॥ श्रीः ॥

# मराठी भाषांतरासह रामायण.

564

## अरण्यकांड.

काशीनाथ वामन लेले वाईकर

यांनीं

वाई येथें मोदवृत्त छापखान्यांत छापून मोदवृत्तवर्तमानपत्रद्वारा

प्रसिद्ध केलें.





शके १८[illegible]

॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं श्रीरामायणम् ।

---

## अरण्यकाण्डम् ।

---

श्रीगणेशाय नमः ॥ प्रविश्य तु महारण्यं दण्डकारण्यमात्मवान् । रामो
ददर्श दुर्धर्षस्तापसाश्रममण्डलम् १ कुशचीरपरिक्षिप्तं ब्राह्म्या लक्ष्म्या
समावृतम् । यथा प्रदीप्तं दुर्दर्शं गगने सूर्यमण्डलम् २ शरण्यं सर्वभूतानां
सुसंमृष्टाजिरं सदा । मृगैर्बहुभिराकीर्णं पक्षिसंघैः समावृतम् ३ पूजितं
चोपनृत्तं च नित्यमप्सरसां गणैः ४ विशालैरग्निशरणैः स्रुग्भाण्डैरजिनैः
कुशैः । समिद्भिस्तोयकलशैः फलमूलैश्च शोभितम् ५ आरण्यैश्च
महावृक्षैः पुण्यैः स्वादुफलैर्वृतम् । बलिहोमार्चितं पुण्यं ब्रह्मघोषनिनादि-

---

ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम् । भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यज सुरेप्सित राज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् । मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ दंडकारण्यसंज्ञक महावनामध्यें प्रविष्ट झाल्यावर शत्रूंनीं वर मान करून अवलोकन करण्यासही अशक्य असलेल्या जितेंद्रिय रामानें तपस्वी लोकांचा आश्रमसमुदाय अवलोकन केला १. कुश आणि वल्कलें ह्यांनीं तो आश्रमसमूह भरलेला असून वेदाभ्यासजन्य तेजानें व्याप्त झाला असल्यामुळें आकाशामध्यें असलेल्या सूर्यमंडलाप्रमाणें तो देदीप्यमान आणि ह्मणूनच राक्षसांनीं वगैरे अवलोकन करण्यास अशक्य झालेला होता २. सर्व प्राण्यांचें तो निवासस्थान होता, त्यांतील आंगणें चांगलीं झाडिलेलीं होतीं, नानाप्रकारच्या मृगांनीं तो गजबजलेला होता, पक्ष्यांच्या समुदायांनीं तो व्याप्त झालेला होता ३ आणि अप्सरांचे समुदाय समीप नृत्य करून त्याला मान देत होते ४. विशाल होमशाला, स्रुक्प्रभृति यज्ञपात्रें, अजिनें, दर्भ, समिधा, उदकांनीं भरलेले कलश आणि फलें व मुळें ह्यांनीं त्याला शोभा आलेली होती ५. स्वादिष्ट फळें देणाऱ्या अरण्यांतील मोठमोठ्या पवित्र वृक्षांनीं तो व्याप्त झालेला होता, वैश्वदेव, होम आणि बलिहरण ह्यांनीं त्याचा सत्कार केलेला होता आणि वेदघोषानें तो पवित्र

तम् ६ पुष्पैश्चान्यैः परिक्षिप्तं पद्मिन्या च सपद्मया । फलमूलाशनैर्दान्तैश्चीर-
कृष्णाजिनाम्बरैः ७ सूर्यवैश्वानराभैश्च पुराणैर्मुनिभिर्युतम् । पुण्यैश्च
नियताहारैः शोभितं परमर्षिभिः ८ तद्ब्रह्मभवनप्रख्यं ब्रह्मघोषनिनादि-
तम् । ब्रह्मविद्भिर्महाभागैर्ब्राह्मणैरुपशोभितम् ९ तद्दृष्ट्वा राघवः श्रीमां-
स्तापसाश्रममण्डलम् । अभ्यगच्छन्महातेजा विज्यं कृत्वा महद्धनुः १०
दिव्यज्ञानोपपन्नास्ते रामं दृष्ट्वा महर्षयः । अभिजग्मुस्तदा प्रीता वैदेहीं
च यशस्विनीम् ११ ते तु सोममिवोद्यन्तं दृष्ट्वा वै धर्मचारिणम् । लक्ष्मणं
चैव दृष्ट्वा तु वैदेहीं च यशस्विनीम् १२ मङ्गलानि प्रयुञ्जानाः प्रत्यगृ-
ह्णन्दृढव्रताः । रूपसंहननं लक्ष्मीं सौकुमार्यं सुवेषताम् १३ ददृशुर्विस्मि-
ताकारा रामस्य वनवासिनः । वैदेहीं लक्ष्मणं रामं नेत्रैरनिमिषैरिव १४
आश्चर्यभूतान्ददृशुः सर्वे ते वनवासिनः । अत्रैनं हि महाभागाः सर्व-
भूतहिते रताः १५ अतिथिं पर्णशालायां राघवं संन्यवेशयन् । ततो
रामस्य सत्कृत्य विधिना पावकोपमाः १६ आजह्रुस्ते महाभागाः

---

आश्रम नादित झालेला होता ६. कमलयुक्त सरोवर आणि इतर पुष्पें ह्यांनीं तो व्याप्त झालेला असून वल्कलें व कृष्णाजिनें परिधान करून फलमूलांवर उपजीविका करणाऱ्या आणि सूर्य व अग्नि ह्यांप्रमाणें तेजस्वी असलेल्या जितेंद्रिय व सनातन मुनींनीं तो युक्त होता व नियमित आहार करणाऱ्या पुण्यवान् महर्षींनीं तो सुशोभित झालेला होता ७,८. असो. वेदघोषानें नादित, वेदवेत्त्या महाभाग्यवान् ब्राह्मणांनीं सुशोभित आणि ब्रह्म-लोकतुल्य ९ असें तें तपस्वी मुनींचें आश्रममंडल अवलोकन केल्यावर महातेजस्वी राम त्या मोठ्या धनुष्याची प्रत्यंचा उतरून समीप गेला १०. तेव्हां ते दिव्यज्ञानसंपन्न महर्षि राम आणि यशस्विनी सीता ह्यांना अवलोकन करण्याबरोबर सुप्रसन्न होऊन पुढें सामोरे आले ११. उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें धर्मनिष्ठ राम, लक्ष्मण आणि यशस्विनी सीता ह्यांना अवलोकन करून त्या १२ स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणाऱ्या महर्षींनीं आशीर्वाद देऊन त्यांचा स्वीकार केला व रामाचा बांधा, कांति, सुकुमारपणा आणि उज्ज्वल वेष पाहून त्या वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या महर्षींच्या मनाला विस्मय वाटला. डोळ्याच्या पापण्याही न लववितां सीता, लक्ष्मण आणि राम ह्या १३,१४ आश्चर्य-कारक झालेल्या त्रिवर्गांना ते सर्व वनवासी अवलोकन करूं लागले. नंतर ह्या आश्रम-मंडलामध्यें महाभाग्यवान् आणि सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं तत्पर असलेल्या त्या महर्षींनीं १५ अतिथि रामाला पर्णकुटिकेमध्यें उतरविलें. तदनंतर रामाचें यथाविधि स्वागत करून त्या अग्नितुल्य तेजस्वी १६, महाभाग्यवान् व धर्मनिष्ठ महर्षींनीं ( रामाच्या

सलिलं धर्मचारिणः । मङ्गलानि प्रयुञ्जाना मुदा परमया युताः १७
मूलं पुष्पं फलं सर्वमाश्रमं च महात्मनः । निवेदयित्वा धर्मज्ञास्ते तु
प्राञ्जलयोऽब्रुवन् १८ धर्मपालो जनस्यास्य शरण्यश्च महायशाः । पूज-
नीयश्च मान्यश्च राजा दण्डधरो गुरुः १९ इन्द्रस्यैव चतुर्भागः प्रजा
रक्षति राघव । राजा तस्माद्वरान्भोगान्रम्यान्भुङ्क्ते नमस्कृतः २० ते वयं
भवता रक्ष्या भवद्विषयवासिनः । नगरस्थो वनस्थो वा त्वं नो राजा
जनेश्वरः २१ न्यस्तदण्डा वयं राजञ्जितक्रोधा जितेन्द्रियाः । रक्ष-
णीयास्त्वया शश्वद्गर्भभूतास्तपोधनाः २२ एवमुक्त्वा फलैर्मूलैः पुष्पैर-
न्यैश्च राघवम् । वन्यैश्च विविधाहारैः सलक्ष्मणमपूजयन् २३ तथाऽन्ये
तापसाः सिद्धा रामं वैश्वानरोपमाः । न्यायवृत्ता यथान्यायं तर्पयामा-
सुरीश्वरम् २४ [ २४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्येऽरण्यकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

कृतातिथ्योऽथ रामस्तु सूर्यस्योदयनं प्रति । आमन्त्र्य स मुनीन्सर्वान्व-

---

पूजेकरितां ) उदक वगैरे आणिलें. नंतर मोठ्या आनंदानें युक्त झालेले व आशीर्वाद देत असलेले १७ ते धर्मवेत्ते महर्षि महात्म्या रामाला मुळें, पुष्पें व फलें अर्पण करून आणि " सर्व आश्रम तुझाच आहे " असें सांगून व हात जोडून त्याला ह्मणाले १८ " हे महायशस्वी रामा, तूं ह्या ऋषि लोकांचा धर्मपालक व रक्षक असून ह्यांना पूज्य व मान्य आहेस. कारण, तूं राजा व दुष्टांचा निग्रह करणारा असून गुरु आहेस १९. हे राघवा, प्रजारक्षक राजा परमात्म्या विष्णूचाच चतुर्थांश असतो आणि ह्मणूनच सर्व लोक त्याला नमस्कार करींत असून श्रेष्ठ व रम्य अशा भोग्य वस्तूंचा तो उपभोग घेत असतो २०. तस्मात्, तुझ्या देशामध्यें वास्तव्य करणाऱ्या आमचें रक्षण तुला कर्तव्य आहे आणि तूं नगरांत असलास किंवा वनांत असलास तरी तूंच लोकाधिपति आमचा राजा आहेस २१. हे राजा, आह्मीं क्रोधसंयमन व इंद्रियदमन करून प्राण्यांचा निग्रह करणाचें सोडिलें आहे. तस्मात्, माता ज्याप्रमाणें गर्भाचें रक्षण करिते त्याप्रमाणें तुला आमचें रक्षण करणें अवश्य आहे " २२. असें सांगून फलें, मुळें, पुष्पें व वनसंबंधी इतर नानाप्रकारचे भक्ष्य पदार्थ ह्यांच्या योगानें त्या महर्षींनीं लक्ष्मणासहवर्तमान रामाचें पूजन केलें २३ व त्याचप्रमाणें इतरही न्यायानें वर्तन करणाऱ्या, अग्नितुल्य तेजस्वी, सिद्ध व तपस्वी मुनींनीं त्या ईश्वरस्वरूप रामाला यथायोग्य रीतीनें तृप्त केलें २४. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

गमेवाभ्यवाहत १ नानामृगगणाकीर्णमृक्षशार्दूलसेवितम् । ध्वस्तवृक्षलतागुल्मं दुर्दर्शसलिलाशयम् २ निष्कूजमानशकुनि झिल्लिकागणनादितम् । लक्ष्मणानुचरो रामो वनमध्यं ददर्श ह ३ सीतया सह काकुत्स्थस्तस्मिन्घोरमृगायुते । ददर्श गिरिशृङ्गाभं पुरुषादं महास्वनम् ४ गभीराक्षं महावक्त्रं विकटं विकटोदरम् । बीभत्सं विषमं दीर्घं विकृतं घोरदर्शनम् ५ वसानं चर्म वैयाघ्रं वसार्द्रं रुधिरोक्षितम् । त्रासनं सर्वभूतानां व्यादितास्यमिवान्तकम् ६ त्रीन्सिंहांश्चतुरो व्याघ्रान्द्वौ वृकौ पृषतान्दश । सविषाणं वसादिग्धं गजस्य च शिरो महत् ७ अवसज्यायसे शूले विनदन्तं महास्वनम् । स रामं लक्ष्मणं चैव सीतां दृष्ट्वा च मैथिलीम् ८ अभ्यधावत्सुसंक्रुद्धः प्रजाः काल इवान्तकः । स कृत्वा भैरवं नादं चालयन्निव मेदिनीम् ९ अङ्केनादाय वैदेहीमपक्रम्य तदाऽब्रवीत् ।

---

आदरातिथ्य झालेला राम सूर्योदयसमयीं त्या सर्व मुनींचा निरोप घेऊन वनामध्येंच प्रविष्ट झाला १. तें वन नानाप्रकारच्या मृगसमुदायांनीं व्याप्त होतें, अस्वलें व वाघ त्यांत रहात होते, त्यांतील वृक्ष, लता आणि झुडपें ह्यांचा नाश झालेला होता, त्यांतील उदकस्थान कोठें आहे हें दिसेनासें झालें होतें २, त्यांतील पक्षी शब्द करीत नव्हते व फक्त चिलटांची मात्र गुणगुण तेथें चालली होती. असें तें वन लक्ष्मण बरोबर असलेल्या रामानें अवलोकन केलें ३. श्वापदांनीं युक्त असलेल्या त्या वनामध्यें सीतेसहवर्तमान रामानें पर्वतशिखरासारिखा एक प्रचंड गर्जना करीत असलेला राक्षस अवलोकन केला ४. मोठमोठ्या कूपासारिखे खोल डोळे, प्रचंड मुख, विशाल उदर आणि भयंकर मुद्रा ह्यांनीं युक्त, विशाल, बीभत्स, ओबडधोबड, कुरूप, लांबलचक ५, व्याघ्रचर्म परिधान केलेला, वसेनें ( ह्मणजे मांसामध्यें असलेल्या स्निग्ध पदार्थानें ) भिजलेला, शरीरावर रक्ताचा सडा झालेला, आ पसरलेला, सर्व प्राण्यांना त्रस्त करून सोडणारा आणि सर्वांचा घात करणारा असा तो राक्षस होता ६ व त्यावेळीं तीन सिंह, चार व्याघ्र, दोन लांडगे, पृषत्संज्ञक दहा मृग आणि वसेनें थोपडलेले व पुढल्या दातांसकट असलेलें एक गजाचें मोठें मस्तक ७ इतकें सामान भक्षणाकरितां एका लोखंडाच्या सुळाला अडकावून ठेऊन तो अतिशय उच्च स्वरानें गर्जना करीत होता. राम, लक्ष्मण आणि जनककन्या सीता ह्यांना अवलोकन केल्याबरोबर प्रलयांतसमयीं क्रुद्ध झालेला मृत्यु ज्याप्रमाणें लोकांकडे धांवतो त्याप्रमाणें तो राक्षस अत्यंत क्रुद्ध होऊन त्यांच्याकडे धांवला. नंतर भयंकर गर्जना करून पृथ्वी कंपित करीत करीत ८, ९ तो राक्षस पुढें आला आणि सीतेला कमरेशीं धरून व उचलून घेऊन तेथून पलीकडे

युवां जटाचीरधरौ सभार्यौ क्षीणजीवितौ १० प्रविष्टौ दण्डकारण्यं शर-
चापासिपाणिनौ । कथं तापसयोर्वां च वासः प्रमदया सह ११
अधर्मचारिणौ पापौ कौ युवां मुनिदूषकौ । अहं वनमिदं दुर्गं विराधो
नाम राक्षसः १२ चरामि सायुधो नित्यमृषिमांसानि भक्षयन् । इयं
नारी वरारोहा मम भार्या भविष्यति १३ युवयोः पापयोश्चाहं पास्यामि
रुधिरं मृधे । तस्यैवं ब्रुवतो दुष्टं विराधस्य दुरात्मनः १४ श्रुत्वा सग-
र्वितं वाक्यं संभ्रान्ता जनकात्मजा । सीता प्रवेपितोद्वेगात्प्रवाते कदली
यथा १५ तां दृष्ट्वा राघवः सीतां विराधाङ्कगतां शुभाम् । अब्रवील्ल-
क्ष्मणं वाक्यं मुखेन परिशुष्यता १६ पश्य सौम्य नरेन्द्रस्य जनक-
स्यात्मसंभवाम् । मम भार्यां शुभाचारां विराधाङ्के प्रवेशिताम् १७
अत्यन्तसुखसंवृद्धां राजपुत्रीं यशस्विनीम् । यदभिप्रेतमस्मासु प्रियं वर-
वृतं च यत् १८ कैकेय्यास्तु सुसंवृत्तं क्षिप्रमद्यैव लक्ष्मण । या न तुष्यति

---

गेल्यावर म्हणाला " बाण, धनुष्य आणि खड्ग हातांत घेऊन व जटा आणि वल्कलें धारण करून दंडकारण्यामध्यें भार्येसहवर्तमान प्रविष्ट झालेल्या तुम्हां उभयतांचें आयुष्य संपलें. अहो तरुण स्त्रीसहवर्तमान तुम्ही तपस्वी अरण्यामध्यें कसेंरे वास्तव्य करितां ? १०, ११. (मुनि-वेषास विरुद्ध अशीं आयुधें धारण करून एकाच स्त्रीचे ठिकाणीं रत असलेले ) असे अधर्म-निष्ठ तुम्ही पापी आणि मुनींच्या नांवाला बट्टा लावणारे कोणरे आहांत ? १२. मी विराधनामक राक्षस आहें आणि हातामध्यें आयुध धारण करून ह्या भयंकर वनामध्यें संचार करीत करीत ऋषींच्या मांसाचें भक्षण करीत असतों. ही वरण्यास योग्य असलेली स्त्री माझी भार्या होईल १३. मी युद्धामध्यें तुम्हां पापरूपी उभयतांचें रुधिर प्राशन करीन." ह्याप्रमाणें त्या दुरात्म्या विराधाचें गर्वयुक्त भाषण श्रवण करितांक्षणीं जनकराजकन्या सीता भयभीत होऊन वाऱ्यानें हालणाऱ्या केळीप्रमाणें थरथर कांपूं लागली १४, १५. व इतक्यात ती शुभ जानकी विराधाच्या अंकावर बसलेली पाहून शोकानें म्लानवदन झालेला राम लक्ष्मणाला म्हणाला १६ " बा सौम्य लक्ष्मणा, राजश्रेष्ठ जनकराजापासून उत्पन्न झालेली, लहान-पणापासून सुखामध्येंच वाढलेली व उत्कृष्ट वर्तन करणारी अशी माझी भार्या म्हणून प्रसिद्ध असलेली यशस्विनी सीता विराधाच्या अंकावर बसलेली तूं अवलोकन कर १७. हे लक्ष्मणा, वनामध्यें आम्हांला जें दुःख व्हावें म्हणून कैकेयीला वाटत होतें तें व वर-प्रद करून जें प्रिय करून घ्यावयाचें होतें १८ तें हें सर्व तिचें अभिलषित आजच सिद्धां प्राप्त झालें ! ती मोठी दीर्घदर्शी असल्यामुळें आपल्या पुत्राला राज्य प्राप्त झालें एवढ्यानेंच तृप्त होत नसून तें त्याला चिरकाल मिळण्याकरितां आमच्या नाशाची इच्छा

राज्येन पुत्रार्थे दीर्घदर्शिनी १९ यथाऽहं सर्व भूतानां प्रियः प्रस्थापितो
वनम् । अद्येदानीं सकामा सा या माता मध्यमा मम २० परस्पर्शात्तु
वैदेह्या न दुःखतरमस्ति मे । पितुर्विनाशात्सौमित्रे स्वराज्यहरणात्तथा २१
इति ब्रुवति काकुत्स्थे बाष्पशोकपरिप्लुतः । अब्रवील्लक्ष्मणः क्रुद्धो
रुद्धो नाग इव श्वसन् २२ अनाथ इव भूतानां नाथस्त्वं वासवोपमः
मया प्रेष्येण काकुत्स्थ किमर्थं परितप्यसे २३ शरेण निहतस्याद्य मया
क्रुद्धेन रक्षसः । विराधस्य गतासोर्हि मही पास्यति शोणितम् २४
राज्यकामे मम क्रोधो भरते यो बभूव ह । तं विराधे विमोक्ष्यामि वज्री
वज्रमिवाचले २५ मम भुजबलवेगवेगितः पततु शरोऽस्य महान्महोरसि
व्यपनयतु तनोश्च जीवितं पततु ततश्च महीं विघूर्णितः २६ [ ९० ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

अथोवाच पुनर्वाक्यं विराधः पूरयन्वनम् । पृच्छतो मम हि ब्रूतं

---

करीत आहे १९. आज सर्व प्राणिमात्रांना प्रिय असलेल्या मला वनामध्यें पाठवून देऊन ती ( कौसल्यापेक्षां कनिष्ठ व सुमित्रेपेक्षां वडील असलेली ) माझी मधली माता कैकेयी कृतकृत्य झाली २०. बा लक्ष्मणा, जरी माझ्या पित्याचा नाश झाला आहे व मी आपल्या स्वतःच्या राज्यापासून भ्रष्ट झालों आहें तरी मुळीं विदेहराजकन्या सीतेला दुसऱ्यानें स्पर्श केलेला पाहून जें दुःख होतें त्यापेक्षां जास्त दुसरें कशानेंही दुःख मला होत नाहीं " २१. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचें भाषण श्रवण केल्यावर शोकामुळें ज्याच्या नेत्रांतून अश्रुधारा वहात आहेत असा लक्ष्मण कोंडून ठेवलेल्या सर्पाप्रमाणें श्वासोच्छ्वास टाकीत रागावून बोलूं लागला २२. ( तो म्हणाला ) ' हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामचंद्रा, तूं सर्व भूतांचा नाथ असून ( पराक्रमाविषयीं ) इंद्रासारिखा असतां अनाथाप्रमाणें शोक कां करीत आहेस ? २३. तुझा सेवक मी क्रुद्ध झालों असतां त्या विराध राक्षसाला बाणानें प्रहार करून गतप्राण करीन व त्यामुळें त्याच्या शरीरांतून निघालेलें रक्त ही पृथ्वी प्राशन करील २४. वज्र धारण करणारा इंद्र ज्याप्रमाणें पर्वताला वज्राचा प्रहार करितो त्याप्रमाणें राज्यासंबंधानें भरताविषयीं जो मला क्रोध आला आहे तो मी त्या राक्षसावर उगवीन २५. माझ्या भुजबलांच्या वेगानें ज्याला वेग प्राप्त झाला आहे असा एक मोठा बाण त्याच्या विस्तीर्ण हृदयाचे ठिकाणीं जाऊन पडो व त्याच्या योगानें त्याचें जीवित नाहींसें होऊन मूर्च्छा येऊन तो या पृथ्वीवर पडो " २६. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडांपैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

कौ कुत्र च गमिष्यतः १ तमुवाच ततो रामो राक्षसं ज्वलिताननम्।
पृच्छन्तं सुमहातेजा इक्ष्वाकुकुलमात्मनः २ क्षत्रियौ वृत्तसंपन्नौ विद्धि
नौ वनगोचरौ। त्वां तु वेदितुमिच्छावः कस्त्वं चरसि दण्डकान् ३
तमुवाच विराधस्तु रामं सत्यपराक्रमम्। हन्त वक्ष्यामि ते
राजन्निबोध मम राघव ४ पुत्रः किल जवस्याहं माता मम शत-
ह्रदा। विराध इति मामाहुः पृथिव्यां सर्व राक्षसाः ५ तपसा चाभिसं-
प्राप्ता ब्रह्मणो हि प्रसादजा। शस्त्रेणावध्यता लोके च्छेद्याभेद्यत्वमेव च ६
उत्सृज्य प्रमदामेनामनपेक्षौ यथागतम्। त्वरमाणौ पलायेथां न वां जीवि-
तमाददे ७ तं रामः प्रत्युवाचेदं कोपसंरक्तलोचनः। राक्षसं विकृताकारं
विराधं पापचेतसम् ८ क्षुद्र धिक्त्वां तु हीनार्थं मृत्युमन्वेषसे ध्रुवम्।
रणे प्राप्स्यसि संतिष्ठ न मे जीवन्विमोक्ष्यसे ९ ततः सज्यं धनुः
कृत्वा रामः सुनिशिताञ्शरान्। सुशीघ्रमभिसंधाय राक्षसं निजघानतम् १०

---

"तदनंतर विराध आपल्या शब्दानें तें वन नादित करीत करीत पुनरपि ह्मणाला " अरे तुह्मी कोण आहांत व कोणीकडे जाणार हें मला कथन करा " १. ( हें श्रवण करितांक्षणीं ) महातेजस्वी राम ज्याच्या तोंडांतून ज्वाला चालल्या आहेत अशा त्या विराध राक्षसाला ह्मणाला "आह्मी इक्ष्वाकुकुलामध्यें उत्पन्न झालों असून २ क्षत्रिय असतां कांहीं कारणानें वनामध्यें संचार करीत आहोंत आतां तूं कोण आहेस व ह्या दंडकारण्यामध्यें संचार कां करीत आहेस हें जाणण्याची आमची इच्छा आहे " ३. तदनंतर तो विराध राक्षस त्या सत्यपराक्रमी रामाला ह्मणाला " हे राजा रामचंद्रा, मी आपलें वृत्त सांगतों; तें तूं श्रवण कर ४. मी जवनामक राक्षसाचा पुत्र असून माझी माता शतह्रदा होय व ह्या पृथ्वीवर सर्व राक्षस मला विराध असें ह्मणतात ५. मी तपाच्या योगानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन त्याच्यापासून ह्या लोकामध्यें शस्त्रानें अवध्यता, अच्छेद्यता व अभेद्यता हीं प्राप्त करून घेतलीं आहेत ६. करितां, ह्या स्त्रियेला सोडून देऊन मोठ्या त्वरेनें जसे आलांत तसे निघून जा; मी तुमचे प्राण हरण करणार नाहीं ७. तेव्हां ( हें त्या राक्षसाचें वाक्य श्रवण करून ) कोपानें आरक्त नेत्र झालेला राम भयंकर आकृतीच्या महापापी विराधाला ह्मणाला ८ " हे अधमा, तुला धिक्कार असो ! ( दुसऱ्याच्या स्त्रियेला स्पर्श करण्याचें ) हें नीच कृत्य करून तूं आपल्याला रणांगणामध्यें मृत्यु प्राप्त करून घेत आहेस. आतां माझ्या समोर उभा रहा. माझ्या हातून तूं जिवंत सुटणार नाहींस " ९. ह्याप्रमाणें भाषण केल्यानंतर रामानें धनुष्य सज्ज केलें आणि तीक्ष्ण धारा असलेले बाण सत्वर धनुष्याला लावून त्या राक्षसाला प्रहार केला १०.

धनुषा ज्यागुणवता सप्त बाणान्मुमोच ह । रुक्मपुङ्खान्महावेगा-
न्सुपर्णानिलतुल्यगान् ११ ते शरीरं विराधस्य भित्त्वा बर्हिणवाससः ।
निपेतुः शोणितादिग्धा धरण्यां पावकोपमाः १२ स विद्धो न्यस्य वैदेहीं
शूलमुद्यम्य राक्षसः । अभ्यद्रवत्सुसंक्रुद्धस्तदा रामं सलक्ष्मणम् १३ स
विनद्य महानादं शूलं शक्रध्वजोपमम् । प्रगृह्याशोभत तदा व्यात्तानन
इवान्तकः १४ अथ तौ भ्रातरौ दीप्तं शरवर्षं ववर्षतुः । विराधे राक्षसे
तस्मिन्कालान्तकयमोपमे १५ स प्रहस्य महारौद्रः स्थित्वाऽजृम्भत राक्षसः ।
जृम्भमाणस्य ते बाणाः कायान्निष्पेतुराशुगाः १६ स्पर्शात्तु वरदानेन
प्राणान्संरोध्य राक्षसः । विराधः शूलमुद्यम्य राघवावभ्यधावत १७
तच्छूलं वज्रसंकाशं गगने ज्वलनोपमम् । द्वाभ्यां शराभ्यां चिच्छेद राघवः
शस्त्रभृतां वरः १८ तद्रामविशिखैश्छिन्नं शूलं तस्यापतद्भुवि । वज्राश-
निना च्छिन्नं मेरोरिव शिलातलम् १९ तौ खड्गौ क्षिप्रमुद्यम्य कृष्णसर्पावि-

---

नंतर प्रत्यंचा चढविलेल्या धनुष्याला सोन्याचा पिसारा असलेले व गरुड आणि वायु ह्यांप्रमाणें शीघ्र गमन करणारे असे सात बाण लावून त्या राक्षसावर सोडिले ११ व ते मोराचा पिसारा असलेले बाण विराधाच्या शरीराचा भेद करून अग्नीप्रमाणें उज्ज्वल असे ते रक्तानें भरून जमीनीवर पडले १२. ह्याप्रमाणें त्या राक्षसाला प्रहार होतांच त्यानें वैदेहीला खालीं ठेविल्यावर आपल्या हातामध्यें शूल घेतला आणि तो लक्ष्मणासहवर्तमान रामावर धांवला १३. तेव्हां त्या राक्षसानें मोठ्यानें गर्जना करून इंद्राच्या ध्वजाप्रमाणें असलेला शूल हातामध्यें घेतला असतां तो मुख पसरलेल्या यमाप्रमाणें दिसूं लागला १४ व त्याला पाहून प्रलयकालच्या प्राणिघातक यमाप्रमाणें असलेल्या त्या विराध राक्षसावर ते दोघे भ्राते रामलक्ष्मण दिव्य बाणांची वृष्टि करूं लागले १५. तेव्हां ( शस्त्रानें अवध्य असलेल्या माझ्यावर हे व्यर्थ बाणवृष्टि करीत आहेत ) असें पाहून तो महाभयंकर राक्षस हंसला व जांभया देत उभा राहिला आणि ते सर्व बाण त्याच्या शरीरापासून आपोआप गळून पडूं लागले १६. वरदानामुळें अत्यंत वेदना झाल्या असतांही ज्याचे प्राण गेले नाहींत असा तो विराध आपल्या हातामध्यें शूल घेऊन त्या रामलक्ष्मणांकडे धांवला १७. तेव्हां शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा रामानें वज्राप्रमाणें कांति असलेला व अग्नीसारखा देदीप्यमान असा आकाशांतून येणारा तो त्याचा शूल दोन बाणांनीं तोडून टाकिला १८ व तो रामाच्या बाणांनीं तुटून पडलेला शूल वज्रप्रहारानें छिन्न होऊन पडलेल्या मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें दिसूं लागला १९. तो शूल पडल्याबरोबर त्या दोघांनीं कृष्ण-

योधतौ । तूर्णमापेततुस्तस्य तदा प्रहरतां बलात् २० स वध्यमानः सुभृशं
भुजाभ्यां परिगृह्यतौ। अप्रकम्प्यौ नरव्याघ्रौ रौद्रः प्रस्थातुमैच्छत २१ तस्या-
भिप्रायमाज्ञाय रामो लक्ष्मणमब्रवीत्। वहत्वयमलं तावत्पथानेन तु राक्षसः २२
यथा चेच्छति सौमित्रे तथा वहतु राक्षसः। अयमेव हि नः पन्था येन याति
निशाचरः २३ स तु स्वबलवीर्येण समुत्क्षिप्य निशाचरः। बालाविव स्कन्ध-
गतौ चकारातिबलोद्धतः २४ तावारोप्य ततः स्कन्धं राघवौ रजनी-
चरः । विराधो विनदन्घोरं जगामाभिमुखो वनम् २५ वनं महामेघ-
निभं प्रविष्टो द्रुमैर्महद्भिर्विविधैरुपेतम् । नानाविधैः पक्षिकुलैर्विचित्रं
शिवायुतं व्यालमृगैर्विकीर्णम् २६ [ ७६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

ह्रियमाणौ तु काकुत्स्थौ दृष्ट्वा सीता रघूत्तमौ । उच्चैःस्वरेण चुक्रोश
प्रगृह्य सुमहाभुजौ १ एष दाशरथी रामः सत्यवाञ्छीलवाञ्छुचिः ।

---

सर्पाप्रमाणें असलेले दोन खड्ग तत्क्षणीं आपल्या हातामध्यें घेऊन त्या विराध राक्षसाला प्रहार केला २०. ह्याप्रमाणें अतिशय प्रहार केला असतांही युद्धामध्यें न हालणाऱ्या त्या पुरुषश्रेष्ठांना आपल्या भुजांमध्यें घेऊन पळून जाण्याची तो विराध इच्छा करूं लागला असतां २१ त्याचा तो आशय जाणून राम लक्ष्मणाला ह्मणाला " ह्या मार्गानें हा राक्षस आपणांला पाहिजे तितकें दूर घेऊन जावो २२. हे लक्ष्मणा, ह्याची इच्छा असेल त्याप्रमाणें हा राक्षस आपणांला घेऊन जाऊं दे. ज्या मार्गानें हा राक्षस चालला आहे तोच आपला मार्ग आहे " २३. तदनंतर अतिशय बलामुळें गर्विष्ठ झालेल्या त्या राक्षसानें आपल्या बलाच्या प्रभावानें त्या रामलक्ष्मणांना वर उचलून धरिलें आणि मुलांप्रमाणें खांद्यावर ठेवून दिलें २४. त्या रघुवंशज रामलक्ष्मणांना ह्याप्रमाणें खांद्यावर घेतल्यानंतर तो विराध राक्षस भयंकर गर्जना करीत करीत दंडकारण्याकडे तोंड करून निघाला २५. सारांश, नानाप्रकारच्या मोठमोठ्या वृक्षांनीं युक्त, अनेक प्रकारच्या पक्षिसमुदायामुळें चित्रविचित्र, कोल्ह्यांनीं व्याप्त, श्वापदांनीं व मृगांनीं गजबजलेल्या आणि मोठ्या मेघाप्रमाणें असलेल्या वनामध्यें तो राक्षस प्रविष्ट झाला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

रघुवंशजश्रेष्ठ ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांना विराध राक्षस घेऊन जात आहे असें आढळून आल्यावर सीता आपले मोठे हात वर करून उच्च स्वरानें आक्रोश करूं लागली १. ( ती ह्मणाली ) " सत्यनिष्ठ, सुशील व पवित्र असलेल्या ह्या

रक्षसा रौद्ररूपेण ह्रियते सहलक्ष्मणः २ मामृक्षा भक्षयिष्यन्ति शार्दूलद्वीपिनस्तथा । मां हरोत्सृज काकुत्स्थौ नमस्ते राक्षसोत्तम ३ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा वैदेह्या रामलक्ष्मणौ । वेगं प्रचक्रतुर्वीरौ वधे तस्य दुरात्मनः ४ तस्य रौद्रस्य सौमित्रिः सव्यं बाहुं बभञ्ज ह । रामस्तु दक्षिणं बाहुं तरसा तस्य रक्षसः ५ स भग्नबाहुः संविग्नः पपाताशु विमूर्छितः । धरण्यां मेघसंकाशो वज्रभिन्न इवाचलः ६ मुष्टिभिर्बाहुभिः पद्भिः सूदयन्तौ तु राक्षसम् । उद्यम्योद्यम्य चाप्येनं स्थण्डिले निष्पिपेषतुः ७ स विद्धो बहुभिर्बाणैः खड्गाभ्यां च परिक्षतः । निष्पिष्टो बहुधा भूमौ न ममार स राक्षसः ८ तं प्रेक्ष्य रामः सुभृशमवध्यमचलोपमम् । भयेष्वभयदः श्रीमानिदं वचनमब्रवीत् ९ तपसा पुरुषव्याघ्र राक्षसोयं न शक्यते । शस्त्रेण युधि निर्जेतुं राक्षसं निखनावहै १० कुञ्जरस्येव रौद्रस्य राक्षसस्यास्य लक्ष्मण । वनेस्मिन्सुमहच्छ्वभ्रं खन्यतां रौद्रवर्चसः ११ इत्युक्त्वा लक्ष्मणं रामः प्रदरः खन्यतामिति । तस्थौ विराधमाक्रम्य

---

दाशरथि रामाला लक्ष्मणासहवर्तमान विराध राक्षस घेऊन जात आहे २. आतां मला अस्वलें, वाघ आणि चित्ते खाऊन टाकितील. हे राक्षसश्रेष्ठा, मी तुला हात जोडितें. तूं मला ने आणि ह्या ककुत्स्थवंशजांना सोड." ३. हें त्या सीतेचें भाषण कानीं आल्यावर वीर रामलक्ष्मणांनीं त्या दुरात्म्याच्या वधाविषयीं त्वरा केली ४ व त्या भयंकर राक्षसाचा डावा हात लक्ष्मणानें व उजवा रामानें जोर करून फोडिला ५. तेव्हां हात मोडून गेलेला तो राक्षस व्याकुल झाला आणि वज्रानें विदीर्ण झालेल्या पर्वताप्रमाणें तो मेघतुल्य राक्षस मूर्च्छित होऊन लगेच भूमीवर पडला ६. बुक्क्यांनीं, चपराकांनीं आणि लाथांनीं त्या राक्षसाला ते मारूं लागले आणि प्रयत्न करकरून त्याला ते भूमीवर अगदीं चिरडूं लागले ७; परंतु, अनेक बाणांनीं जरी तो विद्ध झाला होता, खड्गांनीं जरी त्याच्या सर्व शरीरावर जखमा झालेल्या होत्या. आणि भूमीवर जरी तो अनेक प्रकारांनीं चिरडलेला होता तरी तो राक्षस मेला नाहीं ८. तेव्हां भयप्रसंगीं अभय देणारा श्रीमान् राम त्या अत्यंत अवध्य असलेल्या पर्वतप्राय राक्षसाकडे पाहून ह्मणाला ९ "हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, तपश्चर्या करून ह्या राक्षसानें वर प्राप्त करून घेतला असल्यामुळें शस्त्रानें युद्धामध्यें ह्याचा पराभव होणें, शक्य नाहीं. ह्यास्तव, आपण ह्या राक्षसाला पुरून टाकूं १०. तेव्हां, हे लक्ष्मणा प्रचंड हत्तीला पुरण्याकरितां जसा फारच मोठा खड्डा खणावा लागतो तसा ह्या उग्र तेजानें युक्त असलेल्या राक्षसाकरितां तूं ह्या वनामध्यें बराच मोठा

कण्ठे पादेन वीर्यवान् १२ तच्छ्रुत्वा राघवेणोक्तं राक्षसः प्रश्रितं वचः ।
इदं प्रोवाच काकुत्स्थं विराधः पुरुषर्षभम् १३ हतोहं पुरुषव्याघ्र शक्र-
तुल्यबलेन वै । मया तु पूर्वं त्वं मोहान्न ज्ञातः पुरुषर्षभ १४ कौसल्या
सुप्रजास्तात रामस्त्वं विदितो मया । वैदेही च महाभागा लक्ष्मणश्च
महायशाः १५ अभिशापादहं घोरां प्रविष्टो राक्षसीं तनुम् । तुम्बु-
रुर्नाम गन्धर्वः शप्तो वैश्रवणेन हि १६ प्रसाद्यमानश्च मया सोऽब्र-
वीन्मां महायशाः । यदा दाशरथी रामस्त्वां वधिष्यति संयुगे १७ तदा
प्रकृतिमापन्नो भवान्स्वर्गं गमिष्यति । अनुपस्थीयमानो मां स क्रुद्धो
व्याजहार ह १८ इति वैश्रवणो राजा रम्भासक्तमुवाच ह । तव प्रसा-
दान्मुक्तोहमभिशापात्सुदारुणात् १९ भुवनं स्वं गमिष्यामि स्वस्ति
वोस्तु परंतप । इतो वसति धर्मात्मा शरभङ्गः प्रतापवान् २० अध्य-
र्धयोजने तात महर्षिः सूर्यसंनिभः । तं क्षिप्रमभिगच्छ त्वं स ते
श्रेयोभिधास्यति २१ अवटे चापि मां राम निक्षिप्य कुशली व्रज ।

---

खड्डा खण " ११. ह्याप्रमाणें " खड्डा खण " ह्मणून लक्ष्मणाला सांगितल्यावर वीर्यवान् राम विराध राक्षसाच्या मानेवर पाय देऊन उभा राहिला १२. तेव्हां तें रामानें केलेलें भाषण श्रवण करून तो विराध राक्षस पुरुषश्रेष्ठ रामाला नम्रपणें ह्मणाला १३. " हे पुरुषश्रेष्ठा. तूं इंद्रतुल्य बलाढ्यानें माझा वध केला आहेस. हे पुरुषोत्तमा, मीं पूर्वीं मोहामुळें तुला ओळखिलें नाहीं १४. बा रामा, तुझ्या योगानें कौसल्या सुपुत्रवती झाली आहे, तुज रामाला, महाभाग्यवती सीतेला आणि महायशस्वी लक्ष्मणाला मीं आतां ओळखिलें १५. ही घोर राक्षसी तनु मला शापामुळें प्राप्त झालेली आहे; परंतु, मी पूर्वीं तुंबुरुनामक गंधर्व असून कुबेरानें मला शाप दिला होता १६. शाप झाल्यानंतर मी शापनिवृत्तीकरितां त्याची प्रार्थना करूं लागलों असतां तो महायशस्वी कुबेर ह्मणाला " दाशरथि राम जेव्हां संग्रामामध्यें तुझा वध करील १७ तेव्हां तुला आपलें गंधर्वरूप प्राप्त होऊन तूं स्वर्गाला जाशील " मी रंभेचे ठिकाणीं आसक्त होऊन गेल्या कारणानें माझ्या हातून कुबेरराजाची सेवा होईनाशी झाल्यामुळें क्रुद्ध होऊन त्यानें मला तसा शाप दिला होता व त्याच्याच सांगण्याप्रमाणें मी आतां तुझ्या कृपेनें त्या अत्यंत भयंकर शापांतून मुक्त झालों आहें १८,१९. मी आतां आपल्या स्वर्गलोकाला जातों; हे शत्रुतापना, तुमचें कल्याण असो. येथून सुमारें दीड योजनावर प्रतापी, धर्मनिष्ठ आणि सूर्यासारिखे तेजस्वी असे शरभंग महर्षि रहात आहेत. त्यांच्याकडे तूं सत्वर जा. ते महर्षि तुझें कल्याण करतील २०,२१. हे रामा, मला खळीमध्यें गाडून,

रक्षसां गतसत्त्वानामेष धर्मः सनातनः २२ अवटे ये निधीयन्ते तेषां लोकाः सनातनाः । एवमुक्त्वा तु काकुत्स्थं विराधः शरपीडितः २३ बभूव स्वर्गसंप्राप्तो न्यस्तदेहो महाबलः । तच्छ्रुत्वा राघवो वाक्यं लक्ष्मणं व्यादिदेश ह २४ कुञ्जरस्येव रौद्रस्य राक्षसस्यास्य लक्ष्मण । वनेऽस्मिन्सुमहाञ्छ्वभ्रः खन्यतां रौद्रकर्मणः २५ इत्युक्त्वा लक्ष्मणं रामः प्रदरः खन्यतामिति । तस्थौ विराधमाक्रम्य कण्ठे पादेन वीर्यवान् २६ ततः खनित्रमादाय लक्ष्मणः श्वभ्रमुत्तमम् । अखनत्पार्श्वतस्तस्य विराधस्य महात्मनः २७ तं मुक्तकण्ठमुत्क्षिप्य शङ्कुकर्णं महास्वनम् । विराधं प्राक्षिपच्छ्वभ्रे नदन्तं भैरवस्वनम् २८ तमाहवे दारुणमाशुविक्रमौ स्थिराबुभौ संयति रामलक्ष्मणौ । मुदान्वितौ चिक्षिपतुर्भयावहं नदन्तमुत्क्षिप्य बलेन राक्षसम् २९ अवध्यतां प्रेक्ष्य महासुरस्य तौ शितेन शस्त्रेण तदा

---

टाकून मग तूं खुशाल जा. कारण, गतप्राण झालेल्या राक्षसांचा खळींत रहाणें हा सनातन धर्म असून २२ जे राक्षस खळीमध्यें पुरले जातात त्यांना अक्षय्य लोक प्राप्त होतात " ह्याप्रमाणें पीडित झालेला तो महाबलाढ्य राक्षस रामाला सांगून व देहत्याग करून स्वर्गाला गेला. तेव्हां तें त्याचें भाषण ऐकून राम पुनरपि लक्ष्मणाला ह्मणाला २३,२४ " हे लक्ष्मणा, प्रचंड हत्तीला पुरण्याकरितां जसा फारच मोठा खड्डा खणावा लागतो तसा ह्या क्रूरकर्मी राक्षसाकरितां तूं ह्या वनामध्यें बराच मोठा खड्डा खण " २५. ह्याप्रमाणें " खड्डा खण " ह्मणून लक्ष्मणाला सांगितल्यावर वीर्यवान् राम विराध राक्षसाच्या मानेवर पाय देऊन उभा राहिला २६. तदनंतर लक्ष्मणानें कुदळ घेऊन त्या विराधाच्या बाजूला एक चांगलासा खड्डा काढिला २७ व रामानें त्याच्या मानेवरून पाय काढिल्यावर शंकूप्रमाणें कठिण कर्ण व महाध्वनि ह्यांनीं युक्त असलेला तो विराध राक्षस भयंकर गर्जना करीत असतांना लक्ष्मणानें त्याला त्या खड्ड्यांत लोटून दिलें २८. युद्धामध्यें धैर्य धरून रहाणाऱ्या त्या उभयतां चपल रामलक्ष्मणांनीं त्या घोर राक्षसाला संग्रामामध्यें जिंकिलें आणि स्वसामर्थ्यानें त्याला उचलून तो भयंकर गर्जना करीत असतां आनंदयुक्त झालेल्या त्या रामलक्ष्मणांनीं त्याला खाड्यांत टाकून दिलें २९. सारांश, तीक्ष्ण शस्त्रानें त्या महादैत्याचा वध होत नाहीं असें आढळून आल्यावर युद्धामध्यें

---

१ सांप्रतही राक्षसधर्मानें वागणाऱ्यांना लोकामध्यें मरणानंतर जमिनींत पुरण्याची जी पद्धति दृष्टीस पडते ती फार प्राचीन कालापासून चालत आलेली आहे आणि पुरणें हा मुक्तीचा उपाय ह्मणून त्या लोकांच्या धर्मग्रंथांत सांगितलेंही आहे.

नरर्षभौ । समर्थं चात्यर्थविशारदावुभौ बिले विराधस्य वधं
प्रचक्रतुः ३० स्वयं विराधेन हि मृत्युमात्मनः प्रसह्य रामेण यथा-
र्थमीप्सितः । निवेदितः काननचारिणा स्वयं न मे वधः शस्त्रकृतो
भवेदिति ३१ तदेव रामेण निशम्य भाषितं कृता मतिस्तस्य बिल-
प्रवेशने । बिलं च तेनातिबलेन रक्षसा प्रवेश्यमानेन वनं विनादितम् ३२
प्रहृष्टरूपाविव रामलक्ष्मणौ विराधमुर्व्यां प्रदरे निपात्य तम् । ननन्द-
तुर्वीतभयौ महावने दिवि स्थितौ चन्द्रदिवाकराविव ३३ [ १०९ ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

हत्वा तु तं भीमबलं विराधं राक्षसं वने । ततः सीतां परिष्वज्य समा-
श्वास्य च वीर्यवान् १ अब्रवीद्भ्रातरं रामो लक्ष्मणं दीप्ततेजसम् । कष्टं
वनमिदं दुर्गं न च स्मो वनगोचराः २ अभिगच्छामहे शीघ्रं शरभङ्गं
तपोधनम् । आश्रमं शरभङ्गस्य राघवोभिजगाम ह ३ तस्य देवप्रभा-
वस्य तपसा भावितात्मनः । समीपे शरभङ्गस्य ददर्श महदद्भुतम् ४

---

अत्यंत निपुण असलेल्या त्या उभयतां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांनीं विराधाला खाड्यांत पुरून त्याचा वध केला ३०. रामाच्या हातून इच्छिलेला जो मृत्यु त्या आपला उद्देश सिद्धीस नेणाऱ्या मृत्यूला उद्देशून अरण्यांत संचार करणाऱ्या राक्षसानें "शस्त्रानें माझा वध होणार नाहीं" असें स्वतः रामाला निवेदन केलें ३१. तेव्हां तेंच त्याचें भाषण ऐकून त्याला खाड्यांत टाकण्याचा त्यानें विचार केला आणि ते त्या राक्षसाला खाड्यांत टाकूं लागले असतां त्यानें तें वन दणाणून सोडिलें ३२. असो. ह्याप्रमाणें त्या विराध राक्षसाला भूमींतील खळींत टाकून ते रामलक्ष्मण आनंदित झाले आणि आकाशांतील सूर्यचंद्राप्रमाणें ते त्या महावनामध्यें ( कांहीं दिवस ) निर्भय होऊन आनंदांत राहिले ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चौथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

त्या भयंकर बलानें युक्त असलेल्या विराध राक्षसाचा वध करून आणि सांत्वन-पूर्वक सीतेला आलिंगन देऊन तो वीर्यवान् राम उज्ज्वल तेजस्वी भ्रात्या लक्ष्मणाला ह्मणाला १ "हें वन पीडादायक व गमनाला अयोग्य असें आहे आणि आपणांला तर आजपर्यंत वनामध्यें रहाण्याचा अनुभव नाहीं २. ह्यास्तव, आतां आपण सत्वर तपोधन शरभंग ऋषींकडे जाऊं" असें ह्मणून राम शरभंग मुनींच्या आश्रमाला गेला ३. तेव्हां तपश्चर्येनें ज्यांचें चित्त शुद्ध झालेलें आहे व देवांप्रमाणें ज्यांचा प्रभाव आहे अशा त्या शरभंग मुनींच्या आश्रमासमीप रामानें एक मोठा अद्भुत

अग्निहोत्रमुपासीनं शरभङ्गमुपागमत् २५ तस्य पादौ च संगृह्य रामः सीता च लक्ष्मणः । निषेदुस्तदनुज्ञाता लब्धवासा निमन्त्रिताः २६ ततः शक्रोपयानं तु पर्यपृच्छत राघवः । शरभङ्गश्च तत्सर्वं राघवाय न्यवेदयत् २७ मामेष वरदो राम ब्रह्मलोकं निनीषति । जितमुग्रेण तपसा दुष्प्रापमकृतात्मभिः २८ अहं ज्ञात्वा नरव्याघ्र वर्तमानमदूरतः । ब्रह्मलोकं न गच्छामि त्वामदृष्ट्वा प्रियातिथिम् २९ त्वयाहं पुरुषव्याघ्र धार्मिकेण महात्मना । समागम्य गमिष्यामि त्रिदिवं चावरं परम् ३० अक्षया नरशार्दूल जिता लोका मया शुभाः । ब्राह्म्याश्च नाकपृष्ठ्याश्च प्रतिगृह्णीष्व मामकान् ३१ एवमुक्तो नरव्याघ्रः सर्वशास्त्रविशारदः । ऋषिणा शरभङ्गेन राघवो वाक्यमब्रवीत् ३२ अहमेवाहरिष्यामि सर्वाल्लँलोकान्महामुने । आवासं त्वहमिच्छामि प्रदिष्टमिह कानने ३३ राघवेणैवमुक्तस्तु

---

आणि अश्व जोडिलेल्या रथावर आरूढ होऊन तो शत्रुदमन करणारा इंद्र स्वर्गामध्यें चालता झाला २४. नंतर इंद्र निघून गेल्यावर लक्ष्मण व सीता ह्यांसहवर्तमान राम होमशालेमध्यें बसलेल्या शरभंग मुनींकडे गेला २५. समीप गेल्यावर राम, सीता आणि लक्ष्मण ह्यांनीं त्या मुनींचे पाय धरिले आणि नंतर त्यांनीं भोजनाकरितां वगैरे निमंत्रण केल्यावर आणि रहाण्याच्या जागेची सोय लागल्यावर त्यांची अनुज्ञा घेऊन ते तेथें बसले २६. तदनंतर इंद्राच्या आगमनाचें प्रयोजन रामानें त्यांना विचारिलें व त्या शरभंग मुनींनींही तें सर्व रामाला कथन केलें २७. ( ते ह्मणाले ) " हे रामा, चित्तशुद्धि न केलेल्या पुरुषांना प्राप्त होण्यास दुर्घट असा जो ब्रह्मलोक मीं उग्र तपश्चर्येनें संपादन करून ठेविला आहे त्या ब्रह्मलोकाला मला नेण्याची हा वरप्रद इंद्र इच्छा करीत आहे २८; परंतु, हे पुरुषश्रेष्ठा, तूं अत्यंत प्रिय अतिथि जवळच आला आहेस असें समजून आल्यामुळें तुझें दर्शन घेतल्यावांचून मीं ब्रह्मलोकाला न जाण्याचा विचार केला २९. हे पुरुषश्रेष्ठा, तुज महात्म्या धर्मनिष्ठाची भेट घेऊन नंतर निकृष्ट स्वर्गामध्यें व उत्कृष्ट ब्रह्मलोकामध्यें गमन करीन् ३०. हे पुरुषोत्तमा, मीं ( तपश्चर्येच्या योगानें ) अक्षय व शुभ असे ब्रह्मलोक आणि स्वर्गलोक संपादन करून ठेविले आहेत; त्या माझ्या लोकांचा तूं स्वीकार कर " ३१. ह्याप्रमाणें शरभंग ऋषींनीं पुरुषश्रेष्ठ रामाला सांगितलें असतां तो सर्वशास्त्रपारंगत राम त्यांना ह्मणाला " हे महामुने, मीच ( तपश्चर्येनें ) सर्व लोक संपादन करीन ३२. आपण फक्त ह्या अरण्यामध्यें वास्तव्य करण्याकरितां एक जागा दाखवून द्यावीत येवढीच माझी इच्छा आहे " ३३. ह्याप्रमाणें इंद्रासारिख्या बलाढ्य रामानें शरभंग मुनींना सांगितलें असतां

शक्रतुल्यबलेन वै। शरभङ्गो महाप्राज्ञः पुनरेवाब्रवीद्वचः ३४ इह राम महातेजाः सुतीक्ष्णो नाम धार्मिकः। वसत्यरण्ये नियतः स ते श्रेयो विधास्यति ३५ इमां मन्दाकिनीं राम प्रतिस्रोतामनुव्रज। नदीं पुष्पोडुपवहां ततस्तत्र गमिष्यसि ३६ एष पन्था नरव्याघ्र मुहूर्तं पश्य तात माम्। यावज्जहामि गात्राणि जीर्णां त्वचमिवोरगः ३७ ततोऽग्निं स समाधाय हुत्वा चाज्येन मन्त्रवत्। शरभङ्गो महातेजाः प्रविवेश हुताशनम् ३८ तस्य रोमाणि केशांश्च तदा वह्निर्महात्मनः। जीर्णां त्वचं तदस्थीनि यच्च मांसं च शोणितम् ३९ स च पावकसंकाशः कुमारः समपद्यत। उत्थायाग्निचयात्तस्माच्छरभङ्गो व्यरोचत ४० स लोकानाहिताग्नीनामृषीणां च महात्मनाम्। देवानां च व्यतिक्रम्य ब्रह्मलोकं व्यरोहत ४१ स पुण्यकर्मा भुवने द्विजर्षभः पितामहं सानुचरं ददर्श ह। पितामहश्चापि समीक्ष्य तं द्विजं ननन्द सुस्वागतमित्युवाच ४२ [ १५१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

---

ते महाज्ञानी शरभंग मुनि पुनरपि त्याला ह्मणाले ३४ " हे रामा, ह्या अरण्यामध्यें जितेंद्रिय, धर्मनिष्ठ आणि महातेजस्वी सुतीक्ष्ण ऋषि आहे तो तुझें कल्याण करील ३५. हे रामा, पुष्पसमुदाय वाहून नेणाऱ्या ह्या मंदाकिनी नदीच्या प्रवाहाचे उलट दिशेस तूं जा ह्मणजे तेथें जाशील ३६. हे पुरुषश्रेष्ठा, हा त्या आश्रमाचा मार्ग होय. बा रामा, एक क्षणभर माझ्याकडे दृष्टि दे ह्मणजे तोंपर्यंत जीर्ण त्वचेचा त्याग करणाऱ्या सर्पाप्रमाणें मी ह्या गात्रांचा त्याग करितों " ३७. ह्याप्रमाणें रामाची प्रार्थना केल्यावर त्या शरभंग मुनींनीं अग्निस्थापना करून आज्यानें त्यामध्यें समंत्रक हवन केलें आणि त्या महातेजस्वी शरभंगमुनींनीं अग्नीमध्यें प्रवेश केला ३८. नंतर त्या महात्म्या मुनींचे रोम, केश, जीर्ण त्वचा, अस्थि, मांस आणि रक्त असें जें कांहीं होतें तें अग्नीनें दग्ध केलें ३९. तेव्हां त्या अग्निराशींतून ते शरभंगमुनि अग्नितुल्य तेजस्वी कुमाराच्या रूपानें बाहेर येऊन प्रकाशूं लागले ४० आणि नंतर अग्निहोत्री, महर्षि व देव ह्यांच्या लोकांचें अतिक्रमण करून ते ब्रह्मलोकावर आरूढ झाले ४१. तेथें गेल्यावर त्या पुण्यकर्म करणाऱ्या द्विजश्रेष्ठ शरभंगमुनींनीं सेवकासहवर्तमान ब्रह्मदेवाला अवलोकन केलें व ब्रह्मदेवही त्यांना पाहून आनंदित झाले आणि " आपलें चांगलें स्वागत असो " असें त्या द्विजाला ह्मणाले ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

शरभङ्गे दिवं प्राप्ते मुनिसङ्घाः समागताः। अभ्यगच्छन्त काकुत्स्थं रामं ज्वलिततेजसम् १ वैखानसा वालखिल्याः संप्रक्षाला मरीचिपाः। अश्मकुट्टाश्च बहवः पत्राहाराश्च तापसाः २ दन्तोलूखलिनश्चैव तथैवोन्मज्जकाः परे। गात्रशय्या अशय्याश्च तथैवानवकाशिकाः ३ मुनयः सलिलाहारा वायुभक्षास्तथापरे। आकाशनिलयाश्चैव तथा स्थण्डिलशायिनः ४ तथोर्ध्ववासिनो दान्तास्तथार्द्रपटवाससः। सजपाश्च तपोनिष्ठास्तथा पञ्चतपोन्विताः ५ सर्वे ब्राह्म्या श्रिया युक्ता दृढयोगसमाहिताः। शरभङ्गाश्रमे राममभिजग्मुश्च तापसाः ६ अभिगम्य च धर्मज्ञा रामं धर्मभृतां वरम्। ऊचुः परमधर्मज्ञमृषिसङ्घाः समागताः ७ त्वमिक्ष्वाकुकुलस्यास्य पृथिव्याश्च महारथः। प्रधानश्चापि नाथश्च देवानां मघवा-

---

शरभंगमुनि स्वर्गाला गेल्यावर ऋषिगण एकत्र जुळून अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेल्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे आले १. सारांश, ( ईश्वराच्या नखापासून, उत्पन्न झालेले ) वैखानस, ( केसांपासून उत्पन्न झालेले ) वालखिल्य, ( पादप्रक्षालनापासून उत्पन्न झालेले ) संप्रक्षाल, ( सूर्यचंद्रांच्या किरणांवर उपजीविका करणारे ) मरीचिप, ( शिजविल्यावांचून कुटलेलें अन्न खाणारे ) असंख्य अश्मकुट्ट, ( वृक्षांच्या गलित पानांवर उपजीविका करून रहाणारे ) तपस्वी पत्राहार २, ( दांतावांचून कुटण्याचें वगैरे साधन जवळ न बाळगणारे ) दंतोलूखली, त्याचप्रमाणें ( गळ्याइतक्या पाण्यांत उभे राहून तप करणारे ) दुसरे उन्मज्जक, ( भूमीवर कांहीं एक न पसरितां शयन करणारे ) दुसरे गात्रशय्य, ( कधींच निद्रा न घेणारे ) अशय्य, त्याचप्रमाणें ( एका पाउलापेक्षां जास्त जागेची अपेक्षा न धरितां एकाच पाउलावर उभे राहून तपश्चर्या करणारे ) अनवकाशिक ३, उदकपान करून राहणारे मुनि, वायुभक्षण करून राहणारे दुसरे मुनि, ( उघडचा प्रदेशामध्यें रहाणारे ) आकाशनिलय, ( ओटा घालून त्यावर पडून रहाणारे ) स्थंडिलशायी ४, ( पर्वतशिखरासारिख्या उच्च प्रदेशावर , नेहमीं वास्तव्य करणारे ) ऊर्ध्ववासी, जितेंद्रिय, नेहमीं आर्द्र वस्त्र परिधान करणारे, नेहमीं जप करीत रहाणारे, ( सर्वदां अध्ययन करणारे ) तपोनिष्ठ आणि उन्हाळ्यामध्यें पंचाग्निसाधन करणारे पंचतपोन्वित ५ असे सर्व ब्रह्मतेजानें युक्त असलेले व योगानें एकाग्रचित्त असलेले तपस्वी शरभंग मुनींच्या आश्रमामध्यें आले ६ आणि एकत्र जुळून आलेले ते धर्मज्ञ ऋषिगण धर्माचरण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आणि परम धर्मज्ञ रामासमीप जाऊन ह्मणाले ७ " इंद्र ज्याप्रमाणें देवांचा अधिपति आहे त्याप्रमाणें तूं महारथि ह्या इक्ष्वाकुकुलाचा आणि ह्या पृथ्वीचा मुख्य अधिपति आहेस ८. यश

निव ८ विश्रुतस्त्रिषु लोकेषु यशसा विक्रमेण च। पितृव्रतत्वं सत्यं च त्वयि धर्मश्च पुष्कलः ९ त्वामासाद्य महात्मानं धर्मज्ञं धर्मवत्सलम्। अर्थित्वान्नाथ वक्ष्यामस्तच्च नः क्षन्तुमर्हसि १० अधर्मः सुमहान्नाथ भवेत्तस्य तु भूपतेः। यो हरेद्बलिषड्भागं न च रक्षति पुत्रवत् ११ युञ्जानः स्वानिव प्राणान्प्राणैरिष्टान्सुतानिव। नित्ययुक्तः सदा रक्षन्सर्वान्विषयवासिनः १२ प्राप्नोति शाश्वतीं राम कीर्तिं स बहुवार्षिकीम्। ब्रह्मणः स्थानमासाद्य तत्र चापि महीयते १३ यत्करोति परं धर्मं मुनिर्मूलफलाशनः। तत्र राज्ञश्चतुर्भागः प्रजा धर्मेण रक्षतः १४ सोयं ब्राह्मणभूयिष्ठो वानप्रस्थगणो महान्। त्वन्नाथोनाथवद्राम राक्षसैर्हन्यते भृशम् १५ एहि पश्य शरीराणि मुनीनां भावितात्मनाम्। हतानां राक्षसैर्घोरैर्बहूनां बहुधा वने १६ पम्पानदीनिवासानामनुमन्दाकिनीमपि। चित्रकूटालयानां च क्रियते कदनं महत् १७ एवं वयं न मृष्यामो विप्रकारं तपस्वि-

---

आणि पराक्रम ह्यांच्या योगानें तूं त्रैलोक्यामध्यें विख्यात आहेस. पित्राज्ञापरिपालनरूप व्रतत्व, सत्यवचन आणि संपूर्ण धर्म हे तुझे ठिकाणीं आहेत ९. हे नाथ, धर्मज्ञ, धर्मवत्सल आणि महात्म्या अशा तुझ्याकडे कांहीं प्रार्थना करण्याकरितां आह्मी आलों आहोंत आणि कांहीं सांगणार आहोंत त्याची तूं आह्मांला क्षमा कर १०. हे नाथ, प्राप्तीचा सहावा अंश कररूपानें घेऊनही जो प्रजेचें पुत्रांप्रमाणें रक्षण करीत नाहीं त्या भूपतीला फारच मोठें पातक लागतें ११. प्रजारक्षणाविषयीं यत्न करणारा आणि नेहमीं दक्ष रहाणारा जो राजा प्राणांपेक्षांही प्रिय असलेल्या पुत्रांप्रमाणें नेहमीं आपल्या देशामध्यें वास्तव्य करणाऱ्या सर्व लोकांचें रक्षण करीत असतो १२ त्याला असंख्य वर्षें टिकणारी अक्षय कीर्ति प्राप्त होते आणि, हे रामा, ब्रह्मलोक प्राप्त होऊन तेथेंही त्याची प्रशंसाच होत असते १३. फलमूलांवर उपजीविका करणारीं मुनि जें कांहीं उत्कृष्ट पुण्य संपादन करितो त्याचा चवथा अंश धर्मानें प्रजारक्षण करणाऱ्या राजाला प्राप्त होतो १४. असो. ( सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं ) ब्राह्मणांची संख्या ज्यामध्यें अधिक आहे अशा ह्या वानप्रस्थांच्या मोठ्या समुदायाचा—हे रामा, तूं ह्याचा नाथ असतांनाही—अनाथाप्रमाणें राक्षस वारंवार घात करीत आहेत १५. आमच्या बरोबर ये आणि वनामध्यें घोर राक्षसांनीं नानाप्रकारांनीं मारून टाकिलेल्या भगवच्चिंतननिष्ठ मुनींचीं शरीरें तूं अवलोकन कर १६. पंपानदी, मंदाकिनी आणि चित्रकूटपर्वत ह्या ठिकाणीं वास्तव्य करणाऱ्या मुनींची भयंकर कत्तल चालली आहे १७ आणि तपस्वी लोकांना भयंकर कर्म करणारे राक्षस ह्याप्रमाणें

नाम् । क्रियमाणं वने घोरं रक्षोभिर्भीमकर्मभिः १८ ततस्त्वां शरणार्थं च शरण्यं समुपस्थिताः । परिपालय नो राम वध्यमानान्निशाचरैः १९ परा त्वत्तो गतिर्वीर पृथिव्यां नोपपद्यते । परिपालय नः सर्वान्राक्षसेभ्यो नृपात्मज २० एतच्छ्रुत्वा तु काकुत्स्थस्तापसानां तपस्विनाम्। इदं प्रोवाच धर्मात्मा सर्वानेव तपस्विनः २१ नैवमर्हथ मां वक्तुमाज्ञाप्योऽहं तपस्विनाम् । केवलेन स्वकार्येण प्रवेष्टव्यं वनं मया २२ विप्रकारमपाक्रष्टुं राक्षसैर्भवतामिमम् । पितुस्तु निर्देशकरः प्रविष्टोऽहमिदं वनम् २३ भवतामर्थसिद्ध्यर्थमागतोऽहं यदृच्छया । तस्य मेयं वने वासो भविष्यति महाफलः २४ तपस्विनां रणे शत्रून्हन्तुमिच्छामि राक्षसान् । पश्यन्तु वीर्यमृषयः सभ्रातुर्मे तपोधनाः २५ दत्त्वा वरं चापि तपोधनानां धर्मे धृतात्मा सह लक्ष्मणेन । तपोधनैश्चापि महार्यदत्तः सुतीक्ष्णमेवाभिजगाम वीरः २६ [ १७७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

---

वनामध्यें जें घोर दुःख देत असतात तें आतां आमच्यानें सहन होत नाहीं १८. ह्मणूनच रक्षणाकरितां आह्मी तुज रक्षकाकडे आलों आहोंत. ह्यास्तव, हे रामा, आमचें परिपालन कर; राक्षस आमचा वध करीत आहेत. १९. हे वीरा, ह्या पृथ्वीमध्यें तुझ्याशिवाय आह्मांला दुसरा कोणीही त्राता नाहीं. तस्मात्, हे राजपुत्रा, आह्मां सर्वांचें तूं राक्षसांपासून संरक्षण कर" २०. हें त्या तपस्वी ऋषींचें भाषण श्रवण करून धर्मात्मा ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्या सर्वही तपस्व्यांना ह्मणाला २१ " माझ्याशीं आपण असें भाषण करूं नका. मी तपस्वी जनांचा सेवक आहें. ( आपण जें सांगत आहांत तें माझें कर्तव्यच आहे. तेव्हां ) केवल आपलें कर्तव्य असें समजून तरी तें करण्याकरितां मला वनामध्यें प्रवेश करणें अवश्यच आहे २२. पित्याची आज्ञा परिपालन करण्याकरितां मी ह्या वनामध्यें प्रविष्ट झालों आहें. तेव्हां ह्या कार्यांतच राक्षसांनीं आपणांला दिलेलें हें दुःख दूर करण्याचेंही कार्य होऊन जाणारें आहे. ( आपलें दुःख दूर करण्याकरितां ह्मणूनच मला वनामध्यें गेलें पाहिजे अशांतलीही कांहीं गोष्ट नाहीं ) २३. स्वेच्छेनें मी ह्या वनामध्यें आलों आहें आणि त्यांत आपलें कार्य करण्याकरितांही आल्यासारिखें होणार आहे. तस्मात्, हा माझा वनवास मोठें फल देणारा होणार आहे २४. असो. तपस्वी जनांचे शत्रु जे राक्षस त्यांचा संग्रामामध्यें वध करण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां आतां तपोधन ऋषींनीं भ्रात्यासहवर्तमान माझें वीर्य अवलोकन करावें २५. ह्याप्रमाणें तपोधन ऋषींना वचन देऊन धर्माकडेच

रामस्तु सहितो भ्रात्रा सीतया च परंतपः । सुतीक्ष्णस्याश्रमपदं जगाम सह तैर्द्विजैः १ स गत्वा दूरमध्वानं नदीस्तीर्त्वा बहूदकाः । ददर्श विमलं शैलं महामेरुमिवोन्नतम् २ ततस्तदिक्ष्वाकुवरौ सततं विविधैर्द्रुमैः । काननं तौ विविशतुः सीतया सह राघवौ ३ प्रविष्टस्तु वनं घोरं बहुपुष्पफलद्रुमम् । ददर्शाश्रममेकान्ते चीरमालापरिष्कृतम् ४ तत्र तापसमासीनं मलपङ्कजधारिणम् । रामः सुतीक्ष्णं विधिवत्तपोधनमभाषत ५ रामोहमस्मि भगवन्भवन्तं द्रष्टुमागतः । तन्माभिवद धर्मज्ञ महर्षे सत्यविक्रम ६ स निरीक्ष्य ततो धीरो रामं धर्मभृतां वरम् । समाश्लिष्य च बाहुभ्यामिदं वचनमब्रवीत् ७ स्वागतं ते रघुश्रेष्ठ राम सत्यभृतां वर । आश्रमोयं त्वयाक्रान्तः सनाथ इव सांप्रतम् ८ प्रतीक्षमाणस्त्वामेव नारोहेहं महायशः । देवलोकमितो वीर देहं त्यक्त्वा महीतले ९ चित्रकूट-

---

चित्त असलेला तो वीर आर्य राम लक्ष्मण व तपोधन ऋषि ह्यांसहवर्तमान सुतीक्ष्ण मुनींकडेच निघाला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

शत्रुतापन राम भ्राता लक्ष्मण, सीता आणि ते द्विज ह्यांसहवर्तमान सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमाकडे निघाला १. बराच मार्ग आक्रमण करून विपुल उदकानें युक्त असलेल्या नद्या तरून गेल्यावर महामेरुपर्वताप्रमाणें उंच असलेला एक निर्मल पर्वत त्यानें अवलोकन केला २ व तदनंतर ते इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ रामलक्ष्मण नानाप्रकारच्या वृक्षांनीं चिकटून राहिलेल्या वनामध्यें सीतेसहवर्तमान प्रविष्ट झाले ३. त्या घोर वनामध्यें प्रविष्ट झाल्यावर एकांत प्रदेशामध्यें वल्कलसमूहांनीं सुशोभित आणि विपुल पुष्पांनीं व फलांनीं संपन्न असलेल्या वृक्षांनीं युक्त असा आश्रम रामानें अवलोकन केला ४ आणि सर्वपापनाशार्थ पद्मासन घालून समाधि लावणारे तपोधन सुतीक्ष्ण मुनि आंत बसले असतां राम योग्य रीतीनें त्यांच्या समीप जाऊन त्यांना ह्मणाला ५ " हे भगवन्, मी राम आपल्या दर्शनाकरितां आलों आहें. तस्मात्, हे धर्मज्ञ, हे महर्षे, हे अमोघतपःसामर्थ्यवान्, आपण माझ्याशीं बोला " ६. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाकडे पाहून व हातांनीं त्याला कवटाळून ते ज्ञानी सुतीक्ष्णमुनि त्याला ह्मणाले ७ " हे रघुवंशजोत्तमा, हे सत्यनिष्ठांमध्यें श्रेष्ठ रामा, तुझें स्वागत असो, तुझे पाय लागल्यामुळें आज हा आश्रम सनाथासारिखा दिसत आहे ८. हे महायशस्वी वीरा, भूतलावर देहाचा त्याग करून येथून देवलोकीं आरोहण न करितां तुझीच वाट पहात मी येथें बसलों आहें ९. राज्यापासून भ्रष्ट होऊन तूं जेव्हां

मुपादाय राज्यभ्रष्टोसि मे श्रुतः । इहोपयातः काकुत्स्थ देवराजः शतक्रतुः १० उपागम्य च मे देवो महादेवः सुरेश्वरः । सर्वाँल्लोकाञ्जितानाह मम पुण्येन कर्मणा ११ तेषु देवर्षिजुष्टेषु जितेषु तपसा मया । मत्प्रसादात्सभार्यस्त्वं विहरस्व सलक्ष्मणः १२ तमुग्रतपसं दीप्तं महर्षिं सत्यवादिनम् । प्रत्युवाचात्मवान्रामो ब्रह्माणमिव वासवः १३ अहमेवाहरिष्यामि स्वयं लोकान्महामुने । आवासं त्वहमिच्छामि प्रदिष्टमिह कानने १४ भवान्सर्वत्र कुशलः सर्वभूतहिते रतः । आख्यातं शरभङ्गेन गौतमेन महात्मना १५ एवमुक्तस्तु रामेण महर्षिर्लोकविश्रुतः । अब्रवीन्मधुरं वाक्यं हर्षेण महता युतः १६ अयमेवाश्रमो राम गुणवान्रम्यतामिति । ऋषिसङ्घानुचरितः सदा मूलफलैर्युतः १७ इममाश्रममागम्य मृगसङ्घा महीयसः । अहत्वा प्रतिगच्छन्ति लोभयित्वाकुतोभयाः १८ नान्यो दोषो भवेदत्र मृगेभ्योन्यत्र विद्धि वै । तच्छ्रुत्वा वचनं तस्य महर्षे-

---

चित्रकूट पर्वतावर येऊन राहिला होतास तेव्हांपासूनच तूं इकडे येणार येणार ह्मणून मीं ऐकिलें होतें. असो. ( शरभंगमुनींना ब्रह्मलोकीं जाण्याचें निमंत्रण केल्यावर ) हे रामा, देवराज इंद्र येथें आला होता १० आणि येथें आल्यावर त्या तेजस्वी सुरश्रेष्ठ देवराज इंद्रानें " पुण्यकर्मानें आपण सर्व लोक संपादन केले आहेत " असें मला सांगितलें ११. तेव्हां, हे रामा, देवर्षि ज्यामध्यें वास्तव्य करितात असे जे लोक तपश्चर्येच्या योगानें मीं संपादन करून ठेविले आहेत त्या लोकांचा लक्ष्मण आणि सीता ह्यांसहवर्तमान माझ्या प्रसादानें तूंच उपभोग घे " १२. असें त्यांनीं सांगितल्यानंतर ब्रह्मदेवाशीं भाषण करणाऱ्या इंद्राप्रमाणें तो मनोनिग्रही राम त्या उग्रतपस्वी, सत्यनिष्ठ व तेजस्वी सुतीक्ष्ण महर्षींना ह्मणाला १३ " हे महामुने, मी स्वतःच तपश्चर्येच्या योगानें लोक संपादन करीन. ह्या वनामध्यें आपण दर्शविलेल्या निवासस्थानाचीच मला अपेक्षा आहे १४. आपण सर्वस्वीं कुशल असून प्राणिमात्राच्या हिताविषयीं तत्पर आहांत असें महात्म्या गौतमकुलोत्पन्न शरभंग महर्षींनीं मला सांगितलें आहे " १५. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां त्या जगद्विख्यात् सुतीक्ष्ण महर्षींना मोठा आनंद झाला आणि ते त्याच्याशीं मधुर भाषण करूं लागले कीं १६, " हे रामा, हाच आश्रम सोयीचा आहे; येथें तूं आनंदानें रहा. येथें ऋषिसमुदाय रहात असून हा आश्रम नेहमीं फलमूलांनीं संपन्न असतो १७. ह्या आश्रमामध्यें सर्वस्वीं निर्भय असलेले मृगसमुदाय मोठमोठ्यांनाही लोभपाशांत गुंतवून त्यांचा वध न होतां ते परत जातात १८. मृगाशिवाय दुसरा तिसरा दोष ह्या आश्रमामध्यें कांहीं एक नाहीं हें तूं जाण " हें त्या महर्षींचें

लक्ष्मणाग्रजः १९ उवाच वचनं धीरो विगृह्य सशरं धनुः । तानहं सुमहाभाग मृगसङ्घान्समागतान् २० हन्यां निशितधारेण शरेणानतपर्वणा । भवांस्तत्राभिषज्येत किं स्यात्कृच्छ्रतरं ततः २१ एतस्मिन्नाश्रमे वासं चिरं तु न समर्थये । तमेवमुक्त्वोपरमं रामः संध्यामुपागमत् २२ अन्वास्य पश्चिमां संध्यां तत्र वासमकल्पयत् । सुतीक्ष्णस्याश्रमे रम्ये सीतया लक्ष्मणेन च २३ ततः शुभं तापसयोग्यमन्नं स्वयं सुतीक्ष्णः पुरुषर्षभाभ्याम् । ताभ्यां सुसत्कृत्य ददौ महात्मा संध्यानिवृत्तौ रजनीं समीक्ष्य २४ [ २०१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

रामस्तु सहसौमित्रिः सुतीक्ष्णेनाभिपूजितः । परिणाम्य निशां तत्र प्रभाते प्रत्यबुध्यत १ उत्थाय च यथाकालं राघवः सह सीतया । उपस्पृश्य सुशीतेन तोयेनोत्पलगन्धिना २ अथ तेऽग्निं सुरांश्चैव वैदेही रामलक्ष्मणौ । काल्यं विधिवदभ्यर्च्य तपस्विशरणे वने ३ उदयन्तं दिनकरं दृष्ट्वा विगतकल्मषाः । सुतीक्ष्णमभिगम्येदं श्लक्ष्णं वचनमब्रुवन् ४ सुखो-

---

भाषण श्रवण करून तो विचारी राम त्यांना ह्मणाला " हे महाभाग्यवान् मुने, ते मृगसमुदाय समीप आले असतां बाणासहवर्तमान धनुष्य घेऊन मी त्यांचा १९,२० वांकड्या पेरांनीं युक्त असलेल्या तीक्ष्ण बाणानें वध करीन; परंतु, मृगांचा वध झाला असतां आपणाला दुःख होईल. तेव्हां यापेक्षां वाईट गोष्ट ती कोणती आहे ? २१. ह्यास्तव, ह्या आश्रमामध्यें फार दिवस राहण्याची माझी इच्छा नाहीं ". ह्याप्रमाणें त्या मुनींना सांगून राम संध्यावंदन करण्याकरितां निघून गेला २२. सायंसंध्या केल्यावर त्या सुतीक्ष्ण मुनींच्या रम्य आश्रमामध्यें सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान रामानें वास्तव्य केलें २३ व तदनंतर संध्याकाल टळून रात्र पडली असें दिसून आल्यावर महात्म्या सुतीक्ष्ण मुनींनीं तपस्वी लोकांना योग्य असें शुभ अन्न स्वतः त्या पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांना उत्तम सत्कारपूर्वक अर्पण केलें २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

सुतीक्ष्ण मुनींनीं लक्ष्मणासहवर्तमान आदरसत्कार केलेला राम त्या आश्रमामध्यें रात्र घालविल्यावर प्रभातकालीं जागा झाला १ आणि सीतेसहवर्तमान योग्य वेळीं उठून कमलाच्या वासानें युक्त असलेल्या चांगल्या उदकानें त्यानें स्नान केलें २. नंतर सीता आणि रामलक्ष्मण ह्यांनीं वेळेप्रमाणें ऋषींचें गृह असलेल्या त्या वनामध्यें अग्नीचें व देवांचें पूजन केलें ३ आणि सूर्य उदयास येत असलेला पाहून ते रामप्रभृति निष्पाप

षिताः स्म भगवंस्त्वया पूज्येन पूजिताः । आपृच्छामः प्रयास्यामो मुनयस्त्वरयन्ति नः ५ त्वरामहे वयं द्रष्टुं कृत्स्नमाश्रममण्डलम् । ऋषीणां पुण्यशीलानां दण्डकारण्यवासिनाम् ६ अभ्यनुज्ञातुमिच्छामः सहैभिर्मुनिपुंगवैः । धर्मनित्यैस्तपोदान्तैर्विशिखैरिव पावकैः ७ अविषह्यातपो यावत्सूर्यो नातिविराजते । अमार्गेणागतां लक्ष्मीं प्राप्येवान्वयवर्जितः ८ तावदिच्छामहे गन्तुमित्युक्त्वा चरणौ मुनेः । ववन्दे सहसौमित्रिः सीतया सह राघवः ९ तौ संस्पृशन्तौ चरणावुत्थाप्य मुनिपुंगवः । गाढमाश्लिष्य सस्नेहमिदं वचनमब्रवीत् १० अरिष्टं गच्छ पन्थानं राम सौमित्रिणा सह । सीतया चानया सार्धं छाययेवानुवृत्तया ११ पश्याश्रमपदं रम्यं दण्डकारण्यवासिनाम् । एषां तपस्विनां वीर तपसा भावितात्मनाम् १२ सुप्राज्यफलमूलानि पुष्पितानि वनानि च । प्रशस्तमृगयूथानि शान्तपक्षिगणानि च १३ फुल्लपङ्कजखण्डानि प्रसन्नसलिलानि च । कारण्डवविकीर्णानि तटाकानि

---

त्रिवर्ग सुतीक्ष्ण मुनींकडे जाऊन मधुर वाणीनें त्यांना ह्मणाले ४ " हे भगवन्, आह्मी येथें सुखानें राहिलों आणि आपण पूज्य असतांनाही आमचा आदरसत्कार केलांत; आतां आह्मी आपला निरोप घेऊन जातों. कारण, मुनि आह्मांला त्वरा करीत आहेत ५. दंडकारण्यनिवासी पुण्यशील ऋषींचा संपूर्ण आश्रमसमुदाय अवलोकन करण्याची आह्मांला त्वरा आहे ६. तेव्हां नित्य धर्मनिष्ठ, तपामुळें जितेंद्रिय आणि धूमरहित अग्नीप्रमाणें असलेल्या ह्या मुनिश्रेष्ठांसहवर्तमान आतां जाण्याची अनुज्ञा मिळावी अशी आमची इच्छा आहे ७. ह्याकरितां सूर्य अतिप्रखर होऊन—अन्यायानें ऐश्वर्य प्राप्त करून घेतल्यावर हीन कुलांत जन्मलेल्या प्रभूचा प्रताप ज्याप्रमाणें दुःसह होतो त्याप्रमाणें—त्याचा ताप दुःसह झाला नाहीं ८ तोंच येथून जाण्याची आमची इच्छा आहे. " असें ह्मणून रामानें लक्ष्मण आणि सीता ह्यांसहवर्तमान त्या मुनींच्या चरणांना अभिवंदन केलें ९. तेव्हां चरणांवर मस्तक ठेवणाऱ्या त्या रामलक्ष्मणांना उठवून व त्यांना कडकडून भेटून ते मुनिश्रेष्ठ सुतीक्ष्ण प्रेमपूर्वक ह्मणाले १० " हे रामा, छायेप्रमाणें अनुसरून वागणारी ही सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान तूं उपद्रवरहित निर्विघ्नपणें मार्गाला लाग ११ आणि, हे वीरा, तपानें ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे अशा ह्या दंडकारण्यनिवासी मुनींचे रम्य आश्रम तूं अवलोकन कर १२. फलमूलांची ज्यांत समृद्धि आहे, मृगांचें प्रशस्त कळप ज्यामध्यें आहेत आणि ज्यांतील पक्षिगण शांत आहेत अशीं प्रफुल्लित वनें १३ प्रफुल्लित कमलसमूह व निर्मल उदक ह्यांनीं युक्त असून कारंडोल पक्ष्यांनीं गजबजून गेलेलीं सरोवरें व

सरांसि च १४ द्रक्ष्यसे दृष्टिरम्याणि गिरिप्रस्रवणानि च । रमणीयान्यरण्यानि मयूराभिरुतानि च १५ गम्यतां वत्स सौमित्रे भवानपि च गच्छतु । आगन्तव्यं च ते दृष्ट्वा पुनरेवाश्रमं प्रति १६ एवमुक्तस्तथेत्युक्त्वा काकुत्स्थः सहलक्ष्मणः । प्रदक्षिणं मुनिं कृत्वा प्रस्थातुमुपचक्रमे १७ ततः शुभतरे तूणी धनुषी चायतेक्षणा । ददौ सीता तयोर्भ्रात्रोः खड्गौ च विमलौ ततः १८ आबध्य च शुभे तूणी चापे चादाय सस्वने । निष्क्रान्तावाश्रमाद्गन्तुमुभौ तौ रामलक्ष्मणौ १९ शीघ्रं तौ रूपसंपन्नावनुज्ञातौ महर्षिणा । प्रस्थितौ धृतचापासी सीतया सह राघवौ २० [२२१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

सुतीक्ष्णेनाभ्यनुज्ञातं प्रस्थितं रघुनन्दनम् । हृद्यया स्निग्धया वाचा भर्तारमिदमब्रवीत् १ अधर्मं तु सुसूक्ष्मेण विधिना प्राप्यते महान् । निवृत्तेन च शक्योऽयं व्यसनात्कामजादिह २ त्रीण्येव व्यसनान्यत्र कामजानि भवन्त्युत । मिथ्यावाक्यं तु परमं तस्माद्गुरुतरावुभौ ३ परदारा-

---

तडाग १४, दृष्टीला मनोहर दिसणारे पर्वतावरील प्रवाह आणि मयूर पक्ष्यांनीं नादित झालेलीं रमणीय अरण्यें तूं अवलोकन करशील १५. हे वत्सा, जा; हे लक्ष्मणा, तूंही जा. हे रामा, ते आश्रम अवलोकन करून तूं पुनरपि माझ्या आश्रमाला परत येच" १६. ह्याप्रमाणें सुतीक्ष्णमुनींनीं सांगितलें असतां "ठीक आहे" असें ह्मणून व त्या मुनींना प्रदक्षिणा करून लक्ष्मणासहवर्तमान राम पुढें जाण्यास निघाला १७. तेव्हां पहिल्यापेक्षां चांगले भाते, धनुष्यें आणि निर्मल खड्ग, दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेल्या सीतेनें त्या उभयतां भ्रात्या रामलक्ष्मणांना दिले १८. नंतर ते शुभ भाते पाठीशीं बांधून आणि टणत्कार करणारीं धनुष्यें हातांत घेऊन दंडकारण्यांत जाण्याकरितां ते उभयतां रामलक्ष्मण आश्रमांतून बाहेर निघाले १९ आणि सुतीक्ष्ण महर्षींनीं अनुज्ञा दिल्यावर धनुष्य व खड्ग हातांत घेऊन ते रूपवान् रामलक्ष्मण सीतेसहवर्तमान सत्वर पुढें चालूं लागले २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

सुतीक्ष्णमुनींनीं अनुज्ञा दिल्यावर चालूं लागलेल्या भर्त्या रघुनंदन रामाला मनोहर आणि सप्रेम अशा वाणीनें सीता ह्मणाली १"सूक्ष्म मार्गानें विचार करून पाहिला असतां ( अति दुर्बल अशा मृगांच्या वधाची प्रतिज्ञा करून वनामध्यें आपण प्रवेश केलांतर ) आपल्या हातून मोठा अधर्म होणार आहे आणि हा अधर्म कामजन्य व्यसनापासून आपण परावृत्त झाल्यास टळणें शक्य आहे २. सांप्रत तीनच व्यसनें कामा-

भिगमनं विना वैरं च रौद्रता । मिथ्यावाक्यं न ते भूतं न भविष्यति राघव ४ कुतोभिलषणं स्त्रीणां परेषां धर्मनाशनम् । तव नास्ति मनुष्येन्द्र न चाभूत्ते कदाचन ५ मनस्यपि तथा राम न चैतद्विद्यते क्वचित् । स्वदारनिरतश्चैव नित्यमेव नृपात्मज ६ धर्मिष्ठः सत्यसन्धश्च पितुर्निर्देशकारकः । त्वयि धर्मश्च सत्यं च त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् ७ तच्च सर्वं महाबाहो शक्यं वोढुं जितेन्द्रियैः । तव वश्येन्द्रियत्वं च भूतानां शुभदर्शन ८ तृतीयं यदिदं रौद्रं परप्राणाभिहिंसनम् । निर्वैरं क्रियते मोहात्तच्च ते समुपस्थितम् ९ प्रतिज्ञातस्त्वया वीर दण्डकारण्यवासिनाम् । ऋषीणां रक्षणार्थाय वधः संयति रक्षसाम् १० एतन्निमित्तं च वनं दण्डका इति विश्रुतम् । प्रस्थितस्त्वं सह भ्रात्रा धृतबाणशरासनः ११ ततस्त्वां प्रस्थितं दृष्ट्वा मम चिन्ताकुलं मनः । त्वद्वृत्तं चिन्तयन्त्या वै भवेन्निःश्रेयसं हितम् १२ न हि मे रोचते

---

पासून उत्पन्न होत असतात. मिथ्याभाषण हें एक मुख्य व्यसन आहे आणि इतर दोन त्याच्याहीपेक्षां भयंकर आहेत ३. परस्त्रीसेवन आणि वैरावांचून क्रौर्याचें अवलंबन. ह्या तीन व्यसनांपैकीं, हे राघवा, मिथ्याभाषण आपल्या हातून आजपर्यंत झालें नाहीं व पुढें होणार नाहीं ४. धर्मनाशक असा परस्त्रियांचा अभिलाष तर कोठून असणार ? हे लोकनाथ, तो तुह्माला नाहीं व कधीं झालाही नाहीं ५. इतकेंच नव्हे परंतु, हे रामा, ( परस्त्रीचा अभिलाष ) ही गोष्ट आपल्या कधीं मनामध्येंही नाहीं. हे राजकुमार, आपण नेहमीं स्वस्त्रीचेच ठिकाणीं रत आहां ६. आपण पित्याची आज्ञा परिपालन करणारे असून धर्मनिष्ठ व सत्यप्रतिज्ञ आहांत आणि धर्म व सत्य हें सर्व आपणांवरच अवलंबून आहे ७. आपल्या दर्शनानें प्राण्यांचें शुभ करणाऱ्या हे महापराक्रमी राघवा, जितेंद्रिय पुरुषांच्या हातून एकपत्नीव्रताचें परिपालन होणें व सत्य भाषण हें सर्व शक्य आहे. कारण, इंद्रियें आपल्या स्वाधीन आहेत ८; परंतु, मोहानें वैराशिवाय दुसऱ्यांच्या प्राणांची हिंसा करणें हें जें रौद्रसंज्ञक तिसरें व्यसन तें आज आपणांला प्राप्त झालें आहे ९. कारण, हे वीर, दंडकारण्यनिवासी ऋषींच्या संरक्षणाकरितां संग्रामामध्यें राक्षसांचा वध करण्याची आपण प्रतिज्ञा केली आहे १०. ह्याकरितां दंडका ह्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या वनामध्यें आपण भ्रात्यासहवर्तमान धनुर्बाण घेऊन निघालां ११. तेव्हां आपण निघालां असें पाहून आणि आपलें वचन खरें करून दाखविण्याचा स्वभाव लक्ष्यांत आणून 'मी आपल्या पारलौकिक व ऐहिक सुखाचा विचार करूं लागलें ह्मणजे माझें मन व्याकुल होतें १२. सारांश, हे वीरा, दंडकारण्यांत जाणें मला रुचत नाहीं." मी

वीर गमनं दण्डकान्प्रति । कारणं तत्र वक्ष्यामि वदन्त्याः श्रूयतां मम १३ त्वं
हि बाणधनुष्पाणिर्भ्रात्रा सह वनं गतः । दृष्ट्वा वनचरान्सर्वान्कच्चित्कुर्याः
शरव्ययम् १४ क्षत्रियाणामिह धनुर्हुताशस्येन्धनानि च । समीपतः स्थितं
तेजोबलमुच्छ्रयते भृशम् १५ पुरा किल महाबाहो तपस्वी सत्यवा-
क्छुचिः । कस्मिंश्चिदभवत्पुण्ये वने रतमृगद्विजे १६ तस्यैव तपसो विघ्नं
कर्तुमिन्द्रः शचीपतिः । खड्गपाणिरथागच्छदाश्रमं भटरूपधृक् १७ तस्मिं-
स्तदाश्रमपदे निहितः खड्ग उत्तमः । स न्यासविधिना दत्तः पुण्ये तपसि
तिष्ठतः १८ स तच्छस्त्रमनुप्राप्य न्यासरक्षणतत्परः । वने तु विचरत्येव
रक्षन्प्रत्ययमात्मनः १९ यत्र गच्छत्युपादातुं मूलानि च फलानि च । न
विना याति तं खड्गं न्यासरक्षणतत्परः २० नित्यं शस्त्रं परिवहन्क्रमेण स
तपोधनः । चकार रौद्रीं स्वां बुद्धिं त्यक्त्वा तपसि निश्चयम् २१ ततः
स रौद्राभिरतः प्रमत्तो धर्मकर्षितः । तस्य शस्त्रस्य संवासाज्जगाम नरकं
मुनिः २२ एवमेतत्पुरावृत्तं शस्त्रसंयोगकारणम् । अग्निसंयोगवद्धेतुः शस्त्र-

त्याचें कारण सांगतें; आपण तें माझ्या तोंडून ऐका १३. आपण धनुर्बाण हातांत घेऊन भ्रात्यासह वनांत गेल्यावर तेथील सर्व वनचर राक्षसांना अवलोकन करून कदाचित् बाणांचा व्यय कराल ( हेंच आधीं हिंसारूप अधर्मप्राप्तीचें कारण आहे ) १४. ( बरें, बाण न सोडितां आपण स्वस्थ बसाल ह्मणावें तरी तेंही शक्य नाहीं. कारण, ) ज्याप्रमाणें इंधनें अग्नीचें तेज जास्त करितात त्याप्रमाणें क्षत्रियांचें धनुष्य ज्याच्या समीप असेल त्या पुरुषाचें तेज तें वाढवीत असतें १५. हे महापराक्रमी राघवा, ज्यांतील पशुपक्षी शांत आहेत अशा एका पवित्र वनामध्यें पूर्वी एक सत्यनिष्ठ व शुचिर्भूत तपस्वी तपश्चर्या करीत होता असें सांगतात १६. त्यांच्या तपाला विघ्न आणण्याकरितां शचीपति इंद्र हातांत खड्ग घेऊन व योद्ध्याचें रूप धारण करून त्यांच्या आश्रमाला आला.१७ आणि त्यानें त्या आश्रमामध्यें पुण्यकारक तपश्चर्या करणाऱ्या त्या मुनींपाशीं तो उत्कृष्ट खड्ग ठेव ह्मणून दिला १८. तेव्हां तें शस्त्र प्राप्त झाल्यावर ते मुनि त्या ठेवीचें रक्षण करण्याविषयीं तत्पर राहून लोकांमध्यें असलेल्या आपल्या विश्वासाचें रक्षण करीत करीतच वनामध्यें संचार करीत असत १९. मुळें व फळें आणण्याकरितां जिकडे जावयाचें असेल तिकडे ठेव राखण्याविषयीं तत्पर असलेले ते मुनि त्या खड्गावांचून जात नसत २०; परंतु, नेहमीं शस्त्र बरोबर बाळगिल्यामुळें त्या तपोधनांचा तपाविषयीं असलेला निश्चय शिथिल होऊन क्रूर बुद्धि त्यांचे ठिकाणीं उत्पन्न झाली २१ आणि तदनंतर बेफाम होऊन व अधर्मानें ग्रस्त होऊन क्रूर कर्मा-

संयोग उच्यते २३ स्नेहाच्च बहुमानाच्च स्मारये त्वां तु शिक्षये । न कथंचन सा कार्या गृहीतधनुषा त्वया २४ बुद्धिर्वैरं विना हन्तुं राक्षसान्दण्डकाश्रितान् । अपराधं विना हन्तुं लोको वीर न मंस्यते २५ क्षत्रियाणां तु वीराणां वनेषु नियतात्मनाम् । धनुषा कार्यमेतावदार्तानामभिरक्षणम् २६ क्व च शस्त्रं क्व च वनं क्व च क्षात्रं तपः क्व च । व्याविद्धमिदमस्माभिर्देशधर्मस्तु पूज्यताम् २७ कदर्यकलुषा बुद्धिर्जायते शस्त्रसेवनात् । पुनर्गत्वा त्वयोध्यायां क्षत्रधर्मं चरिष्यसि २८ अक्षया तु भवेत्प्रीतिः श्वश्रूश्वशुरयोर्मम । यदि राज्यं हि संन्यस्य भवेस्त्वं निरतो मुनिः २९ धर्मादर्थः प्रभवति धर्मात्प्रभवते सुखम् । धर्मेण लभते सर्वं धर्मसारमिदं जगत् ३० आत्मानं नियमैस्तैस्तैः कर्षयित्वा प्रयत्नतः । प्राप्यते निपुणैर्धर्मो न सुखा-

---

विषयीं तत्पर झालेले ते मुनि शस्त्राच्या सहवासामुळें नरकाला गेले २२. शस्त्रसंयोगासबंधानें अशी गोष्ट पूर्वीं घडलेली आहे. सारांश, अग्निसंयोग ज्याप्रमाणें काष्ठांचें ठिकाणीं विकृति उत्पन्न होण्याचें कारण आहे त्याचप्रमाणें शस्त्रसंयोग हें पुरुषाचें मनामध्यें विकृति उत्पन्न होण्याचें कारण आहे २३. प्रेमामुळें आणि बहुमानामुळें ह्या गोष्टीचें स्मरण देऊन मी आपणाला उपदेश करीत आहें. तस्मात्, दंडकारण्यामध्यें वास्तव्य करणाऱ्या राक्षसांचा वध वैरावांचून करण्याची ती बुद्धि हातांत धनुष्य धारण करून आपण कधींही आणूं नका. कारण, हे वीरा, अपराधावांचून राक्षसांचा वध करणें लोकांना संमत होणार नाहीं २४, २५. वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या जितेंद्रिय आर्त जनांचें संरक्षण करणें येवढेंच वीर क्षत्रियांच्या धनुष्याचें काम आहे २६. शस्त्र कोणीकडे, वन कोणीकडे, क्षात्रधर्म कोणीकडे आणि तप कोणीकडे. सारांश, आपण हा सर्व घोटाळा करून टाकिलेला आहे. करितां जो देशधर्म असेल त्यालाच मान देणें योग्य आहे २७. शस्त्र धारण केल्यानें पुरुषाची बुद्धि कृपणाप्रमाणें कलुषित होते ( आतां आमचा क्षत्रधर्म असल्यामुळें शस्त्र धारण करणें हें आमचें कर्तव्यच आहे असें आपण ह्मणत असाल तर ) अयोध्येमध्यें फिरून गेल्यावर आपण ( खुशाल ) त्या क्षत्रधर्मानें वागा २८. राज्याचा त्याग करून जर आपण वनामध्येंच रत होऊन, मुनिवृत्तीनें नेहमीं वागाल तर माझ्या सासूसासऱ्यांना आनंद होईल २९. ( हिंसा करणें हा अधर्म असल्यामुळें ऋषिधर्मानें वागण्यांतच कल्याण आहे. कारण, ) धर्मापासूनच अर्थप्राप्ति होते व धर्मापासूनच सुखनिष्पत्ति होते. सारांश, धर्मानेंच सर्व कांहीं प्राप्त होत असून हें जगतूही धर्माचेंच सार आहे ३०. प्रयत्नपूर्वक नानाप्रकारच्या नियमांनीं देह कृश करून समर्थ लोकांना धर्म प्राप्त होत असतो; सुखानें कधीं सुख-

लभते सुखम् ३१ नित्यं शुचिमतिः सौम्य चर धर्मं तपोवने । सर्वं तु विदितं तुभ्यं त्रैलोक्यमपि तत्त्वतः ३२ स्त्रीचापलादेतदुपाहृतं मे धर्मं च वक्तुं तव कः समर्थः । विचार्य बुद्ध्या तु सहानुजेन यद्रोचते तत्कुरु माचिरेण ३३ [ ५५४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

वाक्यमेतत्तु वैदेह्या व्याहृतं भर्तृभक्तया । श्रुत्वा धर्मे स्थितो रामः प्रत्युवाचाथ जानकीम् १ हितमुक्तं त्वया देवि स्निग्धया सदृशं वचः । कुलं व्यपदिशन्त्या च धर्मज्ञे जनकात्मजे २ किं नु वक्ष्याम्यहं देवि त्वयैवोक्तमिदं वचः । क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ३ ते चार्ता दण्डकारण्ये मुनयः संशितव्रताः । मां सीते स्वयमागम्य शरण्यं शरणं गताः ४ वसन्तः कालकालेषु वने मूलफलाशनाः । न लभन्ते सुखं भीरु राक्षसैः क्रूरकर्मभिः । भक्ष्यन्ते राक्षसैर्भीमैर्नरमांसोपजीविभिः ५ ते भक्ष्यमाणा मुनयो दण्डकारण्यवासिनः । अस्मानभ्यवप-

---

साधनाची प्राप्ति होत नाहीं ३१. तस्मात्, हे सौम्य, आपण आपली मति नेहमीं शुद्ध ठेवून तपोवनामध्यें धर्माचें अनुष्ठान करीत जा. आपणाला सर्व त्रैलोक्याचीही खरीखरी माहिती आहे ३२. स्त्रियांच्या उतावीळ स्वभावामुळें माझ्या तोंडून हें भाषण निघून गेलें. कारण, आपणाला धर्माचा उपदेश करण्याला कोण समर्थ आहे ? तथापि, लक्ष्मणासहवर्तमान मनःपूर्वक ह्याचा विचार करून जें रुचेल तें करण्याला आपण विलंब लावूं नका " ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

भर्त्याचे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या सीतेचें हें भाषण श्रवण करून धर्मनिष्ठ राम त्या जनककन्येला ह्मणाला १ " हे देवि, हे धर्मवेत्ते, हे जनककन्ये, क्षत्रियांचा कुलधर्म सांगण्याच्या उद्देशानें माझे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या तूं केलेलें हें भाषण हितावें असून तुला योग्य आहे २. हे देवि, ह्या तुझ्या ह्मणण्याला मी आतां काय बरें उत्तर देऊं ? रक्षण होत नसल्यामुळें लोकांना आर्त होऊन रडत बसण्याची पाळी येऊं नये एतदर्थ क्षत्रियांनीं धनुष्य धारण करावयाचें हें तूं सांगून टाकिलें आहेस ३. हे सीते, तीक्ष्ण व्रत आचरणारे ते मुनि दंडकारण्यामध्यें आर्त झाले आहेत आणि स्वतः माझी भेट घेऊन ते मला रक्षक ह्मणून शरण आले आहेत ४. हे भित्र्ये, फलमूलें भक्षण करून सर्व काल वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या मुनींना क्रूरकर्मी राक्षसांमुळें सुख प्राप्त होत नाहीं. कारण, नरमांस भक्षण करणारे क्रूर राक्षस त्यांना भक्षण

येते मामूचुर्द्विजसत्तमाः ६ मया तु वचनं श्रुत्वा तेषामेवं मुखाच्च्युतम् ।
कृत्वा वचनशुश्रूषां वाक्यमेतदुदाहृतम् ७ प्रसीदन्तु भवन्तो मे ह्रीरेषा तु
ममातुला । यदीदृशैरहं विप्रैरुपस्थेयैरुपस्थितः ८ किं करोमीति च
मया व्याहृतं द्विजसंनिधौ । सर्वैरेव समागम्य वागियं समुदाहृता ९ राक्ष-
सैर्दण्डकारण्ये बहुभिः कामरूपिभिः । अर्दिताः स्म भृशं राम भवान्न-
स्तत्र रक्षतु १० होमकाले तु संप्राप्ते पर्वकालेषु चानघ । धर्षयन्ति स्म
दुर्धर्षा राक्षसाः पिशिताशनाः ११ राक्षसैर्धर्षितानां च तापसानां तप-
स्विनाम् । गतिं मृगयमाणानां भवान्नः परमा गतिः १२ कामं तपःप्र-
भावेण शक्ता हन्तुं निशाचरान् । चिरार्जितं न चेच्छामस्तपः खण्डयितुं
वयम् १३ बहुविघ्नं तपो नित्यं दुश्चरं चैव राघव । तेन शापं न मुञ्चामो
भक्ष्यमाणाश्च राक्षसैः १४ तदर्द्यमानान्रक्षोभिर्दण्डकारण्यवासिभिः ।
रक्षकस्त्वं सह भ्रात्रा त्वन्नाथा हि वयं वने १५ मया चैतद्वचः श्रुत्वा

---

करीत असतात ५. त्यांना राक्षस भक्षण करूं लागले असतां ते दंडकारण्यनिवासी
मुनि माझ्याकडे आले आणि " आमच्यावर अनुग्रह कर " ह्मणून हे द्विजश्रेष्ठ मला
ह्मणाले ६. तेव्हां ह्याप्रमाणें त्यांच्या मुखांतून निघालेलें भाषण श्रवण करून आणि
त्यांच्या ह्मणण्याकडे लक्ष्य देण्याचा विचार करून मीं त्यांना असें ह्मटलें ७ " मी
हूनच तुह्मांकडे येणें योग्य असतांना रक्षण करण्याविषयीं विनंति करण्याकरितां अशा
प्रकारच्या ब्राह्मणांना माझ्याकडे येण्याचा प्रसंग आला ही माझी अत्यंत अपकीर्ति
आहे ८. ह्यास्तव, ह्या श्रमाबद्दल आपण मजवर कृपा करा. मी आपलें काय कार्य
करावें ?" असें मीं द्विजांचें संनिध भाषण केलें. तेव्हां ते सर्वही मुनि एकत्र जुळून मला
ह्मणाले ९ " हे रामा, यथेष्ट रूप धारण करणाऱ्या असंख्य राक्षसांनीं आह्मांला अति-
शय गांजून सोडिलें आहे. ह्यास्तव, त्यांपासून तूं आमचें रक्षण कर १०. हे निष्पापा,
होमकाल व पर्वकाल प्राप्त झाला असतां ते मांसभक्षक दुर्धर राक्षस आह्मांला ग्रासून
टाकितात ११. राक्षसांनीं घेरल्यामुळें त्राता शोधूं लागलेल्या आह्मा तपस्वी मुनींचा
श्रेष्ठ त्राता तूंच आहेस १२. मनांत आणिल्यास तपःसामर्थ्यानें आह्मी त्या राक्षसांचा
वध करण्यास समर्थ आहों; परंतु, पुष्कळ दिवसांपासून संपादन केलेल्या तपाचा व्यय
करण्याची आमची इच्छा नाहीं १३. कारण, हे राघवा, तपामध्यें नेहमीं अनेक विघ्नें
येत असतात व ह्यामुळें तें होणें दुर्घट आहे. ह्मणून राक्षस आह्मांला भक्षण करीत
असतांनाही आह्मी शाप देत नाहीं १४. तस्मात्, दंडकारण्यनिवासी राक्षसांची पीडा
होत असलेल्या आमचें भ्रात्यासहवर्तमान तूं रक्षण कर; तूंच आमचा नाथ आहेस

कार्त्स्न्येन परिपालनम् । ऋषीणां दण्डकारण्ये संश्रुतं जनकात्मजे १६
संश्रुत्य च न शक्ष्यामि जीवमानः प्रतिश्रवम् । मुनीनामन्यथा कर्तुं
सत्यमिष्टं हि मे सदा १७ अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्म-
णाम् । न तु प्रतिज्ञां संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः १८ तदवश्यं मया
कार्यमृषीणां परिपालनम् । अनुक्तेनापि वैदेहि प्रतिज्ञाय कथं पुनः १९
मम स्नेहाच्च सौहार्दादिदमुक्तं त्वया वचः । परितुष्टोस्म्यहं सीते न ह्यनि-
ष्टोनुशास्यते २० सदृशं चानुरूपं च कुलस्य तव शोभने । सधर्मचा-
रिणी मे त्वं प्राणेभ्योपि गरीयसी २१ इत्येवमुक्त्वा वचनं महात्मा सीतां
प्रियां मैथिलराजपुत्रीम् । रामो धनुष्मान्सह लक्ष्मणेन जगाम रम्याणि
तपोवनानि २२ [ ५७६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्येरण्यकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

अग्रतः प्रययौ रामः सीता मध्ये सुशोभना । पृष्ठतस्तु धनुष्पाणि-
र्लक्ष्मणोनुजगाम ह १ तौ पश्यमानौ विविधाञ्शैलप्रस्थान्वनानि च ।

---

असें समजून आह्मी वनामध्यें वास्तव्य करीत आहोंत " १५. हें भाषण श्रवण केल्या-वर, हे जनककन्ये, दंडकारण्यामध्यें ऋषींचें सर्वस्वीं परिपालन करण्याची मीं प्रतिज्ञा केली आहे १६ आणि एकदां जी मुनींशीं प्रतिज्ञा केली त्या प्रतिज्ञेचें जिवांत जीव आहे तोंप-र्यंत माझ्यानें उल्लंघन होणें शक्य नाहीं. कारण, सत्य हें मला नेहमींच इष्ट आहे १७ हे सीते, मी आपल्या जीविताचा अथवा लक्ष्मणासहवर्तमान तुझा त्याग करीन. परंतु, केलेली प्रतिज्ञा आणि त्यांतूनही विशेषतः ब्राह्मणांशीं केलेली प्रतिज्ञा मी फिरविणार नाहीं १८. सारांश, हे सीते, कोणी सांगण्याची अपेक्षा न धरितांही ऋषींचें परिपालन मला अवश्य केलें पाहिजे. तेव्हां प्रतिज्ञा करूनही तें कसें बरें न करावें ? १९ हे सीते, माझे ठिकाणीं तुझें प्रेम असल्यामुळें आणि माझ्याविषयीं तुझें हृदय चांगलें असल्यामुळें तूं हें भाषण केलें आहेस आणि तें ऐकून मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. कारण, जो अप्रिय असेल त्याला कोणी हिताचा उपदेश करीत नसतो २०. हे कल्याणि, हें तुझें भाषण तुझ्या प्रेमाला योग्य असून तुझ्या कुलालाही शोभणारें आहे आणि तूं सहधर्मचारिणी मला प्राणांपेक्षाही प्रिय आहेस " २१. असो. मैथिलराजकन्या प्रिया सीतेशीं हें व अशा प्रकारचें भाषण करून महात्मा धनुर्धारी राम लक्ष्मणासहवर्तमान रम्य तपोवना-मध्यें गेला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

राम पुढें चालले, महाकल्याणी सीता मध्यें निघाली आणि धनुष्य हातांत घेऊन

नदीश्च विविधा रम्या जग्मतुः सह सीतया २ सारसांश्चक्रवाकांश्च
नदीपुलिनचारिणः। सरांसि च सपद्मानि युतानि जलजैः खगैः ३
यूथबन्धांश्च पृषतान्मदोन्मत्तान्विषाणिनः। महिषांश्च वराहांश्च
गजांश्च द्रुमवैरिणः ४ ते गत्वा दूरमध्वानं लम्बमाने दिवाकरे।
ददृशुः सहिता रम्यं तटाकं योजनायतम् ५ पद्मपुष्करसंबाधं गजयूथै-
रलंकृतम्। सारसैर्हंसकादम्बैः संकुलं जलजातिभिः ६ प्रसन्नसलिले
रम्ये तस्मिन्सरसि शुश्रुवे। गीतवादित्रनिर्घोषो न तु कश्चन दृश्यते ७
ततः कौतूहलाद्रामो लक्ष्मणश्च महारथः। मुनिं धर्मभृतं नाम प्रष्टुं समु-
पचक्रमे ८ इदमत्यद्भुतं श्रुत्वा सर्वेषां नो महामुने। कौतूहलं महज्जातं
किमिदं साधु कथ्यताम् ९ तेनैवमुक्तो धर्मात्मा राघवेण मुनिस्तदा।
प्रभावं सरसः क्षिप्रमाख्यातुमुपचक्रमे १० इदं पञ्चाप्सरो नाम तटाकं
सार्वकालिकम्। निर्मितं तपसा राम मुनिना माण्डकर्णिना ११ स हि

---

लक्ष्मण मागून जाऊं लागला १. नानाप्रकारचीं पर्वतशिखरें, वनें आणि अनेक प्रकारच्या रम्य नद्या अवलोकन करीत करीत ते उभयतां रामलक्ष्मण सीतेसहवर्तमान जाऊं लागले २ आणि जातांना नद्यांच्या वाळवंटांतून रहाणारे सारस व चक्रवाकपक्षी जलामध्यें रहाणाऱ्या पक्ष्यांनीं व कमलांनीं युक्त असलेलीं सरोवरें ३, टोळ्या करून करून राहणारे पृषत मृग, मदोन्मत्त झालेले दंष्ट्रायुक्त महिष, वराह आणि वृक्षशत्रु गज ह्यांनाही ते अवलोकन करीत चालले ४. जातां जातां दूर मार्ग आक्रमण केल्यानंतर सूर्य कलल्यावर ( सायंकाळीं ) एका जुटीनें जात असलेल्या त्या त्रिवर्गांनीं प्रत्येक बाजूला एकेक योजन लांब असलेलें एक सरोवर अवलोकन केलें ५. सरोवर आरक्तवर्ण व श्वेतवर्ण कमलांनीं गजबजून गेलें होतें, हत्तींच्या कळपांनीं तें भूषित झालेलें होतें व सारस, राजहंस आणि कलहंस आणि मत्स्यादि जलचर प्राणी ह्यांनीं तें व्याप्त झालेलें होतें ६. असो. निर्मल जलानें युक्त असलेल्या त्या रम्य सरोवरामध्यें गायनाचा व वाद्याचा सूर कानीं ऐकूं येत होता. परंतु, तेथें कोणीही दृष्टोत्पत्तीस येत नव्हता ७. तेव्हां तें जाणण्याच्या उत्सुकतेमुळें राम व महारथि लक्ष्मण धर्मभृतसंज्ञक मुनींना विचारूं लागले कीं ८, "हे महामुने, हें अत्यंत आश्चर्य श्रवण करून आह्मा सर्वांनाच मोठी उत्सुकता प्राप्त झाली आहे. ह्यास्तव, हें काय तें आपण चांगलें सांगा" ९. ह्याप्रमाणें रामानें विनंति केली असतां ते धर्मात्मे मुनि त्या सरोवराचा प्रभाव विलंब न करितां सांगूं लागले कीं १०, "हे रामा, मांडकर्णीमुनींनीं पंचाप्सर नांवाचें हें सार्वकालिक सरोवर तपानें निर्माण केलेलें आहे ११. त्या मांडकर्णी महामुनींनीं वायु

तेपे तपस्तीव्रं माण्डकर्णिर्महामुनिः । दशवर्षसहस्राणि वायुभक्षो जला-
शये १२ ततः प्रव्यथिताः सर्वे देवाः साग्निपुरोगमाः । अब्रुवन्वचनं
सर्वे परस्परसमागताः १३ अस्माकं कस्यचित्स्थानमेष प्रार्थयते मुनिः ।
इति संविग्नमनसः सर्वे तत्र दिवौकसः १४ ततः कर्तुं तपोविघ्नं सर्वदेवैर्नि-
योजिताः । प्रधानाप्सरसः पञ्च विद्युच्चलितवर्चसः १५ अप्सरोभिस्त-
तस्ताभिर्मुनिर्दृष्टपरावरः । नीतो मदनवश्यत्वं देवानां कार्यसिद्धये १६
ताश्चैवाप्सरसः पञ्च मुनेः पत्नीत्वमागताः । तटाके निर्मितं तासां तस्मि-
न्नन्तर्हितं गृहम् १७ तत्रैवाप्सरसः पञ्च निवसन्त्यो यथासुखम् । रम-
यन्ति तपोयोगान्मुनिं यौवनमास्थितम् १८ तासां संक्रीडमानानामेष
वादित्रनिःस्वनः । श्रूयते भूषणोन्मिश्रो गीतशब्दो मनोहरः १९ आश्च-
र्यमिति तस्यैतद्वचनं भावितात्मनः । राघवः प्रतिजग्राह सह भ्रात्रा महा-
यशाः २० एवं कथयमानः स ददर्शाश्रममण्डलम् । कुशचीरपरिक्षिप्तं
ब्राह्म्या लक्ष्म्या समावृतम् २१ प्रविश्य सह वैदेह्या लक्ष्मणेन च राघवः ।

---

भक्षण करून जलाशयामध्यें दहा हजार वर्षें तीव्र तप केलें १२. तेव्हां अग्निप्रभृति सर्व देव घाबरून गेले आणि सर्वही परस्पर जुळून ह्मणाले १३ " आपणांपैकीं कोणाचें स्थान घेण्याची तर हा मुनि इच्छा करीत नाहीं ना ? ". ह्याप्रमाणें ते सर्व मनामध्यें उद्विग्न झाले १४. तदनंतर त्या मुनींच्या तपाला विघ्न करण्याकरितां चंचल विद्युलते-प्रमाणें तेजस्वी असलेल्या पांच श्रेष्ठ अप्सरांची सर्व देवांनीं मिळून योजना केली १५ व त्या अप्सरांनीं ऐहिक व पारलौकिक धर्माधर्म अवगत असलेल्या त्या मुनींना देवांचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां कामाधीन करून सोडिलें १६. त्याच पांच अप्सरा मुनींच्या पत्न्या झाल्या व त्यांच्यासहवर्तमान क्रीडा करण्याकरितां त्या मुनींनीं त्या सरोवरामध्यें एक गुप्त गृह निर्माण केलें १७. त्या गुप्त गृहामध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या पांच अप्सरा तपःसामर्थ्यामुळें यौवनावस्थेंतच असलेल्या त्या मुनीला यथेष्ट रमवीत आहेत १८ व क्रीडा करीत असलेल्या त्या अप्सरांच्याच वाद्यांचा व भूषणध्वनीनें मिश्र झालेला गायनाचा मनोहर ध्वनि कानावर येत आहे " १९ असें त्या धर्मभृत-संज्ञक मुनींनीं सांगितलें असतां " आश्चर्य ! " असें ह्मणून त्या जितेंद्रिय मुनींचें हें सांगणें भ्रात्यासहवर्तमान महायशस्वी रामानें ऐकून घेतलें २०. ह्याप्रमाणें तो राम त्या मुनींशीं संभाषण करीत असतांना ठिकठिकाणीं दर्भ व वल्कलें ज्यांत पडलीं आहेत आणि कृष्णाजिनप्रभृति ब्राह्मणांच्या संपत्तीनें जो व्याप्त झालेला आहे असा एक आश्रमसमुदाय त्या रामानें अवलोकन केला २१. सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्त-

तदा तस्मिन्स काकुत्स्थः श्रीमत्याश्रममण्डले २२ उषित्वा स सुखं तत्र पूज्यमानो महर्षिभिः । जगाम चाश्रमांस्तेषां पर्यायेण तपस्विनाम् २३ येषामुषितवान्पूर्वं सकाशे स महास्त्रवित् । क्वचित्परिदशान्मासानेकसंवत्सरं क्वचित् २४ क्वचिच्च चतुरो मासान्पञ्च षट् च परान्क्वचित् । अपरत्राधिकान्मासानध्यर्धमधिकं क्वचित् २५ त्रीन्मासानष्टमासांश्च राघवो न्यवसत्सुखम् २६ तत्र संवसतस्तस्य मुनीनामाश्रमेषु वै । रमतश्चानुकूल्येन ययुः संवत्सरा दश २७ परिसृत्य च धर्मज्ञो राघवः सह सीतया । सुतीक्ष्णस्याश्रमपदं पुनरेवाजगाम ह २८ स तमाश्रममागम्य मुनिभिः परिपूजितः । तत्रापि न्यवसद्रामः किंचित्कालमरिंदमः २९ अथाश्रमस्थो विनयात्कदाचित्तं महामुनिम् । उपासीनः स काकुत्स्थः सुतीक्ष्णमिदमब्रवीत् ३० अस्मिन्नरण्ये भगवन्नगस्त्यो मुनिसत्तमः । वसतीति मया नित्यं कथाः कथयतां श्रुतम् ३१ न तु जानामि तं देशं वनस्यास्य महत्तया । कुत्राश्रमपदं रम्यं महर्षेस्तस्य धीमतः ३२ प्रसा-

---

त्यान ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्या श्रीसंपन्न आश्रममंडलामध्यें प्रविष्ट झाल्यावर २२ आणि महर्षि मानसंमान करीत असतांना तेथें राहिल्यावर अनुक्रमानें त्या तपस्वी मुनींचे आश्रम तो हिंडू लागला २३. ज्या ऋषींच्या आश्रमामध्यें रामानें पूर्वीं एकदां वास्तव्य केलें होतें त्या मुनींच्याही आश्रमाला तो महास्त्रवेत्ता राम पुनरपि वास्तव्य करण्याकरितां गेला. कोठें तो दहा महिने राहिला, कोठें एक वर्षभर त्यानें वास्तव्य केलें २४, कोठें त्यानें चार महिने काढिले, कोठें पांच पांच, सहा सहा महिने वास्तव्य केलें, दुसऱ्या कांहीं आश्रमांमध्यें वर्षापेक्षांही अधिक महिने तो राहिला, कोठें दीड वर्षापेक्षांही अधिक दिवस काढिले २५ आणि कोठें तीन तीन महिने व कोठें आठ आठ महिने त्या राघवानें सुखानें वास्तव्य केलें २६. ह्याप्रमाणें मुनींच्या आश्रमामध्यें राम आनंदानें राहूं लागला असतां त्याचीं दहा वर्षें सुखानें गेलीं २७. तेव्हां सर्व आश्रम हिंडून तो धर्मज्ञ राम सीतेसहवर्तमान पुनरपि सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमाला आला २८. त्या आश्रमाला आल्यावर मुनींनीं सर्वप्रकारें त्याचें आदरातिथ्य केलें व त्या ठिकाणींही कांहीं दिवसपर्यंत तो शत्रुदमन राम राहिला २९. नंतर आश्रमामध्यें असलेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम एकदां सुतीक्ष्ण महामुनींपाशीं बसला असतांना विनयानें त्यांना ह्मणाला ३० "हे भगवन्, मुनिश्रेष्ठ अगस्त्य ह्या अरण्यामध्यें वास्तव्य करीत असतात असें मीं गोष्टी सांगणाऱ्या ऋषींपासून बरेच वेळां ऐकिलें आहे ३१; परंतु, हें वन मोठें असल्यामुळें तो प्रदेश मला ठाऊक नाहीं आणि त्या

दार्थं भगवतः सानुजः सह सीतया । अगस्त्यमधिगच्छेयमभिवादयितुं मुनिम् ३३ मनोरथो महानेष हृदि संपरिवर्तते । यदहं तं मुनिवरं शुश्रूषेयमपि स्वयम् ३४ इति रामस्य स मुनिः श्रुत्वा धर्मात्मनो वचः । सुतीक्ष्णः प्रत्युवाचेदं प्रीतो दशरथात्मजम् ३५ अहमप्येतदेव त्वां वक्तुकामः सलक्ष्मणम् । अगस्त्यमभिगच्छेति सीतया सह राघव ३६ दिष्ट्या त्विदानीमर्थेऽस्मिन्स्वयमेव ब्रवीषि माम् । अयमाख्यामि ते राम यत्रागस्त्यो महामुनिः ३७ योजनान्याश्रमात्तात याहि चत्वारि वै ततः । दक्षिणेन महाञ्छ्रीमानगस्त्यभ्रातुराश्रमः ३८ स्थलीप्रायवनोद्देशे पिप्पलीवनशोभिते । बहुपुष्पफले रम्ये नानाविहगनादिते ३९ पद्मिन्यो विविधास्तत्र प्रसन्नसलिलाशयाः । हंसकारण्डवाकीर्णाश्चक्रवाकोपशोभिताः ४० तत्रैकां रजनीं व्युष्य प्रभाते राम गम्यताम् । दक्षिणां दिशमास्थाय वनखण्डस्य पार्श्वतः ४१ तत्रागस्त्याश्रमपदं गत्वा योजनमन्तरम् । रमणीये वनोद्देशे बहुपादपशोभिते ४२ रंस्यते तत्र वैदेही लक्ष्मणश्च

---

विवेकी महर्षींचें तें रम्य आश्रमस्थान कोठें आहे हेंही मला माहीत नाहीं ३२. तथापि, त्या भगवानांची कृपा व्हावी एतदर्थ लक्ष्मण आणि सीता ह्यांसहवर्तमान त्या अगस्त्य मुनींना अभिवंदन करण्याकरितां मी जाणार आहें ३३ व त्या श्रेष्ठ मुनींची एकदां आपण स्वतः सेवा करावी हा मोठा मनोरथ माझ्या हृदयामध्यें घोळत आहे " ३४. ह्याप्रमाणें धर्मात्म्या रामाचें भाषण श्रवण करून ते सुतीक्ष्णमुनि त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्या दशरथपुत्राला ह्मणाले ३५ " हे राघवा,—सीतेसहवर्तमान अगस्त्यमुनींकडे जा — हेंच लक्ष्मणासहवर्तमान तुला सांगण्याचा माझा उद्देश आहे ३६. तेव्हां तूं स्वतःच ह्या गोष्टीविषयीं मला विचारीत आहेस हें फारच चांगलें आहे. हे रामा, ह्या मी तुला महामुनि अगस्त्य कोठें रहातात तें सांगतों ३७. बा रामा, ह्या आश्रमांतून चार योजनेंपर्यंत तूं दक्षिणेस जा ह्मणजे अगस्त्यमुनींच्या भ्रात्याचा एक मोठा भव्य आश्रम तेथें आहे ३८. पिप्पलीवनांनीं शोभित, नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं नादित, विपुल फलमूलांनीं युक्त आणि रम्य अशा स्वाभाविक वनप्रदेशावर तो आश्रम आहे ३९ व त्या ठिकाणीं हंस व कारंडोल पक्ष्यांनीं व्याप्त, चक्रवाक पक्ष्यांनीं सुशोभित आणि निर्मल जलानें युक्त अशीं नानाप्रकारचीं कमलयुक्त सरोवरें आहेत ४०. हे रामा, त्या ठिकाणीं एक रात्र वास्तव्य कर आणि प्रभातकालीं वनप्रदेशाच्या बाजूनें दक्षिण दिशेचें अवलंबन करून जा ४१. दक्षिण दिशेस एक योजनपर्यंत प्रदेश तूं चालून

त्वया सह । स हि रम्यो वनोद्देशो बहुपादपसंयुतः४३यदि बुद्धिः कृता द्रष्टुम-
गस्त्यं तं महामुनिम्।अद्यैव गमने बुद्धिं रोचयस्व महामते४४इति रामो मुनेः
श्रुत्वा सह भ्रात्राभिवाद्य च । प्रतस्थेऽगस्त्यमुद्दिश्य सानुजः सह सीतया४५
पश्यन्वनानि चित्राणि पर्वतांश्चाभ्रसंनिभान् । सरांसि सरितश्चैव पथि
मार्गवशानुगान् ४६ सुतीक्ष्णेनोपदिष्टेन गत्वा तेन पथा सुखम् । इदं पर-
मसंहृष्टो वाक्यं लक्ष्मणमब्रवीत् ४७ एतदेवाश्रमपदं नूनं तस्य महात्मनः।
अगस्त्यस्य मुनेर्भ्रातुर्दृश्यते पुण्यकर्मणः ४८ यथा हीमे वनस्यास्य ज्ञाताः
पथि सहस्रशः । संनताः फलभारेण पुष्पभारेण च द्रुमाः ४९ पिप्प-
लीनां च पक्वानां वनादस्मादुपागतः । गन्धोऽयं पवनोत्क्षिप्तः सहसा कटु-
कोदयः ५० तत्र तत्र च दृश्यन्ते संक्षिप्ताः काष्ठसंचयाः । लूनाश्च परि-
दृश्यन्ते दर्भा वैदूर्यवर्चसः ५१ एतच्च वनमध्यस्थं कृष्णाभ्रशिखरोपमम् ।
पावकस्याश्रमस्थस्य धूमाग्रं संप्रदृश्यते ५२ विविक्तेषु च तीर्थेषु कृत-
स्नाना द्विजातयः । पुण्योपहारं कुर्वन्ति कुसुमैः स्वयमर्जितैः ५३ ततः

---

गेलास म्हणजे विपुल वृक्षांनीं सुशोभित अशा रम्य वनप्रदेशामध्यें अगस्त्यमुनींचा आश्रम तूं अवलोकन करशील ४२ व तुझ्यासहवर्तमान लक्ष्मण आणि सीता ह्यांना तेथें करमणूक होईल. कारण, तो वनप्रदेश विपुल वृक्षांनीं युक्त व रम्य आहे ४३. तेव्हां त्या अगस्त्य महर्षींचें दर्शन घेण्याचा जर तुझा विचार झाला असेल तर, हे महामते, तूं आजच जाण्याचा बेत कर " ४४. ह्याप्रमाणें सुतीक्ष्ण मुनींचें भाषण श्रवण करून भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान रामानें त्यांना अभिवंदन केलें आणि अगस्त्यमुनींकडे जाण्याचा उद्देश मनांत धरून लक्ष्मण व सीता ह्यांसहवर्तमान तो राम तेथून निघाला ४५ व जातां जातां मार्गामध्यें प्राप्त झालेलीं अद्भुत वनें, मेघांसारिखे पर्वत, सरोवरें आणि नद्या पहात पहात तो मार्गानें चालला ४६. ह्याप्रमाणें सुतीक्ष्ण मुनींनीं सांगितलेल्या त्या मार्गानें निर्विघ्नपणें गेल्यावर राम अतिशय आनंदित होऊन लक्ष्मणाला ह्मणाला ४७ " खरोखर त्या महात्म्या अगस्त्य मुनींच्या पुण्यवान् भ्रात्याचाच हा आश्रम दिसत आहे ४८. कारण, जशा प्रकारचें वन आपण ऐकिलें होतें तशाच प्रकारच्या फलभारानें व पुष्पभारानें लवलेले हे वृक्ष ह्या वनाच्या मार्गामध्यें हजारों दिसून येत आहेत ४९. तिखटपणा ज्यामध्यें आहे असा हा पक्व पिप्पलीफलांचा गंध वायूमुळें ह्या वनांतून येत आहे ५०, ठिकठिकाणीं काष्ठांचे ढीग घालून ठेविलेले दिसत आहेत आणि वैदूर्य मण्याप्रमाणें तेजस्वी दर्भही कांपून नेलेले दिसत आहेत ५१. कृष्णवर्ण मेघ आणि पर्वतशिखर ह्यांचीच उपमा ज्याला योग्य आहे असा हा आश्रमसंबंधीं अग्नीचा धूर वनामध्यें दिसत आहे ५२. एकांत प्रदे-

सुतीक्ष्णवचनं यथा सौम्य मया श्रुतम् । अगस्त्यस्याश्रमो भ्रातुर्नूनमेष भविष्यति ५४ निगृह्य तरसा मृत्युं लोकानां हितकाम्यया । यस्य भ्रात्रा कृतेयं दिक्शरण्या पुण्यकर्मणा ५५ इहैकदा किल क्रूरो वातापिरपि चेल्वलः । भ्रातरौ सहितावास्तां ब्राह्मणघ्नौ महासुरौ ५६ धारयन्ब्राह्मणं रूपमिल्वलः संस्कृतं वदन् । आमन्त्रयति विप्रान्स श्राद्धमुद्दिश्य निर्घृणः ५७ भ्रातरं संस्कृतं कृत्वा ततस्तं मेषरूपिणम् । तान्द्विजान्भोजयामास श्राद्धदृष्टेन कर्मणा ५८ ततो भुक्तवतां तेषां विप्राणामिल्वलोऽब्रवीत् । वातापे निष्क्रमस्वेति स्वरेण महता वदन् ५९ ततो भ्रातुर्वचः श्रुत्वा वातापिर्मेषवन्नदन् । भित्त्वा भित्त्वा शरीराणि ब्राह्मणानां विनिष्पतत् ६० ब्राह्मणानां सहस्राणि तैरेवं कामरूपिभिः । विनाशितानि संहत्य नित्यशः पिशिताशनैः ६१ अगस्त्येन तदा देवैः प्रार्थितेन महर्षिणा । अनुभूय किल श्राद्धे भक्षितः स महासुरः ६२ ततः संपन्नमित्युक्त्वा दत्त्वा

---

शावरील तीर्थांमध्यें स्नान केलेले हे ब्राह्मण स्वसंपादित पुष्पांनीं पुण्यसंपादक असें देवपूजन करीत आहेत ५३. सारांश, हे सौम्या, सुतीक्ष्णाचें सांगणें ज्याप्रमाणें मीं ऐकिलें आहे त्याचप्रमाणें पहातां खरोखर हा अगस्त्य मुनींच्या भ्रात्याचाच आश्रम असला पाहिजे ५४. ह्या आश्रमांतील अधिपतींच्या भ्रात्यानें ह्मणजे अर्थात् पुण्यकर्म करणाऱ्या अगस्त्यमुनींनीं लोकांचें हित करण्याकरितां एका मृत्युतुल्य दैत्याचा स्वसामर्थ्यानें निग्रह करून ही दिशा लोकांनीं वास्तव्य करण्याला योग्य केली आहे ५५. इतिहासामध्यें असें सांगितलें आहे कीं, ह्या ठिकाणीं एके वेळीं क्रूर वातापि आणि इल्वल असे ब्राह्मणघातकी महादैत्य भ्राते एकत्र रहात होते ५६. तो निर्दय इल्वल ब्राह्मणाचें रूप धारण करून आणि ब्राह्मणाप्रमाणें संस्कारयुक्त भाषण करून ब्राह्मणांना श्राद्धाकरितां निमंत्रण करीत असे ५७ आणि मेषरूप धारण केलेल्या आपल्या त्या वातापि भ्रात्याला शिजवून श्राद्धविधीनें तो त्या ब्राह्मणांना भोजन घालीत असे ५८. नंतर त्या विप्रांचें भोजन झाल्यावर " हे वातापे, बाहेर नीघ " असे शब्द उच्चस्वरानें उच्चारीत उच्चारीत इल्वल त्याला हाक मारी ५९ आणि भ्रात्याची ती हाक ऐकिल्यावर मेषाप्रमाणें शब्द करणारा तो वातापि ब्राह्मणांचीं शरीरें फोडफोडून बाहेर निघे ६०. त्या यथेष्ट रूप धारण करणाऱ्या मांसभक्षक दैत्यांनीं नित्य एकत्र जुळून ह्याप्रमाणें हजारों ब्राह्मणांचा वध केला असतां ६१ देवांनीं प्रार्थना केल्यावरून अगस्त्य महर्षींनीं श्राद्धाचें निमंत्रण घेऊन खरोखर तो महादैत्य भक्षण करून टाकिला ६२. इल्वलानें अगस्त्यमुनींना श्राद्धामध्यें भोजन

हस्ते वने जनम्। भ्रातरं निष्क्रमस्वेति इल्वलः समभाषत ६३ स तदा भाषमाणं
तु भ्रातरं विप्रघातिनम् । अब्रवीत्प्रहसन्धीमानगस्त्यो मुनिसत्तमः ६४
कुतो निष्क्रमितुं शक्तिर्मया जीर्णस्य रक्षसः । भ्रातुस्तु मेषरूपस्य गतस्य
यमसादनम् ६५ अथ तस्य वचः श्रुत्वा भ्रातुर्निधनसंश्रितम् । प्रधर्ष-
यितुमारेभे मुनिं क्रोधान्निशाचरः ६६ सोऽभ्यद्रवद्द्विजेन्द्रं तं मुनिना दीप्त-
तेजसा । चक्षुषानलकल्पेन निर्दग्धो निधनं गतः ६७ तस्यायमाश्रमो
भ्रातुस्तटाकवनशोभितः । विप्रानुकम्पया येन कर्मेदं दुष्करं कृतम् ६८
एवं कथयमानस्य तस्य सौमित्रिणा सह । रामस्यास्तं गतः सूर्यः संध्या-
कालोऽभ्यवर्तत ६९ उपास्य पश्चिमां संध्यां सह भ्रात्रा यथाविधि । प्रवि-
वेशाश्रमपदं तमृषिं चाभ्यवादयत् ७० सम्यक्प्रतिगृहीतस्तु मुनिना तेन
राघवः । न्यवसत्तां निशामेकां प्राश्य मूलफलानि च ७१ तस्यां रात्र्यां
व्यतीतायामुदिते रविमण्डले । भ्रातरं तमगस्त्यस्य आमन्त्रयत राघवः ७२
अभिवादये त्वा भगवन्सुखमस्म्युषितो निशाम् । आमन्त्रये त्वां गच्छामि

झाल्यानंतर " नित्यं श्राद्धं संपन्नं (ह्मणजे मीं केलेलें नित्य श्राद्ध परिपूर्ण झालें नां ?)" असें विचारिलें आणि (" सुसंपन्नं "–ह्मणजे तुझें नित्य श्राद्ध चांगल्या रीतीनें शेंवटास गेलें–असें त्यांनीं सांगितल्यावर ) आपोशनाकरितां त्यांच्या हातावर उदक घालून त्या इल्वलानें " बाहेर ये " असें वनामध्यें भ्रात्याला सांगितलें ६३. तेव्हां त्या भ्रात्याला हाक मारणाऱ्या ब्रह्मघातकी इल्वलाला ते बुद्धिमान् मुनिश्रेष्ठ अगस्त्य हंसत हंसत ह्मणाले ६४ " अरे, मीं जिरवून टाकिल्यामुळें यमसदनाला गेलेल्या तुझ्या मेषरूप राक्षस भ्रात्याचें बाहेर येण्याला आतां सामर्थ्य कोठें उरलें आहे ?" ६५. हें भ्रात्याच्या मरणासंबंधाचें त्या अगस्त्यमुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्या निशाचर इल्वलानें क्रोधानें त्या मुनींची हिंसा करण्याचा विचार केला ६६ आणि तो त्या द्विजश्रेष्ठाच्या अंगावर धांवला; परंतु, देदीप्यमान तेजानें युक्त असलेल्या त्या अगस्त्य मुनींनीं आपल्या अग्नितुल्य दृष्टीनेंच त्याला दग्ध करून टाकिल्यामुळें तो मृत्यु पावला ६७. असो. ब्राह्मणांची दया येऊन ज्यांनीं हें दुष्कर कर्म केलें त्या, अगस्त्यमुनींच्या भ्रात्याचा हा सरोवर व वन ह्यांनीं सुशोभित झालेला आश्रम आहे " ६८. ह्याप्रमाणें राम लक्ष्मणाला सांगत आहे तोंच सूर्य अस्तंगत होऊन संध्याकाळ झाली ६९. तेव्हां लक्ष्मणासहवर्तमान यथाविधि सायंसंध्या करून राम या आश्रमामध्यें प्रविष्ट झाला आणि त्या ऋषींना त्यानें अभिवंदन केलें ७०. त्या मुनींनीं त्याचें उत्तम प्रकारें स्वागत केलें आणि मुळें व फळें भक्षण करून तो ती

गुरुं ते द्रष्टुमग्रजम् ७३ गम्यतामिति तेनोक्तो जगाम रघुनन्दनः । यथो-
द्दिष्टेन मार्गेण वनं तच्चावलोकयन् ७४ नीवारान्पनसान्सालान्वञ्जुलांस्ति-
निशांस्तथा । चिरिबिल्वान्मधूकांश्च बिल्वानथ च तिन्दुकान् ७५ पुष्पि-
तान्पुष्पिताग्राभिर्लताभिरुपशोभितान् । ददर्श रामः शतशस्तत्र कान्ता-
रपादपान् ७६ हस्तिहस्तैर्विमृदितान्वानरैरुपशोभितान् । मत्तैः शकुनि-
सङ्घैश्च शतशः प्रतिनादितान् ७७ ततोब्रवीत्समीपस्थं रामो राजीवलो-
चनः । पृष्ठतोनुगतं वीरं लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम् ७८ स्निग्धपत्रा यथा
वृक्षा यथा क्षान्ता मृगद्विजाः । आश्रमो नातिदूरस्थो महर्षेर्भाविता-
त्मनः ७९ अगस्त्य इति विख्यातो लोके स्वेनैव कर्मणा । आश्रमो
दृश्यते तस्य परिश्रान्तश्रमापहः ८० प्राज्यधूमाकुलवनश्चीरमालापरि-
ष्कृतः । प्रशान्तमृगयूथश्च नानाशकुनिनादितः ८१ निगृह्य तरसा
मृत्युं लोकानां हितकाम्यया । दक्षिणा दिक्कृता येन शरण्या पुण्य-
कर्मणा ८२ तस्येदमाश्रमपदं प्रभावाद्यस्य राक्षसैः । दिगियं दक्षि-

---

रात्र तेथें राहिला ७१. नंतर ती रात्र संपून रविमंडलाचा उदय झाल्यावर राम त्या अगस्त्यमुनींच्या भ्रात्याचा निरोप घेऊं लागला कीं ७२, "हे भगवन्, मी आपणाला अभिवंदन करितों; गेल्या रात्रीं येथें माझें वास्तव्य सुखानें झालें. आतां आपली अनुज्ञा घेऊन आपल्या गुरु ज्येष्ठ भ्रात्याच्या दर्शनाकरितां मी जातों" ७३. असें रामानें त्यांना विचारिल्यावर "जा" ह्मणून त्या मुनींनीं त्याला सांगितलें व नंतर तो रघुनंदन राम सुतीक्ष्णमुनींनीं सांगितलेल्या मार्गानें तें वन अवलोकन करीत करीत पुढें गेला ७४. जलकदंब, फणस, सालवृक्ष, अशोक, तिवस, करंज, मोहा आणि टेंभुरणी असे प्रफुल्लित लतांनीं सुशोभित असलेले शेंकडों वनवृक्ष रामानें जातां जातां अवलोकन केले ७५, ७६ आणि हत्तींच्या सोंडांनीं मुरगळलेले, वानरांनीं सुशोभित व मत्त पक्षिगणांनीं नादित असेही शेंकडों वृक्ष त्यानें पाहिले ७७. तदनंतर समीपच असलेल्या व बरोबर आलेल्या लक्ष्मीवर्धक वीर लक्ष्मणाला कमलनयन राम ह्मणाला ७८ "ज्याअर्थी स्निग्ध पानांनीं युक्त असलेले वृक्ष आणि शांत पशुपक्षी दिसत आहेत त्याअर्थी त्या जितेंद्रिय महर्षींचा आश्रम येथून फार दूर नाहीं ७९. (अगाचें ह्मणजे पर्वताचें स्तंभन करणें ह्या) स्वतःच्याच कर्मानें जगतामध्यें अगस्त्य ह्मणून हे मुनि प्रख्यात झाले आहेत आणि श्रमलेल्या लोकांचे श्रम परिहार करणारा हा त्यांचा आश्रम दिसत आहे ८०. ह्या आश्रमांतील वन विपुल धूमानें व्याप्त झालेलें आहे, वल्कलसमुदायांनीं ह्याला शोभा आलेली आहे, ह्यांतील मृगांचे कळप

णात्रा सा दृश्यते नोपभुज्यते ८३ यदाप्रभृति चाक्रान्ता दिगियं पुण्यकर्मणा । तदाप्रभृति निर्वैराः प्रशान्ता रजनीचराः ८४ नाम्ना चेयं भगवतो दक्षिणा दिक्प्रदक्षिणा । प्रथिता त्रिषु लोकेषु दुर्धर्षा क्रूरकर्मभिः ८५ मार्गं निरोद्धुं सततं भास्करस्याचलोत्तमः । संदेशं पालयंस्तस्य विन्ध्यशैलो न वर्धते ८६ अयं दीर्घायुषस्तस्य लोके विश्रुतकर्मणः। अगस्त्यस्याश्रमः श्रीमान्विनीतमृगसेवितः ८७ एष लोकार्चितः साधुर्हिते नित्यं रतः सताम् । अस्मानधिगतानेष श्रेयसा योजयिष्यति ८८ आराधयिष्याम्यत्राहमगस्त्यं तं महामुनिम् । शेषं च वनवासस्य सौम्य वत्स्याम्यहं प्रभो ८९ अत्र देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । अगस्त्यं नियताहाराः सततं पर्युपासते ९० नात्र जीवेन्मृषावादी क्रूरो वा यदि वा शठः । नृशंसः पापवृत्तो वा मुनिरेष यथाविधः ९१

---

शांत आहेत आणि अनेकप्रकारच्या पक्ष्यांनीं हा नादित केलेला आहे ८१. ज्या पुण्यवान् मुनींनीं लोकांचें हित करण्याकरितां मृत्युतुल्य दैत्याचा स्वसामर्थ्यानें निग्रह करून दक्षिण दिशा लोकांनीं वास्तव्य करण्यास योग्य केली ८२ आणि ज्यांच्या प्रभावामुळें राक्षस अजून सुद्धां भीतीनें ह्या दक्षिण दिशेचा स्वकीय प्रदेश ह्मणून उपभोग घेत नाहींत; परंतु, हिच्याकडे नुसतें पहात मात्र असतात, त्या मुनींचा हा आश्रम होय ८३. जेव्हांपासून ते पुण्यवान् मुनि ह्या दिशेमध्यें संचार करूं लागले, तेव्हांपासून येथील निशाचर प्राण्यांचे ठिकाणीं असलेल्या वैराचा आणि आपल्या क्रूर कर्माचा त्याग करून ते येथें राहिले आहेत ८४. त्या भगवान् अगस्त्य मुनींच्या केवल नामाच्याच प्रभावानें हा दक्षिण दिशेंतील प्रदेश सरळ ( ह्मणजे दुष्टांच्या अंतःकरणांतील वैर वगैरे नाहींसा करण्यास समर्थ ) झालेला आहे आणि क्रूरकर्मी लोकांनीं जिंकण्यास अशक्य ह्मणून त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध झाला आहे ८५. मेरुपर्वतापाशीं स्पर्धा करून सूर्याचा मार्ग नेहमीं आडवूं पाहणारा श्रेष्ठ पर्वत विंध्याद्रि त्या अगस्त्य मुनींची आज्ञा परिपालन करून राहिला असल्यामुळें अद्यापि वृद्धिंगत होत नाहीं ८६. लोकांमध्यें ज्यांचें कर्म प्रख्यात आहे अशा त्या दीर्घायु अगस्त्य मुनींचा हा निरुपद्रवी मृगांनीं आश्रय केलेला भव्य आश्रम होय ८७. लोकांना पूज्य असलेले हे साधु सज्जनांचें हित करण्याविषयीं नेहमीं तत्पर असतात; तेव्हां येथें आलेल्या आपलेंही हे कल्याण करितील ८८. ह्या आश्रमामध्यें राहून मी त्या अगस्त्य महर्षींची सेवा करीन आणि, हे सौम्य व समर्थ लक्ष्मणा, वनवासाचे अवशिष्ट राहिलेले दिवस मी येथेंच काढीन ८९. ह्या आश्रमांमध्यें गंधर्वासहवर्तमान देव, सिद्ध आणि

देवाश्च यक्षाश्च नागाश्च पतगैः सह । वसन्ति नियताहारा धर्ममाराधयिष्णवः १२ अत्र सिद्धा महात्मानो विमानैः सूर्यसंनिभैः । त्यक्त्वा देहान्नवैर्देहैः स्वर्याताः परमर्षयः १३ यक्षत्वममरत्वं च राज्यानि विविधानि च । अत्र देवाः प्रयच्छन्ति भूतैराराधिताः शुभैः १४ आगताः स्माश्रमपदं सौमित्रे प्रविशाग्रतः । निवेदयेह मां प्राप्तमृषये सह सीतया १५ [ ६७१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्ड एकादशः सर्गः ॥ ११ ॥

स प्रविश्याश्रमपदं लक्ष्मणो राघवानुजः । अगस्त्यशिष्यमासाद्य वाक्यमेतदुवाच ह १ राजा दशरथो नाम ज्येष्ठस्तस्य सुतो बली । रामः प्राप्तो मुनिं द्रष्टुं भार्यया सह सीतया २ लक्ष्मणो नाम तस्याहं भ्राता त्ववरजो हितः । अनुकूलश्च भक्तश्च यदि ते श्रोत्रमागतः ३ ते वयं वनमत्युग्रं प्रविष्टाः पितृशासनात् । द्रष्टुमिच्छामहे सर्वे भगवन्तं निवेद्य-

---

महर्षि पवित्र आहार करून नेहमीं अगस्त्य मुनींची सेवा करीत असतात १०. ह्या आश्रमामध्यें असत्य भाषण करणारा, निर्दय, शठ, दुष्ट अथवा पापी पुरुष जिवंत रहात नाहीं. कारण, हे मुनिच तशा प्रकारचे आहेत ११. ह्या आश्रमामध्यें देव, यक्ष आणि गरुडप्रभृति पक्ष्यांसहवर्तमान सर्प पुण्य संपादन करण्याकरितां शुद्ध आहार करून रहात असतात १२. ह्याच आश्रमामध्यें ( तपश्चर्येमुळें ) सिद्ध झालेले महात्मे श्रेष्ठ ऋषि जीर्ण देहांचा त्याग आणि नवीन देहांचा स्वीकार करून व सूर्यासारिख्या तेजस्वी विमानांमध्यें आरूढ होऊन स्वर्गाला गेले आहेत १३. प्राण्यांनीं ह्या आश्रमामध्यें देवांचें सत्कर्मांनीं आराधन केलें असतां ते देव त्यांना यक्षत्व, देवत्व आणि नानाप्रकारचीं राज्यें देतात १४. असो. हे लक्ष्मणा, आपण आश्रमाला येऊन पोंचलों. प्रथम तूं आंत प्रवेश कर आणि सीतेसहवर्तमान मी आल्याचें त्या ऋषींना निवेदन कर १५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

रामाचा कनिष्ठ भ्राता तो लक्ष्मण आश्रमांत जाऊन अगस्त्य मुनींच्या एका शिष्याजवळ गेला आणि त्याला ह्मणाला १ " दशरथ ह्मणून जो राजा होऊन गेला त्याचा बलाढ्य ज्येष्ठ पुत्र राम भार्या सीतेसहवर्तमान मुनींचें दर्शन घेण्याकरितां येथें आला आहे २. अनुकूल, अनुरक्त व त्याच्या हिताविषयीं तत्पर असा मी त्याचा लक्ष्मण ह्मणून कनिष्ठ भ्राता आहें आणि ( बरेच दिवस मी वनवासांत असल्यामुळें ) तुमच्याही ऐकण्यांत असल्याचा संभव आहे ३. ते आह्मी त्रिवर्ग पित्याच्या आज्ञेमुळें अतिशय

ताम् ४ तस्य तद्वचनं श्रुत्वा लक्ष्मणस्य तपोधनः। तथेत्युक्त्वाग्निशरणं प्रविवेश निवेदितुम् ५ स प्रविश्य मुनिश्रेष्ठं तपसा दुष्प्रधर्षणम्। कृताञ्जलिरुवाचेदं रामागमनमञ्जसा ६ यथोक्तं लक्ष्मणेनैव शिष्योगस्त्यस्य संमतः। पुत्रौ दशरथस्येमौ रामो लक्ष्मण एव च ७ प्रविष्टावाश्रमपदं सीतया सह भार्यया। द्रष्टुं भवन्तमायातौ शुश्रूषार्थमरिंदमौ ८ यदत्रानन्तरं तत्त्वमाज्ञापयितुमर्हसि। ततः शिष्यादुपश्रुत्य प्राप्तं रामं सलक्ष्मणम् ९ वैदेहीं च महाभागामिदं वचनमब्रवीत्। दिष्ट्या रामश्चिरस्याद्य द्रष्टुं मां समुपागतः १० मनसा काङ्क्षितं ह्यस्य मयाप्यागमनं प्रति। गम्यतां सत्कृतो रामः सभार्यः सहलक्ष्मणः ११ प्रवेश्यतां समीपं मे किमसौ न प्रवेशितः। एवमुक्तस्तु मुनिना धर्मज्ञेन महात्मना १२ अभिवाद्याब्रवीच्छिष्यस्तथेति नियताञ्जलिः। तदा निष्क्रम्य संभ्रान्तः

---

भयंकर वनामध्यें प्रविष्ट झालों आहों आणि भगवानाचें दर्शन घेण्याची आह्मा सर्वांची इच्छा आहे; आपण त्यांना निवेदन करा" ४. तें त्या लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून तो तपोधन शिष्य "ठीक आहे" असें ह्मणून अगस्त्य मुनींना कळविण्याकरितां होमशालेमध्यें गेला ५ आणि आंत प्रवेश केल्यावर तपश्चर्येमुळें ज्यांच्या समोर इतरांना जाणेंही अशक्य झालें होतें अशा त्या मुनिश्रेष्ठ अगस्त्यांना हात जोडून रामाच्या आगमनाची वर्दी दिली ६ आणि अगस्त्य मुनींना संमत असलेल्या त्या शिष्यानें लक्ष्मणानें सांगिल्याप्रमाणें त्यांना कळविलें. (तो ह्मणाला) "हे दशरथाचे पुत्र रामलक्ष्मण ७ रामभार्या सीतेसहवर्तमान आश्रमामध्यें प्रविष्ट झाले आहेत. हे शत्रुदमन करणारे रामलक्ष्मण आपलें दर्शन घेण्याकरितां आणि कांहीं वेळ आपली शुश्रूषा करण्याकरितां येथें आले आहेत ८. तेव्हां पुढें काय करावयाचें ह्याविषयीं आपण मला आज्ञा करा". शिष्यापासून लक्ष्मणासहवर्तमान राम आणि महाभाग्यवती सीता प्राप्त झाल्याचें श्रवण केल्यावर अगस्त्यमुनि ह्मणाले "वनामध्यें वास्तव्य करूं लागल्याला पुष्कळ दिवस झाले असून राम आज (जागा होऊन) माझें दर्शन घेण्याकरितां आला आहे ही मोठी भाग्याचीच गोष्ट ह्मटली पाहिजे ९,१०. ह्याच्या आगमनाची मलाही मनापासून इच्छा झाली होती. ह्यास्तव, जा आणि भार्या व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान रामाचा सत्कार करून ११ त्याला माझ्याजवळ घेऊन ये. तूं (मला न विचारतांच) त्याला घेऊन कां आला नाहींस?" ह्याप्रमाणें धर्मवेत्त्या महात्म्या अगस्त्यमुनींनीं सांगितलें असतां १२ तो शिष्य हात जोडून अभिवंदनपूर्वक "आज्ञेप्रमाणें करितों" असें त्यांना ह्मणाला आणि नंतर धांदल उडून गेलेला तो शिष्य होमशाळेंतून बाहेर येऊन लक्ष्म-

शिष्यो लक्ष्मणमब्रवीत् १३ कोसौ रामो मुनिं द्रष्टुमेतु प्रविशतु स्वयम् ।
ततो गत्वाश्रमपदं शिष्येण सह लक्ष्मणः १४ दर्शयामास काकुत्स्थं
सीतां च जनकात्मजाम् । तं शिष्यः प्रश्रितं वाक्यमगस्त्यवचनं ब्रुवन् ।५
प्रावेशयद्यथान्यायं सत्कारार्हं सुसत्कृतम् । प्रविवेश ततो रामः सीतया
सह लक्ष्मणः १६ प्रशान्तहरिणाकीर्णमाश्रमं ह्यवलोकयन् । स तत्र ब्रह्मणः
स्थानमग्नेः स्थानं तथैव च १७ विष्णोः स्थानं महेन्द्रस्य स्थानं चैव
विवस्वतः । सोमस्थानं भगस्थानं स्थानं कौबेरमेव च १८ धातुर्वि-
धातुः स्थानं च वायोः स्थानं तथैव च । स्थानं च पाशहस्तस्य वरुणस्य
महात्मनः १९ स्थानं तथैव गायत्र्या वसूनां स्थानमेव च । स्थानं च
नागराजस्य गरुडस्थानमेव च २० कार्तिकेयस्य च स्थानं धर्मस्थानं च
पश्यति । ततः शिष्यैः परिवृतो मुनिरप्यभिनिष्पतत् २१ तं ददर्शाग्रतो रामो
मुनीनां दीप्ततेजसम् । अब्रवीद्वचनं वीरो लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम् २२ बहि-
र्लक्ष्मण निष्क्रामत्यगस्त्यो भगवानृषिः । औदार्येणावगच्छामि निधानं
तपसामिदम् २३ एवमुक्त्वा महाबाहुरगस्त्यं सूर्यवर्चसम् । जग्राहापतत-

---

णाला ह्मणाला १३ " कोण जो हा राम आहे त्याला मुनींचें दर्शन घेण्याकरितां येऊं दे आणि स्वतःच त्यांच्याकडे जाऊं दे " असें शिष्यानें सांगितल्यानंतर राम शिष्या-सहवर्तमान आश्रमामध्यें गेला १४ आणि त्या शिष्याला ककुत्स्थकुलोत्पन्न राम व सीता हीं लक्ष्मणानें दाखवून दिलीं. तेव्हां सत्कारास पात्र असलेल्या त्या अगस्त्य मुनींचें सप्रेम भाषण कथन करीत करीत रामाचा चांगला सत्कार करून तो शिष्य योग्य रीतीनें त्याला आंत घेऊन गेला १५,१६. तेव्हां लक्ष्मण बरोबर असलेला राम सीतेसह-वर्तमान शांत हरिणांनीं व्याप्त असलेला तो आश्रम अवलोकन करीत करीत आंत प्रविष्ट झाला व जातां जातां ब्रह्मदेवाचें स्थान, रुद्राचें स्थान १७, विष्णूचें स्थान, इंद्राचें स्थान, सूर्याचें स्थान, सोमाचें स्थान, ( स्थूलमंडलाभिमानी ) भगाचें स्थान, कुबेराचें स्थान १८, ब्रह्मदेव आणि विश्वकर्मा ह्यांचीं स्थानें, वायूचें स्थान, हातांत पाश घेतलेल्या महात्म्या वरुणाचें स्थान १९, गायत्रीचें स्थान, अष्टवसूंचें स्थान, नागराजाचें स्थान, गरुडाचें स्थान २०, स्कंदाचें स्थान आणि यमराजाचें स्थान तो अवलोकन करूं लागला. असो. राम आल्याचें अवलोकन केल्यानंतर शिष्यगणांनीं परिवेष्टित असलेले मुनिही सामोरे येऊं लागले २१. तेव्हां मुनींच्यापुढें असलेले ते उज्ज्वल तेजस्वी अगस्त्य अवलोकन करून वीर राम लक्ष्मीवर्धक लक्ष्मणाला ह्मणाला २२ " हे लक्ष्मणा, भगवान् अगस्त्य ऋषि बाहेर येत आहेत आणि हें तपाचें भांडारच असावें असें

स्तस्य पादौ च रघुनन्दनः २४ अभिवाद्य तु धर्मात्मा तस्थौ रामः
कृताञ्जलिः । सीतया सह वैदेह्या तदा रामः सलक्ष्मणः २५ प्रतिगृह्य च
काकुत्स्थमर्चयित्वासनोदकैः । कुशलप्रश्नमुक्त्वा च आस्यतामिति सोऽब्र-
वीत् २६ अग्निं हुत्वा प्रदायार्घ्यमतिथीन्प्रतिपूज्य च । वानप्रस्थेन धर्मेण
स तेषां भोजनं ददौ २७ प्रथमं चोपविश्याथ धर्मज्ञो मुनिपुंगवः । उवाच
राममासीनं प्राञ्जलिं धर्मकोविदम् २८ अन्यथा खलु काकुत्स्थ तपस्वी
समुदाचरन् । दुःसाक्षीव परे लोके स्वानि मांसानि भक्षयेत् २९ राजा
सर्वस्य लोकस्य धर्मचारी महारथः । पूजनीयश्च मान्यश्च भवान्प्राप्तः
प्रियातिथिः ३० एवमुक्त्वा फलैर्मूलैः पुष्पैश्चान्यैश्च राघवम् । पूज-
यित्वा यथाकामं ततोगस्त्यस्तमब्रवीत् ३१ इदं दिव्यं महच्चापं हेमवज्र-
विभूषितम् । वैष्णवं पुरुषव्याघ्र निर्मितं विश्वकर्मणा ३२ अमोघः सूर्य-
संकाशो ब्रह्मदत्तः शरोत्तमः । दत्तो मम महेन्द्रेण तूणी चाक्षय्यसा-

त्यांच्या मोठेपणावरून मी समजत आहें " २३. ह्याप्रमाणें सूर्यासारिख्या तेजस्वी अगस्त्यमुनीविषयीं लक्ष्मणाला सांगून महापराक्रमी रघुनंदन रामानें त्या सामोरा येणाऱ्या अगस्त्यमुनींचे पाय धरिले २४ आणि त्यांना अभिवंदन केल्यावर विदेहराजकन्या सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान तो धर्मात्मा राम हात जोडून उभा राहिला २५. तेव्हां रामाचें स्वागत करून व आसन, उदक वगैरेंनीं त्याचा सत्कार करून कुशल प्रश्न केल्यावर " बसावें " ह्मणून त्या अगस्त्यमुनींनीं त्यांना सांगितलें २६. तदनंतर वैश्वदेव करून आणि अर्घ्यांनीं वगैरे त्या अतिथींचा सत्कार करून वानप्रस्थ धर्मानें त्या अगस्त्यमुनींनीं त्यांना प्रथम भोजन घातलें आणि नंतर आसनावर बसून ते धर्मज्ञ मुनिश्रेष्ठ हात जोडून बसलेल्या धर्मवेत्त्या रामाला ह्मणाले २७, २८ " हे काकुत्स्था, अशाप्रकारें अतिथींचें पूजन न करणारा पुरुष खोटी साक्ष देणाऱ्या पुरुषाप्रमाणें परलोकीं मांस भक्षण करितो २९. सर्व लोकांचा राजा महारथि, आणि धर्मप्रवर्तक असा तूं प्रिय अतिथि प्राप्त झाल्यामुळें मला प्रिय व मान्य आहेस " ३०. ह्याप्रमाणें बोलून फळें, मुळें, पुष्पें आणि इतरही वस्तु ह्यांच्या योगानें रामाचा स्वेच्छेप्रमाणें सत्कार केल्यावर अगस्त्यमुनि त्याला ह्मणाले ३१ " हे पुरुषश्रेष्ठा, सुवर्ण आणि हिरे ह्यांनीं भूषित असलेलें व विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें हें मोठें वैष्णव दिव्य धनुष्य ३२, व्यर्थ न जाणारा आणि सूर्याप्रमाणें तेजस्वी असा हा सर्वोत्कृष्ट ब्रह्मदत्त बाण, अग्नीप्रमाणें उज्ज्वल असलेल्या तीक्ष्ण बाणांनीं भरलेले व आंतील बाण कधींही नाहींसे न होणारे असे भाते व सुवर्णाच्या म्यानांत असलेला आणि

यकौ ३३ संपूर्णौ निशितैर्बाणैर्ज्वलद्भिरिव पावकैः । महाराजतकोशोय-
मसिर्हेमविभूषितः ३४ अनेन धनुषा राम हत्वा संख्ये महासुरान् ।
आजहार श्रियं दीप्तां पुरा विष्णुर्दिवौकसाम् ३५ तद्धनुस्तौ च तूणी च
शरं खड्गं च मानद । जयाय प्रतिगृह्णीष्व वज्रं वज्रधरो यथा ३६ एव-
मुक्त्वा महातेजाः समस्तं तद्वरायुधम् । दत्त्वा रामाय भगवानगस्त्यः
पुनरब्रवीत् ३७ [ ७०८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिका-
व्येरण्यकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

राम प्रीतोस्मि भद्रं ते परितुष्टोस्मि लक्ष्मण । अभिवादयितुं यन्मां
प्राप्तौ स्थः सह सीतया १ अध्वश्रमेण वां खेदो बाधते प्रचुरश्रमः ।
व्यक्तमुत्कण्ठते वापि मैथिली जनकात्मजा २ एषा च सुकुमारी च
खेदैश्च न विमानिता । प्राज्यदोषं वनं प्राप्ता भर्तृस्नेहप्रचोदिता ३ यथैषा
रमते राम इह सीता तथा कुरु । दुष्करं कृतवत्येषा वने त्वामभिगच्छती ४

सुवर्णाची मूठ बसविलेला हा खड्ग हीं मला इंद्रानें दिलीं आहेत ३३,३४. ह्यास्तव, हे रामा, पूर्वी संग्रामामध्यें महादैत्यांचा वध करून ज्याप्रमाणें विष्णूंनीं देवांची उज्ज्वल संपत्ति परत आणिली त्याप्रमाणें ह्या धनुष्याच्या योगानें संग्रामामध्यें महादैत्यांचा वध करून तूं उज्ज्वल लक्ष्मी संपादन कर ३५ आणि इंद्र ज्याप्रमाणें वज्राचा स्वीकार करितो त्याप्रमाणें तें धनुष्य, ते भाते, तो बाण आणि तो खड्ग ह्यांचा, हे मान्य रामा, तूं जयप्राप्तीकरितां स्वीकार कर " ३६. ह्याप्रमाणें रामाला सांगून आणि तीं संपूर्ण उत्कृष्ट आयुधें त्याला देऊन ते भगवान् महातेजस्वी अगस्त्यमुनि पुनरपि रामाला ह्मणाले ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

" ज्याअर्थी सीतेसहवर्तमान तुह्मी मला अभिवंदन करण्याकरितां येथें आलां आहां त्याअर्थी, हे रामा, तुझें कल्याण असो; मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें आणि, हे लक्ष्मणा, तुजवरही मी संतुष्ट झालों आहें १. मार्गातील दगदगीमुळें बहुक्लेशकारक दुःख तुह्मांला होत आहे आणि ही जनककन्या सीता तर विश्रांति घेण्याकरितां अगदीं उत्सुक झाल्यासारखी स्पष्टपणें दिसत आहे २. आजपर्यंत दुःखांचा अनुभव नसलेली ही सुकुमार सीता पतिप्रेमानें प्रेरणा केल्यामुळें विपुल दोषांनीं युक्त अस-लेल्या वनामध्यें प्राप्त झाली आहे ३. तेव्हां, हे रामा, ह्या आश्रमामध्यें ज्या रीतीनें सीतेला करमणूक होईल त्या रीतीनें तूं रहाण्याची व्यवस्था ठेव; तुझ्या बरोबर वनांत येणाऱ्या ह्या सीतेनें हें दुर्घट कर्म केलें आहे ४. कारण, हे रघुनंदना, पतीचें यथास्थित

एषा हि प्रकृतिः स्त्रीणामासृष्टे रघुनन्दन । समस्थमनुरज्यन्ते विषमस्थं त्यजन्ति च ५ शतह्रदानां लोलत्वं शस्त्राणां तीक्ष्णतां तथा । गरुडानिलयोः शैघ्र्यमनुगच्छन्ति योषितः ६ इयं तु भवतो भार्या दोषैरेतैर्विवर्जिता । श्लाघ्या च व्यपदेश्या च यथा देवेष्वरुन्धती ७ अलंकृतोयं देशश्च यत्र सौमित्रिणा सह । वैदेह्या चानया राम वत्स्यसि त्वमरिंदम ८ एवमुक्तस्तु मुनिना राघवः संयताञ्जलिः । उवाच प्रश्रितं वाक्यमृषिं दीप्तमिवानलम् ९ धन्योस्म्यनुगृहीतोस्मि यस्य मे मुनिपुङ्गवः । गुणैः सभ्रातृभार्यस्य गुरुर्नः परितुष्यति १० किं तु व्यादिश मे देशं सोदकं बहुकाननम् । यत्राश्रमपदं कृत्वा वसेयं निरतः सुखम् ११ ततोब्रवीन्मुनिश्रेष्ठः श्रुत्वा रामस्य भाषितम् । ध्यात्वा मुहूर्तं धर्मात्मा ततोवाच वचः शुभम् १२ इतो द्वियोजने तात बहुमूलफलोदकः ।

---

असलें ह्मणजे त्याचें चित्तरंजन करावयाचें आणि त्याला विपन्नावस्था प्राप्त झाली असतां त्याची पर्वा करावयाची नाहीं. हा सृष्टीच्या आरंभापासून स्त्रियांचा स्वभाव आहे ५. विद्युल्लतांचें चांचल्य, शस्त्रांचा तीक्ष्णपणा आणि गरुड व वायु ह्यांची त्वरा ( अनुक्रमें एके ठिकाणीं न राहण्यांत, फार दिवसांचें प्रेमबंधन तोडून टाकण्यांत आणि निंद्य कार्य करण्याला प्रवृत्त होण्यांत) स्त्रिया स्वीकारीत असतात ६; परंतु, ह्या तुझ्या भार्येचे ठिकाणीं हे दोष नाहींत. ह्यामुळें ज्याप्रमाणें अरुंधती देवांमध्यें प्रशंसेस पात्र आहे त्याप्रमाणें ही प्रशंसेस पात्र असून पतिव्रतांमध्यें प्रथम गणना करण्यास योग्य आहे ७. हे रामा, तुमच्या आगमनामुळेंच हा आश्रमप्रदेश अलंकृत झाला आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं ह्या सीतेसहवर्तमान आणि लक्ष्मणासहवर्तमान तूं वास्तव्य करशील तो प्रदेश, हे शत्रुनंदना, अलंकृत होईल हें काय सांगावें ?" ८. ह्याप्रमाणें अगस्त्यमुनींनीं सांगितलें असतां अग्निप्रमाणें देदीप्यमान असलेल्या त्या मुनींना राम हात जोडून प्रेमपूर्वक ह्मणाला ९ " ज्याअर्थी भ्राता आणि भार्या ह्यांसहवर्तमान माझ्यावर मुनिश्रेष्ठ गुरु संतुष्ट झाले आहेत त्याअर्थी माझ्यावर आपला अनुग्रह झाला असून मी धन्य आहें १०; परंतु, ( मला कांहीं विचारावयाचें आहे ) ज्या ठिकाणीं निवासस्थान तयार करून मला आनंदानें व सुखानें रहातां येईल असा एक उदक आणि विपुल वृक्षसमुदाय ह्यांनीं युक्त असलेला प्रदेश आपण मला सांगा " ११. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर त्या मुनिश्रेष्ठ अगस्त्यांनीं त्याला सांगितलें. परंतु, ( त्यानें विचारितांक्षणीं एकदम न सांगतां ) क्षणभर विचार करून त्या धर्मात्म्या अगस्त्य मुनींनीं त्याच्याशीं शुभ भाषण केलें १२ ( ते ह्मणाले )" बा रामा, येथून दोन

देशो बहुमृगः श्रीमान्पञ्चवट्यभिविश्रुतः १३ तत्र गत्वाश्रमपदं कृत्वा सौमित्रिणा सह । रमस्व त्वं पितुर्वाक्यं यथोक्तमनुपालयन् १४ विदितो ह्येष वृत्तान्तो मम सर्वस्तवानघ । तपसश्च प्रभावेण स्नेहाद्दशरथस्य च १५ हृदयस्थं च ते च्छन्दो विज्ञातं तपसा मया । इह वासं प्रतिज्ञाय मया सह तपोवने १६ अतश्च त्वामहं ब्रूमि गच्छ पञ्चवटीमिति । स हि रम्यो वनोद्देशो मैथिली तत्र रंस्यते १७ स देशः श्लाघनीयश्च नातिदूरे च राघव । गोदावर्याः समीपे च मैथिली तत्र रंस्यते १८ प्राज्यमूलफलैश्चैव नानाद्विजगणैर्युतः । विविक्तश्च महाबाहो पुण्यो रम्यस्तथैव च १९ भवानपि सदाचारः शक्तश्च परिरक्षणे । अपि चात्र वसन्राम तापसान्पालयिष्यसि २० एतदालक्ष्यते वीर मधूकानां महावनम् । उत्तरेणास्य गन्तव्यं न्यग्रोधमपि गच्छता २१ ततः

---

योजनांवर पंचवटी ह्मणून विख्यात असलेला एक संपन्न प्रदेश आहे. तेथें मृग पुष्कळ असून मुळें, फळें व उदक ह्यांचीही समृद्धि आहे १३. त्या ठिकाणीं लक्ष्मणासहवर्तमान जाऊन तूं आश्रम तयार कर. आणि पित्याची प्रतिज्ञा त्याच्या सांगण्याप्रमाणें परिपालन करीत करीत तूं आनंदानें तेथें रहा १४. हे निष्पापा रामा, दशरथाचे ठिकाणीं माझें प्रेम असल्याकारणानें तपःसामर्थ्यानें तुझा हा सर्व वृत्तांत मला (कधींच) विदित झालेला आहे १५. आणि तपोवनामध्यें ह्या आश्रमांत माझ्यासहवर्तमान वास्तव्य करण्याचें लक्ष्मणाशीं कबूल करूनही आतां मला एकादी वास्तव्य करण्याकरितां दुसरीकडे जागा सांगा अशी विनंति करण्यांत तुझ्या मनांतील काय उद्देश आहे हेंही मीं तपश्चर्येच्या योगानें जाणिलें आहे. (राक्षसांचा वध करण्याची तूं प्रतिज्ञा केली आहेस आणि ह्या माझ्या आश्रमामध्यें तर राक्षस येण्याचा संभव नाहीं. तेव्हां ज्या ठिकाणीं ते येतील असें एकादें स्थान तुला अवश्य आहे हें मी जाणून आहें) १६ आणि ह्मणूनच "पंचवटीमध्यें जा" असें मीं तुला सांगत आहें. तो वनप्रदेश रमणीय असल्यामुळें सीता आनंदानें तेथें राहील १७. ते राघवा, गोदावरीचे समीप असलेला तो प्रशस्त देश येथून फार दूर नाहीं. तेथें सीतेच्या मनाला बरें वाटेल १८. हे महापराक्रमी रामा, विपुल मुळें, फळें आणि नानाप्रकारचे पक्षिगण ह्यांनीं युक्त असलेला तो एकांत प्रदेश पवित्र असल्यामुळें रमणीय असून १९ तूंही सदाचरणानें वागणारा त्याचें रक्षण करण्यास समर्थ आहेस. हे रामा, ह्या ठिकाणीं वास्तव्य करून तूं ऋषींचें परिपालन करशील २०. हे वीरा, वटवृक्षांनीं युक्त असलेल्या आश्रमाला जाणाऱ्यानें हें मधुवृक्षांचें (ह्मणजे मोहाच्या झाडांचें) मोठें वन दिसत आहे त्याच्या

स्थलमुपारुह्य पर्वतस्याविदूरतः। ख्यातः पञ्चवटीत्येव नित्यपुष्पितकाननः २२ अगस्त्येनैवमुक्तस्तु रामः सौमित्रिणा सह। सत्कृत्यामन्त्रयामास तमृषिं सत्यवादिनम् २३ तौ तु तेनाभ्यनुज्ञातौ कृतपादाभिवन्दनौ। तमाश्रमं पञ्चवटीं जग्मतुः सह सीतया २४ गृहीतचापौ तु नराधिपात्मजौ विषक्ततूणी समरेष्वकातरौ। यथोपदिष्टेन पथा महर्षिणा प्रजग्मतुः पञ्चवटीं समाहितौ २५ [७३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रयोदशः सर्गः॥ १३॥

अथ पञ्चवटीं गच्छन्नन्तरा रघुनन्दनः। आससाद महाकायं गृध्रं भीमपराक्रमम् १ तं दृष्ट्वा तौ महाभागौ वनस्थं रामलक्ष्मणौ। मेनाते राक्षसं पक्षिं ब्रुवाणौ को भवानिति २ ततो मधुरया वाचा सौम्यया प्रीणयन्निव। उवाच वत्स मां विद्धि वयस्यं पितुरात्मनः ३ स तं पितृसखं मत्वा पूजयामास राघवः। स तस्य कुलमव्यग्रमथ पप्रच्छ नाम च ४ रामस्य वचनं श्रुत्वा कुलमात्मानमेव च। आचचक्षे द्विजस्तस्मै सर्व-

---

उत्तर बाजूनीं जावें २१ आणि नंतर पर्वताच्या समीपच उघडच्या प्रदेशावर चढून गेलें ह्मणजे नित्य प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेलीं वनें ज्यामध्यें आहेत असा पंचवटी ह्मणून प्रसिद्ध असलेला देश लागतो " २२. ह्याप्रमाणें अगस्त्यमुनींनीं सांगितलें असतां लक्ष्मणासहवर्तमान रामानें त्या सत्यवचनी ऋषींचा सत्कारपूर्वक निरोप घेतला २३ आणि त्यानें अनुज्ञा दिल्यानंतर त्यांचें पादाभिवंदन करून ते उभयतां रामलक्ष्मण सीतेसहवर्तमान त्या पंचवटीनामक प्रदेशाला गेले २४. सारांश, संग्रामामध्यें भय न बाळगणारे व अंतःकरणांत स्वस्थ असलेले ते राजकुमार रामलक्ष्मण भाते लटकावून आणि धनुष्यें हातांत घेऊन महर्षींनीं सांगितलेल्या मार्गानें पंचवटीला चालते झाले २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

पंचवटीला जातां जातां मार्गामध्यें रघुनंदन रामाला भयंकर पराक्रम करणारा एक धिप्पाड गृध्र पक्षी आढळला १. तेव्हां वनामध्यें असलेल्या त्या पक्ष्याला अवलोकन करून ते महाभाग्यवान् रामलक्ष्मण त्याला राक्षस समजले आणि " तूं कोण " ह्मणून त्यांनीं त्या पक्ष्याला विचारिलें २. तेव्हां मधुर आणि सौम्य वाणीनें रामाला प्रसन्न करीत करीत तो ह्मणाला " हे वत्सा, तुझ्या पित्याचा मी मित्र आहें असें तूं समज " ३. हें त्यानें सांगितल्यावर त्याला पित्याचा सखा समजून त्या रामानें त्याचें पूजन केलें आणि त्याचें कुल व नाम हें लक्ष्यपूर्वक त्यानें त्याला

भूतसमुद्भवम् ५ पूर्वकाले महाबाहो ये प्रजापतयोऽभवन् । तान्मे निगदतः सर्वानादितः शृणु राघव ६ कर्दमः प्रथमस्तेषां विकृतस्तदनन्तरम् । शेषश्च संश्रयश्चैव बहुपुत्रश्च वीर्यवान् ७ स्थाणुर्मरीचिरत्रिश्च क्रतुश्चैव महाबलः । पुलस्त्यश्चाङ्गिराश्चैव प्रचेताः पुलहस्तथा ८ दक्षो विवस्वानपरोऽरिष्टनेमिश्च राघव । कश्यपश्च महातेजास्तेषामासीच्च पश्चिमः ९ प्रजापतेस्तु दक्षस्य बभूवुरिति विश्रुताः । षष्टिर्दुहितरो राम यशस्विन्यो महायशः १० कश्यपः प्रतिजग्राह तासामष्टौ सुमध्यमाः । अदितिं च दितिं चैव दनूमपि च कालकाम् ११ ताम्रां क्रोधवशां चैव मनुं चाप्यनलामपि । तास्तु कन्यास्ततः प्रीतः कश्यपः पुनरब्रवीत् १२ पुत्रांस्त्रैलोक्यभर्तॄन्वै जनयिष्यथ मत्समान् । अदितिस्तन्मना राम दितिश्च दनुरेव च १३ कालका च महाबाहो शेषास्त्वमनसोऽभवन् । अदित्यां जज्ञिरे देवास्त्रयस्त्रिंशदरिन्दम १४ आदित्या वसवो रुद्रा अश्विनौ च परन्तप । दितिस्त्वजनयत्पुत्रान्दैत्यांस्तात यशस्विनः १५ तेषामियं वसुमती पुराभूत्सवनार्णवा । दनुस्त्वजनयत्पुत्रमश्वग्रीवमरिन्दम १६ नरकं कालकं

विचारिलें ४. तेव्हां रामाचें भाषण श्रवण करून त्या पक्ष्यानें आपण कोण व आपलें कुल कोणतें हें सांगून प्रसंगोपात सर्व भूतांची उत्पत्तिही त्याला कथन केली ५. (तो ह्मणाला) " हे महापराक्रमी रामा, पूर्वी जे प्रजापति होऊन गेले ते सर्व मी तुला आरंभापासून कथन करितों; तूं श्रवण कर ६. त्यांपैकीं पहिला कर्दम, त्याच्या नंतर विकृत, शेष, संश्रय, वीर्यवान् बहुपुत्र ७, स्थाणु, मरीचि, अत्रि, महाबलाढ्य क्रतु, पुलस्त्य, अंगिरा, प्रचेता, पुलह ८, दक्ष, विवस्वान्, अरिष्टनेमि आणि, हे राघवा, त्यांच्यांतील शेंवटला महातेजस्वी कश्यप होय ९. हे महायशस्वी रामा, दक्षप्रजापतीला साठ यशस्विनी कन्या होत्या ह्मणून प्रसिद्धि आहे १०. त्यांपैकीं अदिति, दिति, दनू, कालका, ताम्रा, क्रोधवशा, मनु आणि अनला अशा आठ सुंदर कन्यांचा कश्यपांनीं प्रतिग्रह केला आणि प्रतिग्रह केल्यानंतर ते कश्यपमुनि प्रसन्न होऊन त्या कन्यांना ह्मणाले ११, १२ " तुह्मांला माझ्यासारिखे त्रैलोक्याधिपति पुत्र होतील ". हे रामा, अदिति, दिति, दनु आणि कालका ह्यांना मात्र कश्यपाप्रमाणें पुत्र असावा अशी इच्छा झाली आणि, हे महापराक्रमी रामा, इतर चौघी त्याविषयीं बेफिकिरच राहिल्या. हे शत्रुदमना रामा, अदितीचे ठिकाणीं तेहेतीस देव उत्पन्न झाले १३, १४. द्वादशादित्य, अष्टवसु, एकादश रुद्र आणि, हे शत्रुतापना रामा, उभयतां यशस्वी दैत्यपुत्र अश्विनीकुमार दितीला झाले १५ व ही पृथ्वी, वनें व समुद्र ह्यांसहवर्तमान पूर्वी दैत्यांचीच

चैव कालकापि व्यजायत । क्रौञ्चीं भासीं [illegible] श्येनीं धृतराष्ट्रीं तथा शुकीम् १७ ताम्रा तु सुषुवे कन्याः पञ्चै[illegible]तान् लोकविश्रुताः । उलूकाञ्जनयत्क्रौञ्ची भासी भासान्व्यजायत १८ श्येनी श्येनांश्च गृध्रांश्च व्यजायत सुतेजसः । धृतराष्ट्री तु हंसांश्च कलहंसांश्च सर्वशः १९ चक्रवाकांश्च भद्रं ते विजज्ञे सापि भामिनी । शुकी नतां विजज्ञे तु नतायां विनता सुता २० दश क्रोधवशा राम विजज्ञेऽप्यात्मसंभवाः । मृगीं च मृगमन्दां च हरीं भद्रमदामपि २१ मातङ्गीमथ शार्दूलीं श्वेतां च सुरभीं तथा । सर्वलक्षणसंपन्नां सुरसां कद्रुकामपि २२ अपत्यं तु मृगाः सर्वे मृग्या नरवरोत्तम । ऋक्षाश्च मृगमन्दायाः सृमराश्चमरास्तथा २३ ततस्त्विरावतीं नाम जज्ञे भद्रमदा सुताम् । तस्यास्त्वैरावतः पुत्रो लोकनाथो महागजः २४ हर्यांश्च हरयोऽपत्यं वानराश्च तपस्विनः । गोलाङ्गूलाश्च शार्दूली व्याघ्रांश्चाजनयत्सुतान् २५ मातङ्ग्यास्त्वथ मातङ्गा अपत्यं मनुजर्षभ । दिशागजं तु काकुत्स्थ श्वेता व्यजनयत्सुतान् २६ ततो दुहितरौ राम सुरभिर्देव्यजायत । रोहिणीं नाम भद्रं ते गन्धर्वीं च यशस्विनीम् २७ रोहिण्यजनयद्गावो गन्धर्वी वाजिनः सुतान् । सुरसाजनयन्नागा-

---

होती. हे शत्रुदमना रामा, दनूला अश्वग्रीव हा पुत्र झाला १६. नरक आणि कालक हे दोन पुत्र कश्यपाच्या कालका स्त्रीला झाले आणि क्रौंची, भासी, श्येनी, धृतराष्ट्री व शुकी १७ अशा पांच जगद्विख्यात कन्या ताम्रेला झाल्या. त्यांपैकीं क्रौंचीला उलूकपक्षी झाले व भासीला भासपक्षी झाले १८. श्येनीला ससाणे व गृध्र असे महातेजस्वी पुत्र झाले, राजहंस आणि कलहंस हे सर्व पुत्र धृतराष्ट्रीला झाले १९ आणि तुझें देव बरें करो, चक्रवाक पक्षीही त्याच स्त्रीला झाले. शुकीला नता ही कन्या झाली आणि त्या नतेचे ठिकाणीं विनता ही कन्या उत्पन्न झाली २०, हे रामा, कश्यपाच्या क्रोधवशानामक स्त्रीला मृगी, मृगमंदा, हरी, भद्रमदा, मातंगी, शार्दूली, श्वेता, सुरभी, सर्वलक्षणसंपन्न सुरसा आणि कद्रुका अशा दहा कन्या झाल्या २१,२२. हे श्रेष्ठ नरोत्तमा, सर्व मृग मृगीची संतति होय व ऋक्ष, सृमर आणि चमर हे मृगमंदेचे पुत्र होत २३. तदनंतर भद्रमदेला इरावती ह्मणून एक कन्या झाली, तिलाच ऐरावत ह्मणून लोकनाथ महागज पुत्र झाला २४. सिंह आणि तपस्वी वानर आणि गोलांगूल हीं हरीचीं अपत्यें असून व्याघ्र हे शार्दूलीचे पुत्र झाले २५. हे पुरुषश्रेष्ठा, गज ही मातंगीची संतति होय आणि, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, दिग्गज हे श्वेतेचे पुत्र होत २६. तदनंतर, हे रामा, तुझें देव बरें करो, रोहिणी आणि यशस्विनी गंधर्वी अशा दोन

श्राम कद्रूश्च पन्नगान् २८ मनुर्मनुष्याञ्जनयत्कश्यपस्य महात्मनः । ब्राह्मणान्क्षत्रियान्वैश्याञ्शूद्रांश्च मनुजर्षभ २९ मुखतो ब्राह्मणा जाता उरसः क्षत्रियास्तथा । ऊरुभ्यां जज्ञिरे वैश्याः पद्भ्यां शूद्रा इति श्रुतिः ३० सर्वान्पुण्यफलान्वृक्षाननलापि व्यजायत । विनता च शुकीपौत्री कद्रूश्च सुरसा स्वसा ३१ कद्रूर्नागसहस्रं तु विजज्ञे धरणीधरान् । द्वौ पुत्रौ विनतायास्तु गरुडोऽरुण एव च ३२ तस्माज्जातोऽहमरुणात्संपातिश्च ममाग्रजः । जटायुरिति मां विद्धि श्येनीपुत्रमरिन्दम ३३ सोहं वाससहायस्ते भविष्यामि यदीच्छसि । सीतां च तात रक्षिष्ये त्वयि याते सलक्ष्मणे ३४ जटायुषं तु प्रतिपूज्य राघवो मुदा परिष्वज्य च संनतोऽभवत् । पितुर्हि शुश्राव सखित्वमात्मवाञ्जटायुषा संकथितं पुनः पुनः ३५ स तत्र सीतां परिदाय मैथिलीं सहैव तेनातिबलेन पक्षिणा । जगाम तां पञ्चवटीं सलक्ष्मणो रिपून्दिधक्षन्सवनानि पालयन् ३६ [ ७६९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

---

कन्या सुरभी देवीला झाल्या २७. रोहिणीपासून गाई उत्पन्न झाल्या, गंधर्वीला अश्व हे पुत्र झाले आणि, हे रामा, सुरसेला नाग व कद्रूला सर्प असे पुत्र झाले २८. हे पुरुषश्रेष्ठा रामा, महात्म्या कश्यपांच्या मनुनामक स्त्रीला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे मानव पुत्र झाले २९. पैकीं ब्राह्मण मुखापासून, क्षत्रिय बाहूंपासून, वैश्य मांड्यांपासून आणि शूद्र पायांपासून उत्पन्न झाले; अशा आशयाची श्रुति आहे ३०. अनलेला सर्व चांगलीं फलें धारण करणारे वृक्ष झाले. विनता ही शुकीची नात होय आणि कद्रू व सुरसा ह्या परस्पर भगिनी होत ३१. पैकीं पृथ्वी धारण करणारे असे सहस्र पुत्र कद्रूला झाले आणि गरुड व अरुण असे दोन पुत्र विनतेला झाले ३२. त्या अरुणापासून मी उत्पन्न झालों आहें आणि संपाति हा माझा ज्येष्ठ बंधु आहे हे शत्रुदमना रामा, जटायु [illegible] श्येनीचा पुत्र आहें असें तूं समज ३३. तुझी इच्छा असेल तर निवासस्था[illegible] मी तुला साहाय्य करणारा होईन आणि, बा रामा, लक्ष्मणासहवर्तमान तूं बाहेर [illegible] मी सीतेचें रक्षण करीत जाईन " ३४. असो. जटायूनें आपल्या पित्याश[illegible] पितृत्वाचें नातें वारंवार कथन केलेलें श्रवण करून जितेंद्रिय रामानें जटायूचा [illegible] केला आणि त्याला आनंदानें आलिंगन दिल्यावर त्याच्यापुढें तो राम नम्र [illegible] उभा राहिला ३५ व तदनंतर मिथिलराजकन्या सीता रक्षणाकरितां त्या जटायूच्या स्वाधीन करून तपोवनांचें रक्षण करण्याकरितां

ततः पञ्चवटीं गत्वा नानाव्यालमृगायुताम् । उवाच लक्ष्मणं रामो भ्रातरं दीप्ततेजसम् १ आगताः स्म यथोद्दिष्टं यं देशं मुनिरब्रवीत् । अयं पञ्चवटीदेशः सौम्य पुष्पितकाननः २ सर्वतश्चार्यतां दृष्टिः कानने निपुणो ह्यसि । आश्रमः कतरस्मिन्नो देशे भवति संमतः ३ रमते यत्र वैदेही त्वमहं चैव लक्ष्मण । तादृशो दृश्यतां देशः संनिकृष्टजलाशयः ४ वनरामण्यकं यत्र जलरामण्यकं तथा । संनिकृष्टं च यस्मिंस्तु समित्पुष्पकुशोदकम् ५ एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः संयताञ्जलिः । सीतासमक्षं काकुत्स्थमिदं वचनमब्रवीत् ६ परवानस्मि काकुत्स्थ त्वयि वर्षशतं स्थिते । स्वयं तु रुचिरे देशे क्रियतामिति मां वद ७ सुप्रीतस्तेन वाक्येन लक्ष्मणस्य महाद्युतिः । विमृशन्रोचयामास देशं सर्वगुणान्वितम् ८ स तं रुचिरमाक्रम्य देशमाश्रमकर्मणि । हस्ते गृहीत्वा हस्तेन रामः सौमित्रि-

---

राक्षस शत्रूंचा वध करण्याच्या उद्देशानें त्या अतिबलाढ्य पक्ष्याला बरोबर घेऊनच तो राम लक्ष्मणासहवर्तमान त्या पंचवटीमध्यें गेला ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चौदावा सर्ग समाप्त झाला ॥१४॥

तदनंतर नानाप्रकारचीं श्वापदें आणि मृग ह्यांनीं युक्त असलेल्या पंचवटीमध्यें गेल्यावर राम आपल्या उज्ज्वल तेजस्वी भ्रात्या लक्ष्मणाला ह्मणाला १. " अगस्त्यमुनींनीं जो देश आपणांला सांगितला त्या देशाला त्यांच्या सांगण्याप्रमाणें आपण आलों. हे सत्त्वशील लक्ष्मणा, प्रफुल्लित वनांनीं युक्त असलेला हाच तो पंचवटी प्रदेश २. आतां वनामध्यें तूं एकदां चोहोंकडे दृष्टि फेंक आणि कोणत्या स्थलावर आपल्या मनाप्रमाणें आश्रम स्थापितां येईल तें पहा. कारण, ह्या कामांत तूं चतुर आहेस ३. हे लक्ष्मणा, सीता, तूं व मी त्या सर्वांचें मन ज्या ठिकाणीं रमेल असा एकादा जलाशय जवळ असलेला प्रदेश हुडकून काढ ४. वनाचें आणि त्याचप्रमाणें जलाचें रमणीयत्व जेथें असेल आणि ज्या ठिकाणीं काष्ठें, पुष्पें, कुश आणि उदक सन्निध असेल असा प्रदेश शोधून काढ " ५. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां लक्ष्मण हात जोडून सीतेच्या समक्ष रामाला ह्मणाला ६ " हे काकुत्स्था, तूं असतांना मी शेंकडों वर्षें जरी तुझ्या संनिध असलों तरी तुझ्या अधीनच आहें ( मी कधींही स्वतंत्र होणार नाहीं ). तेव्हां मनोहर प्रदेश कोणता हा स्वतःच विचार करून " ह्या मनोहर प्रदेशामध्यें आश्रम तयार कर " असें तूं मला सांग " ७. लक्ष्मणाच्या भाषणानें महातेजस्वी राम अतिशय प्रसन्न झाला आणि पर्यालोचन करितां सर्वगुणसंपन्न असा एक प्रदेश त्याच्या मनाला पटला ८. नंतर आश्रमकर्माला योग्य अशा त्या मनोहर प्रदेशावर जाऊन व राम

मब्रवीत् ९ अयं देशः समः श्रीमान्पुष्पितैस्तरुभिर्वृतः । इहाश्रमपदं रम्यं यथावत्कर्तुमर्हसि १० इयमादित्यसंकाशैः पद्मैः सुरभिगन्धिभिः । अदूरे दृश्यते रम्या पद्मिनी पद्मशोभिता ११ यथाख्यातमगस्त्येन मुनिना भावितात्मना । इयं गोदावरी रम्या पुष्पितैस्तरुभिर्वृता १२ हंसकारण्डवाकीर्णा चक्रवाकोपशोभिता । नातिदूरे न चासन्ने मृगयूथनिपीडिता १३ मयूरनादिता रम्याः प्रांशवो बहुकन्दराः । दृश्यन्ते गिरयः सौम्याः फुल्लैस्तरुभिरावृताः १४ सौवर्णै राजतैस्ताम्रैर्देशे देशे तथा शुभैः । गवाक्षिता इवाभान्ति गजाः परमभक्तिभिः १५ सालैस्तालैस्तमालैश्च खर्जूरैः पनसैर्द्रुमैः । नीवारैस्तिनिशैश्चैव पुंनागैश्चोपशोभिताः १६ चूतैरशोकैस्तिलकैः केतकैरपि चम्पकैः । पुष्पगुल्मलतोपेतैस्तैस्तैस्तरुभिरावृताः १७ स्पन्दनैश्चन्दनैर्नीपैः पनसैर्लकुचैरपि । धवाश्वकर्णखदिरैः शमीकिंशुकपाटलैः १८ इदं पुण्यमिदं रम्यमिदं बहुमृगद्विजम् । इह वत्स्याम सौमित्रे

---

लक्ष्मणाचा हात धरून त्याला ह्मणाला ९ " हा प्रदेश - सपाट, टुमदार आणि प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त आहे, तेव्हां ह्या ठिकाणीं तूं योग्य रीतीनें आश्रम तयार कर १०. पद्मशोभेनें युक्त आणि सूर्यासारिख्या उज्ज्वल व सुगंधि कमलांनीं संपन्न असें हें रम्य सरोवर जवळच दिसत आहे ११ आणि जितेंद्रिय अगस्त्य मुनींनीं सांगितल्याप्रमाणें प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेली ही रम्य गोदावरी दिसत आहे १२. येथून फार दूरही नाहीं व फार जवळही नाहीं अशा ठिकाणीं असलेली ही गोदावरी हंस व कारंडव पक्ष्यांनीं गजबजून गेलेली आहे, चक्रवाक पक्ष्यांनीं सुशोभित झाली आहे आणि ( उदकपान करण्याकरितां आलेल्या ) मृगांच्या कळपांनीं अगदीं खेंचलेली आहे १३. मयूरपक्ष्यांनीं नादित, अनेक गुहांनीं युक्त आणि प्रफुल्लित वृक्षांनीं व्याप्त असे हे उंच पर्वत रम्य व सौम्य दिसत आहेत १४ आणि त्याचप्रमाणें सुवर्णवर्ण, रौप्यवर्ण आणि ताम्रवर्ण अशा शुभ वृक्षांच्या योगानें ठिकठिकाणीं हे पर्वत, उत्कृष्ट तऱ्हांनीं शरीरावर चित्रें काढून शृंगारिलेल्या गजांप्रमाणें, दिसत आहेत १५. साल, ताल, तमाल, खर्जूर, फणस, जलकदंब, तिवस आणि नागचाफा ह्या वृक्षांनीं हे पर्वत सुशोभित झालेले आहेत १६. आम्र, अशोक, तिलक, केतक, चंपकपुष्पें, गुल्में आणि लता ह्यांनीं युक्त असलेले इतरही नानाप्रकारचे वृक्ष ह्यांनीं हे पर्वत व्याप्त झाले आहेत १७. स्यंदन, चंदन, कदंब, फणस, ओट, सावई, धव, खदिर, शमी व पळस आणि लोध्र ह्या वृक्षांनीं हे पर्वत गजबजलेले आहेत १८. हे लक्ष्मणा, हें स्थल पवित्र आहे, रम्य आहे आणि नानाप्रकारच्या मृगांनीं व पक्ष्यांनीं युक्त आहे. तस्मात् ह्या जटायु

सार्धमेतेन पक्षिणा १९ एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः परवीरहा । अचि-
रेणाश्रमं भ्रातुश्चकार सुमहाबलः २० पर्णशालां सुविपुलां तत्र संघात-
मृत्तिकाम् । सुस्तम्भां मस्करैर्दीर्घैः कृतवंशां सुशोभनाम् २१ शमीशा-
खाभिरास्तीर्य दृढपाशावपाशिताम् । कुशकाशशरैः पर्णैः सुपरिच्छादितां
तथा २२ समीकृततलां रम्यां चकार सुमहाबलः । निवासं राघवस्यार्थे
प्रेक्षणीयमनुत्तमम् २३ स गत्वा लक्ष्मणः श्रीमान्नदीं गोदावरीं तदा ।
स्नात्वा पद्मानि चादाय सफलः पुनरागतः २४ ततः पुष्पबलिं कृत्वा
शान्तिं च स यथाविधि । दर्शयामास रामाय तदाश्रमपदं कृतम् २५ स
तं दृष्ट्वा कृतं सौम्यमाश्रमं सह सीतया । राघवः पर्णशालायां हर्षमाहा-
रयत्परम् २६ सुसंहृष्टः परिष्वज्य बाहुभ्यां लक्ष्मणं तदा । अतिस्निग्धं
च गाढं च वचनं चेदमब्रवीत् २७ प्रीतोस्मि ते महत्कर्म त्वया कृतमिदं
प्रभो । प्रदेयो यन्निमित्तं ते परिष्वङ्गो मया कृतः २८ भावज्ञेन कृ-

---

पक्ष्यासहवर्तमान आपण येथेंच राहूं " १९. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां शत्रूकडील वीरांचा घात करणाऱ्या अति बलाढ्य लक्ष्मणानें भ्रात्याकरितां लवकरच आश्रम तयार केला २०. मातीच्या भिंती रचलेली अशी एक फारच प्रशस्त व सुशोभित पर्णशाला त्यानें तयार केली. तिला चांगले, खांब लाविलेले होते आणि लांब लांब कळकाचे तिला वासे ठोंकलेले होते २१. शमीच्या शाखा त्या वाशांवर अंथरलेल्या होत्या, त्या ठिकाणीं बळकट बांध घेऊन ती पर्णशाला बांधिलेली होती, कुशकाश, देवनळ आणि पानें ह्यांच्या योगानें तिच्यावर उत्तम आच्छादन केलेलं होतें २२ आणि तिचा तळ साफ केलेला होता. सारांश, अतिबलाढ्य लक्ष्मणानें रामाकरितां एक प्रेक्षणीय व अनुपम निवासस्थान तयार केलें होतें २३. असो. ह्या-प्रमाणें निवासस्थान तयार केल्यानंतर श्रीमान् लक्ष्मण गोदावरी नदीवर गेला आणि तेथें स्नान करून व कमलें घेऊन फलांसहवर्तमान पुनरपि परत आला २४. तदनंतर पुष्पपूजा आणि वास्तुशांत यथाविधि केल्यावर रामाला त्यानें तें तयार केलेलें आश्र-मस्थान दाखविलें २५. तेव्हां पर्णशालेमध्यें तयार केलेला तो सौम्य आश्रम अवलो-कन करून त्या सीतेसहवर्तमान रामाला पराकाष्ठेचा हर्ष झाला २६ आणि अत्यंत आनंदित झालेला तो राम अतिशय प्रेमानें लक्ष्मणाला गाढ आलिंगन देऊन ह्मणाला २७ " हे समर्थ लक्ष्मणा, मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. तूं हें मोठें कर्म केलें आहेस व ह्याकरितां ( दुसरें कांहीं देण्याला मजपाशीं नसल्यामुळें ) देण्याला योग्य, असें गाढ आलिंगनच मीं तुला दिलें आहे. हे लक्ष्मणा, अभिप्राय जाणणारा, कृतज्ञ आणि

तज्ज्ञेन धर्मज्ञेन च लक्ष्मण । त्वया पुत्रेण धर्मात्मा न संवृत्तः पिता मम २९
एवं लक्ष्मणमुक्त्वा तु राघवो लक्ष्मिवर्धनः । तस्मिन्देशे बहुफले न्यव-
सत्स सुखं सुखी ३० कंचित्कालं स धर्मात्मा सीतया लक्ष्मणेन च ।
अन्वास्यमानो न्यवसत्स्वर्गलोके यथामरः [ ८०० ] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥

वसतस्तस्य तु सुखं राघवस्य महात्मनः । शरद्यपाये हेमन्त ऋतुरिष्टः
प्रवर्तत १ स कदाचित्प्रभातायां शर्वर्यां रघुनन्दनः । प्रययावभिषेकार्थं
रम्यां गोदावरीं नदीम् २ प्रह्वः कलशहस्तस्तु सीतया सह वीर्यवान् ।
पृष्ठतोनुव्रजन्भ्राता सौमित्रिरिदमब्रवीत् ३ अयं स कालः संप्राप्तः प्रियो
यस्ते प्रियंवद । अलंकृत इवाभाति येन संवत्सरः शुभः ४ नीहारपरुषो
लोकः पृथिवी सस्यमालिनी । जलान्यनुपभोग्यानि सुभगो हव्यवाहनः ५
नवाग्रयणपूजाभिरभ्यर्च्य पितृदेवताः । कृताग्रयणकाः काले सन्तो विग-
तकल्मषाः ६ प्राज्यकामा जनपदाः संपन्नतरगोरसाः । विचरन्ति मही-

---

धर्मवेत्ता असा तूं पुत्र असल्यामुळें माझा धर्मात्मा पिता मृत झालाच नाहीं असें मला वाटतें. ( कारण, तूंच पित्याप्रमाणें माझें परिपालन करीत आहेस ) " २९. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून सुखी झालेला तो लक्ष्मीवर्धक राम विपुल फलांनीं युक्त असलेल्या त्या प्रदेशामध्यें सुखानें राहिला ३० आणि सीता व लक्ष्मण त्याची शुश्रूषा करीत असल्यामुळें तो धर्मात्मा स्वर्गलोकांत राहणाऱ्या देवाप्रमाणेंच कांहीं कालपर्यंत तेथें राहिला ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

तो महात्मा राम तेथें सुखानें वास्तव्य करूं लागला असतां शरदृतु संपल्यावर प्रिय असा हेमंत ऋतु प्राप्त झाला १. एकदां रात्र उजाडल्यावर तो रघुनंदन राम स्नानाकरितां रम्य गोदावरी नदीला निघाला असतां २ नम्र होऊन व हातांत कलश घेऊन सीतेसहवर्तमान त्याच्या मागोमाग जाणारा वीर्यवान् भ्राता लक्ष्मण त्याला ह्मणाला ३ " हे प्रिय भाषण करणाऱ्या रामा, तुला जो प्रिय तो हा काल प्राप्त झाला आहे आणि त्याच्या योगानें हा संवत्सर ( धान्यादिकांच्या समृद्धीमुळें ) भूषित झाल्यासारिखा दिसत आहे ४. दंवामुळें लोकांचीं शरीरें खडबडीत झालीं आहेत, भूमि धान्यराशींनीं युक्त झाली आहे, जलें उपभोग घेण्यास अयोग्य झालीं आहेत आणि अग्नि लोकांना इष्ट झालेला आहे ५. नवान्न भक्षण करण्याकरितां अवश्य असलेल्या आग्रयणसंज्ञक कर्मरूप पूजांच्या योगानें पितरांचें व देवांचें संतर्पण करून वेळेवर आग्रयण केल्या-

ताश्च तथानघाः ४२ कृताभिषेकः स रराज रामः सीताद्वितीयः सह लक्ष्मणेन । कृताभिषेकस्त्वगराजपुत्र्या रुद्रः स नन्दिर्भगवानिवेशः ४३ [ ८४३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

कृताभिषेकं रामस्तु सीता सौमित्रिरेव च । तस्माद्गोदावरीतीरात्ततो जग्मुः स्वमाश्रमम् १ आश्रमं तदुपागम्य राघवः सहलक्ष्मणः । कृत्वा पौर्वाह्णिकं कर्म पर्णशालामुपागमत् ॥ उवास सुखितस्तत्र पूज्यमानो महर्षिभिः २ स रामः पर्णशालायामासीनः सह सीतया । विरराज महाबाहुश्चित्रया चन्द्रमा इव ३ लक्ष्मणेन सह भ्रात्रा चकार विविधाः कथाः । तदासीनस्य रामस्य कथासंसक्तचेतसः ४ तं देशं राक्षसी काचिदाजगाम यदृच्छया । सा तु शूर्पणखा नाम दशग्रीवस्य रक्षसः ५ भगिनी राममासाद्य ददर्श त्रिदशोपमम् । दीप्तास्यं च महाबाहुं पद्मपत्रायतेक्षणम् ६ गजविक्रान्तगमनं जटामण्डलधारिणम् । सुकुमारं

ह्यांसहवर्तमान रामानें स्नान केलें ४१; त्या उदकानें पितरांचें व देवांचें त्यांनीं तर्पण केलें व नंतर त्या निष्पाप असलेल्या रामप्रभृतींनीं उदय पावलेल्या सूर्याचें व देवतांचें स्तवन केलें ४२. पार्वतीला बरोबर घेऊन स्नान करून निघालेला भगवान् प्रभु रुद्र जाऊं लागला असतां ज्याप्रमाणें शोभतो त्याप्रमाणें सीतेला बरोबर घेऊन लक्ष्मणासहवर्तमान असलेला राम स्नान करून जाऊं लागला असतां शोभूं लागला ४३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६ ॥

स्नान झाल्यावर राम, सीता आणि लक्ष्मण हे त्या गोदावरीच्या तीरापासून आपल्या आश्रमाला गेले १. त्या आश्रमांत आल्यानंतर सकाळची स्नानसंध्या आटोपून राम लक्ष्मणासहवर्तमान बाहेर असलेल्या पर्णशालेमध्यें गेला आणि महर्षि प्रशंसा करीत असतां तो राम त्या पर्णशालेमध्यें सुखानें राहिला २. तो महापराक्रमी राम सीतेसहवर्तमान पर्णशालेमध्यें बसला असतां चित्रा नक्षत्रासहवर्तमान असलेल्या चंद्राप्रमाणें शोभूं लागला ३. आणि भ्रात्या लक्ष्मणाबरोबर तो नानाप्रकारच्या गोष्टी सांगूं लागला; परंतु, ह्याप्रमाणें गोष्टींकडे मन व्यग्र होऊन राम बसला असतांना ४ कोणीएक राक्षसी स्वेच्छेनें त्या प्रदेशाला आली. ती रावण राक्षसाची शूर्पणखा नामक ५ भगिनी होती आणि रामासमीप आल्यावर तिनें रामाला देवाप्रमाणें अवलोकन केलें; इतकेंच नव्हे परंतु, देदीप्यमान मुख, अजानुबाहु, कमलपत्राप्रमाणें दीर्घ नेत्र ६,

महासत्त्वं पार्थिवव्यञ्जनान्वितम् ७ राममिन्दीवरश्यामं कंदर्पसदृशप्रभम् । बभूवेन्द्रोपमं दृष्ट्वा राक्षसी काममोहिता ८ सुमुखं दुर्मुखी रामं वृत्तमध्यं महोदरी । विशालाक्षं विरूपाक्षी सुकेशं ताम्रमूर्धजा ९ प्रियरूपं विरूपा सा सुस्वरं भैरवस्वना । तरुणं दारुणा वृद्धा दक्षिणं वामभाषिणी १० न्यायवृत्तं सुदुर्वृत्ता प्रियमप्रियदर्शना । शरीरजसमाविष्टा राक्षसी राममब्रवीत् ११ जटी तापसवेषेण सभार्यः शरचापधृक् । आगतस्त्वमिमं देशं कथं राक्षससेवितम् १२ किमागमनकृत्यं ते तत्त्वमाख्यातुमर्हसि । एवमुक्तस्तु राक्षस्या शूर्पणख्या परंतपः १३ ऋजुबुद्धितया सर्वमाख्यातुमुपचक्रमे। आसीद्दशरथो नाम राजा त्रिदशविक्रमः १४ तस्याहमग्रजः पुत्रो रामो नाम जनैः श्रुतः । भ्रातायं लक्ष्मणो नाम यवीयान्मामनुव्रतः १५ इयं भार्या च वैदेही मम सीतेति विश्रुता । नियोगात्तु नरेन्द्रस्य पितुर्मातुश्च यन्त्रितः १६ धर्मार्थं धर्मकाङ्क्षी च वनं वस्तुमिहागतः । त्वां तु वेदितुमिच्छामि

---

गजाप्रमाणें शौर्यदर्शक गति, सुकुमार, महाधैर्यवान्, जटामंडल आणि राजलक्षणें ह्यांनीं युक्त ७, नीलकमलाप्रमाणें श्यामवर्ण आणि मदनासारिख्या कांतीनें संपन्न अशा इंद्रतुल्य रामाला अवलोकन करून ती राक्षसी कामानें मोहित झाली ८. नंतर विकाळ मुख, विशाल उदर, विरूप नेत्र, ताम्रवर्ण केश, कुरूप मुद्रा, भयंकर स्वर, उग्र स्वभाव, वृद्ध वय, कुटिल भाषण, अतिशय दुष्ट वर्तन आणि उद्वेगजनक मुद्रा ह्यांनीं युक्त असलेली ती राक्षसी कामाधीन होऊन—उत्कृष्ट मुख, कृश उदर, विशाल नयन, सुंदर केश, सुरूप मुद्रा, मंजुल स्वर, सौम्य स्वभाव, तरुण वय, सरल भाषण, न्यायाला अनुसरून असलेलें वर्तन आणि आह्लादकारक मुद्रा ह्यांनीं युक्त असलेल्या—रामाला ह्मणाली ९,१०,११ "धनुर्बाण धारण करणारा तूं जटिल तपस्व्याचा वेष धारण करून भार्येसहवर्तमान ह्या राक्षसांनीं आश्रय केलेल्या प्रदेशामध्यें कसा बरें आलास ? १२. तूं येथें येण्याचें कारण काय तें मला खरें खरें सांग". ह्याप्रमाणें शूर्पणखा राक्षसीनें विचारिलें असतां तो शत्रुतापन राम १३ सरळ स्वभावाचा असल्यामुळें सर्व सांगूं लागला. (तो ह्मणाला) "देवतुल्य पराक्रमी असा एक दशरथनामक राजा होऊन गेला १४. त्याचा मी रामनामक ज्येष्ठ पुत्र आहें व मी लोकांना विदित आहें. हा लक्ष्मण नांवाचा माझा कनिष्ठ भ्राता असून मला अनुसरून वागत असतो १५. ही सीता ह्मणून प्रसिद्ध असलेली विदेहराजकन्या माझी भार्या आहे. असो. त्या पित्या राजाची आणि मातेची आज्ञा झाल्यामुळें वचनबद्ध होऊन १६ मी धर्माभिलाषी धर्मपरिपालनार्थ वनामध्यें वास्तव्य करण्याकरितां येथें आलों आहें आणि

कस्य त्वं कासि कस्य वा १७ त्वं हि तावन्मनोज्ञाङ्गी राक्षसी प्रतिभासि मे । इह वा किंनिमित्तं त्वमागता ब्रूहि तत्त्वतः १८ साब्रवीद्वचनं श्रुत्वा राक्षसी मदनार्दिता । श्रूयतां राम तत्त्वार्थं वक्ष्यामि वचनं मम १९ अहं शूर्पणखा नाम राक्षसी कामरूपिणी । अरण्यं विचरामीदमेका सर्वभयंकरा २० रावणो नाम मे भ्राता यदि ते श्रोत्रमागतः । प्रवृद्धनिद्रश्च सदा कुम्भकर्णो महाबलः २१ विभीषणस्तु धर्मात्मा न तु राक्षसचेष्टितः । प्रख्यातवीर्यौ च रणे भ्रातरौ खरदूषणौ २२ तानहं समतिक्रान्ता राम त्वापूर्वदर्शनात् । समुपेतास्मि भावेन भर्तारं पुरुषोत्तमम् २३ अहं प्रभावसंपन्ना स्वच्छन्दबलगामिनी । चिराय भव भर्ता मे सीतया किं करिष्यसि २४ विकृता च विरूपा च न सेयं सदृशी तव । अहमेवानुरूपा ते भार्यारूपेण पश्य माम् २५ इमां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् । अनेन सह ते भ्रात्रा भक्षयिष्यामि मानुषीम् २६ ततः पर्वतशृंगाणि वनानि विविधानि च । पश्यन्सह मया

---

आतां तुला जाणण्याची माझी इच्छा आहे. तूं कोण आहेस व कोणाची आहेस? १७. मला तर तूं मनोहर अवयवांनीं युक्त झालेली राक्षसी भासत आहेस. तेव्हां येथें कोणत्या कारणाकरितां तूं आलीस हें मला सत्य सांग " १८. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर मदनानें व्याकुल झालेली ती राक्षसी, त्याला ह्मणाली " हे रामा, माझें बोलणें ऐक; मी तुला खरें खरें सांगत आहें १९. स्वेच्छेप्रमाणें रूप धारण करणारी मी शूर्पणखानामक राक्षसी आहें आणि सर्वांना भय उत्पन्न करणारी असून ह्या अरण्यामध्यें एकटी संचार करीत असतें २०. रावण ह्मणून माझा भ्राता आहे. तो कदाचित् तुझ्या कानावर आला असेल; कुंभकर्ण ह्मणून एक महाबलाढ्य व नेहमींच गाढ निद्रेंत असलेला एक दुसरा भ्राता आहे २१. बिभीषण ह्मणून जो तिसरा भ्राता आहे त्याचें वर्तन राक्षसासारिखें नसून तो धर्मात्मा आहे आणि संग्रामामध्यें ज्यांचें वीर्य प्रख्यात आहे असे दुसरे दोन भ्राते खर व दूषण ह्मणून आहेत २२. हे रामा, तुझें अपूर्व रूप दृष्टीं पडल्यामुळें तूं पुरुषश्रेष्ठ माझा भर्ता आहेस असें समजून त्या भ्रात्यांची पर्वा न करितां मी प्रेमानें तुझ्याकडे आलें आहे २३. मी प्रभावसंपन्न असून स्वेच्छेनें व सामर्थ्यानें सर्व लोकांमध्यें गमन करणारी आहें. तस्मात्, तूं माझा चिरकाल भर्ता हो; सीतेचा तुला काय उपयोग आहे? २४. ही सीता विकृत व कुरूप असल्यामुळें तुला अनुरूप नाहीं. मीच तुला अनुरूप आहें. तेव्हां भार्या ह्या नात्यानें तूं माझ्याकडे अवलोकन कर २५. विरूप, दुराचारिणी, अक्राळविक्राळ आणि पोट अतिशय खवळीला गेलेली ही तुझी मनुष्य जातीची भार्या ह्या तुझ्या भ्रात्यासहवर्तमान मी भक्षण करून टाकीन २६.

कामी दण्डकान्विचरिष्यसि २७ इत्येवमुक्तः काकुत्स्थः प्रहस्य मदिरेक्षणाम् । इदं वचनमारेभे वक्तुं वाक्यविशारदः २८ [ ८७१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तदशः सर्गः ॥१७॥

तां तु शूर्पणखां रामः कामपाशावपाशिताम् । स्वेच्छया श्लक्ष्णया वाचा स्मितपूर्वमथाब्रवीत् १ कृतदारास्मि भवति भार्येयं दयिता मम । त्वद्विधानां तु नारीणां सुदुःखा ससपत्नता २ अनुजस्त्वेष मे भ्राता शीलवान्प्रियदर्शनः । श्रीमानकृतदारश्च लक्ष्मणो नाम वीर्यवान् ३ अपूर्वी भार्यया चार्थी तरुणः प्रियदर्शनः । अनुरूपश्च ते भर्ता रूपस्यास्य भविष्यति ४ एनं भज विशालाक्षि भर्तारं भ्रातरं मम । असपत्ना वरारोहे मेरुमर्कप्रभा यथा ५ इति रामेण सा प्रोक्ता राक्षसी काममोहिता । विसृज्य रामं सहसा ततो लक्ष्मणमब्रवीत् ६ अस्य रूपस्य ते युक्ता भार्याहं

---

व नंतर विषयोपभोगाची इच्छा धरून पर्वतशिखरें आणि नानाप्रकारचीं वनें पहात पहात तूं माझ्यासहवर्तमान दंडकारण्यामध्यें संचार करशील " २७. ह्याप्रमाणें तिनें सांगितलें असतां ककुत्स्थकुलोत्पन्न राम मदिरेसारख्या नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या शूर्पणखेकडे पाहून हंसला आणि संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला तो राम तिच्याशीं असें बोलूं लागला २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

मदनपाशानें बद्ध झालेल्या त्या शूर्पणखेला राम विनोदानें आणि हास्यपूर्वक मधुर वाणीनें ह्मणाला १ " बाई, माझा विवाह झाला आहे, ही माझी प्रिय भार्या आहे आणि तुझ्यासारिख्या स्त्रियांशीं शत्रुत्व असणें फारच दुःखदायक आहे २. हा माझा लक्ष्मणनामक कनिष्ठ भ्राता सुशील, वीर्यवान्, दिसण्याला मनोहर, वैभवशाली आणि अविवाहित आहे ३. ह्याला आजपर्यंत कधीं भार्येचें सुख ठाऊक नाहीं आणि ह्मणूनच भार्येची ह्याला गरज आहे. तेव्हां तरुण आणि दिसण्यांतही मनोहर असा पति तुझ्या रूपाला योग्य होईल ४. तस्मात्, हे विशालनयने, हे सुंदरि, मेरुपर्वताची सेवा करणाऱ्या सूर्याच्या प्रभेप्रमाणें सवत नसलेली तूं ह्या माझ्या भ्रात्याचें सेवन कर " ५. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां कामानें मोहित झालेली ती राक्षसी

---

१ लक्ष्मणाचा विवाह झालेला असूनही तो अविवाहित आहे असें रामांनीं शूर्पणखेला सांगितलें आहे; परंतु, राम तिच्याशीं थट्टेनें बोलूं लागले असें आरंभीच सांगितलें आहे व थट्टेनें केलेलें असत्य भाषण दोषास्पद होत नाहीं. कारण, " न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन्न विवाहकाले । प्राणात्यये सर्वधनापहारे पंचानृतान्याहुरपातकानि " असें वचन

वरवर्णिनी । मया सह सुखं सर्वान्दण्डकान्विचरिष्यसि ७ एवमुक्तस्तु सौमित्री राक्षस्या वाक्यकोविदः । ततः शूर्पणखीं स्मित्वा लक्ष्मणो युक्तमब्रवीत् ८ कथं दासस्य मे दासी भार्या भवितुमिच्छसि । सोहमार्येण परवान्भ्रात्रा कमलवर्णिनी ९ समृद्धार्थस्य सिद्धार्था मुदितामलवर्णिनी। आर्यस्य त्वं विशालाक्षि भार्या भव यवीयसी १० एतां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् । भार्यां वृद्धां परित्यज्य त्वामेवैष भजिष्यति ११ को हि रूपमिदं श्रेष्ठं संत्यज्य वरवर्णिनि । मानुषीषु वरारोहे कुर्याद्भावं विचक्षणः १२ इति सा लक्ष्मणेनोक्ता कराला निर्णतोदरी । मन्यते तद्वचः सत्यं परिहासाविचक्षणा १३ सा रामं पर्णशालायामुपविष्टं परंतपम् । सीतया सह दुर्धर्षमब्रवीत्काममोहिता १४ इमां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् । वृद्धां भार्यामवष्टभ्य न मां त्वं बहु मन्यसे १५ अद्येमां भक्षयिष्यामि पश्यतस्तव मानुषीम् । त्वया सह चरिष्यामि

---

रामाला सोडून देऊन लक्ष्मणाला एकदम ह्मणाली ६ " मी श्रेष्ठ स्त्री त्या तुझ्या रूपाला योग्य भार्या आहें. तूं माझ्यासहवर्तमान सर्व दंडकारण्यामध्यें सुखानें संचार करशील" ७. ह्याप्रमाणें ती राक्षसी लक्ष्मणाला ह्मणाली असतां संभाषण करण्यांत प्रवीण असलेला तो लक्ष्मण हास्य करून शूर्पणखीला ह्मणाला ८ " रक्तकमलासारिख्या वर्णानें युक्त असलेली तूं मज दासाची भार्या होऊन दासी बनण्याची कां बरें इच्छा करीत आहेस ? कारण, मी आपल्या आर्य भ्रात्याच्या तंत्रानें वागणारा परतंत्र आहें ९. तेव्हां, हे विशालनयने, निर्मल कांतीनें युक्त असलेली तूं उत्कृष्ट विषयवासनेनें युक्त असलेल्या आर्य रामाची कनिष्ठ भार्या होऊन कृतकृत्य व आनंदित हो १०. कुरूप, ओबडधोबड, कृशोदरी, दुराचरणी आणि वृद्ध अशा ह्या भार्येचा त्याग करून हा तुझाच उपभोग घेईल ११. कारण, हे श्रेष्ठ स्त्रिये, हे सुंदरि, हें श्रेष्ठ रूप टाकून देऊन कोण बरें विचक्षण पुरुष मनुष्यजातींतील स्त्रियांवर मन ठेवील ? " १२. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां थट्टा समजण्याइतकी चतुर नसलेली ती अक्राळविक्राळ व पोट खबदाडीला गेलेली शूर्पणखा तें भाषण सत्यच मानूं लागली १३ आणि ( अंगीं तेज असल्यामुळें ) ज्याच्या समोर इतरांनीं जाणेंही अशक्य होतें असा तो शत्रुतापन राम पर्णशालेमध्यें सीतेसहवर्तमान बसला असतांना काममोहित झालेली ती शूर्पणखा त्याला ह्मणाली १४ " विरूप, दुराचारिणी, ओबडधोबड, पोट खबदाडीला गेलेली आणि वृद्ध अशी जी ही भार्या तिचा स्वीकार करून तूं मला बहमान देत नाहींस १५. तेव्हां मी आज ह्या मनुष्य जातीच्या स्त्रीला तुझ्या समक्ष

निःसपत्ना यथासुखम् १६ इत्युक्त्वा मृगशावाक्षीमलातसदृशेक्षणा । अभ्यगच्छत्सुसंक्रुद्धा महोल्का रोहिणीमिव १७ तां मृत्युपाशप्रतिमामापतन्तीं महाबलः । निगृह्य रामः कुपितस्ततो लक्ष्मणमब्रवीत् १८ क्रूरैरनार्यैः सौमित्रे परिहासः कथंचन । न कार्यः पश्य वैदेहीं कथंचित्सौम्य जीवतीम् १९ इमां विरूपामसतीमतिमत्तां महोदरीम् । राक्षसीं पुरुषव्याघ्र विरूपयितुमर्हसि २० इत्युक्तो लक्ष्मणस्तस्याः क्रुद्धो रामस्य पश्यतः । उद्धृत्य खड्गं चिच्छेद कर्णनासे महाबलः २१ निकृत्तकर्णनासा तु विस्वरं सा विनद्य च । यथागतं प्रदुद्राव घोरा शूर्पणखा वनम् २२ सा विरूपा महाघोरा राक्षसी शोणितोक्षिता । ननाद विविधान्नादान्यथा प्रावृषि तोयदः २३ सा विक्षरन्ती रुधिरं बहुधा घोरदर्शना । प्रगृह्य बाहू गर्जन्ती प्रविवेश महावनम् २४ ततस्तु सा राक्षससङ्घसंवृतं खरं जनस्थानगतं विरूपिता । उपेत्य तं भ्रातरमुग्रतेजसं पपात भूमौ गगना-

---

भक्षण करून टाकीन आणि ह्याप्रमाणें सवत नाहींशी झालेली मी तुझ्याबरोबर सुखास येईल त्याप्रमाणें संचार करीन ", १६. ह्याप्रमाणें रामाला सांगितल्यावर रोहिणीकडे धांवणारी मोठी ज्वालाच कीं काय अशा रीतीनें अलातचक्रासारिख्या नेत्रांनीं युक्त असलेली ती शूर्पणखा अत्यंत क्रुद्ध होऊन मृगलोचन हरणाच्या छाव्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशा सीतेच्या अंगावर धांवली १७; परंतु, मृत्युपाशाप्रमाणें असलेली ती शूर्पणखा अंगावर धांवून येऊं लागली असतां क्रुद्ध झालेला महाबलाढ्य राम दटावून लक्ष्मणाला ह्मणाला १८ " हे लक्ष्मणा, क्रूर आणि दुष्ट लोकांबरोबर थट्टा कधींही करूं नये. हे सत्त्वस्थ लक्ष्मणा, ( आपल्या थट्टेमुळें ) ही राक्षसी कशी तरी जीव धरून असलेल्या सीतेला भक्षण करण्यास प्रवृत्त झाली आहे १९. आधींच कुरूप, दुराचारिणी, अतिशय मत्त आणि तुंदिल असलेल्या ह्या राक्षसीला, हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, तूं विरूप करून टाक " २०. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां क्रुद्ध झालेल्या महाबलाढ्य लक्ष्मणानें रामासमक्षच खड्ग उपसून तिचे कान व नाक हीं छेदून टाकिलीं २१. तेव्हां कान व नाक तुटलेली ती घोर शूर्पणखा भेसूर ओरडली आणि आल्या वाटेनें वनांत पळून गेली २२. विरूप झाल्यामुळें अंगावर रक्ताचा सडा झालेल्या त्या महाघोर राक्षसीनें पर्जन्यकालीं गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें नानाप्रकारच्या गर्जना केल्या २३ आणि अनेक प्रकारांनीं रक्ताचा स्राव करणारी व घोर मुद्रेनें युक्त असलेली ती शूर्पणखा हात वर करून गर्जना करीत करीत महावनामध्यें प्रविष्ट झाली २४. तदनंतर विरूप करून टाकिलेली ती शूर्पणखा जनस्थानामध्यें राक्षस-

यथाशनिः २५ ततः सभार्यं भयमोहमूर्छिता सलक्ष्मणं राघवमागतं वनम् । निरूपणं चात्मनि शोणितोक्षिता शशंस सर्वं भगिनी खरस्य सा २६ [ ८९७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥ १८ ॥

तां तथा पतितां दृष्ट्वा विरूपां शोणितोक्षिताम् । भगिनीं क्रोधसंतप्तः खरः पप्रच्छ राक्षसः १ उत्तिष्ठ तावदाख्याहि प्रमोहं जहि संभ्रमम् । व्यक्तमाख्याहि केन त्वमेवंरूपा विरूपिता २ कः कृष्णसर्पमासीनमाशीविषमनागसम् । तुदत्यभिसमापन्नमङ्गुल्यग्रेण लीलया ३ कालपाशं समासज्य कण्ठे मोहान्न बुध्यते । यस्त्वामद्य समासाद्य पीतवान्विषमुत्तमम् ४ बलविक्रमसंपन्ना कामगा कामरूपिणी । इमामवस्थां नीता त्वं केनान्तकसमागता ५ देवगन्धर्वभूतानामृषीणां च महात्मनाम् । कोऽयमेवं महावीर्यस्त्वां विरूपां चकार ह ६ न हि पश्याम्यहं लोके यः कुर्यान्मम विप्रियम् । अमरेषु सहस्राक्षं महेन्द्रं पाकशासनम् ७ अद्याहं मार्गणैः प्राणा-

---

समुदायांनीं परिवेष्टित असलेल्या त्या उग्र तेजस्वी भ्रात्यासमीप गेल्यावर आकाशांतून पडणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें एकाएकीं भूमीवर पडली २५ व नंतर भय आणि मोह ह्यांनीं व्याप्त होऊन अंगावर रक्ताचा सडा झालेली ती खराची भगिनी शूर्पणखा, भार्या आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान वनामध्यें राम आल्याचें व लक्ष्मणानें आपल्याला विरूप केल्याचें, सर्व त्याला सांगू लागली २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

अंगावर रक्ताचा सडा झालेली आणि विरूप करून टाकिलेली ती आपली भगिनी तशा प्रकारें भूमीवर पडलेली पाहून खर राक्षस तिला ह्मणाला १ "ऊठ; मोह व भय सोडून दे आणि ह्याप्रमाणें तुला अशी विरूप करून कोणीं टाकिली तें सांग २. ज्याच्या दाढेमध्यें विष आहे अशा संमुख बसलेल्या निरपराधी कृष्णसर्पाला लीलेनें कोण बरें बोटानें डवचीत आहे ? ३. ज्यानें आज तुझ्याशीं प्रसंग केला आहे त्यानें गळ्यामध्यें कालपाश अडकावून जहर विष सेवन केलें आहे हें त्याला मोहामुळें समजत नाहीं ४. बल आणि पराक्रम यांनीं संपन्न, स्वेच्छेनें गमन करणारी, यथेष्ट रूप धारण करणारी आणि मृत्यूप्रमाणें असलेली तूं, कोणीं ही अवस्था तुला आणिल्यामुळें, येथें आली आहेस ५. तुलाही विरूप करून हांकून देणारा असा कोण बरें देव, गंधर्व, इतर प्राणी आणि महात्मे ऋषि यांमध्यें महावीर्यवान् आहे ? ६. माझी कुचाळी काढणारा असा जगतामध्येंही मला कोणी दिसत नाहीं. पाकसंज्ञक दैत्याचा वध

नादास्ये जीवितान्तगैः । सलिले क्षीरमासक्तं निष्पिबन्निव सारसः ८
निहतस्य मया संख्ये शरसंकृत्तमर्मणः । सफेनं रुधिरं कस्य मेदिनी
पातुमिच्छति ९ कस्य पत्ररथाः कायान्मांसमुत्कृत्य संगताः । प्रहृष्टा
भक्षयिष्यन्ति निहतस्य मया रणे १० तं न देवा न गन्धर्वा न पिशाचा
न राक्षसाः । मयापकृष्टं कृपणं शक्तास्त्रातुं महाहवे ११ उपलभ्य शनैः
संज्ञां तं मे शंसितुमर्हसि । येन त्वं दुर्विनीतेन वने विक्रम्य निर्जिता १२
इति भ्रातुर्वचः श्रुत्वा क्रुद्धस्य च विशेषतः । ततः शूर्पणखा वाक्यं सबा-
ष्पमिदमब्रवीत् १३ तरुणौ रूपसंपन्नौ सुकुमारौ महाबलौ । पुण्डरीक-
विशालाक्षौ चीरकृष्णाजिनाम्बरौ १४ फलमूलाशनौ दान्तौ तापसौ ब्रह्म-
चारिणौ । पुत्रौ दशरथस्यास्तां भ्रातरौ रामलक्ष्मणौ १५ गन्धर्वराजप्र-
तिमौ पार्थिवव्यञ्जनान्वितौ । देवौ वा दानवावेतौ न तर्कयितुमुत्सहे १६
तरुणी रूपसंपन्ना सर्वाभरणभूषिता । दृष्टा तत्र मया नारी तयोर्मध्ये

---

करणाऱ्या सहस्रनयन इंद्रावांचून देवांमध्येंही मला कोणी आढळत नाहीं ७. उदका-मध्यें मिश्र झालेलें दुग्ध प्राशन करणाऱ्या हंसपक्ष्याप्रमाणें मृत्युप्रापक बाणांच्या योगानें मी आज हें कृत्य करणाऱ्याचे प्राण घेईन ८. संग्रामामध्यें माझ्या हातून बाणांनीं मर्मस्थानें तुटून मरून पडलेल्या कोणाचें बरें फेनयुक्त रक्त प्राशन करण्याची पृथ्वीला इच्छा आहे ? ९. एकत्र जुळलेले बाण संग्रामामध्यें माझ्या हातून वध पावून पडलेल्या कोणाच्या बरें शरीरांतून मांस बाहेर काढून आनंदानें भक्षण करणार आहेत ? १०. महासंग्रामामध्यें माझ्या तावडींत सांपडलेल्या त्या अनाथाचें रक्षण करण्यास देव, गंधर्व, पिशाच आणि राक्षस ह्यांपैकीं कोणीही समर्थ होणार नाहींत ११. तस्मात्, तूं हळूं हळूं सावध हो आणि ज्या उद्धटानें वनामध्यें येऊन तुला जिंकिलें त्याचें नांव मला सांग " १२. ह्याप्रमाणें विशेषेंकरून क्रुद्ध झालेल्या त्या भ्रात्याचें भाषण श्रवण केल्यावर शूर्पणखा अश्रु ढाळीत ढाळीत त्याला ह्मणाली १३ " तरुण, रूपवान्, सुकुमार, महाबलाढ्य, कमलपत्रासारिख्या विशाल नेत्रांनीं आणि वल्कलें व कृष्णाजिनें ह्याच वस्त्रांनीं युक्त १४, फलमूलांवर उपजीविका करणारे, जितेंद्रिय, तपस्वी आणि ब्रह्मचारी असे दशरथाचे पुत्र भ्राते रामलक्ष्मण अरण्यामध्यें होते १५. राजचिन्हांनीं युक्त आणि गंधर्वाधिपति चित्ररथाप्रमाणें असलेले हे रामलक्ष्मण देव असावेत किंवा दानव असावेत ह्यासंबंधानें माझा कांहीं तर्क होत नाहीं. ( सारांश, दशरथाचे पुत्र ह्मणून त्यांनींच जरी मला सांगितलें आहे तरी अमानुष कृत्य दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें ते वस्तुतः कोण असावेत ह्याविषयीं माझा निश्चय

सुमध्यमा १७ ताभ्यामुभाभ्यां संभूय प्रमदामधिकृत्य ताम् । इमामवस्थां नीताहं यथानाथासती तथा १८ तस्याश्चानृजुवृत्तायास्तयोश्च हतयोरहम् । सफेनं पातुमिच्छामि रुधिरं रणमूर्धनि १९ एष मे प्रथमः कामः कृतस्तत्र त्वया भवेत् । तस्यास्तयोश्च रुधिरं पिबेयमहमाहवे २० इति तस्यां ब्रुवाणायां चतुर्दश महाबलान् । व्यादिदेश खरः क्रुद्धो राक्षसानन्तकोपमान् २१ मानुषौ शस्त्रसंपन्नौ चीरकृष्णाजिनाम्बरौ । प्रविष्टौ दण्डकारण्यं घोरं प्रमदया सह २२ तौ हत्वा तां च दुर्वृत्तामुपावर्तितुमर्हथ । इयं च भगिनी तेषां रुधिरं मम पास्यति २३ मनोरथोयमिष्टोस्या भगिन्या मम राक्षसाः । शीघ्रं संपाद्यतां गत्वा तौ प्रमथ्य स्वतेजसा २४ युष्माभिर्निहतौ दृष्ट्वा तावुभौ भ्रातरौ रणे । इयं प्रहृष्टा मुदिता रुधिरं युधि पास्यति २५ इति प्रतिसमादिष्टा राक्षसास्ते चतुर्दश । तत्र जग्मुस्तया सार्धं घना वातेरिता इव २६ [ ९२३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ १९ ॥

---

होत नाहीं ) १६. असो. तेथें त्यांच्यामध्यें एक उत्कृष्ट कटीनें युक्त असलेली स्त्री मीं अवलोकन केली. ती तरुण व रूपवती असून सर्व अलंकारांनीं भूषित झालेली होती १७. त्या तरुण स्त्रीकरितां त्या उभयतांनीं एकत्र होऊन माझी अशी अनाथ कुलटेसारखी अवस्था करून सोडिली आहे १८. त्या दुराचारिणी स्त्रीचें आणि त्या नीचांचें संग्रामामध्यें फेनासहित रक्त प्राशन करण्याची माझी इच्छा आहे १९. अरे, तिचें आणि त्यांचें रक्त संग्रामामध्यें मीं प्यावें ही माझी उत्कट इच्छा तुझ्या हातून शेंवटास जाईल तर बरें होईल " २०. ह्याप्रमाणें ती बोलूं लागली असतां क्रुद्ध झालेला खर राक्षस मृत्यूसारिख्या चवदा महाबलाढ्य राक्षसांना ह्मणाला २१ " सशस्त्र आणि वल्कलें व कृष्णाजिनें ह्याच वस्त्रांनीं युक्त असलेले जे दोन मानव तरुण स्त्रीसहवर्तमान घोर दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाले आहेत २२ त्यांचा आणि त्या दुराचारिणीचा वध करून तुह्मी परत या; ह्मणजे ही माझी भगिनी त्यांचें रक्त प्राशन करील २३. हें राक्षसहो, तुह्मी जा आणि आपल्या सामर्थ्यानें त्यांचा वध करून ह्या माझ्या भगिनीचा हा प्रिय मनोरथ सत्वर परिपूर्ण करा २४. त्या उभयतां भ्रात्यांचा संग्रामामध्यें तुह्मीं वध केलेला पाहून ही माझी भगिनी हर्षानें व आनंदानें संग्रामामध्यें त्यांचें रक्त प्राशन करील " २५. ह्याप्रमाणें आज्ञा झालेले ते चवदा राक्षस वायूनें हलविलेल्या मेघांप्रमाणें तिकडे गेले २६. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

ततः शूर्पणखा घोरा राघवाश्रममागता । राक्षसानाचचक्षे तौ भ्रातरौ सह सीतया १ ते रामं पर्णशालायामुपविष्टं महाबलम् । ददृशुः सीतया सार्धं लक्ष्मणेनापि सेवितम् २ तां दृष्ट्वा राघवः श्रीमानागतांस्तांश्च राक्षसान् । अब्रवीद्भ्रातरं रामो लक्ष्मणं दीप्ततेजसम् ३ मुहूर्तं भव सौमित्रे सीतायाः प्रत्यनन्तरः । इमानस्या वधिष्यामि पदवीमागतानिह ४ वाक्यमेतत्ततः श्रुत्वा रामस्य विदितात्मनः । तथेति लक्ष्मणो वाक्यं राघवस्य प्रपूजयन् ५ राघवोपि महच्चापं चामीकरविभूषितम् । चकार सज्यं धर्मात्मा तानि रक्षांसि चाब्रवीत् ६ पुत्रौ दशरथस्यावां भ्रातरौ रामलक्ष्मणौ । प्रविष्टौ सीतया सार्धं दुश्चरं दण्डकावनम् ७ फलमूलाशनौ दान्तौ तापसौ ब्रह्मचारिणौ । वसन्तौ दण्डकारण्ये किमर्थमुपहिंसथ ८ युष्मान्पापात्मकान्हन्तुं विप्रकारान्महाहवे । ऋषीणां तु नियोगेन संप्राप्तः सशरासनः ९ तिष्ठतैवात्र संतुष्टा नोपावर्तितुमर्हथ । यदि प्राणैरिहार्थो वो निवर्तध्वं निशाचराः १० तस्य तद्वचनं श्रुत्वा राक्षसास्ते चतुर्दश । ऊचु-

---

तदनंतर ती घोर शूर्पणखा रामाच्या आश्रमाला आली आणि तेथें सीतेसहवर्तमान असलेल्या त्या भ्रात्या रामलक्ष्मणाची खबर तिनें त्या राक्षसांना दिली १. तेव्हां लक्ष्मण ज्याची सेवा करीत आहे असा महाबलाढ्य राम पर्णशालेमध्यें सीतेसहवर्तमान बसलेला त्यांनीं अवलोकन केला २. परंतु, तिला आणि त्या आलेल्या राक्षसांना अवलोकन करितांक्षणीं वैभवशाली रघुवंशज राम उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या भ्रात्या लक्ष्मणाला ह्मणाला ३ " हे लक्ष्मणा, तूं क्षणभर सीतेजवळ ऐस; मी शूर्पणखेचा अभिमान धरून तिच्या पाठोपाठ येथें आलेल्या ह्या राक्षसांचा वध करितों "४. हें सामर्थ्यानें महाशूर असलेल्या रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मण त्या भाषणाला मान देण्याकरितां " ठीक आहे " असें ह्मणाला ५. तेव्हां धर्मात्मा रामही आपल्या सुवर्णविभूषित प्रचंड धनुष्याला प्रत्यंचा चढवून त्या राक्षसांना ह्मणाला ६ " आह्मी दशरथाचे पुत्र भ्राते रामलक्ष्मण सीतेसहवर्तमान ह्या गहन दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झालों आहोंत ७ आणि आह्मी जितेंद्रिय, तपस्वी, ब्रह्मचारी असून ह्या दंडकारण्यामध्यें फलमूलांवर उपजीविका करून रहात आहोंत. तेव्हां तुह्मी कां आमचा वध करितां ? ८. सज्जनांना पीडा करणाऱ्या तुह्मां दुरात्म्यांचा महासंग्रामामध्यें वध करण्याकरितां ऋषींच्या आज्ञेनें मी धनुष्यासहवर्तमान येथें प्राप्त झालों आहें ९. तेव्हां तुह्मी संतुष्ट होऊन येथें उभेच रहा, परत फिरूं नका; परंतु, हे निशाचरहो, तुह्मांला जर प्राणांची अपेक्षा असेल तर तुह्मी येथून परत फिरा " १०. हें त्याचें भाषण श्रवण

वाचं सुसंक्रुद्धा ब्रह्मघ्नाः शूलपाणयः ११ संरक्तनयना घोरा रामं संरक्त-
लोचनम् । परुषा मधुराभाषं हृष्टा दृष्टपराक्रमम् १२ क्रोधमुत्पाद्य नो भर्तुः
खरस्य सुमहात्मनः । त्वमेव हास्यसे प्राणान्सद्योऽस्माभिर्हतो युधि १३ का
हि ते शक्तिरेकस्य बहूनां रणमूर्धनि । अस्माकमग्रतः स्थातुं किं पुनर्यो-
द्धुमाहवे १४ एभिर्बाहुप्रयुक्तैश्च परिघैः शूलपट्टिशैः । प्राणांस्त्यक्ष्यसि
वीर्यं च धनुष्यकरपीडितम् १५इत्येवमुक्त्वा संरब्धा राक्षसास्ते चतुर्दश ।
उद्यतायुधनिस्त्रिंशा राममेवाभिदुद्रुवुः १६ चिक्षिपुस्तानि शूलानि राघवं
प्रति दुर्जयम् । तानि शूलानि काकुत्स्थः समस्तानि चतुर्दश १७तावद्भिरेव
चिच्छेद शरैः काञ्चनभूषितैः।ततः पश्चान्महातेजा नाराचान्सूर्यसंनिभान्१८
जग्राह परमक्रुद्धश्चतुर्दश शिलाशितान् । गृहीत्वा धनुरानम्य लक्ष्यानु-
द्दिश्य राक्षसान् १९ मुमोच राघवो बाणान्वज्रानिव शतक्रतुः । ते भित्त्वा
रक्षसां वेगाद्वक्षांसि रुधिरप्लुताः २० विनिष्पेतुस्तदा भूमौ वल्मीका-

---

केल्यावर ते घोर, तीक्ष्ण, आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त, ब्रह्मघातकी, हातांत शूल घेऊन आलेले व अत्यंत क्रुद्ध झालेले चौदाही राक्षस हर्षयुक्त होऊन ज्याचा पराक्रम अवलोकनांत आलेला नाहीं अशा त्या आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या मधुरभाषणी रामाला ह्मणाले ११,१२ " आमचा भर्ता जो महात्मा खर त्याला कोप आणिल्यामुळें आज तूंच युद्धामध्यें आमच्या हातून वध पावून आतांच प्राणांचा त्याग करशील १३. संग्रामामध्यें युद्ध करण्याची तर गोष्टच नको आहे; परंतु, रणामध्यें आह्मां अनेकांच्या समोर नुसतें उभें रहाण्याचें तरी तुझें एकट्याचें काय सामर्थ्य आहे ? १४. हातांनीं सोडिलेल्या ह्या परिघांच्या योगानें, शूलांच्या योगानें व पट्टयांच्या योगानें तू आपल्या प्राणांचा, वीर्याचा आणि हातांत घेतलेल्या धनुष्याचा त्याग करशील " १५. ह्याप्रमाणें बोलल्यानंतर ते क्रुद्ध झालेले चवदा राक्षस आयुधें व खड्ग उगारून रामाच्याच अंगावर धांवले १६ आणि ते शूल त्यांनीं त्या अजिंक्य रामावर फेंकिले; परंतु, रामानें ते सर्व चवदाही शूल १७ सुवर्णभूषित अशा चवदाच बाणांच्या योगानें तोडून टाकिले. तदनंतर अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या महातेजस्वी रामानें राक्षसांकडे पहात पहात शिळेवर घांसलेले व सूर्यासारिखे तेजस्वी असे चवदा नाराच बाण घेतले आणि ते घेतल्यावर धनुष्य लववून व त्या राक्षसांवर नेम धरून १८,१९ वज्र सोडणाऱ्या इंद्राप्रमाणें ते बाण रामानें सोडिले. तेव्हां ते बाण वेगानें राक्षसांचीं वक्षःस्थलें फोडून रक्तानें भरले २० आणि वारुळांतून बाहेर येणाऱ्या सर्पाप्रमाणें त्यांच्या वक्षःस्थलांतून बाहेर येऊन पृथ्वीवर पडले व त्याच वेळीं त्या बाणांनीं

दिव पन्नगाः । तैर्भग्नहृदया भूमौ भिन्नमूला इव द्रुमाः २१ निपेतुः शोणि-
तस्नाता विकृता विगतासवः । तान्भूमौ पतितान्दृष्ट्वा राक्षसी क्रोधमू-
र्छिता २२ उपगम्य खरं सा तु किंचित्संशुष्कशोणिता । पपात पुनरे-
वार्ता सनिर्यासेव वल्लरी २३ भ्रातुः समीपे शोकार्ता ससर्ज विनदं
महत् । सस्वरं मुमुचे बाष्पं विवर्णवदना तदा २४ निपातितान्प्रेक्ष्य रणे
तु राक्षसान्प्रधाविता शूर्पणखा पुनस्ततः । वधं च तेषां निखिलेन रक्षसां
शशंस सर्वं भगिनी खरस्य सा २५ [ १४८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे विंशतितमः सर्गः ॥ २० ॥

स पुनः पतितां दृष्ट्वा क्रोधाच्छूर्पणखां पुनः । उवाच व्यक्तया वाचा
तामनर्थार्थमागताम् १ मया त्विदानीं शूरास्ते राक्षसाः पिशिताशनाः ।
त्वत्प्रियार्थं विनिर्दिष्टाः किमर्थं रुद्यते पुनः २ भक्ताश्चैवानुरक्ताश्च हिताश्च
मम नित्यशः । हन्यमाना न हन्यन्ते न न कुर्युर्वचो मम ३ किमेतच्छ्रो-

---

हृदय विदीर्ण होऊन रक्तानें नाहालेले व विद्रूप होऊन गतप्राण झालेले ते राक्षसही मुळें तुटलेल्या वृक्षांप्रमाणें भूमीवर पडले. तेव्हां त्यांना भूमीवर पडलेले पाहून शूर्पणखा राक्षसी क्रोधानें व्याप्त झाली आणि २१,२२ ( नाक व कान कांपल्याला बराच वेळ झाल्यामुळें ) जिच्या शरीरावरील रक्त किंचित् वाळलेलें आहे अशी ती दुःखित झालेली शूर्पणखा खराजवळ जाऊन पुनरपि डिंकानें भरलेल्या वेलीप्रमाणें भूमीवर पडली २३. तदनंतर मुख निस्तेज होऊन ती शोकाकुल झालेली शूर्पणखा भ्रात्याचे समीप मोठा आक्रोश करूं लागली आणि हेल काढून अश्रु ढाळूं लागली २४. सारांश, संग्रामामध्यें मारून पाडिलेल्या राक्षसांना अवलोकन करून शूर्पणखा पुनरपि तेथून धांवली आणि त्या खराच्या भगिनीनें त्या राक्षसांच्या वधाचा सर्व वृत्तांत पूर्णपणें त्याला निवेदन केला २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

पुनरपि तेथें पडलेल्या शूर्पणखेला अवलोकन केल्यावर अनर्थ सांगण्याकरितां आलेल्या त्या शूर्पणखेला तो खर रागारागानें स्पष्ट वाणीनें ह्मणाला १ " मीं तर आतांच त्या मांसभक्षक राक्षसांना तुझा मनोरथ परिपूर्ण करण्याकरितां ( रामप्रभृतींचा वध करण्याची ) आज्ञा देऊन पाठविलें आहे. तेव्हां तूं फिरून कां रडत आहेस ? २. ते राक्षस माझे भक्त आहेत, माझे ठिकाणीं अनुरक्त आहेत, नेहमीं माझें हित करणारे आहेत, त्यांचा कोणी वध करूं लागला असतां ते वध पावणारे नाहींत आणि माझी आज्ञा शेवटास न नेणें हेंही त्यांच्यानें व्हावयाचें नाहीं; ३ तेव्हां हें काय ? आणि ज्याकरितां

तुमिच्छामि कारणं यत्कृते पुनः । हा नाथेति विनर्दन्ती सर्पवच्चेष्टसे क्षितौ ४
अनाथवद्विलपसि किं नु नाथे मयि स्थिते । उत्तिष्ठोत्तिष्ठ मा मैवं वैक्लव्यं
त्यज्यतामिति ५ इत्येवमुक्ता दुर्धर्षा खरेण परिसान्त्विता । विमृज्य नयने
सास्रे खरं भ्रातरमब्रवीत् ६ अस्मीदानीमहं प्राप्ता हतश्रवणनासिका । शोणि-
तौघपरिक्लिन्ना त्वया च परिसान्त्विता ७ प्रेषिताश्च त्वया शूरा राक्षसास्ते
चतुर्दश । निहन्तुं राघवं घोरं मत्प्रियार्थं सलक्ष्मणम् ८ ते तु रामेण
सामर्षाः शूलपट्टिशपाणयः । समरे निहताः सर्वे सायकैर्मर्मभेदिभिः ९
तान्भूमौ पतितान्दृष्ट्वा क्षणेनैव महाजवान् । रामस्य च महत्कर्म महांस्त्रासो-
भवन्मम १० सास्मि भीता समुद्विग्ना विषण्णा च निशाचर । शरणं
त्वां पुनः प्राप्ता सर्वतो भयदर्शिनी ११ विषादनक्राध्युषिते परित्रासोर्मि-
मालिनि । किं मां न त्रायसे मग्नां विपुले शोकसागरे १२ एते च
निहता भूमौ रामेण निशितैः शरैः । ये च मे पदवीं प्राप्ता राक्षसाः
पिशिताशनाः १३ मयि ते यद्यनुक्रोशो यदि रक्षःसु तेषु च । रामेण

---

पुनरपि " हे नाथ " ह्मणून आक्रोश करीत करीत तूं सर्पाप्रमाणें पृथ्वीवर तडफडत आहेस त्याचें कारण श्रवण करण्याची माझी इच्छा आहे ४. मी नाथ असतांना तूं कां बरें अनाथाप्रमाणें विलाप करीत आहेस ? ऊठ ऊठ; नको नको असा विलाप करूं. हें दुःख करणें सोडून दे " ५. जिच्या समोर इतरांनीं जाणेंही अशक्य आहे अशा त्या शूर्पणखेचें ह्याप्रमाणें खरानें सांत्वन केलें असतां अश्रु आलेले आपले नेत्र पुसून ती त्या भ्रात्या खराला ह्मणाली ६ " कान व नाक कांपले गेल्यामुळें रक्तप्रवाहानें भिजलेली अशी मी नुकतीच येथें आलें होतें; तूं माझें सांत्वनही केलें होतेंस ७ आणि माझा मनोरथ परिपूर्ण करण्याच्या उद्देशानें लक्ष्मणासहवर्तमान त्या घोर रामाचा वध करण्याकरितां ते चवदा शूर राक्षसही तूं पाठविले होतेस ८; परंतु, शूल व पट्टे धारण केलेल्या त्या सर्व क्रुद्ध राक्षसांचा मर्मभेदक बाणांच्या योगानें संग्रामामध्यें रामानें वध केला ९. तेव्हां एका क्षणामध्यें ते महावेगवान् राक्षस भूमीवर पडलेले पाहून आणि रामाचें तें महत् कर्म अवलोकन करून मला मोठी भीति उत्पन्न झाली आहे १०. आणि, हे निशाचरा, चोहोंकडे रामाचें भय वाटत असलेली ती मी अत्यंत उद्विग्न, खिन्न व भयभीत होऊन पुनरपि तुला शरण आलें आहें ११. अरे, विषादरूप नक्रांनीं वास्तव्य केलेल्या आणि भयरूप लाटांनीं युक्त असलेल्या अगाध शोकसागरामध्यें मी मग्न झालें असतांना तूं माझें कां बरें रक्षण करीत नाहींस ? १२. ज्यांनीं माझ्या मार्गाचें अवलंबन केलें ते हे मांसभक्षक राक्षस तीक्ष्ण बाणांच्या योगानें रामानें

यदि शक्तिस्ते तेजो वास्ति निशाचर १४ दण्डकारण्यनिलयं जहि राक्षसकण्टकम्। यदि राममित्रघ्नं न त्वमद्य वधिष्यसि १५ तव चैवाग्रतः प्राणांस्त्यक्षामि निरपत्रपा। बुद्ध्याहमनुपश्यामि न त्वं रामस्य संयुगे १६ स्थातुं प्रतिमुखे शक्तः सबलोपि महारणे। शूरमानी न शूरस्त्वं मिथ्यारोपितविक्रमः १७ अपयाहि जनस्थानात्त्वरितः सहबान्धवः। जहि त्वं समरे मूढान्यथा तु कुलपांसन १८ मानुषौ तौ न शक्नोषि हन्तुं वै रामलक्ष्मणौ। निःसत्त्वस्याल्पवीर्यस्य वासस्ते कीदृशस्त्विह १९ रामतेजोभिभूतो हि त्वं क्षिप्रं विनशिष्यसि। स हि तेजः समायुक्तो रामो दशरथात्मजः २० भ्राता चास्य महावीर्यो येन चास्मि विरूपिता। एवं विलप्य बहुशो राक्षसी प्रदरोदरी २१ भ्रातुः समीपे शोकार्ता नष्टसंज्ञा बभूव ह। कराभ्यामुदरं हत्वा रुरोद भृशदुःखिता २२ [ ९.७० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्ड एकविंशः सर्गः ॥२१॥

---

मारून भूमीवर पाडिले १३. तस्मात्, माझ्याबद्दल आणि त्या राक्षसांबद्दल जर तुला कांहीं दया असेल आणि रामाशीं युद्ध करण्याचें जर तुझ्या अंगीं सामर्थ्य अथवा तेज असेल तर, हे निशाचरा १४, दंडकारण्यामध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या राक्षसकंटकाचा तूं वध कर. शत्रुनाशक रामाचा आज जर तूं वध केला नाहींस तर १५ (नाक व कान छिन्न झाल्यामुळें) लज्जित झालेली मी तुझ्यापुढें प्राण सोडीन. तूं चतुरंग सैन्य जरी बरोबर घेऊन गेलास तरी रामाच्या समोर संग्रामामध्यें उभा राहण्यास समर्थ नाहींस असें माझ्या बुद्धीला वाटतें. आपल्यावर पराक्रमाचा वृथाच आरोप करून स्वतःला शूर मानणारा तूं महासंग्रामामध्यें शूर नाहींस १६, १७. तस्मात्, हे राक्षसकुलाला कलंक लावणाऱ्या खरा, तूं ह्या जनस्थानांतून बांधवांसहवर्तमान सत्वर चालता हो आणि संग्रामामध्यें त्या मूढांचा वध कर १८. त्या मानव रामलक्ष्मणांचा वध करण्याचें जर तुला सामर्थ्य नसेल तर निःसत्व आणि वीर्यहीन असलेल्या तुझें ह्या दंडकारण्यामध्यें वास्तव्य कशा प्रकारचें होणार आहे ! ( निंद्यच होणार आहे ! ) १९. रामतेजानें तूं ग्रस्त झालास ह्मणजे सत्वर नाश पावशील. कारण, तो दशरथपुत्र राम तेजस्वी आहे २० आणि ज्यानें मला विरूप केलें तो त्याचा भ्राताही महावीर्यवान् आहे." ह्याप्रमाणें नानाप्रकारें विलाप करून निम्न उदरानें युक्त असलेली ती राक्षसी २१ भ्रात्याचे समीप शोकाकुल होऊन मूर्छित झाली आणि अत्यंत दुःखित झालेली ती राक्षसी हातांनीं ऊर बडवून घेऊन रडूं लागली. २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकविसावा सर्ग समाप्त झाला॥२१॥

एवमाधर्षितः शूरः शूर्पनख्या खरस्ततः । उवाच रक्षसां मध्ये खरः खरतरं वचः १ तवापमानप्रभवः क्रोधोऽयमतुलो मम । न शक्यते धारयितुं लवणाम्भ इवोल्बणम् २ न रामं गणये वीर्यान्मानुषं क्षीणजीवितम् । आत्मदुश्चरितैः प्राणान्हतो योऽद्य विमोक्ष्यते ३ बाष्पः संधार्यतामेष संभ्रमश्च विमुच्यताम् । अहं रामं सह भ्रात्रा नयामि यमसादनम् ४ परश्वधहतस्याद्य मन्दप्राणस्य भूतले । रामस्य रुधिरं रक्तमुष्णं पास्यसि राक्षसि ५ संप्रहृष्टा वचः श्रुत्वा खरस्य वदनाच्च्युतम् । प्रशशंस पुनर्मौर्ख्याद्भ्रातरं रक्षसां वरम् ६ तया परुषितः पूर्वं पुनरेव प्रशंसितः । अब्रवीद्दूषणं नाम खरः सेनापतिं तदा ७ चतुर्दश सहस्राणि मम चित्तानुवर्तिनाम् । रक्षसां भीमवेगानां समरेष्वनिवर्तिनाम् ८ नीलजीमूतवर्णानां लोकहिंसाविहारिणाम् । सर्वोद्योगमुदीर्णानां रक्षसां सौम्य कारय ९ उपस्थापय मे क्षिप्रं रथं सौम्य धनूंषि च । शरांश्च चित्रान्खड्गांश्च शक्तीश्च विविधाः शिताः १० अग्रे निर्यातुमिच्छामि पौलस्त्यानां महात्मनाम् । वधार्थं दुर्विनीतस्य

---

ह्याप्रमाणें शूर्पणखेनें शूर खराचा अवमान केला असतां तो खर अतिशय कठोर शब्दांनीं राक्षसांमध्यें तिला ह्मणाला १ " तुझ्या अपमानामुळें उत्पन्न झालेला हा माझा अनुपम क्रोध अतिशय खारट असलेल्या समुद्राच्या पाण्याप्रमाणें आंत दाबून धरितां येणें शक्य नाहीं २. आपल्या दुराचरणांनीं वध पावून जो आज प्राणत्याग करणार आहे त्या आयुष्य संपलेल्या मानव रामाची स्वपराक्रमामुळें मी मुळींच गणना करीत नाहीं ३. आतां हे अश्रु अवरून धर आणि भीति सोडून दे. मी रामाला त्याच्या भ्रात्यासहवर्तमान यमसदनाला पाठवितों ४. कुऱ्हाडीचा तडाका बसल्यामुळें गतप्राण होऊन भूमीवर पडलेल्या रामाचें ऊन ऊन रक्त, हे राक्षसि, तूं आज प्राशन करशील " ५. हें खराच्या तोंडून निघालेलें भाषण श्रवण करून त्या शूर्पणखेला पुनरपि अतिशय हर्ष झाला आणि मूर्खपणामुळें ती राक्षसांमध्यें श्रेष्ठ असलेल्या आपल्या भ्रात्याची पुनरपि प्रशंसा करूं लागली ६. तेव्हां पूर्वीं कठोर शब्द बोलून पुनरपि तिनें प्रशंसा केलेला तो खर दूषणनामक सेनापतीला ह्मणाला ७ " प्राण्यांची हिंसा हीच ज्यांची क्रीडा आहे, नीलमेघाप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे, संग्रामामध्यें जे कधींही परावृत्त होत नाहींत आणि माझ्या इच्छेला अनुसरून जे वर्तन करीत असतात असे जे भयंकर वेगवान् व खवळलेले चवदा हजार राक्षस त्यांच्याकडून तूं सर्व प्रकारें युद्धाची तयारी करीव ८,९ आणि, हे सत्त्वशीला, माझा रथ, धनुष्यें, बाण, अद्भुत खड्ग आणि नानाप्रकारच्या तीक्ष्ण शक्ति तूं सत्वर येथें घेऊन ये १०. हे संग्रामनिपुण

रामस्य रणकोविद ११ इति तस्य ब्रुवाणस्य सूर्यवर्णं महारथम् । सदश्वैः शबलैर्युक्तमाचचक्षेथ दूषणः १२ तं मेरुशिखराकारं तप्तकाञ्चनभूषणम् । हेमचक्रमसंबाधं वैदूर्यमयकूबरम् १३ मत्स्यैः पुष्पैर्द्रुमैः शैलैश्चन्द्रकान्तैश्च काञ्चनैः । माङ्गल्यैः पक्षिसङ्घैश्च ताराभिश्च समावृतम् १४ ध्वजनिस्त्रिंशसंपन्नं किंकिणीवरभूषितम् । सदश्वयुक्तं सोमर्षादारुरोह खरस्तदा १५ खरस्तु तन्महत्सैन्यं रथचर्मायुधध्वजम् । निर्यातेत्यब्रवीत्प्रेक्ष्य दूषणः सर्वराक्षसान् १६ ततस्तद्राक्षसं सैन्यं घोरचर्मायुधध्वजम् । निर्जगाम जनस्थानान्महानादं महाजवम् १७ मुद्गरैः पट्टिशैः शूलैः सुतीक्ष्णैश्च परश्वधैः । खड्गैश्चक्रै रथस्थैश्च भ्राजमानैः सतोमरैः १८ शक्तिभिः परिघैर्घोरैरतिमात्रैश्च कार्मुकैः । गदासिमुसलैर्वज्रैर्गृहीतैर्भीमदर्शनैः १९ राक्षसानां सुघोराणां सहस्राणि चतुर्दश । निर्यातानि जनस्थानात्खरचित्तानुवर्तिनाम् २० तांस्तु निर्धावतो दृष्ट्वा राक्षसान्भीमदर्शनान् । खरस्याथ रथः किंचिज्ज-

---

सेनापते, महात्म्या पौलस्त्य राक्षसांचा अग्रेसर होऊन मी त्या उद्धट रामाचा वध करण्याकरितां येथून जाण्याची इच्छा करीत आहें " ११. ह्याप्रमाणें तो खर बोलत असतांनाच सूर्यवर्ण महारथ चित्रविचित्र वर्णांनीं युक्त असलेले उत्तम अश्व जोडून तयार असल्याचें त्याला दूषणानें सांगितलें १२. तेव्हां मेरुपर्वताच्या शिखरासारिखा आकार, उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें, सुवर्णाचीं चक्रें आणि वैडूर्य रत्नाच्या दांड्या ह्यांनीं युक्त, मंगलकारक व पीतवर्ण मत्स्य, पुष्पें, वृक्षांचे म्हाळे, पाषाणमय चंद्रकांत, पक्षीगण व तारे यांनीं व्याप्त, ध्वज आणि खड्ग ह्यांनीं युक्त, लहान लहान घंटांनीं भूषित आणि उत्कृष्ट अश्व जोडिलेल्या त्या विशाल रथावर तो खर रागारागानें आरूढ झाला १३,१४,१५ आणि रथ, ढाली, आयुधें व ध्वज ह्यांनीं युक्त असलेल्या त्या प्रचंड सैन्याला व सर्व राक्षसांना अवलोकन करून खरानें व दूषणानें त्यांना " चला " असें सांगितलें १६. तदनंतर भयंकर ढाली, आयुधें व ध्वज घेऊन तें राक्षसांचें सैन्य प्रचंड गर्जना करीत करीत मोठ्या वेगानें जनस्थानांतून बाहेर निघालें १७. मुद्गल, पट्टे, शूल, अतिशय तीक्ष्ण धारेचे फरश, खड्ग, चक्र, रथावर असलेलें उज्ज्वल तोमर १८, शक्ति, घोर परिघ, प्रचंड धनुष्यें, गदा, तलवारी, मुसलें आणि दिसण्यांतही भयंकर अशीं हातांत घेतलेलीं वज्रायुधें बरोबर घेऊन १९ खराच्या इच्छेप्रमाणें वागणारे अत्यंत घोर असे चवदा हजार राक्षस जनस्थानांतून बाहेर पडले २० व दिसण्यांत भयंकर असलेले ते राक्षस वेगानें जाऊं लागले आहेत असें अवलोकन केल्यावर खराचा रथही, सर्व सेना निघाली किंवा नाहीं हें कांहींवेळ पाहून,

गाम तदनन्तरम् २१ ततस्तांच्छबलानश्वांस्तप्तकाञ्चनभूषितान्। खरस्य मतमाज्ञाय सारथिः पर्यचोदयत् २२ संचोदितो रथः शीघ्रं खरस्य रिपुघातिनः। शब्देनापूरयामास दिशः सप्रदिशस्तथा २३ प्रवृद्धमन्युस्तु खरः खरस्वरो रिपोर्वधार्थं त्वरितो यथान्तकः। अचूचुदत्सारथिमुन्नदन्पुनर्महाबलो मेघ इवाश्मवर्षवान्२४[ ९९४ ]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥ २२ ॥

तत्प्रयातं बलं घोरमशिवं शोणितोदकम्। अभ्यवर्षन्महाघोरस्तुमुलो गर्दभारुणः १ निपेतुस्तुरगास्तस्य रथयुक्ता महाजवाः। समे पुष्पचिते देशे राजमार्गे यदृच्छया २ श्यामं रुधिरपर्यन्तं बभूव परिवेषणम्। अलातचक्रप्रतिमं प्रतिगृह्य दिवाकरम् ३ ततो ध्वजमुपागम्य हेमदण्डं समुच्छ्रितम्। समाक्रम्य महाकायस्तस्थौ गृध्रः सुदारुणः ४ जनस्थानसमीपे च समाक्रम्य खरस्वनाः। विस्वरान्विविधान्नादान्मांसादान्मृगपक्षिणः ५ व्याजह्रुरभिदीप्तायां दिशि वै भैरवस्वनम्। अशिवं यातुधानानां शिवा घोरा

---

चालूं लागला २१. सारांश, चालू लागण्याविषयीं खराचा अभिप्राय समजून आल्यावर सारथ्यानें ते उत्कृष्ट सुवर्णांनीं भूषित झालेले चित्रविचित्र अश्व हांकिले २२. तेव्हां शत्रूचा घात करणाऱ्या खराचा रथ सत्वर हांकला असतां तो ध्वनीनें दिशा व उपदिशा भरून काढूं लागला २३. कर्कश स्वरानें युक्त असलेला तो महाबलाढ्य खर मृत्यूप्रमाणें अत्यंत क्रुद्ध होऊन शत्रूच्या वधाकरितां सत्वर निघाला आणि पाषाणवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें उच्चस्वरानें गर्जना करीत करीत ( त्वरा करण्याविषयीं ) सारथ्याला सांगूं लागला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

तें घोर सैन्य चालूं लागल्यानंतर गर्दभासारिख्या धूसरवर्णानें युक्त अशा तुमुल ध्वनि करणाऱ्या महाभयंकर मेघानें अमंगल सूचक रक्तमिश्र उदकाची वृष्टि त्या सैन्यावर केली १. पुष्पयुक्त व सपाट प्रदेशावरील राजमार्गानें जातां जातांच रथाला जोडिलेले त्या खराचे ते महावेगवान् अश्व आपोआप खालीं पडले २. रक्तवर्ण सीमेनें युक्त असे एक अलातचक्रासारिखें श्यामवर्ण कडें सूर्याला व्यापून त्याच्या भोंवतालीं पडलें ३. तदनंतर एक महाभयंकर व धिप्पाड गृध्र पक्षी सुवर्ण दंडानें युक्त असलेल्या उन्नतध्वजाजवळ आला आणि त्याच्यावर बसला ४. जनस्थानासमीप जे राक्षस अवशिष्ट राहिले होते त्यांच्याजवळ कर्कश ध्वनि करणारे पशुपक्षी गेले आणि नानाप्रकारचे भेसुर शब्द करूं लागले ५. प्रदीप्त झाल्याप्रमाणें दिसत असलेल्या दिशेमध्यें घोर व मोठमो-

महास्वनाः ६ प्रभिन्नगजसंकाशास्तोयशोणितधारिणः । आकाशं तदनाकाशं चक्रुर्भीमाम्बुवाहकाः ७ बभूव तिमिरं घोरमुद्धतं रोमहर्षणम् । दिशो वा प्रदिशो वापि सुव्यक्तं न चकाशिरे ८ क्षतजार्द्रसवर्णाभा संध्या कालं विना बभौ । खरं चाभिमुखं नेदुस्तदा घोरा मृगाः खगाः ९ कङ्कगोमायुगृध्राश्च चक्रुशुर्भयशंसिनः । नित्याशिवंकरा युद्धे शिवा घोरनिदर्शनाः १० नेदुर्बलस्याभिमुखं ज्वालोद्गारिभिराननैः । कबन्धः परिघाभासो दृश्यते भास्करान्तिके ११ जग्राह सूर्यं स्वर्भानुरपर्वणि महाग्रहः । प्रवाति मारुतः शीघ्रं निष्प्रभोऽभूद्दिवाकरः १२ उत्पेतुश्च विना रात्रिं ताराः खद्योतसप्रभाः । संलीनमीनविहगा नलिन्यः शुष्कपङ्कजाः १३ तस्मिन्क्षणे बभूवुश्च विना पुष्पफलैर्द्रुमाः । उद्धूतश्च विना वातं रेणुर्जलधरारुणः १४ चीचीकूचीति वाश्यन्तो बभूवुस्तत्र सारिकाः । उल्काश्चापि सनिर्घोषा निपेतुर्घोरदर्शनाः ॥ प्रचचाल मही चापि सशैलवन-

---

ठ्यानें ओरडणारीं कोल्हीं राक्षसांना अशुभकारक असा भयंकर ध्वनि करूं लागलीं ६. गंडस्थलांतून मदाचा प्रवाह चाललेल्या गजाप्रमाणें उदक व रक्त ह्यांची वृष्टि करणाऱ्या घोर मेघांनीं आकाश प्रकाशरहित करून टाकिलें ७. अंगावर कांटा आणणारा भयंकर निबिड अंधकार पडला आणि दिशा अथवा उपदिशा स्पष्टपणें मुळींच प्रकाशेनाशा झाल्या ८. योग्य काल प्राप्त झाल्यावांचूनच रक्तानें भिजलेल्या वस्त्राप्रमाणें मेघांचे ठिकाणीं संध्या दिसूं लागली आणि घोर पशू व पक्षी खराकडे तोंड करून ओरडूं लागले ९. भयसूचक कंकपक्षी, कोल्हे व गृध्रपक्षी आक्रोश करूं लागले आणि युद्धामध्यें नेहमीं अशुभ सुचविणाऱ्या भयप्रदर्शक शिवा १० ज्यांच्यांतून ज्वाला बाहेर निघत आहेत अशा मुखांनीं सैन्याच्या पुढें ओरडूं लागल्या. सूर्यापाशीं परिघाप्रमाणें एक धूमकेतु दिसूं लागला ११. त्या दिवशीं ( अमावास्या ) पर्व नसतांनाच महाग्रह राहूनें सूर्याला ग्रासिलें, वारा वेगानें वाहूं लागला आणि सूर्य निस्तेज झाला १२. रात्र पडल्यावांचूनच काजव्यासारिख्या तारा आकाशांत उगवूं लागल्या आणि सरोवरांतील कमलें शुष्क होऊन आंतील मत्स्य व तीरावरील वृक्ष लपून बसले १३. वृक्ष तत्क्षणीं पुष्परहित व फलरहित झाले आणि मेघाप्रमाणें धूसरवर्ण धूळ वाऱ्यावांचून उडूं लागली १४. चीची, कूची अशा प्रकारचा शब्द सारिका करूं लागल्या, निर्घोष ध्वनीसहवर्तमान भयसूचक उल्कापात होऊं लागले आणि पर्वत, वृक्षसमुदाय व अरण्यें ह्यांसहवर्तमान पृथ्वी हलूं लागली १५. रथांत बसून गर्जना करीत असलेल्या बुद्धिमान् खर राक्षसाचा डावा हात स्फुरण पावूं लागला,

कानना १५ खरस्य च रथस्थस्य नर्दमानस्य धीमतः। प्राकम्पत भुजः
सव्यः स्वरश्चास्यावसज्जत १६ सास्रा संपद्यते दृष्टिः पश्यमानस्य सर्वतः।
ललाटे च रुजो जाता न च मोहाव्यवर्तत १७ तान्समीक्ष्य महोत्पातानुत्थि-
तान्रोमहर्षणान्। अब्रवीद्राक्षसान्सर्वान्प्रहसन्स खरस्तदा १८ महोत्पा-
तानिमान्सर्वानुत्थितान्घोरदर्शनान् । न चिन्तयाम्यहं वीर्याद्बलवान्दु-
र्बलानिव १९ तारा अपि शरैस्तीक्ष्णैः पातयेयं नभस्तलात्। मृत्युं मरण-
धर्मेण संक्रुद्धो योजयाम्यहम् २० राघवं तं बलोत्सिक्तं भ्रातरं चापि
लक्ष्मणम्। अहत्वा सायकैस्तीक्ष्णैर्नोपावर्तितुमुत्सहे २१ यन्निमित्तं तु
रामस्य लक्ष्मणस्य विपर्ययः। सकामा भगिनी मेऽस्तु पीत्वा तु
रुधिरं तयोः २२ न क्वचित्प्राप्तपूर्वो मे संयुगेषु पराजयः। युष्माकमे-
तत्प्रत्यक्षं नानृतं कथयाम्यहम् २३ देवराजमपि क्रुद्धो मत्तैरावतगामिनम्।
वज्रहस्तं रणे हन्यां किं पुनस्तौ च मानवौ २४ सा तस्य गर्जितं श्रुत्वा
राक्षसानां महाचमूः। प्रहर्षमतुलं लेभे मृत्युपाशावपाशिता २५ समे-

---

शब्द खोल जाऊं लागला १६, तो कोणीकडेही पाहूं लागला असतां त्याच्या डोळ्यांतून अश्रु येऊं लागले व कपाळामध्यें वेदना उत्पन्न झाल्या. तथापि, तो मोहामुळें परत फिरला नाहीं १७. इतकेंच नव्हे परंतु, अंगावर रोमांच उठविणारे ते मोठाले उत्पात अवलोकन करून तो खर त्या सर्व राक्षसांना हंसत हंसत ह्मणाला १८ "ह्या सर्व उद्भवलेल्या मोठ्या भयसूचक उत्पातांना, दुर्बलांना न जुमानणाऱ्या बलवानाप्रमाणें, मी जुमानीत नाहीं १९. कारण, मी क्रुद्ध झालों असतां तीक्ष्ण बाणांच्या योगानें आकाशापासून ताराही खालीं पाडीन आणि मृत्यूलाही मारून टाकीन २०. बलानें गर्विष्ठ झालेल्या त्या रामाचा आणि त्याच्या लक्ष्मण भ्रात्याचा तीक्ष्ण बाणांनीं वध केल्यावांचून परत फिरण्याची माझी इच्छा नाहीं २१. जिच्याकरितां रामाचे ठिकाणीं व लक्ष्मणाचे ठिकाणीं (क्रूर बुद्धिरूप) विपर्यास दृष्टीस पडत आहे ती माझी भगिनी आज त्यांचें रक्त पिऊन कृतकृत्य होवो २२. आजपर्यंत संग्रामामध्यें माझा कधींही पराजय झालेला नाहीं हें तुह्माला प्रत्यक्ष विदितच आहे; मी कांहीं असत्य भाषण करीत नाहीं २३. मी क्रुद्ध झालों असतां मत्त ऐरावत गजावर आरूढ होऊन जाणाऱ्या वज्रपाणी देवराज इंद्राचाही संग्रामामध्यें वध करीन; मग त्या मानवांची कथा काय ?" २४. ही त्याची गर्जना ऐकून राक्षसांच्या त्या मृत्युपाशानें जखडलेल्या मोठ्या सेनेला अनुपम हर्ष झाला २५. युद्ध पहाण्याच्या इच्छेनें महात्मे ऋषि, देव, गंधर्व, सिद्ध आणि चारण एकत्र जळून तेथें

युश्च महात्मानो युद्धदर्शनकाङ्क्षिणः । ऋषयो देवगन्धर्वाः सिद्धाश्च
सह चारणैः २६ समेत्य चोचुः सहितास्तेऽन्योन्यं पुण्यकर्मणः । स्वस्ति
गोब्राह्मणेभ्यस्तु लोकानां ये च संमताः २७ जयतां राघवो युद्धे पौल-
स्त्यान्रजनीचरान् । चक्रहस्तो यथा विष्णुः सर्वानसुरसत्तमान् २८ एत-
च्चान्यच्च बहुशो ब्रुवाणाः परमर्षयः । जातकौतूहलास्तत्र विमानस्थाश्च
देवताः २९ ददृशुर्वाहिनीं तेषां राक्षसानां गतायुषाम् । रथेन तु खरो
वेगात्सैन्यस्याग्राद्विनिःसृतः ३० श्येनगामी पृथुग्रीवो यज्ञशत्रुर्विहङ्गमः ।
दुर्जयः करवीराक्षः परुषः कालकार्मुकः ३१ हेममाली महामाली सर्पास्यो
रुधिराशनः । द्वादशैते महावीर्याः प्रतस्थुरभितः खरम् ३२ महाकपालः
स्थूलाक्षः प्रमाथस्त्रिशिरास्तथा । चत्वार एते सेनाग्रे दूषणं पृष्ठतोऽन्वयुः ३३
सा भीमवेगा समराभिकाङ्क्षिणी सुदारुणा राक्षसवीरसेना । तौ राज-
पुत्रौ सहसाभ्युपेता माला ग्रहाणामिव चन्द्रसूर्यौ ३४ [ १०२८ ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥
आश्रमं प्रतियाते तु खरे खरपराक्रमे । तानेवौत्पातिकान्रामः सह

---

आले २६ आणि एकत्र जुळून आल्यावर ते पुण्यकर्म करणारे ऋषि वगैरे एकमेकाला म्हणाले " लोकांना संमत असलेल्या गोब्राह्मणांचें कल्याण असो २७ आणि चक्रपाणी विष्णु ज्याप्रमाणें सर्व असुरश्रेष्ठांचा पराजय करितो त्याप्रमाणें राम युद्धामध्यें पौलस्त्य राक्षसांचा पराजय करो " २८. हें व अशाच प्रकारचें भाषण अनेक प्रकारांनीं महर्षि करूं लागले आणि युद्ध पहाण्याची उत्कंठा उत्पन्न झाल्यामुळें देवही विमानांत बसून तेथें आले २९ व त्यांनीं आयुष्य संपलेल्या त्या राक्षसांची सेना अवलोकन केली. खर तर रथांत बसून वेगानें सैन्याच्या पुढें चालला होता आणि श्येनगामी, पृथुग्रीव, यज्ञशत्रु, विहंगम, दुर्जय, करवीराक्ष, परुष, कालकार्मुक ३०, ३१, हेममाली, महामाली, सर्पास्य व रुधिराशन हे महावीर्यवान् बारा अमात्य खराच्या भोंवतालीं राहून जाऊं लागले ३२; महाकपाल, स्थूलाक्ष, प्रमाथ व त्रिशिरा असे चौघे सेनेच्या पुढें दूषणाच्या मागून चालले ३३ आणि ग्रहमाला ज्याप्रमाणें सूर्य चंद्रासमीप जाते त्याप्रमाणें भयंकर वेगानें युक्त असलेली व संग्रामाची इच्छा करणारी ती अत्यंत भयंकर राक्षसवीरांची सेना एकदम त्या राजपुत्रांसमीप गेली ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

भयंकर पराक्रमी खर रामाच्या आश्रमाला निघाल्यावर तेच उत्पात भ्रात्यासह-

भ्रात्रा ददर्श ह १ तानुत्पातान्महाघोरान्रामो दृष्ट्वात्यमर्षणः। प्रजानाम-
हितान्दृष्ट्वा वाक्यं लक्ष्मणमब्रवीत् २ इमान्पश्य महाबाहो सर्वभूताप-
हारिणः। समुत्थितान्महोत्पातान्संहर्तुं सर्वराक्षसान् ३ अमी रुधिरधा-
रास्तु विसृजन्ते खरस्वनाः। व्योम्नि मेघा विवर्तन्ते परुषा गर्दभारुणाः ४
सधूमाश्च शराः सर्वे मम युद्धाभिनन्दिताः। रुक्मपृष्ठानि चापानि
विचेष्टन्ते विचक्षण ५ यादृशा इह कूजन्ति पक्षिणो वनचारिणः। अग्रतो
नोभयं प्राप्तं संशयो जीवितस्य च ६ संप्रहारस्तु सुमहान्भविष्यति न
संशयः। अयमाख्याति मे बाहुः स्फुरमाणो मुहुर्मुहुः ७ संनिकर्षे तु नः
शूर जयं शत्रोः पराजयम्। सुप्रभं च प्रसन्नं च तव वक्त्रं हि लक्ष्यते ८
उद्यतानां हि युद्धार्थं येषां भवति लक्ष्मण। निष्प्रभं वदनं तेषां भवत्यायुःपरि-
क्षयः ९ रक्षसां नर्दतां घोषः श्रूयतेयं महाध्वनिः। आहतानां च भेरीणां
राक्षसैः क्रूरकर्मभिः १० अनागतविधानं तु कर्तव्यं शुभमिच्छता। आपदा-
शङ्कमानेन पुरुषेण विपश्चिता ११ तस्माद्गृहीत्वा वैदेहीं शरपाणिर्धनुर्धरः।

---

वर्तमान रामानें अवलोकन केले १ आणि प्रजांना अहितकारक असे ते महाभयंकर उत्पात अवलोकन करून रामाचें चित्त अतिशय अस्वस्थ झालें आणि तो लक्ष्मणाला ह्मणाला २ " हे महापराक्रमी लक्ष्मणा, सर्व प्राण्यांचा संहार सुचविणारे जे हे मोठे उत्पात राक्षसांचा संहार करण्याकरितां उद्भवले आहेत ते तूं अवलोकन कर ३. भयंकर गर्जना करणारे, गर्दभाप्रमाणें धूसर वर्णानें युक्त असलेले आणि रक्ताचा वर्षाव करणारे हे घोर मेघ आकाशामध्यें फिरत आहेत ४. माझे सर्व बाण धूमयुक्त झाले असल्यामुळें युद्धाकरितां आनंदित झाल्यासारिखे दिसत आहेत आणि, हे चतुर लक्ष्मणा, सुवर्णभूषित पृष्ठभागांनीं युक्त असलेलीं धनुष्येंही स्फुरण पावत आहेत ५. अशा प्रकारचे हे वनचर पक्षी येथें आपल्यापुढें शब्द करीत आहेत यावरून आपणाला अभय असून आपल्या शत्रूंना जीविताचें भय प्राप्त होणार आहे ६. संहार तर मोठाच होईल ह्यांत संशय नाहीं. हा माझा वारंवार स्फुरण पावूं लागलेला दक्षिण बाहु, हे शूरा लक्ष्मणा, लवकरच आपला जय व शत्रूचा पराजय होणार असल्याचें सुचवीत आहे आणि तुझें मुखही सतेज व प्रसन्न दिसत आहे ७,८. हे लक्ष्मणा, युद्धाला उद्युक्त झालेल्या ज्या पुरुषांचें मुख निस्तेज होतें त्यांच्या आयुष्याचा क्षय होत असतो ९. गर्जना करीत असलेल्या राक्षसांचा आणि क्रूरकर्मी राक्षसांनीं वाजविलेल्या दुंदुभींचा हा महाध्वनि ऐकूं येत आहे १०. असो. संकटाची शंका आलेल्या दूरदर्शी कल्याणेच्छु पुरुषानें भावी अनर्थ टाळण्याचा उपाय अवश्य करावा ११. तस्मात्, धनुष्य धारण करून

गुहामाश्रय शैलस्य दुर्गां पादपसंकुलाम् १२ प्रतिकूलितुमिच्छामि न हि वाक्यमिदं त्वया। शापितो मम पादाभ्यां गम्यतां वत्स मा चिरम् १३ त्वं हि शूरश्च बलवान्हन्या एतान्न संशयः। स्वयं निहन्तुमिच्छामि सर्वानेव निशाचरान् १४ एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः सह सीतया। शरानादाय चापं च गुहां दुर्गां समाश्रयत् १५ तस्मिन्प्रविष्टे तु गुहां लक्ष्मणे सह सीतया। हन्त निर्युक्तमित्युक्त्वा रामः कवचमाविशत् १६ स तेनाग्निनिकाशेन कवचेन विभूषितः। बभूव रामस्तिमिरे महानग्निरिवोत्थितः १७ स चापमुद्यम्य महच्छरानादाय वीर्यवान्। संबभूवास्थितस्तत्र ज्यास्वनैः पूरयन्दिशः १८ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च सह चारणैः। समेयुश्च महात्मानो युद्धदर्शनकाङ्क्षया १९ ऋषयश्च महात्मानो लोके ब्रह्मर्षिसत्तमाः। समेत्य चोचुः सहितास्तेऽन्योन्यं पुण्यकर्मणः २० स्वस्ति गोब्राह्मणानां च लोकानां चेति संस्थिताः। जयतां राघवो युद्धे पौलस्त्यान्रजनीचरान् २१ चक्रहस्तो यथा युद्धे सर्वानसुरपुङ्गवान्। एवमुक्त्वा

---

हातांत बाण घे आणि सीतेला घेऊन वृक्षांनीं गजबजलेल्या अशा एकाद्या पर्वताच्या गहन गुहेचा आश्रय कर १२. माझ्या ह्या सांगण्याचे विरुद्ध तूं वागावेंस अशी माझी इच्छा नाहीं. माझ्या पायांची तुला शपथ आहे; हे वत्सा, तूं सीतेला घेऊन जा; विलंब लावूं नकोस १३. तूं शूर व बलवान् आहेस आणि ह्मणूनच तूं ह्यांचा वध करशील ह्यांत संशय नाहीं; परंतु, ह्या सर्वेही राक्षसांचा स्वतःच वध करण्याची माझी इच्छा आहे " १४. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां धनुर्बाण घेऊन लक्ष्मणानें सीतेसहवर्तमान पर्वताच्या एका गहन गुहेचा आश्रय केला १५. लक्ष्मण सीतेसहवर्तमान गुहेमध्यें प्रविष्ट झाल्यावर " आपण ह्मटलेलें सत्वर सिद्धीस गेलें " असें ह्मणून रामानें कवच चढविलें १६ व त्या अग्नीसारख्या तेजस्वी कवचानें भूषित झालेला तो राम अंधकारामध्यें उत्पन्न झालेल्या मोठ्या अग्नीप्रमाणें दिसूं लागला १७. नंतर प्रचंड धनुष्य उचलून धरून आणि बाण हातांत घेऊन प्रत्यंचेच्या टणत्कारांनीं दिशा दणाणून टाकीत टाकीत तो वीर्यवान् राम तेथें उभा राहिला असतां १८ युद्ध पहाण्याच्या इच्छेनें महात्मे देव गंधर्वांसहवर्तमान आणि सिद्ध चारणांसहवर्तमान तेथें आले १९ व त्रैलोक्यामध्येंही श्रेष्ठ, ब्रह्मर्षि ह्मणून प्रसिद्ध असलेले व पुण्यकर्म करणारे ऋषि एकत्र जुळून तेथें आले आणि एकमेकाला ह्मणाले २० " गोब्राह्मणांचें आणि तशाच प्रकारच्या लोकांचें कल्याण व्हावें ह्या इच्छेनें आपण येथें जुळलों आहोंत. करितां, चक्रपाणि विष्णु ज्याप्रमाणें सर्व असुरश्रेष्ठांचा पराजय करितो त्याप्रमाणें युद्धा-

पुनः प्रोचुरालोक्य च परस्परम् २२ चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । एकश्च रामो धर्मात्मा कथं युद्धं भविष्यति २३ इति राजर्षयः सिद्धाः सगणाश्च द्विजर्षभाः । जातकौतूहलास्तस्थुर्विमानस्थाश्च देवताः २४ आविष्टं तेजसा रामं सङ्ग्रामशिरसि स्थितम् । दृष्ट्वा सर्वाणि भूतानि भयाद्विव्यथिरे तदा २५ रूपमप्रतिमं तस्य रामस्याक्लिष्टकर्मणः । बभूव रूपं क्रुद्धस्य रुद्रस्येव महात्मनः २६ इति संभाष्यमाणे तु देवगन्धर्वचारणैः । ततो गम्भीरनिर्ह्रादं घोरचर्मायुधध्वजम् २७ अनीकं यातुधानानां समन्तात्प्रत्यपद्यत । वीरालापान्विसृजतामन्योन्यमभिगच्छताम् २८ चापानि विस्फारयतां जृम्भतां चाप्यभीक्ष्णशः । विप्रघुष्टस्वनानां च दुन्दुभींश्चाभिनिघ्नताम् २९ तेषां सुविपुलः शब्दः पूरयामास तद्वनम् ३० तेन शब्देन वित्रस्ताश्त्रासिता वनचारिणः । दुद्रुवुर्यत्र निःशब्दं पृष्ठतो नावलोकयन् ३१ तच्चानीकं महावेगं रामं समनुवर्तत । धृतनानाप्रहरणं गम्भीरं सागरोपमम् ३२ रामोऽपि चारयंश्चक्षुः सर्वतो रणप-

---

मध्यें राम पौलस्त्य राक्षसांचा पराजय करो ". ह्याप्रमाणें बोलणें झाल्यावर एकमेकांकडे पाहून ते पुन्हां ह्मणाले २१, २२ " एकीकडें क्रूर कर्म करणारे चवदा हजार राक्षस आहेत आणि एकीकडे धर्मात्मा राम एकटा आहे; तेव्हां ह्यांचें युद्ध होईल तरी कसें ! " २३. ह्याप्रमाणें युद्ध पहाण्याची उत्कंठा उत्पन्न झालेले राजर्षि, चारणांसहवर्तमान सिद्ध द्विजश्रेष्ठ आणि देव विमानांमध्यें आरूढ होऊन तेथें उभे राहिले २४. तेजानें व्याप्त झालेल्या रामाला संग्रामामध्यें स्थित असलेला अवलोकन करून सर्व भूतें भयभीत झालीं २५. कारण, अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या महात्म्या रामाचें अप्रतिम रूप क्रुद्ध झालेल्या रुद्राच्या रूपाप्रमाणें दिसत होतें २६. वर सांगितल्याप्रमाणें देव, गंधर्व आणि चारण ह्यांचें बोलणें चाललें असतां गंभीर गर्जना करीत करीत भयंकर ढाली, आयुधें आणि ध्वज घेतलेलें २७ राक्षसांचें सैन्य चोहोंकडून तेथें येऊन ठेपलें. ते राक्षस वीराला योग्य अशीं संभाषणें करूं लागले असतां, एकमेकांकडे जाऊं लागले असतां २८, धनुष्यें ओढूं लागले असतां, वारंवार जांभया देऊं लागले असतां, अतिशय घोष करूं लागले असतां आणि दुंदुभि वाजवूं लागले असतां २९, त्यांच्या त्या अति प्रचंड ध्वनीनें तें वन भरून काढिले ३०. ( चवदा राक्षसांशीं झालेल्या संग्रामामुळें आधींच ) त्रस्त झालेले वनचर प्राणी त्या ध्वनीनें अधिकच त्रस्त झाले आणि ( भीतीमुळें ) मागें न पहातां जिकडे शब्द निघत नव्हता तिकडे धांवले ३१ व इतक्यांत नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेलें तें साग-

ण्डितः । ददर्श खरसैन्यं तद्युद्धायाभिमुखो गतः ३३ वितत्य च धनुर्भीमं तूण्याश्चोद्धृत्य सायकान् । क्रोधमाहारयत्तीव्रं वधार्थं सर्वरक्षसाम् ३४ दुष्प्रेक्ष्यश्चाभवत्क्रुद्धो युगान्ताग्निरिव ज्वलन् । तं दृष्ट्वा तेजसाविष्टं प्राव्यथन्वनदेवताः ३५ तस्य रुष्टस्य रूपं तु रामस्य ददृशे तदा । दक्षस्येव क्रतुं हन्तुमुद्यतस्य पिनाकिनः ३६ तत्कार्मुकैराभरणै रथैश्च तद्वर्मभिश्चाग्निसमानवर्णैः । बभूव सैन्यं पिशिताशनानां सूर्योदये नीलमिवाभ्रजालम् ३७ [१०६५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥२४॥

अवष्टब्धधनुं रामं क्रुद्धं तं रिपुघातिनम् । ददर्शाश्रममागम्य खरः सह पुरःसरैः १ तं दृष्ट्वा सगुणं चापमुद्यम्य खरनिःस्वनम् । रामस्याभिमुखं सूतं चोद्यतामित्यचोदयत् २ स खरस्याज्ञया सूतस्तुरगान्समचोदयत् । यत्र रामो महाबाहुरेको धुन्वन्धनुः स्थितः ३ तं तु निष्पतितं दृष्ट्वा सर्वतो

---

रासारिखें अगाध व महावेगवान् राक्षससैन्य रामाकडे वळलें ३२. तेव्हां तो संग्रामनिपुण राम चोहोंकडे दृष्टि देऊं लागला असतां तें खरसैन्य त्याच्या दृष्टीं पडलें आणि तें दृष्टीं पडल्यावर युद्ध करण्याकरितां तो त्या सैन्याच्या संमुख गेला ३३. राक्षसांसमोर गेल्यानंतर भयंकर धनुष्य ओढून आणि भात्यांतून बाण काढून सर्व राक्षसांच्या वधाकरितां रामानें प्रचंड क्रोध आणिला असतां ३४ युगांतकालीं प्रज्वलित झालेल्या अग्नीप्रमाणें त्या क्रुद्ध रामाकडे पहाणेंही अशक्य झालें आणि तेजानें व्याप्त झालेल्या त्या रामाला अवलोकन करून वनदेवताही भयभीत झाल्या ३५. कारण, दक्षयज्ञाचा विध्वंस करण्याकरितां उद्युक्त झालेल्या पिनाकपाणि रुद्राप्रमाणें रुष्ट झालेल्या त्या रामाचें रूप दिसूं लागलें होतें ३६. असो. (इकडे रामानें ह्याप्रमाणें क्रुद्ध मुद्रा धारण केली असतां) धनुष्यें, भूषणें, रथ आणि तीं अग्नितुल्य तेजस्वी कवचें ह्यांच्या योगानें तें राक्षसांचें सैन्य, सूर्योदयसमयीं दिसणाऱ्या नीलवर्ण मेघसमुदायाप्रमाणें दिसूं लागलें ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

सेनानायकांसहवर्तमान खरराक्षस रामाच्या आश्रमाला आल्यानंतर धनुष्याचें अवलंबन करून असलेल्या त्या क्रुद्ध व शत्रुघातक रामाला त्यानें अवलोकन केलें १ आणि त्याला अवलोकन करितांक्षणीं भयंकर ध्वनीनें युक्त असलेलें आपलें प्रत्यंचा चढविलेलें धनुष्य उचलून घेऊन "रामाचे संमुख रथ हांक" ह्मणून खरानें सारथ्याला सांगितलें २. तेव्हां महापराक्रमी राम एकटा धनुष्य हालवीत बसला होता तिकडे त्या सारथ्यानें खराच्या

रजनीचराः । मुञ्चमाना महानादं सचिवाः पर्यवारयन् ४ स तेषां यातु-
धानानां मध्ये रथगतः खरः । बभूव मध्ये ताराणां लोहिताङ्ग इवोद्धतः ५
ततः शरसहस्रेण राममप्रतिमौजसम् । अर्दयित्वा महानादं ननाद समरे
खरः ६ ततस्तं भीमधन्वानं क्रुद्धाः सर्वे निशाचराः । रामं नानाविधैः
शस्त्रैरभ्यवर्षन्त दुर्जयम् ७ मुद्गरैरायसैः शूलैः प्रासैः खड्गैः परश्वधैः ।
राक्षसाः समरे शूरं निजघ्नू रोषतत्पराः ८ ते बलाहकसंकाशा महाकाया
महाबलाः । अभ्यधावन्त काकुत्स्थं रथैर्वाजिभिरेव च ९ गजैः पर्वतकू-
टाभै रामं युद्धे जिघांसवः । ते रामे शरवर्षाणि व्यसृजन्रक्षसां गणाः १०
शैलेन्द्रमिव धाराभिर्वर्षमाणा महाघनाः । सर्वैः परिवृतो रामो राक्षसैः
क्रूरदर्शनैः ११ तिथिष्विव महादेवो वृतः पारिषदां गणैः । तानि मुक्तानि
शस्त्राणि यातुधानैः स राघवः १२ प्रतिजग्राह विशिखैर्नद्योघानिव सागरः ।
स तैः प्रहरणैर्घोरैर्भिन्नगात्रो न विव्यथे १३ रामः प्रदीप्तैर्बहुभिर्वज्रैरिव
महाचलः । स विद्धः क्षतजादिग्धः सर्वगात्रेषु राघवः १४ बभूव रामः

---

आज्ञेनें घोडे हांकिले ३ व तो खर पुढें सरसावलेला पाहून त्याचे सर्वही राक्षसमंत्री मोठी गर्जना करीत करीत त्याच्या सभोंवतीं चालूं आगले ४ आणि ह्याप्रमाणें रथावर आरूढ झालेला तो खर नक्षत्रांमध्यें असलेल्या क्रूर मंगळाप्रमाणें त्या राक्षसांमध्यें दिसूं लागला ५. तदनंतर अतुलसामर्थ्यवान् रामाला सहस्र बाणांनीं पीडित करून संग्रामामध्यें त्या खरानें मोठी गर्जना केली ६ व नंतर उग्र धनुष्य धारण करणाऱ्या त्या अजिंक्य रामावर सर्व राक्षसांनीं क्रुद्ध होऊन नानाप्रकारच्या शस्त्रांचा वर्षाव केला ७. लोहमय मुद्गल, शूल, भाले, खड्ग आणि फरश ह्या आयुधांच्या योगानें क्रोधाविष्ट झालेल्या राक्षसांनीं संग्रामामध्यें शूर रामावर प्रहार केले ८; मेघाप्रमाणें धिप्पाड व महाबलाढ्य असलेले ते राक्षस रथ, अश्व व पर्वतशिखरासारिखे गज घेऊन रामावर धांवले ९. इतकेंच नव्हे परंतु, युद्धामध्यें रामाचा वध करण्याचा उद्देश धरिलेल्या त्या राक्षसगणांनीं जलधारांच्या योगानें हिमालय पर्वतावर वर्षाव करणाऱ्या महामेघाप्रमाणें रामावर बाणांचे वर्षाव केले. त्या वेळीं भयंकर मुद्रेनें युक्त असलेल्या सर्व राक्षसांनीं परिवेष्टित झालेला तो राम १०,११ प्रदोषदिवशीं पार्षदगणांनीं परिवेष्टित झालेल्या महादेवाप्रमाणें दिसला व सागर ज्याप्रमाणें नद्यांच्या प्रवाहांचा स्वीकार करितो त्याप्रमाणें त्या रामानें राक्षसांनीं सोडिलेल्या त्या शस्त्रांचा बाणांच्या योगानें स्वीकार केला; इतकेंच नव्हे परंतु उज्ज्वल असंख्य वज्रेंच कीं काय अशा त्या घोर शस्त्रांनीं त्या रामाचे अवयव फुटले असतांही महापर्वताप्रमाणें तो यत्किंचितूही डगमगला नाहीं. ह्याप्रमाणें शस्त्रांनीं

संध्याभ्रैर्दिवाकर इवावृतः । विषेदुर्देवगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः १५
एकं सहस्रैर्बहुभिस्तदा दृष्ट्वा समावृतम् । ततो रामस्तु संक्रुद्धो मण्डली-
कृतकार्मुकः १६ ससर्ज निशितान्बाणाञ्छतशोऽथ सहस्रशः । दुरावा-
रान्दुर्विषहान्कालपाशोपमान्रणे १७ मुमोच लीलया कङ्कपत्रान्काञ्चनभूष-
णान् । ते शराः शत्रुसैन्येषु मुक्ता रामेण लीलया १८ आददू रक्षसां
प्राणान्पाशाः कालकृता इव । भित्त्वा राक्षसदेहांस्तांस्ते शरा रुधिरा-
प्लुताः १९ अन्तरिक्षगता रेजुर्दीप्ताग्निसमतेजसः । असंख्येयास्तु रामस्य
सायकाश्चापमण्डलात् २० विनिष्पेतुरतीवोग्रा रक्षःप्राणापहारिणः । तैर्ध-
नूंषि ध्वजाग्राणि चर्माणि कवचानि च २१ बाहून्सहस्ताभरणानूरून्क-
रिकरोपमान् । चिच्छेद रामः समरे शतशोऽथ सहस्रशः २२ हयान्काञ्चन-
संनाहान्रथयुक्तान्ससारथीन्।गजांश्च सगजारोहान्सहयान्सादिनस्तदा २३
चिच्छिदुर्बिभिदुश्चैव रामबाणा गुणच्युताः । पदातीन्समरे हत्वा अनयद्य-
मसादनम् २४ ततो नालीकनाराचैस्तीक्ष्णाग्रैश्च विकर्णिभिः । भीममा-

---

विद्ध झाल्यामुळें सर्व शरीर रक्तानें माखलेला तो राम संध्याकाळच्या मेघांनीं व्याप्त झालेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला. असो. ह्याप्रमाणें हजारों राक्षसांनीं व्यापून टाकिलेल्या एकट्या रामाला अवलोकन करून देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षि खिन्न झाले; परंतु, राम अधीकच क्रुद्ध झाला आणि आपलें धनुष्य ( अतिशय आकर्षणानें ) मंडलाकार करून १२, १३, १४, १५, १६ कंकपक्ष्याच्या पिसांनीं युक्त, सुवर्णानें भूषित, दुःसह, अप्रतिहत आणि तीक्ष्ण असे शेंकडों हजारों बाण तो राक्षसांवर टाकूं लागला असतां शत्रुसैन्यावर रामानें सहज सोडिलेल्या त्या बाणांनीं कालानें सोडिलेल्या पाशाप्रमाणें राक्षसांचे प्राण हरण केले. राक्षसांचे देह फाडून गेल्यामुळें रक्तानें भरलेले ते बाण १७, १८; १९ अंतरिक्षामध्यें गेले असतां प्रदीप्त अग्निसारिखे तेजस्वी दिसूं लागले व ह्याप्रमाणें राक्षसांचे प्राण हरण करणारे अत्यंत उग्र बाण रामाच्या धनुर्मंडलापासून असंख्य सुटले आणि त्या बाणांच्या योगानें धनुष्यें, ध्वजांचीं अग्रें, ढाली, कवचें २०, २१, हस्तभूषणांसहवर्तमान हात, आणि गजशुंडेप्रमाणें असलेल्या शेंकडों हजारों मांड्या रामानें संग्रामामध्यें तोडून टाकिल्या २२. त्याचप्रमाणें सुवर्णाचें सामान घालून रथाला जोडिलेले सारथ्यासहवर्तमान अश्व, स्वारांसहवर्तमान गज आणि अश्वासहवर्तमान स्वार २३ प्रत्यंचेपासून सुटलेल्या रामाच्या बाणांनीं छिन्नभिन्न करून टाकिले आणि रामानें संग्रामामध्यें पदातींनाही मारून यमसदनाला पाठविलें २४. तदनंतर तीक्ष्ण

र्स्वरं चक्रुश्छिद्यमाना निशाचराः २५ तत्सैन्यं विविधैर्बाणैरर्दितं मर्मभेदिभिः । न रामेण सुखं लेभे शुष्कं वनमिवाग्निना २६ केचिद्भीमबलाः शूराः प्रासाञ्शूलान्परश्वधान् । चिक्षिपुः परमक्रुद्धा रामाय रजनीचराः २७ तेषां बाणैर्महाबाहुः शस्त्राण्यावार्य वीर्यवान् । जहार समरे प्राणांश्चिच्छेद च शिरोधरान् २८ ते छिन्नशिरसः पेतुश्छिन्नचर्मशरासनाः । सुपर्णवातविक्षिप्ता जगत्यां पादपा यथा २९ अवशिष्टाश्च ये तत्र विषण्णास्ते निशाचराः । खरमेवाभ्यधावन्त शरणार्थं शराहताः ३० तान्सर्वान्धनुरादाय समाश्वास्य च दूषणः । अभ्यधावत्सुसंक्रुद्धः क्रुद्धं क्रुद्ध इवान्तकः ३१ निवृत्तास्तु पुनः सर्वे दूषणाश्रयनिर्भयाः । राममेवाभ्यधावन्त सालतालशिलायुधाः ३२ शूलमुद्गरहस्ताश्च पाशहस्ता महाबलाः । सृजन्तः शरवर्षाणि शस्त्रवर्षाणि संयुगे ३३ द्रुमवर्षाणि मुञ्चन्तः शिलावर्षाणि राक्षसाः । तद्बभूवाद्भुतं युद्धं तुमुलं रोमहर्षणम् ३४ रामस्यास्य महाघोरं पुनस्तेषां च रक्षसाम् ।

अग्रांनीं युक्त असलेले नालीकं[1], नाराचं[2] आणि विकर्ण[3] ह्या बाणांच्या योगानें ते राक्षस छिन्नभिन्न होऊं लागले असतां भयंकर आक्रोश करूं लागले २५. अग्नीनें शोषून टाकिलेल्या वनाप्रमाणें नानाप्रकारच्या मर्मभेदक बाणांनीं रामानें पीडित केलेल्या त्या सैन्याला सुख मिळेनासें झालें २६. कांहीं महाबलाढ्य शूर राक्षस पराकाष्ठेचे क्रुद्ध होऊन रामाकडे भाले शूल आणि कुऱ्हाडी फेंकूं लागले २७; परंतु, बाणांच्या योगानें महापराक्रमी वीर्यवान् रामानें त्यांच्या शस्त्रांचें निवारण करून संग्रामामध्यें त्यांचें प्राण घेतले व त्यांच्या माना तोडून टाकिल्या २८. तेव्हां अमृत हरण करण्याकरितां जात असतांना गरुडाच्या पक्षांच्या वायूनें ज्याप्रमाणें नंदनवनांतील वृक्ष मोडून पृथ्वीवर पडले त्याप्रमाणें ढाली व धनुष्यें छिन्नभिन्न होऊन मान तुटलेले ते राक्षस भूमीवर पडले २९ आणि बाणांचे तडाके बसलेले जे राक्षस अवशिष्ट राहिले होते ते खिन्न होऊन आश्रयाकरितां खराकडे धांवले ३०. तेव्हां धनुष्य घेऊन आणि त्या सर्वांचें सांत्वन करून क्रुद्ध झालेल्या अंतकाप्रमाणें अत्यंत संतप्त झालेला तो दूषण रुष्ट झालेल्या रामावर धांवला ३१. तेव्हां दूषणाचा आश्रय मिळाल्यामुळें निर्भय झालेले ते सर्व राक्षस पुनरपि परत फिरले; सालवृक्ष, तालवृक्ष आणि शिला हींच आयुधें घेऊन रामावर धांवले ३२ व शूल, मुद्गल आणि पाश हातांत घेऊन ते महाबलाढ्य राक्षस संग्रामामध्यें बाणांचा, शस्त्रांचा, वृक्षांचा आणि पाषाणांचा वर्षाव करूं लागले असतां पुनरपि ह्या रामाचें आणि त्या

[1] तोंडाशींच लोखंड लाविलेले. [2] सर्व लोखंडी. [3] अग्राशीं अंकुशासारिखें असलेले.

ते समन्तादभिक्रुद्धा राघवं पुनरार्दयन् ३५ ततः सर्वा दिशो दृष्ट्वा प्रदिशश्च समावृताः। राक्षसैः सर्वतः प्राप्तैः शरवर्षाभिरावृतः। ३६ स कृत्वा भैरवं नादमस्त्रं परमभास्वरम्। समयोजयद्गान्धर्वं राक्षसेषु महाबलः ३७ ततः शरसहस्राणि निर्ययुश्चापमण्डलात्। सर्वा दश दिशो बाणैरापूर्यन्त समागतैः ३८ नाददानं शरान्घोरान्विमुञ्चन्तं शरोत्तमान्। विकर्षमाणं पश्यन्ति राक्षसास्ते शरार्दिताः ३९ शरान्धकारमाकाशमावृणोत्सदिवाकरम्। बभूवावस्थितो रामः प्रक्षिपन्निव ताञ्छरान् ४० युगपत्पतमानैश्च युगपच्च हतैर्भृशम्। युगपत्पतितैश्चैव विकीर्णा वसुधाभवत् ४१ निहताः पतिताः क्षीणाश्छिन्ना भिन्ना विदारिताः। तत्र तत्र स्म दृश्यन्ते राक्षसास्ते सहस्रशः ४२ सोष्णीषैरुत्तमाङ्गैश्च साङ्गदैर्बाहुभिस्तथा। ऊरुभिर्बाहुभिश्छिन्नैर्नानारूपैर्विभूषणैः ४३ हयैश्च द्विपमुख्यैश्च रथैर्भिन्नैरनेकशः। चामरव्यजनैश्छत्रैर्ध्वजैर्नानाविधैरपि ४४ रामेण बाणाभिहतैर्विच्छिन्नैः शूलपट्टिशैः। विच्छिन्नैः समरे भूमिर्विस्तीर्णा-

---

राक्षसांचे अंगावर कांटा येण्यासारिखें महाघोर तुमुल युद्ध झालें व त्या क्रुद्ध झालेल्या राक्षसांनीं चोंहों बाजूंनीं पुनरपि रामावर मारा चालविला ३३, ३४, ३५. तदनंतर सर्व दिशा आणि उपदिशा व्याप्त झालेल्या अवलोकन करून सर्व बाजूंनीं आलेल्या राक्षसांनीं केलेल्या बाणवृष्टींच्या योगानें व्याप्त झालेल्या ३६ त्या महाबलाढ्य रामानें भयंकर गर्जना केली व राक्षसांकडे अत्यंत उज्ज्वल अशा गांधर्व अस्त्राची योजना केली ३७. नंतर त्याच्या धनुर्मंडलापासून हजारों बाण सुटले आणि त्या सुटलेल्या बाणांनीं दाही दिशा भरून गेल्या ३८. बाणांनीं विद्ध झालेल्या त्या राक्षसांना राम घोर बाण घेतां केव्हां आणि धनुष्याला लावतो केव्हां हें कांहीं एक न दिसतां एकसारिखें तो धनुष्य ओढीतच आहे असें दिसूं लागलें ३९. बाणांनीं झालेल्या अंधकारानें सूर्यासहवर्तमान आकाश आच्छादित होऊन गेलें तरी राम ते बाण तसाच सोडीत राहिला होता ४०. तेव्हां एकदम पडणाऱ्या, एकदम वध पावलेल्या आणि एकदम पडलेल्या राक्षसांनीं सर्व पृथ्वी भरून गेली ४१ आणि ठिकठिकाणीं नुकतेंच मारिलेले, पडल्यानंतर मेलेले, कंठीं प्राण आलेले, दोन तुकडे झालेले, मोडून पडलेले आणि विदीर्ण झालेले ते हजारों राक्षस दिसूं लागले ४२. शिरस्त्राणांसहवर्तमान मस्तकें, बाहुभूषणांसहवर्तमान हात, दोन दोन तुकडे होऊन पडलेल्या मांड्या व बाहु, नानाप्रकारचीं भूषणें ४३, तुकडे तुकडे झालेले अश्व, मुख्य मुख्य गज, रथ, चौऱ्या, मोर्चलें, छत्रें, नानाप्रकारचे ध्वज ४४ आणि रामाचे बाण लागल्यामुळें दोन दोन तुकडे झालेले

भूद्भयङ्करा ४५ तान्दृष्ट्वा निहतान्सर्वे राक्षसाः परमातुराः । न तत्र चलितुं शक्ता रामं परपुरञ्जयम् ४६ [ ११११ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चविंशः सर्गः ॥ २५ ॥

दूषणस्तु स्वकं सैन्यं हन्यमानं विलोक्य च । संदिदेश महाबाहुर्भीमवेगान्दुरासदान् १ राक्षसान्पञ्चसाहस्रान्समरेष्वनिवर्तिनः । ते शूलैः पट्टिशैः खड्गैः शिलावर्षैर्द्रुमैरपि २ शरवर्षैरविच्छिन्नं ववर्षुस्तं समन्ततः । तद्द्रुमाणां शिलानां च वर्षं प्राणहरं महत् ३ प्रतिजग्राह धर्मात्मा राघवस्तीक्ष्णसायकैः । प्रतिगृह्य च तद्वर्षं निमीलित इवर्षभः ४ रामः क्रोधं परं लेभे वधार्थं सर्वरक्षसाम् । ततः क्रोधसमाविष्टः प्रदीप्त इव तेजसा ५ शरैरभ्यकिरत्सैन्यं सर्वतः सहदूषणम् । ततः सेनापतिः क्रुद्धो दूषणः शत्रुदूषणः ६ शरैरशनिकल्पैस्तं राघवं समवारयत् । ततो रामः सुसंक्रुद्धः क्षुरेणास्य महद्धनुः ७ चिच्छेद समरे वीरश्चतुर्भिश्चतुरो हयान् । हत्वा

---

शूल व पट्टे ह्यांच्या योगानें संग्रामांतील विस्तीर्ण भूमि भयंकर दिसूं लागली ४५ व त्याचा वध झालेला पाहून अत्यंत व्याकुल झालेले अवशिष्ट सर्वही राक्षस शत्रुसमुदाय जिंकणाऱ्या रामाचे समोर जाण्यासही समर्थ झाले नाहींत ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५ ॥

आपल्या सैन्याचा वध होत आहे असें अवलोकन केल्यावर महापराक्रमी दूषणानें भयंकर वेगवान्, जिंकण्यास अशक्य आणि संग्रामामध्यें पराङ्मुख न होणाऱ्या अशा पांचहजार राक्षसांना आज्ञा केली. तेव्हां, शूल, पट्टे, खड्ग, पाषाणवृष्टि, वृक्ष आणि बाणवृष्टि ह्यांच्या योगानें त्यांनीं त्या रामावर एकसारिखा वर्षाव सुरू केला; परंतु, वृक्ष आणि पाषाण ह्यांचा तो प्राणघातक प्रचंड वर्षावही १,२,३ धर्मात्म्या रामानें तीक्ष्ण बाणांच्या योगानें अडवून धरिला; डोळे मिटून पर्जन्यवृष्टि सहन करणाऱ्या बैलाप्रमाणें त्या वृष्टीचा निरोध करून ४ राम सर्व राक्षसांच्या वधाकरितां अत्यंत क्रुद्ध झाला आणि क्रोधानें व्याप्त होऊन तेजानें जसा कांहीं जळूं लागलेला तो राम ५ दूषणासहवर्तमान त्या सैन्यावर सर्व बाजूंनीं बाणवृष्टि करूं लागला. तदनंतर शत्रुनाशक दूषण सेनापति क्रुद्ध झाला ६ आणि वज्रतुल्य बाणांच्या योगानें तो रामाचें निवारण करूं लागला. तेव्हां वीर रामही अतिशय क्रुद्ध झाला; क्षुरसंज्ञक बाणानें त्यानें त्या दूषणाचें संग्रामामध्यें मोठें धनुष्य तोडून टाकिलें; चार बाणांनीं चार अश्व मारिले; तीक्ष्ण बाणांनीं अश्व मारिल्यावर अर्धचंद्र बाणानें दूषणाच्या सारथ्याचें ७,८ शीर उडविलें आणि त्या दूषण राक्षसालाही तीन बाणांनीं वक्षःस्थलाचे ठिकाणीं वेध केला. तेव्हां धनुष्य तुटून आणि अश्व

चाश्वाञ्शरैस्तीक्ष्णैरर्धचन्द्रेण सारथेः ८ शिरो जहार तद्रक्षस्त्रिभिर्वि-
व्याध वक्षसि। स च्छिन्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः ९ जग्राह
गिरिशृङ्गाभं परिघं लोमहर्षणम्। वेष्टितं काञ्चनैः पट्टैर्देवसैन्याभिमर्द-
नम् १० आयसैः शङ्कुभिस्तीक्ष्णैः कीर्णं परवसोक्षितम्। वज्राशनिस-
मस्पर्शं परगोपुरदारणम् ११ तं महोरगसंकाशं प्रगृह्य परिघं रणे।
दूषणोऽभ्यपतद्रामं क्रूरकर्मा निशाचरः १२ तस्याभिपतमानस्य दूषणस्य
च राघवः। द्वाभ्यां शराभ्यां चिच्छेद सहस्ताभरणौ भुजौ १३ भ्रष्ट-
स्तस्य महाकायः पपात रणमूर्धनि। परिघश्छिन्नहस्तस्य शक्रध्वज
इवाग्रतः १४ कराभ्यां च विकीर्णाभ्यां पपात भुवि दूषणः। विषाणाभ्यां
विशीर्णाभ्यां मनस्वीव महागजः १५ दृष्ट्वा तं पतितं भूमौ दूषणं निहतं
रणे। साधु साध्विति काकुत्स्थं सर्वभूतान्यपूजयन् १६ एतस्मिन्नन्तरे
क्रुद्धास्त्रयः सेनाग्रयायिनः। संहत्याभ्यद्रवन्रामं मृत्युपाशावपा-
शिताः १७ महाकपालः स्थूलाक्षः प्रमाथी च महाबलः। महाकपालो
विपुलं शूलमुद्यम्य राक्षसः १८ स्थूलाक्षः पट्टिशं गृह्य प्रमाथी च पर-

---

नष्ट होऊन रथ आणि सारथी यांनीं तो हीन झाला असतां ९ रोमांच उत्पन्न कर-णारा, सुवर्णाच्या पट्ट्यांनीं वेष्टिलेला, देवसेनेचें मर्दन करणारा १०, सर्वांगभर लोहाचे तीक्ष्ण शंकु ( खिळे ) असलेला, शत्रूंच्या अंगांतील चरबीनें माखलेला, स्पर्शाविषयीं इंद्राच्या वज्रासारखा, शत्रूंच्या इंद्रियांस ( शरीरास ) किंवा नगरद्वारांस विदारण करणारा आणि पर्वताच्या शिखरासारखा असा एक त्यानें परिघ हातांत घेतला ११. अशा प्रकारचा तो महाभुजंगासारिखा परिघ घेऊन क्रूरकर्मी दूषण राक्षस संग्रामामध्यें रामाचे अंगावर धांवला १२; परंतु, तो दूषण अंगावर धांवून येत असतांना रामानें दोन बाणांनीं त्याचे दोन्ही हात हस्तभूषणांसहवर्तमान तोडून टाकिले १३. तेव्हां हात तुटल्यानंतर त्याचा तो प्रचंड परिघ इंद्रध्वजाप्रमाणें संग्रामामध्यें पुढें पडला १४ आणि हात भूमीवर अस्ताव्यस्त पडल्यानंतर दोन्ही हात पडलेल्या धैर्यवान् हत्तीप्रमाणें तो दूषण भूमीवर पडला १५. तेव्हां संग्रामामध्यें वध पावून भूमीवर पडलेल्या त्या दूषणाला अवलोकन करितांक्षणीं सर्व प्राणी " शाबास शाबास " ह्मणून रामाची प्रशंसा करूं लागले १६. इतक्यामध्यें महाकपाल, स्थूलाक्ष आणि महाबलाढ्य प्रमाथी हे सैन्याच्या पुढें चालणारे तीन सेनापति मृत्युपाशानें जखडून गेल्यामुळें क्रुद्ध होऊन एका जुटीनें रामावर धांवले. महाकपाल राक्षस मोठा शूल उगारून रामावर धांवला १७,१८, स्थूलाक्ष पट्टा घेऊन रामाच्या अंगावर गेला आणि प्रमाथीनें हातांत कुऱ्हाड घेऊन

श्वधम् । दृष्ट्वैवापततस्तांस्तु राघवः सायकैः शितैः १९ तीक्ष्णाग्रैः प्रतिजग्राह संप्राप्तानतिथीनिव । महाकपालस्य शिरश्चिच्छेद रघुनन्दनः २० असंख्येयैस्तु बाणौघैः प्रममाथ प्रमाथिनम् । स्थूलाक्षस्याक्षिणी स्थूले पू रामास सायकैः २१ स पपात हतो भूमौ विटपीव महाद्रुमः । दूषणस्यानुगान्पञ्च साहस्रान्कुपितः क्षणात् २२ हत्वा तु पञ्चसाहस्रैरनयद्यमसादनम् । दूषणं निहतं श्रुत्वा तस्य चैव पदानुगान् २३ व्यादिदेश खरः क्रुद्धः सेनाध्यक्षान्महाबलान् । अयं विनिहतः संख्ये दूषणः सपदानुगः २४ महत्या सेनया सार्धं युद्ध्वा रामं कुमानुषम् । शस्त्रैर्नानाविधाकारैर्हनध्वं सर्वराक्षसाः २५ एवमुक्त्वा खरः क्रुद्धो राममेवाभिदुद्रुवे । श्येनगामी पृथुग्रीवो यज्ञशत्रुर्विहंगमः २६ दुर्जयः करवीराक्षः परुषः कालकार्मुकः । हेममाली महामाली सर्पास्यो रुधिराशनः २७ द्वादशैते महावीर्या बलाध्यक्षाः ससैनिकाः । राममेवाभ्यधावन्त विसृजन्तः शरोत्तमान् २८ ततः पावकसंकाशैर्हेमवज्रविभूषितैः । जघान शेषं तेजस्वी तस्य सैन्यस्य सायकैः २९ ते रुक्मपुङ्खा विशिखाः सधूमा इव पावकाः । निजघ्नुस्तानि रक्षांसि

---

रामावर चाल केली; परंतु, ते धांवून येत आहेत असें अवलोकन करितांक्षणींच प्राप्त झालेल्या अतिथीप्रमाणें तीक्ष्ण अग्रांनीं युक्त अशा प्रांसलेल्या बाणांनीं रामानें त्यांचें स्वागत केलें. महाकपालाचें तर रामानें शिरच उडविलें १९,२०; असंख्य बाणसमुदायांनीं प्रमाथीचा वध केला आणि स्थूलाक्षाचे स्थूल नेत्र बाणांनीं भरून काढिले २१. तेव्हां मोठमोठ्या वृक्षांनीं युक्त असलेल्या वृक्षाप्रमाणें तो स्थूलाक्ष वध पावून भूमीवर पडला आणि क्रुद्ध झालेल्या रामानें पांच हजार बाणांनीं दूषणाचे पांच हजार अनुयायीही एका क्षणांत यमसदनाला पाठविले. नंतर दूषण आणि त्याचे अनुयायी ह्यांचा वध झाल्याचें ऐकिल्यावर २२,२३ खर क्रुद्ध झाला आणि महाबलाढ्य सेनाध्यक्षांनी ह्मणाला " ह्या दूषणाचा अनुयायांसहवर्तमान संग्रामामध्यें वध झाला आहे २४. तेव्हां, हे सर्व राक्षसहो, तुह्मी मोठी सेना बरोबर घेऊन आणि त्या नीच मनुष्य रामाशीं युद्ध करून नानाप्रकारच्या शस्त्रांनीं त्याचा वध करा " २५. ह्याप्रमाणें त्यांना सांगून तो क्रुद्ध झालेला खर राक्षस थेट रामावरच धांवला आणि श्येनगामी, पृथुग्रीव, यज्ञशत्रु, विहंगम २६, दुर्जय, करवीराक्ष, परुष, कालकार्मुक, हेममाली, महामाली, सर्पास्य आणि रुधिराशन २७ हे बारा महावीर्यवान् सेनाधिपतिही उत्कृष्ट बाण सोडीत सोडीत सैनिकांसहवर्तमान रामावरच धांवले २८. तेव्हां तेजस्वी रामानें त्या राक्षससैन्याचा अवशिष्ट राहिलेला तो भाग सुवर्ण व हिरे ह्यांनीं भूषित

वज्रा इव महाद्रुमान् ३० रक्षसां तु शतं रामः शतेनैकेन कर्णिना ।
सहस्रं तु सहस्रेण जघान रणमूर्धनि ३१ तैर्भिन्नवर्माभरणाश्छिन्नभिन्न-
शरासनाः । निपेतुः शोणितादिग्धा धरण्यां रजनीचराः ३२ तैर्मुक्तकेशैः
समरे पतितैः शोणितोक्षितैः । विस्तीर्णा वसुधा कृत्स्ना महावेदिः कुशै-
रिव ३३ तत्क्षणे तु महाघोरं वनं निहतराक्षसम् । बभूव निरयप्रख्यं
मांसशोणितकर्दमम् ३४ चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । हता-
न्येकेन रामेण मानुषेण पदातिना ३५ तस्य सैन्यस्य सर्वस्य खरः शेषो
महारथः । राक्षसस्त्रिशिराश्चैव रामश्च रिपुसूदनः ३६ शेषा हता महा-
वीर्या राक्षसा रणमूर्धनि । घोरा दुर्विषहाः सर्वे लक्ष्मणस्याग्रजेन ते ३७
ततस्तु तद्भीमबलं महाहवे समीक्ष्य धर्मेण हतं बलीयसा । रथेन रामं
महता खरस्ततः समाससादेन्द्र इवोद्यताशनिः ३८ [ ११४९ ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

---

केलेल्या अग्नितुल्य बाणांच्या योगानें मारून टाकिला २९. सुवर्णभूषित पिसांनीं युक्त आणि मधून अग्नीप्रमाणें दिसणाऱ्या त्या बाणांनीं मोठ्या वृक्षांचा नाश करणाऱ्या वज्राप्रमाणें त्या राक्षसांचा वध केला ३०. राम कर्णिसंज्ञक शंभर बाणांनीं शंभर राक्षसांचा आणि हजार बाणांनीं, हजार राक्षसांचा संग्रामामध्यें वध करूं लागला असतां ३१ त्या बाणांमुळें, ज्यांच्यीं कवचांचे व भूषणांचे तुकडे तुकडे झालेले आहेत, ज्यांचीं धनुष्यें छिन्नभिन्न झालेलीं आहेत आणि ज्यांचीं शरीरें रक्तानें माखलेलीं आहेत, असे ते राक्षस भूमीवर पडले ३२. तेव्हां शरीर रक्तानें भरून व केंस मोकळे सुटून संग्रामामध्यें पडलेल्या त्या राक्षसांनीं आच्छादित झालेली ती संपूर्ण रणभूमि दर्भांनीं आच्छादिलेल्या महावेदीप्रमाणें दिसूं लागली ३३ व राक्षस मरून मांस व रक्त ह्यांचा खच ज्याच्यामध्यें पडला आहे असें तें महाघोर वन तत्क्षणीं नरकलोकासारिखें दिसूं लागलें ३४. ह्याप्रमाणें मानव आणि पदाति अशा एकट्या रामानें भयंकर पराक्रम करणाऱ्या चवदा हजार राक्षसांचा वध केला असतां ३५ त्या सर्व सैन्यांपैकीं आपापल्या मुख्य सैन्यासहवर्तमान महारथि खर व त्रिशिरा राक्षस हे आणि शत्रुनाशक राम येवढेच अवशिष्ट राहिले ३६ व बाकीचे महावीर्यवान् घोर घोर आणि अत्यंत दुःसह असे ते सर्वही राक्षस लक्ष्मणाच्या ज्येष्ठ भ्रात्यानें संग्रामामध्यें मारिले ३७. असो. तदनंतर बलिष्ठ रामानें क्षात्रधर्माला अनुसरून महासंग्रामामध्यें मारिलेलें तें प्रचंड सैन्य अवलोकन करून हातांत वज्र घेऊन येणारा इंद्रच कीं काय असा तो खर राक्षस मोठ्या रथावर आरूढ होऊन रामाकडे आला ३८. ह्याप्रमाणें

खरं तु रामाभिमुखं प्रयान्तं वाहिनीपतिः । राक्षसस्त्रिशिरा नाम संनि-
पत्येदमब्रवीत् १ मां नियोजय विक्रान्तं त्वं निवर्तस्व साहसात् । पश्य
रामं महाबाहुं संयुगे विनिपातितम् २ प्रतिजानामि ते सत्यमायुधं चाह-
मालभे । यथा रामं वधिष्यामि वधार्हं सर्वरक्षसाम् ३ अहं वास्य रणे
मृत्युरेष वा समरे मम । विनिवर्त्य रणोत्साहं मुहूर्तं प्राश्निको भव ४
प्रहृष्टो वा हते रामे जनस्थानं प्रयास्यसि । मयि वा निहते रामं संयु-
गाय प्रयास्यसि ५ खरस्त्रिशिरसा तेन मृत्युलोभात्प्रसादितः । गच्छ युध्ये-
त्यनुज्ञातो राघवाभिमुखो ययौ ६ त्रिशिरास्तु रथेनैव वाजियुक्तेन भास्वता।
अभ्यद्रवद्रणे रामं त्रिशृङ्ग इव पर्वतः ७ शरधारासमूहान्स महामेघ इवो-
त्सृजन् । व्यसृजत्सदृशं नादं जलार्द्रस्येव दुन्दुभेः ८ आगच्छन्तं त्रिशि-
रसं राक्षसं प्रेक्ष्य राघवः । धनुषा प्रतिजग्राह विधुन्वन्सायकाञ्शितान् ९
स संप्रहारस्तुमुलो रामत्रिशिरसोस्तदा । संबभूवातिबलिनोः सिंहकुञ्जर-

---

महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सव्वि-
सावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

खर रामाचे समोर जाऊं लागला असतां सेनापति त्रिशिरा राक्षस सत्वर समीप येऊन त्याला ह्मणाला १ " तूं साहस करूं नकोस; मज पराक्रम्याला आज्ञा कर आणि महापराक्रमी राम संग्रामामध्यें पाडिलेला पहा २. मीं आयुध हातांत घेऊन तुला सत्य सांगत आहें. सर्व राक्षसांनीं वध करण्यास योग्य अशा रामाचा मी वध करीन ३. सारांश, संग्रामामध्यें मी तरी ह्याचा मृत्यु होईन किंवा रणामध्यें हा तरी माझा मृत्यु होईल. ह्यास्तव, संग्रामाचा उत्साह बाजूला सारून तूं एक क्षणभर प्रेक्षक होऊन रहा ४. रामाचा वध झाला तर आनंदित होऊन जनस्थानाला जाशील अथवा माझा वध झाला तर युद्ध करण्याकरितां तूं रामावर चाल करून जाशील " ५. ह्याप्रमाणें मृत्यूचा लोभ सुटल्यामुळेंच कीं काय त्या त्रिशिरा राक्षसानें खराची प्रार्थना केली. असतां "जा आणि युद्ध कर " अशी खराची अनुज्ञा झाल्यावर तो त्रिशिरा राक्षस रामासमीप गेला ६. सारांश, तीन शिखरांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें दिसत असलेला तो त्रिशिरा राक्षस अश्व जोडिलेल्या त्या उज्ज्वल रथांत बसून संग्रामामध्यें रामावर धांवला ७ आणि पाण्यानें भिजलेली नौबद जशी बदबद वाजूं लागते तशी जलधारा सोड-णाऱ्या महामेघाप्रमाणें बाणरूप धारांचे समुदाय सोडणारा तो त्रिशिराराक्षस गर्जना करूं लागला ८ आणि त्रिशिरा राक्षस येत आहे असें पाहून धनुष्यानें तीक्ष्ण बाण सोडीत सोडीत रामानें त्याचा सत्कार केला ९. तेव्हां अतिबलाढ्य सिंह व गज

योरिव १० ततस्त्रिशिरसा बाणैर्ललाटे ताडितस्त्रिभिः । अमर्षी कुपितो रामः संरब्ध इदमब्रवीत् ११ अहो विक्रमशूरस्य राक्षसस्येदृशं बलम् । पुष्पैरिव शरैर्योऽहं ललाटेऽस्मि परिक्षितः ॥ ममापि प्रतिगृह्णीष्व शरांश्चापगुणाच्च्युतान् १२ एवमुक्तस्तु संरब्धः शरानाशीविषोपमान् त्रिशिरो वक्षसि क्रुद्धो निजघान चतुर्दश १३ चतुर्भिस्तुरगानस्य शरैः संनतपर्वभिः। न्यपातयत तेजस्वी चतुरस्तस्य वाजिनः १४ अष्टभिः सायकैः सूतं रथोपस्थे न्यपातयत् । रामश्चिच्छेद बाणेन ध्वजं चास्य समुच्छ्रितम् १५ ततो हतरथात्तस्मादुत्पतन्तं निशाचरम् । चिच्छेद रामस्तं बाणैर्हृदये सोऽभवज्जडः १६ सायकैश्चाप्रमेयात्मा सामर्षात्तस्य रक्षसः । शिरांस्यपातयत्त्रीणि वेगवद्भिस्त्रिभिः शरैः १७ सधूमशोणितोद्गारी रामबाणाभिपीडितः । न्यपतत्पतितैः पूर्वं समरस्थो निशाचरः १८ हतशेषास्ततो भग्ना राक्षसाः खरसंश्रयाः । द्रवन्ति स्म न तिष्ठन्ति व्याघ्रत्रस्ता मृगा इव १९

---

ह्याप्रमाणें राम आणि त्रिशिरा ह्यांच्यामध्यें तुमुल युद्ध झालें १०. तदनंतर त्रिशिरा राक्षसानें रामाला ललाटाचे ठिकाणीं तीन बाणांनीं वेध केल्यावर तो सहन न होऊन क्रुद्ध झालेला राम त्याला ह्मणाला ११ " पुष्पासारिख्या बाणांनीं ललाटाचे ठिकाणीं मला वेध झालेला आहे. तेव्हां ह्या रणशूर राक्षसाच्या अशाप्रकारच्या बलाची काय हो तारीफ करावी ? आतां धनुष्याच्या प्रत्यंचेपासून सुटलेल्या माझ्याही बाणांचा तूं स्वीकार कर " १२. ह्याप्रमाणें त्रिशिरा राक्षसाला सांगितल्यानंतर क्षुब्ध व क्रुद्ध झालेल्या रामानें त्रिशिराराक्षसाच्या वक्षःस्थलावर भुजंगांसारिखे चवदा बाण मारिले १३. नम्र अग्रानें युक्त असलेल्या चार बाणांनीं तेजस्वी रामानें चार वेगवान् अश्व मारिले १४, आठ बाणांनीं रथावर बसलेला सारथी खालीं पाडिला आणि एका बाणानें त्याचा उंच ध्वज रामानें तोडून टाकिला १५. नंतर विधुळवाट झालेल्या त्या रथांतून तो त्रिशिरा राक्षस उडी मारूं लागला असतां रामानें हृदयाचे ठिकाणीं त्याला बाणांनीं वेध केला; तेव्हां त्वरा करून त्याला हातामध्यें आयुध घेतां आलें नाहीं १६. तदनंतर अतुल सामर्थ्यांनीं युक्त असलेल्या रामानें क्रोधामुळें त्या राक्षसाचीं तिन्हीं मस्तकें तीन वेगवान् बाणांनीं तोडून टाकिलीं १७. तेव्हां समरांगणामध्यें असलेला तो राक्षस रामाच्या बाणांनीं व्याकुल झाल्यामुळें पूर्वीं पडलेल्या मस्तकाच्या द्वारानें ( अर्थात् धडावर राहिलेल्या मस्तकाच्या छिद्रांतून ) धूमासहवर्तमान रक्ताच्या गुळण्या टाकीत टाकीत भूमीवर पडला १८. ( असा प्रकार झाल्यावर ) वध पावलेल्या सैन्यांतून अवशिष्ट राहिलेल्या खराचा आश्रय करून राहणारे राक्षस संग्रामांतून फुटले आणि जाग्या-

तान्खरो द्रवतो दृष्ट्वा निवर्त्य रुषितस्त्वरन् । राममेवाभिदुद्राव राहु-श्चन्द्रमसं यथा २० [ ११६९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

निहतं दूषणं दृष्ट्वा रणे त्रिशिरसा सह । खरस्याप्यभवत्त्रासो दृष्ट्वा रामस्य विक्रमम् १ स दृष्ट्वा राक्षसं सैन्यमविषह्यं महाबलम् । हतमेकेन बाणेन दूषणस्त्रिशिरा अपि २ तद्बलं हतभूयिष्ठं विमनाः प्रेक्ष्य राक्षसः । आससाद खरो रामं नमुचिर्वासवं यथा ३ विकृष्य बलवच्चापं नाराचा-न्रक्तभोजनान् । खरश्चिक्षेप रामाय क्रुद्धानाशीविषानिव ४ ज्यां विधुन्वन्सुबहुशः शिक्षयास्त्राणि दर्शयन् । चचार समरे मार्गाञ्शरैरथ गतः खरः ५ स सर्वाश्च दिशो बाणैः प्रदिशश्च महारथः । पूरयामास तं दृष्ट्वा रामोपि सुमहद्धनुः ६ स सायकैर्दुर्विषहैर्विस्फुलिङ्गैरिवाग्निभिः । नभश्चकाराविवरं पर्जन्य इव वृष्टिभिः ७ तद्बभूव शितैर्बाणैः खरराम-

---

वर न ठरतां पारध्यांनीं त्रस्त केलेल्या मृगांप्रमाणें पळत सुटले १९. तेव्हां धांवत असलेल्या त्या राक्षसांना अवलोकन करून खर क्रुद्ध होऊन संग्रामाकडे वळला आणि चंद्रावर चालून जाणाऱ्या राहूप्रमाणें तो रामावर चालून गेला २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

संग्रामामध्यें त्रिशिरा राक्षसासहवर्तमान दूषणाचा वध झालेला पाहून रामाचा पराक्रम लक्ष्यांत आल्यावर खरालाही भय वाटलें १. राक्षसांचें तें महाबलाढ्य दुःसह सैन्य, दूषण व त्रिशिरा ह्यांचा एकट्या रामानें वध केल्याचें अवलोकन करून २ आणि ज्यांतील पुष्कळ भागाचा वध झाला आहे अशा त्या अवशिष्ट राहिलेल्या सैन्याकडे दृष्टि देऊन खिन्न झालेला तो खर राक्षस इंद्राकडे जाणाऱ्या नमुचि दैत्याप्रमाणें रामाकडे गेला ३. प्रचंड धनुष्य आकर्षण करून त्या खरानें क्रुद्ध सर्पच कीं काय असे रक्तशोषक नाराच बाण रामावर सोडिले ४; नानाप्रकारांनीं धनुष्यें चाळवून धनुर्विद्येच्या अभ्यासामुळें शरसंधानाचे वगैरे अनेक प्रकार व अस्त्रें, बाणांच्या योगानें दर्शविणारा तो रथारूढ खर रणभूमीमध्यें संचार करू लागला ५ आणि बाणांच्या योगानें सर्व दिशा व उपदिशा त्या महारथि खरानें भरून काढिल्या. त्याला अवलोकन करून महाधनुर्धारी रामानेंही ६ जलवृष्टींच्या योगानें ज्याप्रमाणें पर्जन्य आकाश भरून काढितो त्याप्रमाणें अग्निकणांसारख्या दुःसह बाणांच्या योगानें आकाश गच्च भरून काढिलें ७. तेव्हां खर आणि राम ह्यांनीं सोडिलेल्या तीक्ष्ण बाणांच्या

विसर्जितैः । पर्याकाशमनाकाशं सर्वतः शरसंकुलम् ८ शरजालावृतः सूर्यो न तदा स्म प्रकाशते । अन्योन्यवधसंरम्भादुभयोः संप्रयुध्यतोः ९ ततो नालीकनाराचैस्तीक्ष्णाग्रैश्च विकर्णिभिः । आजघान रणे रामं तोत्रैरिव महाद्विपम् १० तं रथस्थं धनुष्पाणिं राक्षसं पर्यवस्थितम् । ददृशुः सर्वभूतानि पाशहस्तमिवान्तकम् ११ हन्तारं सर्वसैन्यस्य पौरुषे पर्यवस्थितम् । परिश्रान्तं महासत्त्वं मेने रामं खरस्तदा १२ तं सिंहमिव विक्रान्तं सिंहविक्रान्तगामिनम् । दृष्ट्वा नोद्विजते रामः सिंहः क्षुद्रमृगं यथा १३ ततः सूर्यनिकाशेन रथेन महता खरः । आससादाथ तं रामं पतङ्ग इव पावकम् १४ ततोऽस्य सशरं चापं मुष्टिदेशे महात्मनः । खरश्चिच्छेद रामस्य दर्शयन्हस्तलाघवम् १५ स पुनस्त्वपरान्सप्त शरानादाय मर्मणि । निजघान रणे क्रुद्धः शक्राशनिसमप्रभान् १६ ततः शरसहस्रेण राममप्रतिमौजसम् । अर्दयित्वा महानादं ननाद समरे खरः १७ ततस्तत्प्रहतं बाणैः खरमुक्तैः सुपर्वभिः । पपात कवचं भूमौ

---

योगानें सर्व बाजूंनीं बाणमय होऊन गेलेलें तें आकाश प्रकाशशून्य झालें ८ आणि एकमेकांचा वध करण्याची ईर्षा धरून ते उभयतां युद्ध करूं लागले असतां बाणसमूहांनीं व्याप्त झालेला सूर्य प्रकाशरहित झाला ९. तदनंतर अंकुशांनीं ज्याप्रमाणें मोठ्या गजाला वेध करावा त्याप्रमाणें तीक्ष्ण अग्रांनीं युक्त अशा नालीक, नाराच आणि विकर्ण बाणांनीं संग्रामामध्यें खरानें रामाला वेध केला असतां १० हातांत धनुष्य घेऊन व रथावर आरूढ होऊन रणामध्यें स्थित असलेल्या त्या खराला सर्व प्राण्यांनीं हातांत पाश घेतलेल्या मृत्यूप्रमाणें अवलोकन केलें ११. सर्व राक्षससैन्याचा वध करणारा महाधैर्यवान् राम जरी पराक्रम करीतच होता तरी तो श्रांत झाला आहे असें खराला वाटलें १२; परंतु, सिंहासारिख्या शौर्यदर्शक गतीनें युक्त असलेला तो खर सिंहाप्रमाणें चालून येत आहे असें आढळून आल्यावरही क्षुद्र मृगाला अवलोकन केल्यावर ज्याप्रमाणें सिंह उद्विग्न होत नाहीं त्याप्रमाणें रामही उद्विग्न झाला नाहीं. १३. तेव्हां अग्नीसमीप जाणाऱ्या पतंगाप्रमाणें मोठ्या सूर्यतुल्य तेजस्वी रथांत आरूढ होऊन खर त्या रामासमीप आला १४. समीप आल्यावर हस्तलाघव दर्शवीत दर्शवीत त्या खरानें महात्म्या रामाचें धनुष्य बाणासहवर्तमान हातांत धरण्याचेच ठिकाणीं तोडून टाकिलें १५; पुनरपि इंद्राच्या वज्राप्रमाणें सतेज असलेले सात बाण घेऊन त्या क्रुद्ध झालेल्या खरानें संग्रामामध्यें रामाच्या मर्मावर मारिले १६. आणि हजार बाणांनीं अतुल सामर्थ्यवान्

रामस्यादित्यवर्चसम् १८ स शरैरर्पितः क्रुद्धः सर्वगात्रेषु राघवः । रराज समरे रामो विधूमोऽग्निरिव ज्वलन् १९ ततो गम्भीरनिर्ह्रादं रामः शत्रुनिबर्हणः । चकारान्ताय स रिपोः सज्यमन्यन्महद्धनुः २० सुमहद्वैष्णवं यत्तदतिसृष्टं महर्षिणा । वरं तद्धनुरुद्यम्य खरं समभिधावतः २१ ततः कनकपुङ्खैस्तु शरैः सन्नतपर्वभिः । चिच्छेद रामः संक्रुद्धः खरस्य समरे ध्वजम् २२ स दर्शनीयो बहुधा विच्छिन्नः काञ्चनो ध्वजः । जगाम धरणीं सूर्यो देवतानामिवाज्ञया २३ तं चतुर्भिः खरः क्रुद्धो रामं गात्रेषु मार्गणैः । विव्याध हृदि मर्मज्ञो मातङ्गमिव तोयदैः २४ स रामो बहुभिर्बाणैः खरकार्मुकनिःसृतैः । विद्धो रुधिरसिक्ताङ्गो बभूव रुषितो भृशम् २५ स धनुर्धन्विनां श्रेष्ठः संगृह्य परमाहवे । मुमोच परमेष्वासः षट् शरानभिलक्षितान् २६ शिरस्येकेन बाणेन द्वाभ्यां बाह्वोरथार्पयत् । त्रिभिश्चन्द्रार्धवक्त्रैश्च वक्षस्यभिजघान ह २७ ततः पश्चान्म-

---

रामाला वेध करून संग्रामामध्यें खरानें मोठी गर्जना केली १७. तेव्हां उत्कृष्ट पर्वांनीं युक्त अशा त्या खरानें सोडिलेल्या बाणांचा भडिमार झालेलें रामाचें तें सूर्यासारिखें तेजस्वी कवच खालीं पडलें १८ आणि त्या वेळीं सर्व अवयवांचे ठिकाणीं बाण रुतून राहिले असतां तो क्रुद्ध राम जळत असलेल्या धूम्ररहित अग्नीप्रमाणें संग्रामामध्यें शोभूं लागला १९. तदनंतर त्या शत्रुनाशक रामानें गंभीर ध्वनीनें युक्त असलेल्या त्या मोठ्या धनुष्याला शत्रूचा अंत करण्याकरितां प्रत्यंचा चढविली २०. अगस्त्य महर्षींनीं दिलेलें तें प्रचंड व श्रेष्ठ वैष्णव धनुष्य हातांत घेऊन राम खराचे अंगावर धांवून गेला २१ व नंतर क्रुद्ध झालेल्या रामानें सुवर्णभूषित पिसें आणि नम्र पर्वें ह्यांनीं युक्त असलेल्या बाणांच्या योगानें खराचा ध्वज संग्रामामध्यें तोडून टाकिला असतां २२ देवतांच्या आज्ञेनें पृथ्वीवर आलेला सूर्यच कीं काय असा तो अनेकप्रकारांनीं दर्शनीय असलेला सुवर्णध्वज छिन्न होऊन भूमीवर पडला २३. तेव्हां मेघांच्या योगानें ज्याप्रमाणें हत्तीला वेध करावा त्याप्रमाणें त्या क्रुद्ध झालेल्या मर्मज्ञ खरानें चार बाणांच्या योगानें रामाला हृदयाचे ठिकाणीं आणि इतर अवयवांचे ठिकाणीं वेध केला २४ व ह्याप्रमाणें खराच्या धनुष्यापासून सुटलेल्या अनेक बाणांनीं विद्ध झाल्यामुळें शरीरावर रक्ताचा सडा झालेला तो राम अतिशय क्रुद्ध झाला २५ आणि धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या महाधनुर्धारी रामानें परीक्षा केलेले सहा बाण घेऊन महासंग्रामामध्यें खरावर सोडिले २६. पैकीं एका बाणानें खराच्या मस्तकाचे ठिकाणीं, दोहोंनीं बाहूंचे ठिकाणीं आणि अर्धचंद्राकृति तीन बाणांच्या योगानें वक्षःस्थलाचे

हातेजा नाराचान्भास्करोपमान् । जघान राक्षसं क्रुद्धस्त्रयोदश शिलाशितान् २८ रथस्य युगमेकेन चतुर्भिः शबलान्हयान् । षष्ठेन च शिरः संख्ये चिच्छेद खरसारथेः २९ त्रिभिस्त्रिवेणून्बलवान्द्वाभ्यामक्षं महाबलः । द्वादशेन तु बाणेन खरस्य सशरं धनुः ३० छित्त्वा वज्रनिकाशेन राघवः प्रहसन्निव । त्रयोदशेनेन्द्रसमो बिभेद समरे खरम् ३१ प्रभग्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः । गदापाणिरवप्लुत्य तस्थौ भूमौ खरस्तदा ३२ तत्कर्म रामस्य महारथस्य समेत्य देवाश्च महर्षयश्च । अपूजयन्प्राञ्जलयः प्रहृष्टास्तदा विमानाग्रगताः समेताः ३३[१२०२]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

खरं तु विरथं रामो गदापाणिमवस्थितम् । मृदुपूर्वं महातेजाः परुषं वाक्यमब्रवीत् १ गजाश्वरथसंबाधे बले महति तिष्ठता । कृतं ते दारुणं कर्म सर्वलोकजुगुप्सितम् २ उद्वेजनीयो भूतानां नृशंसः पापकर्मकृत् ।

---

ठिकाणीं रामानें वेध केला २७ व नंतर क्रुद्ध झालेल्या त्या महातेजस्वी रामानें पुनरपि शिळेवर घांसलेले आणि सूर्याप्रमाणें सतेज असलेले तेरा नाराच बाण घेऊन त्यांच्या योगानें त्या खर राक्षसाला वेध केला २८. पैकीं एका बाणानें रथाचें जूं मोडून पाडिलें; चार बाणांनीं चित्रविचित्र वर्णांचे चार अश्व मारिले; सहाव्या बाणानें खराच्या सारथ्याचें मस्तक संग्रामामध्यें छेदून टाकिलें २९; तीन बाणांनीं बलवान् रामानें जूं बांधण्याच्या तीन दांड्या तोडून टाकिल्या; दोन बाणांनीं महाबलाढ्य रामानें कण्याचे तुकडे केले आणि बाराव्या बाणानें खर राक्षसाचें धनुष्य त्याच्या हातासहवर्तमान ३० तोडून टाकून त्या इंद्रतुल्य रामानें हंसत हंसत वज्रासारिख्या तेराव्या बाणानें संग्रामामध्यें ( वक्षःस्थलाचे ठिकाणीं ) खराला वेध केला ३१. तेव्हां ज्याचें धनुष्य मोडून गेलें आहे, आणि अश्व व सारथि ह्यांचा वध होऊन जो विरथ झाला आहे असा तो खर हातांत गदा घेऊन व रथांतून उडी मारून भूमीवर उभा राहिला ३२. असो. विमानाच्या अग्रभागीं बसून पहात असलेले देव आणि महर्षि आनंदित होऊन जुळले आणि एकत्र जमून व हात जोडून प्रशंसेस पात्र असलेल्या त्या रामाची प्रशंसा करूं लागले ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

विरथ झाल्यावरही हातांत गदा घेऊन संग्रामामध्यें उभा राहिलेल्या खराला मृदु स्वरानें परंतु, मर्मभेदक शब्दांनीं महातेजस्वी राम ह्मणाला १ "गज, अश्व

त्रयाणामपि लोकानामीश्वरोपि न तिष्ठति ३ कर्म लोकविरुद्धं तु कुर्वाणं क्षणदाचर । तीक्ष्णं सर्वजनो हन्ति सर्पं दुष्टमिवागतम् ४ लोभात्पापानि कुर्वाणः कामाद्वा यो न बुध्यते । हृष्टः पश्यति तस्यान्तं ब्राह्मणी करकादिव ५ वसतो दण्डकारण्ये तापसान्धर्मचारिणः । किं नु हत्वा महाभागान्फलं प्राप्स्यसि राक्षस ६ न चिरं पापकर्माणः क्रूरा लोकजुगुप्सिताः । ऐश्वर्यं प्राप्य तिष्ठन्ति शीर्णमूला इव द्रुमाः ७ अवश्यं लभते कर्ता फलं पापस्य कर्मणः । घोरं पर्यागते काले द्रुमः पुष्पमिवार्तवम् ८ न चिरात्प्राप्यते लोके पापानां कर्मणां फलम् । सविषाणामिवान्नानां भुक्तानां क्षणदाचर ९ पापमाचरतां घोरं लोकस्याप्रियमिच्छताम् । अहमासादितो राजा प्राणान्हन्तुं निशाचर १० अद्य भित्त्वा मया मुक्ताः शराः काञ्चनभूषणाः । विदार्यापि पतिष्यन्ति वल्मी-

---

आणि रथ ह्यांनीं व्याप्त असलेल्या प्रचंड सैन्याचा तूं अधिपति असतांना सर्व लोकांच्या निंदेस पात्र असें ( ब्राह्मणवधासारिखें ) दारुण कर्म केलेंस ( ह्यामुळें तुझा असा नाश झाला ) २. कारण, प्राण्यांचे ठिकाणीं उद्वेग उत्पन्न करणारा, क्रूर आणि पापकर्मी पुरुष त्रैलोक्याचा अधिपति जरी असला तरी फार दिवस रहात नाहीं ३. हे निशाचरा, दुष्ट सर्प आला असतां ज्याप्रमाणें त्याचा सर्व लोक वध करितात त्याचप्रमाणें लोकविरुद्ध कर्म करणाऱ्या तीक्ष्ण पुरुषाचा सर्व लोक वध करितात ४. परिणामाकडे दृष्टि न देतां गार खाणाऱ्या सरडाप्रमाणें लोभामुळें अथवा कामामुळें जो पापें करितो त्याचा नाश लोक आनंदित होऊन पहातात ५. हे राक्षसा, दंडकारण्यामध्यें वास्तव्य करणाऱ्या धर्मनिष्ठ महाभाग्यवान् मुनींचा वध करून तुला काय बरें फल प्राप्त होणार आहे ? ६. मुळें तुटून गेलेले वृक्ष जसे फार दिवस रहात नाहींत तसे ऐश्वर्य प्राप्त झाल्यावर पापकर्म करूं लागलेले आणि ह्मणूनच लोकनिंदेस पात्र झालेले क्रूर लोक फार दिवस रहात नाहींत ७. वृक्षाला ज्याप्रमाणें ऋतूला अनुसरून येणारें पुष्प प्राप्त होतें त्याप्रमाणें समय आला ह्मणजे पापकर्माचें घोर फल कर्त्याला अवश्य प्राप्त होतें ८. हे निशाचरा, भक्षण केलेल्या सविष अन्नाचें फल प्राप्त होण्यास जसा फार वेळ लागत नाहीं तसा जगतामध्यें पाप कर्माचें फल प्राप्त होण्यास फार वेळ लागत नाहीं ९. हे राक्षसा, घोर पाप करून लोकांना उपद्रव देण्याची इच्छा करणाऱ्याचे प्राण हरण करण्याकरितां राजा ह्या नात्यानें माझी योजना झाली आहे १०. तेव्हां सुवर्णभूषणांनीं युक्त असें मीं सोडिलेले बाण आज तुझ्या शरीराचा भेद करून वारुळांत जाणाऱ्या सर्पाप्रमाणें पृथ्वीलाही फोडून जातील ११.

कमिव पन्नगाः ११ ये त्वया दण्डकारण्ये भक्षिता धर्मचारिणः । तानद्य निहतः संख्ये ससैन्योनुगमिष्यसि १२ अद्य त्वां निहतं बाणैः पश्यन्तु परमर्षयः । निरयस्थं विमानस्था ये त्वया निहताः पुरा १३ प्रहरस्व यथाकामं कुरु यत्नं कुलाधम । अद्य ते पातयिष्यामि शिरस्तालफलं यथा १४ एवमुक्तस्तु रामेण क्रुद्धः संरक्तलोचनः । प्रत्युवाच ततो रामं प्रहसन्क्रोधमूर्छितः १५ प्राकृतान्राक्षसान्हत्वा युद्धे दशरथात्मज । आत्मना कथमात्मानमप्रशस्यं प्रशंससि १६ विक्रान्ता बलवन्तो वा ये भवन्ति नरर्षभाः । कथयन्ति न ते किञ्चित्तेजसा चातिगर्विताः १७ प्राकृतास्त्वकृतात्मानो लोके क्षत्रियपांसनाः । निरर्थकं विकत्थन्ते यथा राम विकत्थसे १८ कुलं व्यपदिशन्वीरः समरे कोभिधास्यति । मृत्युकाले तु संप्राप्ते स्वयमप्रस्तवे स्तवम् १९ सर्वथा तु लघुत्वं ते कत्थनेन विदर्शितम् । सुवर्णप्रतिरूपेण तप्तेनेव कुशाग्निना २० न तु मामिह

---

दंडकारण्यामध्यें जे धर्माचरणी पुरुष तूं भक्षण केले आहेस त्यांच्या मागोमाग तूं आज संग्रामामध्यें सैन्यासहवर्तमान वध पावून इहलोकांतून चालता होशील १२. पूर्वी ज्यांचा तूं वध केला आहेस ते विमानांत बसलेले महर्षि बाणांनीं वध पावून नरकांत गेलेल्या आज तुला अवलोकन करतील १३. हे अधम कुळांत उत्पन्न झालेल्या राक्षसा, तूं आपल्या इच्छेप्रमाणें माझ्यावर प्रहार कर आणि हवी तितकी तडफड कर; परंतु, तालवृक्षाच्या फलाप्रमाणें मी आज तुझें शिर खालीं पाडीन" १४. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां क्रुद्ध झालेल्या त्या खराचे डोळे लाल झाले व क्रोधानें अगदीं व्याप्त होऊन हंसत हंसत तो रामाला ह्मणाला १५ "हे दशरथपुत्रा, युद्धामध्यें साधारण राक्षसांचा वध करून प्रशंसेस पात्र नसलेल्याही आपली तूं स्वतः कशी प्रशंसा करीत आहेस? १६. जे पुरुषश्रेष्ठ पराक्रमी अथवा बलाढ्य असतात ते स्वप्रशंसेसंबंधानें कांहीं एक सांगत नाहींत आणि बलाचा गर्व झालेले पुरुषही फार प्रशंसा करीत नाहींत १७. हे रामा, तूं जशा फुशारक्या मारीत आहेस त्याप्रमाणें जगतामध्यें जे हलकट, दुष्ट चित्तानें युक्त आणि क्षत्रियजातीला कलंक लावणारे लोक असतात ते मात्र व्यर्थ फुशारक्या मारीत असतात १८. समरांगणामध्यें मृत्युसमय प्राप्त झाला असतां आपलें कुलीनत्त्व प्रकट करण्याकरितां कोण बरें वीर पुरुष स्वतः अप्रासंगिक स्वप्रशंसा करणार आहे? १९. सुवर्णासारिखें दिसत असलेलें पितळ ज्याप्रमाणें धातुशोधित अग्नीनें तप्त झालें असतां लघुत्व दाखवितें त्याचप्रमाणें स्वप्रशंसेच्या योगानें तूं आपलें सर्वस्वीं लघुत्व प्रगट केलें आहेस २०.

तिष्ठन्तं पश्यसि त्वं गदाधरम् । धराधरमिवाकम्प्यं पर्वतं धातुभिश्चितम् २१ पर्याप्तोऽहं गदापाणिर्हन्तुं प्राणाञ्रणे तव । त्रयाणामपि लोकानां पाशहस्त इवान्तकः २२ कामं बह्वपि वक्तव्यं त्वयि वक्ष्यामि न त्वहम् । अस्तं प्राप्नोति सविता युद्धविघ्नस्ततो भवेत् २३ चतुर्दश सहस्राणि राक्षसानां हतानि ते । त्वद्विनाशात्करोम्यद्य तेषामश्रुप्रमार्जनम् २४ इत्युक्त्वा परमक्रुद्धः स गदां परमाङ्गदाम् । खरश्चिक्षेप रामाय प्रदीप्तामशनिं यथा २५ खरबाहुप्रमुक्ता सा प्रदीप्ता महती गदा । भस्म वृक्षांश्च गुल्मांश्च कृत्वागात्तत्समीपतः २६ तामापतन्तीं महतीं मृत्युपाशोपमां गदाम् । अन्तरिक्षगतां रामश्चिच्छेद बहुधा शरैः २७ सा विशीर्णा शरैर्भिन्ना पपात धरणीतले । गदा मन्त्रौषधिबलैर्व्यालीव विनिपातिता २८ [ १२३० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

भित्त्वा तु तां गदां बाणै राघवो धर्मवत्सलः । स्मयमान इदं वाक्यं

---

धातूंनीं व्याप्त झालेल्या भूधर पर्वताप्रमाणें हातांत गदा घेऊन ह्या संग्रामामध्यें निश्चल राहिलेल्या माझ्या स्वरूपाची ओळख तुला झाली नाहीं ह्मणून तुझ्या ह्या फुशारक्या चालल्या आहेत २१; परंतु, हातांत पाश घेतलेल्या मृत्यूप्रमाणें हातांत गदा धारण केलेला मी संग्रामामध्यें तुझेच नव्हे परंतु, त्रैलोक्याचेही प्राण हरण करण्यास समर्थ आहें २२. खरोखर तुला आणखी पुष्कळ सांगण्यासारिखें आहे; परंतु, मी तें सांगत नाहीं. कारण, सूर्य अस्ताला जात आहे; तेव्हां तें सांगत बसल्यानें युद्धाला अडथळा येईल २३. तूं ज्या चवदा हजार ( मुख्य मुख्य ) राक्षसांचा वध केला आहेस त्यांच्या नातेवाईकांचे अश्रु तुझ्या नाशानें मी आज पुसून टाकीन " २४. ह्याप्रमाणें भाषण केल्यावर अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या खरानें, उज्ज्वल वज्रच कीं काय अशी ती उत्कृष्ट सुवर्णवलयांनीं युक्त असलेली गदा रामावर फेंकिली २५ व खराच्या हातांतून सुटलेली ती देदीप्यमान प्रचंड गदा वृक्ष आणि झुडपें ह्यांचें भस्म करून टाकून रामाचे समीप आली २६; परंतु, मृत्युपाशाप्रमाणें भयंकर असलेली ती प्रचंड गदा येत असतांना अंतरिक्षामध्यें आहे तोंच रामानें बाणांच्या योगानें तिचे तुकडे तुकडे केले २७. तेव्हां बाणांनी विदीर्ण झाल्यामुळें तुकडे तुकडे उडालेली ती गदा मंत्र आणि औषधि ह्यांच्या सामर्थ्यामुळें खालीं पाडिलेल्या सर्पिणीप्रमाणें भूतलावर पडली २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकुणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

संरब्धमिदमब्रवीत् १ एतत्ते बलसर्वस्वं दर्शितं राक्षसाधम। शक्तिहीनतरो मत्तो वृथा त्वमुपगर्जसि २ एषा बाणविनिर्भिन्ना गदा भूमितलं गता। अभिधानप्रगल्भस्य तव प्रत्ययघातिनी ३ यत्त्वयोक्तं विनष्टानामिदमश्रुप्रमार्जनम्। राक्षसानां करोमीति मिथ्या तदपि ते वचः ४ नीचस्य क्षुद्रशीलस्य मिथ्यावृत्तस्य रक्षसः। प्राणानपहरिष्यामि गरुत्मानमृतं यथा ५ अद्य ते भिन्नकण्ठस्य फेनबुद्बुदभूषितम्। विदारितस्य मद्बाणैर्मही पास्यति शोणितम् ६ पांसुरूषितसर्वाङ्गस्त्रस्तन्यस्तभुजद्वयः। स्वप्स्यसे मां समाश्लिष्य दुर्लभां प्रमदामिव ७ प्रवृद्धनिद्रे शयिते त्वयि राक्षसपांसने। भविष्यन्ति शरण्यानां शरण्या दण्डका इमे ८ जनस्थाने हतस्थाने तव राक्षस मच्छरैः। निर्भया विचरिष्यन्ति सर्वतो मुनयो वने ९ अद्य विप्रसरिष्यन्ति राक्षस्यो हतबान्धवाः। बाष्पार्द्रवदना दीना भयादन्यभयावहाः १० अद्य शोकरसज्ञास्ता भविष्यन्ति निरर्थिकाः। अनुरूप-

---

धर्मवत्सल राम, बाणानें ती गदा फोडून टाकिल्यावर क्षुब्ध झालेल्या खराला हंसत हंसत ह्मणाला १ "हे राक्षसाधमा, ही आपली काय ती सामर्थ्याची पुंजी तूं दर्शविलीस. तेव्हां माझ्यापेक्षां सामर्थ्यानें अतिशयच कमी असलेला तूं मात्र गर्जना करीत आहेस २. बोलण्यामध्यें मात्र केवल प्रगल्भ असलेल्या तुझ्या विश्वासाचा घात करणारी ही तुझी गदा माझ्या बाणांनीं विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडली आहे ३. "नष्ट झालेल्या राक्षसांचा उतराई होईन" ह्मणून जें तूं भाषण केलेंस तेंही तुझें भाषण मिथ्या आहे ४. आतां गरुडानें ज्याप्रमाणें अमृत हरण केलें त्याप्रमाणें स्वभावानें हलकट, नीच आणि असत्याचरण करणाऱ्या तुज राक्षसाचे प्राण मी हरण करीन ५. माझ्या बाणांच्या योगानें विदीर्ण होऊन शिरश्छेद झालेल्या तुझें फेन व बुडबुडे ह्यांनीं भूषित झालेलें रक्त आज पृथ्वी प्राशन करील ६. ज्याचें सर्वांग धुळीनें भरलें आहे आणि ज्यानें स्थानभ्रष्ट झालेले आपले दोन्ही बाहु भूमीवर ठेविले आहेत असा तूं, प्राप्त झालेल्या दुर्लभ स्त्रीप्रमाणें पृथ्वीला आलिंगन देऊन शयन करशील ७. राक्षसांनाही कलंक लावणारा तूं शयन करून महानिद्रेचा अनुभव घेऊं लागलास ह्मणजे सर्व लोकांना आश्रयभूत असलेल्या तपस्व्यांना हे दंडकारण्य सुखानें वास करण्यास योग्य होईल ८. हे राक्षसा, माझ्या बाणांच्या योगानें तुझ्या जनस्थानांतील राक्षसांचें वास्तव्य नाहीसें झालें ह्मणजे वनामध्यें मुनि चोहोंकडे निर्भय होऊन संचार करूं लागतील ९. दुसऱ्यांना भयावह असलेल्या राक्षसी बांधवांचा वध झाल्यामुळें आज दीन होतील आणि अश्रूंनीं मुखें आर्द्र झालीं असतांना जनस्थानां-

कुला: पत्न्यो यासां त्वं पतिरीदृशः ११ नृशंसशील क्षुद्रात्मन्निदं ब्राह्म-
णकण्टक । त्वत्कृते शङ्कितैरग्नौ मुनिभिः प्राप्यते हविः १२ तमेवमभि-
संरब्धं ब्रुवाणं राघवं वने । खरो निर्भर्त्सयामास रोषात्खरतरस्वरः १३
दृढं खल्ववलिप्तोसि भयेष्वपि च निर्भयः । वाच्यावाच्यं ततो हि त्वं
मृत्योर्वश्यो न बुध्यसे १४ कालपाशपरिक्षिप्ता भवन्ति पुरुषा हि ये ।
कार्याकार्यं न जानन्ति ते निरस्तषडिन्द्रियाः १५ एवमुक्त्वा ततो रामं
संरुध्य भ्रुकुटिं ततः । स ददर्श महासालमविदूरे निशाचरः १६ रणे
प्रहरणस्यार्थे सर्वतो ह्यवलोकयन् । स तमुत्पाटयामास संदष्टदशनच्छ-
दम् १७ तं समुत्क्षिप्य बाहुभ्यां विनर्दित्वा महाबलः । राममुद्दिश्य चिक्षेप
हतस्त्वमिति चाब्रवीत् १८ तमापतन्तं बाणौघैश्छित्त्वा रामः प्रतापवान् ।
रोषमाहारयत्तीव्रं निहन्तुं समरे खरम् १९ जातस्वेदस्ततो रामो रोषर-

---

तून पळत सुटतील १०. ज्यांचा तूं अशाप्रकारचा पापकर्मी पति आहेस आणि त्यामुळेंच ज्यांच्या कामादि पुरुषार्थांचा निःशेष नाश झाला आहे अशा तुझ्यासारिख्याच अधम कुलामध्यें उत्पन्न झालेल्या त्या तुझ्या पत्न्या आज शोकरस कसा असतो तें स्वानुभवानें जाणतील ११. हे दुष्टस्वभावि, हे क्षुद्रा, हे ब्राह्मणकंटका, तुझ्यामुळें मुनि भयभीतच होऊन अग्नीमध्यें नेहमीं हवन करीत असतात " १२. ह्याप्रमाणें वनामध्यें अत्यंत क्षुब्ध होऊन राम बोलूं लागला असतां अतिशय भयंकर स्वरानें युक्त असलेला खर क्रोधानें त्याची निर्भर्त्सना करूं लागला १३. ( तो ह्मणाला ) " तूं अतिशयच गर्विष्ठ झाला आहेस आणि ह्यामुळें भयकारक गोष्टींचेंही तुला भय वाटेनासें झालें आहे, व त्याचप्रमाणें तूं मृत्यूच्या अधीन झाला असूनही बोलावें कोणतें आणि न बोलावें कोणतें हेंही तुला समजेनासें झालें आहे १४. जे पुरुष कालपाशानें ग्रस्त झालेले असतात त्यांना अंतःकरण आणि पंचज्ञानेंद्रियें ह्यांनीं सोडिलें असल्यामुळें कार्याकार्यांचा विचार रहात नाहीं " १५. ह्याप्रमाणें रामाला बोलून आणि भिंवया चढवून त्या राक्षसानें जवळच असलेल्या एका मोठ्या सालवृक्षाकडे पाहिलें १६. संग्रामामध्यें प्रहार करण्याकरितां चोहोंकडे पहात असलेल्या त्या खरराक्षसानें दांतओंठ खाऊन तो वृक्ष उपटला १७ आणि हातांनीं गरगर फिरवून व मोठी गर्जना करून त्या महाबलाढ्य खरानें तो रामाकडे फेंकून दिला आणि फेंकून देतांना " तूं मेलास " असें तो ह्मणाला १८; परंतु, तो वृक्ष अंगावर येऊं लागला असतां प्रतापी रामानें बाणसमुदायांनीं त्याला तोडून टाकून संग्रामामध्यें खराचा वध करण्याकरितां तीव्र

कालकल्पेन । निर्बिभेद सहस्रेण बाणानां समरे खरम् २० तस्य बाणा-
न्तराद्रक्तं बहु सुस्राव फेनिलम् । गिरेः प्रस्रवणस्येव धाराणां च परि-
स्रवः २१ विह्वलः स कृतो बाणैः खरो रामेण संयुगे । मत्तो रुधिरग-
न्धेन तमेवाभ्यद्रवद्द्रुतम् २२ तमापतन्तं संक्रुद्धं कृतास्त्रो रुधिराप्लुतम् ।
अपासर्पद्द्वित्रिपदं किंचित्त्वरितविक्रमः २३ ततः पावकसंकाशं वधाय
समरे शरम् । खरस्य रामो जग्राह ब्रह्मदण्डमिवापरम् २४ स तद्दत्तं
मघवता सुरराजेन धीमता । संदधे च स धर्मात्मा मुमोच च खरं
प्रति २५ स विमुक्तो महाबाणो निर्घातसमनिःस्वनः । रामेण धनुरा-
यम्य खरस्योरसि चापतत् २६ स पपात खरो भूमौ दह्यमानः शराग्निना ।
रुद्रेणेव विनिर्दग्धः श्वेतारण्ये यथान्धकः २७ स वृत्र इव वज्रेण फेनेन

---

रोष धारण केला १९. तेव्हां रोषानें घाम येऊन नेत्रप्रांत आरक्तवर्ण झाले असतां रामानें समरांगणामध्यें हजार बाणांनीं खराला वेध केला २०. तेव्हां प्रस्रवणपर्वतावरील जलधारांच्या प्रवाहाप्रमाणें त्या खराच्या शरीराला बाणांनीं पडलेल्या क्षतांतून पुष्कळच फेंसाळलेलें रक्त वाहूं लागलें २१; परंतु, संग्रामामध्यें बाणांच्या योगानें रामानें जरी ह्याप्रमाणें त्या खराला परवश करून सोडिलें होतें तरी रक्ताच्या गंधानें तो मत्त होऊन पुनरपि त्या रामावरच धांवला २२. तेव्हां रक्तानें भरून गेलेला तो क्रुद्ध राक्षस धांवून येत आहे असें अवलोकन करून ( बाण मारितां यावा एतदर्थ ) सत्वर गमन करण्यास तो कृतास्त्र राम दोन तीन पावलें मागें सरला २३. तदनंतर संग्रामामध्यें खराच्या वधाकरितां प्रति ब्रह्मास्त्रच कीं काय असा एक अग्नीसारखा तेजस्वी बाण रामानें घेतला २४ आणि बुद्धिमान् देवराज इंद्रानें ( अगस्त्य मुनींच्या द्वारानें ) दिलेला तो बाण धनुष्याला लावून त्या महात्म्या रामानें खरराक्षसावर सोडिला २५ आणि रामानें धनुष्य आकर्षण करून सोडिलेला तो प्रचंड बाण, वायूवर वायु आदळून होणाऱ्या प्रचंड ध्वनीप्रमाणें गर्जना करीत करीत खरराक्षसाच्या वक्षःस्थलावर जाऊन पडला २६. तेव्हां रुद्रानें दग्ध केलेला अंधकासुर ज्याप्रमाणें श्वेतारण्यामध्यें पडला त्याप्रमाणें बाणरूप अग्नीनें जळूं लागलेला तो खर भूमीवर पडला २७. वज्रानें वध पावलेल्या वृत्रासुराप्रमाणें, जलफेनानें वध पाव-

---

१ " वज्रेण फेनेन " ह्या पदांचा मिळून अर्थ–टीकाकारांनीं " तदाच्छादितवज्रेण " ह्मणजे फेनानें आच्छादित झालेल्या वज्राच्या योगानें–असा केला आहे. परंतु, " वज्रेण " ह्या पदाचा संबंध " नमुचिः " ह्या पदाकडे घेणें चुकीचें आहे. कारण, श्रुतीमध्यें उदकावरील फेंसाच्या योगानेंच इंद्रानें नमुचि दैत्याचा वध केला असें सांगितलें आहे. "न मा शुष्केण नार्द्रेण हनः । न

नमुचिर्यथा। बलो वेन्द्राशनिहतो निपपात हतः खरः २८ एतस्मिन्नन्तरे देवाश्चारणैः सह संगताः। दुन्दुभींश्चाभिनिघ्नन्तः पुष्पवर्षं समन्ततः २९ रामस्योपरि संहृष्टा ववर्षुर्विस्मितास्तदा। अर्धाधिकमुहूर्तेन रामेण निशितैः शरैः ३० चतुर्दशसहस्राणि रक्षसां कामरूपिणाम्। खरदूषणमुख्यानां निहतानि महामृधे ३१ अहो बत महत्कर्म रामस्य विदितात्मनः। अहो वीर्यमहो दार्ढ्यं विष्णोरिव हि दृश्यते ३२ इत्येवमुक्त्वा ते सर्वे ययुर्देवा यथागतम् ३३ ततो राजर्षयः सर्वे संगताः परमर्षयः। सभाज्य मुदिता रामं सागस्त्या इदमब्रुवन् ३४ एतदर्थं महातेजा महेन्द्रः पाकशासनः। शरभङ्गाश्रमं पुण्यमाजगाम पुरंदरः ३५ आनीतस्त्वमिमं देशमुपायेन मह-

लेल्या नमुचि दैत्याप्रमाणें अथवा अशनिसंज्ञक आयुधानें वध पावलेल्या बल दैत्याप्रमाणें रामबाणानें वध पावलेला तो खर पृथ्वीवर पडला २८. ह्यावेळीं चारणांसहवर्तमान एकत्र मिळालेले देव दुंदुभि वाजवून आनंदानें रामावर सर्व बाजूंनीं विस्मयपूर्वक पुष्पवृष्टि करूं लागले आणि ह्मणाले " दीड मुहूर्तामध्यें रामानें तीक्ष्ण बाणांनीं २९,३० यथेष्ट रूप धारण करणाऱ्या खरदूषणप्रभृति चवदा हजार राक्षसांचा महासंग्राममध्यें वध केला ३१. तेव्हां पराक्रमानें विख्यात झालेल्या ह्या रामाचें काय हो तरी हें महत्कर्म! अहो ह्याचें वीर्य आणि धैर्य विष्णूप्रमाणें दिसत आहे " ३२. असें ह्मणून ते सर्व आले तसे निघून गेले. तदनंतर सर्व राजर्षि आणि महर्षि अगस्त्यमुनींसहवर्तमान आनंदित होऊन तेथें जुळले व रामाची प्रशंसा करून ह्मणाले ३३,३४ " ह्याचकरितां पाक दैत्याचा वध करणारा महातेजस्वी

दिवा न नक्तमिति। स एतमपां फेनमासिञ्चत्। न वा एष शुष्को नार्द्रो व्युष्टासीत्। अनुदितः सूर्यः। न वा एतद्दिवा न नक्तम्। तस्यैतस्मिँल्लोके। अपां फेनेन शिर उदवर्तयत्।" अशी त्या नमुचि दैत्याच्यासंबधानें श्रुति आहे व त्या श्रुतीचा अर्थ—मला शुष्क पदार्थानें अथवा आर्द्र पदार्थानें आणि त्याचप्रमाणें दिवसा अथवा रात्रीं मारूं नको असा नमुचीनें वर मागितला. तेव्हां इंद्रानें त्याच्यावर पाण्यावरील फेंस टाकिला. कारण, फेंस शुष्कही नाहीं आणि आर्द्रही नाही. त्यावेळीं पहाट झालेली असून सूर्योदय झालेला नव्हता, तेव्हां दिवस नाहीं आणि रात्र नाही अशीच ती वेळ होती. ह्मास्तव, अशा वेळीं उदकाच्या फेंसानें नमुचि दैत्याचें शिर इंद्रानें उडविलें—असा आहे. शुष्क पदार्थानें अथवा आर्द्र पदार्थानें वध न होण्याविषयीं नमुचि दैत्याला वर मिळाला होता हें विदित असल्यासारिखें टीकाकारांनीं दर्शविलें आहे. परंतु, फेंसासारिख्या पदार्थानें वध कसा होईल अशी शंका येऊनच कीं काय फेन या शब्दाचा अर्थ फेनानें आच्छादित असा जो टीकाकारांनीं केला आहे तो प्रत्यक्ष श्रुतीशींच विरुद्ध असल्यामुळें सर्वस्वी त्याज्य आहे.

र्षिभिः । एषां वधार्थं शत्रूणां रक्षसां पापकर्मणाम् ३६ तदिदं नः कृतं कार्यं त्वया दशरथात्मज । स्वधर्मं प्रचरिष्यन्ति दण्डकेषु महर्षयः ३७ एतस्मिन्नन्तरे वीरो लक्ष्मणः सह सीतया । गिरिदुर्गाद्विनिष्क्रम्य संविवेशाश्रमे सुखी ३८ ततो रामस्तु विजयी पूज्यमानो महर्षिभिः । प्रविवेशाश्रमं वीरो लक्ष्मणेनाभिपूजितः ३९ तं दृष्ट्वा शत्रुहन्तारं महर्षीणां सुखावहम् । बभूव हृष्टा वैदेही भर्तारं परिषस्वजे ४० मुदा परमया युक्ता दृष्ट्वा रक्षोगणान्हतान् । रामं चैवाव्ययं दृष्ट्वा तुतोष जनकात्मजा ४१ ततस्तु तं राक्षससङ्घमर्दनं संपूज्यमानं मुदितैर्महात्मभिः । पुनः परिष्वज्य मुदान्विताननना बभूव हृष्टा जनकात्मजा तदा ४२ [ १२७२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे त्रिंशः सर्गः ॥ ३० ॥

त्वरमाणस्ततो गत्वा जनस्थानादकम्पनः । प्रविश्य लङ्कां वेगेन रावणं वाक्यमब्रवीत् १ जनस्थानस्थिता राजन्राक्षसा बहवो हताः । खरश्च

---

महेंद्र शरभंग मुनींच्या पुण्य आश्रमाला आला होता ३५. ह्या पापकर्मी राक्षसशत्रूंचा वध करण्याकरितां महर्षींनीं तुला उपाय योजून ह्या प्रदेशामध्यें आणिलें होतें ३६. तें हें आमचें कार्य, हे दशरथपुत्रा रामा, तूं शेंवटास नेलें आहेस व ह्यामुळें दंडकारण्यामध्यें महर्षींना स्वधर्माचें आचरण करितां येईल ३७. हें त्यांचें बोलणें चाललें आहे तोंच वीर लक्ष्मण सीतेसहवर्तमान पर्वताच्या गुहेंतून बाहेर निघून आश्रमामध्यें सुखानें प्रविष्ट झाला ३८. तदनंतर महर्षि ज्याची प्रशंसा करीत आहेत असा तो विजयी वीर राम आश्रमामध्यें प्रविष्ट झाला असतां लक्ष्मणानें त्याची स्तुति केली ३९. महर्षींना सुख देणाऱ्या त्या शत्रुघातक भर्त्याला अवलोकन केल्यावर आनंदित झालेली सीता त्याला कडकडून भेटली ४० आणि पराकाष्ठेच्या आनंदानें युक्त झालेल्या त्या जनककन्या सीतेला, राक्षसगणांचा वध होऊन राम खुशाल आहे, असें आढळून आल्यावर संतोष झाला ४१. तदनंतर आनंदित झालेले महात्मे मुनि ज्याची प्रशंसा करीत आहेत अशा त्या आपल्या राक्षससमुदायांचें मर्दन करणाऱ्या भर्त्याला पुनरपि आलिंगन देऊन आधींच सानंद मुद्रेनें युक्त झालेल्या जनककन्येला हर्ष झाला ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

( युद्धांतून पळून गेलेला ) अकंपन राक्षस तदनंतर सत्वर जाऊन वेगानें लंकेमध्यें प्रविष्ट झाला आणि रावणाला ह्मणाला १ "हे राजा, जनस्थानांत असलेल्या असंख्य राक्षसांचा व खराचा संग्रामामध्यें वध झाला. मी ( प्रेक्षक असल्या कारणानें

निहतः संख्ये कथंचिदहमागतः २ एवमुक्तो दशग्रीवः क्रुद्धः संरक्तलोचनः । अकम्पनमुवाचेदं निर्दहन्निव तेजसा ३ केन भीमं जनस्थानं हतं मम परासुना । को हि सर्वेषु लोकेषु गतिं नाधिगमिष्यति ४ न हि मे विप्रियं कृत्वा शक्यं मघवता सुखम् । प्राप्तुं वैश्रवणेनापि न यमेन च विष्णुना ५ कालस्य चाप्यहं कालो दहेयमपि पावकम् । मृत्युं मरणधर्मेण संयोजयितुमुत्सहे ६ वातस्य तरसा वेगं निहन्तुमपि चोत्सहे । दहेयमपि संक्रुद्धस्तेजसादित्यपावकौ ७ तथा क्रुद्धं दशग्रीवं कृताञ्जलिरकम्पनः । भयात्संदिग्धया वाचा रावणं याचतेभयम् ८ दशग्रीवोभयं तस्मै प्रददौ रक्षसां वरः । स विस्रब्धोब्रवीद्वाक्यमसंदिग्धमकम्पनः ९ पुत्रो दशरथस्यास्ते सिंहसंहननो युवा । रामो नाम महास्कन्धो वृत्तायतमहाभुजः १० श्यामः पृथुयशाः श्रीमानतुल्यबलविक्रमः । हतस्तेन जनस्थाने खरश्च सहदूषणः ११ अकम्पनवचः श्रुत्वा रावणो राक्षसाधिपः ।

---

बाणाच्या तावडींत न सापडल्यामुळें जीव धरून ) कसा तरी येथें आलों " २. ह्याप्रमाणें अकंपनानें सांगितलें असतां रावण क्रुद्ध झाला, त्याचे नेत्र लाल झाले आणि तेजानें जळतच कीं काय तो अकंपनाला ह्मणाला ३ " ज्यानें माझें भयंकर जनस्थान मारून टाकिलें आहे तो खरोखर गतप्राण झालाच आहे असें मी समजतों. कारण, असें कर्म करणारा कोण बरें, सर्व लोकांमध्यें जरी हिंडला तरी, प्राप्त होणारें मरण टाळण्यास समर्थ होणार आहे ? ४. फार कशाला, माझी कुचळी काढून इंद्राला, कुबेराला, यमाला अथवा विष्णूलाही सुख प्राप्त होणें अशक्य आहे ५. कालाचाही मी काल आहें; अग्नीलाही मी दग्ध करून टाकीन; मृत्यूलाही मारण्याचें माझें सामर्थ्य आहे ६; जोरानें वायूचा वेगही नाहींसा करण्यास मी तयार आहें आणि क्रुद्ध झालों असतां तेजाच्या योगानें सूर्य व अग्नि ह्यांनाही मी जाळून टाकीन " ७. ह्याप्रमाणें दशानन रावण क्रुद्ध झाला असतां अकंपनानें हात जोडून भयामुळें 'अडखळत अडखळत त्या रावणापाशीं अभय मिळण्याविषयीं प्रार्थना केली ८. तेव्हां राक्षसांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रावणानें त्याला अभय दिल्यावर धीर आलेला तो अकंपन निःसंदेहपणें रावणाला ह्मणाला ९ " दशरथाचा एक राम ह्मणून तरुण पुत्र आहे; उत्कृष्ट अवयव आणि सौंदर्य ह्यांनीं तो युक्त आहे; त्याचे स्कंध मोठे मोठे आहेत; बाहु वर्तुल, विस्तीर्ण आणि दीर्घ आहेत १०; कांतीनें तो महायशस्वी राम श्यामवर्ण आहे व त्या श्रीमान् रामाच्या बलाला व पराक्रमाला कोठेंच तोड नाहीं आणि त्यानेंच जनस्थानामध्यें दूषणासहवर्तमान खराचा वध केला आहे " ११.

नागेन्द्र इव निःश्वस्य इदं वचनमब्रवीत् १२ स सुरेन्द्रेण संयुक्तो रामः सर्वामरैः सह। उपायातो जनस्थानं ब्रूहि कच्चिदकम्पन १३ रावणस्य पुनर्वाक्यं निशम्य तदकम्पनः। आचचक्षे बलं तस्य विक्रमं च महात्मनः १४ रामो नाम महातेजाः श्रेष्ठः सर्वधनुष्मताम्। दिव्यास्त्रगुणसंपन्नः पुरं धर्मं गतो युधि १५ तस्यानुरूपो बलवान्रक्ताक्षो दुन्दुभिस्वनः कनीयांल्लक्ष्मणो भ्राता राकाशशिनिभाननः १६ स तेन सह संयुक्तः पावकेनानिलो यथा। श्रीमान्राजवरस्तेन जनस्थानं निपातितम् १७ नैव देवा महात्मानो नात्र कार्या विचारणा। शरा रामेण तूत्सृष्टा रुक्मपुङ्खाः पतत्रिणः १८ सर्पाः पञ्चानना भूत्वा भक्षयन्ति स्म राक्षसान्। येन येन च गच्छन्ति राक्षसा भयकर्षिताः १९ तेन तेन स्म पश्यन्ति राममेवाग्रतः स्थितम्। इत्थं विनाशितं तेन जनस्थानं तवानघ २० अकम्पनवचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत्। गमिष्यामि जनस्थानं रामं हन्तुं सलक्ष्मणम् २१ अथैवमुक्ते वचने प्रोवाचेदमकम्पनः। शृणु राजन्यथावृत्तं

---

हें अकंपनाचें भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण नागराजाप्रमाणें सुस्कारा टाकून ह्मणाला १२ " हे अकंपना, तो राम इंद्रासहवर्तमान असून सर्व देवांबरोबर जनस्थानामध्यें आला होता की काय तें सांग " १३. हा रावणाचा दुसरा प्रश्न ऐकून घेऊन अकंपन त्या महात्म्या रामाचा पराक्रम व सामर्थ्य त्याला सांगूं लागला १४. (तो ह्मणाला) " राम ह्मणजे महातेजस्वी असून सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ आहे. दिव्यास्त्ररूप साधनांनीं तो संपन्न आहे आणि युद्धामध्यें पराकाष्ठेचें शौर्य गाजविणारा आहे १५. त्याला योग्य असाच त्याचा एक लक्ष्मण ह्मणून बलाढ्य कनिष्ठ भ्राता आहे. त्याचे नेत्र आरक्तवर्ण असून आवाज दुंदुभीप्रमाणें गंभीर आहे आणि पौर्णिमेच्या चंद्रासारिखें त्याचें मुख आहे १६. अग्नीशीं संयुक्त होणाऱ्या वायूप्रमाणें तो श्रीमान् राजाधिराज राम लक्ष्मणाशीं संयुक्त झाला आहे आणि त्यानेंच जनस्थानाचा निःपात केला आहे १७. महात्मे देव तेथें मुळींच आले नाहींत; ह्याविषयीं मुळींच शंका नको. सुवर्णभूषित पिसांनीं युक्त असलेले बाण एकटा रामच सोडीत होता १८ आणि तेच बाण पंचमुखी सर्प होऊन राक्षसांना भक्षण करीत होते. भयग्रस्त झालेले राक्षस जिकडे जिकडे जात असत १९ तिकडे तिकडे समोर उभा असलेला रामच त्यांच्या दृष्टीं पडे. ह्याप्रमाणें, हे निष्पापा, त्यानें जनस्थानाचा नाश केला " २०. हें अकंपनाचें भाषण श्रवण करून " मी लक्ष्मणासहवर्तमान रामाचा वध करण्याकरितां जनस्थानामध्यें जातों " असें रावण त्याला ह्मणाला २१; परंतु, रावण असें

रामस्य बलपौरुषम् २२ असाध्यः कुपितो रामो विक्रमेण महायशाः । आपगायास्तु पूर्णाया वेगं परिहरेच्छरैः २३ सताराग्रहनक्षत्रं नभश्चाप्यवसादयेत् । असौ रामस्तु सीदन्तीं श्रीमानभ्युद्धरेन्महीम् २४ भित्त्वा वेलां समुद्रस्य लोकानाप्लावयेद्विभुः । वेगं वापि समुद्रस्य वायुं वा विधमेच्छरैः २५ संहृत्य वा पुनर्लोकान्विक्रमेण महायशाः । शक्तः श्रेष्ठः स पुरुषः स्रष्टुं पुनरपि प्रजाः २६ न हि रामो दशग्रीव शक्यो जेतुं रणे त्वया । रक्षसां वापि लोकेन स्वर्गः पापजनैरिव २७ न तं वध्यमहं मन्ये सर्वैर्देवासुरैरपि । अयं तस्य वधोपायस्तन्ममैकमनाः शृणु २८ भार्या तस्योत्तमा लोके सीता नाम सुमध्यमा । श्यामा समविभक्ताङ्गी स्त्रीरत्नं रत्नभूषिता २९ नैव देवी न गन्धर्वी नाप्सरा न च पन्नगी । तुल्या सीमन्तिनी तस्य मानुषी तु कुतो भवेत् ३० तस्यापहर भार्यां त्वं तं प्रमथ्य महावने । सीतया रहितो रामो न चैव हि भविष्यति ३१ अरोचयत तद्वाक्यं रावणो राक्षसाधिपः ।

---

बोलल्यावर अकंपन त्याला ह्मणाला " हे राजा, रामाचें वर्तन, बल व पराक्रम तूं श्रवण कर २२. राम क्रुद्ध झाला असतां पराक्रम करून त्याचा पराजय करणें अशक्य आहे. कारण, भरून चाललेल्या नदीचाही वेग तो बाणांच्या योगानें परत फिरवील २३; तारा, ग्रह आणि नक्षत्रें ह्यांसहवर्तमान आकाशही खालीं पाडील आणि हा श्रीमान् राम पृथ्वी रसातलाला जाऊं लागली असतां तिचाही उद्धार करील २४. समुद्राची मर्यादा नाहींशी करून हा समर्थ राम लोकांना बुडवून टाकील आणि बाणांच्या योगानें समुद्राचा वेगही नाहींसा करून वायूलाही उडवून देईल २५. इतकेंच नव्हे परंतु, स्वपराक्रमानें लोकांचा संहार करून तो महायशस्वी श्रेष्ठ पुरुष राम पुनरपि प्रजा उत्पन्न करण्यास समर्थ आहे २६. हे दशानन, पापी लोकांना स्वर्ग प्राप्त होणें ज्याप्रमाणें अशक्य आहे त्याचप्रमाणें संग्रामामध्यें तुझ्या हातून अथवा राक्षससमुदायाच्या हातून रामाचा पराजय होणें अशक्य आहे २७. सर्व देवदैत्यांच्या हातूनही संग्रामामध्यें त्याचा वध होईल असें मला वाटत नाहीं. त्याच्या वधाचा हा एक उपाय आहे; तो तूं एकचित्तानें माझ्यापासून श्रवण कर २८. सीता ह्मणून त्याची एक अतिशय सुंदर व जगतामध्यें उत्कृष्ट भार्या आहे. ती नेहमीं तरुण रहाणारी आहे, तिच्या अवयवांची ठेवण सारखी व रेखलेली आहे आणि रत्नांनीं ती भूषित झालेली असून सर्व स्त्रियांमध्यें उत्कृष्ट आहे २९. देवांगना, गंधर्वस्त्री, अप्सरा अथवा नागकन्या ह्यांतही तिच्यासारिखी कोणी नाहीं; मग मनुष्यजातीची स्त्री तिच्यासारिखी कोठून असणार ? ३०. तेव्हां कोणाच्या तरी उपायानें महावनामध्यें त्याचें उच्चाटण

चिन्तयित्वा महाबाहुरकम्पनमुवाच ह ३२ बाढं कल्यं गमिष्यामि एकः सारथिना सह । आनेष्यामि च वैदेहीमिमां हृष्टो महापुरीम् ३३ तदेवमुक्त्वा प्रययौ खरयुक्तेन रावणः । रथेनादित्यवर्णेन दिशः सर्वाः प्रकाशयन् ३४ स रथो राक्षसेन्द्रस्य नक्षत्रपथगो महान् । चञ्चूर्यमाणः शुशुभे जलदे चन्द्रमा इव ३५ स दूरे चाश्रमं गत्वा ताटकेयमुपागमत् । मारीचेनार्चितो राजा भक्ष्यभोज्यैरमानुषैः ३६ तं स्वयं पूजयित्वा तु आसनेनोदकेन च । अर्थोपहितया वाचा मारीचो वाक्यमब्रवीत् ३७ कच्चित्सुकुशलं राजँल्लोकानां राक्षसाधिप । आशङ्के नाधिजाने त्वं यतस्तूर्णमुपागतः ३८ एवमुक्तो महातेजा मारीचेन स रावणः । ततः पश्चादिदं वाक्यमब्रवीद्वाक्यकोविदः ३९ आरक्षो मे हतस्तात रामेणाक्लिष्टकारिणा । जनस्थानमवध्यं तत्सर्वं युधि निपातितम् ४० तस्य मे कुरु साचिव्यं तस्य भार्यापहारणे । राक्षसेन्द्रवचः श्रुत्वा मारीचो वाक्यम-

---

करून तूं त्याची भार्या हरण कर. कारण, सीतेचा विरह झाला असतां राम जिवंत रहाणार नाहीं " ३१. हें त्याचें भाषण राक्षसाधिपति रावणाला रुचलें आणि तो महापराक्रमी रावण विचार करून त्याला ह्मणाला ३२ " ठीक आहे. मी प्रातःकालीं सारथ्यासहवर्तमान एकटा जाईन आणि आनंदानें ह्या मोठ्या नगरीमध्यें सीतेला घेऊन येईन " ३३. ह्याप्रमाणें अकंपनाला सांगितल्यावर तो रावण गर्दभ जोडिलेल्या आणि सूर्यासारिखा तेजस्वी असलेल्या रथामध्यें आरूढ होऊन सर्व दिशा प्रकाशित करीत करीत निघाला ३४. तेव्हां राक्षसाधिपति रावणाचा नक्षत्रमार्गानें जाणारा तो रथ मेघांतून एकसारख्या जाणाऱ्या चंद्राप्रमाणें शोभूं लागला ३५. तो रावण दूर असलेल्या मारीचाश्रमाला गेल्यावर ताटकापुत्र मारीचाकडे गेला असतां त्या मारीचानें अमानुष प्राण्यालाच योग्य अशा भक्ष्य व भोज्य पदार्थांनीं त्या राजाचा सत्कार केला ३६ आणि ह्याप्रमाणें आसन, उदक वगैरे देऊन त्याचें स्वतः पूजन केल्यावर अर्थसंपन्न वाणीनें मारीच त्याला ह्मणाला ३७ " हे राक्षसाधिपते राजा, राक्षस लोकांचें कुशल आहे ना ? ज्याअर्थीं तूं सत्वर येथें निघून आला आहेस त्याअर्थीं मला ते कुशल आहेतसें दिसत नाहीं; मला भयाची शंका येत आहे " ३८. ह्याप्रमाणें मारीच बोलला असतां संभाषण करण्यामध्यें प्रवीण असलेला तो रावण त्याचें बोलणें ऐकून घेतल्यानंतर त्याला ह्मणाला ३९ " बा मारीचा, माझ्या सीमारक्षकाचा अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या रामानें वध केला असून युद्धामध्यें अवध्य असलेल्या त्या सर्व जनस्थानाचाही निःपात करून टाकिला आहे ४०

प्रवीत् ४१ आख्याता केन वा सीता मित्ररूपेण शत्रुणा । त्वया राक्षसशार्दूल को न नन्दति नन्दितः ४२ सीतामिहानयस्वेति को ब्रवीति ब्रवीहि मे । रक्षोलोकस्य सर्वस्य कः शृङ्गं छेत्तुमिच्छति ४३ प्रोत्साहयति यश्च त्वां स च शत्रुरसंशयम् । आशीविषमुखाद्दंष्ट्रामुद्धर्तुं चेच्छति त्वया ४४ कर्मणानेन केनासि कापथं प्रतिपादितः । सुखसुप्तस्य ते राजन्प्रहृतं केन मूर्धनि ४५ विशुद्धवंशाभिजनाग्रहस्तस्तेजोमदः संस्थितदोर्विषाणः । उदीक्षितुं रावण नेह युक्तः स संयुगे राघवगन्धहस्ती ४६ असौ रणान्तःस्थितिसंधिवालो विदग्धरक्षोमृगहा नृसिंहः । सुप्तस्त्वया बोधयितुं न शक्यः शराङ्गपूर्णो निशितासिदंष्ट्रः ४७ चापापहारे भुजवेगपङ्के शरोर्मिमाले सुमहाहवौघे । न रामपातालमुखेऽतिघोरे प्रस्कन्दितुं राक्षसराज युक्तम् ४८ प्रसीद लङ्केश्वर राक्षसेन्द्र लङ्कां प्रसन्नो

---

तेव्हां त्याची भार्या हरण करण्याकरितां तूं मला साहाय्य कर." हें राक्षसाधिपति रावणाचें भाषण श्रवण केल्यावर मारीच ह्मणाला ४१ "हे राक्षसश्रेष्ठा, कोणत्या मित्ररूप शत्रूनें तुला सीता हरण करण्यास सांगितलें आहे ? अरे, दानादिकांच्या योगानें तूं संतुष्ट केलेला असा कोण पुरुष तुझ्याशीं द्वेष करीत आहे ? ४२. "येथें सीतेला घेऊन ये " असें कोण ह्मणत आहे तें मला सांग. सर्व राक्षस लोकांची उन्नति नाहींशी करण्याची कोण इच्छा करीत आहे ? (तें एकदां मला कळूं दे) ४३. ह्या कृत्याविषयीं जो तुला प्रोत्साहन देत आहे तो निःसंशय तुझा शत्रु आहे आणि तुझ्याकडून सर्पाच्या मुखांतील दाढ उपटून काढण्याची तो इच्छा करीत आहे ४४. ह्या कर्माचा उपदेश करून तुला कोणीं नाशाच्या मार्गाला लावून दिलें आहे ? व, हे राजा, तूं सुखानें निजला असतांना तुझ्या मस्तकावर कोणीं प्रहार केला आहे ? ( हें मला समजूं दे ) ४५. शुद्ध कुलामध्यें जन्म हीच ज्याची शुंडा, प्रताप हाच ज्याचा मद आणि बांधेसूद बाहु हेच ज्याचे दांत अशा त्या रामरूप मत्त गजाकडे संग्रामामध्यें ह्या प्रसंगीं नुसतें पहाणेंही योग्य नाहीं; मग, हे रावणा, त्याच्याशीं युद्ध करण्याची तर गोष्ट कशाला पाहिजे ? ४६. रणामध्यें असणें हेंच ज्याचे संधि व केश आहेत; रणशूर राक्षसरूप मृगांचा जो वध करणारा आहे, बाणरूप अंगांनीं जो परिपूर्ण आहे आणि तीक्ष्ण खड्गरूप दंष्ट्रांनीं जो युक्त आहे अशा ह्या घोरत पडलेल्या पुरुषसिंह रामाला डवचणें योग्य नाहीं ४७. हे राक्षसराजा, धनुष्य हाच ज्यांतील ग्राह, हारक नक्र आहे, भुजांचा वेग हाच ज्यांतील चिखल आहे, बाण हाच ज्यांतील लाटा आहेत व प्रचंड संग्राम हाच ज्यांतील जलप्रवाह आहे अशा ह्या पातालापर्यंत

मन साधु गच्छ । त्वं स्वेषु दारेषु रमस्व नित्यं रामः सभार्यो रमतां वनेषु ४९ एवमुक्तो दशग्रीवो मारीचेन स रावणः । न्यवर्तत पुरीं लङ्कां विवेश च गृहोत्तमम् ५० [ १३२२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्ड एकत्रिंशः सर्गः ॥ ३१ ॥

ततः शूर्पणखा दृष्ट्वा सहस्राणि चतुर्दश । हतान्येकेन रामेण रक्षसां भीमकर्मणाम् १ दूषणं च खरं चैव हतं त्रिशिरसं रणे । दृष्ट्वा पुनर्महानादान्ननाद जलदोपमा २ सा दृष्ट्वा कर्म रामस्य कृतमन्यैः सुदुष्करम् । जगाम परमोद्विग्ना लङ्कां रावणपालिताम् ३ सा ददर्श विमानाग्रे रावणं दीप्ततेजसम् । उपोपविष्टं सचिवैर्मरुद्भिरिव वासवम् ४ आसीनं सूर्यसङ्काशे काञ्चने परमासने । रुक्मवेदिगतं प्राज्यं ज्वलन्तमिव पावकम् ५ देवगन्धर्वभूतानामृषीणां च महात्मनाम् । अजेयं समरे घोरं व्यात्ताननमिवान्तकम् ६ देवासुरविमर्देषु वज्राशनिकृतव्रणम् । ऐरावतविषाणाग्र-

---

प्रविष्ट झालेल्या रामरूप महाभयंकर सागराच्या वडवानलरूप मुखामध्यें जाऊन पडणें योग्य नाहीं ४८. हे लंकाधिपते, तूं प्रसन्न हो आणि, हे राक्षसराजा, आपलें मन निर्मल करून तूं खुशाल लंकेला जा. तूं स्वस्त्रीचे ठिकाणीं नेहमीं रममाण होत जा आणि रामालाही वनामध्यें आपल्या भार्येसहवर्तमान रममाण होऊं दे " ४९. ह्याप्रमाणें मारीचानें दशकंठ रावणाला सांगितलें असतां तो लंकानगरीला परत गेला आणि आपल्या उत्कृष्ट गृहामध्यें प्रविष्ट झाला ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

तदनंतर एकट्या रामानें भयंकर कर्म करणाऱ्या चवदा हजार राक्षसांचा आणि दूषण, खर व त्रिशिरा ह्यांचाही संग्रामामध्यें वध केल्याचें अवलोकन करून वर्णानें मेघासारिखी असलेली ती शूर्पणखा पुनरपि मोठमोठ्या गर्जना करूं लागली १, २ आणि इतरांना अत्यंत दुष्कर असें रामानें केलेलें तें कर्म अवलोकन केल्यावर अत्यंत उद्विग्न झालेली ती शूर्पणखा रावणानें परिपालन केलेल्या लंकेमध्यें गेली ३ व मरुद्गणांसहवर्तमान असणाऱ्या आणि इंद्राप्रमाणें सचिवांसहवर्तमान सातमजली वाड्याच्या गच्चीवर बसलेल्या उज्ज्वल व तेजस्वी रावणाला तिनें अवलोकन केलें ४. ज्याच्यामध्यें पुष्कळ आज्यहोम केलेला आहे आणि ह्मणूनच जो प्रज्वलित आहे अशा सुवर्णनिर्मित स्थंडिलावर असलेल्या अग्नीप्रमाणें सुवर्णनिर्मित व प्रभेनें सूर्यासारिख्या असलेल्या उत्कृष्ट आसनावर बसलेला तो रावण दिसत होता ५. देव, गंधर्व, भूतें आणि महात्मे ऋषि ह्यांना समरांगणामध्यें अजिंक्य असलेला तो घोर रावण जबडा पसरलेल्या मृत्यूप्रमाणें

…कर्किणवक्षसम् ७ विंशद्भुजं दशग्रीवं दर्शनीयपरिच्छदम् । विशालवक्षसं वीरं राजलक्षणलक्षितम् ८ नद्धवैदूर्यसंकाशं तप्तकाञ्चनभूषणम् । सुभुजं शुक्लदशनं महास्यं पर्वतोपमम् ९ विष्णुचक्रनिपातैश्च शतशो देवसंयुगे । अन्यैः शस्त्रैः प्रहारैश्च महायुद्धेषु ताडितम् १० अहताङ्गैः समस्तैस्तं देवप्रहरणैस्तदा । अक्षोभ्याणां समुद्राणां क्षोभणं क्षिप्रकारणम् ११ क्षेप्तारं पर्वताग्राणां सुराणां च प्रमर्दनम् । उच्छेत्तारं च धर्माणां परदाराभिमर्शनम् १२ सर्वदिव्यास्त्रयोक्तारं यज्ञविघ्नकरं सदा । पुरीं भोगवतीं गत्वा पराजित्य च वासुकिम् १३ तक्षकस्य प्रियां भार्यां पराजित्य जहार यः । कैलासं पर्वतं गत्वा विजित्य नरवाहनम् । १४ विमानं पुष्पकं तस्य कामगं वै जहार यः । वनं चैत्ररथं दिव्यं नलिनीं नन्दनं वनम् १५ विनाशयति यः क्रोधाद्देवोद्यानानि वीर्यवान् । चन्द्रसूर्यौ महाभागावुत्तिष्ठन्तौ परन्तपौ १६ निवारयति बाहुभ्यां यः शैलशिखरोपमः । दश-

---

भासत होता ६. देवदैत्यांच्या युद्धामध्यें वज्र आणि अशनि ह्या आयुधांनीं त्याला जखमा झालेल्या होत्या आणि ऐरावत गजाच्या दांतांचे अग्रांनीं झालेल्या खुणा त्याच्या वक्षःस्थलावर होत्या ७. वीस बाहु, दहा कंठ, दर्शनीय सरंजाम, विशाल वक्षःस्थल आणि राजचिन्हें ह्यांनीं तो वीर युक्त होता ८. शरीरावर घातलेल्या वैडूर्यमण्याप्रमाणें त्याची कांति होती, उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें त्यानें धारण केलेलीं होतीं, त्याचे भुज उत्कृष्ट होते, दंत शुभ्रवर्ण होते, मुख विशाल होतें आणि शरीर पर्वतासारिखें धिप्पाड होतें ९. देवांच्या युद्धामध्यें विष्णूच्या सुदर्शन चक्राचे शेंकडों प्रहार त्याच्या अंगावर झालेले होते व महायुद्धामध्यें इतर शस्त्रांचेही प्रहार त्याला लागलेले होते १०. ज्यांचे अवयव शाबूत आहेत अशा सर्व देवांच्या शस्त्रांनीं ताडित झालेला तो रावण चपल असून कधींही न क्षोभणाऱ्या समुद्रांनाही क्षोभ उत्पन्न करणारा होता ११. तो पर्वतशिखरें फेंकून देणारा होता, देवांचें मर्दन करणारा होता, धर्मांचा उच्छेदक होता आणि परस्त्रीवर लक्ष्य ठेवणारा होता १२. तो सर्व दिव्य अस्त्रें योजणारा असून नेहमीं यज्ञाला विघ्न करणारा होता. त्यानें एकदां पातालामध्यें भोगवती नगरीला जाऊन आणि वासुकीचा पराजय करून १३ तक्षकाची प्रिय भार्या जिंकून आणिली होती. त्याचप्रमाणें कैलास पर्वतावर जाऊन आणि कुबेराला जिंकून १४ बसणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें गमन करणारें त्याचें पुष्पक विमान त्यानें हरण करून आणिलें होतें. दिव्य चैत्ररथवन, तेथील सरोवर, नंदनवन १५ आणि देवांच्या बागा ह्यांचा तो वीर्यवान् रावण नाश करीत असे. शत्रूंना ताप देणारे महाभाग्यवान् चंद्रसूर्य

वर्षसहस्राणि तपस्तप्त्वा महावने १७ पुरा स्वयंभुवे धीरः शिरांस्युपजहार यः । देवदानवगन्धर्वपिशाचपतगोरगैः १८ अभयं यस्य सङ्ग्रामे मृत्युतो मानुषादृते । मन्त्रैरभिष्टुतं पुण्यमध्वरेषु द्विजातिभिः १९ हविर्धानेषु यः सोममुपहन्ति महाबलः । प्राप्तयज्ञहरं दुष्टं ब्रह्मघ्नं क्रूरकारिणम् २० कर्कशं निरनुक्रोशं प्रजानामहिते रतम् । रावणं सर्वभूतानां सर्वलोकभयावहम् २१ राक्षसी भ्रातरं क्रूरं सा ददर्श महाबलम् । तं दिव्यवस्त्राभरणं दिव्यमाल्योपशोभितम् २२ आसने सूपविष्टं तं कालेकालमिवायतम् । राक्षसेन्द्रं महाभागं पौलस्त्यकुलनन्दनम् २३ उपगम्याब्रवीद्वाक्यं राक्षसी भयविह्वला । रावणं शत्रुहन्तारं मन्त्रिभिः परिवारितम् २४ तमब्रवीद्दीप्तविशाललोचनं प्रदर्शयित्वा भयलोभमोहिता । सुदारुणं वाक्यमभीतचारिणी महात्मना शूर्पणखा विरूपिता २५ [१३४७] इत्यार्षे

---

उदय पावूं लागले असतां १६ पर्वतशिखराप्रमाणें असलेला तो रावण आपल्या बाहूंनीं त्यांचें निवारण करीत असे. दहाहजार वर्षें महावनामध्यें तपश्चर्या करून १७ पूर्वी स्वयंभू शंकराला त्या ज्ञानी रावणानें आपलीं मस्तकें अर्पण केलीं होतीं. देव, दानव, गंधर्व, पिशाच, पक्षी आणि उरग ह्यांच्याशीं १८ संग्राम करण्यामध्यें त्याला मुळींच भय नव्हतें आणि मनुष्याशिवाय इतरांपासून त्याला मृत्यूचेंही भय राहिलें नव्हतें. यज्ञामध्यें ब्राह्मणांनीं मंत्रांच्या योगानें स्तुति केलेल्या पवित्र सोमाचा तो महाबलाढ्य रावण हविर्धान संज्ञक यज्ञशालामध्यें नाश करीत असे, उपस्थित झालेला यज्ञ उध्वस्त करीत असे व दुष्ट आणि ब्रह्मघातकी असून क्रूर कर्म करणारा असे १९,२०. इतकेंच नव्हे परंतु, निष्ठुर, निर्दय, सर्व लोकांना भय उत्पन्न करणारा आणि सर्व प्राण्यांना आक्रोश करावयाला लावणारा तो रावण लोकांच्या अहिताविषयीं तत्पर असे २१. असो. अशा प्रकारचा तो महाबलाढ्य क्रूर भ्राता दिव्य वस्त्रें व भूषणें धारण करून दिव्य पुष्पमालांनीं भूषित झालेला त्या शूर्पणखा राक्षसीनें अवलोकन केला २२ आणि प्रलयकालीं संहार करण्यास उद्युक्त झालेल्या कालाप्रमाणें तो पौलस्त्य कुलनंदन महाभाग्यवान् राक्षसाधिपति रावण सिंहासनावर बसला असतांना २३ भयानें विह्वल झालेली ती शूर्पणखा राक्षसी त्याच्या जवळ गेली आणि मंत्र्यांनीं परिवेष्टित असलेल्या त्या शत्रुघातक रावणाला तिनें हकीकत कळविली २४. सारांश, सर्व लोकांमध्यें निर्भयपणें संचार करणारी, महात्म्या लक्ष्मणानें विरूप करून टाकिलेली आणि ( रामविषयक ) भयानें व लोभानें मोहित झालेली ती शूर्पणखा आपली विरूपता दाखवून देदीप्यमान आणि विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या रावणाशीं

श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

ततः शूर्पणखा दीना रावणं लोकरावणम् । अमात्यमध्ये संक्रुद्धा परुषं वाक्यमब्रवीत् १ प्रमत्तः कामभोगेषु स्वैरवृत्तो निरङ्कुशः । समुत्पन्नं भयं घोरं बोद्धव्यं नावबुध्यसे २ सक्तं ग्राम्येषु भोगेषु कामवृत्तं महीपतिम् । लुब्धं न बहु मन्यन्ते स्मशानाग्निमिव प्रजाः ३ स्वयं कार्याणि यः काले नानुतिष्ठति पार्थिवः । स तु वै सह राज्येन तैश्च कार्यैर्विनश्यति ४ अयुक्तचारं दुर्दर्शमस्वाधीनं नराधिपम् । वर्जयन्ति नरा दूरान्नदीपङ्कमिव द्विपाः ५ ये न रक्षन्ति विषयमस्वाधीनं नराधिपाः । ते न वृद्ध्या प्रकाशन्ते गिरयः सागरे यथा ६ आत्मवद्भिर्विगृह्य त्वं देवगन्धर्वदानवैः। अयुक्तचारश्चपलः कथं राजा भविष्यसि ७ त्वं तु बालस्वभावश्च बुद्धिहीनश्च राक्षस। ज्ञातव्यं तं न जानीषे कथं राजा भविष्यसि ८ येषां चाराश्च कोशश्च नयश्च जयतां वर। अस्वाधीनां नरे-

---

फारच कठोर भाषण करू लागली २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥३२॥

तदनंतर क्रोधानें प्रदीप्त झालेली ती शूर्पणखा लोकांना आक्रोश करावयाला लावणाऱ्या रावणाला अमात्यांमध्यें मर्मभेदक शब्दांनीं ह्मणाली १ "विषयोपभोगांमध्यें अत्यंत आसक्त, स्वैरवृत्ति आणि निरंकुश असा तूं असल्यामुळें प्राप्त झालेलें घोर भय जाणिलें नाहींस २. प्रजाजन विषयोपभोगांमध्यें आसक्त होऊन स्वैच्छ राजाला, स्मशानांतील अग्नीला ज्याप्रमाणें स्पर्श करीत नाहींत त्याप्रमाणें स्पर्श न करून, मान देत नाहींत ३. जो पृथ्वीपति प्रसंगविशेषीं आपण होऊन आपलीं कामें करीत नाहीं त्याचा, तीं कार्यें आणि राज्य ह्यांसहवर्तमान नायनाट होतो ४. हेरांकडून माहिती न मिळविणाऱ्या, योग्य कालीं प्रजाजनाला, दर्शन न देणाऱ्या व स्त्रीवश झालेल्या नराधिपाला, हत्ती ज्याप्रमाणें नदीच्या चिखलाला दूर टाकून देतात त्याप्रमाणें लोक सोडून जातात ५. जे भूपति प्रथमतः आपल्या ताब्यांत गेलेल्या देशाचें (तो आपल्या ताब्यांत घेऊन ) रक्षण करीत नाहींत ते किती जरी संपन्न असले तथापि समुद्रांत बुडालेल्या पर्वताप्रमाणें प्रकाशमान होत नाहींत ६. बाह्य इंद्रियांसहवर्तमान अंतःकरणाचा जय करणाऱ्यांशीं विरोध करून आणि देव, गंधर्व व दानव ह्यांशीं वैर माजवून हेरांकडून माहिती न मिळवितां चंचल वृत्ति धारण करणारा तूं राजा कसा होशील ? ७. हे राक्षसा, तूं पोरकट स्वभावाचा व बुद्धिहीन असा असून जें अवश्य जाणण्यास पाहिजे तें जाणीत नाहींस. तेव्हां तूं राजा कसा होशील ? ८. हे शत्रूंना

न्द्राणां प्राकृतैस्ते जनैः समाः ९ यस्मात्पश्यन्ति दूरस्थान्सर्वानर्थान्नराधिपाः । चारेण तस्मादुच्यन्ते राजानो दीर्घचक्षुषः १० अयुक्तचारं मन्ये त्वां प्राकृतैः सचिवैर्युतः । स्वजनं च यतः स्थानं निहतं नावबुध्यसे ११ चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । हतान्येकेन रामेण खरश्च सहदूषणः १२ ऋषीणामभयं दत्तं कृतक्षेमाश्च दण्डकाः । धर्षितं च जनस्थानं रामेणाक्लिष्टकारिणा १३ त्वं तु लुब्धः प्रमत्तश्च पराधीनश्च राक्षस । विषये स्वे समुत्पन्नं यद्भयं नावबुध्यसे १४ तीक्ष्णमल्पप्रदातारं प्रमत्तं गर्वितं शठम् । व्यसने सर्वभूतानि नाभिधावन्ति पार्थिवम् १५ अतिमानिनमग्राह्यमात्मसंभावितं नरम् । क्रोधनं व्यसने हन्ति स्वजनोऽपि नराधिपम् १६ नानुतिष्ठति कार्याणि भयेषु न बिभेति च । क्षिप्रं राज्याच्च्युतो दीनस्तृणैस्तुल्यो भवेदिह १७ शुष्ककाष्ठैर्भवेत्कार्यं लोष्ठैरपि च पांसुभिः । न तु स्थानात्परिभ्रष्टैः कार्यं स्याद्वसुधाधिपैः १८ उपभुक्तं

---

जिंकणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ रावणा, गुप्त हेर, भांडारखाना आणि नीति हीं ज्या भूपतींच्या स्वाधीन नाहींत ते राज्यसूत्रें चालविण्यास अयोग्य असलेल्या सामान्य दासासारिखच होत ९. राजे लोक हेररूपी चक्षूंच्या योगानें दूरदूरच्या सर्व गोष्टी जाणून घेतात ह्मणून त्यांना दीर्घचक्षू ह्मणतात १०. तूं प्राकृत मंत्रिजनांनीं युक्त असून हेरांकडून माहिती मिळविणारा नाहींस असें मला वाटतें. कारण, आपले लोक जेथें वास्तव्य करितात तें स्थान दुसऱ्यानें हरण केलेलें तुला माहीत नाहीं ११. अरे, एकट्या रामचंद्रानें भयंकर कर्म करणारे चवदा हजार राक्षस आणि दूषणासहवर्तमान खर ह्यांचा वध करून १२ व ऋषींना अभय देऊन दंडकारण्य सुखरूप करून टाकिलें आणि अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या रामानें जनस्थानाचा विध्वंस केला १३; परंतु, हे राक्षसा, तूं तर लुब्ध, मत्त आणि पराधीन होऊन बसला आहेस. कारण, आपल्या देशामध्येंच उत्पन्न झालेल्या भयाची तुला खबर नाहीं १४. तीक्ष्ण, योग्यतेपेक्षां कमी देणारा, मत्त, गर्विष्ठ आणि शठ अशा राजाकडे संकटसमयीं रक्षण करण्यास कोणीही लोक धांऊन जात नाहींत १५. अत्यंत अभिमानी, स्वकीय जनांनाही जवळ जाण्यास योग्य नसलेला, स्वतःलाच मोठा समजणारा आणि विनाकारण रागावणारा असा जो पुरुष असेल त्याचा संकट आलें असतां स्वजन सुद्धां वध करितात १६. जो कर्तव्यकर्में करीत नाहीं आणि भयंकर प्रसंग उपस्थित झाले असतां भय बाळगीत नाहीं तो सत्वरच राज्यापासून भ्रष्ट होऊन तृणासारिखा ह्या जगतामध्यें दीन होऊन जातो १७. कारण, शुष्क काष्ठें, मातीचीं ढिखळें

यथा वासः स्रजो वा मृदिता यथा । एवं राज्यात्परिभ्रष्टः समर्थोपि निरर्थकः १९ अप्रमत्तश्च यो राजा सर्वज्ञो विजितेन्द्रियः । कृतज्ञो धर्मशीलश्च स राजा तिष्ठते चिरम् २० नयनाभ्यां प्रसुप्तो वा जागर्ति नयचक्षुषा । व्यक्तक्रोधप्रसादश्च स राजा पूज्यते जनैः २१ त्वं तु रावण दुर्बुद्धिर्गुणैरेतैर्विवर्जितः । यस्य ते विदितश्चारै रक्षसां सुमहान्वधः २२ परावमन्ता विषयेषु सङ्गवान्न देशकालप्रविभागतत्त्ववित् । अयुक्तबुद्धिर्गुणदोषनिश्चये विपन्नराज्यो न चिराद्विपत्स्यसे २३ इति स्वदोषान्परिकीर्तितांस्तया समीक्ष्य बुद्ध्या क्षणदाचरेश्वरः । धनेन दर्पेण बलेन चान्वितो विचिन्तयामास चिरं स रावणः २४ [ १३७१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥ ३३ ॥

ततः शूर्पणखां दृष्ट्वा ब्रुवतीं परुषं वचः । अमात्यमध्ये संक्रुद्धः परिपप्रच्छ रावणः १ कश्च रामः कथं वीर्यः किंरूपः किंपराक्रमः ।

---

आणि धूळ ह्यांचाही उपयोग असतो; परंतु, स्थानभ्रष्ट झालेल्या राजांचा कांहींही उपयोग होत नाहीं १८. ज्याप्रमाणें वापरलेलें वस्त्र अथवा चुरगळलेल्या माळा निरुपयोगी होतात त्याचप्रमाणें राज्यापासून भ्रष्ट झालेला पुरुष समर्थ असूनही निरुपयोगी होतो १९. स्वकार्यदक्ष, सर्वज्ञ, जितेंद्रिय, कृतज्ञ आणि धर्मशील असा जो राजा असतो तोच पुष्कळ दिवसपर्यंत राजा कायम राहतो २०. डोळे मिटून निजला तरी न्यायदृष्टि उघडी ठेवून जो जागत असतो आणि योग्य ठिकाणींच ज्याचा क्रोध व कृपा हीं व्यक्त होत असतात त्याच राजाला लोक मान देत असतात २१; परंतु, हे राजा, राक्षसांचा अतिशय मोठा संहारही ज्या तुला हेरांच्या द्वारानें समजला नाहीं तो तूं ह्या गुणांनीं रहित असून मंदमती आहेस(हें उघड होत आहे) २२. दुसऱ्यांचा फक्त अवमान करणारा, विषयांचे ठिकाणीं आसक्त, कोणत्या ठिकाणीं व कोणत्या वेळीं काय करावें ह्याचें तत्त्व न जाणणारा आणि गुण अथवा दोष ह्यांचा निर्णय करण्याकडे लक्ष्य न देणारा तूं असल्यामुळें तुझें राज्य नष्ट( झाल्यासारिखें )झालें असून तूंही लवकरच नाश पावशील" २३. ह्याप्रमाणें तिनें उच्चारिलेले आपले दोष बुद्धिपूर्वक लक्ष्यांत घेऊन धन, गर्व आणि बल ह्यांनीं युक्त असलेला तो राक्षसाधिपति रावण पुष्कळ वेळपर्यंत विचार करूं लागला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

तदनंतर शूर्पणखा मर्मभेदक भाषण करीत आहे असें आढळून आल्यावर अमा-

किमर्थं दण्डकारण्यं प्रविष्टश्च सुदुस्तरम् २ आयुधं किं च रामस्य येन ते राक्षसा हताः । खरश्च निहतः संख्ये दूषणस्त्रिशिरास्तथा ॥ तत्त्वं ब्रूहि मनोज्ञाङ्गि केन त्वं च विरूपिता ३ इत्युक्त्वा राक्षसेन्द्रेण राक्षसी क्रोधमूर्च्छिता । ततो रामं यथान्यायमाख्यातुमुपचक्रमे ४ दीर्घबाहुर्विशालाक्षश्चीरकृष्णाजिनाम्बरः । कन्दर्पसमरूपश्च रामो दशरथात्मजः ५ शक्रचापनिभं चापं विकृष्य कनकाङ्गदम् । दीप्तान्क्षिपति नाराचान्सर्पानिव महाविषान् ६ नाददानं शरान्घोरान्विमुञ्चन्तं महाबलम् । न कार्मुकं विकर्षन्तं रामं पश्यामि संयुगे ७ हन्यमानं तु तत्सैन्यं पश्यामि शरवृष्टिभिः । इन्द्रेणेवोत्तमं सस्यमाहतं त्वश्मवृष्टिभिः ८ रक्षसां भीमवीर्याणां सहस्राणि चतुर्दश । निहतानि शरैस्तीक्ष्णैस्तेनैकेन पदातिना ९ अर्धाधिकमुहूर्तेन खरश्च सहदूषणः । ऋषीणामभयं दत्तं कृतक्षेमाश्च दण्डकाः १० एका कथञ्चिन्मुक्ताहं परिभूय महात्मना । स्त्रीवधं शङ्कमानेन

---

त्यांमध्यें असलेल्या रावणानें क्रुद्ध होऊन विचारिलें १ "राम कोण ? त्याचें वीर्य कसें आहे ? त्याचें स्वरूप कसें आहे ? त्याचा पराक्रम कसा आहे आणि अतिशय गहन अशा दंडकारण्यामध्यें तो कशाकरितां प्राप्त झाला आहे ? २. ज्याच्या योगानें संग्रामामध्यें ते चवदा हजार राक्षस, खर, दूषण व त्रिशिरा ह्यांचा वध झाला असें त्या रामाचें आयुध तरी कोणतें होतें ? हें मला सांग आणि, हे सुंदरि, तुला विरूप कोणी केली हेंही मला कळीव " ३. ह्याप्रमाणें राक्षसाधिपति रावणानें विचारिलें असतां क्रोधानें व्याप्त झालेली ती राक्षसी यथायोग्य रीतीनें रामाची हकीकत सांगूं लागली ४. ( ती ह्मणाली ) " आजानुबाहु, विशालनयन, वल्कलें व कृष्णाजिन हीं वस्त्रें आणि मदनासारिखें रूप ह्यांनीं युक्त असलेला राम दशरथाचा पुत्र आहे ५. सुवर्णवलयांनीं भूषित असें इंद्रधनुष्यासारिखें धनुष्य आकर्षण करून महाविषारी सर्पाप्रमाणें देदीप्यमान् नाराच बाण तो सोडीत असतो ६. संग्रामामध्यें महाबलाढ्य राम भयंकर बाण घेतो केव्हां, सोडतो केव्हां आणि धनुष्य ओढतो केव्हां हें मला तर आढळण्यांत आलें नाहीं ७. इंद्रानें पाषाणवृष्टींच्या योगानें नाहींसें केलेल्या पिकाप्रमाणें बाणवृष्टींच्या योगानें सैन्याचा वध होत आहे इतकें मात्र माझ्या दृष्टीं पडत होतें ८. त्या एकट्या रामानें पदाति असतांनाही तीक्ष्ण बाणांच्या योगानें भयंकर सामर्थ्यवान् अशा चवदा हजार राक्षसांचा वध केला ९; दूषणासहवर्तमान खराचाही वध केला आणि इतकें कृत्य दीड मुहूर्तामध्यें आटोपून त्यानें ऋषींना अभय दिलें व दंडकारण्य सुखरूप केलें १०. स्त्रीवधाची भीति बाळगिणाऱ्या त्या प्रख्यात पराक्रमी

रामेण विदितात्मना ११ भ्राता चास्य महातेजा गुणतस्तुल्य विक्रमः । अनुरक्तश्च भक्तश्च लक्ष्मणो नाम वीर्यवान् १२ अमर्षी दुर्जयो जेता विक्रान्तो बुद्धिमान्बली । रामस्य दक्षिणो बाहुर्नित्यं प्राणो बहिश्चरः १३ रामस्य तु विशालाक्षी पूर्णेन्दुसदृशानना । धर्मपत्नी प्रिया नित्यं भर्तुः प्रियहिते रता १४ सा सुकेशी सुनासोरूः सुरूपा च यशस्विनी । देवतेव वनस्यास्य राजते श्रीरिवापरा १५ तप्तकाञ्चनवर्णाभा रक्ततुङ्गनखी शुभा । सीता नाम वरारोहा वैदेही तनुमध्यमा १६ नैव देवी न गन्धर्वी न यक्षी न च किन्नरी । तथारूपा मया नारी दृष्टपूर्वा महीतले १७ यस्य सीता भवेद्भार्या यं च हृष्टा परिष्वजेत् । अभिजीवेत्स सर्वेषु लोकेष्वपि पुरंदरात् १८ सा सुशीला वपुःश्लाघ्या रूपेणाप्रतिमा भुवि । तवानुरूपा भार्या सा त्वं च तस्याः पतिर्वरः १९ तां तु विस्तीर्णजघनां पीनोत्तुङ्गपयोधराम् । भार्यार्थे तु तवानेतुमुद्यताहं वराननाम् २० विरूपि-

---

महात्म्या रामाच्या हातून मी नुसता ( नासिकाछेदनाचा वगैरे ) अपमान पावूनच एकटी कशी तरी सुटलें ११. त्याचा लक्ष्मण ह्मणून एक वीर्यवान् भ्राता आहे तो गुणांनीं ह्याच्याचसारिखा असून ह्याचे ठिकाणीं अनुरक्त, ह्याचा भक्त आणि महातेजस्वी आहे १२. तो तापट, पराजित होण्यास अशक्य, शत्रूंना जिंकणारा, पराक्रमी, बुद्धिमान् व बलाढ्य रामाचा उजवा हात आहे आणि देहाबाहेर संचार करणारा रामाचा प्राणच कीं काय असा आहे १३. विशालनयन आणि पूर्णचंद्रासारिखें आल्हादकारक मुख ह्यांनीं युक्त असलेली रामाची प्रिय धर्मपत्नी आपल्या भर्त्याचें प्रिय आणि हित करण्याविषयीं नहमीं तत्पर असते १४ आणि उत्कृष्ट केश, सुंदर नासिका व मांड्या आणि मनोहर रूप ह्यांनीं युक्त असलेली आणि दुसरी लक्ष्मीच कीं काय अशी भासणारी ती यशस्विनी ह्या दंडकारण्याच्या देवतेप्रमाणें शोभत आहे १५. विदेहराजकन्या जी सुलक्षणी सीता तिचा वर्ण तप्त सुवर्णाप्रमाणें आहे, नखें आरक्तवर्ण असून उन्नत आहेत, कटिप्रदेश उत्कृष्ट आहे आणि उदर कृश आहे १६. देव, गंधर्व, यक्ष आणि किन्नर ह्या जातींतही तशी रूपवती स्त्री आजपर्यंत भूतलावर माझ्या पाहण्यांत आली नाहीं १७.सीता ज्याची भार्या होईल आणि ज्याला ती आनंदानें आलिंगन देईल तो कोणत्याही कालीं आणि कोणत्याही लोकांमध्यें इंद्रापेक्षांही अधिक सुखानें राहील १८. सुशील, शरीराच्या बांध्यामुळें लोकप्रशंसेस पात्र आणि रूपानें तर पृथ्वीमध्येंही अनुपम अशी ती सीता तुला भार्या योग्य असून तूंही तिला पति उत्कृष्ट आहेस १९. विपुल कटिप्रदेश, पुष्ट व उन्नत स्तन आणि उत्कृष्ट मुख ह्यांनीं युक्त असलेली ती स्त्री तुझी

तस्मि क्रूरेण लक्ष्मणेन महाभुज २१ तां तु दृष्ट्वाद्य वैदेहीं पूर्णचन्द्रनिभाननाम् । मन्मथस्य शराणां च त्वं विधेयो भविष्यसि २२ यदि तस्यामभिप्रायो भार्यात्वे तव जायते । शीघ्रमुद्ध्रियतां पादो जयार्थमिह दक्षिणः २३ रोचते यदि ते वाक्यं ममैतद्राक्षसेश्वर । क्रियतां निर्विशङ्केन वचनं मम रावण २४ विज्ञायैषामशक्तिं च क्रियतां च महाबल । सीता तवानवद्याङ्गी भार्यात्वे राक्षसेश्वर २५ निशम्य रामेण शरैरजिह्मगैर्हताञ्जनस्थानगतान्निशाचरान् । खरं च दृष्ट्वा निहतं च दूषणं त्वमद्य कृत्यं प्रतिपत्तुमर्हसि २६ [१३९७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥ ३४ ॥

ततः शूर्पणखावाक्यं तच्छ्रुत्वा रोमहर्षणम् । सचिवानभ्यनुज्ञाय कार्यं बुद्ध्वा जगाम ह १ तत्कार्यमनुगम्यान्तर्यथावदुपलभ्य च । दोषाणां च गुणानां च संप्रधार्य बलाबलम् २ इतिकर्तव्यमित्येव कृत्वा निश्चयमा-

---

भार्या व्हावी एतदर्थ मी तिला आणण्यास उद्युक्त झालें असतांना २०, हे महापराक्रमी रावणा, क्रूर लक्ष्मणानें मला विरूप करून टाकिलें २१. पूर्णचंद्राप्रमाणें जिचें मुख आल्हादकारक आहे अशा त्या वैदेहीला अवलोकन करितांक्षणींच तूं मदन बाणांच्या अधीन होऊन राहशील २२. तेव्हां भार्या ह्या नात्यानें ती आपणाला मिळावी अशी जर इच्छा तुझ्या मनांत उत्पन्न होत असेल तर ह्या कामांत जय येण्याकरितां तूं आपला उजवा पाय सत्वर उचल २३. हे राक्षसाधिपते रावणा, हें माझें सांगणें तुला रुचत असेल तर तूं त्या माझ्या सांगण्याप्रमाणें निःशंकपणानें वाग २४. सारांश, हे महाबलाढ्य राक्षसाधिपा, ( राज्य वगैरे कांहींएक नसल्यामुळें ) ह्या रामादिकांची सामर्थ्यहीनता लक्ष्यांत घेऊन मनोहर अवयवांनीं युक्त असलेली सीता भार्या ह्या नात्यानें तुला मिळेल अशी तूं तजवीज कर २५. तात्पर्य, सरळ जाणाऱ्या बाणांच्या योगानें जनस्थानांतील राक्षसांचा रामानें वध केल्याचें ऐकून आणि खरदुषणांचा त्यानें वध केल्याचें लक्ष्यांत घेऊन ह्या प्रसंगाला उचित असें कृत्य निश्चयपूर्वक विचार करून तूं आज कर" २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चौतीसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३४ ॥

तदनंतर रोमांच उठविणारें तें शूर्पणखेचें भाषण श्रवण केल्यावर त्यानें त्या कार्याविषयीं सचिवांचें अनुमोदन घेतलें आणि तें कार्य करण्याचा निश्चय करून तो मारीच आश्रमाला निघाला १. प्रथमतः तें कृत्य मनामध्यें आणून, पूर्णपणें त्याचा विचार करून गुणदोषांच्या बलाबलाचा निश्चय करून २ आणि अशीच गोष्ट करा-

त्मनः। स्थिरबुद्धिस्ततो रम्यां यानशालां जगाम ह ३ यानशालां ततो गत्वा प्रच्छन्नं राक्षसाधिपः। सुतं संचोदयामास रथः संयुज्यतामिति ४ एवमुक्तः क्षणेनैव सारथिर्लघुविक्रमः। रथं संयोजयामास तस्याभिमतमुत्तमम् ५ कामगं रथमास्थाय काञ्चनं रत्नभूषितम्। पिशाचवदनैर्युक्तं खरैः कनकभूषणैः ६ मेघप्रतिमनादेन स तेन धनदानुजः। राक्षसाधिपतिः श्रीमान्ययौ नदनदीपतिम् ७ स श्वेतवालव्यजनः श्वेतच्छत्रो दशाननः। स्निग्धवैदूर्यसंकाशस्तप्तकाञ्चनभूषणः ८ दशग्रीवो विंशतिभुजो दर्शनीयपरिच्छदः। त्रिदशारिर्मुनीन्द्रघ्नो दशशीर्ष इवाद्रिराट् ९ कामगं रथमास्थाय शुशुभे राक्षसाधिपः। विद्युन्मण्डलवान्मेघः स बलाक इवाम्बरे १० सशैलसागरानूपं वीर्यवानवलोकयन्। नानापुष्पफलैर्वृक्षैरनुकीर्णं सहस्रशः ११ शीतमङ्गलतोयाभिः पद्मिनीभिः समन्ततः। विशालैराश्रमपदैर्वेदिमद्भिरलंकृतम् १२ कदल्यटविसंशोभं नारि-

---

वयाची असा आपला विचार ठरवून बुद्धीचा पक्का निश्चय झाल्यावर तो आपल्या रमणीय रथखान्यामध्यें गेला ३ आणि रथखान्यांत गेल्यावर त्या राक्षसाधिपति रावणानें "रथ जोड" ह्मणून गुप्तपणें सारथ्याला आज्ञा केली ४. ह्याप्रमाणें रावणाची आज्ञा झाल्यावर त्या चलाख सारथ्यानें एका क्षणांत त्या रावणाला संमत असा उत्कृष्ट रथ जोडून तयार केला ५. तेव्हां सुवर्णाचे अलंकार घातलेले आणि पिशाचासारिख्या मुखांनीं युक्त असलेले गर्दभ ज्याला जोडिले आहेत अशा सुवर्णमय व रत्नभूषित स्वेच्छाचारी रथामध्यें आरूढ होऊन ६ तो कुबेराचा कनिष्ठ भ्राता वैभवशाली राक्षसाधिपति रावण त्या मेघतुल्य गंभीर नादानें युक्त असलेल्या रथाच्या योगानें समुद्र तरून गेला ७. श्वेतवर्ण केशाचे चामर, श्वेतवर्ण छत्र, पाणीदार, वैदूर्य मण्यासारिखी कांति, उत्कृष्ट सुवर्ण भूषणें, दहा मुखें, दहा कंठ, वीस हात व मनोहर सामान सुमान ह्यांनीं युक्त, देवशत्रु, मुनिश्रेष्ठांचा वध करणारा आणि दहा मस्तकांनीं युक्त असलेला हिमालयपर्वतच कीं काय असा दिसणारा तो ८,९ राक्षसाधिपति रावण यथेष्ट गमन करणाऱ्या रथावर आरूढ झाला असतां बलाकासंज्ञक पक्ष्यांचे समुदाय आणि विद्युन्मंडल ह्यांनीं युक्त असलेल्या आकाशांतील मेघाप्रमाणें शोभूं लागला १०. तो वीर्यवान् रावण पर्वतासह समुद्रतीर अवलोकन करीत करीत चालला. तें तीर नानाप्रकारच्या पुष्पयुक्त व फलयुक्त हजारों वृक्षांनीं गजबजलेलें होतें ११. शीत आणि मंगलकारक उदक ज्यांमध्यें आहे अशीं सरोवरें आणि स्थंडिलें ज्यांत आहेत असे विशाल आश्रम ह्यांच्या योगानें तें सभोंवतीं भूषित झालेलें होतें १२.

केलीपशोभितम् । सालैस्तालैस्तमालैश्च तरुभिश्च सुपुष्पितैः १३ अत्यन्तनियताहारैः शोभितं परमर्षिभिः । नागैः सुपर्णैर्गन्धर्वैः किन्नरैश्च सहस्रशः १४ जितकामैश्च सिद्धैश्च चारणैश्चोपशोभितम् । आजैर्वैखानसैर्माषैर्वालखिल्यैर्मरीचिपैः १५ दिव्याभरणमाल्याभिर्दिव्यरूपाभिरावृतम् । क्रीडारतविधिज्ञाभिरप्सरोभिः सहस्रशः १६ सेवितं देवपत्नीभिः श्रीमतीभिरुपासितम् । देवदानवसङ्घैश्च चरितं त्वमृताशिभिः १७ हंसक्रौञ्चप्लवाकीर्णं सारसैः संप्रसादितम् । वैदूर्यप्रस्तरं स्निग्धं सान्द्रं सागरतेजसा १८ पाण्डुराणि विशालानि दिव्यमाल्ययुतानि च । तूर्यगीताभिजुष्टानि विमानानि समन्ततः १९ तपसा जितलोकानां कामगान्यभिसंपतन् । गन्धर्वाप्सरसश्चैव ददर्श धनदानुजः २० निर्यासरसमूलानां चन्दनानां सहस्रशः । वनानि पश्यन्सौम्यानि घ्राणतृप्तिकराणि च २१ अगुरूणां च मुख्यानां वनान्युपवनानि च । तक्कोलानां च जात्यानां फलानां च सुगन्धिनाम् २२ पुष्पाणि च तमालस्य गुल्मानि मरि-

---

केळींच्या वनांनीं त्याला शोभा आलेली होती, नारळींनीं तें सुशोभित झालें होतें, साल, ताल, तमाल इत्यादि प्रफुल्लित वृक्षांनीं तें सुंदर दिसत होतें १३, अत्यंत शुद्ध आहार करणाऱ्या महर्षींनी तें शोभविलेलें होतें, हजारों नाग, सुपर्ण, गंधर्व, किन्नर १४, आणि जितेंद्रिय, सिद्ध, चारण, ब्रह्मपुत्र, वैखानस, वालखिल्य, मरीचिप आणि माषसंज्ञक महर्षि ह्यांनीं तें सुशोभित झालेलें होतें १५. क्रीडा आणि रतिधर्म ह्यांचा प्रकार ज्यांना अवगत आहे अशा दिव्य भूषणें धारण केलेल्या आणि दिव्य रूपांनीं युक्त असलेल्या हजारों अप्सरांनीं तें व्याप्त झालेलें होतें १६. वैभवसंपन्न स्त्रियांनीं त्याचा आश्रय केलेला होता, देवांगनांनींही त्याचें अवलंबन केलेलें होतें आणि अमृत भक्षण करणारे देवदैत्यांचे समुदाय तेथें संचार करीत होते १७. हंस, क्रौंच आणि मंडूक ह्यांनीं तें गजबजलेलें होतें, सारसपक्ष्यांनीं तें निर्मल केलेलें होतें, वैदूर्य मण्यासारिख्या श्यामवर्ण तृणांनीं तें आच्छादित झालेलें होतें आणि समुद्राच्या तेजानें तें स्निग्ध व शीतल दिसत होतें १८. असो. श्वेतवर्ण, विशाल व दिव्य पुष्पांनीं युक्त, वाद्यें आणि गायन ह्यांनीं संपन्न व यथेष्ट गमन करणारीं अशीं तपश्चर्येनें उत्तम लोक संपादन केलेल्या पुरुषांचीं चोहोंकडे असलेलीं विमानें व गंधर्व आणि अप्सरा ह्यांना जातां जातां त्या रावणानें अवलोकन केलें १९, २०. डिंक हा रस ज्यांच्या मुळाशीं आहे अशीं हजारों चंदनवृक्षांचीं सौम्य व घ्राणेंद्रियें तृप्त करणारीं वनें अवलोकन करीत करीत तो रावण चालला २१. त्याचप्रमाणें श्रेष्ठ अगुरूंचीं वनें, उत्कृष्ट तक्कोल वृक्षांचीं उपवनें,

चस्य च । मुक्तानां च समूहानि शुष्यमाणानि तीरतः २३ शैलानि प्रवरांश्चैव प्रवालनिचयांस्तथा । काञ्चनानि च शृङ्गाणि राजतानि तथैव च २४ प्रस्रवाणि मनोज्ञानि प्रसन्नान्यद्भुतानि च । धनधान्योपपन्नानि स्त्रीरत्नैरावृतानि च २५ हस्त्यश्वरथगाढानि नगराणि विलोकयन् । तं समं सर्वतः स्निग्धं मृदुसंस्पर्शमारुतम् २६ अनूपे सिन्धुराजस्य ददर्श त्रिदिवोपमम् । तत्रापश्यत्स मेघाभं न्यग्रोधं मुनिभिर्वृतम् २७ समन्तायस्य ताः शाखाः शतयोजनमायताः । यस्य हस्तिनमादाय महाकायं च कच्छपम् २८ भक्षार्थं गरुडः शाखामाजगाम महाबलः । तस्य तां सहसा शाखां भारेण पतगोत्तमः २९ सुपर्णः पर्णबहुलां बभञ्जाथ महाबलः । तत्र वैखानसा माषा वालखिल्या मरीचिपाः ३० आजा बभूवुर्धूम्राश्च संगताः परमर्षयः । तेषां दयार्थं गरुडस्तां शाखां शतयोजनाम् ३१ भग्नामादाय वेगेन तौ चोभौ गजकच्छपौ । एकपादेन धर्मात्मा भक्षयित्वा तदामिषम् ३२ निषादविषयं हत्वा शाखया पतगोत्तमः । प्रहर्ष-

---

सुगंधि फलांचीं अरण्यें २२, तमालपुष्पें, मिऱ्याचीं झुडुपें, तीरावर सुकत पडलेल्या मोत्यांच्या राशि २३. पाषाणांचे ढीग, उत्कृष्ट पोंवळ्यांच्या राशि, रौप्यवर्ण व सुवर्णवर्ण शिखरें २४, निर्मल जलानें युक्त, आश्चर्यकारक आणि मनोहर असे प्रवाह व धनधान्यांनीं समृद्ध, स्त्रीरत्नांनीं व्याप्त २५ आणि हत्ती, अश्व व रथ ह्यांनीं खेंचलेलीं नगरें अवलोकन करीत जातां जातां समुद्राचे तीरीं ज्याचा स्पर्श मृदु आहे अशा वायूनें युक्त व सर्व बाजूंनीं स्निग्ध असा तो स्वर्गतुल्य सपाट प्रदेश रावणानें पाहिला व त्या प्रदेशावर मेघतुल्य मुनींनीं व्याप्त झालेला वटवृक्ष त्या रावणानें अवलोकन केला २६, २७. त्या वृक्षाच्या त्या शाखा सभोंवतीं शंभर शंभर योजनें दूर दूर गेलेल्या होत्या. प्रचंड शरीरानें युक्त असलेला गज व कूर्म भक्षणाकरितां घेऊन महाबलाढ्य गरुड त्याच वृक्षाच्या एका शाखेवर येऊन बसला असतां त्याची ती विपुल पानांनीं युक्त असलेली शाखा पक्षिश्रेष्ठ महाबलाढ्य गरुडानें आपल्या भाराच्या योगानें मोडून टाकिली. त्यावेळीं त्या मोडलेल्या शाखेच्या अधोभागीं वैखानस, माष, वालखिल्य, मरीचिप २८, २९, ३०, आज आणि धूम्र हे महर्षि एकत्र जुळून बसलेले होते. तेव्हां त्यांची दया आल्यामुळें शंभर योजनें लांब असलेली ती मोडकी फांदी आणि ते उभयतां गज व कूर्म ह्यांना घेऊन तो गरुड वेगानें तेथून निघाला व मध्यंतरीं ती फांदी व ते गजकूर्म एका पायानें धरून व आकाशांतून जातां जातां ते आमिष (खाण्याचे अर्थात् गज व कूर्म) भक्षण करून आणि त्या शाखेच्या योगानें निषाद

मतुलं लेभे मोक्षयित्वा महामुनीन् ३३ स तु तेन प्रहर्षेण द्विगुणीकृतवि-
क्रमः । अमृतानयनार्थं वै चकार मतिमान्मतिम् ३४ अयोजालानि
निर्मथ्य भित्त्वा रत्नगृहं वरम् । महेन्द्रभवनाद्गुप्तमाजहारामृतं ततः ३५
तं महर्षिगणैर्जुष्टं सुपर्णकृतलक्षणम् । नाम्ना सुभद्रं न्यग्रोधं ददर्श धनदा-
नुजः ३६ तं तु गत्वा परं पारं समुद्रस्य नदीपतेः । ददर्शाश्रममेकान्ते
पुण्ये रम्ये वनान्तरे ३७ तत्र कृष्णाजिनधरं जटामण्डलधारिणम् । ददर्श
नियताहारं मारीचं नाम राक्षसम् ३८ स रावणः समागम्य विधिवत्तेन
रक्षसा । मारीचेनार्चितो राजा सर्वकामैरमानुषैः ३९ तं स्वयं पूज-
यित्वा च भोजनेनोदकेन च । अर्थोपहितया वाचा मारीचो वाक्यम-
ब्रवीत् ४० कच्चित्ते कुशलं राजल्लँङ्कायां राक्षसेश्वर । केनार्थेन पुनस्त्वं वै
तूर्णमेव इहागतः ४१ एवमुक्तो महातेजा मारीचेन स रावणः । ततः
पश्चादिदं वाक्यमब्रवीद्वाक्यकोविदः ४२ [ १४३९ ] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः ॥ ३५ ॥

---

वेशाचा नाश करून व त्या महर्षींना सोडून त्या श्रेष्ठ पक्ष्याला अतुल हर्ष झाला ३१, ३२, ३३. तेव्हां त्या हर्षामुळें ज्याच्या गतीचा जोर दुप्पट झालेला आहे अशा त्या बुद्धिमान् गरुडानें अमृत आणण्याचा विचार केला ३४ आणि पक्ष्यांचा प्रवेश होऊं नये म्हणून घरावरून बांधलेली लोखंडाची जाळी तोडून आणि तें श्रेष्ठ रत्नमय गृह फोडून त्या इंद्राच्या गृहांत रक्षण करून ठेविलेलें अमृत त्यानें हरण केलें ३५. असो. गरुडानें ( शाखा मोडून ) ज्याला खूण केलेली आहे आणि महर्षिसमुदायांनीं जो सेवित आहे असा तो सुभद्रनामक वटवृक्ष रावणानें पाहिला ३६. नंतर नदीपति समुद्राच्या पलीकडल्या तीराला गेल्यावर एकांत, रम्य व पवित्र अशा वनामध्यें एक आश्रम त्याच्या दृष्टीं पडला ३७ व त्या आश्रमामध्यें कृष्णाजिनें आणि जटामंडल धारण करून शुद्ध आहारावर उपजीविका करणारा मारीच नामक राक्षस त्यानें पाहिला ३८. तेव्हां रावण तेथें आल्यावर त्या मारीच राक्षसानें अमानुष अशा सर्व भोग्य वस्तूंनीं पुनरपि त्या राजाचा यथाविधि सत्कार केला ३९ आणि अन्नपाण्याच्या योगानें त्याचा स्वतः सत्कार केल्यावर अर्थानें भरलेल्या वाणीनें मारीच राक्षसानें त्याला विचारिलें ४०. "हे राक्षसाधिपते राजा, तुझ्या लंकेमध्यें सर्व ठीक आहे नां ? तूं येथें कोणत्या उद्देशानें पुनरपि सत्वरच आला आहेस ?" ४१. ह्याप्रमाणें मारीचानें विचारिल्यानंतर संभाषण करण्यामध्यें कुशल असलेल्या त्या महातेजस्वी रावणानें त्याच्याशीं असें ( पुढें सांगण्यांत येणारें ) भाषण केलें ४२. ह्याप्रमाणें

मारीच श्रूयतां तात वचनं मम भाषतः। आर्तोस्मि मम चार्तस्य भवान्हि परमा गतिः १ जानीषे त्वं जनस्थानं भ्राता यत्र खरो मम । दूषणश्च महाबाहुः स्वसा शूर्पणखा च मे २ त्रिशिराश्च महाबाहू राक्षसः पिशिताशनः । अन्ये च बहवः शूरा लब्धलक्षा निशाचराः ३ वसन्ति मन्नियोगेन अधिवासं च राक्षसाः । बाधमाना महारण्ये मुनीन्ये धर्मचारिणः ४ चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । शूराणां लब्धलक्षाणां खरचित्तानुवर्तिनाम् ५ ते त्विदानीं जनस्थाने वसमाना महाबलाः । संगताः परमायत्ता रामेण सह संयुगे ६ नानाशस्त्रप्रहरणाः खरप्रमुखराक्षसाः । तेन संजातरोषेण रामेण रणमूर्धनि ७ अनुक्त्वा परुषं किंचिच्छरैर्व्यापारितं धनुः । चतुर्दश सहस्राणि रक्षसामुग्रतेजसाम् ८ निहतानि शरैर्दीप्तैर्मानुषेण पदातिना । खरश्च निहतः संख्ये दूषणश्च निपातितः ९ हत्वा त्रिशिरसं चापि निर्भया दण्डकाः कृताः । पित्रा निरस्तः क्रुद्धेन सभार्यः क्षीणजीवितः १० स हन्ता तस्य सैन्यस्य रामः

---

महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

( रावण ह्मणाला ) " बा मारीचा, मी सांगत असतांना तूं माझें बोलणें ऐकून घे. मी दुःखित झालों आहें आणि अशा दुःखित स्थितीमध्यें तूंच माझा मुख्य आधार आहेस १. जनस्थान तुला माहीतच आहे. त्या ठिकाणीं माझा भ्राता खर व महापराक्रमी दूषण, माझी भगिनी शूर्पणखा २, महापराक्रमी मांसभक्षक त्रिशिराराक्षस आणि इतरही युद्धाचा उत्साह असलेले पुष्कळ शूर निशाचर ३ राक्षस माझ्या आज्ञेनें महारण्यामध्यें धर्मनिष्ठ मुनींना पीडा करण्याकरितां वास्तव्य करीत आहेत ( हेंहीं तुला विदितच आहे ) ४. युद्धाचा उत्साह असलेले आणि खराच्या इच्छेला अनुसरून वागणारे असे जे भयंकर पराक्रम करणारे महाबलाढ्य चवदा हजार राक्षस जनस्थानामध्यें सांप्रत वास्तव्य करीत होते ते एकत्र जुळून रामाशीं युद्ध करण्यास अगदीं मनापासून तयार झाले ५,६. त्या खरप्रमुख राक्षसांपाशीं नानाप्रकारचीं शस्त्रें व आयुधेंही होतीं; परंतु, कांहीं एक मर्मभेदक भाषण न उच्चारितां क्रुद्ध झालेल्या त्या रामानें संग्रामामध्यें धनुष्याची बाणांशीं योजना केली आणि भयंकर तेजस्वी ७, ८ चवदा हजार राक्षस त्या पदाति मानवानें देदीप्यमान बाणांच्या योगानें मारिले. त्याचप्रमाणें संग्रामामध्यें त्यानें खराचा वध केला, दूषणाचा निःपात केला ९ आणि त्रिशिरा राक्षसालाही मारून दंडकारण्य निर्भय केलें. आयुष्याचा क्षय झालेल्या त्या

क्षत्रियपांसनः । अशीलः कर्कशस्तीक्ष्णो मूर्खो लुब्धोऽजितेन्द्रियः ११
त्यक्तधर्मा त्वधर्मात्मा भूतानामहिते रतः । येन वैरं विनारण्ये सत्त्वमा-
स्थाय केवलम् १२ कर्णनासापहारेण भगिनी मे विरूपिता । अस्य
भार्यां जनस्थानात्सीतां सुरसुतोपमाम् १३ आनयिष्यामि विक्रम्य सहा-
यस्तत्र मे भव । त्वया ह्यहं सहायेन पार्श्वस्थेन महाबल १४ भ्रातृभिश्च
सुरान्सर्वान्नाहमत्राभिचिन्तये । तत्सहायो भव त्वं मे समर्थो ह्यसि
राक्षस १५ वीर्ये युद्धे च दर्पे च न ह्यस्ति सदृशस्तव । उपायतो महा-
ञ्शूरो महामायाविशारदः १६ एतदर्थमहं प्राप्तस्त्वत्समीपं निशाचर ।
शृणु तत्कर्म साहाय्ये यत्कार्यं वचनान्मम १७ सौवर्णस्त्वं मृगो भूत्वा
चित्रो रजतबिन्दुभिः । आश्रमे तस्य रामस्य सीतायाः प्रमुखे चर १८
त्वां तु निःसंशयं सीता दृष्ट्वा तु मृगरूपिणम् । गृह्यतामिति भर्तारं
लक्ष्मणं चाभिधास्यति १९ ततस्तयोरपाये तु शून्ये सीतां यथासुखम् ।
निराबाधो हरिष्यामि राहुश्चन्द्रप्रभामिव २० ततः पश्चात्सुखं रामे भार्या-

---

रामाला क्रुद्ध झालेल्या त्या पित्यानें नगरांतून हांकून दिलें आहे १० व त्या सैन्याचा वध करणारा तो राम क्षत्रियांना कलंक लावणारा, दुःशील, कर्कश, तीक्ष्ण, मूर्ख, लुब्ध, अजितेंद्रिय ११, धर्माचा त्याग केलेला व अधर्मनिष्ठ असून प्राण्यांच्या अहितासंबंधीं तत्पर आहे व त्यानेंच अरण्यामध्यें वैरावांचून केवल शक्तीच्या जोरावर १,२ कर्ण व नासिका ह्यांचा अपहार करून माझी भगिनी विरूप केली आहे. तेव्हां देवकन्येसमान असलेल्या त्याच्या सीतानामक भार्येला जनस्थानांतून १३ मी पराक्रमानें घेऊन येणार आहें त्याविषयीं तूं मला साहाय्य हो. हे महाबलाढ्य मारीचा, तूं एक साहाय्य करणारा माझ्या जवळ असलास ह्मणजे १४ कुंभकर्णप्रभृति भ्रात्यांसहवर्तमान देवांचीही ह्यासंबंधानें मी पर्वा करीत नाहीं. ह्यास्तव, हे राक्षसा, तूं मला साहाय्य हो; तूं समर्थ आहेस १५. वीर्यामध्यें, युद्धाविषयीं उत्साहसंबंधानें व उपाय योजण्यांतही तुझ्यासारिखा कोणी नाहीं. कारण, तूं मोठा शूर असून महामायावी आहेस १६. हे राक्षसा, एतदर्थ मी तुझ्या समीप आलों आहें. आतां साहाय्यासंबंधानें माझ्या सांगण्यावरून तूं काय कर्म करावयाचें तें ऐक १७. रौप्यबिंदूंनीं युक्त असा तूं एक सोन्याचा अद्भुत मृग हो आणि त्या रामाच्या आश्रमामध्यें सीतेच्या पुढें चालूं लाग १८; ह्मणजे मृगरूप धारण केलेल्या तुला अवलोकन करितांक्षणीं सीता "हा मृग धरा" ह्मणून भर्त्याला आणि लक्ष्मणाला निःसंशय सांगेल १९, व असें तिनें सांगितल्यानंतर ते तुझ्या मागोमाग निघून गेले ह्मणजे शून्य

हरणकर्शिते । विस्रब्धं प्रहरिष्यामि कृतार्थेनान्तरात्मना २१ तस्य रामकथां श्रुत्वा मारीचस्य महात्मनः । शुष्कं समभवद्वक्त्रं परित्रस्तो बभूव च २२ ओष्ठौ परिलिहञ्शुष्कौ नेत्रैरनिमिषैरिव । मृतभूत इवार्तस्तु रावणं समुदैक्षत २३ स रावणं त्रस्तविषण्णचेता महावने रामपराक्रमज्ञः । कृताञ्जलिस्तत्त्वमुवाच वाक्यं हितं च तस्मै हितमात्मनश्च २४ [ १४६३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रस्य वाक्यं वाक्यविशारदः । प्रत्युवाच महातेजा मारीचो राक्षसेश्वरम् १ सुलभाः पुरुषा राजन्सततं प्रियवादिनः । अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोक्ता च दुर्लभः २ न नूनं बुध्यसे रामं महावीर्यगुणोन्नतम् । अयुक्तचारश्चपलो महेन्द्रवरुणोपमम् ३ अपि स्वस्ति भवेत्तात सर्वेषामपि रक्षसाम् । अपि रामो न संक्रुद्धः कुर्याल्लोकानरा-

---

झालेल्या त्या आश्रमामध्यें जाऊन चंद्रप्रभा हरण करणाऱ्या राहूप्रमाणें कांहीं एक अडथळा न येतां सीतेला मी सुखानें हरण करून नेईन २०. तदनंतर भार्येचा अपहार झाल्यामुळें राम कृश झाला असतां मी अंतःकरणामध्यें कृतकृत्य होऊन अनायासानें गुप्तपणें रामावर प्रहार करीन " २१. ह्याप्रमाणें रामाशीं प्रसंग येणार असल्याचें श्रवण करून त्या महात्म्या मारीच राक्षसाचें तोंड सुकून गेलें व तो भयभीत झाला २२; भयानें व्याकुल होऊन मृतप्राय झालेला तो मारीच राक्षस डोळ्यांच्या पापण्या न हालवितां शुष्क ओंठ चाटीत चाटीत रावणाकडे पाहूं लागला २३ व रामाचा पराक्रम जाणणारा असल्यामुळें ज्याचें मन त्रस्त व खिन्न झालें आहे असा तो मारीच राक्षस त्याला व आपणाला हितकारक असें खरें खरें भाषण हात जोडून त्या महावनामध्यें रावणाशीं करूं लागला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

राक्षसाधिपति रावणाचें तें भाषण श्रवण करून महायशस्वी व वक्ता मारीच त्या राक्षसराजाला ह्मणाला १ " हे राजा, नेहमीं प्रिय भाषण करणारे पुरुष पाहिजे तितके मिळणारे आहेत; परंतु, अप्रिय जरी असलें तरी हितकारक भाषण करणारा वक्ता आणि तें ऐकून घेणारा श्रोता हे दुर्लभ आहेत २. तूं हेरांची योजना केलेली नाहींस आणि स्वतः अविचारी आहेस; ह्यामुळें मोठें वीर्य आणि मोठे गुण ह्यांनीं योग्यतेला चढलेल्या व इंद्रवरुणांची बरोबरी करणाऱ्या रामाला तूं खरोखर ओळखीत नाहींस ३. बा रावणा, ( तुझी ही दुर्बुद्धि पालटून ) सर्व राक्षसांचें कल्याण होईल काय ? आणि

अमानुषम् ४ अपि ते जीवितान्ताय नोत्पन्ना जनकात्मजा । अपि सीता-निमित्तं च न भवेद्व्यसनं महत् ५ अपि त्वामीश्वरं प्राप्य कामवृत्तं निरङ्कुशम् । न विनश्येत्पुरी लङ्का त्वया सह सराक्षसा ६ त्वद्विधः कामवृत्तो हि दुःशीलः पापमन्त्रितः । आत्मानं स्वजनं राष्ट्रं स राजा हन्ति दुर्मतिः ७ न च पित्रा परित्यक्तो नामर्यादः कथञ्चन । न लुब्धो न च दुःशीलो न च क्षत्रियपांसनः ८ न च धर्मगुणैर्हीनः कौसल्या-नन्दवर्धनः । न च तीक्ष्णो हि भूतानां सर्वभूतहिते रतः ९ वञ्चितं पितरं दृष्ट्वा कैकेय्या सत्यवादिनम् । करिष्यामीति धर्मात्मा ततः प्रव्रजितो वनम् १० कैकेय्याः प्रियकामार्थं पितुर्दशरथस्य च । हित्वा राज्यं च भोगांश्च प्रविष्टो दण्डकावनम् ११ न रामः कर्कशस्तात नाविद्वान्ना-जितेन्द्रियः । अनृतं न श्रुतं चैव नैवं त्वं वक्तुमर्हसि १२ रामो विग्रहवा-न्धर्मः साधुः सत्यपराक्रमः । राजा सर्वस्य लोकस्य देवानामिव वासवः १३ कथं तु तस्य वैदेहीं रक्षितां स्वेन तेजसा । इच्छसे प्रसभं

---

राम क्रुद्ध झाला असतां लोक राक्षसशून्य करणार नाहीं काय ? ४. अरे, तुझ्या जीविताच्या अंताकरितां तर जनककन्या उत्पन्न झाली नाहीं नां ? आणि सीतेमुळें आपणांवर मोठें संकट गुदरणार नाहीं नां ? ५. स्वेच्छाचारी आणि निरंकुश असा तूं अधिपति असल्यामुळें तुझ्या बरोबरच राक्षसांसहवर्तमान लंका नगरी नाहींशी होणार नाहीं नां ? ६. तुझ्यासारिखा स्वेच्छाचारी, दुःशील आणि दुष्ट मंत्र्यांचा सल्ला मिळालेला जो दुष्टबुद्धि राजा असतो तो स्वतःचा, स्वजनाचा आणि राष्ट्राचा घात करितो ७. रामाचा पित्यानें त्याग केलेला नाहीं, तो मर्यादा सोडून कदापि वागणारा नाहीं, तो लुब्ध नाहीं, त्याचें शील वाईट नाहीं, तो क्षत्रियांना कलंक लावणारा नाहीं ८ आणि धर्मसंबंधीं गुणांचा त्याचे ठिकाणीं अभाव नाहीं व तो प्राण्यांशीं निष्ठुरपणानें वागणाराही नाहीं, परंतु कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणारा तो राम सर्व भूतांच्या हिताविषयीं तत्पर आहे ९. कैकेयीनें पित्याला फसविल्याचें अवलोकन केल्यावर "मी पित्याचें वचन खरें करीन" असा उद्देश मनांत धरून तो धर्मात्मा वनामध्यें निघून गेला १०. सारांश, कैकेयीचा आणि पित्या दशरथाचा प्रिय मनो-रथ परिपूर्ण करण्याकरितां राज्य आणि भोग ह्यांचा त्याग करून तो दंडकारण्या-मध्यें प्रविष्ट झाला आहे ११. बा रावणा, राम निर्दय नाहीं, अविद्वान् नाहीं, तो अजितेंद्रिय नाहीं आणि अनृत भाषण त्यानें कधीं ऐकिलेलेंही नाहीं. तेव्हां ह्याप्रमाणें त्याला दोष देणें योग्य नाहीं १२. अमोघपराक्रमी सज्जन राम मूर्तिमान् धर्म आहे

हर्तुं प्रभामिव विवस्वतः १४ शरार्चिषमनाधृष्यं चापखड्गेन्धनं रणे ।
रामाग्निं सहसा दीप्तं न प्रवेष्टुं त्वमर्हसि १५ धनुर्व्यादितदीप्तास्यं शरा-
र्चिषममर्षणः । चापबाणधरं तीक्ष्णं शत्रुसेनापहारिणम् १६ राज्यं सुखं
च संत्यज्य जीवितं चेष्टमात्मनः । नात्यासादयितुं तात रामान्तकमिहा-
र्हसि १७ अप्रमेयं हि तत्तेजो यस्य सा जनकात्मजा । न त्वं समर्थस्तां
हर्तुं रामचापाश्रयां वने १८ तस्य वै नरसिंहस्य सिंहोरस्कस्य भामिनी ।
प्राणेभ्योपि प्रियतरा भार्या नित्यमनुव्रता १९ न सा धर्षयितुं शक्या
मैथिल्योजस्विनः प्रिया । दीप्तस्येव हुताशस्य शिखा सीता सुमध्यमा २०
किमुद्यमं व्यर्थमिमं कृत्वा ते राक्षसाधिप । दृष्टश्चेत्त्वं रणे तेन तदन्त-
मुपजीवितम् २१ जीवितं च सुखं चैव राज्यं चैव सुदुर्लभम् । स सर्वैः
सचिवैः सार्धं बिभीषणपुरस्कृतैः २२ मन्त्रयित्वा स धर्मिष्ठैः कृत्वा निश्च-

---

आणि इंद्र ज्याप्रमाणें देवांचा राजा आहे त्याप्रमाणें तो सर्व लोकांचा राजा आहे १३. तेव्हा सूर्याच्या प्रभेप्रमाणें स्वतःच्या तेजानें सुरक्षित असलेल्या त्याच्या वैदेही भार्येला बलात्कारानें हरण करून आणण्याची तूं कशी इच्छा करीत आहेस ? १४. बाण ह्या ज्याच्या ज्वाला आहेत आणि धनुष्यें व खड्ग हीं ज्याचीं इंधनें आहेत व ज्याच्या समोर जाणेंही दुर्घट आहे अशा रामरूप प्रदीप्त अग्नींत रणामध्यें अविचारानें प्रवेश करणें तुला योग्य नाहीं १५. बाणरूप ज्वालांनीं युक्त असलेलें धनुष्य हेंच ज्याचें पसरलेलें ज्वालायुक्त मुख आहे व धनुर्बाण धारण करून शत्रुसैन्याचा जो संहार करणारा आहे अशा रामरूप प्रचंड मृत्यूशीं जनस्थानांतील राक्षसांचा वध सहन न झाल्यामुळें आपलें राज्य, सुख आणि प्रिय जीवित ह्यांचा त्याग करून, बा रावणा, येथें अतिशय झगडणें तुला योग्य नाहीं १६१७. ती जनककन्या ज्याची भार्या आहे त्याचें तेज कांहीं अतर्क्य आहे व ह्यामुळें वनामध्यें रामधनुष्याच्या आश्रयाला असलेल्या त्या सीतेचें हरण करण्यास तूं समर्थ नाहींस १८. सिंहासारिखें ज्याचें वक्षःस्थल आहे अशा त्या पुरुषसिंहाची ती भार्या नेहमीं त्याला अनुसरणारी असल्यामुळें त्याला प्राणांपेक्षांही प्रिय आहे १९. प्रदीप्त अग्नीची ज्वाला धरणें ज्याप्रमाणें अशक्य आहे त्याप्रमाणें तेजस्वी रामाच्या त्या प्रिय व सौंदर्यसंपन्न मिथिलराजकन्या सीतानामक भार्येवर हात टाकितां येणें शक्य नाहीं २०. तेव्हां, हे राक्षसाधिपा, हा व्यर्थ उद्योग करून तुला काय प्राप्त होणार आहे ! रणामध्यें तूं जर त्याच्या दृष्टीं पडलास तर तो तुझ्या जीविताचा अंतच आहे २१. तस्मात्, जीवित, सुख आणि अत्यंत दुर्लभ राज्य ह्यांसंबंधानें बिभीषणप्रभृति सर्व धर्मनिष्ठ मंत्र्यांसहवर्तमान विचार करून नंतर आपला निश्च-

यमात्मनः । दोषाणां च गुणानां च संप्रधार्य बलाबलम् २३ आत्मनश्च बलं ज्ञात्वा राघवस्य च तत्त्वतः । हितं हि तव निश्चित्य क्षमं त्वं कर्तुमर्हसि २४ अहं तु मन्ये तव न क्षमं रणे समागमं कोसलराजसूनुना । इदं हि भूयः शृणु वाक्यमुत्तमं क्षमं च युक्तं च निशाचराधिप २५ [ १४८८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

कदाचिदप्यहं वीर्यात्पर्यटन्पृथिवीमिमाम् । बलं नागसहस्रस्य धारयन्पर्वतोपमः १ नीलजीमूतसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः । भयं लोकस्य जनयन्किरीटी परिघायुधः २ व्यचरन्दण्डकारण्यमृषिमांसानि भक्षयन् । विश्वामित्रोथ धर्मात्मा मद्वित्रस्तो महामुनिः ३ स्वयं गत्वा दशरथं नरेन्द्रमिदमब्रवीत् । अयं रक्षतु मां रामः पर्वकाले समाहितः ४ मारीचान्मे भयं घोरं समुत्पन्नं नरेश्वर । इत्येवमुक्तो धर्मात्मा राजा दशरथस्तदा ५ प्रत्युवाच महाभागं विश्वामित्रं महामुनिम् । ऊनद्वादशवर्षोयमकृतास्त्रश्च राघवः ६ कामं तु मम तत्सैन्यं मया सह गमिष्यति ।

---

करून, गुणदोषांचें बलाबल लक्ष्यांत घेऊन २२, २३ व आपलें आणि रामाचें बल किती आहे हेंही खरें खरें मनांत आणून ' हें करणें हितावह आहे ' असा निश्चय झाल्यावर मग जें योग्य असेल तें तूं कर २४. कोसलदेशाधिपति दशरथ राजाच्या पुत्राशीं रणामध्यें समागम करणें तुला योग्यच नाहीं असें मला वाटतें. हे राक्षसाधिपते, हें मी योग्य व सयुक्तिक असें जें पुनरपि उत्कृष्ट भाषण करीत आहें तें तूं ऐक २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

सहस्र गजांचें सामर्थ्य असलेला, नीलमेघाप्रमाणें कांति असलेला, उत्कृष्ट सुवर्णाचीं कुंडलें धारण केलेला व परिघसंज्ञक आयुध हातांत घेऊन मस्तकीं किरीट घातलेला मी पर्वतप्राय मारीच अंगांत पाणी खेळत असल्यामुळें ह्या पृथ्वीवर पर्यटण करीत असतांना १,२ऋषिमांस भक्षण करण्याकरितां दंडकारण्यामध्यें संचार करूं लागलों. तेव्हां मला त्रासून गेलेला धर्मात्मा विश्वामित्र महर्षि ३ स्वतः दशरथ राजाकडे गेला आणि ह्मणाला " पर्वदिवशीं ( यागसमयीं ) ह्या रामानें दक्ष राहून माझें रक्षण करावें ४. हे राजा, मारीच राक्षसापासून मला घोर भय उत्पन्न झालें आहे." ह्याप्रमाणें त्यानें सांगितलें असतां धर्मात्मा दशरथ राजा ५ महाभाग्यवान् विश्वामित्र महर्षीना ह्मणाला " हा माझा रघुवंशज राम अद्यापि पुरा बारा वर्षांचाही झालेला

बलेन चतुरङ्गेण स्वयमेत्य निशाचरम् ७ वधिष्यामि मुनिश्रेष्ठ शत्रुं तव यथेप्सितम् । एवमुक्तः स तु मुनी राजानमिदमब्रवीत् ८ रामान्नान्यद्बलं लोके पर्याप्तं तस्य रक्षसः । देवतानामपि भवान्समरेष्वभिपालकः ९ आसीत्तव कृतं कर्म त्रिलोकविदितं नृप । काममस्ति महत्सैन्यं तिष्ठत्विह परंतप १० बालोप्येष महातेजाः समर्थस्तस्य निग्रहे । गमिष्ये राममादाय स्वस्ति तेस्तु परंतप ११ इत्येवमुक्त्वा स मुनिस्तमादाय नृपात्मजम् । जगाम परमप्रीतो विश्वामित्रः स्वमाश्रमम् १२ तं तथा दण्डकारण्ये यज्ञमुद्दिश्य दीक्षितम् । बभूवोपस्थितो रामश्चित्रं विस्फारयन्धनुः १३ अजातव्यञ्जनः श्रीमान्बालः श्यामः शुभेक्षणः । एकवस्त्रधरो धन्वी शिखी कनकमालया १४ शोभयन्दण्डकारण्यं दीप्तेन स्वेन तेजसा । अदृश्यत तदा रामो बालचन्द्र इवोदितः १५ ततोहं मेघसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः । बली दत्तवरो दर्पादाजगामाश्रमान्तरम् १६ तेन दृष्टः प्रवि-

---

नसून अस्त्रविद्येमध्येंही निपुण नाहीं ६. तेव्हां माझ्यासहवर्तमान तें माझें सैन्य आपल्या इच्छेप्रमाणें तिकडे जाईल आणि हे मुनिश्रेष्ठ, चतुरंग सैन्यासहवर्तमान मी स्वतःच येऊन आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या त्या राक्षसशत्रूचा वध करीन " ह्याप्रमाणें दशरथानें सांगितलें असतां तो मुनि त्या राजाला ह्मणाला ७,८ " त्या राक्षसाचा वध करण्याला समर्थ असें रामावांचून ह्या जगतामध्यें दुसरें बल नाहीं. संग्रामामध्यें देवांचेंही तूं रक्षण करणारा होतास ९. हे राजा, त्रैलोक्यामध्यें तूं केलेलें कर्म विदितही आहे आणि, हे शत्रुतापना, तुझ्यापाशीं खरोखर मोठें सैन्यही आहे; परंतु, तें तुझें सैन्य येथेंच असूं दे १०. हा राम जरी बाल आहे तरी महातेजस्वी असून त्या राक्षसाचा निग्रह करण्यास समर्थ आहे. तेव्हां, हे शत्रुतापना, मी रामाला घेऊन जातों; तुझें कल्याण असो " ११. ह्याप्रमाणें दशरथाला सांगितल्यावर तो विश्वामित्र मुनि त्या राजकुमाराला घेऊन अत्यंत आनंदानें आपल्या आश्रमाला गेला १२. तदनंतर तो विश्वामित्र मुनि दंडकारण्यामध्यें यज्ञाकरितां दीक्षा घेऊन बसला असतांना राम आपलें अद्भुत धनुष्य लववीत त्याच्या समीप उभा राहिला १३. त्यावेळीं एकच वस्त्र, धनुष्य व झुलपें धारण करून सुवर्णमालेनें भूषित, शुभ नेत्रांनीं युक्त व वैभवशाली आणि श्यामवर्ण असलेला तो राम बाल असल्यामुळें त्याचे ठिकाणीं श्मश्रुप्रभृति चिन्हेंही उत्पन्न झालीं नव्हतीं १४ आणि आपल्या उज्ज्वल तेजानें दंडकारण्य सुशोभित करीत असलेला राम उदय पावलेल्या बालचंद्राप्रमाणें दिसत होता १५. असो. तदनंतर मेघतुल्य, शुद्ध सुवर्णाचीं कुंडलें धारण केलेला आणि बलाढ्य असा मी ( देवांना अवध्य ह्मणून ब्रह्म-

ष्टाहं सहसैवोद्यतायुधः । मां तु दृष्ट्वा धनुः सज्यमसंभ्रान्तश्चकार ह १७
अवजानन्न संमोहाद्बालोयमिति राघवम् । विश्वामित्रस्य तां वेदिमभ्य-
धावं कृतत्वरः १८ तेन मुक्तस्ततो बाणः शितः शत्रुनिबर्हणः । तेनाहं
ताडितः क्षिप्तः समुद्रे शतयोजने १९ नेच्छता तात मां हन्तुं तदा वीरेण
रक्षितः । रामस्य शरवेगेन निरस्तो भ्रान्तचेतनः २० पातितोहं तदा
तेन गम्भीरे सागराम्भसि । प्राप्य संज्ञां चिरात्तात लङ्कां प्रति गतः
पुरीम् २१ एवमस्मि तदा मुक्तः सहायास्ते निपातिताः । अकृतास्त्रेण
रामेण बालेनाक्लिष्टकर्मणा २२ तन्मया वार्यमाणस्तु यदि रामेण निग्र-
हम् । करिष्यस्यापदं घोरां क्षिप्रं प्राप्य न शिष्यसि २३ क्रीडारतिवि-
धिज्ञानां समाजोत्सवदर्शिनाम् । रक्षसां चैव संतापमनर्थं चाहरिष्यसि २४
हर्म्यप्रासादसंबाधां नानारत्नविभूषिताम् । द्रक्ष्यसि त्वं पुरीं लङ्कां विनष्टां
मैथिलीकृते २५ अकुर्वतोपि पापानि शुचयः पापसंश्रयात् । परपापैर्वि-

---

देवाचा ) वर प्राप्त झाला असल्यामुळें गर्वानें आश्रमामध्यें आलों १६. त्या आश्रमा-मध्यें एकाएकीं परिघसंज्ञक आयुध हातांत घेऊन प्रविष्ट झालेल्या मला त्यानें प्रथम पाहिलें नाहीं; परंतु, पहातांक्षणीं त्यानें यत्किंचितही न घाबरतां आपल्या धनुष्याला प्रत्यंचा चढविली; तथापि हा बालक आहे असें समजून अज्ञानानें रामाला न जुमा-नतां त्वरा करून मी विश्वामित्राच्या त्या वेदीकडे धांवलों १७, १८; परंतु, त्या रामानें एक शत्रुनाशक तीक्ष्ण बाण सोडिला व त्या बाणानें मला ताडित करून समुद्रामध्यें शंभर योजनें दूर फेंकून दिलें १९. तेव्हां रामाच्या बाणवेगानें फेंकला गेलेला मी मूर्छित झालों आणि, बा रावणा, माझा वध करण्याची त्याची केवळ इच्छा नसल्यामु-ळेंच त्या वीराच्या हातून माझें रक्षण झालें २०. अगाध समुद्रजलामध्यें मला त्यानें पाडिल्यावर, बा रावणा, पुष्कळ वेळानें मी शुद्धीवर आलों आणि नंतर लंकानगरीला परत गेलों २१. अशाप्रकारें मी मात्र त्या वेळेला सुटलों आणि अस्त्राविषयीं अन-भिज्ञ आणि बाल परंतु, अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या रामानें माझ्या साहाय्याकरितां तेथें गेलेल्या त्या राक्षसांचा निःपातच केला २२. तेव्हां मी नको नको ह्मणत अस-तांनाही तूं जर रामाशीं कलह उपस्थित करशील तर घोर विपत्ति प्राप्त होऊन तुझा सत्वरच नाश होईल २३. क्रीडा आणि संभोग ह्यांचे प्रकार जाणणारे आणि समाजांचे उत्सव अवलोकन करणारे जे राक्षस त्यांच्या संतापाला व अनर्थाला तूं कारण होशील २४ व सीतेकरितां वाड्यांनीं व प्रासादांनीं गजबजलेली आणि नाना-प्रकारच्या रत्नांनीं भूषित असलेली लंकानगरी उध्वस्त झालेली तूं पहाशील २५. पापांचें

नश्यन्ति मत्स्या नागह्रदे यथा २६ दिव्यचन्दनदिग्धाङ्गान्दिव्याभरणभू-
षितान् । द्रक्ष्यस्यभिहतान्भूमौ तव दोषात्तु राक्षसान् २७ हतदारान्सदा-
रांश्च दश विद्रवतो दिशः । हतशेषानशरणान्द्रक्ष्यसि त्वं निशाचरान् २८
शरजालपरिक्षिप्तामग्निज्वालासमावृताम् । प्रदग्धभवनां लङ्कां द्रक्ष्यसि
त्वमसंशयम् २९ परदाराभिमर्शात्तु नान्यत्पापतरं महत् । प्रमदानां सह-
स्राणि तव राजन्परिग्रहे ३० भव स्वदारनिरतः स्वकुलं रक्ष राक्षसान् ।
मानं वृद्धिं च राज्यं च जीवितं चेष्टमात्मनः ३१ कलत्राणि च सौम्यानि
मित्रवर्गं तथैव च । यदीच्छसि चिरं भोक्तुं मा कृथा रामविप्रियम् ३२
निवार्यमाणः सुहृदा मया भृशं प्रसह्य सीतां यदि धर्षयिष्यसि । गमिष्यसि
क्षीणबलः सबान्धवो यमक्षयं रामशरास्तजीवितः ३३ [१५२१] इत्यार्षे

---

आचरण न करितां पुरुष स्वतः जरी शुद्ध असले तरी पाप्यांच्या संगतीमुळें ते सर्पयुक्त सरोवरांतील मत्स्यांप्रमाणें दुसऱ्यांच्या पापामुळेंच नाश पावतात. ( सारांश, ज्यामध्यें सर्प आहेत अशा सरोवरांत रहाणारे मत्स्य स्वतः जरी कसलेंही पाप न करितां शुद्ध आचरणानें वागत असले तरी सरोवरांतील सर्प नाहींसे करण्याकरितां लोक प्रयत्न करूं लागले असतां त्या सर्पांबरोबर मत्स्यांचाही ज्याप्रमाणें केवल त्या सर्पांची संगत झाल्यामुळें नाश होतो त्याचप्रमाणें पापी पुरुषांच्या संसर्गानें शुद्ध आचरणानें वागणाऱ्या पुरुषांचाही नाश होतो. ) २६. तात्पर्य, दिव्य चंदन ज्यांच्या अंगाला लाविलें आहे आणि दिव्य अलंकारांनीं जे भूषित झालेले आहेत असे राक्षस तुझ्या दोषामुळें भूमीवर मारून टाकिलेले तूं अवलोकन करशील २७. वध पावलेले असे जे राक्षस अवशिष्ट रहातील त्यांपैकीं कांहीं स्त्रियांचा वध झालेले आणि कांहीं सपत्निक असे अनाथ होऊन दशदिशेस पळत सुटलेले तूं अवलोकन करशील २८ आणि बाण-समूहांनीं परिवेष्टित, अग्नीच्या ज्वालांनीं व्याप्त व दग्ध झालेल्या गृहांनीं युक्त अशी लंका तूं निःसंशय पहाशील २९. हे राजा, तुझ्या अंतःपुरामध्यें हजारों तरुण स्त्रिया आहेत आणि परस्त्रीगमनापेक्षां अधिक असें कोणतेंही दुसरें महापातक नाहीं ३०. तेव्हां तूं स्वस्त्रियांचे ठिकाणींच रत हो आणि आपलें कुल, राक्षस, मान, मोठेपणा, राज्य आणि स्वतःला इष्ट असलेलें जीवित ह्यांचें रक्षण कर ३१. सारांश, सौम्य स्त्रिया आणि मित्रगण ह्यांचा चिरकाल उपभोग घेण्याची जर तुला इच्छा असेल तर तूं रामाचा अपराध करूं नकोस ३२. मी सुहृद वारंवार नको नको ह्मणत असतांनाही अविचारानें जर तूं सीतेवर हात टाकशील तर रामबाणांच्या योगानें तुझ्या जीवितांचा अंत होऊन व सैन्याचा नाश होऊन तूं बांधवांसहवर्तमान यमसदनाला

श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टात्रिंशः सर्गः॥ ३८॥

एवमस्मि तदा मुक्तः कथंचित्तेन संयुगे। इदानीमपि यद्वृत्तं तच्छृणुष्व यदुत्तरम् १ राक्षसाभ्यामहं द्वाभ्यामनिर्विण्णस्तथा कृतः। सहितो मृगरूपाभ्यां प्रविष्टो दण्डकावने २ दीप्तजिह्वो महादंष्ट्रस्तीक्ष्णशृङ्गो महाबलः। व्यचरन्दण्डकारण्यं मांसभक्षो महामृगः ३ अग्निहोत्रेषु तीर्थेषु चैत्यवृक्षेषु रावण। अत्यन्तघोरो व्यचरंस्तापसांस्तान्प्रधर्षयन् ४ निहत्य दण्डकारण्ये तापसान्धर्मचारिणः। रुधिराणि पिबंस्तेषां तन्मांसानि च भक्षयन् ५ ऋषिमांसाशनः क्रूरस्त्रासयन्वनगोचरान्। तदा रुधिरमत्तोहं व्यचरं दण्डकावनम् ६ तदाहं दण्डकारण्ये विचरन्धर्मदूषकः। आसादयं तदा रामं तापसं धर्ममाश्रितम् ७ वैदेहीं च महाभागां लक्ष्मणं च महारथम्। तापसं नियताहारं सर्वभूतहिते रतम् ८ सोहं वनगतं रामं परिभूय महाबलम्। तापसोयमिति ज्ञात्वा पूर्ववैरमनुस्मरन् ९ अभ्यधावं

---

जाशील ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला॥ ३८॥

ह्याप्रमाणें त्या युद्धामध्यें मी कसा तरी त्या रामाच्या हातून सुटलों; परंतु, सांप्रत हीं लोकोत्तर अशी जी एक गोष्ट घडून आली आहे ती तूं श्रवण कर १. पूर्वी माझी रामानें तशी अवस्था केली असतांनाही पापकर्माचा कंटाळा न आलेला मी मृगरूप धारण केलेल्या दोन राक्षसांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झालों होतों २. प्रदीप्त जिव्हा, मोठ्या मोठ्या दाढा, तीक्ष्ण शृंगें आणि प्रचंड बल ह्यांनीं युक्त असलेला मी मांसभक्षक मोठ्या मृगाचें रूप धारण करून दंडकारण्यामध्यें संचार करीत होतों ३. हे रावणा, मी अत्यंत घोर मृग, त्या तापसांना त्रास देण्याकरितां अग्निहोत्रें, तीर्थें आणि देवताधिष्ठित वृक्ष ह्यांचे ठिकाणीं संचार करीत होतों ४ आणि दंडकारण्यामध्यें धर्माचरण करणाऱ्या मुनींचा वध करून मी त्यांचें रक्त प्राशन करीत होतों व त्यांचें मांस भक्षण करीत होतों ५. सारांश, ऋषिमांस भक्षण करणारा मी क्रूर मृग रुधिरप्राशनानें मत्त होऊन वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या मुनींना त्रस्त करीत करीत दंडकारण्यामध्यें संचार करीत होतों ६. तेव्हां दंडकारण्यामध्यें संचार करितां करितां मी धर्मविध्वंसक, मुनिधर्माचें अवलंबन केलेल्या रामासमीप, महाभाग्यवती वैदेहीसमीप आणि शुद्ध आहार करणारा, सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं तत्पर आणि तपस्वी अशा महारथि लक्ष्मणासमीप आलों ७,८. नंतर वनामध्यें आलेल्या महाबलाढ्य रामाला न जुमानितां हा तपस्वी आहे असें समजून पूर्व वैर

सुसंक्रुद्धस्तीक्ष्णशृङ्गो मृगाकृतिः । जिघांसुरकृतप्रज्ञस्तं प्रहारमनुस्म-
रन् १० तेन त्यक्तास्त्रयो बाणाः शिताः शत्रुनिबर्हणाः । विकृष्य
सुमहच्चापं सुपर्णानिलतुल्यगाः ११ ते बाणा वज्रसंकाशाः सुघोरा रक्तभो-
जनाः । आजग्मुः सहिताः सर्वे त्रयः संनतपर्वणः १२ पराक्रमज्ञो रामस्य
शठो दृष्टभयः पुरा । समुत्क्रान्तस्ततो मुक्तस्तावुभौ राक्षसौ हतौ १३
शरेण मुक्तो रामस्य कथंचित्प्राप्य जीवितम् । इह प्रव्राजितो युक्तस्ता-
पसोहं समाहितः १४ वृक्षे वृक्षे हि पश्यामि चीरकृष्णाजिनाम्बरम् । गृही-
तधनुषं रामं पाशहस्तमिवान्तकम् १५ अपि रामसहस्राणि भीतः
पश्यामि रावण । रामभूतमिदं सर्वमरण्यं प्रतिभाति मे १६ राममेव हि
पश्यामि रहिते राक्षसेश्वर । दृष्ट्वा स्वप्नगतं राममुद्भ्रमामीव चेतनः १७
रकारादीनि नामानि रामत्रस्तस्य रावण । रत्नानि च रथाश्चैव वित्रासं
जनयन्ति मे १८ अहं तस्य प्रभावज्ञो न युद्धं तेन ते क्षमम् । बलिं वा

---

लक्ष्यांत घेऊन आणि तो प्रहार मनांत आणून तीक्ष्ण शृंगांनीं युक्त, अविचारी व मृगरूप धारण केलेला असा मी अत्यंत क्रुद्ध होऊन त्याचा वध करण्याच्या उद्देशानें ( मृगरूप धारण केलेल्या इतर दोन राक्षसांसहवर्तमान ) त्याच्या अंगावर धांवलों १०. तेव्हां शत्रूंचा घात करणारे व गरुड आणि वायु ह्यांच्याप्रमाणें शीघ्र गमन करणारे तीन तीक्ष्ण बाण आपलें अति प्रचंड धनुष्य आकर्षण करून त्यानें टाकिले ११ व वज्रतुल्य, अत्यंत घोर, रक्तशोषक आणि बांकदार पेऱ्यांनीं युक्त असलेले ते सर्व तिन्ही बाण एकदम आले १२. तेव्हां रामाचा पराक्रम जाणीत असलेला आणि पूर्वी एकदां भय अवलोकन केलेला मी शठ पलायन करून तेथून सुटलों आणि त्या दोन्ही राक्षसांचा वध झाला १३. रामाच्या बाणाचे तावडींतून मी जीव धरून कसा तरी सुटलों आणि येथें सर्व दुराचरणांचा परित्याग करून स्वस्थ अंतःकरणानें तपोनिष्ठ व जितेंद्रिय होऊन राहिलों १४. प्रत्येक वृक्षावर वल्कलें व कृष्णाजिन धारण करून धनुष्य घेतलेला राम हातांत पाश घेतलेल्या मृत्यूप्रमाणें मला दिसत आहे. हे रावणा, मी भयभीत झालों असून हजारों राम मला दृष्टीं पडत आहेत आणि हें सर्व अरण्यच मला राममय भासत आहे १६. रामरहित असलेल्याही वनामध्यें, हे राक्षसराजा, रामच मला दिसत असतो आणि स्वप्नामध्यें रामाला पाहिलें असतां मी भिऊन जागा असल्याप्रमाणें ओरडूं लागतों १७. हे रावणा, रामाची जरब बसून गेल्यामुळें रकारानें ज्या नांवांचा आरंभ होतो तीं नांवें ह्मणजे उदाहरणार्थ रत्नें, रथ वगैरे हीं माझे ठिकाणीं भय उत्पन्न करितात १८. सारांश, मला त्याचा प्रभाव

नमुचिं वापि हन्याद्धि रघुनन्दनः १९ रणे रामेण युध्यस्व क्षमां वा कुरु रावण । न ते रामकथा कार्या यदि मां द्रष्टुमिच्छसि २० बहवः साधवो लोके युक्ता धर्ममनुष्ठिताः । परेषामपराधेन विनष्टाः सपरिच्छदाः २१ सोहं परापराधेन विनशेयं निशाचर । कुरु यत्ते क्षमं तत्त्वमहं त्वां नानुयामि वै २२ रामश्च हि महातेजा महासत्त्वो महाबलः । अपि राक्षसलोकस्य भवेदन्तकरोपि हि २३ यदि शूर्पणखाहेतोर्जनस्थानगतः खरः । अतिवृत्तो हतः पूर्वं रामेणाक्लिष्टकर्मणा ॥ अत्र ब्रूहि यथातत्त्वं को रामस्य व्यतिक्रमः ३४ इदं वचो बन्धुहितार्थिना मया यथोच्यमानं यदि नाभिपत्स्यसे । सबान्धवस्त्यक्ष्यसि जीवितं रणे हतोद्य रामेण शरैरजिह्मगैः २५ [ १५४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्ड एकोनचत्वारिंशः सर्गः ॥ ३९ ॥

---

विदित आहे; त्याच्याशीं युद्ध करणें तुला योग्य नाहीं. फार तर काय बलीलाही तो मारील आणि नमुचि दैत्य जरी आतां उत्पन्न झाला तरी त्याचाही रघुनंदन राम वध करील १९. हे रावणा, संग्रामामध्यें तूं रामाशीं युद्ध कर किंवा क्षमेचें अवलंबन करून स्वस्थ बैस. ( कारण, त्याच्याशीं संग्रामामध्यें युद्ध केलेंस तर एकट्या तुझाच नाश होऊन बाकीचे तरी रहातील; परंतु, हें जें कृत्य तूं मनामध्यें आणिलें आहेस त्यामुळें सर्व राक्षसकुलाचाच नाश होईल. ) मला जर जिवंत पहाण्याची तुझी इच्छा असेल तर तूं रामाची गोष्ट माझ्यापाशीं काढूं नको. ( कारण, त्याचें नांव काढणें हें आमच्या राक्षसांचें तेज नाहींसें करणारें आहे आणि तेज नाहींसें होणें ही अवस्था मरणापेक्षांही दुःखदायक आहे ) २०. जगतामध्यें धर्मानुष्ठान केलेले असे पुष्कळ निरुपद्रवी व जितेंद्रिय पुरुष दुसऱ्यांच्या अपराधामुळें सपरिवार नाश पावलेले आहेत २१. तेव्हां, हे राक्षसा, दुसऱ्याच्या अपराधामुळें नाश पावण्याचा मला प्रसंग येणार आहे. तस्मात्, तुला जें योग्य दिसेल तें तूं कर; मी तुझें अनुकरण करणार नाहीं २२. कारण, राम महातेजस्वी, महाबुद्धिमान् आणि महाबलाढ्य असल्यामुळें राक्षसलोकाचा तो निःसंशय घातही करून टाकील २३. आतां शूर्पणखेकरितां खर मर्यादेचें उल्लंघन करून पूर्वीं जनस्थानांत गेला असल्यामुळें अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या रामानें त्याचा वध केला ह्यांत रामाचा काय बरें अपराध झाला ? हें तूंच एकदां खरें खरें सांग २४. असो. बांधवांचें हित व्हावें ह्या उद्देशानें मी करीत असलेल्या ह्या भाषणाचा जर तूं अंगिकार केला नाहींस तर सरळ जाणाऱ्या बाणांच्या योगानें रामाच्या हातून संग्रामामध्यें आजच वध पावून तूं बांधवांसहवर्तमान जीविताचा त्याग कर-

मारीचस्य तु तद्वाक्यं क्षमं युक्तं च रावणः। उक्तो न प्रतिजग्राह
मर्तुकाम इवौषधम् १ तं पथ्यहितवक्तारं मारीचं राक्षसाधिपः। अब्र-
वीत्परुषं वाक्यमयुक्तं कालचोदितः २ दुष्कुलैतदयुक्तार्थं मारीच मयि
कथ्यते। वाक्यं निष्फलमत्यर्थं बीजमुप्तमिवोषरे ३ त्वद्वाक्यैर्न तु मां
शक्यं भेत्तुं रामस्य संयुगे। मूर्खस्य पापशीलस्य मानुषस्य विशेषतः ४
यस्त्यक्त्वा सुहृदो राज्यं मातरं पितरं तथा। स्त्रीवाक्यं प्राकृतं श्रुत्वा वन-
मेकपदे गतः ५ अवश्यं तु मया तस्य संयुगे खरघातिनः। प्राणैः प्रियतरा
सीता हर्तव्या तव सन्निधौ ६ एवं मे निश्चिता बुद्धिर्हृदि मारीच
विद्यते। न व्यावर्तयितुं शक्या सेन्द्रैरपि सुरासुरैः ७ दोषं गुणं वा संपृ-
ष्टस्त्वमेवं वक्तुमर्हसि। अपायं वा उपायं वा कार्यस्यास्य विनिश्चये ८
संपृष्टेन तु वक्तव्यं सचिवेन विपश्चिता। उद्यताञ्जलिना राज्ञो य इच्छे-

---

शील २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

मरणाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला ज्याप्रमाणें, औषध घेण्यास सांगितलें असतांही तो घेत नाहीं त्याप्रमाणें मारीचाचें तें भाषण योग्य व सयुक्तिक असतांही रावणानें स्वीकारिलें नाहीं १. इतकेंच नव्हे परंतु, पथ्यकारक आणि हितावह असें भाषण करणाऱ्या मारीचाला तो राक्षसाधिपति रावण कालाची प्रेरणा झाल्यामुळें अयोग्य आणि मर्मभेदक शब्दांनीं ह्मणाला २ " हे मारीचा, हे कुलहीना, उखार जमीनीमध्यें पेरलेलें बीं ज्याप्रमाणें अगदीं निष्फल होऊन जातें त्याप्रमाणें ज्यांतील अर्थ मुळींच अयोग्य आहे असा हा निष्फल उपदेश तूं मला करीत आहेस ३; परंतु, मूर्ख, दुःशील आणि विशेषतः मनुष्य असा जो राम त्याच्याशीं भार्याहरण-रूप संग्राम करण्याविषयीं निश्चित झालेला मी तुझ्या भाषणांनीं त्या निश्चयापासून निवृत्त होण्यास शक्य नाहीं ४. स्त्रीचें क्षुल्लक वचन ऐकून जो सुहृद, राज्य, माता आणि पिता ह्यांचा त्याग करून एकदम वनामध्यें गेला ५ त्या संग्रामामध्यें खराचा वध करणाऱ्या रामाची प्राणापेक्षांही प्रिय असलेली भार्या मी तुझ्या समक्ष हरण करणार ६. हे मारीचा, ह्याप्रमाणें मनामध्यें जो माझा पक्का निश्चय झालेला आहे तो इंद्रासहवर्तमान देवदैत्यांच्यानींही ढळणें शक्य नाहीं ७. ह्या कार्याचा निर्णय करण्यासंबंधानें दोष अथवा गुण किंवा अपाय अथवा उपाय जर मीं तुला विचारिला असता तर ह्याप्रमाणें सांगणें तुला योग्य होतें ८. ज्या विचारी सचिवाला आपल्या अभ्युदयाची इच्छा असेल त्यानें प्रश्न झाल्यावर हात जोडून राजाला

त्रुतिमात्मनः ९ वाक्यमप्रतिकूलं तु मृदुपूर्वं शुभं हितम् । उपचारेण वक्तव्यो युक्तं च वसुधाधिपः १० सावमर्दं तु यद्वाक्यमथवा हितमुच्यते । नाभिनन्देत तद्राजा मानार्थी मानवर्जितम् ११ पञ्चरूपाणि राजानो धारयन्त्यमितौजसः । अग्नेरिन्द्रस्य सोमस्य यमस्य वरुणस्य च १२ औष्ण्यं तथा विक्रमं च सौम्यं दण्डं प्रसन्नताम् । धारयन्ति महात्मानो राजानः क्षणदाचर १३ तस्मात्सर्वास्ववस्थासु मान्याः पूज्याश्च नित्यदा । त्वं तु धर्ममविज्ञाय केवलं मोहमाश्रितः १४ अभ्यागतं तु दौरात्म्यात्परुषं वदसीदृशम् । गुणदोषौ न पृच्छामि क्षयं चात्मनि राक्षस १५ मयोक्तमपि चैतावत्त्वां प्रत्यमितविक्रम । अस्मिंस्तु स भवान्कृत्ये साहाय्यं कर्तुमर्हसि १६ शृणु तत्कर्मसाहाय्ये यत्कार्यं वचनान्मम । सौवर्णस्त्वं मृगो भूत्वा चित्रो रजतबिन्दुभिः १७ आश्रमे तस्य रामस्य सीतायाः प्रमुखे चर । प्रलोभयित्वा वैदेहीं यथेष्टं गन्तुमर्हसि १८ त्वां हि मायामयं दृष्ट्वा काञ्चनं जातविस्मया । आनयैनमिति क्षिप्रं रामं वक्ष्यति मैथिली १९ अपक्रान्ते च

सांगावें ९. शुभ, हितावह, योग्य आणि अनुकूल असेंच भाषण मार्दवपूर्वक आदरानें राजाशीं करावें लागतें १०. राजाचा उपमर्द करणारें आणि मानहीन असें भाषण हितकारक जरी कोणी करूं लागला तरी मानी राजा त्याला मान डोलवणार नाहीं ११. अचिंत्यसामर्थ्यवान् राजे अग्नि, इंद्र, सोम, यम आणि वरुण ह्या पांच लोकपालांचीं पांच रूपें धारण करीत असतात १२. सारांश, हे राक्षसा, तीक्ष्णपणा, पराक्रम, सौम्यता, दुष्टनिग्रह, आणि प्रसन्नता हे पांच लोकपालांचे पांच गुण महात्मे राजे धारण करीत असतात १३. तस्मात्, कोणतीही अवस्था प्राप्त झाली तरी राजे हे नेहमीं मान्य व पूज्य आहेत; परंतु, तूं केवळ मोहग्रस्त झाल्यामुळें राजधर्म न जाणून १४ मी आलों असतां दुष्ट स्वभावामुळें अशाप्रकारचें मर्मभेदक भाषण माझ्याशीं करीत आहेस. हे राक्षसा, माझे अंगीं गुणदोष काय आहेत हें मी तुला विचारीत नाहीं १५. हे अमितपराक्रमी मारीचा, ह्या कृत्यामध्यें तूं साहाय्य कर येवढेंच मीं तुला विचारिलें आहे १६. साहाय्य करण्यामध्यें तूं काय काम करावयाचें हें ( पाहिजे तर ) आणखी एकदां मी सांगतों तें ऐक. "रौप्य बिंदूंनीं युक्त असा अद्भुत सुवर्णमय मृग होऊन १७ तूं त्या रामाच्या आश्रमामध्यें सीतेसमोर चालूं लाग आणि सीतेला लुब्ध करून मग वाटेल तिकडे जा १८. सुवर्णमृगरूप धारण केलेल्या तुज मायावी राक्षसाला अवलोकन केल्यावर सीतेला विस्मय वाटेल आणि "ह्या मृगाला घेऊन या" असें ती रामाला लगेच ह्मणेल १९. नंतर राम तेथून निघून गेला असतां तूंही दूर जाऊन,

काकुत्स्थे दूरं गत्वाप्युदाहर । हा सीते लक्ष्मणेत्येवं रामवाक्यानुरूपकम् २० तच्छ्रुत्वा रामपदवीं सीतया च प्रचोदितः । अनुगच्छति संभ्रान्तं सौमित्रिरपि सौहृदात् २१ अपक्रान्ते च काकुत्स्थे लक्ष्मणे च यथासुखम् । आहरिष्यामि वैदेहीं सहस्राक्षः शचीमिव २२ एवं कृत्वा त्विदं कार्यं यथेष्टं गच्छ राक्षस । राज्यस्यार्धं प्रदास्यामि मारीच तव सुव्रत २३ गच्छ सौम्य शिवं मार्गं कार्यस्यास्य विवृद्धये । अहं त्वानुगमिष्यामि सरथो दण्डकावनम् २४ प्राप्य सीतामयुद्धेन वञ्चयित्वा तु राघवम् । लङ्कां प्रति गमिष्यामि कृतकार्यः सह त्वया २५ नो चेत्करोषि मारीच हन्मि त्वामहमद्य वै । एतत्कार्यमवश्यं मे बलादपि करिष्यसि २६ राज्ञो विप्रतिकूलस्थो न जातु सुखमेधते २७ आसाद्य तं जीवितसंशयस्ते मृत्युर्ध्रुवो ह्यद्य मया विरुध्यतः । एतद्यथावत्परिगण्य बुद्ध्या यदत्र पथ्यं कुरु तत्तथा त्वम् २८ [ १५७४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

---

" हे सीते, हे लक्ष्मणा, " अशा रामाच्या शब्दाला जुळण्यासारिख्या हाका मार २०; ह्मणजे त्या हाका ऐकून सीता रामाच्या मार्गाला जाण्याविषयीं लक्ष्मणाला सांगेल आणि भ्रातृप्रेमामुळें लक्ष्मणही घाबऱ्याप्रमाणें त्याच्या मागोमाग जाईल २१. ह्याप्रमाणें राम आणि लक्ष्मण तेथून निघून गेले ह्मणजे शचीला हरण करणाऱ्या इंद्राप्रमाणें मी सीतेला खुशाल हरण करून आणीन २२. तस्मात्, अशारीतीनें हें कार्य करून, हे राक्षसा, तूं पाहिजे तिकडे जा. हे सुव्रता मारीचा, मी तुला अर्धें राज्य देईन २३. ह्या कार्याच्या सिद्धीकरितां, हे सत्त्वस्थ मारीचा, तूं निर्विघ्नपणें आतां मार्गाला लाग; मी रथासहवर्तमान तुझ्या मागोमाग दंडकारण्यामध्यें येतों २४. रामाला फसवून युद्धावांचूनच सीता प्राप्त झाल्यावर मी तुझ्यासहवर्तमान कृतकृत्य होऊन लंकेला परत जाईन २५. हे मारीचा, ह्याप्रमाणें जर न वागशील तर मी आजच तुझा वध करून टाकितों. माझ्या बलात्कारानें कां होईना हें कार्य तुला अवश्य केलेंच पाहिजे २६. कारण, राजाशीं प्रतिकूल वागणाऱ्याला कधींही सुख प्राप्त होत नाहीं २७. सारांश, रामाशीं प्रसंग आणिल्यानें तुझ्या जीविताचा संशय आहे; परंतु, माझ्याशीं विरुद्ध वागल्यानें तर आज तुझा मृत्यु निश्चितच झाला आहे. तेव्हां ह्याचा पूर्णपणें लक्ष्यपूर्वक विचार करून ह्या दोहोंपैकीं जें तुझ्या हिताचें वाटेल तें तूं आपल्या इच्छेप्रमाणें कर " २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

आज्ञप्तो रावणेनेत्थं प्रतिकूलं च राजवत् । अब्रवीत्परुषं वाक्यं निःशङ्को राक्षसाधिपम् १ केनायमुपदिष्टस्ते विनाशः पापकर्मणा । सपुत्रस्य सराज्यस्य सामात्यस्य निशाचर २ कस्त्वया सुखिना राजन्नाभिनन्दति पापकृत् । केनेदमुपदिष्टं ते मृत्युद्वारमुपायतः ३ शत्रवस्तव सुव्यक्तं हीनवीर्या निशाचर । इच्छन्ति त्वां विनश्यन्तमुपरुद्धं बलीयसा ४ केनेदमुपदिष्टं ते क्षुद्रेणाहितबुद्धिना । यस्त्वामिच्छन्ति नश्यन्तं स्वकृतेन निशाचर ५ वध्याः खलु न वध्यन्ते सचिवास्तव रावण । ये त्वामुत्पथमारूढं न निगृह्णन्ति सर्वशः ६ अमात्यैः कामवृत्तो हि राजा कापथमाश्रितः । निग्राह्यः सर्वथा सद्भिः स निग्राह्यो न गृह्यसे ७ धर्ममर्थं च कामं च यशश्च जयतां वर । स्वामिप्रसादात्सचिवाः प्राप्नुवन्ति निशाचर ८ विपर्यये तु तत्सर्वं व्यर्थं भवति रावण । व्यसनं स्वामिवैगुण्यात्प्राप्नुवन्तीतरे जनाः ९ राजमूलो हि धर्मश्च यशश्च

---

ह्याप्रमाणें राजालाच योग्य अशी प्रतिकूल आज्ञा रावणानें केली असतां तो मारीच निःशंकपणें पुनरपि मर्मभेदक भाषण त्या राक्षसाधिपतीशीं करूं लागला कीं १, "हे निशाचरा, कोणत्या पापकर्मी पुरुषानें पुत्र आणि राज्य ह्यांसहवर्तमान तुझा नाश होण्याचा तुला हा उपदेश केला आहे ? २. हे राजा, तूं सुखी राहिल्यानें कोणत्या पापकर्मी पुरुषाला बरें वाटत नाहीं ? अरे, उपाय ह्मणून हें मृत्यूचें द्वार तुला कोणीं दाखवून दिलें आहे ? ३. हे निशाचरा, तुझे कोणी शत्रु आहेत; परंतु, तुझ्यापेक्षां ते वीर्यानें निःसंशय कमी असल्यामुळें बलिष्ठ शत्रूच्या तावडींत सांपडून तुझा नाश होतांना पहाण्याची ते इच्छा करीत आहेत ४. हे निशाचरा, स्वतः योजिलेल्या उपायानें तुझा नाश होत असतांना पहाण्याची इच्छा करणाऱ्या कोणत्या दुष्टबुद्धि क्षुद्र पुरुषानें हा तुला उपदेश केला आहे ? ५. हे रावणा, तूं उन्मार्गाचा स्वीकार केला असतांना सर्व प्रकारांनीं जे तुझा निग्रह करीत नाहींत त्या सचिवांचा खरोखर वध करणेंच तुला योग्य असून तूं त्यांचा वध करीत नाहींस ६. राजानें स्वेच्छाचारी होऊन कुमार्गाचें अवलंबन केलें असतां चांगल्या अमात्यांनीं त्याचा सर्वप्रकारें निग्रहच केला पाहिजे; परंतु, तुला ताब्यांत ठेवणें योग्य असतांनाही कोणी अमात्य तुझा निग्रह करीत नाहींत ७. हे विजयिश्रेष्ठ निशाचरा, प्रभूचें आचरण शुद्ध असलें ह्मणजे धर्म, अर्थ काम आणि यश हीं सचिवांना प्राप्त होतात ८; परंतु, हे रावणा, प्रभूचें आचरण जर उलट असलें तर तें सर्व व्यर्थ होतें आणि इतर लोकांनाही प्रभूच्या दोषामुळें संकट प्राप्त होतें ९. हे विजयिश्रेष्ठा, धर्म आणि यश हीं राजावरच अवलंबून असल्यामुळें

जयतां वर । तस्मात्सर्वास्ववस्थासु रक्षितव्या नराधिपाः १० राज्यं पालयितुं शक्यं न तीक्ष्णेन निशाचर । न चातिप्रतिकूलेन नाविनीतेन राक्षस ११ ये तीक्ष्णमन्त्राः सचिवा भुज्यन्ते सह तेन वै । विषमेषु रथाः शीघ्रं मन्दसारथयो यथा १२ बहवः साधवो लोके युक्तधर्ममनुष्ठिताः । परेषामपराधेन विनष्टाः सपरिच्छदाः १३ स्वामिना प्रतिकूलेन प्रजास्तीक्ष्णेन रावण । रक्ष्यमाणा न वर्धन्ते मृगा गोमायुना यथा १४ अवश्यं विनशिष्यन्ति सर्वे रावण राक्षसाः । येषां त्वं कर्कशो राजा दुर्बुद्धिरजितेन्द्रियः १५ तदिदं काकतालीयं घोरमासादितं मया । अत्र त्वं शोचनीयोसि ससैन्यो विनशिष्यसि १६ मां निहत्य तु रामोसावचिरात्त्वां वधिष्यति । अनेन कृतकृत्योस्मि म्रिये चाप्यरिणा हतः १७ दर्शनादेव रामस्य हतं मामवधारय । आत्मानं च हतं विद्धि हृत्वा सीतां सबान्धवम् १८ आनयिष्यसि चेत्सीतामाश्रमात्सहितो मया । नैव

---

कोणत्याही अवस्थेमध्यें मंत्र्यांनीं राजाचें रक्षणच केलें पाहिजे १०. हे निशाचर राक्षसा, क्रूर, उद्धट आणि प्रजाजनांना फारच प्रतिकूल अशा राजाच्या हातून राज्याचें परिपालन होणें शक्य नाहीं ११. मंदबुद्धि सारथि ज्या रथांवर आहेत असे रथ विषम प्रदेशावरून जाऊं लागले असतां ज्याप्रमाणें सारथ्यांसहवर्तमान ते सत्वर नाश पावतात त्याचप्रमाणें तीक्ष्ण उपाय योजण्याची मसलत देणारे मंत्री त्या राजासहवर्तमान त्या मसलतीचें नाशरूप फल लवकरच भोगतात १२. धर्मानें वागणारे असे कित्येक निरुपद्रवी लोक ह्या जगतामध्यें दुसऱ्यांच्या अपराधामुळें नाश पावलेले आहेत १३. व्याध रक्षण करीत असतांना ज्याप्रमाणें मृग वृद्धिंगत होत नाहींत त्याचप्रमाणें प्रतिकूल आणि उग्र असा राजा रक्षण करीत असतांना प्रजेची भरभराट होत नाहीं १४. हे रावणा, निर्दय, दुष्टबुद्धि आणि अजितेंद्रिय असा तूं ज्यांचा राजा आहेस त्या सर्व राक्षसांचा खाचित नाश होईल १५. सारांश, तुझ्यापासून मृत्यु येण्याचें हें घोर संकट जरी मला आज एकाएकीं प्राप्त झालें आहे तरी (जन्मास आलेला प्राणी केव्हां तरी मरावयाचाच आहे असा विचार मनांत येऊन) त्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं; परंतु, ह्या करण्यामध्यें सैन्यासहवर्तमान तुझा नाश होणार ह्मणून तुझ्याबद्दल मला वाईट वाटत आहे १६. असो. हा राम प्रथम माझा वध करून नंतर लवकरच तुझा वध करील. तेव्हां आतां तुझ्या हातून मरण्यापेक्षां रणामध्यें ह्या शत्रूच्या हातून वध झाला असतां मी कृतकृत्य तरी होईन १७. रामाचें मला दर्शन झालें कीं मी मेलोंच असें तूं समज आणि सीतेला हरण केलीस ह्मणजे तुझाही बांधवांसहवर्तमान

त्वमपि नाहं वै नैव लङ्का न राक्षसाः १९ निवार्यमाणस्तु मया हितै-
षिणा न मृष्यसे वाक्यमिदं निशाचर । परेतकल्पा हि गतायुषो नरा
हितं न गृह्णन्ति सुहृद्भिरीरितम् २० [ १५९४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥ ४१ ॥

एवमुक्त्वा तु परुषं मारीचो रावणं ततः । गच्छावेत्यब्रवीद्दीनो
भयाद्रात्रिंचरप्रभोः १ दृष्टश्चाहं पुनस्तेन शरचापासिधारिणा । मद्वधो-
द्यतशस्त्रेण निहतं जीवितं च मे २ न हि रामं पराक्रम्य जीवन्प्रतिनि-
वर्तते । वर्तते प्रतिरूपोसौ यमदण्डहतस्य ते ३ किं तु कर्तुं मया शक्य-
मेवं त्वयि दुरात्मनि । एष गच्छाम्यहं तात स्वस्ति तेस्तु निशाचर ४
प्रहृष्टस्त्वभवत्तेन वचनेन स राक्षसः । परिष्वज्य सुसंश्लिष्टमिदं वचन-
मब्रवीत् ५ एतच्छौटीर्ययुक्तं ते मच्छन्दवशवर्तिनः । इदानीमसि मारीचः
पूर्वमन्यो हि राक्षसः ६ आरुह्यतामयं शीघ्रं खगो रत्नविभूषितः । मया

---

वध झालाच हें तूं समजून ठेव १८. माझ्यासहवर्तमान तूं जर आश्रमांतून सीतेला हरण करून आणिशील तर मीही जिवंत रहाणार नाहीं; तूंही कायम रहात नाहींस; लंकाही जाग्यावर रहात नाहीं आणि राक्षसही हयात रहात नाहींत १९. हे निशाचरा, तुझें हित इच्छिणारा मी तुला नको नको ह्मणत असतांना ह्या माझ्या सांगण्याची तूं पर्वा करीत नाहींस तेव्हां आयुष्य संपून मृतप्राय झालेले पुरुष सुहृदांनीं सांगितलेला हितकारक उपदेश स्वीकारीत नाहींत ( हेंच सत्य आहे ) " २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

ह्याप्रमाणें रावणाला मर्मभेदक भाषण केल्यानंतर मारीच राक्षस दीन होऊन त्या राक्षसाधिपतीच्या भीतीनें त्याला ह्मणाला " आपण जाऊं १; परंतु, बाण, धनुष्य आणि खड्ग धारण केलेल्या रामानें मला पुनरपि अवलोकन केलें ह्मणजे माझ्या वधाकरितां शस्त्र उचललेल्या त्या रामाच्या हातून माझ्या जीविताचा नाश होणार ( हें ठरलेलेंच आहे ) २. कारण, रामावर चाल करून गेल्यानंतर कोणीही जिवंत परत फिरत नाहीं. तेव्हां यमदंडाचा प्रहार झालेल्या तुझा हा राम प्रतियमदंडच आहे ( असें मला वाटतें ) ३. तूं हा असा दुष्ट असतांना माझ्या हातून दुसरें काय होणें शक्य आहे ? तस्मात्, हा मी निघालों; बा निशाचरा, तुझें कल्याण असो " ४. ह्या मारीचाच्या भाषणानें त्या रावण राक्षसाला हर्ष झाला आणि मारीचाला अगदीं कडकडून भेटून तो ह्मणाला ५ " माझ्या इच्छेप्रमाणें वागणाऱ्या तुझें हें भाषण वीर्याला शोभण्या-

सह रथो युक्तः पिशाचवदनैः खरैः ७ प्रलोभयित्वा वैदेहीं यथेष्टं गन्तु-
मर्हसि । तां शून्ये प्रसभं सीतामानयिष्यामि मैथिलीम् ॥ ततस्तथे-
त्युवाचैनं रावणं ताटकासुतः ८ ततो रावणमारीचौ विमानमिव तं रथम् ।
आरुह्याययतुः शीघ्रं तस्मादाश्रममण्डलात् ९ तथैव तत्र पश्यन्तौ पत्त-
नानि वनानि च । गिरींश्च सरितः सर्वा राष्ट्राणि नगराणि च १०
समेत्य दण्डकारण्यं राघवस्याश्रमं ततः । ददर्श सहमारीचो रावणो
राक्षसाधिपः ११ अवतीर्य रथात्तस्मात्ततः काञ्चनभूषणात् । हस्ते
गृहीत्वा मारीचं रावणो वाक्यमब्रवीत् १२ एतद्रामाश्रमपदं दृश्यते कद-
लीवृतम् । क्रियतां तत्सखे शीघ्रं यदर्थं वयमागताः १३ स रावणवचः श्रुत्वा
मारीचो राक्षसस्तदा । मृगो भूत्वाश्रमद्वारि रामस्य विचचार ह १४
स तु रूपं समास्थाय महदद्भुतदर्शनम् । मणिप्रवरशृङ्गाग्रः सितासि-
तमुखाकृतिः १५ रक्तपद्मोत्पलमुख इन्द्रनीलोत्पलश्रवाः । किंचिदभ्युन्नत-

---

सारिखें आहे व तूं आतां मारीच आहेस ( असें मला दिसत आहे ). पूर्वी दुसराच कोणी राक्षस तुझ्या अंगांत आला होता ६. आतां पिशाच्यासारिख्या मुखांनीं युक्त असलेले गर्दभ ज्याला जोडिलेले आहेत अशा ह्या रत्नविभूषित आकाशगामी रथावर माझ्यासहवर्तमान तूं सत्वर आरूढ हो ७. विदेहराजकन्या सीतेला लुब्ध केल्यावर मग तूं पाहिजे तिकडे जा. आश्रम शून्य झाल्यावर मी ती मिथिलाधिपतीची कन्या सीता बलात्कारानें हरण करून आणीन ". ह्याप्रमाणें रावणानें सांगितल्यानंतर तो ताट-कापुत्र रावणाला " ठीक आहे " असें ह्मणाला ८. तदनंतर विमानाप्रमाणें आकाशांतून संचार करणाऱ्या त्या रथामध्यें रावण व मारीच हे आरूढ होऊन त्या आश्रममं-डलांतून सत्वर निघून गेले ९. जातां जातां शहरें, वनें, पर्वत, सर्व नद्या, राष्ट्रें आणि राजधान्या अवलोकन करीत करीत ते चालले १०. नंतर दंडकारण्यामध्यें आल्यावर मारीचासहवर्तमान त्या राक्षसाधिपति रावणानें रामाचा आश्रम अवलोकन केला ११. तदनंतर त्या सुवर्णविभूषित रथांतून खालीं उतरल्यावर मारीचाचा हात धरून रावण त्याला ह्मणाला १२ " केळींनीं व्याप्त झालेला हा रामाचा आश्रम दिसत आहे; तस्मात्, हे मित्रा, ज्याकरितां आपण आलों आहोंत तें कार्य कर " १३. हें रावणाचें भाषण श्रवण केल्यावर मारीच राक्षस मृगरूप धारण करून रामाच्या आश्रमाच्या द्वारांत संचार करूं लागला १४. त्यानें पहाणाऱ्याला मोठें आश्चर्य वाटावें असें रूप धारण केलेलें होतें, त्याच्या शृंगांचीं अग्रें उत्कृष्ट रत्नांचीं होतीं, मुखाची आकृति कोठें पांढरी व कोठें काळी होती १५, मुख आरक्तवर्ण व नीलवर्ण कमलासारिखें होतें, कान इंद्रनील अथवा नीलकमल ह्यास-

ग्रीव इन्द्रनीलनिभोदरः १६ मधूकनिभपार्श्वश्च कंजकिंजल्कसंनिभः। वैदूर्यसंकाशखुरस्तनुजङ्घः सुसंहतः १७ इन्द्रायुधसवर्णेन पुच्छेनोर्ध्वं विराजितः। मनोहरस्निग्धवर्णो रत्नैर्नानाविधैर्वृतः १८ क्षणेन राक्षसो जातो मृगः परमशोभनः। वनं प्रज्वलयन्रम्यं रामाश्रमपदं च तत् १९ मनोहरं दर्शनीयं रूपं कृत्वा स राक्षसः। प्रलोभनार्थं वैदेह्या नानाधातुविचित्रितम् २० विचरन्गच्छते शष्पं शाद्वलानि समन्ततः। रौप्यैर्बिन्दुशतैश्चित्रं भूत्वा च प्रियनन्दनः २१ विटपीनां किसलयान्भक्षयन्विचचार ह। कदलीगृहकं गत्वा कर्णिकारानितस्ततः २२ तमाश्रमं मन्दगतिं सीतासंदर्शनं ततः। राजीवचित्रपृष्ठः स विरराज महामृगः २३ रामाश्रमपदाभ्याशे विचचार यथासुखम्। पुनर्गत्वा निवृत्तश्च विचचार मृगोत्तमः २४ गत्वा मुहूर्तं त्वरया पुनः प्रतिनिवर्तते। विक्रीडंश्च पुनर्भूमौ पुनरेव निषीदति २५ आश्रमद्वारमागम्य मृगयूथानि गच्छति।

---

माणें होतें, मान किंचित् वर केलेली होती, उदराची कांति इंद्रनीलमण्यासारिखी होती १६, बरगडयांचा वर्ण मोहाच्या फुलासारिखा दिसत होता, शरीराचा वर्ण कमलाच्या परागासारिखा होता, खूर वैडूर्यमण्यारिखे दिसत होते, पोटऱ्या बारीक होत्या, बांधा मजबूत होता १७, इंद्रधनुष्यासारिखा ज्याचा वर्ण आहे अशा पुच्छानें त्याला शोभा आलेली होती, शरीर मनोहर व तुळतुळीत होतें आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं तो व्याप्त झाल्यासारिखा दिसत होता १८. सारांश, एका क्षणामध्यें तो राक्षस पराकाष्ठेचा उत्कृष्ट मृग बनून तें रम्य वन आणि तो रमणीय रामाश्रम प्रकाशित करूं लागला १९. तात्पर्य, सीतेला लुब्ध करण्याकरितां नानाप्रकारच्या धातूंनीं चित्रविचित्र दिसत असलेलें असें मनोहर व दर्शनीय रूप धारण करून तो राक्षस २० आश्रमाच्या भोंवतीं कोमल तृण भक्षण करीत करीत संचार करीत होता. तदनंतर आश्चर्य वाटेल अशारीतीनें शेंकडों रौप्यबिंदूंनीं युक्त होऊन प्रिय रावणाला आनंद देणारा २१ तो मारीच वृक्षांचे अंकुर भक्षण करीत करीत हिंडूं लागला. नंतर केळीच्या बंगल्यांत जाऊन आणि कर्णिकर वृक्षांतून इकडे तिकडे २२ सीता दृष्टीं पडावी ह्या उद्देशानें मंदगतीचें अवलंबन करून कमलासारिख्या अद्भुत पृष्ठभागानें युक्त असलेला तो महामृग झळकूं लागला २३. रामाश्रमासमीप तो यथेष्ट संचार करूं लागला आणि एकवार आश्रम सोडून गेल्यावर पुनरपि तो परत येऊन श्रेष्ठ मृग हिंडूं लागला २४. क्षणांत सत्वर आश्रम सोडून जाऊन पुनरपि तो परत येऊं लागला आणि पुनरपि क्रीडा करूं लागून पुनरपि भूमीवर बसूं लागला २५. आश्रमाच्या

मृगयूथैरनुगतः पुनरेव निवर्तते २६ सीतादर्शनमाकाङ्क्षन्राक्षसो मृगतां गतः । परिभ्रमति चित्राणि मण्डलानि विनिष्पतन् २७ समुद्वीक्ष्य च सर्वे तं मृगा येऽन्ये वनेचराः । उपगम्य समाघ्राय विद्रवन्ति दिशो दश २८ राक्षसः सोऽपि तान्वन्यान्मृगान्मृगवधे रतः । प्रच्छादनार्थं भावस्य न भक्षयति संस्पृशन् २९ तस्मिन्नेव ततः काले वैदेही शुभलोचना । कुसुमापचये व्यग्रा पादपानत्यवर्तत ३० कर्णिकारानशोकांश्च चूतांश्च मदिरेक्षणा । कुसुमान्यपचिन्वन्ती चचार रुचिरानना ३१ अनर्हा वनवासस्य सा तं रत्नमयं मृगम् । मुक्तामणिविचित्राङ्गं ददर्श परमाङ्गना ३२ तं वै रुचिरदन्तौष्ठं रूप्यधातुतनूरुहम् । विस्मयोत्फुल्लनयना सस्नेहं समुदैक्षत ३३ स च तां रामदयितां पश्यन्मायामयो मृगः । विचचार ततस्तत्र दीपयन्निव तद्वनम् ३४ अदृष्टपूर्वं दृष्ट्वा तं नानारत्नमयं मृगम् । विस्मयं परमं सीता जगाम जनकात्मजा ३५ [१६२९] इत्यार्षे श्रीम-

---

ह्याराशीं येऊन हरिणांच्या कळपांकडे जाऊं लागला आणि पुनरपि त्या मृगांच्या कळपांसहवर्तमान परत येऊं लागला २६. मृगरूप धारण केलेला तो राक्षस सीतेची दृष्टि आपल्याकडे जावी अशी इच्छा धरून आश्चर्यकारक मंडलावर उड्या मारीत मारीत हिंडूं लागला २७. तेव्हां त्या वनामध्यें संचार करणारे जे दुसरे मृग होते ते सर्व त्याच्याकडे पाहून जवळ येऊं लागले आणि वास घेऊन दशदिशेला पळूं लागले २८; परंतु, तो राक्षस जरी मृगवधाविषयीं तत्पर असे तरी आपलें स्वरूप गुप्त राखण्याकरितां स्पर्शास्पर्श झाला असतांही त्या वन्यमृगांना भक्षण करीत नसे २९. असो. शुभ नेत्रांनीं युक्त असलेली विदेहकन्या सीता त्याच वेळीं पुष्पें तोडण्यामध्यें गर्क होऊन झाडांखालून चालली होती ३०. मदिरेसारखे आरक्तवर्ण नेत्र व सुंदर मुख ह्यांनीं युक्त असलेली ती सीता कर्णिकार, अशोक आणि आम्र ह्या वृक्षांचीं फुलें तोडीत तोडीत चालली ३१. नंतर जातां जातां वनवासाची लहानपणापासून संवय नसलेल्या त्या उत्कृष्ट स्त्रीनें मोत्यें आणि हिरे ह्यांच्या योगानें ज्याचें शरीर अद्भुत दिसत आहे असा तो रत्नमय मृग अवलोकन केला ३२ व मनोहर दंत आणि ओष्ठ व रुप्याचे केश ह्यांनीं युक्त असलेल्या त्या मृगाकडे आश्चर्यानें जिचे नेत्र प्रफुल्लित झालेले आहेत अशी ती सीता पाहूं लागली ३३. तेव्हां त्या रामप्रिय सीतेला अवलोकन केल्यावर तो मायामय मृग तें वन प्रकाशित करीतच कीं काय तेथें संचार करूं लागला ३४ आणि असें झालें असतां पूर्वीं कधींही न पाहिलेला असा तो अनेकरत्नमय मृग अवलोकन करून जनककन्या सीतेला पराकाष्ठेचा विस्मय झाला ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मी-

द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः॥४२॥

सा तं संप्रेक्ष्य सुश्रोणी कुसुमानि विचिन्वती । हेमराजतवर्णाभ्यां पार्श्वाभ्यामुपशोभितम् १ प्रहृष्टा चानवद्याङ्गी मृष्टहाटकवर्णिनी । भर्तारमपि चक्रन्द लक्ष्मणं चैव सायुधम् २ आहूयाहूय च पुनस्तं मृगं साधु वीक्षते । आगच्छागच्छ शीघ्रं वै आर्यपुत्र सहानुज ३ तावाहूतौ नरव्याघ्रौ वैदेह्या रामलक्ष्मणौ । वीक्षमाणौ तु तं देशं तदा ददृशतुर्मृगम् ४ शङ्कमानस्तु तं दृष्ट्वा लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् । तमेवैनमहं मन्ये मारीचं राक्षसं मृगम् ५ चरन्तो मृगयां हृष्टाः पापेनोपाधिना वने । अनेन निहता राम राजानः पापरूपिणा ६ अस्य मायाविदो माया मृगरूपमिदं कृतम् । भानुमत्पुरुषव्याघ्र गन्धर्वपुरसंनिभम् ७ मृगो ह्येवंविधो रत्नविचित्रो नास्ति राघव । जगत्यां जगतीनाथ मायैषा हि न संशयः८ एवं ब्रुवाणं काकुत्स्थं प्रतिवार्य शुचिस्मिता । उवाच सीता संहृष्टा

---

किप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

सुवर्ण आणि रौप्यवर्णांनीं युक्त असलेल्या बरगड्यांनीं सुशोभित असलेल्या त्या मृगाला अवलोकन करून उत्कृष्ट कटि, निर्दोष अवयव व शुद्ध सुवर्णासारिखी कांति ह्यांनीं युक्त असलेली ती सीता फुलें तोडितां तोडितां आनंदित झाली व आयुधांसहवर्तमान लक्ष्मणाला व भर्त्या रामाला हाका मारूं लागली १, २ आणि "हे कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान आर्यपुत्रा, इकडे या, इकडे या" अशा हाका मारून मारून पुनरपि ती त्या मृगाकडे टक लावून पाहूं लागली ३. तेव्हां सीतेनें हाक मारिल्यावर पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण त्या प्रदेशाकडे पाहूं लागले असतां एक मृग त्यांनीं अवलोकन केला ४ आणि त्या मृगाला अवलोकन करितांक्षणीं लक्ष्मण साशंक ह्मणाला "हाच तो मृगरूप धारण करणारा मारीच राक्षस असावा असें मला वाटतें ५. हे रामा, आनंदानें राजे मृगया करीत असतांना ह्याच पापरूपी दुष्टानें कपट करून त्यांचा वध केलेला आहे ६. हे पुरुषश्रेष्ठा, गंधर्वनगरासारिखें वरून रमणीय आणि प्रकाशयुक्त असें जें हें मृगरूप ह्यानें धारण केलें आहे तीं हीं त्या मायावी राक्षसाची माया आहे ७. कारण, हे राघवा, अशा प्रकारच्या रत्नांच्या योगानें चित्रविचित्र असलेला मृग पृथ्वीमध्यें नाहीं. तस्मात्, हे पृथ्वीपते, ही निःसंशय ह्याची माया आहे" ८. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न लक्ष्मण बोलत असतांना मारीच राक्षसाच्या कपटानें भान न राहिल्यासारिखी झालेली ती सुहास्यवदना सीता आनंदित होऊन व लक्ष्मणाचा

छद्मना हृतचेतना ९ आर्यपुत्राभिरामोसौ मृगो हरति मे मनः । आनयैनं महाबाहो क्रीडार्थं नो भविष्यति १० इहाश्रमपदेस्माकं बहवः पुण्यदर्शनाः । मृगाश्चरन्ति सहिताश्चमराः सृमरास्तथा ११ ऋक्षाः पृषतसङ्घाश्च वानराः किंनरास्तथा । विहरन्ति महाबाहो रूपश्रेष्ठा महाबलाः १२ न चान्यः सदृशो राजन्दृष्टः पूर्वं मृगो मया । तेजसा क्षमया दीप्त्या यथायं मृगसत्तमः १३ नानावर्णविचित्राङ्गो रत्नभूतो ममाग्रतः । द्योतयन्वनमव्यग्रं द्योतते शशिसंनिभः १४ अहो रूपमहो लक्ष्मीः स्वरसंपच्च शोभना । मृगोद्भुतो विचित्राङ्गो हृदयं हरतीव मे १५ यदि ग्रहणमभ्येति जीवन्नेव मृगस्तव । आश्चर्यभूतं भवति विस्मयं जनयिष्यति १६ समाप्तवनवासानां राज्यस्थानां च नः पुनः । अन्तःपुरे विभूषार्थो मृग एष भविष्यति १७ भरतस्यार्यपुत्रस्य श्वश्रूणां मम च प्रभो । मृगरूपमिदं दिव्यं विस्मयं जनयिष्यति १८ जीवन्न यदि तेभ्येति ग्रहणं मृगसत्तमः । अजिनं नरशार्दूल रुचिरं तु भविष्यति १९ निहतस्यास्य सत्त्वस्य जाम्बू-

---

निषेध करून ह्मणाली ९ " हे आर्यपुत्र, हा सुंदर मृग माझें मन हरण करीत आहे. ह्यास्तव, हे महापराक्रमसंपन्न, ह्याला आपण घेऊन या; आपल्या करमणुकीला हा उपयोगी पडेल १०. ह्या आपल्या आश्रमामध्यें मनोहर आकृतींनीं युक्त असे चमर, सृमर वगैरे अनेक प्रकारचे मृग एकत्र संचार करीत असतात ११ आणि, हे महापराक्रमसंपन्न, अस्वलें, पृषत मृगांचे कळप, वानर आणि रूपश्रेष्ठ असे महाबलाढ्य किन्नर विहार करीत असतात १२. हे भूपते, तेज, सौम्यपणा आणि देहकांति ह्यांच्या योगानें ह्या श्रेष्ठ मृगासारिखा मृग पूर्वीं मीं कधीं अवलोकन केलेला नाहीं १३. नानाप्रकारच्या वर्णांनीं ज्याचें शरीर चित्रविचित्र झालें आहे असा हा रत्नमय मृग हें वन पूर्णपणें प्रकाशित करीत असून ह्याची प्रभा चंद्रासारिखी आल्हादकारक आहे १४. कायहो हें स्वरूप, कायहो ही प्रभा आणि किती तरी हो हा उत्कृष्ट शब्द ! चित्रविचित्र शरीरानें युक्त असलेला हा अद्भुत मृग माझें मन हरण करीत आहे १५. हा मृग जर जिवंत आपल्या हातीं लागेल तर तो आश्चर्यरूप होऊन विस्मय उत्पन्न करील १६. वनवास संपूर्ण होऊन आपण पुनरपि राज्यावर जाऊन बसलों असतां अंतःपुरामध्यें शोभेकरितां हा मृग उपयोगी पडेल १७. हे प्रभो, भरताला, आर्य पुत्राला आणि माझ्या सासवांना हें दिव्य मृगरूप विस्मय उत्पन्न करील १८. हे पुरुषश्रेष्ठ, हा उत्कृष्ट मृग जर जिवंत हातीं लागला नाहीं तर ह्याचें अजिन मनोहर होईल १९. ह्या मृगाचा वध करून ह्याच्या सुवर्णमय अजिनावर

नदमयत्वचि। शष्पबृस्यां विनीतायामिच्छाम्यहमुपासितुम् २० कामवृत्त-
मिदं रौद्रं स्त्रीणामसदृशं मतम्। वपुषा त्वस्य सत्त्वस्य विस्मयो जनितो
मम २१ तेन काञ्चनरोम्णा तु मणिप्रवरशृङ्गिणा। तरुणादित्यवर्णेन
नक्षत्रपथवर्चसा २२ बभूव राघवस्यापि मनो, विस्मयमागतम्। इति
सीतावचः श्रुत्वा दृष्ट्वा च मृगमद्भुतम् २३ लोभितस्तेन रूपेण सीतया
च प्रचोदितः। उवाच राघवो हृष्टो भ्रातरं लक्ष्मणं वचः २४ पश्य
लक्ष्मण वैदेह्याः स्पृहामुल्लसितामिमाम्। रूपश्रेष्ठतया ह्येष मृगोद्य न
भविष्यति २५ न वने नन्दनोद्देशे न चैत्ररथसंश्रये। कुतः पृथिव्यां
सौमित्रे योस्य कश्चित्समो मृगः २६ प्रतिलोमानुलोमाश्च रुचिरा रोम-
राजयः। शोभन्ते मृगमाश्रित्य चित्राः कनकबिन्दुभिः २७ पश्यास्य
जृम्भमाणस्य दीप्तामग्निशिखोपमाम्। जिह्वां मुखान्निःसरन्तीं मेघादिव
शतह्रदाम् २८ मसारगल्वर्कमुखः शङ्खमुक्तानिभोदरः। कस्य नामानि-
रूप्योसौ न मनो लोभयेन्मृगः २९ कस्य रूपमिदं दृष्ट्वा जाम्बूनदमय-

---

गवती आसन पसरून त्याच्यावर बसण्याची माझी इच्छा आहे २०. आपल्या कामा-
करितां पतीला आज्ञा करणें हें वर्तन स्त्रियांना अयोग्य व भयंकर आहे असें जरी
मी समजत आहें तरी ह्या प्राण्याचें शरीर पाहून मला विस्मय उत्पन्न झाला आहे २१.
कारण, त्याचे केश सुवर्णाचे असून कांति नक्षत्रांनीं व्याप्त झालेल्या आकाशासारिखी
दिसत आहे" २२. ह्याप्रमाणें सीतेचें भाषण श्रवण करून व तो अद्भुत मृग अव-
लोकन करून रामाचेंही मन विस्मित झालें २३. तेव्हां सीतेनें प्रेरणा केलेला व त्या
रूपाला लुब्ध झालेला तो राम आनंदित होऊन भ्रात्या लक्ष्मणाला ह्मणाला २४
"हे लक्ष्मणा, वैदेहीला उत्पन्न झालेली ही इच्छा अवलोकन कर. हा मृग, ह्याचें श्रेष्ठ
रूप असल्यामुळें आज जिवंत रहात नाहीं २५. नंदनवनामध्यें अथवा चैत्ररथ वनाम-
ध्येंही कोणी ह्या मृगासारिखा मृग नाहीं. मग, हे लक्ष्मणा, पृथ्वीवर तर कोठून अस-
णार? २६. सुवर्णबिंदूंनीं चित्रविचित्र अशा ह्या मृगाचा आश्रय करून असलेल्या उलट
सुलट रोमपंक्ति मनोहर दिसत आहेत २७. मेघांतून निघणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें हा जांभया
देऊं लागला असतां त्याच्या मुखांतून बाहेर निघणारी अग्निज्वालेसारिखी देदीप्यमान
जिह्वा तूं अवलोकन कर २८. इंद्रनीलमण्याच्या पानपत्राच्या आकृतीसारिखें ज्याचें
मुख आहे व शंख आणि मोत्यें ह्यांसारिखी ज्याच्या उदराची कांति आहे असा हा
अनिर्वचनीय मृग कोणाचें बरें मन लुब्ध करणार नाहीं? २९. सुवर्णमय कांतीनें
युक्त आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं भरलेलें असें हें दिव्य रूप अवलोकन करून

प्रभम् । नानारत्नमयं दिव्यं न मनो विस्मयं व्रजेत् ३० मांसहेतोरपि मृगान्विहारार्थं च धन्विनः । घ्नन्ति लक्ष्मण राजानो मृगयायां महावने ३१ धनानि व्यवसायेन विचियन्ते महावने । धातवो विविधाश्चापि मणिरत्नसुवर्णिनः ३२ तत्सारमखिलं नृणां धनं निचयवर्धनम् । मनसा चिन्तितं सर्वं यथा शुक्रस्य लक्ष्मण ३३ अर्थी येनार्थकृत्येन संव्रजत्यविचारयन् । तमर्थमर्थशास्त्रज्ञाः प्राहुरर्थ्याः सुलक्ष्मण ३४ एतस्य मृगरत्नस्य परार्ध्ये काञ्चनत्वचि । उपवेक्ष्यति वैदेही मया सह सुमध्यमा ३५ न कादली न प्रियकी न प्रवेणी न चाविकी । भवेदेतस्य सदृशी स्पर्शेनेनेति मे मतिः ३६ एष चैव मृगः श्रीमान्यश्च दिव्यो नभश्चरः । उभावेतौ मृगौ दिव्यौ तारामृगमहीमृगौ ३७ यदि वायं तथा यन्मां भवेद्वदसि लक्ष्मण । मायैषा राक्षसस्येति कर्तव्योस्य वधो मया ३८ एतेन हि नृशंसेन मारीचेनाकृतात्मना । वने विचरता पूर्वं हिंसिता मुनिपुङ्गवाः ३९ उत्थाय बहवो येन मृगयायां जनाधिपाः । निहताः परमेष्वासास्तस्माद्वध्यस्त्वयं मृगः ४०

---

कोणाच्या बरें मनाला विस्मय वाटणार नाहीं ? ३०. हे लक्ष्मणा, मांसाकरितां आणि करमणुकीकरितां धनुर्धारी राजे महावनामध्यें मृगया करीत असतांना मृगांचा वध करितात ३१ आणि महावनामध्यें हिरे, रत्नें, सुवर्ण इत्यादिकांसहवर्तमान नानाप्रकारचे धातु हें द्रव्य राजे गोळा करीत असतात ३२. तस्मात्, हे लक्ष्मणा, ब्रह्मरूप बनलेल्या पुरुषाला इच्छामात्रानें सिद्ध झालेल्या सर्व भोग्य वस्तु ज्याप्रमाणें सर्व द्रव्यांपेक्षां श्रेष्ठ वाटत असतात त्याचप्रमाणें कोशाची अभिवृद्धि करणारें तें वनांतील संपूर्ण धन पुरुषांना अत्यंत प्रशस्त वाटत असतें ३३. हे उत्कृष्ट लक्ष्मणा, अर्थ संपादन करणें हें कर्तव्यकर्म आहे असें समजून ज्याच्या प्राप्तीकरितां अर्थेच्छु पुरुष विचार न करितांच ज्ञालता होतो त्याला अर्थ संपादन करण्याविषयीं चतुर असलेले अर्थशास्त्रवेत्ते अर्थ असें ह्मणतात ३४. तेव्हां ह्या श्रेष्ठ मृगाच्या उत्कृष्ट सुवर्णमय अजिनावर सुंदरी सीता माझ्यासहवर्तमान बसेल ३५. कदलीसंज्ञक मृग, प्रियकीसंज्ञक मृग, बोकड अथवा मेंढ्या ह्यांपैकीं कोणाचेंही अजिन ह्या मृगाच्या अजिनासारिखें मृदु नाहीं असें मला वाटतें ३६. हा श्रीमान् मृग आणि आकाशामध्यें संचार करणारा ( मृगनक्षत्ररूप ) दिव्य मृग असे तारामृग व भूमृग हे दोनच दिव्य मृग आहेत ३७. आतां, हे लक्ष्मणा, ही राक्षसाची माया आहे असें जें मला तूं ह्मणत आहेस त्याप्रमाणें जर हा असेल तर ह्याचा वध मला कर्तव्यच आहे . ३८. कारण, ह्या इंद्रियाधीन असलेल्या दुष्ट मारीचानें वनामध्यें संचार करितां करितां

पुरस्तादिह वातापिः परिभूय तपस्विनः । उदरस्थो द्विजान्हन्ति स्वगर्भो-
ऽश्वतरीमिव ४१ स कदाचिच्चिराल्लोके आससाद महामुनिम् । अगस्त्यं
तेजसा युक्तं भक्ष्यस्तस्य बभूव ह ४२ समुत्थाने च तद्रूपं कर्तुकामं समीक्ष्य
तम् । उत्स्मयित्वा तु भगवान्वातापिमिदमब्रवीत् ४३ त्वया विगण्य
वातापे परिभूताश्च तेजसा । जीवलोके द्विजश्रेष्ठास्तस्मादसि जरां गतः ४४
तद्रक्षोपि न भवेदेव वातापिरिव लक्ष्मण । मद्विधं योतिमन्येत धर्मनित्यं
जितेन्द्रियम् ४५ भवेद्धतोयं वातापिरगस्त्येनेव मा गतः । इह त्वं भव
संनद्धो यन्त्रितो रक्ष मैथिलीम् ४६ अस्यामायत्तमस्माकं यत्कृत्यं रघु-
नन्दन । अहमेनं वधिष्यामि ग्रहीष्याम्यथवा मृगम् ४७ यावद्गच्छामि
सौमित्रे मृगमानयितुं द्रुतम् । पश्य लक्ष्मण वैदेह्या मृगत्वचि गतां स्पृहाम् ४८
त्वचा प्रधानया ह्येष मृगोद्य न भविष्यति । अप्रमत्तेन ते भाव्यमाश्रमस्थेन

---

पूर्वी मुनिश्रेष्ठांचा वध केला आहे ३९ आणि मृगयेमध्यें अनेक महाधनुर्धारी राजे ह्यानें प्रादुर्भूत होऊन मारिले आहेत. तस्मात्, ह्या प्राण्याचा वध केलाच पाहिजे ४०. स्वतःच्या उदरांत असलेला गर्भ ज्याप्रमाणें खेचरीचा वध करितो त्याप्रमाणें उदरामध्यें असलेल्या वातापीनें ह्या ठिकाणीं पूर्वी असंख्य ब्राह्मणांचा फसवून वध केला आहे ४१. असें होतां होतां पुष्कळ दिवस झाल्यावर त्या वातापीची तेजस्वी अगस्त्य महर्षीशीं गांठ पडली आणि तो त्याचें भक्ष्य झाला ४२. तदनंतर ( श्राद्ध समाप्त होऊन ) ब्राह्मण उठण्याचे वेळीं आपलें राक्षसरूप प्रकट करण्याची तो वातापि इच्छा करीत आहे असें आढळून आल्यावर भगवान् अगस्त्यमुनि किंचित् हंसून त्याला ह्मणाले ४३ " हे वातापे, तूं पापाचा विचार न करितां ह्या जगतामध्यें स्वसामर्थ्यानें श्रेष्ठ ब्राह्मणांचा वध केला आहेस आणि ह्मणूनच तूं आतां जिरून गेला आहेस ४४. तेव्हां जितेंद्रिय राहून नेहमीं धर्मानें वागणाऱ्या माझ्यासारख्यांचेंही अतिक्रमण करणाऱ्या ह्या मारीच राक्षसाचा, हे लक्ष्मणा, अगस्त्यमुनींच्या हातून वध पावलेल्या वातापीप्रमाणें माझ्या हातून वध होईल ४५. सारांश, अगस्त्यांच्या हातून ज्याप्रमाणें वातापीचा वध झाला त्याप्रमाणें माझ्याकडे आलेल्या ह्या मारीचाचा वध होईल. हे लक्ष्मणा, तूं येथें सज्ज रहा आणि प्रयत्नपूर्वक सीतेचें रक्षण कर ४६. हे रघुनंदना, आह्माला जें करावयाचें आहे तें सर्व ह्या सीतेवर अवलंबून आहे. तेव्हां मी ह्या मृगाचा वध तरी करीन किंवा ह्याला जिवंत तरी धरून आणीन ४७, हे सुमित्रानंदना, मी मृग आणण्याकरितां सत्वर जातों. कारण, हे लक्ष्मणा, कृष्णाजिनासंबंधानें सीतेला इच्छा झाली आहे तिकडे तूं लक्ष्य दे ४८. श्रेष्ठ त्वचेमुळें आज हा मृग जिवंत राह-

सीतया ४९ यावत्पृषतमेकेन सायकेन निहन्म्यहम् । हत्वैतच्चर्म आदाय शीघ्रमेष्यामि लक्ष्मण ५० प्रदक्षिणेनातिबलेन पक्षिणा जटायुषा बुद्धिमता च लक्ष्मण । भवाप्रमत्तः प्रतिगृह्य मैथिलीं प्रतिक्षणं सर्वत एव शङ्कितः ५१ [ १६८० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

तथा तु तं समुद्दिश्य भ्रातरं रघुनन्दनः । बबन्धासिं महातेजा जाम्बूनदमयत्सरुम् १ ततस्त्रिविनतं चापमादायात्मविभूषणम् । आबध्य च कलापौ द्वौ जगामोदग्रविक्रमः २ तं वन्यराजो राजेन्द्रमापतन्तं निरीक्ष्य वै । बभूवान्तर्हितस्त्रासात्पुनः संदर्शनेभवत् ३ बद्धासिर्धनुरादाय प्रदुद्राव यतो मृगः । तं स्म पश्यति रूपेण द्योतयन्तमिवाग्रतः ४ अवेक्ष्यावेक्ष्य धावन्तं धनुष्पाणिर्महावने । अतिवृत्तमिवोत्पाताल्लोभयानं कदाचन ५ शङ्कितं तु समुद्भ्रान्तमुत्पतन्तमिवाम्बरम् । दृश्यमानमदृश्यं च वनोद्देशेषु

---

णार नाहीं. सीतेसहवर्तमान तूं ह्या आश्रमामध्यें रहा ४९. हे लक्ष्मणा, मी एका बाणानें ह्या पृषतसंज्ञक मृगाचा वध करीन आणि ह्याचें कातडें घेऊन लवकर परत येईन ५०. फारच सरळ आणि अतिबलाढ्य अशा ह्या बुद्धिमान् जटायु पक्ष्यासहवर्तमान, हे लक्ष्मणा, सीतेला ताब्यांत घेऊन आणि प्रतिक्षणीं सर्व बाजूंनीं राक्षसांविषयीं शंकित होऊन तूं सावध रहा " ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

ह्याप्रमाणें त्या भ्रात्याला सांगितल्यावर महातेजस्वी रघुनंदन रामानें सोन्याची मूठ लाविलेला एक खड्ग घेतला १. तदनंतर तीन ठिकाणीं बांक असलेलें आणि स्वतःला भूषण असलेलें असें धनुष्य हातांत घेऊन व दोन भाते पाठीशीं बांधून तो उत्कृष्ट पराक्रम करणारा राम निघाला २; परंतु, तो वनमृगांचा राजा मारीच मागोमाग येत असलेल्या त्या राजाधिराज रामाला अवलोकन करून भीतीनें वारंवार अदृश्य व दृश्य होऊं लागला ३. जिकडे मृग तिकडे खड्ग लटकावून व धनुष्य हातांत घेऊन राम धांवत चालला असतां रूपाच्या योगानें झळकणारा मृग पुढेंच असलेला त्यानें अवलोकन केला ४. फिरून फिरून मागें पाहून महावनामध्यें धांवत असलेल्या त्या मृगाला धनुर्धारी रामानें अवलोकन केलें. केव्हां केव्हां तो मृग उडीमुळें टप्प्यांतून गेल्यासारिखा दिसत असे ५. केव्हां केव्हां अगदीं जवळ आल्यासारिखा दिसून रामाचे ठिकाणीं लोभ उत्पन्न करीत असे. बाण लागेल ह्या भीतीनें शंकित झाल्यासारिखें दर्शवी, केव्हां केव्हां बेफाम होऊन

केषुचित् ६ छिन्नाभ्रैरिव संवीतं शारदं चन्द्रमण्डलम् । मुहूर्तादेव ददृशे
मुहुर्दूरात्प्रकाशते ७ दर्शनादर्शनेनैव सोपाकर्षत राघवम् । स दूरमाश्रमस्यास्य
मारीचो मृगतां गतः ८ आसीत्क्रुद्धस्तु काकुत्स्थो विवशस्तेन मोहितः ।
अथावतस्थे सुश्रान्तश्छायामाश्रित्य शाद्वले ९ स तमुन्मादयामास मृग-
रूपो निशाचरः । मृगैः परिवृतोथान्यैरदूरात्प्रत्यदृश्यत १० गृहीतुकामं
दृष्ट्वा तं पुनरेवाभ्यधावत । तत्क्षणादेव संत्रासात्पुनरन्तर्हितोभवत् ११ पुन-
रेव ततो दूराद्वृक्षखण्डाद्विनिःसृतः । दृष्ट्वा रामो महातेजास्तं हन्तुं कृतनि-
श्चयः १२ भूयस्तु शरमुद्धृत्य कुपितस्तत्र राघवः । सूर्यरश्मिप्रतीकाशं
ज्वलन्तमरिमर्दनम् १३ संधाय सुदृढं चापे विकृष्य बलवद्बली । तमेव
मृगमुद्दिश्य ज्वलन्तमिव पन्नगम् १४ मुमोच ज्वलितं दीप्तमस्त्रं ब्रह्मवि-
निर्मितम् । स भृशं मृगरूपस्य विनिर्भिद्य शरोत्तमः १५ मारीचस्यैव
हृदयं विभेदाशनिसंनिभः । तालमात्रमथोत्प्लुत्य न्यपतत्स भृशातुरः १६

---

आकाशामध्यें उंच उंच उड्या मारी आणि कांहीं वनप्रदेशामध्यें केव्हां केव्हां दृश्य व अदृश्य होत असे ६. विस्खलित ढगांनीं व्याप्त केलेल्या शरदृतूंतील चंद्रमंडलाप्रमाणें तो मृग क्षणामध्यें दिसूं लागे आणि क्षणामध्यें फारच दूर जाऊन वारंवार झळकूं लागे ७. असो. मृगरूप धारण केलेला तो मारीच राक्षस ह्या आश्रमापासून दूर गेल्यावर वारंवार दृश्य व अदृश्य होण्याच्या योगानें त्यानें रामाला आपल्या मागोमाग दूर ओढीत नेलें ८. तदनंतर त्या मृगापुढें अगदीं निरुपाय होऊन कांहींएक सुचेनासें झालेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम अतिशय क्रुद्ध झाला आणि फारच थकून गेल्यामुळें छायेचा आश्रय करून कोमल तृणावर बसला ९. नंतर त्या मृगरूप राक्षसानें त्याला पुनरपि भ्रमांत पाडिलें आणि इतर मृगांनीं परिवेष्टित झालेला तो मृग लांब दृष्टीं पडूं लागला १०. तदनंतर तो राम आपल्याला धरणार असें अवलोकन करून तो पुनरपि पुढें पळाला; भीतीमुळें पुनरपि तत्क्षणीं गुप्त झाला ११ आणि तेथून दूर असलेल्या वृक्षसमुदायांतून पुनरपि बाहेर पडला. तेव्हां त्याला अवलोकन करून महातेजस्वी रामानें त्याचा वध करण्याचा निश्चय केला १२. नंतर त्या ठिकाणीं क्रुद्ध झालेल्या बलाढ्य रामानें सूर्यकिरणांप्रमाणें उज्ज्वल असा एक शत्रुनाशक बाण भात्यांतून काढून तो नीट धनुष्याला लावून जोरानें धनुष्य खेंचलें आणि देदीप्यमान सर्पाप्रमाणें असलेला तो ब्रह्मदत्त बाण उज्ज्वल व देदीप्यमान अशा ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण करून रामानें त्या मृगावर सोडिला. तेव्हां त्या वज्रप्राय उत्कृष्ट बाणानें मृगरूप मारीच राक्षसाला अतिशय वेध करून त्याचें हृदय

व्यनदद्भैरवं नादं धरण्यामल्पजीवितः । म्रियमाणस्तु मारीचो जहौ तां
कृत्रिमां तनुम् १७ स्मृत्वा तद्वचनं रक्षो दध्यौ केन तु लक्ष्मणम् । इह
प्रस्थापयेत्सीता तां शून्ये रावणो हरेत् १८ स प्राप्तकालमाज्ञाय चकार
च ततः स्वनम् । सदृशं राघवस्येव हा सीते लक्ष्मणेति च १९ तेन मर्मणि
निर्विद्धं शरेणानुपमेन हि । मृगरूपं तु तत्त्यक्त्वा राक्षसं रूपमास्थितः २०
चक्रे स सुमहाकायो मारीचो जीवितं त्यजन् । तं दृष्ट्वा पतितं भूमौ
राक्षसं भीमदर्शनम् २१ रामो रुधिरसिक्ताङ्गं चेष्टमानं महीतले । जगाम
मनसा सीतां लक्ष्मणस्य वचः स्मरन् २२ मारीचस्य तु मायैषा पूर्वोक्ता
लक्ष्मणेन तु । तत्तथा ह्यभवच्चाद्य मारीचोयं मया हतः २३ हा सीते लक्ष्म-
णेत्येवमाक्रुश्य तु महास्वनम् । ममार राक्षसः सोयं श्रुत्वा सीता कथं
भवेत् २४ लक्ष्मणश्च महाबाहुः कामवस्थां गमिष्यति । इति संचिन्त्य
धर्मात्मा रामो हृष्टतनूरुहः २५ तत्र रामं भयं तीव्रमाविवेश विषादजम् ।

---

फोडून टाकिलें असतां अत्यंत व्याकुल झालेला तो मारीच एक ताड उडी मारून खालीं पडला १३, १४, १५, १६. नंतर मरण्याच्या बेतांत आलेला तो मारीच पृथ्वीवर भयंकर गर्जना करूं लागला व मरतां मरतां त्या मारीचानें त्या कृत्रिम रूपाचा त्याग केला १७. इतक्यांत त्या रावणाच्या भाषणाचें स्मरण झाल्यावर आपण कोणता उपाय योजिला असतां सीता लक्ष्मणाला इकडे पाठवून देईल आणि शून्य आश्रमामध्यें जाऊन रावणाला तिला धरून नेतां येईल याविषयीं त्यानें विचार केला १८ आणि रावणाच्या भाषणाप्रमाणें वागण्याचा समय आला असें जाणून त्यानें " हे सीते, हे लक्ष्मणा, " असा अगदीं रामासारिखा सूर काढून आरोळ्या दिल्या १९ व नंतर त्या अनुपम बाणाच्या योगानें ज्याच्या मर्माचा भेद झाला आहे अशा त्या मृगरूपाचा त्याग करून त्यानें राक्षसरूप धारण केलें २० आणि प्राण सोडितांना त्या मारीचानें आपलें शरीर फार मोठें केलें. तेव्हां भयंकर मुद्रेनें युक्त, भूमीवर पडलेला आणि रक्ताचा सडा अंगावर होऊन भूतलावर तडफड करीत असलेला तो राक्षस अवलोकन केल्यावर लक्ष्मणाच्या भाषणाचें स्मरण होऊन रामाला सीतेची आठवण झाली २१, २२. ( आणि तो ह्मणाला ) " लक्ष्मणानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ही मारीच राक्षसाची माया उघडकीला आली; आज ह्या मारीचाचा माझ्या हातून वध झाला २३ आणि " हे सीते, हे लक्ष्मणा " असा उच्च स्वरानें आक्रोश करून तो हा राक्षस मृत्यु पावला. तेव्हां ह्या आरोळ्या ऐकून सीतेची कशी काय अवस्था होईल ! २४ आणि महापराक्रमी लक्ष्मणाची तरी काय अवस्था होऊन

राक्षसं मृगरूपं तं हत्वा श्रुत्वा च तत्स्वनम् २६ निहत्य पृषतं चान्यं मांसमादाय राघवः । त्वरमाणो जनस्थानं ससाराभिमुखं तदा २७ [१७०७] इत्यार्षे श्रीमद्रामायणेवाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ॥४४॥

आर्तस्वरं तु तं भर्तुर्विज्ञाय सदृशं वने । उवाच लक्ष्मणं सीता गच्छ जानीहि राघवम् १ न हि मे जीवितं स्थाने हृदयं वावतिष्ठते । क्रोशतः परमार्तस्य श्रुतः शब्दो मया भृशम् २ आक्रन्दमानं तु वने भ्रातरं त्रातुमर्हसि ३ तं क्षिप्रमभिधाव त्वं भ्रातरं शरणैषिणम् । रक्षसां वशमापन्नं सिंहानामिव गोवृषम् ४ न जगाम तथोक्तस्तु भ्रातुराज्ञाय शासनम् । तमुवाच ततस्तत्र क्षुभिता जनकात्मजा ५ सौमित्रे मित्ररूपेण भ्रातुस्त्वमसि शत्रुवत् । यस्त्वमस्यामवस्थायां भ्रातरं नाभिपद्यसे ६ इच्छसि त्वं विनश्यन्तं रामं लक्ष्मण मत्कृते । लोभात्तु मत्कृते नूनं नानुगच्छसि राघवम् ७ व्यसनं ते प्रियं मन्ये स्नेहो भ्रातरि नास्ति ते । तेन तिष्ठसि

---

जाईल " असा विचार मनांत येऊन धर्मात्म्या रामाच्या अंगावर कांटा आला २५ आणि खेद झाल्यामुळें त्याला फारच भीति वाटूं लागली. असो. ह्याप्रमाणें त्या मृगरूप राक्षसाचा वध करून व मरतां मरतां त्यानें केलेली ती गर्जना ऐकून २६ रामानें दुसरा एक पृषत मृग मारिला आणि त्याचें मांस घेऊन तो राघव जनस्थानाकडे तोंड करून सत्वर चालला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

भर्त्याच्या शब्दासारिखा तो दीन शब्द वनामध्यें ऐकून सीता लक्ष्मणाला ह्मणाली " जा आणि रामाचा काय वृत्तांत आहे तो जाणा १. अतिशय व्याकुल होऊन आक्रोश करीत असलेल्या रामाचा शब्द वारंवार माझ्या कानीं आला आहे. ह्यामुळें माझ्या जिवांत जीव नाहीं अथवा माझें मनही स्वस्थ नाहीं २. तेव्हां वनामध्यें ओरडत असलेल्या आपल्या भ्रात्याला संकटांतून तारणें तुह्मांला योग्य आहे ३. ह्याकरितां त्या शरणार्थी भ्रात्याकडे तुह्मी सत्वर धाव घ्या. सिंहाच्या तावडींत सांपडलेल्या बैलाप्रमाणें तो राक्षसांचे तावडींत सांपडला आहे. " ४. ह्याप्रमाणें सीतेनें जरी लक्ष्मणाला सांगितलें तरी भ्रात्याची आज्ञा लक्ष्यांत आणून तो तेथून गेला नाहीं. तेव्हां जनककन्या क्षुब्ध होऊन त्याला ह्मणाली ५ " हे लक्ष्मणा, तूं मित्ररूपानें आपल्या भ्रात्याचा शत्रु आहेस. कारण, ह्या असल्या अवस्थेमध्येंही तूं आपल्या भ्रात्याकडे जात नाहींस ६. हे लक्ष्मणा, राम नाश पावण्याची तूं माझ्याकरितां इच्छा करीत आहेस आणि मजविषयीं लोभ धरूनच तूं खरोखर रामाकडे जात नाहींस ७.

विस्रब्धं तमपश्यन्महाद्युतिम् ८ किं हि संशयमापन्ने तस्मिन्निह मया भवेत्। कर्तव्यमिह तिष्ठन्त्या यत्प्रधानस्त्वमागतः ९ एवं ब्रुवाणां वैदेहीं बाष्पशोकसमन्विताम्। अब्रवील्लक्ष्मणस्त्रस्तां सीतां मृगवधूमिव १० पन्नगासुरगन्धर्वदेवदानवराक्षसैः। अशक्यस्तव वैदेहि भर्ता जेतुं न संशयः ११ देवि देवमनुष्येषु गन्धर्वेषु पतत्रिषु। राक्षसेषु पिशाचेषु किन्नरेषु मृगेषु च १२ दानवेषु च घोरेषु न स विद्येत शोभने। यो रामं प्रतियुध्येत समरे वासवोपमम् १३ अवध्यः समरे रामो नैवं त्वं वक्तुमर्हसि। नत्वामस्मिन्वने हातुमुत्सहे राघवं विना १४ अनिवार्यं बलं तस्य बलैर्बलवतामपि। त्रिभिर्लोकैः समुदितैः सेश्वरैः सामरैरपि १५ हृदयं निर्वृतं तेस्तु संतापस्त्यज्यतां तव। आगमिष्यति ते भर्ता शीघ्रं हत्वा मृगोत्तमम् १६ न स तस्य स्वरो व्यक्तं न कश्चिदपि दैवतः। गन्धर्वनगरप्रख्या माया तस्य च रक्षसः १७ न्यासभूतासि वैदेहि न्यस्ता मयि महात्मना। रामेण त्वं वरारोहे न त्वां

---

रामाचें संकटच तुला प्रिय आहे असें मला वाटतें.' भ्रात्याचे ठिकाणीं तुझें प्रेम नाहीं आणि ह्मणूनच तो महातेजस्वी भ्राता डोळ्याआड झाला असतांही तूं निःशंकपणें येथें राहिला आहेस ८. राम तुला मुख्य असून तूं जर येथें आला आहेस तर तो राम संकटांत सांपडला असतां मला तरी येथें जिवंत राहून काय करावयाचें आहे?" ९. ह्याप्रमाणें अश्रु व शोक ह्यांनीं युक्त होऊन व हरिणीप्रमाणें त्रस्त होऊन भाषण करीत असलेल्या त्या सीतेला लक्ष्मण ह्मणाला १० "हे वैदेहि, पन्नग, असुर, गंधर्व, देव, दानव आणि राक्षस ह्यांच्या हातून तुझ्या भर्त्याचा पराजय होणें निःसंशय अशक्य आहे ११. हे देवि, देव, मनुष्य, गंधर्व, पक्षी, राक्षस, पिशाच, किन्नर, मृग १२ आणि घोर दानव ह्यांपैकीं इंद्रतुल्य रामाशीं समरांगणामध्यें युद्ध करण्याला समर्थ असा, हे कल्याणि, कोणीही नाहीं १३. समरांगणामध्यें राम अवध्य आहे. तेव्हां तुला ह्या वनामध्यें एकटी टाकून जाण्याची माझी इच्छा नाहीं १४. बलाढ्य लोकांच्याही सामर्थ्यानें त्याच्या बलाचा प्रतिकार होणें शक्य नाहीं व देव आणि ईश्वर ह्यांसहवर्तमान त्रैलोक्यांतील लोक तयार झाले असतांनाही त्याच्या सामर्थ्याचें त्यांच्यानें निवारण होणें शक्य नाहीं १५. तुझें चित्त स्वस्थ असूं दे, तूं संताप सोडून दे; तो श्रेष्ठ मृग लवकरच मारून तुझा भर्ता परत येईल १६. त्या रामाचा हा स्वर निःसंशय नव्हे व हा कांहीं देवतांचाही ध्वनि नव्हे. गंधर्वनगरासारिखी ही त्या राक्षसाची मिथ्या माया आहे १७. हे वैदेहि, तूं ठेवीप्रमाणें आहेस आणि

त्यक्तुमिहोत्सहे १८ कृतवैराश्च कल्याणि वयमेतैर्निशाचरैः। खरस्य निधने देवि जनस्थानवधं प्रति १९ राक्षसा विविधा वाचो व्याहरन्ति महावने। हिंसाविहारा वैदेहि न चिन्तयितुमर्हसि २० लक्ष्मणेनैवमुक्ता तु क्रुद्धा संरक्तलोचना। अब्रवीत्परुषं वाक्यं लक्ष्मणं सत्यवादिनम् २१ अनार्य करुणारम्भ नृशंस कुलपांसन। अहं तव प्रियं मन्ये रामस्य व्यसनं महत् २२ रामस्य व्यसनं दृष्ट्वा तेनैतानि प्रभाषसे। नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत् २३ त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु। सुदुष्टस्त्वं वने राममेकमेकोनुगच्छसि २४ मम हेतोः प्रतिच्छन्नः प्रयुक्तो भरतेन वा। तन्न सिध्यति सौमित्रे तवापि भरतस्य वा २५ कथमिन्दीवरश्यामं रामं पद्मनिभेक्षणम्। उपसंश्रित्य भर्तारं कामयेयं पृथग्जनम् २६ समक्षं तव सौमित्रे प्राणांस्त्यक्ष्याम्यसंशयम्। रामं विना क्षणमपि नैव जीवामि भूतले २७ इत्युक्तः परुषं वाक्यं सीतया रोमहर्ष-

---

हे सुंदरि, महात्म्या रामानें तुला माझे स्वाधीन केलें आहे. ह्यास्तव, तुझा त्याग करण्याची माझी इच्छा नाहीं १८. हे कल्याणि, हे देवि, खराचा वध होऊन जनस्थानाचा वध झाला. ह्यामुळें राक्षस आमच्याशीं वैर धरून आहेत १९ आणि, हे विदेहराजकन्ये, हिंसेकरितां विहार करणारे राक्षस महावनामध्यें नानाप्रकारचे शब्द उच्चारीत असतात. तेव्हां तूं त्याचा विचार करूं नको" २०. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतांही सीता क्रुद्ध झाली आणि डोळे लाल करून सत्यवादी लक्ष्मणाशीं मर्मभेदक भाषण करूं लागली कीं २१, "सज्जनांना अयोग्य अशा दयेचें ढोंग करून माझें रक्षण करणाऱ्या दुष्टा, हे कुलदूषका, मला वाटतें रामावर मोठें संकट येणें तुला प्रिय आहे २२ आणि ह्मणूनच रामावर संकट आलेलें पाहून तूं अशीं भाषणें करीत आहेस; परतु, हे लक्ष्मणा, नेहमीं आपलें स्वरूप गुप्त ठेवून वागणाऱ्या तुझ्यासारिख्या दुष्ट शत्रूचे ठिकाणीं अशी पापबुद्धि असणें हें कांहीं आश्चर्य नव्हे. तूं अत्यंत दुष्ट आहेस आणि माझ्याकरितां अथवा भरतानें सांगितलें असल्यामुळें, आपलें स्वरूप गुप्त ठेवून वनामध्यें असलेल्या एकट्या रामाच्या मागोमाग तूं एकटा जात आहेस; परंतु, हे लक्ष्मणा, तुझा अथवा त्या भरताचा तो मनोरथ सिद्धीस जाणार नाहीं २३,२४,२५. अरे, नीलकमलाप्रमाणें श्यामवर्ण आणि कमलपत्रासारिख्या नेत्रांनीं युक्त अशा भर्त्या रामाचा उपभोग घेऊन मी आतां परपुरुषाची कशी बरें इच्छा करीन ? २६. हे लक्ष्मणा, मी तुझ्या समक्ष निःसंशय प्राणत्याग करीन; रामावांचून एक क्षणभरही मी भूतलावर जिवंत रहाणार नाहीं" २७. ह्याप्रमाणें

णम् । अब्रवील्लक्ष्मणः सीतां प्राञ्जलिः स जितेन्द्रियः २८ उत्तरं नोत्सहे वक्तुं दैवतं भवती मम । वाक्यमप्रतिरूपं तु न चित्रं स्त्रीषु मैथिलि २९ स्वभावस्त्वेष नारीणामेषु लोकेषु दृश्यते । विमुक्तधर्माश्चपलास्तीक्ष्णा भेदकराः स्त्रियः ३० न सहे हीदृशं वाक्यं वैदेहि जनकात्मजे । श्रोत्रयोरुभयोर्मध्ये तप्तनाराचसंनिभम् ३१ उपशृण्वन्तु मे सर्वे साक्षिणो हि वनेचराः । न्यायवादी यथा वाक्यमुक्तोऽहं परुषं त्वया ३२ धिक्त्वामद्य विनश्यन्तीं यन्मामेवं विशङ्कसे । स्त्रीत्वादुष्टस्वभावेन गुरुवाक्ये व्यवस्थितम् ३३ गच्छामि यत्र काकुत्स्थः स्वस्ति तेस्तु वरानने । रक्षन्तु त्वां विशालाक्षि समग्रा वनदेवताः ३४ निमित्तानि हि घोराणि यानि प्रादुर्भवन्ति मे । अपि त्वां सह रामेण पश्येयं पुनरागतः ३५ लक्ष्मणेनैवमुक्ता तु रुदती जनकात्मजा । प्रत्युवाच ततो वाक्यं तीव्रबाष्पपरिप्लुता ३६ गोदावरीं प्रवेक्ष्यामि हीना रामेण लक्ष्मण । आबन्धिष्येऽथवा त्यक्ष्ये वि-

---

अंगावर कांटा आणणारें मर्मभेदक भाषण सीतेनें लक्ष्मणाशीं केलें असतां तो जितेंद्रिय लक्ष्मण हात जोडून सीतेला ह्मणाला २८ " उत्तर देण्याची माझी इच्छा नाहीं; तूं माझें दैवत आहेस आणि, हे मैथिलि, स्त्रियांचे ठिकाणीं अयोग्य भाषण हेंही कांहीं मोठें आश्चर्य नव्हे २९. ह्या लोकांमध्यें स्त्रियांचा हा स्वभावच दिसत आहे. स्त्रिया ह्मणजे क्रूर, चंचल, धर्माची पर्वा न॰बाळगणाऱ्या आणि एकमेकांत फूट पाडणाऱ्या अशा असावयाच्याच ३०. हे जनककन्ये वैदेहि, दोन्ही कानांमध्यें तप्त नाराच बाणासारिखे सलत असलेलें तुझें हें अशा प्रकारचें भाषण मला सहन होत नाहीं ३१. ज्याअर्थी मी न्यायानें भाषण करीत असतांनाही तूं माझ्याशीं मर्मभेदक भाषण केलें आहेस त्याअर्थी साक्षी असलेले सर्व वनचर प्राणी मी काय ह्मणत आहें इकडे लक्ष्य देवोत ३२. वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या माझ्याविषयीं तूं जातीची स्त्री असल्यामुळें दुष्ट स्वभावानें अशी शंका घेत आहेस. तस्मात्, विनाशकाल जवळ आलेल्या तुला धिक्कार असो ३३. हे सुमुखि, जिकडे राम असेल तिकडे मी जातों; तुझें कल्याण असो आणि, हे विशालनयने, संपूर्ण वनदेवता तुझें रक्षण करोत ३४. मला भयसूचक घोर चिन्हें दृष्टीं पडत आहेत; यावरून रामासहवर्तमान परत आल्यावर तूं माझ्या दृष्टीं पडशील किंवा नाहीं ही शंकाच आहे " ३५. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां तीव्र अश्रूंनीं भरून गेलेली ती जनककन्या रडत रडत त्याला ह्मणाली ३६ " हे लक्ष्मणा, रामाचा वियोग झाला असतां मी गोदावरीमध्यें उडी घालीन, गळ्याला फांस लावून घेईन, कड्याबिड्यावर उभी राहून

षमे देहमात्मनः ३७ पिबामि वा विषं तीक्ष्णं प्रवेक्ष्यामि हुताशनम्। न त्वहं राघवादन्यं कदापि पुरुषं स्पृशे ३८ इति लक्ष्मणमाश्रुत्य सीता शोकसमन्विता। पाणिभ्यां रुदती दुःखादुदरं प्रजघान ह ३९ तामार्तरूपां विमना रुदन्तीं सौमित्रिरालोक्य विशालनेत्राम्। आश्वासयामास न चैव भर्तुस्तं भ्रातरं किंचिदुवाच सीता ४० ततस्तु सीतामभिवाद्य लक्ष्मणः कृताञ्जलिः किंचिदभिप्रणम्य। अवेक्षमाणो बहुशः स मैथिलीं जगाम रामस्य समीपमात्मवान् ४१ [१७४८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः॥ ४५॥

तया परुषमुक्तस्तु कुपितो राघवानुजः। स विकाङ्क्षन्भृशं रामं प्रतस्थे न चिरादिव १ तदासाद्य दशग्रीवः क्षिप्रमन्तरमास्थितः। अभिचक्राम वैदेहीं परिव्राजकरूपधृक् २ श्लक्ष्णकाषायसंवीतः शिखी छत्री उपानही। वामे चांसेवसज्याथ शुभे यष्टिकमण्डलू ३ परिव्राजकरूपेण वैदेहीमन्ववर्तत। तमाससादातिबलो भ्रातृभ्यां रहितां वने ४ रहितां सूर्यचन्द्राभ्यां

---

तेथून आपला देह लोटून देईन ३७, तीक्ष्ण विष प्राशन करीन अथवा अग्निमध्यें प्रवेश करीन; परंतु, रामावांचून इतर पुरुषाला मी कधींही स्पर्श करणार नाहीं" ३८. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला निश्चयपूर्वक सांगून शोकाकुल झालेली सीता रडत रडत आपल्या हातांनीं दुःखानें उदर बुडवून घेऊं लागली असतां ३९ आर्त होऊन रडत असलेल्या त्या विशालनयना सीतेला अवलोकन करून लक्ष्मणानें तिचें सांत्वन केलें. तथापि भर्त्याच्या त्या भ्रात्याशीं ती सीता कांहींच बोलेना ४०. तेव्हां सीतेला मनानें अभिवंदन करून व किंचित् नम्र होऊन पहात पहात तो लक्ष्मण रामाचे समीप निघून गेला ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला॥ ४५॥

तदनंतर तिच्या कठोर वाणीनें रुष्ट झालेला रामाचा कनिष्ठ बंधु लक्ष्मण, रामही आपल्याशीं विरुद्ध आहे कीं काय अशी शंका आल्यामुळें रामचंद्राकडे जाण्याच्या इच्छेनें सत्वर निघाला १. ही संधि साधून संन्याशाचा वेष घेतलेला दशग्रीव रावणही अति सत्वर त्या वैदेहीच्या जवळ आला २. तो मनोहर भगवीं वस्त्रें परिधान केलेला असून शेंडी, छत्री व जोडा ह्यांसहवर्तमान असलेल्या त्याच्या डाव्या खांद्यावर उत्तम प्रकारची काठी आणि कमंडलु हीं लटकलेलीं होतीं ३. तो अतिबलवान् रावण वनामध्यें दोघां बंधूंनीं रहित असलेल्या त्या वैदेहीकिडे संन्याशाच्या वेषानें आला ४ आणि त्यानें सूर्यचंद्रांनीं रहित असलेल्या संध्येप्रमाणें शोभणाऱ्या त्या पूर्ववयस्क

संध्यामिव महत्तमः । तामपश्यत्ततो बालां राजपुत्रीं यशस्विनीम् ५
रोहिणीं शशिना हीनां ग्रहवद्भृशदारुणः । तमुग्रं पापकर्माणं जनस्थान-
गता द्रुमाः ६ संदृश्य न प्रकम्पन्ते न प्रवाति च मारुतः । शीघ्रस्रोताश्च
तं दृष्ट्वा वीक्षन्तं रक्तलोचनम् ७ स्तिमितं गन्तुमारेभे भयाद्गोदावरी नदी ।
रामस्य त्वन्तरं प्रेप्सुर्दशग्रीवस्तदन्तरे ८ उपतस्थे च वैदेहीं भिक्षुरूपेण
रावणः । अभव्यो भव्यरूपेण भर्तारमनुशोचतीम् ९ अभ्यवर्तत वैदेहीं
चित्रामिव शनैश्चरः । सहसा भव्यरूपेण तृणैः कूप इवावृतः १० अति-
ष्ठत्प्रेक्ष्य वैदेहीं रामपत्नीं यशस्विनीम् । तिष्ठन्संप्रेक्ष्य च तदा पत्नीं रामस्य
रावणः ११ शुभां रुचिरदन्तौष्ठीं पूर्णचन्द्रनिभाननाम् । आसीनां पर्ण-
शालायां बाष्पशोकाभिपीडिताम् १२ स तां पद्मपलाशाक्षीं पीतकौशे-
यवासिनीम् । अभ्यगच्छत वैदेहीं हृष्टचेता निशाचरः १३ दृष्ट्वा काम-
शराविद्धो ब्रह्मघोषमुदीरयन् । अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं रहिते राक्षसाधिपः १४
तामुत्तमां त्रिलोकानां पद्महीनामिव श्रियम् । विभ्राजमानां वपुषा रावणः

---

यशस्विनी राजपुत्रीला अवलोकन केलें ५. तेव्हां ती चंद्रानें रहित असलेल्या रोहि-णीप्रमाणें केतुरूप रावणाच्या दृष्टीं पडली. त्या पापकर्म करणाऱ्या उग्र रावणाला अवलोकन करितांच जनस्थानांतील झाडें ६ हलेनाशीं झालीं, वारा वाहेनासा झाला, जलद वाहणारे पाण्याचे ओघ आरक्तवर्ण नेत्र असलेल्या त्या रावणाला पाहून ७ हळू हळू वाहूं लागले व त्याचप्रमाणें गोदावरी नदीही मंद मंदच वाहूं लागली. असो. आश्रमामध्यें रामचंद्र नाहीं असें पाहून तो भव्य असलेला दशग्रीव रावण ८ भिक्षु-रूपानें भर्त्याबद्दल शोक करीत असलेल्या त्या वैदेहीकडे भव्य रूप धारण करून आला ९. तेव्हां चित्रानक्षत्राकडे येणाऱ्या शनैश्वराप्रमाणें आणि तृणांनीं आच्छादित असलेल्या कूपाकडे जाणाऱ्या भव्य पुरुषाप्रमाणें तो रावण वैदेहीजवळ प्राप्त झाल्यावर उभ्या उभ्याच रामचंद्राची पत्नी यशस्विनी वैदेही सीतेला अवलोकन करून १०, ११ उत्कृष्ट दंत व ओष्ठ असलेली, पौर्णिमेच्या चंद्रासारिखें मुख असलेली, शोकाश्रूंनीं नेत्र भरून गेलेली १२, पर्णशालेमध्यें बसलेली, पद्मपत्राप्रमाणें विस्तृत नेत्र असलेली आणि पीतांबर धारण केलेली अशी ती कल्याणी वैदेही सीता त्याच्या दृष्टीस पडली व तिला पाहून त्याला मोठा आनंद झाला १३. ह्याप्रमाणें जानकीला अवलोकन करून कामबाणानें पीडित झालेल्या त्या राक्षसाधिपति रावणानें वेदांचा उच्चार केला आणि कोणी नाहीं असें पाहून तो तिच्याशीं बोलण्याच्या इच्छेनें त्रैलोक्यामध्यें उत्कृष्ट कमलरहित लक्ष्मीप्रमाणें शोभणाऱ्या व शरीरानें प्रकाशित होणाऱ्या सीतेला

प्रशशंस ह १५ रौप्यकाञ्चनवर्णाभे पीतकौशेयवासिनि । कमलानां शुभां मालां पद्मिनीव च बिभ्रती १६ ह्रीः श्रीः कीर्तिः शुभा लक्ष्मीरप्सरा वा शुभानने । भूतिर्वा त्वं वरारोहे रतिर्वा स्वैरचारिणी १७ समाः शिखरिणः स्निग्धाः पाण्डुरा दशनास्तव । विशाले विमले नेत्रे रक्तान्ते कृष्णतारके १८ विशालं जघनं पीनमूरू करिकरोपमौ । एतावुपचितौ वृत्तौ संहतौ संप्रगल्भितौ १९ पीनोन्नतमुखौ कान्तौ स्निग्धतालफलोपमौ । मणिप्रवेकाभरणौ रुचिरौ तौ पयोधरौ २० चारुस्मिते चारुदति चारुनेत्रे विलासिनि । मनो हरसि मे रामे नदीकूलमिवाम्भसा २१ करान्तमितमध्यासि सुकेशे संहतस्तनि । नैव देवी न गन्धर्वी न यक्षी न च किंनरी २२ नैवंरूपा मया नारी दृष्टपूर्वा महीतले । रूपमग्र्यं च लोकेषु सौकुमार्यं वयश्च ते २३ इह वासश्च कान्तारे चित्तमुन्माथयन्ति मे । सा प्रतिक्राम भद्रं ते न त्वं वस्तुमिहार्हसि २४ राक्ष-

---

ह्मणाला १४,१५ " हे उत्कृष्ट सुवर्णाप्रमाणें वर्ण असलेलें, पीतवस्त्र परिधान करणारे व लक्ष्मीप्रमाणें कमलांची माला अत्यंत धारण करणारे सुंदरि जानकि १६, तूं श्री, ह्री, कीर्ति, लक्ष्मी, अप्सरा, उत्तम प्रकारचें मुख असलेली भूति अथवा स्वैर वर्तन करणारी रतिच आहेस कीं काय ? १७. तुझे दंत एकसारिखे, मऊ आणि पांडुरवर्ण असे असून तुझे विशाल आणि स्वच्छ असे नेत्र काळ्या बाहुल्यांनीं युक्त आहेत व त्यांचे प्रांत आरक्तवर्ण आहेत १८. तुझा कटिपश्चाद्भाग विशाल असून तुझ्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणें सरळ आहेत. हे तुझे स्तन, उंच असून वर्तुलाकृति, सारखे, आलिंगन देण्यास योग्य १९, अग्रें उंच असलेले, सुंदर, तालवृक्षाच्या फळांप्रमाणें मऊ व श्रेष्ठ श्रेष्ठ मणि ज्यांवर लोंबत आहेत असे आहेत २०. हे उत्कृष्ट हास्य करणारे व रमणीय दंत आणि सुंदर नयन ह्यांनीं युक्त असलेले विलासिनि जानकि, ज्याप्रमाणें नदी आपल्या उदकानें आपल्या तीराला वाहून नेते त्याप्रमाणें तूं माझें अंतःकरण ओढून नेत आहेस २१. हे उत्कृष्ट आणि आकुंचित स्तन ह्यांनीं युक्त असलेले जानकि, तुझी कटि अंगुष्ठ व तर्जनी ह्यांमध्यें मावणारी असून तूं देवांगना, गंधर्वस्त्री, यक्षीण अथवा किन्नरी नसावीस ( असें वाटतें ) २२. ह्या भूतलावर तुझ्यासारिखी रूपवती स्त्री मीं पूर्वीं कधीं अवलोकन केली नसून ह्या लोकांमध्यें तुझें हें रूप, हा सुकुमारपणा आणि हें वय हीं अत्यंत उत्कृष्ट आहेत २३. अशा प्रकारचें तुझें रूप असून तूं अरण्यामध्यें वास्तव्य करीत आहेस हें पाहून माझें मन अगदीं गोंधळून जात आहे. तस्मात्, हे जानकि, तुझें कल्याण असो. तूं येथें न राहतां माझ्याबरोबर चल २४. इच्छेस

सानामयं वासो घोराणां कामरूपिणाम् । प्रासादाग्र्याणि रम्याणि नगरोपवनानि च २५ संपन्नानि सुगन्धीनि युक्तान्याचरितुं त्वया । वरं माल्यं वरं गन्धं वरं वस्त्रं च शोभने २६ भर्तारं च वरं मन्ये त्वद्युक्तमसितेक्षणे। का त्वं भवसि रुद्राणां मरुतां वा शुचिस्मिते २७ वसूनां वा वरारोहे देवता प्रतिभासि मे । नेह गच्छन्ति गन्धर्वा न देवा न च किंनराः २८ राक्षसानामयं वासः कथं तु त्वमिहागता । इह शाखामृगाः सिंहा द्वीपिव्याघ्रमृगा वृकाः २९ ऋक्षास्तरक्षवः कङ्काः कथं तेभ्यो न बिभ्यसे । मदान्वितानां घोराणां कुञ्जराणां तरस्विनाम् ३० कथमेका महारण्ये न बिभेषि वरानने । कासि कस्य कुतश्च त्वं किंनिमित्तं च दण्डकान् ३१ एका चरसि कल्याणि घोरान्राक्षससेवितान् । इति प्रशस्ता वैदेही रावणेन महात्मना ३२ द्विजातिवेषेण हि तं दृष्ट्वा रावणमागतम् । सर्वैरतिथिसत्कारैः पूजयामास मैथिली ३३ उपानीयासनं पूर्वं पाद्येनाभिनिमन्त्र्य च । अब्रवीत्सिद्धमित्येव तदा तं सौम्यदर्शनम् ३४ द्विजातिवेषेण समीक्ष्य

---

येईल तें रूप धारण करणाऱ्या घोर राक्षसांचें हें अरण्य वसतिस्थान आहे. सुंदर सुंदर नगरांच्या, पुष्पांनीं भरलेल्या व सुगंधयुक्त अशा, उपवनांमध्यें राजवाड्यांच्या गच्च्यांवर तुझ्यासहवर्तमान क्रीडा करण्यास तूं योग्य आहेस. तुझी सुंदर माला, उत्कृष्ट गंध, रमणीय वस्त्र व, हे कृष्णनयने सुंदरि, तुझे ठिकाणीं रममाण होणारा पति हीं सर्व श्रेष्ठ आहेत. हे सुहास्यवदने, तूं रुद्र, देव, २५,२६,२७ व वसु ह्यांपैकीं कोण आहेस ? मला वाटतें तूं देवता आहेस. येथें देव, गंधर्व अथवा किन्नर हे कधींही येत नाहींत २८. हें राक्षसांचें वसतिस्थान असून तूं कशी येथें प्राप्त झाली आहेस ? ह्या ठिकाणीं वानर, सिंह, चित्ते, वाघ लांडगे २९, अस्वलें, तरस आणि कंक ह्मणून प्रख्यात असलेले पक्षी वास्तव्य करितात. ह्यास्तव, त्यांपासून तुला कशी भीति वाटत नाहीं ? तूं कोण आहेस, कोणाची आहेस आणि ह्या दंडकारण्यामध्यें कोठून व कशाकरितां प्राप्त झाली आहेस ? ३०,३१. हे कल्याणि, घोर राक्षसांनीं सेवन केलेल्या ह्या दंडकारण्यांत तूं एकटी कां संचार करीत आहेस ? " ह्याप्रमाणें महात्म्या रावणानें जानकीशीं आदरपूर्वक भाषण केलें असतां ३२ यतिवेषानें हा रावणच आपणाकडे आला आहे असें अवलोकन करूनही त्या मैथिलीनें, ज्याप्रमाणें अतिथीचा सत्कार करावयाचा त्याचप्रमाणें त्याचा सत्कार केला ३३ आणि प्रथमतः त्याला बसावयास आसन देऊन पाद्य समर्पण केलें आणि शुद्ध असलेलें व परिपक्क झालेलें असें अन्न तयार आहे ह्मणून सांगितलें ३४. तदनंतर कमंडलु व भगवीं वस्त्रें परिधान करून यतिवेषानें प्राप्त

मैथिली समागतं पात्रकुसुम्भधारिणम् । अशक्यमुद्द्वेष्टुमुपायदर्शनान्न्य-
मन्त्रयद्ब्राह्मणवत्तथागतम् ३५ इयं बृसी ब्राह्मण काममास्यतामिदं च
पाद्यं प्रतिगृह्यतामिति । इदं च सिद्धं वनजातमुत्तमं त्वदर्थमव्यग्रमिहोप-
भुज्यताम् ३६ निमन्त्र्यमाणः प्रतिपूर्णभाषिणीं नरेन्द्रपत्नीं प्रसमीक्ष्य
मैथिलीम् । प्रसह्य तस्या हरणे दृढं मनः समर्पयामास वधाय रावणः ३७
ततः सुवेषं मृगयागतं पतिं प्रतीक्षमाणा सहलक्ष्मणं तदा । निरीक्षमाणा
हरितं ददर्श तन्महद्वनं नैव तु रामलक्ष्मणौ ३८ [१७८६]इत्यार्षे श्रीम-
द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः॥ ४६॥

रावणेन तु वैदेही तदा पृष्टा जिहीर्षुणा । परिव्राजकरूपेण शशंसात्मा-
नमात्मना १ ब्राह्मणश्चातिथिश्चैष अनुक्तो हि शपेत माम् । इति
ध्यात्वा मुहूर्तं तु सीता वचनमब्रवीत् २ दुहिता जनकस्याहं मैथिलस्य
महात्मनः । सीता नाम्नास्मि भद्रं ते रामस्य महिषी प्रिया ३ उषित्वा
द्वादश समा इक्ष्वाकूणां निवेशने । भुञ्जाना मानुषान्भोगान्सर्वकामस-

---

झालेल्या रावणाला सीतेनें अवलोकन केलें आणि त्याची उपेक्षा करणें योग्य नव्हे असें मनांत आणून आपण ब्राह्मण आहांत असें इतरांना वाटण्याकरितां रावणानें योजिलेले उपाय दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें ती ब्राह्मण समजून त्याला ह्मणाली ३५ "हे द्विज, ह्या आसनावर आपण खुशाल बसून ह्या पाद्याचा स्वीकार करावा आणि आपणांकरितां तयार केलेले हे उत्कृष्ट वन्य पदार्थ आपण येथें स्वस्थपणें सेवन करावे" ३६. ह्याप्रमाणें त्याच्याशीं सीतेचें बोलणें चाललें असतांना त्या राजपत्नीचें भाषण संपूर्ण झालें असें पाहून आपल्या नाशाकरितां बलात्कारानें तिला हरण करून नेण्याविषयीं रावणानें आपल्या मनाचा पक्का निश्चय केला ३७. नंतर उत्कृष्ट वेष धारण करून लक्ष्मणासहवर्तमान मृगयेला गेलेल्या पतीची मार्गप्रतीक्षा करीत बसलेली ती सीता निरखून पाहूं लागली असतां रामलक्ष्मण तर नाहींतच परंतु प्रचंड हिरवेंगार वन मात्र तिच्या दृष्टीं पडलें ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

यतिवेष धारण केलल्या व आपला नाश होण्याची इच्छा करणाऱ्या रावणानें सीतेला प्रश्न केला असतां तिनें स्वतःविषयीं त्याला सांगितलें १. हा ब्राह्मण असून अतिथि आहे; तेव्हां ह्याच्या प्रश्नाला जर उत्तर दिलें नाहीं तर हा मला शाप देईल असा क्षणभर विचार केल्यानंतर ती सीता ह्मणाली २ "आपलें देव बरें करो, मी महात्म्या मिथिलाधिपति राजाची कन्या असून रामाची सीतानामक प्रियपत्नी

मृद्धिनी ४ तत्र त्रयोदशे वर्षे राजामन्त्रयत प्रभुः । अभिषेचयितुं रामं
समेतो राजमन्त्रिभिः ५ तस्मिन्संभ्रियमाणे तु राघवस्याभिषेचने ।
कैकेयी नाम भर्तारं ममार्या याचते वरम् ६ परिगृह्य तु कैकेयी श्वशुरं
सुकृतेन मे । मम प्रव्राजनं भर्तुर्भरतस्याभिषेचनम् ॥ द्वावयाचत भर्तारं
सत्यसंधं नृपोत्तमम् ७ नाद्य भोक्ष्ये न च स्वप्स्ये न पास्ये न कदाचन ।
एष मे जीवितस्यान्तो रामो यद्यभिषिच्यते ८ इति ब्रुवाणां कैकेयीं
श्वशुरो मे स पार्थिवः । अयाचतार्थैरन्वर्थैर्न च याच्ञां चकार सा ९
मम भर्ता महातेजा वयसा पञ्चविंशकः । अष्टादश हि वर्षाणि मम
जन्मनि गण्यते १० रामेति प्रथितो लोके सत्यवाञ्शीलवाञ्शुचिः ।
विशालाक्षो महाबाहुः सर्वभूतहिते रतः ११ कामार्तश्च महाराजः पिता
दशरथः स्वयम् । कैकेय्याः प्रियकामार्थं तं रामं नाभ्यषेचयत् १२

---

आहे ३. ( विवाहानंतर ) माझीं बारा वर्षे इक्ष्वाकुवंशजांच्या घरामध्यें, मनुष्याला योग्य अशा सर्व प्रकारच्या भोग्यवस्तूंचा उपभोग घेण्यांत आणि हवी ती इच्छा परिपूर्ण करून घेण्यांत, गलीं असतां ४ तेरावे वर्षीं राजमंत्र्यांसहवर्तमान असलेल्या प्रभु दशरथराजानें रामाला अभिषेक करण्याचें ठरविलें ५; परंतु, रघुवंशज रामाच्या त्या अभिषेकाची तयारी चालली असतां मला पूज्य असलेल्या कैकयीनें आपल्या भर्त्यापाशीं वरप्रदान मागितलें ६. माझ्या सासऱ्याला प्रथमतः तिनें धर्माची शपथ घातली आणि नंतर माझ्या भर्त्याला वनवास व भरताला अभिषेक असे दोन वर तिनें त्या आपल्या सत्यवचनी नृपश्रेष्ठ भर्त्यापाशीं मागितले ( आणि ती ह्मणाली ) ७ "मी आज कांहीं एक खाणार नाहीं, कांहीं एक पिणार नाहीं आणि कधीं झोंपही घेणार नाहीं; रामाला जर अभिषेक होणार असेल तर ही माझ्या जीविताची परिसमाप्तिच झाली ( असें आपण समजा )" ८. ह्याप्रमाणें कैकेयी बोलूं लागली असतां माझ्या सासऱ्यानें ह्मणजे त्या दशरथराजानें उपभोग घेण्यास योग्य अशा पुष्कळ वस्तु तिला देऊं केल्या असतांही तिनें त्याच्या विनंतीला मान दिला नाहीं ९. त्या वेळीं माझा महातेजस्वी पति वयानें पंचवीस वर्षांचा असून माझें वय अठरा वर्षांचें होतें १०. विशालनयन, महापराक्रमी, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर, सत्यवचनी, सुशील आणि पवित्र असा माझा भर्ता राम ह्मणून लोकांमध्यें प्रसिद्ध आहे ११. तथापि कामाच्या तावडींत सांपडलेल्या स्वतः पित्या दशरथमहाराजानेंच कैकेयीची प्रिय इच्छा परिपूर्ण करण्याकरितां त्या रामाला अभिषेक केला नाहीं १२. असो. अभिषेकाकरितां माझा भर्ता राम पित्याचे समीप आला

अभिषेकाय तु पितुः समीपं राममागतम् । कैकेयी मम भर्तारमि-
त्युवाच द्रुतं वचः १३ तव पित्रा समाज्ञप्तं ममेदं शृणु राघव । भरताय
प्रदातव्यमिदं राज्यमकण्टकम् १४ त्वया तु खलु वस्तव्यं नव वर्षाणि
पञ्च च । वने प्रव्रज काकुत्स्थ पितरं मोचयानृतात् १५ तथेत्युवाच तां
रामः कैकेयीमकुतोभयः । चकार तद्वचः श्रुत्वा भर्ता मम दृढव्रतः १६
दद्यान्न प्रतिगृह्णीयात् सत्यं ब्रूयान्न चानृतम् । एतद्ब्राह्मण रामस्य व्रतं धृतम-
नुत्तमम् १७ तस्य भ्राता तु वैमात्रो लक्ष्मणो नाम वीर्यवान् । रामस्य पुरुष-
व्याघ्रः सहायः समरेऽरिहा १८ स भ्राता लक्ष्मणो नाम ब्रह्मचारी दृढव्रतः ।
अन्वगच्छद्धनुष्पाणिः प्रव्रजन्तं मया सह १९ जटी तापसरूपेण मया सह
सहानुजः । प्रविष्टो दण्डकारण्यं धर्मनित्यो दृढव्रतः २० ते वयं प्रच्युता
राज्यात्कैकेय्यास्तु कृते त्रयः । विचराम द्विजश्रेष्ठ वनं गम्भीरमोजसा २१
समाश्वस मुहूर्तं तु शक्यं वस्तुमिह त्वया २२ आगमिष्यति मे भर्ता

---

असतां कैकेयी सत्वर त्याला ह्मणाली १३ "हे राघवा, हें तुझ्या पित्यानें मला दिलेलें वचन तू श्रवण कर. ' हें निष्कंटक राज्य भरताला द्यावयाचें असून १४ तुला चवदा वर्षे वनामध्यें वास्तव्य करावयाचें आहे. ह्याकरितां, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं आतां वनामध्यें चालता हो आणि अनृतापासून आपले पित्याला मुक्त कर, "१५. ह्यावर स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणाऱ्या व कसल्याही प्रकारची भीति नसलेल्या त्या रामानें "ठीक आहे" असें तिला उत्तर दिलें आणि तिचें बोलणें ऐकून घेतल्यानंतर माझ्या भर्त्यानें त्याचप्रमाणें केलें १६. हे ब्राह्मणा, दान द्यावें; परंतु, प्रतिग्रह कधींही करूं नये, आणि त्याचप्रमाणें भाषण सत्यच करावें; परंतु, अनृत कधींही बोलूं नये हें रामाचें अत्युत्तम स्वीकृत व्रत होय १७. असो. त्या रामाचा लक्ष्मण ह्मणून एक बलाढ्य सापत्न भ्राता आहे आणि तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण समरांगणामध्यें शत्रूचा नाश करणारा असून त्याला साहाय्य करणारा आहे १८. ह्यामुळें मला बरोबर घेऊन आणि हातामध्यें धनुष्य घेऊन राम वनामध्यें जाऊं लागला असतां तो दृढनिश्चयी भ्राता लक्ष्मण ब्रह्मचर्य स्वीकारून त्याच्या मागोमाग वनामध्यें गेला १९ आणि ह्याप्रमाणें जटा धारण केलेला व नेहमीं धर्माचीच अपेक्षा करणारा दृढनिश्चयी राम कनिष्ठ भ्रात्याला बरोबर घेऊन माझ्यासहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला २०. तात्पर्य, हे द्विजश्रेष्ठा, कैकेयीकरितां राज्याला मुकलेले ते आह्मी तिघे गहन वनामध्यें स्वसामर्थ्यानें संचार करीत आहोंत २१. येथें आपणाला रहाणें जर शक्य असेल तर क्षणभर विश्रांति घ्या २२. रुरु, गोधा व वराह ह्यांचा वध करून, बरेंचसें मांस बरोबर घेऊन आणि इतरही

वन्यमादाय पुष्कलम्। रुरून्गोधान्वराहांश्च हत्वादायामिषं बहु २३ स त्वं नाम च गोत्रं च कुलमाचक्ष्व तत्त्वतः। एकश्च दण्डकारण्ये किमर्थं चरसि द्विज २४ एवं ब्रुवत्यां सीतायां रामपत्न्यां महाबलः। प्रत्युवाचोत्तरं तीव्रं रावणो राक्षसाधिपः २५ येन वित्रासिता लोकाः सदेवासुरमानुषाः। अहं स रावणो नाम सीते रक्षोगणेश्वरः २६ त्वां तु काञ्चनवर्णाभां दृष्ट्वा कौशेयवासिनीम्। रतिं स्वकेषु दारेषु नाधिगच्छाम्यनिन्दिते २७ बह्वीनामुत्तमस्त्रीणामाहृतानामितस्ततः। सर्वासामेव भद्रं ते ममाग्रमहिषी भव २८ लङ्का नाम समुद्रस्य मध्ये मम महापुरी। सागरेण परिक्षिप्ता निविष्टा गिरिमूर्धनि २९ तत्र सीते मया सार्धं वनेषु विचरिष्यसि। न चास्य वनवासस्य स्पृहयिष्यसि भामिनि ३० पञ्च दास्यः सहस्राणि सर्वाभरणभूषिताः। सीते परिचरिष्यन्ति भार्या भवसि मे यदि ३१ रावणेनैवमुक्ता तु कुपिता जनकात्मजा। प्रत्युवाचानवद्याङ्गी तमनादृत्य

---

पुष्कळ वन्य पदार्थ घेऊन माझा भर्ता (इतक्यांतच) येईल २३. आतां आपण आपलें नांव, गोत्र आणि कुल खरें खरें मला सांगा आणि हे द्विज, दंडकारण्यामध्यें आपण एकटे कशाकरितां संचार करीत आहांत तेंही कथन करा" २४. ह्याप्रमाणें रामपत्नी सीता विचारूं लागली असतांना तो राक्षसाधिपति महाबलाढ्य रावण तिच्या प्रश्नाला कठोर उत्तर देऊं लागला कीं २५, "हे सीते, ज्यानें देव, दैत्य आणि मनुष्य ह्यांसहवर्तमान सर्व त्रैलोक्य त्रस्त करून सोडिलें आहे तो मी रावणनामक राक्षसगणांचा राजा होय २६. सुवर्णासारिख्या कांतीनें युक्त असलेल्या तुला पैठणी नेसलेली अवलोकन केल्यापासून आपल्या स्त्रियांचे ठिकाणीं, हे सुंदरि, माझें मन मुळींच रमेनासें झालें आहे २७. ह्याकरितां इकडून तिकडून ज्या मीं अनेक उत्कृष्ट स्त्रिया हरण करून आणिल्या आहेत त्या सर्वांमध्यें तूंच माझी पट्टराणी हो; ह्मणजे तुझें कल्याण होईल २८. समुद्रामध्यें लंका ह्मणून माझी एक मोठी नगरी आहे. तिच्या सभोंवतीं समुद्राचा वेढा असून पर्वताच्या माथ्यावर ती वसलेली आहे २९. त्या ठिकाणीं तूं माझ्यासहवर्तमान वनामध्यें संचार करूं लागलीस ह्मणजे, हे सुंदरि सीते, ह्या वनांत राहण्याची तुला इच्छाही होणार नाहीं ३०. हे सीते, तूं जर माझी भार्या होशील तर सर्व प्रकारचे अलंकार धारण केलेल्या अशा पांच हजार दासी तुझी सेवा करीत रहातील" ३१. ह्याप्रमाणें रावण बोलला असतां ती जनककन्या सुंदरी सीता क्रुद्ध होऊन व त्या राक्षसाचा धिक्कार करून त्याला ह्मणाली ३२ "महापर्वताप्रमाणें जो कधीं कंपित होणें शक्य नाहीं आणि महासागराप्रमाणें जो

राक्षसम् ३२ महागिरिमिवाकम्प्यं महेन्द्रसदृशं पतिम् । महोदधिमिवाक्षोभ्यमहं राममनुव्रता ३३ सर्वलक्षणसंपन्नं न्यग्रोधपरिमण्डलम् । सत्यसंधं महाभागमहं राममनुव्रता ३४ महाबाहुं महोरस्कं सिंहविक्रान्तगामिनम् । नृसिंहं सिंहसंकाशमहं राममनुव्रता ३५ पूर्णचन्द्राननं रामं राजवत्सं जितेन्द्रियम् । पृथुकीर्तिं महाबाहुमहं राममनुव्रता ॥ त्वं पुनर्जम्बुकः सिंहीं मामिहेच्छसि दुर्लभाम् ३६ नाहं शक्या त्वया स्प्रष्टुमादित्यस्य प्रभा यथा ३७ पादपान्काञ्चनान्नूनं बहून्पश्यसि मन्दभाक् । राघवस्य प्रियां भार्यां यस्त्वमिच्छसि राक्षस ३८ क्षुधितस्य च सिंहस्य मृगशत्रोस्तरस्विनः । आशीविषस्य वदनाद्दंष्ट्रामादातुमिच्छसि ॥ मन्दरं पर्वतश्रेष्ठं पाणिना हर्तुमिच्छसि ३९ कालकूटं विषं पीत्वा स्वस्तिमान्गन्तुमिच्छसि । अक्षिसूच्या प्रमृजसि जिह्वया लेढि च क्षुरम् ४० राघवस्य प्रियां भार्यामधिगन्तुं

---

क्षुब्ध होणें शक्य नाहीं असा जो माझा पति महेंद्रतुल्य राम त्यालाच अनुसरून मी वागणारी आहें ३३. सर्वलक्षणसंपन्न आणि वटवृक्षाप्रमाणें सर्वांना आश्रयभूत अशा त्या महाभाग्यवान् सत्यवचनी रामाला अनुसरून वागणें हेंच माझें व्रत आहे ३४. महापराक्रमी, विशाल वक्षःस्थलानें युक्त, सिंहगतीनें चालणाऱ्या आणि पराक्रमामध्यें सिंहाप्रमाणेंच असणाऱ्या पुरुषश्रेष्ठ रामालाच अनुसरून मी वागणारी आहें ३५. पूर्णचंद्राप्रमाणें ज्याचें मुख आहे अशा महापराक्रमी, महाकीर्तिमान् व जितेंद्रिय राजपुत्र रामाला अनुसरून वागणें हेंच माझें व्रत आहे ३६. सिंहिणीची इच्छा धरणाऱ्या कोल्ह्याप्रमाणें तूं विनाकारण माझी येथें इच्छा करीत आहेस; परंतु, मी तुला मिळणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर, ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रभेला सूर्यापासून पृथक् करून कोणाला स्पर्श करितां येत नाहीं त्याचप्रमाणें रामाचा विनियोग करून मला तुझा स्पर्श होणें शक्य नाहीं ३७. हे भाग्यहीना ( मृत्यु जवळ आल्यामुळें स्वप्नामध्यें ) पुष्कळच सुवर्णवृक्ष खरोखर तूं पहात असशील. हे राक्षसा, रामाच्या प्रिय भार्येची तूं इच्छा करीत आहेस ३८. परंतु, असें मनांत आणणें ह्मणजे मृगांचा शत्रु आणि महाबलाढ्य अशा क्षुधित सिंहाच्या अथवा सर्पाच्या तोंडांतून दाढ काढून घेण्याची इच्छा करण्यासारिखें अथवा मंदरनामक श्रेष्ठ पर्वत हातानें उचलून नेण्याचीच इच्छा करण्यासारिखें आहे ३९. इतकेंच नव्हे; परंतु, कालकूट विष भक्षण करून स्वस्तिक्षेम जाण्याची तूं इच्छा करीत आहेस आणि धार साफ लागण्याकरितां नेत्राग्रांवर तूं वस्तरा घाशीत असून जिभेनें तो चाटीत आहेस ४०. रामाची प्रिय भार्या प्राप्त होण्याची तूं इच्छा करीत आहेस; ह्मणजे गळ्यामध्यें शिळा बांधून समुद्र तरून जाण्याचेंच तूं

त्वमिच्छसि । अवसृज्य शिलां कण्ठे समुद्रं तर्तुमिच्छसि ४१ सूर्याचन्द्रमसौ चोभौ पाणिभ्यां हर्तुमिच्छसि । यो रामस्य प्रियां भार्यां प्रधर्षयितुमिच्छसि ४२ अग्निं प्रज्वलितं दृष्ट्वा वस्त्रेणाहर्तुमिच्छसि । कल्याणवृत्तां यो भार्यां रामस्याहर्तुमिच्छसि ४३ अयोमुखानां शूलानां मध्ये चरितुमिच्छसि ॥ रामस्य सदृशीं भार्यां योऽधिगन्तुं त्वमिच्छसि ४४ यदन्तरं सिंहसृगालयोर्वने यदन्तरं स्यन्दनिकासमुद्रयोः । सुराग्र्यसौवीरकयोर्यदन्तरं तदन्तरं दाशरथेस्तवैव च ४५ यदन्तरं काञ्चनसीसलोहयोर्यदन्तरं चन्दनवारिपङ्कयोः । यदन्तरं हस्तिबिडालयोर्वने तदन्तरं दाशरथेस्तथैव च ४६ यदन्तरं वायसवैनतेययोर्यदन्तरं मद्गुमयूरयोरपि । यदन्तरं हंसकगृध्रयोर्वने तदन्तरं दाशरथेस्तवैव च ४७ तस्मिन्सहस्राक्षसमप्रभावे रामे स्थिते कार्मुकबाणपाणौ । हृतापि तेऽहं न जरां गमिष्ये आज्यं यथा मक्षिकयावगीर्णम् ४८ इतीव तद्वाक्यमदुष्टभावा सुदुष्टमुक्त्वा रजनीचरं तम् । गात्रप्रकम्पाद्व्यथिता बभूव वातोद्धता सा कदलीव तन्वी ४९

---

मनामध्यें आणिलें आहेस ४१. अरे, रामाच्या प्रिय भार्येवर हात टाकण्याचें तूं मनांत आणीत आहेस; परंतु, असें मनांत आणणें ह्मणजे सूर्य व चंद्र ह्या उभयतांना हातांनींच ओढून आणण्याचा तूं विचार करीत आहेस ४२. सदाचरणानें वागणाऱ्या रामाच्या भार्येला हरण करण्याची इच्छा करणारा तूं प्रज्वलित अग्नि अवलोकन करितांक्षणीं त्याला वस्त्रांत बांधून आणण्याचेंच मनामध्यें आणीत आहेस ४३. ( फार कशाला, हे रावणा, ) रामाची अनुरूप भार्या प्राप्त करून घेण्याची इच्छा करणारा तूं खरोखर लोहाग्रयुक्त शूलांमध्येंच संचार करण्याची इच्छा करीत आहेस ४४. सिंह आणि कोल्हा ह्यांच्यांत जें अंतर वनामध्यें दिसून येतें अथवा ओढा आणि समुद्र ह्यांच्यामध्यें जें अंतर दृष्टोत्पत्तीस येतें किंवा अमृत आणि कांजी ह्यांच्यामध्यें जें अंतर अनुभवाला येतें तें अंतर दशरथपुत्र राम आणि तूं ह्यांच्यामध्यें असल्याचें निदर्शनाला येत आहे ४५. सुवर्ण आणि शिसें ह्या धातूंमध्यें, चंदनोदक आणि चिखल ह्यांमध्यें आणि हत्ती व मांजर ह्यांमध्यें जितकें अंतर आहे तितकें अंतर दशरथपुत्र आणि तूं ह्यांमध्यें आहे ४६. कावळा आणि गरुड किंवा पाणकोंबडा आणि मोर अथवा हंस आणि गिधाड ह्यांच्यांत जें अंतर वनामध्यें दृष्टोत्पत्तीस येतें तें अंतर दशरथपुत्र राम आणि तूं ह्यांच्यामध्यें निदर्शनास येत आहे ४७. तेव्हां हातामध्यें धनुष्यबाण घेऊन तो इंद्रतुल्य पराक्रमी राम ( भूतलावर ) असतांना जरी तूं मला घेऊन गेलास तरी माशीनें गिळलेल्या तुपाप्रमाणें मी तुला पचणार नाहीं. " ४८. ह्याप्रमाणें स्वभावानें

तां वेपमानामुपलक्ष्य सीतां स रावणो मृत्युसमप्रभावः । कुलं बलं नाम च कर्म चात्मनः समाचचक्षे भयकारणार्थम् ५०[१८३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥४७॥

एवं ब्रुवत्यां सीतायां संरब्धः परुषं वचः । ललाटे भ्रुकुटिं कृत्वा रावणः प्रत्युवाच ह १ भ्राता वैश्रवणस्याहं सापत्नो वरवर्णिनि । रावणो नाम भद्रं ते दशग्रीवः प्रतापवान् २ यस्य देवाः सगन्धर्वाः पिशाचपतगोरगाः । विद्रवन्ति सदा भीता मृत्योरिव सदा प्रजाः ३ येन वैश्रवणो भ्राता वैमात्रः कारणान्तरे । द्वन्द्वमासादितः क्रोधाद्रणे विक्रम्य निर्जितः ४ मद्भयार्तः परित्यज्यः स्वमधिष्ठानमृद्धिमत् । कैलासं पर्वतश्रेष्ठमध्यास्ते नरवाहनः ५ यस्य तत्पुष्पकं नाम विमानं कामगं शुभम् । वीर्यादावर्जितं भद्रे येन यामि विहायसम् ६ मम संजातरोषस्य मुखं दृष्ट्वैव मैथिलि । विद्रवन्ति परित्रस्ताः सुराः शक्रपुरोगमाः ७ यत्र तिष्ठाम्यहं तत्र मारुतो

---

सरळ असलेल्या सीतेनें त्या अत्यंत दुष्ट राक्षसाला सांगितल्यावर शरीराला कंप सुटून वाऱ्यानें लटलट हालूं लागलेल्या बारीक केळीप्रमाणें तिची अवस्था झाली ४९. नंतर कांपत असलेल्या त्या सीतेला अवलोकन करून तिला भीति घालण्याच्या उद्देशानें तो मृत्यूप्रमाणें पराक्रमी असलेला रावण आपलें कुल, बल, नांव आणि पराक्रम तिला सांगूं लागला ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४७ ॥

ह्याप्रमाणें सीता निंदा करूं लागली असतां रावण क्रुद्ध झाला आणि कपाळाला आंठ्या घालून तिला कठोर शब्दांनीं ह्मणाला १ " तुझें देव बरें करो, हे सुंदरि, प्रतापी आणि दशकंठ असा मी रावण ह्मणून कुबेराचा सापत्न भ्राता आहें २. गंधर्वांसहवर्तमान देव, पिशाच, पक्षी आणि उरग हे सर्वदां मृत्यूला भीत असलेल्या प्राण्याप्रमाणें मला नेहमीं भिऊन पळत सुटतात ३. एके वेळीं कांहीं कारण उपस्थित झाल्यामुळें मी आपल्या सापत्न भ्रात्याकुबेराची रणामध्यें क्रोधामुळें गांठ घेतली आणि पराक्रम करून त्याचा पराजय केला ४. तऱ्हां माझ्या भयानें व्याकुल झाल्यामुळें आपल्या समृद्ध स्थानाचा त्याग करून तो नरवाहन कुबेर तूर्त कैलासनामक श्रेष्ठ पर्वतावर वास्तव्य करीत आहे ५ आणि, हे कल्याणि हवें तिकडे गमन करणारें जें त्याचें पुष्पकनामक शुभ विमान तें मीं पराक्रमानें हिसकून घेतलें असून त्याच्याच योगानें मी आकाशामध्यें गमन करीत असतों ६. हे मिथिलराजकन्ये, मी क्रुद्ध झालों असतां माझी मुद्रा अवलोकन करितांक्षणींच इंद्रप्रभृति देव भयभीत होऊन पळत

वाति शङ्कितः । तीव्रांशुः शिशिरांशुश्च भयात्संपद्यते दिवि ८ निष्कम्पपत्रास्तरवो नद्यश्च स्तिमितोदकाः । भवन्ति यत्र तत्राहं तिष्ठामि च चरामि च ९ मम पारे समुद्रस्य लङ्का नाम पुरी शुभा । संपूर्णा राक्षसैर्घोरैर्यथेन्द्रस्यामरावती १० प्राकारेण परिक्षिप्ता पाण्डुरेण विराजिता । हेमकक्ष्या पुरी रम्या वैदूर्यमयतोरणा ११ हस्त्यश्वरथसंबाधा तूर्यनादविनादिता । सर्वकामफलैर्वृक्षैः संकुलोद्यानभूषिता १२ तत्र त्वं वस हे सीते राजपुत्रि मया सह । न स्मरिष्यसि नारीणां मानुषीणां मनस्विनि १३ भुञ्जाना मानुषान्भोगान्दिव्यांश्च वरवर्णिनि । न स्मरिष्यसि रामस्य मानुषस्य गतायुषः १४ स्थापयित्वा प्रियं पुत्रं राज्ये दशरथो नृपः । मन्दवीर्यस्ततो ज्येष्ठः सुतः प्रस्थापितो वनम् १५ तेन किं भ्रष्टराज्येन रामेण गतचेतसा । करिष्यसि विशालाक्षि तापसेन तपस्विना १६ रक्ष राक्षसभर्तारं कामय स्वयमागतम् । न मन्मथशराविष्टं प्रत्याख्यातुं त्वमर्हसि १७

---

सुटतात ७. जेथें मी रहातों तेथें वाराही भीतभीतच वहात असून सूर्यही माझ्या भीतीनें शीतल किरणांनीं युक्त होत असतो ८. इतकेंच नव्हे; परंतु, ज्या ठिकाणीं मी रहातों व हिंडतों त्या ठिकाणीं वृक्षांचीं पानेंही हलेनाशीं होऊन नद्यांचें उदकही हलेनासें होतें ९. इंद्राच्या अमरावतीप्रमाणें लंका ह्मणून समुद्राच्या पलीकडे माझी एक शुभ नगरी आहे आणि घोर राक्षसांनीं ती भरलेली आहे १०. श्वेतवर्ण प्राकार तिच्या भोंवतीं असून वैदूर्य रत्नें जडलेल्या तिला वेशी आहेत आणि त्या रम्य नगरीच्या सीमा सुवर्णाच्या असून ती झळकत आहे ११. गज, अश्व आणि रथ ह्यांनीं ती गजबजलेली असून वाद्यांच्या नादानें ती नादित झालेली आहे आणि कल्पवृक्षांनीं ती व्याप्त झालेली असून नागांच्या योगानें भूषित झालेली आहे १२. तेव्हां, हे राजकन्ये सीते, त्या ठिकाणीं तू माझ्याबरोबर रहा; ह्मणजे, हे विचारी स्त्रिये, तुला मानवी स्त्रियांचें स्मरण देखील होणार नाहीं १३ व त्याचप्रमाणें, हे सुंदरि, मनुष्य आणि देव ह्या उभयतांनाही योग्य असलेल्या भोग्य वस्तूंचा तूं उपभोग घेऊं लागलीस ह्मणजे मरणाच्या दारीं बसलेल्या मानव रामाचेंही तुला स्मरण होणार नाहीं १४. दशरथराजानें आपल्या प्रिय पुत्राची राज्यावर स्थापना केली असून ज्येष्ठ पुत्राचें सामर्थ्य कमी असल्यामुळें त्यानें त्याला वनामध्यें पाठविलें आहे १५. ह्याकरितां राज्यापासून भ्रष्ट व मनामध्यें अस्वस्थ अशा त्या बिचाऱ्या शौर्यहीन रामाशीं, हे विशालनयने, तुला आतां काय बरें कर्तव्य आहे ! १६. तस्मात् तूं संभाळ आणि स्वतः चालून आलेल्या राक्षसाधिपतीची इच्छा कर. मदनबाणांनीं विद्ध झालेल्या मला नाकारणें तुला योग्य नाहीं १७.

प्रत्याख्याय हि मां भीरु पश्चात्तापं गमिष्यसि । चरणेनाभिहत्येव पुरूरवसमुर्वशी १८ अङ्गुल्या न समो रामो मम युद्धे स मानुषः । तव भाग्येन संप्राप्तं भजस्व वरवर्णिनि १९ एवमुक्ता तु वैदेही क्रुद्धा संरक्तलोचना । अब्रवीत्परुषं वाक्यं रहिते राक्षसाधिपम् २० कथं वैश्रवणं देवं सर्वदेवनमस्कृतम् । भ्रातरं व्यपदिश्य त्वमशुभं कर्तुमिच्छसि २१ अवश्यं विनशिष्यन्ति सर्वे रावण राक्षसाः । येषां त्वं कर्कशो राजा दुर्बुद्धिरजितेन्द्रियः २२ अपहृत्य शचीं भार्यां शक्यमिन्द्रस्य जीवितुम् । न हि रामस्य भार्यां मामानीय स्वस्तिमान्भवेत् २३ जीवेच्चिरं वज्रधरस्य पश्चाच्छचीं प्रधृष्याप्रतिरूपरूपाम् । न मादृशीं राक्षस धर्षयित्वा पीतामृतस्यापि तवास्ति मोक्षः २४ [१८६०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

सीताया वचनं श्रुत्वा दशग्रीवः प्रतापवान् । हस्ते हस्तं समाहत्य चकार सुमहद्वपुः १ स मैथिलीं पुनर्वाक्यं बभाषे वाक्यकोविदः । नोन्मत्तया

---

कारण, हे भित्रे, पुरूरव्याला लाथ मारून उर्वशीला जसा पश्चात्ताप झाला तसा मला नाकारिल्यामुळें तुला पश्चात्ताप होईल १८. (बलासंबंधानें पाहूं गेलें असतां) तो मानव राम युद्धामध्यें माझ्या एका बोटाचीही बरोबरी करणार नाहीं. ह्याकरितां, हे सुंदरि, तुझ्या सुदैवानें जवळ आलेल्या माझा तूं अंगीकार कर" १९. ह्याप्रमाणें रावण बोलला असतां सीता क्रुद्ध होऊन तिचे डोळे लाल झाले आणि रामरहित आश्रमामध्यें असलेली ती सीता त्या राक्षसराजाशीं कठोर भाषण करूं लागली २०. सर्व देवांना पूज्य जो देव कुबेर तो भ्राता आहे असें सांगून तूं पाप करण्याचें कसें मनामध्यें आणीत आहेस ? २१. हे रावणा, कठोर, दुष्ट आणि विषयलंपट असा तूं ज्यांचा राजा आहेस त्या सर्व राक्षसांचा अवश्य नाश होईल" २२. अरे, कदाचित् इंद्राची भार्या शचीही हरण करून नेल्यावर हरण करणारा जिवंत रहाणें शक्य आहे; परंतु, मज रामभार्येला नेऊन स्वस्तिक्षेम रहाण्याचा संभव नाहीं २३. सारांश, हे राक्षसा, वज्रपाणि इंद्राची जी अनुपम सौंदर्यसंपन्न भार्या शची तिचा अपहार केल्यानंतरही कदाचित् पुष्कळ दिवसपर्यंत जिवंत रहाणें शक्य आहे; परंतु, बलात्कारानें मजसारिख्या रामभार्येला हरण करून नेल्यावर तूं जरी अमृतपान केलेंस तरी मृत्यूपासून तुझी सुटका होणार नाहीं २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४८॥

ह्याप्रमाणें सीतेचें भाषण श्रवण केल्यावर प्रतापी रावणानें हातावर हात चोळून

श्रुतौ मन्ये मम वीर्यपराक्रमौ २ उद्वहेयं भुजाभ्यां तु मेदिनीमम्बरे स्थितः। आपिबेयं समुद्रं च मृत्युं हन्यां रणे स्थितः ३ अर्कं तुद्यां शरैस्तीक्ष्णै-र्विभिन्द्यां हि महीतलम्। कामरूपेण उन्मत्ते पश्य मां कामरूपिणम् ४ एवमुक्तवतस्तस्य रावणस्य शिखिप्रभे। क्रुद्धस्य हरिपर्यन्ते रक्ते नेत्रे बभूवतुः ५ सद्यः सौम्यं परित्यज्य तीक्ष्णरूपं स रावणः। स्वं रूपं कालरूपाभं भेजे वैश्रवणानुजः ६ संरक्तनयनः श्रीमांस्तप्तकाञ्चनभूषणः। क्रोधेन महताविष्टो नीलजीमूतसंनिभः ७ दशास्यो विंशतिभुजो बभूव क्षणदाचरः। स परिव्राजकच्छद्म महाकायो विहाय तत् ८ प्रतिपेदे स्वकं रूपं रावणो राक्षसाधिपः। रक्ताम्बरधरस्तस्थौ स्त्रीरत्नं प्रेक्ष्य मैथिलीम् ९ स तामसितकेशान्तां भास्करस्य प्रभामिव। वसनाभरणोपेतां मैथिलीं रावणोऽब्रवीत् १० त्रिषु लोकेषु विख्यातं यदि भर्तारमिच्छसि। मामाश्रय वरारोहे तवाहं सदृशः पतिः ११ मां भजस्व चिराय त्वमहं श्लाघ्यः पतिस्तव। नैव

---

फारच मोठें शरीर धारण केलें १ आणि तो संभाषणज्ञ रावण पुनरपि सीतेला ह्मणाला " मला वाटतें तूं शुद्धीवर नसल्यामुळें माझें वीर्य व पराक्रम कधीं ऐकिलें नाहींस २. अंतरिक्षामध्यें राहून मी दोन हातांनीं पृथ्वी उचलून घेऊन जाईन, समुद्रही गट्ट करून टाकीन आणि रणामध्यें उभा राहिलों असतां मृत्यूचाही वध करीन ३. इतकेंच नव्हे; परंतु, तीक्ष्ण बाणांनीं सूर्यालाही दुःख देईन व भूतल भेदून टाकीन. विषयवासनेमुळें आणि स्वरूपामुळें तूं बेफाम झाली आहेस. ह्यास्तव, हे सीते, मनाप्रमाणें रूप धारण करणाऱ्या मजकडे तूं पहा " ४. ह्याप्रमाणें तो रावण क्रुद्ध होऊन बोलूं लागला असतां त्याचे नेत्र अग्नीप्रमाणें आरक्तवर्ण होऊन नेत्रप्रांतही हिरवे होऊन गेले ५. तात्पर्य, त्या रावणनामक कुबेराच्या कनिष्ठ भ्रात्यानें एकदम सौम्य रूपाचा त्याग करून मृत्यूच्या स्वरूपाप्रमाणें असलेलें आपलें स्वतःचें रूप धारण केलें ६ ह्मणजे प्रचंड क्रोधानें व्याप्त होऊन आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त झालेला तो वैभवशाली रावण राक्षस उत्कृष्ट सुवर्णभूषणें, नीलमेघतुल्य कांति ७, दहा मुखें आणि वीस हात ह्यांनीं युक्त झाला. सारांश, शरीरानें धिप्पाड असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणानें कपटमूलक यतिवेषाचा त्याग करून स्वतःचें रूप धारण केलें आणि आरक्त वस्त्रें परिधान केलेला तो रावण स्त्रियांमध्यें सर्वोत्कृष्ट असलेल्या सीतेकडे दृष्टि देऊन उभा राहिला ८, ९. अग्रांसुद्धा काळे कुळकुळित केंस, वस्त्रें व भूषणें ह्यांनीं युक्त असलेल्या व सूर्याच्या प्रभेप्रमाणें दिसणाऱ्या सीतेला तो रावण ह्मणाला १० " तुला भर्ता जर त्रैलोक्य-विख्यात पाहिजे असेल तर, हे सुंदरि, तूं माझें अवलंबन कर; मी तुला योग्य

नाहं कचिद्भद्रे करिष्ये तव विप्रियम् १२ त्यज्यतां मानुषो भावो मयि भावः प्रणीयताम् । राज्याच्च्युतमसिद्धार्थं रामं परिमितायुषम् १३ कैर्गुणैरनुरक्तासि मूढे पण्डितमानिनि । यः स्त्रियो वचनाद्राज्यं विहाय ससुहृज्जनम् १४ अस्मिन्व्यालानुचरिते वने॰ वसति दुर्मतिः । इत्युक्त्वा मैथिलीं वाक्यं प्रियार्हां प्रियवादिनीम् १५ अभिगम्य सुदुष्टात्मा राक्षसः काममोहितः । जग्राह रावणः सीतां बुधः खे रोहिणीमिव १६ वामेन सीतां पद्माक्षीं मूर्धजेषु करेण सः । ऊर्वोस्तु दक्षिणेनैव परिजग्राह पाणिना १७ तं दृष्ट्वा गिरिशृङ्गाभं तीक्ष्णदंष्ट्रं महाभुजम् । प्राद्रवन्मृत्युसंकाशं भयार्ता वनदेवताः १८ स च मायामयो दिव्यः खरयुक्तः खरस्वनः । प्रत्यदृश्यत हेमाङ्गो रावणस्य महारथः १९ ततस्तां परुषैर्वाक्यैरभितर्ज्य महास्वनः । अङ्कनादाय वैदेहीं रथमारोहयत्तदा २० सा गृहीतातिचुक्रोश रावणेन यशस्विनी । रामेति सीता दुःखार्ता रामं दूरं गतं वने २१

---

पति आहें ११. ह्याकरितां, तूं चिरकाल माझा स्वीकार कर; मीच तुला पति उत्कृष्ट आहें. शिवाय, हे कल्याणि, मी कधींही तुझ्या इच्छेविरुद्ध वागणार नाहीं १२. तस्मात् तूं आतां आपली मनुष्यविषयक प्रीति सोडून देऊन माझे ठिकाणीं प्रेम कर. हे मूढे, तूं आपल्याला शहाणी समजत आहेस; परंतु, राज्यापासून भ्रष्ट, अल्पायु आणि मनोरथभग्न झालेल्या रामाचे ठिकाणीं कोणत्या गुणामुळें तूं अनुरक्त आहेस ? तो दुर्बुद्धि राम स्त्रीच्या सांगण्यावरून सुहृज्जनांसहवर्तमान राज्याचा त्याग करून श्वापदांनीं वस्ती केलेल्या ह्या वनामध्यें रहात आहे." ह्याप्रमाणें दयेला पात्र असलेल्या आणि ( रावणावांचून सर्वांशीं ) प्रिय भाषण करीत असलेल्या सीतेच्या समीप १३,१४,१५ तो गेला आणि आकाशामध्यें ज्याप्रमाणें बुधानें विषयवासनेमुळें आपल्या रोहिणी मातेला धरावी त्याप्रमाणें त्या अत्यंत दुष्ट व मदांध झालेल्या रावण राक्षसानें सीतेला धरिली १६. सारांश, कमलनयन सीतेचे केश त्यानें डाव्या हातानें धरिले व उजवा हात मांड्यांखालीं घालून त्यानें तिला उचलली १७. तेव्हां प्रचंड बाहु आणि तीक्ष्ण दंष्ट्रा ह्यांनीं युक्त, स्वरूपानें मृत्युसमान आणि पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या रावणाला अवलोकन करितांक्षणीं वनदेवता भयभीत होऊन धांवूं लागल्या १८ व इतक्यांत कर्कश स्वर व सुवर्णाचें सामान ह्यांनीं युक्त असलेला आणि गर्दभ जोडिलेला तो रावणाचा मायामय दिव्य महारथही दृष्टीं पडूं लागला १९. तदनंतर मोठी गर्जना करणाऱ्या त्या रावणानें कठोर शब्दांनीं सीतेला धमकाविलें आणि हातांनीं उचलून धरून तिला रथावर ठेविलें २०. रावणानें सीतेला उचलतांक्षणीं

तामकामां स कामार्तः पन्नगेन्द्रवधूमिव । विचेष्टमानामादाय उत्पपाताथ रावणः २२ ततः सा राक्षसेन्द्रेण ह्रियमाणा विहायसा । भृशं चुक्रोश मत्तेव भ्रान्तचित्ता यथातुरा २३ हा लक्ष्मण महाबाहो गुरुचित्तप्रसादक । ह्रियमाणां न जानीषे रक्षसा कामरूपिणा २४ जीवितं सुखमर्थं च धर्महेतोः परित्यजन् । ह्रियमाणामधर्मेण मां राघव न पश्यसि २५ ननु नामाविनीतानां विनेतासि परंतप । कथमेवंविधं पापं न त्वं शाधि हि रावणम् २६ न तु सद्योऽविनीतस्य दृश्यते कर्मणः फलम् । कालोऽप्यङ्गीभवत्यत्र सस्यानामिव पक्तये २७ त्वं कर्म कृतवानेतत्कालोपहतचेतनः । जीवितान्तकरं घोरं रामाद्व्यसनमाप्नुहि २८ हन्तदानीं सकामा तु कैकेयी बान्धवैः सह । ह्रियेयं धर्मकामस्य धर्मपत्नी यशस्विनः २९ आमन्त्रये

---

ती यशस्वी सीता दुःखाकुल झाली आणि दूर गेलेल्या रामाच्या नांवानें राम राम ह्मणून फारच आक्रोश करूं लागली २१. तथापि तो विषयाधीन झालेला रावण अनुरागरहित आणि नागराजाच्या स्त्रीप्रमाणें सुटून जाण्याकरितां तडफड करीत असलेल्या सीतेला घेऊन सत्वर चालता झाला २२. ह्याप्रमाणें तो राक्षसाधिपति रावण आकाशमार्गानें तिला घेऊन चालला असतां शोकाकुल व बेशुद्ध झालेली स्त्री ज्याप्रमाणें मनामध्यें गोंधळून जाऊन शोक करूं लागते त्याप्रमाणें ती शोक करूं लागली २३. ( ती ह्मणाली ) " हे लक्ष्मणा, तूं महापराक्रमी असून वडिलांच्या मनाला आनंद देणारा आहेस; परंतु, असें असतांनाही इच्छेप्रमाणें रूप धारण करणारा हा राक्षस मला घेऊन जात आहे हें तुझ्या गांवींही नाहीं २४. हे राघवा, धर्माकरितां जीवितावर, सुखावर आणि संपत्तीवर तूं लाथ मारणारा असतांनाही मला हा रावण अधर्मानें घेऊन जात आहे इकडे तूं ढुंकूनही पहात नाहींस २५. हे शत्रुतापना, बेफामपणानें वागणाऱ्या लोकांना तूं तर ताळ्यावर आणणारा आहेस; परंतु अशा प्रकारच्या ह्या पापी रावणाला तूं शासन करीत नाहींस हें काय ? २६. बेफामपणानें केलेल्या कृत्याचें फल तात्काल दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. कारण, धान्यें परिपक्क होण्यास ज्याप्रमाणें कालाची अपेक्षा आहे त्याप्रमाणें कर्माचें फल प्राप्त होण्यास कालाची अपेक्षा आहे २७. ( हे रावणा, ) कालानें तुझी बुद्धि नाहींशी केल्यामुळें तूं हें कर्म केलें आहेस. ह्यास्तव, जीविताचा नाश करणारें असें घोर संकट रामापासून तुला प्राप्त होईल २८. हंः! आतां मात्र आपल्या बांधवांसहवर्तमान कैकेयीचे मनोरथ परिपूर्ण झाले खरे. कारण, धर्माचीच अपेक्षा धरणाऱ्या यशस्वी रामाच्या धर्मपत्नीला रावण घेऊन जात आहे २९. मी आतां जनस्थान आणि प्रफुल्लित

जनस्थानं कर्णिकारांश्च पुष्पितान् । क्षिप्रं रामाय शंसध्वं सीतां हरति रावणः ३० हंससारससंघुष्टां वन्दे गोदावरीं नदीम् । क्षिप्रं रामाय शंसध्वं सीतां हरति रावणः ३१ दैवतानि च यान्यस्मिन्वने विविधपादपे । नमस्करोम्यहं तेभ्यो भर्तुः शंसत मां हृताम् ३२ यानि कानिचिदप्यत्र सत्त्वानि विविधानि च । सर्वाणि शरणं यामि मृगपक्षिगणानि वै ३३ ह्रियमाणां प्रियां भर्तुः प्राणेभ्योऽपि गरीयसीम् । विवशा ते हृता सीता रावणेनेति शंसत ३४ विदित्वा तु महाबाहुरमुत्रापि महाबलः । आनेष्यति पराक्रम्य वैवस्वतहृतामपि ३५ सा तदा करुणावाचो विलपन्ती सुदुःखिता । वनस्पतिगतं गृध्रं ददर्शायतलोचना ३६ सा तमुद्वीक्ष्य सुश्रोणी रावणस्य वशंगता । समाक्रन्दद्भयपरा दुःखोपहितया गिरा ३७ जटायो पश्य मामार्य ह्रियमाणामनाथवत् । अनेन राक्षसेन्द्रेण करुणं पापकर्मणा ३८ नैष वारयितुं शक्यस्त्वया क्रूरो निशाचरः । सत्त्ववाञ्जितकाशी च सायु-

---

झालेल्या कर्णिकार वृक्षांचा निरोप घेते. ( हे वृक्षहो, ) रावण सीतेला हरण करून नेत आहे असें तुह्मी सत्वर रामाला सांगा ३०. हंस आणि सारसपक्षी ह्यांनीं नादित असलेल्या गोदावरी नदीला मी वंदन करितें. ( हे पक्षिगणहो, ) रावण सीतेला घेऊन जात आहे हें तुह्मी सत्वर रामाला कळवा ३१. नानाप्रकारच्या वृक्षांनीं युक्त असलेल्या ह्या वनामध्यें ज्या कांहीं देवता असतील त्यांना मी नमस्कार करीत आहें. करितां, ( अहो देवतांनों, ) मला नेली ह्मणून तुह्मी भर्त्याला विदित करा ३२. ह्या अरण्यामध्यें जे कांहीं नानाप्रकारचे प्राणी आणि मृगांचे व पक्ष्यांचे समुदाय असतील त्या सर्वांना मी शरण आलें आहें ३३. ह्यास्तव, ( हे अरण्यवासि प्राणिगणहो, ) निरुपाय झालेली तुझी सीता रावणानें हरण करून नेली ह्मणून तुह्मी—भर्त्याला प्राणांपेक्षांही अधिक आणि प्रिय अशा मला रावण हरण करून नेत असल्याचें वर्तमान—रामाला कळवा ३४. ह्मणजे यमानें जरी मला परलोकीं नेलें असलें तरी सुद्धां समजतांक्षणीं तो महापराक्रमी व महाबलाढ्य राम त्याला जिंकून मला परत आणील " ३५. ह्याप्रमाणें ती दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली व अत्यंत दुःखाकुल झालेली सीता करुण स्वरानें विलाप करूं लागली असतां वृक्षावर बसलेला जटायु तिनें पाहिला ३६. तेव्हां त्याला पहातांक्षणीं रावणाच्या तावडींत सांपडलेली व ह्मणूनच भयभीत झालेली ती सुंदरी सीता दुःखजन्य अश्रूंमुळें अस्पष्ट निघत असलेल्या शब्दांनीं त्याला ओरडून ह्मणाली ३७ " हे सज्जना जटायो, पहा; हा राक्षसाधिपति व पापकर्म करणारा रावण शोचनीय रीतीनें अनाथासारिखी मला ओढून

धर्मैव दुर्मतिः ३९ रामाय तु यथातत्त्वं जटायो हरणं मम । लक्ष्मणाय च तत्सर्वमाख्यातव्यमशेषतः ४० [१९००] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे एकोनपञ्चाशः सर्गः ॥ ४९ ॥

तं शब्दमवसुप्तस्तु जटायुरथ शुश्रुवे । निरैक्षद्रावणं क्षिप्रं वैदेहीं च ददर्श सः १ ततः पर्वतशृङ्गाभस्तीक्ष्णतुण्डः खगोत्तमः । वनस्पतिगतः श्रीमान्व्याजहार शुभां गिरम् २ दशग्रीव स्थितो धर्मे पुराणे सत्यसंश्रवः । भ्रातस्त्वं निन्दितं कर्म कर्तुं नार्हसि सांप्रतम् ३ जटायुर्नाम नाम्नाहं गृध्रराजो महाबलः । राजा सर्वस्य लोकस्य महेन्द्रवरुणोपमः ४ लोकानां च हिते युक्तो रामो दशरथात्मजः । तस्यैषा लोकनाथस्य धर्मपत्नी यशस्विनी ५ सीता नाम वरारोहा यां त्वं हर्तुमिहेच्छसि । कथं राजा स्थितो धर्मे परदारान्परामृशेत् ६ रक्षणीया विशेषेण राजदारा महाबल । निवर्तय गतिं नीचां परदाराभिमर्शनात् ७ न तत्समाचरेद्धीरो यत्परोस्य विगर्हयेत् । यथात्मनस्तथान्येषां दारा रक्ष्या विमर्शनात् ८ अर्थं वा यदि

---

नेत आहे ३८ व ह्या क्रूर राक्षसाचें निवारणही तुझ्यानें होणें शक्य नाहीं. कारण, हा दुर्बुद्धि बलाढ्य व सशस्त्र असून विजयी पुरुषाप्रमाणें दिसत आहे ३९. तस्मात्, हे जटायो, माझ्या नेण्यासंबंधानें सर्व कांहीं इत्थंभूत वर्तमान तूं पूर्णपणें रामाला व लक्ष्मणाला कथन कर " ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ४९ ॥

निद्रिस्थ असलेल्या जटायूच्या कानावर तो शब्द येतांक्षणींच जटायु पाहूं लागला तों लगेच रावण आणि सीता हीं त्याच्या दृष्टीं पडलीं १. तदनंतर पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड व तीक्ष्ण चंचूंनीं युक्त असा तो वृक्षावर असलेला वैभवशाली श्रेष्ठ पक्षी शुभ शब्दांनीं (रावणाला) ह्मणाला २ " हे दशानना, मी सनातन धर्माचें अवलंबन करीत असून आपली प्रतिज्ञा शेवटास नेणारा आहें. ह्याकरितां, बाबारे, सांप्रत, हें निंद्य कर्म करणें तुला योग्य नाहीं ३. मी जटायु ह्मणून महाबलाढ्य गृध्रराज आहें आणि इंद्रवरुणांप्रमाणें असलेला मी सर्व पृथ्वीचा राजा आहें ४. दशरथपुत्र राम लोकांच्या हिताविषयीं तत्पर आहे आणि त्या लोकनाथाची ही यशस्वी धर्मपत्नी आहे ५. ह्या सुरूप स्त्रीचें नांव सीता आहे व तूं तिला हरण करून नेण्याचें इच्छीत आहेस; परंतु, धर्माला अनुसरून वागणारा राजा परस्त्रीला कसा बरें स्पर्श करील? ६. हे महाबलाढ्य रावणा, राजस्त्रीचें तर विशेषेंकरून रक्षण केलें पाहिजे. तस्मात्, तूं आपली नीच मनोवृत्ति परस्त्रीस्पर्शापासून निवृत्त कर ७. दुसरा ज्याला नांव ठेवील

वा कामं शिष्टाः शास्त्रेष्वनागतम् । व्यवस्यन्त्यनुराजानं धर्मं पौलस्त्यनन्दन ९
राजा धर्मश्च कामश्च द्रव्याणां चोत्तमो निधिः । धर्मः शुभं वा पापं वा
राजमूलं प्रवर्तते १० पापस्वभावश्चपलः कथं त्वं रक्षसां वर । ऐश्वर्यम-
भिसंप्राप्तो विमानमिव दुष्कृती ११ कामस्वभावो यः सोऽसौ न शक्यस्तं
प्रमार्जितुम् । नहि दुष्टात्मनामार्यमावसत्यालये चिरम् १२ विषये वा पुरे
वा ते यदा रामो महाबलः । नापराध्यति धर्मात्मा कथं तस्यापराध्यसि १३
यदि शूर्पणखाहेतोर्जनस्थानगतः खरः । अतिवृत्तो हतः पूर्वं रामेणाक्लि-
ष्टकर्मणा १४ अत्र ब्रूहि यथातत्त्वं को रामस्य व्यतिक्रमः । यस्य त्वं
लोकनाथस्य हृत्वा भार्यां गमिष्यसि १५ क्षिप्रं विसृज वैदेहीं मा त्वा
घोरेण चक्षुषा । दहेद्दहनभूतेन वृत्रमिन्द्राशनिर्यथा १६ सर्पमाशीविषं
बद्ध्वा वस्त्रान्तेनावबुध्यसे । ग्रीवायां प्रतिमुक्तं च कालपाशं न पश्यसि १७
स भारः सौम्य भर्तव्यो यो नरं नावसादयेत् । तदन्नमपि भोक्तव्यं जीर्यते

---

तें कर्म विचारी पुरुषानें कधीं करूं नये. अरे, आपल्या स्त्रीप्रमाणेंच परस्त्रीचेंही परपुरुषाच्या स्पर्शापासून रक्षण केलें पाहिजे ८. हे पौलस्त्यनंदना, शास्त्रामध्यें ज्याचा नीट बोध होत नाहीं असा धर्म, अर्थ अथवा काम राजाचेंच आचरण पाहून शिष्ट लोक निश्चित करीत असतात ९. धर्म, काम आणि उत्तम वस्तूंचें उत्कृष्ट भांडार हें सर्व राजाच आहे. कारण, धर्म, पुण्य अथवा पातक हें सर्व राजमूलकच प्रवृत्त होत असतें १०. तस्मात्, हे राक्षसश्रेष्ठा, तूं स्वभावानें दुष्ट व चंचल असतांना पातकी पुरुषाला ज्याप्रमाणें विमान प्राप्त व्हावें त्याप्रमाणें तुला ऐश्वर्य कसें प्राप्त झालें आहे? ११. जो पुरुष स्वभावतःच पापी असतो तो आपला स्वभाव नाहींसा करण्यास समर्थ होत नाहीं. कारण, दुष्ट पुरुषांचे घरीं कितीही दिवस लोटले तरी पुण्यकर्म होण्याचा संभव नसतो १२. अरे, तुझ्या प्रदेशामध्यें अगर नगरामध्यें महाबलाढ्य व धर्मात्मा राम जरी तुझा कांहीं अपराध करीत नाहीं तर तूं कशाकरितां त्याचा अपराध करीत आहेस? १३. आतां शूर्पणखेकरितां जनस्थानामध्यें गेलेला खर पूर्वींच अयोग्य रीतीनें वागल्यामुळें जर सत्कर्मनिष्ठ रामानें त्याचा वध केला आहे १४ तर ज्या पृथ्वीपति रामाची भार्या हरण करून तूं जात आहेस त्या रामाचा ह्यांत काय बरें अपराध आहे हें तूं खरें सांग १५. सारांश, इंद्राच्या वज्रानें ज्याप्रमाणें वृत्रासुराला दग्ध करून टाकिलें त्याप्रमाणें अग्निरूप बनलेल्या घोर दृष्टीच्या योगानें रामानें तुला दहन न करावें एतदर्थ तूं सीतेला सत्वर सोडून दे १६. अरे, सीता हा एक विषयुक्त दंष्ट्रांनीं युक्त असलेला सर्पच पदरामध्यें बांधून तूं चालला आहेस हें तूं जाणीत नाहींस आणि गळ्यामध्यें पडलेला कालपाश

यदनामयम् १८ यत्कृत्वा न भवेद्धर्मो न कीर्तिर्न यशो ध्रुवम् । शरीरस्य भवेत्खेदः कस्तत्कर्म समाचरेत् १९ षष्टिर्वर्षसहस्राणि जातस्य मम रावण । पितृपैतामहं राज्यं यथावदनुतिष्ठतः २० वृद्धोऽहं त्वं युवा धन्वी सरथः कवची शरी । न चाप्यादाय कुशली वैदेहीं मे गमिष्यसि २१ न शक्तस्त्वं बलाद्धर्तुं वैदेहीं मम पश्यतः । हेतुभिर्न्यायसंयुक्तैर्ध्रुवां वेदश्रुतीमिव २२ युद्ध्यस्व यदि शूरोऽसि मुहूर्तं तिष्ठ रावण । शयिष्यसे हतो भूमौ यथा पूर्वं खरस्तथा २३ असकृत्संयुगे येन निहता दैत्यदानवाः । न चिराच्चीरवासास्त्वां रामो युधि वधिष्यति २४ किं नु शक्यं मया कर्तुं गतौ दूरं नृपात्मजौ । क्षिप्रं त्वं नश्यसे नीच तयोर्भीतो न संशयः २५ न हि मे जीवमानस्य नयिष्यसि शुभामिमाम् । सीतां कमलपत्राक्षीं रामस्य महिषीं प्रियाम् २६ अवश्यं तु मया कार्यं प्रियं तस्य महात्मनः । जीवि-

---

तूं अवलोकन करीत नाहींस १७. हे सौम्य रावणा, ज्याच्या खालीं चिरडून जाण्याची पाळी येणार नाहीं तो भार पुरुषानें उचलावा आणि अन्न तरी रोगोत्पत्ति न होतां जें जिरेल तेंच खावें १८. अरे, जें केलें असतां धर्म, कीर्ति आणि अक्षय्य यश ह्यांपैकीं कांहींच प्राप्त न होतां शरीराला क्लेश मात्र होण्याचा संभव असतो तें कर्म कोण बरें करील ? १९. हे रावणा, वाडवडिलांपासून चालत आलेलें पक्षिराज्य योग्य रीतीनें चालवितां चालवितां माझ्या जन्माला साठ हजार वर्षें होऊन गेलीं २०. तेव्हां मी वृद्ध असून तूं तरुण आहेस आणि धनुष्य, बाण, रथ व कवच ह्यांनीं तूं युक्त आहेस, तथापि माझ्या समक्ष सीतेला घेऊन तूं सुखरूप जाणार नाहींस २१. तात्पर्य, मीमांसकापुढें सनातन वेदश्रुतीला हेत्वाभासांच्या योगानें भलतीकडे नेण्यास ज्याप्रमाणें शास्त्री समर्थ होत नाहीं त्याचप्रमाणें माझ्या समक्ष सीतेला बलात्कारानें हरण करून नेण्यास तूं समर्थ नाहींस २२. तस्मात्, हे रावणा, शूर असशील तर एक क्षणभर थांब पहा आणि रामाशीं युद्ध कर; ह्मणजे पूर्वी ज्याप्रमाणें खर भूमीवर मरून पडला त्याप्रमाणें तूं भूमीवर मरून पडशील २३. अरे, संग्रामामध्यें ज्यानें अनेक वेळां दैत्यदानवांचा वध केला आहे तो वल्कलें परिधान करणारा राम लवकरच युद्धामध्यें तुझा वध करील २४. राजपुत्र रामलक्ष्मण तर दूर गेले आहेत. तेव्हां ह्या प्रसंगीं माझ्याच्यानें काय बरें होणार आहे ? परंतु, हे नीचा, त्यांना भिऊन तूं लवकरच पळून जाशील ह्यांत संशय नाहीं २५. कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ही रामाची प्रिय भार्या कल्याणी सीता मी जिवंत असतांना तुला नेतां येणार नाहीं २६. जीव जरी खर्ची पडला तरी त्या महात्म्या रामाला आणि त्याचप्रमाणें दशरथाला प्रिय होणारी

तेनापि रामस्य तथा दशरथस्य च २७ तिष्ठ तिष्ठ दशग्रीव मुहूर्तं पश्य रावण । वृन्तादिव फलं त्वां तु पातयेयं रथोत्तमात् २८ युद्धातिथ्यं प्रदास्यामि यथाप्राणं निशाचर २९ [१९२९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥ ५० ॥

इत्युक्तः क्रोधताम्राक्षस्तप्तकाञ्चनकुण्डलः । राक्षसेन्द्रोभिदुद्राव पतगेन्द्रममर्षणः १ स संप्रहारस्तुमुलस्तयोस्तस्मिन्महामृधे । बभूव वातोद्धुतयोर्मेघयोर्गगने यथा २ तद्बभूवाद्भुतं युद्धं गृध्रराक्षसयोस्तदा। सपक्षयोर्माल्यवतोर्महापर्वतयोरिव ३ ततो नालीकनाराचैस्तीक्ष्णाग्रैश्च विकर्णिभिः । अभ्यवर्षन्महाघोरैर्गृध्रराजं महाबलम् ४ स तानि शरजालानि गृध्रः पत्ररथेश्वरः । जटायुः प्रतिजग्राह रावणास्त्राणि संयुगे ५ तस्य तीक्ष्णनखाभ्यां तु चरणाभ्यां महाबलः । चकार बहुधा गात्रे व्रणान्पतगसत्तमः ६ अथ क्रोधाद्दशग्रीवो जग्राह दश मार्गणान् । मृत्युदण्डनिभान्घोराञ्छत्रोर्निधनकाङ्क्षया ७ स तैर्बाणैर्महावीर्यः पूर्णमुक्तैरजिह्मगैः ।

---

गोष्ट मला अवश्यच केली पाहिजे २७. ह्यास्तव, हे दशकंठा रावणा, थांब, थांब; एक क्षणभर धीर धर ह्मणजे देठापासून ज्याप्रमाणें फळ गळून पडतें त्याप्रमाणें मी तुला उत्कृष्ट रथापासून खालीं पाडितों २८ आणि, हे राक्षसा, मी युद्धरूप पाहुणचारानें तुझें यथाशक्ति स्वागत करितों २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥५०॥

ह्याप्रमाणें जटायु रावणाला बोलला असतां त्या राक्षसाधिपतीला तें सहन झालें नाहीं. तेव्हां उत्कृष्ट सुवर्णाचीं कुंडलें धारण केलेला तो रावण क्रोधानें डोळे लाल करून त्या पक्षिराजावर सत्वर चालून गेला १ व नंतर वायूनें प्रेरित झालेल्या मेघांचें ज्याप्रमाणें आकाशामध्यें परस्पराशीं युद्ध होतें त्याप्रमाणें त्या महासंग्रामामध्यें त्या उभयतांचें तुमुल युद्ध सुरू झालें २. पक्षांनीं युक्त असलेल्या दोन माल्यवान् महापर्वतांमध्यें ज्याप्रमाणें परस्पर युद्ध व्हावें त्याप्रमाणें गृध्र आणि राक्षस ह्यांमध्यें तें अद्भुत युद्ध सुरू झालें ३. युद्ध सुरू झाल्यावर नालीक, नाराच आणि तीक्ष्णाग्रांनीं युक्त असलेले महाभयंकर विकर्णीसंज्ञक बाण ह्यांचा रावणानें महाबलाढ्य गृध्रराजावर वर्षाव केला ४. व त्या पक्षिराज गृध्र जटायूनेंही युद्धामध्यें रावणानें सोडिलेल्या त्या बाणसमुदायांचा स्वीकार केला ५. इतकेंच नव्हे परंतु, त्या महाबलाढ्य श्रेष्ठ पक्षानें रावणाच्या शरीरावर तीक्ष्ण नखांनीं युक्त असलेल्या आपल्या पायांच्या योगानें अनेक व्रणांनीं जखमा केल्या ६. तेव्हां मृत्यूच्या दंडाप्रमाणें भयंकर असे दहा बाण शत्रूचा

विभेद निशितैस्तीक्ष्णैर्गृध्रं घोरैः शिलीमुखैः ८ स राक्षसरथे पश्यञ्जा-
नकीं बाष्पलोचनाम् । अचिन्तयित्वा बाणांस्तान्राक्षसं समभिद्रवत् ९
ततोस्य सशरं चापं मुक्तामणिविभूषितम् । चरणाभ्यां महातेजा बभञ्ज
पतगोत्तमः १० ततोन्यद्धनुरादाय रावणः क्रोधमूर्छितः । ववर्ष शर-
वर्षाणि शतशोथ सहस्रशः ११ शरैरावारितस्तस्य संयुगे पतगेश्वरः ।
कुलायमभिसंप्राप्तः पक्षिवच्च बभौ तदा १२ स तानि शरजालानि पक्षाभ्यां
तु विधूय ह । चरणाभ्यां महातेजा बभञ्जास्य महद्धनुः १३ तच्चाग्नि-
सदृशं दीप्तं रावणस्य शरावरम् । पक्षाभ्यां च महातेजा व्यधुनोत्पतगे-
श्वरः १४ काञ्चनोरश्छदान्दिव्यान्पिशाचवदनान्खरान् । तांश्चास्य जव-
संपन्नाञ्जघान समरे बली १५ अथ त्रिवेणुसंपन्नं कामगं पावकार्चि-
षम् । मणिसोपानचित्राङ्गं बभञ्ज च महारथम् १६ पूर्णचन्द्रप्रतीकाशं
छत्रं च व्यजनैः सह । पातयामास वेगेन ग्राहिभी राक्षसैः सह १७

---

वध करण्याच्या इच्छेनें रागारागानें रावणानें हातांत घेतले ७ आणि कानापर्यंत दोरी ताणून सोडिलेले, सरळ जाणारे, घासलेले, तीक्ष्ण आणि भयंकर अशा शिलीमुखसंज्ञक बाणांच्या योगानें त्या महावीर्यवान् रावणानें जटायूचें शरीर भेदून टाकिलें ८. तथापि, राक्षसाच्या रथावर अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या सीतेकडे त्याचें लक्ष्य गेल्यामुळें त्या बाणांची पर्वा न करितां तो त्या राक्षसाच्या अंगावर धांऊन गेला ९ आणि महा-तेजस्वी श्रेष्ठ पक्ष्यानें आपल्या पायांच्या योगानें त्याचें मोत्यें आणि रत्नें ह्यांनीं सजवि-लेलें धनुष्य बाणासहवर्तमान मोडून टाकिलें १०. तव्हां रावण क्रोधानें व्याप्त झाला आणि त्यानें दुसरें धनुष्य घेऊन शेंकडों हजारों बाणांचें वर्षाव जटायूवर केले ११ व त्यामुळें बाणांच्या योगानें युद्धामध्यें व्याप्त झालेला तो पक्षिराज घरट्यांत येऊन बसलेल्या पक्ष्याप्रमाणें दिसूं लागला १२. असो. त्या महातेजस्वी जटायूनें आपले पंख हाल-वून ते बाणसमुदाय टाकून दिले, पायांच्या योगानें त्याचें प्रचंड धनुष्य तोडिलें १३ आणि त्या महातेजस्वी पक्षिराजानें आपल्या पक्षांच्या योगानें रावणाचें तें अग्नीप्र-माणें उज्ज्वल असलेलें कवचही उडवून दिलें १४; इतकेंच नव्हे परंतु, पिशाच्यासा-रिख्या मुखांनीं आणि सुवर्णाच्या उरस्त्राणांनीं युक्त असलेलें त्या रावणाचें वेगवान् व दिव्य गर्दभही संग्रामामध्यें त्या बलाढ्य जटायूनें मारून टाकिले १५ आणि नंतर दांड्या, रत्नजडित पायऱ्या व चमत्कारिक सामान ह्यांनीं युक्त असून अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेला त्याचा महारथ त्यानें तोडून टाकिला १६; पूर्ण चंद्राप्रमाणें अस-लेलें छत्रही, चामरांसहवर्तमान आणि तें संभाळणाऱ्या राक्षसांसहवर्तमान, त्यानें वेगा-

सारथेश्चास्य वेगेन तुण्डेन च महच्छिरः । पुनर्व्यपहनच्छ्रीमान्पक्षिराजो
महाबलः १८ स भग्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः । अङ्केनादाय
वैदेहीं पपात भुवि रावणः १९ दृष्ट्वा निपतितं भूमौ रावणं भग्नवाह-
नम् । साधु साध्विति भूतानि गृध्रराजमपूजयन् २० परिश्रान्तं तु तं
दृष्ट्वा जरया पक्षियूथपम् । उत्पपात पुनर्हृष्टो मैथिलीं गृह्य रावणः २१
तं प्रहृष्टं निधायाङ्के रावणं जनकात्मजाम् । गच्छन्तं खड्गशेषं च प्रनष्टहत-
साधनम् २२ गृध्रराजः समुत्पत्य रावणं समभिद्रवत् । समावार्य महा-
तेजा जटायुरिदमब्रवीत् २३ वज्रसंस्पर्शबाणस्य भार्यां रामस्य रावण ।
अल्पबुद्धे हरस्येनां वधाय खलु रक्षसाम् २४ समित्रबन्धुः सामात्यः
सबलः सपरिच्छदः । विषपानं पिबस्येतत्पिपासित इवोदकम् २५
अनुबन्धमजानन्तः कर्मणामविचक्षणाः । शीघ्रमेव विनश्यन्ति यथा त्वं

---

वेगानें खालीं पाडिल १७ आणि त्या महाबलाढ्य श्रीमान् पक्षिराजानें त्याच्या सारथ्याचें प्रचंड मस्तकही चोचीच्या योगानें वेगावेगानें तोडून टाकिलें १८. तेव्हां ज्याचें धनुष्य भग्न झालें आहे, ज्याचा रथ नाहींसा झाला आहे आणि ज्याच्या अश्वांचा व सारथीचा वध झाला आहे असा तो रावण सीतेला घेऊन पृथ्वीवर पडला. त्यानें डाव्या हातांत सीतेचे केश धरून आणि उजवा हात कमरेखालीं घालून तिला उचलिली होती १९. असो. वाहनांचा वध होऊन रावण भूमीवर पडल्याचें अवलोकन करितांक्षणीं "शाबास शाबास" ह्मणून सर्व प्राणी गृध्रराज जटायूची प्रशंसा करूं लागले २०. तों इतक्यांत पक्ष्यांच्या कळपाचें रक्षण करणारा जटायु ह्मातारपणामुळें थकून गेला आहे असें अवलोकन करून रावण पुनरपि आनंदित झाला आणि सीतेला घेऊन आकाशमार्गानें प्रयाण करूं लागला २१. असो. इतर सर्व साधनें नाहींशीं होऊन फक्त खड्गच ज्याचे जवळ शिलक राहिला आहे असा तो आनंदित झालेला रावण जनककन्या सीतेला अंकावर बसवून जाऊं लागला असतां २२ तो महातेजस्वी गृध्रराज जटायु उड्डाण करून त्याचे अंगावर धांवला आणि त्याला अडवून धरून ह्मणाला २३ "हे मूढा रावणा, ज्याचे बाण, प्रहारासंबंधानें, वज्राची बरोबरी करणारे आहेत अशा रामाची ही भार्या तूं खरोखर राक्षसांच्या वधाकरितां हरण करून नेत आहेस २४. सारांश, तृषाक्रांत झालेला पुरुष ज्याप्रमाणें उदक प्राशन करूं लागतो त्याचप्रमाणें (मृत्यूनें ग्रस्त झालेला) तूं मित्र, बांधव, अमात्य, सैन्य आणि सेवक ह्यांसहवर्तमान हें विष प्राशन करीत आहेस २५. असो. जे मूढ पुरुष आपल्या कृत्यांच्या परिणामाकडे लक्ष्य देत नाहींत ते तुझ्याप्रमाणें सत्वरच नाश

विनशिष्यसि २६ बद्धस्त्वं कालपाशेन क्व गतस्तस्य मोक्ष्यसे । वधाय बडिशं गृह्य सामिषं जलजो यथा २७ नहि जातु दुराधर्षौ काकुत्स्थौ तव रावण । धर्षणं चाश्रमस्यास्य क्षमिष्येते तु राघवौ २८ यथा त्वया कृतं कर्म भीरुणा लोकगर्हितम् । तस्कराचरितो मार्गो नैष वीरनिषेवितः २९ युद्धस्व यदि शूरोसि मुहूर्तं तिष्ठ रावण । शयिष्यसि हतो भूमौ यथा भ्राता खरस्तथा ३० परेतकाले पुरुषो यत्कर्म प्रतिपद्यते । विनाशायात्मनोधर्म्यं प्रतिपन्नोसि कर्म तत् ३१ पापानुबन्धो वै यस्य कर्मणः को नु तत्पुमान् । कुर्वीत लोकाधिपतिः स्वयंभूर्भगवानपि ३२ एवमुक्त्वा शुभं वाक्यं जटायुस्तस्य रक्षसः । निपपात भृशं पृष्ठे दशग्रीवस्य वीर्यवान् ३३ तं गृहीत्वा नखैस्तीक्ष्णैर्विददार समन्ततः । अधिरूढो गजारोहो यथा स्याद्दुष्टवारणम् ३४ विददार नखैरस्य तुण्डं पृष्ठे समर्पयन् । केशांश्चोत्पाटयामास नखपक्षमुखायुधः ३५ स तदा गृध्रराजेन क्लिश्यमानो मुहु-

---

पावतात २६. अरे, आपल्या वधाकरितां आमिष लाविलेला गळ मुखामध्यें घेऊन ज्याप्रमाणें मत्स्य सुटून जाण्यास समर्थ होत नाहीं. त्याचप्रमाणें कालपाशानें बद्ध झालेला तूं कोठेंही गेलास तरी त्या रामाच्या तावडींतून कसा बरें सुटशील ? २७. हे रावणा, तूं जो ह्या आश्रमाचा अपमान केला आहेस तो ककुत्स्थकुलोत्पन्न रघुवंशज रामलक्ष्मणांना कधींही सहन होणार नाहीं २८. लोकांमध्यें निंद्य ठरणारें जें हें कृत्य तूं रामाला भिऊन केलें आहेस तो चोरांनीं स्वीकारिलेला मार्ग आहे; वीरांनीं अवलंबन केलेला हा मार्ग नव्हे २९. ह्याकरितां, हे रावणा, जर शूर असशील तर एक क्षणभर उभा राहून युद्ध कर; ह्मणजे आपल्या खरनामक भ्रात्याप्रमाणें वध पावून भूमीवर शयन करशील ३०. मृत्यूचा समय प्राप्त झाला असतां पुरुष ज्या कर्माचें अवलंबन करीत असतो त्या पातकावह कर्माचें अवलंबन आपल्या नाशाकरितां तूं केलें आहेस ३१. ज्याचा परिणाम चांगला नाहीं तें कर्म प्रत्यक्ष लोकाधिपति भगवान् ब्रह्मदेवही जरी झाला तरी कोणता बरें ( कल्याणेच्छु ) पुरुष करण्यास प्रवृत्त होईल " ? ३२. ह्याप्रमाणें शुभ भाषण करून तो वीर्यवान् जटायु त्या दशकंठ राक्षसाच्या मागें एकसारिखा धांवूं लागला ३३ आणि दुष्ट गजावर आरूढ झालेला महात ज्याप्रमाणें अंकुशाच्या योगानें गजाला जखमा करितो त्याचप्रमाणें तीक्ष्ण नखांच्या योगानें त्या रावणाला भरून त्याच्या शरीरावर सर्व ठिकाणीं तो जटायु जखमा करूं लागला ३४. नखें, पक्ष आणि मुख हींच ज्याचीं आयुधें आहेत अशा त्या जटायूनें रावणाच्या पाठीमध्यें चोंच भोसकून नखांनीं त्याला जखमी केलें आणि त्याचे केश उपटून टाकिले ३५.

मुहुः । अमर्षस्फुरितोष्ठः सन्प्राकम्पत च राक्षसः ३६ संपरिष्वज्य वैदेहीं वामेनाङ्केन रावणः । तलेनाभिजघानार्तो जटायुं क्रोधमूर्छितः ३७ जटायुस्तमतिक्रम्य तुण्डेनास्य खगाधिपः । वामबाहून्दश तदा व्यपाहरदरिन्दमः ३८ संछिन्नबाहोः सद्यो वै बाहवः सहसाभवन् । विषज्वालावलीमुक्ता वल्मीकादिव पन्नगाः ३९ ततः क्रोधाद्दशग्रीवः सीतामुत्सृज्य वीर्यवान् । मुष्टिभ्यां चरणाभ्यां च गृध्रराजमपोथयत् ४० ततो मुहूर्तं सङ्ग्रामो बभूवातलवीर्ययोः । राक्षसानां च मुख्यस्य पक्षिणां प्रवरस्य च ४१ तस्य व्यायच्छमानस्य रामस्यार्थे स रावणः । पक्षौ पादौ च पार्श्वौ च खड्गमुद्धृत्य सोऽच्छिनत् ४२ स च्छिन्नपक्षः सहसा रक्षसा रौद्रकर्मणा । निपपात महागृध्रो धरण्यामल्पजीवितः ४३ तं दृष्ट्वा पतितं भूमौ क्षतजार्द्रं जटायुषम् । अभ्यधावत वैदेही स्वबन्धुमिव दुःखिता ४४ तं नीलजीमूतनिकाशकल्पं सपाण्डुरोरस्कमुदारवीर्यम् । ददर्श लङ्काधिपतिः पृथिव्यां जटायुषं शान्तमिवाग्निदावम् ४५ ततस्तु तं पत्त्ररथं मही-

ह्याप्रमाणें गृध्रराज जटायु वारंवार क्लेश देऊं लागला असतां क्रोधामुळें ओठ फुरफुरूं लागलेला तो रावणराक्षस थरथर कांपूं लागला ३६ व क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या दुःखित रावणानें डाव्या मांडीवर सीतेला घेऊन जटायूला एक चपराक मारिली ३७. तथापि, ती सहन करून शत्रूंचें दमन करणाऱ्या पक्षिराज जटायूनें आपल्या चोंचीच्या योगानें त्याचे दहाही डावे हात तोडून टाकिले ३८; परंतु, ह्याप्रमाणें जरी त्याचे हात तुटले गेले तरी विषयुक्त ज्वालासमुदाय ज्यांच्या मुखांतून निघत आहेत असे सर्प ज्याप्रमाणें वारुळांतून बाहेर निघतात त्याचप्रमाणें त्या रावणाच्या बाहुरंध्रांतून एकाएकीं बाहु निघाले ३९. तेव्हां, वीर्यवान् दशकंठ रावण सीतेला सोडून देऊन रागारागानें त्या गृध्रराज जटायूला लाथाबुक्या मारूं लागला असतां ४० ज्यांच्या सामर्थ्याला तुलना नाहीं अशा राक्षसश्रेष्ठ रावणामध्यें आणि पक्षिश्रेष्ठ जटायूमध्यें एक मुहूर्तभर युद्ध झालें ४१ व त्या युद्धांत रामाकरितां धडपडत असलेल्या जटायूचे पंख, दोन्ही बाजवा व पाय त्या रावणानें तरवार उपसून तोडून टाकिले ४२. ह्याप्रमाणें क्रूरकर्मी राक्षसानें पंख तोडून टाकिल्यामुळें तो धिप्पाड गृध्रपक्षी जटायु कंठीं प्राण येऊन एकाएकीं भूमीवर पडला ४३. तेव्हां तो जटायु पृथ्वीवर पडला आहे व त्याचें शरीर रक्तानें भरलें आहे असें अवलोकन करितांक्षणीं ती दुःखित झालेली सीता त्याच्याकडे धांवली ४४. व नील मेघाप्रमाणें आकृति, श्वेत वक्षस्थल आणि प्रचंड सामर्थ्य ह्यांनीं युक्त असलेला तो जटायु लंकाधिपति रावणाला शांत झालेल्या अग्नीप्रमाणें पृथ्वीवर दिसूं

तले निपातितं रावणवेगमर्दितम् । पुनश्च संगृह्य शशिप्रभानना रुरोद सीता जनकात्मजा तदा ४६ [१९७५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्ड एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

सा तु ताराधिपमुखी रावणेन निरीक्ष्य तम् । गृध्रराजं विनिहतं विललाप सुदुःखिता १ निमित्तं लक्षणं स्वप्नं शकुनिस्वरदर्शनम् । अवश्यं सुखदुःखेषु नराणां परिदृश्यते २ न नूनं राम जानासि महद्व्यसनमात्मनः। धावन्ति नूनं काकुत्स्थ मदर्थं मृगपक्षिणः ३ अयं हि कृपया राम मां त्रातुमिह संगतः। शेते विनिहतो भूमौ ममाभाग्याद्विहंगमः ४ त्राहि मामद्य काकुत्स्थ लक्ष्मणेति वराङ्गना। सुसंत्रस्ता समाक्रन्दच्छृण्वतां तु यथान्तिके ५ तां क्लिष्टमाल्याभरणां विलपन्तीमनाथवत् । अभ्यधावत वैदेहीं रावणो राक्षसाधिपः ६ तां लतामिव वेष्टन्तीमालिङ्गन्तीं महाद्रुमान् । मुञ्च मुञ्चेति बहुशः प्राप तां राक्षसाधिपः ७ क्रोशन्तीं रामरामेति रामेण रहितां

---

लागला ४५ आणि इकडे चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती जनककन्या सीता रावणाच्या सामर्थ्यानें जर्जर होऊन भूतलावर पडलेल्या त्या पक्ष्याला पुनः कवटाळून रडूं लागली ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५१॥

चंद्रतुल्य मुखानें युक्त असलेली ती सीता रावणानें मारिलेल्या गृध्रराज जटायुला अवलोकन करून अत्यंत दुःखित झाली आणि (आपल्याशीं) विलाप करूं लागली १. ( ती ह्मणाली ) " सुखाचे अथवा दुःखाचे प्रसंग यावयाचे असल्यास स्वप्न अथवा पक्ष्यांचा स्वर असें कांहींतरी सूचक चिन्ह मनुष्यांच्या दृष्टोत्पत्तीस अवश्य येत असतें २; परंतु, हे रामा, माझ्याकरितां ( ह्मणजे रावणानें माझा अपहार केला आहे हें सुचविण्याकरितां ) पशुपक्षी जरी धांवाधांव करीत आहेत तरी खरोखर स्वतःवर आलेलें मोठें संकट तूं जाणीत नाहींस ३. हे रामा, हा पक्षी माझें रक्षण करण्याकरितां कृपा करून येथें आला; परंतु, माझ्या दुर्दैवामुळें हा भूमीवर मरून पडला आहे ४. तस्मात्, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हे लक्ष्मणा, आज तुह्मी माझें रक्षण करा. " ह्याप्रमाणें ती उत्कृष्ट स्त्री सीता अतिशय त्रस्त होऊन व रामलक्ष्मण समीप ऐकत बसले आहेत असें समजून ( हळूं हळूं ) विलाप करूं लागली ५. जिनें धारण केलेलीं पुष्पें व भूषणें अस्ताव्यस्त झालीं आहेत अशी ती सीता अनाथाप्रमाणें विलाप करूं लागली असतां राक्षसाधिपति रावण तिच्या अंगावर धांवून गेला ६ आणि लतेप्रमाणें मोठमोठ्या वृक्षांना आलिंगन देऊन ती सीता वेळ्या घालूं लागली असतां " सोड सोड " असें वारंवार

वने । जीवितान्ताय केशेषु जग्राहान्तकसंनिभः ८ प्रधर्षितायां वैदेह्यां बभूव सचराचरम् । जगत्सर्वममर्यादं तमसान्धेन संवृतम् ९ न वाति मारुतस्तत्र निष्प्रभोभूद्दिवाकरः । दृष्ट्वा सीतां परामृष्टां देवो दिव्येन चक्षुषा १० कृतं कार्यमिति श्रीमान्व्याजहार पितामहः । प्रहृष्टा व्यथितावासन्सर्वे ते परमर्षयः ११ दृष्ट्वा सीतां परामृष्टां दण्डकारण्यवासिनः । रावणस्य विनाशं च प्राप्तं बुद्ध्वायदृच्छया १२ स तु तां रामरामेति रुदतीं लक्ष्मणेति च । जगामादाय चाकाशं रावणो राक्षसेश्वरः १३ तप्ताभरणवर्णाङ्गी पीतकौशेयवासिनी । रराज राजपुत्री तु विद्युत्सौदामनी यथा १४ उद्धूतेन च वस्त्रेण तस्याः पीतेन रावणः । अधिकं परिबभ्राज गिरिर्दीप्त इवाग्निना १५ तस्याः परमकल्याण्यास्ताम्राणि सुरभीणि च । पद्मपत्राणि वैदेह्या अभ्यकीर्यन्त रावणम् १६ तस्याः कौश-

---

ह्मणत तो राक्षसाधिपति रावण तिचे समीप आला ७ आणि रामाचा वियोग झाल्यामुळें " राम राम " ह्मणून वनामध्यें आक्रोश करीत असलेल्या सीतेचे केश दिसण्यांत मृत्यूसारिख्या असलेल्या राक्षसानें आपल्या जीविताच्या नाशाकरितां धरिले ८. असो. ह्याप्रमाणें रावणानें सीतेला बलात्कारानें धरिलें असतां चराचर प्राण्यांसहवर्तमान सर्व जगत् अमर्याद होऊन निबिड अंधकारानें व्याप्त झालें ९. तेथें वारा वाहेनासा झाला आणि सूर्यही निस्तेज झाला. इकडे वैभवशाली भगवान् ब्रह्मदेव सीतेला रावणानें धरिल्याचें अवलोकन केल्याबरोबर " आपलें कार्य झालें " असें ह्मणाले आणि तेथें असलेले सर्व महर्षि आनंदित व दुःखित झाले कारण, सीतेचें संकट पाहून ते दुःख करूं लागले आणि ( परिवारासहवर्तमान ) रावणाचा नाश होण्याचा प्रसंग आला आहे असें आढळून आल्यामुळें त्यांना हर्ष होऊं लागला १०, ११. ( कारण, सीतेला रावणानें धरिलें असें पाहून त्या दंडकारण्यनिवासी महर्षींना दुःख झालें आणि अनायासें रावणाचा नाश होण्याचा समय आला आहे असें आढळून आल्यामुळें त्यांना हर्ष झाला ) १२. असो. " रामा ! रामा ! लक्ष्मणा ! " ह्मणून ती सीता रडत असतांना तिला घेऊन राक्षसाधिपति रावण आकाशमार्गानें चालता झाला १३; शरीराची कांति उज्ज्वल सुवर्णभूषणाप्रमाणें असल्यामुळें आणि स्वतः पिंवळी पैठणी नेसलेली असल्यामुळें ती राजकन्या मेघांतील विद्युल्लतेप्रमाणें दिसूं लागली १४ आणि तिचें पीतवस्त्र वाऱ्यानें उडूं लागलें असतां रावणही अग्नीच्या योगानें प्रदीप्त झालेल्या पर्वताप्रमाणें अधिकच शोभूं लागला १५. त्या परम कल्याणी सीतेचे शरीरावरील आरक्तवर्ण व सुगंधी अशीं कमलांचीं पानें रावणाचे अंगावर पडलीं १६; सोन्याप्रमाणें

यमुद्धूतमाकाशे कनकप्रभम् । बभौ चादित्यरागेण ताम्रमभ्रमिवातपे १७
तस्यास्तद्विमलं वक्त्रमाकाशे रावणाङ्कगम् । न रराज विना रामं विनालमिव पङ्कजम् १८ बभूव जलदं नीलं भित्त्वा चन्द्र इवोदितः । सुललाटं सुकेशान्तं पद्मगर्भाभमव्रणम् १९ शुक्लैः सुविमलैर्दन्तैः प्रभावद्भिरलंकृतम् । तस्याः सुनयनं वक्त्रमाकाशे रावणाङ्कगम् २० रुदितं व्यपमृष्टास्रं चन्द्रवत्प्रियदर्शनम् । सुनासं चारुताम्रोष्ठमाकाशे हाटकप्रभम् २१
राक्षसेन्द्रसमाधूनं तस्यास्तद्वदनं शुभम् । शुशुभे न विना रामं दिवा चन्द्र इवोदितः २२ सा हेमवर्णा नीलाङ्गं मैथिली राक्षसाधिपम् । शुशुभे काञ्चनी काञ्ची नीलं गजमिवाश्रिता २३ सा पद्मपीता हेमाभा रावणं जनकात्मजा । विद्युद्धनमिवाविश्य शुशुभे तप्तभूषणा २४ तस्या भूषणघोषेण वैदेह्या राक्षसेश्वरः । अभूत्सचपलो नीलः सघोष इव

झळकत असलेलें तिचें वस्त्र आकाशामध्यें उडूं लागलें असतां तें संध्यासमयीं सूर्याच्या प्रभेनें युक्त झालेल्या ताम्रवर्ण अभ्राप्रमाणें दिसूं लागलें १७; रावणाच्या अंकावर असलेलें तिचें निर्मल मुख रामाच्या वियोगामुळें आकाशामध्यें देंठ नसलेल्या कमलाप्रमाणें फारसें शोभलें नाहीं १८. उत्कृष्ट कपाळ, मनोहर केश व कमलाच्या गाभ्यासारिखी कांति ह्यांनीं युक्त असून व्रणरहित असलेलें तिचें मुख नीलमेघाचा भेद करून त्यामध्यें उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें दिसूं लागलें १९. शुभ्रवर्ण, अत्यंत निर्मल व सतेज अशा दंतांच्या योगानें भूषित आणि उत्कृष्ट नेत्रांनीं युक्त असलेलें तिचें मुखकमल रावणाच्या अंकावर असल्यामुळें आकाशामध्यें शोभेनासें झालें २०. तिचें मुख जरी चंद्राप्रमाणें दृष्टीला आल्हादकारक होतें आणि सुवर्णासारिखी कांति, सुंदर नासिका आणि मनोहर व ताम्रवर्ण ओष्ठ ह्यांनीं जरी तें युक्त होतें तरी रडकें व अश्रु पुसलेलें असल्यामुळें आकाशामध्यें शोभत नव्हतें २१. सारांश, दिवसा उदय पावलेला चंद्र ज्याप्रमाणें शोभत नाहीं त्याप्रमाणें राक्षसाधिपति रावणामुळें जर्जर करून टाकिलेलें तिचें शुभ मुख रामाचा वियोग झाला असल्यामुळें शोभेनासें झालें २२. सुवर्णासारिख्या कांतीनें युक्त असलेली ती सीता नीलवर्ण राक्षसाधिपतीच्या आश्रयाला असल्यामुळें नीलगजाच्या आश्रयाला असलेल्या सुवर्णाच्या साखळदंडाप्रमाणें दिसूं लागली २३. कमलाच्या केसराप्रमाणें जिच्या देहाचा वर्ण आहे, सुवर्णाप्रमाणें जिची कांति आहे आणि उज्ज्वल सुवर्णभूषणें जिनें धारण केलेलीं आहेत अशी ती जनककन्या सीता रावणाच्या आश्रयाला असल्यामुळें मेघामध्यें प्रविष्ट झालेल्या विद्युल्लतेप्रमाणें दिसूं लागली २४. सीतेनें धारण केलेल्या भूषणांच्या ध्वनीनें

तोयदः २५ उत्तमाङ्गच्युता तस्याः पुष्पवृष्टिः समन्ततः । सीताया ह्रियमाणायाः पपात धरणीतले २६ सा तु रावणवेगेन पुष्पवृष्टिः समन्ततः । समाधूता दशग्रीवं पुनरेवाभ्यवर्तत २७ अभ्यवर्तत पुष्पाणां धारा वैश्रवणानुजम् । नक्षत्रमाला विमला मेरुं नगमिवोत्तमम् २८ चरणान्नूपुरं भ्रष्टं वैदेह्या रत्नभूषितम् । विद्युन्मण्डलसंकाशं पपात धरणीतले २९ तरुप्रवालरक्ता सा नीलाङ्गं राक्षसेश्वरम् । प्रशोभयत वैदेही गजं कक्ष्येव काञ्चनी ३० तां महोल्कामिवाकाशे दीप्यमानां स्वतेजसा । जहाराकाशमाविश्य सीतां वैश्रवणानुजः ३१ तस्यास्तान्यग्निवर्णानि भूषणानि महीतले । सघोषाण्यवशीर्यन्त क्षीणास्तारा इवाम्बरात् ३२ तस्याः स्तनान्तराद्भ्रष्टो हारस्ताराधिपद्युतिः । वैदेह्या निपतन्भाति गङ्गेव गगनच्युता ३३ उत्पातवाताभिहता नानाद्विजगणायुताः । मा भैरिति

राक्षसाधिपति रावण विद्युल्लतेनें युक्त असून गर्जना करणाऱ्या नीलमेघाप्रमाणें दिसूं लागला २५. असो. सीतेला रावण घेऊन जाऊं लागला असतां तिच्या मस्तकामध्यें असलेल्या पुष्पांचा वर्षाव भूतलावर चोहोंकडे झाला २६ आणि रावणाच्या वेगा (मुळें उत्पन्न झालेल्या वायू ) नें ती पुष्पवृष्टि जरी जिकडे तिकडे उडवून दिली जात होती तरी ती ( एकसारखी होत असल्यामुळें ) पुनरपि रावणाच्या सभोंवतींच येत होती २७. सारांश, निर्मळ नक्षत्रमाळा ज्याप्रमाणें श्रेष्ठ मेरुपर्वताचेभोंवतीं फिरत असते त्याप्रमाणें ती पुष्पवृष्टि रावणासभोंवतीं फिरत होती २८. जातां जातां विद्युन्मंडलाप्रमाणें तेजस्वी असलेली रत्नजडित तोरडी सीतेच्या पायापासून सुटून भूतलावर पडली २९. ( रावण घेऊन जाऊं लागल्यामुळें अतिशयच क्रुद्ध आणि ह्मणूनच ) वृक्षावरील नूतन पल्लवाप्रमाणें आरक्तवर्ण झालेली ती सीता सुवर्णाची झूल ज्याप्रमाणें हत्तीला शोभा देऊं लागते त्याप्रमाणें त्या नीलवर्ण शरीरानें युक्त असलेल्या राक्षसाधिपति रावणाला शोभा देऊं लागली ३०. मोठ्या ज्वालेप्रमाणें आकाशामध्यें आपल्या तेजानें देदीप्यमान होत असलेल्या त्या सीतेला तो कुबेराचा कनिष्ठ भ्राता रावण आकाशमार्गाचें अवलंबन करून घेऊन जाऊं लागला असतां ३१ तिच्या शरीरावर असलेली अग्नीसारखी उज्ज्वल व नादयुक्त भूषणें पुण्य क्षीण झाल्यामुळें आकाशांतून गळून पडणाऱ्या तारारूप पुण्यवान् लोकांप्रमाणें गळून पडलीं ३२ आणि त्या सीतेच्या वक्षस्थलापासून सुटलेला चंद्रसमान तेजस्वी हार खालीं पडूं लागला असतां आकाशांतून च्युत झालेली गंगाच कीं काय असा भासूं लागला ३३. नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त असलेल्या वृक्षांचीं अग्रें उत्पातवायूंचे तडाके बसल्यामुळें हलूं लागलीं असतां ते वृक्ष सीतेला

विधूताग्रा व्याजह्रुरिव पादपाः ३४ नलिन्यो ध्वस्तकमलास्त्रस्तमीनजले-
चराः । सखीमिव गतोत्साहां शोचन्तीव स्म मैथिलीम् ३५ समन्ताद-
भिसंपत्य सिंहव्याघ्रमृगद्विजाः । अन्वधावंस्तदा रोषात्सीताच्छायानु-
गामिनः ३६ जलप्रपातास्रमुखाः शृङ्गैरुच्छ्रितबाहुभिः । सीतायां ह्रिय-
माणायां विक्रोशन्तीव पर्वताः ३७ ह्रियमाणां तु वैदेहीं दृष्ट्वा दीनो
दिवाकरः । प्रविध्वस्तप्रभः श्रीमानासीत्पाण्डुरमण्डलः ३८ नास्ति धर्मः
कुतः सत्यं नार्जवं नानृशंसता । यत्र रामस्य वैदेहीं सीतां हरति
रावणः ३९ इति भूतानि सर्वाणि गणशः पर्यदेवयन् । वित्रस्तका दीन-
मुखा रुरुदुर्मृगपोतकाः ४० उद्वीक्ष्योद्वीक्ष्य नयनैर्भयादिव विलक्षणैः ।
सुप्रवेपितगात्राश्च बभूवुर्वनदेवताः ४१ विक्रोशन्तीं दृढं सीतां दृष्ट्वा दुःखं
तथागताम् । तां तु लक्ष्मण रामेति क्रोशन्तीं मधुरस्वराम् ॥ अवेक्ष-
माणां बहुशो वैदेहीं धरणीतलम् ४२ स तामाकुलकेशान्तां विप्रमृष्ट-

---

" भिऊं नको " ह्मणूनच सांगत आहेत कीं काय असे भासूं लागले ३४. रावणाच्या त्रासामुळें आंतील कमलांचा नाश होऊन मत्स्यप्रभृति जलचर प्राणी भयभीत होऊन गेले असतां सरोवरें, निरुत्साह झालेल्या आपल्या प्रिय सखी सीतेकरितां, शोकच करीत आहेत कीं काय अशीं दिसूं लागलीं ३५. रावणविषयक क्रोधामुळें सिंह, व्याघ्र, मृग आणि पक्षी चोहोंकडून जमा होऊन सीतेच्या छायेचे मागोमाग धांवूं लागले ३६. जलप्रपातरूप अश्रूंच्या ज्यांच्या मुखावरून धारा चालल्या आहेत असे शृंगयुक्त असलेले पर्वत सीतेला रावण घेऊन जाऊं लागला असतां आपले बाहु वर करून आक्रोश करीत आहेत असे दिसूं लागले ३७. सीतेला रावण नेत आहे असें अवलोकन करितांक्षणीं सूर्य दीन झाल्या-मुळें निस्तेज दिसूं लागला आणि कांतिमान् असूनही तेजोहीन अशा पांडुरवर्ण मंड-ळानें तो युक्त झाला ३८ "अहो! ज्याअर्थी रावण विदेहराजकन्या सीतेला हरण करून नेत आहे त्याअर्थी धर्म, सरळपणा आणि दया हीं राहिलींच नाहींत; मग सत्याची गोष्ट पाहिजे कशाला ! " ३९ ह्मणून सर्व प्राणी ज्ञातींचा एकत्र संघ जुळवून शोक करूं लागले आणि त्रस्त होऊन गेलेले मृगबालकही दीन वदन करून रुदन करूं लागले ४०. मधुर स्वरानें युक्त असलेली सीता तशाप्रकारें दुःखांत पडली असून " हे लक्ष्मणा, हे रामा, " असा अतिशय शोक करीत आहे आणि वारंवार भूत-ळाकडे पहात आहे असें दृष्टोत्पत्तीस आल्याकारणानें भयामुळें विलक्षण झालेल्या नेत्रांनीं वारंवार वर पाहून वनदेवतांच्या शरीराला फारच कंप सुटला ४१,४२. जिचे केशाग्र अस्ताव्यस्त झाले असून तिलक पुसून गेलेला आहे अशी ती बिचारी सीता

विशेषकाम् । जहारात्मविनाशाय दशग्रीवो मनस्विनीम् ४३ ततस्तु सा चारुदती शुचिस्मिता विनाकृता बन्धुजनेन मैथिली । अपश्यती राघव-लक्ष्मणावुभौ विवर्णवक्त्रा भयभारपीडिता ४४ [२०१९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

खमुत्पतन्तं तं दृष्ट्वा मैथिली जनकात्मजा । दुःखिता परमोद्विग्ना भये महति वर्तिनी १ रोषरोदनताम्राक्षी भीमाक्षं राक्षसाधिपम् । रुदती करुणं सीता ह्रियमाणा तमब्रवीत् २ न व्यपत्रपसे नीच कर्मणानेन रावण । ज्ञात्वा विरहितां यो मां चोरयित्वा पलायसे ३ त्वयैव नूनं दुष्टात्मन्भीरुणा हर्तुमिच्छता । ममापवाहितो भर्ता मृगरूपेण मायया ४ यो हि मामुद्यतस्त्रातुं सोऽप्ययं विनिपातितः । गृध्रराजः पुराणोऽसौ श्वशुरस्य सखा मम ५ परमं खलु ते वीर्यं दृश्यते राक्षसाधम । विश्राव्य नामधेयं हि युद्धेनास्मि जिता त्वया ६ ईदृशं गर्हितं कर्म कथं कृत्वा न

---

आपल्या नाशाकरितां रावणानें हरण करून नेली ४३. तेव्हां मनोहर दंत व पवित्र हास्य ह्यांनीं युक्त असलेली ती मिथिलराजकन्या सीता स्वजनांचा वियोग झाल्यामुळें भयाच्या भाराखालीं खचून गेल्यासारिखी झाली आणि उभयतांही रामलक्ष्मण कोठेंही तिला दिसेनासे झाल्यामुळें तिचें मुखही निस्तेज झालें ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५२ ॥

त्या रावणाला आकाशमार्गानें चाललेला अवलोकन करून मोठ्या संकटांत सांपडलेली जनककन्या सीता अत्यंत उद्विग्न व दुःखित झाली १ आणि तो घेऊन जाऊं लागला असतां क्रोधामुळें आणि रोदनामुळें जिचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशी ती सीता भयंकर नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसाधिपतिरावणाला दीन वाणीनें ह्मणाली २ " हे नीचा रावणा, मी एकटी आहें असें समजून आल्यामुळें तूं माझा अपहार करून जात आहेस ह्या कर्माची, हे नीचा रावणा, तुला लाज कशी वाटत नाहीं? ३. अरे दुष्टा, रामलक्ष्मणांची भीति वाटत असल्यामुळें तूंच माझा अपहार करण्याची इच्छा धरून कपटानें मृगरूप धारण केलेंस आणि माझ्या भर्त्याला येथून दूर नेलेंस ४ इतकेंच नव्हे; परंतु, माझ्या श्वशुराचा मित्र वृद्ध गृध्रराज माझें रक्षण करण्याकरितां उद्युक्त झाला असतांना त्याचाही तूं वध केलास ५. हे राक्षसाधमा, आपलें नांव महशूर करून युद्धामध्यें तूं मला जिंकिलेंस हें खरोखर तुझें मोठेंच सामर्थ्य माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहे ! ६. हुः! हे नीचा, स्त्रीचा अपहार आणि त्यांतूनही

लज्जसे । स्त्रियाश्चाहरणं नीच रहिते च परस्य च ७ कथयिष्यन्ति लोकेषु पुरुषाः कर्म कुत्सितम् । सुनृशंसमधर्मिष्ठं तव शौटीर्यमानिनः ८ धिक्ते शौर्यं च सत्त्वं च यत्त्वया कथितं तदा । कुलाक्रोशकरं लोके धिक्ते चारित्रमीदृशम् ९ किं शक्यं कर्तुमेवं हि यज्जवेनैव धावसि । मुहूर्तमपि तिष्ठ त्वं न जीवन्प्रतियास्यसि १० न हि चक्षुःपथं प्राप्य तयोः पार्थिवपुत्रयोः । ससैन्योपि समर्थस्त्वं मुहूर्तमपि जीवितुम् ११ न त्वं तयोः शरस्पर्शं सोढुं शक्तः कथंचन । वने प्रज्वलितस्येव स्पर्शमग्नेर्विहङ्गमः १२ साधु कृत्वात्मनः पथ्यं साधु मां मुञ्च रावण १३ मत्प्रधर्षणसंक्रुद्धो भ्रात्रा सह पतिर्मम । विधास्यति विनाशाय त्वं मां यदि न मुञ्चसि १४ येन त्वं व्यवसायेन बलान्मां हर्तुमिच्छसि । व्यवसायस्तु ते नीच भविष्यति निरर्थकः १५ न ह्यहं तमपश्यन्ती भर्तारं विबुधोपमम् । उत्सहे शत्रुवशगा प्राणान्धारयितुं चिरम् १६ न नूनं चात्मनः श्रेयः

---

एकांत स्थलामध्यें परस्त्रीचा अपहार अशा प्रकारचें हें निंद्य कर्म करून तुला लाज कशी वाटत नाहीं? ७ अरे, स्वतःला शूर समजत असलेल्या तुझें हें निंद्य कर्म अत्यंत निर्दयपणाचें व अतिशय पातकमय आहे ह्मणून लोक जगतांमध्यें सांगतील ८. त्यावेळीं ( माझा अपहार करण्याचे पूर्वी ) तूं ज्या आपल्या शौर्याची व सामर्थ्याची माझ्यापाशीं प्रशंसा केलीस त्या तुझ्या शौर्याला आणि सामर्थ्याला धिक्कार असो आणि कुलाला कलंक लावणाऱ्या ह्या अशाप्रकारच्या तुझ्यावर्तनालाही धिक्कार असो ९. अरे, ज्याअर्थी तूं अगदीं वेगावेगानेंच धांवत चालला आहेस त्याअर्थी अशा स्थितींत तुझा काय प्रतीकार करणें शक्य आहे? परंतु, तूं जर शूर असशील तर एक क्षणभर तरी धीर धर ह्मणजे तूं जिवंत परत जाणार नाहींस १०. अरे, त्या राजकुमारांच्या दृष्टीचे टप्यांत आल्यावर तूं सैन्यासहवर्तमान जरी असलास तरी एकक्षणभरही जिवंत रहाण्यास समर्थ होणार नाहींस ११. ( फार कशाला ! ) वनामध्यें प्रज्वलित झालेल्या अग्नीचा स्पर्श ज्याप्रमाणें पक्षी सहन करण्यास समर्थ नसतो त्याचप्रमाणें त्यांच्या बाणांचा स्पर्श करण्यास तूं कोणत्याही प्रकारें समर्थ नाहींस १२. ह्यास्तव, हे रावणा, आपल्या कल्याणाकडे लक्ष्य देऊन तूं बऱ्या विचारानें मला सोडून दे १३. कारण, तूं जर मला न सोडशील तर बलात्कारानें माझा अपहार झाल्यामुळें भ्रात्यासहवर्तवर्तमान क्रुद्ध झालेला माझा पति तुझ्या नाशाची तजवीज करील १४. हे नीचा, ज्या उद्देशानें तूं माझा बलात्कारानें अपहार करण्याची इच्छा करीत आहेस तो तुझा उद्देश व्यर्थ होईल १५. कारण, तो देवतुल्य भर्ता माझ्या दृष्टीआड असतांना शत्रूचे

पथ्यं वा समवेक्षसे । मृत्युकाले यथा मर्त्यो विपरीतानि सेवते १७
मुमूर्षूणां तु सर्वेषां यत्पथ्यं तन्न रोचते । पश्यामीह हि कण्ठे त्वां काल-
पाशावपाशितम् १८ यथा चास्मिन्भयस्थाने न बिभेषि निशाचर ।
व्यक्तं हिरण्मयांस्त्वं हि संपश्यसि महीरुहान् १९ नदीं वैतरणीं घोरां
रुधिरौघविवाहिनीम् । खड्गपत्रवनं चैव भीमं पश्यसि रावण २० तप्त-
काञ्चनपुष्पां च वैदूर्यप्रवरच्छदाम् । द्रक्ष्यसे शाल्मलीं तीक्ष्णामायसैः
कण्टकैश्चिताम् २१ न हि त्वमीदृशं कृत्वा तस्यालीकं महात्मनः ।
धारितुं शक्ष्यसि चिरं विषं पीत्वेव निर्घृण २२ बद्धस्त्वं कालपाशेन
दुर्निवारेण रावण । क्व गतो लप्स्यसे शर्म मम भर्तुर्महात्मनः २३ निमे-
षान्तरमात्रेण विना भ्रातरमाहवे । राक्षसा निहता येन सहस्राणि चतु-
र्दश २४ कथं स राघवो वीरः सर्वास्त्रकुशलो बली । न त्वां हन्याच्छ-

---

आधीन झालेल्या मला फारवेळपर्यंत प्राणधारण करून रहाण्याची इच्छा नाहीं १६. स्वतःला कोणती गोष्ट तात्काल अथवा परिणामीं सुखावह होणारी आहे ह्याचा विचार तूं मुळींच करीत नाहींस. मृत्यु समीप आला असतां ज्याप्रमाणें मर्त्य जन विपरीत कृत्यांचें अवलंबन करूं लागतो त्याप्रमाणें तूं करीत आहेस १७. मरण जवळ आलेल्या सर्वांनाच जें हितकर असेल तें रुचत नाहीं. तेव्हां ( ज्याअर्थी तूं असें हें निंद्य कर्म करीत आहेस त्याअर्थी ) कालपाशाचा वेढा तुझ्या गळ्याभोंवतीं घट्ट बसला आहे असें मला वाटतें १८. हे राक्षसा, भय बाळगण्यासारिखें हें कृत्य असतांनाही ज्याअर्थी तूं भीत नाहींस त्याअर्थी ( मृत्युसूचक ) सुवर्णमय वृक्ष तूं ( स्वप्नामध्यें ) अवलोकन करीत असल्याचें स्पष्ट होत आहे १९. हे रावणा, रक्ताचे लोट वाहून नेणारी अशी घोर वैतरणी नदी आणि खड्गरूप पानांनीं युक्त असलेलें भयंकर वन तूं अवलोकन करीत आहेस २०. लोखंडी काट्यांनीं भरलेला, उज्ज्वल सुवर्ण-पुष्पांनीं आणि उत्कृष्टवैडूर्यरत्नरूप पानांनीं युक्त असलेला शाल्मलि संज्ञक तीक्ष्ण वृक्ष तूं अवलोकन करूं लागशील २१. हे निर्दया, विष प्राशन केल्यावर ज्याप्रमाणें फार वेळ जीव धरून रहातां येणें शक्य नाहीं त्याचप्रमाणें त्या महात्म्या रामाचा अशा प्रकारचा अपराध करून तुला फार वेळ जिवंत रहातां येणार नाहीं २२. हे रावणा, तूं खरोखर निवारण होण्यास अशक्य अशा कालपाशानें बद्ध झाला आहेस. माझ्या भर्त्याचा अपराध केल्यावर तूं कोठें जरी गेलास तरी तुला सुख कोठून प्राप्त होणार आहे ? २३. अरे, फक्त एका निमिषांतच भ्रात्याच्या मदतीवांचून युद्धामध्यें ज्यानें चवदा हजार राक्षसांचा वध केला २४ तो सर्व अस्त्रांमध्यें निपुण व बलाढ्य असलेला

रैस्तीक्ष्णैरिष्टभार्यापहारिणम् २५ एतच्चान्यच्च परुषं वैदेही रावणाङ्कगा। भयशोकसमाविष्टा करुणं विललाप ह २६ तदा भृशार्तां बहु चैव भाषिणीं विलापपूर्वं करुणं च भामिनीम्। जहार पापस्तरुणीं विचेष्टतीं नृपात्मजामागतगात्रवेपथुः २७ [ २०४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥ ५३ ॥

ह्रियमाणा तु वैदेही कंचिन्नाथमपश्यती। ददर्श गिरिशृङ्गस्थान्पञ्च वानरपुङ्गवान् १ तेषां मध्ये विशालाक्षी कौशेयं कनकप्रभम्। उत्तरीयं वरारोहा शुभान्याभरणानि च २ मुमोच यदि रामाय शंसेयुरिति भामिनी। वस्त्रमुत्सृज्य तन्मध्ये निक्षिप्तं सहभूषणम्। संभ्रमात्तु दशग्रीवस्तत्कर्म च न बुद्धवान् ३ पिङ्गाक्षास्तां विशालाक्षीं नेत्रैरनिमिषैरिव। विक्रोशन्तीं तदा सीतां ददृशुर्वानरोत्तमाः ४ स च पम्पामतिक्रम्य लङ्कामभिमुखः पुरीम्। जगाम मैथिलीं गृह्य रुदतीं राक्षसेश्वरः ५ तां जहार

---

रघुवंशज वीर राम प्रियभार्येचा अपहार करणाऱ्या तुझा तीक्ष्ण बाणांनीं कसा बरें वध करणार नाहीं ? " २५ असो. रावणाच्या तावडींत सांपडलेली सीता भय आणि शोक ह्यांनीं व्याकुल होऊन करुणस्वरानें ह्या व अशाच प्रकारच्या कठोर शब्दांनीं विलाप करूं लागली २६. तथापि अत्यंत दुःखित झालेली ती राजकन्या तरुणी सीता ह्याप्रमाणें करुणस्वरानें विलापपूर्वक एकसारखी बोलत असतांनाही आणि सुटून जाण्याकरितां तडफड करीत असतांनाही शरीराचा थरकांप झालेला तो रावण तिला घेऊन गेला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक, आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

सीतेला रावण घेऊन चालला असतां कोणीही त्राता जेव्हां तिच्या दृष्टीं पडेना तेव्हां एका पर्वतशिखरावर बसलेले पांच श्रेष्ठ वानर तिनें अवलोकन केले १ व जातां जातां वानरांमध्यें त्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या सुंदरी सीतेनें सुवर्णाप्रमाणें झळकत असलेला शेला आणि शुभ्र भूषणें २, हे ( वानर ) तरी रामाला बातमी कळवितील ह्मणून टाकून दिलीं. परंतु, शरीरावरून वस्त्र काढून सीतेनें भूषणांसहवर्तमान त्या वानरांमध्यें टाकून दिलें हें कृत्य लगबगीमुळें रावणाला समजलें नाहीं ३. ज्यांच्या नेत्रांचा वर्ण पिंगट आहे असे ते श्रेष्ठ वानर त्या आक्रोश करीत असलेल्या विशालनयना सीतेकडे डोळ्यांचें पातेंही न लववितां टक लाऊन पाहूं लागले ४ व तो राक्षसाधिपति रावण रोदन करीत असलेल्या सीतेला घेऊन पंपासरोवर ओलांडिल्यावर लंकानगरीकडे तोंड करून चालला ५.

सुसंहृष्टो रावणो मृत्युमात्मनः । उत्सङ्गेनेव भुजगीं तीक्ष्णदंष्ट्रां महाविषाम् ६ वनानि सरितः शैलान्सरांसि च विहायसा । स क्षिप्रं समतीयाय शरश्चापादिव च्युतः ७ तिमिनक्रनिकेतं तु वरुणालयमक्षयम् । सरितां शरणं गत्वा समतीयाय सागरम् ८ संभ्रमात्परिवृत्तोर्मी रुद्धमीनमहोरगः । वैदेह्यां ह्रियमाणायां बभूव वरुणालयः ९ अन्तरिक्षगता वाचः ससृजुश्चारणास्तथा । एतदन्तो दशग्रीव इति सिद्धास्तदाब्रुवन् १० स तु सीतां विचेष्टन्तीमङ्कनादाय रावणः । प्रविवेश पुरीं लङ्कां रूपिणीं मृत्युमात्मनः ११ सोभिगम्य पुरीं लङ्कां सुविभक्तमहापथाम् । संरूढकक्ष्यां बहुलां स्वमन्तःपुरमाविशत् १२ तत्र तामसितापाङ्गीं शोकमोहसमन्विताम् । निदधे रावणः सीतां मयो मायामिवासुरीम् १३ अब्रवीच्च दशग्रीवः पिशाचीर्घोरदर्शनाः । यथा नैनां पुमान्स्त्री वा सीतां पश्यत्यसंमतः १४ मुक्तामणिसुवर्णानि वस्त्राण्याभरणानि च । यद्यदिच्छेत्तदेवास्या

---

तीक्ष्ण दंष्ट्रा आणि जलाल विष ह्यांनीं युक्त असलेल्या नागिणीला कडेवर घेऊन जाणाऱ्या पुरुषाप्रमाणें रावण आपल्या मृत्युरूप सीतेला अतिशय आनंदित होऊन घेऊन गेला ६. धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें तो रावण सत्वरच वनें, नद्या, पर्वत आणि सरोवरें आकाशमार्गानें ओलांडून चालता झाला ७. तिमिनामक मत्स्य आणि नक्र ह्यांचें वसतिस्थान, वरुणाचें अक्षय्य निवासस्थान आणि नद्यांचें आश्रयस्थान असा सागर ओलांडून तो रावण चालता झाला ८; परंतु, सीतेला घेऊन तो जाऊं लागला असतां समुद्र गोंधळून गेल्यामुळें त्यांत पूर्वीप्रमाणें लाटा होईनाशा झाल्या आणि आंत असलेले मत्स्य व महोरगही स्तिमित झाले ९. अंतरिक्षामध्यें असलेले चारण आपआपल्यांत बोलूं लागले आणि " ह्या कृत्यामुळें रावणाचा अंत होणार " असें सिद्धही ह्मणूं लागले " १०. असो. सुटून जाण्याकरितां तडफड करीत असलेल्या त्या सीतेला ह्मणजे अर्थात् आपल्या मूर्तिमंत मृत्यूला कडेवर घेऊन रावण लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला ११ आणि मोठमोठे रुंद मार्ग व पुष्कळ लोकांची जेथें गर्दी झाली आहे अशा वेशी ह्यांनीं युक्त असलेल्या लंकानामक विशाल नगरीमध्यें गेल्यावर रावण आपल्या अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला १२. नंतर कृष्णवर्ण नेत्रप्रांतांनीं युक्त असून शोक व मोह ह्यांनीं युक्त झालेली ती सीता रावणानें राक्षसी माया ठेवणाऱ्या मयासुराप्रमाणें तेथें ठेविली १३ आणि दिसण्यांतही भयंकर अशा ज्या राक्षसी तेथें होत्या त्यांना तो ह्मणाला " माझ्या आज्ञेवांचून ती सीता कोणत्याही पुरुषाच्या अथवा स्त्रीच्याही दृष्टीस पडणार नाहीं अशा रीतीनें तुह्मी हिचें रक्षण करा १४.

देयं मच्छन्दतो यथा १५ या च वक्ष्यति वैदेहीं वचनं किंचिदप्रियम् । अज्ञानाद्यदि वा ज्ञानान्न तस्या जीवितं प्रियम् १६ तथोक्त्वा राक्षसीस्तास्तु राक्षसेन्द्रः प्रतापवान् । निष्क्रम्यान्तःपुरात्तस्मात्किं कृत्यमिति चिन्तयन् १७ ददर्शाष्टौ महावीर्यान्राक्षसान्पिशिताशनान् १८ स तान्दृष्ट्वा महावीर्यो वरदानेन मोहितः । उवाच तानिदं वाक्यं प्रशस्य बलवीर्यतः १९ नानाप्रहरणाः क्षिप्रमितो गच्छत सत्वराः । जनस्थानं हतस्थानं भूतं पूर्वं खरालयम् २० तत्रास्यतां जनस्थाने शून्ये निहतराक्षसे । पौरुषं बलमाश्रित्य त्रासमुत्सृज्य दूरतः २१ बहुसैन्यं महावीर्यं जनस्थाने निवेशितम् । सदूषणखरं युद्धे निहतं रामसायकैः २२ ततः क्रोधो ममापूर्वो धैर्यस्योपरि वर्धते । वैरं च सुमहज्जातं रामं प्रति सुदारुणम् २३ निर्यातयितुमिच्छामि तच्च वैरं महारिपोः । न हि लप्स्याम्यहं निद्रामहत्वा संयुगे रिपुम् २४ तं त्विदानीमहं हत्वा खरदूषणघातिनम् । रामं शर्मोपल-

---

मोत्यें, रत्नें आणि सुवर्ण ह्यांचीं भूषणें व वस्त्रें ह्यांपैकीं ज्याची ज्याची सीतेला इच्छा होईल तें तें तुह्मी त्याच वेळेला तिला देत जा, अशी माझी तुह्मांला आज्ञा आहे १५. समजून उमजून अथवा चुकून जी कोणी सीतेशीं अप्रिय भाषण करील तिला आपलें जीवित प्रिय नाहीं असें समजावें" १६. ह्याप्रमाणें तो राक्षसाधिपति प्रतापी रावण त्या राक्षसींना सांगून त्या अंतःपुरांतून बाहेर पडला आणि "आतां काय करावें" ह्मणून चिंतन करूं लागला तों मोठे बलाढ्य व मांसभक्षक असे आठ राक्षस त्यानें अवलोकन केले १७,१८ आणि ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें मोहित झालेला तो महावीर्यवान् रावण त्यांना अवलोकन केल्यावर बल व वीर्य ह्यांसंबंधानें त्यांची प्रशंसा करून त्यांना असें ह्मणाला १९ " नाना प्रकारचीं आयुधें घेऊन तुह्मी सत्वर येथून जनस्थानाकडे जा. कारण, तें जनस्थान पूर्वीं खरांचें निवासस्थान असूनही सांप्रत रामानें निर्जन करून टाकिलें आहे २०. तुह्मी शरीरबलाचें अवलंबन करून भीति दूर सोडून द्या आणि राक्षसांचा वध झाल्यामुळें शून्य झालेल्या जनस्थानांत जाऊन रहा २१. अहो, जनस्थानामध्यें महापराक्रमी असें पुष्कळच सैन्य ठेविलेलें होतें; तथापि दूषण आणि खर ह्यांसहवर्तमान तें सैन्य रामबाणांच्या योगानें युद्धांमध्यें वध पावलें २२. त्या दिवसापासून धैर्यापेक्षांही माझे ठिकाणीं एकसारिखा अपूर्व क्रोध वृद्धिंगत होत आहे आणि रामासंबंधानें फारच भयंकर असें अति प्रचंड वैर माझ्या मनामध्यें उत्पन्न झालें आहे २३. त्या प्रबल शत्रूसंबंधानें मनामध्यें असलेल्या त्या वैराचा शेवट करण्याची माझी इच्छा आहे आणि ह्यामुळें युद्धामध्यें शत्रूचा वध केल्यावांचून मला निद्रा येणें शक्य नाहीं २४.

प्स्यामि धनं लब्ध्वेव निर्धनः २५ जनस्थाने वसद्भिस्तु भवद्भी राममाश्रिता । प्रवृत्तिरुपनेतव्या किं करोतीति तत्त्वतः २६ अप्रमादाच्च गन्तव्यं सर्वैरेव निशाचरैः । कर्तव्यश्च सदा यत्नो राघवस्य वधं प्रति २७ युष्माकं तु बलं ज्ञातं बहुशो रणमूर्धनि । अतश्चास्मिञ्जनस्थाने मया यूयं निवेशिताः २८ ततः प्रिय वाक्यमुपेत्य राक्षसा महार्थमष्टावभिवाद्य रावणम् । विहाय लङ्कां सहिताः प्रतस्थिरे यतो जनस्थानमलक्ष्यदर्शनाः २९ ततस्तु सीतामुपलभ्य रावणः सुसंप्रहृष्टः परिगृह्य मैथिलीम् । प्रसज्य रामेण च वैरमुत्तमं बभूव मोहान्मुदितः स रावणः ३० [२०७६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुःपञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

संदिश्य राक्षसान्घोरान्रावणोऽष्टौ महाबलान् । आत्मानं बुद्धिवैक्लव्यात्कृतकृत्यममन्यत १ स चिन्तयानो वैदेहीं कामबाणैः प्रपीडितः । प्रविवेश गृहं रम्यं सीतां द्रष्टुमभित्वरन् २ स प्रविश्य तु तद्वेश्म रावणो राक्ष-

---

तस्मात्, धनप्राप्ति झाली असतां निर्धनाला ज्याप्रमाणें सुख होतें त्याप्रमाणें खर आणि दूषण ह्यांचा घात करणाऱ्या रामाचा आतां वध केल्यावर मला सुख होईल २५. तेव्हां राम काय करीत आहे अशाप्रकारची त्याच्यासंबंधानें असलेली खरीखरी बातमी जनस्थानांमध्यें राहून तुह्मी माझ्याकडे पाठवीत जा २६. सर्वही राक्षसांनीं गाफील न होतां तिकडे जावें आणि रघुवंशज रामाच्या वधाविषयीं नेहमीं यत्न करावा २७. अरे, संग्रामामध्यें पुष्कळवेळां तुमचें बल माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें आहे आणि ह्मणूनच ह्या जनस्थानांत मीं तुमची योजना केली आहे " २८. नंतर ह्याप्रमाणें गंभीर अर्थानें युक्त असलेल्या त्या प्रिय भाषणाला आठही राक्षसांनीं मान दिला आणि रावणाला अभिवंदन करून व लंका सोडून कोणाच्या दृष्टीं न पडतां एकत्र जुळून ते जनस्थानाकडे चालते झाले २९. असो. सीता हातीं आल्यावर तिला घरांत नेऊन ठविल्यामुळें रावणाला अतिशय हर्ष झाला आणि ह्यामुळें रामाशीं जरी त्या रावणानें अनिर्वचनीय वैर संपादन केलें होतें तरी मोहामुळें तो त्यांत आनंदच मानूं लागला ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

ह्याप्रमाणें त्या आठ महाबलाढ्य घोर राक्षसांना आज्ञा केल्यावर रावण बुद्धिभ्रंशामुळें स्वतःला कृतकृत्य मानूं लागला १ आणि कामबाणांनीं व्याकुल झाल्यामुळें सीतेचें चिंतन करीत करीत तो तिला अवलोकन करण्याकरितां त्वरेनें त्या रम्य गृहामध्यें गेला २ आणि त्या गृहांत प्रविष्ट झाल्यावर त्या राक्षसाधिपति रावणानें त्या

साधिपः । अपश्यद्राक्षसीमध्ये सीतां दुःखपरायणाम् ३ अश्रुपूर्णमुखीं दीनां शोकभारावपीडिताम् । वायुवेगैरिवाक्रान्तां मज्जन्तीं नावमर्णवे ४ मृगयूथपरिभ्रष्टां मृगीं श्वभिरिवावृताम् । अधोगतमुखीं सीतां तामभ्येत्य निशाचरः ५ तां तु शोकवशाद्दीनामवशां राक्षसाधिपः । स बलाद्दर्शयामास गृहं देवगृहोपमम् ६ हर्म्यप्रासादसंबाधं स्त्रीसहस्रनिषेवितम् । नानापक्षिगणैर्जुष्टं नानारत्नसमन्वितम् ७ दान्तकैस्तापनीयैश्च स्फाटिकै राजतैस्तथा । वज्रवैदूर्यचित्रैश्च स्तम्भैर्दृष्टिमनोरमैः ८ दिव्यदुन्दुभिनिर्घोषं तप्तकाञ्चनभूषणम् । सोपानं काञ्चनं चित्रमारुरोह तया सह ९ दान्तका राजताश्चैव गवाक्षाः प्रियदर्शनाः । हेमजालावृताश्चासंस्तत्र प्रासादपङ्क्तयः १० सुधामणिविचित्राणि भूमिभागानि सर्वशः । दशग्रीवः स्वभवने प्रादर्शयत मैथिलीम् ११ दीर्घिकाः पुष्करिण्यश्च नानापुष्पस-

---

राक्षसींमध्यें असलेली सीता अवलोकन केली. त्यावेळीं ती केवळ दुःखाचाच आश्रय करून राहिलेली होती ३, अश्रूंच्या योगानें तिचें मुख भरून गेलेलें होतें, ती अगदीं दीन झालेली होती, शोकाच्या भरानें अगदीं खचून गेल्यामुळें वायुवेगानें ग्रस्त आणि ह्मणूनच समुद्रामध्यें मग्न होत असलेल्या नावेप्रमाणें तिची अवस्था झालेली होती ४, हरणांच्या कळपांतून चुकल्यामुळें कुतऱ्यांनीं घेरलेल्या हरिणीप्रमाणें ती दिसत होती आणि मान खालीं घालून ती बसली होती. असो. तो राक्षस तिचे समीप गेला ५ व त्यानें पराधीन व शोकाकुल झाल्यामुळें दीन झालेल्या त्या सीतेला बलात्कारानें आपलें देवगृहाप्रमाणें असलेलें गृह दाखविलें ६. त्या गृहाच्या भोंवतालीं श्रीमंत लोकांच्या वाड्यांची व राजवाड्यांची गर्दी झालेली होती, हजारों स्त्रियांनीं त्याचा आश्रय केलेला होता, नानाप्रकारचे पक्षिसमुदाय तेथें रहात होते, तऱ्हेतऱ्हेचीं रत्नें त्यामध्यें होतीं ७, हिरे व वैडूर्यमणी जडलेले असल्यामुळें चित्रविचित्र आणि ह्मणूनच दृष्टीलाही रम्य अशा हस्तिदंती, सुवर्णमय, स्फाटिकमय व रौप्यमय स्तंभांनीं तें युक्त होतें ८, दिव्य दुंदुभींचा घोष तेथें चालला होता आणि सुवर्णाच्या अलंकारांनीं तें सजविलें होतें. अशा प्रकारचें आपलें घर सीतेला दाखविल्यानंतर तिच्यासहवर्तमान तो त्यांतील एक अद्भुत सोनेरी जिना चढून वर गेला ९. त्या घराला असलेल्या हस्तिदंती व रुप्याच्या खिडक्या दिसण्यांत मनोहर होत्या आणि त्याच्याभोंवतीं असलेल्या राजवाड्यांच्या ओळी सुवर्णमय जाळ्यांनीं आच्छादित झालेल्या होत्या १०. असो. सफेती आणि रत्नें ह्यांच्या योगानें विचित्र दिसत असलेले आपल्या घरांतील सर्वही भूप्रदेश रावणानें

मावृताः । रावणो दर्शयामास सीतां शोकपरायणाम् १२ दर्शयित्वा तु
वैदेहीं कृत्स्नं तद्भवनोत्तमम् । उवाच वाक्यं पापात्मा सीतां लोभितुमि-
च्छया १३ दश राक्षसकोट्यश्च द्वाविंशतिरथापराः । वर्जयित्वा जरा-
न्वृद्धान्बालांश्च रजनीचरान् १४ तेषां प्रभुरहं सीते सर्वेषां भीमकर्म-
णाम् । सहस्रमेकमेकस्य मम कार्यपुरःसरम् १५ यदिदं राज्यतन्त्रं मे
त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् । जीवितं च विशालाक्षि त्वं मे प्राणैर्गरीयसी १६
बह्वीनामुत्तमस्त्रीणां मम योसौ परिग्रहः । तासां त्वमीश्वरी सीते मम
भार्या भव प्रिये १७ साधु किं तेन्यथाबुद्ध्या रोचयस्व वचो मम ।
भजस्व माभितप्तस्य प्रसादं कर्तुमर्हसि १८ परिक्षिप्ता समुद्रेण लङ्केयं
शतयोजना । नेयं धर्षयितुं शक्या सेन्द्रैरपि सुरासुरैः १९ न देवेषु न
यक्षेषु न गन्धर्वेषु नर्षिषु । अहं पश्यामि लोकेषु यो मे वीर्यसमो
भवेत् २० राज्यभ्रष्टेन दीनेन तापसेन पदातिना । किं करिष्यसि रामेण

---

सीतेला दर्शविले ११ व त्याचप्रमाणें शोकाचेंच अवलंबन करून बसलेल्या त्या सीतेला नानाप्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झालेल्या पुष्करणी व वापीही त्यानें दाखविल्या १२. ह्याप्रमाणें आपलें तें उत्कृष्ट सर्व गृह सीतेला दाखविल्यावर तो पापबुद्धि रावण सीतेला लुब्ध करून टाकण्याच्या इच्छेनें ह्मणाला १३ " वृद्ध व अल्पवयी राक्षसजन सोडून दिले तरी दुसरे बत्तीस कोट राक्षस आहेत आणि हे सीते, क्रूर कर्म करणाऱ्या त्या सर्वही राक्षसांचा मी अधिपति आहें; १४ इतकेंच नव्हे; परंतु, माझ्या कार्याविषयीं पुढाकार घेणारे हजार हजार राक्षस त्या बत्तीस हजारांपैकीं प्रत्येक राक्षसाच्या हाताखालीं आहेत १५ हे विशालनयने, राज्यसंबंधीं जें जें ह्मणून कांहीं आहे तें सर्व तुझ्या अधीन असून माझें जीवितही तुझ्याच अधीन आहे; कारण, तूं मला माझ्या प्राणांपेक्षांही श्रेष्ठ आहेस १६. हे सीते, हे प्रिये, तूं माझी भार्या हो आणि माझ्या भार्या ह्मणून ज्या कांहीं इतर पुष्कळ उत्कृष्ट स्त्रिया आहेत त्यांची मालकीण हो १७. ह्याशिवाय भलतीच गोष्ट मनांत आणून तुला कांहींएक उपयोग होणार नाहीं; तस्मात्, हितकारक अशा माझ्या भाषणाला तूं मान दे, माझा अंगीकार कर आणि मदनानें संतप्त झालेल्या मजवर तूं कृपा कर १८. शंभर योजनें लांब असलेली ही लंका समुद्रानें परिवेष्टित असल्यामुळें इंद्रासहवर्तमान देवदैत्य जरी आले तरी त्यांच्यानेंही हिच्यावर हल्ला होणें शक्य नाहीं ( राम येथें येण्याची गोष्टच पाहिजे कशाला ! ) १९. देव, यक्ष, गंधर्व, ऋषि आणि मानव ह्यांत वीर्यानें माझी बरोबरी करणारा मला कोणीही दिसत नाहीं २०. तेव्हां

मानुषेणाल्पतेजसा २१ भजस्व सीते मामेव भर्ताहं सदृशस्तव । यौवनं त्वध्रुवं भीरु रमस्वेह मया सह २२ दर्शने मा कृथा बुद्धिं राघवस्य वरानने । कास्य शक्तिरिहागन्तुमपि सीते मनोरथैः २३ न शक्यो वायुराकाशे पाशैर्बन्द्धुं महाजवः दीप्यमानस्य वाप्यग्नेर्ग्रहीतुं विमलाः शिखाः २४ त्रयाणामपि लोकानां न तं पश्यामि शोभने । विक्रमेण नयेद्यस्त्वां मद्बाहुपरिपालिताम् २५ लङ्कायाः सुमहद्राज्यमिदं त्वमनुपालय । त्वत्प्रेष्या मद्विधाश्चैव देवाश्चापि चराचरम् । अभिषेकजलक्लिन्ना तुष्टा च रमयस्व च २६ दुष्कृतं यत्पुरा कर्म वनवासेन तद्गतम् । यच्च ते सुकृतं कर्म तस्येह फलमाप्नुहि २७ इह सर्वाणि माल्यानि दिव्यगन्धानि मैथिलि । भूषणानि च मुख्यानि तानि सेव मया सह २८ पुष्पकं नाम सुश्रोणि भ्रातुर्वैश्रवणस्य मे । विमानं सूर्यसंकाशं तरसा निर्जितं रणे २९ विशालं

---

राज्यापासून भ्रष्ट, दीन, शोचनीय, अशक्त आणि पादचारी अशा मानव रामाशीं तुला काय कर्तव्य आहे? २१. हे सीते, तूं माझाच अंगीकार कर; मी तुला योग्य पति आहें; हे भित्रे यौवन अस्थिर आहे. ह्यास्तव तूं आतां ( व्यर्थ कालक्षेप न करितां ) ह्या ठिकाणीं माझ्यासहवर्तमान रममाण हो २२. हे सुमुखि, रघुवंशज रामाच्या दर्शनाची इच्छा करूं नकोस. कारण, हे सीते, मनोरथांच्या योगानें तरी येथें येण्याचें त्याचें काय सामर्थ्य लागून गेलें आहे? २३. महावेगवान् वायूला आकाशामध्यें पाशांनीं बद्ध करणें अथवा देदीप्यमान अग्नीच्या निर्मल ज्वाला धरून ठेवणें ज्याप्रमाणें अशक्य आहे त्याचप्रमाणें रामाचें आगमन येथें होणें अशक्य आहे २४. हे कल्याणि, माझ्या बाहूंच्या योगानें तूं सुरक्षित असतांना पराक्रम करून तुला घेऊन जाणारा त्रैलोक्यामध्येंही मला कोणी दिसत नाहीं २५. लंकेच्या ह्या अति अफाट राज्याचें तूंच परिपालन कर. तूं जर माझा अंगीकार करशील तर माझ्यासारिखे तुझे दास होतील व देवही तुझ्या आज्ञेंत रहातील; इतकेंच नव्हे परंतु सर्व चराचर जगत् तुझें दास्यत्व पत्करून राहील. श्रमनिवृत्ति व्हावी एतदर्थ न्हाण्याकरितां आणिलेल्या उदकानें तूं ( आतां अगदीं सुकून गेली आहेस ती ) आर्द्र हो आणि संतुष्ट राहून माझ्याशीं रममाण हो २६. पूर्वी जें कांहीं पातक तुझ्या हातून झालें होतें त्याचें अनिष्ट फल वनवासाच्या योगानें संपून गेलें आहे. तुझ्या हातून जें कांहीं पुण्यकर्म घडलें असेल त्याच्या फलाचा आतां येथें उपभोग घे २७. हे मिथिलराजकन्ये, दिव्य दिव्य गंधांनीं युक्त असलेलीं सर्व प्रकारचीं पुष्पें आणि मुख्य मुख्य भूषणें येथें आहेत त्यांचा तूं माझ्यासहवर्तमान उपभोग घे २८. हे सुंदरि, मी आपल्या वैश्रवणनामक भ्रात्याचें सूर्यासमान तेजस्वी

रमणीयं च तद्विमानं मनोजवम् । तत्र सीते मया सार्धं विहरस्व यथा-सुखम् ३० वदनं पद्मसंकाशं विमलं चारुदर्शनम् । शोकार्तं तु वरारोहे न भ्राजति वरानने ३१ एवं वदति तस्मिन्सा वस्त्रान्तेन वराङ्गना । पिधायेन्दुनिभं सीता मन्दमश्रूण्यवर्तयत् ३२ ध्यायन्तीं तामिवास्वस्थां सीतां चिन्ताहतप्रभाम् । उवाच वचनं वीरो रावणो रजनीचरः ३३ अलं व्रीडेन वैदेहि धर्मलोपकृतेन ते । आर्षोयं दैवि निष्पन्दो यस्त्वामभिभविष्यति ३४ एतौ पादौ मया स्निग्धौ शिरोभिः परिपीडितौ । प्रसादं कुरु मे क्षिप्रं वश्यो दासोहमस्मि ते ३५ इमाः शून्यमया वाचः शुष्यमाणेन भाषिताः । न चापि रावणः कांचिन्मूर्ध्ना स्त्रीं प्रणमेत ह ३६ एवमुक्त्वा दशग्रीवो मैथिलीं जनकात्मजाम् । कृतान्तवशमापन्नो ममेयमिति मन्यते ३७ [ २११३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥५५॥

---

असलेलें पुष्पकनामक विमान संग्रामामध्यें स्वसामर्थ्यानें जिंकून आणिलें आहे २९ आणि तें विमान विस्तृत व रमणीय असून त्याची गति मनाप्रमाणें शीघ्र आहे. ह्यास्तव, हे सीते, त्या विमानामध्यें तूं माझ्यासहवर्तमान यथेष्ट क्रीडा कर ३०. हे सुंदरि, हे सुमुखि, कमलतुल्य व निर्मल असल्यामुळें दिसण्यांतही मनोहर असलेलें तुझें मुख शोकाकुल झाल्या कारणानें झळकेनासें झालें आहे" ३१. ह्याप्रमाणें तो रावण भाषण करूं लागला असतां सीता आपल्या चंद्रतुल्य आल्हादकारक असलेल्या मुखावर पदर घेऊन हळू हळू अश्रु ढाळूं लागली ३२. तेव्हां शोकानें अस्वस्थ व काळजीनें निस्तेज झालेली ती सीता चिंताक्रांत होऊन बसली असतांना तो वीर रावण राक्षस तिला ह्मणाला ३३ "हे सीते, ( स्वभर्तृत्यागपूर्वक परपुरुषस्वीकाररूप ) धर्मलोपामुळें उत्पन्न झालेली लज्जा आतां पुरे. हे देवि, तुझा माझा जो हा संबंध झाला आहे व जो होणार आहे तो वेदमूलकच आहे ( कारण, बलात्कारानें स्त्री हरण करून आणणें हा राक्षसविधि विवाहविधीमध्यें उक्त आहे ) ३४. तुझ्या ह्या तुळतुळींत पायांवर मीं आपलीं मस्तकें ठेविलीं आहेत. ह्यास्तव, तूं मजवर सत्वर कृपा कर. मी तुझ्या हुकुमाप्रमाणें वागणारा तुझा दास आहें ३५. करितां, कामपीडित होऊन मी जे हे शब्द बोललों आहे ते व्यर्थ न होतील असें कर; रावण मस्तकानें कोणत्या स्त्रीला प्रणाम करणार नाहीं" ३६. ह्याप्रमाणें रावण जनककन्या सीतेला ह्मणाला आणि मृत्यूचे तावडींत सांपडला असल्यामुळें ही माझी आहे असें ह्मणूं लागला ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५५ ॥

सा तथोक्ता तु वैदेही निर्भया शोककर्शिता । तृणमन्तरतः कृत्वा
रावणं प्रत्यभाषत १ राजा दशरथो नाम धर्मसेतुरिवाचलः । सत्यसन्धः
परिज्ञातो यस्य पुत्रः स राघवः २ रामो नाम स धर्मात्मा त्रिषु लोकेषु
विश्रुतः । दीर्घबाहुर्विशालाक्षो दैवतं स पतिर्मम ३ इक्ष्वाकूणां कुले
जातः सिंहस्कन्धो महाद्युतिः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा यस्ते प्राणान्व-
धिष्यति ४ प्रत्यक्षं यद्यहं तस्य त्वया वै धर्षिता बलात् । शयिता त्वं
हतः सङ्ख्ये जनस्थाने यथा खरः ५ य एते राक्षसाः प्रोक्ता घोररूपा
महाबलाः । राघवे निर्विषाः सर्वे सुपर्णे पन्नगा यथा ६ तस्य ज्यावि-
प्रमुक्तास्ते शराः काञ्चनभूषणाः । शरीरं विधमिष्यन्ति गङ्गाकुलमि-
वोर्मयः ७ असुरैर्वा सुरैर्वा त्वं यद्यवध्योसि रावण । उत्पाद्य सुम-
हद्वैरं जीवंस्तस्य न मोक्ष्यसे ८ स ते जीवितशेषस्य राघवोन्तकरो
बली । पशोर्यूपगतस्येव जीवितं तव दुर्लभम् ९ यदि पश्येत्स रामस्त्वां
रोषदीप्तेन चक्षुषा । रक्षस्त्वमद्य निर्दग्धो यथा रुद्रेण मन्मथः १०

---

ह्याप्रमाणें रावणानें शोकाकुल झालेल्या सीतेशीं भाषण केलें असतां ती सीता तृण आड धरून निर्भयपणें रावणाला ह्मणाली १ " धर्माचा अचल सेतुच कीं काय दशरथ ह्मणून एक राजा होऊन गेला. त्याचा तो राम पुत्र असून सत्यवचनी ह्मणून प्रसिद्ध आहे २. तो धर्मात्मा राम आजानुबाहु व विशालनयन असून त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध आहे आणि तोच माझा पति व दैवत आहे ३. इक्ष्वाकुकुलामध्यें तो उत्पन्न झाला आहे, त्याचे स्कंध सिंहासारखे विशाल आहेत, तो महातेजस्वी आहे आणि भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान तोच तुझे प्राण नाहींसे करील ४. त्याच्या समक्ष जर तूं बलात्कारानें माझ्यावर हल्ला केला असतास तर जनस्थानामध्यें वध पावलेल्या खराप्रमाणें तूं युद्धामध्यें वध होऊन पडला असतास ५. तूं जे हे राक्षस भयंकर व महाबलाढ्य ह्मणून मला सांगितलेस ते सर्व गरुडाची गांठ पडली असतां निर्विष होणाऱ्या सर्पाप्रमाणें रामाची गांठ पडली असतां निरुपद्रवी होतील. ६ आणि त्याच्या प्रत्यंचेपासून सुटलेले सुवर्णभूषित बाण ज्याप्रमाणें लाटा गंगेचे तीर उडवून देतात त्याप्रमाणें तुझें शरीर उडवून देतील ७. हे रावणा, दैत्यांच्या हातून अथवा देवांच्या हातून जरी तुझा वध होणें शक्य नसलें तरी रामाशीं तूं अति मोठें वैर उत्पन्न केलें असल्यामुळें त्याच्या हातून तूं जिवंत सुटणार नाहींस ८. तो बलाढ्य राम तुझ्या अवशिष्ट राहिलेल्या जीविताचा अंत करणारा आहे. सारांश, यज्ञस्तंभाला बद्ध झालेल्या पशूच्या जीविताप्रमाणें तुझें जीवित दुर्लभ आहे ९. हे राक्षसा, क्रोधाग्नीनें प्रदीप्त झालेल्या

यश्चन्द्रं नभसो भूमौ पातयेन्नाशयेत वा । सागरं शोषयेद्वापि स सीतां मोचयेदिह ११ गतासुस्त्वं गतश्रीको गतसत्त्वो गतेन्द्रियः । लङ्का वैधव्यसंयुक्ता त्वत्कृतेन भविष्यति १२ न ते पापमिदं कर्म सुखोदर्कं भविष्यति । याहं नीता विनाभावं पतिपार्श्वात्त्वया बलात् १३ स हि दैवरसंयुक्तो मम भर्ता महाद्युतिः । निर्भयो वीर्यमाश्रित्य शून्ये वसति दण्डके १४ स ते वीर्यं बलं दर्पमुत्सेकं च यथाविधम् । अपनेष्यति गात्रेभ्यः शरवर्षेण संयुगे १५ यदा विनाशो भूतानां दृश्यते कालचोदितः । तदा कार्ये प्रमाद्यन्ति नराः कालवशं गताः १६ मां प्रधृष्य स ते कालः प्राप्तोऽयं राक्षसाधम । आत्मनो राक्षसानां च वधायान्तःपुरस्य च १७ न शक्या यज्ञमध्यस्था वेदिः स्रुग्भाण्डमण्डिता । द्विजातिमन्त्रसंपूता चण्डालेनावमर्दितुम् १८ तथाहं धर्मनित्यस्य धर्मपत्नी दृढव्रता । त्वया स्प्रष्टुं न शक्याहं राक्षसाधम पापिना १९ क्रीडन्ती राजहंसेन पद्म-

---

त्या रामाची दृष्टि जर तुझ्यावर गेली तर रुद्राच्या योगानें जळून खाक झालेल्या मदनाप्रमाणें तूं पूर्णपणें दग्ध होऊन जाशील १०. अरे; ( प्रसंग पडला असतां ) जो चंद्राला आकाशापासून भूमीवर पाडील किंवा त्याचा नाशही करील अथवा समुद्र शुष्क करून टाकील तो येथें असलेल्या सीतेचीही सुटका करीलच करील ११. तुझें वैभव, बल, इंद्रियें आणि प्राण हे सर्व नष्ट होऊन तूं केलेल्या अपराधामुळें लंका वैधव्ययुक्त होईल १२. ज्याअर्थी बलात्कारानें तूं पतीपासून माझा वियोग केला आहेस त्याअर्थी तुझ्या ह्या पापकर्माचा परिणाम चांगला होणार नाहीं १३. तो माझा महातेजस्वी भर्ता केवल वीर्याचें अवलंबन करून निर्जन अशा दंडकारण्यामध्यें माझ्या दिरासहवर्तमान निर्भयपणें वास्तव्य करीत आहे १४. तो युद्धामध्यें बाणवृष्टीच्या योगानें तुझ्या शरीरापासून तुझा पराक्रम, शारीरबल, मद आणि ( माझ्याशीं झाल्याप्रमाणें ) अमर्यादपणा हीं सर्व काढून टाकील १५. जेव्हां कालाच्या प्रेरणेप्रमाणें प्राण्यांचा नाश होण्याचा समय दिसत असतो तेव्हां कालाच्या अधीन झालेल्या लोकांची बुद्धि कर्तव्यासंबंधानें विपरीत होत असते १६. हे राक्षसाधमा, माझ्याशीं अतिप्रसंग करून ज्याअर्थी तूं येथें राहिला आहेस त्याअर्थी तूं स्वतः, आणि तुझें अंतःपुर ह्या सर्वांचा नाश होण्याचा तो हा समय आला आहे १७. कारण, ज्याप्रमाणें स्रुचिप्रभृति पात्रांनीं भूषित आणि ब्राह्मणांनीं म्हटलेल्या मंत्रांनीं पवित्र झालेल्या यज्ञामधील वेदीला चंडालाचा स्पर्श होणें शक्य नसतें १८ त्याचप्रमाणें, हे राक्षसाधमा, नित्य धर्माचेंच अवलंबन करून असलेल्या रामाची जी मी

षण्डेषु नित्यशः । हंसी सा तृणमध्यस्थं कथं द्रक्ष्येत मद्गुकम् २० इदं शरीरं निःसंज्ञं बन्ध वा घातयस्व वा । नेदं शरीरं रक्ष्यं मे जीवितं वापि राक्षस २१ न तु शक्यमपक्रोशं पृथिव्यां दातुमात्मनः । एवमुक्त्वा तु वैदेही क्रोधात्सुपरुषं वचः २२ रावणं जानकी तत्र पुनर्नोवाच किंचन । सीताया वचनं श्रुत्वा परुषं रोमहर्षणम् २३ प्रत्युवाच ततः सीतां भयसंदर्शनं वचः । शृणु मैथिलि मद्वाक्यं मासान्द्वादश भामिनि २४ कालेनानेन नाभ्येषि यदि मां चारुहासिनि । ततस्त्वां प्रातराशार्थं सूदाश्छेत्स्यन्ति लेशशः २५ इत्युक्त्वा परुषं वाक्यं रावणः शत्रुरावणः । राक्षसीश्च ततः क्रुद्ध इदं वचनमब्रवीत् २६ शीघ्रमेव हि राक्षस्यो विरूपा घोरदर्शनाः । दर्पमस्यापनेष्यन्तु मांसशोणितभोजनाः २७ वचनादेव तास्तस्य सुघोरा घोरदर्शनाः । कृतप्राञ्जलयो भूत्वा मैथिलीं पर्यवारयन् २८ स ताः प्रोवाच राजासौ रावणो घोरदर्शनाः । प्रचल्य चरणोत्कर्षैर्दारयन्निव

---

पातिव्रत्यरूप दृढ व्रत धारण करणारी धर्मपत्नी तिला तुज पाप्याचा स्पर्श होणें शक्य नाहीं १९. कारण, कमलाच्या समुदायांमध्यें नहमीं राजहंसाबरोबर क्रीडा करणारी जी हंसी ती तृणामध्यें बसलेल्या पाणकोंबड्याला काढून अवलोकन करणार ? २०. हे राक्षसा, तूं ह्या जड शरीराला बांध अथवा मारून टाक. ह्या शरीराचें रक्षण मला कर्तव्य नाहीं २१ ( करितां ह्याचें कांहीं जरी झालें तरी ) पृथ्वीवर ( सीता गैर चालीची निघाली अशाप्रकारची) आपली निंदा होऊं देणें मला योग्य नाहीं " २२. ह्याप्रमाणें जनककन्या सीता क्रोधामुळें रावणाशीं फारच कठोर भाषण करून स्वस्थ बसली व तिनें पुनरपि त्याच्याशीं कांहीं एक भाषण केलें नाहीं. असो. शरीरावर रोमांच उठविणारे असें तें कठोर भाषण श्रवण केल्यावर २६ रावण भयदर्शक शब्दांनीं तिला ह्मणाला " हे स्त्रिये सीते, माझें ह्मणणें ऐक. मी बारा महिनेपर्यंत वाट पाहीन २४ आणि, हे सुहास्यवदने, इतक्या वेळामध्यें जर तूं माझा अंगीकार न करशील तर न्याहारीकरितां आचारी तुझे तिळायेवढाले तुकडे करून टाकतील " २५. ह्याप्रमाणें शत्रूंना रडविणारा तो क्रुद्ध रावण सीतेशीं कठोर भाषण करून राक्षसींना ह्मणाला २६ " हे राक्षसस्त्रियांनो, मांस व रक्त सेवन करणाऱ्या आणि दिसण्यामध्येंही भयंकर असून अक्राळ विक्राळ असलेल्या तुह्मी हिच्या गर्वाचा सत्वरच परिहार करा " २७. असो. ह्याप्रमाणें त्यानें सांगितलें असतां त्याच्या सांगण्याप्रमाणेंच दिसण्यांतही भयंकर असलेल्या त्या अतिक्रूर राक्षसस्त्रिया रावणाकडे हात जोडून व सीतेच्या भोंवतीं गराडा देऊन उभ्या राहिल्या २८. तेव्हां तो राजा रावण दोन तीन

मेदिनीम् २९ अशोकवनिकामध्ये मैथिली नीयतामिति । तत्रेयं रक्ष्यतां गूढं युष्माभिः परिवारिता ३० तत्रैनां तर्जनैर्घोरैः पुनः सान्त्वैश्च मैथिलीम् । आनयध्वं वशं सर्वा वन्यां गजवधूमिव ३१ इति प्रतिसमादिष्टा राक्षस्यो रावणेन ताः । अशोकवनिकां जग्मुर्मैथिलीं परिगृह्य तु ३२ सर्वकामफलैर्वृक्षैर्नानापुष्पफलैर्वृताम् । सर्वकालमदैश्चापि द्विजैः समुपसेविताम् ३३ सा तु शोकपरीताङ्गी मैथिली जनकात्मजा । राक्षसीवशमापन्ना व्याघ्रीणां हरिणी यथा ३४ शोकेन महता त्रस्ता मैथिली जनकात्मजा । न शर्म लभते भीरुः पाशबद्धा मृगी यथा ३५ न विन्दते तत्र तु शर्म मैथिली विरूपनेत्राभिरतीव तर्जिता । पतिं स्मरन्ती दयितं च देवरं विचेतनाभूद्भयशोकपीडिता ३६ [१८४७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥ ५६ ॥

---

पावलं चालला आणि जोराजोरानें पावलें उचलल्यामुळें पृथ्वी विदारणच करून टाकीत आहे कीं काय अशा रीतीनें भासूं लागलेला तो रावण उग्र स्वरूप धारण करणाऱ्या त्या राक्षसस्त्रियांना ह्मणाला २९ " सीतेला अशोक वनामध्यें नेली पाहिजे आणि तेथें तुह्मी एकसारिखा हिच्याभोंवतीं गराडा देऊन हिचें अगदीं गुप्तपणें रक्षण केलें पाहिजे ३०. सारांश, अरण्यांतील हत्तिणीला ज्याप्रमाणें हस्तगत करून घेतात त्याप्रमाणें त्या ठिकाणीं भयंकर धमक्या देऊन आणि चुचकारून चुचकारून तुह्मी हिला वश करून घ्या " ३१. ह्याप्रमाणें रावणानें त्या राक्षसींना आज्ञा केल्यावर त्या राक्षसी सीतेला घेऊन अशोकवनामध्यें गेल्या ३२. नानाप्रकारचीं पुष्पें व फलें धारण करणाऱ्या कल्पवृक्षांनीं तें वन व्याप्त झालें असून सर्वदा मत्त असलेल्या पक्ष्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता ३३. असो. रामवियोगामुळें व्याकुल झालेली ती जनककन्या सीता राक्षसींच्या तावडींत सांपडली असतां वाघिणींच्या तावडींत सांपडलेल्या हरिणीप्रमाणें तिची स्थिति झाली ३४; प्रचंड शोकानें ती अगदीं त्रस्त झाली आणि जाळ्यांत अडकलेल्या हरिणीप्रमाणें त्या भीतियुक्त झालेल्या सीतेला कशाहीपासून सुख होईनासें झालें ३५. सारांश, भयंकर नेत्रांनीं युक्त असलेल्या राक्षसस्त्रिया तिला अतिशयच धमक्या देऊं लागल्या असतां सीतेला त्या ठिकाणीं सुख कसलें तें मिळालेंच नाहीं; इतकेंच नव्हे; परंतु, प्रिय पति आणि दीर ह्यांचें स्मरण होत असल्यामुळें भय व शोक ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या सीतेला भानही नाहींसें झालें ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं छपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५६ ॥

* प्रवेशितायां सीतायां लङ्कां प्रति पितामहः । तदा प्रोवाच देवेन्द्रं परितुष्टं शतक्रतुम् १ त्रैलोक्यस्य हितार्थाय रक्षसामहिताय च । लङ्कां प्रवेशिता सीता रावणेन दुरात्मना २ पतिव्रता महाभागा नित्यं चैव सुखैधिता । अपश्यन्ती च भर्तारं पश्यन्ती राक्षसीजनम् ३ राक्षसीभिः परिवृता भर्तृदर्शनलालसा । निविष्टा हि पुरी लङ्का तीरे नदनदीपतेः ४ कथं ज्ञास्यति तां रामस्तत्रस्थां तामनिन्दिताम् । दुःखं संचिन्तयन्ती सा बहुशः परिदुर्लभा ५ प्राणयात्रामकुर्वाणा प्राणांस्त्यक्ष्यत्यसंशयम् । स भूयः संशयो जातः सीतायाः प्राणसंक्षये ६ स त्वं शीघ्रमितो गत्वा सीतां पश्य शुभाननाम् । प्रविश्य नगरीं लङ्कां प्रयच्छ हविरुत्तमम् ७ एवमुक्तोथ देवेन्द्रः पुरीं रावणपालिताम् । आगच्छन्निद्रया सार्धं भगवान्पाकशासनः ८ निद्रां चोवाच गच्छ त्वं राक्षसान्संप्रमोहय । सा तथोक्ता मघवता देवी परमहर्षिता ९ देवकार्यार्थसिद्ध्यर्थं प्रामोहयत राक्षसान् । एतस्मि-

---

* रावण सीतेला लंकेमध्ये घेऊन गेला असतां संतुष्ट असलेल्या देवराज इंद्राला ब्रह्मदेव ह्मणाला १ "त्रैलोक्याच्या कल्याणाकरितां आणि राक्षसांच्या अकल्याणाकरितां दुरात्म्या रावणानें सीतेला लंकेमध्यें नेलें आहे २. ती महाभाग्यवती पतिव्रता नेहमीं सुखामध्यें वाढलेली आहे तथापि, सांप्रत भर्ता तिच्या दृष्टोत्पत्तीस न येतांना राक्षसस्त्रियाच ती अवलोकन करीत आहे ३. कारण, पतीच्या दर्शनाविषयीं उत्सुक असलेल्या त्या सीतेला राक्षसस्त्रियांनीं घेरून टाकिलें आहे. बरें, लंका पहावी तो समुद्राचें तीरीं वसलेली आहे ४. तेव्हां त्या ठिकाणीं असलेल्या त्या निर्दोष सीतेची बातमी रामाला कशी लागेल ? एकसारखें दुःखच मनामध्यें आणीत असलेली ती ती सीता जीव जगण्यास अवश्य असलेलें अन्नपानही सेवन न करितां निःसंशय प्राणत्याग करील आणि ह्मणूनच रामाला सर्वस्वी दुर्लभ होईल. ह्यास्तव, ज्याअर्थी सीतेचे प्राण जातात कीं काय असा संशय पुनरपि उत्पन्न झाला आहे ५, ६ त्याअर्थी तूं येथून सत्वर निघून जाऊन शुभ मुखानें युक्त असलेल्या सीतेला अवलोकन कर आणि लंकानगरीमध्यें प्रवेश करून तिला उत्कृष्ट हवि अर्पण कर" ७. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें देवराज इंद्राला सांगितलें असतां भगवान् इंद्र निद्रेला बरोबर घेऊन त्या रावणरक्षित लंकानगरीमध्यें आला ८ आणि तेथें आल्यानंतर निद्रेला ह्मणाला "तूं जा आणि राक्षसांना मोह पाड." ह्याप्रमाणें इंद्रानें सांगितलें असतां निद्रादेवीला अत्यंत हर्ष झाला ९. आणि देवांचें कार्य शेवटास जावें एतदर्थ तिनें राक्षस मोहित केले.

---

* ह्या सर्गावर रामायणतिलकसंज्ञक टीका नसल्यामुळें हा प्रक्षिप्त आहे असें कोणी ह्मणतात.

न्तरे देवः सहस्राक्षः शचीपतिः १० आससाद वनस्थां तां वचनं चेद-
मब्रवीत् । देवराजोस्मि भद्रं ते इह चास्मि शुचिस्मिते ११ अहं त्वां
कार्यसिद्ध्यर्थं राघवस्य महात्मनः । साहाय्यं कल्पयिष्यामि मा शुचो
जनकात्मजे १२ मत्प्रसादात्समुद्रं स तरिष्यति बलैः सह । मयैवेह च
राक्षस्यो मायया मोहिताः शुभे १३ तस्मादन्नमिदं सीते हविष्यान्नमहं
स्वयम् । स त्वां संगृह्य वैदेहि आगतः सह निद्रया १४ एतदत्स्यसि
मद्धस्तान्न त्वां बाधिष्यते शुभे । क्षुधा तृषा च रम्भोरु वर्षाणामयुतैरपि १५
एवमुक्ता तु देवेन्द्रमुवाच परिशङ्किता । कथं जानामि देवेन्द्रं त्वामिहस्थं
शचीपतिम् १६ देवलिङ्गानि दृष्टानि रामलक्ष्मणसंनिधौ । तानि दर्शय
देवेन्द्र यदि त्वं देवराट् स्वयम् १७ सीताया वचनं श्रुत्वा तथा चक्रे
शचीपतिः । पृथिवीं नास्पृशत्पद्भ्यामनिमेषेक्षणानि च १८ अरजोम्बर-
धारी च न म्लानकुसुमस्तथा । तं ज्ञात्वा लक्षणैः सीता वासवं परिह-

---

इतक्यांमध्यें सहस्र नेत्रांनीं युक्त असलेला शचीपति देव इंद्र १० अशोकवनामध्यें
असलेल्या सीतेसमीप जाऊन तिला ह्मणाला " हे सुहास्यवदने, तुझें कल्याण असो;
मी देवराज इंद्र आहें आणि ह्या ठिकाणीं आलों आहें ११. देवांचें कार्य सिद्धीस
नेण्याकरितां महात्म्या रघुवंशज रामाला साहाय्य करण्याची मी तजवीज करीन;
ह्यास्तव, हे जनककन्यके, तूं शोक करूं नकोस १२. माझ्या प्रसादामुळें तो राम
सैन्यासहवर्तमान समुद्र तरून जाईल. हे कल्याणि, ह्या ठिकाणीं असलेल्या राक्षस-
स्त्रियांना मींच मोह पाडिलेला आहे १३. हे विदेहराजकन्यके सीते, मी तुझ्याकरितां
हें हविष्यान्न स्वतः घेऊन निद्रेसहवर्तमान येथें आलों आहें १४ हे कल्याणि, हे
सुंदरि, माझ्या हातून जर तूं हें भक्षण करशील तर लाखों वर्षें लोटलीं असतांही
तुला क्षुधेपासून अथवा तृषेपासून पीडा होणार नाहीं " १५. ह्याप्रमाणें इंद्रानें तिला
सांगितलें असतांही संशययुक्त असलेली ती सीता देवराज इंद्राला ह्मणाली " तूं येथें
शचीपति देवराज इंद्रच आला आहेस हें मीं कशावरून समजावें? १६ हे देवाधिपा,
तूं जर स्वतः देवराज असशील तर रामलक्ष्मणांसमीप जीं देवांचीं चिन्हें माझ्या
दृष्टोत्पत्तीस आललीं आहेत तीं तूं स्वतःचे ठिकाणीं असलेलीं दाखीव " १७. हें
सीतेचें भाषण श्रवण करितांक्षणीं इंद्रानें तसें केलें; ह्मणजे त्याच्या पायांचा
पृथ्वीला स्पर्श होईनासा झाला; नेत्राच्या पापण्या लवनाशा झाल्या १८, त्याचें
वस्त्र निर्मल झालें व पुष्पेंही टवटवीत झालीं. असो. ह्या लक्षणांवरून तो
इंद्र आहे असें जेव्हां सीतेला समजून आलें तेव्हां तिला अतिशय हर्ष झाला १९

र्पिता १९ उवाच वाक्यं रुदती भगवद्राघवं प्रति । सह भ्रात्रा महाबाहु-
र्दिष्ट्या मे श्रुतिमागतः २० यथा मे श्वशुरो राजा यथा च मिथिलाधिपः ।
तथा त्वामद्य पश्यामि सनाथो मे पतिस्त्वया २१ तवाज्ञया च देवेन्द्र
पयोभूतमिदं हविः । अशिष्यामि त्वया दत्तं रघूणां कुलवर्धनम् २२
इन्द्रहस्ताद्गृहीत्वा तत्पायसं सा शुचिस्मिता । न्यवेदयत भर्त्रे सा लक्ष्म-
णाय च मैथिली २३ यदि जीवति मे भर्ता सह भ्रात्रा महाबलः ।
इदमस्तु तयोर्भक्त्या तदाश्नात्पायसं स्वयम् २४ इतीव तत्प्राश्य हविर्व-
रानना जहौ क्षुधादुःखमसुद्भवं च तम् । इन्द्रात्प्रवृत्तिमुपलभ्य जानकी
काकुत्स्थयोः प्रीतमना बभूव २५ स चापि शक्रस्त्रिदिवालयं तदा प्रीतो
ययौ राघवकार्यसिद्धये । आमन्त्र्य सीतां स ततो महात्मा जगाम
निद्रासहितः स्वमालयम् २६ [ १८७३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सर्गः ॥

राक्षसं मृगरूपेण चरन्तं कामरूपिणम् । निहत्य रामो मारीचं तूर्णं

---

आणि भगवान् रघुवंशज रामासंबंधानें ती रडत रडत त्याला ह्मणाली "सुदैवानें भ्रात्यासहवर्तमान पतीची वार्ता माझ्या कानावर आली आहे २०. माझा पति आज आपल्यामुळें सनाथ झाला आहे. ह्यास्तव माझे श्वशुर दशरथमहाराज अथवा मिथिलाधिपति जनकराज ह्यांचेंच आगमन आज येथें झालें असें मी समजत आहें २१. हे देवराज, रघुवंशजांचें कुल वृद्धिंगत करणारें असें हें आपण दिलेलें दुग्धरूप हविष्यान्न आपल्या आज्ञेनें मी भक्षण करीन " २२. असें ह्मणून त्या सुहास्यवदन सीतेनें इंद्राच्या हातांतून तें पायस घेतलें; प्रथमतः तें तिनें मनानें आपल्या भर्त्याला व लक्ष्मणाला अर्पण केलें २३ आणि नंतर भ्रात्यासहवर्तमान माझा महाबलाढ्य भर्ता जर जीवमान असेल तर हें पायस त्यांना अर्पण होवो असें ह्मणून त्यांच्या भक्तीनें तिनें तें पायस स्वतः ग्रहण केलें २४. सारांश, त्या सुंदरी सीतेनें ह्याप्रमाणें तें हविष्यान्न भक्षण केल्यावर क्षुधा व तृषा ह्यांसंबंधानें दुःखाचाही त्याग केला आणि ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांची वार्ता इंद्रापासून समजल्यामुळें त्या जनककन्येच्या मनाला आनंद झाला २५. असो. ( ह्याप्रमाणें सीतेनें तें पायस भक्षण केल्यानंतर ) संतुष्ट झालेला इंद्रही रघुवंशज रामाच्या हातून होणारें कार्य सिद्धीस नेण्याकरितां स्वर्गाकडे निघाला आणि सीतेचा निरोप घेऊन तो महात्मा निद्रेसहवर्तमान स्वस्थानीं गेला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडांपैकीं इंद्रदत्तपायसभक्षणसंबधीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५७॥

पथि न्यवर्तत १ तस्य संत्वरमाणस्य द्रष्टुकामस्य मैथिलीम् । क्रूरस्वनोथ गोमायुर्विननादास्य पृष्ठतः २ स तस्य स्वरमाज्ञाय दारुणं रोमहर्षणम् । शङ्कयामास गोमायोः स्वरेण परिशङ्कितः ३ अशुभं बत मन्येहं गोमायुर्वाशते यथा । स्वस्ति स्यादपि वैदेह्या राक्षसैर्भक्षणं विना ४ मारीचेन तु विज्ञाय स्वरमालक्ष्य मामकम् । विक्रुष्टं मृगरूपेण लक्ष्मणः शृणुयाद्यदि ५ स सौमित्रिः स्वरं श्रुत्वा तां च हित्वाथ मैथिलीम् । तयैव प्रहितः क्षिप्रं मत्सकाशमिहैष्यति ६ राक्षसैः सहितैर्नूनं सीताया ईप्सितो वधः ७ काञ्चनश्च मृगो भूत्वा व्यपनीयाश्रमात्तु माम् । दूरं नीत्वाथ मारीचो राक्षसोभूच्छराहतः ८ हा लक्ष्मण हतोस्मीति यद्वाक्यं व्याजहार ह । अपि स्वस्ति भवेद्द्वाभ्यां रहिताभ्यां मया वने ९ जनस्थाननिमित्तं हि कृतवैरोस्मि राक्षसैः । निमित्तानि च घोराणि दृश्यन्तेद्य बहूनि च १० इत्येवं चिन्तयन्रामः श्रुत्वा गोमा-

---

इकडे यथेष्ट रूप धारण करण्यास समर्थ असलेला जो मारीच राक्षस मृगरूप धारण करून संचार करूं लागला होता त्याचा मार्गामध्यें सत्वर वध करून राम परत फिरला १. परंतु, सीतेच्या भेटीची इच्छा धरून तो राम त्वरेनें परत येऊं लागला असतां क्रूर शब्द करणारें एक खोकड त्याच्या मागें ओरडलें २. तेव्हां त्याचा तो अंगावर रोमांच उठविणारा भयंकर ध्वनि श्रवण करून सीतेच्या रक्षणाविषयीं आधींच शंकित असलेल्या रामाला खोकडाच्या शब्दासंबंधानें शंका आली ३ ( आणि तो ह्मणाला ) " ज्याअर्थीं ह्मातारें कोल्हें ओरडत आहे त्याअर्थीं हें कांहीं तरी अशुभ चिन्ह आहे असें मला वाटतें ४. अरे, सीतेचें कुशल असेल नां ? राक्षसांनीं तिला भक्षण करून तर टाकिली नसेल नां ? मी कसा ओरडत असतो हें लक्ष्यपूर्वक समजून घेऊन मृगरूप धारण केलेल्या मारीचानें ( आह्मांला अपकार करण्याकरितां हे सीते, हे लक्ष्मणा, असा ) जो आक्रोश केला तो जर लक्ष्मणाच्या कानावर गेला असेल तर सुमित्रापुत्र लक्ष्मण ध्वनि कानावर येतांक्षणीं त्या मिथिलराजकन्येला सोडून देईल आणि तिनेंच पाठविल्यामुळें सत्वर माझ्या समीप येईल ६. खरोखर राक्षसांनीं एकत्र जमून सीतेचा वध करण्याचे मनामध्यें आणिलें आहे ७. कारण, प्रथमतः मारीच राक्षसानें सुवर्ण मृग बनून मला आश्रमांतून बाहेर काढिलें; तेथून दूर नेल्यावर मीं जेव्हां बाणानें त्याला वेध केला तेव्हां तो मारीच राक्षस बनला ८ आणि ( मरणसमयीं ) " हे लक्ष्मणा, माझा वध झाला रे झाला ! " असेंही तो ह्मणाला. ह्यावरून आह्मी दोघे वनामध्यें नसतांना तेथें सर्व कुशल असेल नां ९. कारण, जनस्थानाकरितां

मुनिःस्वनम् । निवर्तमानस्त्वरितो जगामाश्रममात्मवान् ११ आत्मन-श्चापनयनं मृगरूपेण रक्षसा । आजगाम जनस्थानं राघवः परिशङ्कितः १२ तं दीनमानसं दीनमासेदुर्मृगपक्षिणः । सव्यं कृत्वा महात्मानं घोरांश्च ससृजुः स्वरान् १३ तानि दृष्ट्वा निमित्तानि महाघोराणि राघवः । ततो लक्ष्मणमायान्तं ददर्श विगतप्रभम् १४ ततो विदूरे रामेण समीयाय स लक्ष्मणः । विषण्णः सन्विषण्णेन दुःखितो दुःखभागिना १५ स जगर्हेथ तं भ्राता दृष्ट्वा लक्ष्मणमागतम् । विहाय सीतां विजने वने राक्षससेविते १६ गृहीत्वा च करं सव्यं लक्ष्मणं रघुनन्दनः । उवाच मधुरोदर्कमिदं परुषमार्तवत् १७ अहो लक्ष्मण गर्ह्यं ते कृतं यत्त्वं विहाय ताम् । सीतामिहागतः सौम्य कच्चित्स्वस्ति भवेदिति १८ न मेऽस्ति संशयो वीर सर्वथा जनकात्मजा । विनष्टा भक्षिता वापि राक्षसैर्वनचारिभिः १९ अशुभान्येव भूयिष्ठं यथा प्रादुर्भवन्ति मे । अपि

---

राक्षसांनीं माझ्याशीं वैर धरिलें आहे आणि आज भयंकर चिन्हें पुष्कळच दृष्टोत्पत्तीस येत आहेत " १० ह्याप्रमाणें खोकडाचा शब्द एकतांक्षणीं चिंता करूं लागलेला व परत फिरलेला तो जितेंद्रिय राम त्वरेनें आश्रमामध्यें आला ११. असो. मृगरूप धारण केलेल्या राक्षसानें आपल्याला आश्रमापासून दूर नेलें ह्याविषयीं चिंतन करीत असलेला तो रघुवंशज राम साशंक होऊन जनस्थानामध्यें आला १२. तेव्हां मनामध्यें खिन्न व शरीरानेंही म्लान होऊन गेलेल्या त्या रामासमीप पशुपक्षी आले आणि त्या महात्म्याला डावी घालून भयंकर शब्द करूं लागले १३. असो. ह्याप्रमाणें महाभयंकर चिन्हें अवलोकन केल्यावर निस्तेज होऊन येत असलेला लक्ष्मण रामाचे दृष्टीं पडला १४. तदनंतर खिन्न व दुःखित झालेला तो लक्ष्मण त्यांच्याचप्रमाणें खिन्न व दुःखित झालेल्या रामाला अगदीं जवळ येऊन भेटला असतां १५ राक्षसांचें वास्तव्य असलेल्या निर्जन वनामध्यें सीतेला टाकून आलेल्या लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं भ्राता राम त्याची निंदा करूं लागला १६. सारांश, रघुनंदन रामानें लक्ष्मणाचा डावा हात धरिला आणि परिणामीं सुखकर होणाऱ्या कठोर शब्दांनीं एकाद्या भयभीत झालेल्या पुरुषाप्रमाणें तो त्याला ह्मणाला १७, "हे लक्ष्मणा, सीतेला टाकून तूं येथें आलास हें तूं फारच निंद्य कर्म केलेंस. कारण, हे सौम्य लक्ष्मणा, ( आपणांपैकीं कोणीही तेथें नसतांना ) सीतेचें कुशल असेल काय? १८. हे वीरा, जनककन्या सीतेचा सर्वस्वीं नाश तरी झाला असला पाहिजे अथवा वनामध्यें संचार करणाऱ्या राक्षसांनीं तिला भक्षण करून तरी टाकिली असली पाहिजे १९. हे

लक्ष्मण सीतायाः सामग्र्यं प्राप्नुयामहे २० जीवन्त्याः पुरुषव्याघ्र सुताया जनकस्य वै। यथा वै मृगसङ्घाश्च गोमायुश्चैव भैरवम् २१ वाशन्ते शकुनाश्चापि प्रदीप्तामभितो दिशम्। अपि स्वस्ति भवेत्तस्या राजपुत्र्या महाबल २२ इदं हि रक्षोमृगसंनिकाशं प्रलोभ्य मां दूरमनुप्रयातम्। हतं कथंचिन्महता श्रमेण स राक्षसोऽभून्म्रियमाण एव २३ मनश्च मे दीनमिहाप्रहृष्टं चक्षुश्च सव्यं कुरुते विकारम्। असंशयं लक्ष्मण नास्ति सीता हृता मृता वा पथि वर्तते वा २४ [१८९७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः ॥ ५७ ॥

स दृष्ट्वा लक्ष्मणं दीनं शून्यं दशरथात्मजः। पर्यपृच्छत धर्मात्मा वैदेहीमागतं विना १ प्रस्थितं दण्डकारण्यं या मामनुजगाम ह। क्व सा लक्ष्मण वैदेही यां हित्वा त्वमिहागतः २ राज्यभ्रष्टस्य दीनस्य दण्डकान्परिधावतः। क्व सा दुःखसहाया मे वैदेही तनुमध्यमा ३ यां विना नोत्सहे वीर मुहूर्तमपि जीवितुम्। क्व सा प्राणसहाया मे सीता सुरसु-

---

पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, ज्याअर्थी पुष्कळ अशुभ चिन्हें मला होत आहेत त्याअर्थी जनककन्या सीता जिवंत असून तिचें कुशलवृत्त आपणाला समजेल काय? मृगांचे कळप, खोकड व पक्षी प्रदीप्त झालेल्या दिशेकडे तोंड करून भयंकर शब्द करीत आहेत; तेव्हां, हे महाबलाढ्य लक्ष्मणा, त्या राजकन्येचें कुशल असेल नां ? २०,२१,२२. मृगाप्रमाणें भासणारा हा राक्षस मला लुब्ध करून दूर निघून गेला आणि मोठ्या श्रमानें कसा तरी मीं जेव्हां त्याचा वध केला तेव्हां मरतां मरतांच मात्र त्यानें आपलें राक्षसरूप धारण केलें २३. ह्या ठिकाणीं माझें मन खिन्न व हर्षरहित झालेलें आहे आणि माझा डावा डोळा लवत आहे. ह्यावरून, हे लक्ष्मणा, सीता निःसंशय आश्रमांतून नाहींशी झालेली आहे. मग तिला कोणी हरण करून नेलेली असो, तीं कोठें मरून पडलेली असो किंवा कोठेंतरी मार्गांत असो २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५७॥

सीतेला टाकून आलेल्या त्या दीन व खिन्न लक्ष्मणाला अवलोकन केल्यावर तो दशरथपुत्र धर्मात्मा राम त्याला ह्मणाला १ " हे लक्ष्मणा, मी दंडकारण्यामध्यें निघालों असतां जी माझ्या मागोमाग आली व जिचा त्याग करून तूं येथें आला आहेस ती सीता कोठें आहे? २. अरे, राज्याला मुकल्यामुळें दीन होऊन दंडकारण्यामध्यें भटकत फिरणाऱ्या मला दुःखामध्येंही साहाय्य करणारी ती सुंदरी विदेहराजकन्या कोठें आहे? ३. हे वीरा, जिच्यावांचून एकक्षणभरही जिवंत रहाण्याची माझी इच्छा नाहीं ती देवकन्ये-

तोपमा ४ पतित्वममराणां हि पृथिव्याश्चापि लक्ष्मण । विना तां तपनीयाभ्यां नेच्छेयं जनकात्मजाम् ५ कच्चिज्जीवति वैदेही प्राणैः प्रियतरा मम । कच्चित्प्रव्राजनं वीर न मे मिथ्या भविष्यति ६ सीतानिमित्तं सौमित्रे मृते मयि गते त्वयि । कच्चित्सकामा कैकयी सुखिता सा भविष्यति ७ सपुत्रराज्यां सिद्धार्थां मृतपुत्रा तपस्विनी । उपस्थास्यति कौसल्या कच्चित्सौम्येन कैकयीम् ८ यदि जीवति वैदेही गमिष्याम्याश्रमं पुनः । संवृत्ता यदि वृत्ता मा प्राणांस्त्यक्ष्यामि लक्ष्मण ९ यदि मामाश्रमगतं वैदेही नाभिभाषते । पुरः प्रहसिता सीता विनशिष्यामि लक्ष्मण १० ब्रूहि लक्ष्मण वैदेही यदि जीवति वा न वा । त्वयि प्रमत्ते रक्षोभिर्भक्षिता वा तपस्विनी ११ सुकुमारी च बाला च नित्यं चादुःखभागिनी । मद्वियोगेन वैदेही व्यक्तं शोचति दुर्मनाः १२ सर्वथा रक्षसा तेन जिह्मेन सुदुरात्मना । वदता लक्ष्मणेत्युच्चैस्तवापि जनितं भयम् १३ श्रुतश्च मन्ये वैदेह्या

---

प्रमाणें सुंदर व माझ्या प्राणांची मैत्रीण असलेली सीता कोठें आहे ४. हे लक्ष्मणा, पृथ्वीचें व देवांचें आधिपत्य जरी मला प्राप्त झालें तरी सुवर्णासारिख्या उज्ज्वल कांतीनें युक्त असलेल्या त्या जानकीचा वियोग होत असेल तर मला त्याची इच्छा नाहीं ५. हे वीरा, मला प्राणांहूनही प्रिय असलेली विदेहराजकन्या सीता जिवंत असेल काय ? अरे, चवदा वर्षेपर्यंत वनामध्यें वास्तव्य करण्याची जी मीं प्रतिज्ञा केली आहे ती (सीतेचें जीवित नाहींसें झाल्यास माझेंही जीवित कायम राहणें संभवनीय नसल्यामुळें ) असत्य तर होणार नाहीं नां? ६. हे सुमित्रापुत्रा लक्ष्मणा, सीतेकरितां मला मरण येऊन तूं एकटा अयोध्येमध्यें परत गेल्यावर तरी त्या कैकेयीचे मनोरथ परिपूर्ण होऊन ती सुखी होईल काय ? ७. अरे, पुत्र मेल्यामुळें दीन झालेली कौसल्या, मनोरथ परिपूर्ण होऊन पुत्र व राज्य ह्यांसहवर्तमान असलेल्या, कैकेयीची सामोपचारानें, सेवा करील नां ? ८ हे लक्ष्मणा, विदेहराजकन्या जर जिवंत असेल तर मी आश्रमामध्यें पुन्हा जाईन; परंतु, ती जर मृत झाली असेल तर मी प्राणत्याग करीन ९. हे लक्ष्मणा, मी आश्रमांत जातांक्षणीं समोर येऊन सीतेनें जर माझ्याशीं भाषण केलें नाहीं तर मी नाश पावणार १०. हे लक्ष्मणा, सीता जिवंत आहे किंवा नाहीं? अरे, गाफीलपणानें तूं येथें निघून आल्यामुळें त्या बिचारीला राक्षसांनीं भक्षण करून टाकिलें कीं काय? ११ ती विदेहराजकन्या सुकुमार व अद्यापि लहान असून नेहमीं सुखामध्येंच रहाणारी आहे. तेव्हां माझ्या वियोगामुळें निःसंशय ती खिन्न होऊन कोठें तरी शोक करीत असेल १२. " हे लक्ष्मणा " ह्मणून अतिशय उच्च स्वरानें आरोळी

स स्वरः सदृशो मम । त्वया प्रेषितस्त्वं च द्रष्टुं मां शीघ्रमागतः १४
सर्वथा तु कृतं कष्टं सीतामुत्सृजता वने । प्रतिकर्तुं नृशंसानां रक्षसां दत्त-
मन्तरम् १५ दुःखिताः खरघातेन राक्षसाः पिशिताशनाः । तैः सीता
निहता घोरैर्भविष्यति न संशयः १६ अहोस्मि व्यसने मग्नः सर्वथा रिपु-
नाशन । किं त्विदानीं करिष्यामि शङ्के प्राप्तव्यमीदृशम् १७ इति सीतां वरा-
रोहां चिन्तयन्नेव राघवः । आजगाम जनस्थानं त्वरया सहलक्ष्मणः १८
विगर्हमाणोनुजमार्तरूपं क्षुधाश्रमेणैव पिपासया च । विनिःश्वसञ्शुष्क-
मुखो विषण्णः प्रतिश्रयं प्राप्य समीक्ष्य शून्यम् १९ स्वमाश्रमं स प्रवि-
गाह्य वीरो विहारदेशाननुसृत्य कांश्चित् । एतत्तदित्येव निवासभूमौ प्रहृ-
ष्टरोमा व्यथितो बभूव २० [ ११९७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्येरण्यकाण्डेष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

---

ठोकणाऱ्या त्या अत्यंत दुष्ट व कुटिल राक्षसानें तुझे ठिकाणींही निःसंशय भय उत्पन्न केलें असावें असें मला वाटतें १३. माझ्यासारिखा जो त्यानें स्वर काढिला तो सीतेनें ऐकिला आणि तिनें भयभीत होऊन तुला पाठविल्यामुळें तूं मला पाहण्याकरितां सत्वर येथें आला आहेस असें मला वाटतें १४. अरे, सीतेला वनामध्यें टाकून येथें आलास ही गोष्ट तूं सर्वस्वीं वाईट केलीस. कारण, दुष्ट राक्षसांना आपला सूड उगविण्याची ही तूं संधिच आणून दिलीस १५. खराचा वध झाल्यामुळें त्या मांसभक्षक राक्षसांना दुःख झालें होतें. तेव्हां त्या घोर राक्षसांनीं सीतेचा वध केला असेल ह्यांत संशय नाहीं १६. हे शत्रुनाशका लक्ष्मणा, मी सर्वस्वीं संकटांत बुडून गेलों आहें; ह्यामुळें सांप्रत काय करावें? अरे, अशा प्रकारचें प्राप्त होणारें दुःख आपणांला अनुभवावें लागणारच अशी मला शंका येते " १७. ह्याप्रमाणें सुंदरी सीतेसंबंधानेंच मनामध्यें चिंतन करीत असलेला तो रघुवंशज राम लक्ष्मणासहवर्तमान सत्वर जनस्थानामध्यें परत आला १८ आश्रमाचे संनिध असलेला प्रदेश सीतेनें विरहित आहे असें अवलोकन करून रामाचें मुख निस्तेज झालें, तो मनामध्यें खिन्न झाला, दुःखाचे सुस्कारे टाकूं लागला आणि क्षुधा, तृषा व श्रम ह्यांच्या योगानें व्याकुल झालेल्या आपल्या कनिष्ठ भ्रात्याची निंदा करूं लागला १९. तदनतर आपल्या आश्रमामध्यें तो वीर राम प्रविष्ट झाल्यावर तेथील कांहीं क्रीडास्थानांकडे गेला, आणि ( तेथेंही सीता नाहीं असें आढळून आल्यावर ) निवासस्थानामध्यें ( अमुक अमुक क्रीडा ज्या ठिकाणीं आपण केली ) तेंच हें ठिकाण असें स्मरण होतांक्षणीं त्याच्या अंगावर रोमांच उठले आणि तो फारच दुःखाकुल झाला २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक

अथाश्रमादुपावृत्तमन्तरा रघुनन्दनः। परिपप्रच्छ सौमित्रिं रामो दुःखार्दितं वचः १ तमुवाच किमर्थं त्वमागतोपास्य मैथिलीम् । यदा सा तव विश्वासाद्वने विरहिता मया २ दृष्ट्वैवाभ्यागतं त्वां मे मैथिलीं त्यज्य लक्ष्मण । शङ्कमानं महत्पापं यत्सत्यं व्यथितं मनः ३ स्फुरते नयनं सव्यं बाहुश्च हृदयं च मे । दृष्ट्वा लक्ष्मण दूरे त्वां सीताविरहितं पथि ४ एवमुक्तस्तु सौमित्रिर्लक्ष्मणः शुभलक्षणः । भूयो दुःखसमाविष्टो दुःखितं राममब्रवीत् ५ न स्वयं कामकारेण तां त्यक्त्वाहमिहागतः । प्रचोदितस्तयैवोग्रैस्त्वत्सकाशमिहागतः ६ आर्येणेव परिक्रुष्टं लक्ष्मणेति सुविस्वरम् । परित्राहीति यद्वाक्यं मैथिल्यास्तच्छ्रुतिं गतम् ७ सा तमार्तस्वरं श्रुत्वा तव स्नेहेन मैथिली । गच्छ गच्छेति मामाशु रुदती भयविक्लवा ८ प्रचोद्यमानेन मया गच्छेति बहुशस्तया । प्रत्युक्ता मैथिली वाक्यमिदं तत्प्रत्ययान्वितम् ९ न तत्पश्याम्यहं रक्षो यदस्य भयमावहेत् । निर्वृता

---

आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

सीतेच्या सांगण्यावरून आश्रमांतून निघून मार्गामध्यें आपल्यासमीप आलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला रघुनंदन राम दुःखानें ह्मणाला १ " मी तुझ्या विश्वासामुळें सीतेला वनामध्यें सोडून आलों होतों; तर तिला सोडून तूं कशाकरितां येथें आलास?२. मारीच राक्षस जेव्हां माझ्यासारखी आरोळी देऊं लागला तेव्हां फारच वाईट गोष्ट घडल्याची जी शंका येऊन माझें मन व्याकुल झालें होतें ती, हे लक्ष्मणा, सीतेला सोडून तूं आला आहेस असें पाहतांक्षणींच खरी ठरली ३. कारण, हे लक्ष्मणा, सीतेविरहित असलेल्या तुला मार्गामध्यें दूर अवलोकन करितांच माझा डावा डोळा लवूं लागला आणि डावा बाहुटा व हृदयाचा डावा भाग हे स्फुरण पावूं लागले " ४. ह्याप्रमाणें शुभलक्षणसंपन्न सुमित्रापुत्र लक्ष्मणाला राम बोलला असतां अधिकच दुःखाकुल झालेला तो लक्ष्मण दुःखित अशा रामाला ह्मणाला ५ " मी स्वतः आपल्या इच्छेनें तिचा त्याग करून येथें आलों नाहीं; दुःसह शब्द उच्चारून तिनेंच आज्ञा केल्यामुळें मी येथें आपल्या समीप आलों आहें ६. " हे लक्ष्मणा, रक्षण कर " ह्मणून अतिशय भयंकर गळा काढून तुमच्यासारिखी जी आरोळी कोणीं दिली ती सीतेच्या कानावर गेली ७ आणि तो आर्त शब्द कानावर पडतांक्षणींच आपल्या ठिकाणीं सीतेचें प्रेम असल्यामुळें ती भीतीनें गांगरून जाऊन " जा, सत्वर जा " असें रडत रडत मला ह्मणाली ८. ह्याप्रमाणें " जा, जा " ह्मणून वारंवार जेव्हां ती मला जाण्याविषयीं आग्रह करूं लागली तेव्हां तिचा विश्वास बसेल अशा रीतीनें मीं उलट भाषण तिच्याशीं केलें ९. (मी ह्मणालों)

भव नास्त्येतत्केनाप्येतदुदाहृतम् १० विगर्हितं च नीचं च कथमार्योऽभि-
धास्यति । त्राहीति वचनं सीते यस्त्रायेत्त्रिदशानपि ११ किंनिमित्तं तु
केनापि भ्रातुरालम्ब्य मे स्वरम् । विस्वरं व्याहृतं वाक्यं लक्ष्मण त्राहि
मामिति १२ राक्षसेनेरितं वाक्यं त्रासात्त्राहीति शोभने । न भवत्या
व्यथा कार्या कुनारीजनसेविता १३ अलं विक्लवतां गन्तुं स्वस्था भव
निरुत्सुका । न चास्ति त्रिषु लोकेषु पुमान्यो राघवं रणे १४ जातो वा
जायमानो वा संयुगे यः पराजयेत् । अजेयो राघवो युद्धे देवैः शक्रपुरो-
गमैः १५ एवमुक्ता तु वैदेही परिमोहितचेतना । उवाचाश्रूणि मुञ्चन्ती
दारुणं मामिदं वचः १६ भावो मयि तवात्यर्थं पाप एव निवेशितः । विनष्टे
भ्रातरि प्राप्तुं न च त्वं मामवाप्स्यसि १७ संकेताद्भरतेन त्वं रामं समनुग-
च्छसि । क्रोशन्तं हि यथात्यर्थं नैनमभ्यवपद्यसे १८ रिपुः प्रच्छन्नचारी

---

रामाला भीति उत्पन्न करणारा असा कोणीही राक्षस माझ्या आढळण्यांत येत नाहीं. तूं स्वस्थ रहा; ही आरोळी रामाची नव्हे. दुसऱ्यानेंच कोणीतरी ही आरोळी दिली आहे १०. कारण, हे सीते, प्रसंग पडला असतां देवांचें सुद्धां जो रक्षण करील तो आर्य राम क्षत्रियाला अयोग्य आणि ह्मणूनच निंद्य असें " रक्षण कर " हे शब्द कसे उच्चारील ? ११. कांहीं तरी वाईट हेतु मनामध्यें धरून कोणी तिसऱ्यानेंच माझ्या भ्रात्याच्या ध्वनीचें अवलंबन करून " हे लक्ष्मणा, मला तार " असें वाक्य दुःखित स्वरानें उच्चारिलें आहे १२. सारांश, हे कल्याणि, भयभीत झाल्यामुळें " त्राहि त्राहि " हे शब्द कोणीं राक्षसानेंच उच्चारिले आहेत. तव्हां निंद्य स्त्रियांनाच योग्य असलेलें दुःख करण्याचें तुला कारण नाहीं १३. तुझें खिन्न होणें आतां पुरे. तूं स्वस्थ हो; कांहींएक काळजी करूं नकोस; कारण, त्रैलोक्यामध्यें सांप्रत असलेल्या आणि पुढें उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांपैकीं संग्रामामध्यें रघुवंशज रामाचा पराजय कर-णारा असा कोणीही नाहीं; राम युद्धांमध्यें इंद्रप्रभृति देवांनाही अजिंक्यच आहे" १४, १५. ह्याप्रमाणें देहभान नाहींसें झालेल्या सीतेला मीं सांगितलें असतां अश्रु ढाळीत ढाळीत कठोर शब्दांनीं ती मला ह्मणाली १६ " भ्रात्याचा नाश झाल्यावर मी तुझ्या हस्त-गत व्हावें अशी माझ्या संबंधानें अतिशयच पापबुद्धि दुर्दैवानें तुझ्या अंतःकरणामध्यें प्रवृत्त झाली आहे; परंतु, मी तुझ्या हातीं लागणार नाहीं १७. राम तुझ्या नांवानें अतिशय ओरडत असतांनाही ज्याअर्थी तूं त्याच्याकडे जात नाहींस त्याअर्थी भर-ताशीं ( कांहीं तरी निंद्य ) संकेत करून तूं रामाच्या मागोमाग वनामध्यें आला आहेस; परंतु, हा तुझा मनोरथ सिद्धीस जाणार नाहीं १८. कपटानें वागणारा तूं वस्तुतः

त्वं मदर्थमनुगच्छासि । राघवस्यान्तरं प्रेप्सुस्तथैनं नाभिपद्यसे १९ एवमुक्तस्तु वैदेह्या संरब्धो रक्तलोचनः । क्रोधात्प्रस्फुरमाणोष्ठ आश्रमादभिनिर्गतः २० एवं ब्रुवाणं सौमित्रिं रामः संतापमोहितः । अब्रवीद्दुष्कृतं सौम्य तां विना त्वमिहागतः २१ जानन्नपि समर्थं मां रक्षसामपवारणे। अनेन क्रोधवाक्येन मैथिल्या निर्गतो भवान् २२ न हि ते परितुष्यामि त्यक्त्वा यदसि मैथिलीम् । क्रुद्धायाः परुषं श्रुत्वा स्त्रिया यत्त्वमिहागतः २३ सर्वथा त्वपनीतं ते सीतया यत्प्रचोदितः । क्रोधस्य वशमागम्य नाकरोः शासनं मम २४ असौ हि राक्षसः शेते शरेणाभिहतो मया । मृगरूपेण येनाहमाश्रमादपवाहितः २५ विकृष्य चापं परिधाय सायकं सलीलबाणेन च ताडितो मया । मार्गीं तनुं त्यज्य च विक्लवस्वरो बभूव केयूरधरः स राक्षसः २६ शराहतेनैव तदार्तया गिरा स्वरं ममालम्ब्य सुदूरसुश्रवम् । उपाहृतं तद्वचनं सुदारुणं त्वमागतो येन विहाय मैथि-

---

शत्रुच माझा अपहार करण्याच्या इच्छेनें रामाचे बरोबर आला आहेस आणि राम दृष्टीआड होण्याची वाट पहात आहेस; परंतु, हा तुझा मनोरथ परिपूर्ण होणार नाहीं" १९. ह्याप्रमाणें सीता मला बोलली असतां मी क्षुब्ध झालों, क्रोधानें डोळे लाल होऊन ओठ स्फुरण पावूं लागले व रागारागानेंच मी त्या आश्रमांतून बाहेर निघालों" २०. ह्याप्रमाणें सुमित्रापुत्र लक्ष्मण सांगत असतांना दुःखामुळें मोहित झालेला राम त्याला म्हणाला "हे विनयसंपन्न लक्ष्मणा, सीतेवांचून तूं येथें आलास ही गोष्ट तूं अयोग्य केलीस २१. राक्षसांचें निवारण करण्यास मी समर्थ आहें असें जाणीत असूनही सीतेच्या ह्या क्रोधमूलक भाषणावरून तूं आश्रमांतून बाहेर पडलास हें नीट नाहीं २२. क्रुद्ध झालेल्या स्त्रीचें कठोर भाषण श्रवण केल्यावर त्या सीतेचा त्याग करून ज्याअर्थी तूं येथें आला आहेस त्याअर्थीं ह्या तुझ्या करण्यापासून मला संतोष होत नाहीं २३. सीतेनें रागारागानें सांगितल्यामुळें तूंही क्रोधाच्या अधीन होऊन माझ्या आज्ञेप्रमाणें वागला नाहींस हा सर्वस्वीं तुझा अपराध आहे २४. असो. ज्यानें मृगरूप धारण करून मला आश्रमांतून दूर नेलें तो हा राक्षस मीं टाकिलेल्या बाणामुळें वध पावून येथें पडला आहे २५. मी धनुष्य ओढून त्याला बाण लाविला आणि तें धनुष्य विशेष आकर्षण न करितांच सहज तो बाण त्या मृगावर सोडिला; तेव्हां तो बाण लागतांक्षणीं मृगरूपाचा त्याग करून तो बाहुभूषणें धारण करणारा राक्षस बनला आणि दुःखाच्या आरोळ्या ठोकूं लागला २६. बाण लागतांक्षणीं फारच लांब ऐकूं जाइल अशा रीतीनें माझ्या स्वराचें अवलंबन करून व्याकुल वाणीनें त्या राक्षसानें

लीम् २७ [१९४४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनषष्टितमः सर्गः ॥ ५९ ॥

भृशमाव्रजमानस्य तस्याधो वामलोचनम् । प्रास्फुरच्चास्खलद्रामो वेपथुश्चास्य जायते १ उपालक्ष्य निमित्तानि सोऽशुभानि मुहुर्मुहुः । अपि क्षेमं तु सीताया इति वै व्याजहार ह २ त्वरमाणो जगामाथ सीतादर्शनलालसः । शून्यमावसथं दृष्ट्वा बभूवोद्विग्नमानसः ३ उद्भ्रमन्निव वेगेन विक्षिपन्रघुनन्दनः । तत्र तत्रोटजस्थानमभिवीक्ष्य समन्ततः ४ ददर्श पर्णशालां च सीतया रहितां तदा । श्रिया विरहितां ध्वस्तां हेमन्ते पद्मिनीमिव ५ रुदन्तमिव वृक्षैश्च ग्लानपुष्पमृगद्विजम् । श्रिया विहीनं विध्वस्तं संत्यक्तं वनदैवतैः ६ विप्रकीर्णाजिनकुशं विप्रविद्धबृसीकटम् । दृष्ट्वा शून्योटजस्थानं विललाप पुनः पुनः ७ हृता मृता वा नष्टा वा

---

फारच भयंकर शब्द उच्चारिले व त्यामुळेंच तूं सीतेचा त्याग करून येथें आलास २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला ॥ ५९ ॥

राम आश्रमाकडे येऊं लागला असतां त्याचा डावा डोळा खालच्या बाजूला अतिशयच लवूं लागला, चालतांना तो अडखळूं लागला आणि त्याच्या शरीरालाही कंप सुटूं लागला १. अशा प्रकारचीं अशुभ चिन्हें वारंवार अवलोकन केल्यावर " सीतेचें कुशल असेल काय " असे शब्द तो उच्चारूं लागला २. सीतेच्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला तो राम त्वरेत्वरेनें आश्रमासमीप आला आणि त्या निवासस्थानामध्यें सीता नाहीं असें आढळून आल्यावर मनामध्यें उद्विग्न झाला ३. हातवारे करून तो रघुनंदन राम इकडे तिकडे हिंडूं लागला आणि सीता असेल ह्या आशेनें तो त्या पर्णकुटिकेंतील प्रदेश सर्व बाजूंनीं पाहूं लागला ४. नंतर हेमंत ऋतूमध्यें कमलांचा विध्वंस झाल्यामुळें शोभारहित असलेल्या सरोवराप्रमाणें सीतेनें रहित असलेली ती पर्णकुटिका रामानें अवलोकन केली ५ आणि त्याचप्रमाणें आश्रमही अवलोकन केल्यावर तो वारंवार विलाप करूं लागला. कारण, त्यांतील पुष्प, पशु व पक्षी हीं सर्व निस्तेज झाल्याकारणानें वृक्षांच्या योगानें त्याला शोभा न येतां उलट तो रडतच आहे कीं काय असा भासत होता. विध्वंस झाल्यामुळें त्यांत शोभा कसली ती राहिली नव्हती; वनदेवताही त्याला सोडून गेल्या होत्या; कृष्णाजिनें व दर्भ अस्ताव्यस्त पडले होते; दर्भासनें व चटाया फाटून गेलेल्या होत्या आणि आंतील पर्णकुटिकांतून कोणीही नव्हतें ६,७. ( अशा प्रकारचा आश्रम अवलोकन केल्यावर विलाप करूं लागलेला

भक्षिता वा भविष्यति । निलीनाप्यथवा भीरुरथवा वनमाश्रिता ८ गता विचेतुं पुष्पाणि फलान्यपि च वा पुनः । अथवा पद्मिनीं याता जलार्थं वा नदीं गता ९ यत्नान्मृगयमाणस्तु नाससाद वने प्रियाम् । शोकरक्तेक्षणः श्रीमानुन्मत्त इव लक्ष्यते १० वृक्षाद्वृक्षं प्रधावन्स गिरींश्चापि नदीनदम् । बभ्राम विलपन्रामः शोकपङ्कार्णवप्लुतः ११ अस्ति कच्चित्त्वया दृष्टा सा कदम्बप्रिया प्रिया । कदम्ब यदि जानीषे शंस सीतां शुभाननाम् १२ स्निग्धपल्लवसंकाशां पीतकौशेयवासिनीम् । शंसस्व यदि सा दृष्टा बिल्व-बिल्वोपमस्तनी १३ अथवार्जुन शंस त्वं प्रियां तामर्जुनप्रियाम् । जनकस्य सुता तन्वी यदि जीवति वा न वा १४ ककुभः ककुभोरूं तां व्यक्तं जानाति मैथिलीम् । लतापल्लवपुष्पाढ्यो भाति ह्येष वनस्पतिः १५

---

राम आपल्याशीं ह्मणाला ) " सीतेला कोणी तरी नेली असेल, ती मेली असेल, तिचा पत्ता नाहींसा झाला असेल, कोणी तिला भक्षण करून टाकिली असेल, ती भित्री कोठें तरी दडून राहिली असेल, किंवा तिनें कदाचित् वनाचें अवलंबन केलें असेल ८. पुष्पें आणि फलें गोळा करण्याकरितां कदाचित् ती गेली असेल किंवा उदकाकरितां सरोवराकडे अथवा नदीकडे कदाचित् ती गेली असेल " ९. अशाप्रकारें तर्क करून राम प्रयत्नपूर्वक तिला शोधूं लागला असतांही जेव्हां वनामध्यें ती प्रिया त्याला मिळाली नाहीं तेव्हां शोकानें नेत्र आरक्तवर्ण झाल्यामुळें तो वैभवशाली राम उन्मत्तासारिखा दिसूं लागला १०. शोकरूप चिखलानें युक्त असलेल्या दुःखसागरामध्यें बुडून गेलेला तो राम विलाप करीत करीत ह्या वृक्षापासून त्या वृक्षाकडे धांवूं लागला आणि पर्वत, नद्या व नद हिंडूं लागला ११. "हे कदंबवृक्षा, माझ्या त्या प्रियेला कदंबवृक्ष प्रिय आहेत; तेव्हां ती तुझ्या कोठें दृष्टीं पडत आहे? अरे, तुला जर ठाऊक असेल तर ती सुमुखी सीता कोठें आहे हें मला सांग १२. स्निग्ध पल्लवाप्रमाणें जिचें शरीर कोमल आहे आणि जी पिंवळी पैठणी नेसली आहे ती सीता कोठें आहे हें मला सांग. अरे, बेलफळाचीच उपमा देण्यास योग्य असे जिचे स्तन आहेत ती सीता जर तुझ्या दृष्टीं पडली असल तर मला सांग १३. अथवा, हे अर्जुनवृक्षा, अर्जुनवृक्ष जिला प्रिय आहेत अशी ती माझी प्रिया कोठें आहे हें तूं तरी सांग. अरे, ती जनककन्या सुंदरी सीता जिवंत आहे किंवा नाहीं ( हें काय तें मला कळूं दे ) १४. सीतेच्या मांड्या ककुभवृक्षाप्रमाणें तुळतुळीत आहेत; तेव्हां ह्या ककुभ वृक्षाला ती कोठें आहे हें निःसंशय माहीत असेलच. ज्याअर्थी लता, पल्लव आणि पुष्पें ह्यांनीं हा वृक्ष समृद्ध दिसत आहे, त्याअर्थीं ह्याला सीतेची माहिती

भ्रमरैरुपगीतश्च यथा द्रुमवरो ह्यसि। एष व्यक्तं विजानाति तिलकस्ति-लकप्रियाम् १६ अशोक शोकापनुद शोकोपहतचेतनम् । त्वन्नामानं कुरु क्षिप्रं प्रियासंदर्शनेन माम् १७ यदि ताल त्वया दृष्टा पक्वतालोपमस्तनी। कथयस्व वरारोहां कारुण्यं यदि ते मयि १८ यदि दृष्टा त्वया जम्बो जाम्बूनदसमप्रभा । प्रियां यदि विजानासि निःशङ्कं कथयस्व मे १९ अहो त्वं कर्णिकाराद्य पुष्पितः शोभसे भृशम् । कर्णिकारप्रियां साध्वीं शंस दृष्टा यदि प्रिया २० चूतनीपमहासालान्पनसान्कुररांस्तथा । दाडि-मानपि तान्गत्वा दृष्ट्वा रामो महायशाः २१ बकुलानथ पुन्नागांश्चन्दना-न्केतकांस्तथा । पृच्छन्रामो वने भ्रान्त उन्मत्त इव लक्ष्यते २२ अथवा मृगशावाक्षीं मृग जानासि मैथिलीम् । मृगविप्रेक्षणी कान्ता मृगीभिः सहिता भवेत् २३ गज सा गजनासोरूर्यदि दृष्टा त्वया भवेत् । तां मन्ये

---

आहेच आहे. ( कारण त्यावांचून ह्याचे ठिकाणीं अशी शोभा कोठून रहाणार ?) १५. अरे, तूं वृक्षामध्यें श्रेष्ठ असल्यामुळें भ्रमर तुझ्यासमीप गुंजारव करीत आहेत. (पण माझी सीता कोठें आहे हें तरी मला सांग. ) छे ! सीतेला तिलकवृक्ष प्रिय आहेत. तेव्हां ह्या तिलकवृक्षाला तिची हकीकत निःसंशय माहीत आहे १६. हे अशोका, हे शोकनाशका, शोकामुळें मला कांहीं सुचेनासें झालें आहे. ह्यास्तव, माझी प्रिया मला दाखवून देऊन तूं मला तुझ्या अन्वर्थ नांवानें युक्त कर ( ह्मणजे अशोक करून टाक ) १७. परिपक्व तालफलाप्रमाणें जिचे स्तन आहेत अशी सीता, हे ताल-वृक्षा, तुझ्या तरी कोठें दृष्टीं पडली आहे काय ? माझी जर तुला कांहीं दया येत असेल तर ती सुंदरी कोठें आहे हें मला सांग १८. हे जंबूवृक्षा, सुवर्णासारिख्या कांतीनें युक्त असलेली सीता तुझ्या तरी दृष्टीं पडली आहे काय ? अरे, माझ्या प्रियेचा वृत्तांत जर तुला कांहीं ठाऊक असेल तर तो असेल तसा तूं निःशंकपणें मला कथन कर १९. आं हो ! हे कर्णिकार वृक्षा, तूं आज फारच प्रफुल्लित झालेला दिसत आहेस. तेव्हां माझी प्रिया तुझ्या दृष्टीं पडली आहे काय ? अरे, कर्णिकाराचीं पुष्पें जिला प्रिय आहेत त्या साध्वीची वार्ता तूं मला सांग " २०. ह्याप्रमाणें महायशस्वी राम आम्र, नीप, महासाल, फणस, कुरर आणि दाडिम हे वृक्ष अवलोकन करून सीतेची बातमी विचारण्याकरितां त्यांचेही समीप गेला २१ आणि त्याचप्रमाणें बकुल, पुन्नाग, चंदन व केतक ह्या वृक्षांना विचारीत विचारीत वनामध्यें भटकत असलेला तो राम उन्मत्त पुरुषाप्रमाणें दिसूं लागला २२. " अथवा, हे मृगा, हरणाच्या बछड्याप्रमाणें जिचे डोळे आहेत ती सीता तुला तरी ठाऊक

विदितां तुभ्यमाख्याहि वरवारण २४ शार्दूल यदि सा दृष्टा प्रिया चन्द्रनिभानना । मैथिली मम विस्रब्धः कथयस्व न ते भयम् २५ किं धावसि प्रिये नूनं दृष्टासि कमलेक्षणे । वृक्षैराच्छाद्य चात्मानं किं मां न प्रतिभाषसे २६ तिष्ठ तिष्ठ वरारोहे न तेऽस्ति करुणा मयि । नात्यर्थं हास्यशीलासि किमर्थं मामुपेक्षसे २७ पीतकौशेयकेनासि सूचिता वरवर्णिनि । धावन्त्यपि मया दृष्टा तिष्ठ यद्यस्ति सौहृदम् २८ नैव सा नूनमथवा हिंसिता चारुहासिनी । कृच्छ्रं प्राप्तं हि मां नूनं यथोपेक्षितुमर्हति २९ व्यक्तं सा भक्षिता बाला राक्षसैः पिशिताशनैः । विभज्याङ्गानि सर्वाणि मया विरहिता प्रिया ३० नूनं तच्छुभदन्तोष्ठं सुनासं शुभकुण्डलम् । पूर्णचन्द्रनिभं ग्रस्तं मुखं निष्प्रभतां गतम् ३१ सा हि चन्दनवर्णाभा ग्रीवा ग्रैवेयकोचिता । कोमला विलपन्त्यास्तु कान्ताया भक्षिता शुभा ३२ नूनं विक्षि-

---

आहे काय ? कारण, हरिणाक्षी स्त्री हरिणींबरोबरच असली पाहिजे २३. हे गजा, गजशुंडेप्रमाणें जिच्या मांड्या आहेत ती सीता तुझ्या दृष्टीं पडली असेल; ती तुला माहीत आहेच असें मला वाटतें. करितां, हे श्रेष्ठ गजा, तूं मला तिची हकीकत सांग २४ हे व्याघ्रा, चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती प्रिया मिथिलराजकन्या जर तुझ्या दृष्टीं पडली असेल तर तूं निर्धास्त राहून मला सांग; माझ्यापासून तुला भय नाहीं २५. हे प्रिये, तूं धांवाधांव कां करीत आहेस ? हे कमलनयने, खरोखर आतां मीं तुला पाहिलेंच. वृक्षांच्या आड लपून तूं माझ्याशीं कां बरें भाषण करीत नाहींस ? २६. हे सुंदरि, थांब, थांब ! तुला कांहीं माझी दया येत नाहीं. तुझा स्वभावही फार थट्टेखोर नाहीं. मग असें असतांना तूं आतां कां बरें माझी उपेक्षा करीत आहेस ? २७. हे श्रेष्ठ स्त्रिये, पिंवळ्या पैठणीवरून तर मीं तुला ओळखिलेंच आहे आणि धांवतां धांवतांहीं तूं माझ्या दृष्टीं पडली आहेस. तेव्हां माझे ठिकाणीं जर कांहीं तुझें प्रेम असेल तर थांब २८. छः ! खरोखर ती सीता नव्हेच. त्या सुहास्यवदनेचा खास कोणीतरी वध केला आहे. कारण, ती जर येथें असेल तर अशाप्रकारें मी संकटांत सांपडलों असतांना माझी जरूर बाळगीलच बाळगील २९. माझा विरह झालेल्या त्या बालेला तिच्या सर्व अवयवांचे तुकडे तुकडे करून मांसभक्षक राक्षसांनीं निःसंशय भक्षण केलें आहे ३०. शुभ दंत व ओठ, उत्कृष्ट नासिका, आणि शुभ कुंडलें ह्यांनीं युक्त असून पूर्ण चंद्राप्रमाणें उज्ज्वल असलेलें तिचें मुख ( माझ्या वियोगामुळें ) निस्तेज झालें असतां खरोखर राक्षसांनीं भक्षण करून टाकिलें आहे ३१. माझ्याकरितां विलाप करीत बसलेल्या त्या कांतेचीं कंठभूषणें

ष्यमाणौ तौ बाहू पल्लवकोमलौ । भक्षितौ वेपमानाग्रौ सहस्ताभरणाङ्गदौ ३३ मया विरहिता बाला रक्षसां भक्षणाय वै । सार्थेनेव परित्यक्ता भक्षिता बहुबान्धवा ३४ हा लक्ष्मण महाबाहो पश्यसे त्वं प्रियां क्वचित् । हा प्रिये क्व गता भद्रे हा सीतेति पुनः पुनः ३५ इत्येवं विलपन्रामः परिधावन्वनाद्वनम् । क्वचिदुद्भ्रमते वेगात्क्वचिद्विभ्रमते बलात् ॥ क्वचिन्मत्त इवाभाति कान्तान्वेषणतत्परः ३६ स वनानि नदीः शैलान्गिरिप्रस्रवणानि च । काननानि च वेगेन भ्रमत्यपरिसंस्थितः ३७ तदा स गत्वा विपुलं महद्वनं परीत्य सर्वं त्वथ मैथिलीं प्रति । अनिष्ठिताशः स चकार मार्गणे पुनः प्रियायाः परमं परिश्रमम् ३८ [ १९८२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

दृष्ट्वाश्रमपदं शून्यं रामो दशरथात्मजः । रहितां पर्णशालां च प्रविद्धान्यासनानि च १ अदृष्ट्वा तत्र वैदेहीं संनिरीक्ष्य च सर्वशः । उवाच

---

नेहमीं धारण करण्याची संवय असलेली ती चंदनासारिखी गौरवर्ण, शुभ व कोमल मान राक्षसांनीं भक्षण करून टाकिली ३२ आणि तसेंच पल्लवांप्रमाणें कोमल, इकडे तिकडे चलनवलन करणारे व हस्तभूषणें, बाहुभूषणें आणि कांपरें भरलेलीं बोटें ह्यांनीं युक्त असलेले ते तिचे हातही खरोखर राक्षसांनीं खाऊन टाकिले ३३. पुष्कळ नातेवाईक असूनही ज्याप्रमाणें अरण्यामध्यें जनसमुदायानें त्याग केलेल्या स्त्रियेला राक्षसांनीं भक्षण करून टाकावें त्याप्रमाणें राक्षसांच्या भक्षणाकरितां मी त्या बालेला टाकून गेलों ३४. हे महापराक्रमी लक्ष्मणा, तूं कोठें प्रियेला अवलोकन करीत आहेस काय ? हे प्रिये, हे कल्याणि, हे सीते, कोठे गे गेलीस ! ह्याप्रमाणें वारंवार ३५ विलाप करूं लागलेला राम ह्या वनापासून त्या वनांत धांवाधांव करूं लागला असतां कोठें कोठें उड्या मारूं लागला आणि कोठें कोठें शोकबलामुळें घिरट्या घालूं लागला. भार्येचा शोध लावण्यामध्यें गढून गेलेला तो राम कांहीं वेळ उन्मत्त पुरुषाप्रमाणें भासूं लागला ३६. सारांश, एक क्षणभरही कोठें न ठरतां वेगानें तो अरण्यें, नद्या, पर्वत, पर्वतावरील जलप्रवाह आणि कुंजवनें हिंडूं लागला ३७. हिंडतां हिंडतां तो मोठ्या प्रचंड वनामध्यें गेल्यावर मैथिलीकरितां तो बाजूनीं हिंडला आणि निराश जरी झाला तथापि पुनरपि प्रियेच्या शोधाकरितां तो पराकाष्ठेचे श्रम घेऊं लागला ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६० ॥

दशरथकुमार राम आश्रमामध्यें गेला असतां तेथें कोणी नाहीं, पर्णशालेमध्येंही

रामः प्राक्रुश्य प्रगृह्य रुचिरौ भुजौ २ क नु लक्ष्मण वैदेही कं वा देश-मितो गता । केनाहृता वा सौमित्रे भक्षिता केन वा प्रिया ३ वृक्षेणा-वार्य यदि मां सीते हसितुमिच्छसि । अलं ते हसितेनाद्य मां भजस्व सुदुःखितम् ४ यैः परिक्रीडसे सीते विश्वस्तैर्मृगपोतकैः । एते हीनास्त्वया सौम्ये ध्यायन्त्यस्राविलेक्षणाः ५ सीतया रहितोऽहं वै नहि जीवामि लक्ष्मण । वृतं शोकेन महता सीताहरणजेन माम् ६ परलोके महाराजो नूनं द्रक्ष्यति मे पिता । कथं प्रतिज्ञां संश्रुत्य मया त्वमभियोजितः ७ अपूर-यित्वा तं कालं मत्सकाशमिहागतः । कामवृत्तमनार्यं वा मृषावादिनमेव च ८ धिक्त्वामिति परे लोके व्यक्तं वक्ष्यति मे पिता । विवशं शोकसं-तप्तं दीनं भग्नमनोरथम् ९ मामिहोत्सृज्य करुणं कीर्तिर्नरमिवानृजुम् । क गच्छसि वरारोहे मा मोत्सृज सुमध्यमे १० त्वया विरहितश्चाहं त्यक्ष्ये जीवितमात्मनः । इतीव विलपन्रामः सीतादर्शनलालसः ११ न ददर्श

कोणी नाहीं व आसनें अस्ताव्यस्त पडलीं आहेत असें त्याला आढळून आलें १. सर्व बाजूंनीं पाहिलें असतांही जेव्हां सीता तेथें दृष्टीं पडेना तेव्हां आपले मनोहर हात उभारून आणि आक्रोश करून राम ह्मणाला २ " हे लक्ष्मणा, सीता कोठें आहे ? येथून कोणत्या प्रदेशाला ती गेली आहे ? हे सुमित्रापुत्रा लक्ष्मणा, तिला कोणीं घेऊन गेला आहे कीं काय अथवा ती प्रिया कोणीं भक्षण केली आहे कीं काय ? ३ हे सीते, झाडाच्या आड लपून जर तूं माझी थट्टा करीत असशील तर ही तुझी थट्टा आज पुरे; अतिशयच दुःखित झालेल्या माझा तू स्वीकार कर ४. हे विनयसंपन्न सीते, नेहमींच्या सहवासामुळें निर्धास्त झालेल्या ज्या हरिणबालकांबरोबर तूं क्रीडा करीत होतीस त्या ह्या हरिणबालकांचे नेत्र तुझा वियोग झाल्यामुळें अश्रूंनीं कलुषित झाले असून हे तुझें चिंतन करीत आहेत ५. हे लक्ष्मणा, सीतेवांचून मी जिवंत राहणार नाहीं. माझा पिता महाराज दशरथ खरोखर सीताहरणजन्य शोकानें ग्रस्त झालेल्या मला परलोकीं अवलोकन करील. सीतेच्या रक्षणार्थ मीं तुझी योजना केली असतां तूं माझ्याशीं प्रतिज्ञा केली असूनही ६, ७ तितका कालपर्यंत सीतेचें रक्षण न करितां तूं माझ्यासमीप येथें आलास ह्यामुळें माझा पिता परलोकीं तुला स्वच्छाचारी, दुष्ट अथवा असत्यवादी ह्मणेल किंवा " तुला धिक्कार असो " असें तरी खचित ह्मणेल. धैर्यहीन, शोकसंतप्त, दीन, मनोरथ भग्न झालेला ८, ९ आणि ह्मणूनच दयेला पात्र अस-लेल्या ' माझा कुटिल पुरुषाचा त्याग करून जाणाऱ्या कीर्तीप्रमाणें ' त्याग करून हे सुंदरि, तूं कोठें जात आहेस? हे कृशोदरि, तूं मला सोडून जाऊं नको १०. तुझा विरह झाला असतां

सुदुःखार्तो राघवो जनकात्मजाम् । अनासाद्यमानं तं सीताशोकपरायणम् १२ पङ्कमासाद्य विपुलं सीदन्तमिव कुञ्जरम् । लक्ष्मणो राममत्यर्थमुवाच हितकाम्यया १३ मा विषादं महाबुद्धे कुरु यत्नं मया सह । इदं गिरिवरं वीर बहुकन्दरशोभितम् १४ प्रियकाननसंचारा वनोन्मत्ता च मैथिली । सा वनं वा प्रविष्टा स्यान्नलिनीं वा सुपुष्पिताम् १५ सरितं वापि संप्राप्ता मीनवञ्जुलसेविताम् । वित्रासयितुकामा वा लीना स्यात्काननं क्वचित् १६ जिज्ञासमाना वैदेही त्वां मां च पुरुषर्षभ । तस्या ह्यन्वेषणे श्रीमन्क्षिप्रमेव यतावहे १७ वनं सर्वं विचिनुवो यत्र सा जनकात्मजा । मन्यसे यदि काकुत्स्थ मा स्म शोके मनः कृथाः १८ एवमुक्तः स सौहार्दाल्लक्ष्मणेन समाहितः । सह सौमित्रिणा रामो विचेतुमुपचक्रमे १९ तौ वनानि गिरींश्चैव सरितश्च सरांसि च । निखिलेन विचिन्वन्तौ सीतां

---

मी आपल्या जीविताचा त्याग करीन ". ह्याप्रमाणें सीतेच्या दर्शनाकरितां उत्सुक असलेला तो राम विलाप करूं लागला ११ आणि अत्यंत दुःखित झाला. तथापि, जनककन्या सीता त्या रघुवंशाच्या दृष्टीं पडली नाहीं. तेव्हां अतिशय खोल चिखल प्राप्त झाल्यामुळें आंत रुतून जाणाऱ्या गजाप्रमाणें सीता प्राप्त होत नसल्यामुळें शोकाकुल होऊन तो राम, शोकसागरांत फारच मग्न होऊं लागला असतां त्याच्या हिताची इच्छा धरून लक्ष्मण त्याला ह्मणाला १२, १३ " हे महाबुद्धे, तूं खेद करूं नकोस. माझ्यासहवर्तमान तिला शोधण्याचा यत्न कर. हे वीरा, हा श्रेष्ठ पर्वत नानाप्रकारच्या गुहांनीं सुशोभित झालेला आहे १४ आणि सीतेला वनामध्यें संचार करणें प्रिय आहे. तेव्हां वन अवलोकन करून जर ती हर्षयुक्त झाली असेल तर ती एकाद्या वनामध्यें किंवा प्रफुल्लित झालेल्या सरोवरामध्यें प्रविष्ट झाली असेल १५. कदाचित्, मत्स्य आणि वेतस् ह्यांनीं युक्त असलेल्या एकाद्या नदीकडे ती गेली असेल किंवा आपल्याला घाबरवून टाकण्याकरितां ती कदाचित् कोठें तरी वृक्षसमूहामध्यें दडून बसली असेल १६. हे पुरुषश्रेष्ठा, आपण तिचा शोध करितों किंवा नाहीं ह्याबद्दल तुझी व माझी परीक्षा करण्याकरितां कोठें तरी ती लपून बसली आहे. ह्यास्तव, हे वैभवशाली रामा, तिला हुडकून काढण्याविषयीं आपण सत्वरच यत्न करूं १७. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, ज्या ठिकाणीं ती सीता आहे असें तुला वाटत असेल तें सर्व वन आपण धुंडून काढूं; परंतु, तूं शोक करण्याचें मनामध्यें आणूं नकोस " १८. ह्याप्रमाणें प्रेमामुळें लक्ष्मणानें भाषण केलें असतां तो राम स्थिर झाला आणि त्या लक्ष्मणाला बरोबर घेऊन तिला हुडकूं लागला १९. ते दशरथकुमार वनें, पर्वत, नद्या व

दशरथात्मजौ २० तस्य शैलस्य सानूनि शिलाश्च शिखराणि च । निखि-
लेन विचिन्वन्तौ नैव तामभिजग्मतुः २१ विचित्य सर्वतः शैलं रामो
लक्ष्मणमब्रवीत् । नेह पश्यामि सौमित्रे वैदेहीं पर्वते शुभाम् २२ ततो
दुःखाभिसंतप्तो लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् । विचरन्दण्डकारण्यं भ्रातरं दीप्त-
तेजसम् २३ प्राप्स्यसे त्वं महाप्राज्ञ मैथिलीं जनकात्मजाम् । यथा विष्णु-
र्महाबाहुर्बलिं बद्ध्वा महीमिमाम् २४ एवमुक्तस्तु वीरेण लक्ष्मणेन स
राघवः । उवाच दीनया वाचा दुःखाभिहतचेतनः २५ वनं सुविचितं
सर्वं पद्मिन्यः फुल्लपङ्कजाः । गिरिश्चायं महाप्राज्ञ बहुकन्दरनिर्झरः २६
न हि पश्यामि वैदेहीं प्राणेभ्योऽपि गरीयसीम् २७ एवं स विलपन्रामः
सीताहरणकर्शितः । दीनः शोकसमाविष्टो मुहूर्तं विह्वलोऽभवत् २८ स
विह्वलितसर्वाङ्गो गतबुद्धिर्विचेतनः । विषसादातुरो दीनो निःश्वस्याशी-
तमायतम् २९ बहुशः स तु निःश्वस्य रामो राजीवलोचनः । हा प्रियेति
विचुक्रोश बहुशो बाष्पगद्गदः ३० तं सान्त्वयामास ततो लक्ष्मणः प्रिय-

---

सरोवरें अगदीं पूर्णपणें धुंडाळूं लागले २० आणि तेथें असलेल्या त्या पर्वतांचीं टेंकाडें, कडे व शिखरेंही संपूर्णपणें ते हुडकूं लागले; तथापि त्यांना तिची भेट झाली नाहीं २१. तेव्हां ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं पर्वत शोधून काढिल्यावर राम लक्ष्मणाला ह्मणाला " हे सुमित्रा पुत्रा, मला ती पवित्र सीता पर्वतावर दृष्टीं पडत नाहीं" २२. ह्यानंतर दुःखा-कुल झालेला लक्ष्मणही दंडकारण्यामध्यें संचार करितां करितां आपल्या महातेजस्वी भ्रात्याला ह्मणाला २३. " हे महाबुद्धिमान् रामा, महापराक्रमी विष्णूला ज्याप्र-माणें ही पृथ्वी बलीला बद्ध केल्यानंतर प्राप्त झाली त्याप्रमाणें जनककन्या सीता तुला प्राप्त होईल " २४. ह्याप्रमाणें वीर लक्ष्मणानें सांगितलें असतां दुःखानें मन व्याकुळ झालेला तो राम दीन वाणीनें त्याला ह्मणाला २५ " हे महाबुद्धिमान् लक्ष्मणा, वन सर्व सूक्ष्म रीतीनें शोधिलें, प्रफुल्लित कमलांनीं युक्त असलेलीं सरोवरें हुडकिलीं आणि अनेक गुहांनीं व जलप्रवहांनीं युक्त असलेला हा पर्वतही धुंडाळिला २६; परंतु, प्राणा-पेक्षांही अधिक असलेली ती वैदेही माझ्या कोठेंही दृष्टीं पडत नाहीं " २७. सीतेचा अपहार झाल्यामुळें कृश, दीन व शोकाकुल झालेला राम ह्याप्रमाणें विलाप करितां करितां क्षणभर अगदीं विह्वल झाला २८. त्याचे सर्व अवयव गळून गेले, भान नाहींसें होऊन तो निश्चेष्ट पडला आणि दुःखाचा दीर्घ सुस्कारा टाकून तो दीन व व्याकुल झालेला राम खेद करूं लागला २९. ह्याप्रमाणें वारंवार लांब लांब सुस्कारे टाकून तो कमलनयन राम एकसारिखा अश्रूंनीं कंठ दाटल्यामुळें अस्पष्ट स्वरानें " हे

बान्धवम् । बहुप्रकारं शोकार्तः प्रश्रितः प्रश्रिताञ्जलिः ३१ अनादृत्य तु तद्वाक्यं लक्ष्मणोष्ठपटच्युतम् । अपश्यंस्तां प्रियां सीतां प्राक्रोशत्स पुनः पुनः ३२ [२०१४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्ड एकषष्टितमः सर्गः ॥ ६१ ॥

सीतामपश्यन्धर्मात्मा शोकोपहतचेतनः । विललाप महाबाहू रामः कमललोचनः १ पश्यन्निव च तां सीतामपश्यन्मन्मथार्दितः । उवाच राघवो वाक्यं विलापाश्रयदुर्वचम् २ त्वमशोकस्य शाखाभिः पुष्पप्रियतरा प्रिये । आवृणोषि शरीरं ते मम शोकविवर्धनी ३ कदलीकाण्डसदृशौ कदल्या संवृतावुभौ । ऊरू पश्यामि ते देवि नासि शक्ता निगूहितुम् ४ कर्णिकारवनं भद्रे हसन्ती देवि सेवसे । अलं ते परिहासेन मम बाधावहेन वै ५ विशेषेणाश्रमस्थाने हासोऽयं न प्रशस्यते । अवगच्छामि ते शीलं परिहासप्रियं प्रिये ६ आगच्छ त्वं विशालाक्षि शून्योऽयमुटज-

---

प्रिये " असा आक्रोश करूं लागला असतां ३० त्या बंधुवर प्रेम करणाऱ्या रामाचें, शोकाकुल व विनयसंपन्न असलेल्या लक्ष्मणानें हात जोडून, नानाप्रकारें सांत्वन केलें ३१. तथापि, ती प्रिया सीता जेव्हां दृष्टीं पडेना तेव्हां लक्ष्मणाच्या ओंठांतून निघालेल्या त्या भाषणालाही न जुमानितां तो राम फिरून फिरून सीतेकरितां आक्रोशच करूं लागला ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

सीता दृष्टीं पडेनाशीं झाल्याकारणानें शोकामुळें बुद्धीला भ्रंश पडलेला तो धर्मात्मा कमलनयन महापराक्रमी राम विलाप करूं लागला १ आणि वास्तविक जरी सीता त्याच्या दृष्टीं पडत नव्हती तरी मदनानें व्याकुल झालेला तो राम भ्रमांत असल्यामुळें ती दृष्टीं पडत आहे असें समजून विलापयुक्त आणि ह्मणूनच अस्पष्ट असें भाषण तिला उद्देशून करूं लागला २. (तो ह्मणाला) "हे प्रिये, पुष्पें तुला अतिशय प्रिय आहेत ह्मणून तूं अशोकाच्या (प्रफुल्लित) शाखांनीं आपलें शरीर आच्छादित करीत आहेस आणि ह्यामुळें माझा शोक वृद्धिंगत करीत आहेस ३. हे देवि, केळीच्या खुंटांप्रमाणें असलेल्या तुझ्या दोन्ही मांड्या केळीनें झांकून गेलेल्या मला दिसत आहेत; ह्यामुळें तूं स्वतःला दडवून ठेवण्यास समर्थ नाहींस ४. हे कल्याणि, हे देवि, माझी थट्टा करण्याकरितां तूं कर्णिकारांच्या वनाचें अवलंबन करीत आहेस; परंतु, मला दुःख देणारी ही तुझी थट्टा आतां पुरे ५. हे प्रिये, तुझा स्वभाव थट्टेखोर आहे हें मी जाणतों. परंतु, विशेषतः आश्रमामध्यें ही थट्टा प्रशस्त

स्तव । सुव्यक्तं राक्षसैः सीता भक्षिता वा हृतापि वा ७ न हि सा विल-
पन्तं मामुपसंप्रैति लक्ष्मण । एतानि मृगयूथानि साश्रुनेत्राणि लक्ष्मण ८
शंसन्तीव हि मे देवीं भक्षितां रजनीचरैः । हा ममार्ये क यातासि हा
साध्वि वरवर्णिनि ९ हा सकामाद्य कैकेयी देवि मेद्य भविष्यति ।
सीतया सह निर्यातो विना सीतामुपागतः १० कथं नाम प्रवेक्ष्यामि
शून्यमन्तःपुरं मम । निर्वीर्य इति लोको मां निर्दयश्चेति वक्ष्यति ११
कातरत्वं प्रकाशं हि सीतापनयेन मे । निवृत्तवनवासश्च जनकं मिथिला-
धिपम् १२ कुशलं परिपृच्छन्तं कथं शक्ष्ये निरीक्षितुम् । विदेहराजो
नूनं मां दृष्ट्वा विरहितं तया १३ सुताविनाशसंतप्तो मोहस्य वशमेष्यति ।
अथवा न गमिष्यामि पुरीं भरतपालिताम् १४ स्वर्गोपि हि तया हीनः
शून्य एव मतो मम । तन्मामुत्सृज्य हि वने गच्छायोध्यापुरीं शुभाम् १५
न त्वहं तां विना सीतां जीवेयं हि कथंचन । गाढमाश्लिष्य भरतो

---

नाहीं ६. ह्यास्तव, हे विशालनयने, तूं ये. ही तुझी पर्णकुटिका शून्य आहे! छेः! राक्षसांनीं सीतेला भक्षण करून टाकिली आहे अथवा त्यांनीं तिला कोठें नेली तरी आहे ह्यांत मुळींच संशय नाहीं ७. कारण, हे लक्ष्मणा, मी विलाप करीत असतांना ती माझ्यापाशीं येत नाहीं. हे लक्ष्मणा, ह्या हरिणांच्या कळपांचे नेत्र आश्रूंनीं भरून गेले आहेत ८. त्यावरून देवी सीतेला राक्षसांनीं भक्षण केल्या-चेंच मला सांगत आहेत. हे सदाचरणसंपन्न साध्वि, हे सुंदरि, कोठें गेलीस ९? हाय! हाय! देवि, आज माझ्या कैकेयीचा मनोरथ परिपूर्ण होईल. सीतेबरोबर नगरांतून बाहेर पडलेला मी सीतेवांचून परत नगरांत गेलों असतां १० त्या शून्य अंतः-पुरामध्यें मी कसा प्रवेश करूं? "हा वीर्यहीन व निर्दय आहे" असें मला लोक ह्मणतील ११. माझ्यापासून सीतेला हरण करून नेल्यामुळें माझा भितरपणा तर उघडच सिद्ध होत आहे. वनवास संपून परत गेलों ह्मणजे मिथिलाधिपति जनकराजा १२ मला कुशलप्रश्न करूं लागला असतां त्याच्याकडे माझ्यानें पहावेल तरी कसें! मी त्या सीतेवांचून आलों आहें असें अवलोकन करण्याबरोबर तो विदेहराज जनक १३ कन्येच्या नाशामुळें संतप्त होऊन मोहाचे आधीन होईल अथवा (इतकी पंचाईत कशाला!) भरतानें रक्षण केलेल्या त्या अयोध्यानगरीमध्यें मी जाणारच नाहीं १४. कारण, तिच्यावांचून स्वर्गही जरी असला तरी मी तो शून्यच समजत आहें. तस्मात्, हे लक्ष्मणा, तूं आपला आतां मला वनामध्यें सोडून त्या शुभ अयोध्यानगरीमध्यें चालता हो १५. कांहीं केलें तरी त्या सीतेवांचून मी जिवंत रहाणार नाहीं. तूं भर-

वाच्यो मद्वचनात्त्वया १६ अनुज्ञातोसि रामेण पालयेति वसुंधराम् ।
अम्बा च मम कैकेयी सुमित्रा च त्वया विभो १७ कौसल्या च यथा-
न्यायमभिवाद्या ममाज्ञया । रक्षणीया प्रयत्नेन भवता सूक्तचारिणा १८
सीतायाश्च विनाशोयं मम चामित्रसूदन । विस्तरेण जनन्या मे विनि-
वेद्यस्त्वया भवेत् १९ इति विलपति राघवे तु दीने वनमुपगम्य तया
विना सुकेश्या । भयविकलमुखस्तु लक्ष्मणोपि व्यथितमना भृशमातुरो
बभूव २० [ २०३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येर-
ण्यकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥ ६२ ॥

स राजपुत्रः प्रियया विहीनः शोकेन मोहेन च पीड्यमानः । विषा-
दयन्भ्रातरमार्तरूपो भूयो विषादं प्रविवेश तीव्रम् १ स लक्ष्मणं शोकव-
शाभिपन्नं शोके निमग्नो विपुले तु रामः । उवाच वाक्यं व्यसनानुरूप-
मुष्णं विनिःश्वस्य रुदन्सशोकम् २ न मद्विधो दुष्कृतकर्मकारी मन्ये
द्वितीयोस्ति वसुंधरायाम् । शोकानुशोको हि परंपराया मामेति भिन्द-

---

ताला कडकडून भेट आणि माझ्या आज्ञेवरून त्याला सांग कीं १६ "पृथ्वीचें परिपालन कर" अशी रामानें तुला अनुज्ञा दिली आहे. हे प्रभो लक्ष्मणा, माझी माता कैकेयी, सुमित्रा आणि त्याचप्रमाणें कौसल्या ह्यांना तूं रीतीप्रमाणें माझ्या आज्ञेनें अभिवंदन कर आणि मीं चांगलें सांगितल्याप्रमाणें वागून तूं प्रयत्नपूर्वक ह्यांचें रक्षण कर १७, १८. हे शत्रुनाशका लक्ष्मणा, सीतेचा ह्मणूनच माझा हा असा नाश झाल्याची हकीकत तूं माझ्या मातेला सविस्तर निवेदन कर" १९. असो. उत्कृष्ट केशांनीं युक्त असलेली सीता जेथें नाहीं त्या वनामध्यें आल्यावर राम दीन होऊन ह्याप्रमाणें विलाप करूं लागला असतां लक्ष्मणाचेंही मुख भयानें निस्तेज झालें आणि मनामध्यें कळवळून तोही फारच व्याकुळ झाला २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२॥

प्रियेचा वियोग झाल्यामुळें शोकानें व मोहानें व्याकुळ होत असलेला तो राजकुमार राम दुःखित होऊन भ्रात्या लक्ष्मणाचे ठिकाणीं विषाद उत्पन्न करूं लागला आणि आपणही अतिशय खिन्न झाला १. नंतर शोकामध्यें मग्न झालेल्या त्या लक्ष्मणाला स्वतःही अपार शोकामध्यें मग्न झालेला तो राम उष्ण व दीर्घ सुस्कारा टाकून शोक करीत करीत रडतां रडतां दुःखाला अनुरूप असें भाषण करूं लागला २. (तो ह्मणाला) "मला वाटतें, माझ्यासारिखा दुष्कर्म करणारा दुसरा कोणीही पुरुष ह्या पृथ्वीमध्यें नाहीं आणि ह्मणूनच माझें हृदय व मन विदीर्ण करणारा हा शोकामागून शोक

न्हृदयं मनश्च ३ पूर्वं मया नूनमभीप्सितानि पापानि कर्माण्यसकृत्कृतानि । तत्रायमद्यापतितो विपाको दुःखेन दुःखं यदहं विशामि ४ राज्यप्रणाशः स्वजनैर्वियोगः पितुर्विनाशो जननीवियोगः । सर्वाणि मे लक्ष्मण शोकवेगमापूरयन्ति प्रविचिन्तितानि ५ सर्वं तु दुःखं मम लक्ष्मणेदं शान्तं शरीरे वनमेत्य क्लेशम् । सीतावियोगात्पुनरभ्युदीर्णं काष्ठैरिवाग्निः सहसोपदीप्तः ६ सा नूनमार्या मम राक्षसेन ह्यभ्याहृता खं समुपेत्य भीरुः । अपस्वरं सुस्वरविप्रलापा भयेन विक्रन्दितवत्यभीक्ष्णम् ७ तौ लोहितस्य प्रियदर्शनस्य सदोचितावुत्तमचन्दनस्य । वृत्तौ स्तनौ शोणितपङ्कदिग्धौ नूनं प्रियाया मम नाभिपातः ८ तच्छ्लक्ष्णसुव्यक्तमृदुप्रलापं तस्या मुखं कुञ्चितकेशभारम् । रक्षोवशं नूनमुपागताया न भ्राजते राहुमुखे यथेन्दुः ९ तां हारपाशस्य सदोचितान्तां ग्रीवां प्रियाया मम सुव्रतायाः । रक्षांसि नूनं परिपीतवन्ति शून्ये हि भित्त्वा रुधिराशनानि १० शय्याविहीना विजने वने सा रक्षोभिरावृत्य विकृष्यमाणा ।

---

एकसारिखा माझ्याकडे येत आहे ३. खरोखर पूर्वी माझ्या हातून जाणून बुजून वारंवार पापकर्में घडलेलीं आहेत आणि त्यांपैकींच कांहीं पातकांचें फल परिपक्क होऊन आज मला प्राप्त झालें आहे व ह्यामुळेंच मला ही दुःखपरंपरा अनुभवावी लागत आहे ४. हे लक्ष्मणा, राज्यभ्रंश, स्वजनांचा वियोग, पित्याचा नाश आणि मातेचा वियोग हीं सर्व मनामध्यें आलीं असतां मला शोकवेगाचें भरतें आणितात ५. हे लक्ष्मणा, वनामध्यें आल्यावर माझ्या शरीराला जरी क्लेश झाले होते तरी सीता समीप असल्यामुळें माझें तें सर्व दुःख शमलें होतें; परंतु, काष्ठांच्या योगानें ज्याप्रमाणें अग्नि एकाएकीं प्रदीप्त होतो त्याप्रमाणें सीतेच्या वियोगामुळें हें दुःख एकाएकीं वृद्धिंगत झालें आहे ६. ती माझी सुशील परंतु भित्री सीता राक्षसानें हरण केली असल्यामुळें आकाशामध्यें प्राप्त झाल्यावर स्वाभाविक सुस्वर शब्द करणारी असूनही भयामुळें एकसारिखी कर्कशस्वरानें आक्रोश करून राहिली असेल ७. दिसण्यांतही मनोहर अशा उत्कृष्ट केशराचीच सर्वदां संवय असलेले ते माझ्या प्रियेचे वर्तुल स्तन सांप्रत रक्तमिश्रित चिखलानें भरून गेले असतांही मला मृत्यु येत नाहीं ८. मधुर, अत्यंत स्पष्ट व मृदु भाषणांनीं युक्त असून कुरळ्या केशांनीं संपन्न असलेलें तें तिचें मुख ती राक्षसाच्या तावडींत सांपडली असतां चंद्राप्रमाणें खरोखर शोभेनासें झालें असेल ९. ज्याला नेहमीं हाररूप मालेचीच संवय आहे असा तो माझ्या पतिव्रतेचा कंठ निर्जन वनामध्यें रक्तप्राशन करणाऱ्या राक्षसांनीं चिरून खरोखर त्यांतील रक्त प्राशन

नूनं विनादं कुररीव दीना सा मुक्तवत्यायतकान्तनेत्रा ११ अस्मिन्मया सार्धमुदारशीला शिलातले पूर्वमुपोपविष्टा । कान्तस्मिता लक्ष्मणजातहासा त्वामाह सीता बहुवाक्यजातम् १२ गोदावरीयं सरितां वरिष्ठा प्रिया प्रियाया मम नित्यकालम् । अप्यत्र गच्छेदिति चिन्तयामि नैकाकिनी याति हि सा कदाचित् १३ पद्मानना पद्मपलाशनेत्रा पद्मानि वानेतुमभिप्रयाता । तदप्ययुक्तं न हि सा कदाचिन्मया विना गच्छति पङ्कजानि १४ कामं त्विदं पुष्पितवृक्षषण्डं नानाविधैः पक्षिगणैरुपेतम् । वनं प्रयाता नु तदप्ययुक्तमेकाकिनी सातिबिभेति भीरुः १५ आदित्य भो लोककृताकृतज्ञ लोकस्य सत्यानृतकर्मसाक्षिन् । मम प्रिया सा क्व गता हृता वा शंसस्व मे शोकहतस्य सर्वम् १६ लोकेषु सर्वेषु न नास्ति किंचिद्यत्ते न नित्यं विदितं भवेत्तत् । शंसस्व वायो कुलपा-

---

केलें असेल १०. निर्जनवनामध्यें माझ्या विरहित असलेल्या त्या सीतेला राक्षस सभोंवतीं गराडा देऊन जेव्हां ओढून नेऊं लागले असतील तेव्हां दीर्घ व मनोहर नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या बिचाऱ्या सीतेनें कुररीप्रमाणें शब्द काढिला असेल ११. मनोहर हास्य आणि उदार स्वभाव ह्यांनीं युक्त असलेली ती सीता पूर्वीं माझ्यासहवर्तमान ह्या धोंड्यावर बसून, हे लक्ष्मणा, हंसत हंसत तुझ्याशीं पुष्कळच बोलत बसत असे १२. नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेली ही गोदावरी माझ्या प्रियेला सर्वदां प्रिय आहे. तेव्हां ती येथेंच कोठें तरी गेली असेल असेंही एकदां माझ्या मनांत येतें; परंतु छेः! ती एकटी कधींही बाहेर जात नाहीं १३. बरें, जिचें मुख कमलासारिखें असून नेत्र कमलपत्राप्रमाणें आहेत अशी ती सीता कदाचित् कमलें आणण्याकरितां बाहेर गेली असेल; परंतु, तेंही जुळत नाहीं. कारण, माझ्यापासून ती कधींही कमलें आणण्याकरितां जात नाहीं १४. प्रफुल्लित वृक्षसमुदाय आणि नानाप्रकारचे पक्षिगण ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या वनामध्येंच खरोखर ती गेली असेल; परंतु, छेः ! तेंही जुळत नाहीं. कारण, एकटी कोठें बाहेर जाण्यास ती भित्री अतिशय भीत असते १५. हे सूर्यनारायणा, लोकांनीं केलें काय व न केलें काय हें सर्व तूं जाणत असून लोकांचीं खरीं खोटीं कर्मे तूं अवलोकन करीत असतोस. ह्यास्तव, माझी ती प्रिया कोठें गेली आहे किंवा तिला कोणीं हरण करून नेलें आहे हें सर्व मला सांग; मी अगदीं शोकाकुल झालों आहें १६. हे वायो, तुला नेहमीं विदित होत नाहीं अशी कोणतीही गोष्ट सर्व त्रैलोक्यामध्येंही नाहीं. तेव्हां ( आपल्या पवित्र वर्तनानें ) कुलाचें रक्षण करणाऱ्या त्या प्रियेसंबंधीं वार्ता तूं मला सांग. अरे, ती मेली आहे अथवा तिला कोणीं हरण

लिनीं तां मृता हृता वा पथि वर्तते वा १७ इतीव तं शोकविधेयदेहं रामं विसंज्ञं विलपन्तमेव । उवाच सौमित्रिरदीनसत्त्वो न्याय्ये स्थितः कालयुतं च वाक्यम् १८ शोकं विसृज्याद्य धृतिं भजस्व सोत्साहता चास्तु विमार्गणेस्याः । उत्साहवन्तो हि नरा न लोके सीदन्ति कर्मस्वतिदुष्करेषु १९ इतीव सौमित्रिमुदग्रपौरुषं ब्रुवन्तमार्तं रघुवंशसत्तमः । न चिन्तयामास धृतिं विमुक्तवान्पुनश्च दुःखं महदप्युपागमत् २० [ २०५४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

स दीनो दीनया वाचा लक्ष्मणं वाक्यमब्रवीत् । शीघ्रं लक्ष्मण जानीहि गत्वा गोदावरीं नदीम् १ अपि गोदावरीं सीता पद्मान्यानयितुं गता । एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः पुनरेव हि २ नदीं गोदावरीं रम्यां जगाम लघुविक्रमः । तां लक्ष्मणस्तीर्थवतीं विचित्वा राममब्रवीत् ३ नैनां पश्यामि तीर्थेषु क्रोशतो न शृणोति मे । कं नु सा देश-

---

करून नेलें आहे किंवा ती कोठें तरी मार्गामध्यें आहे ( हें मला कळूं दे ) " १७. ह्याप्रमाणें शोकानेंच ज्याचा देह ग्रस्त झाला आहे असा तो राम उन्मत्तपणें अतिशय प्रलाप करीत असतांना उदार अंतःकरणानें युक्त असून न्यायानें तो सुमित्रापुत्र लक्ष्मण समयोचित शब्दांनीं त्याला ह्मणाला १८ " शोक सोडून दे, धैर्य धर आणि ह्या सीतेचा शोध करण्याविषयीं उत्साह असूं दे. कारण, अत्यंत दुष्कर कृत्यें प्राप्त झालीं असतांही जगतामध्यें उत्साही लोकांचें धैर्य कधींही खचत नाहीं " १९. ह्याप्रमाणें तो उत्कृष्ट पराक्रमी सुमित्रापुत्र लक्ष्मण दुःखाकुल होऊन सांगूं लागला असतांनाही रघुवंशजश्रेष्ठ रामानें त्याचा विचार न करितां धैर्य सोडिलें आणि त्यामुळें पुनरपि पूर्वीपेक्षांही मोठें दुःख त्याला प्राप्त झालें २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

तो दीन राम दीन वाणीनें लक्ष्मणाला ह्मणाला " हे लक्ष्मणा, ह्या गोदावरीकडे जाऊन तूं सीतेचा लवकर शोध कर १. कारण, कदाचित् सीता कमलें आणण्याकरितां गोदावरीवर गेली असेल. " ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां लक्ष्मण पुनरपि २ लवकर लवकर पाऊल उचलून मनोहर अशा गोदावरीनदीकडे गेला आणि उतार असलेली ती नदी धुंडाळून तो रामाला ह्मणाला ३ " उतारांचे ठिकाणीं ही सीता माझ्या दृष्टीं पडत नाहीं आणि मी आक्रोश करीत असतां माझें ऐकतही नाहीं.

मापन्ना वैदेही क्लेशनाशिनी ४ न हि तं वेद्मि वै राम यत्र सा तनुमध्यमा ।
लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा दीनः संतापमोहितः ५ रामः समभिचक्राम
स्वयं गोदावरीं नदीम् । स तामुपस्थितो रामः क्व सीतेत्येवमब्रवीत् ६
भूतानि राक्षसेन्द्रेण वधार्हेण हृतामपि । न तां शशंसू रामाय तथा
गोदावरी नदी ७ ततः प्रचोदिता भूतैः शंस चास्मै प्रियामिति । न च
सा ह्यवदत्सीतां पृष्टा रामेण शोचता ८ रावणस्य च तद्रूपं कर्मापि च
दुरात्मनः । ध्यात्वा भयात्तु वैदेहीं सा नदी न शशंस ह ९ निराशस्तु
तया नद्या सीताया दर्शने कृतः । उवाच रामः सौमित्रिं सीतादर्शनक-
र्शितः १० एषा गोदावरी सौम्य किंचिन्न प्रतिभाषते । किं तु लक्ष्मण
वक्ष्यामि समेत्य जनकं वचः ११ मातरं चैव वैदेह्या विना तामहमप्रि-
यम् । या मे राज्यविहीनस्य वने वन्येन जीवतः १२ सर्वं व्यपानयच्छोकं
वैदेही क्व नु सा गता । ज्ञातिवर्गविहीनस्य वैदेहीमप्यपश्यतः १३ मन्ये

---

तेव्हां दर्शन झालें असतां आमचे क्लेश नाश करणारी ही विदेहराजकन्या सीता कोणत्या तरी प्रदेशाला गेली आहे ? ४. हे रामा, जिकडे ती सुंदरी गेली असेल तो प्रदेश मला माहीत नाहीं." हें लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून दीन व संतापामुळें मोहित झालेला ५ राम स्वतः गोदावरीनदीकडे चालला आणि त्या नदीला गेल्यावर सीता कोठें आहे असें विचारूं लागला ६. तथापि वधालाच पात्र अशा राक्षसाधिपति रावणानें तिला नेली आहे हें जाणीत असूनही तेथील प्राण्यांनीं आणि त्याचप्रमाणें गोदावरीनदीनेंही रामाला तिच्यासंबंधानें बातमी सांगितली नाहीं ७. तदनंतर, तेथील प्राण्यांनीं " तूं ह्या रामाला ह्याची प्रिया कोठें आहे हें सांग " असें गोदावरीनदीला सांगितलें असतांनाही आणि शोक करणाऱ्या रामानें तिला विचारिलें असतांनाही तिनें सीतेची बातमी रामाला सांगितली नाहीं ८. सारांश, त्या दुरात्म्या रावणाचें तें कर्म आणि रूप मनामध्यें आणून भयामुळें त्या गोदावरीनदीनें विदेह राजकन्येची हकीकत रामाला कळविली नाहीं ९. तेव्हां सीतेच्या दर्शनाविषयीं त्या नदीनें निराश करून टाकिलेला व सीतेची भेट न झाल्यामुळें कृश झालेला तो राम सुमित्रापुत्र लक्ष्मणाला ह्मणाला १० " हे विनयसंपन्न लक्ष्मणा, ही गोदावरी कांहींएक उत्तर देत नाहीं. ह्यास्तव, सीतेच्या पित्याची आणि मातेची गांठ पडली असतां तिच्यावांचून मी त्यांना काय बरें अप्रिय वृत्त कथन करूं ? राज्यापासून भ्रष्ट होऊन वनामध्यें वन्य पदार्थांवर उपजीविका करणाऱ्या माझा ११, १२ सर्व शोक जिनें दूर केला ती विदेहराजकन्या सीता कोठें बरें गेली असेल ? ज्ञातिवर्गांचा वियोग

दीर्घा भविष्यन्ति रात्रयो मम जाग्रतः । मन्दाकिनीं जनस्थानमिमं
प्रस्रवणं गिरिम् १४ सर्वाण्यनुचरिष्यामि यदि सीता हि लभ्यते । एते
महामृगा वीरा मामीक्षन्ते पुनः पुनः १५ वक्तुकामा इह हि मे इङ्गि-
तान्युपलक्षये । तांस्तु दृष्ट्वा नरव्याघ्रो राघवः प्रत्युवाच ह १६ क्व
सीतेति निरीक्षन्वै बाष्पसंरुद्धया गिरा । एवमुक्ता नरेन्द्रेण ते मृगाः
सहसोत्थिताः १७ दक्षिणाभिमुखाः सर्वे दर्शयन्तो नभःस्थलम् ।
मैथिली ह्रियमाणा सा दिशं यामभ्यपद्यत १८ तेन मार्गेण गच्छन्तो
निरीक्षन्ते नराधिपम् । येन मार्गं च भूमिं च निरीक्षन्ते स्म ते मृगाः १९
पुनर्नदन्तो गच्छन्ति लक्ष्मणेनोपलक्षिताः । तेषां वचनसर्वस्वं लक्षयामास
चेङ्गितम् २० उवाच लक्ष्मणो धीमाञ्ज्येष्ठं भ्रातरमार्तवत् । क्व सीतेति
त्वया पृष्टा यदि मे सहसोत्थिताः २१ दर्शयन्ति क्षितिं चैव दक्षिणां च

होऊन सीतेलाही अवलोकन न करणाऱ्या मला १३ आतां निद्रा येत नसल्याकारणानें रात्री मोठ्या होतील असें वाटतें. सीता जर सांपडत असेल तर मंदाकिनीनदी, जनस्थान व हा प्रस्रवणपर्वत हीं सर्व मी हिंडून पाहीन. हे वीर महामृग वारंवार माझ्याकडे पहात आहेत १४, १५ व ह्यांना कांहीं तरी माझ्याशीं बोलावयाचें आहे अशा प्रकारचे ह्यांचे हावभाव माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहेत. " असें ह्मणत ह्मणत पुरुषश्रेष्ठ रघुवंशज रामानें त्यांच्याकडे पाहिलें आणि एकसारिखी त्यांच्याकडे दृष्टि देऊन अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अस्पष्ट उच्चार होत असलेल्या वाणीनें सीता कोठें आहे " ह्मणून त्यांना विचारिलें. ह्याप्रमाणें पुरुषश्रेष्ठ रामानें मृगांना प्रश्न केला असतां ते एकाएकीं उठले १६, १७ आणि सर्वही दक्षिणाभिमुख आकाश दाखवूं लागले. कारण, रावण त्याच दिशेकडे सीतेला घेऊन गेला होता १८. सारांश, त्या दक्षिणदिशेकडील मार्गानें जातां जातां ते मृग प्रजाधिपति रामाकडे वरचेवर पहात आपला उद्देश रामाला कळण्याकरितां वारंवार आकाशमार्गाकडे दृष्टि देत, साफ चालतां यावें एतदर्थ पायांखालील भूप्रदेश दिसण्याकरितां वारंवार भूमीकडेही पहात असत १९ आणि गर्जना करीत करीत पुनरपि त्या दिशेकडे जात. अशाप्रकारें आपला उद्देश व्यक्त करणारे ते मृग लक्ष्मणानें अवलोकन केले आणि त्यांचें तें चलनवलनरूप भाषणही त्यानें जाणिलें २०. तदनंतर तो बुद्धिमान् लक्ष्मण दुःखित पुरुषालाच योग्य अशा शब्दांनीं आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला ह्मणाला " सीता कोठें आहे असें तूं विचारितांक्षणीं ज्याअर्थी एकाएकी उठून मला २१ हे मृग भूमि आणि दक्षिण दिशा दाखवीत आहेत त्याअर्थी, हे राजा, राक्ष-

दिशं मृगाः । साधु गच्छावहे देव दिशमेतां च नैर्ऋतीम् २२ यदि तस्यागमः कश्चिदार्या वा साथ लक्ष्यते । बाढमित्येव काकुत्स्थः प्रस्थितो दक्षिणां दिशम् २३ लक्ष्मणानुगतः श्रीमान्वीक्षमाणो वसुंधराम् । एवं संभाषमाणौ तावन्योन्यं भ्रातरावुभौ २४ वसुंधरायां पतितपुष्पमार्गमपश्यताम् । पुष्पवृष्टिं निपतितां दृष्ट्वा रामो महीतले २५ उवाच लक्ष्मणं वीरो दुःखितो दुःखितं वचः । अभिजानामि पुष्पाणि तानीमानीह लक्ष्मण २६ अपि नद्धानि वैदेह्या मया दत्तानि कानने । मन्ये सूर्यश्च वायुश्च मेदिनी च यशस्विनी २७ अभिरक्षन्ति पुष्पाणि प्रकुर्वन्तो मम प्रियम् । एवमुक्त्वा महाबाहुर्लक्ष्मणं पुरुषर्षभम् २८ उवाच रामो धर्मात्मा गिरिं प्रस्रवणाकुलम् । कच्चित्क्षितिभृतां नाथ दृष्टा सर्वाङ्गसुन्दरी २९ रामा रम्ये वनोद्देशे मया विरहिता त्वया । क्रुद्धोऽब्रवीद्गिरिं तत्र सिंहः क्षुद्रमृगं यथा ३० तां हेमवर्णां हेमाङ्गीं सीतां दर्शय पर्वत । यावत्सानूनि

---

सांनीं आश्रित असलेल्या ह्या दिशेकडे आपण गेलों तर बरें होईल २२. कारण, कदाचित् तिकडे तिचा कांहीं थांग लागण्याचा अथवा ती कुलीन स्त्री दृष्टीं पडण्याचा संभव आहे ". ह्यावर " ठीक आहे " असें ह्मणून ककुत्स्थकुलोत्पन्न राम दक्षिणदिशेकडे निघाला २३ आणि लक्ष्मणाबरोबर दक्षिणेकडे निघालेला तो वैभवशाली राम पृथ्वीकडे दृष्टि देऊं लागला. ह्याप्रमाणें एकमेकांशीं बोलत बोलत ते उभयतां भ्राते जाऊं लागले असतां २४ पृथ्वीवर पडलेल्या पुष्पांनीं युक्त असा एक मार्ग त्यांच्या आढळण्यांत आला. तेव्हां भूप्रदेशावर पुष्पवृष्टि पडलेली पाहून दुःखित झालेला तो वीर राम दीन वाणीनें लक्ष्मणाला ह्मणाला " हे लक्ष्मणा, अरण्यामध्यें मीं दिलेलीं पुष्पं सीतेनें आपल्या बुचड्यामध्यें घातलीं होतीं तींच हीं मीं ओळखिलीं. मला वाटतें सूर्य, यशस्विनी पृथ्वी आणि वायु हे २५, २६, २७ माझें प्रिय करण्याकरितां पुष्पाचें रक्षण करीत आहेत ". ह्याप्रमाणें पुरुषश्रेष्ठ लक्ष्मणाला सांगून तो महापराक्रमी २८ धर्मात्मा राम जलप्रवाहांनीं गजबजून गेलेल्या प्रस्रवण-पर्वताला विचारूं लागला " हे पर्वतराज, रम्य वनप्रदेशामध्यें माझा वियोग झालेली सर्वांगसुंदरी व मनोहर सीता तुझ्या कोठें दृष्टीं पडली आहे काय ? " ह्याप्रमाणें रामानें विचारिलें असतांही जेव्हां तो पर्वत कांहींच बोलेना तेव्हां एकाद्या क्षुद्र मृगाशीं सिंहच भाषण करीत आहे कीं काय अशा रीतीनें क्षुब्ध होऊन राम त्या पर्वताला ह्मणाला २९, ३०, " हे पर्वता, तुझ्या सर्व शिखरांचा मी विध्वंस केला नाहीं तोंच तूं आपला बऱ्या विचारानें ती सुवर्णवर्ण व सौंदर्यसंपन्न सीता कोठें

सर्वाणि न ते विध्वंसयाम्यहम् ३१ एवमुक्तस्तु रामेण पर्वतो मैथिलीं प्रति । दर्शयन्निव तां सीतां नादर्शयत राघवं ३२ ततो दाशरथी राम उवाच च शिलोच्चयम् । मम बाणाग्निनिर्दग्धो भस्मीभूतो भविष्यसि ३३ असेव्यः सर्वतश्चैव निस्तृणद्रुमपल्लवः । इमां वा सरितं चाद्य शोषयिष्यामि लक्ष्मण ३४ यदि नाख्याति मे सीता मध्यचन्द्रनिभाननाम् । एवं प्रुषितो रामो दिधक्षन्निव चक्षुषा ३५ ददर्श भूमौ निष्क्रान्तं राक्षसस्य पदं महत् । त्रस्ताया रामकाङ्क्षिण्याः प्रधावन्त्या इतस्ततः ३६ राक्षसेनानुसृताया वैदेह्याश्च पदानि तु । स समीक्ष्य परिक्रान्तं सीताया राक्षसस्य च ३७ भग्नं धनुश्च तूणी च विकीर्णं बहुधा रथम् । संभ्रान्तहृदयो रामः शशंस भ्रातरं प्रियम् ३८ पश्य लक्ष्मण वैदेह्या कीर्णाः कनकबिन्दवः । भूषणानां हि सौमित्रे माल्यानि विविधानि च ३९ तप्तबिन्दुनिकाशैश्च

---

आहे हें मला दाखीव " ३१. ह्याप्रमाणें तो राम पर्वताला ह्मणाला असतां तो पर्वत रामाला पुढें सांगितल्याप्रमाणें सीता गेल्याच्या खुणा दर्शवूं लागला. परंतु साक्षात् वाणीनें शब्द उच्चारून त्यानें त्याला सीता दाखविली नाहीं ३२. तेव्हां दशरथपुत्र राम त्या पर्वताला ह्मणाला " माझ्या बाणरूप अग्नीनें दग्ध झाल्यामुळें आज तुझें भस्म होऊन जाईल ३३ आणि सर्व बाजूंनीं तुझ्यावरील तृण, वृक्ष व पल्लव नाहींसे होऊन तुझा कोणीही आश्रय करणार नाहीं. अथवा, हे लक्ष्मणा, पूर्णचंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली सीता कोठें आहे हें जर ही नदी मला न सांगेल तर आज मी हिला शुष्क करून टाकितों ३४. ह्याप्रमाणें क्रुद्ध होऊन दृष्टीनें जसा कांहीं जें समोर येईल तें दग्ध करण्यास प्रवृत्त झालेल्या त्या रामानें भूमीवर उमटलेलें राक्षसाचें मोठें पाऊल अवलोकन केलें व ( रावणाचें जटायूशीं युद्ध चाललें असतांना ) राक्षसाच्या मागोमाग जाण्यास भाग पडलेली आणि भयभीत झालेली ती सीता रामदर्शनाची इच्छा धरून इकडे तिकडे धावूं लागलीं असतां तिचीं जीं पाउलें उमटलीं होतीं तींही रामानें अवलोकन केलीं. ह्याप्रमाणें सीतेचीं व राक्षसांचीं पाउलें पाहून व जटायूशीं युद्ध करितां करितां मोडलेलें धनुष्य, भाते आणि अनेक तुकडे होऊन अस्ताव्यस्त पडलेला तो रावणाचा रथ अवलोकन करून मनामध्यें गोंधळून गेलेला तो राम आपल्या प्रिय भ्रात्याला ह्मणाला ३५, ३६, ३७, ३८ " हे लक्ष्मणा, भूषणांतील सोन्याचे तुकडे सीतेनें फेंकून दिले आहेत आणि हे सुमित्रापुत्रा, पहा; त्याचप्रमाणें नानाप्रकारचीं पुष्पें तिनें इकडे तिकडे टाकिलीं आहेत ३९. हे सुमित्रानंदना, सुवर्णबिंदूंप्रमाणें दिसत

चित्रैः क्षतजबिन्दुभिः । आवृतं पश्य सौमित्रे सर्वतो धरणीतलम् ४०
मन्ये लक्ष्मण वैदेही राक्षसैः कामरूपिभिः । भित्त्वा भित्त्वा विभक्ता वा
भक्षिता वा भविष्यति ४१ तस्या निमित्तं सीताया द्वयोर्विवदमानयोः ।
बभूव युद्धं सौमित्रे घोरं राक्षसयोरिह ४२ मुक्तामणिचितं चेदं रमणीयं
विभूषितम् । धरण्यां पतितं सौम्य कस्य भग्नं महद्धनुः ४३ राक्षसाना-
मिदं वत्स सुराणामथवापि वा । तरुणादित्यसंकाशं वैदूर्यगुलिकाचि-
तम् ४४ विशीर्णं पतितं भूमौ कवचं कस्य काञ्चनम् । छत्रं शतशलाकं च
दिव्यमाल्योपशोभितम् ४५ भग्नदण्डमिदं सौम्य भूमौ कस्य निपातितम् ।
काञ्चनोरश्छदाश्चेमे पिशाचवदनाः खराः ४६ भीमरूपा महाकायाः कस्य
वा निहता रणे । दीप्तपावकसंकाशो द्युतिमान्समरध्वजः ४७ अपविद्धश्च
भग्नश्च कस्य सांग्रामिको रथः । रथाक्षमात्रा विशिखास्तपनीयविभू-
षणाः ४८ कस्येमे निहता बाणाः प्रकीर्णा घोरदर्शनाः । शरावरौ शरैः
पूर्णौ विध्वस्तौ पश्य लक्ष्मण ४९ प्रतोदाभीषुहस्तोयं कस्य वा सारथि-

---

असलेल्या अद्भुत रक्तबिंदूंच्या योगानें सर्व बाजूनीं व्याप्त झालेले हें भूतल तूं अवलोकन कर ४०. ह्यावरून हे लक्ष्मणा, यथेष्टरूप धारण करणाऱ्या राक्षसांनीं जनककन्या सीता तोडतोडून वांटून घेतली असावी अथवा भक्षण करून टाकिली असावी असें वाटतें ४१. हे लक्ष्मणा, त्या सीतेकरितां कलह करणाऱ्या दोन राक्षसांचें ह्या ठिकाणीं घोर युद्ध झालें आहे ( असा अजमास होतो) ४२. हे विनयसंपन्न लक्ष्मणा, मोत्यें व रत्नें लाविलेलें रम्य व अलकृत असें हें प्रचंड धनुष्य कोणाचें बरें भूमीवर मोडून पडलें आहे ? ४३. हे वत्सा, हे धनुष्य राक्षसांचें अथवा देवांचें असलें पाहिजे. बालसूर्याप्रमाणें तेजस्वी व वैडूर्यमण्यांनीं अलकृत असें हें भूमीवर तुकडे तुकडे होऊन पडलेलें ४४ सुवर्णाचें कवच कोणाचें बरें असावें ? त्याचप्रमाणें शेंकडों काड्यांनीं युक्त व दिव्य पुष्पांनीं सुशोभित असें हें छत्र ४५, हे विनयसंपन्न लक्ष्मणा, कोणाचें बरें दांडा मोडून भूमीवर पडलें आहे ? पिशाचासारिख्या मुखांनीं युक्त, भयंकर, धिप्पाड व सुवर्णाची झूल घातलेले असे संग्रामामध्यें मारून टाकिलेले गर्दभ कोणाचे बरें असावेत ? देदीप्यमान, अग्नीप्रमाणें उज्ज्वल, तेजस्वी आणि संग्रामामध्यें आपल्या यजमानाचें अस्तित्व व्यक्त करणारा असा हा ४६,४७ उलथून पाडून मोडून टाकिलेला संग्रामसंबंधीं रथ कोणाचा बरें असावा ? रथाच्या कण्याइतके लांब आणि सुवर्णभूषणांनीं युक्त असे प्रतिपक्षावर टाकिलेले आणि ह्मणूनच इकडे तिकडे पडलेले हे दिसण्यांतही भयंकर असलेले बाण कोणाचे बरें असावेत ? हे लक्ष्मणा, पहा; बाणांनीं भरलेले हे

हतः । पदवी पुरुषस्यैषा व्यक्तं कस्यापि रक्षसः ५० वैरं शतगुणं पश्य मम तैर्जीवितान्तकम् । सुघोरहृदयैः सौम्य राक्षसैः कामरूपिभिः ५१ हृता मृता वा वैदेही भक्षिता वा तपस्विनी । न धर्मस्त्रायते सीतां ह्रियमाणां महावने ५२ भक्षितायां हि वैदेह्यां हृतायामपि लक्ष्मण । के हि लोके प्रियं कर्तुं शक्ताः सौम्य ममेश्वराः ५३ कर्तारमपि लोकानां शूरं करुणवेदिनम् । अज्ञानादवमन्येरन्सर्वभूतानि लक्ष्मण ५४ मृदुं लोकहिते युक्तं दान्तं करुणवेदिनम् । निर्वीर्य इति मन्यन्ते नूनं मां त्रिदशेश्वराः ५५ मां प्राप्य हि गुणो दोषः संवृत्तः पश्य लक्ष्मण । अद्यैव सर्वभूतानां रक्षसामभवाय च ५६ संहृत्यैव शशिज्योत्स्नां महान्सूर्य इवोदितः । संहृत्यैव गुणान्सर्वान्मम तेजः प्रकाशते ५७ नैव यक्षा न गन्धर्वा न पिशाचा न

---

भाते विध्वस्त होऊन पडले आहेत ४८,४९, चाबूक आणि लगामाच्या दोऱ्या ज्याच्या हातामध्यें आहेत असा हा मारून टाकिलेला सारथि कोणाचा बरें आहे? निःसंशय हा मार्ग कोणत्या तरी राक्षसाचा असला पाहिजे ५०. राक्षसांशीं ह्यापूर्वी जें माझें वैर होतें त्यापेक्षां आतां कोणीं माझा कैवार घेऊन ह्यांच्याशीं युद्ध केल्याचें दिसत असल्यामुळें तें शेंकडों पट जास्त झालें असून जीविताचा नाश करणारें आहे असें तूं समज; हे विनयसंपन्न लक्ष्मणा, ज्यांचीं अंतःकरणें फारच कठोर आहेत अशा यथेष्टरूप धारण करणाऱ्या राक्षसांनीं ५१ त्या बिचाऱ्या सीतेला हरण करून नेल्यामुळें ती मृत झाली असेल किंवा त्यांनीं तिला भक्षण करून टाकिली असेल. अरेरे! राक्षस सीतेला हरण करून नेऊं लागले असतांना महावनामध्यें धर्मही तिचें रक्षण करण्यास समर्थ होत नाहीं ५२. हे विनयसंपन्न लक्ष्मणा, विदेहराजकन्या सीतेला राक्षसांनीं भक्षण केलें असलें किंवा ते कोठें तिला घेऊन गेले असले तरी जगतामध्यें माझें प्रिय करण्यास देव तरी कोणते समर्थ होणार आहेत ? ५३. हे लक्ष्मणा, लोकांचा उत्पादक आणि शूर असा शंकरही जर दयार्द्र दृष्टीनें स्वस्थ बसू लागला तर त्याचा सुद्धां सर्व प्राणी अवमान करतील ( मग माझी कथा कशाला पाहिजे ? ) ५४. प्राण्यांना सौख्य देण्याविषयीं उद्युक्त आणि ह्मणूनच स्वभावतः गरीब असा मी इंद्रियदमन करून दयेमुळें स्वस्थ रहात असल्याकारणानें इंद्रप्रभृति स्वर्गाधिपति खरोखर मला वीर्यहीन समजत आहेत ( आणि ह्मणूनच त्यांनीं सीतेचें रक्षण केलें नाहीं ) ५५. हे लक्ष्मणा, मृदुपणा वास्तविक गुण असूनही तो माझे ठिकाणीं दोष बनला आहे. तस्मात्, ( हा मृदुपणा सोडून देऊन मी आतां पौरुषाचें अवलंबन करितों. ) चंद्रप्रकाशासारिख्या माझ्या गुणांना लुप्त करून आजच सर्व राक्षसप्राण्यांच्या नाशाकरितां रवीसारिखें माझें

राक्षसाः । किंनरा वा मनुष्या वा सुखं प्राप्स्यन्ति लक्ष्मण ५८ ममास्त्रबाणसंपूर्णमाकाशं पश्य लक्ष्मण । असंपातं करिष्यामि ह्यद्य त्रैलोक्यचारिणाम् ५९ संनिरुद्धग्रहगणमावारितनिशाकरम् । विप्रनष्टा-नलमरुद्भास्करद्युतिसंवृतम् ६० विनिर्मथितशैलाग्रं शुष्यमाणजलाशयम् । ध्वस्तद्रुमलतागुल्मं विप्रणाशितसागरम् ॥ त्रैलोक्यं तु करिष्यामि संयुक्तं कालकर्मणा ६१ न ते कुशलिनीं सीतां प्रदास्यन्ति ममेश्वराः । अस्मिन्मुहूर्ते सौमित्रे मम द्रक्ष्यन्ति विक्रमम् ६२ नाकाशमुत्पतिष्यन्ति सर्वभूतानि लक्ष्मण । समाकुलममर्यादं जगत्पश्याद्य लक्ष्मण ६३ आकर्णपूर्णैरिषुभिर्जीवलोकदुरावरैः । करिष्ये मैथिलीहेतोरपिशाच-मराक्षसम् ६४ मम रोषप्रयुक्तानां विशिखानां बलं सुराः । द्रक्ष्यन्त्यद्य विमुक्तानाममर्षाद्दूरगामिनाम् ६५ नैव देवा न दैतेया न पिशाचा न राक्षसाः । भविष्यन्ति मम क्रोधात्त्रैलोक्येऽपि प्रणाशिते ६६ देवदानव-

---

तेज प्रकाशत आहे हें तूं अवलोकन कर ५६,५७. हे लक्ष्मणा, यक्ष, गंधर्व, पिशाच, राक्षस, किन्नर आणि मनुष्य ह्यांपैकीं कोणालाही आतां सुख प्राप्त होणार नाहीं ५८. हे लक्ष्मणा, धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं आकाश परिपूर्ण झालेलें तूं अवलोकन कर; आज मी त्रैलोक्यामध्यें संचार करणाऱ्या सर्व प्राण्यांचे व्यवहार बंद पाडीन ५९. सारांश, त्रैलोक्यांतील ग्रहगणांचा प्रचार मी बंद करीन; चंद्रालाही आच्छादित करून टाकीन; अग्नि, वायु व सूर्य ह्यांचे तेज नाहींसे करून मी हे त्रैलोक्य अंधकारानें व्याप्त करून टाकीन ६०; जलाशय शुष्क करून टाकीन; वृक्ष, लता व झुडपें ह्यांचा विध्वंस करून टाकीन आणि समुद्रांचाही नायनाट करीन. तात्पर्य, ह्या त्रैलोक्याचा मी आज नाश करीन ६१. सीतेला हरण करून नेणारे जरी समर्थ असले तरी ते जर आज सीता मला सुखरूप परत न देतील तर, हे सुमित्रानंदना लक्ष्मणा, ह्या घटकेसच माझा पराक्रम काय आहे तो ते अवलोकन करतील ६२. हे लक्ष्मणा, पृथ्वीवरील सर्व प्राणी कांहीं आकाशांत उडून जाणार नाहींत ( सीतेला हरण करून नेणारे प्राणी भूतला-वरच कोठें तरी असतील ). तेव्हां, हे लक्ष्मणा, आज हें जगत् क्षुब्ध व विकृत झालेलें तूं अवलोकन करशील ६३. कोणत्याही प्राण्याला ज्यांचे निवारण करितां येणार नाहीं अशा कर्णापर्यंत प्रत्यंचा ओढून सोडिलेल्या बाणांच्या योगानें सीतेक-रितां मीं हें जगत् पिशाचरहित आणि राक्षसशून्य करून टाकीन ६४. क्रोधानें सोडि-ल्यामुळें दूर जाणाऱ्या माझ्या बाणांचें सामर्थ्य आज देव अवलोकन करितील ६५. माझ्या क्रोधामुळें त्रैलोक्याचा नाश झाला असतां देव, दैत्य, पिशाच व राक्षस ह्यां-

यक्षाणां लोका ये राक्षसामपि । बहुधा निपतिष्यन्ति बाणौघैः शकलीकृताः ६७ निर्मर्यादानिमाँल्लोकान्करिष्याम्यद्य सायकैः । हृतां मृतां वा सौमित्रे न दास्यन्ति ममेश्वराः ६८ तथारूपां हि वैदेहीं न दास्यन्ति यदि प्रियाम् । नाशयामि जगत्सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ६९ यावद्दर्शनमस्या वै तापयामि च सायकैः । इत्युक्त्वा क्रोधताम्राक्षः स्फुरमाणोष्ठसंपुटः ७० वल्कलाजिनमाबध्य जटाभारमबन्धयत् । तस्य क्रुद्धस्य रामस्य तथाभूतस्य धीमतः ७१ त्रिपुरं जघ्नुषः पूर्वं रुद्रस्येव बभौ तनुः । लक्ष्मणादथ चादाय रामो निष्पीड्य कार्मुकम् ७२ शरमादाय संदीप्तं घोरमाशीविषोपमम् । संदधे धनुषि श्रीमान्रामः परपुरंजयः ७३ युगान्ताग्निरिव क्रुद्ध इदं वचनमब्रवीत् । यथा जरा यथा मृत्युर्यथा कालो यथा विधिः ७४ नित्यं न प्रतिहन्यन्ते सर्वभूतेषु लक्ष्मण । तथाहं क्रोधसंयुक्तो न निवार्योऽस्म्यसंशयम् ७५ पुरेव मे चारुदतीमनिन्दितां

---

पैकीं कोणीही राहणार नाहीं ६६. देव दानव, यक्ष आणि राक्षस ह्यांचे गण बाणसमुदायांनीं अनेक प्रकारें तुकडे तुकडे होऊन पृथ्वीवर पडतील ६७. हे लक्ष्मणा, सीतेला नेणारे बलाढ्य प्राणी जर मला सीता हरण केलेली अथवा मेलेली न देतील तर बाणांच्या योगानें मी आजच सर्व त्रैलोक्य क्षुब्ध करून टाकीन ६८. तशा प्रकारच्या माझ्या प्रिय सीतेला जर कोणी आणून न देतील तर नुसत्या जगताचाच नव्हे परंतु, चराचर प्राण्यांसहवर्तमान सर्व त्रैलोक्याचाही मी नाश करून टाकीन ६९ आणि तिचें दर्शन होईपर्यंत मी बाणांच्या योगानें सर्वांना असेंच संतप्त ठेवीन ". ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितल्यावर क्रोधानें नेत्र आरक्तवर्ण होऊन दोन्ही ओठ स्फुरण पावूं लागलेल्या त्या रामानें ७० परिधान केलेलीं वल्कलें व अजिनें सांवरून बांधून जटाभारही सांवरून बांधिला व तो बुद्धिमान् राम तशाप्रकारें क्रुद्ध झाला असतां ७१ पूर्वीं त्रिपुरासुराचा वध करण्याची इच्छा धरणाऱ्या रुद्राच्या शरीराप्रमाणें त्याचें शरीर दिसूं लागलें. तदनंतर रामानें लक्ष्मणापासून धनुष्य घेऊन तें हातामध्यें घट्ट धरिलें ७२; सर्पाप्रमाणें भयंकर असलेला एक उज्ज्वल बाण त्यानें हातामध्यें घेतला आणि नंतर शत्रुसमुदाय जिंकणाऱ्या त्या वैभवशाली रामानें तो बाण त्या धनुष्याला लाविला ७३. इतकेंच नव्हे; परंतु, प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें क्रुद्ध झालेला तो राम लक्ष्मणाला ह्मणाला " हे लक्ष्मणा, जरा, मृत्यु, काल आणि दैव हीं प्राप्त झालीं असतां ज्याप्रमाणें कोणत्याही प्राण्याचे ठिकाणीं त्यांचें निवारण होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं त्याप्रमाणें मी क्रोधसंयुक्त झालों असतां माझें कोणाच्याही हातून निःसंशय निवारण होणार

दिशान्ति सीतां यदि नाद्य मैथिलीम् । सदेवगन्धर्वमनुष्यपन्नगं जगत्स-
शैलं परिवर्तयाम्यहम् ७६ [२१३०]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये
आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥ ६४ ॥

तप्यमानं तदा रामं सीताहरणकर्शितम् । लोकानामभवे युक्तं सांव-
र्तकमिवानलम् १ वीक्षमाणं धनुः सज्यं निःश्वसन्तं पुनः पुनः । दग्धु-
कामं जगत्सर्वं युगान्ते च यथा हरम् २ अदृष्टपूर्वं संक्रुद्धं दृष्ट्वा रामं
स लक्ष्मणः । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं मुखेन परिशुष्यता ३ पुरा भूत्वा
मृदुर्दान्तः सर्वभूतहिते रतः । न क्रोधवशमापन्नः प्रकृतिं हातुमर्हसि ४
चन्द्रे लक्ष्मीः प्रभा सूर्ये गतिर्वायौ भुवि क्षमा । एतच्च नियतं नित्यं
त्वयि चानुत्तमं यशः ५ एकस्य नापराधेन लोकान्हन्तुं त्वमर्हसि ६ न तु
जानामि कस्यायं भग्नः साङ्ग्रामिको रथः । केन वा कस्य वा हेतोः

---

नाहीं ७४, ७५. पूर्वीप्रमाणें मनोहर दंतांनीं युक्त व निर्दोष असलेली मिथिलराजकन्या सीता जर तिचे अपहार करणारे मला न देतील तर देव, गंधर्व, मनुष्य, पंनग व पर्वत ह्यांसहवर्तमान मी सर्व जगत् उलथून टाकीन ७६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६४ ॥

सीतेचा अपहार झाल्यामुळें म्लान वदन होऊन शोक करीत असलेला तो राम प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें लोकांच्या नाशाला उद्युक्त झाला आहे १, प्रत्यंचा चढविलेल्या धनुष्याकडे पहात आहे, वारंवार सुस्कारे टाकीत आहे, प्रलयसमयीं जगत् दग्ध करून टाकण्यास उद्युक्त होणाऱ्या रुद्राप्रमाणें सर्व जगतच दग्ध करून टाकण्याची इच्छा करीत आहे २ आणि पूर्वी कधींही पहाण्यांत न आलेला अशा रीतीनें क्रुद्ध झालेला आहे असें अवलोकन करण्याबरोबर लक्ष्मणाचें मुख निस्तेज झालें आणि हात जोडून तो त्याला ह्मणाला ३ " आपण पूर्वी इंद्रियनिग्रही आणि प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर होतां; तेव्हां सांप्रत क्रोधाच्या अधीन होऊन आपल्या स्वभावाचा त्याग करणें तुह्मांला योग्य नाहीं ४. चंद्राचे ठिकाणीं कांति, सूर्याचें ठिकाणीं प्रभा, वायूचे ठिकाणीं गति व पृथ्वीचे ठिकाणीं क्षमा हीं जशीं नित्यसिद्ध आहेत तशीच आपले ठिकाणीं अनुपम कीर्ति नित्यसिद्ध आहे ५. ह्यास्तव, एकाच्या अपराधाकरितां सर्व लोकांचा वध करणें आपणांला योग्य नाहीं ६. हा अपराध एकाचाच आहे हें मी जाणीत आहें, कारण, हा कोणाचा तरी एकाचाच संग्रामसंबंधीं रथ, सामान व आयुधें ह्यांसहवर्तमान मोडून पडलेला आहे हें हें उघडच दिसत आहे; परंतु, हा रथ कोणी मोडिला

संयुगः सपरिच्छदः ७ खुरनेमिक्षतश्चायं सिक्तो रुधिरबिन्दुभिः । देशो निर्वृत्तसङ्ग्रामः सुघोरः पार्थिवात्मज ८ एकस्य तु विमर्दोयं न द्वयोर्वदतां वर । न हि वृत्तं हि पश्यामि बलस्य महतः पदम् ९ नैकस्य तु कृते लोकान्विनाशयितुमर्हसि । युक्तदण्डा हि मृदवः प्रशान्ता वसुधाधिपाः १० सदा त्वं सर्वभूतानां शरण्यः परमा गतिः । को नु दारप्रणाशं ते साधु मन्येत राघव ११ सरितः सागराः शैला देवगन्धर्वदानवाः । नालं ते विप्रियं कर्तुं दीक्षितस्येव साधवः १२ येन राजन्हृता सीता तमन्वेषितुमर्हसि । मद्द्वितीयो धनुष्पाणिः सहायैः परमर्षिभिः १३ समुद्रं वा विचेष्यामः पर्वतांश्च वनानि च । गुहाश्च विविधा घोराः पद्मिन्यो विविधास्तथा १४ देवगन्धर्वलोकांश्च विचेष्यामः समाहिताः । यावन्नाधिगमिष्यामस्तव भार्यापहारिणम् १५ न चेत्साम्ना प्रदास्यन्ति पत्नीं ते त्रिदशेश्वराः । कोशलेन्द्र ततः पश्चात्प्राप्तकालं करिष्यसि १६ शीलेन

---

आहे व काय कारणाकरितां मोडिला आहे ह्याची मात्र अटकळ मला होत नाहीं ७. हे राजपुत्रा, अश्वांच्या खुरांनीं व चाकांच्या धावांनीं खळग्या पडलेल्या ह्या अतिभयंकर प्रदेशावर रक्तबिंदूंचा सडा झालेला आहे; ह्यावरून येथें संग्राम झालेला असावा असें दिसतें ८. हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ रामा, हा संग्राम एकेकट्याचाच झालेला आहे; अनेकांचा झालेला नाहीं. कारण, मोठ्या सैन्याचीं पावलें उमटलेलीं येथें दिसत नाहींत ९. तस्मात्, एकाकरितां त्रैलोक्याचा नाश करणें तुला योग्य नाहीं. पृथ्वीच्या अधिपतींनीं शांत व मृदु राहून अपराधाप्रमाणेंच दंडाचें अवलंबन केलें पाहिजे १०. सर्व प्राण्यांचें रक्षण करणारा तूंच असून सर्वांचा मुख्य आश्रयही तूंच आहेस. तेव्हां, हे रघुवंशजा रामा, तुझ्या पत्नीचा नाश होणें कोणालाही बरें वाटणार नाहीं ११. यज्ञदीक्षा घेतलेल्या यजमानाचे इच्छेविरुद्ध ज्याप्रमाणें ज्ञानी ऋत्विज वागत नाहींत त्याचप्रमाणें नद्या, समुद्र, पर्वत, देव, गंधर्व आणि दैत्य ह्यांपैकीं कोणीही तुझ्या मर्जीविरुद्ध वागण्यास समर्थ नाहींत १२. हे राजा, हातामध्यें धनुष्य घेऊन व साहाय्य करणाऱ्या श्रेष्ठ ऋषींसहवर्तमान मला बरोबर घेऊन तूं ज्यानें सीतेचा अपहार केला आहे त्याला हुडकून काढ १३. समुद्र, पर्वत, वनें, नानाप्रकारच्या घोर गुहा आणि नानाप्रकारचीं सरोवरें आपण धुंडून काढूं १४. इतकेंच नव्हे परंतु, तुझ्या भार्येचा अपहार करणाऱ्याचा पत्ता लागेपर्यंत आपण लक्ष्यपूर्वक देवलोक आणि गंधर्वलोकही शोधून काढूं १५; व ह्याप्रमाणें सामोपचारानें स्वर्गाधिपति देव जर तुला तुझी पत्नी परत न देतील तर, हे कोसलराज, नंतर समयाला योग्य असें काय हवें तें तूं कर १६. हे राजा,

साम्ना विनयेन सीतां नयेन न प्राप्स्यसि चेन्नरेन्द्र । ततः समुत्सादय हेमपुङ्खैर्महेन्द्रवज्रप्रतिमैः शरौघैः १७ [ २१४७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

तं तथा शोकसंतप्तं विलपन्तमनाथवत् । मोहेन महता युक्तं परिद्यूनमचेतसम् १ ततः सौमित्रिराश्वास्य मुहूर्तादिव लक्ष्मणः । रामं संबोधयामास चरणौ चाभिपीडयन् २ महता तपसा चापि महता चापि कर्मणा । राज्ञा दशरथेनासील्लब्धोऽमृतमिवामरैः ३ तव चैव गुणैर्बद्धस्त्वद्वियोगान्महीपतिः । राजा देवत्वमापन्नो भरतस्य यथाश्रुतम् ४ यदि दुःखमिदं प्राप्तं काकुत्स्थ न सहिष्यसे । प्राकृतश्चाल्पसत्त्वश्च इतरः कः सहिष्यति ५ आश्वासिहि नरश्रेष्ठ प्राणिनः कस्य नापदः । संस्पृशन्त्यग्निवद्राजन्क्षणेन व्यपयान्ति च ६ लोकस्वभाव एवैष ययातिर्नहुषात्मजः । गतः शक्रेण सालोक्यमनयस्तं समस्पृशत् ७ महर्षियो वसिष्ठस्तु यः पितुर्नः

---

गरीबी, सामोपचार, विनय आणि नीति ह्यांच्या योगानें जर तुला सीता प्राप्त न होईल तर इंद्रवज्रतुल्य आणि सुवर्णाच्या पिसांनीं युक्त अशा बाणसमुदायांच्या योगानें तूं त्रैलोक्याचा नाश करून टाक १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

त्याप्रमाणें शोकसंतप्त, खिन्न, अत्यंत मोहित व भानरहित झालेला तो राम अनाथाप्रमाणें विलाप करूं लागला असतां १ एक क्षणभरही वाट न पहातां सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रामाचे पाय धरिले आणि धीर देऊन तो त्याला ह्मणाला २ " देवांना ज्याप्रमाणें अमृत प्राप्त झालें त्याप्रमाणें मोठी तपश्चर्या आणि मोठें कर्मानुष्ठान केल्यामुळें दशरथराजाला तूं प्राप्त झालेला असून ३ त्या पृथ्वीपति राजाला तूं आपल्या गुणांनींच आपल्या स्वाधीन करून घेतलें असल्याकारणानें तुझ्याच वियोगामुळें तो स्वर्गवासी झाल्याची हकीकतही तूं भरतापासून इत्थंभूत श्रवण केलीच आहेस ४. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हें प्राप्त झालेलें दुःख जर तूं सहन न करशील तर कमी धैर्याचा असा दुसरा कोण बरें साधारण पुरुष ( प्रसंग पडला असतां ) दुःख सहन करील ? ( कारण, श्रेष्ठांचेंच अनुकरण इतर लोक करीत असतात ) ५. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठा, तूं धीर धर. हे राजा, प्रत्येक प्राण्यावर संकटें येऊन तीं त्याला अग्नीप्रमाणें चटका लावीतच असतात; परंतु, (धैर्याचें अवलंबन केलें असतां ) तीं एका क्षणामध्यें नाहींशींही होतात ६. अरे, ( प्रपंचांत दुःख होणें ) हा जगताचा स्वभावच आहे. नहुषपुत्र ययाति इंद्रलोकीं गेला असतां त्यालाही ( कांहीं दिवस स्वर्गच्युतिरूप ) दुःख भोगावें

पुरोहितः । अह्ना पुत्रशतं जज्ञे तथैवास्य पुनर्हतम् ८ या चेयं जगतो माता सर्वलोकनमस्कृता । अस्याश्च चलनं भूमेर्दृश्यते कोसलेश्वर ९ यौ चेमौ जगतो नेत्रौ यत्र सर्वं प्रतिष्ठितम् । आदित्यचन्द्रौ ग्रहणमभ्युपेतौ महाबलौ १० सुमहान्त्यपि भूतानि देवाश्च पुरुषर्षभ । न दैवस्य प्रमुञ्चन्ति सर्वभूतानि देहिनः ११ शक्रादिष्वपि देवेषु वर्तमानौ नयानयौ । श्रूयेते नरशार्दूल न त्वं व्यथितुमर्हसि १२ मृतायामपि वैदेह्यां नष्टायामपि राघव । शोचितुं नार्हसे वीर यथान्यः प्राकृतस्तथा १३ त्वद्विधा न हि शोचन्ति सततं सर्वदर्शनाः । सुमहत्स्वपि कृच्छ्रेषु रामानिर्विण्णदर्शनाः १४ तत्त्वतो हि नरश्रेष्ठ बुद्ध्या समनुचिन्तय । बुद्ध्या युक्ता महाप्राज्ञा विजानन्ति शुभाशुभे १५ अदृष्टगुणदोषाणामध्रुवाणां तु कर्मणाम् । नान्तरेण क्रियां तेषां फलमिष्टं च वर्तते १६ मामेवं हि पुरा वीर त्वमेव

---

लागलें ७. आपल्या पित्याचे पुरोहित जे महर्षि त्यांना शंभर पुत्र झाले व एका दिवसांतच विश्वामित्रानें ते सर्व मारून टाकिले ८. हे कोसलाधिपते, सर्व लोकांना पूज्य अशा ह्या जगज्जननी पृथ्वीचेंही चलन दृष्टोत्पत्तीस येतें ९. धर्मप्रवर्तक, जगन्नियंते आणि सर्वांना आधारभूत असे जे महाबलाढ्य सूर्य चंद्र यांनाही ग्रहण लागत असतें १०. हे पुरुषश्रेष्ठा, प्राणी कितीही मोठे असले तरी ते अथवा 'देवही दैवाच्या कचाट्यांतून सुटत नाहींत; मग देह धारण करणारे ( सामान्य ) सर्व प्राणी त्याच्या कचाट्यांतून सुटत नाहींत हें कशाला सांगावयास पाहिजे ? ११. हे पुरुषश्रेष्ठा, इंद्रादि देवांचें ठिकाणींही सुखदुःख असल्याचें ऐकण्यांत येतें; ह्यास्तव, शोक करणें तुला योग्य नाहीं १२. फार तर काय, परंतु, हे वीरा, सीता नाहींशी झाली असतां किंवा ती मेली असतांही एकाद्या साधारण पुरुषाप्रमाणें तिच्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं १३. हे रामा, नेहेमीं सर्व गोष्टींकडे लक्ष्य पुरविणारे आणि खिन्न मुद्रेनें कधींही युक्त न होणारे तुझ्यासारिखे ( श्रेष्ठ लोक ) मोठीं मोठीं संकटें आलीं असतांही दुःख करीत बसत नाहींत १४. हे पुरुषश्रेष्ठा, तूं बुद्धिपूर्वक एकदां तत्त्वदृष्टीनें युक्तायुक्तेचा विचार कर. कारण, बुद्धीनें युक्त असलेले महाज्ञानी लोक शुभाशुभ जाणीत असतात १५. ज्यांतील गुणदोष प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस येत नाहींत अशीं जीं नश्वर कर्मे त्यांची निष्पत्ति पुरुषव्यापारावांचून होत नाहीं; परंतु, स्वतःच्या खटपटीनें झालेलीं जीं तीं कर्मे त्यांच्यापासून परिणामीं सुख अथवा दुःख प्राप्त होतच असतें. ( तेव्हां काय प्राप्त होईल तें सहन केलेंच पाहिजे ) १६. हे वीरा, ह्याप्रमाणें पूर्वी तूंच मला

बहुशोकवान् । अनुशिष्याद्धि को नु त्वामपि साक्षाद्बृहस्पतिः १७
बुद्धिश्च ते महाप्राज्ञ देवैरपि दुरन्वया । शोकेनाभिप्रसुप्तं ते ज्ञानं संबोधयाम्यहम् १८ दिव्यं च मानुषं चैवमात्मनश्च पराक्रमम् । इक्ष्वाकुवृषभावेक्ष्य यतस्व द्विषतां वधे १९ किं ते सर्वविनाशेन कृतेन पुरुषर्षभ । तमेव तु रिपुं पापं विज्ञायोद्धर्तुमर्हसि २० [ २१६७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥

पूर्वजोऽप्युक्तवाक्यस्तु लक्ष्मणेन सुभाषितम् । सारग्राही महासारं प्रतिजग्राह राघवः १ स निगृह्य महाबाहुः प्रवृद्धं रोषमात्मनः । अवष्टभ्य धनुश्चित्रं रामो लक्ष्मणमब्रवीत् २ किं करिष्यावहे वत्स क्व वा गच्छाव लक्ष्मण । केनोपायेन पश्यावः सीतामिह विचिन्तय ३ तं तथा परितापार्तं लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् । इदमेव जनस्थानं त्वमन्वेषितुमर्हसि ४ राक्षसैर्बहुभिः कीर्णं नानाद्रुमलतायुतम् । सन्तीह गिरिदुर्गाणि निर्दराः कन्दराणि

---

अनेक वेळां उपदेश केला आहेस. बाकी साक्षात् बृहस्पतिही तुला उपदेश करण्यास समर्थ नाहीं; मग दुसऱ्याची तर गोष्ट पाहिजे कशाला ? १७. हे महाज्ञानवान् रामा, तुझ्या ज्ञानाचें आकलन देवांनाही करितां येणें शक्य नाहीं; तथापि शोकानें तें तुझें ज्ञान आज आच्छादित झाल्यासारिखें दिसत असल्यामुळें मी तें ( तुझ्याच उपदेशानें पुनरपि ) आवरणरहित करितों १८. हे इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठा रामा, देवांना व मनुष्यांना उचित अशा आपल्या पराक्रमाचा विचार करून तूं शत्रूंच्या वधाविषयीं प्रयत्न कर १९. हे पुरुषश्रेष्ठा, सर्वांचा नाश करून तुला काय उपयोग होणार आहे ? ज्यानें तुझ्या भार्येला नेलें असेल त्याच दुष्ट शत्रूला ओळखून काढून तूं त्याचीं पाळें मुळें खणून काढ "२०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

ह्याप्रमाणें लक्ष्मणानें ज्येष्ठ भ्रात्या रामाला चांगल्या शब्दांनीं उपदेश केला असतां सार ग्रहण करणाऱ्या रघुवंशज रामानें त्यांतील मुख्य सार ग्रहण केलें १. नंतर पराकाष्ठेला पोंचलेला आपला क्रोध आंवरून धरून व अद्भुत धनुष्य हातांत घेऊन तो महापराक्रमी राम लक्ष्मणाला ह्मणाला २ " वत्सा लक्ष्मणा, आपण आतां काय करावें ? आपणांला कोणत्या उपायानें येथें सीता प्राप्त होईल ह्याचा तूं विचार कर " ३. ह्याप्रमाणें तो राम दुःखाकुल झाला असतां लक्ष्मण त्याला ह्मणाला " हें जनस्थानच तूं शोधून काढ ४. नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेलें हें जनस्थान असंख्य राक्षसांनीं व्याप्त झालेलें आहे. ह्या ठिकाणीं जाण्यास अशक्य असे

च ५ गुहाश्च विविधा घोरा नानामृगगणाकुलाः । आवासाः किंनराणां च गधर्वभवनानि च ६ तानि युक्तो मया सार्धं समन्वेषितुमर्हसि । त्वद्विधा बुद्धिसंपन्ना महात्मानो नरर्षभाः ७ आपत्सु न प्रकम्पन्ते वायुवेगैरिवाचलाः । इत्युक्तस्तद्वनं सर्वं विचचार सलक्ष्मणः ८ क्रुद्धो रामः शरं घोरं संधाय धनुषि क्षुरम् । ततः पर्वतकूटाभं महाभागं द्विजोत्तमम् ९ ददर्श पतितं भूमौ क्षतजार्द्रं जटायुषम् । तं दृष्ट्वा गिरिशृङ्गाभं रामो लक्ष्मणमब्रवीत् १० अनेन सीता वैदेही भक्षिता नात्र संशयः । गृध्ररूपमिदं व्यक्तं रक्षो भ्रमति काननम् ११ भक्षयित्वा विशालाक्षीमास्ते सीतां यथासुखम् । एनं वधिष्ये दीप्ताग्रैः शरैर्घोरैरजिह्मगैः १२ इत्युक्त्वाभ्यपतद्द्रष्टुं संधाय धनुषि क्षुरम् । क्रुद्धो रामः समुद्रान्तां चालयन्निव मेदिनीम् १३ तं दीनदीनया वाचा सफेनं रुधिरं वमन् । अभ्यभाषत पक्षी स रामं दशरथात्मजम् १४ यामोषधीमिवायुष्मन्नन्वेषसि महावने । सा देवी मम च

---

पर्वतप्रदेश, धबधबे, दऱ्या ५ आणि अनेक प्रकारच्या भयंकर गुहा नानाप्रकारच्या मृगगणांनीं व्याप्त असून किन्नरांचीं निवासस्थानें व गंधर्वांचीं घरेंही येथें आहेत ६; तीं तूं मला बरोबर घेऊन शोधून काढ. तुझ्यासारिखे बुद्धिमान् व महात्मे पुरुषश्रेष्ठ ७ वायुवेगाला दाद न देणाऱ्या पर्वताप्रमाणें संकटसमयीं घाबरे होत नाहींत". ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितल्यावर तो क्रुद्ध राम वस्तऱ्यासारिखा तीक्ष्ण व घोर बाण धनुष्याला लावून लक्ष्मणासहवर्तमान त्या सर्व वनामध्यें संचार करूं लागला. तेव्हां पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड असलेला महाभाग्यवान् पक्षिश्रेष्ठ ८, ९ जटायु रक्तानें भरून गेलेला व भूमीवर पडलेला त्यानें अवलोकन केला आणि पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या पक्ष्याला अवलोकन केल्यावर राम लक्ष्मणाला ह्मणाला १० " ह्यानेंच विदेहराजकन्या सीता भक्षण करून टाकिली ह्यांत संशय नाहीं. निःसंशय हा गृध्ररूप राक्षस अरण्यामध्यें संचार करीत आहे ११. तस्मात्, विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या सीतेला यथेष्ट भक्षण करून ज्याअर्थीं हा स्वस्थ बसलेला आहे त्या अर्थीं उज्ज्वल अग्रांनीं युक्त व सरळ जाणाऱ्या घोर बाणांनीं मी ह्याचा वध करितों " १२. असें ह्मणून रामानें धनुष्याला क्षुरसंज्ञक बाण लाविला आणि समुद्रवलयांकित पृथ्वी कंपित करीतच कीं काय तो क्रुद्ध राम त्या पक्ष्याला पाहण्याकरितां त्याच्या अंगावर धांवून गेला १३. तेव्हां फेंसासहवर्तमान रक्त ओकीत असलेला तो पक्षी अत्यंत दीन वाणीनें त्या दशरथपुत्र रामाला ह्मणाला १४ " हे चिरंजीवी रामा, संजीवनी ओषधीप्रमाणें तूं जिचा महावनामध्यें शोध करीत आहेस ती सीता

प्राणा रावणेनोभयं हृतम् १५ त्वया विरहिता देवी लक्ष्मणेन च राघव ।
ह्रियमाणा मया दृष्टा रावणेन बलीयसा १६ सीतामभ्यवपन्नोऽहं रावणश्च
रणे प्रभो । विध्वंसितरथच्छत्रः पतितो धरणीतले १७ एतदस्य धनुर्भ-
ग्नमेते चास्य शरास्तथा । अयमस्य रणे राम भग्नः साङ्ग्रामिको रथः १८
अयं तु सारथिस्तस्य मत्पक्षनिहतो भुवि । परिश्रान्तस्य मे पक्षौ छित्त्वा
खड्गेन रावणः १९ सीतामादाय वैदेहीमुत्पपात विहायसम् । रक्षसा निहतं
पूर्वं मां न हन्तुं त्वमर्हसि २० रामस्तस्य तु विज्ञाय सीतासक्तां प्रियां
कथाम् । गृध्रराजं परिष्वज्य परित्यज्य महद्धनुः २१ निपपातावशो भूमौ
रुरोद सह लक्ष्मणः । द्विगुणीकृततापार्तो रामो धीरतरोऽपि सन् २२ एक-
मेकायने कृच्छ्रे निःश्वसन्तं मुहुर्मुहुः । समीक्ष्य दुःखितो रामः सौमित्रि-
मिदमब्रवीत् २३ राज्यं भ्रष्टं वने वासः सीता नष्टा मृतो द्विजः । ईदृशीयं

---

आणि माझे प्राण हीं दोन्हीं रावणानें हरण करून नेलीं १५. हे रघुवंशजा रामा, तूं आणि लक्ष्मण ह्यांपैकीं कोणीच बरोबर नसून सीतादेवीला महाबलाढ्य रावण घेऊन चालला आहे असें जेव्हां मीं अवलोकन केलें १६ तेव्हां, हे प्रभो, सीतेचें रक्षण करण्याच्या उद्देशानें मी त्याच्या पुढें गेलों आणि संग्रामामध्यें रावणाच्या रथाचा व छत्राचा विध्वंस करून मीं त्याला भूतलावर पाडिलें १७. हे रामा, हें त्याचें धनुष्य मोडून पडलें असून हे त्याचे बाण पडले आहेत आणि त्याचप्रमाणें रणामध्यें त्याचा हा संग्राम-संबंधीं रथ मोडून पडला आहे १८. इतकेंच नव्हे; परंतु, माझ्याच पंखांच्या योगानें हा त्याचा सारथिही भूमीवर मरून पडला आहे. तथापि, युद्ध करून मी शांत झालों असतां रावणानें खड्ग घेऊन माझे पंख तोडिले १९ आणि विदेहराजकन्या सीतेला घेऊन तो आकाशमार्गानें चालता झाला. ह्यास्तव, राक्षसानें पूर्वींच मारून टाकिलेल्या माझा वध करणें तुला योग्य नाहीं " २०. ह्याप्रमाणें त्यानें सांगितलेली ती सीतेसंबंधानें प्रिय कथा श्रवण केल्याबरोबर आपल्या हातांतील मोठें धनुष्य टाकून देऊन राम त्या गृध्रराज जटायूला कडकडून भेटला २१ आणि स्वतः इतरांपेक्षां धैर्यवान् असूनसुद्धां जटायूचाही वध झाल्याचें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आल्या कारणानें द्विगुणित दुःखानें व्याकुल झाल्यामुळें कांहीं एक सुचेनासें होऊन तो लक्ष्मणासहवर्तमान भूमीवर पडून रोदन करूं लागला २२. तदनंतर शोक करितां करितां लक्ष्मणाला ऊर्ध्व होऊन तो एकटा एकसारिखा दीर्घश्वास टाकीत आहे असें अवलोकन केल्यावर तो दुःखित राम म्हणाला २३ " राज्य नाहींसें झालें, वनामध्यें वास्तव्य करण्याचा प्रसंग आला, सीतेचा ठिकाण नाहीं आणि ( कैवारी ) पक्षीही मरून गेला;

ममालक्ष्मीर्दहेदपि हि पावकम् २४ संपूर्णमपि चेदद्य प्रतरेयं महोदधिम् । सोपि नूनं ममालक्ष्म्या विशुष्येत्सरितां पतिः २५ नास्त्यभाग्यतरो लोके मत्तोस्मिन्सचराचरे । येनेयं महती प्राप्ता मया व्यसनवागुरा २६ अयं पितुर्वयस्यो मे गृध्रराजो महाबलः । शेते विनिहतो भूमौ मम भाग्यविपर्ययात् २७ इत्येवमुक्त्वा बहुशो राघवः सहलक्ष्मणः । जटायुषं च पस्पर्श पितृस्नेहं निदर्शयन् २८ निकृत्तपक्षं रुधिरावसिक्तं तं गृध्रराजं परिगृह्य राघवः । क्व मैथिली प्राणसमा गतेति विमुच्य वाचं निपपात भूमौ २९ [ २१९६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः ॥ ६७ ॥

रामः प्रेक्ष्य तु तं गृध्रं भुवि रौद्रेण पातितम् । सौमित्रिं मित्रसंपन्नमिदं वचनमब्रवीत् १ ममायं नूनमर्थेषु यतमानो विहंगमः । राक्षसेन हतः संख्ये प्राणांस्त्यजति मत्कृते २ अतिखिन्नः शरीरेस्मिन्प्राणो लक्ष्मण विद्यते । तथा स्वरविहीनोयं विक्लवं समुदीक्षते ३ जटायो यदि शक्नोषि वाक्यं

---

अशा प्रकारची ही माझी आपत्ति अग्नीलाही जाळून टाकील २४. हा दुःखसंताप शमन होण्याकरितां संपूर्ण महासागरामध्यें जर मीं आज उडी घातली तर तो सागरही माझ्या आगीनें खरोखर शुष्क होऊन जाईल २५. ज्या मला हें प्रचंड दुःखजाल प्राप्त झालें आहे त्या माझ्यापेक्षां ह्या चराचर जगतामध्यें अधिक भाग्यहीन प्राणी कोणीही नाहीं २६. अरे, माझ्या पित्याचा मित्र हा महाबलाढ्य गृध्रराजही माझें नशीब फिरल्यामुळें भूमीवर मरून पडला आहे " २७. ह्याप्रमाणें रामानें लक्ष्मणासहवर्तमान नानाप्रकारांनीं विलाप केला आणि पितृप्रेम दर्शविण्याच्या उद्देशानें जटायूला त्यानें वारंवार आलिंगन दिलें २८. असो. ह्याप्रमाणें पंख तुटून शरीर रक्तानें भरलेल्या त्या गृध्रराजाला आलिंगन दिल्यावर " प्राणसमान असलेली माझी ( प्रिया ) मिथिलराजकन्या सीता कोठें गेली " असा हंबरडा फोडून रघुवंशज राम भूमीवर पडला २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

घोर राक्षसानें भूमीवर मारून पाडिलेल्या त्या गृध्राला अवलोकन केल्यावर राम सर्वांशीं मित्रत्वानें वागणाऱ्या लक्ष्मणाला ह्मणाला १ " खरोखर माझ्याकरितांच हा पक्षी धडपड करूं लागला असतांना राक्षसानें युद्धामध्यें ह्याचा वध केला आहे व हा आतां माझ्याकरितां प्राण सोडीत आहे २. हे लक्ष्मणा, ह्याच्या शरीरामध्यें ह्याचे प्राण अगदीं गुदमरून गेल्याचें दिसत आहे व ह्याच्या तोंडांतून उच्चारही निघत

व्याहरितुं पुनः।सीतामाख्याहि भद्रं ते वधमाख्याहि चात्मनः ४ किंनिमित्तो
जहारार्यां रावणस्तस्य किं मया। अपराधं तु यं दृष्ट्वा रावणेन हृता प्रिया ५
कथं तच्चन्द्रसंकाशं मुखमासीन्मनोहरम्। सीतया कानि चोक्तानि तस्मि-
न्काले द्विजोत्तम ६ कथंवीर्यः कथंरूपः किंकर्मा स च राक्षसः। क चास्य
भवनं तात ब्रूहि मे परिपृच्छतः ७ तमुद्वीक्ष्य स धर्मात्मा विलपन्तमना-
थवत्। वाचा विक्लवया राममिदं वचनमब्रवीत् ८ सा हृता राक्षसेन्द्रेण राव-
णेन दुरात्मना। मायामास्थाय विपुलां वातदुर्दिनसंकुलाम् ९ परिक्लान्तस्य
मे तात पक्षौ छित्त्वा निशाचरः। सीतामादाय वैदेहीं प्रयातो दक्षिणामुखः १०
उपरुध्यन्ति मे प्राणा दृष्टिर्भ्रमति राघव। पश्यामि वृक्षान्सौवर्णानुशीर-
कृतमूर्धजान् ११ येन याति मुहूर्तेन सीतामादाय रावणः। विप्रणष्टं धनं
क्षिप्रं तत्स्वामी प्रतिपद्यते १२ विन्दो नाम मुहूर्तोसौ न च काकुत्स्थ

नसून हा डोळे फिरवीत आहे ३. हे जटायो, तुझ्यानें जर बोलवत असेल तर पुनरपि एकदां सीतेची हकीकत सांग आणि तुझें देव बरें करो, स्वतःच्या वधाचाही वृत्तांत तूं मला कथन कर ४. साध्वी सीता रावणानें कशाकरितां बरें हरण करून नेली? माझी प्रिया सीता रावणानें हरण करून नेण्यासारिखा मी त्याचा काय बरें अपराध केला आहे? ५. तेवेळीं सीतेचें तें चंद्रतुल्य मनोहर मुख कसें झालें होतें आणि, हे पक्षिश्रेष्ठ, त्यावेळीं सीतेनें काय शब्द उच्चारिले (हें तूं मला कथन कर) ६. त्याचप्रमाणें, बा० जटायो, त्या राक्षसानें वीर्य कसें आहे, त्याचें स्वरूप कसें आहे, त्याचें कर्म कसें आहे आणि त्याचें वसतिस्थान कोठें आहे हें मी तुला विचारीत आहे तें तूं मला कथन कर" ७. ह्याप्रमाणें तो राम अनाथासारिखें भाषण करूं लागला असतां त्याच्याकडे पाहून तो धर्मात्मा जटायु अडखळत अडखळत ह्मणाला ८ "वायु व मेघपटल ह्यांनीं युक्त असलेल्या प्रचंड मायेचें अवलंबन करून त्या दुरात्म्या राक्षसाधिपति रावणानें सीता हरण करून नेली ९, मी त्याच्याशीं युद्ध करून थकलों असतां, बा रामा, माझेही पंख त्यानें तोडून टाकिले आणि विदेहराजकन्या सीतेला घेऊन तो राक्षस दक्षिणेकडे तोंड करून चालता झाला १०. हे रघुवंशजा रामा, आतां माझे प्राण व्याकुल होत असून माझी नजर ठरेनाशी झाली आहे आणि (मरणकाल समीप आल्यामुळें) नलेदरूप केसांनीं युक्त असे सुवर्णवृक्ष माझ्या दृष्टीं पडूं लागले आहेत ११. असो. ज्या मुहूर्तावर रावण सीतेला घेऊन गेला त्या मुहूर्तावर जें द्रव्य नाहींसें झालेलें असेल तें मालकाला सत्वर परत मिळत असतें १२. हे ककुत्स्थकुलो-त्पन्ना रामा, त्या वेळीं ह्या [1]विंदनामक मुहूर्त होता ही गोष्ट त्या रावणाच्या लक्ष्यांत

[1] वाका.

सोऽनुभवतु । झषवद्बडिशं गृह्य क्षिप्रमेव विनश्यति १३ न च त्वया व्यथा
कार्या जनकस्य सुतां प्रति । वैदेह्यां रंस्यसे क्षिप्रं हत्वा तं रणमूर्धनि १४
असंमूढस्य गृध्रस्य रामं प्रत्यनुभाषतः । आस्यात्सुस्राव रुधिरं म्रियमा-
णस्य सामिषम् १५ पुत्रो विश्रवसः साक्षाद्भ्राता वैश्रवणस्य च ।
इत्युक्त्वा दुर्लभान्प्राणान्मुमोच पतगेश्वरः १६ ब्रूहि ब्रूहीति रामस्य ब्रुवा-
णस्य कृताञ्जलेः । त्यक्त्वा शरीरं गृध्रस्य प्राणा जग्मुर्विहायसम् १७
स निक्षिप्य शिरो भूमौ प्रसार्य चरणौ तथा । विक्षिप्य च शरीरं स्वं
पपात धरणीतले १८ तं गृध्रं प्रेक्ष्य ताम्राक्षं गतासुमचलोपमम् । रामः
सुबहुभिर्दुःखैर्दीनः सौमित्रिमब्रवीत् १९ बहूनि रक्षसां वासे वर्षाणि वसता
सुखम् । अनेन दण्डकारण्ये विशीर्णमिह पक्षिणा २० अनेकवार्षिको
यस्तु चिरकालसमुत्थितः । सोऽयमद्य हतः शेते कालो हि दुरतिक्रमः २१
पश्य लक्ष्मण गृध्रोऽयमुपकारी हतश्च मे । सीतामभ्यवपन्नो हि रावणेन

---

आली नाहीं. तस्मात्, (ज्याअर्थी तो ह्या मुहूर्तावर सीतेला घेऊन गेला आहे त्याअर्थी) आमिषाचा स्वीकार करणाऱ्या मत्स्याप्रमाणें त्याचा सत्वरच नाश होईल १३. जनककन्येसंबंधानें तूं मुळींच काळजी करूं नकोस; संग्रामामध्यें त्या राक्षसाचा वध करून तूं लवकरच विदेहराजकन्येशीं रममाण होशील " १४. ह्याप्रमाणें तो शुद्धीवर असलेला गृध्रपक्षी रामाला सांगूं लागला असतां मरणोन्मुख झाल्यामुळें त्याच्या तोंडांतून मांसासहवर्तमान रक्त वाहूं लागलें १५ आणि ) रावण कोण हें सांगण्याचा उद्देश मनांत धरून ) " विश्रवस् मुनींचा प्रत्यक्ष पुत्र व कुबेराचा भ्राता " इतकेंच बोलून त्या पक्षिराजानें दुर्लभ प्राण सोडिले १६. सारांश " सांग, सांग " असें राम हात जोडून त्याला ह्मणत असतांनाही शरीराचा त्याग करून त्या गृध्रपक्ष्याचे प्राण आकाशामध्यें निघून गेले १७. तात्पर्य, मस्तक भूमीवर टाकून देऊन आणि त्याचप्रमाणें पाय लांब करून व आपलें शरीर अस्ताव्यस्त टाकून देऊन तो भूतलावर मरून पडला १८. तेव्हां ताम्रवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला पर्वतप्राय गृध्रपक्षी गतप्राण झाल्याचें अवलोकन करून फारच दुःख झाल्यामुळें दीन झालेला राम लक्ष्मणाला ह्मणाला १९ " राक्षसांचें निवासस्थान असलेल्या ह्या दंडकारण्यामध्यें पुष्कळ वर्षेंपर्यंत सुखानें वास्तव्य करणाऱ्या ह्या पक्ष्याला शेवटीं येथेंच मरण आलें २०. पुष्कळ वर्षांचा ह्मणजे चिरंजीवी असलेला हा पक्षी ज्याअर्थी आज मरून पडला आहे त्याअर्थी कालाचें अतिक्रमण होणें दुर्घट आहे ( हीच गोष्ट खरी ) २१. हे लक्ष्मणा, पहा माझ्यावर उपकार करणारा हा गृध्रपक्षी सीतेची मुक्तता करण्याकरितां

बलीयसा २२ गृध्रराज्यं परित्यज्य पितृपैतामहं महत् । मम हेतोरयं प्राणा-
न्मुमोच पतगेश्वरः २३ सर्वत्र खलु दृश्यन्ते साधवो धर्मचारिणः ।
शूराः शरण्याः सौमित्रे तिर्यग्योनिगतेष्वपि २४ सीताहरणजं दुःखं न
मे सौम्य तथागतम् । यथा विनाशो गृध्रस्य मत्कृते च परन्तप २५
राजा दशरथः श्रीमान्यथा मम महायशाः । पूजनीयश्च मान्यश्च तथायं
पतगेश्वरः २६ सौमित्रे हर काष्ठानि निर्मथिष्यामि पावकम् । गृध्रराजं
दिधक्ष्यामि मत्कृते निधनं गतम् २७ नाथं पतगलोकस्य चितिमारोपयाम्य-
हम् । इमं धक्ष्यामि सौमित्रे हतं रौद्रेण रक्षसा २८ या गतिर्यज्ञशीलाना-
माहिताग्नेश्च या गतिः । अपरावर्तिनां या च या च भूमिप्रदायिनाम् २९
मया त्वं समनुज्ञातो गच्छ लोकाननुत्तमान् । गृध्रराज महासत्त्व संस्कृ-
तश्च मया व्रज ३० एवमुक्त्वा चितां दीप्तामारोप्य पतगेश्वरम् । ददाह
रामो धर्मात्मा स्वबन्धुमिव दुःखितः ३१ रामोऽपि सह सौमित्रिर्वनं
यात्वा स वीर्यवान् । स्थूलान्हत्वा महारोहीननु तस्तार तं द्विजम् ३२

---

प्रवृत्त झाला असतां बलाढ्य रावणाच्या हातून ह्याचा वध झाला २२. आपले वाडवडि-
लांपासून चालत आलेल्या गृध्रराज्याचा त्याग करून ह्या पक्षिराजानें माझ्याकरितां
प्राण सोडिला २३. हे लक्ष्मणा, शूर व शरण जाण्यास योग्य असे धर्मानें वागणारे
साधुजन खरोखर सर्वत्र म्हणजे तिर्यग्योनि प्राप्त झालेल्या प्राण्यांतही दृष्टोत्पत्तीस येतात २४.
हे विनयसंपन्न शत्रुतापना लक्ष्मणा, माझ्याकरितां गृध्रपक्ष्याचा नाश झाला ह्याबद्दल
जसा माझ्या मनाला चटका लागून राहिला आहे तसा सीतेचा अपहार झाल्यामुळें होणाऱ्या
दुःखाचा चटका लागून राहिलेला नाहीं. वैभवशाली महाकीर्तिमान् दशरथराजा जसा
मला पूज्य व मान्य होता तसाच हा पक्षिराज मला पूज्य व मान्य आहे २५, २६. तस्मात्,
हे लक्ष्मणा, काष्ठें घेऊन ये म्हणजे मी मंथन करून अग्नि काढीन आणि माझ्याकरितां प्राणा-
ला मुकलेल्या ह्या पक्षिराजाचें दहन करीन २७. हे लक्ष्मणा, क्रूर राक्षसानें वध केलेल्या
ह्या पक्षिगणांच्या राजाला मी चितेवर ठेवून दहन करीन २८. हे महाशय गृध्रराजा, माझ्या
हस्तें तुझा और्ध्वदेहिक संस्कार होत असल्यामुळें यज्ञशील, अग्निहोत्री, युद्धापासून
परावृत्त न होणारे आणि भूमिदान करणारे ह्यांची गति तुला क्रमाक्रमानें प्राप्त झाल्यावर
माझ्या अनुज्ञेनें तुला सर्वोत्कृष्ट असे क्रममुक्तिदायक लोक प्राप्त होतील " २९, ३०.
असें बोलून रामानें त्या पक्षिराजाला प्रदीप्त चितेवर ठेविलें आणि दुःखाकुल होऊन
त्या धर्मात्म्यानें स्वतःचा बांधवच की काय असें समजून त्याचें दहन केलें ३१. नंतर
लक्ष्मणाला बरोबर घेऊन वनामध्यें गेलेल्या त्या वीर्यवान् रामानें मोठे मोठे स्थूल हरिण

रोहिमांसानि चोद्धृत्य पेशीकृत्वा महायशाः । शकुनाय ददौ रामो रम्ये हरितशाद्वले ३३ यत्तत्प्रेतस्य मर्त्यस्य कथयन्ति द्विजातयः । तत्स्वर्गगमनं क्षिप्रं तस्य रामो जजाप ह ३४ ततो गोदावरीं गत्वा नदीं नरवरात्मजौ । उदकं चक्रतुस्तस्मै गृध्रराजाय तावुभौ ३५ शास्त्रदृष्टेन विधिना जलं गृध्राय राघवौ । स्नात्वा तौ गृध्रराजाय उदकं चक्रतुस्तदा ३६ स गृध्रराजः कृतवान्यशस्करं सुदुष्करं कर्म रणे निपातितः । महर्षिकल्पेन च संस्कृतस्तदा जगाम पुण्यां गतिमात्मनः शुभाम् ३७ कृतोदकौ तावपि पक्षिसत्तमे स्थिरां च बुद्धिं प्रणिधाय जग्मतुः । प्रवेश्य सीताधिगमे ततो मनो वनं सुरेन्द्राविव विष्णुवासवौ ३८ [ २२३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥ ६८ ॥

कृत्वैवमुदकं तस्मै प्रस्थितौ राघवौ तदा । अवेक्षन्तौ वने सीतां जग्मतुः पश्चिमां दिशम् १ तां दिशं दक्षिणां गत्वा शरचापासिधारिणौ । अविप्रहत-

---

मारून आणिले आणि तदनंतर त्या पक्ष्याला उद्देशून पिंडदान करण्याकरितां त्यानें भूमीवर तृण पसरिलें ३२. मृगमांस बाहेर काढून व त्याचे पिंड करून महाकीर्तिमान् रामानें रम्य अशा त्या हिरव्या तृणावर पक्ष्याला अर्पण केले ३३ आणि मृत झालेल्या मनुष्याला स्वर्गप्राप्ति व्हावी ह्या उद्देशानें जे मंत्र ब्राह्मण सांगत असतात त्या स्वर्गप्रापक मंत्रांचा रामानें सत्वर जप केला ३४. इतकें झाल्यावर ते उभयतां राजपुत्र गोदावरी नदीचे तीरीं गेले आणि त्यांनीं त्या गृध्रराजाचें तर्पण केलें ३५. सारांश, शास्त्रोक्तविधीचें अवलंबन करून जलाचा आश्रय केल्यावर त्या उभयतां रघुवंशजांनीं त्या गृध्राच्या उद्देशानें स्नान केलें आणि नंतर त्यांनीं त्या गृध्रराजाला जलांजलि दिली ३६. असो. कीर्ति वृद्धिंगत करणारें असें अत्यंत दुष्कर कर्म करून संग्रामांत वध पावलेल्या त्या गृध्रराजाचा महर्षितुल्य रामानें और्ध्वदेहिक संस्कार केल्यामुळें त्याला केवल पुण्यानेंच प्राप्त होणारी व सुखरूपच असलेली अशी आत्मगति प्राप्त झाली ३७ व इकडे उत्तर क्रियेसंबंधीं उदककर्म आटोपल्यावर त्या श्रेष्ठ पक्ष्याविषयीं आपली पूज्य बुद्धि अचल कायम ठेवून आणि पुनरपि सीतेच्या प्राप्तीकडे आपलें मन लावून देवाधिपति विष्णु व इंद्रच कीं काय असे ते रामलक्ष्मण वनामध्यें प्रविष्ट झाले ३८. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६८ ॥

याप्रमाणें त्या जटायूला जलांजलि दिल्यावर तेथून वनामध्यें निघालेले ते रघुवंशज रामलक्ष्मण सीतेला शोधण्याकरितां पश्चिमदिशेकडे चालते झाले १ आणि

ऐक्ष्वाकौ पन्थानं प्रतिपेदतुः २ गुल्मैर्वृक्षैश्च बहुभिर्लताभिश्च प्रवेष्टितम् । आवृतं सर्वतो दुर्गं गहनं घोरदर्शनम् ३ व्यतिक्रम्य तु वेगेन गृहीत्वा दक्षिणां दिशम् । सुभीमं तन्महारण्यं व्यतियातौ महाबलौ ४ ततः परं जनस्थानात्त्रिक्रोशं गम्य राघवौ । क्रौञ्चारण्यं विविशतुर्गहनं तौ महौजसौ ५ नानामेघघनप्रख्यं प्रहृष्टमिव सर्वतः । नानावर्णैः शुभैः पुष्पैर्मृगपक्षिगणैर्युतम् ६ दिदृक्षमाणौ वैदेहीं तद्वनं तौ विचिन्वतुः । तत्र तत्रावतिष्ठन्तौ सीताहरणदुःखितौ ७ ततः पूर्वेण तौ गत्वा त्रिक्रोशं भ्रातरौ तदा । क्रौञ्चारण्यमतिक्रम्य मतङ्गाश्रममन्तरे ८ दृष्ट्वा तु तद्वनं घोरं बहुभीममृगद्विजम् । नानावृक्षसमाकीर्णं सर्वं गहनपादपम् ९ ददृशाते गिरौ तत्र दरीं दशरथात्मजौ । पातालसमगम्भीरां तमसा नित्यसंवृताम् १० आसाद्य च नरव्याघ्रौ दर्यास्तस्याविदूरतः । ददर्शतुर्महारूपां राक्षसीं विकृताननाम् ११ भयदा-

नंतर जरा दक्षिण दिशेकडे वळल्यावर धनुर्बाण व खड्ग धारण केलेले ते इक्ष्वाकुवंशज रामलक्ष्मण संचाररहित अशा मार्गाला लागले २. झुडपें, वृक्ष आणि नानाप्रकारच्या लता ह्यांनीं परिवेष्टित असलेला तो वनरूप मार्ग सर्व बाजूंनीं आच्छादित, जाण्यास कठीण व दिसण्यांतही भयंकर होता ३. तथापि, दक्षिणदिशेचें अवलंबन करून वेगावेगानें ते त्या मार्गांतून पार पडले आणि नंतर ते महाबलाढ्य रामलक्ष्मण अतिशयच भयंकर अशा त्या महारण्यामध्यें प्रविष्ट झाले ४. तदनंतर जनस्थानापासून तीन कोस गेल्यावर ते महासामर्थ्यवान् रघुवंशज रामलक्ष्मण क्रौंचारण्यसंज्ञक गहन वनामध्यें प्रविष्ट झाले ५. अनेक मेघांच्या समुदायाप्रमाणें श्यामवर्ण असलेलें तें वन अनेक वर्णांच्या शुभ पुष्पांनीं व पशुपक्ष्यांच्या समुदायांनीं युक्त असल्यामुळें सर्व बाजूंनीं आनंदित झाल्यासारिखें दिसत होतें ६. असो. सीतेचा अपहार झाल्यामुळें दुःखित झालेले ते रामलक्ष्मण सीतेला शोधण्याचा उद्देश मनामध्यें धरून जागोजाग थांबले आणि त्यांनीं तें वन धुंडून काढिलें ७. तदनंतर त्या क्रौंचारण्यसंज्ञक वनांतून निघाल्यावर पूर्वदिशेकडे ते तीन कोस गेले असतां मार्गामध्यें मतंगमुनींचा आश्रम त्यांनीं अवलोकन केला ८. आणि भयंकर अशा असंख्य पशुपक्ष्यांनीं युक्त, नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त व गहन वृक्षांनीं गजबजलेलें असें तें घोर मतंगाश्रमवन अवलोकन केल्यावर ९ त्या दशरथपुत्रांनीं पातालाप्रमाणें खोल व अंधकारानें नेहमीं व्याप्त असलेली एक दरी त्या पर्वतावर अवलोकन केली १० व त्या दरीच्या शेजारींच ते पुरुषश्रेष्ठ बसले असतां अकाळविकाळ मुखानें युक्त असलेली एक फारच मोठी राक्षसी त्यांच्या दृष्टीं पडली ११. ती निंद्य कर्म करणारी

मत्त्वसत्त्वानां बीभत्सां रौद्रदर्शनाम्। लम्बोदरीं तीक्ष्णदंष्ट्रां करालीं परु-
षत्वचम् १२ भक्षयन्तीं मृगान्भीमान्विकटां मुक्तमूर्धजाम्। अपश्यतां तु
तौ तत्र भ्रातरौ रामलक्ष्मणौ १३ सा समासाद्य तौ वीरौ व्रजन्तं भ्रातु-
रग्रतः। एहि रंस्यावहेत्युक्त्वा समालम्भत लक्ष्मणम् १४ उवाच चैनं
वचनं सौमित्रिमुपगृह्य च। अहं त्वयोमुखी नाम लाभस्ते त्वमसि
प्रियः १५ नाथ पर्वतदुर्गेषु नदीनां पुलिनेषु च। आयुश्चिरमिदं वीर त्वं
मया सह रंस्यसे १६ एवमुक्तस्तु कुपितः खड्गमुद्धृत्य लक्ष्मणः। कर्ण-
नासस्तनं तस्या निचकर्तारिसूदनः १७ कर्णनासे निकृत्ते तु विस्वरं
विननाद सा। यथागतं प्रदुद्राव राक्षसी घोरदर्शना १८ तस्यां गतायां
गहनं व्रजन्तौ वनमोजसा। आसेदतुरमित्रघ्नौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ १९
लक्ष्मणस्तु महातेजाः सत्यवाञ्छीलवाञ्छुचिः। अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं
भ्रातरं दीप्ततेजसम् २० स्पन्दते मे दृढं बाहुरुद्विग्नमिव मे मनः। प्रायश-
श्चाप्यनिष्टानि निमित्तान्युपलक्षये २१ तस्मात्सज्जीभवार्य त्वं कुरुष्व वचनं

राक्षसी दिसण्यांतही भयंकर असून अशक्त प्राण्यांना भयप्रद होती. तिचें उदर लांब होतें, दाढा तीक्ष्ण होत्या, शरीर उन्नत होतें, त्वचा कठिण होती १२, आकार फारच स्थूल होता, केंस मोकळे सोडिलेले होते आणि भयंकर मृगांनाही ती भक्षण करीत होती. अशा प्रकारची ती राक्षसी त्या भ्रात्या॰ रामलक्ष्मणांनीं अवलोकन केल्यावर १३ ती त्या वीरांचे समीप आली आणि भ्रात्याचे अग्रभागीं संचार करीत असलेल्या लक्ष्मणाला " ये, आपण रममाण होऊं " असें ह्मणून तिनें त्याला आलिंगन दिलें १४. इतकेंच नव्हे; परंतु, लक्ष्मणाला मिठी मारिल्यावर ती त्याला ह्मणाली " माझें नांव अयोमुखी असून मी तुला लाभरूपच आहें आणि तूं माझा प्रिय भर्ता आहेस १५. ह्यास्तव, हे नाथा, हे वीरा, पर्वतसंबंधीं दुर्गम प्रदेश व नद्यांचीं वाळवंटें ह्याठिकाणीं माझ्यासहवर्तमान तूं चिरकाल रममाण हो " १६. ह्याप्रमाणें तिनें सांगितलें असतां लक्ष्मण क्रुद्ध झाला आणि त्या शत्रुनाशकानें तरवार उपसून तिचे कान, नाक व स्तन कापून काढिले १७. तेव्हां कान व नाक तुटल्यावर तिनें भयंकर गर्जना केली आणि दिसण्यांतही भयंकर असलेली ती राक्षसी आल्या मार्गानें पळून गेली १८. ती गेल्यावर शत्रूंचा वध करणारे ते भ्राते रामलक्ष्मण जोरानें चालतां चालतां एका गहन वनामध्यें आले १९. तेव्हां सत्यनिष्ठ, सुशील, शुचि व महातेजस्वी लक्ष्मण हात जोडून उज्ज्वल कांतीनें युक्त असलेल्या भ्रात्याला ह्मणाला २०. " माझा (वाम) बाहु अतिशयच स्फुरण पावत असून माझें मनही उद्विग्न झाल्यासारिखें झालें आहे

मम । ममैव हि निमित्तानि सद्यः शंसन्ति संभ्रमम् २२ एष वञ्चुलको नाम पक्षी परमदारुणः । आवयोर्विजयं युद्धे शंसन्निव विनर्दति २३ तयोरन्वेषतोरेवं सर्वं तद्वनमोजसा । संजज्ञे विपुलः शब्दः प्रभञ्जन्निव तद्वनम् २४ संवेष्टितमिवात्यर्थं गहनं मातरिश्वना । वनस्य तस्य शब्दोऽभूद्वनमापूरयन्निव २५ तं शब्दं काङ्क्षमाणस्तु रामः खड्गी सहानुजः । ददर्श सुमहाकायं राक्षसं विपुलोरसम् २६ आसेदतुश्च तद्रक्षस्तावुभौ प्रमुखे स्थितम् । विवृद्धमशिरोग्रीवं कबन्धमुदरे मुखम् २७ रोमभिर्निशितैस्तीक्ष्णैर्महागिरिमिवोच्छ्रितम् । नीलमेघनिभं रौद्रं मेघस्तनितनिःस्वनम् २८ अग्निज्वालानिकाशेन ललाटस्थेन दीप्यता । महापक्ष्मेण पिङ्गेन विपुलेनायतेन च २९ एकेनोरसि घोरेण नयनेन सुदर्शिना ।

---

व ह्याप्रमाणें प्रायः भयसूचक चिन्हेंच माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहेत २१. तस्मात्, हे आर्य, तूं सज्ज हो; माझें एक. कारण, हीं चिन्हें मला आतांच भय प्राप्त होईल असें सुचवीत आहेत २२ आणि हा महाभयंकर वंचुलक नांवाचा पक्षी युद्धामध्यें आपला विजय होईल असें सुचवीत सुचवीत गर्जना करीत आहे " २३. असो. ह्याप्रमाणें स्वसामर्थ्यानें तें सर्व वन शोधीत असतांना तें वन मोडूनच टाकीत आहे कीं काय असा एक मोठा ध्वनि उत्पन्न झाला २४. सारांश, वायूनें तें वन अतिशय व्याप्त झाल्यासारिखें झाल्यामुळें सर्व वन दणाणून टाकणारा असा शब्द त्या वनामध्येंच उत्पन्न झाला २५. तेव्हां तो शब्द होण्याचें कारण काय ह्मणून राम हातामध्यें तरवार घेऊन आपल्या कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान विचार करूं लागला असतां विशाल वक्षस्थलानें युक्त असा एक अतिप्रचंड राक्षस त्यांनीं अवलोकन केला २६ व संमुखच उभा राहिलेल्या त्या राक्षसाकडे ते उभयतां गेले. त्याचें शरीर फारच वाढलेलें होतें मुख उदरामध्येंच असल्यामुळें मस्तक व कंठ ह्यांनीं रहित असलेला तो राक्षस कबंध ह्या नांवाला अगदीं योग्य झालेला होता २७. निशित ह्मणजे तीक्ष्ण रोमांनीं युक्त असलेला तो राक्षस उन्नत अशा महापर्वताप्रमाणें दिसत होता; त्या भयंकर राक्षसाची कांति नीलवर्ण मेघाप्रमाणें असून स्वरही मेघगर्जनेप्रमाणेंच होता २८. त्याच्या कपाळावर अग्नीच्या ज्वालेसारिखा एक देदीप्यमान डोळा होता, त्याच्या पापण्या फारच मोठ्या होत्या, त्याचा वर्ण पिंगट होता, तो विशाल व दीर्घ होता २९, त्याची दृष्टि उत्तम होती आणि तो एक भयंकर डोळा ( मस्तकाचा भाग सर्व आंत गेलेला असल्यामुळें ) उरःप्रदेशाचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत होता. अशा प्रकारचा डोळा व मोठमोठ्या दाढा ह्यांनीं युक्त असलेलें आपलें प्रचंड मुख तो राक्षस चाटीत

महादंष्ट्रोपपन्नं तं लेलिहानं महामुखम् ३० भक्षयन्तं महाघोरानृक्षसिंहमृगद्विजान् । घोरौ भुजौ विकुर्वाणमुभौ योजनमायतौ ३१ कराभ्यां विविधान्गृह्य ऋक्षान्पक्षिगणान्मृगान् । आकर्षन्तं विकर्षन्तमनेकान्मृगयूथपान् ३२ स्थितमावृत्य पन्थानं तयोर्भ्रात्रोः प्रपन्नयोः । अथ तं समतिक्रम्य क्रोशमात्रं ददर्शतुः ३३ महान्तं दारुणं भीमं कबन्धं भुजसंवृतम् । कबन्धमिव संस्थानादतिघोरप्रदर्शनम् ३४ स महाबाहुरत्यर्थं प्रसार्य विपुलौ भुजौ । जग्राह सहितावेव राघवौ पीडयन्बलात् ३५ खड्गिनौ दृढधन्वानौ तिग्मतेजौ महाभुजौ । भ्रातरौ विवशं प्राप्तौ कृष्यमाणौ महाबलौ ३६ तत्र धैर्याच्च शूरस्तु राघवो नैव विव्यथे । बाल्यादनाश्रयाच्चैव लक्ष्मणस्त्वभिविव्यथे ३७ उवाच च विषण्णः सन्राघवं राघवानुजः । पश्य मां विवशं वीर राक्षसस्य वशंगतम् ३८ मयैकेन तु निर्युक्तः

होता ३०. महाभयंकर अस्वलें, सिंह, मृग व पक्षी तो भक्षण करीत होता, एकेक योजन ( ह्मणजे चार चार कोस ) लांब असलेले आपले दोन्ही भयंकर हात तो इकडे तिकडे हालवीत होता ३१, नानाप्रकारचे पक्षिगण, अस्वलें व मृग हातांनीं धरून तो आपल्याकडे ओढीत होता, आपआपल्या कळपांचें रक्षण करणारे असे अनेक मृग आपल्यापासून पलीकडेही ओढून तो टाकीत होता ३२ आणि मार्गानें जात असलेल्या त्या उभयतां भ्रात्यांचा मार्ग व्याप्त करून तो उभा राहिला होता. तेव्हां त्याच्या मिठीमध्यें न सांपडतां ते रामलक्ष्मण दूर जाऊन उभे राहिले असतां शरीरानें तो राक्षस एक कोसपर्यंत असल्याचें त्यांनीं अवलोकन केलें ३३. धिप्पाड, क्रूर, भयंकर बाहूंच्या योगानें प्राण्यांना घेरणारा आणि दिसण्यांतही अतिशयच भयंकर असलेला तो कबंध राक्षस ( मस्तक उदरांत असल्यामुळें ) आकृतीनेंही कबंधच होता ३४. दीर्घ हातांनीं युक्त असलेल्या त्या कबंध राक्षसानें रघुवंशज रामलक्ष्मणांना आवळून टाकण्याच्या उद्देशानें आपले दीर्घ हात लांब करून एकदम धरिलें ३५ व ते रामलक्ष्मण जरी महाधनुर्धारी, प्रचंड तेजस्वी, महापराक्रमी, महाबलाढ्य व हातांत तरवारी घेतलेले असे होते तथापि तो राक्षस त्यांना ओढूं लागला असतां ते निरुपाय होऊन त्याच्या मिठींत सांपडलेच ३६. त्या उभयतांपैकीं रघुवंशज शूर राम धैर्यामुळें भयभीत झाला नाहीं; परंतु लक्ष्मण बालबुद्धीमुळें आणि धैर्याचा आधार नसल्यामुळें भयभीत झाला ३७. इतकेंच नव्हे; परंतु, रामाच्या मागून जन्मास आलेला तो लक्ष्मण खिन्न होऊन रामाला ह्मणाला "हे वीरा, निरुपाय होऊन राक्षसाच्या तावडींत सांपडलेल्या मला अवलोकन कर ३८. मज एकट्याची राक्षसाच्या बलि-

परिमुच्यस्व राघव । मां हि भूतबलिं दत्त्वा पलायस्व यथासुखम् ३९
अधिगन्तासि वैदेहीमचिरेणेति मे मतिः । प्रतिलभ्य च काकुत्स्थ पितृ-
पैतामहीं महीम् ४० तत्र मां राम राज्यस्थः स्मर्तुमर्हसि सर्वदा । लक्ष्मणे-
नैवमुक्तस्तु रामः सौमित्रिमब्रवीत् ४१ मा स्म त्रासं वृथा वीर न हि त्वाह-
ग्विषीदति । एतस्मिन्नन्तरे क्रूरो भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४२ तावुवाच महा-
बाहुः कबन्धो दानवोत्तमः । कौ युवां वृषभस्कन्धौ महाखड्गधनुर्धरौ ४३
घोरं देशमिमं प्राप्तौ दैवेन मम चाक्षुषौ । वदतं कार्यमिह वां किमर्थं
चागतौ युवाम् ४४ इमं देशमनुप्राप्तौ क्षुधार्तस्येह तिष्ठतः । सबाणचाप-
खड्गौ च तीक्ष्णशृङ्गाविवर्षभौ ४५ मां तूर्णमनुसंप्राप्तौ दुर्लभं जीवितं हि
वाम् । तस्य तद्वचनं श्रुत्वा कबन्धस्य दुरात्मनः ४६ उवाच लक्ष्मणं रामो
मुखेन परिशुष्यता । कृच्छ्रात्कृच्छ्रतरं प्राप्य दारुणं सत्यविक्रम ४७ व्यसनं

---

स्थानीं योजना करून तूं आपली सुटका करून घे. सारांश, हे रामा, राक्षसाला माझा बलि देऊन तूं आपला खुशाल पळून जा ३९; ह्मणजे तुला विदेहराजकन्या लवकरच प्राप्त होईल असें मला वाटतें. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, वाडवडिलांपासून चालत आलेली पृथ्वी प्राप्त होऊन तूं राज्यावर बसलास ह्मणजे नेहमीं माझी आठवण करीत जा." लक्ष्मणानें ह्याप्रमाणें सांगितलें असतां राम त्याला ह्मणाला ४०, ४१ "हे वीरा, तूं भिऊं नको, तुझ्यासारिखा पुरुष धैर्य सोडीत नाहीं." हें उभयतांचें बोलणें चाललें आहे तोंच तो क्रूर व दीर्घ बाहूनीं युक्त असलेला राक्षसश्रेष्ठ कबंध त्या भ्रात्या रामलक्ष्मणांना ह्मणाला "बैलासारिखे ज्यांचे खांदे आहेत व मोठ-मोठे खड्ग व धनुष्यें ज्यांनीं धारण केलीं आहेत असें तुह्मी कोण ४२,४३. सुदैवानें ह्या घोर प्रदेशामध्यें येऊन मला दृग्गोचर झाला आहांत ? तुमचें येथें काय काम आहे व तुह्मी येथें कशाकरितां आलां आहांत हें मला सांगा" ४४. अरे, बाण, धनुष्य व खड्ग धारण केल्यामुळें तीक्ष्ण शृंगांनीं युक्त असलेल्या बैलाप्रमाणें दिसत असलेले तुह्मी, क्षुधेनें व्याकुल होऊन येथें असलेल्या माझ्या ह्या प्रदेशावर, प्राप्त झालां असून ४५ लगेंच माझ्या समीपही आलां आहांत ह्यामुळें तुमचें जीवित दुर्लभ आहे." हें त्या दुरात्म्या कबंध राक्षसाचें भाषण श्रवण करून ४६ रामाच्या तोंडचें पाणी पळून तो लक्ष्मणाला ह्मणाला "हे अमोघपराक्रमी लक्ष्मणा, अत्यंत दुःसह असें राज्यभ्रंशरूप भयंकर दुःख प्राप्त झालें असूनही ( न डगमगतां आजपर्यंत कायम राहिलेल्या ) आपणांला आज ती प्रिया प्राप्त न होतांच जीविताचा अंत होईल अशा प्रकारचें हें संकट प्राप्त झालें आहे. तस्मात्, हे लक्ष्मणा, सर्व प्राण्यांचे ठिकाणीं

जीवितान्ताय प्राप्तमप्राप्य तां प्रियाम् । कालस्य सुमहद्वीर्यं सर्वभूतेषु लक्ष्मण ४८ त्वां च मां च नरव्याघ्र व्यसनैः पश्य मोहितौ । न हि भारोऽस्ति दैवस्य सर्वभूतेषु लक्ष्मण ४९ शूराश्च बलवन्तश्च कृतास्त्राश्च रणाजिरे । कालाभिपन्नाः सीदन्ति यथा वालुकसेतवः ५० इति ब्रुवाणो दृढसत्यविक्रमो महायशा दाशरथिः प्रतापवान् । अवेक्ष्य सौमित्रिमुदग्रविक्रमः स्थिरां तदा स्वां मतिमात्मनाकरोत् ५१ [ २२८५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनसप्ततितमः सर्गः ॥ ६९ ॥

तौ तु तत्र स्थितौ दृष्ट्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ । बाहुपाशपरिक्षिप्तौ कबन्धो वाक्यमब्रवीत् १ तिष्ठतः किं नु मां दृष्ट्वा क्षुधार्तं क्षत्रियर्षभौ । आहारार्थं तु संदिष्टौ दैवेन हतचेतनौ २ तच्छ्रुत्वा लक्ष्मणो वाक्यं प्राप्तकालं हितं तदा । उवाचार्तिमापन्नो विक्रमे कृतनिश्चयः ३ त्वां च मां च पुरा तूर्णमादत्ते राक्षसाधमः । तस्मादसिभ्यामस्याशु बाहू छिन्दावहे गुरू ४ भीषणोऽयं महाकायो राक्षसो भुजविक्रमः । लोकं ह्यतिजितं

---

कालाचें अति मोठें सामर्थ्य दृष्टोत्पत्तीस येतच असतें ४७, ४८. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, पहा; तूं व मी असे दोघेही संकटांनीं गांगरून गेलों आहोंत. ह्यावरून कोणीही प्राणी असला तरी त्याचे ठिकाणीं पराक्रम गाजविण्यास दैवाला मुळींच जड जात नाहीं ४९. कारण, शूर, बलाढ्य व अस्त्रनिपुण असेही लोक वेळ आली ह्मणजे वाळूच्या बंधाऱ्यांप्रमाणें समरांगणामध्यें नाश पावतात " ५०. ह्याप्रमाणें बोलणाऱ्या त्या महाकीर्तिमान्, प्रतापी आणि प्रचंड व अमोघ पराक्रम करणाऱ्या दशरथपुत्र रामानें सुमित्रानंदन लक्ष्मणाकडे पाहिलें आणि स्वतः त्या महापराक्रमी रामानें आपलें मन मुळींच खिन्न होऊं न देतां अचल केलें ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकुणहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ६९ ॥

बाहुपाशानें घेरले गेलेले ते रामलक्ष्मण तसेच तेथें उभे आहेत असें अवलोकन करून कबंध राक्षस त्यांना ह्मणाला १. " हे क्षत्रियश्रेष्ठहो, क्षुधेनें व्याकुळ झालेल्या मला अवलोकन करूनही तुह्मी स्वस्थ कसले उभे रहात आहां ? अरे, अकल गुंग झालेल्या तुमची नेमणूक दैवानें माझ्या आहाराकडे केलेली आहे " २. प्रथमतः भयभीत झालेल्या लक्ष्मणानें तें राक्षसाचें भाषण श्रवण करितांक्षणीं पराक्रमाविषयीं निश्चय केला आणि समयाला योग्य व हितावह असें भाषण तो रामाशीं करूं लागला ३. ( तो ह्मणाला ) " हा राक्षसाधम आधीं तुला व मला सत्वर आवळून टाकील; तस्मात्, तरवारींनीं आपण ह्याचे मोठमोठे हात तोडून टाकूं ४. शरीरानें धिप्पाड, ह्यानीं

ज्ञात्वा युवयोर्वां हन्तुमिहेच्छति ५ निश्चेष्टानां वधो राजन्कुत्सितो जगतीपतेः।
क्रतुमध्योपनीतानां पशूनामिव राघव ६ एतत्संजल्पितं श्रुत्वा तयोः
क्रुद्धस्तु राक्षसः। विदार्यास्यं ततो रौद्रं तौ भक्षयितुमारभत् ७ ततस्तौ
देशकालज्ञौ खड्गाभ्यामेव राघवौ। अच्छिन्दन्तौ सुसंहृष्टौ बाहू तस्यांसदे-
शयोः ८ दक्षिणो दक्षिणं बाहुमसक्तमसिना ततः। चिच्छेद रामो वेगेन
सव्यं वीरस्तु लक्ष्मणः ९ स पपात महाबाहुश्छिन्नबाहुर्महास्वनः। खं च
गां च दिशश्चैव नादयञ्जलदो यथा १० स निकृत्तौ भुजौ दृष्ट्वा शोणि-
तौघपरिप्लुतः। दीनः पप्रच्छ तौ वीरौ कौ युवामिति दानवः ११ इति
तस्य ब्रुवाणस्य लक्ष्मणः शुभलक्षणः। शशंस तस्य काकुत्स्थं कबन्धस्य
महाबलः १२ अयमिक्ष्वाकुदायादो रामो नाम जनैः श्रुतः। तस्यैवावरजं
विद्धि भ्रातरं मां च लक्ष्मणम् १३ मात्रा प्रतिहते राज्ये रामः प्रव्रा-
जितो वनम्। मया सह चरत्येष भार्यया च महद्वनम् १४ अस्य देवप्र-

---

पराक्रम करणारा आणि भयंकर असा हा राक्षस सर्व पृथ्वीचा पराजय करून ह्या ठिकाणीं आपलाही वध करण्याची इच्छा करीत आहे ५; परंतु, हे रघुकुलोत्पन्ना राजा, यज्ञामध्यें आणिलेल्या निश्चेष्ट पशूप्रमाणें क्षत्रियाचा वध हालचाल न करितां होणें निंद्य आहे ६. हें त्याचें संभाषण श्रवण करून तो राक्षस क्रुद्ध झाला आणि आपला भयंकर जबडा पसरून त्यांना भक्षण करण्यास प्रवृत्त झाला ७. तेव्हां देश व काल जाणणारे ते उभयतां रघुवंशज रामलक्ष्मण अतिशय आनंदित झाले आणि तरवारींनींच त्यांनीं त्याचे दोन्ही हात खांद्यापाशीं तोडून टाकिले ८. समर्थ रामानें त्याचा लुला पडलेला उजवा हात तरवारीच्या योगानें झटपट तोडून टाकिला आणि वीर लक्ष्मणानें डावा हात उतरून टाकिला ९. तेव्हां मोठी गर्जना करणारा व पूर्वी दीर्घ हातांनीं युक्त असलेला तो कबंध हात तुटल्यामुळें मेघाप्रमाणें आकाश, पृथ्वी व दिशा नादित करीत करीत खालीं पडला १० आणि रक्तप्रवाहानें भरून गेलेला तो दीन कबंध राक्षस आपले हात तुटलेले पहातांक्षणीं " तुह्मी कोण " ह्मणून त्या वीरांना विचारूं लागला ११. ह्याप्रमाणें तो विचारीत असतांना शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या महाबलाढ्य लक्ष्मणानें त्या कबंधाला ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची हकीकत प्रथम निवेदन केली १२. ( तो ह्मणाला ) " हा इक्ष्वाकूंचा वारस आहे व राम ह्मणून लोकांना विदित आहे. त्याचाच कनिष्ठ भ्राता लक्ष्मण मी आहें असें तूं समज १३. सापत्न मातेनें राज्य हाणून पाडून रामाला वनामध्यें पाठविलें आणि तेव्हांपासून हा आपल्या भार्येसहवर्तमान व माझ्यासहवर्तमान महावनामध्यें संचार

भावस्य वसतो विजने वने। रक्षसापहृता भार्या यामिच्छन्ताविहागतौ १५
त्वं तु को वा किमर्थं वा कबन्धसदृशो वने । आस्येनोरसि दीप्तेन
भग्नजङ्घो विचेष्टसे १६ एवमुक्तः कबन्धस्तु लक्ष्मणेनोत्तरं वचः । उवाच
वचनं प्रीतस्तदिन्द्रवचनं स्मरन् १७ स्वागतं वां नरव्याघ्रौ दिष्ट्या
पश्यामि वामहम् । दिष्ट्या चेमौ निकृत्तौ मे युवाभ्यां बाहुबन्धनौ १८
विरूपं यच्च मे रूपं प्राप्तं ह्यविनयाद्यथा । तन्मे शृणु नरव्याघ्र तत्त्वतः
शंसतस्तव १९ [२३०४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिका-
व्येऽरण्यकाण्डे सप्ततितमः सर्गः ॥ ७० ॥

पुरा राम महाबाहो महाबलपराक्रमम् । रूपमासीन्ममाचिन्त्यं त्रिषु
लोकेषु विश्रुतम् ॥ यथा सूर्यस्य सोमस्य शक्रस्य च यथा वपुः १
सोहं रूपमिदं कृत्वा लोकवित्रासनं महत् । ऋषीन्वनगतान्राम त्रास-
यामि ततस्ततः २ ततः स्थूलशिरा नाम महर्षिः कोपितो मया । स
चिन्वन्विविधं वन्यं रूपेणानेन धर्षितः ३ तेनाहमुक्तः प्रेक्ष्यैवं घोरशापा-

---

करीत आहे १४. हा देवतुल्य पराक्रमी राम निर्जन वनामध्यें वास्तव्य करीत असतांना राक्षसानें त्याची भार्या हरण करून नेली आहे व तिचा शोध लावण्याकरितां आह्मी येथें आलों आहोंत १५. आतां कबंधासारिखा असलेला तूं कोण आणि वक्षस्थलाचे ठिकाणीं दृश्य असलेल्या मुखानें युक्त व पोटर्‍यामध्यें मोडलेला असा तूं आज कशाकरितां वनामध्यें तडफड करीत उभा राहिला आहेस ( हें सांग ) १६. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें विचारिलें असतां कबंध संतुष्ट झाला आणि त्या इंद्राच्या वचनाचें स्मरण होऊन त्याला उत्तर देऊं लागला कीं १७, " हे पुरुषश्रेष्ठहो, तुमचें स्वागत असो. आज सुदैवानें तुमचें मला दर्शन झालें आणि तुह्मी हे माझे बाहुरूप पाश तोडून टाकिलेत हीही मोठी भाग्याची गोष्ट आहे १८. आतां, हे पुरुषश्रेष्ठ, मला उद्धटपणामुळें क्रूर देह कसा प्राप्त झाला तें मी तुला सांगतों; तूं श्रवण कर १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७० ॥

हे महापराक्रमी रामा, प्रचंड बल व पराक्रम ह्यांनीं युक्त असून त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध व सूर्य, चंद्र आणि इंद्र ह्यांच्या शरीराप्रमाणें दिव्य असें अचिंत्य रूप पूर्वी माझें होतें १; परंतु मी हें लोकांना भीतिप्रद होणारें प्रचंड राक्षसरूप धारण करून, हे रामा, वनांतील ऋषींना ठिकठिकाणीं भय दाखवूं लागलों २. असें होतां होतां एकदां स्थूलशिरा नांवाच्या महर्षीला मीं क्रोध आणिला. कारण, नानाप्रकारचें वन्य

भिक्षाविना । एतदेवं नृशंसं ते रूपमस्तु विगर्हितम् ४ स मया याचितः क्रुद्धः शापस्यान्तो भवेदिति । अभिशापकृतस्येति तेनेदं भाषितं वचः ५ यदा छित्त्वा भुजौ रामस्त्वां दहेद्विजने वने । तदा त्वं प्राप्स्यसे रूपं स्वमेव विपुलं शुभम् ६ श्रिया विराजितं पुत्रं दनोस्त्वं विद्धि लक्ष्मण । इन्द्रशापादिदं रूपं प्राप्तमेवं रणाजिरे ७ अहं हि तपसोग्रेण पितामहमतोषयम् । दीर्घमायुः स मे प्रादात्ततो मां विभ्रमोऽस्पृशत् ८ दीर्घमायुर्मया प्राप्तं किं मां शक्रः करिष्यति । इत्येवं बुद्धिमास्थाय रणे शक्रमधर्षयम् ९ तस्य बाहुप्रमुक्तेन वज्रेण शतपर्वणा । सक्थिनी च शिरश्चैव शरीरे संप्रवेशितम् १० स मया याच्यमानः सन्नानयद्यमसादनम् । पितामहवचः सत्यं तदस्त्विति ममाब्रवीत् ११ अनाहारः कथं शक्तो भग्नसक्थिशिरोमुखः । वज्रिणाभिहतः कालं सुदीर्घमपि जीवितुम् १२ स एवमुक्तः शक्रो मे बाहू योजनमायतौ । तदा चास्यं च मे कुक्षौ

---

पदार्थ तो गोळा करीत असतांना मी ह्या रूपानें त्याच्या अंगावर चालून गेलों ३. तेव्हां घोर शाप देणारा तो ऋषि असें अवलोकन करून मला ह्मणाला " हें ह्याप्रमाणेंच तुझें निंद्य व दुष्ट शरीर होवो " ४. ह्यावर " मी आपल्यावर चालून आल्यामुळें आपण दिलेल्या ह्या माझ्या शापाचा अंत व्हावा " ह्मणून मीं त्या मुनींची प्रार्थना केली असतां ते ह्मणाले ५ " राम जेव्हां निर्जनवनामध्यें हात तोडून तुझें दहन करील तेव्हां तुला स्वतःचें भव्य व शुभ रूप प्राप्त होईल ६. हे लक्ष्मणा, संपत्तीनें झळकत असलेला मी दनूचा पुत्र आहे असें तूं समज. आतां इंद्रशापामुळें हें रूप मला समरांगणामध्यें कसें प्राप्त झालें तें मी कथन करितों ७. " मीं उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला संतुष्ट केलें असतां त्यानें मला दीर्घायुष्य दिलें व त्यामुळें मला गर्व झाला ८. " मला दीर्घ आयुष्य प्राप्त झालें आहे तेव्हां इंद्र माझें काय करणार " असा विचार मनामध्यें आणून मी समरांगणामध्यें इंद्राच्या अंगावर चालून गेलों ९; तेव्हां शेंकडों धारांनीं युक्त असलेलें वज्र त्या इंद्रानें आपल्या हातानें सोडिलें असतां त्याच्या योगानें माझ्या मांड्या व मस्तक शरीरामध्यें घुसलें १० आणि शेंवटीं मीं प्रार्थना केल्यामुळें यमसदनीं माझी रवानगी न करितां " तें ब्रह्मदेवाचें भाषण सत्य होवो " असें तो मला ह्मणाला ११; परंतु, मांड्या, मस्तक व मुख भग्न झाल्यामुळें मला आहार करितां येणार नाहीं. तेव्हां " आहाररहित आणि त्यांतूनही आपला तडाका बसलेला मी दीर्घकालपर्यंत जिवंत राहण्याला कसा समर्थ होणार ? " १२. ह्याप्रमाणें मीं प्रश्न केला असतां इंद्रानें मला एकेक योजन लांब असे बाहु दिले आणि तीक्ष्ण दंष्ट्रांनीं युक्त असें मुख मला उदरामध्यें

तीक्ष्णदंष्ट्रमकल्पयत् १३ सोहं भुजाभ्यां दीर्घाभ्यां संक्षिप्यास्मिन्वने-
चरान् । सिंहद्वीपिमृगव्याघ्रान्भक्षयामि समन्ततः १४ स तु मामब्रवीदिन्द्रो
यदा रामः सलक्ष्मणः । छेत्स्यते समरे बाहू तदा स्वर्गं गमिष्यसि १५
अनेन वपुषा तात वनेस्मिन्राजसत्तम । यद्यत्पश्यामि सर्वस्व ग्रहणं
साधु रोचये १६ अवश्यं ग्रहणं रामो मन्येहं समुपैष्यति । इमां बुद्धिं
पुरस्कृत्य देहन्यासकृतश्रमः १७ स त्वं रामोसि भद्रं ते नाहमन्येन
राघव । शक्यो हन्तुं यथा तत्त्वमेवमुक्तं महर्षिणा १८ अहं हि मति-
साचिव्यं करिष्यामि नरर्षभ । मित्रं चैवोपदेक्ष्यामि युवाभ्यां संस्कृतो-
ग्निना १९ एवमुक्तस्तु धर्मात्मा दनुना तेन राघवः । इदं जगाद वचनं
लक्ष्मणस्य च पश्यतः २० रावणेन हृता भार्या सीता मम यशस्विनी ।
निष्क्रान्तस्य जनस्थानात्सह भ्रात्रा यथासुखम् २१ नाममात्रं तु जानामि
न रूपं तस्य रक्षसः । निवासं वा प्रभावं वा वयं तस्य न विद्महे २२
शोकार्तानामनाथानामेवं विपरिधावताम् । कारुण्यं सदृशं कर्तुमुपका-

---

निर्माण करून दिलें १३. तेव्हांपासून ह्या वनामध्यें कोणत्याही बाजूला संचार करणारे सिंह, चित्ते, मृग आणि व्याघ्र आपल्या दीर्घ हातांनीं धरून मी भक्षण करीत आहें १४. असो. " लक्ष्मणासहवर्तमान राम जेव्हां समरांगणामध्यें तुझे हात तोडून टाकील तेव्हां स्वर्गामध्यें परत जाशील " असें इंद्रानें मला सांगितलें असल्यामुळें १५, बा नृपश्रेष्ठा, ह्या शरीरानें युक्त असलेल्या माझ्या ह्या वनामध्यें जें जें दृष्टीं पडतें तें सर्वत्र ग्रहण करणें मला बरें वाटूं लागलें १६. कारण ( राम कोणता हें मला ठाऊक नाहीं. तेव्हां आपण असा क्रम सुरू ठेविला असतां ) राम केव्हां तरी माझ्या हातीं येईल असें मला वाटलें आणि हाच विचार मनामध्यें आणून मी ह्या आपल्या देहाचा रामाच्या हातून त्याग करण्याविषयीं यत्न करूं लागलों १७. तो राम तूंच आहेस; तुझें कल्याण असो. हे राघवा, दुसऱ्याच्या हातून माझा वध होणें शक्य नाहीं असें त्या महर्षीनीं मला एक तत्त्व सांगून ठेविलें होतें १८. हे पुरुषश्रेष्ठा, तुह्मी अग्नीच्या योगानें माझा और्ध्वदेहिक संस्कार केला ह्मणजे मी एक युक्ति सांगून आपलें मित्रत्वाचें सार्थक करीन आणि तुला एक मित्रही सांगेन" १९. ह्याप्रमाणें त्या दनुनामक राक्षसानें सांगितलें असतां धर्मात्मा राम लक्ष्मणाचे समक्ष ह्मणाला २० " मी जनस्थानांतून भ्रात्यासहवर्तमान खुशाल बाहेर गेलों असतांना माझी यशस्विनी भार्या सीता रावणानें हरण करून नेली २१. त्या राक्षसाचें नांव मात्र मला ठाऊक आहे. परंतु, त्याचें रूप कसें आहे, त्याचें निवासस्थान कोणतें व त्याचा प्रभाव काय आहे हें आह्मांला माहीत नाहीं २२. ह्याकरितां, अनाथ व शोकाकुल होऊन आम्र-

रेण वर्तताम् २३ काष्ठान्यानीय भग्नानि काले शुष्काणि कुञ्जरैः । धक्ष्यामस्त्वां वयं वीर श्वभ्रे महति कल्पिते २४ स त्वं सीतां समाचक्ष्व येन वा यत्र वा हृता । कुरु कल्याणमत्यर्थं यदि जानासि तत्त्वतः २५ एवमुक्तस्तु रामेण वाक्यं दनुरनुत्तमम् । प्रोवाच कुशलो वक्ता वक्तारमपि राघवम् २६ दिव्यमस्ति न मे ज्ञानं नाभिजानामि मैथिलीम् । यस्तां वक्ष्यति तं वक्ष्ये दग्धः स्वं रूपमास्थितः २७ योऽभिजानाति तद्रूक्षस्तद्वक्ष्ये राम तत्परम् २८ अदग्धस्य हि विज्ञातुं शक्तिरस्ति न मे प्रभो । राक्षसं तु महावीर्यं सीता येन हृता तव २९ विज्ञानं हि महद्भ्रष्टं शापदोषेण राघव । स्वकृतेन मया प्राप्तं रूपं लोकविगर्हितम् ३० किं तु यावन्न यात्यस्तं सविता श्रान्तवाहनः । तावन्मामवटे क्षिप्त्वा दह राम यथाविधि ३१ दग्धस्त्वयाऽहमवटे न्यायेन रघुनन्दन । वक्ष्यामि तं महावीर यस्तं वेत्स्यति राक्षसम् ३२ तेन सख्यं च कर्तव्यं न्याय्यवृत्तेन राघव । कल्पयिष्यति ते वीर

---

माणें भटकत असलेल्या व तुजवर उपकार करणाऱ्या आह्मांवर योग्य अशी कांहीं कृपा कर २३. आह्मी योग्य वेळीं हत्तींनीं मोडून टाकिलेलीं शुष्क काष्ठें आणून, हे वीरा, तयार केलेल्या मोठ्या खड्यामध्यें तुझें दहन करूं २४; परंतु, सीतेला कोणीं नेलें व कोठें नेलें हें तूं आह्मांला सांग. तुला जर खरोखर माहीत असेल तर आह्मांला अत्यंत हितावह असलेली ही गोष्ट तूं कर " २५. ह्याप्रमाणें राम त्याला ह्मणाला असतां त्या कुशल व वक्त्या दनूनें वक्तृत्वपणानेंही युक्त असलेल्या रामाशीं उत्कृष्ट भाषण केलें कीं २६, " मला दिव्य ज्ञान नाहीं ह्यामुळें सीता कोणीकडे आहे हें मला ठाऊक नाहीं; परंतु, माझें दहन करून स्वतःचें रूप मला प्राप्त झाल्यावर सीतेची बातमी जी लागेल ती मी तुला कथन करीन २७. सारांश, हे रामा, सीतेला हरण करून नेणाऱ्या राक्षसाला जो जाणीत आहे तो मी तुला दहनानंतर कथन करीन २८. हे प्रभो, ज्यानें सीता हरण करून नेली तो महावीर्यवान् राक्षस कोण हें समजण्याची दग्ध झाल्यावांचून माझी शक्ति नाहीं २९. कारण, हे राघवा, शापदोषानें माझें मोठें ज्ञान भ्रष्ट झालें असून स्वतः केलेल्या अनुचित कर्माच्या योगानें हें लोकनिंद्य रूप मला प्राप्त झालें आहे ३०. तेव्हां वाहनें श्रांत होऊन रवि अस्ताला गेला नाहीं तोंच, हे रामा, खड्यामध्यें टाकून माझें यथाविधि दहन कर ३१. हे रघुनंदना महावीरा, खड्यामध्यें तूं माझें यथाविधि दहन केल्यावर त्या राक्षसाला जाणणारा कोण तो मी तुला सांगेन ३२. हे राघवा, न्यायानें वागणाऱ्या त्याच्याशीं तूं सख्य कर; ह्मणजे, हे शीघ्रपराक्रमी वीर रामा, तो

साहाय्यं लघुविक्रम ३३ न हि तस्यास्त्यविज्ञातं त्रिषु लोकेषु राघव । सर्वान्परिवृतो लोकान्पुरा वै कारणान्तरे ३४ [२३३८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्ड एकसप्ततितमः सर्गः ॥ ७१ ॥

एवमुक्तौ तु तौ वीरौ कबन्धेन नरेश्वरौ । गिरिप्रदरमासाद्य पावकं विससर्जतुः १ लक्ष्मणस्तु महोल्काभिर्ज्वलिताभिः समन्ततः । चितामादीपयामास सा प्रजज्वाल सर्वतः २ तच्छरीरं कबन्धस्य घृतपिण्डोपमं महत् । मेदसा पच्यमानस्य मन्दं दहत पावकः ३ स विधूय चितामाशु विधूमोऽग्निरिवोत्थितः । अरजे वाससी बिभ्रन्माल्यं दिव्यं महाबलः ४ ततश्चिताया वेगेन भास्वरो विरजाम्बरः । उत्पपाताशु संहृष्टः सर्वप्रत्यङ्गभूषणः ५ विमाने भास्वरे तिष्ठन्हंसयुक्ते यशस्करे । प्रभया च महातेजा दिशो दश विराजयन् ६ सोऽन्तरिक्षगतो वाक्यं कबन्धो राममब्रवीत् । शृणु राघव तत्त्वेन यथा सीतामवाप्स्यसि ७ राम षड्युक्तयो लोके

---

तुला साहाय्य करील ३३. हे राघवा, तिन्ही लोकांमध्यें त्याला अज्ञात असें कांहींही नाहीं. कारण, कांहीं निमित्त उपस्थित झाल्यामुळें तो पूर्वीं सर्व लोक हिंडून आलेला आहे " ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७१ ॥

ह्याप्रमाणें कबंधानें त्या प्रजाधिपति वीर रामलक्ष्मणांना सांगितलें असतां त्याला एका पर्वताच्या खाड्यांत नेऊन टाकून ( आणि सर्व बाजूंनीं काष्ठें घालून ) त्यांनीं अग्नि दिला १. प्रज्वलित अशा मोठमोठ्या ज्वालांनीं लक्ष्मणानें सर्व बाजूंनीं ती चिता पेटविली व ती चोहोंकडून जळूं लागली २. मेदानें भरलेला तो राक्षस जळूं लागला असतां घृतपिंडाप्रमाणें असलेल्या त्याच्या त्या प्रचंड शरीराला अग्नि सावकाश जाळूं लागला ३. तदनंतर चिता ढासळून देऊन तो धूमरहित अग्नीप्रमाणें चितेबाहेर निघाला आणि तो महाबलाढ्य निर्मल वस्त्रें व दिव्य माला धारण केलेला असा दिसूं लागला ४. सारांश, उज्ज्वल, निर्मल वस्त्रानें युक्त आणि अंगुलिप्रभृति सर्व बारीक सारीक अवयवांचे ठिकाणींही अलंकार धारण केलेला असा तो आनंदित झालेला कबंध चितेपासून वेगावेगानें सत्वर बाहेर निघाला ५ आणि हंसयुक्त, यशस्कारक व उज्ज्वल अशा विमानामध्यें बसून आपल्या प्रभेच्या योगानें तो महातेजस्वी दश दिशा प्रकाशित करूं लागला ६. तदनंतर अंतरिक्षामध्यें असलेला तो कबंध रामाला ह्मणाला " हे राघवा, सीता तुला कशी प्राप्त होईल हें मी तुला खरें खरें सांगत आहें; तूं श्रवण कर ७. हे रामा, ( संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव आणि समाश्रय ह्या )

यामिः सर्वं विमृश्यते । परिमृष्टो दशान्तेन दशाभागेन सेव्यते ८
दशाभागगतो हीनस्त्वं हि राम सलक्ष्मणः । यत्कृते व्यसनं प्राप्तं त्वया
दारप्रधर्षणम् ९ तदवश्यं त्वया कार्यः स सुहृत्सुहृदां वर । अकृत्वा न हि
ते सिद्धिमहं पश्यामि चिन्तयन् १० श्रूयतां राम वक्ष्यामि सुग्रीवो नाम
वानरः । भ्रात्रा निरस्तः क्रुद्धेन वालिना शक्रसूनुना ११ ऋष्यमूके
गिरिवरे पम्पापर्यन्तशोभिते । निवसत्यात्मवान्वीरश्चतुर्भिः सह वानरैः १२
वानरेन्द्रो महावीर्यस्तेजोवानमितप्रभः । सत्यसन्धो विनीतश्च धृतिमान्म-
तिमान्महान् १३ दक्षः प्रगल्भो द्युतिमान्महाबलपराक्रमः । भ्रात्रा विवा-
सितो वीर राज्यहेतोर्महात्मना १४ स ते सहायो मित्रं च सीतायाः
परिमार्गणे । भविष्यति हि ते राम मा च शोके मनः कृथाः १५ भवि-
तव्यं हि तच्चापि न तच्छक्यमिहान्यथा । कर्तुमिक्ष्वाकुशार्दूल कालो हि
दुरतिक्रमः १६ गच्छ शीघ्रमितो वीर सुग्रीवं तं महाबलम् । वयस्यं तं

---

सहा युक्त्या जगतामध्यें आहेत व त्यांच्याच योगानें सर्व कांहीं राजाला विचारानें प्राप्त होत असतें; परंतु, जो ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेला आहे त्याला ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेल्याचीच मदत होत असते ( अशी नीति असल्यामुळें सहाव्याच युक्तीचें तुला अवलंबन केलें पाहिजे ) ८. हे रामा, ज्याअर्थी तूं लक्ष्मणासहवर्तमान राज्यापासून भ्रष्ट झाला आहेस त्याअर्थी सांप्रत तूं ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडला आहेस ही गोष्ट सिद्ध आहे आणि ह्याच कारणामुळें भार्यापहाररूप संकट तुला प्राप्त झालें आहे ९. ह्यास्तव, हे मित्रश्रेष्ठा, ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेला तोच मित्र तुला अवश्य केला पाहिजे. विचार करून पाहिलें असतां त्याला मित्र केल्यावांचून तुझा मनोरथ परिपूर्ण होईल असें मला वाटत नाहीं १०. हे रामा, मी सांगतों तें ऐक. सुग्रीवनामक वानर क्रुद्ध झालेल्या इंद्रपुत्र भ्रात्या वालीनें हांकून दिला आहे ११ आणि तो जितेंद्रिय वीर सुग्रीव चार वानरांसहवर्तमान, पंपानामक पुष्करिणीच्या योगानें आसमंताद्भागीं सुशोभित असलेल्या, ऋष्यमूक पर्वतावर वास्तव्य करीत आहे १२. तो वानरराज महावीर्यवान्, तेजस्वी, अतुल प्रभेनें युक्त, सत्यप्रतिज्ञ, विनयसंपन्न, धैर्यवान्, विचारी, महात्मा १३, दक्ष, गंभीर, कांतिमान्, महाबलाढ्य व महापराक्रमी असून, हे राजा, त्याच्या महाबलाढ्य भ्रात्यानें राज्याकरितां त्याला हांकून लाविलें आहे १४. हे रामा, तो सीतेच्या शोधाविषयीं तुझा मित्र व साहाय्यकर्ता होईल; तूं आतां आपलें मन शोकाकुल करून घेऊं नको १५. हे इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठा, जें होणार तें कधींही ह्या जगतामध्यें टळणें शक्य नाहीं. कारण, कालाचें अतिक्रमण होणें दुर्घट आहे १६. हे वीरा, तूं येथून त्या

कुरु क्षिप्रमितो गत्वाऽद्य राघव १७ अद्रोहाय समागम्य दीप्यमाने विभावसौ । न च ते सोऽवमन्तव्यः सुग्रीवो वानराधिपः १८ कृतज्ञः कामरूपी च सहायार्थी च वीर्यवान् । शक्तौ ह्यद्य युवां कर्तुं कार्यं तस्य चिकीर्षितम् १९ कृतार्थो वाकृतार्थो वा तव कृत्यं करिष्यति । स ऋक्षरजसः पुत्रः पम्पामटति शङ्कितः २० भास्करस्यौरसः पुत्रो वालिना कृतकिल्बिषः । संनिधायायुधं क्षिप्रमृष्यमूकालयं कपिम् २१ कुरु राघव सत्येन वयस्यं वनचारिणम् । स हि स्थानानि कार्त्स्न्येन सर्वाणि कपिकुञ्जरः २२ नरमांसाशिनां लोके नैपुणादधिगच्छति । न तस्याविदितं लोके किञ्चिदस्ति हि राघव २३ यावत्सूर्यः प्रतपति सहस्रांशुः परन्तप । स नदीर्विपुलाञ्छैलान्गिरिदुर्गाणि कन्दरान् २४ अन्विष्य वानरैः सार्धं पत्नीं तेऽधिगमिष्यति । वानरांश्च महाकायान्प्रेषयिष्यति राघव २५ दिशो विचेतुं

---

महाबलाढ्य सुग्रीवाकडे सत्वर जा आणि, हे राघवा, येथून गेल्यावर विलंब न करितां आजच्या आजच त्याला मित्र करून घे १७. एकमेकांनीं एकमेकांचा द्रोह करावयाचा नाहीं ह्या उद्देशानें तुह्मी एकत्र जुळा आणि अग्नि प्रज्वलित झाला असतांना त्याच्या समक्ष एकमेकांशीं सख्य करा त्या वानरराज सुग्रीवाचा तूं अवमान करूं नको १८. तो यथेष्ट रूप धारण करणारा वीर्यवान् वानरराज साहाय्य मिळण्याची इच्छा करीत असून कृतज्ञ आहे व तुह्मीही त्यानें मनांत योजिलेलें कार्य करण्यास आज समर्थ आहांत १९. त्याचा मनोरथ सिद्धीस गेल्यानंतर अथवा सिद्धीस जाण्याचे पूर्वीही तो तुझें कार्य करील. कारण, तो ऋक्षराजाचा ( क्षेत्रज ) पुत्र आहे व भयभीत होऊन पंपानामक पुष्करिणीवर संचार करीत आहे २०; सूर्याचा तो औरस पुत्र आहे व वालीशीं त्याचें वैर पडलेलें आहे. ह्याकरितां आयुध संनिध ठेवून ( ह्मणजे आयुधाची शपथ घेऊन ) त्या ऋष्यमूकपर्वतावर वास्तव्य करणाऱ्या वनचारी वानरराजाला तूं सत्यानें, हे राघवा, सत्वर मित्र कर. कारण, तो कपिश्रेष्ठ ह्या जगतामध्यें नरमांसभक्षक राक्षसांचीं जीं कांहीं स्थानें आहेत तीं सर्व निपुणतेमुळें पूर्णपणें जाणीत आहे. हे राघवा, जगतामध्यें त्याला विदित नाहीं असें कांहींही नाहीं २१ २२, २३. हे शत्रुतापना, हजारों किरणांनीं युक्त असलेला सूर्य जितका प्रदेश प्रकाशित करीत आहे तितक्या प्रदेशावरील नद्या, मोठमोठे पर्वत, पर्वतांवरील दुर्गम स्थानें आणि गुहा २४, वानरांसहवर्तमान धुंडून काढून तो तुझ्या पत्नीचा शोध लावील. हे राघवा, दिशा धुंडून काढण्याकरितां तो शरीरानें धिप्पाड असलेले वानर चोहोंकडे पाठवून देईल आणि तुझ्या वियोगामुळें शोक करीत बसलेल्या त्या मिथिलराजकन्या सुंदरी सीतेला रावणाच्या

तां सीतां त्वद्वियोगेन शोचतीम् । अन्वेष्यति वरारोहां मैथिलीं रावणा-
लये २६स मेरुशृङ्गाग्रगतामनिन्दितां प्रविश्य पातालतलेऽपि वाश्रिताम् । प्लव-
ङ्गमानामृषभस्तव प्रियां निहत्य रक्षांसि पुनः प्रदास्यति २७ [ २३६५ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्विसप्ततितमः
सर्गः ॥ ७२ ॥

दर्शयित्वा तु रामाय सीतायाः परिमार्गणे । वाक्यमन्वर्थमर्थज्ञः क-
बन्धः पुनरब्रवीत् १ एष राम शिवः पन्था यत्रैते पुष्पिता द्रुमाः । प्रतीचीं
दिशमाश्रित्य प्रकाशन्ते मनोरमाः २ जम्बूप्रियालपनसा न्यग्रोधप्लक्षति-
न्दुकाः । अश्वत्थाः कर्णिकाराश्च चूताश्चान्ये च पादपाः ३ धन्वना नागवृ-
क्षाश्च तिलका नक्तमालकाः । नीलाशोकाः कदम्बाश्च करवीराश्च पुष्पिताः ॥
अग्निमुख्या अशोकाश्च सुरक्ताः पारिभद्रकाः ४ तानारुह्याथवा भूमौ पात-
यित्वा च तान्बलात् । फलान्यमृतकल्पानि भक्षयित्वा गमिष्यथ ५ तद-
तिक्रम्य काकुत्स्थ वनं पुष्पितपादपम् । नन्दनप्रतिमं त्वन्यत्कुरवस्तूत्तरा
इव ६ सर्वकालफला यत्र पादपा मधुरस्रवाः । सर्वे च ऋतवस्तत्र वने

---

घरीं तो शोधून काढील २५, २६. सारांश, तुझी निर्दोष प्रिया जरी मेरुपर्वताच्या शिखरावर असली किंवा पातालांत नेऊन ठेविलेली असली तरी तेथेंही प्रवेश करून व राक्षसांचा वध करून तो वानरराज सुग्रीव तुला ती परत आणून देईल २७. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७२ ॥

सीतेचा शोध लावण्याविषयीं रामाला उपाय दर्शवून तो व्यवहारज्ञ कबंध अन्वर्थक शब्दांनीं त्याला पुनरपि म्हणाला १ " हे रामा, पश्चिम दिशेचा आश्रय करून जिकडे हे मनोहर प्रफुल्लित वृक्ष प्रकाशत आहेत तिकडून हा सुखकारक मार्ग ( ऋष्यमूक पर्वताकडे ) चालला आहे २. जांभळी, चार, फणस, वट, पिंपरी, पिंपळ, कर्णिकार, आंबे आणि इतरही वृक्ष ह्या मार्गावर आहेत ३. धावडा, नागकेशर, तिळवा, करंज, नील, अशोक, कळंब व कण्हेर हे प्रफुल्लित वृक्ष ह्या मार्गाला असून चित्रा, लाल अशोक आणि बाळंतलिंब असेही आणखी वृक्ष आहेत ४. त्यांवर चढा अथवा त्यांना भूमीवर पाडा आणि त्यांचीं अमृततुल्य फळें भक्षण करून तुह्मी पुढें चालते व्हा ५. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेलें तें वन ओलांडिल्यावर उत्तरकुरुदेशाप्रमाणें असलेल्या दुसऱ्या एका नंदनतुल्य वनामध्यें तुह्मी जाल ६. ज्यांतून मधुर रसाचा स्राव चालला आहे व ज्यांना नेहमीं फळें येत आहेत असे वृक्ष त्या वनामध्यें असून कुबेराच्या चैत्ररथवनाप्रमाणें ह्याही वनांत सर्व

चैत्ररथे यथा ७ फलभारनतास्तत्र महाविटपधारिणः । शोभन्ते सर्वतस्तत्र मेघपर्वतसंनिभाः ८ तानारुह्याथवा भूमौ पातयित्वाऽथ वा सुखम् । फलान्यमृतकल्पानि लक्ष्मणस्ते प्रदास्यति ९ चङ्क्रमन्तौ वराञ्शैलाञ्शैलाच्छैलं वनाद्वनम् । ततः पुष्करिणीं वीरौ पम्पां नाम गमिष्यथ १० अशर्करामविभ्रंशां समतीर्थामशैवलाम् । राम संजातवालूकां कमलोत्पलशोभिताम् ११ तत्र हंसाः प्लवाः क्रौञ्चाः कुररश्चैव राघव । वल्गुस्वराणि कूजन्ति पम्पासलिलगोचराः १२ नोद्विजन्ते नरान्दृष्ट्वा वधस्याकोविदाः पुरा । घृतपिण्डोपमान्स्थूलांस्तान्द्विजान्भक्षयिष्यथ १३ रोहितांश्चक्रतुण्डांश्च नलमीनांश्च राघव । पम्पायामिषुभिर्मत्स्यांस्तत्र राम वरान्हतान् १४ निस्त्वक्पक्षानयस्तप्तानकृशानेककण्टकान् । तव भक्त्या समायुक्तो लक्ष्मणः संप्रदास्यति १५ भृशं तान्खादतो मत्स्यान्पम्पायाः पुष्पसंचये । पद्मगन्धि शिवं वारि सुखशीतमनामयम् १६ उद्धृत्य स तदा क्लिष्टं रूप्यस्फटिकसंनिभम् । अथ पुष्करपर्णेन लक्ष्मणः पाययिष्यति १७ स्थूलान्गिरिगु-

---

ऋतूंतील प्रकार आहेत ७. मोठमोठ्या फांद्या ज्यांवर आहेत असे मेघाप्रमाणें आणि पर्वताप्रमाणें दिसणारे वृक्ष फळांच्या भारानें वांकलेले सर्व बाजूंनीं शोभत आहेत ८. त्यांवर आरोहण करून अथवा खुशाल त्यांना भूमीवर पाडून त्यांचीं अमृततुल्य फळें लक्ष्मण तुला देईल ९. ह्या पर्वतावरून त्या पर्वतावर व ह्या वनांतून त्या वनांत ह्याप्रमाणें श्रेष्ठ श्रेष्ठ पर्वत व वनें हिंडतां हिंडतां, हे वीरहो, तुह्मी पंपानामक पुष्करिणीवर जाल १०. हे रामा, त्या पुष्करिणीचे ठिकाणीं खडे नाहींत, शेवाळें नसल्यामुळें निसरडें नाहीं, उदक शांत आहे, आंत वाळू आहे आणि नानाप्रकारच्या कमलांनीं ती सुशोभित आहे ११. हे राघवा, पंपापुष्करिणीच्या उदकामध्यें राहणारे हंस, क्रौंच व कुररपक्षी आणि बेडूक त्या ठिकाणीं मधुर ध्वनि करीत असतात १२ आणि पूर्वी तेथें कोणाचा वध झाल्याचें त्यांना माहित नसल्यामुळें मनुष्यांना पाहून ते भीतही नाहींत. तेव्हां घृतपिंडतुल्य असलेल्या त्या स्थूल पक्ष्यांना तुह्मी भक्षण करा १३. हे रघुवंशजा, चक्रतुंड, नीलवर्ण, स्थूल आणि अनेक कंटकांनीं युक्त असे श्रेष्ठ श्रेष्ठ पंपापुष्करिणींतील रोहितसंज्ञक मत्स्य बाणांनीं मारून लोखंडाच्या सुळ्यावर भाजून आणि त्यांचीं त्वचा व पंख काढून टाकून तुझे ठिकाणीं प्रेम करीत असलेला लक्ष्मण तुला देईल १४, १५. ते मत्स्य तूं पाहिजे तितके खाऊं लागलास ह्मणजे पुष्पसमुदायामध्यें असलेलें त्या पंपापुष्करिणीचें कमलगंधानें युक्त, मंगलकारक, सुखावह, गार, निरोगी, स्वच्छ आणि रुप्याप्रमाणें अथवा स्फटिकाप्रमाणें तेजस्वी उदक कमल-

हाशय्यान्वानरान्वनचारिणः। सायाह्ने विचरन्राम दर्शयिष्यति लक्ष्मणः।१८ अपां लोभादुपावृत्तान्वृषभानिव नर्दतः । स्थूलान्पीतांश्च पम्पायां द्रक्ष्यसि त्वं नरोत्तम १९ सायाह्ने विचरन्राम विटपी माल्यधारिणः । शिवोदकं च पम्पायां दृष्ट्वा शोकं विहास्यसि २० सुमनोभिश्चितास्तत्र तिलका नक्तमालकाः । उत्पलानि च फुल्लानि पङ्कजानि च राघव २१ न तानि कश्चिन्माल्यानि तत्रारोपयिता नरः । न च वै म्लानतां यान्ति न च शीर्यन्ति राघव २२ मतङ्गशिष्यास्तत्रासन्नृषयः सुसमाहिताः । तेषां भाराभितप्तानां वन्यमाहरतां गुरोः२३ ये प्रपेतुर्महीं तूर्णं शरीरात्स्वेदबिन्दवः। तानि माल्यानि जातानि मुनीनां तपसा तदा २४ स्वेदबिन्दुसमुत्थानि न विनश्यन्ति राघव । तेषां गतानामद्यापि दृश्यते परिचारिणी २५ श्रमणी शबरी नाम काकुत्स्थ चिरजीविनी । त्वां तु धर्मे स्थिता नित्यं सर्वभूतनमस्कृतम् २६ दृष्ट्वा देवोपमं राम स्वर्गलोकं गमिष्यति । ततस्तद्राम पम्पायास्तीरमाश्रित्य पश्चिमम् २७ आश्रमस्थानमतुलं गुह्यं काकुत्स्थ

---

पत्रानें लक्ष्मण तुला पाजील १६,१७. पर्वतांच्या गुहेमध्यें निद्रा घेणारे वनचर वानर, हे रामा, सायंकाळीं संचार करितां करितां लक्ष्मण तुला दाखवील १८ आणि, हे पुरुषश्रेष्ठा, जलपान केल्यामुळें उदकाचा लोभ सोडून परत फिरलेले व बैलाप्रमाणें गर्जना करणारे ते स्थूल वानर पंपापुष्करिणीवर तूंही अवलोकन करशील १९. हे रामा, सायंकालीं संचार करितां करितां फुलझाडें व पंपापुष्करिणींतील मंगलकारक उदक दृष्टीं पडल्यावर तुझें मानसिक दुःख नाहींसें होईल २०. हे राघवा, तिळवे व करंज त्या ठिकाणीं फुलांनीं भरलेले असून नील कमलें व इतर कमलेंही प्रफुल्लित झालेलीं असतात २१. हे राघवा, तेथील पुष्पें घेऊन कोणीही पुरुष धारण करीत नाहीं, तीं कोमेजतही नाहींत आणि नाशही पावत नाहींत २२. अत्यंत समाधानी असे मतंगशिष्य ऋषि तेथें होते; ते गुरुकरितां वनांतील काष्ठांचीं वगैरे ओझीं आणतांना थकले असतां त्यांच्या शरीरांतून जे घामाचे बिंदु भराभर भूमीवर पडले तीं मुनींच्या तपश्चर्येमुळें पुष्पें झालीं २३,२४. हे राघवा, घर्मबिंदूपासून उत्पन्न झालेलीं तीं पुष्पें नाहींशीं होत नाहींत. ते मुनि जरी निघून गेले आहेत तथापि, त्यांची दासी कोणी शबरीनामक चिरजीवी स्त्री, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, अद्यापि तेथें दृष्टीं पडते. हे रामा, धर्माला नित्य अनुसरून वागणारी ती शबरी सर्व प्राण्यांना पूज्य व देवतुल्य अशा तुझें दर्शन घेऊन स्वर्गलोकीं गमन करील. तदनंतर, पंपापुष्करिणीच्या पश्चिम तीराचा आश्रय केल्यावर, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, एक गुह्य व अनुपम आश्रमस्थान तूं

पश्यसि । न तत्राक्रमितुं नागाः शक्नुवन्ति तदाश्रमे २८ ऋषेस्तस्य मतङ्गस्य विधानाच्च काननम् । मतङ्गवनमित्येव विश्रुतं रघुनन्दन २९ तस्मिन्नन्दनसंकाशे देवारण्योपमे वने । नानाविहगसंकीर्णे रंस्यसे राम निर्वृतः ३० ऋष्यमूकस्तु पम्पायाः पुरस्तात्पुष्पितद्रुमः । सुदुःखारोहणश्चैव शिशुनागाभिरक्षितः ३१ उदारो ब्रह्मणा चैव पूर्वकालेऽभिनिर्मितः । शयानः पुरुषो राम तस्य शैलस्य मूर्धनि ३२ यः स्वप्ने लभते वित्तं तत्प्रबुद्धोऽधिगच्छति । यस्त्वेनं विषमाचारः पापकर्माधिरोहति ३३ तत्रैव प्रहरन्त्येनं सुप्तमादाय राक्षसाः । ततोऽपि शिशुनागानामाक्रन्दः श्रूयते महान् ३४ क्रीडतां राम पम्पायां मतङ्गाश्रमवासिनाम् । सक्ता रुधिरधाराभिः संहत्य परमद्विपाः ३५ प्रचरन्ति पृथक्कीर्णा मेघवर्णास्तरस्विनः । ते तत्र पीत्वा पानीयं विमलं चारु शोभनम् ३६ अत्यन्तसुखसंस्पर्शं सर्वगन्धसमन्वितम् । निवृत्ताः संविगाहन्ते वनानि वनगोचराः ३७ ऋक्षांश्च द्वीपिनश्चैव नीलकोमलकप्रभान् । रुरूनपेतानजयान्दृष्ट्वा शोकं प्रहास्यसि ३८ राम तस्य तु शैलस्य

---

अवलोकन करशील. त्याच आश्रमामध्यें प्रवेश करण्याला गज समर्थ होत नाहींत २५, २६, २७, २८ व, हे रघुनंदना, त्या मतंग ऋषीच्या प्रभावामुळें तें वनही मतंगवन ह्मणूनच प्रसिद्ध आहे २९. हे रामा, देवांच्या उपवनाप्रमाणें अथवा इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं गजबजून गेलेल्या त्या वनामध्यें तूं सुखी होऊन रममाण होशील ३०. पंपापुष्करिणीच्या समोरच प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असा ऋष्यमूक पर्वत आहे; त्यावर आरोहण करणें फारच कठिण असून बाल नागांनीं त्याचें रक्षण केलेलें आहे ३१. हे रामा, पूर्वीं सृष्टिकालीं ब्रह्मदेवानें तो उदार पर्वत निर्माण केलेला आहे ह्यामुळें त्या पर्वतावर निद्रिस्थ असलेला पुरुष ३२ जी स्वप्नामध्यें द्रव्य प्राप्त करून घेतो त्याला जागें झाल्यावर तें द्रव्य मिळतें. जो दुराचारी व पापकर्मी पुरुष ह्या पर्वतावर आरोहण करितो ३३ तो निद्रिस्थ होतांक्षणीं त्याला राक्षस धरून तेथेंच मारितात. हे रामा, मतंगाश्रमाचे संनिध वास्तव्य करणारे बाल गज पंपापुष्करिणीमध्यें क्रीडा करूं लागले असतां त्यांची मोठी गर्जना तेथेंही ऐकूं येते. ताम्रवर्ण मदधारांनीं बरबटलेले कांहीं श्रेष्ठ गज एकत्र मिळून ३४, ३५, संचार करीत असतात आणि मेघवर्ण व सामर्थ्यवान् असे कांहीं गज वेगळे वेगळे फुटून संचार करीत असतात. स्पर्श झाला असतां अत्यंत सुखदायक, सर्व प्रकारच्या सुगंधानें युक्त, निर्मल, मनोहर व पवित्र असें उदक तेथें पिऊन ते गज परत फिरतात आणि अरण्यामध्यें जातात ३६, ३७. हे रामा, नील रत्नाप्रमाणें कोमल

महती शोभते गुहा। शिलापिधाना काकुत्स्थ दुःखं चास्याः प्रवेशनम् ३९
तस्या गुहायाः प्राग्द्वारे महाञ्छीतोदको ह्रदः। बहुमूलफलो रम्यो नाना-
नगसमाकुलः ४० तस्यां वसति धर्मात्मा सुग्रीवः सह वानरैः। कदा-
चिच्छिखरे तस्य पर्वतस्यापि तिष्ठति ४१ कबन्धस्त्वनुशास्यैवं तावुभौ
रामलक्ष्मणौ। स्रग्वी भास्करवर्णाभः खे व्यरोचत वीर्यवान् ४२ तं तु
खस्थं महाभागं तावुभौ रामलक्ष्मणौ। प्रस्थितौ त्वं व्रजस्वेति वाक्यमू-
चतुरन्तिके ४३ गम्यतां कार्यसिद्ध्यर्थमिति तावब्रवीत्स च। सुप्रीतौ ताव-
नुज्ञाप्य कबन्धः प्रस्थितस्तदा ४४ स तत्कबन्धः प्रतिपद्य रूपं वृतः
श्रिया भास्वरसर्वदेहः। निदर्शयन्राममवेक्ष्य खस्थः सख्यं कुरुष्वेति तदा-
भ्युवाच ४५ [ २४१० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिका-
व्येऽरण्यकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः॥ ७३ ॥

---

कांतीनें युक्त असून हिंसा न करणारे व्याघ्र, अस्वलें आणि मनुष्याला पाहून पळून जाणारे रुरुसंज्ञक मृग दृष्टीं पडले असतां तुझें मानसिक दुःख रहाणार नाहीं ३८. हे रामा, त्या पर्वतावर शिलेनें आच्छादून टाकिलेली अशी एक मोठी गुहा शोभत आहे व, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या गुहेमध्यें प्रवेश होणें कठीण आहे ३९. त्या गुहेच्या पूर्वद्वाराशीं शीत जलानें युक्त असें एक मोठें सरोवर आहे व तें रम्य सरोवर नानाप्रकारच्या वृक्षांनीं गजबजून गेलें असून असंख्य फलमूलांनीं भरलेलें आहे ४०. त्या गुहेमध्यें धर्मात्मा सुग्रीव वानरांसहवर्तमान वास्तव्य करीत असतो आणि कधीं कधीं तो त्या पर्वताच्या शिखरावरही रहात असतो" ४१. ह्याप्रमाणें त्या उभयतां रामलक्ष्मणांना सांगितल्यावर तो वीर्यवान् कबंध माला धारण करून सूर्यतुल्य कांतीनें युक्त झालेला असा आकाशामध्यें झळकूं लागला ४२. तेव्हां त्यानें सांगितलेल्या मार्गाकडे निघालेले ते उभयतां रामलक्ष्मण समीपच आकाशामध्यें असलेल्या त्या महाभाग्यवान् कबंधाला "तूं पुण्यलोकाप्रत गमन कर" असें ह्मणाले ४३ असतां "कार्यसिद्धीकरितां तुह्मीं जावें" ह्मणून त्यानेंही त्यांना सांगितलें आणि अत्यंत प्रसन्न झालेल्या त्या रामलक्ष्मणांना ( ह्याप्रमाणें ) जाण्याची अनुज्ञा देऊन तो कबंध चालता झाला ४४. असो. तें रूप प्राप्त झाल्यावर कांतीनें युक्त झालेल्या त्या कबंधाचा सर्व देह तेजस्वी झाला आणि आकाशामध्यें असलेला तो कबंध मार्ग वगैरे दाखवितां दाखवितां रामाकडे पाहून "सुग्रीवाशीं सख्य कर" असें त्याला ह्मणाला ४५ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं त्र्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७३ ॥

तौ कबन्धेन तं मार्गं पम्पाया दर्शितं वने । आतस्थतुर्दिशं गृह्य
प्रतीचीं नृवरात्मजौ १ तौ शैलेष्वाचितानेकान्क्षौद्रपुष्पफलद्रुमान् ।
वीक्षन्तौ जग्मतुर्द्रष्टुं सुग्रीवं रामलक्ष्मणौ २ कृत्वा तु तौ शैलपृष्ठे वासं तौ
रघुनन्दनौ । पम्पायाः पश्चिमं तीरं राघवावुपतस्थतुः ३ तौ पुष्करिण्याः
पम्पायास्तीरमासाद्य पश्चिमम् । अपश्यतां ततस्तत्र शबर्या रम्यमाश्र-
मम् ४ तौ तमाश्रममासाद्य द्रुमैर्बहुभिरावृतम् । सुरम्यमभिवीक्षन्तौ
शबरीमभ्युपेयतुः ५ तौ दृष्ट्वा तु तदा सिद्धा समुत्थाय कृताञ्जलिः ।
पादौ जग्राह रामस्य लक्ष्मणस्य च धीमतः ६ पाद्यमाचमनीयं च सर्वं
प्रादाद्यथाविधि ७ तामुवाच ततो रामः श्रमणीं धर्मसंस्थिताम् ।
कच्चित्ते निर्जिता विघ्नाः कच्चित्ते वर्धते तपः ८ कच्चित्ते नियतः कोप
आहारश्च तपोधने । कच्चित्ते नियमाः प्राप्ताः कच्चित्ते मनसः सुखम् ९
कच्चित्ते गुरुशुश्रूषा सफला चारुभाषिणि । रामेण तापसी पृष्टा सा
सिद्धा सिद्धसंमता १० शशंस शबरी वृद्धा रामाय प्रत्यवस्थिता ।
अद्य प्राप्ता तपःसिद्धिस्तव संदर्शनान्मया ११ अद्य मे सफलं जन्म

वनामध्यें कबंधानें दाखविलेल्या त्या मार्गाचें अवलंबन करून ते राजकुमार पंपापुष्करिणीला जाण्याच्या उद्देशानें पश्चिमदिशेकडे चालते झाले १. मध, पुष्पें व फलें ह्यांनीं भरलेले अनेक वृक्ष पर्वतांचे ठिकाणीं अवलोकन करीत करीत ते रामलक्ष्मण सुग्रीवाची भेट घेण्याकरितां निघाल्यावर २ पर्वताचे पृष्ठभागीं वास्तव्य करून ते रघुनंदन राघव पंपेच्या पश्चिम तीराला जाऊन पोंचले ३ आणि पंपापुष्करणीच्या पश्चिम तीराला गेल्यावर शबरीचा रम्य आश्रम त्यांनीं तेथें अवलोकन केला ४. असंख्य वृक्षांनीं व्याप्त असलेल्या त्या अत्यंत मनोहर आश्रमाला गेल्यावर ( वनसौंदर्य ) पहात पहात ते शबरीसमीप गेले ५. तेव्हां त्यांना अवलोकन करितांक्षणीं सिद्ध झालेल्या त्या शबरीनें उठून हात जोडिले आणि रामाचे व बुद्धिमान् लक्ष्मणाचे पाय धरून ६ तिनें पाद्य, आचमनीय वगैरे सर्व यथाविधि त्यांना अर्पण केलें ७. तदनंतर राम त्या धर्मनिष्ठ तपस्विनी स्त्रीला प्रश्न करूं लागला कीं " तपाला विघ्न आणणाऱ्या कामादि षड्रिपूंवें तूं दमन केलें आहेस नां? तुझ्या तपाचा उत्कर्ष आहे नां? ८, कोपाचा निग्रह झाला आहे नां ? हे तपोधने, आहार स्वाधीन ठेविला आहेस नां ? नियमांनीं वागत आहेस नां? तुझ्या मनाला सुख आहे नां? ९ आणि, हे मनोहरभाषिणि, तुझी गुरुशुश्रूषा सफल आहे नां ? " ह्याप्रमाणें रामानें त्या–सिद्धांना अभिमत असलेल्या–सिद्ध तापसीला प्रश्न केल्यावर १० संमुख उभी राहिलेली ती वृद्ध शबरी रामाला ह्मणाली " तुझ्या दर्शनामुळें आज माझ्या तपाची सिद्धि मला प्राप्त

गुरवश्च सुपूजिताः । अद्य मे सफलं तप्तं स्वर्गश्चैव भविष्यति १२ त्वयि देववरे राम पूजिते पुरुषर्षभ । तवाहं चक्षुषा सौम्य पूता सौम्येन मानद १३ गमिष्याम्यक्षयाँल्लोकांस्त्वत्प्रसादादरिन्दम । चित्रकूटं त्वयि प्राप्ते विमानैरतुलप्रभैः १४ इतस्ते दिवमारूढा यानहं पर्यचारिषम् । तैश्चाहमुक्ता धर्मज्ञैर्महाभागैर्महर्षिभिः १५ आगमिष्यति ते रामः सुपुण्यमिममाश्रमम् । स ते प्रतिग्रहीतव्यः सौमित्रिसहितोतिथिः १६ तं च दृष्ट्वा वराँल्लोकानक्षयांस्त्वं गमिष्यसि । एवमुक्ता महाभागैस्तदाहं पुरुषर्षभ १७ मया तु संचितं वन्यं विविधं पुरुषर्षभ । तवार्थे पुरुषव्याघ्र पम्पायास्तीरसंभवम् १८ एवमुक्तः स धर्मात्मा शबर्या शबरीमिदम् । राघवः प्राह विज्ञाने तां नित्यमबहिष्कृताम् १९ दनोः सकाशात्तत्त्वेन प्रभावं ते महात्मनाम् । श्रुतं प्रत्यक्षमिच्छामि संद्रष्टुं यदि मन्यसे २० एतत्तु वचनं श्रुत्वा रामवक्त्रविनिःसृतम् । शबरी दर्शयामास तावुभौ तद्वनं महत् २१ पश्य मेघघनप्रख्यं मृगपक्षिसमाकुलम् । मतङ्गवनमि-

---

झाली ११; आज माझा जन्म सफल झाला; उत्कृष्ट रीतीनें गुरुशुश्रूषा केल्याचें आज सार्थक झालें; आचरिलेलें तप आज सफल झालें आणि, हे पुरुषोत्तमा रामा, तुज शूरश्रेष्ठाचें माझ्या हातून पूजन झाल्यामुळें मला आतां स्वर्गप्राप्तिही होईल. हे संमानास्पद व विनयसंपन्न रामा, तुझ्या सौम्य दृष्टीनें मी आज पवित्र झालें आहें १२, १३ आणि, हे शत्रुदमना, तुझ्या प्रसादामुळें मला अक्षय्य लोक प्राप्त होणार आहेत. तूं चित्रकूट पर्वताला येतांक्षणीं अतुल प्रभेनें युक्त असलेल्या विमानांच्या योगानें १४ ह्या आश्रमांतून मीं सेवा केलेले तपस्वी लोक स्वर्गाला चालते झाले व जातां जातां ते धर्मवेत्ते महाभाग्यवान् महर्षि मला ह्मणाले १५ " ह्या तुझ्या महापुण्यदायक आश्रमामध्यें राम येईल आणि लक्ष्मणासहवर्तमान तो अतिथि राम आला असता तूं त्याचें स्वागत कर १६. कारण, त्याचें दर्शन झाल्यानें तुला अक्षय्य असे उत्तम लोक प्राप्त होतील." ह्याप्रमाणें, हे पुरुषश्रेष्ठा रामा, त्या महाभाग्यवान् मुनींनीं मला सांगितलें असतां १७ तुझ्याकरितां, हे पुरुषोत्तमा, हे पुरुषश्रेष्ठा, पंपेच्या तीरावरील नानाप्रकारचे वन्य पदार्थ मीं जुळवून ठेविले आहेत " १८. ह्याप्रमाणें शबरीनें सांगितलें असतां तो धर्मात्मा राघव नेहेमीं भूतभविष्य जाणणाऱ्या त्या शबरीला ह्मणाला १९ " तुझ्या त्या महात्म्या गुरूंचा प्रभाव दनूनें जो मला वस्तुतः कथन केला आहे तो दर्शविण्याची तुझी इच्छा असल्यास प्रत्यक्ष अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे २०. रामाच्या मुखांतून निघालेलें हें भाषण श्रवण करितांक्षणीं शबरी तें मोठें वन त्या उभयतांना दाखवूं लागली २१ (आणि ह्मणाली ) " सजल मेघाप्रमाणें

स्येव विश्रुतं रघुनन्दन २२ इह ते भावितात्मानो गुरवो मे महाद्युते ।
जुहवाञ्चक्रिरे तीर्थं मन्त्रवन्मन्त्रपूजितम् २३ इयं प्रत्यक्स्थली वेदी यत्र
ते मे सुसत्कृताः । पुष्पोपहारं कुर्वन्ति श्रमादुद्वेपिभिः करैः २४ तेषां
तपःप्रभावेण पश्याद्यापि रघूत्तम । द्योतयन्ती दिशः सर्वाः श्रिया वेद्य-
तुलप्रभा २५ अशक्नुवद्भिस्तैर्गन्तुमुपवासश्रमालसैः । चिन्तितनागतान्पश्य
समेतान्सप्त सागरान् २६ कृताभिषेकैस्तैर्न्यस्ता वल्कलाः पादपेष्विह ।
अद्यापि न विशुष्यन्ति प्रदेशे रघुनन्दन २७ देवकार्याणि कुर्वद्भिर्या-
नीमानि कृतानि वै । पुष्पैः कुवलयैः सार्धं म्लानत्वं न तु यान्ति वै २८
कृत्स्नं वनमिदं दृष्टं श्रोतव्यं च श्रुतं त्वया । तदिच्छाम्यभ्यनुज्ञाता
त्यक्ष्याम्येतत्कलेवरम् २९ तेषामिच्छाम्यहं गन्तुं समीपं भावितात्मनाम् ।
मुनीनामाश्रमो येषामहं च परिचारिणी ३० धर्मिष्ठं तु वचः श्रुत्वा
राघवः सहलक्ष्मणः । प्रहर्षमतुलं लेभे आश्चर्यमिति चाब्रवीत् ३१
तामुवाच ततो रामः शबरीं संशितव्रताम् । अर्चितोहं त्वया भद्रे गच्छ

---

असलेलें, पशुपक्ष्यांनीं व्याप्त झालेलें आणि मतंगवन ह्मणून प्रसिद्ध असलेलें हें वन, हे रघुनंदना, तूं अवलोकन कर २२. हे महातेजस्वी रामा, मनःसंयमन केलेल्या त्या माझ्या गुरूंनीं वेदमंत्रांनीं पूजित असा समंत्रक यज्ञ ह्या ठिकाणीं केला २३. ही प्रत्यक्स्थली-नामक वेदी, ह्या वेदीचे ठिकाणीं मला अत्यंत पूज्य असलेले ते गुरु आपल्या कंपयुक्त हातांनीं मोठ्या कष्टानें देवतांना पुष्पें अर्पण करीत असत २४. हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, त्यांच्या तपःसामर्थ्यामुळें अनुपम प्रभेनें युक्त झालेली ही वेदी आपल्या कांतीनें सर्व दिशा अद्यापि प्रकाशित करीत आहे २५. उपवासजन्य श्रमामुळें सुस्त होऊन दूर जाण्यास असमर्थ झालेल्या त्या मुनींनीं ध्यान केलें असतां त्यांच्या-करितां येथें जुळून आलेल्या ह्या सप्तसागरांना तूं अवलोकन कर २६. हे रघुनंदना, स्नान केल्यावर ह्या आश्रमांतील प्रदेशामध्यें त्यांनीं जीं वल्कलें वृक्षांवर वाळत टाकिलीं आहेत तीं अद्यापिही कोरडीं होत नाहींत २७. देवपूजेच्या उद्देशानें नीलकमल-पुष्पांसहवर्तमान जीं पुष्पें त्यांनीं येथें आणून ठेविलीं आहेत तीं ( त्यांच्या तपःसाम-र्थ्यामुळें ) अद्यापि कोमेजून जात नाहींत २८. असो. हें संपूर्ण वन तूं आतां पाहिलें असून जें ऐकावयाचें होतें तेंही तूं माझ्यापासून ऐकिलें आहेस. आतां तुझी अनुज्ञा घेऊन ह्या देहाचा त्याग करावा अशी माझी इच्छा आहे २९. कारण, ज्या मुनींचा हा आश्रम आहे आणि ज्यांची मी दासी आहें त्या जितेंद्रिय मुनींसमीप जाण्याची माझी इच्छा आहे" ३०. हें अत्यंत धर्मानुसारी भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मणासहवर्तमान रामाला अनुपम हर्ष

कामं यथासुखम् ३२ इत्येवमुक्ता जटिला चीरकृष्णाजिनाम्बरा। अनुज्ञाता तु रामेण हुत्वात्मानं हुताशने ३३ ज्वलत्पावकसंकाशा स्वर्गमेव जगाम ह। दिव्याभरणसंयुक्ता दिव्यमाल्यानुलेपना ३४ दिव्याम्बरधरा तत्र बभूव प्रियदर्शना। विराजयन्ती तं देशं विद्युत्सौदामनी यथा ३५ यत्र ते सुकृतात्मानो विहरन्ति महर्षयः। तत्पुण्यं शबरीस्थानं जगामात्मसमाधिना ३६ [ २४४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येरण्यकाण्डे चतुस्सप्ततितमः सर्गः ॥ ७४ ॥

दिवं तु तस्यां यातायां शबर्यां स्वेन तेजसा। लक्ष्मणेन सह भ्रात्रा चिन्तयामास राघवः १ चिन्तयित्वा तु धर्मात्मा प्रभावं तं महात्मनाम्। हितकारिणमेकाग्रं लक्ष्मणं राघवोऽब्रवीत् २ दृष्टो मयाश्रमः सौम्य बह्वाश्चर्यः कृतात्मनाम्। विश्वस्तमृगशार्दूलो नानाविहगसेवितः ३ सप्तानां च समुद्राणां तेषां तीर्थेषु लक्ष्मण। उपस्पृष्टं च विधिवत्पितरश्चापि तर्पिताः ४ प्रणष्टमशुभं यत्नः कल्याणं समुपस्थितम्। तेन त्वेत-

---

झाला आणि " आश्चर्य आहे " असें तो ह्मणाला ३१. "तदनंतर उग्र तप केलेल्या त्या शबरीला राम ह्मणाला " हे कल्याणि, तूं माझें पूजन केलें आहेस; आतां अनायासें तुझा मनोरथ परिपूर्ण होईल " ३२. वल्कलें व कृष्णाजिनें परिधान केलेल्या तपस्वी शबरीला ह्याप्रमाणें सांगून रामानें अनुज्ञा दिल्यावर तिनें अग्निमध्यें आपलें हवन केलें व ३३ उज्ज्वल अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेली ती शबरी स्वर्गाला चालती झाली. जातां जातां दिव्य अलंकार, दिव्य पुष्पें, दिव्य चंदन आणि दिव्य वस्त्रें ह्यांनीं ती युक्त झाली; तिचें दर्शन इतरांना प्रिय झालें आणि सौदामनी विद्युल्लतेप्रमाणें तो प्रदेश प्रकाशित करणारी ३४, ३५ ती शबरी ते कृतार्थ झालेले महर्षि जेथें विहार करीत होते त्या पवित्र स्थानाला ब्रह्मसमाधीच्या योगानें चालती झाली ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चौऱ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७४ ॥

स्वतःच्या तेजानें ती शबरी स्वर्गाला गेल्यावर भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान राम विचार करूं लागला १ आणि महात्म्यांचा तो प्रभाव लक्ष्यांत आणून धर्मात्मा राघव एकनिष्ठपणें आपल्या हिताकरितां झटणाऱ्या लक्ष्मणाला ह्मणाला २ " हे विनयसंपन्न लक्ष्मणा, त्या कृतार्थ मुनींचा अति आश्चर्यांनीं युक्त असलेला आश्रम मीं अवलोकन केला; ह्या आश्रमांतील मृग व व्याघ्र निर्भय असून नानाप्रकारचे पक्षी ह्याच्या आश्रयाला आहेत ३. हे लक्ष्मणा, ( लोकांवर उपकार करण्याकरितां ) त्यांनीं स्थापिलेल्या सप्तसागरतीर्थांमध्यें मीं यथाविधि स्नान करून पितरांचेंही तर्पण केलें ४. ह्यामुळें आपलें जें कांहीं नष्टचर्य होतें

त्प्रहृष्टं मे मनो लक्ष्मण संप्रति ५ हृदये मे नरव्याघ्र शुभमाविर्भविष्यति।
तदागच्छ गमिष्यावः पम्पां तां प्रियदर्शनाम् ६ ऋष्यमूको गिरिर्यत्र
नातिदूरे प्रकाशते। यस्मिन्वसति धर्मात्मा सुग्रीवोंऽशुमतः सुतः ७ नित्यं
वालिभयात्त्रस्तश्चतुर्भिः सह वानरैः। अहं त्वरे च तं द्रष्टुं सुग्रीवं वानर-
र्षभम् ८ तदधीनं हि मे कार्यं सीतायाः परिमार्गणम्। इति ब्रुवाणं तं
वीरं सौमित्रिरिदमब्रवीत् ९ गच्छावस्त्वरितं तत्र ममापि त्वरते मनः।
आश्रमात्तु ततस्तस्मान्निष्क्रम्य स विशांपतिः १० आजगाम ततः पम्पां
लक्ष्मणेन सह प्रभुः। समीक्षमाणः पुष्पाढ्यं सर्वतो विपुलद्रुमम् ११
कोयष्टिभिश्चार्जुनकैः शतपत्रैश्च कीचकैः। एतैश्चान्यैश्च बहुभिर्नादितं
तद्वनं महत् १२ स रामो विविधान्वृक्षान्सरांसि विविधानि च। पश्य-
न्कामाभिसंतप्तो जगाम परमं ह्रदम् १३ स तामासाद्य वै रामो दूरा-
त्पानीयवाहिनीम्। मतङ्गसरसं नाम ह्रदं समवगाहत १४ तत्र जग्मतुर-
व्यग्रौ राघवौ हि समाहितौ। स तु शोकसमाविष्टो रामो दशरथा-

---

तें नाहींसें होऊन आपलें कल्याण होण्याची वेळ जवळ आली आहे आणि, हे लक्ष्मणा, सांप्रत हें माझें मन आनंदित झालें आहे ५. हे पुरुषश्रेष्ठा, कांहीं तरी शुभ गोष्ट दृष्टीं पडेल असें माझ्या अंतःकरणाला वाटत आहे. ह्याकारितां इकडे ये; आपण त्या दिसण्यांतही मनोहर असलेल्या पंपेकडे जाऊं ६. तेथून जवळच ऋष्यमूकपर्वत झळकत असून त्या पर्वतावर तो सूर्यपुत्र धर्मात्मा सुग्रीव चार वानरांसहवर्तमान नेहेमीं वास्तव्य करीत आहे. कारण, वालीच्या भयानें तो घाबरून गेलेला आहे. त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाला पहाण्याची तर मला त्वरा झाली आहे ७, ८. कारण, सीतेचा शोध लावणें हें माझें कार्य त्याच्यावर अवलंबून आहे. ह्याप्रमाणें तो वीर राम बोलत असतांना सुमित्रापुत्र लक्ष्मण त्याला ह्मणाला ९ " आपण सत्वर तिकडे जाऊं; माझ्याही मनाला तिकडे जाण्याची त्वरा झाली आहे. " तदनंतर, तो प्रजाधिपति राम त्या आश्रमांतून निघाला १० आणि नंतर लक्ष्मणासहवर्तमान तो समर्थ राम पंपापुष्करिणीकडे वन पहात पहात गेला. तें वन प्रफुल्लित झालेलें होतें; सर्व बाजूंनीं मोठेमोठे वृक्ष त्यामध्यें होते ११ आणि टिट्टिभपक्ष्यांनीं युक्त असलेले अर्जुन वृक्ष, शेंकडों पानांनीं भरलेले कीचकसंज्ञक वेळू व इतरही पुष्कळ वृक्ष ह्यांच्या योगानें तें महावन नादित झालेलें होतें १२. असो. कामामुळें संतप्त झालेला तो राम नानाप्रकारचे वृक्ष व सरोवरें अवलोकन करीत करीत त्या उत्कृष्ट सरोवराकडे चालला १३ आणि समीपच वहात असलेल्या त्या पंपानामक नदीला गेल्यावर त्या मतंगसरसनामक सरोवरामध्यें त्यानें स्नान केलें १४. सीतेचा

त्मजः १५ विवेश नलिनीं रम्यां पङ्कजैश्च समावृताम् । तिलकाशोकपुंनागबकुलोद्दालकाशिनीम् १६ रम्योपवनसंबाधां रम्यसंपीडितोदकाम् । स्फटिकोपमतोयां तां श्लक्ष्णवालुकसंतताम् १७ मत्स्यकच्छपसंबाधां तीरस्थद्रुमशोभिताम् । सखीभिरिव संयुक्तां लताभिरनुवेष्टिताम् १८ किंनरोरगगन्धर्वयक्षराक्षससेविताम् । नानाद्रुमलताकीर्णां शीतवारिनिधिं शुभाम् १९ पद्मसौगन्धिकैस्ताम्रां शुक्लां कुमुदमण्डलैः । नीलां कुवलयोद्घाटैर्बहुवर्णां कुथामिव २० अरविन्दोत्पलवतीं पद्मसौगन्धिकायुताम् । पुष्पिताम्रवणोपेतां बर्हिणोद्घुष्टनादिताम् २१ स तां दृष्ट्वा ततः पम्पां रामः सौमित्रिणा सह । विललाप च तेजस्वी रामो दशरथात्मजः २२ तिलकैर्बीजपूरैश्च वटैः शुक्लद्रुमैस्तथा । पुष्पितैः करवीरैश्च पुन्नागैश्च सुपुष्पितैः २३ मालतीकुन्दगुल्मैश्च भण्डीरैर्निचुलैस्तथा । अशोकैः सप्तपर्णैश्च केतकैरतिमुक्तकैः २४ अन्यैश्च विविधैर्वृक्षैः प्रमदेवोपशोभिताम् । अस्या-

---

शोध लावण्याविषयीं तत्पर आणि स्वस्थ असे ते रघुवंशज रामलक्ष्मण तेथें गेल्यानंतर तो दशरथपुत्रराम शोकाकुल होऊन १५ त्या सरोवरामध्यें प्रविष्ट झाला. तें सरोवर रम्य असून कमलांनीं गच्च भरलेलें होतें; तिलक, अशोक, पुन्नाग, बकुल व उद्दाल ह्या वृक्षांच्या योगानें त्याला शोभा आलेली होती; रम्य उपवनांनीं तें गजबजून गेलेलें होतें. त्यांतील मनोहर उदक क्षुब्ध झालेलें होतें; मृदु वाळू तेथें पसरलेली होती आणि आंतील जल स्फटिकासारिखें स्वच्छ होतें १६,१७; मासे व कांसवें ह्यांची तेथें गर्दी झालेली होती; तीरावरील वृक्षामुळें त्याला शोभा आलेली होती आणि तें लतांनीं परिवेष्टित झालें असल्यामुळें सखीसहवर्तमान असलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत होतें १८. किन्नर, उरग, गंधर्व, यक्ष आणि राक्षस ह्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता आणि तें शुभ सरोवर नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं व्याप्त झालेलें असून शीतोदकाचें एक भांडारच होतें १९. आरक्तवर्ण कमलांच्या योगानें तें कोठें कोठें आरक्तवर्ण दिसत असून श्वेतकमलांमुळें श्वेतवर्ण दिसत होतें आणि तसेंच नील कमलांच्या समूहामुळें तें कोठें कोठें नीलवर्णही भासत होतें. सारांश, अनेक वर्णांच्या कमलांनीं युक्त असलेलें तें सरोवर अनेकरंगी वाकळेप्रमाणें दिसत होतें २०. अरविंद, उत्पल, पद्म, सौगंधिक, इत्यादि नानाप्रकारच्या कमलांनीं व फुलून गेलेल्या आम्रवनांनीं तें सरोवर युक्त असून मयूर पक्ष्यांच्या गर्जनेमुळें नादित झालेलें होतें २१. असो. रामानें लक्ष्मणासहवर्तमान ती पुष्करिणी अवलोकन केली आणि लगेंच तो दशरथपुत्र तेजस्वी राम ( सीतेकरितां ) विलाप करूं लागला २२. कारण, तिळवा, महाळुंग, वड, लोध, प्रफुल्लित कण्हेर, फारच प्रफुल्लित पुन्नाग २३, मालत्या व कुंद ह्यांचीं झांकरें,

स्तीरे तु पूर्वोक्तः पर्वतो धातुमण्डितः २५ ऋष्यमूक इति ख्यातश्चित्र-
पुष्पितपादपः । हरिर्ऋक्षरजोनाम्नः पुत्रस्तस्य महात्मनः २६ अध्यास्ते तु
महावीर्यः सुग्रीव इति विश्रुतः । सुग्रीवमभिगच्छ त्वं वानरेन्द्रं नरर्षभ २७
इत्युवाच पुनर्वाक्यं लक्ष्मणं सत्यविक्रमः । कथं मया विना सीता शक्यं
लक्ष्मण जीवितुम् २८ इत्येवमुक्त्वा मदनाभिपीडितः स लक्ष्मणं वाक्य-
मनन्यचेतनः । विवेश पम्पां नलिनीमनोरमां तमुत्तमं शोकमुदीरयाणः २९
क्रमेण गत्वा प्रविलोकयन्वनं ददर्श पम्पां शुभदर्शकाननाम् । अनेकनाना-
विधपक्षिसंकुलां विवेश रामः सह लक्ष्मणेन ३० [२४७६] इत्यार्षे श्रीमद्रा-
मायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः ॥७५॥

समाप्तमिदमरण्यकाण्डम् ॥ ३ ॥

---

शिरस् , तिवस, अशोक, सातवण, केवडा, कुसरी २४ आणि इतरही नानाप्रकारचे वृक्ष ह्यांनीं ती पुष्करिणी युक्त असल्यामुळें ( अनेक अलंकार धारण केलेल्या ) तरुण स्त्रीप्रमाणें दिसत होती. “ पूर्वी कबंधानें सांगितलेला पर्वत ह्या पुष्करिणीचेच तीरीं असून हा नानाप्रकारच्या धातूंनीं भूषित झालेला आहे २५; ऋष्यमूक ह्मणून हा प्रसिद्ध आहे आणि चित्रविचित्र प्रफुल्लित वृक्षांनीं हा युक्त आहे. असो. त्या महात्म्या ऋक्ष-रजनामक वानराचा पुत्र एक वानर २६ ह्या पर्वतावर वास्तव्य करीत आहे आणि तो महावीर्यवान् असून सुग्रीव ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा, तूं वानरराज सुग्रीवाकडे जा ” २७ असें पुनरपि सत्यपराक्रमी रामानें लक्ष्मणाला सांगितलें आणि, “ हे लक्ष्मणा, सीतेवांचून जिवंत रहाणें मला कसें बरें शक्य होईल ? ” २८. इत-केंच भाषण लक्ष्मणाशीं करून मदनानें पीडित झालेला आणि सीतेशिवाय मनामध्यें दुसरें कांहींच नसलेला तो राम आपलें तें सांचलेलें पराकाष्ठेचें दुःख प्रकट करीत करीत त्या कमलांनीं युक्त असलेल्या मनोहर पंपापुष्करिणीमध्यें प्रविष्ट झाला २९. सारांश, क्रमा-क्रमानें वन अवलोकन करीत करीत गेल्यावर जिच्या तीरीं असलेल्या वनांचें दर्शनही शुभ आहे आणि नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं जी गजबजून गेलेली आहे अशी ती पंपा-पुष्करिणी रामानें अवलोकन केली आणि लक्ष्मणासहवर्तमान त्यानें त्या पुष्करिणीमध्यें प्रवेश केला ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७५ ॥ ह्या ठिकाणीं अरण्यकांडही संपूर्ण झालें ॥ ३ ॥

---

॥ श्रीः ॥

# मराठी भाषांतरासह रामायण.



## किष्किंधाकांड.

काशीनाथ वामन लेले वाईकर

ह्यांनीं

वाई येथें मोदवृत्त छापखान्यांत छापून मोदवृत्तवर्तमानपत्रद्वारा

प्रसिद्ध केलें.

*D. V. & Bros.*

New & Old Booksellers.

*Mehunpura Corner,*

POONA 2.



शके १८२०.

॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं
# श्रीरामायणम् ।

## किष्किन्धाकाण्डम् ।

स तां पुष्करिणीं गत्वा पद्मोत्पलझषाकुलाम् । रामः सौमित्रिसहितो विललापाकुलेन्द्रियः १ तत्र दृष्ट्वैव तां हर्षादिन्द्रियाणि चकम्पिरे । स कामवशमापन्नः सौमित्रिमिदमब्रवीत् २ सौमित्रे शोभते पम्पा वैडूर्यविमलोदका । फुल्लपद्मोत्पलवती शोभिता विविधैर्द्रुमैः ३ सौमित्रे पश्य पम्पायाः काननं शुभदर्शनम् । यत्र राजन्ति शैला वा द्रुमाः सशिखरा इव ४ मां तु शोकाभिसंतप्तमाधयः पीडयन्ति वै । भरतस्य च दुःखेन

---

श्रीगणेशाय नमः ॥ ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम् । भृत्यार्तिहन्प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् । त्यक्त्वा सुदुस्त्यज सुरेप्सित राज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् । मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ राम, लक्ष्मणासहवर्तमान नीलकमलें, श्वेतकमलें आणि मत्स्य ह्यांनीं गजबजून गेलेल्या त्या पुष्करिणीसमीप गेला आणि अंतःकरण व्याकुल झाल्यामुळें शोक करूं लागला १; परंतु, ती पुष्करिणी दृष्टीं पडतांक्षणीं त्याला हर्ष होऊन त्याचीं इंद्रियें थरथरूं लागलीं आणि मदनाचे अधीन होऊन तो सुमित्रापुत्र लक्ष्मणाला ह्मणाला २ "हे लक्ष्मणा नानाप्रकारच्या वृक्षांनीं अलंकृत, प्रफुल्लित श्वेतकमलांनीं व नीलकमलांनीं युक्त आणि वैडूर्यरत्नासारिख्या निर्मल उदकानें भरलेली ही पंपापुष्करिणी शोभा देत आहे ३. हे लक्ष्मणा, ज्याचें दर्शन शुभावह आहे असें हें पंपेच्या तीरावरील वन तूं अवलोकन कर. ह्या वनांतील वृक्ष उच्च उच्च शाखांनीं युक्त असल्यामुळें शिखरयुक्त पर्वताप्रमाणें दिसत आहेत ४. परंतु, सीतेच्या अपहाराचें आणि भरताला ( जटा वल्कलादि धारणामुळें ) होत असलेल्या दुःखाचें स्मरण झालें ह्मणजे शोकाकुल झालेल्या मला मानसिक व्यथा

वैदेह्या हरणेन च ५ शोकार्तस्यापि मे पम्पा शोभते चित्रकानना । व्यवकीर्णा बहुविधैः पुष्पैः शीतोदका शिवा ६ नलिनैरपि संछन्ना ह्यत्यर्थशुभदर्शना । सर्पव्यालानुचरिता मृगद्विजसमाकुला ७ अधिकं प्रविभात्येतन्नीलपीतं तु शाद्वलम् । द्रुमाणां विविधैः पुष्पैः परिस्तोमैरिवार्पितम् ८ पुष्पभारसमृद्धानि शिखराणि समन्ततः । लताभिः पुष्पिताग्राभिरुपगूढानि सर्वतः ९ सुखानिलोयं सौमित्रे कालः प्रचुरमन्मथः । गन्धवान्सुरभिर्मासो जातपुष्पफलद्रुमः १० पश्य रूपाणि सौमित्रे वनानां पुष्पशालिनाम् । सृजतां पुष्पवर्षाणि वर्षं तोयमुचामिव ११ प्रस्तरेषु च रम्येषु विविधाः काननद्रुमाः । वायुवेगप्रचलिताः पुष्पैरवकिरन्ति गाम् १२ पतितैः पतमानैश्च पादपस्थैश्च मारुतः । कुसुमैः पश्य सौमित्रे क्रीडतीव समन्ततः १३ विक्षिपन्विविधाः शाखा नगानां कुसुमोत्कटाः । मारुतश्चलितस्थानैः षट्पदैरनुगीयते १४ मत्तको-

---

पीडा देऊं लागतात ५. असो. मी जरी शोकाकुल झालों आहें तरी अद्भुत वनांनीं युक्त, नानाप्रकारच्या पुष्पांनीं भरलेली आणि शीत जलानें परिपूर्ण असलेली ही कल्याणकारक पंपा मला सुखावह होत आहे ६. हिचे तीरीं सर्प आणि श्वापदें संचार करीत असून ही जरी पशुपक्ष्यांनीं गजबजून गेली आहे आणि कमलांनीं जरी आच्छादित झाली आहे तरी हिचें दर्शन फारच कल्याणकारक आहे ७. वृक्षावरील नानाप्रकारच्या पुष्पराशींनीं युक्त असल्यामुळें नीलवर्ण आणि पीतवर्ण बनलेला हा हिरवागार प्रदेश फारच शोभा देत आहे ८. पुष्पभारांनीं परिपूर्ण झालेलीं वृक्षांचीं अग्रें प्रफुल्लित अग्रांनीं युक्त झालेल्या लतांनीं चोहोंकडून व्यापून टाकिलेलीं आहेत ९. हे लक्ष्मणा, हा वसंतकाल कामोद्दीपक असून कामी पुरुषाला गर्वयुक्त करणारा आहे; ह्यामध्यें वाराही सुखावह वहात आहे आणि हा मधुमास असून ह्या वेळीं वृक्षांनाही पुष्पें व फलें आलेलीं आहेत १०. हे लक्ष्मणा, जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें पुष्पांचे वर्षाव करणाऱ्या आणि पुष्पांच्या योगानें सुशोभित झालेल्या वनांच्या शोभा तूं अवलोकन कर ११. सपाट व रम्य प्रदेशावर असलेले नानाप्रकारचे वनवृक्ष वायूच्या वेगानें हालत असल्यामुळें पृथ्वीवर पुष्पांचा वर्षाव करीत आहेत १२. हे लक्ष्मणा, पहा; हा वायु पडलेल्या, पडणाऱ्या आणि वृक्षावरच असलेल्या पुष्पांच्या योगानें जसा कांहीं आसमंताद्भागीं क्रीडा करीत आहे १३. पुष्पांनीं भरलेल्या वृक्षांच्या अनेक शाखा हालवून सोडणाऱ्या ह्या वायूच्या ध्वनीच्या मागोमाग स्थानांतर केलेले भृंग गायन करीत आहेत १४; मत्त कोकिल

किलसन्नादैर्नर्तयन्निव पादपान् । शैलकन्दरनिष्क्रान्तः प्रगीत इव चानिलः १५ तेन विक्षिपतात्यर्थं पवनेन समन्ततः । अमी संसक्तशाखाग्रा ग्रथिता इव पादपाः १६ स एव सुखसंस्पर्शो वाति चन्दनशीतलः । गन्धमभ्यवहन्पुण्यं श्रमापनयनोऽनिलः १७ अमी पवनविक्षिप्ता विनदन्तीव पादपाः । षट्पदैरनुकूजद्भिर्वनेषु मधुगन्धिषु १८ गिरिप्रस्थेषु रम्येषु पुष्पवद्भिर्मनोरमैः । संसक्तशिखराः शैला विराजन्ति महाद्रुमैः १९ पुष्पसंछन्नशिखरा मारुतोत्क्षेपचञ्चलाः । अमी मधुकरोत्तंसाः प्रगीता इव पादपाः २० सुपुष्पितांस्तु पश्यैतान्कर्णिकारान्समन्ततः । हाटकप्रतिसंछन्नान्नरान्पीताम्बरानिव २१ अयं वसन्तः सौमित्रे नानाविहगनादितः । सीतया विप्रहीणस्य शोकसंदीपनो मम २२ मां हि शोकसमाक्रान्तं संतापयति मन्मथः । हृष्टं प्रवदमानश्च समाह्वयति कोकिलः २३ एष दात्यूहको हृष्टो रम्ये मां वननिर्झरे । प्रणदन्मन्म-

---

पक्ष्यांच्या ध्वनीच्या योगानें हा वायु वृक्षांना जसा कांहीं तालसुरावर नृत्य शिकवीत असल्यासारिखा दिसत आहे आणि पर्वताच्या गुहांतून बाहेर निघालेला हा वायु स्वतःच गायन करीत असल्यासारिखा भासत आहे १५. झाडें अतिशयच इकडे तिकडे करणाऱ्या वायूच्या योगानें वृक्षांचीं शाखाग्रें एकमेकांत गुंतून गेल्यामुळें हे वृक्ष एकत्र बांधून टाकिल्यासारिखे दिसत आहेत १६. तोच हा वायु स्पर्श झाला असतां सुख देणारा आहे, चंदनाप्रमाणें थंड आहे, श्रम दूर करणारा आहे आणि पवित्रगंध आपल्याबरोबर वाहून नेणारा आहे १७. मधाच्या वासानें युक्त असलेले हे वृक्ष वायूनें चलित झाल्यामुळें त्यांच्या आश्रयाला असलेले भृंग गुंजारव करूं लागल्याकारणानें गर्जना करीत असल्यासारिखे भासत आहेत १८. मनोहर पर्वतशिखरांवर उत्पन्न झालेल्या रमणीय व प्रफुल्लित महावृक्षांच्या योगानें ज्यांचीं शिखरें परस्पराशीं संबद्ध झालेलीं आहेत असे हे पर्वत शोभा देत आहेत १९ आणि त्याचप्रमाणें पुष्पाच्छादित शिखरें आणि भृंगरूप शिखा ह्यांनीं युक्त असलेले व वायूच्या वेगामुळें चंचल झालेले हे वृक्ष गायन करीत असल्यासारिखे दिसत आहेत २०. आसमंताद्भागीं प्रफुल्लित झालेले हे कर्णिकार पहा कसे पीतांबर धारण करून सुवर्ण भूषणांनीं आच्छादित झालेल्या पुरुषांप्रमाणें दिसत आहेत २१. हे लक्ष्मणा, अनेक पक्ष्यांच्या गर्जनेनें युक्त असलेला हा वसंत सीतेचा वियोग झालेल्या माझा शोकच वृद्धिंगत करीत आहे २२. मदनही शोकग्रस्त झालेल्या मला अतिशय ताप देत आहे आणि हा बोलका कोकिलपक्षी हंसत हंसत जसें कांहीं मला आह्वानच करीत आहे २३.

थाविष्टं शोचयिष्यति लक्ष्मण २४ श्रुत्वैतस्य पुरा शब्दमाश्रमस्था मम प्रिया। मामाहूय प्रमुदिता परमं प्रत्यनन्दत २५ एवं विचित्राः पतगा नानारावविराविणः। वृक्षगुल्मलताः पश्य संपतन्ति समन्ततः २६ विमिश्रा विहगाः पुंभिरात्मव्यूहाभिनन्दिताः। भृङ्गराजप्रमुदिताः सौमित्रे मधुरस्वराः २७ अस्याः कूले प्रमुदिताः सङ्घशः शकुनास्त्विह। दात्यूहरतिविक्रन्दैः पुंस्कोकिलरुतैरपि २८ स्वनन्ति पादपाश्चेमे ममानङ्गप्रदीपकाः। अशोकस्तबकाङ्गारः षट्पदस्वननिःस्वनः २९ मां हि पल्लवताम्रार्चिर्वसन्ताग्निः प्रधक्ष्यति। न हि तां सूक्ष्मपक्ष्माक्षीं सुकेशीं मृदुभाषिणीम् ३० अपश्यतो मे सौमित्रे जीवितेऽस्ति प्रयोजनम्। अयं हि रुचिरस्तस्याः कालो रुचिरकाननः ३१ कोकिलाकुलसीमान्तो दयिताया ममानघ। मन्मथायाससंभूतो वसन्त-

---

हे लक्ष्मणा, वनांतील रम्य झऱ्यावर असलेला हा पाणकोंबडा आनंदित होऊन गर्जना करीत आहे आणि त्यामुळें कामाधीन झालेल्या मला दुःख देत आहे २४. पूर्वी ह्या पाणकोंबड्याचा शब्द ऐकतांक्षणीं आश्रमांत असलेली माझी आनंदित प्रिया मला हांक मारून आपला आनंद अतिशयच प्रकट करून दाखवीत असे २५. सारांश, ह्याप्रमाणें नानाप्रकारचे ध्वनि करणारे हे चित्रविचित्र पक्षी सर्व बाजूनीं वृक्ष, गुल्म व लता ह्यांवर उडून बसत आहेत हें तूं पहा २६. हे लक्ष्मणा, पतींनीं युक्त झालेल्या पक्षिस्त्रिया ह्या ठिकाणीं आपआपल्या जातिसमूहामध्यें आनंदित झालेल्या आहेत; भृंगराजाचा समागम झाल्यामुळें आनंदित झालेल्या भृंगस्त्रियाही ह्या ठिकाणीं मधुर स्वर करीत आहेत २७ आणि ह्या पंपेच्या तीरीं कळपांनीं रहात असलेले पक्षीही आनंदित झालेले आहेत. पाणकोंबड्यांचे रतिक्रीडाविषयक शब्द आणि कोकिलपक्ष्यांचे ध्वनि ह्यांच्या योगानें २८ जसे कांहीं गर्जना करीत असलेले हे वृक्ष माझे ठिकाणीं कामोद्दीपन करीत आहेत. अशोकगुच्छरूप अंगार, भृंगध्वनिरूप शब्द २९ आणि पल्लवरूप आरक्तवर्ण ज्वाला ह्यांनीं युक्त असलेला वसंतरूप अग्नि मला दग्ध करण्याच्या बेतांत आहे. जिच्या नेत्रांच्या पापण्या सूक्ष्म आहेत, जिचे केश उत्कृष्ट आहेत आणि जिचें भाषण मृदु आहे अशी ती सीता ३० माझ्या दृष्टीं पडत नसल्यामुळें, हे लक्ष्मणा, आतां मला जिवंत रहाण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. हे निष्पापा लक्ष्मणा, ह्या वसंतामध्यें कोकिलपक्ष्यांनीं सर्व सीमाप्रदेश व्याप्त करून टाकिले असून वनेंही मनोहर झालीं आहेत आणि त्यामुळें हा काल त्या माझ्या प्रियेला इष्ट वाटणारा आहे. कामपीडेमुळें उत्पन्न झालेला आणि ( मंदवायु व प्रफुल्लित वनें इत्यादि)

गुणवर्धितः ३२ अयं मां धक्ष्यति क्षिप्रं शोकाग्निर्न चिरादिव । अपश्यतस्तां वनितां पश्यतो रुचिरान्द्रुमान् ३३ ममायमात्मप्रभवो भूयस्त्वमुपयास्यति । अदृश्यमाना वैदेही शोकं वर्धयतीह मे ३४ दृश्यमानो वसन्तश्च स्वेदसंसर्गदूषकः । मां हि सा मृगशावाक्षी चिन्ताशोकबलात्कृतम् ३५ संतापयति सौमित्रे क्रूरश्चैत्रवनानिलः । अमी मयूराः शोभन्ते प्रनृत्यन्तस्ततस्ततः ३६ स्वैः पक्षैः पवनोद्धूतैर्गवाक्षैः स्फाटिकैरिव । शिखिनीभिः परिवृतास्त एते मदमूर्छिताः ३७ मन्मथाभिपरीतस्य मम मन्मथवर्धनाः । पश्य लक्ष्मण नृत्यन्तं मयूरमुपनृत्यति ३८ शिखिनी मन्मथार्तैषा भर्तारं गिरिसानुनि । तामेव मनसा रामां मयूरोप्यनुधावति ३९ वितत्य रुचिरौ पक्षौ रुतैरुपहसन्निव । मयूरस्य वने नूनं रक्षसा न हृता प्रिया ४० तस्मान्नृत्यति रम्येषु वनेषु सह कान्तया । मम त्वयं विना वासः पुष्पमासे सुदुःसहः ४१ पश्य लक्ष्मण संरागस्तिर्यग्योनिगतेष्वपि । अधुना शिखिनी

---

वसंत गुणांनीं प्रज्वलित झालेला ३१, ३२ हा शोकरूप अग्नि लवकरच मला दग्ध करून टाकील. ती स्त्री दृष्टीस न पडतां मनोहर वृक्षच अवलोकनांत येत असल्यामुळें ३३ माझा हा काम वृद्धिंगतच होत राहील. अदृश्य असलेली सीता ह्या ठिकाणीं माझा शोक वृद्धिंगत करीत असून ३४ दृश्य असलेला वसंत कामविकारजन्य घामामुळें मला मलिन करून टाकीत आहे. हरणाच्या बछड्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती सीता चिंता व शोक ह्यांच्या योगानें मला मुद्दाम पीडा देत आहे ३५ आणि, हे लक्ष्मणा, चैत्रमासांतील हा क्रूर वनवायुही मला संतप्त करीत आहे. हे इकडे तिकडे नाचत असलेले मयूर स्फटिकाच्या जाळ्याप्रमाणें दिसणाऱ्या आणि वायूनें उडविलेल्या आपल्या पंखांच्या योगानें शोभत आहेत आणि मयूर पक्षिणींनीं परिवेष्टित झालेले ते हे मदमत्त मयूर ३६,३७ मदनानें ग्रस्त केलेल्या माझा काम अधिकच वृद्धिंगत करीत आहेत. हे लक्ष्मणा, पहा, मदनानें व्याकुल झालेली ही मयूरपक्षिणी पर्वतशिखरावर नृत्य करीत असलेल्या आपल्या मयूरभर्त्यासमीप नृत्य करीत आहे आणि आपले मनोहर पंख पसरून शब्दांनीं उपहास करीतच आहे कीं काय असा तो मयूरपक्षीही मनापासून त्या आपल्या मनोहर स्त्रियेच्या मागोमाग धांवत आहे. राक्षसानें माझी प्रिया खरोखर मयूरवनांतून नेली नाहीं ३८,३९,४० ह्मणूनच हा मयूर रमणीय वनामध्यें आपल्या कांतेसहवर्तमान नृत्य करीत आहे. असो. सीतेवांचून चैत्रमासांत हें वनामध्यें वास्तव्य मला अत्यंत दुःसह झालें आहे ४१. हे लक्ष्मणा, पशुपक्ष्यांच्या जन्मास आलेल्याही प्राण्यांमध्यें कसें प्रेम आहे तें पहा.

कामाद्भर्तारमभिवर्तते ४२ ममाप्येवं विशालाक्षी जानकी जातसंभ्रमा। मदनेनाभिवर्तेत यदि नापहृता भवेत् ४३ पश्य लक्ष्मण पुष्पाणि निष्फलानि भवन्ति मे। पुष्पभारसमृद्धानां वनानां शिशिरात्यये ४४ रुचिराण्यपि पुष्पाणि पादपानामतिश्रिया। निष्फलानि महीं यान्ति समं मधुकरोत्करैः ४५ नदन्ति कामं शकुना मुदिताः सङ्घशः कलम्। आह्वयन्त इवान्योन्यं कामोन्मादकरा मम ४६ वसन्तो यदि तत्रापि यत्र मे वसति प्रिया। नूनं परवशा सीता सापि शोचत्यहं यथा ४७ नूनं न तु वसन्तस्तं देशं स्पृशति यत्र सा। कथं ह्यसितपद्माक्षी वर्तयेत्सा मया विना ४८ अथवा वर्तते तत्र वसन्तो यत्र मे प्रिया। किं करिष्यति सुश्रोणी सा तु निर्भर्त्सिता परैः ४९ श्यामा पद्मपलाशाक्षी मृदुभाषा च मे प्रिया। नूनं वसन्तमासाद्य परित्यक्ष्यति जीवितम् ५०, दृढं हि हृदये बुद्धिर्मम संपरिवर्तते। नालं वर्तयितुं सीता साध्वी मद्विरहं गता ५१

---

सांप्रत ही मयूरपक्षिणी कामवासनेमुळें आपल्या भर्त्याशीं लगटत आहे ४२ आणि विशालनयना सीतेला जर राक्षसानें नेलें नसतें तर तीही मदनाच्या योगानें घाबरी होऊन मला ह्याचप्रमाणें बिलगली असती ४३. हे लक्ष्मणा, पहा, पुष्पभारांची समृद्धि असलेल्या वनांतील पुष्पें वसंतऋतूमध्यें मला निष्फल होत आहेत ४४. वृक्षांच्या अतिशय सौंदर्यामुळें मनोहर दिसत असलेलीं हीं पुष्पें भृंगसमूहांसहवर्तमान व्यर्थ पृथ्वीवर येत आहेत ४५. कळपाकळपानें असलेले हे पक्षी आनंदित झाले असून एकमेकाला हाक मारीत असल्याप्रमाणेंच कीं काय इच्छेनुरूप अस्पष्ट व मधुर ध्वनि करीत आहेत आणि त्यामुळें मला कामोद्दीपक झाले आहेत ४६. माझी प्रिया सीता जेथें वास्तव्य करीत आहे तेथेंही जर हा वसंतकाल असेल तर तीही पराधीन असल्यामुळें माझ्याप्रमाणेंच खरोखर शोक करीत असेल ४७. जेथें ती आहे त्या प्रदेशामध्यें खरोखर जरी वसंत नसला तरी नीलकमलासारख्या नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता माझ्यावांचून कशी बरें जिवंत राहील ? ४८. अथवा जेथें माझी प्रिया आहे तेथें वसंत हा असेलच; परंतु, तो जरी असला तरी शत्रूंनीं पीडिलेल्या त्या सुंदरीशीं त्याचें कांहीं एक चालावयाचें नाहीं. (सारांश, शत्रूंच्या पीडेचें दुःख सोशीत असलेल्या स्त्रीला मदनाची बाधा होण्याचा संभव नाहीं) ४९. नित्ययौवन, कमलपत्रासारिखे नेत्र आणि मृदु भाषण ह्यांनीं युक्त असलेली माझी प्रिया वसंत प्राप्त झाल्यावर खरोखर प्राणत्याग करील ५०. साध्वी सीतेला माझा वियोग झाला असल्यामुळें ती जीवंत राहण्यास

मयि भावो हि वैदेह्यास्तत्त्वतो विनिवेशितः । ममापि भावः सीतायां सर्वथा विनिवेशितः ५२ एष पुष्पवहो वायुः सुखस्पर्शो हिमावहः । तां विचिन्तयतः कान्तां पावकप्रतिमो मम ५३ सदा सुखमहं मन्ये यं पुरा सह सीतया । मारुतः स विना सीतां शोकसंजननो मम ५४ तां विनाथ विहङ्गोसौ पक्षी प्रणदितस्तदा । वायसः पादपगतः प्रहृष्टमभिकूजति ५५ एष वै तत्र वैदेह्या विहगः प्रतिहारकः । पक्षी मां तु विशालाक्ष्याः समीपमुपनेष्यति ५६ पश्य लक्ष्मण संनादं वने मदविवर्धनम् । पुष्पिताग्रेषु वृक्षेषु द्विजानामवकूजताम् ५७ विक्षिप्तां पवनेनैतामसौ तिलकमञ्जरीम्। षट्पदः सहसाभ्येति मदोद्धूतामिव प्रियाम् ५८ कामिनामयमत्यन्तमशोकः शोकवर्धनः । स्तवकैः पवनोत्क्षिप्तैस्तर्जयन्निव मां स्थितः ५९ अमी लक्ष्मण दृश्यन्ते चूताः कुसुमशालिनः । विभ्रमोत्सिक्तमनसः साङ्गरागा

---

समर्थ नाहीं असें माझ्या मनानें पक्कें घेतलें आहे ५१. सीतेचें खरें खरें प्रेम माझ्यावर जडलें असून माझेंही प्रेम सर्वप्रकारें सीतेवर जडलें आहे ५२. आपल्याबरोबर पुष्पें उडवून नेणारा थंडगार वारा जरी स्पर्श झाला असतां सुखदायक होणारा आहे तरी मी त्या कांतेचें चिंतन करीत असल्यामुळें मला तो अग्नितुल्य झाली आहे ५३. सीतेसहवर्तमान ज्याला मी पूर्वीं नेहमीं सुखकारक समजत होतों तो वायु ती सीता नसल्यामुळें आज माझ्या शोकोत्पत्तीला कारण झालेला आहे ५४. त्यावेळीं ह्या आकाशगामी पक्ष्यानें गर्जना केली ( आणि तिच्या योगानें सीतेचा वियोग झाल्याचें मला ह्यानें सुचविलें ); परंतु, आतां तोच काकपक्षी वृक्षावर बसून आनंदानें शब्द करीत आहे ( आणि सीतेचा समागम होणार असल्याचें मला सुचवीत आहे ) ५५. हा पक्षी त्या ठिकाणीं सीतेला अतिशय पीडा होत असल्याचें सुचवीत असून मला मात्र त्या विशालनयनेचे समीप नेणार आहे ५६. हे लक्ष्मणा, प्रफुल्लित अग्रांनीं युक्त अशा वृक्षांचे ठिकाणीं किलबिल किलबिल शब्द करीत असलेल्या पक्ष्यांचा कामोद्दीपक ध्वनि तूं ह्या वनामध्यें अवलोकन कर ५७. वायूनें चलित झालेल्या ह्या तिलकमंजरीकडे हा भ्रमर एकाएकीं येत आहे आणि विषयांध होऊन अडखळत अडखळत चालूं लागलेल्या आपल्या प्रियेकडे जाणाऱ्या कामी पुरुषाप्रमाणें तो दिसत आहे ५८. हा अशोक कामी जनांचा शोक अतिशय वृद्धिंगत करणारा आहे आणि वायूनें वर उडालेल्या पुष्पगुच्छांच्या योगानें जसा कांहीं मला दटावीतच येथें उभा राहिला आहे ५९. हे लक्ष्मणा, मोहोरामुळें सुशोभित झालेले हे आम्रवृक्ष शृंगारानें मन प्रफुल्लित झालेल्या व शरीराला उटी लाविलेल्या पुरुषांप्रमाणें

नराइव ६० सौमित्रे पश्य पम्पायाश्चित्रासु वनराजिषु । किंनरा नर-शार्दूल विचरन्ति यतस्ततः ६१ इमानि शुभगन्धीनि पश्य लक्ष्मण सर्वशः । नलिनानि प्रकाशन्ते जले तरुणसूर्यवत् ६२ एषा प्रसन्नसलिला पद्मनी-लोत्पलायुता । हंसकारण्डवाकीर्णा पम्पा सौगन्धिकायुता ६३ जले तरुण-सूर्याभैः षट्पदाहतकेसरैः । पङ्कजैः शोभते पम्पा समन्तादभिसंवृता ६४ चक्रवाकयुता नित्यं चित्रप्रस्थवनान्तरा । मातङ्गमृगयूथैश्च शोभते सलि-लार्थिभिः ६५ पवनाहतवेगाभिरूर्मिभिर्विमलेम्भसि । पङ्कजानि विराजन्ते ताड्यमानानि लक्ष्मण ६६ पद्मपत्रविशालाक्षीं सततं प्रियपङ्कजाम् । अप-श्यतो मे वैदेहीं जीवितं नाभिरोचते ६७ अहो कामस्य वामत्वं यो गता-मपि दुर्लभाम् । स्मारयिष्यति कल्याणीं कल्याणतरवादिनीम् ६८ शक्यो धारयितुं कामो भवेदभ्यागतो मया । यदि भूयो वसन्तो मां न हन्यात्पु-ष्पितद्रुमः ६९ यानि स्म रमणीयानि तया सह भवन्ति मे । तान्येवार-

---

दिसत आहेत ६०. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, पंपेच्या तीरीं असलेल्या ह्या चित्र-विचित्र वनसमुदायामध्यें ( किन्नरींसहवर्तमान ) किन्नर इकडे तिकडे संचार करीत आहेत ६१. पहा, हे लक्ष्मणा, हीं सुगंधीं रक्तकमलें जलामध्यें सर्वप्रकारें बालसूर्या-प्रमाणें प्रकाशत आहेत ६२. निर्मल उदक आणि श्वेतवर्ण, नीलवर्ण व रक्तवर्ण कमलें ह्यांनीं युक्त असलेली ही पंपा हंस व कारंडव पक्ष्यांनीं गजबजून गेलेली आहे ६३ आणि भ्रमरांनीं ज्यांतील पराग उदकामध्यें पाडिले आहेत अशा बालसूर्यतुल्य आर-क्तवर्ण कमलांनीं सर्व बाजूंनीं ही व्याप्त झाली असल्यामुळें शोभा देत आहे ६४. चक्रवाक पक्ष्यांनीं ही नेहमीं युक्त आहे, अद्भुत प्रदेशांनीं युक्त असलेलीं आणखीं दुसरींही वनें हिचे तीरीं आहेत आणि जलपान करण्याच्या इच्छेनें आलेल्या गजांच्या व मृगांच्या कळपांनीं हिला शोभा आलेली आहे ६५. वायूचा तडाखा बसल्यामुळें ज्यांच्यामध्यें वेग उत्पन्न झाला आहे अशा लाटांनीं ताडित होत असलेलीं कमलें, हे लक्ष्मणा, निर्मल उदकांत झळकत आहेत ६६. पद्मपत्रांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असून नित्य कमलांची आवड असलेली सीता दृष्टीं पडत नसल्यामुळें मला जगावेंसें वाटत नाहीं ६७. अहो ! कायहो हा मदनाचा कुटिलपणा ! अत्यंत कल्याणकारक भाषण करणारी कल्याणी सीता दूर गेली असतांही आणि ह्मणूनच मला आतां दुर्लभ असतांही हा आपला मला तिची स्मृति देत आहे ६८. प्रफु-ल्लित वृक्षांनीं युक्त असलेला वसंत जर मला अधिक प्रहार न करील तर हा प्राप्त झालेला कामही धारण करणें मला शक्य होईल ६९. अरे, तिच्यासहवर्तमान असतांना

मणीयानि जायन्ते मे तया विना ७० पद्मकोशपलाशानि द्रष्टुं दृष्टिर्हि मन्यते । सीताया नेत्रकोशाभ्यां सदृशानीति लक्ष्मण ७१ पद्मकेसरसंसृष्टो वृक्षान्तरविनिःसृतः । निःश्वास इव सीताया वाति वायुर्मनोहरः ७२ सौमित्रे पश्य पम्पाया दक्षिणे गिरिसानुषु । पुष्पितां कर्णिकारस्य यष्टिं परमशोभिताम् ७३ अधिकं शैलराजोयं धातुभिस्तु विभूषितः । विचित्रं सृजते रेणुं वायुवेगविघट्टितम् ७४ गिरिप्रस्थास्तु सौमित्रे सर्वतः संप्रपुष्पितैः । निष्पत्रैः सर्वतो रम्यैः प्रदीप्ता इव किंशुकैः ७५ पम्पातीररुहाश्चेमे संसिक्ता मधुगन्धिनः । मालतीमल्लिकापद्मकरवीराश्च पुष्पिताः ७६ केतक्यः सिंदुवाराश्च वासन्त्यश्च सुपुष्पिताः । मातुलिङ्गाश्च पूर्णाश्च कुन्दगुल्माश्च सर्वशः ७७ चिरिबिल्वा मधूकाश्च वञ्जुला बकुलास्तथा । चम्पकास्तिलकाश्चैव नागवृक्षाश्च पुष्पिताः ७८ पद्मकाश्चैव शोभन्ते नीलाशोकाश्च पुष्पिताः । लोध्राश्च गिरिपृष्ठेषु सिंहकेसरपिञ्जराः ७९ अङ्कोलाश्च कुरण्टाश्च चूर्णकाः पारिभद्रकाः । चूताः पाटलयश्चापि कोविदाराश्च पुष्पिताः ८० मुचुकुन्दार्जुनाश्चैव दृश्यन्ते गिरिसानुषु ।

---

ज्या गोष्टी मला रमणीय होत होत्या त्याच तिचा वियोग झाल्यामुळें रमणीय होत नाहींत ७०. हे लक्ष्मणा, कमलकोशाचीं दलें सीतेच्या पापण्यासारखीं आहेत ह्मणून दृष्टीला तीं पहावींशीं वाटतात ७१. दुसऱ्या वृक्षांतून बाहेर पडून कमलकेसराचा संसर्ग झालेला वायु सीतेच्या निःश्वासाप्रमाणें मनोहर वहात आहे ७२. हे लक्ष्मणा, पंपेच्या दक्षिणेस पर्वतशिखरांवर असलेली कर्णिकार वृक्षाची प्रफुल्लित व अत्यंत सुशोभित काठी तूं अवलोकन कर ७३ हा ऋष्यमूकनामक श्रेष्ठ पर्वत धातूनें भूषित असून वायुवेगानें उडालेली पुष्कळच चमत्कारिक धूळ फेकीत आहे ७४. हे लक्ष्मणा, सर्व बाजूंनीं प्रफुल्लित, पर्णरहित आणि चोहोंकडून रमणीय अशा पलाशवृक्षांच्या योगानें पर्वतशिखरें जशीं कांहीं पेटल्यासारखीं दिसत आहेत ७५. पंपेच्या तीरीं असलेले मालती, मोगरी, कमल व कण्हेर हे सुगंध वृक्ष जलसिंचनानें वाढलेले असून प्रफुल्लित झालेले आहेत ७६. केतकी, निरगुंडी व कुसरी हीं झाडें प्रफुल्लित झालीं असून ह्या पंपेच्या तीरीं महाळुंगाचे वृक्ष फलांनीं भरलेले आहेत व कुंदांचीं झाकरेंही सर्वस्वीं पुष्पांनीं भरलेलीं आहेत. ७७. करंज, मोहा, तिवस, बकुल, चांफा, तिळवा आणि नागचांफा हे वृक्ष प्रफुल्लित झालेले आहेत ७८; पद्मक, नील अशोक आणि सिंहांची आयाळ ज्यांच्या योगानें पिंजरवर्ण झालेली आहे असे लोध्र वृक्ष पर्वताच्या माथ्यावर प्रफुल्लित झालेले असून शोभत आहेत ७९. पिस्ते, पिंवळ्या कोरांट्या, सावरी,

केतकोद्दालकाश्चैव शिरीषाः शिंशपा धवाः ८१ शाल्मल्यः किंशुकाश्चैव रक्ताः कुरबकास्तथा । तिनिशा नक्तमालाश्च चन्दनाः स्यन्दनास्तथा ८२ हिन्तालास्तिलकाश्चैव नागवृक्षाश्च पुष्पिताः ८३ पुष्पितान्पुष्पिताग्राभिर्लताभिः परिवेष्टितान् । द्रुमान्पश्येह सौमित्रे पम्पाया रुचिरान्बहून् ८४ वातविक्षिप्तविटपान्यथासन्नान्द्रुमानिमान् । लताः समनुवर्तन्ते मत्ता इव वरस्त्रियः ८५ पादपात्पादपं गच्छञ्छैलाच्छैलं वनाद्वनम् । वाति नैकरसास्वादसंमोदित इवानिलः ८६ केचित्पर्याप्तकुसुमाः पादपा मधुगन्धिनः। केचिन्मुकुलसंवीताः श्यामवर्णा इवाबभुः ८७ इदं मृष्टमिदं स्वादु प्रफुल्लमिदमित्यपि । रागरक्तो मधुकरः कुसुमेष्वेव लीयते ८८ निलीय पुनरुत्पत्य सहसान्यत्र गच्छति । मधुलुब्धो मधुकरः पम्पातीरद्रुमेष्वसौ ८९ इयं कुसुमसंघातैरुपस्तीर्णा सुखाकृता । स्वयं निपतितैर्भूमिः शयनप्रस्तरैरिव ९० विविधा विविधैः पुष्पैस्तैरेव नगसानुषु । विस्तीर्णाः पीतरक्ताभाः सौमित्रे प्रस्तराः कृताः ९१ हिमान्ते पश्य सौमित्रे वृक्षाणां पुष्प-

---

मंदार, आम्र, गुलाब आणि कांचन प्रफुल्लित झालेले आहेत ८०. मुचकुंद, अर्जुन, केतक मोंकरी शिरसू, शिसवा आणि धावडा हेही वृक्ष पर्वतशिखरावर दृष्टीं पडत आहेत ८१. सावऱ्या, पळस, तांबड्या कोरांट्या, तिवस, करंज, चंदन, स्पंदन ८२, हिंताल तिलक, आणि नागचाफे हेही वृक्ष प्रफुल्लित दिसत आहेत ८३. हे लक्ष्मणा, ह्या पंपेच्या तीरीं प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेल्या लतांनीं परिवेष्टित आणि मनोहर असे हे पुष्कळच प्रफुल्लित वृक्ष तूं अवलोकन कर ८४. वायूच्या योगानें ज्यांच्या फांद्या अस्ताव्यस्त होऊन ज्यांची एकमेकामध्यें गुंतागुंत झालेली आहे अशा ह्या वृक्षांना मत्त झालेल्या श्रेष्ठ स्त्रियांप्रमाणें लता चिकटून रहात आहेत ८५. ह्या वृक्षापासून त्या वृक्षावर, ह्या पर्वतावरून त्या पर्वतावर आणि ह्या वनांतून त्या वनांत वहात जाणारा वायु अनेक रसांच्या आस्वादामुळें हर्षयुक्त झाल्यासारिखा दिसत आहे ८६. कांहीं सुगंधी वृक्ष विपुल पुष्पांनीं युक्त आहेत व कांहीं पुष्पकलिकांनी परिवेष्टित असलेले वृक्ष श्यामवर्ण दिसत आहेत ८७. हें मधुर, हें स्वादिष्ट व हें प्रफुल्लित असें समजून आरक्तवर्ण मधुमक्षिका पुष्पांमध्येंच लीन होत आहेत ८८ आणि पुष्पांत लीन झाल्यावर ही मधुलुब्ध मधुमक्षिका पुनरपि उडून एकाएकीं पंपातीरीं असलेल्या वृक्षावरच दुसरे ठिकाणीं जात आहे ८९. ह्या भूमीवर आपोआप पडलेल्या पुष्पराशींचे थर झालेले असल्यामुळें शयन करण्याकरितां बिछानें पसरलेल्या भूमिप्रमाणें ही सुखकर झालेली आहे ९०. हे लक्ष्मणा, नानाप्रकारच्या पुष्पांचे थर पर्वतशिखरावर

संभवम् । पुष्पमासे हि तरवः संघर्षादिव पुष्पिताः ९२ आह्वयन्त इवा-
न्योन्यं नगाः षट्पदनादिताः । कुसुमोत्तंसविटपाः शोभन्ते बहु लक्ष्मण ९३
एष कारण्डवः पक्षी विगाह्य सलिलं शुभम् । रमते कान्तया सार्धं काम-
मुद्दीपयन्निव ९४ मन्दाकिन्यास्तु यदिदं रूपमेतन्मनोहरम् । स्थाने जगति
विख्याता गुणास्तस्या मनोरमाः ९५ यदि दृश्येत सा साध्वी यदि चेह
वसेमहि । स्पृहयेयं न शक्राय नायोध्यायै रघूत्तम ९६ न ह्येवं रमणीयेषु
शाद्वलेषु तया सह । रमतो मे भवेच्चिन्ता न स्पृहान्येषु वा भवेत् ९७
अमी हि विविधैः पुष्पैस्तरवो विविधच्छदाः । काननेऽस्मिन्विना कान्तां
चिन्तामुत्पादयन्ति मे ९८ पश्य शीतजलां चेमां सौमित्रे पुष्करायुताम् ।
चक्रवाकानुचरितां कारण्डवनिषेविताम् ९९ प्लवैः क्रौञ्चैश्च संपूर्णां महा-
मृगनिषेविताम् । अधिकं शोभते पम्पा विकूजद्भिर्विहंगमैः १०० दीप-

---

झाले असल्यामुळें विस्तीर्ण, पीतवर्ण व रक्तवर्ण असे नानाप्रकारचे बिछाने तयार करून ठेविल्यासारखे दिसत आहेत ९१. हे लक्ष्मणा, थंडी संपतांक्षणीं वृक्षांचे ठिकाणीं झालेला हा पुष्पप्रादुर्भाव तूं अवलोकन कर. ह्या चैत्रमहिन्यामध्यें वृक्ष जसे कांहीं एकमेकाच्या ईर्षेनेंच प्रफुल्लित झालेले आहेत ९२. हे लक्ष्मणा, भृंगांनीं नादित असल्यामुळें वृक्ष एकमेकांना आह्वान करीत असल्यासारिखे दिसत आहेत आणि फांद्या पुष्पांनीं भरलेल्या असल्यामुळें ते फारच शोभत आहेत ९३. हा कारंडव पक्षी शुभ उदकामध्यें प्रविष्ट होऊन माझे ठिकाणीं कामोद्दीपन करण्याकरितांच कीं काय आपल्या कांतेसहवर्तमान रममाण होत आहे ९४. गंगेप्रमाणें पंपेचें हें रूप मनोहर असल्यामुळें जगतामध्यें हिच्या उत्कृष्ट गुणांची जी ख्याति झालेली आहे ती अगदीं योग्य आहे ९५. हे रघुवंशजश्रेष्ठा लक्ष्मणा, ती साध्वी स्त्री जर दृष्टीं पडेल आणि तिच्यासहवर्तमान जर आमचें ह्या ठिकाणीं वास्तव्य होईल तर अयोध्येचीच नव्हे परंतु इंद्रपदाचीही मी जरूर बाळगणार नाहीं ९६; कारण, ह्याप्रमाणें रमणीय असलेल्या ह्या हिरव्यागार प्रदेशावर मी तिच्यासहवर्तमान रममाण होऊं लागलों असतां मला कसलीही चिंता रहाणार नाहीं आणि दुसऱ्या गोष्टी माझ्या मनातही येणार नाहींत ९७. नानाप्रकारच्या पर्णांनीं युक्त असलेले हे वृक्ष ह्या वनामध्यें सीतेवांचून असलेल्या मला नानाप्रकारच्या पुष्पांनीं चिंताक्रांत मात्र करून टाकीत आहेत ९८. शीत जलानें परिपूर्ण व कमलांनीं भरलेली ही पंपा, हे लक्ष्मणा, तूं अवलोकन कर. चक्रवाक पक्षी हिचे तीरीं संचार करीत असून कारंडव पक्षी हिचा आश्रय करून राहिलेले आहेत ९९. बदकांनीं व क्रौंच पक्ष्यांनीं ही भरलेली आहे आणि मोठमोठ्या मृगांनीं हिचा आश्रय केलेला

यन्तीव मे कामं विविधा मुदिता द्विजाः । श्यामां चन्द्रमुखीं स्मृत्वा प्रियां पद्मनिभेक्षणाम् १ पश्य सानुषु चित्रेषु मृगीभिः सहितान्मृगान् । मां पुनर्मृगशावाक्ष्या वैदेह्या विरहीकृतम् ॥ व्यथयन्तीव मे चित्तं संचरन्तस्ततस्ततः २ अस्मिन्सानुनि रम्ये हि मत्तद्विजगणाकुले । पश्येयं यदि तां कान्तां ततः स्वस्ति भवेन्मम ३ जीवेयं खलु सौमित्रे मया सह सुमध्यमा । सेवेत यदि वैदेही पम्पायाः पवनं शुभम् ४ पद्मसौगन्धिकवहं शिवं शोकविनाशनम् । धन्या लक्ष्मण सेवन्ते पम्पाया वनमारुतम् ५ श्यामा पद्मपलाशाक्षी प्रिया विरहिता मया । कथं धारयति प्राणान्विवशा जनकात्मजा ६ किं नु वक्ष्यामि धर्मज्ञं राजानं सत्यवादिनम् । जनकं पृष्टसीतं तं कुशलं जनसंसदि ७ यामामनुगता मन्दं पित्रा प्रस्थापितं वनम् । सीता धर्मं समास्थाय क नु सा वर्तते प्रिया ८ तया विहीनः कृपणः कथं लक्ष्मण धारये । या

---

आहे. ही पंपा शब्द करणाऱ्या पक्ष्यांमुळें तर अधिकच शोभत आहे १०० आणि पद्मपत्राप्रमाणें नेत्र व चंद्राप्रमाणें आह्लादकारक मुख ह्यांनीं युक्त असलेल्या माझ्या नित्य तरुणी प्रियेची आठवण देऊन हे आनंदित झालेले नानाप्रकारचे पक्षी माझे ठिकाणीं कामोद्दीपन करीत आहेत १. अद्भुत शिखरांवरून मृगींसहवर्तमान असलेल्या मृगांना तूं अवलोकन कर आणि बालहरिणासारिखे जिचे नेत्र आहेत त्या सीतेचा वियोग झालेल्या माझ्याकडेही दृष्टि दे. इकडे तिकडे संचार करीत असलेले हे मृग माझ्या चित्ताला दुःख मात्र देत आहेत २. मत्त पक्षिगणांनीं गजबजून गेलेल्या ह्या रमणीय पर्वताशिखरावर जर ती कांता माझ्या दृष्टीं पडेल तरच माझी धडगत आहे ३. सारांश, हे लक्ष्मणा, ती सुंदरी वैदेही जर माझ्याबरोबर ह्या पंपातीरावरील शुभ वायूचें सेवन करील तरच खरोखर मी जिवंत राहीन ४. हे लक्ष्मणा, श्वेत कमलें व रक्त कमलें ह्यांचा गंध वाहून नेणाऱ्या अशा ह्या मंगलकारक व रोगनाशक पंपातीरावरील वनवायूचें जे सेवन करितात ते धन्य आहेत ५. कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र आहेत व जी नेहमींच तरुण आहे अशी ती जनककन्या प्रिया माझा वियोग होऊन शत्रूचे अधीन झाली असतांना कसे बरें प्राण धारण करील ? ६. सीता कोठें आहे ह्मणून लोकांच्या सभेमध्यें जनकानें मला प्रश्न केला तर त्या धर्मवेत्त्या व सत्यवादी राजाला मी आतां काय बरें कुशल वृत्तांत कथन करूं ? ७. अरे, पित्यानें मला वनांत पाठविलें असतां जी धर्माचें अवलंबन करून हळूं हळूं माझ्या मागोमाग आली ती प्रिया सीता कोठें आहे ? ८. हे लक्ष्मणा,

मामनुगता राज्याद्भ्रष्टं विहतचेतसम् ९ तच्चार्वञ्चितपद्माक्षं सुगन्धि शुभमव्रणम् । अपश्यतो मुखं तस्याः सीदतीव मतिर्मम १० स्मितहास्यान्तरयुतं गुणवन्मधुरं हितम् । वैदेह्या वाक्यमतुलं कदा श्रोष्यामि लक्ष्मण ११ प्राप्य दुःखं वने श्यामा मां मन्मथविकर्शिनम् । नष्टदुःखेव हृष्टेव साध्वी साध्वभ्यभाषत १२ किं नु वक्ष्याम्ययोध्यायां कौसल्यां हि नृपात्मज । क्व सा स्नुषेति पृच्छन्तीं कथं चापि मनस्विनीम् १३ गच्छ लक्ष्मण पश्य त्वं भरतं भ्रातृवत्सलम् । न ह्यहं जीवितुं शक्तस्तामृते जनकात्मजाम् १४ इति रामं महात्मानं विलपन्तमनाथवत् । उवाच लक्ष्मणो भ्राता वचनं युक्तमव्ययम् १५ संस्तम्भ राम भद्रं ते मा शुचः पुरुषोत्तम । नेदृशानां मतिर्मन्दा भवत्यकलुषात्मनाम् १६ स्मृत्वा वियोगजं दुःखं त्यज स्नेहं प्रिये जने । अतिस्नेहपरिष्वङ्गाद्वर्तिरार्द्रापि दह्यते १७ यदि गच्छति पातालं ततोऽभ्यधिकमेव वा । सर्वथा रावणस्तात न

---

राज्यापासून च्युत आणि मनामध्यें खिन्न झालेल्या माझ्या मागोमाग जी आली तिचा वियोग झाल्यामुळें दीन झालेला मी कसा बरें प्राण धारण करूं ? ९. मनोहर आणि प्रशंसेस पात्र अशा कमलतुल्य नेत्रांनीं युक्त, शुभ, कसलाही व्रण नसलेलें आणि सुगंधि असें तिचें मुख दृष्टीं पडत नसल्यामुळें माझें धैर्य अगदीं खचत आहे १०. हे लक्ष्मणा, मधून मधून किंचित् हास्यानें युक्त, मधुर, हितकारक आणि गुणसंपन्न असें सीतेचें अनुपम भाषण माझ्या आतां कधीं बरें कानीं पडेल ? ११. वनामध्यें दुःख प्राप्त झालें असूनही ती तरुणी साध्वी दुःख नाहींसें झाल्यासारिखी स्वतःला भासवीत होती आणि जशी कांहीं हर्षयुक्त होऊन मदनानें जर्जर केलेल्या माझ्याशीं चांगलें भाषण करीत होती १२. ' हे राजकुमारा, ती माझी स्नुषा कोठें आहे ' म्हणून विचारी कौसल्या मला विचारूं लागली असतां मी तिला अयोध्येमध्यें काय सांगूं व कसें सांगूं? १३. हे लक्ष्मणा, तूं जा आणि भ्रातृवत्सल भरताला भेट. मी आतां त्या जनककन्येवांचून जिवंत रहाण्यास समर्थ नाहीं " १४. ह्याप्रमाणें महात्मा राम अनाथासारिखा विलाप करूं लागला असतां भ्राता लक्ष्मण योग्य व व्यर्थ न होणारें असें भाषण त्याच्याशीं करूं लागला १५. ( तो ह्मणाला ) " हे रामा, शोक आंवरून धर. हे पुरुषोत्तमा, तुझें देव बरें करो, तूं शोक करूं नकोस. तुझ्यासारिख्या निर्मल मनाच्या पुरुषांची मति अशी कधीं गुंग होत नाहीं १६. प्रिय वस्तूसंबंधानें वियोगजन्य दुःख अवश्य ठविलेलेंच आहे हें लक्ष्यांत आणून प्रिय जनाचे ठिकाणीं असलेलें प्रेम तूं आतां सोडून दे. कारण, अति स्नेहाचा संबंध झाल्यामुळें भिजलेली वातही जळूं लागते १७. हे राघावा,

भविष्यति राघव १८ प्रवृत्तिर्लभ्यतां तावत्तस्य पापस्य रक्षसः । ततो हास्यति वा सीतां निधनं वा गमिष्यति १९ यदि याति दितेर्गर्भं रावणः सह सीतया । तत्राप्येनं हनिष्यामि न चेद्दास्यति मैथिलीम् १२० स्वास्थ्यं भद्र भजस्वार्य त्यज्यतां कृपणा मतिः । अर्थो हि नष्टकार्यार्थैरयत्नेनाधिगम्यते २१ उत्साहो बलवानार्य नास्त्युत्साहात्परं बलम् । सोत्साहस्य हि लोकेषु न किंचिदपि दुर्लभम् २२ उत्साहवन्तः पुरुषा नावसीदन्ति कर्मसु । उत्साहमात्रमाश्रित्य प्रतिलप्स्याम जानकीम् २३ त्यज्यतां कामवृत्तत्वं शोकं संन्यस्य पृष्ठतः । महात्मानं कृतात्मानमात्मानं नावबुद्ध्यसे २४ एवं संबोधितस्तेन शोकोपहतचेतनः । त्यज्य शोकं च मोहं च रामो धैर्यमुपागमत् २५ सोऽभ्यतिक्रामदव्यग्रस्तामचिन्त्यपराक्रमः । रामः पम्पां सुरुचिरां रम्यां पारिप्लवद्रुमाम् २६ निरीक्षमाणः सहसा महात्मा सर्वं वनं निर्झरकन्दरं च । उद्विग्नचेताः सह लक्ष्म-

---

रावण पातालांत जावो किंवा त्यापेक्षांही अधिक दुर्गम प्रदेशावर जावो, त्यानें कांहीं केलें तरी तो आतां जिवंत रहाणार नाहीं १८. तस्मात्, त्या पापी राक्षसाची बातमी आपणांला प्रथम मिळविली पाहिजे म्हणजे सीतेला सोडून देणें तरी त्याला भाग पडेल किंवा मरावें तरी लागेल १९. फार कशाला; सीतेला घेऊन रावण जरी दितीच्या गर्भांत गेला तरी सुद्धां तो सीतेला परत न देईल तर मी त्याचा तेथेंही वध करीन १२०. हे कल्याणसंपन्न सज्जना रामा, धैर्याचें अवलंबन कर आणि हे असले धीर खचविणारे विचार सोडून दे. कारण, नष्ट झालेली वस्तु ज्यांना अवश्य मिळवावयाची आहे त्यांना ती यत्नावाचून कधींही मिळत नाहीं २१. हे सज्जना, उत्साहाचें सामर्थ्य ज्यास्त आहे. उत्साहापेक्षां श्रेष्ठ बल दुसरें नाहीं आणि ह्मणूनच उत्साही पुरुषाला त्रैलोक्यामध्यें कोणतीही वस्तु दुर्लभ नाहीं २२. उत्साही पुरुष दुर्घट कार्य प्राप्त झालें असतांही खचून जात नाहींत. ह्यास्तव, आपणही केवल उत्साहाचेंच अवलंबन करून जानकी परत मिळवूं २३ शोकाला मागें टाकून तूं ही विषयाधीनता सोडून दे. तूं स्वतः महात्मा व कृतार्थ आहेस हें तुला समजत नाहीं काय ? " २४. ह्याप्रमाणें त्या लक्ष्मणानें रामाला समजाविलें असतां चित्त शोकाकुल झालेल्या रामानें शोकाचा व मोहाचा त्याग करून धैर्याचें अवलंबन केलें २५ आणि तो अचिंत्य पराक्रमी राम वायूनें चंचल झालेल्या वृक्षांनीं युक्त, अत्यंत मनोहर व रम्य अशी ती पंपा सोडून सावधपणानें पुढें चालला २६. सारांश, दुःखाकुल आणि ह्मणूनच मनामध्यें उद्विग्न झालेल्या त्या रामानें लक्ष्मणासहवर्तमान विचार केला आणि तें सर्व वन, झरे व गुहा

णेन विचार्य दुःखोपहतः प्रतस्थे २७ तं मत्तमातङ्गविलासगामी गच्छन्तमव्यग्रमना महात्मा । स लक्ष्मणो राघवमिष्टचेष्टो ररक्ष धर्मेण बलेन चैव २८ तावृष्यमूकस्य समीपचारी चरन्ददर्शाद्भुतदर्शनीयौ । शाखामृगाणामधिपस्तरम्वी वितत्रसे नैव विचेष्टचेष्टम् २९ स तौ महात्मा गजमन्दगामी शाखामृगस्तत्र चरंश्चरन्तौ । दृष्ट्वा विषादं परमं जगाम चिन्तापरीतो भयभारमग्नः १३० तमाश्रमं पुण्यसुखं शरण्यं सदैव शाखामृगसेवितान्तम् । त्रस्ताश्च दृष्ट्वा हरयो विजग्मुर्महौजसौ राघवलक्ष्मणौ तौ १३१ [ १३१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

तौ तु दृष्ट्वा महात्मानौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । वरायुधधरौ वीरौ सुग्रीवः शङ्कितोभवत् १ उद्विग्नहृदयः सर्वा दिशः समवलोकयन् । न व्यतिष्ठत कस्मिंश्चिद्देशे वानरपुङ्गवः २ नैव चक्रे मनः स्थातुं वीक्षमाणौ महाबलौ । कपेः परमभीतस्य चित्तं व्यवससाद ह ३

---

अवलोकन करीत करीत तो महात्मा एकाएकीं पुढें चालता झाला २७. तो राम जाऊं लागला असतां मत्त गजाप्रमाणें झुलत झुलत चालणाऱ्या आणि इष्ट व्यापारांचेंच अवलंबन करणाऱ्या महात्म्या लक्ष्मणानें सावध राहून धर्मानें व बलानें त्याचें रक्षण केलें २८. तदनंतर ऋष्यमूकपर्वताचे समीप संचार करणारा महाबलाढ्य वानरराज सुग्रीव हिंडतां हिंडतां अद्भुत व दर्शनीय अशा त्या रामलक्ष्मणांना अवलोकन करितांक्षणीं भयभीत होऊन हूं कीं चूं देखील करीनासा झाला २९. तात्पर्य, तेथें हिंडत हिंडत आलेल्या त्या रामलक्ष्मणांना अवलोकन करितांक्षणीं गजाप्रमाणें मंदगतीनें चालणारा तो महात्मा सुग्रीव वानर पराकाष्ठेचा खिन्न झाला आणि चिंताक्रांत होऊन अतिशय भयामुळें त्याचा उत्साहही नाहींसा झाला १३० व पुण्यप्रद, सुखावह, आश्रय करण्यास योग्य आणि वानरांनीं वास्तव्य केलेल्या सीमांनीं युक्त अशा त्या आश्रमाला प्राप्त झालेल्या त्या महाबलाढ्य रामलक्ष्मणांना अवलोकन करितांक्षणीं इतर वानरही तेथून चालते झाले १३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १॥

धनुर्धर व वीर असे ते महात्मे भ्राते रामलक्ष्मण अवलोकन करून सुग्रीव चिंताक्रांत झाला १, त्याचें अंतःकरण उद्विग्न झालें, चोहोंकडे पाहूं लागला आणि तो वानरराज कोणत्याही प्रदेशावर ठरेनासा झाला २. महाबलाढ्य रामलक्ष्मणावर दृष्टि गेल्यामुळें एके ठिकाणीं स्थिर रहाण्याचा विचार मनामध्यें मुळींच न येतां

चिन्तयित्वा स धर्मात्मा विमृश्य गुरुलाघवम् । सुग्रीवः परमोद्विग्नः सर्वैस्तैर्वानरैः सह ४ ततः स सचिवेभ्यस्तु सुग्रीवः प्लवगाधिपः । शशंस परमोद्विग्नः पश्यंस्तौ रामलक्ष्मणौ ५ एतौ वनमिदं दुर्गं वालिप्रणिहितौ ध्रुवम् । छद्मना चीरवसनौ प्रचरन्ताविहागतौ ६ ततः सुग्रीवसचिवा दृष्ट्वा परमधन्विनौ । जग्मुर्गिरितटात्तस्मादन्यच्छिखरमुत्तमम् ७ ते क्षिप्रमभिगम्याथ यूथपा यूथपर्षभम् । हरयो वानरश्रेष्ठं परिवार्योपतस्थिरे ८ एवमेकायनगताः प्लवमाना गिरेर्गिरिम् । प्रकम्पयन्तो वेगेन गिरीणां शिखराणि च ९ ततः शाखामृगाः सर्वे प्लवमाना महाबलाः । बभञ्जुश्च नगांस्तत्र पुष्पितान्दुर्गमाश्रितान् १० आप्लवन्तो हरिवराः सर्वतस्तं महागिरिम् । मृगमार्जारशार्दूलांस्त्रासयन्तो ययुस्तदा ११ ततः सुग्रीवसचिवाः पर्वतेन्द्रं समाहिताः । संगम्य कपिमुख्येन सर्वे प्राञ्जलयः स्थिताः १२ ततस्तु भयसंत्रस्तं वालिकिल्बिषशङ्कितम् । उवाच हनुमान्वाक्यं सुग्रीवं

---

अत्यंत भयभीत झालेल्या त्या वानराचें चित्त अगदीं गोंधळून गेलें ३. नंतर तेथें रहाणें आणि तेथून चालतें होणें ह्यांत बरें वाईट कोणतें हें स्वतः लक्ष्यांत आणून वानरांसहवर्तमानही त्याचा विचार करून सुग्रीव त्या सर्व वानरांसहवर्तमान पराकाष्ठेचा उद्विग्न झाला ४. तदनंतर रामलक्ष्मण दृष्टीं पडत असल्यामुळें अत्यंत उद्विग्न झालेला तो वानरराज सुग्रीव आपल्या मंत्र्यांना ह्मणाला ५ " कपटानें वल्कलें धारण करून हिंडत हिंडत येथें आलेले हे निःसंशय ह्या दुर्गम वनामध्यें वालीनें पाठविले आहेत " ६. हें भाषण एकिल्यावर ते महाधनुर्धारी रामलक्ष्मण सुग्रीवाच्या मंत्र्यांनीं अवलोकन केले आणि लगेच ते त्या पर्वताच्या कड्यापासून निघून त्याच पर्वताच्या दुसऱ्या एका उत्कृष्ट शिखराकडे चालते झाले ७. नंतर आपल्या कळपाचें रक्षण करणारे ते वानर त्यांच्यामध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या कपिश्रेष्ठ सुग्रीवाकडे त्वरित गेले आणि त्याच्या भोंवतीं गराडा घालून उभे राहिले ८. तात्पर्य, एकसारिखीच अवस्था झालेले ते सर्वही वानर वेगानें पर्वतांचीं शिखरें कंपित करीत करीत ह्या पर्वतापासून त्या पर्वतावर उड्या मारूं लागले ९ आणि उड्या मारूं लागलेल्या त्या सर्वही महाबलाढ्य वानरांनीं तेथील दुर्गम प्रदेशावर असलेले प्रफुल्लित वृक्ष मोडून टाकिले १०. चोहोंकडून त्या महापर्वतावर ते श्रेष्ठ वानर उड्या मारूं लागले आणि हरिणें, मांजरें व व्याघ्र ह्यांनीं भीति उत्पन्न करीत करीत चालते झाले ११. तदनंतर धैर्याचें अवलंबन केलेले सुग्रीवाचे कांहीं मंत्री त्या श्रेष्ठ पर्वतावर वानरराज सुग्रीवासमीप गेले आणि सर्वही हात जोडून उभे राहिले १२. तदनंतर वालीच्या पोटांत कांहीं किल्बिष

वाक्यकोविदः १३ संभ्रमस्त्यज्यतामेष सर्वैर्वालिकृते महान् । मलयोयं गिरिवरो भयं नेहास्ति वालिनः १४ यस्मादुद्विग्नचेतास्त्वं विद्रुतो हरिपुङ्गव । तं क्रूरदर्शनं क्रूरं नेह पश्यामि वालिनम् १५ यस्मात्तव भयं सौम्य पूर्वजात्पापकर्मणः । स नेह वाली दुष्टात्मा न ते पश्याम्यहं भयम् १६ अहो शाखामृगत्वं ते व्यक्तमेव प्लवंगम । लघुचित्ततयात्मानं न स्थापयसि यो मतौ १७ बुद्धिविज्ञानसंपन्न इङ्गितैः सर्वमाचर । न ह्यबुद्धिं गतो राजा सर्वभूतानि शास्ति हि १८ सुग्रीवस्तु शुभं वाक्यं श्रुत्वा सर्वं हनूमतः । ततः शुभतरं वाक्यं हनूमन्तमुवाच ह १९ दीर्घबाहू विशालाक्षौ शरचापासिधारिणौ । कस्य न स्याद्भयं दृष्ट्वा ह्येतौ सुरसुतोपमौ २० वालिप्रणिहितावेव शङ्केहं पुरुषोत्तमौ । राजानो बहुमित्राश्च विश्वासो नात्र हि क्षमः २१ अरयश्च मनुष्येण विज्ञेयाश्छन्नचारिणः ।

---

येऊन त्यानें ह्या उभयतांना पाठविलें आहे अशी शंका आल्यामुळें भयभीत झालेल्या सुग्रीवाला संभाषणज्ञ हनुमान् ह्मणाला १३ "वालीकरितां जो हा मोठा सर्वांचा चित्तक्षोभ झालेला आहे त्याचा त्याग केला पाहिजे. हा श्रेष्ठ पर्वत मलय आहे आणि ह्या ठिकाणीं आपणांला वालीपासून भीति नाहीं १४. हे वानरराजा, ज्यामुळें चित्त उद्विग्न होऊन तूं ऋष्यमूक पर्वतापासून पळून आलास तो क्रूर मुद्रा धारण करणारा क्रूर वाली मला दिसत नाहीं १५. सारांश, हे विनयसंपन्न सुग्रीवा, ज्या पापकर्मी ज्येष्ठ भ्रात्यापासून तुला भय उत्पन्न झालें आहे तो दुष्टात्मा वाली येथें नाहीं आणि ह्मणूनच मला वाटतें तुला भीति नाहीं १६. हे वानरा, चंचल अंतःकरणामुळें तूं ज्याअर्थी बुद्धीचा दृढ निश्चय करीत नाहींस त्याअर्थी तुझें वानरत्व व्यक्तच झालें आहे १७. बुद्धि आणि ज्ञान ह्यांनीं संपन्न होऊन इंगितांच्या योगानें तूं सर्व कांहीं करीत जा. कारण, बुद्धीचें अवलंबन न केलेला राजा आपल्या ताब्यांतील कोणत्याही प्रजेवर अंमल चालविण्यास समर्थ होत नाहीं" १८. हें हनुमानाचें शुभ वाक्य श्रवण करून सुग्रीव त्याच्याहीपेक्षां शुभ शब्दांनीं हनुमानाला ह्मणाला १९ "आजानुबाहु, विशालनयन आणि बाण, धनुष्य व खड्ग धारण करणाऱ्या ह्या देवकुमारतुल्य उभयतांना अवलोकन केल्यावर कोणाला बरें भय उत्पन्न होणार नाहीं? २०. वालीनें ह्या पुरुषश्रेष्ठांना पाठविलें आहे असा मला संशय येतो. कारण, राजेलोकांना पुष्कळ मित्र असतात; (तेव्हां हेही कोणी वालीचे मित्रच असतील? तस्मात्,) ह्यांच्याविषयीं विश्वास धरून राहणें योग्य नाहीं २१. कपटानें संचार करणारे शत्रु मनुष्यानें ओळखिले पाहिजेत. कारण, ते विश्वासघातकी विश्वासानें स्वस्थ राहिले-

विश्वस्तानामविश्वस्ताश्छिद्रेषु प्रहरन्त्यपि २२ कृत्येषु वाली मेधावी राजा नो बहुदर्शिनः। भवन्ति परहन्तारस्ते ज्ञेयाः प्राकृतैर्नरैः २३ तौ त्वया प्राकृतेनैव गत्वा ज्ञेयौ प्लवंगम। इङ्गितानां प्रकारैश्च रूपव्याभाषणेन च २४ लक्षयस्व तयोर्भावं प्रहृष्टमनसौ यदि। विश्वासयन्प्रशंसाभिरिङ्गितैश्च पुनः पुनः २५ ममैवाभिमुखं स्थित्वा पृच्छ त्वं हरिपुङ्गव। प्रयोजनं प्रवेशस्य वनस्यास्य धनुर्धरौ २६ शुद्धात्मानौ यदि त्वेतौ जानीहि त्वं प्लवंगम। व्याभाषितैर्वा रूपैर्वा विज्ञेया दुष्टतानयोः २७ इत्येवं कपिराजेन संदिष्टो मारुतात्मजः। चकार गमने बुद्धिं यत्र तौ रामलक्ष्मणौ २८ तथेति संपूज्य वचस्तु तस्य कपिः सुभीतस्य दुरासदस्य। महानुभावो हनुमान्ययौ तदा स यत्र रामोतिबली सलक्ष्मणः २९ [१६०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे द्वितीयः सर्गः ॥२॥

वचो विज्ञाय हनुमान्सुग्रीवस्य महात्मनः। पर्वताद्दृष्यमूकात्तु पुप्लुवे

---

त्यांचें छिद्र पाहून प्रहार करितात २२. आपले मनोरथ सिद्धीस नेण्याविषयीं वाली मोठा बुद्धिमान् आहे आणि प्रतिपक्षाला फसविण्याचे अनेक उपाय राजेलोक जाणीत असून ते संधि साधून शत्रूवर प्रहार करीत असतात. ह्यास्तव, सामान्य लोकांकडून त्यांचा पत्ता लावविला पाहिजे २३. तस्मात्, हे वानरा, उदासीन पुरुषाप्रमाणें तूं जाऊन त्यांची नानाप्रकारची हालचाल, मुद्रा आणि बोलण्याची ढब ह्यांच्या योगानें परीक्षा करून ये २४. तू त्यांच्या मनाचा कल पहा आणि तूं समीप गेल्यावर बोलण्याचालण्यांत जर त्यांचें मन संतुष्ट झालेलें तुझ्या दृष्टीं पडलें तर प्रशंसाबोधक शब्दांनीं आणि माझा अभिप्राय दर्शविणाऱ्या हावभावांनीं माझ्याविषयीं त्यांचे मनांत तूं विश्वास उत्पन्न कर २५ आणि, हे वानरश्रेष्ठा, धनुष्य धारण करून ह्या वनामध्यें प्रवेश करण्याचें प्रयोजन काय हें माझ्या संमुख उभा राहून तूं त्यांना विचार २६. हे वानरा, ह्यांचीं मनें शुद्ध आहेत कीं काय हें तूं समजून घे व हे दुष्ट असल्यास ह्यांचा दुष्टपणाही भाषणावरून अथवा आकारावरून तुला ओळखितां येईल २७ ह्याप्रमाणें वानरराज सुग्रीवानें आज्ञा केली असतां वायुपुत्र हनुमानानें त्या रामलक्ष्मणाकडे जाण्याचें मनांत आणिलें २८ आणि वालीनें गांठण्यास अशक्य परंतु अत्यंत भयभीत झालेल्या त्या सुग्रीवाच्या भाषणाला " ठीक आहे " ह्मणून मान देऊन तो महाप्रभावी हनुमान् जेथें तो अतिबलाढ्य राम लक्ष्मणासहवर्तमान होता तेथें गेला २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

यत्र राघवौ १ कपिरूपं परित्यज्य हनुमान्मारुतात्मजः । भिक्षुरूपं ततो भेजे शठबुद्धितया कपिः २ ततश्च हनुमान्वाचा श्लक्ष्णया सुमनोज्ञया । विनीतवदुपागम्य राघवौ प्रणिपत्य च ३ आबभाषे च तौ वीरौ यथावत्प्रशशंस च । संपूज्य विधिवद्वीरौ हनुमान्वानरोत्तमः ४ उवाच कामतो वाक्यं मृदु सत्यपराक्रमौ । राजर्षिदेवप्रतिमौ तापसौ संशितव्रतौ ५ देशं कथमिमं प्राप्तौ भवन्तौ वरवर्णिनौ । त्रासयन्तौ मृगगणानन्यांश्च वनचारिणः ६ पम्पातीररुहान्वृक्षान्वीक्षमाणौ समन्ततः । इमां नदीं शुभजलां शोभयन्तौ तरस्विनौ ७ धैर्यवन्तौ सुवर्णाभौ कौ युवां चीरवाससौ । निःश्वसन्तौ वरभुजौ पीडयन्ताविमाः प्रजाः ८ सिंहविप्रेक्षितौ वीरौ महाबलपराक्रमौ । शक्रचापनिभे चापे गृहीत्वा शत्रुनाशनौ ९ श्रीमन्तौ रूपसंपन्नौ वृषभश्रेष्ठविक्रमौ । हस्तिहस्तोपमभुजौ द्युतिमन्तौ नरर्षभौ १० प्रभया पर्वतेन्द्रोऽयं युवयोरवभासितः । राज्यार्हावमरप्रख्यौ कथं देशमि-

---

महात्म्या सुग्रीवानें सांगितलेलें लक्ष्यांत घेऊन हनुमान् ऋष्यमूक पर्वतापासून राघवांकडे चालता झाला १. प्रथमतः मनाला विश्वास न वाटल्यामुळें वायुपुत्र हनुमान् वानरानें वानररूपाचा त्याग करून सामान्य तापशाचें रूप धारण केलें २ आणि नम्रपणें त्या राघवांसमीप जाऊन व त्यांना प्रणिपात करून मधुर व मनोहर शब्दांनीं ३ त्या वीरांशीं भाषण करून त्यांची त्यानें यथायोग्य रीतीनें प्रशंसाही केली व ह्याप्रमाणें योग्य रीतीनें त्या वीरांची प्रशंसा केल्यावर तो वानरश्रेष्ठ हनुमान् ४ त्या सत्यपराक्रमी रामलक्ष्मणांना मृदु शब्दांनीं आपल्या इच्छेनें विचारू लागला. ( तो ह्मणाला ) " निर्मल तपश्चर्या करणारे तुह्मी तपस्वी राजर्षी अथवा देव ह्याप्रमाणें दिसत आहां ५. तेव्हां तुह्मी श्रेष्ठ ब्रह्मचारी ह्या प्रदेशावर कशाकरितां आलां ? तुमच्यामुळें मृगगणांना आणि वनांत संचार करणाऱ्या इतरही प्राण्यांना त्रास होत आहे ६. पंपेच्या तीरावरील वृक्षांकडे तुह्मी ( कांहीं वस्तु शोधण्याच्या उद्देशानें ) चोहोंकडून निरखून पहात आहांत व शुभ जलांनीं युक्त असलेल्या ह्या नदीला तुह्मी शोभा आणीत आहांत. तस्मात् बलवान् ७, धैर्यवान्, सुवर्णासारख्या कांतीनें युक्त आणि वल्कलें परिधान केलेले असे तुह्मी कोण आजानुबाहु दुःखाचे सुस्कार टाकीत आहांत आणि आपल्या मुद्रेनें ह्या वनसंबंधीं प्रजाजनांना पीडा देत आहांत ? ८. तुमची मुद्रा सिंहासारिखी दिसत असून तुह्मी महाबलाढ्य व महापराक्रमी वीर आहांत आणि तुह्मी इंद्रधनुष्यासारिखीं धनुष्यें घेतलीं असल्यामुळें शत्रूचा वध करण्याचा तुमचा उद्देश दिसत आहे ९. तुह्मी श्रीमान् व रूपवान् असून तुमची चालण्याची ढब उत्कृष्ट बैलाप्रमाणें आहे व

हागतौ ११ पद्मपत्रेक्षणौ वीरौ जटामण्डलधारिणौ । अन्योन्यसदृशौ वीरौ देवलोकादिहागतौ १२ यदृच्छयेव संप्राप्तौ चन्द्रसूर्यौ वसुंधराम् । विशालवक्षसौ वीरौ मानुषौ देवरूपिणौ १३ सिंहस्कन्धौ महोत्साहौ समदाविव गोवृषौ । आयताश्च सुवृत्ताश्च बाहवः परिघोपमाः १४ सर्वभूषणभूषार्हाः किमर्थं न विभूषिताः । उभौ योग्यावहं मन्ये रक्षितुं पृथिवीमिमाम् १५ ससागरवनां कृत्स्नां विन्ध्यमेरुविभूषिताम् । इमे च धनुषी चित्रे श्लक्ष्णे चित्रानुलेपने १६ प्रकाशेते यथेन्द्रस्य वज्रे हेमविभूषिते । संपूर्णाश्च शितैर्बाणैस्तूणाश्च शुभदर्शनाः १७ जीवितान्तकरैर्घोरैर्ज्वलद्भिरिव पन्नगैः । महाप्रमाणौ विपुलौ तप्तहाटकभूषणौ १८ खड्गावेतौ विराजेते निर्मुक्तभुजगाविव । एवं मां परिभाषन्तं कस्माद्वै नाभिभाषथः १९ सुग्रीवो नाम धर्मात्मा कश्चिद्वानरपुङ्गवः । वीरो विनिकृतो भ्रात्रा जग-

---

तुमचे बाहू गजशुंडप्रमाणें असून तुह्मी पुरुषश्रेष्ठ तेजस्वी आहांत १०. हा पर्वतराजही तुमच्या प्रभेनें झळकूं लागला आहे. तेव्हां राज्यालाच पात्र असलेले तुह्मी देवतुल्य ह्या प्रदेशाला कसे आलां ? ११. तुमचे नेत्र कमलपत्राप्रमाणें विशाल असून तुह्मीं वीरांनीं जटामंडल धारण केलें आहे व तुह्मी उभयतांही वीर एकमेकांसारिखे असून देवलोकापासून येथें आलां आहां ( असें मला वाटत आहे ) १२. पृथ्वीवर तुह्मी चंद्रसूर्य सहज आलां आहांत असें मला वाटत आहे आणि विशाल वक्षस्थलांनीं युक्त असलेले तुह्मी वीर जरी मनुष्य आहांत तरी तुमचें रूप देवांप्रमाणें आहे १३. तुमचे स्कंध सिंहासारिखे असून तुह्मी आनंदित झालेल्या तरुण वृषभांप्रमाणें मोठे उत्साही दिसत आहांत व अडसराप्रमाणें असलेले तुमचे बाहू अत्यंत वर्तुल व दीर्घ असून १४ सर्व अलंकार धारण करण्यास योग्य आहेत. परंतु ते तुह्मी कशाकरितां भूषित केले नाहींत ? विंध्य, मेरु इत्यादि पर्वतांनीं विभूषित असून सागर व वनें ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या संपूर्ण पृथ्वीचें रक्षण करण्यास तुह्मी उभयतां योग्य आहांत असें मला वाटतें. चित्रविचित्र शिडकाव टाकिलेलीं हीं तुमचीं लकलकीत अद्भुत धनुष्यें १५, १६ इंद्राचीं सुवर्णभूषित वज्रेच कीं काय अशीं दिसत आहेत. शुभ आकारानें युक्त असलेले तुमचे भाते, दंश करण्यास उद्युक्त झालेल्या सर्पांप्रमाणें प्राणनाशक अशा, भयंकर व तीक्ष्ण बाणांनीं भरलेले आहेत. प्रमाणानें मोठे, रुंद व सुवर्णभूषणांनीं युक्त १७, १८ असे हे खड्ग कात टाकिलेल्या सर्पांप्रमाणें झळकत आहेत. अरे, मी ह्याप्रमाणें तुमच्याशीं बोलत असतांना तुह्मीं माझ्याशीं कां भाषण करीत नाहीं ? १९. सुग्रीव ह्मणून कोणी एक धर्मात्मा व वीर वानरश्रेष्ठ आहे

भ्रमति दुःखितः २० प्राप्तोऽहं प्रेषितस्तेन सुग्रीवेण महात्मना । राज्ञा वानरमुख्यानां हनुमान्नाम वानरः २१ युवाभ्यां स हि धर्मात्मा सुग्रीवः सख्यमिच्छति । तस्य मां सचिवं वित्तं वानरं पवनात्मजम् २२ भिक्षुरूपप्रतिच्छन्नं सुग्रीवप्रियकारणात् । ऋष्यमूकादिह प्राप्तं कामगं कामचारिणम् २३ एवमुक्त्वा तु हनुमांस्तौ वीरौ रामलक्ष्मणौ । वाक्यज्ञो वाक्यकुशलः पुनर्नोवाच किंचन २४ एतच्छ्रुत्वा वचस्तस्य रामो लक्ष्मणमब्रवीत् । प्रहृष्टवदनः श्रीमान्भ्रातरं पार्श्वतः स्थितम् २५ सचिवोऽयं कपीन्द्रस्य सुग्रीवस्य महात्मनः । तमेव काङ्क्षमाणस्य ममान्तिकमिहागतः २६ तमभ्यभाष सौमित्रे सुग्रीवसचिवं कपिम् । वाक्यज्ञं मधुरैर्वाक्यैः स्नेहयुक्तमरिंदमम् २७ नानृग्वेदविनीतस्य नायजुर्वेदधारिणः । नासामवेदविदुषः शक्यमेवं विभाषितुम् २८ नूनं व्याकरणं कृत्स्नमनेन बहुधा श्रुतम् । बहु व्याहरतानेन न किंचिदपशब्दितम् २९ न मुखे नेत्रयोश्चापि ललाटे च भ्रुवोस्तथा । अन्येष्वपि च सर्वेषु दोषः संविदितः क्वचित् ३० अवि-

आणि त्याला भ्रात्यानें हांकून लाविलें असल्यामुळें तो दुःखित असा जगतावर भ्रमण करीत आहे २०. त्या वानरश्रेष्ठाधिपति महात्म्या सुग्रीवानें पाठविल्यावरून मी हनुमान् नामक वानर येथें आलों आहें २१. तो धर्मात्मा सुग्रीव तुह्मांसहवर्तमान सख्य करण्याची इच्छा करीत असून मी वायुपुत्र वानर त्याचा मंत्री आहें असें तुह्मी समजा २२. सुग्रीवाचें प्रिय करण्याकरितां मीं तापसरूप धारण केलें आहे व मी इच्छेस येईल त्याप्रमाणें वागणारा व मनास वाटेल तिकडे जाणारा ऋष्यमूक पर्वतापासून येथें आलों आहें" २३. ह्याप्रमाणें त्या वीर रामलक्ष्मणांना सांगितल्यानंतर बोलण्यामध्यें कुशल असलेला तो संभाषणज्ञ हनुमान् पुनरपि कांहीं एक बोलला नाहीं २४. तेव्हां हें त्याचें भाषण श्रवण करून आनंदित मुद्रेनें युक्त झालेला वैभवशाली राम समीपच असलेल्या भ्रात्या लक्ष्मणाला ह्मणाला २५ "हा वानरराज महात्म्या सुग्रीवाचा मंत्री त्याच्याचकरितां येथें माझ्यासमीप आला आहे २६ ह्याकरितां, हे लक्ष्मणा, प्रेमयुक्त, शत्रूंचें दमन करणारा आणि संभाषणज्ञ अशा त्या सुग्रीवमंत्री वानराशीं मधुर शब्दांनीं तूं कांहीं तरी बोल २७. ज्यानें ऋग्वेदाचा अभ्यास केलेला नाहीं, ज्यानें यजुर्वेद धारण केलेला नाहीं आणि जो सामवेद जाणीत नाहीं त्याला असें भाषण करितां येणें शक्य नाहीं २८. खरोखर संपूर्ण व्याकरण ह्यानें अनेक वेळां ऐकिलेलें आहे. कारण, हा जरी पुष्कळ बोलत होता तरी कांहींही अशुद्ध ह्याच्या तोंडांतून निघालेलें नाहीं २९. मुख, नेत्र, ललाट, भिंवया आणि

स्तरमसंदिग्धमविलम्बितमव्यथम् । उरस्थं कण्ठगं वाक्यं वर्तते मध्यमस्वरम् ३१ संस्कारक्रमसंपन्नामद्भुतामविलम्बिताम् । उच्चारयति कल्याणीं वाचं हृदयहर्षिणीम् ३२ अनया चित्रया वाचा त्रिस्थानव्यञ्जनस्थया । कस्य नाराध्यते चित्तमुद्यतासेररेरपि ३३ एवंविधो यस्य दूतो न भवेत्पार्थिवस्य तु । सिद्ध्यन्ति हि कथं तस्य कार्याणां गतयोऽनघ ३४ एवंगुणगणैर्युक्ता यस्य स्युः कार्यसाधकाः । तस्य सिद्ध्यन्ति सर्वेऽर्था दूतवाक्यप्रचोदिताः ३५ एवमुक्तस्तु सौमित्रिः सुग्रीवसचिवं कपिम् । अभ्यभाषत वाक्यज्ञो वाक्यज्ञं पवनात्मजम् ३६ विदिता नौ गुणा विद्वन्सुग्रीवस्य महात्मनः । तमेव चावां मार्गावः सुग्रीवं प्लवगेश्वरम् ३७ यथा ब्रवीषि हनुमन्सुग्रीववचनादिह । तत्तथा हि करिष्यावो वचनात्तव सत्तम ३८ तत्तस्य वाक्यं निपुणं निशम्य प्रहृष्टरूपः पवनात्मजः कपिः । मनः समा-

---

इतरही सर्व अवयव ह्यांपैकीं कोठेंही ह्याचे ठिकाणीं दोष दृष्टोत्पत्तीस आला नाहीं ३०. ह्याच्या भाषणांत उगीच पाल्हाळ नाहीं, तें संदिग्ध नाहीं, अस्खलित आहे, ऐकणाऱ्याला कंटाळा आणण्यासारिखें नाहीं आणि मनामध्यें उत्कृष्ट रीतीनें येऊन नंतर कंठविवरापासून तें श्रोत्यांच्या कानावर पडत असल्यामुळें त्याचा उच्चार मध्यम स्वरानें होत आहे ३१. सारांश, त्या त्या वर्णाचे संस्कार क्रमानें अंतःकरणावर ठसविण्यास समर्थ, त्वरारहित, विलंबशून्य आणि ह्मणूनच हृदयाला आनंद देणारी अशी शुभ वाणी हा उच्चारीत आहे ३२. ऊर, कंठ आणि शिर ह्या तीनही ठिकाणीं अभिव्यक्त होणाऱ्या ह्याच्या ह्या अद्भुत वाणीनें खड्ग उपसून तयार असलेला शत्रु जरी झाला तरी कोणाचें बरें चित्त अनुकूल होणार नाहीं ३३. हे निष्पापा, ह्या प्रकारचा दूत ज्या राजापाशीं नसेल त्याचीं कृत्यें सिद्धीस कशीं जाणार ? ३४. ह्या प्रकारच्या गुणसमुदायांनीं युक्त असलेले कार्यसाधक ज्याच्यापाशीं असतील त्याचे दूतांच्या भाषणानें बोधित केलेले सर्वही मनोरथ सिद्धीस जातील " ३५. ह्याप्रमाणें रामानें सुमित्रापुत्र लक्ष्मणाला सांगितलें असतां संभाषण करण्यामध्यें कुशल असलेल्या त्या वायुपुत्र सुग्रीवमंत्री वानराला तो संभाषणज्ञ लक्ष्मण ह्मणाला ३६ " हे ज्ञानसंपन्न महात्म्या, सुग्रीवाचे गुण आह्मांला माहीत आहेत व त्या वानरराज सुग्रीवालाच आह्मी शोधीत आहोंत ३७ तस्मात्, हे सज्जनश्रेष्ठ हनुमाना, सुग्रीवाच्या आज्ञेवरून जसें तूं आह्मांला सांगशील तसें आह्मी तुझ्या सांगण्याप्रमाणें करूं " ३८. तें त्या लक्ष्मणाचें भाषण पूर्णपणें श्रवण केल्यावर तो वायुपुत्र आनंदित झाला आणि सुग्रीवाचा विचार मनामध्यें आणून त्या रामलक्ष्मणापाशीं सख्य

धाय जयापरत्तौ सख्यं तदा कर्तुमियेष ताभ्याम् ३९ [१९९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे तृतीयः सर्गः ॥३॥

ततः प्रहृष्टो हनुमान्कृत्यवानिति तद्वचः । श्रुत्वा मधुरभावं च सुग्रीवं मनसा गतः १ भाव्यो राज्यागमस्तस्य सुग्रीवस्य महात्मनः । यदयं कृत्यवान्प्राप्तः कृत्यं चैतदुपागतम् २ ततः परमसंहृष्टो हनूमान्प्लवगोत्तमः । प्रत्युवाच ततो वाक्यं रामं वाक्यविशारदम् ३ किमर्थं च वनं घोरं पम्पाकाननमण्डितम् । आगतः सानुजो दुर्गं नानाव्यालमृगायुतम् ४ तस्य तद्वचनं श्रुत्वा लक्ष्मणो रामचोदितः । आचचक्षे महात्मानं रामं दशरथात्मजम् ५ राजा दशरथो नाम द्युतिमान्धर्मवत्सलः । चातुर्वर्ण्यं स्वधर्मेण नित्यमेवाभिपालयन् ६ न द्वेष्टा विद्यते तस्य स तु द्वेष्टि न कंचन । स तु सर्वेषु भूतेषु पितामह इवापरः ७ अग्निष्टोमादिभिर्यज्ञैरिष्टवानाप्तदक्षिणैः । तस्यायं पूर्वजः पुत्रो रामो नाम जनैः श्रुतः ८ शरण्यः सर्वभूतानां पितुर्निर्देशपारगः । ज्येष्ठो दशरथस्यायं पुत्राणां

---

करण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडांपैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

तदनंतर सुग्रीवासंबंधानें रामाचें सौम्य भाषण श्रवण करून व सुग्रीवाशीं रामाचें कांहीं कार्य आहे असें जाणून सुग्रीवाचा मनोरथ आतां परिपूर्ण होईल असें मनामध्यें आल्यामुळें हनुमानाला हर्ष झाला आणि तो मनामध्यें ह्मणाला १ "त्या महात्म्या सुग्रीवाला राज्यप्राप्ति अवश्य होणार. कारण, हा (महापुरुष कांहीं कार्याच्या उद्देशानें येथें आला आहे" २. तदनंतर अत्यंत हर्षयुक्त झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् संभाषण करण्यामध्यें निपुण असलेल्या रामाला फिरून ह्मणाला ३ "पंपेच्या तीरावरील वनांनीं भूषित असून नानाप्रकारच्या श्वापदांनीं व मृगांनीं युक्त असल्यामुळें दुर्गम झालेल्या ह्या घोर वनामध्यें कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान आपण कशाकरितां आलां?" ४. हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर रामानें सांगितल्यावरून लक्ष्मणानें दशरथपुत्र महात्म्या रामाविषयीं त्याला हकीकत सांगितली ५. (तो ह्मणाला) "दशरथ ह्मणून एक तेजस्वी व धर्मवत्सल राजा होऊन गेला. तो नेहमीं स्वधर्मानें चारी वर्णांचें सर्वप्रकारें परिपालन करीत असे ६. त्याचा द्वेष करणारा कोणीही नव्हता व तोही कोणाचा द्वेष करीत नसे आणि पालक ह्या नात्यानें सर्व प्राण्यांना तो दुसरा ब्रह्मदेवच कीं काय असें वाटत असे ७. योग्य दक्षिणांनीं युक्त असे अग्निष्टोमप्रभृति क्रतु त्यानें केले होते. त्याचा हा ज्येष्ठ पुत्र राम ह्मणून लोकांमध्यें

गुणवत्तरः ९ राजलक्षणसंयुक्तः संयुक्तो राज्यसंपदा । राज्याद्भ्रष्टो मया वस्तुं वने मार्थमिहागतः १० भार्यया च महाभाग सीतयानुगतो वशी। दिनक्षये महातेजाः प्रभयेव दिवाकरः ११ अहमस्यावरो भ्राता गुणैर्दास्यमुपागतः । कृतज्ञस्य बहुज्ञस्य लक्ष्मणो नाम नामतः १२ सुखार्हस्य महार्हस्य सर्वभूतहितात्मनः । ऐश्वर्येण विहीनस्य वनवासे रतस्य च १३ रक्षसापहृता भार्या रहिते कामरूपिणा । तच्च न ज्ञायते रक्षः पत्नी येनास्य वा हृता १४ दनुर्नाम दितेः पुत्रः शापाद्राक्षसतां गतः । आख्यातस्तेन सुग्रीवः समर्थो वानराधिपः १५ स ज्ञास्यति महावीर्यस्तव भार्यापहारिणम् । एवमुक्त्वा दनुः स्वर्गं भ्राजमानो दिवं गतः १६ एतत्ते सर्वमाख्यातं याथातथ्येन पृच्छतः । अहं चैव च रामश्च सुग्रीवं शरणं गतौ १७ एष दत्त्वा च वित्तानि प्राप्य चानुत्तमं यशः । लोकनाथः

---

प्रसिद्ध आहे ८. हा दशरथाचा ज्येष्ठ पुत्र इतर पुत्रांपेक्षां गुणांनीं श्रेष्ठ असून पित्याची आज्ञा पार पाडणारा आहे आणि प्राणिमात्रांनीं आश्रय करण्यास योग्य आहे ९. राजचिन्हांनीं हा युक्त असून राज्यवैभवानेंही हा युक्त असतांना राज्यापासून च्युत होऊन वनामध्यें वास्तव्य करण्याकरितां माझ्यासहवर्तमान येथें आला आहे १० आणि, हे महाभाग्यवान् हनुमाना, सायंकालीं महातेजस्वी सूर्याचे मागोमाग ज्याप्रमाणें प्रभा जाते त्याप्रमाणें ह्या जितेंद्रिय रामाचे मागोमाग त्याची भार्या सीता अरण्यांत चालती झाली ११. मी ह्याचा कनिष्ठ भ्राता असून ह्याच्या गुणांमुळें ह्या कृतज्ञ व सर्वज्ञ रामाचा दास बनलों आहें व लक्ष्मण ह्या नांवानें मी प्रसिद्ध आहें १२. सुखोपभोग घेण्यासच पात्र, महायोग्य, प्राणिमात्रांच्या हिताविषयींच मनाची प्रवृत्ति असलेल्या आणि ऐश्वर्यहीन झाल्यामुळें वनवासच रुचत असलेल्या ह्या रामाची १३ भार्या आह्मी जवळ नसतांना राक्षसानें हरण करून नेली आणि ज्यानें ह्याची पत्नी हरण करून नेली त्या राक्षसाचा पत्ताही लागत नाहीं १४. दनु ह्मणून एक दितीचा पुत्र शापामुळें राक्षस बनलेला होता; त्यानें वानरराज सुग्रीव समर्थ आहे ह्मणून सांगितलें १५ आणि " तो महावीर्यवान् सुग्रीव तुझ्या भार्येचा अपहार करणाऱ्याचा शोध लावील " असें सांगून तेजानें झळकत असलेला तो दनु स्वर्गास जाण्याकरितां आकाशमार्गानें निघून गेला १६. तूं प्रश्न केल्यावरून हें सर्व इत्थंभूत वर्तमान तुला मीं कळविलें आहे आणि मी व राम असे उभयतां सुग्रीवाला शरण आलों आहोंत १७. ह्या रामानें पूर्वीं ब्राह्मणांना द्रव्यदान करून उत्कृष्ट कीर्ति संपादन केलेली आहे आणि पूर्वीं हा लोकांचा नाथही झालेला

पुरा भूत्वा सुग्रीवं नाथमिच्छति १८ सीता यस्य स्नुषा चासीच्छरण्यो धर्मवत्सलः। तस्य पुत्रः शरण्यस्य सुग्रीवं शरणं गतः १९ सर्वलोकस्य धर्मात्मा शरण्यः शरणं पुरा। गुरुर्मे राघवः सोयं सुग्रीवं शरणं गतः २० यस्य प्रसादे सततं प्रसीदेयुरिमाः प्रजाः। स रामो वानरेन्द्रस्य प्रसादमभिकाङ्क्षते २१ येन सर्वगुणोपेताः पृथिव्यां सर्वपार्थिवाः। मानिताः सततं राज्ञा सदा दशरथेन वै २२ तस्यायं पूर्वजः पुत्रस्त्रिषु लोकेषु विश्रुतः। सुग्रीवं वानरेन्द्रं तु रामः शरणमागतः २३ शोकाभिभूते रामे तु शोकार्ते शरणं गते। कर्तुमर्हति सुग्रीवः प्रसादं सह यूथपैः २४ एवं ब्रुवाणं सौमित्रिं करुणं साश्रुपातनम्। हनूमान्प्रत्युवाचेदं वाक्यं वाक्यविशारदः २५ ईदृशा बुद्धिसंपन्ना जितक्रोधा जितेन्द्रियाः। द्रष्टव्या वानरेन्द्रेण दिष्ट्या दर्शनमागताः २६ स हि राज्याच्च विभ्रष्टः कृतवैरश्च वालिना। हृतदारो वने त्रस्तो भ्रात्रा विनिकृतो भृशम् २७ करिष्यति स साहाय्यं युवयोर्भास्करात्मजः। सुग्रीवः सह चास्माभिः सीतायाः

---

आहे. तथापि (दैवगतीमुळें) सुग्रीव आपला नाथ असावा अशी ह्याला इच्छा झाली आहे १८. सीता ज्याची स्नुषा होती त्या शरण जाण्यास योग्य असलेल्या दशरथाचा धर्मवत्सल व इतरांनीं शरण जाण्यास योग्य असा पुत्र राम सुग्रीवाला शरण गेला आहे १९. जो माझा गुरु धर्मात्मा राघव सर्व लोकांनीं शरण जाण्यास पूर्वी योग्य होता तो आज सुग्रीवाला शरण गेला आहे २०. ज्याच्या प्रसादामुळें नेहमीं ह्या प्रजा संतुष्ट रहावयाच्या तो राम वानरराजाच्या कृपेची आज इच्छा करीत आहे २१. पृथ्वींतील सर्वगुणसपन्न अशा संपूर्ण राजांना ज्या दशरथराजानें नेहमीं मान दिला २२ त्याचा हा त्रैलोक्यविख्यात ज्येष्ठ पुत्र राम आज वानरराज सुग्रीवाला शरण आला आहे २३. सारांश, शोकग्रस्त झालेला राम अगदीं शोकाच्या अधीन होऊन जर शरण आला आहे तर सुग्रीवानें आपल्या सेनापालकासहवर्तमान त्याच्यावर कृपा करणेंच योग्य आहे" २४. ह्याप्रमाणें अश्रु ढाळीत ढाळीत सुमित्रापुत्र लक्ष्मण हृदयद्रावक भाषण करीत असतांना संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला हनुमान् त्याला ह्मणाला २५ "अशाप्रकारचे बुद्धिमान्, जितेंद्रिय, क्रोध जिंकलेले आणि वानरराजानें भेट घेण्यास योग्य अशांचें दर्शन झालें ही सुदैवाचीच गोष्ट आहे २६. तो सुग्रीव भ्रात्या वालीशीं वैर बांधून असल्यामुळें राज्यापासून भ्रष्ट झालेला आहे व स्त्रीचा अपहार करून भ्रात्यानें त्याला अत्यंत दुःख दिलें असल्यामुळें तो आतां त्रस्त होऊन वनामध्यें वास्तव्य करीत आहे २७. तस्मात्, तो सूर्यपुत्र सुग्रीव सीतेच्या

परिमार्गणे २८ इत्येवमुक्त्वा हनुमाञ्श्लक्ष्णं मधुरया गिरा । बभाषे साधु गच्छामः सुग्रीवमिति राघवम् २९ एवं ब्रुवन्तं धर्मात्मा हनूमन्तं स लक्ष्मणः । प्रतिपूज्य यथान्यायमिदं प्रोवाच राघवम् ३० कपिः कथयते हृष्टो यथायं मारुतात्मजः । कृत्यवान्सोपि संप्राप्तः कृतकृत्योसि राघव ३१ प्रसन्नमुखवर्णश्च व्यक्तं हृष्टश्च भाषते । नानृतं वक्ष्यते वीरो हनूमान्मारुतात्मजः ३२ ततः स सुमहाप्राज्ञो हनूमान्मारुतात्मजः । जगामादाय तौ वीरौ हरिराजाय राघवौ ३३ भिक्षुरूपं परित्यज्य वानरं रूपमास्थितः। पृष्ठमारोप्य तौ वीरौ जगाम कपिकुञ्जरः ३४ स तु विपुलयशाः कपिप्रवीरः पवनसुतः कृतकृत्यवत्प्रहृष्टः। गिरिवरमुरुविक्रमः प्रयातः स शुभमतिः सह रामलक्ष्मणाभ्याम् ३५ [ २३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुर्थः सर्गः॥४॥

ऋष्यमूकात्तु हनुमान्गत्वा तं मलयं गिरिम् । आचचक्षे तदा वीरौ

---

शोधासंबंधानें आह्मांसहवर्तमान तुमचें साहाय्य करील " २८. ह्याप्रमाणें मधुर शब्दांनीं लक्ष्मणाशीं चित्तवेधक भाषण केल्यावर " फार उत्तम आहे, आपण सुग्रीवाकडे जाऊं " असें हनुमान् रामाला ह्मणाला २९. तेव्हां, हनुमान् ह्याप्रमाणें बोलत असतांना तो धर्मात्मा लक्ष्मण हनुमानाच्या भाषणाला योग्य रीतीनें मान देऊन रघुवंशज रामाला ह्मणाला ३० " हे रघुवंशजा रामा, हा वायुपुत्र वानर आनंदित होऊन सांगत आहे त्याप्रमाणें त्या सुग्रीवाचेंही कार्य व्हावयाचें आहे ह्यामुळें आपलें कार्य झाल्यासारिखेंच आहे ३१. ह्याचा चेहरा प्रसन्न दिसत असून हा आनंदानें स्पष्ट भाषण करीत आहे ह्यावरून हा वायुपुत्र वीर हनुमान् अनृत भाषण करणार नाहीं ( असा अदमासें दिसतो ) " ३२. ह्याप्रमाणें रामाला लक्ष्मणानें सांगितलें असतां तो महाबुद्धिवान् वायुपुत्र हनुमान् त्या रघुवंशज वीरांना बरोबर घेऊन वानरराजाकडे गेला ३३. सारांश, भिक्षुरूपाचा त्याग करून हनुमानानें वानररूप धारण केलें आणि त्या उभयतां वीरांना आपल्या पाठीवर घेऊन तो श्रेष्ठ कपि सुग्रीवाकडे चालता झाला ३४. तात्पर्य, महाकीर्तिमान्, कार्यसिद्धि झालेल्या पुरुषाप्रमाणें आनंदित, महापराक्रमी आणि बुद्धीनें चांगला असा तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान् रामलक्ष्मणांसहवर्तमान ऋष्यमूकनामक श्रेष्ठ पर्वतावर चालता झाला ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चौथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

हनुमान् ऋष्यमूक पर्वतावर त्या रामलक्ष्मणांना ठेवून तेथून त्या मलयपर्वतावर

कपिराजाय राघवौ १ अयं रामो महाप्राज्ञ संप्राप्तो दृढविक्रम । लक्ष्म-
णेन सह भ्रात्रा रामोयं सत्यविक्रमः २ इक्ष्वाकूणां कुले जातो रामो
दशरथात्मजः । धर्मे निगदितश्चैव पितुर्निर्देशकारकः ३ राजसूयाश्वमे-
धैश्च वह्निर्येनाभितर्पितः । दक्षिणाश्च तथोत्सृष्टा गावः शतसहस्रशः ४
तपसा सत्यवाक्येन वसुधा तेन पालिता । स्त्रीहेतोस्तस्य पुत्रोयं रामोरण्यं
समागतः ५ तस्यास्य वसतोरण्ये नियतस्य महात्मनः । रावणेन हृता भार्या
स त्वां शरणमागतः ६ भवता सख्यकामौ तौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । प्रगृह्य
चार्चयस्वैतौ पूजनीयतमावुभौ ७ श्रुत्वा हनूमतो वाक्यं सुग्रीवो वानरा-
धिपः । दर्शनीयतमो भूत्वा प्रीत्योवाच च राघवम् ८ भवान्धर्मविनी-
तश्च सुतपाः सर्ववत्सलः । आख्याता वायुपुत्रेण तत्त्वतो मे भवद्गुणाः ९
तन्ममैवैष सत्कारो लाभश्चैवोत्तमः प्रभो । यत्त्वमिच्छसि सौहार्दं वान-
रेण मया सह १० रोचते यदि मे सख्यं बाहुरेष प्रसारितः । गृह्यतां

---

गेला आणि त्यानें वानरराज सुग्रीवाला त्या वीर रघुवंशज रामलक्ष्मणांविषयीं हकी-
कत निवेदन केली १. ( तो ह्मणाला ) " हे महाबुद्धिमान्, हे महापराक्रमी, हा
राम भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान येथें आला आहे व हा सत्यपराक्रमी आहे २. इक्ष्वा-
कुवंशजांच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या ह्या दशरथपुत्र रामाला स्वसत्यपरिपालनरूप
धर्माविषयीं पित्याची प्रेरणा झाली आहे आणि ह्मणूनच हा त्या आपल्या पित्याची
आज्ञा शवटास नेण्यास उद्युक्त झाला आहे ३. राजसूय आणि अश्वमेध ह्या यागांनीं
ज्यानें अग्नि संतुष्ट केला, त्याचप्रमाणें शेंकडों हजारों गाई ज्यानें दक्षिणा ह्मणून
दिल्या ४ आणि ज्यानें तपाचें व सत्यभाषणाचें अवलंबन करून पृथ्वीचें परिपालन
केलें त्या दशरथाच्या स्त्रीकरितां हा राम अरण्यामध्यें आला आहे ५. ( इतकेंच
नव्हे परंतु, ) तो हा महात्मा जितेंद्रिय राम अरण्यामध्यें वास्तव्य करीत असतांना
रावणानें ह्याची भार्या हरण करून नेली आहे आणि ह्यामुळें हा तुला शरण आला
आहे ६. तस्मात्, ज्याअर्थीं ते भ्राते रामलक्ष्मण तुझ्याशीं सख्य करण्याची इच्छा
करीत आहेत त्याअर्थीं तूं ह्यांची भेट घेऊन अत्यंत पूज्य अशा ह्या उभयतांचें पूजन
कर " ७. हें हनूमानाचें भाषण श्रवण केल्यावर वानरराज सुग्रीव ( केवल इच्छे-
च्याच जोरानें ) अत्यंत दर्शनीय बनून प्रेमानें रामाला ह्मणाला ८ " आपण धर्मसं-
बंधानें सुशिक्षित असून महातपस्वी व सर्वांवर दया करणारे आहांत आणि वायुपुत्र
हनूमानानें मला आपले गुण खऱ्या रीतीनें कथन केले आहेत ९. तस्मात्, मज वान-
राशीं ज्याअर्थीं आपण मैत्री जोडण्याची इच्छा करीत आहांत त्याअर्थीं, हे प्रभो,

पाणिना पाणिर्मर्यादा बध्यतां ध्रुवा ११ एतत्तु वचनं श्रुत्वा सुग्रीवस्य सुभाषितम् । संप्रहृष्टमना हस्तं पीडयामास पाणिना १२ हृद्यः सौहृदमालम्ब्य पर्यष्वजत पीडितम् १३ ततो हनूमान्संत्यज्य भिक्षुरूपमरिन्दमः । काष्ठयोः स्वेन रूपेण जनयामास पावकम् १४ दीप्यमानं ततो वह्निं पुष्पैरभ्यर्च्य सत्कृतम् । तयोर्मध्ये तु सुप्रीतो निदधौ सुसमाहितः १५ ततोऽग्निं दीप्यमानं तौ चक्रतुश्च प्रदक्षिणम् । सुग्रीवो राघवश्चैव वयस्यत्वमुपागतौ १६ ततः सुप्रीतमनसौ तावुभौ हरिराघवौ । अन्योन्यमभिवीक्षन्तौ न तृप्तिमभिजग्मतुः १७ त्वं वयस्योऽसि हृद्यो मे एकं दुःखं सुखं च नौ । सुग्रीवो राघवं वाक्यमित्युवाच प्रहृष्टवत् १८ ततः सुपर्णबहुलां भङ्क्त्वा शाखां सुपुष्पिताम् । सालस्यास्तीर्य सुग्रीवो निषसाद सराघवः १९ लक्ष्मणायाथ संहृष्टो हनुमान्मारुतात्मजः । शाखां

---

माझा हा सत्कार झालेला असून मला मोठा लाभच झालेला आहे १०. ह्याकरितां माझ्याशीं सख्य होणें जर आपणाला बरें वाटत असेल तर हा हात पुढें केला आहे; आपल्या हातानें हा माझा हात धरा आणि एकमेकांचें कार्य संपादन करण्याविषयीं कधींही न फिरणाऱ्या अशा निश्चयाची विचारपूर्वक प्रतिज्ञा होऊं द्या " ११. हें सुग्रीवानें उत्कृष्ट रीतीनें झालेलें भाषण श्रवण केल्यावर राम मनामध्यें अतिशय आनंदित झाला आणि आपल्या हातानें त्यानें त्याचा हात घट्ट धरिला १२ आणि आनंदित झालेल्या त्या रामानें प्रेमाचें अवलंबन करून त्याला गाढ आलिंगन दिलें १३. तदनंतर सुग्रीवाकडे जातेवेळीं पुनरपि धारण केलेल्या भिक्षुरूपाचा त्याग करून आग आपलें स्वतःचें रूप धारण करून शत्रु दमन करणाऱ्या हनुमानानें दोन काष्ठांपासून अग्नि उत्पन्न केला १४. आणि त्या देदीप्यमान अग्नीचें सत्कारपूर्वक पुष्पांनीं पूजन केल्यावर मनामध्यें अतिशय स्वस्थ असलेल्या व अत्यंत आनंदित झालेल्या त्या हनूमानानें राम आणि सुग्रीव ह्या दोघांच्यामध्यें त्या अग्नीची स्थापना केली १५. तदनंतर देदीप्यमान अग्नीला त्या उभयतांनीं प्रदक्षिणा केली आणि सुग्रीव व राम ह्यांनीं अशा रीतीनें एकमेकाची मैत्री संपादन केली १६. तें उभयतां राम व सुग्रीव मनामध्यें अत्यंत प्रसन्न झाले आणि एकमेकांकडे एकसारिखे पाहूं लागले; तथापि, त्यांची ( परस्परदर्शनाविषयीं ) तृप्ति झाली नाहीं १७. " माझ्या अंतःकरणाला प्रिय असा तूं माझा मित्र आहेस व आपलें उभयतांचें सुखदुःख एकच आहे " असें सुग्रीव स्वतः आनंदित झाल्यासारिखें दर्शवून रामाला ह्मणाला १८. आणि नंतर पक्ष्यांनीं गजबजलेली व अत्यंत प्रफुल्लित अशी एक साल

चन्दनवृक्षस्य ददौ परमपुष्पिताम् २० ततः प्रहृष्टः सुग्रीवः श्लक्ष्णं मधुरया गिरा । प्रत्युवाच तदा रामं हर्षव्याकुललोचनः २१ अहं विनिकृतो राम चरामीह भयार्दितः । हृतभार्यो वने त्रस्तो दुर्गमेतदुपाश्रितः २२ सोऽहं त्रस्तो वने भीतो वसाम्युद्भ्रान्तचेतनः । वालिना निकृतो भ्रात्रा कृतवैरश्च राघव २३ वालिनो मे महाभाग भयार्तस्याभयं कुरु । कर्तुमर्हसि काकुत्स्थ भयं मे न भवेद्यथा २४ एवमुक्तस्तु तेजस्वी धर्मज्ञो धर्मवत्सलः । प्रत्यभाषत काकुत्स्थः सुग्रीवं प्रहसन्निव २५ उपकारफलं मित्रं विदितं मे महाकपे । वालिनं तं वधिष्यामि तव भार्यापहारिणम् २६ अमोघाः सूर्यसंकाशा ममेमे निचिताः शराः । तस्मिन्वालिनि दुर्वृत्ते निपतिष्यन्ति वेगिताः २७ कङ्कपत्रप्रतिच्छन्ना महेन्द्राशनिसंनिभाः । तीक्ष्णाग्रा ऋजुपर्वाणः सरोषा भुजगा इव २८ तमद्य वालिनं पश्य तीक्ष्णैराशीविषोपमैः । शरैर्विनिहतं भूमौ प्रकीर्णमिव पर्व-

---

वृक्षाची शाखा तोडून व खालीं पसरून तो सुग्रीव रामासहवर्तमान तिच्यावर बसला १९. नंतर अत्यंत हर्षयुक्त झालेल्या वायुपुत्र हनुमानानें फारच प्रफुल्लित झालेली अशी एक चंदनवृक्षाची शाखा लक्ष्मणाला ( बसण्याकरितां ) दिली २०. तदनंतर हर्षानें ज्याचे नेत्र विकसित झालेले आहेत असा तो अतिशय आनंदित झालेला सुग्रीव मधुर शब्दांनीं रामाशीं चित्तवेधक भाषण करूं लागला कीं २१, " हे रामा, भ्रात्यानें माझा अगदीं पराजय केलेला आहे व मी भयभीत होऊन येथें संचार करीत आहें. इतकेंच नव्हे; परंतु, माझ्या भार्येचाही त्यानें अपहार केला आहे आणि ह्यामुळें मी त्रस्त होऊन वनामध्यें ह्या दुर्गमस्थानाचा आश्रय करून राहिलों आहें २२. सारांश, हे रघुवंशजा रामा, त्रस्त व भयभीत झाल्यामुळें चित्तालाही भ्रम पडलेला असा मी वनामध्यें वास्तव्य करीत आहें. भ्रात्या वालीनें माझा पराजय केलेला आहे आणि मीं त्याच्याशीं वैर बांधिलेलें आहे २३. तस्मात्, हे महाभाग्यवान् ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, भयग्रस्त झालेल्या मला वालीपासून फिरून भीति न राहील अशा रीतीनें आपण माझ्या भयाचा नाश करा " २४. ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां धर्मवेत्ता व धर्मवत्सल असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न तेजस्वी राम सुग्रीवाला हंसत हंसत ह्मणाला २५- " हे महावानरा, उपकाररूप फल प्राप्त करून देणाऱ्याला मी मित्र समजत असतों. तस्मात्, तुझी भार्या हरण करून नेणाऱ्या त्या वालीचा मी वध करीन २६. सूर्यासारिखे तेजस्वी असे हे माझे कधींहीं व्यर्थ न जाणारे साठवून ठेविलेले बाण वेगयुक्त होऊन त्या दुराचरणी वालीवर पडतील २७. कंकपक्ष्याच्या पक्षांनीं आच्छा-

तम् २९ स तु तद्वचनं श्रुत्वा राघवस्यात्मनो हितम् । सुग्रीवः परमप्रीतः परमं वाक्यमब्रवीत् ३० तव प्रसादेन नृसिंह वीर प्रियां च राज्यं च समाप्नुयामहम् । तथा कुरु त्वं नरदेव वैरिणं यथा न हिंस्यात्स पुनर्ममाग्रजम् ३१ सीताकपीन्द्रक्षणदाचराणां राजीवहेमज्वलनोपमानि । सुग्रीवरामप्रणयप्रसङ्गे वामानि नेत्राणि समं स्फुरन्ति ३२ [ २६६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

पुनरेवाब्रवीत्प्रीतो राघवं रघुनन्दनम् । अयमाख्याति ते राम सेवको मन्त्रिसत्तमः १ हनूमान्यन्निमित्तं त्वं निर्जनं वनमागतः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा वसतश्च वने तव २ रक्षसापहृता भार्या मैथिली जनकात्मजा । त्वया वियुक्ता रुदती लक्ष्मणेन च धीमता ३ अन्तरं प्रेप्सुना तेन हत्वा गृध्रं जटायुषम् । भार्यावियोगजं दुःखं प्रापितस्तेन रक्षसा ४

---

दित, तीक्ष्ण अग्रें आणि सरळ पर्वें ह्यांनीं युक्त व इंद्रवज्रतुल्य असलेले हे बाण क्रोधयुक्त भुजंगासारिखे दिसत आहेत २८. ह्यास्तव, सर्पतुल्य तीक्ष्ण बाणांच्या योगानें वध पावून कोसळलेल्या पर्वताप्रमाणें भूमीवर पसरलेल्या वालीला तूं आज अवलोकन कर " २९. स्वतःला हितकारक असें तें रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीवानें अतिशय संतुष्ट होऊन आपला मुख्य मनोरथ रामाला निवेदन केला ३०. ( तो ह्मणाला ) " हे पुरुषश्रेष्ठा वीरा, तुझ्या कृपेमुळें प्रिया व राज्य हीं मला प्राप्त होतील. ह्यास्तव, मला पुनरपि तो दुःख न देईल अशा रीतीनें त्या माझ्या वैरी ज्येष्ठ भ्रात्याची, हे प्रजाधिपते, आपण व्यवस्था लावा ३१. असो. ह्याप्रमाणें सुग्रीव राम व ह्यांचे सख्य चाललें असतां सीता, वाली आणि राक्षस ह्यांचे अनुक्रमें कमलासारिखे, सुवर्णासारिखे व अग्नीसारिखे असलेले वामनेत्र एकदम स्फुरण पावूं लागले ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

पुनरपि सुग्रीव संतुष्ट होऊन रघुनंदन रामाला ह्मणाला " हे रामा, मंत्र्यांमध्यें श्रेष्ठ असा हा माझा सेवक १ हनुमान् तूं कोणत्या कारणाकरितां निर्जन वनामध्यें आला आहेस हें मला सांगत आहे. भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान तूं वनामध्यें वास्तव्य करीत असतांना २ जनककन्या मैथिली तुझी भार्या राक्षसानें हरण करून नेली त्या वेळीं तूं व बुद्धिमान् लक्ष्मण ह्यां पैकीं कोणीही समीप नसल्यामुळें ( राक्षसाचे अधीन झालेली ) ती रोदन करीत होती ३. सारांश, संधि पहात असलेल्या त्या राक्षसानें जटायू गृध्राचा वध केला आणि भार्यावियोग जन्य दुःख

भार्यावियोगजं दुःखं न चिरात्त्वं विमोक्ष्यसे । अहं तामानयिष्यामि नष्टां देवश्रुतीमिव ५ रसातले वा वर्तन्तीं वर्तन्तीं वा नभस्तले । अहमानीय दास्यामि तव भार्यामरिन्दम ६ इदं तथ्यं मम वचस्त्वमवेहि च राघव । न शक्या सा जरयितुमपि सेन्द्रैः सुरासुरैः ७ तव भार्या महाबाहो भक्ष्यं विषकृतं यथा । त्यज शोकं महाबाहो तां कान्तामानयामि ते ८ अनुमानात्तु जानामि मैथिली सा न संशयः । ह्रियमाणा मया दृष्टा रक्षसा रौद्रकर्मणा ९ क्रोशन्ती राम रामेति लक्ष्मणेति च विस्वरम् । स्फुरन्ती रावणस्याङ्के पन्नगेन्द्रवधूर्यथा १० आत्मना पञ्चमं मां हि दृष्ट्वा शैलतले स्थितम् । उत्तरीयं तया त्यक्तं शुभान्याभरणानि च ११ तान्यस्माभिर्गृहीतानि निहितानि च राघव । आनयिष्याम्यहं तानि प्रत्यभिज्ञातुमर्हसि १२ तमब्रवीत्ततो रामः सुग्रीवं प्रियवादिनम् । आनयस्व सखे शीघ्रं किमर्थं प्रविलम्बसे १३ एवमुक्तस्तु सुग्रीवः शैलस्य गहनां गुहाम् । प्रविवेश ततः शीघ्रं राघवप्रियकाम्यया १४ उत्तरीयं गृहीत्वा तु स तान्याभरणानि च

---

तुला प्राप्त करून दिलें ४. परंतु, हें तुझें भार्यावियोगजन्य दुःख लवकरच नाहींसें होईल; कारण, ब्रह्मज्ञानाला साधनभूत असलली श्रुति मधुकैटभांनीं हरण करून नेली असतांनाही जशी विष्णूनें परत आणिली तशी सांप्रत नाहींशी झालेली ती तुझी भार्या मी आणीन ५. हे शत्रुदमना, तुझी भार्या रसातलामध्यें असली किंवा आकाशामध्यें जरी असली तरी ती मी तुला आणून देईन ६. हे रघुवंशजा रामा, हें माझें भाषण सत्य आहे असें तूं समज. हे महापराक्रमी रामा, विषमिश्रित अन्नाप्रमाणें इंद्रासहवर्तमान देवदैत्यांनाही ती तुझी भार्या जिरणें शक्य नाहीं. ह्यास्तव, हे महापराक्रमी रामा, शोकाचा त्याग कर; ती तुझी कांता मी आणून देईन ७,८. क्रूरकर्मी राक्षस घेऊन जात असतांना " रामा, रामा, लक्ष्मणा, " ह्मणून भयंकर आक्रोश करीत असलेली आणि रावणाचे हातामध्यें नागराजाच्या स्त्रीप्रमाणें तडफड करीत असलेली जी माझ्या दृष्टीं पडली ती निःसंशय मैथिलीच असावी असें माझें अनुमान आहे ९,१०. माझ्यासहवर्तमान पांच असामी पर्वतावर बसल्याचें पाहून तिनें आपलें उत्तरीय वस्त्र व शुभ भूषणें टाकून दिलीं ११. तीं, हे रामा, आह्मीं घेऊन ठेविलीं आहेत. आतां तीं मी येथें आणितों; तूं (तीं कोणाचीं) तें ओळख १२. ह्यावर त्या प्रिय भाषण करणाऱ्या सुग्रीवाला राम ह्मणाला " हे मित्रा, तर मग आण लवकर; विलंब कशाकरितां करीत आहेस ? " १३. ह्याप्रमाणें रामानें भाषण केलें

इदं पश्येति रामाय दर्शयामास वानरः १५ ततो गृहीत्वा वासस्तु
शुभान्याभरणानि च। अभवद्बाष्पसंरुद्धो नीहारेणेवचन्द्रमाः १६
सीतास्नेहप्रवृत्तेन स तु बाष्पेण दूषितः। हा प्रियेति रुद-
न्धैर्यमुत्सृज्य न्यपतत्क्षितौ १७ हृदि कृत्वा स बहुशस्तमलंकारमुत्तमम्।
निशश्वास भृशं सर्पो बिलस्थ इव रोषितः १८ अविच्छिन्नाश्रुवेगस्तु
सौमित्रिं प्रेक्ष्य पार्श्वतः। परिदेवयितुं दीनं रामः समुपचक्रमे १९ पश्य
लक्ष्मण वैदेह्या संत्यक्तं ह्रियमाणया। उत्तरीयमिदं भूमौ शरीराद्भूषणानि
च २० शाद्वलिन्यां ध्रुवं भूम्यां सीतया ह्रियमाणया। उत्सृष्टं भूषण-
मिदं तथा रूपं हि दृश्यते २१ एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणो वाक्यमब्र-
वीत्। नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुण्डले २२ नूपुरे त्वभिजा-
नामि नित्यं पादाभिवन्दनात्। ततस्तु राघवो वाक्यं सुग्रीवमिदमब्रवीत् २३
ब्रूहि सुग्रीव कं देशं ह्रियन्ती लक्षिता त्वया। रक्षसा रौद्ररूपेण

असतां त्यांचें प्रिय करण्याकरितां सुग्रीव सत्वर पर्वताच्या गहन गुहेमध्यें शिरला १४ आणि उत्तरीय वस्त्र व तीं भूषणें घेऊन "हें पहा" ह्मणून रामाला त्या वानरानें तीं दाखविलीं १५. तदनंतर तें उत्तरीय वस्त्र व तीं शुभ भूषणें घेतल्यावर धुक्यानें ज्याप्रमाणें चंद्रमा गुदमरून जातो त्याप्रमाणें राम अश्रूंनीं गुदमरून गेला १६ आणि सीतेवर असलेल्या प्रेमामुळें गळूं लागलेल्या अश्रूंच्या योगानें दूषित झालेला तो राम "हे प्रिये," ह्मणून धैर्य सोडून रोदन करूं लागला आणि पृथ्वीवर पडला १७. इतकेंच नव्हे परंतु, ते उत्कृष्ट अलंकार वारंवार आपल्या हृदयावर ठेवून क्रोध युक्त झालेल्या बिलांतील सर्पाप्रमाणें तो एकसारिखे सुस्कारे टाकूं लागला १८ आणि नेत्रांतून एकसारिखा अश्रूंचा प्रवाह चालला असतांना बाजूस असलेल्या लक्ष्मणाकडे पाहून राम दीन वाणीनें शोक करूं लागला १९. (तो ह्मणाला) "हे लक्ष्मणा, सीतेला राक्षस घेऊन जात असतांना शरीरापासून भूषणें आणि त्याचप्रमाणें हें उत्तरीय वस्त्र तिनें भूमीवर टाकिलें आहे हें तूं पहा २०. राक्षस सीतेला घेऊन चालला असतांना कोमल तृणानें युक्त असलेल्या भूमीवर तिनें टाकिलेलीं हीं भूषणें जशींच्या तशींच दिसत आहेत" २१. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां लक्ष्मण ह्मणाला "सीतेचीं बाहुभूषणें मला ठाऊक नाहींत व कुंडलेंही माहीत नाहींत २२; परंतु, नित्य पादाभिवंदनाचा प्रसंग येत असल्यामुळें तोरड्यांची मात्र मला ओळख पटत आहे". इतकें झाल्यावर राम सुग्रीवाला ह्मणाला २३ "हे सुग्रीवा, माझी प्राणप्रिया क्रूररूप धारण करणाऱ्या राक्षसानें हरण करून नेली आहे. तेव्हां कोणत्या प्रदेशावर तो हरण करून

मम प्राणप्रिया हृता २४ क्व वा वसति तद्रक्षो महद्व्यसनदं मम । यन्निमित्तमहं सर्वान्नाशयिष्यामि राक्षसान् २५ हरता मैथिलीं येन मां च रोषयता ध्रुवम् । आत्मनो जीवितान्ताय, मृत्युद्वारमपावृतम् २६ मम दयिततमा हृता वनाद्रजनिचरेण विमथ्य येन सा । कथय मम रिपुं तमद्य वै प्लवगपते यमसंनिधिं नयामि २७ [ २९३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

एवमुक्तस्तु सुग्रीवो रामेणार्तेन वानरः । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं सबाष्पं बाष्पगद्गदः १ न जाने निलयं तस्य सर्वथा पापरक्षसः । सामर्थ्यं विक्रमं वापि दौष्कुलेयस्य वा कुलम् २ सत्यं तु प्रतिजानामि त्यज शोकमरिंदम । करिष्यामि तथा यत्नं यथा प्राप्स्यसि मैथिलीम् ३ रावणं सगणं हत्वा परितोष्यात्मपौरुषम् । तथास्मि कर्ता न चिराद्यथा प्रीतो भविष्यसि ४ अलं वैक्लव्यमालम्ब्य धैर्यमात्मगतं स्मर । त्वद्विधानां न सदृशमीदृशं बुद्धिलाघवम् ५ मयापि व्यसनं प्राप्तं भार्याविरहजं

---

नेत असतांना ती तुझ्या दृष्टी पडली हें मला सांग २४; अथवा मला मोठ्या संकटांत पाडणारा तो राक्षस कोठें वास्तव्य करीत आहे तें तरी कथन कर ह्मणजे त्याच्याकरितां मी आज सर्व राक्षसांचा नाश करून टाकीन २५. मैथिलीला हरण करून ज्यानें मला कोपविलें आहे त्यानें निःसंशय आपल्या जीविताचा अंत होण्याकरितां मृत्यूचें द्वार उघडून ठेविलें आहे २६. अत्यंत प्रिय अशी ती माझी भार्या ज्या राक्षसानें वनांतून फसवून नेली आहे तो माझा शत्रु तूं मला सांग; ह्मणजे, हे वानराधिपते, आज मी त्याला यमाचे संनिध पोंचवितों २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

ह्याप्रमाणें आर्त झालेल्या रामानें सुग्रीववानराला सांगितलें असतां अश्रूंनीं कंठ दाटून आलेला तो सुग्रीव हात जोडून अश्रु ढाळीत ढाळीत ह्मणाला १ "त्या पापी राक्षसाचें वसतिस्थान, सामर्थ्य, पराक्रम किंवा दुष्कुलामध्यें उत्पन्न झालेल्या त्या राक्षसाचें कुल मला मुळींच माहीत नाहीं २. परंतु, हे शत्रुदमना, सीता तुला प्राप्त होईल अशा रीतीनें मी यत्न करीन हें मात्र मी खरें खरें प्रतिज्ञेवर सांगतों; तूं वाईट वाटूं देऊं नको ३. अनुयायीगणांसहवर्तमान रावणाचा वध करून आणि तुझ्या संतोषाला पात्र अशा स्वतःच्या पौरुषाचें अवलंबन करून तूं ज्या रीतीनें प्रसन्न होशील त्या रीतीनें मी लवकरच तजवीज करीन ४. आतां खेद पुरे झाला; धैर्याचें अवलंबन करून स्वतःसंबंधानें कांहीं तरी स्मर. तुझ्यासारख्यांना अशा प्रकारचा हा बुद्धीचा

महत् । नाहमेव हि शोचामि धैर्यं न च परित्यजे ६ नाहं तामनुशोचामि प्राकृतो वानरोऽपि सन् । महात्मा च विनीतश्च किं पुनर्धृतिमान्महान् ७ बाष्पमापतितं धैर्यान्निग्रहीतुं त्वमर्हसि । मर्यादां सत्त्वयुक्तानां धृतिं नोत्स्रष्टुमर्हसि ८ व्यसने वार्थकृच्छ्रे वा भये वा जीवितान्तगे । विमृशंश्च स्वया बुद्ध्या धृतिमान्नावसीदति ९ बालिशस्तु नरो नित्यं वैक्लव्यं योऽनुवर्तते । स मज्जत्यवशः शोके भाराक्रान्तेव नौर्जले १० एषोऽञ्जलिर्मया बद्धः प्रणयात्त्वां प्रसादये । पौरुषं श्रय शोकस्य नान्तरं दातुमर्हसि ११ ये शोकमनुवर्तन्ते न तेषां विद्यते सुखम् । तेजश्च क्षयते तेषां न त्वं शोचितुमर्हसि १२ शोकेनाभिप्रपन्नस्य जीविते चापि संशयः। स शोकं त्यज राजेन्द्र धैर्यमाश्रय केवलम् १३ हितं वयस्यभावेन ब्रूमि नोपदिशामि ते । वयस्यतां पूजयन्मे न त्वं शोचितुमर्हसि १४ मधुरं सांत्वितस्तेन सुग्रीवेण स राघवः । मुखमश्रुपरिक्लिन्नं वस्त्रान्तेन प्रमा-

---

कोतेपणा योग्य नाहीं ५. भार्याविरहामुळें मलाही मोठें संकट प्राप्त झालेलें आहे; परंतु मी ह्याप्रमाणें शोक करीत बसत नाहीं व धैर्यही सोडीत नाहीं ६. मी यःकश्चित् वानर असतांनाही त्या प्रियेबद्दल शोक करीत नाहीं; मग महात्मा, सुशिक्षित, धैर्यवान् आणि उदार अशा तुझी गोष्ट पाहिजे कशाला ?७. तस्मात्, आलेले अश्रु धैर्यानें तूं आंवरून धर, सत्त्वगुणी लोकांचा धैर्यरूप मर्यादा सोडून देणें तुला योग्य नाहीं ८. इष्टवियोगामुळें संकट आलें असतां, धनाचा नाश झाला असतां अथवा जीविताचा नाश करणारें असें भय प्राप्त झालें असतांही स्वतःच्या बुद्धीनें विचार करणारा धैर्यवान् पुरुष मनामध्यें खचत नाहीं ९. जो बालिश पुरुष नेहमीं खेद करीत बसतो तो ओझ्यानें जर्जर झालेली नौका ज्याप्रमाणें जलामध्यें बुडते त्याप्रमाणें निरुपाय होऊन शोकांमध्यें बुडून जातो १०. हे मीं हात जोडिले आहेत आणि प्रेमामुळें मी तुझी प्रार्थना करीत आहें. ह्यास्तव पौरुषाचें अवलंबन करून शोकाला आपलेजवळ जागा देऊं नकोस ११. जे शोकाचें अवलंबन करितात त्यांना सुख प्राप्त होत नसून त्यांचें तेजही नाहींसें होत जातें. तस्मात्, शोक करणें तुला योग्य नाहीं १२. शोकाकुल झालेल्याच्या जीविताविषयीं संशय उत्पन्न होत असतो. तस्मात्, हे राजाधिराज, शोकाचा त्याग करून तूं केवल धैर्याचें अवलंबन कर १३. मित्रभावामुळें मी तुला हिताची गोष्ट सुचवीत आहें; मी कांहीं उपदेश करीत नाहीं. तेव्हां माझ्या मित्रत्वाला मान देऊन शोक करणें तुला योग्य नाहीं " १४. ह्याप्रमाणें मधुर शब्दांनीं त्या सुग्रीवानें सांत्वन केलें असतां अश्रूंनीं भिजून गेलेलें आपलें मुख

र्जयत् १५ प्रकृतिस्थस्तु काकुत्स्थः सुग्रीववचनात्प्रभुः । संपरिष्वज्य
सुग्रीवमिदं वचनमब्रवीत् १६ कर्तव्यं यद्वयस्येन स्निग्धेन च हितेन च ।
अनुरूपं च युक्तं च कृतं सुग्रीव तत्त्वया १७ एष च प्रकृतिस्थोहमनु-
नीतस्त्वया सखे । दुर्लभो हीदृशो बन्धुरस्मिन्काले विशेषतः १८ किं तु
यत्नस्त्वया कार्यो मैथिल्याः परिमार्गणे । राक्षसस्य च रौद्रस्य राव-
णस्य दुरात्मनः १९ मया च यदनुष्ठेयं विस्रब्धेन तदुच्यताम् । वर्षा-
स्विव च सुक्षेत्रे सर्वं संपद्यते तव २० मया च यदिदं वाक्यमभिमाना-
त्समीरितम् । तत्त्वया हरिशार्दूल तत्त्वमित्युपधार्यताम् २१ अनृतं नोक्त-
पूर्वं मे न च वक्ष्ये कदाचन । एतत्ते प्रतिजानामि सत्येनैव शपाम्यहम् २२
ततः प्रहृष्टः सुग्रीवो वानरैः सचिवैः सह । राघवस्य वचः श्रुत्वा
प्रतिज्ञातं विशेषतः २३ एवमेकान्तसंपृक्तौ ततस्तौ नरवानरौ । उभाव-
न्योन्यसदृशं सुखं दुःखमभाषताम् २४ महानुभावस्य वचो निशम्य हरि-
र्नृपाणामधिपस्य तस्य । कृतं स मेने हरिवीरमुख्यस्तदा च कार्यं हृदयेन
विद्वान् २५ [ ३१८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये
किष्किन्धाकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

---

त्या राघवानें वस्त्राच्या टोंकानें पुसून काढिलें १५ आणि सुग्रीवाच्या सांगण्यावरून स्वभावाचें अवलंबन केलेला तो प्रभु ककुत्स्थकुलोत्पन्न राम सुग्रीवाला आलिंगन देऊन ह्मणाला १६ “ हे सुग्रीवा, हितकारक आणि प्रेमयुक्त मित्राचें अनुरूप व योग्य असें जें कांहीं कर्तव्य आहे तें तूं केलें आहेस १७. हे मित्रा, तूं सांत्वन केल्यामुळें मी आतां सावध झालों आहें. खरोखर विशेषेंकरून अशा वेळीं अशा प्रकारचा बंधु दुर्लभ आहे १८. सीतेच्या आणि दुरात्म्या क्रूर रावणराक्षसाच्या शोधाविषयीं तूं यत्न कर १९ आणि मीं काय करावें तेंही तूं निःशंकपणें सांगून टाक. पर्जन्यकालीं चांगल्या जमिनीमध्यें पेरलेल्या बीजाप्रमाणें तुझें सर्व कांहीं कृत्य सफल होईल २०. मीं अभिमानामुळें जें कांहीं भाषण केलें आहे तें, हे वानरश्रेष्ठा, खरें आहे असें तूं समज २१. ह्यापूर्वींही मीं कधीं अनृत भाषण केलें नाहीं व पुढेंही कधीं करणार नाहीं हें तुला प्रतिज्ञेवर सांगून मी सत्याची शपथ घेतों ” २२. ह्याप्रमाणें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर आणि विशेषतः त्याची प्रतिज्ञा श्रवण केल्यानंतर वानरमं-त्र्यासहवर्तमान सुग्रीवाला मोठा हर्ष झाला २३ आणि ह्याप्रमाणें एकांतामध्यें परस्पराशीं सख्य केलेले ते उभयतां नरवानर परस्परांना योग्य अशा सुखदुःखाच्या गोष्टी बोलूं लागले २४ आणि त्या महाप्रभावी राजाधिराज रामाचें भाषण श्रवण केल्या-

परितुष्टस्य सुग्रीवस्तेन वाक्येन हर्षितः । लक्ष्मणस्याग्रजं शूरमिदं वचनमब्रवीत् १ सर्वथाहमनुग्राह्यो देवतानां न संशयः । उपपन्नो गुणोपेतः सखा यस्य भवान्मम २ शक्यं खलु भवेद्राम सहायेन त्वयानघ । सुरराज्यमभिप्राप्तुं स्वराज्यं किमुत प्रभो ३ सोहं सभाज्यो बन्धूनां सुहृदां चैव राघव । यस्याग्निसाक्षिकं मित्रं लब्धं राघववंशजम् ४ अहमप्यनुरूपस्ते वयस्यो ज्ञास्यसे शनैः । न तु वक्तुं समर्थोहं त्वयि आत्मगतान्गुणान् ५ महात्मनां तु भूयिष्ठं त्वद्विधानां कृतात्मनाम् । निश्चला भवति प्रीतिर्धैर्यमात्मवतां वर ६ रजतं वा सुवर्णं वा शुभान्याभरणानि च । अविभक्तानि साधूनामवगच्छन्ति साधवः ७ आढ्यो वापि दरिद्रो वा दुःखितः सुखितोपि वा । निर्दोषश्च सदोषश्च वयस्यः परमा गतिः ८ धनत्यागः सुखत्यागो देशत्यागोपि वानघ । वयस्यार्थे प्रवर्तन्ते स्नेहं दृष्ट्वा तथाविधम् ९ तत्तथेत्यब्रवीद्रामः सुग्रीवं प्रियदर्शनम् । लक्ष्मणस्याग्रतो लक्ष्म्या वासवस्येव धीमतः १० ततो रामं स्थितं दृष्ट्वा

---

वर तो श्रेष्ठ वानरवीर समंजस सुग्रीव आपलें कार्य झालेंच असें मनामध्यें समजूं लागला २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडांपैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

त्या भाषणानें सुग्रीव संतुष्ट व हर्षयुक्त झाला आणि लक्ष्मणाच्या त्या शूर ज्येष्ठ भ्रात्याला ह्मणाला १ "ज्याअर्थी तुझ्यासारिखा गुणी मित्र मला प्राप्त झाला आहे त्याअर्थी देवतांची सर्वस्वीं मजवर कृपा आहे ह्याबद्दल मुळींच शंका नाहीं २. हे निष्पापा रामा, तुझ्यासारिखा साहाय्यकर्ता असला ह्मणजे देवराज्यही प्राप्त होणें शक्य आहे; मग, हे प्रभो, स्वराज्याची ती कथा काय ? ३ असो. अग्नीसमक्ष राघववंशज मित्र ज्याला प्राप्त झाला तो मी, हे राघवा, बंधूंच्या व मित्रांच्या मानाला पात्र आहें ४. मी तुला योग्य असाच मित्र आहें हें हळूं हळूं तुला समजून येईल. आपल्या गुणांचा उच्चार तुझ्यापाशीं करण्यास मी समर्थ नाहीं ५. हे स्वावलंबी पुरुषांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामा, तुझ्यासारिख्या मनोनिग्रही महात्म्यांची प्रीति व धैर्य अधिकच निश्चल होत असतात ६. असो. मित्रासंबंधानें रुपें, सोनें अथवा शुभ भूषणें ह्यांविषयीं आपपरभाव मित्र मनामध्यें आणीत नाहींत ७. मित्र संपन्न असो, दरिद्री असो, दुःखी असो, निर्दोष असो अथवा सदोष असो; तोच मुख्य आश्रय आहे ८. हे निष्पापा रामा, तशा प्रकारचें प्रेम दृष्टोत्पत्तीस आलें ह्मणजे धनाचा, सुखाचा व देशाचाही त्याग मित्राकरितां होत असतो " ९. तदनंतर कांतीनें युक्त असलेला तो

लक्ष्मणं च महाबलम् । सुग्रीवः सर्वतश्चक्षुर्वने लोलमपातयत् ११ स
ददर्श ततः सालमविदूरे हरीश्वरः । सुपुष्पमीषत्पत्राढ्यं भ्रमरैरुपशोभि-
तम् १२ तस्यैकां पर्णबहुलां शाखां भङ्क्त्वा सुशोभिताम् । रामस्यास्तीर्य
सुग्रीवो निषसाद सराघवः १३ तावासीनौ ततो दृष्ट्वा हनूमानपि लक्ष्मणम् ।
शालशाखां समुत्पाट्य विनीतमुपवेशयत् १४ सुखोपविष्टं रामं तु प्रसन्न-
मुदधिं यथा । सालपुष्पावसंकीर्णे तस्मिन्गिरिवरोत्तमे १५ ततः प्रहृष्टः
सुग्रीवः श्लक्ष्णया शुभया गिरा । उवाच प्रणयाद्रामं हर्षव्याकुलिता-
क्षरम् १६ अहं विनिकृतो भ्रात्रा चराम्येष भयार्दितः । ऋष्यमूकं गिरिवरं
हृतभार्यः सुदुःखितः १७ सोऽहं त्रस्तो भये मग्नो वने संभ्रान्तचेतनः ।
वालिना निकृतो भ्रात्रा कृतवैरश्च राघव १८ वालिनो मे भयार्तस्य सर्व-
लोकाभयंकर । ममापि त्वमनाथस्य प्रसादं कर्तुमर्हसि १९ एवमुक्तस्तु
तेजस्वी धर्मज्ञो धर्मवत्सलः । प्रत्युवाच स काकुत्स्थः सुग्रीवं प्रहसन्निव २०

---

राम इंद्रतुल्य विचारी लक्ष्मणासमोर प्रियदर्शन सुग्रीवाला "ठीक आहे" असें ह्मणाला १०. तेव्हां राम व महाबलाढ्य लक्ष्मण उभे राहिलेले पाहून सुग्रीवानें आपली चंचल दृष्टि वनांमध्यें सर्व ठिकाणीं फिरविली असतां ११ प्रफुल्लित, थोडक्याशा पानांनीं युक्त आणि भ्रमरांनीं सुशोभित असा एक तालवृक्ष जवळच त्याच्या दृष्टीं पडला १२. तेव्हां पानांनीं भरलेली व सुशोभित अशी एक त्या वृक्षाची फांदी तोडून रामाकरितां त्यानें खालीं पसरिली आणि रामासहवर्तमान तो सुग्रीव त्या फांदीवर बसला १३. तदनंतर त्या उभयतांना बसलेले पाहून हनुमानानेंही दुसरी एक वृक्षाची फांदी मोडिली आणि विनयसंपन्न लक्ष्मणाला त्यानें तिच्यावर बसविलें १४. नंतर सालपुष्पांनीं आच्छादित झालेल्या त्या श्रेष्ठ पर्वतावर राम प्रसन्न सागराप्रमाणें सुखानें बसला आहे असें आढळून आल्यावर सुग्रीवाला हर्ष झाला १५ आणि आनंदाच्या भरामुळें जिच्यांतील अक्षरांचा उच्चार अस्पष्टपणें होत आहे अशा सौम्य व शुभ वाणीनें तो सुग्रीव स्नेहामुळें रामाला ह्मणाला १६ "भ्रात्यानें पराजित केलेला आणि भार्येचा अपहार झाल्यामुळें अत्यंत दुःखित झालेला हा मी भयग्रस्त होऊन ऋष्यमूक नामक श्रेष्ठ पर्वतावर संचार करीत आहे १७. हे राघवा, भ्रात्या वालीनें वैर धरून मला दुःख दिलें असल्यामुळें मी त्रस्त झालों असून भयामध्यें मग्न झालों आहे आणि चित्तक्षोभ होऊन वनामध्यें फिरत आहे १८. तस्मात्, हे सर्वलोकांना अभय देणाऱ्या रामा, वालीमुळें भयभीत झालेल्या मज अनाथावर तूं कृपा कर १९. ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां तेजस्वी, धर्मवेत्ता आणि धर्मवत्सल असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम हंसत हंसत सुग्री-

उपकारफलं मित्रमपकारोरिलक्षणम् । अद्यैव तं वधिष्यामि तव भार्यापहारिणम् २१ इमे हि मे महाभाग पत्रिणस्तिग्मतेजसः । कार्तिकेयवनोद्भूताः शरा हेमविभूषिताः २२ कङ्कपत्रपरिच्छन्ना महेन्द्राशनिसंनिभाः । सुपर्वाणः सुतीक्ष्णाग्राः सरोषा भुजगा इव २३ वालिसंज्ञममित्रं ते भ्रातरं कृतकिल्बिषम् । शरैर्विनिहतं पश्य विकीर्णमिव पर्वतम् २४ राघवस्य वचः श्रुत्वा सुग्रीवो वाहिनीपतिः । प्रहर्षमतुलं लेभे साधुसाध्विति चाब्रवीत् २५ राम शोकाभिभूतोहं शोकार्तानां भवान्गतिः । वयस्य इति कृत्वा हि त्वय्यहं परिदेवये २६ त्वं हि पाणिप्रदानेन वयस्यो मेग्निसाक्षिकम् । कृतः प्राणैर्बहुमतः सत्येन च शापाम्यहम् २७ वयस्य इति कृत्वा च विस्रब्धः प्रवदाम्यहम् । दुःखमन्तर्गतं तन्मे मनो हरति नित्यशः २८ एतावदुक्त्वा वचनं बाष्पदूषितलोचनः । बाष्पदूषितया वाचा नोच्चैः शक्नोति भाषितुम् २९ बाष्पवेगं तु सहसा नदीवेगमिवागतम् । धारयामास धैर्येण सुग्रीवो रामसंनिधौ ३० स निगृह्य तु

---

वाला ह्मणाला २० "उपकार हें मित्रापासून प्राप्त होणारें फल असून अपकार हें शत्रूचें चिन्ह आहे. ह्यास्तव, तुझी भार्या हरण करणाऱ्या त्या वालीचा मी आजच वध करीन २१. हे महाभाग्यवान् सुग्रीवा, पिसें व तीक्ष्ण तेज ह्यांनीं युक्त असलेले हे माझे सुवर्णभूषित बाण कार्तिकेयाच्या वनामध्यें उत्पन्न झालेले आहेत २२; कंकपक्ष्याच्या पिसांनीं हे आच्छादित झालेले आहेत, ह्यांचीं अग्रें फारच तीक्ष्ण आहेत; पेरीं चांगलीं आहेत आणि महेंद्राच्या वज्राप्रमाणें असलेले हे बाण क्रुद्ध झालेल्या भुजंगासारिखे ( शत्रुनाशक ) आहेत २३. तात्पर्य, तुझा अपराध केलेला जो वालीनांवाचा तुझा भ्रातृरूप शत्रु तो बाणांच्या योगानें वध पावून पर्वताप्रमाणें भूमीवर पसरलेला तूं अवलोकन कर " २४. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर त्या वानरसेनाधिपति सुग्रीवाला अनुपम हर्ष झाला व तो ह्मणाला " शाबास, शाबास २५. हे रामा, मी शोकग्रस्त झालों आहें व शोकग्रस्तांचा तूं आश्रय आहेस. ह्यास्तव, मित्र असें समजून मी तुझ्यापाशीं आपलें दुःख निवेदन करीत आहें २६. हातावर हात देऊन अग्नीचे समक्ष मीं तुला मित्र केला आहे व प्राणांपेक्षांही तूं मला अधिक संमत आहेस हें मी शपथेवर खरें सांगतों २७ आणि जें अंतरगत दुःख माझ्या मनाला नेहमीं क्षुब्ध करीत आहे तें मित्र असें समजून मी निःशंकपणें तुला सांगतों " २८. इतकेंच बोलल्यावर डोळ्यांमध्यें अश्रु आलेल्या त्या सुग्रीवाचा कंठ आश्रूनीं दाटून आल्यामळें त्याला उच्चस्वरानें बोलतां येईना २९; तथापि नदीच्या वेगाप्रमाणें

तं बाष्पं प्रमृज्य नयने शुभे । विनिःश्वस्य च तेजस्वी राघवं पुनरूचिवान् ३१
पुराहं वालिना राम राज्यात्स्वादवरोपितः । परुषाणि च संश्राव्य निर्धू-
तोस्मि बलीयसा ३२ हृता भार्या च मे तेन, प्राणेभ्योपि गरीयसी ।
सुहृदश्च मदीया ये संयता बन्धनेषु ते ३३ यत्नवांश्च स दुष्टात्मा मद्वि-
नाशाय राघव । बहुशस्तत्प्रयुक्ताश्च वानरा निहता मया ३४ शङ्कया
त्वेतयाहं च दृष्ट्वा त्वामपि राघव । नोपसर्पाम्यहं भीतो भये सर्वे हि
बिभ्यति ३५ केवलं हि सहाया मे हनुमत्प्रमुखास्त्विमे । अतोहं धारया-
म्यद्य प्राणान्कृच्छ्रगतोपि सन् ३६ एते हि कपयः स्निग्धा मां रक्षन्ति
समन्ततः । सह गच्छन्ति गन्तव्ये नित्यं तिष्ठन्ति चास्थिते ३७ संक्षेप-
स्त्वेष मे राम किमुक्त्वा विस्तरं हि ते । स मे ज्येष्ठो रिपुर्भ्राता वाली
विश्रुतपौरुषः ३८ तद्विनाशेपि मे दुःखं प्रमृष्टं स्यादनन्तरम् । सुखं मे

---

एकाएकीं उसळलेला तो आश्रूंचा वेग सुग्रीवानें रामाचे संनिध धैर्यानें आंवरून धरिला ३० आणि तो वेग आंवरून धरून व शुभ नेत्रांतील अश्रु पुसून आणि दीर्घ श्वास टाकून तो तेजस्वी सुग्रीव पुनरपि रामाला ह्मणाला ३१ "हे रामा, पूर्वी वालीनें स्वराज्यापासून मला भ्रष्ट केलें आणि कठोर शब्द ऐकवून त्या बलाढ्यानें माझी निर्भर्त्सना केली ३२. प्राणांहूनही प्रिय अशी माझी भार्या त्यानें हरण करून नेली आणि जे माझे मित्र होते तेही त्यानें काराग्रहांमध्यें अडकवून ठेविले ३३. हे राघवा, माझ्या नाशाकारितां त्या दुरात्म्याचे प्रयत्न चाललेच असतात व माझ्या वधाकारितां त्यानें पाठविलेले पुष्कळ वानर मीं आजपर्यंत मारिलेलेही आहेत ३४. तेव्हां, हे राघवा, तुला अवलोकन करूनही ( माझ्या वधाकारितां त्यानें पाठविलेल्यां-पैकींच तूं आहेस कीं काय ) अशी शंका येत असल्यामुळें मी, भीतिग्रस्त होऊन तुझ्यासमीप येत नाहीं. कारण, कांहीं भय प्राप्त झालें असतां कोणीही झाले तरी भीतच असतात ३५. हनुमान् ज्यांतील प्रमुख आहे असे हेच काय ते माझे केवल मित्र आहेत आणि मी संकटांत सांपडलों असतांनाही ह्यांच्यामुळेंच आज प्राण धारण करून राहिलों आहें ३६. हे वानर माझ्यावर प्रेम करणारे असून सर्व बाजूंनीं माझें रक्षण करीत असतात, मला कोठें जावयाचें असल्यास सर्वही माझ्या बरोबर येतात आणि मी बसलों असतांनाही ते नेहमीं उभे असतात ३७. हे रामा, ही मीं संक्षेपानें आपली हकीकत तुला सांगितली आहे. कारण, सविस्तर सांगून तुला तरी काय उपयोग होणार आहे ? तो ज्येष्ठ भ्राता वाली माझा शत्रु असून त्याचा पराक्रम विख्यात आहे ३८. तस्मात्, त्याचा नाश झाल्यानंतरच माझ्या दुःखाचें परिमार्जन होणारें असून माझें सुख

जीवितं चैव तद्विनाशनिबन्धनम् ३९ एष मे राम शोकान्तः शोकार्तेन निवेदितः । दुःखितः सुखितो वापि सख्युर्नित्यं सखा गतिः ४० श्रुत्वै-तच्च वचो रामः सुग्रीवमिदमब्रवीत् । किंनिमित्तमभूद्वैरं श्रोतुमिच्छामि तत्त्वतः ४१ सुखं हि कारणं श्रुत्वा वैरस्य तव वानर । आनन्तर्याद्विधा-स्यामि संप्रधार्य बलाबलम् ४२ बलवान्हि ममामर्षः श्रुत्वा त्वामवमा-नितम् । वर्धते हृदयोत्कम्पी प्रावृड्वेग इवाम्भसः ४३ हृष्टः कथय विस्रब्धो यावदारोप्यते धनुः । सृष्टश्च हि मया बाणो निरस्तश्च रिपु-स्तव ४४ एवमुक्तस्तु सुग्रीवः काकुत्स्थेन महात्मना । प्रहर्षमतुलं लेभे चतुर्भिः सह वानरैः ४५ ततः प्रहृष्टवदनः सुग्रीवो लक्ष्मणाग्रजे । वैरस्य कारणं तत्त्वमाख्यातुमुपचक्रमे ४६ [ ३६४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

वाली नाम मम भ्राता ज्येष्ठः शत्रुनिषूदनः । पितुर्बहुमतो नित्यं मम चापि तथा पुरा १ पितर्युपरते तस्मिञ्ज्येष्ठोयमिति मन्त्रिभिः । कपी-

---

व जीवित हींही त्याच्याच नाशावर अवलंबून आहेत ३९. हे रामा, हा माझें दुःख नाहींसें होण्याचा उपाय मीं शोकग्रस्तानें तुला निवेदन केला आहे. कारण, दुःखी अथवा सुखी असला तरी मित्रच नेहमीं मित्राचा आधार आहे " ४०. हें भाषण श्रवण करून राम सुग्रीवाला ह्मणाला " तुमचें वैर कशामुळें पडलें हें खरें खरें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे ४१. हे वानरा, तुझ्या वैराचें कारण श्रवण करून व बलाबलाचा विचार करून नंतर मी तुझ्या सुखाची तजवीज करीन ४२. तुझा अव-मान झाल्याचें ऐकून हृदयाला कंपित करणारा माझा प्रबल क्रोध पर्जन्यकालच्या जलवेगाप्रमाणें वृद्धिंगत होत आहे ४३. तस्मात्, तूं हर्षयुक्त होऊन व माझ्यावर विश्वास टाकून तो वाली कोठें आहे हें मला सांग ह्मणजे लगेंच धनुष्याला प्रत्यंचा चढवून व बाण सोडून मीं तुझ्या शत्रूचा वध केलाच ( असें तूं समज ) " ४४. ह्याप्रमाणें महात्म्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें सुग्रीवाला सांगितलें असतां चारी वानरांसहवर्तमान त्या सुग्रीवाला अनुपम हर्ष झाला ४५ आणि नंतर प्रसन्नमुखानें युक्त झालेला तो सुग्रीव रामाला वैराचें कारण खरें खरें सांगूं लागला ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मी-किप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

वाली ह्मणून माझा ज्येष्ठ भ्राता आहे तो शत्रूंचें निर्दलन करणारा असून पित्याला नेहमीं संमत असे व मीही त्याचप्रमाणें पूर्वीं त्याला मोठा मान देत असे १. पुढें तो

नामीश्वरो राज्ये कृतः परमसंमतः २ राज्यं प्रशासतस्तस्य पितृपैतामहं महत् । अहं सर्वेषु कालेषु प्रणतः प्रेष्यवत्स्थितः ३ मायावी नाम तेजस्वी पूर्वजो दुन्दुभेः सुतः । तेन तस्य महद्वैरं वालिनः स्त्रीकृतं पुरा ४ स तु सुप्ते जने रात्रौ किष्किन्धाद्वारमागतः । नर्दति स्म सुसंरब्धो वालिनं चाह्वयद्रणे ५ प्रसुप्तस्तु मम भ्राता नर्दतो भैरवस्वनम् । श्रुत्वा न ममृषे वाली निष्पपात जवात्तदा ६ स तु वै निःसृतः क्रोधात्तं हन्तुमसुरोत्तमम् । वार्यमाणस्ततः स्त्रीभिर्मया च प्रणतात्मना ७ स तु निर्धूय ताः सर्वा निर्जगाम महाबलः । ततोहमपि सौहार्दान्निःसृतो वालिना सह ८ स तु मे भ्रातरं दृष्ट्वा मां च दूरादवस्थितम् । असुरो जातसंत्रासः प्रदुद्राव तदा भृशम् ९ तस्मिन्द्रवति संत्रस्ते ह्यावां द्रुततरं गतौ । प्रकाशोपि कृतो मार्गश्चन्द्रेणोद्गच्छता तदा १० स तृणैरावृतं दुर्गं धरण्या विवरं महत् । प्रविवेशासुरो वेगादावामासाद्य विष्ठितौ ११

---

पिता निवर्तल्यावर हा ज्येष्ठ पुत्र आहे असें समजून वानरांचा राजा ह्मणून लोकांना अतिशय संमत असलेल्या त्या वालीला मंत्र्यांनीं राज्यावर बसविलें २. वाडवडिलांपासून चालत आलेलें प्रचंड राज्य तो चालवीत असतांना मी नेहमीं दासाप्रमाणें त्याचेपाशीं नम्र होऊन उभा रहात असें ३. दुंदुभीचा मायावी ह्मणून एक तेजस्वी ज्येष्ठ पुत्र होता त्याच्याशीं त्या वालीचें पूर्वीं स्त्रीकरितां मोठें वैर पडलें होतें ४. तो रात्रीं लोक निद्रिस्थ झाल्यावर किष्किंधेच्या वेशीपाशीं आला, फारच क्षुब्ध होऊन गर्जना करूं लागला आणि संग्रामामध्यें वालीला त्यानें आह्वान केलें ५ तेव्हां तो भयंकर गर्जना करीत असतांना निद्रिस्थ असलेल्या माझ्या भ्रात्यानें, ती ऐकिल्यावर त्याला सहन झाली नाहीं. ह्यामुळें तो वाली वेगावेगानें तेथून निघाला ६. त्या श्रेष्ठ असुराचा वध करण्याकरितां रागानें तो वाली बाहेर पडूं लागला असतां सर्व स्त्रिया व मी नम्रपणानें त्याचें निवारण करूं लागलों ७; परंतु, माझ्यासहवर्तमान त्या सर्व स्त्रियांना झिडकारून देऊन तो महाबलाढ्य वाली चालता झाला. तेव्हां मीही बंधुप्रेमामुळें वालीबरोबर निघालों असतां ८ तो मायावी असुर, माझा भ्राता व मी दूर उभे असल्याचें अवलोकन करून भयभीत झाला आणि अतिशय पळत सुटला ९. तो त्रस्त होऊन धावूं लागला असतां आह्मीही त्यापेक्षां त्वरेनें त्याच्या अंगावर धावून गेलों व इतक्यांत उदय पावणाऱ्या चंद्रानें मार्गही प्रकाशित केला १०. तेव्हां त्याच्या पाठोपाठ धावून जाऊन आह्मी उभे राहिलों असतां तो दैत्य वेगावेगानें तृणांनीं आच्छादित व प्रवेश करण्यास कठिण अशा एका मोठ्या भूविवरामध्यें प्रविष्ट झाला

तं प्रविष्टं रिपुं दृष्ट्वा बिलं रोषवशं गतः । मामुवाच ततो वाली वच
क्षुभितेन्द्रियः १२ इह तिष्ठाद्य सुग्रीव बिलद्वारि समाहितः । यावद्
प्रविश्याहं निहन्मि समरे रिपुम् १३ मया त्वेतद्वचः श्रुत्वा याचितः
परंतपः । शापयित्वा स मां पद्भ्यां प्रविवेश बिलं ततः १४ तस्
प्रविष्टस्य बिलं साग्रः संवत्सरो गतः । स्थितस्य च बिलद्वारि स काल
व्यत्यवर्तत १५ अहं तु नष्टं तं ज्ञात्वा स्नेहादागतसंभ्रमः । भ्रातरं
प्रपश्यामि पापशङ्कि च मे मनः १६ अथ दीर्घस्य कालस्य बिलात्तस्मा
द्विनिःसृतम् । सफेनं रुधिरं दृष्ट्वा ततोहं भृशदुःखितः १७ नर्दतामसु
राणां च ध्वनिर्मे श्रोत्रमागतः । न रतस्य च सङ्ग्रामे क्रोशतोपि स्वनं
गुरोः १८ अहं त्ववगतो बुद्ध्या चिह्नैस्तैर्भ्रातरं हतम् । पिधाय च
बिलद्वारं शिलया गिरिमात्रया १९ शोकार्तश्चोदकं कृत्वा किष्किन्धा
मागतः सखे । गूहमानस्य मे तत्त्वं यत्नतो मन्त्रिभिः श्रुतम् २० ततो

असतां ११ तो शत्रु बिलामध्यें प्रविष्ट झालेला अवलोकन करून वाली अंतःकरणा मध्यें क्षुब्ध होऊन क्रोधाचे अधीन झाला आणि मला ह्मणाला १२ "हे सुग्रीवा ह्या ठिकाणीं बिळाच्या द्वाराशीं तूं आज सावधपणानें उभा रहा ह्मणजे मी इतक्यांत आंत प्रवेश करून संग्रामामध्यें त्या शत्रूचा वध करितों" १३. हें भाषण श्रवण केल्यावर मला बरोबर नेण्याविषयीं मीं त्या शत्रुतापन वालीची प्रार्थना केली; तथापि आपल्या पायांची मला शपथ घालून तो एकटाच बिळामध्यें प्रविष्ट झाला १४. तो बिळांत शिरून एक संपूर्ण संवत्सर लोटला तरी तो काल लोटेपर्यंत मी त्या बिळाच्या द्वाराशींच उभा राहिलों होतों १५. तेव्हां तो नाहींसा झाला असें जाणून प्रेमामुळें मला भय उत्पन्न झालें आणि भ्राता दृष्टीं पडत नसल्यामुळें माझ्या मनामध्येंही त्याच्या मृत्यू विषयीं वाईट शंका येऊं लागली १६. ह्या गोष्टीलाही बरेच दिवस लोटल्यावर त्या बिळांतून फेंसासहवर्तमान रक्त बाहेर आलें व तें अवलोकन करितांक्षणीं तर मला अतिशय दुःख झालें १७. गर्जना करणाऱ्या असुरांचा शब्द माझ्या कानावर आला; परंतु, संग्रामाविषयीं तत्पर असलेला तो माझा पूज्य ज्येष्ठ भ्राता आक्रोश करीत असतांनाही त्याचा शब्द माझ्या कानावर आला नाहीं १८. तेव्हां भ्रात्याचा वध झाला असा त्या चिन्हांवरून मीं तर्क केला, एका पर्वतप्राय शिलेनें त्या बिळाचें द्वार झांकून टाकिलें १९, शोकाकुल होऊन भ्रात्याचें उत्तरकार्य केलें आणि, हे मित्रा, किष्किंधा नगरीला परत आलों. तेव्हां खरी गोष्ट जरी मी लपवून ठेवीत होतों तरी प्रयत्नांमुळें मंत्र्यांनीं ती श्रुत करून घेतलीच २०. तदनंतर ते एकत्र जुळून

तैः समागम्य समेतैरभिषेचितः । राज्यं प्रशासतस्तस्य न्यायतो मम राघव २१ आजगाम रिपुं हत्वा दानवं स तु वानरः । अभिषिक्तं तु मां दृष्ट्वा क्रोधात्संरक्तलोचनः २२ मदीयान्मन्त्रिणो बद्ध्वा परुषं वाक्यमब्रवीत् । निग्रहे च समर्थस्य तं पापं प्रति राघव २३ न प्रावर्तत मे बुद्धिर्भ्रातृगौरवयन्त्रिता । हत्वा शत्रुं स मे भ्राता प्रविवेश पुरं तदा २४ मानयंस्तं महात्मानं यथावच्चाभिवादयम् । उक्ताश्च नाशिषस्तेन प्रहृष्टेनान्तरात्मना २५ नत्वा पादावहं तस्य मुकुटेनास्पृशं प्रभो । अपि वाली मम क्रोधान्न प्रसादं चकार सः २६ [ ३९० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

ततः क्रोधसमाविष्टं संरब्धं तमुपागतम् । अहं प्रसादयांचक्रे भ्रातरं हितकाम्यया १ दिष्ट्यासि कुशली प्राप्तो निहतश्च त्वया रिपुः । अनाथस्य हि मे नाथस्त्वमेको नाथ नन्दन २ इदं बहुशलाकं ते पूर्णचन्द्रमिवोदितम् । छत्रं सवालव्यजनं प्रतीच्छस्व मया धृतम् ३

---

माझ्यापाशीं आले आणि मला त्यांनीं राज्याभिषेक केला. असो. हे राघवा, मी त्याचें राज्य न्यायानें चालवूं लागलों असतां २१ तो वानर असुररूप शत्रूचा वध करून परत आला आणि मला राज्याभिषेक झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं क्रोधानें डोळे लाल करून २२ आणि माझ्या मंत्र्यांनाही बांधून टाकून त्यांच्याशीं कठोर भाषण करूं लागला. परंतु, हे राघवा, मी त्यावळीं त्याचा निग्रह करण्यास समर्थ असूनही भ्रात्याबद्दल वाटत असलेल्या मोठेपणानें जखडून गेलेलें माझें मन त्या पाप्याचा निग्रह करण्यास प्रवृत्त झालें नाहीं. असो. शत्रूचा वध करून तो माझा भ्राता किष्किंधा नगरीमध्यें प्रविष्ट झाल्यावर २३,२४ त्या महात्म्याला मान देऊन मीं रीतीप्रमाणें त्याला अभिवंदनही केलें; परंतु, त्यानें मनामध्यें संतुष्ट होऊन मला आशीर्वाद दिले नाहींत २५. तेव्हां नम्र होऊन, हे प्रभो, मी आपल्या मुकुटानें त्याच्या पायाला स्पर्शही केला; तथापि, क्रोधामुळें वालीनें मजवर कृपा केली नाहीं २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

तदनंतर क्रोधानें व्याप्त होऊन व क्षुब्ध होऊन आलेल्या त्या भ्रात्याची स्वहितबुद्धीनें मी विनवणी करूं लागलों कीं १, "हे आनंददायक प्रभो, शत्रूचा वध करून तूं कुशल परत आलास ही फारच आनंदाची गोष्ट आहे आणि मज अनाथाचा तूंच एक नाथ आहेस २. उदय पावलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक व अनेक शला-

आर्तस्तस्य बिलद्वारि स्थितः संवत्सरं नृप । दृष्ट्वा च शोणितं
द्वारि बिलाच्चापि समुत्थितम् ४ शोकसंविग्नहृदयो भृशं व्याकुलि-
तेन्द्रियः । अपिधाय बिलद्वारं शैलशृङ्गेण तत्तदा ५ तस्मा-
द्देशादपाक्रम्य किष्किन्धां प्राविशं पुनः । विषादात्त्विह मां दृष्ट्वा
पौरैर्मन्त्रिभिरेव च ६ अभिषिक्तो न कामेन तन्मे क्षन्तुं त्वमर्हसि ।
त्वमेव राजा मानार्हः सदा चाहं यथा पुरा ७ राजभावे नियोगोयं मम
त्वद्विरहात्कृतः । सामात्यपौरनगरं स्थितं निहतकण्टकम् ८ न्यासभूतमिदं
राज्यं तव निर्यातयाम्यहम् । मा च रोषं कृथाः सौम्य मम शत्रु-
निषूदन ९ याचे त्वां शिरसा राजन्मया बद्धोयमञ्जलिः । बलादस्मिन्समा-
गम्य मन्त्रिभिः पुरवासिभिः १० राज्यभावे नियुक्तोहं शून्यदेशजिगी-
षया । स्निग्धमेवं ब्रुवाणं मां स विनिर्भर्त्स्य वानरः ११ धिक्त्वामिति च
मामुक्त्वा बहु तत्तदुवाच ह । प्रकृतीश्च समानीय मन्त्रिणश्चैव संमतान् १२

कानीं युक्त असें हें तुझें छत्र जें मीं मोर्चेलासहवर्तमान धारण केलें होतें तें तूं परत घे ३. हे राजा, त्या बिलाच्या द्वाराशीं मी आर्त होऊन तुझी मार्गप्रतीक्षा करीत करीत एक संवत्सरपर्यंत उभा राहिलों आणि बिळांतून बाहेर आलेलें रक्तही जेव्हां मीं अवलोकन केलें ४ तेव्हां माझें हृदय शोकानें उद्विग्न होऊन चित्त व्याकुल झालें असतां पर्वतशिखराच्या योगानें तें बिलद्वार झांकून टाकून ५ मी त्या प्रदेशांतून निघालों आणि पुनरपि किष्किंधानगरीमध्यें दुःखानें प्रविष्ट झालों. तेव्हां मला अवलोकन करून नगरवासीजनांनीं व मंत्र्यांनीं ६ ( तूं निवृत्त झालास ह्या समजुतीवर निरुपाय होऊन ) मला अभिषेक केला; ७ मला राज्याची इच्छा झाल्यामुळें त्यांनीं तो केलेला नाहीं. ह्यास्तव, तूं मला क्षमा कर; संमानास पात्र असा राजा तूंच आहेस व मी पूर्वीप्रमाणेंच सर्वदां तुझा दास आहें ८. अमात्य आणि नगरवासी जन ह्यांसहवर्तमान उपद्रवरहित असलेलें सर्व नगर तसेंच कायम रहावें ह्याकरितां मंत्र्यांनीं तुझा वियोग झाल्यामुळें राज्याचे ठिकाणीं ही माझी योजना केली होती. तस्मात्, ठेव ह्या नात्यानें असलेलें हें तुझें राज्य मी आज तुझ्या स्वाधीन करीत आहें. हे दयाशील शत्रुनाशका, मजवर क्रुद्ध होऊं नकोस ९. हे राजा, मस्तक नम्र करून मी तुझी प्रार्थना करीत आहें व तुझ्यापुढें हे मीं हात जोडिले आहेत. मंत्री आणि नगरवासी जन ह्यांनीं एकत्र जुळून राजरहित झालेला प्रदेश जिंकण्याची इतरांना इच्छा होऊं नये एतदर्थ बलात्कारानें माझी ह्या राज्यावर योजना केलेली आहे." ह्याप्रमाणें मी सप्रेम भाषण करीत असतांनाही त्या वानरानें माझी निर्भर्त्सना केली १०, ११ आणि "तुला

**मामाह सुहृदां मध्ये वाक्यं परमगर्हितम् । विदितं वो मया रात्रौ मायावी स महासुरः १३ मां समाह्वयत क्रुद्धो युद्धाकाङ्क्षी तदा पुरा । तस्य तद्भाषितं श्रुत्वा निःसृतोहं नृपालयात् १४ अनुयातश्च मां तूर्णमयं भ्राता सुदारुणः । स तु दृष्ट्वैव मां रात्रौ सद्वितीयं महाबलः १५ प्राद्रवद्भयसंत्रस्तो वीक्ष्यावां समुपागतौ । अभिद्रुतस्तु वेगेन विवेश स महाबिलम् १६ तं प्रविष्टं विदित्वा तु सुघोरं सुमहद्बिलम् । अयमुक्तोथ मे भ्राता मया तु क्रूरदर्शनः १७ अहत्वा नास्ति मे शक्तिः प्रतिगन्तुमितः पुरीम् । बिलद्वारि प्रतीक्ष त्वं यावदेनं निहन्म्यहम् १८ स्थितोयमिति मत्वाहं प्रविष्टस्तु दुरासदम् । तं मे मार्गयतस्तत्र गतः संवत्सरस्तदा १९ स तु दृष्टो मया शत्रुरनिर्वेदाद्भयावहः । निहतश्च मया सद्यः स सर्वैः सह बन्धुभिः २० तस्यैव च प्रवृत्तेन रुधिरौघेण तद्बिलम् । पूर्णमासीद्दुराक्रामं स्तनतस्तस्य भूतले २१ सूदयित्वा तु तं शत्रुं विक्रान्तं तमहं**

---

धिक्कार असो " असें मला ह्मणून इतरही पुष्कळच तो मला बोलला. इतकेंच नव्हे; परंतु, आपली प्रजा व आपणाला संमत असलेले मंत्री बोलावून आणून १२ मित्रमंडळीमध्यें फारच निंद्य असें भाषण त्यानें माझ्याशीं केलें. ( तो ह्मणाला ) " महादैत्य मायावी क्रुद्ध होऊन रात्रीं युद्धाच्या इच्छेनें मला पूर्वी आह्वान करीत असे हें तुह्माला विदितच आहे. त्याचें तें भाषण श्रवण करून मी राजवाड्यांतून बाहेर पडलों असतां १३,१४ हा अतिक्रूर भ्राताही सत्वर माझ्या मागोमाग आला. परतु, भ्रात्याला बरोबर घेऊन मी आलों आहें असें अवलोकन करितांक्षणीं तो महाबलाढ्य असुर रात्रींच १५ भयभीत होऊन पळून गेला आणि पाठोपाठ आह्मी आलेले पाहिल्यावर वेगावेगानें धांव मारून तो एका मोठ्या बिळामध्यें प्रविष्ट झाला १६. फारच प्रचंड व अतिभयंकर तो अशा बिळामध्यें प्रविष्ट झाला असें समजून आल्यावर ह्या दिसण्यांतही क्रूर असलेल्या भ्रात्याला मी ह्मणालों १७ ' शत्रूचा वध केल्यावांचून नगरीला परत जाणें मला शक्यच नाहीं. ह्यास्तव, मी ह्याचा वध करीपर्यंत तूं ह्या बिळाच्या द्वाराशीं माझी प्रतीक्षा करीत रहा ' १८. ह्यानंतर हा तेथें उभा आहे असें समजून मी त्या दुर्गम बिळामध्यें प्रविष्ट झालों असतां त्या दैत्याला हुडकितां हुडकितां माझें एक वर्ष तेथें गेलें १९. शेवटीं एक वर्षपर्यंत कंटाळा न आणितां शोध चालला असतांनाही दृष्टोत्पत्तीस न आल्यामुळें भयावह झालेला तो शत्रु माझ्या दृष्टीं पडला. तेव्हां मी तत्क्षणींच त्याच्या सर्व बांधवांसहवर्तमान त्याचा वध केला २०. तेव्हां पातालामध्यें तो राक्षस गर्जना करूं लागला असतांना

मुखम्। निष्कामं नेह पश्यामि बिलस्य पिहितं मुखम् २२ विक्रोशमानस्य तु मे सुग्रीवेति पुनः पुनः। यतः प्रतिवचो नास्ति ततोहं भृशदुःखितः २३ पादप्रहारैस्तु मया बहुभिः परिपातितम्। ततोहं तेन निष्क्रम्य पथा पुरमुपागतः २४ तत्रानेनास्मि संरुद्धो राज्यं मृगयतात्मनः। सुग्रीवेण नृशंसेन विस्मृत्य भ्रातृसौहृदम् २५ एवमुक्त्वा तु मां तत्र वस्त्रेणैकेन वानरः। तदा निर्वासयामास वाली विगतसाध्वसः २६ तेनाहमपविद्धश्च हृतदारश्च राघव। तद्भयाच्च महीं सर्वां क्रान्तवान्सवनार्णवाम् २७ ऋष्यमूकं गिरिवरं भार्याहरणदुःखितः। प्रविष्टोस्मि दुराधर्षं वालिनः कारणान्तरे २८ एतत्ते सर्वमाख्यातं वैरानुकथनं महत्। अनागसा मया प्राप्तं व्यसनं पश्य राघव २९ वालिनश्च भयात्तस्य सर्वलोकभयापह। कर्तुमर्हसि मे वीर प्रसादं तस्य निग्रहात् ३० एवमुक्तः स तेजस्वी धर्मज्ञो धर्मसंहितम्। वचनं वक्तुमारेभे सुग्रीवं प्रहसन्निव ३१

---

त्याच्या शरीरापासून निघालेल्या रक्ताच्या प्रवाहानें तें दुर्गम बिल भरून गेलें २१. असो. त्या पराक्रमी शत्रूचा अनायासें वध केल्यावर पहातां तों मला बाहेर पडण्याचा मार्ग दिसेनासा झाला. कारण तें बिळाचें द्वार झांकून टाकिलेलें होतें २२. तदनंतर " सुग्रीवा, " म्हणून मी वारंवार आरोळ्या मारूं लागलों असतांही जेव्हां प्रत्युत्तर येईना तेव्हां तर मला अतिशयच दुःख झालें २३, पुष्कळ लाथा मारून मीं तें आच्छादन खालीं पाडिलें आणि त्या मार्गानें बाहेर पडून मी आपल्या नगराला आलों २४. सारांश आपणाला राज्य मिळावें ह्या इच्छेनें ह्या दुष्ट सुग्रीवानें भ्रातृप्रेम विसरून जाऊन मला त्या बिलामध्यें अडकवून ठेवलें. " २५. असें त्या मित्रमंडळीमध्यें मला बोलून मनामध्यें कांहीं एक न आणितां त्या वाली वानरानें एका वस्त्रानिशीं मला हांकून लाविलें २६. सारांश, हे राघवा, त्यानें मला हांकून लाविलें असून माझ्या भार्येचा अपहार केला असल्यामुळें त्याच्या भीतीनें वनें व समुद्र ह्यांसहवर्तमान ह्या पृथ्वीचें मीं पर्यटण केलें २७ आणि भार्येचा अपहार झाल्यामुळें दुःखित असलेला मी शेंवटीं कांहीं कारणामुळें वालीचा प्रवेश होण्यास अशक्य झालेल्या ह्या ऋष्यमूकनामक श्रेष्ठ पर्वतावर आलों २८. असो. वैर पडण्याचें हें मुख्य कारण मीं तुला सर्व निवेदन केलें आहे. सर्व लोकांचें भय दूर करणाऱ्या हे राघवा, मी निरपराधी असतांनाही त्या वालीच्या भीतीमुळें मला कसें संकट प्राप्त झालें आहे तें तूं अवलोकन कर आणि, हे वीरा, त्याचा निग्रह करून तूं मजवर कृपा कर " २९, ३०. ह्याप्रमाणें सुग्रीवानें रामाला सांगितलें असतां तो तेजस्वी धर्मवेत्ता राम सुग्रीवाशीं

अमोघाः सूर्यसंकाशा निशिता मे शरा इमे । तस्मिन्वालिनि दुर्वृत्ते पतिष्यन्ति रुषान्विताः ३२ यावत्तं न हि पश्येयं तव भार्यापहारिणम् । तावत्स जीवेत्पापात्मा वाली चारित्रदूषकः ३३ आत्मानुमानात्पश्यामि मग्नस्त्वं शोकसागरे । त्वामहं तारयिष्यामि बाढं प्राप्स्यसि पुष्कलम् ३४ तस्य तद्वचनं श्रुत्वा हर्षपौरुषवर्धनम् । सुग्रीवः परमप्रीतः सुमहद्वाक्यमब्रवीत् ३५ [ ४२५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

रामस्य वचनं श्रुत्वा हर्षपौरुषवर्धनम् । सुग्रीवः पूजयांचक्रे राघवं प्रशशंस च १ असंशयं प्रज्वलितैस्तीक्ष्णैर्मर्मातिगैः शरैः । त्वं दहेः कुपितो लोकान्युगान्त इव भास्करः २ वालिनः पौरुषं यत्तद्यच्च वीर्यं धृतिश्च या । तन्ममैकमनाः श्रुत्वा विधत्स्व यदनन्तरम् ३ समुद्रात्पश्चिमात्पूर्वं दक्षिणादपि चोत्तरम् । क्रामत्यनुदिते सूर्ये वाली व्यपगतक्लमः ४ अग्राण्यारुह्य शैलानां शिखराणि महान्त्यपि । ऊर्ध्वमुत्पात्य तरसा

---

हंसत हंसत धर्माला अनुसरून असलेलें भाषण करूं लागला ३१. (तो ह्मणाला) सूर्यासारिखे तेजस्वी, तीक्ष्ण व क्रोधयुक्त असे हे माझे कधींही व्यर्थ न जाणारे बाण त्या दुराचारी वालीवर जाऊन पडतील ३२. तुझ्या भार्येचा अपहार करणारा तो पापी व दुर्वर्तनी वाली माझ्या दृष्टीं पडला नाहीं तोंपर्यंतच जिवंत राहील ३३. स्वतःच्या स्थितीवरून पहातां तूं शोकसागरामध्यें मग्न झाला आहेस असें माझें अनुमान होतें. तस्मात्, मी तुला ह्या शोकसागरापासून तारीन व तुलाही भार्या व विपुलराज्य हीं प्राप्त होतील " ३४. ह्याप्रमाणें हर्ष व पौरुष वृद्धिंगत करणारें तें रामाचें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीव अतिशय संतुष्ट होऊन रामाशीं फारच मोठें संभाषण करूं लागला ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥१०॥

हर्ष व पौरुष वृद्धिंगत करणारें तें रामाचें भाषण श्रवण करून सुग्रीवानें त्या भाषणाची वाखाणणी करून रामाची प्रशंसा केली १. (तो ह्मणाला) "तूं क्रुद्ध झाल्यास मर्मभेदक, तीक्ष्ण व प्रज्वलित अशा बाणांच्या योगानें प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें निःसंशय त्रैलोक्य दग्ध करून टाकशील २; तथापि, वालीचें पौरुष, वीर्य आणि धैर्य हें सर्व एकाग्र अंतःकरण करून तूं ऐकून घे आणि नंतर तुला काय कर्तव्य असेल तें कर ३. (ब्राह्ममुहूर्तावर उठून) सूर्योदय होण्याचे पूर्वींच वाली यत्किंचित्ही श्रम न होतां पश्चिमसमुद्रापासून पूर्वसमुद्रापर्यंत आणि दक्षिणसमुद्रा-

प्रतिगृह्णाति वीर्यवान् ५ बहवः सारवन्तश्च वनेषु विविधा द्रुमाः । वालिना तरसा भग्ना बलं प्रथयतात्मनः ६ महिषो दुन्दुभिर्नाम कैलासशिखरप्रभः । बलं नागसहस्रस्य धारयामास वीर्यवान् ७ स वीर्योत्सेकदुष्टात्मा वरदानेन मोहितः । जगाम स महाकायः समुद्रं सरितां पतिम् ८ ऊर्मिमन्तमतिक्रम्य सागरं रत्नसंचयम् । मम युद्धं प्रयच्छेति तमुवाच महार्णवम् ९ ततः समुद्रो धर्मात्मा समुत्थाय महाबलः । अब्रवीद्वचनं राजन्नसुरं कालचोदितम् १० समर्थो नास्मि ते दातुं युद्धं युद्धविशारद । श्रूयतां त्वभिधास्यामि यस्ते युद्धं प्रदास्यति ११ शैलराजो महारण्ये तपस्विशरणं परम् । शङ्करश्वशुरो नाम्ना हिमवानिति विश्रुतः १२ महाप्रस्रवणोपेतो बहुकन्दरनिर्झरः । स समर्थस्तव प्रीतिमतुलां कर्तुमर्हति १३ तं भीतमिति विज्ञाय समुद्रमसुरोत्तमः । हिमवद्वनमागम्य शरश्चापादिव च्युतः १४ ततस्तस्य गिरेः श्वेता गजेन्द्रप्रतिमाः शिलाः । चिक्षेप

पासून उत्तरसमुद्रापर्यंत प्रत्यहीं फेरी करीत असतो ४, पर्वतांच्या माथ्यावर आरोहण करून तो वीर्यवान् वाली वेगानें उंच उड्डाण करीत असतो आणि चेंडूप्रमाणें पर्वतांचीं मोठीं मोठीं शिखरें हातांत घेत असतो ५. आपलें सामर्थ्य गाजविण्याकरितां त्या वालीनें वनामध्यें नानाप्रकारचे पुष्कळच बळकट वृक्ष जोरानें मोडून टाकिले आहेत ६. कैलासपर्वताच्या शिखरासारिख्या प्रभेनें युक्त आणि महिषरूप धारण केलेला असा एक दुंदुभी ह्मणून दैत्य होता व त्या वीर्यवान् दैत्याला सहस्र गजांचें बल होतें ७. वरप्रदानामुळें मोहित होऊन वीर्याच्या गर्वानें दुरात्मा बनलेला तो धिप्पाड राक्षस नदीपति समुद्राकडे गेला ८ आणि लाटांनीं युक्त असलेल्या त्या रत्नाकर सागराची मर्यादा न राखितां माझ्याशीं युद्ध कर ह्मणून तो त्या महासागराला ह्मणाला ९. तेव्हां, हे राजा, महाबलाढ्य धर्मात्मा समुद्र उठला आणि कालाची प्रेरणा झालेल्या त्या असुराला ह्मणाला १० "हे युद्धनिपुण, मी तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं. तुझ्याशीं युद्ध कोण करील तो मी तुला सांगतों, श्रवण कर ११. महारण्यामध्यें तपस्वीजनांचें मुख्य आश्रयस्थान आणि शंकराचा श्वशुर असा एक हिमवान् ह्या नांवानें विख्यात असलेला पर्वतराज आहे १२. मोठमोठ्या जलप्रवाहांनीं, अनेक गुहांनीं व झऱ्यांनीं युक्त असलेला तो पर्वतराज तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ असून युद्धाच्या योगानें तुझा अनुपम मनोरथ परिपूर्ण करील १३." ह्याप्रमाणें समुद्रानें सांगितलें असतां तो भ्याला आहे असें समजून तो असुरश्रेष्ठ दुंदुभी धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें वेगावेगानें हिमालयपर्वतासंबंधीं वनामध्यें गेला १४.

बहुधा भूमौ दुन्दुभिर्विननाद च १५ ततः श्वेताम्बुदाकारः सौम्यः प्रीतिकराकृतिः । हिमवानब्रवीद्वाक्यं स्व एव शिखरे स्थितः १६ क्लेष्टुमर्हसि मां न त्वं दुन्दुभे धर्मवत्सल । रणकर्मस्वकुशलस्तपस्विशरणो ह्यहम् १७ तस्य तद्वचनं श्रुत्वा गिरिराजस्य धीमतः । उवाच दुन्दुभिर्वाक्यं क्रोधात्संरक्तलोचनः १८ यदि युद्धसमर्थस्त्वं मद्भयाद्वा निरुद्यमः । तमाचक्ष्व प्रदद्यान्मे यो हि युद्धं युयुत्सतः १९ हिमवानब्रवीद्वाक्यं श्रुत्वा वाक्यविशारदः । अनुक्तपूर्वं धर्मात्मा क्रोधात्तमसुरोत्तमम् २० वाली नाम महाप्राज्ञ शक्रपुत्रः प्रतापवान् । अध्यास्ते वानरः श्रीमान्किष्किन्धामतुलप्रभाम् २१ स समर्थो महाप्राज्ञस्तव युद्धविशारदः । द्वन्द्वयुद्धं स दातुं ते नमुचेरिव वासवः २२ तं शीघ्रमभिगच्छ त्वं यदि युद्धमिहेच्छसि । स हि दुर्मर्षणो नित्यं शूरः समरकर्मणि २३ श्रुत्वा हिमवतो वाक्यं कोपाविष्टः स दुन्दुभिः । जगाम तां पुरीं तस्य किष्किन्धां वालिनस्तदा २४ धारयन्माहिषं वेषं तीक्ष्णशृङ्गो भयावहः । प्रावृषीव मह-

---

नंतर त्या पर्वतावरील मोठमोठ्या गजांसारिख्या श्वेतवर्ण शिला भूमीवर नानाप्रकारांनीं फेंकून देऊन तो दुंदुभी गर्जना करूं लागला १५. तेव्हां श्वेतवर्ण मेघासारिख्या आकारानें युक्त, आनंददायक मुद्रा धारण केलेला व दिसण्यांतही सौम्य असलेला हिमवान् पर्वत स्वतःच्याच शिखरावर उभा राहून त्याला ह्मणाला १६ "हे धर्मवत्सल दुंदुभे, तूं मला क्लेश देऊं नकोस; तपस्वी जनांना आश्रयभूत असलेला मी रणकर्मामध्यें प्रवीण नाहीं" १७. हें त्या विचारी पर्वतराजाचें भाषण श्रवण केल्यावर क्रोधानें डोळे लाल झालेला दुंदुभी त्याला ह्मणाला १८ "तूं जर युद्ध करण्यास असमर्थ असशील किंवा माझ्या भीतीमुळें निश्चेष्ट झाला असशील तर मज युद्धेच्छूशीं युद्ध करणारा कोण तो मला सांग" १९. हें भाषण श्रवण केल्यावर त्यावेळपर्यंत युद्ध करणारा असा ज्याला कोणी सांगितलाच नव्हता त्या असुरश्रेष्ठाला रागारागानें तो धर्मात्मा हिमवान् पर्वत ह्मणाला २० "हे महाबुद्धिमान् दुंदुभे, वाली ह्मणून एक प्रतापी व वैभवशाली इंद्रपुत्र वानर अतुलप्रभेनें युक्त असलेल्या किष्किंधानगरीमध्यें वास्तव्य करीत आहे २१. तो महाबुद्धिमान् वाली युद्धामध्यें निपुण असून नमुचिनामक असुराशीं युद्ध करण्यास समर्थ असलेल्या इंद्राप्रमाणें तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करण्यास समर्थ आहे २२. तस्मात्, ह्या भूतलावर जर तुला युद्ध करण्याची इच्छा असेल तर तूं सत्वर तिकडे जा; तो नेहमींच क्रुद्ध असून संग्रामकर्मामध्यें शूर आहे" २३. हें हिमवान् पर्वताचें भाषण श्रवण केल्यावर दुंदुभी क्रुद्ध झाला आणि

मेघस्तोयपूर्णो नभस्तले २५ ततस्तु द्वारमागम्य किष्किन्धाया महाबलः । ननर्द कम्पयन्भूमिं दुन्दुभिर्दुन्दुभिर्यथा २६ समीपजान्द्रुमान्भञ्जन्वसुधां दारयन्खुरैः । विषाणेनोल्लिखन्दर्पात्तद्द्वारं द्विरदो यथा २७ अन्तःपुरगतो वाली श्रुत्वा शब्दममर्षणः । निष्पपात सह स्त्रीभिस्ताराभिरिव चन्द्रमाः २८ मितं व्यक्ताक्षरपदं तमुवाच स दुन्दुभिम् । हरीणामीश्वरो वाली सर्वेषां वनचारिणाम् २९ किमर्थं नगरद्वारमिदं रुद्ध्वा विनर्दसे । दुन्दुभे विदितो मेसि रक्ष प्राणान्महाबल ३० तस्य तद्वचनं श्रुत्वा वानरेन्द्रस्य धीमतः । उवाच दुन्दुभिर्वाक्यं क्रोधात्संरक्तलोचनः ३१ न त्वं स्त्रीसंनिधौ वीर वचनं वक्तुमर्हसि । मम युद्धं प्रयच्छाद्य ततो ज्ञास्यामि ते बलम् ३२ अथवा धारयिष्यामि क्रोधमद्य निशामिमाम् । गृह्यतामुदयः स्वैरं कामभोगेषु वानर ३३ दीयतां संप्रदानं च परिष्वज्य च वानरान् । सर्वशाखामृगेन्द्रस्त्वं संसाधय सुहृज्जनम् ३४ सुदृष्टां कुरु किष्किन्धां कुरुष्वा-

---

वालीच्या किष्किंधानगरीमध्यें गेला २४. जातांना त्यानें महिषाचा वेष धारण केला असल्यामुळें तो तीक्ष्ण शृंगांनीं युक्त होऊन भयावह झाला होता आणि पर्जन्यकालीं आकाशामध्यें असलेल्या जलपूर्ण महामेघाप्रमाणें दिसत होता २५. असो. तदनंतर तो महाबलाढ्य दुंदुभी किष्किंधानगरीच्या द्वारापाशीं आला आणि भूमि कंपित करीत करीत दुंदुभीप्रमाणें गर्जना करूं लागला २६. इतकेंच नव्हे परंतु; समीप असलेले वृक्ष मोडूं लागला, खुरांनीं पृथ्वी विदीर्ण करूं लागला आणि गर्वामुळें शृंगांच्या योगानें तें द्वार हत्तीप्रमाणें उखळून टाकूं लागला २७. तेव्हां तो शब्द ऐकिल्यावर अंतःपुरामध्यें असलेला वाली क्रुद्ध झाला आणि तारांनीं युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें स्त्रियांसहवर्तमान, बाहेर पडला २८. नंतर वनामध्यें संचार करणाऱ्या सर्व वानरांचा अधिपती तो वाली ज्यांतील अक्षरांचा व शब्दांचा उच्चार स्पष्ट आहे असें मित भाषण दुंदुभीशीं करूं लागला २९. ( तो ह्मणाला ) " हे दुंदुभे, हें नगराचें द्वार अडवून धरून तूं कशाकरितां गर्जना करीत आहेस ? हे महाबलाढ्य दुंदुभे, तूं मला विदित आहेस; आपल्या प्राणांचें संरक्षण कर " ३०. हें त्या विचारी वानरराजाचें भाषण श्रवण करून क्रोधानें नेत्र आरक्तवर्ण झालेला दुंदुभी त्याला ह्मणाला ३१ " हे वीरा, स्त्रियांचें संनिध असें भाषण करणें तुला योग्य नाहीं. आज तूं माझ्याशीं युद्ध कर ह्मणजे तुझें काय सामर्थ्य आहे तें आढळून येईल ३२. अथवा ही रात्र संपेपर्यंत मी आपला क्रोध आज आंवरून धरीन. हे वानरा, सूर्योदयापर्यंत तुला काय विषयांचा उपभोग घेणें असेल तो खुशाल घे ३३, दान दे, मित्रांचाही निरोप घे

त्समम् पुरं । क्रीडस्व च समं स्त्रीभिरहं ते दर्पशासनः ३५ यो हि मत्तं प्रमत्तं वा भग्नं वा रहितं कृशम् । हन्यात्स भ्रूणहा लोके त्वद्विधं मदमोहितम् ३६ स प्रहस्याब्रवीन्मन्दं क्रोधात्तमसुरेश्वरम् । विसृज्य ताः स्त्रियः सर्वास्ताराप्रभृतिकास्तदा ३७ मत्तोयमिति मामंस्था यद्यभीतोसि संयुगे । मदोयं संप्रहारेस्मिन्वीरपानं समर्थ्यताम् ३८ तमेवमुक्त्वा संक्रुद्धो मालामुत्क्षिप्य काञ्चनीम् । पित्रा दत्तां महेन्द्रेण युद्धाय व्यवतिष्ठत ३९ विषाणयोर्गृहीत्वा तं दुन्दुभिं गिरिसंनिभम् । अविध्यत तदा वाली विनदन्कपिकुञ्जरः ४० वाली व्यापादयांचक्रे ननर्द च महास्वनम् । श्रोत्राभ्यामथ रक्तं तु तस्य सुस्राव पात्यतः ४१ तयोस्तु क्रोधसंरम्भात्परस्परजयैषिणोः । युद्धं समभवद्घोरं दुन्दुभेर्वालिनस्तथा ४२ अयुध्यत तदा वाली शक्रतुल्यपराक्रमः । मुष्टिभिर्जानुभिः पद्भिः शिलाभिः पादपैस्तथा ४३ परस्परं घ्नतोस्तत्र वानरासुरयोस्तदा । आसीद्धीनोसुरो युद्धे शक्रसूनुर्व्य-

---

आणि वानरांना भेट. कारण, तूं सर्व वानरांचा राजा आहेस ३४ किष्किंधानगरी एकदां चांगली पाहून घे. त्या राजधानीमध्यें कोणी आपल्यासारिखा राजा नेमून टाक आणि स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करून घे. मी तुझा दर्प ( सूर्योदय झाला ह्मणजे ) नाहींसा करीन ३५. कारण, मत्त, बेसावध, भग्न, आयुधादिकांनीं शून्य, कृश अथवा तुझ्यासारिख्या मदमोहित पुरुषाचा जो वध करितो त्याला ह्या जगतामध्यें भ्रूणहत्येचें पातक लागतें " ३६. ह्यानंतर त्या सर्व ताराप्रभृति स्त्रिया सोडून देऊन व किंचित् हास्य करून वाली रागारागानें त्या असुराधिपतीला ह्मणाला ३७ " युद्धाविषयीं जर तुला भय नसेल तर—हा मत्त झाला आहे—असें तूं समजूं नकोस. हा मद जरी स्त्रीसांनिध्यामुळें आलेला आहे तरी तुझ्याशीं होणाऱ्या ह्या युद्धामध्यें मन उत्साहयुक्त होण्याकरितां केलेल्या वीरपानाचा हा परिणाम आहे असें तूं समज " ३८. ह्याप्रमाणें त्या असुराला बोलून अत्यंत क्रुद्ध झालेला तो वाली पित्या इंद्रानें दिलेली सुवर्णमाला गळ्यांत घालून युद्धाकरितां उभा राहिला ३९ आणि महिषरूप धारण करणाऱ्या त्या पर्वतप्राय दुंदुभीचीं शिंगें धरून गर्जना करीत करीत त्या वानरराज वालीनें त्याला फेंकून दिलें ४०. सारांश, वालीनें उच्च स्वरानें गर्जना करून त्याला खालीं पाडिलें तेव्हां पडतां पडतां त्याच्या कानांतून रक्तस्राव होऊं लागला ४१. तात्पर्य, परस्परांना जिंकण्याची इच्छा करणाऱ्या त्या उभयतां वालिदुंदुभींमध्यें क्रोधाच्या आवेशामुळें घोर युद्ध झालें ४२. इंद्रतुल्यपराक्रमी वालीनें त्या दुंदुभीला मुष्टी, गुढगे, लत्ता, पाषाण व वृक्ष ह्यांनीं प्रहार केला ४३ व

वर्धत ४४ तं तु दुन्दुभिमुद्यम्य धरण्यामभ्यपातयत् । युद्धे प्राणहरे तस्मि-
न्निष्पिष्टो दुन्दुभिस्तदा ४५ स्रोतोभ्यो बहु रक्तं तु तस्य सुस्राव पात्यतः ।
पपात च महाबाहुः क्षितौ पञ्चत्वमागतः ४६ तं तोलयित्वा बाहुभ्यां
गतसत्त्वमचेतनम् । चिक्षेप वेगवान्वाली वेगेनैकेन योजनम् ४७ तस्य
वेगप्रविद्धस्य वक्त्रात्क्षतजबिन्दवः । प्रपेतुर्मारुतोत्क्षिप्ता मतङ्गस्याश्रमं
प्रति ४८ तान्दृष्ट्वा पतितांस्तत्र मुनिः शोणितविप्रुषः । क्रुद्धस्तस्य महा-
भाग चिन्तयामास को न्वयम् ४९ येनाहं सहसा स्पृष्टः शोणितेन दुरा-
त्मना । कोयं दुरात्मा दुर्बुद्धिरकृतात्मा च बालिशः ५० इत्युक्त्वा स
विनिष्क्रम्य ददृशे मुनिसत्तमः । महिषं पर्वताकारं गतासुं पतितं भुवि ५१
स तु विज्ञाय तपसा वानरेण कृतं हि तत् । उत्ससर्ज महाशापं क्षेप्तारं
वानरं प्रति ५२ इह तेनाप्रवेष्टव्यं प्रविष्टस्य वधो भवेत् । वनं मत्संश्रयं
येन दूषितं रुधिरस्रवैः ५३ क्षिपता पादपाश्चेमे संभग्नाश्चासुरीं तनुम् ।

---

ह्याप्रमाणें ते दैत्यवानर एकमेकाना प्रहार करूं लागले असतां त्या युद्धामध्यें दैत्याचा पक्ष कमी पडून इंद्रपुत्र वालीची सरशी झाली ४४. शेवटीं वालीनें त्या दुंदुभीला उचलून भूमीवर पाडिलें आणि ह्याप्रमाणें त्या प्राणनाशक युद्धामध्यें दुंदुभीचा नाश झाला ४५. दुंदुभी पडतां पडतां त्याच्या नासिकाप्रभृतिद्वारांतून अतिशयच रक्त वाहूं लागलें व तो महापराक्रमी दुंदुभी पृथ्वीवर पडून मृत्यु पावला ४६. तेव्हां गतप्राण होऊन निश्चेष्ट पडलेल्या त्या दुंदुभीला (आजमावून पहाण्याकरितां) तोलून धरून वेगवान् वालीनें एका हिसकयाबरोबर एक योजनपर्यंत दूर फेंकून दिलें ४७. ह्याप्रमाणें त्या दुंदुभीला वेगानें फेंकून दिलें असतां त्याच्या मुखापासून निघालेले रक्तबिंदु वाऱ्यानें उडून मतंगमुनींच्या आश्रमांत जाऊन पडले ४८. तेव्हां, हे महाभाग्यवान् रामा, त्या असु-राचे ते रक्तबिंदु तेथें पडलेले पाहून मतंगमुनि क्रुद्ध झाले आणि हा कोण ह्मणून विचार करूं लागले ४९. "ज्या दुरात्म्यानें एकाएकीं मला रक्ताचा स्पर्श केला असा हा अविचारी, उल्लू, मूर्ख व दुरात्मा कोण आहे?" ५० असा विचार करून ते श्रेष्ठ मुनि बाहेर पडले असतां एक पर्वतप्राण महिष गतप्राय होऊन पृथ्वीवर पडलेला त्यांनीं पाहिला ५१ आणि हें काम वानराचें आहे असें तपःसामर्थ्यानें जाणून त्या महिषाला फेंकून देणाऱ्या वानराला उद्देशून त्या मुनींनीं मोठा शापही दिला ५२. (ते ह्मणाले) "ज्यानें हें कृत्य केलें त्यानें ह्या ठिकाणीं प्रवेश करितां उपयोगीं नाहीं. माझ्या आश्रमाला असलेलें हें वन रुधिरस्रावाच्या योगानें ज्यानें दूषित केलें तो येथें प्रविष्ट झाल्यास त्याचा वध होईल ५३. असुराचा देह फेंकून देतांना ज्यानें हे वृक्ष

समन्तादाश्रमं पूर्णं योजनं मामकं यदि ५४ आक्रमिष्यति दुर्बुद्धिर्व्यक्तं स न भविष्यति । ये चास्य सचिवाः केचित्संश्रिता मामकं वनम् ५५ न च तैरिह वस्तव्यं श्रुत्वा यान्तु यथासुखम् । तेपि वा यदि तिष्ठन्ति शपिष्ये तानपि ध्रुवम् ५६ वनेस्मिन्मामके नित्यं पुत्रवत्परिरक्षिते । पत्राङ्कुरविनाशाय फलमूलाभवाय च ५७ दिवसश्चाद्य मर्यादा यं द्रष्टा श्वोस्मि वानरम् । बहुवर्षसहस्राणि स वै शैलो भविष्यति ५८ ततस्ते वानराः श्रुत्वा गिरं मुनिसमीरिताम् । निश्चक्रमुर्वनात्तस्मात्तान्दृष्ट्वा वालिरब्रवीत् ५९ किं भवन्तः समस्ताश्च मतङ्गवनवासिनः । मत्समीपमनुप्राप्ता अपि स्वस्ति वनौकसाम् ६० ततस्ते कारणं सर्वं तथा शापं च वालिनः । शशंसुर्वानराः सर्वे वालिने हेममालिने ६१ एतच्छ्रुत्वा तदा वाली वचनं वानरेरितम् । स महर्षिं समासाद्य याचते स्म कृताञ्जलिः ६२ महर्षिस्तमनादृत्य प्रविवेशाश्रमं प्रति । शापधारणभीतस्तु वाली विह्वलतां गतः ६३ ततः शापभयाद्भीतो

---

मोडून टाकिले तो ह्या माझ्या आश्रमाच्या आसपास एक संपूर्ण योजनपर्यंत ५४ जर येईल तर तो दुर्बुद्धि निःसंशय जिवंत राहणार नाहीं. त्याचप्रमाणें जे कोणी त्याचे मंत्री माझ्या वनाचा आश्रय करून राहिले असतील ५५ त्यांनींही येथें वास्तव्य न करितां हें माझें भाषण ऐकून ( इच्छेस येईल तिकडे ) सुखानें चालतें व्हावें. ते जर येथें रहातील तर मी त्यांनाही निःसंशय शाप देईन ५६. पुत्राप्रमाणें नेहमीं सर्वस्वीं संभाळिलेल्या माझ्या वनामध्यें वानरांचें आगमन पानें, अंकुर, फळें व मुळें ह्यांच्या नाशाकरितांच होत असतें ५७. ह्यास्तव, माझ्या शापाला हा आजचाच दिवस काय तो अवधि आहे; परंतु, ( वालीशीं संबंध असलेला ) असा जो वानर उद्यींक येथें माझ्या दृष्टीं पडेल तो पुष्कळ वर्षेंपर्यंत पर्वत होऊन पडेल ५८. ह्याप्रमाणें मुनींनीं उच्चारिलेली ती शापवाणी श्रवण केल्यावर तेथें असलेले ते वानर त्या वनांतून चालते झाले असतां त्यांना अवलोकन करून वाली ह्मणाला ५९. " मतंग मुनींच्या वनामध्यें वास्तव्य करणारे तुह्मी सर्वजण माझ्यासमीप कशाकरितां आलां आहांत ? तुह्मां वनचरांचें कुशल आहे नां ? ६०. असें वालीनें विचारिलें असतां सुवर्णमाला धारण केलेल्या त्या वालीला मतंगमुनींनीं दिलेला शाप व त्याचें सर्व कारण त्या संपूर्ण वानरांनीं कथन केलें ६१. तेव्हां वानरांनीं कथन केलेलें तें भाषण श्रवण करून वाली त्या मतंगमहर्षींकडे गेला आणि हात जोडून प्रार्थना करूं लागला ६२. तथापि, त्याची पर्वा न करितां मतंगमुनि आश्रमामध्यें गेले व शापविषयक दोष समजून

ऋष्यमूकं महागिरिम्। प्रवेष्टुं नेच्छति हरिर्द्रष्टुं वापि नरेश्वर ६४ तस्याप्रवेशं ज्ञात्वाहमिदं राम महावनम्। विचरामि सहामात्यो विषादेन विवर्जितः ६५ एषोऽस्थिनिचयस्तस्य दुन्दुभेः संप्रकाशते। वीर्योत्सेकान्निरस्तस्य गिरिकूटनिभो महान् ६६ इमे च विपुलाः सालाः सप्तशाखावलम्बिनः। यत्रैकं घटते वाली निष्पत्रयितुमोजसा ६७ एतदस्यासमं वीर्यं मया राम प्रकाशितम्। कथं तं वालिनं हन्तुं समरे शक्ष्यसे नृप ६८ तथा ब्रुवाणं सुग्रीवं प्रहसँल्लक्ष्मणोऽब्रवीत्। कस्मिन्कर्मणि निर्वृत्ते श्रद्दध्या वालिनो वधम् ६९ तमुवाचाथ सुग्रीवः सप्त सालानिमान्पुरा। एवमेकैकशो वाली विव्याधाथ स चासकृत् ७० रामो निर्दारयेदेषां बाणेनैकेन च द्रुमम्। वालिनं निहतं मन्ये दृष्ट्वा रामस्य विक्रमम् ७१ हतस्य महिषस्यास्थि पादेनैकेन लक्ष्मण। उद्यम्य प्रक्षिपेच्चापि तरसा द्वे धनुःशते ७२ एवमुक्त्वा तु सुग्रीवो रामं रक्तान्तलो-

---

आल्यामुळें भयभीत झालेला वाली अंतःकरणामध्यें अगदीं विह्वल होऊन गेला ६३ तेव्हांपासून शापाच्या भयाला भीत असलेला वानर वाली, हे प्रजाधिपते, ऋष्यमूकसंज्ञक महापर्वतावर प्रवेश करीत नाहीं अथवा तो पर्वत पहाण्याचेंही मनामध्यें आणीत नाहीं ६४. तस्मात्, हे रामा, ह्या महावनामध्यें त्याचा प्रवेश होणें नाहीं असें समजून कसलीही भीति न बाळगितां मी अमात्यांसहवर्तमान येथें संचार करीत असतों ६५. वीर्याचा गर्व झाल्यामुळें फेंकला गेलेल्या त्या दुंदुभीचा हा अस्थींचा पर्वतप्राय मोठा ढीग पडला आहे ६६. हे जे मोठमोठ्या शाखांनीं युक्त असलेले प्रचंड सात सालवृक्ष आहेत ते वाली शेजारून गेला असतां सर्वही एकदम त्याच्या वेगानें कंपित होऊन पर्णरहित होणारे आहेत ६७. सारांश, हे रामा, हें त्याचें अतुल वीर्य मीं तुला उघड करून सांगितलें आहे. तस्मात्, हे राजा, समरांगणामध्यें त्या वालीचा वध करण्यास तूं कसा बरें समर्थ होशील ?" ६८. ह्याप्रमाणें सुग्रीव बोलत असतांना "काय केलें म्हणजे वालीचा वध रामाचे हातून होण्याविषयीं तुला विश्वास येईल?" म्हणून लक्ष्मणानें हंसत हंसत त्याला विचारिलें असतां ६९ सुग्रीव त्याला म्हणाला "पूर्वी एकेवेळीं ह्या सातही सालवृक्षांची वाली नेहमीं अशी दुर्दशा करीत असे ७०. ह्यास्तव, ह्या वृक्षांपैकीं एक वृक्ष जरी एका बाणानें रामानें विदीर्ण करून टाकिला तरी सुद्धां हा रामाचा पराक्रम अवलोकन करून मी वालीचा वध झाला असेंच समजेन ७१. त्याचप्रमाणें, हे लक्ष्मणा, वध पावलेल्या ह्या महिषरूप दुंदुभीच्या अस्थींचा ढीग एका पायानें उचलून आपल्या सामर्थ्यानें जर दोनशें धनुष्येंपर्यंत रामानें फेंकून दिला तरीही

चनः । ध्यात्वा मुहूर्तं काकुत्स्थं पुनरेव वचोऽब्रवीत् ७३ शूरश्च शूर-मानी च प्रख्यातबलपौरुषः । बलवान्वानरो वाली संयुगेष्वपराजितः ७४ दृश्यन्ते चास्य कर्माणि दुष्कराणि सुरैरपि । यानि संचिन्त्य भीतोऽहमृष्यमूक-मुपाश्रितः ७५ तमजय्यमधृष्यं च वानरेन्द्रममर्षणम् । विचिन्तयन्नमुं चापि ऋष्यमूकममुं त्वहम् ७६ उद्विग्नः शङ्कितश्चाहं विचरामि महावने । अनुरक्तैः सहामात्यैर्हनूमत्प्रमुखैर्वरैः ७७ उपालब्धं च मे श्लाघ्यं सन्मित्रं मित्र-वत्सल । त्वामहं पुरुषव्याघ्र हिमवन्तमिवाश्रितः ७८ किं तु तस्य बल-ज्ञोऽहं दुर्भ्रातुर्बलशालिनः । अप्रत्यक्षं तु मे वीर्यं समरे तव राघव ७९ न खल्वहं त्वां तुलये नावमन्ये न भीषये । कर्मभिस्तस्य भीमैश्च कातर्यं जनितं मम ८० कामं राघव ते वाणी प्रमाणं धैर्यमाकृतिः । सूचयन्ति परं तेजो भस्मच्छन्नमिवानलम् ८१ तस्य तद्वचनं श्रुत्वा सुग्रीवस्य

---

मी वालीचा वध झाला असें समजेन " ७२. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला बोलून आरक्तवर्ण नेत्रप्रांतांनीं युक्त असलेला तो सुग्रीव ककुत्स्थकुलोत्पन्न रामाविषयीं क्षणभर विचार करून पुनरपि ह्मणाला ७३ " वालीचें सामर्थ्य व पौरुष प्रख्यात असून स्वतःला शूर समजणारा तो शूर व बलाढ्य वानर युद्धामध्यें अजिंक्य आहे ७४ आणि देवां-च्याही हातून होण्यास दुर्घट अशीं ह्याचीं कृत्यें माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहेत तीं मनांत आणून मी भयभीत झालों असल्यामुळें ऋष्यमूकपर्वताचा आश्रय करून राहिलों आहें ७५. सारांश, त्या क्रुद्ध वानरराजाचा पराजय होणें अथवा त्याच्यावर हल्ला होणेंही अशक्य आहे असें समजून आणि ऋष्यमूकपर्वतावर त्याचा प्रवेश होणें नाहीं हें लक्ष्यांत आणून मी ७६ नेहमीं उद्विग्न व साशंक राहून ह्या महावनामध्यें माझे ठिकाणीं प्रेम करणाऱ्या ह्या हनुमत्प्रभृति श्रेष्ठ श्रेष्ठ अमात्यांसहवर्तमान संचार करीत असतां ७७. हे मित्रवत्सला, आतां मला प्रशंसेस पात्र असा सन्मित्र प्राप्त झाला आहे आणि, हे पुरुषश्रेष्ठा, हिमालयपर्वताप्रमाणें निश्चल असलेल्या तुझा आश्रय करून मी राहिलों आहें ७८. तथापि, त्या बलाढ्य दुष्ट भ्रात्याचें बल मला विदित असून, हे राघवा, समरांगणामध्यें तुझें वीर्य माझ्या अवलोकनांत आलेलें नाहीं ७९. ह्यामुळें तुझी त्याच्याशीं तुलना करण्याचा, तुझा अवमान करण्याचा अथवा तुझे ठिकाणीं भीति उत्पन्न करण्याचा जरी माझा उद्देश नाहीं तरी त्या वालीच्या भयंकर कर्मांमुळें मला भीति उत्पन्न झालेली आहे ८०. हे राघवा, तुझी प्रमाणभूत वाणी, धैर्य व मुद्रा हीं भस्मानें आच्छादित झालेल्या अग्नीप्रमाणें तुझे ठिकाणीं उत्कृष्ट तेज असल्याचें खरोखर सुचवीत आहेत" ८१. हें महात्म्या सुग्रीवाचें

महात्मनः । स्मितपूर्वमतो रामः प्रत्युवाच हरिं प्रति ८२ यदि न प्रत्ययोस्मासु विक्रमे तव वानर । प्रत्ययं समरे श्लाघ्यमहमुत्पादयामि ते ८३ एवमुक्त्वा तु सुग्रीवं सान्त्वयँल्लक्ष्मणाग्रजः । राघवो दुन्दुभेः कायं पादाङ्गुष्ठेन लीलया ८४ तोलयित्वा महाबाहुश्चिक्षेप दश योजनम् । असुरस्य तनुं शुष्कां पादाङ्गुष्ठेन वीर्यवान् ८५ क्षिप्तं दृष्ट्वा ततः कायं सुग्रीवः पुनरब्रवीत् । लक्ष्मणस्याग्रतो रामं तपन्तमिव भास्करम् ८६ हरीणामग्रतो वीरमिदं वचनमर्थवत् ८७ आर्द्रः समांसः प्रत्यग्रः क्षिप्तः कायः पुरा सखे । परिश्रान्तेन मत्तेन भ्रात्रा मे वालिना तदा ८८ लघुः संप्रति निर्मांसस्तृणभूतश्च राघव । क्षिप्त एवं प्रहर्षेण भवता रघुनन्दन ८९ नात्र शक्यं बलं ज्ञातुं तव वा तस्य वाधिकम् । आर्द्रं शुष्कमिति ह्येतत्सुमहद्राघवान्तरम् ९० स एव संशयस्तात तव तस्य च यद्बलम् । सालमेकं विनिर्भिद्य भवेद्व्यक्तिर्बलाबले ९१ कृत्वैतत्कार्मुकं सज्यं हस्तिहस्तमिवापरम् । आकर्णपूर्णमायम्य विसृजस्व महाशरम् ९२ इमं हि

---

भाषण श्रवण केल्यावर राम हास्यपूर्वक त्या वानराला ह्मणाला ८२ " हे वानरा, पराक्रमासंबंधानें जर आमच्याविषयीं तुला विश्वास नसेल तर समरांगणामध्यें प्रशंसेस पात्र होणारी अशी प्रतीति मी तुला आणून देतों " ८३. ह्याप्रमाणें सुग्रीवाला सांगून त्याचें सांत्वन करण्याकरितां रघुवंशज रामानें पायाच्या अंगठ्यानें तें दुंदुभीचें शरीर सहज तोलून धरिलें ८४ आणि नंतर अजमाऊन पाहून त्या वीर्यवान् महापराक्रमी रामानें दैत्याचें तें शुष्क शरीर पायाच्या अंगठ्यानें दहा-योजनें लांब फेंकून दिलें ८५. तेव्हां तें शरीर फेंकून दिलेलें पाहून सुग्रीव लक्ष्मणासमोर सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या वीर रामाला वानरांचे समक्ष अर्थपरिपूर्ण वाणीचें अवलंबन करून ह्मणाला ८६, ८७ " आर्द्र, मांसपरिपूर्ण व ताजा असा देह पूर्वीं, हे मित्रा, श्रांत व मत्त झालेल्या माझ्या भ्रात्या वालीनें फेंकून दिला होता ८८; परंतु, सांप्रत मांसरहित झालेला हा देह, हे राघवा, तृणासारिखा हलका झालेला आहे आणि ह्मणून, हे रघुनंदना, ह्याप्रमाणें आनंदानें तो तुला फेंकून देतां आला आहे ८९. तस्मात्, ह्यावरून ताडून पाहूं लागलें असतां तुझें बल जास्त अथवा वालीचें जास्त हें समजणें शक्य नाहीं. कारण, हे राघवा, आर्द्र आणि शुष्क हें अंतर फारच मोठें आहे ९०. बा रामा, तुझें व त्याचें बल किती आहे ह्याविषयीं संशय पूर्वींप्रमाणें अद्यापही मला आहेच. ह्यास्तव, सात सालवृक्षांपैकीं एकाचा भेद झाल्यानें बलाबलाविषयीं फोड होणार आहे ९१. तस्मात् दुसरी गजशुंडाच कीं काय असें

सालं प्रहितस्त्वया शरो न संशयोत्रास्ति विदारयिष्यति । अलं विमर्शेन मम प्रियं ध्रुवं कुरुष्व राजन्प्रतिशापितो मया १३ यथा हि तेजःसु वरः सदा रविर्यथा हि शैलो हिमवान्महाद्रिषु । यथा चतुष्पत्सु च केसरी वरस्तथा नराणामसि विक्रमे वरः १४ [ ५१९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकादशः सर्गः ॥ ११ ॥

एतच्च वचनं श्रुत्वा सुग्रीवस्य सुभाषितम् । प्रत्ययार्थं महातेजा रामो जग्राह कार्मुकम् १ स गृहीत्वा धनुर्घोरं शरमेकं च मानदः । सालमुद्दिश्य चिक्षेप पूरयन्स रवैर्दिशः २ स विसृष्टो बलवता बाणः स्वर्णपरिष्कृतः । भित्त्वा तालान्गिरिप्रस्थं सप्तभूमिं विवेश ह ३ सायकस्तु मुहूर्तेन तालान्भित्त्वा महाजवः । निष्पत्य च पुनस्तूर्णं तमेव प्रविवेश ह ४ तान्दृष्ट्वा सप्त निर्भिन्नान्सालान्वानरपुङ्गवः । रामस्य शरवेगेन विस्मयं परमं गतः ५ स मूर्ध्ना न्यपतद्भूमौ प्रलम्बी कृतभूषणः । सुग्रीवः परमप्रीतो राघवाय कृताञ्जलिः ६ इदं चोवाच धर्मज्ञं कर्मणा तेन हर्षितः ।

---

धनुष्य सज्ज करून व कानापर्यंत ताणून तूं मोठा बाण सोड १२. तूं सोडिलेला बाण ह्या सालवृक्षाला विदीर्ण करून टाकील ह्याविषयीं मला संशय नाहीं. ह्यास्तव, विचार न करितां, हे राजा, माझा मनोरथ निःसंशय परिपूर्ण कर; तुला माझी शपथ आहे १३. अरे, सर्वदां तेजस्व्यांमध्यें जसा रवि श्रेष्ठ आहे, महापर्वतांमध्यें जसा हिमालयपर्वत श्रेष्ठ आहे तसाच पराक्रमसंबंधानें पाहूं गेलें असतां पुरुषांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस १४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

उत्कृष्ट रीतीनें उच्चारिलेलें सुग्रीवाचें हें भाषण श्रवण केल्यावर, त्याला विश्वास येण्याकरितां महातेजस्वी रामानें धनुष्य घेतलें १ आणि त्या मानी रामानें धनुष्य व एक बाण हातीं घेतल्यावर प्रत्यंचेच्या टणत्कारानें दशदिशा नादित करीत करीत सालवृक्षाला उद्देशून तो बाण सोडिला २. बलाढ्य रामानें सोडिलेला तो सुवर्णभूषित बाण सात ताल व त्या तालांना आधारभूत असलेलें पर्वतशिखर भेदून रसातलामध्यें प्रविष्ट झाला ३. इतकेंच नव्हे; परंतु, तो महावेगवान् बाण एका क्षणामध्यें सात ताल भेदून रसातलामध्यें गेल्यावर पुनरपि उड्डाण करून त्याच भात्यामध्यें प्रविष्ट झाला ४. तेव्हां ते सात सालवृक्ष रामाच्या बाणवेगानें विदीर्ण झालेले अवलोकन करितांक्षणीं वानरराज सुग्रीवाला पराकाष्ठेचा विस्मय झाला ५ व भूषणें धारण केलेल्या त्या सुग्रीवानें अत्यंत आनंदित होऊन रामाला शिरसाष्टांग नमस्कार घातला.

रामं सर्वास्त्रविदुषां श्रेष्ठं शूरमवस्थितम् ७ सेन्द्रानपि सुरान्सर्वांस्त्वं बाणैः पुरुषर्षभ । समर्थः समरे हन्तुं किं पुनर्वालिनं प्रभो ८ येन सप्त महातालाा गिरिर्भूमिश्च दारिता । बाणेनैकेन काकुत्स्थ स्थाता ते को रणाग्रतः ९ अद्य मे विगतः शोकः प्रीतिरद्य परा मम । सुहृदं त्वां समासाद्य महेन्द्रवरुणोपमम् १० तमद्यैव प्रियार्थं मे वैरिणं भ्रातृरूपिणम् । वालिनं जहि काकुत्स्थ मया बद्धोयमञ्जलिः ११ ततो रामः परिष्वज्य सुग्रीवं प्रियदर्शनम् । प्रत्युवाच महाप्राज्ञो लक्ष्मणानुगतं वचः १२ अस्माद्गच्छाम किष्किन्धां क्षिप्रं गच्छ त्वमग्रतः । गत्वा चाह्वय सुग्रीव वालिनं भ्रातृगन्धिनम् १३ सर्वे ते त्वरितं गत्वा किष्किन्धां वालिनः पुरीम् । वृक्षैरात्मानमावृत्य ह्यतिष्ठन्गहने वने १४ सुग्रीवोप्यनदद्घोरं वालिनो ह्वानकारणात् । गाढं परिहितो वेगान्नादैर्भिन्दन्निवाम्बरम् १५ तं श्रुत्वा निनदं भ्रातुः क्रुद्धो वाली महाबलः । निष्पपात सुसंरब्धो भास्करोस्तत-

---

नंतर हात जोडून ६ व त्या कृत्यानें हर्षयुक्त होऊन सर्व अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ व शूर अशा तेथें स्थित असलेल्या धर्मवेत्त्या रामाला तो ह्मणाला ७ " हे पुरुषश्रेष्ठा, इंद्रासहवर्तमान सर्व देवांचाही बाणांच्या योगानें समरांगणामध्यें वध करण्यास तूं समर्थ आहेस. मग, हे प्रभो, वालीची तीं कथा काय ? ८. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, ज्यानें प्रचंड सात तालवृक्ष, पर्वत आणि भूमि हीं एका बाणानें विदीर्ण करून टाकिलीं त्या तुझ्याशीं समरांगणामध्यें कोण बरें सामना करणार आहे ? ९. इंद्रवरुणतुल्य असलेला तूं मित्र प्राप्त झाल्यामुळें माझ्या दुःखाच्या आज परिहार झाला असून मला पराकाष्ठेचें सुख झालें आहे १०. तस्मात्, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, माझें प्रिय करण्याकरितां माझ्या भ्रातृरूप वालीसंज्ञक वैऱ्याचा आपण आजच वध करा; मीं हे आपणापुढें हात जोडिले आहेत " ११. तदनंतर लक्ष्मणाप्रमाणें प्रिय ह्मणून स्वीकारिलेल्या आणि ह्मणूनच दर्शनाच्या योगानें आनंद देणाऱ्या सुग्रीवाला कडकडून भेटून महाबुद्धिमान् राम ह्मणाला १२ " हे सुग्रीवा, आपण ह्या ऋष्यमूकपर्वतापासून किष्किंधानगरीला जाऊं. तूं सत्वर पुढें जा आणि पुढें गेल्यावर भ्राता ह्या संज्ञेला व्यर्थ पात्र झालेल्या वालीला आह्वान कर " १३. असें रामानें सांगितल्यानंतर ते सर्वही वालीच्या किष्किंधानगरीमध्यें सत्वर गेले आणि वृक्षांच्या आड आपले देह छपवून ते गहन वनामध्यें उभे राहिले १४. तेव्हां वालीला आह्वान करण्याकरितां वस्त्रानें कंबर घट्ट खेचून आरोळ्यांनीं गगनमंडल विदीर्ण करीतच कीं काय वेगावेगानें सुग्रीवानेंही भयंकर गर्जना केली असतां १५ भ्रात्याची ती गर्जना श्रवण

टादिव १६ ततः सुतुमुलं युद्धं वालिसुग्रीवयोरभूत् । गगने ग्रहयोर्घोरं
बुधाङ्गारकयोरिव १७ तलैरशनिकल्पैश्च वज्रकल्पैश्च मुष्टिभिः । जघ्नतुः
समरेऽन्योन्यं भ्रातरौ क्रोधमूर्च्छितौ १८ ततो रामो धनुष्पाणिस्तावुभौ
समुदैक्षत । अन्योन्यसदृशौ वीरावुभौ देवाविवाश्विनौ १९ यन्नावगच्छ-
त्सुग्रीवं वालिनं वापि राघवः । ततो न कृतवान्बुद्धिं मोक्तुमन्तकरं शरम् २०
एतस्मिन्नन्तरे भग्नः सुग्रीवस्तेन वालिना । अपश्यन्राघवं नाथमृष्यमूकं
प्रदुद्रुवे २१ क्लान्तो रुधिरसिक्ताङ्गः प्रहारैर्जर्जरीकृतः । वालिनाभिद्रुतः
क्रोधात्प्रविवेश महावनम् २२ तं प्रविष्टं वनं दृष्ट्वा वाली शापभयात्ततः ।
मुक्तो ह्यसि त्वमित्युक्त्वा स निवृत्तो महाबलः २३ राघवोपि सह भ्रात्रा
सह चैव हनूमता । तदेव वनमागच्छत्सुग्रीवो यत्र वानरः २४ तं समी-
क्ष्यागतं रामं सुग्रीवः सहलक्ष्मणम् । ह्रीमान्दीनमुवाचेदं वसुधामवलो-

---

करून महाबलाढ्य वाली क्रुद्ध झाला आणि मनामध्यें अतिशय क्षुब्ध होऊन अस्ता-
चलापासून स्वल्पकालामध्यें उदयाचलाला येणाऱ्या सूर्याप्रमाणें तो वेगानें तेथें येऊन
पोंचला १६. तदनंतर आकाशामध्यें बुध व मंगळ ह्या ग्रहांच्या घोर युद्धाप्रमाणेंच कीं
काय वाली व सुग्रीव ह्यामध्यें तुमुल युद्ध झालें १७. त्या युद्धांत वज्रप्राय हस्ततल
आणि मुष्टि ह्यांच्या योगानें त्या क्रोधानें व्याप्त झालेल्या भ्रात्यांनीं एकमेकांना प्रहार
केले १८. नंतर राम धनुष्य हातामध्यें घेऊन त्या उभयतांकडे पाहूं लागला असतां
देव अश्विनीकुमारांप्रमाणें असलेले ते उभयतां वीर एकसारिखेच दिसूं लागले १९.
ह्यामुळें वाली कोणता आणि सुग्रीव कोणता ह्याच्या उमजच रामाला पडला नाहीं
आणि ह्मणूनच त्यानें वालीचा अंत करणारा बाण सोडण्याचें मनामध्यें
आणिलें नाहीं २०. इतक्यांत त्या वालीनें सुग्रीवाला पराजित केलें असतां
नाथ राघव दृष्टीं न पडल्यामुळें तो सुग्रीव ऋष्यमूक पर्वताकडे धावूं लागला २१
आणि रागारागानें वाली पाठोपाठ धांवत असतांही तो महावनामध्यें प्रविष्ट झाला. त्या
वेळीं सुग्रीव फारच श्रमला होता, त्याच्या शरीरावर रक्ताचा सडा झालेला होता आणि
प्रहारांच्या योगानें तो अगदीं जर्जर झालेला होता २२. असा तो वनामध्यें प्रविष्ट
झाल्याचें अवलोकन करून शापभीतीमुळें वाली त्या सुग्रीवाला "तूं सुटलास" असें
ह्मणाला आणि नंतर तो महाबलाढ्य वाली तेथून परत फिरला २३. इतक्यांत भ्राता
लक्ष्मण व हनूमान् ह्यांच्या बरोबर रामही जेथें सुग्रीव वानर होता त्याच वनामध्यें
आला २४. तेव्हां लक्ष्मणासहवर्तमान आलेल्या त्या रामाला अवलोकन करून
लज्जित झालेला सुग्रीव ( मान खालीं घालून ) भूमीकडे पहात पहात

कथन् २५ आह्वयस्वेति मामुक्त्वा दर्शयित्वा च विक्रमम् । वैरिणा घातयित्वा च किमिदानीं त्वया कृतम् २६ तामेव वेलां वक्तव्यं त्वया राघव तत्त्वतः । वालिनं न निहन्मीति ततो नाहमितो व्रजे २७ तस्य चैवं ब्रुवाणस्य सुग्रीवस्य महात्मनः । करुणं दीनया वाचा राघवः पुनरब्रवीत् २८ सुग्रीव श्रूयतां तात क्रोधश्च व्यपनीयताम् । कारणं येन बाणोयं स मया न विसर्जितः २९ अलंकारेण वेषेण प्रमाणेन गतेन च । त्वं च सुग्रीव वाली च सदृशौ स्थः परस्परम् ३० स्वरेण वर्चसा चैव प्रेक्षितेन च वानर। विक्रमेण च वाक्यैश्च व्यक्तिं वां नोपलक्षये ३१ ततोहं रूपसादृश्यान्मोहितो वानरोत्तम । नोत्सृजामि महावेगं शरं शत्रुनिबर्हणम् ३२ जीवितान्तकरं घोरं सादृश्यात्तु विशङ्कितः । मूलघातो न नौ स्याद्धि द्वयोरिति कृतो मया ३३ त्वयि वीर विपन्ने हि अज्ञानाल्लाघवान्मया. । मौढ्यं च मम बाल्यं च ख्यापितं स्यात्कपीश्वर ३४ दत्ताभयवधो नाम पातकं

---

दीन वाणीनें ह्मणाला २५. " वालीला आह्वान कर असें मला सांगून प्रत्यय येण्याकरितां मला पराक्रम दर्शवून आणि माझ्या कडून त्या वैऱ्याची कुचाळी काढून, सांप्रत हें तूं काय केलंस ? २६. हे राघवा, वालीला मी मारणार नाहीं असें त्याच वेळीं तूं मला खरें खरें सांगावयाचें होतेंस ह्मणजे मी येथून गेलों नसतो " २७. ह्याप्रमाणें तो महात्मा सुग्रीव अंतःकरणाला करुणा येण्यासारिख्या दीन वाणीनें बोलूं लागला असतां राम पुनरपि त्याला ह्मणाला २८ " बा सुग्रीवा, क्रोध सोडून दे आणि मी हा बाण न सोडण्याचें कारण काय तें ऐक २९. हे सुग्रीवा, अलंकार, वेष, शरीराची ठेवण आणि चालण्याची ढब ह्यांसंबंधानें तूं व वाली हे उभयतां अगदीं एकमेकांसारिखे आहांत ३०. इतकेंच नव्हे; परंतु, हे वानरा, स्वर, कांति, पहाणें, चालणें आणि भाषण ह्यांसंबंधानें तुह्मा उभयतांमध्यें मला भेद मुळींच दृष्टीं पडत नाहीं ३१. तस्मात्, उभयतांचें रूप अगदीं सारखें असल्यामुळें तूं कोणता आणि वाली कोणता ह्याविषयीं मला मोह पडून मीं प्राणनाशक व शत्रुघातक असा महावेगवान् घोर बाण सोडिला नाहीं. तात्पर्य, उभयतांचें सादृश्य असल्यामुळें वाली कोणता व तूं कोणता ह्याविषयीं मला शंका आली आणि बाण सोडिला असतां कदाचित् (तो तुला लागून ) आपणा उभयतांचा समूल घात होण्याचा प्रसंग येईल ह्याकरितां मीं बाणप्रक्षेप केला नाहीं ३२, ३३. हे वीर वानरराज, अज्ञानामुळें आणि घाईमुळें जर माझ्या हातून तुझा नाश झाला असतां तर माझ्या मूढपणाची व बालिशपणाची मात्र ख्याति होऊन राहिली असती ३४. इतकेंच नव्हे; परंतु, ज्याला अभय

महदद्भुतम् । अहं च लक्ष्मणश्चैव सीता च वरवर्णिनी ३५ त्वदधीना वयं
सर्वे वनेस्मिञ्छरणं भवान् । तस्माद्युध्यस्व भूयस्त्वं मा माशङ्कीश्च वानर ३६
एतन्मुहूर्ते तु मया पश्य वालिनमाहवे । निरस्तमिषुणैकेन चेष्टमानं
महीतले ३७ अभिज्ञानं कुरुष्व त्वमात्मनो वानरेश्वर । येन त्वामभि-
जानीयां द्वन्द्वयुद्धमुपागतम् ३८ गजपुष्पीमिमां फुल्लामुत्पाट्य शुभल-
क्षणाम् । कुरु लक्ष्मण कण्ठेस्य सुग्रीवस्य महात्मनः ३९ ततो
गिरितटे जातामुत्पाट्य कुसुमायुताम् । लक्ष्मणो गजपुष्पीं तां तस्य
कण्ठे व्यसर्जयत् ४० स तया शुशुभे श्रीमाँल्लतया कण्ठसक्तया ।
मालयेव बलाकानां ससंध्य इव तोयदः ४१ विभ्राजमानो वपुषा राम-
वाक्यसमाहितः । जगाम सह रामेण किष्किन्धां पुनराप सः ४२
[ ५६१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्कि-
न्धाकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

ऋष्यमूकात्स धर्मात्मा किष्किन्धां लक्ष्मणाग्रजः । जगाम सह सुग्रीवो

---

त्याचा वध हातून घडला असता ह्मणजे दत्ताभयवधसंज्ञक हें मोठें अद्भुत महापातक मला लागलें असतें. मी, लक्ष्मण व सुंदरी सीता ३५ असे आह्मी सर्व तुझ्या अधीन आहोंत आणि ह्या वनामध्यें तूंच आमचा आश्रय आहेस. तस्मात्, हे वानरा, तूं पुनरपि युद्ध कर आणि मजविषयीं कसलीही शंका घेऊं नको ३६. आतांच्या आतांच युद्धांमध्यें माझ्या हातून एका बाणानें वालीचा नाश होऊन तो भूतलावर तडफड करीत असलेला तूं अवलोकन करशील ३७. परंतु, हे वानरराज, तूं स्वतःविषयीं कांहीं तरी ओळखतां येण्या-सारिखी खूण करून ठेव ह्मणजे द्वंद्वयुद्धामध्यें गुंतलेल्या तुला मी ओळखून काढीन ३८. हे लक्ष्मणा, शुभ लक्षणांनीं युक्त अशी ही प्रफुल्लित झालेली नागपुष्पी लता उप-टून तूं ह्या महात्म्या सुग्रीवाच्या कंठामध्यें घाल " ३९. असें रामानें सांगितल्यानंतर पर्वताचे तटावर उगवलेली ती प्रफुल्लित नागपुष्पी लता उपटून लक्ष्मणानें त्याच्या गळ्यांत घातली असतां ४० तो श्रीमान् सुग्रीव संध्यारागासहवर्तमान असलेला मेघ बगळ्यांच्या मालिकेनें ज्याप्रमाणें शोभतो त्याप्रमाणें त्या कंठगत लतनें शोभूं लागला ४१ आणि रामाच्या सांगण्यावरून अंतःकरणामध्यें स्वस्थ झालेला तो सुग्रीव शरीरानें झळकत झळकत रामासहवर्तमान पुनरपि किष्किंधानगरीमध्यें गेला ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

तो लक्ष्मणाचा ज्येष्ठ भ्राता धर्मात्मा राम ऋष्यमूकपर्वतापासून सुग्रीवासहवर्तमान

वालिविक्रमपालिताम् १ समुद्यम्य महच्चापं रामः काञ्चनभूषितम् । शरांश्चादित्यसंकाशान्गृहीत्वा रणसाधकान् २ अग्रतस्तु ययौ तस्य राघवस्य महात्मनः । सुग्रीवः संहतग्रीवो लक्ष्मणस्य महाबलः ३ पृष्ठतो हनुमान्वीरो नलो नीलश्च वीर्यवान् । तारश्चैव महातेजा हरियूथपयूथपः ४ ते वीक्षमाणा वृक्षांश्च पुष्पभारावलम्बिनः । प्रसन्नाम्बुवहाश्चैव सरितः सागरंगमाः ५ कन्दराणि च शैलांश्च निर्दराणि गुहास्तथा । शिखराणि च मुख्यानि दरीश्च प्रियदर्शनाः ६ वैदूर्यविमलैस्तोयैः पद्मैश्चाकोशकुड्मलैः।शोभितान्सजलान्मार्गे तटाकांश्चावलोकयन् ७ कारण्डैः सारसैर्हंसैर्वञ्जुलैर्जलकुक्कुटैः । चक्रवाकैस्तथा चान्यैः शकुनैः प्रतिनादितान् ८ मृदुशष्पाङ्कुराहारान्निर्भयान्वनचारिणाम् । चरतां सर्वतः पश्यन्स्थलीषु हरिणान्स्थितान् ९ तटाकवैरिणश्चापि शुक्लदन्तविभूषितान् । घोरानेकचरान्वन्यान्द्विरदान्कूलघातिनः १० मत्तान्गिरितटोद्घुष्टान्पर्वता-

---

वालीच्या पराक्रमानें सुरक्षित असलेल्या किष्किंधानगरीमध्यें गेला १ व जातांना आपलें सुवर्णभूषित प्रचंड धनुष्य उचलून धरून समरांगणामध्यें विजय देणारे व प्रभेनें सूर्यासारिखे असलेले बाण त्यानें बरोबर घेतले २. त्या महात्म्या रामाच्या व लक्ष्मणाच्याही पुढें दृढ कंठानें युक्त असलेला महाबलाढ्य सुग्रीव चालूं लागला ३. वानरसेनाधिपतींच्या समुदायाचें रक्षण करणारा महातेजस्वी व सामर्थ्यवान् असा हनूमान्, नल, नील व तार हे वीर मागून चालले ४. जातां जातां पुष्पभारानें नम्र झालेले वृक्ष व निर्मल जल वाहणाऱ्या समुद्रगामी नद्या त्यांच्या अवलोकनांत आल्या ५. त्याचप्रमाणें ज्यांची मुद्रा उत्कृष्ट आहे असे ते हनूमत्प्रभृति वीर जाऊं लागले असतां मंदिरांच्या आकाराची पर्वतविवरें, गुहा, उत्कृष्ट शिखरें आणि दऱ्या त्यांनीं अवलोकन केल्या ६. त्याचप्रमाणें वैडूर्यमण्यासारिख्या निर्मल उदकांनीं आणि अग्रभागापर्यंत कलिकावस्थेंतच असलेल्या (ह्मणजे अर्थात् किंचित् उमललेल्या ) कमलांनीं सुशोभित झालेले सजल तडाग अवलोकन करीत करीत ते चालले ७. कारंडव, सारस, हंस, वंजुल, पाणकोंबडे, चक्रवाक आणि इतरही पक्षी ज्यांचा शब्द ऐकून प्रतिशब्द करीत आहेत ८ व मृदु अशा तृणांकुरांवर ज्यांची उपजीविका आहे अशीं निर्भय हरिणें संचार करणाऱ्या वनचरांच्या स्थानांचें ठिकाणीं चोहोंकडे जातां जातां त्यांच्या दृष्टीं पडत होतीं ९. असो. शुभ्र दंतांनीं भूषित, एकाकी संचार करणारे, नद्यांचीं तीरें पाडणारे आणि ह्मणूनच तटाकांचे शत्रु असलेले, भयंकर, मदमत्त आणि पर्वतावर गर्जना करणारे असून ( आकृतीनें फारच धिप्पाड असल्यामुळें ) संचार करणाऱ्या

निव जङ्गमान् । वानरान्द्विरदप्रख्यान्महीरेणुसमुक्षितान् ११ वने वनचरांश्चान्यान्खेचरांश्च विहंगमान् । पश्यन्तस्त्वरिता जग्मुः सुग्रीववशवर्तिनः १२ तेषां तु गच्छतां तत्र त्वरितं रघुनन्दनः । द्रुमषण्डवनं दृष्ट्वा रामः सुग्रीवमब्रवीत् १३ एष मेघ इवाकाशे वृक्षषण्डः प्रकाशते । मेघसंघातविपुलं पर्यन्तकदलीवृतम् १४ किमेतज्ज्ञातुमिच्छामि सखे कौतूहलं मम । कौतूहलापनयनं कर्तुमिच्छाम्यहं त्वया १५ तस्य तद्वचनं श्रुत्वा राघवस्य महात्मनः । गच्छन्नेवाचचक्षेथ सुग्रीवस्तन्महद्वनम् १६ एतद्राघव विस्तीर्णमाश्रमं श्रमनाशनम् । उद्यानवनसंपन्नं स्वादुमूलफलोदकम् १७ अत्र सप्तजना नाम मुनयः शंसितव्रताः । सप्तैवासन्नधःशीर्षा नियतं जलशायिनः १८ सप्तरात्रे कृताहारा वायुनाचलवासिनः । दिवं वर्षशतैर्याताः सप्तभिः सकलेवराः १९ तेषामेतत्प्रभावेण द्रुमप्राकारसंवृतम् । आश्रमं सुदुराधर्षमपि सेन्द्रैः सुरासुरैः २० पक्षिणो वर्जय-

---

पर्वताप्रमाणेंच भासणारे वन्य गज, पृथ्वीवरील धुळींनें व्याप्त झालेले गजतुल्य वानर १०, ११, इतरही वनचर प्राणी आणि आकाशांत संचार करणारे पक्षी वनामध्यें अवलोकन करीत करीत ते सुग्रीवाच्या आज्ञेंत वागणारे वीर सत्वर चालते झाले १२. ते सत्वर जाऊं लागले असतां वृक्षसमूहानें युक्त असलेलें एक वन अवलोकन करून राम सुग्रीवाला ह्मणाला १३ “ आकाशांतील मेघांप्रमाणें हा वृक्षसमूह झळकत आहे. मेघसमूहाप्रमाणें विपुल आणि सभोंवतीं कदलीवृक्षांनीं व्याप्त असलेलें १४ हें काय आहे तें जाणण्याची माझी इच्छा आहे. हे मित्रा, हें समजण्याविषयीं मला फार उत्कंठा लागलेली आहे आणि ही उत्कंठा तुझ्याकडून तृप्त करवावी अशी माझी इच्छा आहे ” १५. हें महात्म्या रामचंद्राचें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीव जातां जातांच प्रचंड वनाविषयीं रामाला सांगूं लागला १६. ( तो ह्मणाला ) “ हे राघवा, बागा व उपवनें ह्यांनीं समृद्ध आणि मधुर मुळेंफळें व उदक ह्यांनीं युक्त असा हा श्रमनाशक विस्तीर्ण आश्रम आहे १७. ह्या आश्रमामध्यें प्रशंसेस पात्र असें व्रतानुष्ठान करणारे सप्तजननामक सात मुनि मस्तक खालीं ठेऊन ( व पाय वर करून ) आणि नेहमीं जलामध्यें राहून तपश्चर्या करीत होते १८. सात दिवस लोटल्यानंतर केवळ वायूचेंच आहाराकरितां एक वार सेवन करणारे ते पर्वतनिवासी सप्तजनमुनि सातशें वर्षांनीं देहासहवर्तमान स्वर्गाला गेले १९. त्यांच्या प्रभावामुळें वृक्षरूप प्राकारानें परिवेष्टित असलेल्या ह्या आश्रमावर इंद्राचें साहाय्य असलेल्या देवदैत्यांचाही हल्ला होणें अत्यंत दुर्घट झालें आहे २०. पक्ष्यांनीं आणि

न्त्येतत्तथान्ये वनचारिणः। विशन्ति मोहाद्येऽप्यत्र न निवर्तन्ति ते पुनः २१
विभूषणरवाश्चात्र श्रूयन्ते सकलाक्षराः । तूर्यगीतस्वनश्चापि गन्धो
दिव्यश्च राघव २२ त्रेताग्नयोऽपि दीप्यन्ते धूमो ह्येष प्रदृश्यते। वेष्टयन्निव
वृक्षाग्रान्कपोताङ्गारुणो घनः २३ एते वृक्षाः प्रकाशन्ते धूमसंसक्तम-
स्तकाः । मेघजालप्रतिच्छन्ना वैदूर्यगिरयो यथा २४ कुरु प्रणामं
धर्मात्मंस्तेषामुद्दिश्य राघव। लक्ष्मणेन सह भ्रात्रा प्रयतः संहताञ्जलिः २५
प्रणमन्ति हि ये तेषामृषीणां भावितात्मनाम् । न तेषामशुभं किंचि-
च्छरीरे राम विद्यते २६ ततो रामः सह भ्राता लक्ष्मणेन कृताञ्जलिः।
समुद्दिश्य महात्मानस्तानृषीनभ्यवादयत् २७ अभिवाद्य च धर्मात्मा
रामो भ्रात्रा च लक्ष्मणः। सुग्रीवो वानराश्चैव जग्मुः संहृष्टमानसाः २८
ते गत्वा दूरमध्वानं तस्मात्सप्तजनाश्रमात्। ददृशुस्तां दुराधर्षां किष्किन्धां
वालिपालिताम् २९ ततस्तु रामानुजरामवानराः प्रगृह्य शस्त्राण्युदितो-

---

त्याचप्रमाणें इतर वनचर प्राण्यांनीं हा आश्रम वर्ज्य केला असून मोहामुळें जे ह्यांत प्रवेश करितात ते पुनरपि परत येत नाहींत २१. मधुर शब्दांनीं युक्त असे अप्सरांच्या भूषणांचे ध्वनि येथें कानावर येत असून वाद्यें व गायन ह्यांचे ध्वनिही कर्णपथावर येत असतात आणि त्याचप्रमाणें, हे राघवा, दिव्य सुगंधही येथें येत असतो २२. इतकेंच नव्हे; परंतु, अग्निहोत्रसंबंधीं अग्निही येथें प्रज्वलित असतात; कपोतपक्ष्याच्या शरीराप्रमाणें धूसरवर्ण असून मेघाप्रमाणें भासणारा हा धूम वृक्षांचीं अग्रें व्याप्त करीत असल्यासारिखा दिसत आहे २३ आणि मस्तकांचे ठिकाणीं धूमाचा संपर्क झालेले हे वृक्ष मेघसमूहांनीं आच्छादित झालेल्या वैदूर्यरत्नमय पर्वता-सारिखे दिसत आहेत २४. हे धर्मात्म्या रघुवंशजा रामा, भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान हात जोडून तूं नम्र हो आणि त्या मुनींना उद्देशून प्रणाम कर २५. कारण, हे रामा, त्या जितेंद्रिय मुनींना उद्देशून जे प्रणाम करितात त्यांच्या शरीराचे ठिकाणीं कांहींही अशुभ रहात नाहीं " २६. असें सुग्रीवानें सांगितल्यानंतर भ्रात्या लक्ष्मणा-सहवर्तमान रामानें हात जोडिले आणि त्या महात्म्या ऋषींना उद्देशून अभिवंदन केलें २७. भ्रात्यासहवर्तमान अभिवंदन केल्यावर धर्मात्मा राम, लक्ष्मण, सुग्रीव आणि इतर वानर ह्या सर्वांच्या मनाला आनंद झाला व ते पुढें चालते झाले २८. असो. त्या सप्तजनमुनींच्या आश्रमापासून बराच दूर मार्ग चालून गेल्यावर पराजय होण्यास अशक्य अशी ती वालीनें रक्षण केलेली किष्किंधानगरी त्यांनीं अवलोकन केली २९ आणि तदनंतर उत्कट व उग्र तेजानें युक्त झालेले राम, लक्ष्मण व वानर शस्त्रें घेऊन

ग्रतेजसः। पुरीं सुरेशात्मजवीर्यपालितां वधाय शत्रोः पुनरागतास्त्विह ३०
[ ५९१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

सर्वे ते त्वरितं गत्वा किष्किन्धां वालिनः पुरीम् । वृक्षैरात्मानमावृत्य व्यतिष्ठन्गहने वने १ विसार्य सर्वतो दृष्टिं कानने काननप्रियः । सुग्रीवो विपुलग्रीवः क्रोधमाहारयद्भृशम् २ ततस्तु निनदं घोरं कृत्वा युद्धाय चाह्वयत् । परिवारैः परिवृतो नादैर्भिन्दन्निवाम्बरम् ॥ गर्जन्निव महामेघो वायुवेगपुरःसरः ३ अथ बालार्कसदृशो दृप्तसिंहगतिस्ततः । दृष्ट्वा रामं क्रियादक्षं सुग्रीवो वाक्यमब्रवीत् ४ हरिवागुरया व्याप्तां तप्तकाञ्चनभूषणाम् । प्राप्ताः स्म ध्वजयन्त्राढ्यां किष्किन्धां वालिनः पुरीम् ५ प्रतिज्ञा या कृता वीर त्वया वालिवधे पुरा । सफलां कुरु तां क्षिप्रं लतां काल इवागतः ६ एवमुक्तस्तु धर्मात्मा सुग्रीवेण स राघवः । तमेवोवाच वचनं सुग्रीवं शत्रुसूदनः ७ कृताभिज्ञानचिह्नस्त्वमनया गजमाह्वया । लक्ष्मणेन समुत्पाट्य एषा कण्ठे कृता तव ८ शोभसेऽप्यधिकं वीर लतया

---

इंद्रपुत्र वालीच्या सामर्थ्यानें सुरक्षित असलेल्या नगरीमध्यें शत्रूचा वध करण्याकरितां पुनरपि प्रविष्ट झाले ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

वालीच्या किष्किंधानगरीला ते सर्व सत्वर गेल्यावर वृक्षांच्या आड लपून गहन वनामध्यें उभे राहिले असतां १ मोठ्या कंठानें युक्त असलेला वनप्रिय सुग्रीव वनामध्यें चोहोंकडे दृष्टि फेंकल्यावर अत्यंत क्रुद्ध झाला २ आणि परिवारांनीं परिवेष्टित असलेला तो सुग्रीव वायूचा वेग ज्याच्या अग्रभागीं आहे अशा महामेघाप्रमाणें गर्जना करूं लागला आणि ध्वनीच्या योगानें आकाशमंडलाचा भेद करीतच कीं काय भयंकर गर्जना करून त्यानें वालीला युद्धार्थ आह्वान केलें ३. तदनंतर वर्णानें व प्रतापानें बालसूर्याची बरोबरी करणारा आणि मत्त सिंहाप्रमाणें चालणारा सुग्रीव सत्कर्मतत्पर रामाकडे पाहून ह्मणाला ४ " वानररूप जाळ्यानें व्याप्त, सुवर्णभूषणांनीं युक्त आणि ध्वजयंत्रांनीं समृद्ध अशा वालीच्या नगरीला आपण आलों आहों ५. तेव्हां हे वीरा, प्राप्त झालेला ऋतु ज्याप्रमाणें लता फलयुक्त करितो त्याप्रमाणें वालीच्या वधाविषयीं पूर्वीं जी तूं प्रतिज्ञा केली होतीस ती सत्वर सफल कर " ६. ह्याप्रमाणें सुग्रीवानें धर्मात्म्या रामाला सांगितलें असतां तो शत्रुनाशक राम त्या सुग्रीवालाच ह्मणाला ७ " ह्या नागपुष्पी लतेच्या योगानें तूं मला ओळखूं येण्याचें चिह्न धारण केलेलं आहेस,

कण्ठसक्तया । विपरीत इवाकाशे सूर्यो नक्षत्रमालया ९ अद्य वालिस-
मुत्थं ते भयं वैरं च वानर । एकेनाहं प्रमोक्ष्यामि बाणमोक्षेण संयुगे १०
मम दर्शय सुग्रीव वैरिणं भ्रातृरूपिणम् । वाली विनिहतो यावद्वने पांसुषु
चेष्टते ११ यदि दृष्टिपथं प्राप्तो जीवन्स विनिवर्तते । ततो दोषेण मा गच्छेत्सद्यो
गर्हेच्च मां भवान् १२ प्रत्यक्षं सप्त ते ताला मया बाणेन दारिताः । ततो वेत्सि
बलेनाद्य वालिनं निहतं रणे १३ अनृतं नोक्तपूर्वं मे चिरं कृच्छ्रेऽपि तिष्ठता ।
धर्मलोभपरीतेन न च वक्ष्ये कथंचन १४ सफलां च करिष्यामि प्रतिज्ञां
जहि संभ्रमम् । प्रसूतं कलमक्षेत्रं वर्षेणेव शतक्रतुः १५ तदाह्वाननिमित्तं च
वालिनो हेममालिनः । सुग्रीव कुरु तं शब्दं निष्पतेद्येन वानरः १६ जित-
काशी जयश्लाघी त्वया चाधर्षितः पुरात् । निष्पतिष्यत्यसङ्गेन वाली स
प्रियसंयुगः १७ रिपूणां धर्षितं श्रुत्वा मर्षयन्ति न संयुगे । जानन्तस्तु स्वकं
वीर्यं स्त्रीसमक्षं विशेषतः १८ स तु रामवचः श्रुत्वा सुग्रीवो हेमपिङ्गलः ।

---

लक्ष्मणानें ही लता उपटून तुझ्या कंठामध्यें घातलेली आहे ८ व, हे वीरा, आकाशामध्यें नक्षत्रमालेनें परिवेष्टित असलेला सूर्य ज्याप्रमाणें शोभतो त्याप्रमाणें गळ्यामध्यें घातलेल्या ह्या लतेच्या योगानें तूं अधिकच शोभत आहेस ९. असो. हे वानरा, वालीमुळें प्राप्त झालेलें तुझें भय व वैर मी आज युद्धामध्यें एकच बाण सोडून नाहींतशीं करून टाकितों १०. हे सुग्रीवा, त्या भ्रातृरूप वैऱ्याला मला दाखीव ह्मणजे लगेच तो वाली वध होऊन वनामध्यें धुळींत तडफडूं लागेल ११. माझ्या दृष्टीच्या टप्प्यांत येऊन तो वाली जर जिवंत परत गेला तर मी तत्क्षणीं तुझ्या दूषणाला व निंदेला पात्र होईन १२. अरे, तुझ्यासमक्ष मीं सात ताडवृक्ष एका बाणानें विदीर्ण केले आहेत; तेव्हां त्या माझ्या सामर्थ्याच्या बलानें वाली रणामध्यें वध पावून पडलेला आजच तुझ्या आढळण्यांत येईल १३. पुष्कळ दिवसपर्यंत संकटांत असतांनाही धर्मसेवनाच्या इच्छेनें अंतःकरण व्याप्त झाल्यामुळें मीं कधीं पूर्वी अनृत भाषण केलेलें नाहीं व ह्यापुढें कधीं करणारही नाहीं १४. तात्पर्य, उगवलेलें भाताचें शेत वृष्टीच्या योगानें ज्याप्रमाणें इंद्र सफल करितो त्याप्रमाणें मी आपली प्रतिज्ञा सफल करीन; तूं भीति सोडून दे १५. हे सुग्रीवा, सुवर्णमाला धारण केलेल्या वालीला आह्वान करण्याकरितां तूं एकदां गर्जना कर, ह्मणजे तो वानर येथें धांवत येईल १६. सारांश, निर्भय व विजयाची इच्छा करणाऱ्या त्या वालीला संग्राम प्रिय असल्यामुळें तुझें आह्वान होतांक्षणीं विलंब न करितां तो आपल्या नगरांतून धांवत येईल १७. कारण, शत्रूंचें संग्रामामध्यें आह्वान श्रवण केल्यावर स्वतःच्या वीर्या-

ननर्द क्रूरनादेन विनिर्भिन्दन्निवाम्बरम् १९ तत्र शब्देन वित्रस्ता गावो यान्ति हतप्रभाः । राजदोषपरामृष्टाः कुलस्त्रिय इवाकुलाः २० द्रवन्ति च मृगाः शीघ्रं भग्ना इव रणे हयाः । पतन्ति च खगा भूमौ क्षीणपुण्या इव ग्रहाः २१ ततः स जीमूतकृतप्रणादो नादं ह्यमुं च त्वरया प्रतीतः । सूर्यात्मजः शौर्यविवृद्धतेजाः सरित्पतिर्वानिलचञ्चलोर्मिः २२ [ ६१३ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

अथ तस्य निनादं तं सुग्रीवस्य महात्मनः । शुश्रावान्तःपुरगतो वाली भ्रातुरमर्षणः १ श्रुत्वा तु तस्य निनदं सर्वभूतप्रकम्पनम् । मदश्चैकपदे नष्टः क्रोधश्चापादितो महान् २ ततो रोषपरीताङ्गो वाली स कनकप्रभः । उपरक्त इवादित्यः सद्यो निष्प्रभतां गतः ३ वाली दंष्ट्राकरालस्तु क्रोधा-

---

बद्दल खात्री असलेल्या वीरांना विशेषतः स्त्रियांच समक्ष तें सहन होत नाहीं १८." सुवर्णासारख्या पिंगट वर्णानें युक्त असलेल्या सुग्रीवानें तें रामाचें भाषण श्रवण केल्यावर आकाश विदीर्ण करीतच कीं काय अशा क्रूर स्वरानें गर्जना केली असतां १९ त्या गर्जनेच्या योगानें मोठमोठे बैल भयभीत व निस्तेज झाले आणि पालन न करणें ह्या राजाच्या दोषामुळें शत्रूंनीं हस्तगत करून घेतलेल्या कुलस्त्रिया ज्याप्रमाणें इकडे तिकडे धांवत सुटतात त्याप्रमाणें ते धांवाधांव करूं लागले २०. इतकेंच नव्हे; परंतु, संग्रामामध्यें दाणादाण उडून गेलेल्या अश्वांप्रमाणें मृग सत्वर धांवूं लागले आणि पुण्य संपल्यामुळें आकाशांतून भ्रष्ट होणाऱ्या देवांप्रमाणें पक्षीही भूमीवर पडूं लागले २१. असो. तदनंतर रामाच्या शौर्याविषयीं खात्री वाटत असलेल्या व मेघाप्रमाणें पूर्वी गर्जना केलेल्या त्या सूर्यपुत्र सुग्रीवानें पुनरपि तशी गर्जना केली आणि वायूनें ज्यांतील लाटा उचंबळूं लागल्या आहेत अशा सागराप्रमाणें पराक्रम करण्याविषयीं त्याचें तेज वृद्धिंगत झालें २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चौदावा सर्ग समाप्त झाला ॥ १४ ॥

महात्म्या सुग्रीव भ्रात्याची ती गर्जना श्रवण केल्यावर अंतःपुरांत असलेल्या वालीला ती सहन झाली नाहीं १. ह्यामुळें प्राणीमात्रांना कंपित करणारा तो सुग्रीवाचा शब्द श्रवण केल्याबरोबर वालीचा मद तत्क्षणीं नाहींसा होऊन त्याला प्रचंड क्रोध चढला २ आणि सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेला तो वाली क्रोधानें व्याप्त झाल्यामुळें ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें एकाएकीं निस्तेज झाला ३. दंष्ट्रांच्या योगानें अक्राळ विक्राळ दिसत असून क्रोधानें प्रदीप्त अग्नीप्रमाणें नेत्र लाल झालेला तो वाली

हीप्ताग्निलोचनः । भात्युत्पतितपद्माभः समृणाल इव ह्रदः ४ शब्दं दुर्मर्षणं श्रुत्वा निष्पपात ततो हरिः । वेगेन च पदन्यासैर्दारयन्निव मेदिनीम् ५ तं तु तारा परिष्वज्य स्नेहाद्दर्शितसौहृदा । उवाच त्रस्तसंभ्रान्ता हितोदर्कमिदं वचः ६ साधु क्रोधमिमं वीर नदीवेगमिवागतम् । शयनादुत्थितः काल्यं त्यज भुक्तामिव स्रजम् ७ काल्यमेतेन सङ्ग्रामं करिष्यसि च वानर । वीर ते शत्रुबाहुल्यं फल्गुता वा न विद्यते ८ सहसा तव निष्क्रामो मम तावन्न रोचते । श्रूयतामभिधास्यामि यन्निमित्तं निवार्यते ९ पूर्वमापतितः क्रोधात्स त्वामाह्वयते युधि । निष्पत्य च निरस्तस्ते हन्यमानो दिशो गतः १० त्वया तस्य निरस्तस्य पीडितस्य विशेषतः । इहैत्य पुनराह्वानं शङ्कां जनयतीव मे ११ दर्पश्च व्यवसायश्च यादृशस्तस्य नर्दतः । निनादस्य च संरम्भो नैतदल्पं हि कारणम् १२ नासहायमहं मन्ये सुग्रीवं

---

कमलें उद्ध्वस्त झाल्यामुळें शोभारहित होऊन केवळ कमलनालांनीं व्याप्त झालेल्या सरोवराप्रमाणें निस्तेज दिसूं लागला ४. असो. सुग्रीवाचा तो दुःसह शब्द श्रवण करितांक्षणीं वेगानें पाउलें टाकीत असल्यामुळें पृथ्वी जशी कांहीं विदीर्णच करीत करीत तो वानर वाली तेथून उडाला ५. तेव्हां पूर्वीपासून जिनें प्रेम दर्शविलें आहे अशी भयभीत व क्षुब्ध झालेली तारा त्या वालीला प्रेमानें आलिंगन देऊन परिणामीं हितावह होणारें भाषण त्याच्याशीं करूं लागली ६. ( ती म्हणाली ) " हे वीरा, नदीच्या वेगाप्रमाणें एकाएकीं प्राप्त झालेल्या ह्या क्रोधाचा , प्रातःकालीं झोंपेंतून उठल्यावर ज्याप्रमाणें पूर्वरात्रीं उपभोग घेतलेल्या पुष्पमालेचा त्याग करतोस त्याप्रमाणें, तूं बऱ्या विचारानें त्याग कर ७. हे वानरा, तूं ह्या सुग्रीवाशीं उद्यीक प्रातःकाळीं संग्राम कर. हे वीरा, जरी तुला शत्रु पुष्कळ नाहींत आणि तुझे ठिकाणीं कसलीही न्यूनता नाहीं ८ तरी एकाएकीं हें तुझें युद्धार्थ बाहेर जाणें मला रुचत नाहीं. मी कशाकरितां तुझें निवारण करीत आहें तें ऐक; मी सांगतें ९. " पूर्वी रागारागानें येऊन तुला एकदां त्यानें युद्धाकरितां आह्वान केलें होतें; परंतु, तूं सत्वर जाऊन त्याचा पराजय केलास व तोही मार खातां खातां वाट फुटेल तिकडे चालता झाला १०. तथापि, तूं त्याला जिंकून विशेषतः पीडा दिली असतांनाही ज्याअर्थी तो पुनरपि येथें येऊन तुला आह्वान करीत आहे त्याअर्थी ह्या त्याच्या आह्वानामुळें माझ्या मनांत भय उत्पन्न झालें आहे ११. गर्जना करणाऱ्या त्या सुग्रीवाचा गर्व, युद्धाविषयीं औत्सुक्य आणि गर्जनेचा जोर जो दृष्टीं पडत आहे त्याचा विचार केला असतां ह्याच्या मुळाशीं कांहीं क्षुल्लकच कारण असेल असें मला वाटत नाहीं १२. कोणी साहाय्य-

तमिहागतम् । अवष्टब्धसहायश्च यमाश्रित्यैष गर्जति १३ प्रकृत्या निपुणश्चैव बुद्धिमांश्चैव वानरः । नापरीक्षितवीर्येण सुग्रीवः सख्यमेष्यति १४ पूर्वमेव मया वीर श्रुतं कथयतो वचः । अङ्गदस्य कुमारस्य वक्ष्याम्यद्य हितं वचः १५ अङ्गदस्तु कुमारोयं वनान्तमुपनिर्गतः । प्रवृत्तिस्तेन कथिता चारैरासीन्निवेदिता १६ अयोध्याधिपतेः पुत्रौ शूरौ समरदुर्जयौ । इक्ष्वाकूणां कुले जातौ प्रथितौ रामलक्ष्मणौ १७ सुग्रीवप्रियकामार्थं प्राप्तौ तत्र दुरासदौ । स ते भ्रातुर्हि विख्यातः सहायो रणकर्मणि १८ रामः परबलामर्दी युगान्ताग्निरिवोत्थितः । निवासवृक्षः साधूनामापन्नानां परा गतिः १९ आर्तानां संश्रयश्चैव यशसश्चैकभाजनम् । ज्ञानविज्ञानसंपन्नो निदेशे निरतः पितुः २० धातूनामिव शैलेन्द्रो गुणानामाकरो महान् । तत्क्षमो न विरोधस्ते सह तेन महात्मना २१ दुर्जयेनाप्रमेयेण रामेण रणकर्मसु । शूर वक्ष्यामि ते किंचिन्न चेच्छाम्यभ्यसू-

---

कर्ता बरोबर आल्यावांचून तो सुग्रीव येथें आला आहे असें मला दिसत नाहीं. त्यानें कोणा तरी साहाय्यकर्त्या पुरुषाचें अवलंबन केलें आहे व त्याचाच आश्रय केला असल्यामुळें हा गर्जना करीत आहे १३. शिवाय, सुग्रीव वानर जात्याच कुशल व बुद्धिमान् असल्यामुळें ज्याच्या वीर्याचा कधीं प्रत्यय आलेला नाहीं त्याच्याशीं तो कधीं सख्य करणार नाहीं १४. हे वीरा, पूर्वींच कुमार अंगद सांगत असतांना जें भाषण मीं श्रवण केलें आहे तेंच हितावह भाषण मी आज तुला सांगतें १५. हा अंगद कुमार एकदां वनामध्यें गेला असतां हेरांनीं त्याला जो वृत्तांत कळविला तो त्यानें मला कथन केला आहे १६. इक्ष्वाकूंच्या कुलामध्यें उत्पन्न झालेले अयोध्याधिपति दशरथाचे समरांगणामध्यें अजिंक्य असलेले शूर पुत्र रामलक्ष्मण वनामध्यें गेलेले आहेत १७ आणि सुग्रीवाचें प्रिय करण्याकरितां ते अजिंक्य रामलक्ष्मण तेथें प्राप्त झालेले आहेत. सारांश, प्रलयकालीं उत्पन्न झालेल्या अग्नीप्रमाणें शत्रुसैन्याचा विध्वंस करणारा आणि संग्रामकर्मामध्यें विख्यात असलेला तो राम तुझ्या भ्रात्याला साहाय्य करणारा आहे. तो साधुरूप पक्ष्यांचा निवासवृक्ष असून शरण आलेल्यांचा मुख्य आश्रय आहे १८,१९, दुःखितांचा आधार आहे, यशाचें परम निधान आहे, ब्रह्मज्ञान आणि धर्मज्ञान ह्यांनीं संपन्न असून पित्याची आज्ञा परिपालन करण्याविषयीं तो तत्पर आहे २० आणि धातूंची खाण असलेल्या गिरिराज हिमालय महापर्वताप्रमाणें तो गुणांची एक मोठी खाणच आहे. तस्मात्, दुर्जय व युद्धकर्मासंबंधानें अतुल अशा त्या महात्म्या रामाशीं विरोध करणें तुला योग्य नाहीं. हे शूरा, तुझा मत्सर न करितां मी कांहीं तुला सांगतें. २१,२२.

यितुम् २२ श्रूयतां क्रियतां चैव तव वक्ष्यामि यद्धितम् । यौवराज्येन सुग्रीवं तूर्णं साध्वभिषेचय २३ विग्रहं मा कृथा वीर भ्रात्रा राजन्यवीयसा । अहं हि ते क्षमं मन्ये तेन रामेण सौहृदम् २४ सुग्रीवेण च संप्रीतिं वैरमुत्सृज्य दूरतः । लालनीयो हि ते भ्राता यवीयानेष वानरः २५ तत्र वा सन्निहस्थो वा सर्वथा बन्धुरेव ते । न हि तेन समं बन्धुं भुवि पश्यामि कंचन २६ दानमानादिसत्कारैः कुरुष्व प्रत्यनन्तरम् । वैरमेतत्समुत्सृज्य तव पार्श्वे स तिष्ठतु २७ सुग्रीवो विपुलग्रीवो महाबन्धुर्मतस्तव । भ्रातृसौहृदमालम्ब्य नान्या गतिरिहास्ति ते २८ यदि ते मत्प्रियं कार्यं यदि चावैषि मां हिताम् । याच्यमानः प्रियत्वेन साधु वाक्यं कुरुष्व मे २९ प्रसीद पथ्यं शृणु जल्पितं हि मे न रोषमेवानुविधातुमर्हसि । क्षमो हि ते कोशलराजसूनुना न विग्रहः शक्रसमानतेजसा ३० तदा हि तारा हितमेव वाक्यं तं वालिनं पथ्यमिदं बभाषे । न रोचते तद्वचनं हितस्य कालाभिपन्नस्य विनाशकाले ३१ [ ६४४ ] इत्यार्षे श्रीमद्रामा-

---

ह्यास्तव, मी जी तुझ्या हिताची गोष्ट तुला सांगेन ती ऐकून घेऊन त्याप्रमाणें तूं वाग. अरे, सुग्रीवाला तूं बऱ्या विचारानें सत्वर यौवराज्याचा अभिषेक कर २३; हे वीरा राजा, कनिष्ठ भ्रात्याशीं तूं युद्ध करूं नको त्या बलाढ्य रामाशीं सख्यव सुग्रीवाचे ठिकाणीं प्रेम करणेंच तुला योग्य आहे असें मला वाटतें. ह्या कनिष्ठ भ्रात्या वानराचें तुला लालनच केलें पाहिजे २४,२५. अरे, तो दूर असला किंवा येथें असला तरी सर्वस्वीं तुझा बंधुच आहे व त्याच्यासारिखा तुझा बंधु ह्या भूतलावर मला कोणी आढळत नाहीं २६. ह्यास्तव, ह्या वैराचा त्याग करून दान, मान इत्यादि सत्कारांच्या योगानें तूं त्याला स्वाधीन करून घे; तो तुझ्या संनिध उभा राहो २७. प्रचंड ग्रीवेनें युक्त असलेला सुग्रीव हाच मुख्य बंधु ह्मणून तुला अनुमत असून भ्रातृप्रेमाचें अवलंबन केल्याशिवाय ह्या प्रसंगीं तूं संकटांतून पार पडण्याचा दुसरा कांहीं एक उपाय नाहीं २८. तस्मात्, जर तुला माझें प्रिय कर्तव्य असेल आणि हित करणारी ह्मणून जर तूं मला समजत असशील तर मला प्रिय असलेली गोष्ट करण्याविषयीं मी प्रार्थना करीत आहें त्याप्रमाणें तूं माझा उत्कृष्ट उपदेश ऐक २९. अरे, मजवर कृपा कर आणि मीं केलेला हितकारक उपदेश ऐकून घे. माझ्यावर रागावणें तुला योग्य नाहीं. खरोखर कोसलदेशाधिपतीच्या इंद्रतुल्य तेजस्वी पुत्राशीं युद्ध करणें तुला योग्य नाहीं. ३०" असो. ह्याप्रमाणें त्या वालीला तारेनें हितावह व पथ्यकारक असा उपदेश केला असतांही मृत्यूनें ग्रासलेल्या त्या वालीचा विनाशकाल

यणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥

तामेवं ब्रुवतीं तारां ताराधिपनिभाननाम् । वाली निर्भर्त्सयामास वचनं चेदमब्रवीत् १ गर्जतोस्य सुसंरब्धं भ्रातुः शत्रोर्विशेषतः । मर्षयिष्यामि केनापि कारणेन वरानने २ अधर्षितानां शूराणां समरेष्वनिवर्तिनाम् । धर्षणामर्षणं भीरु मरणादतिरिच्यते ३ सोढुं न च समर्थोहं युद्धकामस्य संयुगे । सुग्रीवस्य च संरम्भं हीनग्रीवस्य गर्जितम् ४ न च कार्यो विषादस्ते राघवं प्रति मत्कृते । धर्मज्ञस्य कृतज्ञश्च कथं पापं करिष्यति ५ निवर्तस्व सह स्त्रीभिः कथं भूयोनुगच्छसि । सौहृदं दर्शितं तावन्मयि भक्तिस्त्वया कृता ६ प्रतियोत्स्याम्यहं गत्वा सुग्रीवं जहि संभ्रमम् । दर्पं चास्य विनेष्यामि न च प्राणैर्वियोक्ष्यते ७ अहं ह्याजिस्थितस्यास्य करिष्यामि यदीप्सितम् । वृक्षैर्मुष्टिप्रहारैश्च पीडितः प्रतियास्यति ८ न मे

---

आला असल्यामुळें त्याला तो उपदेश रुचला नाहीं २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

ताराधिपति चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती तारा ह्याप्रमाणें उपदेश करीत असतांना वाली निर्भर्त्सना करून तिला ह्मणाला १ "हे सुंदरि, गर्जना करीत असलेल्या ह्या भ्रात्याची आणि विशेषतः शत्रूची ही गडबड सहन करण्याचें मला काय कारण आहे ? २. हे भित्र्ये, ज्यांच्यावर कधीं कोणी चाल केलेली नाहीं आणि युद्धामध्यें जे कधीं परावृत्त होत नाहींत अशा शूर लोकांना कोणी आह्वान केलें असतांना तें निमूटपणें सहन करणें हें मरणापेक्षांही अधिक दुःखदायक आहे ३. संग्रामामध्यें युद्धाची इच्छा धरणाऱ्या व भूषणरहित कंठानें युक्त असलेल्या सुग्रीवाची गर्जना व उद्धटपणा सहन करण्यास मी समर्थ नाहीं ४. रामासंबंधानें तूं माझ्याकरितां मुळींच दुःखी होऊं नको. कारण, धर्मवेत्ता व कृतज्ञ जो राम तो पाप कसें करील ? ५. आतां इतर स्त्रियांबरोबर तूं परत जा. फिरून फिरून कशाकरितां तूं माझ्या मागोमाग येत आहेस ? तूं आपलें प्रेम दर्शवून माझे ठिकाणीं असलेली भक्ति प्रकट केलीस ( ही पुरे आहे ) ६. मी सुग्रीवाकडे जाऊन त्याच्याशीं युद्ध करीन आणि त्याचा गर्व नाहींसा करीन तूं भय बाळगूं नको; तो कांहीं माझ्या हातून प्राणाला मुकणार नाहीं ७. सारांश, संग्रामामध्यें स्थित असलेल्या ह्या सुग्रीवाची व्यवस्था मी तुझ्या इच्छेप्रमाणेंच करीन ह्मणजे वृक्ष आणि मुष्टिप्रहार ह्यांनीं ताडित होऊन तो परत जाईल ८. त्या

गर्वितमायस्तं सहिष्यति दुरात्मवान् । कृतं तारे सहायत्वं दर्शितं सौहृदं मयि ९ शापितासि मम प्राणैर्निवर्तस्व जनेन च । अलं जित्वा निवर्तिष्ये तमहं भ्रातरं रणे १० तं तु तारा परिष्वज्य वालिनं प्रियवादिनी । चकार रुदती मन्दं दक्षिणा सा प्रदक्षिणाम् ११ ततः स्वस्त्ययनं कृत्वा मन्त्रविद्विजयैषिणी । अन्तःपुरं सह स्त्रीभिः प्रविष्टा शोकमोहिता १२ प्रविष्टायां तु तारायां सह स्त्रीभिः स्वमालयम् । नगर्या निर्ययौ क्रुद्धो महासर्प इव श्वसन् १३ स निःश्वस्य महारोषो वाली परमवेगवान् । सर्वतश्चारयन्दृष्टिं शत्रुदर्शनकाङ्क्षया १४ स ददर्श ततः श्रीमान्सुग्रीवं हेमपिङ्गलम् । सुसंवीतमवष्टब्धं दीप्यमानमिवानलम् १५ तं स दृष्ट्वा महाबाहुः सुग्रीवं पर्यवस्थितम् । गाढं परिदधे वासो वाली परमकोपनः १६ स वाली गाढसंवीतो मुष्टिमुद्यम्य वीर्यवान् । सुग्रीवमेवाभिमुखो ययौ योद्धुं कृतक्षणः १७ श्लिष्टं मुष्टिं समुद्यम्य संरब्धतरमागतः । सुग्रीवोपि

---

दुष्टाला माझा गर्व आणि दृढ प्रयत्न सहन होणार नाहीं. हे तारे, तू मला मदत केली असून माझे ठिकाणीं आपलें प्रेमही दर्शविलें आहेस ९. ह्यास्तव, इतर स्त्रियांसहवर्तमान तूं परत जा; माझ्या प्राणांची तुला शपथ आहे. ह्या भ्रात्याचा संग्रामामध्यें केवल पूर्ण पराजय करूनच मी परत फिरेन १०. ह्यानंतर वालीला प्रिय भाषण करणाऱ्या तारेनें आलिंगन दिलें आणि स्वभावानें सरळ असून हळू हळू रडत असलेल्या त्या तारेनें त्याला प्रदक्षिणाही केली ११. तदनंतर भर्त्याच्या विजयाची इच्छा करणाऱ्या त्या मंत्रवेत्त्या तारेनें वालीचें स्वस्त्ययन केलें आणि नंतर शोकाकुल होऊन स्त्रियांसहवर्तमान ती अंतःपुरामध्यें निघून गेली १२. इकडे तारा स्त्रियांसहवर्तमान स्वस्थानीं प्रविष्ट झाल्यावर क्रुद्ध झालेल्या महाभुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकीत टाकीत वाली नगराच्या बाहेर पडला १३ व प्रचंड क्रोधानें आणि पराकाष्ठेच्या वेगानें युक्त असलेला तो वाली सुस्कारे टाकून शत्रु दृष्टीं पडावा ह्या हेतूनें चोहोंकडे दृष्टि फेकूं लागला १४. तेव्हां त्या वैभवशाली वालीनें सुग्रीवाला अवलोकन केलें. त्या सुग्रीवाचा वर्ण सुवर्णासारिखा पिंवळा होता, कंबर बांधून तो तयार होता, युद्धाच्या इच्छेनें तो रणभूमीममध्यें धैर्यानें उभा राहिलेला होता आणि अग्निप्रमाणें तो देदीप्यमान दिसत होता १५. असो. रणभूमीमध्यें युद्धाकरितां स्थित असलेल्या त्या सुग्रीवाप्रत अवलोकन करून महाकोपी व महापराक्रमी वालीनें आपलें वस्त्र घट्ट केलें १६. आणि वस्त्र आंवळून युद्धांकरितां तयार झालेला तो वीर्यवान् वाली मूठ उगारून सुग्रीवाचे संमुख गेला १७. तेव्हां सुवर्णमाला धारण केलेल्या वालीला उद्देशून सुग्रीवही घट्ट वळलेली

समुद्दिश्य वालिनं हेममालिनम् १८ तं वाली क्रोधताम्राक्षं सुग्रीवं रण-
कोविदम् । आपतन्तं महावेगमिदं वचनमब्रवीत् १९ एष मुष्टिर्महान्बद्धो
गाढः सुनियताङ्गुलिः । मया वेगविमुक्तस्ते प्राणानादाय यास्यति २०
एवमुक्तस्तु सुग्रीवः क्रुद्धो वालिनमब्रवीत् । तव चैष हरन्प्राणान्मुष्टिः
पततु मूर्धनि २१ ताडितस्तेन तं क्रुद्धः समभिक्रम्य वेगतः । अभव-
च्छोणितोद्गारी सापीड इव पर्वतः २२ सुग्रीवेण तु निःशङ्कं सालमुत्पाट्य
तेजसा । गात्रेष्वभिहतो वाली वज्रेणेव महागिरिः २३ स तु वृक्षेण
निर्भग्नः सालताडनविह्वलः । गुरुभारभराक्रान्ता नौः ससार्थेव सागरे २४
तौ भीमबलविक्रान्तौ सुपर्णसमवेगितौ । प्रयुद्धौ घोरवपुषौ चन्द्रसूर्याविवाम्बरे
२५ परस्परममित्रघ्नौ छिद्रान्वेषणतत्परौ । ततोऽवर्धत वाली तु
बलवीर्यसमन्वितः २६ सूर्यपुत्रो महावीर्यः सुग्रीवः परिहीयत । वालिना

---

मूठ उगारून वालीपेक्षां अधिकच जोराजोरानें त्याच्याकडे गेला असतां १८ संग्राम-निपुण आणि क्रोधामुळें डोळे लाल झालेला तो सुग्रीव मोठ्यावेगानें आपल्या अंगा-वर धांवून येत आहे हें अवलोकन करून वाली ह्मणाला १९ "बोटें चांगलीं जुळून घट्ट आवळलेल्या ह्या प्रचंड मुठीचा मीं वेगानें प्रहार केला असतां तो तुझे प्राण घेत-ल्यावांचून रहाणार नाहीं." २०. ह्याप्रमाणें वालीनें भाषण केलें असतां सुग्रीव क्रुद्ध होऊन त्याला ह्मणाला "ही माझी मूठ तुझे प्राण हरण करण्याकरितां तुझ्या मस्तकावर पडो" २१. नंतर वालीनें वेगावेगानें त्या क्रुद्ध सुग्रीवाजवळ येऊन त्याला ताडण केलें असतां तो सुग्रीव रक्ताच्या गुळण्या टाकूं लागल्यामुळें झऱ्यांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें दिसूं लागला २२. तथापि सुग्रीवानें निःशंकपणें जोराजोरानें एक सालवृक्ष उपटून वालीच्या शरीरावर मारिला असतां तो वाली वज्राचा प्रहार झालेल्या महापर्वताप्रमाणें शोभूं लागला २३ आणि वृक्षाच्या योगानें जेरीस आलेला व—अतिशय ओझें लादलेली नौका ज्याप्रमाणें आंतील व्यापाऱ्यांच्या तांड्यासहवर्तमान समुद्रामध्यें बुडूं लागते त्याप्रमाणें—सालवृक्षाच्या ताडणानें विह्वल झालेला तो वाली मनामध्यें खचूं लागला २४. भयंकर बल, प्रचंड पराक्रम, गरुडासारिखा वेग व घोर शरीर ह्यांनीं युक्त असलेले ते शत्रुघातक वालिसुग्रीव एकमेकांचें छिद्र पहाण्याविषयीं दक्ष राहून निकरानें युद्ध करूं लागले असतां आकाशामध्यें चंद्रसूर्यच युद्ध करीत आहेत कीं काय असें दिसूं लागले. तदनंतर, बल व वीर्य ह्यांनीं युक्त असलेल्या वालीची सरशी होऊं लागली २५,२६ आणि महावीर्यवान् सूर्यपुत्र सुग्रीवाचा पराभव होऊं लागला. तेव्हां वालीनें गर्व नाहींसा केल्यामुळें पराक्रमांतही कमी

भग्नदर्पस्तु सुग्रीवो मन्दविक्रमः २७ वालिनं प्रति सामर्षो दर्शयामास राघवम् । वृक्षैः सशाखैः शिखरैर्वज्रकोटिनिभैर्नखैः २८ मुष्टिभिर्जानुभिः पद्भिर्बाहुभिश्च पुनः पुनः । तयोर्युद्धमभूद्धोरं वृत्रवासवयोरिव २९ तौ शोणिताक्तौ युध्येतां वानरौ वनचारिणौ । मेघाविव महाशब्दैस्तर्जमानौ परस्परम् ३० हीयमानमथापश्यत्सुग्रीवं वानरेश्वरम् । प्रेक्षमाणं दिशश्चैव राघवः स मुहुर्मुहुः ३१ ततो रामो महातेजा आर्तं दृष्ट्वा हरीश्वरम् । स शरं वीक्षते वीरो वालिनो वधकाङ्क्षया ३२ ततो धनुषि संधाय शरमाशीविषोपमम् । पूरयामास तच्चापं कालचक्रमिवान्तकः ३३ तस्य ज्यातलघोषेण त्रस्ताः पत्ररथेश्वराः । प्रदुद्रुवुर्मृगाश्चैव युगान्त इव मोहिताः ३४ युक्तस्तु वज्रनिर्घोषः प्रदीप्ताशनिसंनिभः । राघवेण महाबाणो वालिवक्षसि पातितः ३५ ततस्तेन महातेजा वीर्ययुक्तः कपीश्वरः । वेगेनाभिहतो वाली निपपात महीतले ३६ इन्द्रध्वज इवोद्धूतः पौर्णमास्यां महीतले । आश्वयुक्समये मासि गतसत्त्वो विचेतनः ३७ बाष्पसंरुद्धकण्ठस्तु

---

झालेला सुग्रीव २७ वालीवर क्रुद्ध झाला आणि आपला उतरता पाया आहे असें तो रामाला दर्शवूं लागला. नंतर शाखांसहवर्तमान वृक्ष, पर्वतशिखरें, वज्रप्रहार, नखें २८, मुष्टि, गुडघे, लाथा व बाहू ह्यांच्या योगानें त्या उभयतांमध्यें वृत्रासुर आणि इंद्र ह्यांच्या युद्धाप्रमाणें घोर युद्ध झालें २९. सारांश, रक्तानें माखलेले ते उभयतां वनचर वानर मेघांप्रमाणें मोठमोठ्या गर्जना करून एकमेकाला दटावीत दटावीत युद्ध करूं लागले ३०. इतक्यांत वानरराज सुग्रीवाचा पक्ष कमी होऊन तो वारंवार इकडे तिकडे पहात आहे असें रामाच्या दृष्टोत्पत्तीस आलें ३१. तेव्हां वानरराज सुग्रीव भयभीत झाला आहे असें अवलोकन करितांक्षणीं तो महातेजस्वी वीर राम वालीचा वध करण्याच्या इच्छेनें बाण पाहूं लागला ३२ आणि नंतर सर्पासारिखा एक प्राणनाशक बाण धनुष्याला लावून मृत्युच कालचक्राचें आकर्षण करीत आहे कीं काय अशा रीतीनें त्यानें तें धनुष्य ताणिलें असतां ३३ त्याच्या प्रत्यंचेच्या टणत्कारानें मोठमोठे पक्षी व मृग त्रस्त व प्रलयकालाप्रमाणें मोहित होऊन धावूं लागले ३४. इतक्यांत वज्रासारख्या गर्जनेनें युक्त आणि उज्ज्वल विद्युल्लतेसमान तेजस्वी असा रामानें सोडिलेला प्रचंड बाण वालीच्या वक्षःस्थलावर पडला ३५ व त्या बाणाचा वेगानें तडाका बसला असतां तो महातेजस्वी वीर्यवान् वानरराज वाली उभारलेला इंद्रध्वज उत्सव समाप्त झाल्यानंतर आश्विनमासांतील पौर्णिमेचे दिवशीं ज्याप्रमाणें भूतलावर पडतो त्याप्रमाणें मरणोन्मुख व निश्चेष्ट होऊन

वाली चार्तस्वरः शनैः ३८ नरोत्तमः कालइवान्तकोपमं शरोत्तमं काञ्च-
नरूपभासितम् । ससर्ज दीप्तं तममित्रमर्दनं सधूममग्निं मुखतो यथा हरः ३९
अथोक्षितः शोणिततोयविस्रवैः प्रपुष्पिताशोक इवाचलोद्गतः । विचेतनो
वासवसूनुराहवे प्रभ्रंशितेन्द्रध्वजवत्क्षितिं गतः ४० [ ६८४ ] इत्यार्षे श्रीम-
द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे षोडशः सर्गः ॥१६॥

ततः शरेणाभिहतो रामेण रणकर्कशः । पपात सहसा वाली निकृत्त
इव पादपः १ स भूमौ न्यस्तसर्वाङ्गस्तप्तकाञ्चनभूषणः । अपतद्देवराजस्य
मुक्तरश्मिरिव ध्वजः २ अस्मिंन्निपतिते भूमौ हर्यृक्षाणां गणेश्वरे । नष्टच-
न्द्रमिव व्योम न व्यराजत मेदिनी ३ भूमौ निपतितस्यापि तस्य देहं
महात्मनः । न श्रीर्जहाति न प्राणा न तेजो न पराक्रमः ४ शक्रदत्ता
वरा माला काञ्चनी रत्नभूषिता । दधार हरिमुख्यस्य प्राणांस्तेजः श्रियं
च सा ५ स तया मालया वीरो हैमया हरियूथपः । संध्यानुगतपर्यन्तः

---

भूतलावर पडला ३६, ३७ आणि पडतां पडतां अश्रूंनीं कंठ दाटून आलेला तो वाली भयभीत होऊन हलकें हलकें रडूं लागला ३८. सारांश, मुखासमीप असलेल्या ललाटस्थ नेत्राच्या योगानें शंकरानें सोडिलेला सधूम अग्निच कीं काय अशा रीतीनें सुवर्णभूषणानें झळकत असलेला तो शत्रुघातक, मृत्युतुल्य व देदीप्यमान उत्कृष्ट बाण कालाप्रमाणें दिसत असलेल्या पुरुषश्रेष्ठ रामानें सोडिला असतां ३९ रक्तरूप जलस्रावांनीं सिंचित झालेला तो इंद्रपुत्र वाली पर्वतावर उगवलेल्या प्रफुल्लित अशोक वृक्षाप्रमाणें दिसूं लागला आणि उत्सव समाप्त झाल्यानंतर खालीं उतरलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें तो वाली निश्चेष्ट होऊन समरांगणामध्यें भूतलावर पडला ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील किष्किंधाकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६ ॥

तदनंतर रणामध्यें प्रतिपक्ष्याला भयावह असलेला वाली रामाच्या हातून बाणानें ताडित झाला असतां तोडिलेल्या वृक्षाप्रमाणें एकाएकीं खालीं पडला १. सारांश, उज्ज्वल सुवर्णभूषणांनीं युक्त असलेला तो वाली ताणून धरलेल्या दोऱ्या सोडिल्यावर ज्याप्रमाणें इंद्रध्वज खालीं पडतो त्याप्रमाणें भूमीवर सपशेल पडला २ व वानरसमाज आणि अस्वलांचा समुदाय ह्यांचा तो अधिपति भूमीवर पडला असतां भूमि चंद्ररहित आकाशाप्रमाणें शोभेनाशी झाली ३. परंतु, तो महात्मा भूमीवर पडला असतांही कांति, तेज, पराक्रम व प्राण त्याच्या देहाला सोडून गेले नाहींत ४. कारण, इंद्रानें दिलेल्या रत्नभूषित व उत्कृष्ट सुवर्णमालेनें त्या वानरश्रेष्ठाचें तेज, कांति व प्राण धारण केले

पयोधर इवाभवत् ६ तस्य माला च देहश्च मर्मघाती च यः शरः । त्रिधेव रचिता लक्ष्मीः पतितस्यापि शोभते ७ तदस्त्रं तस्य वीरस्य स्वर्गमार्गप्रभावनम् । रामबाणासनक्षिप्तमावहत्परमां गतिम् ८ तं तथा पतितं सङ्ख्ये गतार्चिषमिवानलम् । ययातिमिव पुण्यान्ते देवलोकादिहच्युतम् ९ आदित्यमिव कालेन युगान्ते भुवि पातितम् । महेन्द्रमिव दुर्धर्षमुपेन्द्रमिव दुःसहम् १० महेन्द्रपुत्रं पतितं वालिनं हेममालिनम् । व्यूढोरस्कं महाबाहुं दीप्तास्यं हरिलोचनम् ११ लक्ष्मणानुचरो रामो ददर्शोपससर्प च । तं तथा पतितं वीरं गतार्चिषमिवानलम् १२ बहुमान्य च तं वीरं वीक्षमाणं शनैरिव । उपयातौ महावीर्यौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ १३ तं दृष्ट्वा राघवं वाली लक्ष्मणं च महाबलम् । अब्रवीत्परुषं वाक्यं प्रश्रितं धर्मसंहितम् १४ स भूमावल्पतेजोसुर्निहतो नष्टचेतनः । अर्थसंहितया वाचा गर्वितं रणगर्वितम् १५ पराङ्मुखवधं कृत्वा कोत्र प्राप्तस्त्वया गुणः ।

---

होते ५ आणि त्या सुवर्णमालेच्या योगानें तो वानरसेनांचें रक्षण करणारा वीर वाली संध्याकाळच्या आरक्तवर्णप्रकाशानें ज्याच्या कडा युक्त झालेल्या आहेत अशा मेघाप्रमाणें दिसूं लागला ६. सारांश, तो खालीं पडला असतांनाही त्याची माला, देह आणि मर्मघाती बाण ह्या तीन ठिकाणीं विभागून राहिल्यासारिखी कांति शोभूं लागली ७ आणि रामाच्या धनुष्यापासून सुटलेल्या त्या स्वर्गमार्गदर्शक बाणानें त्या वीराला उत्कृष्ट गति दिली ८. असो. प्रतिपक्ष्यांनीं चाल करून जाण्यास इंद्रासारिखा अशक्य, विष्णूसारिखा दुःसह आणि सुवर्णमाला, विशाल वक्षःस्थल, दीर्घ बाहू, उज्ज्वल मुख व पीतवर्ण नेत्र ह्यांनीं युक्त असलेला इंद्रपुत्र वाली ज्वालारहित अग्नीप्रमाणें, पुण्यक्षय झाला असतां देवलोकापासून च्युत झालेल्या ययातीप्रमाणें अथवा प्रलयसमयीं कालानें भूतलावर पाडिलेल्या सूर्याप्रमाणें समरांगणामध्यें पडलेला ९, १०, ११ अवलोकन करितांक्षणीं लक्ष्मणरूप अनुयायानें युक्त असलेला राम त्याच्याजवळ गेला. तात्पर्य, ज्वालारहित झालेल्या अग्नीप्रमाणें तेथें पडलेल्या व हळूं हळूं इकडे तिकडे पहात असलेल्या त्या वीराला बहुमान देऊन महावीर्यवान् भ्राते रामलक्ष्मण त्याच्यासमीप गेले १२, १३. तेव्हां बाणाचा प्रहार झाल्यामुळें तेज व प्राण क्षीण होऊन भूमीवर निश्चेष्ट पडलेला तो वाली रणाविषयीं गर्व चढलेल्या परंतु, विनयसंपन्न व धर्मयुक्त असलेल्या रामाला आणि महाबलाढ्य लक्ष्मणाला अवलोकन करून अर्थपरिपूर्ण वाणीनें कठोर भाषण करूं लागला १४, १५. ( तो ह्मणाला ) " अरे, युद्धाकरितां मी दुसऱ्यावर क्षुब्ध झालों असतांना तुझ्या-

यदहं युद्धसंरब्धस्त्वत्कृते निधनं गतः १६ कुलीनः सत्त्वसंपन्नस्तेजस्वी चरितव्रतः । रामः करुणवेदी च प्रजानां च हिते रतः १७ सानुक्रोशो महोत्साहः समयज्ञो दृढव्रतः । इत्येतत्सर्वभूतानि कथयन्ति यशो भुवि १८ दमः शमः क्षमा धर्मो धृतिः सत्त्वं पराक्रमः । पार्थिवानां गुणा राजन्दण्डश्चाप्यपकारिषु १९ तान्गुणान्संप्रधार्याहमग्र्यं चाभिजनं तव । तारया प्रतिषिद्धः सन्सुग्रीवेण समागतः २० न मामन्येन संरब्धं प्रमत्तं वेद्धुमर्हसि । इति ते बुद्धिरुत्पन्ना बभूवादर्शने तव २१ स त्वां विनिहतात्मानं धर्मध्वजमधार्मिकम् । जाने पापसमाचारं तृणैः कूपमिवावृतम् २२ सतां वेषधरं पापं प्रच्छन्नमिव पावकम् । नाहं त्वामभिजानामि धर्मच्छद्माभिसंवृतम् २३ विषये वा पुरे वा ते यदा पापं करोम्यहम् । न च त्वामवजानेहं कस्मात्त्वं हंस्यकिल्बिषम् २४ फलमूलाशनं नित्यं वानरं वनगोचरम् । मामिहाप्रतियुध्यन्तमन्येन च

---

करितां मी प्राणाला मुकलों आहें. तेव्हां मी तुझ्या संमुख नसतांना माझा वध करून तूं कोणता वरें पुरुषार्थ संपादन केलास ? १६ अरे, राम कुलीन, सत्त्वशील, तेजस्वी, व्रतस्थ, परदुःख जाणणारा, प्रजेच्या हिताविषयीं तत्पर, दयाळू, मोठा उत्साहवान्, काळवेळ जाणणारा आणि स्वीकारिलेलें मत नेटानें चालविणारा असा आहे ह्मणून सर्व प्राणी पृथ्वीवर तुझी कीर्ति सांगत असतात १७,१८. हे राजा, दम, शांति, क्षमा, धर्म, धैर्य, सत्त्व, पराक्रम आणि उपद्रव देणाऱ्यांना दंड हे राजांचे गुण आहेत १९. तेव्हां ते गुण तुझ्यापाशीं आहेत आणि तुझें कुल मोठें आहे असें समजून तारेनें निषेध केला असतांनाही मी सुग्रीवाशीं येऊन भिडलों २०. सारांश, मी दुसऱ्याशीं भिडलों असतां आणि असावध असतां तूं मला वेध करणार नाहींस असें तुझ्यासंबंधानें तूं दृष्टीं पडण्याचे पूर्वीं मला वाटलें होतें २१. परंतु, तूं तृणांनीं आच्छादित झालेल्या कूपाप्रमाणें धर्माचें ढोंग करून लोकांचा घात करणारा असा दुराचारी, अधर्मनिष्ठ व आत्मघातकी आहेस असें मला आतां कळून आलें २२. अरे, धर्माच्या मिषानें व्याप्त होऊन सज्जनांचा वेष धारण करणारा तूं वस्तुतः पापी असून गुप्त अग्नीप्रमाणें घात करणारा आहेस हें पूर्वीं माझ्या लक्ष्यांत आलें नाहीं २३. तुझ्या देशामध्यें अथवा नगरामध्यें मीं जर कांहीं पाप केलें नाहीं आणि तुझी अवज्ञा सुद्धां जर केली नाहीं तर मज निरपराध्याचा तूं कशाकरितां वध केला आहेस ? २४. अरे, नेहमीं फलमूलांवर उपजीविका करणारा असा मी वानर तुझ्याशीं युद्ध करीत नसून दुसऱ्याशीं भिडलों असतांना तूं कशाकरितां माझा वध केलास ? २५.

समागतम् २५ त्वं नराधिपतेः पुत्रः प्रतीतः प्रियदर्शनः । लिङ्गमप्यस्ति ते राजन्दृश्यते धर्मसंहितम् २६ कः क्षत्रियकुले जातः श्रुतवान्नष्टसंशयः । धर्मलिङ्गप्रतिच्छन्नः क्रूरं कर्म समाचरेत् २७ त्वं राघवकुले जातो धर्मवानिति विश्रुतः । अभव्यो भव्यरूपेण किमर्थं परिधावसे २८ साम दानं क्षमा धर्मः सत्यं धृतिपराक्रमौ । पार्थिवानां गुणा राजन्दण्डश्चाप्यपकारिषु २९ वयं वनचरा राम मृगा मूलफलाशिनः । एषा प्रकृतिरस्माकं पुरुषस्त्वं नरेश्वर ३० भूमिर्हिरण्यं रूपं च निग्रहे कारणानि च । तत्र कस्ते वने लोभो मदीयेषु फलेषु वा ३१ नयश्च विनयश्चोभौ निग्रहानुग्रहावपि । राजवृत्तिरसंकीर्णा न नृपाः कामवृत्तयः ३२ त्वं तु कामप्रधानश्च कोपनश्चानवस्थितः । राजवृत्तेषु संकीर्णः शरासनपरायणः ३३ न तेऽस्त्यपचितिर्धर्मे नार्थे बुद्धिरवस्थिता । इन्द्रियैः कामवृत्तः सन्कृष्यसे मनुजेश्वर ३४ हत्वा बाणेन काकुत्स्थ मामिहानपराधिनम् । किं वक्ष्यसि

---

अरे, तूं राजपुत्र असून दिसण्यांत मोठा मनोहर व विश्वासूक आहेस आणि, हे राजा, ( जटा व वल्कलें )हें धर्माचें चिह्नही तुझ्या ठिकाणीं दृष्टीं पडत आहे २६. अरे, क्षत्रियकुलामध्यें उत्पन्न झालेला आणि बहुश्रुत असल्यामुळें धर्माविषयीं कसलाही संशय न राहिलेला असा कोण बरें धर्माचें कातडें पांघरून क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त होईल? २७. अरे, राघवकुलामध्यें उत्पन्न झालेला तूं धर्मवान् ह्मणून जरी प्रसिद्ध असलास तरी हलकट आहेस. तेव्हां नम्रवेष धारण करून तूं कशाकरितां भटकत आहेस ? २८. हे राजा, साम, दान, क्षमा, धर्म, सत्य, धैर्य, पराक्रम आणि अपकार करणाऱ्यांना दंड हे राजांचे गुण आहेत २९ . हे रामा, फलमूलांवर उपजीविका करून वनामध्यें संचार करणारे आह्मी मृग आहोंत आणि ( वनामध्यें संचार करणें व फलमूलांवर उपजीविका करणें )हा आमचा स्वभावच आहे आणि, हे राजा, तूं तर पुरुष आहेस ३०. सारांश, मनुष्यानें एकाद्याचा निग्रह करण्याला भूमि, सुवर्ण आणि स्त्रीरूप हीं कारणें होत असतात. तेव्हां वनसंबंधानें अथवा माझ्या उपजीविकेच्या फलांसंबंधानें तुला कसला लोभ उत्पन्न झाला आहे? ३१. न्याय, विनय आणि निग्रह व अनुग्रह हे गुण राजाचे वर्तनांत अवश्य असल्यामुळें राजाची वागणूक कधींही घोंटाळ्याची नसते. सारांश, राजे स्वेच्छाचारी नसतात ३२. परंतु, तूं (धर्म व अर्थ ह्यांची पर्वा बाळगणारा नसून ) मुख्यतः कामाच्याच मागें लागलेला, क्रोधशील, अव्यवस्थित, बाण सोडण्याविषयींच तत्पर आणि राजनीतिसंबंधानें अनियमित आहेस ३३. हे राजा, धर्माविषयीं तुझी पूज्य बुद्धि नाहीं आणि

सतां मध्ये कर्म कृत्वा जुगुप्सितम् ३५ राजहा ब्रह्महा गोघ्नश्चोरः प्राणिवधे रतः । नास्तिकः परिवेत्ता च सर्वे निरयगामिनः ३६ सूचकश्च कदर्यश्च मित्रघ्नो गुरुतल्पगः । लोकं पापात्मनामेते गच्छन्ते नात्र संशयः ३७ अधार्यं चर्म मे सद्भी रोमाण्यस्थि च वर्जितम् । अभक्ष्याणि च मांसानि त्वद्विधैर्धर्मचारिभिः ३८ पञ्च पञ्चनखा भक्ष्या ब्रह्मक्षत्रेण राघव । शल्यकः श्वाविधो गोधा शशः कूर्मश्च पञ्चमः ३९ चर्म चास्थि च मे राम न स्पृशन्ति मनीषिणः । अभक्ष्याणि च मांसानि सोऽहं पञ्चनखो हतः ४० तारया वाक्यमुक्तोऽहं सत्यं सर्वज्ञया हितम् । तदतिक्रम्य मोहेन कालस्य वशमागतः ४१ त्वया नाथेन काकुत्स्थ न सनाथा वसुंधरा । प्रमदा शीलसंपूर्णा पत्येव च विधर्मणा ४२ शठो नैकृतिकः क्षुद्रो मिथ्याप्रश्रितमानसः । कथं दशरथेन त्वं जातः पापो महात्मना ४३ छिन्नचारित्र्यकक्ष्येण सतां धर्मातिवर्तिना । त्यक्तधर्माङ्कुशेनाहं निहतो रामह-

---

अर्थाकडेही तुझें लक्ष्य नाहीं. तूं कामी असल्यामुळें इंद्रियाधीन झालेला आहेस ३४. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, मज निरपराध्याचा बाणानें वध करून ह्मणजे अर्थात् निंद्य कर्म करून तूं सज्जनांमध्यें काय बरें सांगशील ? ३५. अरे, राजघातकी, ब्रह्मघातकी, गोघातकी, चोर, प्राण्यांच्या वधाविषयीं तत्पर, नास्तिक आणि ज्येष्ठ भ्रात्याचे पूर्वी विवाह करणारा हे सर्व नरकाला जाणारे आहेत ३६. चहाडखोर, कृपण, मित्रघातकी आणि गुरुपत्नीशीं रत होणारा ह्यांना, पाप्यांना प्राप्त होणारा लोक प्राप्त होत असतो ह्यांत संशय नाहीं ३७. अरे, माझें चर्म सज्जन धारण करीत नसून माझे केश व अस्थिही सज्जनांनीं वर्ज्य केलेल्या आहेत आणि तुझ्यासारिखे धर्मनिष्ठ माझें मांसही भक्षण करीत नाहींत ३८. हे राघवा, शल्यक, श्वाविध, गोधा, शश आणि पांचवा कूर्म हे पांचच पांच नखांच्या प्राण्यांपैकीं ब्राह्मण व क्षत्रिय यांचें भक्ष्य आहेत ३९. तात्पर्य, माझ्या चर्माला व अस्थीला ज्ञानी लोक स्पर्शही करीत नसून माझें मांसही त्यांना अभक्ष्यच आहे. तथापि, असें असतांनाही मज पांचनखी प्राण्याचा तूं वध केलास ४०. अरे, सर्वज्ञ तारेनें सत्य व हितकारक असा उपदेश मला केला असतांनाही मोहानें त्याची पर्वा न करितां मी कालाच्या तावडींत सांपडलों ४१. अधर्माचारी पतीच्या योगानें जशी सुशील स्त्री वस्तुतः सनाथ होत नाहीं तशी ही पृथ्वी, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं नाथ असल्यामुळें वस्तुतः सनाथ झालेली नाहीं ४२. अरे, महात्म्या दशरथापासून शठ, उपद्रवी, क्षुद्र आणि मन विनयसंपन्न आहे असें खोटेंच दर्शविणारा तूं पापी कसा रे उत्पन्न झालास ! ४३. सज्जनांच्या धर्माचे अति-

स्तिना ४४ अशुभं चाप्ययुक्तं च सतां चैव विगर्हितम् । वक्ष्यसे चेदृशं कृत्वा सद्भिः सह समागतः ४५ उदासीनेषु योऽस्मासु विक्रमोऽयं प्रकाशितः। अपकारिषु ते राम नैवं पश्यामि विक्रमम् ४६ दृश्यमानस्तु युध्येथा मया युधि नृपात्मज । अद्य वैवस्वतं देवं पश्येस्त्वं निहतो मया ४७ त्वयादृश्येन तु रणे निहतोऽहं दुरासदः । प्रसुप्तः पन्नगेनेव नरः पापवशं गतः ४८ सुग्रीवप्रियकामेन यदहं निहतस्त्वया । मामेव यदि पूर्वं त्वमेतदर्थमचोदयः । मैथिलीमहमेकाह्ना तव चानीतवान्भवेः ४९ राक्षसं च दुरात्मानं तव भार्यापहारिणम् । कण्ठे बद्ध्वा प्रदद्यां ते निहतं रावणं रणे ५० न्यस्तां सागरतोये वा पाताले वापि मैथिलीम् । आनयेयं तवादेशाच्छ्वेतामश्वतरीमिव ५१ युक्तं यत्प्राप्नुयाद्राज्यं सुग्रीवः स्वर्गते मयि । अयुक्तं यद-

---

क्रमण करणाऱ्या, सद्वर्तनरूप मर्यादा नाहींशी करणाऱ्या आणि धर्मरूप अंकुशाला न जुमानणाऱ्या रामरूप हत्तीनें माझा वध केला आहे ४४. अरे, अशुभ, अयोग्य आणि सज्जनांनीं निंदित अशा प्रकारचें हें कर्म करून सज्जनांची गांठ पडली असतां तूं त्यांना काय बरें सांगशील ? ४५. हे रामा, आह्मी उदासीन असतांना तूं आमचें ठिकाणीं हा आपला पराक्रम गाजविला आहेस; परंतु, तुझा अपराध करणाऱ्यांचे ठिकाणीं ( अर्थात् तुझी भार्या हरण करणाऱ्या राक्षसांचे ठिकाणीं ) तूं अशा प्रकारचा पराक्रम करशील असें मला वाटत नाहीं ४६. हे राजपुत्रा, समरांगणामध्यें माझ्या दृष्टीं पडून जर तूं माझ्याशीं युद्ध केलें असतेंस तर आज माझ्या हातून वध पावल्यामुळें यमदेवाचेंच दर्शन घेण्याची तुला पाळी आली असती ४७. परंतु, प्रत्यक्ष युद्धामध्यें अजिंक्य असलेल्या माझा अदृश्य असलेला सर्प ज्याप्रमाणें निद्रिस्थ झालेल्या पापी मनुष्याचा वध करितो त्याप्रमाणें संग्रामामध्यें अदृश्य राहून तूं माझा वध केलास ४८. अरे, सुग्रीवाचे हातून आपलें प्रिय करून घेण्याच्या इच्छेनें तूं माझा वध केला आहेस; परंतु, ही गोष्ट जर तूं मला पूर्वींच सांगतास तर एका दिवसांत मी मैथिलीला तुझ्याकडे आणून दिली असती ४९ आणि तुझ्या भार्येचा अपहार करणारा दुरात्मा राक्षस संग्रामामध्यें गळ्याला बांधून मी जिवंत तुझ्या हवालीं केला असता ५०. अरे, श्वेतवर्ण खेचरीचें रूप धारण केलेली श्रुति मधुकैटभदैत्यांनीं पातालामध्यें नेली असतांही ज्याप्रमाणें हयग्रीवानें पुनरपि ती भूतलावर आणिली त्याप्रमाणें समुद्राच्या उदकामध्यें अथवा पातालामध्यें जरी सीतेला रावणानें नेऊन ठेविली असती तरी मी तुझ्या आज्ञेनें तिला परत आणून दिली असती ५१. अरे, मी स्वर्गाला गेल्यानंतर सुग्रीवाला राज्य प्राप्त व्हावें हें योग्य आहे. परंतु, रणामध्यें तूं माझा अधर्मानें

धर्मेण त्वयाहं निहतो रणे ५२ काममेवंविधो लोकः कालेन विनियुज्यते । क्षमं चेद्भवता प्राप्तमुत्तरं साधु चिन्त्यताम् ५३ इत्येवमुक्त्वा परिशुष्कवक्त्रः शराभिघाताद्व्यथितो महात्मा । समीक्ष्य रामं रविसंनिकाशं तूष्णीं बभौ वानरराजसूनुः ५४ [ ७३८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे सप्तदशः सर्गः ॥ १७ ॥

इत्युक्तः प्रश्रितं वाक्यं धर्मार्थसहितं हितम् । परुषं वालिना रामो निहतेन विचेतसा १ तं निष्प्रभमिवादित्यं मुक्ततोयमिवाम्बुदम् । उक्तवाक्यं हरिश्रेष्ठमुपशान्तमिवानलम् २ धर्मार्थगुणसंपन्नं हरीश्वरमनुत्तमम् । अधिक्षिप्तस्तदा रामः पश्चाद्वालिनमब्रवीत् ३ धर्ममर्थं च कामं च समयं चापि लौकिकम् । अविज्ञाय कथं बाल्यान्मामिहाद्य विगर्हसे ४ अपृष्ट्वा बुद्धिसंपन्नान्वृद्धानाचार्यसंमतान् । सौम्य वानरचापल्यात्त्वं मां वक्तुमिहेच्छसि ५ इक्ष्वाकूणामियं भूमिः सशैल-

---

वध केलास हें मात्र अयोग्य आहे ५२. अरे, अशा प्रकारचा प्राणी कोणीही झाला तरी त्याला मृत्यु हा यावयाचाच असतो; परंतु, पुढें मागें तुला राज्य प्राप्त झाल्यावर माझ्या वधासंबंधानें तुला लोकांनीं प्रश्न केला असतां त्या प्रश्नाचें तुला योग्य उत्तर काय देतां येईल ह्याचा तूं चांगला विचार कर " ५३. असो. बाणाच्या प्रहारामुळें विह्वल होऊन तोंड कोरडें पडलेला तो महात्मा वानरराजपुत्र वाली ह्याप्रमाणें बोलून व रवितुल्य रामाला अवलोकन करून स्वस्थ राहिला ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

वस्तुतः कठोर परंतु दिसण्यांत हितावह, विनययुक्त आणि धर्म व अर्थ ह्यांना धरून असलेलें भाषण मूर्छित झालेल्या मुमूर्षु वालीनें रामाला अनुलक्षून केलें १. तेव्हां निस्तेज सूर्याप्रमाणें, वृष्टि केलेल्या मेघाप्रमाणें अथवा विझलेल्या अग्नीप्रमाणें दिसत असलेला तो वानरराज सर्वोत्कृष्ट वाली रामाची निंदा करून स्वस्थ बसला असतां धर्म व अर्थ ह्या गुणांनीं युक्त असलेलें भाषण रामानें त्याच्याशीं केलें २,३. (ते ह्मणाले ) " धर्म, अर्थ, काम आणि लौकिक व्यवहार जाणिल्याशिवाय तूं मूर्खपणामुळें आज माझी कां बरें येथें निंदा करीत आहेस ? ४. हे वानरा, आचार्य ह्मणून संमत असलेल्या ज्ञानवान् वृद्धांना न विचारितां तूं चपलतेमुळें माझ्याशीं अशा प्रकारचें सौम्य भाषण बोलण्याचें मनामध्यें आणिलेंस; (परंतु, हें तुझें भाषण योग्य नाहीं ) ५. कारण, मनूनें पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान ही भूमि इक्ष्वाकुवंशजांना दिलेली

वनकानना । मृगपक्षिमनुष्याणां निग्रहानुग्रहेष्वपि ६ तां पालयति धर्मात्मा भरतः सत्यवानृजुः । धर्मकामार्थतत्त्वज्ञो निग्रहानुग्रहे रतः ७ नयश्च विनयश्चोभौ यस्मिन्सत्यं च सुस्थितम् । विक्रमश्च यथा दृष्टः स राजा देशकालवित् ८ तस्य धर्मकृतादेशा वयमन्ये च पार्थिवाः । चरामो वसुधां कृत्स्नां धर्मसन्तानमिच्छवः ९ यस्मिन्नृपतिशार्दूले भरते धर्मवत्सले । पालयत्यखिलां पृथ्वीं कश्चरेद्धर्मविप्रियम् १० ते वयं मार्गविभ्रष्टं स्वधर्मे परमे स्थिताः । भरताज्ञां पुरस्कृत्य चिन्तयामो यथाविधि ११ त्वं तु संक्लिष्टधर्मश्च कर्मणा च विगर्हितः । कामतन्त्रप्रधानश्च न स्थितो राजवर्त्मनि १२ ज्येष्ठो भ्राता पिता वापि यश्च विद्यां प्रयच्छति । त्रयस्ते पितरो ज्ञेया धर्मे च पथि वर्तिनः १३ यवीयानात्मनः पुत्रः शिष्यश्चापि गुणोदितः । पुत्रवत्ते त्रयश्चिन्त्या धर्मश्चैवात्र कारणम् १४ सूक्ष्मः परमविज्ञेयः सतां धर्मः प्लवङ्गम । हृदिस्थः सर्व-

---

असून पशू, पक्षी व मनुष्यें ह्यांच्यावर अनुग्रह आणि ह्यांचा निग्रह करण्याचा अधिकारही त्यानें दिलेला आहे ६ व त्याचप्रमाणें दुष्टांचा निग्रह व सज्जनांवर अनुग्रह करण्याविषयीं तत्पर, धर्म, अर्थ व काम ह्यांचें तत्त्व जाणणारा, सत्यनिष्ठ, सरळ आणि धर्मात्मा भरत ह्या पृथ्वीचें परिपालन करीत आहे ७. न्याय, नियम, सत्य आणि पराक्रम हीं त्या भरताचें ठिकाणीं अक्षय असल्याचें अनुभवसिद्ध आहे व देश आणि काल जाणणारा तो भरत सांप्रत सर्व पृथ्वीचा राजा आहे ८ धर्मसंरक्षणार्थ त्यानें आमची व इतरही राजांची योजना केलेली आहे व आह्मीही धर्मवृद्धीची इच्छा धरून संपूर्ण पृथ्वीवर संचार करीत आहोंत ९. अरे, तो धर्मवत्सल नृपश्रेष्ठ भरत संपूर्ण पृथ्वीचें परिपालन करीत असतांना धर्मनाश करण्यास कोण बरें उद्युक्त होईल ? १०. सारांश, सर्वोत्कृष्ट अशा स्वधर्माविषयीं तत्पर असलेले ते आह्मी भरताची आज्ञा शिरसा मान्य करून मार्गाला सोडून जात असलेल्याचा यथायोग्य विचार करीत असतों ११ आणि तूं तर क्रूर्मानें लोकनिंदेस पात्र, कामाच्यान मार्गी लागलेला, धर्मवंचक आहेस व ह्मणूनच राजमार्गाला अनुसरून चालतही नाहींस १२. अरे, ज्येष्ठ भ्राता, पिता आणि जो विद्या देतो तो हे तीन धर्ममार्गानें चालणाऱ्याचें पिते आहेत असें समजलें पाहिजे १३. त्याचप्रमाणें कनिष्ठ भ्राता, औरस पुत्र व गुणी शिष्य ह्या तिघांना पुत्रांप्रमाणेंच समजलें पाहिजे आणि धर्म हेंच त्याचें कारण होय १४. हे वानरा, सज्जनांचा धर्म सूक्ष्म असल्यामुळें तो इतरांना समजण्यास अत्यंत अशक्य आहे. फक्त प्राणिमात्राच्या हृदयामध्यें वास करणारा परमात्मा मात्र प्राण्यांचें पाप-

भूतानामात्मा वेद शुभाशुभम् १५ चपलश्चपलैः सार्धं वानरैरकृता-
त्मभिः । जात्यन्ध इव जात्यन्धैर्मन्त्रयन्प्रेक्षसे नु किम् १६ अहं तु व्यक्त-
तामस्य वचनस्य ब्रवीमि ते । न हि मां केवलं रोषात्त्वं विगर्हितुम-
र्हसि १७ तदेतत्कारणं पश्य यदर्थं त्वं मया हतः । भ्रातुर्वर्तसि भार्यायां
त्यक्त्वा धर्मं सनातनम् १८ अस्य त्वं धरमाणस्य सुग्रीवस्य महात्मनः ।
रुमायां वर्तसे कामात्स्नुषायां पापकर्मकृत् १९ तद्व्यतीतस्य ते धर्मा-
त्कामवृत्तस्य वानर । भ्रातृभार्याभिमर्शेऽस्मिन्दण्डोयं प्रतिपादितः २० न हि
लोकविरुद्धस्य लोकवृत्तादपेयुषः । दण्डादन्यत्र पश्यामि निग्रहं हरियूथप २१
न च ते मर्षये पापं क्षत्रियोहं कुलोद्भवः । औरसीं भगिनीं वापि भार्यां
वाप्यनुजस्य यः २२ प्रचरेत नरः कामात्तस्य दण्डो वधः स्मृतः ।
भरतस्तु महीपालो वयं त्वादेशवर्तिनः २३ त्वं च धर्मादतिक्रान्तः कथं
शक्यमुपेक्षितुम् । गुरुधर्मव्यतिक्रान्तं प्राज्ञो धर्मेन पालयन् ॥ भरतः

---

पुण्य जाणीत आहे १५. सारांश, एकाद्या जन्मांधानें दुसऱ्या जन्मांधाबरोबर एकादी
वस्तु अवलोकन करण्यास उद्युक्त व्हावें त्याप्रमाणें स्वभावतः चपल असलेला तूं तुझ्या-
सारिख्या चपल व अशिक्षित वानरांसहवर्तमान खलबत करणारा आहेस; तेव्हां तुला
धर्म कोठून समजणार ? १६. हें भाषण मी तुला स्पष्ट करून सांगतों; केवल रागानें
माझी निंदा करणें तुला योग्य नाहीं १७. मीं तुझा कशाकरितां वध केला ह्याचें
कारण लक्ष्यांत आण. अरे, सनातन धर्माचा त्याग करून तूं आपल्या भ्रात्याच्या
भार्येचा अभिलाष धरलेला आहेस १८. सारांश, हा महात्मा सुग्रीव हयात असतांना
वस्तुतः तुला स्नुषेप्रमाणें असलेली जी त्याची भार्या रुमा तिचा अभिलाष तूं करीत
आहेस आणि ह्मणून अर्थातूच तूं पापकर्म करणारा आहेस १९. तेव्हां, हे वानरा,
धर्माला सोडून स्वेच्छाचारानें वागत असलेल्या तुला ह्या भ्रातृभार्योपभोगरूप पातका-
बद्दल मीं हा दंड केलेला आहे २०. हे वानरसेनानायका, लोकमर्यादा सोडून जगद्वि-
रुद्ध वर्तन करणाऱ्या तुझा निग्रह वधदंडावांचून दुसऱ्या रीतीनें करणें मला बरोबर
दिसत नाहीं २१. तात्पर्य, मी कुलीन क्षत्रिय असल्यामुळें तुझ्या पापाची कधींही
उपेक्षा करणार नाहीं. कन्येशीं, भगिनीशीं अथवा कनिष्ठ भ्रात्याच्या भार्येशीं जो २२
पुरुष विषयवासनेनें रत होतो त्याला वध हाच दंड शास्त्रामध्यें सांगितला आहे. अरे,
भरत पृथ्वीचें परिपालन करणारा असून आह्मी त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणारे आहोंत २३
आणि तूं तर धर्माचें अतिक्रमण केलेलें आहेस. तेव्हां श्रेष्ठ जो धर्म त्यापासून
भ्रष्ट झालेल्या तुझी उपेक्षा आमच्या हातून होणें कसें बरें शक्य होईल ? राजनीति

कामयुक्तानां निग्रहे पर्यवस्थितः २४ वयं तु भरतादेशावधिं कृत्वा हरीश्वर । त्वद्विधान्भिन्नमर्यादान्निग्रहीतुं व्यवस्थिताः २५ सुग्रीवेण च मे सख्यं लक्ष्मणेन यथा तथा । दारराज्यनिमित्तं च निःश्रेयसकरः स मे २६ प्रतिज्ञा च मया दत्ता तदा वानरसंनिधौ । प्रतिज्ञा च कथं शक्या मद्विधेनानवेक्षितुम् २७ तदेभिः कारणैः सर्वैर्महद्भिर्धर्मसंश्रितैः । शासनं तव यद्युक्तं तद्भवाननुमन्यताम् २८ सर्वथा धर्म इत्येव द्रष्टव्यस्तव निग्रहः । वयस्यस्योपकर्तव्यं धर्ममेवानुपश्यता २९ शक्यं त्वयापि तत्कार्यं धर्ममवानुवर्तता ३० श्रूयते मनुना गीतौ श्लोकौ चारित्रवत्सलौ । गृहीतौ धर्मकुशलैस्तथा तच्चरितं मया ३१ राजभिर्धृतदण्डाश्च कृत्वा पापानि मानवाः । निर्मलाः स्वर्गमायान्ति सन्तः सुकृतिनो यथा ३२ शासनाद्वापि मोक्षाद्वा स्तेनः पापात्प्रमुच्यते । राजा त्वशासन्पापस्य तदवाप्नोति

---

जाणणारा भरत धर्मानें वागणाऱ्यांचें परिपालन धर्मानेंच करीत असून कामाच्याच मागें लागलेल्यांचा निग्रह करण्याविषयीं तत्पर असतो २४ आणि, हे वानरराजा, आह्मीही भरताची आज्ञा शिरसा मान्य करीत असून मर्यादा सोडून वागणाऱ्या तुझ्यासारख्यांचा निग्रह करण्याविषयीं उद्युक्त आहोंत २५. शिवाय, लक्ष्मणाप्रमाणें सुग्रीवाशीं माझें सख्य आहे आणि भार्या व राज्य प्राप्त होण्याकरितां त्यानें माझें हित करण्याविषयीं प्रतिज्ञा केलेली असून २६ मींही वानरांसमक्ष त्याच्या मनाप्रमाणें वागण्याचें त्याला वचन दिलेलें आहे. तेव्हां दिलेलें वचन न पाळणें माझ्यासारिख्याच्या हातून कसें बरें शक्य होईल ? २७. तस्मात्, हीं सर्व कारणें महत्त्वाचीं व धर्माला अनुसरून असल्यामुळें तुला जें योग्य शासन केलें आहे तें तुला मान्य असावें २८. तुझा जो मीं निग्रह केला हा सर्वस्वीं धर्मच झाला आहे असें तूं समज. धर्माकडे दृष्टि देऊन वागणाऱ्यानें मित्रावर उपकार केलाच पाहिजे २९. तूंजर धर्माला अनुसरून वागणारा असतास तर मीं जी गोष्ट केली ती तूंही केली असतीस. ( तात्पर्य, ज्याप्रमाणें मीं तुला शासन केलें आहे त्याप्रमाणें तूंही अशा प्रकारचें पातक करणाऱ्याला शासन केलें असतेंस ) ३०. सद्वर्तनप्रतिपालक असे दोन श्लोक मनूनीं सांगितलेले माझ्या ऐकण्यांत आहेत. ते धर्मनिष्ठांनीं स्वीकारिलेले असून तुझा वध करण्यांत मींही त्यांना अनुसरूनच वर्तन केलेलें आहे ३१. पुरुषांच्या हातून पातकें झालीं असतां राजांनीं त्यांना दंड केला ह्मणजे ते निष्पाप होतात आणि पुण्यवान् सज्जनांप्रमाणें ते स्वर्गाला जातात ३२. राजाला विदित झाल्यानंतर त्यानें शासन केल्यास अथवा सोडून दिल्यास पातकी पातकापासून मुक्त होतो; परंतु, पापी पुरुषाला शासन न करणाऱ्या राजाला मात्र त्याचें

किल्बिषम् ३३ आर्येण मम मान्धात्रा व्यसनं घोरमीप्सितम् । श्रमणेन
कृते पापे यथा पापं कृतं त्वया ३४ अन्यैरपि कृतं पापं प्रमत्तैर्वसुधाधिपैः।
प्रायश्चित्तं च कुर्वन्ति तेन तच्छाम्यते रजः ३५ तदलं परितापेन धर्मतः
परिकल्पितः । वधो वानरशार्दूल न वयं स्ववशे स्थिताः ३६ शृणु चाप्य-
परं भूयः कारणं हरिपुङ्गव । तच्छ्रुत्वा हि महद्वीर न मन्युं कर्तुमर्हसि ३७
न मे तत्र मनस्तापो न मन्युर्हरिपुङ्गव । वागुराभिश्च पाशैश्च कूटैश्च विवि-
धैर्नराः ३८ प्रतिच्छन्नाश्च दृश्याश्च गृह्णन्ति सुबहून्मृगान् । प्रधावितान्वा
वित्रस्तान्विस्रब्धानतिविष्ठितान् ३९ प्रमत्तानप्रमत्तान्वा नरा मांसाशिनो
भृशम् । विद्ध्यन्ति विमुखांश्चापि न च दोषोत्र विद्यते ४० यान्ति राज-
र्षयश्चात्र मृगयां धर्मकोविदाः । तस्मात्त्वं निहतो युद्धे मया बाणेन वानर
अयुध्यन्प्रतियुध्यन्वा यस्माच्छाखामृगो ह्यसि ४१ दुर्लभस्य च धर्मस्य

---

पातक लागतें ३३. मांधाता ह्या नांवाच्या माझ्या पूर्वजानेंही तुझ्यासारिखें एका बौद्ध यतीनें पातक केलें असतां त्याला योग्य असलेला असाच भयंकर दंड केलेला होता ३४ आणि त्याचप्रमाणें मदमत्त झालेल्या पुरुषांनीं केलेल्या पापाबद्दल इतरही भूपालांनीं असाच दंड केलेला आहे. पापी लोक ( पश्चात्ताप झाला असतां ) आपल्या पातकाच्या क्षालनार्थ नुसत्या राजदंडावरच अवलंबून रहात नसून धर्मशास्त्र-विहित प्रायश्चित्तही करीत असतात आणि त्याच्या योगानें त्यांचें पातक नाहींसें होत असतें ३५. तस्मात्, तुझा संताप आतां पुरे. हे वानरश्रेष्ठा, धर्मानेंच तुझा वध झालेला आहे आणि आह्मी स्वतंत्र नसून धर्माधीन आहोंत ३६. असो. हे वानरश्रेष्ठा, तुझ्या वधाचें आणखीही एक कारण मी सांगतों तें श्रवण कर. हे वीरा, तें महत्त्वाचें कारण श्रवण केल्यानंतर माझ्यावर क्रोध करणें तुला योग्य होणार नाहीं ३७. तुझा परोक्ष रीतीनें वध केल्याबद्दल माझ्या मनाला पश्चात्तापही झालेला नाहीं आणि क्रोध हेंही माझ्या हातून तुझा वध होण्याचें कारण नाहीं. लोक दृश्य अथवा गुप्त राहून जाळ्यांनीं अथवा कपटयुक्त उपायांनीं पुष्कळ मृग धरीत असतात ३८ आणि मृग धांवत असतांना, त्रस्त झाले असतांना, विश्वासानें स्वस्थ ब..ले असतांना, मृगांनीं निकरानें युद्ध करीत असतांना आणि तसेच गैरसावध अथवा सावध असतांना किंवा पराङ्मुखही असतांना मांस भक्षक पुरुष पानाच्या आड लपून अगर उघड रीतीनें त्यांना वेध करीत असतात. तात्पर्य, कोणत्याही रीतीनें मृगाचा वध करण्याला दोष नाहीं ३९,४०. धर्मवेत्ते राजर्षि मृगयेला जात असतात हें मृगवध निर्दोष असण्याला प्रमाण आहे आणि ह्मणूनच तूं प्रतिप-क्ष्याशीं युद्ध करीत असून माझ्याशीं जरी युद्ध करीत नव्हतास तरी शाखामृग अस-

जीवितस्य शुभस्य च । राजानो वानरश्रेष्ठ प्रदातारो न संशयः ४२ तान्न हिंस्यान्न चाक्रोशेन्नाक्षिपेन्नाप्रियं वदेत् । देवा मानुषरूपेण चरन्त्येते महीतले ४३ त्वं तु धर्ममविज्ञाय केवलं रोषमास्थितः । विदूषयसि मां धर्मे पितृपैतामहे स्थितम् ४४ एवमुक्तस्तु रामेण वाली प्रव्यथितो भृशम् । न दोषं राघवे दध्यौ धर्मेऽधिगतनिश्चयः ४५ प्रत्युवाच ततो रामं प्राञ्जलिर्वानरेश्वरः । यत्त्वमात्थ नरश्रेष्ठ तत्तथैव न संशयः ४६ प्रतिवक्तुं प्रकृष्टे हि नापकृष्टस्तु शक्नुयात् ४७ यदयुक्तं मया पूर्वं प्रमादाद्वाक्यमप्रियम् । तत्रापि खलु मां दोषं कर्तुं नार्हसि राघव ४८ त्वं हि दृष्टार्थतत्त्वज्ञः प्रजानां च हिते रतः । कार्यकारण-सिद्धौ च प्रसन्ना बुद्धिरव्यया ४९ मामप्यवगतं धर्माद्व्यतिक्रान्तपुरस्कृतम् । धर्मसंहितया वाचा धर्मज्ञ परिपालय ५० बाष्पसंरुद्धकण्ठस्तु

---

त्यामुळें, हे वानरा, मीं तुझा युद्धामध्यें बाणानें वध केला आहे ४१. हे वानर श्रेष्ठा, प्रजेला राजेच दुर्लभ धर्म, जीवित आणि अभ्युदय प्राप्त करून देणारे आहेत ह्यांत संशय नाहीं ४२. त्या राजांची ( संग्रामावांचून ) हिंसा करूं नये, निंदा करूं नये, त्यांचा अव॰मान करूं नये आणि त्यांना अप्रिय असलेलीही गोष्ट करूं नये. कारण, हे देवच मनुष्यरूपानें भूतलावर संचार करीत असतात ४३. तूं धर्माविषयीं मुळींच अज्ञानी असतांना केवल क्रुद्ध होऊन मज वाडवडीलांपासून चालत आलेल्या धर्मानें वागणाऱ्याला दूषण देत आहेस " ४४. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां वाली ( रामाला विनाकारण दोष लाविल्याबद्दल ) अत्यंत दुःखित झाला आणि धर्म कोणता याविषयीं त्याला निश्चित ज्ञान झाल्यामुळें रामाचे ठिकाणीं दोषारोप करण्याचें त्यानें पुनरपि मनामध्यें आणिलें नाहीं ४५. तदनंतर वानराधिपति वाली हात जोडून रामाला ह्मणाला " हे पुरुषश्रेष्ठा, तूं ह्मणतोस त्याप्रमाणेंच आहे ह्यांत संशय नाहीं ४६. कारण, श्रेष्ठाच्या पुढें निकृष्ट उत्तर देण्यास समर्थ होणार नाहीं ४७ प्रमादामुळें मीं जें पूर्वीं आपणाला अप्रिय असें भाषण केलें त्याबद्दल, हे राघवा, आपण मला दोष देऊं नका ४८. कारण, आपण धर्मादिकांचें तत्त्व स्वानुभवानें जाणणारे असून प्रजेच्या कल्याणाविषयीं दक्ष आहांत आणि कार्य कोणतें व कारण कोणतें ह्या गोष्टीचा निश्चय करण्यामध्यें आपलें अंतःकरण निर्दोष व निर्मल आहे ४९. तस्मात्, धर्मातिक्रमण करणाऱ्यांमध्यें अग्रगण्य ह्मणून प्रसिद्ध असलेल्या माझें धर्मयुक्त उपदेशानें, हे धर्मज्ञ, आपण परिपालन करा " ५०. असें ह्मणतां ह्मणतां वालीचा कंठ अश्रूंनीं दाटून आला आणि चिखलांत रुतलेल्या हत्तीप्रमाणें कांहीं सुचेनासें झालेला तो वाली रामाकडे पाहून रडत रडत

वाली सार्तरवः शनैः । उवाच रामं संप्रेक्ष्य पङ्कलग्न इव द्विपः ५१ न
चात्मानमहं शोचे न तारां नापि बान्धवान् । यथा पुत्रं गुणज्येष्ठमङ्गदं
कनकाङ्गदम् ५२ स ममादर्शनाद्दीनो बाल्यात्प्रभृति लालितः । तटाक
इव पीताम्बुरुपशोषं गमिष्यति ५३ बालश्चाकृतबुद्धिश्च एकपुत्रश्च मे
प्रियः । तारेयो राम भवता रक्षणीयो महाबलः ५४ सुग्रीवे चाङ्गदे
चैव विधत्स्व मतिमुत्तमाम् । त्वं हि गोप्ता च शास्ता च कार्याकार्य-
विधौ स्थितः ५५ या ते नरपते वृत्तिर्भरते लक्ष्मणे च या । सुग्रीवे चाङ्गदे
राजंस्तां चिन्तयितुमर्हसि ५६ मद्दोषकृतदोषां तां यथा तारां तपस्वि-
नीम् । सुग्रीवो नावमन्येत तथावस्थातुमर्हसि ५७ त्वया ह्यनुगृहीतेन
शक्यं राज्यमुपासितुम् । त्वद्वशे वर्तमानेन तव चित्तानुवर्तिना ५८ शक्यं
दिवं चार्जयितुं वसुधां चापि शासितुम् । त्वत्तोऽहं वधमाकाङ्क्षन्वार्यमा-
णोपि तारया ५९ सुग्रीवेण सह भ्रात्रा द्वन्द्वयुद्धमुपागतः । इत्युक्त्वा
वानरो रामं विरराम हरीश्वरः ६० स तमाश्वासयद्रामो वालिनं व्यक्त-

---

हळू हळू त्यांना ह्मणाला ५१ " ज्याप्रमाणें सुवर्णबाहुभूषणांनीं युक्त आणि गुणांनीं वरिष्ठ अशा अंगदनामक पुत्राबद्दल मला वाईट वाटत आहे त्याप्रमाणें स्वतः संबंधानें वाटत नाहीं; तारेकरितांही मी दुःख करीत नाहीं व बांधवांविषयींही मला विषाद होत नाहीं ५२. बालपणापासून मी त्याचें लालन केलें असल्यामुळें मी दिसेनासा झाल्यावर तो अंगद दीन होऊन उदक संपून गेलेल्या तडागाप्रमाणें शुष्क होऊन जाईल ५३. तस्मात्, हे रामा, बाल आणि बुद्धीनेंही पोक्त नसलेला असा जो माझा तारेचे ठिकाणीं झालेला एकुलता एक महाबलाढ्य व प्रिय पुत्र अंगद त्याचें आपण रक्षण करा ५४. सारांश, सुग्रीवाविषयीं आणि त्याचप्रमाणें अंगदाविषयीं आपलें मन चांगलें असूं द्या. कारण, कर्तव्य केल्याबद्दल रक्षण आणि अकार्य केल्याबद्दल शासन करणारेही आपणच ठरलेले आहांत ५५. हे प्रजाधिपते राजा, भरत आणि लक्ष्मण यांच्याशीं जशी आपली वागणूक आहे तशीच सुग्रीव आणि अंगद ह्यांच्याशीं ठेवण्याचें मनामध्यें असावें ५६ आणि माझ्या अपराधामुळें अपराधी ठरलेल्या त्या बिचाऱ्या तारेचा सुग्रीव अवमान न करील अशा रीतीनें आपण व्यवस्था ठेवावी ५७. तुमच्या अधीन राहून तुमच्या मनाप्रमाणें वागणारा जो तुमच्या मर्जीतला असेल त्याला राज्य चालविणें ५८, स्वर्गप्राप्ति होणें आणि पृथ्वीचें परिपालन करणें ह्या गोष्टी शक्य आहेत. तुमच्या हातून वध व्हावा ह्या इच्छेनें, तारा ' नको नको ' ह्मणत असताही ५९, भ्रात्या सुग्रीवासहवर्तमान मीं द्वंद्वयुद्ध केलें ". इतकें

दर्शनम् ॥ साधुसंमतया वाचा धर्मतत्त्वार्थयुक्तया ६१ न वयं भवता चिन्त्या नाप्यात्मा हरिसत्तम । वयं भवद्विशेषेण धर्मतः कृतनिश्चयाः ६२ दण्ड्ये यः पातयेद्दण्डं दण्ड्यो यश्चापि दण्ड्यते । कार्यकारणसिद्धार्थावुभौ तौ नावसीदतः ६३ तद्भवान्दण्डसंयोगादस्माद्विगतकल्मषः । गतः स्वां प्रकृतिं धर्म्यां दण्डदिष्टेन वर्त्मना ६४ त्यज शोकं च मोहं च भयं च हृदये स्थितम् । त्वया विधानं हर्यग्र्य न शक्यमतिवर्तितुम् ६५ यथा त्वय्यङ्गदो नित्यं वर्तते वानरेश्वर । तथा वर्तेत सुग्रीवे मयि चापि न संशयः ६६ स तस्य वाक्यं मधुरं महात्मनः समाहितं धर्मपथानुवर्तितम् । निशम्य रामस्य रणावमर्दिनो वचः सुयुक्तं निजगाद वानरः ६७ शराभितप्तेन विचेतसा मया प्रभाषितस्त्वं यदजानता विभो । इदं महेन्द्रोपमभीमविक्रम प्रसादितस्त्वं क्षम मे हरीश्वर ६८ [ ८०६ ] इत्यार्षे

---

रामाला सांगून वानरराज वाली स्वस्थ बसला असतां ६० ज्ञान प्राप्त झालेल्या त्या वालीचें सज्जनांना संमत आणि धर्मतत्त्वविषयक अर्थानें युक्त अशा वाणीनें रामांनीं सांत्वन केलें ६१. ( ते ह्मणाले ) "हे वानरश्रेष्ठा, तुला आह्माविषयीं अथवा स्वतःविषयीं काळजी करण्याचें कारण नाहीं. धर्मशास्त्रासंबंधानें तुझ्यापेक्षां आह्मी कार्याकार्य निश्चय करण्यांत अधिक प्रवीण आहोंत ६२. जो अपराध्याला दंड करितो आणि ज्या अपराध्याला दंड होतो ते दोघेही दंडास पात्र असणें आणि दंड करविणें ह्यांच्या योगानें परलोकप्राप्तीचें साधन प्राप्त करून घेत असल्यामुळें हानि पावत नाहींत ६३. तस्मात्, हा वधरूप दंड तुला प्राप्त झाल्यामुळें तूं पापरहित होऊन दंडबोधक शास्त्रोक्त मार्गानें आपल्या धर्माला अनुसरून असलेल्या शुद्ध स्वभावाप्रत प्राप्त झाला आहेस ६४. ह्यास्तव, अंतःकरणांतील भय, शोक व मोह ह्यांचा तूं त्याग कर. हे वानरश्रेष्ठा, प्राक्तनकर्मामुळें जें होणार ते तुला टाळितां येणें शक्य नाहीं ६५. हे वानरराजा, अंगद ज्याप्रमाणें नेहमीं तुझ्याशीं वागतो त्याचप्रमाणें सुग्रीवाशीं व माझ्याशींही वागेल ह्यांत संशय नाहीं" ६६. ह्याप्रमाणें रणामध्यें प्रतिपक्ष्यांचा नाश करणाऱ्या त्या महात्म्या रामाचें धर्ममार्गाला अनुसरून असलेलें मधुर व विचारयुक्त भाषण श्रवण करून वानर वालीनेंही रामाशीं योग्य भाषण केलें कीं ६७, "हे प्रभो, हे वानरराज, हे इंद्रतुल्यभयंकरपराक्रमी रामा, बाणानें संतप्त झाल्यामुळें कांहीं सुचेनासें होऊन अज्ञानानें मीं जें हें आपणाला उद्देशून भाषण केलें त्याबद्दल मला क्षमा असावी; मजवर कृपा होण्याविषयीं मीं आपली प्रार्थना केली आहे" ६८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक

श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥१८॥

स वानरमहाराजः शयानः शरपीडितः । प्रत्युक्तो हेतुमद्वाक्यैर्नोत्तरं प्रतिपद्यत १ अश्मभिः परिभिन्नाङ्गः पादपैराहतो भृशम् । रामबाणेन चाक्रान्तो जीवितान्ते मुमोह सः २ तं भार्या बाणमोक्षेण रामदत्तेन संयुगे । हतं प्लवगशार्दूलं तारा शुश्राव वालिनम् ३ सा सपुत्राप्रियं श्रुत्वा वधं भर्तुः सुदारुणम् । निष्पपात भृशं तस्मादुद्विग्ना गिरिकन्दरात् ४ ये त्वङ्गदपरीवारा वानरा हि महाबलाः । ते सकार्मुकमालोक्य रामं त्रस्ताः प्रदुद्रुवुः ५ सा ददर्श ततस्त्रस्तान्हरीनापततो द्रुतम् । यूथादिव परिभ्रष्टान्मृगान्निहतयूथपान् ६ तानुवाच समासाद्य दुःखितान्दुःखिता सती । रामवित्रासितान्सर्वाननुबद्धानिवेषुभिः ७ वानरा राजसिंहस्य यस्य यूयं पुरःसराः । तं विहाय सुवित्रस्ताः कस्माद्द्रवत दुर्गताः ८ राज्यहेतोः स चेद्भ्राता भ्रात्रा क्रूरेण पातितः । रामेण प्रसृतैर्दूरान्मार्ग-

---

आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

रामबाणानें व्यथित झाल्यामुळें भूतलावर पडलेल्या त्या वानरांच्या सार्वभौम राजाला सहेतुक भाषणांनीं उत्तर मिळालें असतां त्यानें कांहीं एक प्रत्युत्तर दिलें नाहीं १. नंतर पाषाणांनीं शरीर फुटून गेलेला, वृक्षांनीं अत्यंत ताडित झालेला आणि रामबाणानें जर्जर झालेला तो वाली प्राणप्रयाणसमयीं मूर्च्छित झाला २. तेव्हां रामानें सोडिलेल्या बाणानें वानरश्रेष्ठ वालीचा युद्धामध्यें वध झाला हें तारेनें श्रवण केलें ३ आणि भर्त्याचा वध हें अत्यंत भयंकर अप्रिय वर्तमान श्रवण करितांक्षणीं ती तारा आपल्या पुत्रासहवर्तमान अत्यंत उद्विग्न होऊन आपल्या पुत्रासहवर्तमान त्या पर्वतगुहारूप किष्किंधानगरीपासून बाहेर निघाली ४ व अंगदाभोंवतीं जे बलाढ्य वानर होते तेही धनुष्य धारण केलेल्या रामाला अवलोकन करितांक्षणीं भयभीत होऊन पळूं लागले ५. तेव्हां समाजरक्षकांचा वध होऊन कळपापासून दूर झालेल्या मृगाप्रमाणें भयभीत होऊन सत्वर पळत सुटलेल्या त्या वानरांना तिनें अवलोकन केलें ६ आणि जसे कांहीं रामाचे बाणच मागें लागले आहेत कीं काय अशा रीतीनें भयभीत होऊन दुःखित झालेल्या त्या वानरांसमीप गेल्यावर ती दुःखाकुल झालेली साध्वी तारा त्यांना ह्मणाली ७ " हे वानरहो, ज्या श्रेष्ठ राजाच्या पुढें तुह्मी चालणारे आहांत त्याला सोडून तुह्मी संकटांत सांपडल्यामुळें अत्यंत भयभीत होऊन कशाकारितां पळत आहांत ?८. लांबून वेध करणाऱ्या व दूर उभे राहून रामानें

णैर्दूरपातिभिः ९ कपिपत्न्या वचः श्रुत्वा कपयः कामरूपिणः । प्राप्तकालमविश्लिष्टमूचुर्वचनमङ्गनाम् १० जीवपुत्रे निवर्तस्व पुत्रं रक्षस्व चाङ्गदम् । अन्तको रामरूपेण हत्वा नयति वालिनम् ११ क्षिप्रान्वृक्षान्समाविध्य विपुलाश्च तथा शिलाः । वाली वज्रसमैर्बाणैर्वज्रेणेव निपातितः १२ अभिभूतमिदं सर्वं विद्रुतं वानरं बलम् । अस्मिन्प्लवगशार्दूले हते शक्रसमप्रभे १३ रक्ष्यतां नगरी शूरैरङ्गदश्चाभिषिच्यताम् । पदस्थं वालिनः पुत्रं भजिष्यन्ति प्लवंगमाः १४ अथवा रुचितं स्थानमिह ते रुचिरानन । आविशन्ति च दुर्गाणि क्षिप्रमद्यैव वानराः १५ अभार्याः सहभार्याश्च संत्यत्र वनचारिणः । लुब्धेभ्यो विप्रलब्धेभ्यस्तेभ्यो नः सुमहद्भयम् १६ अल्पान्तरगतानां तु श्रुत्वा वचनमङ्गना । आत्मनः प्रतिरूपं सा बभाषे चारुहासिनी १७ पुत्रेण मम किं कार्यं राज्येनापि किमा-

---

सोडिलेल्या बाणांनीं जर क्रूर भ्रात्या सुग्रीवानें राज्याकरितां त्या भ्रात्याचा वध केला असेल तर पळून काय उपयोग? (त्याच्या सेवेनेंच तुमचा निभाव लागणारा आहे)"९ हें वानरपत्नीचें भाषण श्रवण केल्यावर यथेष्ट रूप धारण करणारे वानर समयोचित अशा स्पष्ट शब्दांनीं त्या स्त्रीला ह्मणाले १० " हे पुत्रवति स्त्रिये, तूं परत फीर आणि आपल्या अंगदनामक पुत्राचें रक्षण कर. रामरूपानें अंतकच वालीला मारून (यमसदनीं) नेत आहे ११. वेगावेगानें जाणाऱ्या वृक्षानीं व प्रचंड शिलांनीं वालीनें प्रतिपक्ष्याला वेध केला असूनही वज्रतुल्य बाणांच्या योगानें त्याचा वध झाला आहे आणि तो वज्रानेंच झाला आहे कीं काय असें मला वाटत आहे १२. सांप्रत पराभव पावलेलें हें सर्व वानरसैन्य पळत सुटलें आहे. तस्मात्, तेजानें इंद्रतुल्य असलेला हा वानरराज वध पावला असतांना १३ शूर वानरांच्या योगानें नगरीचें रक्षण करून अंगदाला अभिषेक करावा. कारण, वालीचा पुत्र राज्यावर बसला असतां वानर त्याची, हे सुंदर मुखानें युक्त राजपत्नि, हें स्थान जरी तुला आवडत असलें तरी सेवा करूं लागतील १४. अथवा, वानर आजच किष्किंधा नगरींतील दुर्गमस्थानामध्यें प्रवेश करितील १५. ते प्रविष्ट झाले असतां अपत्नीक आणि सपत्नीक असे जे दुसरे वनचर वानर येथें आहेत तेही त्यांच्या मागोमाग प्रवेश करितील आणि त्या राज्यलुब्ध व पूर्वीं आमचे हातून फसले गेलेल्या सुग्रीवपक्षीय वानरांपासून आह्मांला फारच मोठें भय प्राप्त होईल" १६. हें समीपच असलेल्या वानरांचें भाषण श्रवण केल्यावर मनोहर हास्यानें युक्त असलेली ती वालीची भार्या तारा आपणाला योग्य असें भाषण करूं लागली १७. (ती ह्मणाली) "तो महाभाग्यवान् वानरश्रेष्ठ भर्ता मृत्यु पावला असतांना पुत्राशीं,

त्मना। कपिसिंहे महाभागे तस्मिन्भर्तरि नश्यति १८ पादमूलं गमि-
ष्यामि तस्यैवाहं महात्मनः। योसौ रामप्रयुक्तेन शरेण विनिपातितः १९
एवमुक्त्वा प्रदुद्राव रुदती शोकमूर्छिता। शिरश्चोरश्च बाहुभ्यां दुःखेन
समभिघ्नती २० सा व्रजन्ती ददर्शाथ पतिं निपतितं भुवि। हन्तारं वान-
रेन्द्राणां समरेष्वनिवर्तिनाम् २१ क्षेप्तारं पर्वतेन्द्राणां वज्राणामिव वास-
वम्। महावातसमाविष्टं महामेघौघनिःस्वनम् २२ शक्रतुल्यपराक्रान्तं
वृष्ट्वेवोपरतं घनम्। नर्दन्तं नर्दतां भीमं शूरं शूरेण पातितम्॥ शार्दूलेना-
मिषस्यार्थे मृगराजमिवाहतम् २३ अर्चितं सर्वलोकस्य सपताकं सवे-
दिकम्। नागहेतोः सुपर्णेन चैत्यमुन्मथितं यथा २४ अवष्टभ्यावतिष्ठन्तं
ददर्श धनुरूर्जितम्। रामं रामानुजं चैव भर्तुश्चैव तथानुजम् २५ तान-
तीत्य समासाद्य भर्तारं निहतं रणे। समीक्ष्य व्यथिता भूमौ संभ्रान्ता
निपपात ह २६ सुप्तेव पुनरुत्थाय आर्यपुत्रेति वादिनी। रुरोद सा पतिं

राज्याशीं अथवा स्वतःच्या देहाशीं तरी मला काय कर्तव्य आहे? १८. जो हा माझा भर्ता रामानें सोडिलेल्या बाणाच्या योगानें सुग्रीवानें संग्रामामध्यें पाडिला आहे त्या महात्म्या भर्त्याच्याच पायापाशीं मी जातें" १९. असें बोलून ती शोकाकुल झालेली तारा रडत रडत आणि दुःखानें मस्तक व ऊर बाहूंच्या योगानें बडवून घेत घेत धांवूं लागली २० आणि जातां जातां भूमीवर पडलेला भर्ता तिनें अवलोकन केला. संग्रामामध्यें परावृत्त न होणाऱ्या वानरराजांचा वध करण्यास तो समर्थ असे २१; वज्रें फेंकण्यास समर्थ असलेल्या इंद्राप्रमाणें संग्रामामध्यें मोठमोठे पर्वत फेंकण्यास समर्थ, प्रचंड वायूप्रमाणें रणामध्यें त्याला अवेश येणारा, मोठमोठ्या मेघ-समुदायांप्रमाणें गर्जना करणारा २२, इंद्रतुल्यपराक्रमी, जलवृष्टि करून शांत झालेल्या मेघाप्रमाणें स्वस्थ राहिलेला, गर्जना करणाऱ्या योद्ध्यांमध्यें भयंकर गर्जना करणारा, शूर, मांसाकरितां व्याघ्रानें मारिलेल्या मोठ्या मृगाप्रमाणें शूराच्या हातून वध पाव-लेला २३, सर्व लोकांना पूज्य आणि आंत असलेले सर्प भक्षण करण्याकरितां गरुडानें स्थानासहवर्तमान उद्ध्वस्त करून टाकिलेल्या मार्गावरील वारुळाप्रमाणें ध्वजासहवर्तमान रामानें उलथून पाडिलेला असा आपला भर्ता तिनें अवलोकन केल्यावर २४ धैर्य धरून हातामध्यें प्रचंड धनुष्य धारण करणाऱ्या रामाला, लक्ष्मणाला आणि त्याचप्रमाणें भर्त्याच्या कनिष्ठ भ्रात्यालाही तिनें अवलोकन केलें २५. नंतर त्यांना पाहून पुढें गेल्या-वर रणामध्यें वध पावून पडलेल्या भर्त्यासमीप ती आली आणि त्याला पहातांक्षणीं दुःखाकुल व मूर्च्छित होऊन ती भूमीवर पडली २६. तदनंतर झोपेंतून उठलेल्या स्त्रीप्र-

दृष्ट्वा संवीतं मृत्युदामभिः २७ तामवेक्ष्य तु सुग्रीवः क्रोशन्तीं कुररीमिव। विषादमगमत्कष्टं दृष्ट्वा चाङ्गदमागतम् २८ [ ८३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकोनविंशः सर्गः॥ १९॥

रामचापविसृष्टेन शरेणान्तकरेण तम्। दृष्ट्वा विनिहतं भूमौ तारा ताराधिपानना १ सा समासाद्य भर्तारं पर्यष्वजत भामिनी। इषुणाभिहतं दृष्ट्वा वालिनं कुञ्जरोपमम् २ वानरं पर्वतेन्द्राभं शोकसंतप्तमानसा। तारा तरुमिवोन्मूलं पर्यदेवयतातुरा ३ रणे दारुणविक्रान्त प्रवीर प्लवतां वर। किमिदानीं पुरोभागामद्य त्वं नाभिभाषसे ४ उत्तिष्ठ हरिशार्दूल भजस्व शयनोत्तमम्। नैवंविधाः शेरते हि भूमौ नृपतिसत्तमाः ५ अतीव खलु ते कान्ता वसुधा वसुधाधिप। गतासुरपि तां गात्रैर्मां विहाय निषेवसे ६ व्यक्तमद्य त्वया वीर धर्मतः संप्रवर्तता। किष्किन्धेव पुरी रम्या

---

माणें पुनरपि सावध झाल्यावर मृत्युपाशांनीं बद्ध झालेल्या पतीला अवलोकन करून "हे आर्यपुत्रा" असें ह्मणत ह्मणत ती रडूं लागली २७. तेव्हां कुररीप्रमाणें आक्रोश करीत असलेल्या तारेला आणि जवळ आलेल्या अंगदाला अवलोकन करून सुग्रीवाला मोठें दुःख झालें २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला॥ १९॥

चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या तारेनें रामाच्या धनुष्यापासून सुटलेल्या प्राणघातक बाणाच्या योगानें भूमीवर वध पावून पडलेल्या वालीला अवलोकन केलें १. नंतर गजासारिखा धिप्पाड असलेला तो वाली बाणाच्या योगानें वध पावलेला पाहून ती स्त्री त्या भर्त्याच्या समीप गेली आणि त्याला कडकडून भेटली २. तदनंतर, शोकानें मन संतप्त झालेली ती तारा दुःखाकुल होऊन महापर्वताप्रमाणें दिसणाऱ्या आणि उपटून पडलेल्या वृक्षाप्रमाणें समरांगणांत पडलेल्या त्या वानराकरितां शोक करूं लागली ३. (ती ह्मणाली) "हे रणामध्यें भयंकर पराक्रम करणाऱ्या महावीरा, हे वानरश्रेष्ठा, सांप्रत मीं मर्यादेचें अतिक्रमण केलें आहे असें समजून तूं माझ्याशीं भाषण करीत नाहींस काय? ४. हे वानरश्रेष्ठा, ऊठ आणि उत्कृष्ट शय्येवर शयन कर. अरे, तुझ्यासारिखे नृपश्रेष्ठ भूमीवर शयन करीत नाहींत ५. हे पृथ्वीपते, पृथ्वी तुला खरोखर अतिशयच प्रिय आहे. कारण, तूं सांप्रत गतप्राण झाला असूनही मला सोडून तिचेंच अपल्या अवयवांच्या योगानें सेवन करीत आहेस ६. हे वीरा, धर्मानें युद्ध करून तूं आज स्वर्गसाधनभूत रणभूमीमध्यें किष्किंधानगरीप्रमाणें दुसरी एक रम्य नगरी निर्माण केली आहेस. (असें नसेल तर किष्किंधानगरी सोडून तूं येथें कशा-

स्वर्गमार्गे विनिर्मिता ७ यान्यस्माभिस्त्वया सार्धं वनेषु मधुगन्धिषु । विहृतानि त्वया काले तेषामुपरमः कृतः ८ निरानन्दा निराशाहं निमग्ना शोकसागरे । त्वयि पञ्चत्वमापन्ने महायूथपयूथपे ९ हृदयं सुस्थितं मह्यं दृष्ट्वा निपतितं भुवि । यन्न शोकाभिसंतप्तं स्फुटतेद्य सहस्रधा १० सुग्रीवस्य त्वया भार्या हृता स च विवासितः । यत्तत्तस्य त्वया व्युष्टिः प्राप्तेयं प्लवगाधिप ११ निःश्रेयसपरा मोहात्त्वया चाहं विगर्हिता । यैषाब्रुवं हितं वाक्यं वानरेन्द्र हितैषिणी १२ रूपयौवनदृप्तानां दक्षिणानां च मानद । नूनमप्सरसामार्य चित्तानि प्रमथिष्यसि १३ कालो निःसंशयो नूनं जीवितान्तकरस्तव । बलाद्येनावपन्नोसि सुग्रीवस्यावशो वशी १४ अस्थाने वालिनं हत्वा युध्यमानं परेण च । न संतप्यति काकुत्स्थः कृत्वा कर्म सुगर्हितम् १५ वैधव्यं शोकसंतापं कृपणाकृपणा सती । अदुःखोपचिता पूर्वं वर्तयिष्याम्यनाथवत् १६ लालि-

---

करितां शयन करीत आहेस ? ) ७. मधुगंधानें युक्त असलेल्या वनामध्यें आमच्यासहवर्तमान ज्या तूं क्रीडा केल्यास त्यांची ह्या वेळीं तूं परिसमाप्तिच केली आहेस ८. मोठमोठ्या वानरसेनानायकांच्याही समुदायाचें संरक्षण करणारा तूं मृत्यु पावल्यामुळें मी आनंदशून्य व निराश होऊन शोकसागरामध्यें अगदीं मग्न झालें आहें ९. खरोखर माझें हृदय फारच बळकट आहे. कारण भूमीवर पडलेल्या तुला अवलोकन करूनही शोकसंतप्त होऊन त्याचे अद्यापि हजारों तुकडे तुकडे होऊन जात नाहींत १०. हे वानरराजा, सुग्रीवाच्या भार्येचा अपहार करून त्याला जें तूं हांकून लाविलेंस त्याचें हें फल आज तुला प्राप्त झालें आहे ११. हे वानरराजा, तुझ्या हिताची इच्छा धरून व तुझ्या कल्याणाविषयीं तत्पर राहून मीं तुला हिताची गोष्ट सांगितली असतांनाही मोहानें तूं माझी निंदा केलीस १२. हे मानी वानरराजा, हे आर्या, सौंदर्य आणि यौवन ह्यांच्या योगानें गर्विष्ठ झालेल्या चतुर अप्सरांचीं अंतःकरणें खरोखर तूं क्षुब्ध करून टाकशील १३. खरोखर तुझ्या जीविताचा अंत करणारा हा कालच निःसंशय प्राप्त झाला आहे आणि ह्मणूनच दुसऱ्यांना आपल्या ताब्यांत ठेवणाराही तूं त्या कालाच्या योगानें निरुपाय होऊन सुग्रीवाच्या तावडींत सांपडलास १४. अरे, वाली दुसऱ्याशीं युद्ध करीत असतांना त्याचा वध करून ह्मणजे अर्थात् अत्यंत निंद्य कर्म करूनही ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला पश्चात्ताप होत नाहीं हें अयोग्य आहे १५. पूर्वीं मला कधीं दुःख भोगण्याचा प्रसंग आला नसूनही सांप्रत अत्यंत दैन्यावस्थेस पोंचलेल्या मला अनाथाप्रमाणें राहून वैधव्यांत व शोकसंतापांतच

तश्चाङ्गदो वीरः सुकुमारः सुखोचितः । वत्स्यते कामवस्थां मे पितृव्ये
क्रोधमूर्छिते १७ कुरुष्व पितरं पुत्र सुदृष्टं धर्मवत्सलम् । दुर्लभं दर्शनं
तस्य तव वत्स भविष्यति १८ समाश्वासय पुत्रं त्वं संदेशं संदिशस्व
मे । मूर्ध्नि चैनं समाघ्राय प्रवासं प्रस्थितो ह्यसि १९ रामेण हि मह-
त्कर्म कृतं त्वामभिनिघ्नता । आनृण्यं तु गतं तस्य सुग्रीवस्य प्रतिश्रवे २०
सकामो भव सुग्रीव रुमां त्वं प्रतिपत्स्यसे । भुङ्क्ष्व राज्यमनुद्विग्नः
शस्तो भ्राता रिपुस्तव २१ किं मामेवं प्रलपतीं प्रियां त्वं नाभिभाषसे ।
इमाः पश्य वरा बह्वीो भार्यास्ते वानरेश्वर २२ तस्या विलपितं श्रुत्वा
वानर्यः सर्वतश्च ताः । परिगृह्याङ्गदं दीना दुःखार्ताः प्रतिचुक्रुशुः २३
किमङ्गदं साङ्गदवीरबाहो विहाय यातोसि चिरं प्रवासम् । न युक्तमेवं
गुणसंनिकृष्टं विहाय पुत्रं प्रियचारुवेषम् २४ यद्यप्रियं किंचिदसंप्रधार्य
कृतं मया स्यात्तव दीर्घबाहो । क्षमस्व मे तद्धरिवंशनाथ व्रजामि मूर्ध्ना

---

दिवस काढण्याचा प्रसंग आला आहे १६. सुकुमार, सुखाचीच संवय असलेला आणि मीं लाड केलेला हा वीर अंगद क्रोधसंतप्त झालेल्या चुलत्यापाशीं कोणत्या स्थितीमध्यें राहील ? १७. हे पुत्रा, आपल्या धर्मवत्सल पित्याला एकदां चांगलें पाहून घे. कारण, हे वत्सा, आतां त्याचें दर्शन तुला दुर्लभ होईल १८. ( हे वानरराजा, ) तूं आतां प्रवासाला निघाला आहेस. ह्यास्तव, माझ्या पुत्राचें सांत्वन कर आणि कर्तव्याचा उपदेश कर १९. तुझा वध करून रामानें तर मोठेंच कर्म केलें आहे; कारण, सुग्रीवाशीं केलेल्या प्रतिज्ञेसंबंधानें तो आतां त्याचा अनृणी झाला आहे २०. हे सुग्रीवा, आतां तुझे मनोरथ परिपूर्ण होऊं दे; तुला आतां, रुमा प्राप्त होईल. तूं निःशंकपणें राज्याचा उपभोग घे. कारण, तुझा शत्रु जो तुझा भ्राता त्याचा आतां वध झाला आहे २१. हे वानरराजा, ह्याप्रमाणें मी तुझी प्रिया विलाप करीत असतां-नाही तूं माझ्याशीं कां बरें भाषण करीत नाहींस ? येथें आलेल्या ह्या आपल्या अनेक श्रेष्ठ भार्यांकडे तरी पहा ! " २२. हा तिचा विलाप श्रवण केल्यावर चोहोंकडून तेथें जुळलेल्या दीन व दुःखाकुल वानरस्त्रिया अंगदाला कवटाळून धरून आक्रोश करूं लागल्या २३. ( नंतर तारा ह्मणाली ) " भूषणांनीं भूषित व वीरयानक बाहूंनीं युक्त असलेल्या वानरराजा, अंगदाला सोडून तूं कां बरें दीर्घ प्रवासाला निघाला आहेस? अरे; प्रिय व मनोहर रूप धारण करीत असून गुणांनींही तुझ्यासारिखा असलेल्या पुत्राला सोडून देऊन ह्याप्रमाणें निघून जाणें तुला योग्य नाहीं २४. हे महापराक्रमी वानरसेनाधिपते, अविचारानें माझ्या हातून जर कांहीं आपल्या मर्जीविरुद्ध गोष्ट

तव वीर पादौ २५ तथा तु तारा करुणं रुदन्ती भर्तुः समीपे सह वान-
रीभिः । व्यवस्यत प्रायमनिन्द्यवर्णा उपोपवेष्टुं भुवि यत्र वाली २६
[ ८६० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धा-
काण्डे विंशः सर्गः ॥ २० ॥

ततो निपतितां तारां च्युतां तारामिवाम्बरात् । शनैराश्वासयामास
हनूमान्हरियूथपः १ गुणदोषकृतं जन्तुः स्वकर्म फलहेतुकम् । अव्यग्र-
स्तदवाप्नोति सर्वं प्रेत्य शुभाशुभम् २ शोच्या शोचसि कं शोच्यं दीनं
दीनानुकम्पसे । कश्च कस्यानुशोच्योस्ति देहेस्मिन्बुद्बुदोपमे ३ अङ्गदस्तु
कुमारोयं द्रष्टव्यो जीवपुत्रया । आयत्यां च विधेयानि समर्थान्यस्य
चिन्तय ४ जानास्यनियतामेवं भूतानामागतिं गतिम् । तस्माच्छुभं हि
कर्तव्यं पण्डिते नेह लौकिकम् ५ यस्मिन्हरिसहस्राणि शतानि नियु-

---

घडली असेल तर आपण मला क्षमा करा; हे वीर, मी आपल्या चरणीं मस्तक ठेवितें" २५. ह्याप्रमाणें वानरींसहवर्तमान भर्त्याचे समीप दीन स्वरानें तारा रोदन करूं लागली आणि उत्कृष्ट कांतीनें युक्त असलेल्या त्या तारेनें ज्या भूमीवर वाली पडला होता त्या भूमीसमीप असलेल्या भूमीवर अन्नग्रहण न करितां प्राण सोडण्याचा निश्चय केला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यां-तील किष्किंधाकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

तदनंतर आकाशांतून च्युत झालेल्या तारेप्रमाणें भूमीवर पडलेल्या त्या तारेचें वानरसेनाधिपति हनूमान् हलकें हलकें सांत्वन करूं लागला १. ( तो ह्मणाला ) "गुणदोषांमुळें जें प्राण्याच्या हातून स्वर्गनरकादि फलसाधनरूप कर्म घडलेलें असतें त्याचें सर्व बरें- वाईट फल मरणानंतर स्वस्थ असलेल्या ह्या प्राण्याला प्राप्त होतें २. वास्तविक तूं शोचनीय असतांना शोचनीय अशा दुसऱ्या कोणाकरितां शोक करीत आहेस आणि स्वतःच दीन असून दुसऱ्या कोणा दीनाकरितां तुला कळवळा येत आहे ? बुडबुड्याप्रमाणें असलेला हा देह नाहींसा झाल्यावर खरोखर कोण बरें कोणाच्या शोकास पात्र होणार आहे ? ३ तूं पुत्रवतीनें ह्या कुमार अंगदाकडे पाहून ह्या वालीच्या मरणोत्तरसमयीं कोणतीं कृत्यें करण्यास योग्य आहेत ह्याचा विचार केला पाहिजे ४. प्राण्यांचें जन्ममरण ह्याप्रमाणें अनियमित असल्याचें तुला विदितच आहे. तस्मात्, हे समंजस राजपत्नि, ह्या प्रसंगीं लौकिकी रोदन वगैरे न करितां भर्त्याला परलोकीं सुखावह होणारें जें कांहीं असेल तेंच तुला केलें पाहिजे ५. जो जिवंत असतांना शेंकडों, हजारों, लाखों वानरांची मनाप्रमाणें उपजीविका चालत असे तो

तानि च । वर्तयन्ति कृताशानि सोऽयं दिष्टान्तमागतः ६ यदयं न्याय-
दृष्टार्थः सामदानक्षमापरः । गतो धर्मजितां भूमिं नैनं शोचितुमर्हसि ७
सर्वे च हरिशार्दूलाः पुत्रश्चायं तवाङ्गदः । हर्यृक्षपतिराज्यं च त्वत्सनाथ-
मनिन्दिते ८ ताविमौ शोकसंतप्तौ शनैः प्रेरय भामिनि । त्वया परिगृही-
तोऽयमङ्गदः शास्तु मेदिनीम् ९ संततिश्च यथा दृष्टा कृत्यं यच्चापि सांप्र-
तम् । राज्ञस्तत्क्रियतां सर्वमेष कालस्य निश्चयः १० संस्कार्यो हरिरा-
जस्तु अङ्गदश्चाभिषिच्यताम् । सिंहासनगतं पुत्रं पश्यन्ती शान्तिमे-
ष्यसि ११ सा तस्य वचनं श्रुत्वा भर्तृव्यसनपीडिता । अब्रवीदुत्तरं तारा
हनूमन्तमवस्थितम् १२ अङ्गदप्रतिरूपाणां पुत्राणामेकतः शतम् । हत-
स्याप्यस्य वीरस्य गात्रसंश्लेषणं वरम् १३ न चाहं हरिराजस्य प्रभवा-
म्यङ्गदस्य वा । पितृव्यस्तस्य सुग्रीवः सर्वकार्येष्वनन्तरः १४ न ह्येषा

---

आज मृत्यु पावला आहे ६. ज्याअर्थीं ह्यानें नीतिशास्त्ररूपतत्त्वाला अनुसरून राज्य चालविलें आहे आणि ज्याअर्थीं साम, दान व क्षमा ह्यांविषयीं तत्पर राहूनच इतर वानरांशीं हा वागत असे त्याअर्थीं धर्मानें पृथ्वी जिंकणाऱ्या राजांचें स्थान ह्याला प्राप्त होईल ह्याच्याविषयीं शोक करण्याचें तुला कारण नाहीं ७. हे निर्दोष राजपत्नि, सर्व वानरश्रेष्ठ हा तुझा पुत्र अंगद आणि वानर व ऋक्षगण ह्यांचा अधिपति जो वाली त्याचें राज्य हीं सर्व तुझ्यामुळेंच सनाथ होणारीं आहेत ८. तस्मात्, हे राजपत्नि, शोकाकुल झालेल्या ह्या उभयतां चुलत्या-पुतण्यांना तूं उत्तरकार्य करण्याची अनुज्ञा दे आणि तूं हातीं धरलेल्या ह्या अंगदाला पृथ्वीचें परिपालन करूं दे ९. शास्त्रामध्यें संततीचें जें कर्तव्य सांगितलें आहे आणि राजासंबंधानें जें कर्तव्य करणें सध्यां प्राप्त झालें आहे तें सर्व केलें पाहिजे.( शोक करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं.) कालानें अवश्य घडणारीच गोष्ट ही झालेली आहे १०. तस्मात्, वानरराज वालीचें उत्तरकार्य होऊन अंगदाला राज्याभिषेक झाला पाहिजे ह्मणजे आपल्या पुत्राला सिंहासनावर बसलेला पाहून तुझ्या मनाला स्वस्थता वाटेल" ११. हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर पतिमरणानें दुःखित झालेली तारा समीप उभ्या असलेल्या हनुमानाला ह्मणाली १२ "अंगदासारिखे शंभर पुत्र एका बाजूला घालून वध पावलेल्या ह्या वीराच्या देहाला आलिंगन देणें हें जर दुसऱ्या बाजूला घातलें ( आणि सुखाची तुलना करून पाहिली ) तर वधपावलेल्याही ह्या वीराच्या देहाला आलिंगन देणेंच मला जास्त सुखावह आहे १३. आतां वानरराज्यालाही मी योग्य नाहीं आणि अंगदाचीही मी मालकीण नाहीं. सांप्रत सर्व गोष्टींविषयीं त्याचा पिता सुग्रीवच त्याला माझ्यापेक्षां जवळ आहे १४.

बुद्धिरास्थेया हनूमन्नङ्गदं प्रति। पिता हि बन्धुः पुत्रस्य न माता हरि-
सत्तम १५ न हि मम हरिराजसंश्रयात्क्षमतरमस्ति परत्र चेह वा। अभि-
मुखहतवीरसेवितं शयनमिदं मम सेवितुं क्षमम् १६ [ ८७६ ] इत्यार्षे श्रीमद्रा-
मायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे एकविंशः सर्गः॥२१॥

वीक्षमाणस्तु मन्दासुः सर्वतो मन्दमुच्छ्वसन्। आदावेव तु सुग्रीवं ददर्शा-
नुजमग्रतः १ तं प्राप्तविजयं वाली सुग्रीवं प्लवगेश्वरम्। आभाष्य व्यक्तया
वाचा सस्नेहमिदमब्रवीत् २ सुग्रीव दोषेण न मां गन्तुमर्हसि किल्बिषात्।
कृष्यमाणं भविष्येण बुद्धिमोहेन मां बलात् ३ युगपद्विहितं तात न मन्ये
सुखमावयोः। सौहार्दं भ्रातृयुक्तं हि तदिदं जातमन्यथा ४ प्रतिपद्य त्वम-
द्यैव राज्यमेषां वनौकसाम्। मामप्यद्यैव गच्छन्तं विद्धि वैवस्वतक्षयम् ५
जीवितं च हि राज्यं च श्रियं च विपुलां तथा। प्रजहाम्येष वै तूर्णमहं
चागर्हितं यशः ६ अस्यां त्वहमवस्थायां वीर वक्ष्यामि यद्वचः। यद्यप्य

---

हे हनूमन्, अंगदाला मी अभिषेक करावा असा विचार तूं मनामध्येंही आणूं नकोस. कारण, हे वानरश्रेष्ठा, पितृतुल्य असलेला सुग्रीवच माझ्या पुत्राला सुख देण्याविषयीं अधिकारी आहे; मज मातेचा अधिकार नाहीं १५. सारांश, वानरराज वालीच्या आश्रयापेक्षां इहलोकीं अथवा परलोकीं अधिक योग्य असें मला कांहींही नाहीं. संग्रामामध्यें परावृत्त न होतां वध पावलेल्या ह्या वीरानें स्वीकारिलेल्या ह्या शय्येचेंच सेवन करणें मला योग्य आहे" १६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २१ ॥

सर्वप्रकारें मुमूर्षु होऊन हलकें हलकें श्वासोच्छ्वास करणारा वाली इकडे तिकडे पाहूं लागला असतां प्रथमतः कनिष्ठ भ्राता सुग्रीवच त्याच्या दृष्टीं पडला १. तेव्हां विजयी झालेल्या त्या वानरराज सुग्रीवाला हांक मारून तो स्पष्ट वाणीनें प्रेमपूर्वक त्याला असें ह्मणाला २ "हे सुग्रीवा, तूं मला दोष लावूं नकोस. कारण, प्राक्तन कर्माच्या प्रभावामुळें अवश्य होणाऱ्या बुद्धिभ्रमाच्या तावडींत मी माझे इच्छेविरुद्ध सांपडल्यामुळें अशा गोष्टी घडून आल्या ३. बा सुग्रीवा, आपणां उभयतांना एकदम सुख होणें आपल्या नशीबीं लिहिलेलेंच नव्हतें असें मला वाटतें आणि ह्मणूनच आपल्या ह्या बंधुविषयक प्रेमाचा परिणाम विपरीत झाला असें मी समजत आहें ४. आतां ह्या वनचर वानरांच्या राज्याचा तूं आजच स्वीकार कर आणि मीही आजच यमसदनीं जात आहें असें समज ५. जीवित, राज्य, विपुल संपत्ति आणि निष्कलंक यश ह्या सर्वांचा त्याग करून हा मी सत्वर चालता होत आहें ६. हे वीरा राजा, ह्या

सुकरं राजन्कर्तुमेव त्वमर्हसि ७ सुखार्हं सुखसंवृद्धं बालमेनमबालिशम् ।
बाष्पपूर्णमुखं पश्य भूमौ पतितमङ्गदम् ८ मम प्राणैः प्रियतरं पुत्रं पुत्र-
मिवौरसम् । मया हीनमहीनार्थं सर्वतः परिपालय ९ त्वमप्यस्य पिता
दाता परित्राता च सर्वशः । भयेष्वभयदश्चैव यथाहं प्लवगेश्वर १० एष
तारात्मजः श्रीमांस्त्वया तुल्यपराक्रमः । रक्षसां च वधे तेषामग्रतस्ते
भविष्यति ११ अनुरूपाणि कर्माणि विक्रम्य बलवान्रणे । करिष्यत्येष
तारेयस्तेजस्वी तरुणोऽङ्गदः १२ सुषेणदुहिता चेयमर्थसूक्ष्मविनिश्चये ।
औत्पातिके च विविधे सर्वतः परिनिष्ठिता १३ यदेषा साध्विति ब्रूया-
त्कार्यं तन्मुक्तसंशयम् । न हि तारामतं किंचिदन्यथा परिवर्तते १४ राघ-
वस्य च ते कार्यं कर्तव्यमविशङ्कया । स्यादधर्मो ह्यकरणे त्वां च हिंस्या-
द्विमानितः १५ इमां च मालामाधत्स्व दिव्यां सुग्रीव काञ्चनीम् । उदारा
श्रीः स्थिता ह्यस्यां संप्रजह्यान्मृते मयि १६ इत्येवमुक्तः सुग्रीवो वालिना

---

अवस्थेमध्यें जें कांहीं मी तुला सांगत आहें तें जरी करण्यास कठीण असलें तरीही तूं करच ७. सुखाला पात्र, सुखामध्यें वाढलेला आणि बाल असूनही बुद्धीनें बालिश नसलेला हा अंगद अश्रूंनीं मुख व्याप्त होऊन भूमीवर पडलेला तूं अवलोकन कर ८ आणि प्राणांपेक्षांही मला अधिक प्रिय असलेल्या परंतु मीं सोडिलेल्या ह्या माझ्या गुणसंपन्न पुत्राचें तूं औरस पुत्राप्रमाणें सर्वप्रकारें परिपालन कर ९. हे वानरराजा, माझ्याप्रमाणें तूंच आतां ह्याचा पिता, दाता, परित्राता आणि भय प्राप्त झालें असतां सर्वप्रकारें अभय देणारा आहेस १०. तारेपासून झालेला हा माझा वैभवशाली पुत्र पराक्रमामध्यें तुझी बरोबरी करणारा आहे. तेव्हां रामाशीं विरोध धरणाऱ्या राक्षसांचा वध करण्याविषयीं हा तुझ्या पुढें होईल ११. हा बलाढ्य, तरुण व तेजस्वी तारापुत्र संग्रामामध्यें पराक्रम करून आपल्याला अनुरूप अशीं कर्में करील १२. ही सुषेणकन्या ताराही सूक्ष्म गोष्टींचा निर्णय करण्याविषयीं आणि नानाप्रकारचीं संकटें प्राप्त झालीं असतां त्यांतून पार पडण्याचे उपाय जाणण्याविषयीं सर्वप्रकारें अतिशयच समर्थ आहे १३. ही जें चांगलें ह्मणेल तें तूं निःसंशय करीत जा. तारेनें योग्य ठरविलेली कोणतीही गोष्ट विपरीत होत नाहीं १४. रघुवंशजरामानेंही जें कांहीं कार्य कर्तव्य असेल तें तूं निःशंकपणें कर. तें न करण्यांत तुझा अधर्म होणार असून त्याचा अपमान झाल्यामुळें तुझाही तो वध करील १५. हे सुग्रीवा, ही दिव्य सुवर्णमाला तूं धारण कर. कारण, हिचे ठिकाणीं असलेली प्रशस्त जयश्री मी मृत झाल्यावर हिला सोडून जाईल " १६. ह्याप्रमाणें भ्रातृप्रेमा-

भ्रातृसौहृदात् । हर्षं त्यक्त्वा पुनर्दीनो ग्रहग्रस्त इवोडुराट् १७ तद्वालिवचनाच्छान्तः कुर्वन्युक्तमतन्द्रितः । जग्राह सोऽभ्यनुज्ञातो मालां तां चैव काञ्चनीम् १८ तां मालां काञ्चनीं दत्त्वा दृष्ट्वा चैवात्मजं स्थितम् । संसिद्धः प्रेत्यभावाय स्नेहादङ्गदमब्रवीत् १९ देशकालौ भजस्वाद्य क्षममाणः प्रियाप्रिये । सुखदुःखसहः काले सुग्रीववशगो भव २० यथा हि त्वं महाबाहो लालितः सततं मया । न तथा वर्तमानं त्वां सुग्रीवो बहु मन्यते २१ नास्या मित्रैर्गतं गच्छेर्मा शत्रुभिररिंदम । भर्तुरर्थपरो दान्तः सुग्रीववशगो भव २२ न चातिप्रणयः कार्यः कर्तव्योऽप्रणयश्च ते । उभयं हि महादोषं तस्मादन्तरदृग्भव २३ इत्युक्त्वाथ विवृत्ताक्षः शरसंपीडितो भृशम् । विवृतैर्दशनैर्भीमैर्बभूवोत्क्रान्तजीवितः २४ ततो विचुक्रुशुस्तत्र वानरा हतयूथपाः । परिदेवयमानास्ते सर्वे प्लवगसत्तमाः २५ किष्किन्धा ह्यद्य शून्या च स्वर्गते वानरेश्वरे । उद्यानानि

---

मुळें वालीनें सुग्रीवाला सांगितलें असतां हर्षाचा त्याग करून पुनरपि ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें दीन झाला १७. वालीच्या त्या भाषणामुळें सुग्रीवाच्या मनांतील वैरबुद्धि नाहींशी झाली व त्यानें केलेल्या योग्य उपदेशाप्रमाणें लक्ष्यपूर्वक वागण्याचें मनांत धरून वालीच्या अनुज्ञेनें त्यानें ती सुवर्णमाला स्वीकारिली १८. असो. सुग्रीवाला ती सुवर्णमाला देऊन व तेथें असलेल्या आपल्या पुत्राकडे पाहून मरण्याविषयीं निश्चित झालेला तो वाली प्रेमानें अंगदाला ह्मणाला १९ "देशकालाकडे लक्ष्य देऊन प्रिय व अप्रिय प्रकार सहन करून आणि प्रसंग असतां सुखदुःख सासून तूं आजपासून सुग्रीवाच्या मतानें वागत जा २०. हे महापराक्रमी पुत्रा, मीं ज्याप्रमाणें नेहमीं तुझें लालन केलें त्याप्रमाणें जर तूं वागूं लागलास तर सुग्रीव तुझी विशेषशी पर्वा करणार नाहीं २१. हे शत्रुदमना, ह्यांच्या अनुपकाऱ्यांशीं अथवा ह्याच्या शत्रूंशीं कधींही सख्य न करितां जितेंद्रिय व स्वामी सुग्रीवाच्या कार्याविषयीं तत्पर राहून तूं नेहमीं त्याच्या मर्जीप्रमाणें वागत जा २२. ह्याच्याशीं तूं अति लगटपणाही करूं नकोस; कारण, हीं दोन्हींही मोठीं अनर्थावह आहेत. तस्मात्, तूं मध्यम मार्गाकडे लक्ष्य देऊन वागत जा" २३. ह्याप्रमाणें अंगदाला सांगितल्यावर रामबाणामुळें अतिशयच व्यथित झालेला तो वाली डोळे फिरवूं लागला आणि भयंकर असे आपले दांत वासून गतप्राण झाला २४. तेव्हां सेनानायक वध पावल्यामुळें वानर आक्रोश करूं लागले आणि तेथें असलेले ते सर्वही वानरश्रेष्ठ शोक करूं लागले २५. ( ते ह्मणाले ) "वानरराज वाली स्वर्गाला जातांक्षणीं आज ही किष्किंधा नगरी, उपवनें, पर्वत व

च शून्यानि पर्वताः काननानि च २६ हते प्लवगशार्दूले निष्प्रभा वानराः कृताः २७ येन दत्तं महद्युद्धं गन्धर्वस्य महात्मनः । गोलभस्य महाबाहोर्दश वर्षाणि पञ्च च २८ नैव रात्रौ न दिवसे तद्युद्धमुपशाम्यति । ततः षोडशमे वर्षे गोलभो विनिपातितः २९ तं हत्वा दुर्विनीतं तु वाली दंष्ट्राकरालवान् । सर्वाभयंकरोस्माकं कथमेष निपातितः ३० हते तु वीरे प्लवगाधिपे तदा वनेचरास्तत्र न शर्म लेभिरे । वनेचराः सिंहयुते महावने यथा हि गावो निहते गवां पतौ ३१ ततस्तु तारा व्यसनार्णवप्लुता मृतस्य भर्तुर्वदनं समीक्ष्य सा । जगाम भूमिं परिरभ्य वालिनं महाद्रुमं छिन्नमिवाश्रिता लता ३२[९०८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥ २२ ॥

ततः समुपजिघ्रन्ती कपिराजस्य तन्मुखम् । पतिं लोकश्रुता तारा मृतं वचनमब्रवीत् १ शेषे त्वं विषमे दुःखमकृत्वा वचनं मम । उपलोपचिते वीर सुदुःखे वसुधातले २ मत्तः प्रियतरा नूनं वानरेन्द्र मही तव।

---

अरण्यें हीं सर्व शून्य दिसत आहेत २६ आणि वानरश्रेष्ठ वालीचा वध झाल्यामुळें आह्मी सर्व वानर निस्तेज झालों आहों २७. अहो, महात्म्या व महापराक्रमी गोलभ गंधर्वाशीं ज्यानें पंधरा वर्षेपर्यंत रात्रीं अथवा दिवसां मुळींच न थांबतां मोठें युद्ध केलें आणि सोळावे वर्षीं गोलभाचा वध केला २८, २९ आणि त्या दुष्ट गंधर्वाचा वध केल्यावर दंष्ट्रांच्या योगानें भयंकर दिसणाऱ्या ज्या वालीनें आह्मासर्वांचें भय नाहींसें केलें त्याच ह्या वालीचा आज कसा बरें वध झाला ? " ३०. असो. गाईच्या अधिपतीचा वध झाला असतां ज्याप्रमाणें वनांत संचार करणाऱ्या गाईंना सिंहयुक्त महावनामध्यें स्वस्थता वाटत नाहीं त्याचप्रमाणें वानरराज वीर वालीचा वध झाल्यावर ( वध करणाऱ्या रामचंद्रानें युक्त असलेल्या ) त्या वनामध्यें वानरांना स्वस्थता वाटनाशी झाली ३१ आणि ह्याप्रमाणें वाली गतप्राण झाल्यानंतर दुःखसागरांत निमग्न झालेल्या तारेनें भर्त्याच्या मुखाकडे पाहून त्याला कवटाळून धरिलें व महावृक्षाच्या आश्रयाला असलेली लता ज्याप्रमाणें तो वृक्ष तुटून पडला असतां भूमीवर पडते त्याप्रमाणें ती भूमीवर पडली ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडांपैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

तदनंतर वानरराज वालीचें तें मुख हुंगीत हुंगीत ती जगद्विख्यात तारा आपल्या मृत पतीला ह्मणाली १ " हे वीरा, माझ्या सांगण्याप्रमाणें न वागल्यामुळें विषम पाषाणांनीं व्याप्त आणि ह्मणूनच अत्यंत दुःखदायक अशा ह्या भूतलावर तूं दुःखानें

शेषे हि तां परिष्वज्य मां च न प्रतिभाषसे ३ सुग्रीवस्य वशं प्राप्तो विधिरेष भवत्यहो । सुग्रीव एव विक्रान्तो वीर साहसिकप्रिय ४ ऋक्षवानरमुख्यास्त्वां बलिनं पर्युपासते । तेषां विलपितं कृच्छ्रमङ्गदस्य च शोचतः ॥ मम चेमा गिरः श्रुत्वा किं त्वं न प्रतिबुध्यसे ५ इदं तद्वीरशयनं तत्र शेषे हतो युधि । शायिता निहता यत्र त्वयैव रिपवः पुरा ६ विशुद्धसत्त्वाभिजन प्रिययुद्ध मम प्रिय । मामनाथां विहायैकां गतस्त्वमसि मानद ७ शूराय न प्रदातव्या कन्या खलु विपश्चिता । शूरभार्यां हतां पश्य सद्यो मां विधवां कृताम् ८ अवभग्नश्च मे मानो भग्ना मे शाश्वती गतिः । अगाधे च निमग्नास्मि विपुले शोकसागरे ९ अश्मसारमयं नूनमिदं मे हृदयं दृढम् । भर्तारं निहतं दृष्ट्वा यन्नाद्य शतधा कृतम् १० सुहृच्चैव च भर्ता च प्रकृत्या च मम प्रियः । प्रहारे च पराक्रान्तः शूरः पञ्चत्वमागतः ११ पतिहीना तु या नारी कामं भवतु पुत्रिणी । धनधा-

---

शयन करीत आहेस २. हे वानरराजा, खरोखर पृथ्वीच तुला माझ्यापेक्षां जास्त प्रिय आहे. कारण, तिला कवटाळून धरून तूं शयन करीत आहेस आणि माझ्याशीं नुसतें भाषणही करीत नाहींस ३. हे वीरा, हे साहसप्रिया, हा रामरूप विधाताच सुग्रीवाचे अधीन झाला आहे ! तस्मात्, सुग्रीवालाच पराक्रमी समजलें पाहिजे ४. मोठमोठे अस्वलांनीं व वानरांनीं तुज बलाढ्याची सेवा केलेला आहे. तेव्हां त्यांचा व शोक करणाऱ्या अंगदाचा दुःसह विलाप आणि माझे हे शब्द श्रवण करून तूं कां बरें जागा होत नाहींस ! ५. ज्या ठिकाणीं पूर्वीं तूंच आपल्या शत्रूंचा वध करून त्यांना निजविलेंस तीच ही वीरशय्या होय आणि त्याच शय्येवर तूं आज युद्धामध्यें वध पावून शयन करीत आहेस ६. हे युद्धप्रिया, मी तुला प्रिय असून तूं शुद्ध सात्त्विक कुलामध्यें उत्पन्न झालेला आहेस. तेव्हां, हे मान्या, मला एकटीला अनाथ सोडून देऊन तूं गेलास हें काय बरें ? ७. खरोखर विचारी पुरुषानें आपली कन्या शूराला कधींही देऊं नये. पहा, मी शूरभार्या असल्यामुळें एकाएकीं मला वैधव्य येऊन माझा घात झालेला आहे ८. आज माझी मानमान्यता नाहींशी होऊन माझ्या शाश्वत सुखाचीही परिसमाप्ति झाली आहे आणि अगाध अशा मोठ्या शोकसागरामध्यें मी बुडून गेलें आहें ९. खरोखर हें माझें बळकट हृदय अभेद्य पाषाणाचेंच केलेलें आहे; कारण, वध पावलेल्या भर्त्याला पाहूनही ह्याचे आज शेंकडों तुकडे झालेले नाहींत १०. स्वभावतःच मला प्रिय असलेला हा माझा मित्ररूप भर्ता शूर असून शत्रूला प्रहार करण्याविषयीं पराक्रमी असतांनाही वध पावला ११. पतिहीन झालेली स्त्री खुशाल

न्यसमृद्धापि विधवेत्युच्यते बुधैः १२ स्वगात्रप्रभवे वीर शेषे रुधिरम-
ण्डले । कृमिरागपरिस्तोमे स्वकीये शयने यथा १३ रेणुशोणितसंवीतं
गात्रं तव समन्ततः । परिरब्धुं न शक्नोमि भुजाभ्यां प्लवगर्षभ १४
कृतकृत्योद्य सुग्रीवो वैरेस्मिन्नतिदारुणे । यस्य राम विमुक्तेन हृतमेके-
षुणा भयम् १५ शरेण हृदि लग्नेन गात्रसंस्पर्शने तव । वार्यामि त्वां
निरीक्षन्ती त्वयि पञ्चत्वमागते १६ उद्बबर्ह शरं नीलस्तस्य गात्रगतं
तदा । गिरिगह्वरसंलीनं दीप्तमाशीविषं यथा १७ तस्य निष्कृष्यमाणस्य
बाणस्यापि बभौ द्युतिः । अस्तमस्तकसंनद्धरश्मेर्दिनकरादिव १८ पेतुः
क्षतजधारास्तु व्रणेभ्यस्तस्य सर्वशः । ताम्रगैरिकसंपृक्ता धारा इव धरा-
धरात् १९ अवकीर्णं विमार्जन्ती भर्तारं रणरेणुना । अस्रैर्नयनजैः शूरं
सिषेचास्त्रसमाहतम् २० रुधिरोक्षितसर्वाङ्गं दृष्ट्वा विनिहतं पतिम् । उवाच
तारा पिङ्गाक्षं पुत्रमङ्गदमङ्गना २१ अवस्थां पश्चिमां पश्य पितुः पुत्र

---

पुत्रवती असो किंवा तिच्याजवळ धनधान्यांची समृद्धि असो, ज्ञानी लोक तिला विधवा असें ह्मणतात १२. हे वीरा, इंद्रगोपप्रभृति कीटकासारिखा रंगीत पलंगपोस जिच्यावर अंथरिला आहे अशा स्वतःच्या शय्येवर ज्याप्रमाणें तूं शयन करीत होतास त्याप्रमाणें स्वतःच्याच शरीरापासून उत्पन्न झालेल्या ह्या रक्ताच्या थारळ्यांत तूं शयन करीत आहेस १३. हे वानरश्रेष्ठा, धूळ आणि रक्त ह्यांनीं चोहोंकडून व्याप्त झालेल्या ह्या तुझ्या शरीराला मला हातांनीं आलिंगन देतां येत नाहीं १४. त्या अतिभयंकर वैरामध्यें सुग्रीव आज कृतकृत्य झाला. कारण, रामानें सोडिलेल्या एका बाणाच्या योगानें आज त्याचें भय नाहींसें झालें १५. तूं मृत्यु पावल्यामुळें तुझ्या मुखाकडे निरखून पहात असलेल्या मला तुझ्या हृदयामध्यें खिळून राहिलेल्या बाणामुळें तुझ्या शरीराला आलिंगन देतां येत नाहीं" १६. हें तिचें भाषण श्रवण केल्यावर तेथें असलेल्या नीलानें पर्वताच्या गुहेमध्यें लीन होऊन राहिलेल्या देदीप्यमान सर्पाप्रमाणें त्याच्या शरीरामध्यें खिळून राहिलेला तो बाण बाहेर काढिला १७. ( तो बाण रक्तानें भरला असल्यामुळें ) बाहेर निघतांना त्याचें तेज अस्ताचलाशीं किरणें संयुक्त झालेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागलें १८ व त्याच्या शरीराला झालेल्या जखमांतून सर्व बाजूंनीं रक्ताचे प्रवाह ताम्र व गैरिक ह्या धातूंनीं युक्त अशा पर्वतावरील जलधारांप्रमाणें वाहूं लागले १९. नंतर रणभूमींतील धुळीनें व्याप्त झालेल्या भर्त्याच्या देहावरील धूळ झाडूं लागलेल्या तारेनें रामबाणानें वध पावलेल्या त्या शूराला डोळ्यांतील अश्रूंनीं स्नान घातलें २० आणि सर्वांगावर रक्ताचा सडा होऊन मरून पडलेल्या

सुदारुणाम् । संप्रसक्तस्य वैरस्य गतोन्तः पापकर्मणा २२ बालसू-
र्योज्ज्वलतनुं प्रयातं यमसादनम् । अभिवादय राजानं पितरं पुत्र मान-
दम् २३ एवमुक्तः समुत्थाय जग्राह चरणौ पितुः । भुजाभ्यां पीनवृत्ता-
भ्यामङ्गदोहमिति ब्रुवन् २४ अभिवादयमानं त्वामङ्गदं त्वं यथा पुरा ।
दीर्घायुर्भव पुत्रेति किमर्थं नाभिभाषसे २५ अहं पुत्रसहाया त्वामुपासे
गतचेतनम् । सिंहेन पातितं सद्यो गौः सवत्सेव गोवृषम् २६ इष्ट्वा सङ्ग्रा-
मयज्ञेन रामप्रहरणाम्भसा। तस्मिन्नवभृथे स्नातः कथं पत्न्या मया विना २७
या दत्ता देवराजेन तव तुष्टेन संयुगे। शातकौम्भीं प्रियां मालां तां ते पश्यामि
नेह किम् २८ राज्यश्रीर्न जहाति त्वां गतासुमपि मानद । सूर्यस्यावर्त-
मानस्य शैलराजमिव प्रभा २९ न मे वचः पथ्यमिदं त्वया कृतं न
चास्मि शक्ता हि निवारणे तव । हता सपुत्रास्मि हतेन संयुगे सह त्वया

---

पतीला अवलोकन करून पिंगटवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या अंगदनामक पुत्राला ती तारा स्त्री ह्मणाली २१ " हे पुत्रा, अत्यंत भयंकर अशी ही पित्याची शेंवटली अवस्था अवलोकन कर. प्राक्तन पापकर्मामुळें उत्पन्न झालेल्या वैराचा अंत झाला २२. हे पुत्रा, बालसूर्याप्रमाणें उज्ज्वल शरीरानें युक्त असलेल्या ह्या आपल्या यमसदनाला गेलेल्या वानरराज मान्य पित्याला अभिवंदन कर " २३. ह्याप्रमाणें तारेनें सांगितलें असतां अंगद उठला आणि " मी अंगद आहें " असें ह्मणत ह्मणत त्यानें आपल्या पुष्ट व वर्तुल हातांनीं पित्याचे चरण धरिले २४. तेव्हां ( वाली कांहींच बोलत नाहीं असें पाहून तारा ह्मणाली ) " अंगद आपणाला अभिवंदन करीत असतांना आपण पूर्वीप्रमाणें त्याला " हे पुत्रा, दीर्घायु हो " असा आशीर्वाद कां बरें देत नाहीं? २५. सिंहानें एकाएकीं मारून टाकिलेल्या वृषभाचे समीप स्थित असलेल्या सवत्स गाईप्रमाणें मी पुत्राला घेऊन गतप्राण झालेल्या आपल्या शेजारीं उभी आहें २६. आपण संग्रामयाग करून त्या अवभृथामध्यें रामबाणरूप उदकानें मज पत्नीशिवाय कसें बरें स्नान केलें ? २७. देवराज इंद्रानें युद्धामध्यें संतुष्ट होऊन जी प्रिय सुवर्णमाला आपणाला दिली होती ती माझ्या कां बरें दृष्टीं पडत नाहीं? २८. अस्ताचलास जाणाऱ्या सूर्याची प्रभा ज्याप्रमाणें त्या पर्वतराजाला सोडून जात नाहीं त्याप्रमाणें, हे मान्य, आपण गतप्राण झालां असूनही आपले ठिकाणीं असलेलें राजतेज आपणांला सोडून अद्यापि गेलें नाहीं २९. माझें तें हितकारक भाषण आपण ऐकिलें नाहीं आणि ह्मणूनच आपलें निवारण करण्यास मी समर्थ झालें नाहीं. ह्यास्तव, युद्धामध्यें आपला वध झाल्यामुळें माझाही पुत्रासहवर्तमान घात झाला असून ही राजलक्ष्मी

श्रीर्विजहाति मामपि ३० [ ९३८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥

तामाशुवेगेन दुरासदेन त्वभिप्लुतां शोकमहार्णवेन । पश्यंस्तदा वाल्यनुजस्तरस्वी भ्रातुर्वधेनाप्रतिमेन तेपे १ स बाष्पपूर्णेन मुखेन पश्यन्क्षणेन निर्विण्णमना मनस्वी । जगाम रामस्य शनैः समीपं भृत्यैर्वृतः संपरिदूयमानः २ स तं समासाद्य गृहीतचापमुदात्तमाशीविषतुल्यबाणम् । यशस्विनं लक्षणलक्षिताङ्गमवस्थितं राघवमित्युवाच ३ यथा प्रतिज्ञातमिदं नरेन्द्र कृतं त्वया दृष्टफलं च कर्म । ममाद्य भोगेषु नरेन्द्रसूनो मनो निवृत्तं हतजीवितेन ४ अस्यां महिष्यां तु भृशं रुदत्यां पुरेतिविक्रोशति दुःखतप्ते । हते नृपे संशयितेऽङ्गदे च न राम राज्ये रमते मनो मे ५ क्रोधादमर्षादतिविप्रधर्षाद्भ्रातुर्वधो मेनुमतः पुरस्तात् । हते त्विदानीं हरियूथपेस्मिन्सुतीक्ष्णमिक्ष्वाकुवर प्रतप्स्ये ६ श्रेयोद्य मन्ये मम शैलमुख्ये तस्मिन्हि वासश्चिरमृष्यमूके । यथा तथा वर्तयतः स्ववृत्त्या नेमं

---

आपणाबरोबर माझाही त्याग करीत आहे ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकीप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला॥ २३।

अतिवेगवान्, दुस्तर व प्रचंड शोकसागरामध्यें मग्न झालेल्या तारेला अवलोकन केल्यावर बलाढ्य सुग्रीवाला आपल्याला अयोग्य अशा भ्रातृवधाचें दुःख होऊं लागलें १ मुख अश्रूंनीं भरून गेलें आणि मनाला खेद वाटून दासांनीं परिवेष्टित आणि शोक करीत असलेला तो विचारी सुग्रीव क्षणभर तिच्याकडे पाहून हलकें हलकें रामासमीप गेला २ आणि राजचिह्नें व सर्पतुल्य भयंकर बाण ह्यांनीं युक्त असून हातामध्यें धनुष्य धारण केलेल्या आणि तेथें स्थित असलेल्या यशस्वी व उदार रामाकडे गेल्यावर तो त्याला ह्मणाला ३ "हे राजा, प्रतिज्ञा केल्याप्रमाणें तूं हें दृष्ट फलानें युक्त असलेलें कर्म केलें आहेस; परंतु, हे राजपुत्रा, जीवितही व्यर्थ झालेल्या माझें मन भोग्य वस्तूंपासून आज परावृत्त झालें आहे ४. हे रामा, ही राजपत्नी अतिशय रडत असल्यामुळें, किष्किंधानगर दुःखसंतप्त होऊन अतिशय आक्रोश करीत असल्यामुळें आणि राजाचा वध झाल्याकारणानें अंगदाचें जीवितही पितृवियोगानें संशयित झाल्याचें दिसत असल्यामुळें राज्याचे ठिकाणीं माझें मन रमत नाहीं ५. हे इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठा, भ्रात्यानें माझा अतिशयच पराभव केला असल्याकारणानें क्रोधामुळें व असहिष्णुतेमुळें पूर्वीं मला त्याचा वध होणें बरें वाटलें होतें. परंतु, हा वानरसेनानायक वध पावल्यावर आतां मला अत्यंत दुःख होत आहे ६. स्वजातीला उचित असें वर्तन ठेवून कशाही रीतीनें

निहत्य त्रिदिवस्य लाभः ७ न त्वा जिघांसामि चरेति यन्मामयं महात्मा मतिमानुवाच । तस्यैव तद्राम वचोनुरूपमिदं वचः कर्म च मेनुरूपम् ८ भ्राता कथं नाम मया गुणस्य भ्रातुर्वधं राम विरोचयेत । राज्यस्य दुःखस्य च वीर सारं विचिन्तयन्कामपुरस्कृतोपि ९ वधो हि मे मतो नासीत्स्वमाहात्म्यव्यतिक्रमात् । ममासीद्बुद्धिदौरात्म्यात्प्राणहारी व्यतिक्रमः १० द्रुमशाखावभग्नोहं मुहूर्तं परिनिष्टनन् । सान्त्वयित्वा त्वनेनोक्तो न पुनः कर्तुमर्हसि ११ भ्रातृत्वमार्यभावश्च धर्मश्चानेन रक्षितः । मया क्रोधश्च कामश्च कपित्वं च प्रदर्शितम् १२ अचिन्तनीयं परिवर्जनीयमनीप्सनीयं स्वनवेक्षणीयम् । प्राप्तोस्मि पाप्मानमिदं वयस्य भ्रातुर्वधात्त्वाष्ट्रवधादिवेन्द्रः १३ पाप्मानमिन्द्रस्य मही जलं च वृक्षाश्च कामं जगृहुः स्त्रियश्च । को नाम पाप्मानमिमं सहेत शाखामृगस्य प्रतिपत्तुमिच्छेत् १४ नार्हामि संमानमिमं प्रजानां न यौवराज्यं कुत एव

---

वर्तन ठेवण्याचा प्रसंग आला तरी त्या ऋष्यमूकनामक श्रेष्ठ पर्वतावर वास्तव्य करणें आज श्रेयस्कर आहे असें मला वाटतें. परंतु त्याचा वध करून स्वर्ग प्राप्त झाला तरी तो नको. ७. " मी तुझा घात करणार नाहीं. तूं चालता हो " असें जें हा विचारी महात्मा मला ह्मणाला तें त्याचें ह्मणणें त्यालाच योग्य असून, हे रामा, हें माझें वधरूप कर्म व तो वध घडवून आणणारें भाषण मात्र मलाच योग्य आहे ८. कोणीही भ्राता जरी कितीही विषयलंपट झाला असला तरी, हे वीरा रामा, राज्यप्राप्तीचें सुख आणि भ्रातृवधामुळें होणारें दुःख ह्यांचा सारासार विचार करूं लागल्यावर गुणवान् भ्रात्याचा वध करणें माझ्याप्रमाणें त्याला कसें बरें रुचेल ? ९. स्वतःची अपकीर्ति होण्याचा प्रसंग येईल ह्या भयामुळें वालीला माझा वध अभिमत नव्हता तरी माझी बुद्धि दुष्ट असल्यामुळें माझ्या हातून मात्र हा भ्रात्याचे प्राण जाण्यास कारणीभूत होणारा अन्याय झालेला आहे १०. वृक्षशाखेचा तडाका बसल्यामुळें पलायन करण्याचा प्रसंग येऊन मी जेव्हां तुझ्या नांवानें एक मुहूर्तभर आक्रोश करीत बसलों तेव्हां " तूं असें फिरून करूं नकोस " एवढेंच ह्या वालीनें सांत्वनपूर्वक मला सांगितलें ११. सारांश, बंधुत्व, मोठेपणा आणि धर्म हीं ह्यानें पाळिलीं व मीं मात्र काम, क्रोध व वानरस्वभाव हीं दर्शविलीं १२. हे मित्रा, विश्वरूपाचा वध केल्यामुळें जसें इंद्राला पातक प्राप्त झालें तसें विचार करण्यास, मनामध्यें आणावयास आणि अवलोकन करण्यासही अयोग्य असें हें पातक भ्रात्याच्या वधामुळें मला प्राप्त झालें आहे १३. इंद्राचें पातक पृथ्वी, उदक, वृक्ष आणि स्त्रिया ह्यांनीं खुशाल स्वीकारिलें; परंतु, हें वानराचें

राज्यम् । अधर्मयुक्तं कुलनाशयुक्तमेवंविधं राघव कर्म कृत्वा १५
पापस्य कर्तास्मि विगर्हितस्य क्षुद्रस्य लोकापकृतस्य लोके । शोको
महान्मामभिवर्ततेयं वृष्टेर्यथा निम्नमिवाम्बुवेगः १६ सोदर्यघातापरगा-
त्रवालः संतापहस्ताक्षिशिरोविषाणः । एनोमयो मामभिहन्ति हस्ती दृप्तो
नदीकूलमिव प्रबुद्धः १७ अंहो बतेदं नृवराविषह्यं निवर्तते मे हृदि साधु
वृत्तम् । अग्नौ विवर्णं परितप्यमानं किट्टं यथा राघव जातरूपम् १८
महाबलानां हरियूथपानामिदं कुलं राघव मन्निमित्तम् । अस्याङ्गदस्यापि
च शोकतापादर्धस्थितप्राणमितीव मन्ये १९ सुतः सुलभ्यः सुजनः सुवश्यः
कुतस्तु पुत्रः सदृशोङ्गदेन । न चापि विद्येत स वीर देशो यस्मिन्भवेत्सो-
दरसंनिकर्षः २० अद्याङ्गदो वीरवरो न जीवेज्जीवेत माता परिपालना-
र्थम् । विना तु पुत्रं परितापदीना सा नैव जीवेदिति निश्चितं मे २१

---

पातक घेण्याची कोणाला इच्छा आहे आणि तें घेण्यास समर्थ तरी कोण आहे ? १४. हे राघवा, कुलाचा नाश ज्याच्या योगानें होईल अशा प्रकारचें हें धर्मविरुद्ध कर्म माझ्या हातून घडल्यामुळें मी प्रजेच्या संमानास अथवा यौवराज्यासही पात्र नाहीं, तेव्हां मी राज्याला पात्र कोठून होणार? १५. इहलोकीं निंद्य व परलोकींही परमार्थाच्या आड येणारें आणि क्षुद्र प्राण्याला योग्य असलेलें पातक माझ्या हातून घडलें असल्यामुळें पर्जन्यवृष्टीच्या उदकाचा प्रवाह जसा सखल प्रदेश व्याप्त करून टाकितो तसा हा प्रचंड शोक मला व्यापून टाकीत आहे १६. सहोदर भ्रात्याचा वध हेंच ज्याचे दुसरे अवयव व केश आहेत आणि संताप हेंच ज्याचें डोकें, सोंड, मस्तक व दांत आहेत् असा हा पापमय प्रचंड हत्ति मदमत्त होऊन नदीच्या तीराप्रमाणें मला धडका मारीत आहे १७. हे पुरुषश्रेष्ठा राघवा, निस्तेज आणि ह्मणूनच अग्नीमध्यें तापत घातलेलें सुवर्ण जसें मळ नाहींसा करून टाकितें तसें हें माझ्या मनाला लागून राहिलेलें दुःसह पातक माझें जन्मांतरार्जित पुण्य नाहींसें करीत आहे १८. हे राघवा, महाबलाढ्य वानरसेनाधिपतींचें हें कुल माझ्याकरितां आणि ह्या अंगदाच्या शोकतापामुळें अर्धवट मेल्यासारिखें झालें आहे असें मला वाटतें १९. पित्याला पुन्नामनरकापासून तारणारा सज्जन आणि पित्याच्या आज्ञेंत वागणारा असा अंगदासारिखा पुत्र प्राप्त होणें सुलभ नाहीं आणि, हे वीरा, जेथें सहोदर भ्रात्याची गांठ पडेल असा कोणता प्रदेशही येथें विद्यमान नाहीं २०. हा श्रेष्ठ वीर अंगद आज जिवंत राहील असें मला वाटत नाहीं. तथापि, हा जर जिवंत राहिला तर त्याचें परिपालन करण्याकरितां त्याची माताही जिवंत राहील; परंतु, शोकामुळें दीन झालेली ही तारा

सोहं प्रवेक्ष्याम्यतिदीप्तमग्निं भ्रात्रा च पुत्रेण च सख्यमिच्छन् । इमे विचेष्यन्ति हरिप्रवीराः सीतां निदेशे परिवर्तमानाः २२ कृत्स्नं तु ते सेत्स्यति कार्यमेतन्मय्यप्ययतीते मनुजेन्द्रपुत्र । कुलस्य हन्तारमजीवनार्हं रामानुजानीहि कृतागसं माम् २३ इत्येवमार्तस्य रघुप्रवीरः श्रुत्वा वचो वालिजघन्यजस्य । संजातबाष्पः परवीरहन्ता रामो मुहूर्तं विमना बभूव २४ तस्मिन्क्षणेऽभीक्ष्णमवेक्षमाणः क्षितिक्षमावान्भुवनस्य गोप्ता । रामो रुदन्तीं व्यसने निमग्नां समुत्सुकः सोथ ददर्श ताराम् २५ तां चारुनेत्रां कपिसिंहनाथां पतिं समाश्लिष्य तदा शयानाम् । उत्थापयामासुरदीनसत्त्वां मन्त्रिप्रधानाः कपिराजपत्नीम् २६ सा विस्फुरन्ती परिरभ्यमाणा भर्तुः समीपादपनीयमाना । ददर्श रामं शरचापपाणिं स्वतेजसा सूर्यमिव ज्वलन्तम् २७ सुसंवृतं पार्थिवलक्षणैश्च तं चारुनेत्रं मृगशावनेत्रा । अदृष्टपूर्वं पुरुषप्रधानमयं स काकुत्स्थ इति प्रजज्ञे २८ तस्येन्द्रकल्पस्य दुरासदस्य

---

पुत्रावांचून मात्र जिवंत रहाणारच नाहीं असें मला निश्चित वाटत आहे २१. तस्मात्, भ्रात्याशीं व पुत्राशीं सख्य व्हावें एतदर्थ मी अत्यंत प्रदीप्त अग्निमध्यें प्रवेश करितों. हे श्रेष्ठ वानर तुझ्या आज्ञमध्यें वागणारे आहेत व हे सीतेचा शोध लावितील २२ हे राजपुत्रा, मी परलोकीं गेल्यावरही हें तुझें संपूर्ण कार्य सिद्धीस जाईल. ह्यास्तव, हे रामा, कुलघातकी आणि ह्मणूनच जिवंत रहाण्यास अयोग्य अशा मज पाप्याला तूं ( अग्निप्रवेश करण्याविषयीं ) अनुज्ञा दे " २३. ह्याप्रमाणें वालीचा कनिष्ठ भ्राता जो सुग्रीव त्यानें दुःखित होऊन केलेलें भाषण श्रवण केल्यावर शत्रुपक्षीय वीरनाशक रघुवीर रामाच्याही नेत्रांमध्यें अश्रु आले आणि क्षणभर त्याला कांहीं सुचेनासेंही झालें २४. तों त्याच वेळीं दुःखामध्यें मग्न झाल्यामुळें रोदन करणारी तारा अत्यंत उत्सुक, वारंवार इकडे तिकडे पहाणाऱ्या, जगत्पालक व पृथ्वीसारिख्या क्षमाशील रामाच्या दृष्टीं पडली २५. सुंदर नेत्रांनीं युक्त असलेली ती वानराधिपतींची स्वामिनी व वानरराज वालीची उदार पत्नी पतीला कवटाळून भूमीवर पडली असतां श्रेष्ठ मंत्र्यांनीं तिला उठविलें २६. तेव्हां भर्त्याला कवटाळण्याकरितां तडफडत असलेल्या त्या तारेला ते मुख्य मुख्य मंत्री भर्त्यापासून दूर नेऊं लागले असतांना स्वतःच्या तेजानें सूर्यसारिखा प्रकाशमान होत असलेला राम हातामध्यें धनुर्बाण घेतलेला तिनें अवलोकन केला २७ व राजलक्षणांनीं संपन्न, मनोहर नेत्रांनीं युक्त आणि पूर्वीं कधींच पहाण्यांत न आलेला असा तो पुरुषश्रेष्ठ अवलोकन केल्याबरोबर हा काकुत्स्थ आहे असें त्या मृगनयनेनें पक्कें जाणिलें २८ व लगेंच ती संकटांत सांपडल्यामुळें दुःखित

महानुभावस्य समीपमार्या । आर्तातितूर्णं व्यसनं प्रपन्ना जगाम तारा परिविह्वलन्ती २९ तं सा समासाद्य विशुद्धसत्त्वं शोकेन संभ्रान्तशरीरभावा । मनस्विनी वाक्यमुवाच तारा रामं रणोत्कर्षणलब्धलक्ष्यम् ३० त्वमप्रमेयश्च दुरासदश्च जितेन्द्रियश्चोत्तमधर्मकश्च । अक्षीणकीर्तिश्च विचक्षणश्च क्षितिक्षमावान्क्षतजोपमाक्षः ३१ त्वमात्तबाणासनबाणपाणिर्महाबलः संहननोपपन्नः । मनुष्यदेहाभ्युदयं विहाय दिव्येन देहाभ्युदयेन युक्तः ३२ येनैव बाणेन हतः प्रियो मे तेनैव बाणेन हि मां जहीहि । हता गमिष्यामि समीपमस्य न मां विना वीर रमेत वाली ३३ स्वर्गेऽपि पद्मामलपत्रनेत्र समेत्य संप्रेक्ष्य च मामपश्यन् । नह्येष उच्चावचताम्रचूडा विचित्रवेषाप्सरसोऽभजिष्यत् ३४ स्वर्गेऽपि शोकं च विवर्णतां च मया विना प्राप्स्यति वीर वाली । रम्ये नगेन्द्रस्य तटावकाशे विदेहकन्यारहितो यथा त्वम् ३५ त्वं वेत्थ तावद्वनिताविहीनः प्राप्नोति दुःखं पुरुषः

---

झालेली कुलीन तारा विवळत विवळत त्या इंद्रतुल्य व अजिंक्य अशा महापराक्रमी रामाचे समीप गेली २९ आणि शोकामुळें देहभानावर नसलेली ती विचारी तारा शुद्ध अंतःकरणानें युक्तच संग्रामांत लक्ष्यभेद करण्याविषयीं सर्वापेक्षां अधिक अशा त्या रामापाशीं जाऊन ह्मणाली ३० " आरक्तवर्णनेत्रांनीं युक्त असलेला तूं योगिजनांनाही प्राप्त होण्यास अशक्य आहेस, जितेंद्रिय आहेस, उत्कृष्ट धर्मानें चालणारा आहेस, तुझें ज्ञान होणें दुर्घट आहे, तुझी कीर्ति कधींही क्षीण होणारी नाहीं व तूं पृथ्वीप्रमाणें क्षमाशील असून ज्ञानी आहेस ३१. हातामध्यें धनुर्बाण धारण केलेला तूं महाबलाढ्य असून तुझें शरीरही बांधेसूत आहे व तुझ्यापासून वध पावलेला वाली मनुष्यदेहामध्यें प्राप्त होणाऱ्या सुखाचा त्याग करून दिव्य देहानें प्राप्त होणाऱ्या सुखाचा उपभोग घेत आहे ३२. ह्यास्तव, हे वीरा, ज्या बाणाच्या योगानें माझ्या प्रिय पतीचा वध झाला त्याच बाणाच्या योगानें तूं माझा वध कर ह्मणजे मी वध होतांक्षणीं त्याचे समीप जाईन; त्या वालीला माझ्यावांचून चैन पडावयाचें नाहीं ३३. हे निर्मलकमलपत्राक्षा रामा, स्वर्गामध्येंही नानाप्रकारच्या रक्तपुष्पांचे गजरे मस्तकामध्यें घालून अद्भुत वेष धारण केलेल्या अप्सरांचा जरी त्याला समागम झाला तरी तो मला पाहूं लागेल आणि मी त्याच्या दृष्टीं पडलें नाहीं ह्मणजे त्या अप्सरांचाही तो उपभोग घेणार नाहीं ३४. सारांश, हे वीरा, ज्याप्रमाणें सीतेचा विरह झाल्यामुळें ऋष्यमूकपर्वताच्या तटासमीप असलेल्या रम्य प्रदेशामध्येंही तूं शोकाकुल व निस्तेज झाला आहेस त्याचप्रमाणें तो वाली स्वर्गामध्येंही माझा विरह झाल्यामुळें शोकग्रस्त व

कुमारः । तत्त्वं प्रजानञ्जहि मां न वाली दुःखं ममादर्शनजं भजेत ३६
यद्यापि मन्येत भवान्महात्मा स्त्रीघातदोषस्तु भवेन्न मह्यम् । आत्मेयम-
स्येति हि मां जहि त्वं न स्त्रीवधः स्यान्मनुजेन्द्रपुत्र ३७ शास्त्रप्रयोगाद्वि-
विधाच्च वेदादनन्यरूपाः पुरुषस्य दाराः । दारप्रधानाद्धि न दानमन्य-
त्प्रदृश्यते ज्ञानवतां हि लोके ३८ त्वं चापि मां तस्य मम प्रियस्य प्रदास्यसे
धर्ममवेक्ष्य वीर । अनेन दानेन न लप्स्यसे त्वमधर्मयोगं मम वीरघातात् ३९
आर्तामनाथामपनीयमानामेवंगतां नार्हसि मामहन्तुम् ४० अहं हि मात-
ङ्गविलासगामिना प्लवंगमानामृषभेण धीमता । विना वरार्होत्तमहेममा-
लिना चिरं न शक्ष्यामि नरेन्द्र जीवितुम् ४१ इत्येवमुक्तस्तु विभुर्महात्मा
तारां समाश्वास्य हितं बभाषे । मा वीरभार्ये विमतिं कुरुष्व लोको हि
सर्वो विहितो विधात्रा ४२ तं चैव सर्वं सुखदुःखयोगं लोकोऽब्रवीत्तेन

---

निस्तेज होईल ३५. तात्पर्य, स्त्रीचा वियोग झाला असतां तरुण पुरुषाला कसें दुःख होतें हें तूं तर जाणीत आहेस. तस्मात्, हें लक्ष्यांत आणून तूं माझा वध कर म्हणजे माझ्या विरहामुळें वालीला दुःख होणार नाहीं ३६. हे राजपुत्रा, आपणाला स्त्रीवधाचा दोष लागेल असें जर तुज महात्म्याला वाटत असेल तर तेंही बरोबर नाहीं. ही वालीचा आत्माच आहे असें समजून तूं माझा वध कर म्हणजे स्त्रीहत्येचा दोष तुला लागणार नाहीं ३७. अरे, शास्त्रविहित अनुष्ठानाचा पतीसहवर्तमान अधिकार असल्यामुळें आणि स्त्री हा पतीचा अर्धा आत्मा आहे अशा अनेक श्रुति असल्यामुळें स्त्री वस्तुतः पुरुषाहून भिन्न नाहीं. शिवाय स्त्रीदानासारिखें दुसरें दानही ज्ञानवानांच्या दृष्टीनें ह्या जगतामध्यें नाहीं ३८. ह्यास्तव, तूंही धर्माकडे लक्ष्य देऊन मला त्या माझ्या प्रियाचे स्वाधीन कर. कारण, हे वीरा, तुझ्या हातून हें दान झालें म्हणजे माझ्या पतीच्या वधाचें तुला पातक लागणार नाहीं. ३९. मी अनाथ व दुःखाकुल झालें असून सांप्रत मला आपले पतीपासून हे श्रेष्ठ मंत्री दूर नेत आहेत. तेव्हां अशा अवस्थेमध्यें असलेल्या माझा वध न करणें तुला योग्य नाहीं. ४० गजाप्रमाणें विलासी गतीनें युक्त, श्रेष्ठांना योग्य अशी उत्कृष्ट सुवर्णमाला धारण करणारा आणि वानरामध्यें श्रेष्ठ असा जो माझा विचारी पति वाली त्याच्यावांचून, हे राजपुत्रा, मी फार दिवस जिवंत रहाण्यास समर्थ नाहीं "४१. ह्याप्रमाणें तारेनें विनंति केली असतां तिचें सांत्वन करून तो महात्मा प्रभु राम तिच्याशीं हितावह भाषण करूं लागला. ( तो म्हणाला ) " हे वीरपत्नि, तूं असें भलतें सलतें मनामध्यें आणूं नकोस. हें सर्व जगत् विधात्यानें निर्माण केलें असून ४२ त्यांना भोगावें लागणारें हें सर्व सुखदुःखही त्या विधा-

कृतं विधात्रा । त्रयोपि लोका विहितं विधानं नातिक्रमन्ते वशगा हि तस्य ४३ प्रीतिं परां प्राप्स्यसि तां तथैव पुत्रश्च ते प्राप्स्यति यौवराज्यम् । धात्रा विधानं विहितं तथैव न शूरपत्न्यः परिदेवयन्ति ४४ आश्वासिता तेन महात्मना तु प्रभावयुक्तेन परन्तपेन । सा वीरपत्नी ध्वनता मुखेन सुवेषरूपा विरराम तारा ४५ [ ९८३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥२४॥

स सुग्रीवं च तारां च साङ्गदां सहलक्ष्मणः । समानशोकः काकुत्स्थः सान्त्वयन्निदमब्रवीत् १ न शोकपरितापेन श्रेयसा युज्यते मृतः । यदत्रानन्तरं कार्यं तत्समाधातुमर्हथ २ लोकवृत्तमनुष्ठेयं कृतं वो बाष्पमोक्षणम् । न कालादुत्तरं किंचित्परं कर्म उपासितुम् ३ नियतिः कारणं लोको नियतिः कर्मसाधनम् । नियतिः सर्वभूतानां नियोगेष्विह कारणम् ४ न कर्ता कस्यचित्कश्चिन्नियोगे नापि चेश्वरः । स्वभावे वर्तते

---

त्यानेंच केलें आहे असें श्रुतीनें सांगितलें आहे आणि ह्मणूनच त्रैलोक्यांतीलही प्राणी त्याच्या अधीन असून त्यानें जें ठरविलें असेल तें टाळण्यास समर्थ होत नाहींत ४३. तुझ्या पुत्राला यौवराज्य प्राप्त होईल आणि तें प्राप्त झालें ह्मणजे तुलाही पहिल्याप्रमाणेंच पराकाष्ठेचा आनंद होईल. ( हे राजपत्नि, ) शूरांच्या स्त्रिया कधीं शोक करीत बसत नाहींत. ही जी गोष्ट झाली ती तशीच व्हावयाची ह्मणून विधात्यानें ठरविलें होतें " ४४. ह्याप्रमाणें त्या महात्म्या शत्रुतापन महाप्रभावी रामानें तिचें सांत्वन केलें असतां उत्कृष्ट वेष व रूप ह्यांनीं युक्त असलेली ती तारा आपलें सुरू असलेलें तोंड बंद करून स्वस्थ राहिली. ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

लक्ष्मणासहवर्तमान असलेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्यांच्याचप्रमाणें शोक करूं लागला आणि सुग्रीवाचें व अंगदासहवर्तमान तारेचें सांत्वन करण्याकरितां ह्मणाला १ " शोकसंतापामुळें मृताला कधींही सुगति प्राप्त होत नाहीं. तस्मात् आतां ह्यानंतर जें कांहीं कर्तव्य असेल तें तुह्मीं करा २. लोकव्यवहाराप्रमाणेंही वागलेंच पाहिजे आणि त्याचप्रमाणें तुह्मी अश्रुही ढाळिलेतच; परंतु, ( आतां मरणानंतर जें कांहीं कर्तव्य असेल तें करा. ) वेळ निघून गेली ह्मणजे कोणतेंही सत्कर्म करितां येत नाहीं ३. जगतामध्यें कालावरच सर्व कांहीं अवलंबून असून कर्मेंही कालावरच साध्य होत असतात आणि त्याचप्रमाणें धर्माचा अधिकार असलेल्या प्राण्यांना विहित असलेले जे ज्योतिष्टोमादिक याग ते होण्यालाही कालच कारण

ऽस्तस्य कालः परायणम् ५ न कालः कालमत्येति न कालः परिहीयते । स्वभावं च समासाद्य न किंचिदतिवर्तते ६ न कालस्यास्ति बन्धुत्वं न हेतुर्न पराक्रमः । न मित्रज्ञातिसंबन्धः कारणं नात्मनो वशः ७ किं तु कालपरीणामो द्रष्टव्यः साधु पश्यता । धर्मश्चार्थश्च कामश्च कालक्रमसमाहिताः ८ इतः स्वां प्रकृतिं वाली गतः प्राप्तः क्रियाफलम् । सामदानार्थसंयोगैः पवित्रं प्लवगेश्वरः ९ स्वधर्मस्य च संयोगाज्जितस्तेन महात्मना । स्वर्गः परिगृहीतश्च प्राणानपरिरक्षता १० एषा वै नियतिः श्रेष्ठा यां गतो हरियूथपः । तदलं परितापेन प्राप्तकालमुपास्यताम् ११ वचनान्ते तु रामस्य लक्ष्मणः परवीरहा । अवदत्प्रश्रितं वाक्यं सुग्रीवं गतचेतसम् १२ कुरु त्वमस्य सुग्रीव प्रेतकार्यमनन्तरम् ।

---

आहे ४. कोणतेंही कर्म कालाचा आश्रय असल्यावांचून कोणालाही करितां येत नाहीं व कालाचा आधार असल्यावांचून विहित कर्म करण्यालाही पुरुष समर्थ होत नाहीं. लोकव्यवहार हा प्राक्तन कर्मावर अवलंबून आहे आणि त्या कर्माला कालाचाच मुख्य आश्रय आहे ५. कालामुळें अवश्य घडणाऱ्या गोष्टी घडण्याला कधीं कालातिक्रमण होत नाहीं व त्या कधीं आधींही घडून येत नाहींत. सारांश, प्राक्तन कर्माच्या कचाट्यांत सांपडलेल्या कोणत्याही प्राण्याला अवश्य घडणारी गोष्ट टाळितां येत नाहीं ६. ह्या कालस्वरूप ईश्वराचें ठिकाणीं कोणाहीविषयीं पक्षपात नाहीं; तो टाळण्याकरितां कोणताही उपाय चालत नाहीं; त्याच्यापुढें कसल्याही पराक्रमाची मात्रा चालत नाहीं; मित्र आणि ज्ञातिसंबंध ह्यांचाही कांहीं उपयोग होत नाहीं आणि तो भगवान् काल कोणाच्या इच्छेप्रमाणेंही वागणारा नाहीं ७. सुखदुःखादि प्राप्त होणें हें सर्व कालाधीन असलेल्या आपआपल्या कर्माचेंच फल आहे असें विवेकी पुरुषानें मनांत आणावें. कारण, धर्म, अर्थ आणि काम हे कालाला अनुसरूनच प्राप्त होत असतात ८. साम व दान ह्यांनीं संपादन केलेल्या ऐश्वर्याच्या योगानें वानरराज वालीला शुभ कर्माचें फल जो राज्याचा उपभोग तो इहलोकीं प्राप्त झाला होता आणि सांप्रतही त्याला स्वकर्माचेंच फल प्राप्त झालें आहे ९. सारांश, स्वधर्मामुळें त्या महात्म्यानें इहलोकीं स्वर्ग संपादन करून ठेविला होता आणि सांप्रत युद्धामध्यें प्राणाला मुकल्यामुळें त्याला तो प्रापटी झाला आहे १०. ही कालकृत व्यवस्था अपरिहार्य आहे आणि तीच वानरसेनाधिपति वालीला प्राप्त झाली आहे. तस्मात्, आतां शोक पुरे झाला; समयाला उचित असें जें कर्म तें आतां होऊं द्या" ११. हें रामाचें भाषण संपल्यावर शत्रुपक्षीय वीरनाशक लक्ष्मण देहभानावर नसलेल्या सुग्री-

ताराङ्गदाभ्यां सहितो वालिनो दहनं प्रति १३ समाज्ञापय काष्ठानि शुष्काणि च बहूनि च । चन्दनानि च दिव्यानि वालिसंस्कारकारणात् १४ समाश्वासय दीनं त्वमङ्गदं दीनचेतसम् । मा भूर्बालिशबुद्धिस्त्वं त्वदधीनमिदं पुरम् १५ अङ्गदस्त्वानयेन्माल्यं वस्त्राणि विविधानि च । घृतं तैलमथो गन्धान्यच्चात्र समनन्तरम् १६ त्वं तार शिबिकां शीघ्रमादायागच्छ संभ्रमात् । त्वरा गुणवती युक्ता ह्यस्मिन्काले विशेषतः १७ सज्जीभवन्तु प्लवगाः शिबिकावाहनोचिताः । समर्था बलिनश्चैव निर्हरिष्यन्ति वालिनम् १८ एवमुक्त्वा तु सुग्रीवं सुमित्रानन्दवर्धनः । तस्थौ भ्रातृसमीपस्थो लक्ष्मणः परवीरहा १९ लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा तारः संभ्रान्तमानसः । प्रविवेश गुहां शीघ्रं शिबिकासक्तमानसः २० आदाय शिबिकां तारः स तु पर्यापतत्पुनः । वानरैः रुह्यमानां तां शूरैरुद्वहनोचितैः २१ दिव्यां भद्रासनयुतां शिबिकां स्यन्दनोपमाम् । पक्षिकर्मभिराचित्रां द्रुमकर्मविभूषिताम् २२ आचितां चित्रपत्तीभिः

---

वाला विनयपूर्वक ह्मणाला १२ " हे सुग्रीवा, मरणानंतर कर्तव्य असें ह्या वालीचें और्ध्वदेहिक कर्म तें तूं कर आणि तारा व अंगद ह्यांसहवर्तमान तूं वालीला दहन करण्याच्या उद्योगाला लाग १३. वालीचा संस्कार करण्याकरितां तूं पुष्कळ शुष्क काष्ठें व दिव्य चंदन जमविण्याची आज्ञा कर १४ व मनामध्यें खिन्न झालेल्या ह्या दीन अंगदाचें तूं सांत्वन कर. असा पोरकट विचार मनांत आणूं नको; हें किष्किंधा नगर तुझ्या अधीन आहे १५. पुष्पें, नानाप्रकारचीं वस्त्रें, घृत, तेल, सुगंधिद्रव्यें आणि इतरही अवश्यक साहित्यें हीं सर्व अंगद घेऊन येईल १६. हे तारा, सत्वर लगबगीनें जा. कारण, तेवढी पालखी घेऊन ये ह्याप्रसंगीं योग्य त्वराच फायदेशीर होणारी आहे १७. पालखी वाहून नेण्याचा सराव असलेले समर्थ व बलाढ्य वानर तयार होऊं द्या; ह्मणजे ते वालीला घेऊन जातील " १८. सुमित्रेचा आनंद वर्द्धिंगत करणारा व शत्रुपक्षीय वीरांचा घात करणारा लक्ष्मण सुग्रीवाला ह्याप्रमाणें सांगून आपल्या भ्रात्यासमीप उभा राहिला १९. नंतर लक्ष्मणाचें भाषण श्रवण केल्यावर अंतःकरणाची धांदल उडून गेलेला तार पालखी आणण्याचा उद्देश मनांत धरून सत्वर गुहेमध्यें गेला २० आणि पालखी घेऊन परत फिरला. वहाण्याचा सराव असलेले शूर वानर ती पालखी घेऊन येत होते २१; ती दिव्य शिबिका रथासारिखी असून राजाला उचित अशा मोठ्या मूल्यवान् आसनानें ती युक्त होती; तिच्या असमंताद्भागीं पक्ष्यांचीं चित्रें काढिलेलीं होतीं; वृक्षांच्या चित्रांनीं तिला शोभा

सन्निविष्टां समन्ततः । विमानमिव सिद्धानां जालवातायनायुताम् २३
सुनियुक्तां विशालां च सुकृतां शिल्पिभिः कृताम् । दारुपर्वतकोपेतां
चारुकर्मपरिष्कृताम् २४ वराभरणहारैश्च चित्रमाल्योपशोभिताम् ।
गुहागहनसंछन्नां रक्तचन्दनभूषिताम् २५ पुष्पाढ्यैः समभिच्छन्नां पद्म-
मालाभिरेव च । तरुणादित्यवर्णाभिर्भ्राजमानाभिरावृताम् २६ ईदृशीं
शिबिकां दृष्ट्वा रामो लक्ष्मणमब्रवीत् । क्षिप्रं विनीयतां वाली प्रेतकार्यं
विधीयताम् २७ ततो वालिनमुद्यम्य सुग्रीवः शिबिकां तदा । आरोप-
यत विक्रोशन्नङ्गदेन सहैव तु २८ आरोप्य शिबिकां चैव वालिनं गत-
जीवितम् । अलंकारैश्च विविधैर्माल्यैर्वस्त्रैश्च भूषितम् २९ आज्ञापयत्तदा
राजा सुग्रीवः प्लवगेश्वरः । और्ध्वदेहिकमार्यस्य क्रियतामनुकूलतः ३०
विश्राणयन्तोऽरत्नानि विविधानि बहूनि च । अग्रतः प्लवगा यान्तु शिबिका
तदनन्तरम् ३१ राज्ञामृद्धिविशेषा हि दृश्यन्ते भुवि यादृशाः । तादृशै-
रिह कुर्वन्तु वानरा भर्तृसत्क्रियाम् ३२ तादृशं वालिनः क्षिप्रं प्राकुर्वं-

---

आणिलेली होती २२; पायदळांच्या चित्रांनीं ती व्याप्त झालेली होती; सर्व बाजूंनीं तिची रचना उत्तमप्रकारें केलेली होती; जाळ्या व खिडक्या ह्यांनीं युक्त असून ती सिद्धांच्या विमानाप्रमाणें दिसत होती २३. तिच्या रचनेची योजना फार उत्कृष्ट होती; ती विशाल असून कारागिरांनीं उत्तम प्रकारें बनविलेली होती; काष्ठनिर्मित क्रीडापर्वतांनीं ती युक्त होती; मोहक असें काम तिच्यावर केलेलें होतें २४; उत्कृष्ट भूषणें व माळा ह्यांनीं ती संपन्न असून चित्रविचित्र पुष्पांच्या योगानें सुशोभित केलेली होती; वर पिंजरी घालून ती आच्छादित केलेली होती; आरक्तवर्ण चंदनानें ती भूषित केलेली होती २५; पुष्पसमुदायांनीं ती व्याप्त झालेली होती आणि बालसूर्यासारिखा ज्यांचा वर्ण आहे अशा उज्ज्वल कमलमालांनीं ती आच्छादित झालेली होती २६. अशा प्रकारची शिबिका अवलोकन करून राम लक्ष्मणाला ह्मणाला "वालीला सत्वर न्या आणि त्याचा और्ध्वदेहिक संस्कार करा" २७. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर अंगदासहवर्तमान आक्रोश करीत असलेल्या सुग्रीवानें वालीला उचलून पालखींत ठेविलें २८ आणि गतप्राण झालेल्या वालीला नानाप्रकारच्या अलंकारांनीं, पुष्पांनीं व वस्त्रांनीं भूषित करून पालखींत ठेविल्यानंतर २९ "नदीच्या तीराजवळ ह्याचें और्ध्वदेहिक कर्म करा" ह्मणून त्या वानरराज सुग्रीवानें आज्ञा केली ३०. 'तदनंतर नानाप्रकारचीं असंख्य रत्नें उधळीत उधळीत वानरांनीं पुढें जावें आणि त्यांच्या मागून पालखी जावी ३१. सारांश, ह्या भूतलावर राजांच्या संपत्ति ज्या प्रकारच्या

और्ध्वदेहिकम् । अङ्गदं परिरभ्याशु तारप्रभृतयस्तथा ३३ क्रोशन्तः प्रययुः सर्वे वानरा हतबान्धवाः । ततः प्रणिहिताः सर्वा वानर्योऽस्य वशानुगाः ३४ चुक्रुशुर्वीरवीरेति भूयः क्रोशन्ति ताः प्रियम् । ताराप्रभृतयः सर्वा वानर्यो हतबान्धवाः ३५ अनुजग्मुश्च भर्तारं क्रोशन्त्यः करुणस्वनाः । तासां रुदितशब्देन वानरीणां वनान्तरे ३६ वनानि गिरयश्चैव विक्रोशन्तीव सर्वतः । पुलिने गिरिनद्यास्तु विविक्ते जलसंवृते ३७ चितां चक्रुः सुबहवो वानरा वनचारिणः । अवरोप्य ततः स्कन्धाच्छिबिकां वानरोत्तमाः ३८ तस्थुरेकान्तमाश्रित्य सर्वे शोकपरायणाः । ततस्तारा पतिं दृष्ट्वा शिबिकातलशायिनम् ३९ आरोप्याङ्के शिरस्तस्य विललाप सुदुःखिता । हा वानरमहाराज हा नाथ मम वत्सल ४० हा महार्ह महाबाहो हा मम प्रिय पश्य माम् । जनं न पश्यसीमं त्वं कस्माच्छोकाभिपीडितम् ४१ प्रहृष्टमिह ते वक्त्रं गतासोरपि मानद । अस्तार्कसमवर्णं च दृश्यते

---

दृष्टीस पडतात त्या प्रकारच्या संपत्तींच्या योगानें वानरांनीं राजाचें क्रियाकर्म करावें ३२; अशीही त्यानें आणखी आज्ञा केल्यावर वानरांनीं वालीचा तशा प्रकारचा और्ध्वदेहिक संस्कार सत्वर केला. नंतर बंधुवध झालेले तारप्रभृति सर्व ही वानर अंगदाला सत्वर कवटाळून आक्रोश करीत करीत वालीकडे चालते झाले. तदनंतर वालीचे अधीन असलेल्या सर्व वानरस्त्रिया एकत्र जमल्या ३३,३४ आणि "हे वीरा, हे वीरा," असें ह्मणून त्या आपल्या प्रिय पतीविषयीं अधिकच आक्रोश व शोक करूं लागल्या व पतिवध झालेल्या ताराप्रभृति सर्वही वानरस्त्रिया ३५ करुणस्वरानें आक्रोश करीत करीत भर्त्याचे मागोमाग चालल्या. तेव्हां त्या वानरस्त्रियांच्या रोदनस्वरांच्या योगानें वनामध्यें ३६( प्रतिध्वनी निघूं लागल्यामुळें ) वृक्षसमुदाय आणि पर्वत चोहोंकडून आक्रोशच करीत आहेत कीं काय असा भास होऊं लागला. पर्वतावरून वहात येणाऱ्या एका नदीच्या निर्जन व जलानें परिपूर्ण अशा वाळवंटावर ३७ असंख्य वनचर वानरांनीं चिता तयार केली. नंतर श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांनीं आपल्या खांद्यांवरून पालखी खालीं उतरिली ३८ आणि शोकाकुल झालेले ते सर्व वानर एकांत स्थलाचा आश्रय करून उभे राहिले. नंतर पालखींत पडलेल्या पतीला अवलोकन करितांक्षणीं तारेला ३९ अत्यंत दुःख झालें आणि त्या वालीचें मस्तक आपल्या मांडीवर ठेवून ती विलाप करूं लागली कीं, "हे मजवर प्रेम करणाऱ्या वानरमहाराजा, हे नाथा, ४०, हे महामान्य, हे महापराक्रमी, हे माझ्या प्रिया, माझ्याकडे पहा. अरे, शोकानें व्याप्त झालेल्या ह्या स्त्रियांकडे तूं कां बरें पहात नाहींस? ४१. हे मान्य, गतप्राण झालेल्याही

जीवतो यथा ४२ एष त्वां रामरूपेण कालः कर्षति वानर । येन स्म विधवाः सर्वाः कृता एकेषुणा रणे ४३ इमास्तास्तव राजेन्द्र वानर्योप्लुवगास्तव । पादैर्विकृष्टमध्वानमागताः किं न बुध्यसे ४४ तवेष्टा ननु चैवेमा भार्याश्चन्द्रनिभाननाः । इदानीं नेक्षसे कस्मात्सुग्रीवं प्लवगेश्वर ४५ एते हि सचिवा राजंस्तारप्रभृतयस्तव । पुरवासिजनश्चायं परिवार्य विषीदति ४६ विसर्जयैनान्सचिवान्यथापुरमरिंदम । ततः क्रीडामहे सर्वा वनेषु मदनोत्कटाः ४७ एवं विलपतीं तारां पतिशोकपरीवृताम् । उत्थापयन्ति स्म तदा वानर्यः शोककर्शिताः ४८ सुग्रीवेण ततः सार्धं सोऽङ्गदः पितरं रुदन् । चितामारोपयामास शोकेनाभिप्लुतेन्द्रियः ४९ ततोऽग्निं विधिवद्दत्त्वा सोपसव्यं चकार ह । पितरं दीर्घमध्वानं प्रस्थितं व्याकुलेन्द्रियः ५० संस्कृत्य वालिनं तं तु विधिवत्प्लवगर्षभाः । आजग्मुरुदकं कर्तुं नदीं शुभ-

---

तुझें मुख जिवंत असलेल्या पुरुषाप्रमाणें आनंदित व अस्ताचलाला गेलेल्या सूर्याप्रमाणें आरक्तवर्ण दिसत आहे ४२. हे वानरा, रामाच्या रूपानें हा कालच तुला ( परलोकीं ) ओढून नेत आहे आणि रणामध्यें एकाच बाणाच्या योगानें ( तुझा वध करून ) यानें आह्मा सर्वांना विधवा करून टाकिल्या आहेत ४३. हे राजाधिराज, ज्यांना उड्या मारितां येत नाहींत अशा त्या ह्या तुझ्या वानरस्त्रिया तुझ्याकरितां पायांनीं चालत चालत फारच दूर आल्या आहेत हें तुझ्या गांवीं सुद्धां कसें येत नाहीं ? ४४. खरोखर चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखांनीं युक्त असलेल्या ह्या तुझ्या प्रिय भार्या आहेत; परंतु, हे वानराधिपते, तूं सांप्रत ह्यांच्याकडे अथवा सुग्रीवाकडे कां बरें पहात नाहींस ? ४५. हे राजा, हे तुझे तारप्रभृति मंत्री आले आहेत आणि हे नगरवासी लोक तुझ्याभोंवतीं गराडा देऊन खेद करीत आहेत ४६. तस्मात्, हे शत्रुदमना, तूं ह्या मंत्र्यांना जाण्याची अनुज्ञा दे ह्मणजे उत्कट कामवासनेनें युक्त झालेल्या आह्मी सर्वही पूर्वीप्रमाणें ( तुझ्यासहवर्तमान ) वनांमध्यें क्रीडा करूं " ४७. ह्याप्रमाणें पतीच्या शोकानें व्याप्त झालेली तारा विलाप करीत पडली असतां शोकाकुल झालेल्या वानरस्त्रियांनीं तिला उठविलें ४८. तदनंतर शोकानें ज्याचें अंतःकरण ग्रस्त झालें आहे अशा त्या अंगदानें रडत रडत आपल्या त्या पित्याला सुग्रीवाच्या साहाय्यानें चितेवर ठेविलें ४९. तदनंतर यथाविधि अग्नि देऊन अंतःकरणामध्यें व्याकुल झालेल्या त्या अंगदानें फारच दूर मार्गाला लागलेल्या आपल्या पित्याला एक उलटी प्रदक्षिणा केली ५० व त्या वालीचा यथाविधि संस्कार करून त्याला उदक देण्याकरितां श्रेष्ठ श्रेष्ठ वानर शुभजलांनीं युक्त असलेल्या पवित्र

जलां शिवाम् ५१ ततस्ते सहितास्तत्र अङ्गदं स्थाप्य चाग्रतः । सुग्रीवतारासहिताः सिषिचुर्वानरा जलम् ५२ सुग्रीवेणेव दीनेन दीनो भूत्वा महाबलः । समानशोकः काकुत्स्थः प्रेतकार्याण्यकारयत् ५३ ततोथ तं वालिनमग्र्यपौरुषं प्रकाशमिक्ष्वाकुवरेषुणा हतम् । प्रदीप्य दीप्ताग्निसमौजसं तदा सलक्ष्मणं राममुपेयिवान्हरिः ५४ [ १०३७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे पञ्चविंशः सर्गः॥२५॥

ततः शोकाभिसंतप्तं सुग्रीवं क्लिन्नवाससम् । शाखामृगमहामात्राः परिवार्योपतस्थिरे १ अभिगम्य महाबाहुं राममक्लिष्टकारिणम् । स्थिताः प्राञ्जलयः सर्वे पितामहमिवर्षयः २ ततः काञ्चनशैलाभस्तरुणार्कनिभाननः । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं हनूमान्मारुतात्मजः ३ भवत्प्रसादात्काकुत्स्थ पितृपैतामहं महत् । वानराणां सुदंष्ट्राणां संपन्नबलशालिनाम् ४ महात्मनां सुदुष्प्रापं प्राप्तं राज्यमिदं प्रभो । भवता समनुज्ञातः प्रविश्य नगरं शुभम् ५ संविधास्यति कार्याणि सर्वाणि ससुहृद्गणः । स्नातोयं

---

नदीवर गेले ५१. तदनंतर अंगदाला पुढें करून सुग्रीव आणि तारा ह्यांसहवर्तमान तेथें एकत्र जुळलेल्या वानरांनीं वालीच्या नांवानें पाणी सोडिलें ५२. तेव्हां दीनें सुग्रीवाप्रमाणें दीन होऊन त्याच्याचप्रमाणें शोक करूं लागलेल्या महाबलाढ्य ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें वालीचे और्ध्वदेहिक संस्कार करविले ५३. असो. तदनंतर इक्ष्वाकवंशजश्रेष्ठ रामाच्या बाणानें उघडपणें वध पावलेल्या त्या महापराक्रमी व प्रदीप्त अग्निप्रमाणें तेजस्वी असलेल्या वालीचें दहन करून सुग्रीव वानर लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या रामासमीप गेला ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५ ॥

तदनंतर, आर्द्र वस्त्रानें युक्त व शोकसंतप्त झालेल्या सुग्रीवाभोंवतीं गराडा देऊन वानरसेनेचे अधिपति उभे राहिले १ आणि ब्रह्मदेवासमीप जाऊन उभे राहणाऱ्या ऋषींप्रमाणें महापराक्रमी व सरळ रीतीनें वागणाऱ्या रामापाशीं जाऊन ते सर्वही हात जोडून उभे राहिले २. तदनंतर बालसूर्याप्रमाणें आरक्तवर्ण मुखानें युक्त व सुवर्णाचा पर्वतच कीं काय असा धिप्पाड असलेला वायुपुत्र हनूमान् हात जोडून ह्मणाला ३ "उत्तम दंष्ट्रा आणि समृद्ध बल ह्यांनीं युक्त असलेल्या महात्म्या वानरांना प्राप्त होण्यास अतिदुर्घट असलेलें हें वाडवडिलांपासून चालत आलेलें प्रचंड राज्य, हे ककुत्स्थकुलोत्पन्न प्रभो, आपल्या प्रसादामुळें प्राप्त झालें आहे. आतां आपली अनुज्ञा झाल्यावर शुभ नगरामध्यें प्रवेश करून ४,५ सुग्रीव सुहृद्गणासहवर्तमान सर्व कार्य उरकून टाकील

विविधैर्गन्धैरौषधैश्च यथाविधि ६ अर्चयिष्यति माल्यैश्च रत्नैश्च त्वां विशे-
षतः । इमां गिरिगुहां रम्यामभिगन्तुं त्वमर्हसि ७ कुरुष्व स्वामिसंबन्धं
वानरान्संप्रहर्षय । एवमुक्तो हनुमता राघवः परवीरहा ८ प्रत्युवाच हनू-
मन्तं बुद्धिमान्वाक्यकोविदः । चतुर्दश समाः सौम्य ग्रामं वा यदि वा
पुरम् ९ न प्रवेक्ष्यामि हनुमन्पितुर्निर्देशपारगः । सुसमृद्धां गुहां दिव्यां
सुग्रीवो वानरर्षभः १० प्रविष्टो विधिवद्वीरः क्षिप्रं राज्येऽभिषिच्यताम् ।
एवमुक्त्वा हनूमन्तं रामः सुग्रीवमब्रवीत् ११ वृत्तज्ञो वृत्तसंपन्नमुदारब-
लविक्रमम् । इममप्यङ्गदं वीरं यौवराज्येऽभिषेचय १२ ज्येष्ठस्य हि सुतो
ज्येष्ठः सदृशो विक्रमेण च । अङ्गदोयमदीनात्मा यौवराज्यस्य भाजनम् १३
पूर्वोयं वार्षिको मासः श्रावणः सलिलागमः । प्रवृत्ताः सौम्य चत्वारो
मासा वार्षिकसंज्ञिताः १४ नायमुद्योगसमयः प्रविश त्वं पुरीं शुभाम् ।
अस्मिन्वत्स्याम्यहं सौम्य पर्वते सहलक्ष्मणः १५ इयं गिरिगुहा रम्या
विशाला युक्तमारुता । प्रभूतसलिला सौम्य प्रभूतकमलोत्पला १६ कार्तिके

आणि स्नान करून हा नानाप्रकारचे सुगंध, औषधि, पुष्पें आणि रत्नें ह्यांच्या योगानें विशेषकरून तुझें यथाविधि पूजन करील. ह्यास्तव, ह्या पर्वताच्या रमणीय गुहेमध्यें तूं जा ६,७ व स्वामी ह्या नात्यानें सुग्रीवाचा वानराशीं संबंध घडवून आणून तूं त्यांना आनंद दे ". ह्याप्रमाणें हनूमानानें सांगितलें असतां शत्रुपक्षीयवीरनाशक आणि संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला बुद्धिमान् राम हनूमानाला ह्मणाला "हे विनयसंपन्न हनुमाना, चौदा वर्षें संपूर्ण होईपर्यंत मी ग्रामामध्यें अथवा नगरामध्यें प्रवेश करणार नाहीं. कारण, मी पित्याची आज्ञा शेंवटास नेणारा आहें. ह्यास्तव, ह्या वानरश्रेष्ठ वीर सुग्रीवानें अत्यंत समृद्ध अशा दिव्य गुहेमध्यें प्रवेश करावा आणि ह्यालाच सत्वर यथाविधि राज्याभिषेक व्हावा ". ह्याप्रमाणें हनूमानाला सांगितल्यानंतर सदाचार जाणणारा राम सदाचारसंपन्न आणि महाबलाढ्य व महापराक्रमी अशा हनूमानाला ह्मणाला "ह्या वीर अंगदालाही यौवराज्याचा अभिषेक करीव ८,९,१०,११,१२. कारण, हा उदारबुद्धि अंगद ज्येष्ठ जो वाली त्याचा ज्येष्ठ पुत्र असून पराक्रमानें त्याची बरोबरी करणारा आहे आणि ह्मणूनच यौवराज्याला पात्र आहे १३. हे विनयसंपन्ना, हे वर्षाकालाचे चार महिने आहेत; पैकीं पर्जन्यानें युक्त असा हा वर्षाकालसंबंधीं श्रावण मास दोन ऋतूंपैकीं पहिल्याच ऋतूंतला आहे १४. तस्मात्, हा उद्योगाचा समय नव्हे; तूं शुभ नगरीमध्यें प्रवेश कर आणि, हे विनयसंपन्न, मी लक्ष्मणासहवर्तमान तोंपर्यंत ह्या पर्वतावर वास्तव्य करीन १५. हे विनयी सुग्रीवा, ही पर्व

समनुप्राप्ते त्वं रावणवधे यत । एष नः समयः सौम्य प्रविश त्वं स्वमा-
लयम् १७ अभिषिञ्चस्व राज्ये च सुहृदः संप्रहर्षय । इति रामाभ्यनुज्ञातः
सुग्रीवो वानरर्षभः १८ प्रविवेश पुरीं रम्यां किष्किन्धां वालिपालि-
ताम् । तं वानरसहस्राणि प्रविष्टं वानरेश्वरम् १९ अभिवार्य प्रविष्टानि
सर्वतः प्लवगेश्वरम् । ततः प्रकृतयः सर्वा दृष्ट्वा हरिगणेश्वरम् २० प्रणम्य
मूर्ध्ना पतिता वसुधायां समाहिताः । सुग्रीवः प्रकृतीः सर्वाः संभाष्यो-
त्थाप्य वीर्यवान् २१ भ्रातुरन्तःपुरं सौम्यं प्रविवेश महाबलः । प्रविष्टं भीम-
विक्रान्तं सुग्रीवं वानरर्षभम् २२ अभ्यषिञ्चन्त सुहृदः सहस्राक्षमिवामराः ।
तस्य पाण्डुरमाजह्रुश्छत्रं हेमपरिष्कृतम् २३ शुक्ले च वालव्यजने हेमदण्डे
यशस्करे । तथा रत्नानि सर्वाणि सर्वबीजौषधानि च २४ सक्षीराणां च
वृक्षाणां प्ररोहान्कुसुमानि च । शुक्लानि चैव वस्त्राणि श्वेतं चैवानुले-
पनम् २५ सुगन्धीनि च माल्यानि स्थलजान्यम्बुजानि च । चन्दनानि च
दिव्यानि गन्धांश्च विविधान्बहून् २६ अक्षतं जातरूपं च प्रियङ्गुमधु-

ताची गुहा रमणीय, विशाल व हवाशीर असून कमलपुष्पांची आणि उदकाची हिच्यामध्यें समृद्धि आहे. ( तेव्हां मी ह्या गुहेमध्यें वास्तव्य करीन ) १६. कार्तिक लागल्यावर तूं रावणाच्या वधाविषयीं यत्न कर; हा आपला संकेत ठरला आहे. आतां हे नम्र सुग्रीवा, तूं स्वस्थानाप्रत जा १७; अंगदाला यौवराज्याचा अभिषेक कर आणि सुहृदांना आनंद दे. " ह्याप्रमाणें रामानें अनुज्ञा दिल्यावर वानरश्रेष्ठ सुग्रीव १८ वालीनें रक्षण केलेल्या रमणीय किष्किंधानगरीमध्यें प्रविष्ट झाला आणि तो वानराधिपति सुग्रीव प्रविष्ट झाल्यावर हजारों वानर १९ त्या वानरराजाच्या मागोमाग प्रविष्ट झाले आणि सर्व बाजूंनीं त्याच्या भोंवतीं उभे राहिले. नंतर सर्व मंत्र्यांनीं २० वानरगणाधिपति सुग्रीवाला अवलोकन करितांक्षणीं मस्तकानें प्रणाम करून पृथ्वीवर साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां स्वस्थ अंतःकरणानें युक्त असलेल्या त्या मंत्र्यांना उठवून व त्यांच्याशीं संभाषण करून तो वीर्यवान् २१ व महाबलाढ्य सुग्रीव भ्रात्याच्या शांत अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला. व तो भयंकर पराक्रम करणारा वानरश्रेष्ठ सुग्रीव प्रविष्ट झाल्यावर २२ इंद्राला अभिषेक करणाऱ्या देवांप्रमाणें सुहृदांनीं त्याला अभिषेक केला. सुवर्णाचें ज्यावर काम केलेलें आहे असें श्वेत छत्र वानरांनीं त्याच्याकडे आणिलें २३ आणि त्याचप्रमाणें सुवर्णदंडांनीं युक्त व यशस्कारक अशा शुभ्र चौऱ्या, सर्व प्रकारचीं रत्नें, सर्व प्रकारचीं बीजें, औषधी २४ व चिकाळू वृक्षांच्या पारंब्या, पुष्पें, शुभ्र वस्त्रें, श्वेतवर्ण अनुलेपनें २५, सुगंधी पुष्पें, भूमीवर येणारीं कमलें

सर्पिषी । दधि चर्म च वैयाघ्रं परार्ध्यौ चाप्युपानहौ २७ समालम्भनमा-
दाय गोरोचनं मनःशिलाम् । आजग्मुस्तत्र मुदिता वराः कन्याश्च
षोडश २८ ततस्ते वानरश्रेष्ठमभिषेक्तुं यथाविधि । रत्नैर्वस्त्रैश्च भक्ष्यैश्च
तोषयित्वा द्विजर्षभान् २९ ततः कुशपरिस्तीर्णं समिद्धं जातवेदसम् ।
मन्त्रपूतेन हविषा हुत्वा मन्त्रविदो जनाः ३० ततो हेमप्रतिष्ठाने वरास्त-
रणसंवृते । प्रासादशिखरे रम्ये चित्रमाल्योपशोभिते ३१ प्राङ्मुखं विधि-
वन्मन्त्रैः स्थापयित्वा वरासने । नदीनदेभ्यः संहृत्य तीर्थेभ्यश्च समन्ततः ३२
आहृत्य च समुद्रेभ्यः सर्वेभ्यो वानरर्षभाः । अपः कनककुम्भेषु निधाय विमलं
जलम् ३३ शुभैर्ऋषभशृङ्गैश्च कलशैश्चैव काञ्चनैः । शास्त्रदृष्टेन विधिना मह-
र्षिविहितेन च ३४ गजो गवाक्षो गवयः शरभो गन्धमादनः । मैन्दश्च द्विवि-
दश्चैव हनूमाञ्जाम्बवांस्तथा ३५ अभ्यषिञ्चन्त सुग्रीवं प्रसन्नेन सुगन्धिना ।
सलिलेन सहस्राक्षं वसवो वासवं यथा ३६ अभिषिक्ते तु सुग्रीवे सर्वे वान-
रपुङ्गवाः । प्रचुक्रुशुर्महात्मानो हृष्टाः शतसहस्रशः ३७ रामस्य तु वचः

---

दिव्य चंदन, नानाप्रकारचीं पुष्कळ सुगंधीं द्रव्यें २६, अक्षत, सुवर्ण, वाघंटीं, मध, तूप, दही, व्याघ्रचर्म आणि उत्कृष्ट पादुका हें सामानही ते घेऊन आले २७ आणि गोरोचन व मनशीळ हें अनुलेपनद्रव्य बरोबर घेऊन आनंदित झालेल्या सोळा श्रेष्ठ कन्याही तेथें आल्या २८. तदनंतर त्यांनीं वानरश्रेष्ठ सुग्रीवाला यथाविधि अभिषेक करण्याकरितां नानाप्रकारच्या वस्त्रांनीं व भक्ष्य पदार्थांनीं द्विजश्रेष्ठ ब्राह्मणांना संतुष्ट केले २९; दर्भांचीं परिस्तरणें घालून प्रज्वलित केलेल्या अग्नीमध्यें मंत्रवेत्त्या लोकांनीं समंत्रक आज्यचा होम केला ३०; राजवाड्यांतील हेमप्रतिष्ठान नांवाच्या रम्य, उत्कृष्ट आस्तरणें घातलेल्या आणि चित्रविचित्र पुष्पांनीं सुशोभित केलेल्या गच्चीवर ३१ एक श्रेष्ठ आसन घालून त्यावर सुग्रीवाला मंत्र ह्मणून यथाविधि प्राङ्मुख बसविलें; नद्या व नद आणि आसमंताद्भागीं असलेलीं तीर्थें ह्यांपासून उदक आणून ३२ आणि त्याचप्रमाणें सर्व समुद्रांपासूनही निर्मल जल आणून वानरश्रेष्ठांनीं सुवर्णकुंभामध्यें ठेविलें ३३ आणि अष्टवसूंनीं ज्याप्रमाणें सहस्रनयन इंद्राला अभिषेक केला त्याप्रमाणें बैलाचीं पवित्र शिंगें व सुवर्णकलश ह्यांमध्यें तें निर्मल व सुगंधी उदक घालून महर्षींनीं सांगितल्याप्रमाणें शास्त्रोक्त पद्धतीनें गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, हनूमान् आणि जांबवान् ह्यांनीं सुग्रीवाला अभिषेक केला ३४, ३५, ३६ व ह्याप्रमाणें सुग्रीवाला अभिषेक झाल्यावर सर्वही शेंकडों, हजारों महात्मे वानरश्रेष्ठ आनंदित होऊन गर्जना करूं लागले ३७. नंतर रामाची आज्ञा शेवटास

कुर्वन्सुग्रीवो वानरेश्वरः । अङ्गदं संपरिष्वज्य यौवराज्येऽभ्यषेचयत् ३८
अङ्गदे चाभिषिक्ते तु सानुक्रोशाः प्लवंगमाः । साधु साध्विति सुग्रीवं
महात्मानो ह्यपूजयन् ३९ रामं चैव महात्मानं लक्ष्मणं च पुनः पुनः ।
प्रीताश्च तुष्टुवुः सर्वे तादृशे तत्र वर्तिनि ४० हृष्टपुष्टजनाकीर्णा पताका-
ध्वजशोभिता । बभूव नगरी रम्या किष्किन्धागिरिगह्वरे ४१ निवेद्य
रामाय तदा महात्मने महाभिषेकं कपिवाहिनीपतिः । रुमां च भार्यामु-
पलभ्य वीर्यवानवाप राज्यं त्रिदशाधिपो यथा ४२ [१०७९] इत्यार्षे श्रीम-
द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

अभिषिक्ते तु सुग्रीवे प्रविष्टे वानरे गुहाम् । आजगाम सह भ्रात्रा
रामः प्रस्रवणं गिरिम् १ शार्दूलमृगसंघुष्टं सिंहैर्भीमरवैर्वृतम् । नानागुल्म-
लतागूढं बहुपादपसंकुलम् २ ऋक्षवानरगोपुच्छैर्मार्जारैश्च निषेवितम् ।
मेघराशिनिभं शैलं नित्यं शुचिकरं शिवम् ३ तस्य शैलस्य शिखरे
महतीमायतां गुहाम् । प्रत्यगृह्णत वासार्थं रामः सौमित्रिणा सह ४

---

नेण्याकरितां वानराधिपति सुग्रीवानें अंगदाला आलिंगन देऊन त्याला यौवराज्याचा अभिषेक केला ३८ आणि ह्याप्रमाणें अंगदाला यौवराज्याचा अभिषेक झाला असतां महात्म्या सदय वानरांनीं " शाबास, शाबास " ह्मणून सुग्रीवाची प्रशंसा केली ३९ आणि तशा प्रकारचें वर्तमान त्या किष्किंधानगरींत घडल्यामुळें सर्वही संतुष्ट होऊन माहात्म्या रामाची व सुग्रीवाची वारंवार स्तुति करूं लागले ४० व पर्वताच्या गुहेमध्यें असलेली आणि पताका व ध्वज ह्यांनीं सुशोभित झालेली ती रमणीय किष्किंधानगरी तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त दिसूं लागली ४१. असो. ह्याप्रमाणें झालेल्या महाभिषेकाचें वर्तमान महात्म्या रामाला निवेदन करून आणि आपली भार्या रुमा प्राप्त करून घेऊन देवराज्याचा स्वीकार करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्या वानरसेनाधिपति वीर्यवान् सुग्रीवानें वानरराज्याचा स्वीकार केला ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

सुग्रीव गुहेमध्यें प्रविष्ट होऊन त्याला राज्याभिषेक झाल्यावर भ्रात्यासहवर्तमान राम प्रस्रवण पर्वतावर आले १. तो पर्वत व्याघ्र व मृग ह्यांनीं नादित झालेला होता, भयंकर गर्जना करणाऱ्या सिंहांनीं व्याप्त झालेला होता, नानाप्रकारच्या झांकरांनीं व वेलींनीं तो अगदीं झांकला गेलेला होता, अनेक वृक्षांनीं तो गजबजलेला होता २, ऋक्ष, वानर, गोपुच्छ व मार्जार ह्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता, मेघसमुदायाप्रमाणें तो पर्वत दिसत होता आणि सर्वदां कल्याणकारक व पुण्यवर्धक असा

कृत्वा च समयं रामः सुग्रीवेण सहानघः। कालयुक्तं महद्वाक्यमुवाच
रघुनन्दनः ५ विनीतं भ्रातरं भ्राता लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम्। इयं गिरिगुहा
रम्या विशाला युक्तमारुता ६ अस्यां वत्स्याम सौमित्रे वर्षरात्रमरिंदम।
गिरिशृङ्गमिदं रम्यमुत्तमं पार्थिवात्मज ७ श्वेताभिः कृष्णताम्राभिः शिला-
भिरुपशोभितम्। नानाधातुसमाकीर्णं नदीदर्दुरसंयुतम् ८ विविधैर्वृक्षष-
ण्डैश्च चारु चित्रलतायुतम्। नानाविहगसंघुष्टं मयूरवरनादितम् ९ माल-
तीकुन्दगुल्मैश्च सिन्दुवारैः शिरीषकैः। कदम्बार्जुनसर्जैश्च पुष्पितैरुपशो-
भितम् १० इयं च नलिनी रम्या फुल्लपङ्कजमण्डिता। नातिदूरे गुहाया
नौ भविष्यति नृपात्मज ११ प्रागुदक्प्रवणे देशे गुहा साधु भविष्यति।
पश्चाच्चैवोन्नता सौम्य निवातेयं भविष्यति १२ गुहाद्वारे च सौमित्रे शिला
समतला शिवा। कृष्णा चैवायता चैव भिन्नाञ्जनचयोपमा १३ गिरिशृङ्ग-
मिदं तात पश्य चोत्तरतः शुभम्। भिन्नाञ्जनचयाकारमम्भोधरमिवोदि-

---

होता ३. त्या पर्वताच्या शिखरावर एक मोठी विस्तीर्ण गुहा वास्तव्य करण्याकरितां लक्ष्मणासहवर्तमान रामानें स्वीकारिली ४. सुग्रीवाशीं बेत केल्यावर निष्पाप रघुनंदन राम विनयसंपन्न आणि लक्ष्मीवर्धक अशा आपल्या भ्रात्या लक्ष्मणाशीं समयोचित व भारदस्त भाषण करूं लागला. ( तो ह्मणाला ) “ ही पर्वताची गुहा रमणीय, विशाल व हवाशीर आहे ५, ६. तस्मात्, हे शत्रुदमना लक्ष्मणा, पर्जन्यकाल संपेपर्यंत आपण ह्या गुहेमध्यें वास्तव्य करूं. हे राजपुत्रा, हें पर्वताशिखर रमणीय व उत्कृष्ट असून ७ श्वेतवर्ण, कृष्णवर्ण आणि ताम्रवर्ण शिलांनीं हें भूषित झालेलें आहे; हें नानाप्रकारच्या धातूंनीं व्याप्त झालेलें आहे; नदीसंबंधीं बेडूक ह्या ठिकाणीं आहेत ८; नानाप्रकारच्या वृक्षसमुदायांनीं हें सुंदर दिसत आहे; चित्रविचित्र लतांनीं हें युक्त आहे; अनेक प्रकारच्या पक्ष्यांचा येथें किलबिलाट चाललेला आहे; उत्कृष्ट मयुरां(च्या शब्दां)नीं हें नादित झालेलें आहे ९ आणि मालतीचीं व कुंदाचीं झांकरें, निर्गुंडी, शिरस व प्रफुल्लित कळंब, अर्जुनसादडा आणि साल ह्या वृक्षांनीं हें सुशोभित झालेलें आहे १०. हे राजपुत्रा, प्रफुल्लित कमलांच्या योगानें भूषित झालेलें हें रमणीय सरोवर आपल्या गुहेपासून फारसें लांब नसेल ११; ईशान्येच्या बाजूस सखल असलेल्या प्रदेशावर असलेली ही गुहा सुखसाधनच होईल आणि, हे विनयसंपन्न लक्ष्मणा, पश्चिमेच्या बाजूनें किंचित् चढ असलेली ही गुहा निवाऱ्याचीही असेल १२. हे लक्ष्मणा, गुहेच्या दाराशीं पसरलेल्या कज्जलपर्वताप्रमाणें विस्तृत, कृष्णवर्ण, सपाट व सुखावह अशी एक शिळा आहे १३. बा लक्ष्मणा, आकारानें विदीर्ण झालेल्या कज्जलपर्वतासारिखें

तम् १४ दक्षिणस्यामपि दिशि स्थितं श्वेतमिवाम्बरम् । कैलासशिखर-
प्रख्यं नानाधातुविराजितम् १५ प्राचीनवाहिनीं चैव नदीं भृशमकर्दमाम् ।
गुहायाः परतः पश्य त्रिकूटे जाह्नवीमिव १६ चन्दनैस्तिलकैः सालैस्तमा-
लैरतिमुक्तकैः । पद्मकैः सरलैश्चैव अशोकैश्चैव शोभिताम् १७ वानीरै-
स्तिमिदैश्चैव बकुलैः केतकैरपि । हिन्तालैस्तिनिशैर्नीपैर्वेतसैः कृतमा-
लकैः १८ तीरजैः शोभिता भाति नानारूपैस्ततस्ततः । वसनाभरणोपेता
प्रमदेवाभ्यलंकृता १९ शतशः पक्षिसङ्घैश्च नानानादविनादिता । एकैक-
मनुरक्तैश्च चक्रवाकैरलंकृता २० पुलिनैरतिरम्यैश्च हंससारससेविता ।
प्रहसन्त्येव भात्येषा नानारत्नसमन्विता २१ क्वचिन्नीलोत्पलैश्छन्ना भाति
रक्तोत्पलैः क्वचित् । क्वचिदाभाति शुक्लैश्च दिव्यैः कुमुदकुड्मलैः २२
पारिप्लवशतैर्जुष्टा बर्हिक्रौञ्चविनादिता । रमणीया नदी सौम्या मुनिसङ्घ-
निषेविता २३ पश्य चन्दनवृक्षाणां पङ्क्तीः सुरुचिरा इव । ककुभानां च

---

दिसत असून आकाशांत आलेल्या ढगाप्रमाणें भासणारें असें हें शुभ पर्वतशिखर उत्तरेच्या बाजूला तूं अवलोकन कर १४ आणि त्याचप्रमाणें दक्षिण दिशेस असलेलें दुसरें एक शिखर तूं पहा. नानाप्रकारच्या धातूंनीं झळकत असलेलें आणि श्वेत वस्त्रासा-रिखें भासमान होत असलेलें हें शिखर कैलासशिखराची बरोबरी करणारें आहे १५. त्रिकूटाचलावर असलेल्या जाह्नवी (तुल्य मंदाकिनी) प्रमाणें अत्यंत निर्मल अशी पूर्व-वाहिनी नदी गुहेसभोंवतीं असलेली तूं अवलोकन कर १६. चंदन, तिळवा, साल, तमाल, कस्तुरी मोगरा, पद्मक, सरल आणि अशोक ह्यांच्या योगानें ही सुशोभित झालेली आहे १७; देवनळ, तिमिद, बकुल, केतक, हिंताळ, तिंवस, कळंब, वेत आणि बाहवा १८ अशा अनेक प्रकारच्या तीरावरील वृक्षांनीं सुशोभित असल्यामुळें हीं वस्त्रें व भूषणें ह्यांनीं युक्त व अलंकार धारण केलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत आहे १९. शेंकडों पक्षिगणांमुळें नानाप्रकारच्या ध्वनींनीं ही नादित झालेली असून परस्परांवर प्रेम कर-णाऱ्या चक्रवाक पक्ष्यांच्या योगानें ही भूषित झालेली आहे २०. अत्यंत रमणीय वाळवंटांनीं ही युक्त असून हंस व सारस पक्ष्यांनीं हिचा आश्रय केलेला आहे आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं युक्त असलेली ही नदी हास्य करीत असल्यासारिखी दिसत आहे २१; कोठें कोठें नीलकमलांनीं, कोठें कोठें आरक्तकमलांनीं व कांहीं ठिकाणीं श्वेतवर्ण व दिव्य कमलकालिकांनीं ही अच्छादित झाल्यासारिखी दिसत आहे २२ आणि शेंकडों जलचर पक्ष्यांनीं व मुनिगणांनीं आश्रय केलेली ही सौम्य व रमणीय नदी मयूर आणि क्रौंच पक्ष्यांच्या योगानें नादित झालेली आहे २३. चंदनवृक्षांच्या अत्यंत

दृश्यन्ते मनसैवोदिताः समम् २४ अहो सुरमणीयोयं देशः शत्रुनिषूदन ।
दृढं रंस्याव सौमित्रे साध्वत्र निवसावहे २५ इतश्च नातिदूरे सा किष्किन्धा
चित्रकानना । सुग्रीवस्य पुरी रम्या भविष्यति नृपात्मज २६ गीतवादि-
त्रनिर्घोषः श्रूयते जयतां वर । नदतां वानराणां च मृदङ्गाडम्बरैः सह २७
लब्ध्वा भार्यां कपिवरः प्राप्य राज्यं सुहृद्वृतः । ध्रुवं नन्दति सुग्रीवः
संप्राप्य महतीं श्रियम् २८ इत्युक्त्वा न्यवसत्तत्र राघवः सहलक्ष्मणः ।
बहुदृश्यदरीकुञ्जे तस्मिन्प्रस्रवणे गिरौ २९ सुसुखे हि बहुद्रव्ये तस्मिन्हि
धरणीधरे । वसतस्तस्य रामस्य रतिरल्पापि नाभवत् ३० हृतां हि
भार्यां स्मरतः प्राणेभ्योपि गरीयसीम् । उदयाभ्युदितं दृष्ट्वा शशाङ्कं स
विशेषतः ३१ आविवेश न तं निद्रा निशासु शयनं गतम् । तत्समुत्थेन
शोकेन बाष्पोपहतचेतनम् ३२ तं शोचमानं काकुत्स्थं नित्यं शोकप-
रायणम् । तुल्यदुःखोब्रवीद्भ्राता लक्ष्मणोनुनयं वचः ३३ अलं वीर व्यथां

---

रमणीय रांगा तूं अवलोकन कर आणि मनाप्रमाणें उगवलेल्या अशा ज्या ह्या ककुभ वृक्षांच्या रांगा दिसत आहेत त्याही तूं पहा २४. हे शत्रुनाशका, हा प्रदेश अत्यंत रमणीय आहे; आपणाला येथें करमणूक होईल आणि म्हणूनच, हे लक्ष्मणा, आपण खुशाल येथें वास्तव्य करूं २५. हे राजपुत्रा, अद्भुत वनांनीं युक्त असलेली ही सुग्रीवाची रमणीय किष्किंधानगरी येथून फार लांब नाहीं २६. कारण, हे विजयिश्रेष्ठा, मृदंग आणि आडंबर ह्यांसहवर्तमान गायनोपयुक्त वाद्यांचा व गर्जना करीत असलेल्या वानरांचा ध्वनि येथें ऐकूं येत आहे २७. ह्यावरून भार्या प्राप्त होऊन वानरश्रेष्ठ सुग्रीवाला राज्यही मिळालें आहे आणि प्रचंड ऐश्वर्य प्राप्त झाल्यामुळें सुहृदांनीं परिवेष्टित असलेला तो सुग्रीव निःसंशय आनंद करीत आहे" २८. ह्याप्रमाणें बोलून तो रघुवंशज राम अनेक उत्कृष्ट वस्तूंनीं भरलेल्या दऱ्या व कुंजवनें ज्यावर आहेत अशा त्या प्रस्रवण पर्वतावर लक्ष्मणासहवर्तमान वास्तव्य करूं लागला २९; परंतु, अत्यंत सुखावह आणि सुखसाधनभूत अनेक द्रव्यांनीं युक्त असलेल्या त्या पर्वतावर वास्तव्य करीत असलेल्या रामाचें चित्तरंजन यत्किंचित्ही झालें नाहीं ३०. कारण, विशेषतः उदयाचलावर आलेला चंद्र दृष्टीं पडला असतां प्राणांपेक्षांहीं अधिक प्रिय असलेली जी रावणानें नेलेली भार्या तिचें स्मरण होत असल्यामुळें ३१ रात्रीं शय्येवर पडला असतांना त्याला कधींही निद्रा येत नसे आणि त्या वियोगजन्य शोकामुळें नेत्र अश्रूंनीं भरून येऊन त्याच्या मनाला मुळींच चैन पडत नसे ३२. तेव्हां, नेहमीं दुःखपरायण होऊन शोक करीत असलेल्या त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला समदुःखी

मत्वा न त्वं शोचितुमर्हसि । शोचतो ह्यवसीदन्ति सर्वार्था विदितं हि
ते ३४ भवान्क्रियापरो लोके भवान्देवपरायणः । आस्तिको धर्मशीलश्च
व्यवसायी च राघव ३५ न ह्यव्यवसितः शत्रुं राक्षसं तं विशेषतः । सम-
र्थस्त्वं रणे हन्तुं विक्रमे जिह्मकारिणम् ३६ समुन्मूलय शोकं त्वं व्यव-
सायं स्थिरीकुरु । ततः सपरिवारं तं राक्षसं हन्तुमर्हसि ३७ पृथिवी-
मपि काकुत्स्थ ससागरवनाचलाम् । परिवर्तयितुं शक्तः किं पुनस्तं हि
रावणम् ३८ शरत्कालं प्रतीक्षस्व प्रावृट्कालोऽयमागतः । ततः सराष्ट्रं
सगणं रावणं तं वधिष्यसि ३९ अहं तु खलु ते वीर्यं प्रसुप्तं प्रतिबोधये।
दीप्तैराहुतिभिः काले भस्मच्छन्नमिवानलम् ४० लक्ष्मणस्य हि तद्वाक्यं
प्रतिपूज्य हितं शुभम् । राघवः सुहृदं स्निग्धमिदं वचनमब्रवीत् ४१
वाच्यं यदनुरक्तेन स्निग्धेन च हितेन च । सत्यविक्रमयुक्तेन तदुक्तं

---

भ्राता लक्ष्मण नम्रपणानें ह्मणाला ३३ "हे वीरा, आतां हें दुःख करणें पुरें झालें; तुझ्यासारख्याला शोक करणें हें प्रशस्त नाहीं. कारण, शोक करीत असलल्या पुरुषाचे सर्वही मनोरथ जागच्या जागींच रहातात हें तुला विदितच आहे ३४. हे रघुवंशज रामा, तूं जगतामध्यें उद्योगतत्पर, देवकार्यार्थ वाहिलेला, आस्तिक, धर्मशील आणि व्यवसायी ह्मणून प्रसिद्ध आहेस ३५ आणि पराक्रम दर्शविण्याचें स्थान जो संग्राम त्यामध्यें विशेषतः कपटाचें अवलंबन करणाऱ्या त्या शत्रू राक्षसचा वध करण्यास तूं उद्योगशील बनल्यावांचून समर्थ होणार नाहींस ३६. तस्मात्, शोक सोडून देऊन तूं आतां एकसारिखा उद्योग सुरू ठेव; ह्मणजे तूं त्या राक्षसाचा सपरिबार वध करण्यास समर्थ होशील ३७. इतकेंच नव्हे; परंतु, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा (तूं उद्योगाचें अवलंबन केल्यावर) समुद्र, वनें व पर्वत ह्यांसहवर्तमान पृथ्वीही उलथीपालथी करण्यास तूं समर्थ होशील; मग त्या रावणाचा वध करण्यास तू समर्थ होशील ह्याविषयीं संशय तो कसला? ३८. सांप्रत हा पर्जन्यकाल आलेला आहे. ह्यास्तव, शरदृतु येईपर्यंत वाट पहा. शरदृतु प्राप्त झाल्यावर तूं राष्ट्र व परिवार ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करशील ३९. भस्मामध्यें आच्छादित होऊन राहिलेल्या अग्नीला योग्य वेळीं उद्दीपक आहुतींच्या योगानें ज्याप्रमाणें होमकालीं ऋत्विज प्रदीप्त करितात त्याचप्रमाणें तुझे ठिकाणीं निद्रिस्थ असलेलें हें वीर्य खरोखर मी जागृत करीत आहें" ४०. ह्याप्रमाणें त्या लक्ष्मणाच्या हितकारक व शुभ भाषणाला मान देऊन रघुवंशज राम शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या भ्रातृवत्सल लक्ष्मणाला ह्मणाला ४१ "अनुरक्त, स्नेहयुक्त, हितकारक आणि अमोघपराक्रमी अशा

लक्ष्मण त्वया ४२ एष शोकः परित्यक्तः सर्वकार्यावसादकः । विक्रमेष्वप्रतिहतं तेजः प्रोत्साहयाम्यहम् ४३ शरत्कालं प्रतीक्षिष्ये स्थितोस्मि वचने तव । सुग्रीवस्य नदीनां च प्रसादमनुपालयन् ४४ उपकारेण वीरस्तु प्रतिकारेण युज्यते । अकृतज्ञो प्रतिकृतो हन्ति सत्त्ववतां मनः ४५ तदेव युक्तं प्रणिधाय लक्ष्मणः कृताञ्जलिस्तत्प्रतिपूज्य भाषितम् । उवाच रामं स्वभिरामदर्शनं प्रदर्शयन्दर्शनमात्मनः शुभम् ४६ यथोक्तमेतत्तव सर्वमीप्सितं नरेन्द्र कर्ता न चिरात्तु वानरः । शरत्प्रतीक्षः क्षमतामिमं भवाञ्जलप्रपातं रिपुनिग्रहे धृतः ४७ नियम्य कोपं परिपाल्यतां शरत्क्षमस्व मासांश्चतुरो मया सह । वसाचलेस्मिन्मृगराजसेविते संवर्तयञ्छत्रुवधे समर्थः ४८ [११२७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

स तदा वालिनं हत्वा सुग्रीवमभिषिच्य च । वसन्माल्यवतः पृष्ठे रामो लक्ष्म-

---

भ्रात्यानें जें कांहीं सांगण्यासारिखें आहे तें, हे लक्ष्मणा, तूं सांगितलें आहेस ४२. वास्तव, सर्व कार्यांचा नाश करणारा हा शोक मी सोडून दिला असून पराक्रमसमयीं अकुंठित असलेलें नैसर्गिक तेज मी आतां वृद्धिंगत करितों ४३. मी तुझ्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तयार झालों असून सुग्रीवाचें मन शांत होण्याची आणि नद्यांचें उदक निर्मल होण्याची ह्मणजे अर्थात् शरदृतूची वाट पहात आहें ४४. कोणीं उपकार केला असतां वीर पुरुष त्याच्यावर प्रत्युपकार अवश्य करीतच असतो. कारण, दुसऱ्याचा उपकार झाला असतां जो कृतघ्न बनून त्याच्यावर प्रत्युपकार करीत नाहीं त्याची उपकार करणाऱ्या सामर्थ्यवानाशीं मैत्री रहात नाहीं" ४५. ह्याप्रमाणें रामानें केलेल्या भाषणाला मान देऊन आणि तेंच योग्य आहे असा विचार करून लक्ष्मणानें हात जोडिले आणि आपला सुविचार रामाला दर्शविण्याच्या उद्देशानें तो मनोहर मुद्रेनें युक्त असलेल्या रामाला ह्मणाला ४६ "हे राजा, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें हा तुझा सर्वही मनोरथ सुग्रीव वानर लवकरच शेवटास नेईल. शत्रूचा निग्रह करण्याविषयीं आपला निश्चय झालेला आहे; तथापि, शरदृतूपर्यंत वाट पहा ह्मणजे अर्थात् हा पर्जन्यकाल संपेपर्यंत धीर धर ४७. सारांश, क्रोध आंवरून धर, शरदृतूची वाट पहा, वर्षाकालाचे हे चार महिने लोटपर्यंत धीर धर आणि शत्रूचा वध करण्याविषयीं समर्थ असलेला तूं शरदृतूपर्यंत कालक्षेप करीत करीत सिंहांनीं आश्रय केलेल्या ह्या पर्वतावर माझ्यासहवर्तमान वास्तव्य कर ४८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

णमब्रवीत् १ अयं स कालः संप्राप्तः समयोद्य जलागमः। संपश्य त्वं नभो मेघैः संवृतं गिरिसंनिभैः २ नवमासधृतं गर्भं भास्करस्य गभस्तिभिः । पीत्वा रसं समुद्राणां द्यौः प्रसूते रसायनम् ३ शक्यमम्बरमारुह्य मेघसोपानपङ्क्तिभिः । कुटजार्जुनमालाभिरलंकर्तुं दिवाकरः ४ संध्यारागोत्थितैस्ताम्रैरन्तेष्वपि च पाण्डुभिः । स्निग्धैरभ्रपटच्छेदैर्बद्धव्रणमिवाम्बरम् ५ मन्दमारुतनिःश्वासं संध्याचन्दनरञ्जितम् । आपाण्डुजलदं भाति कामातुरमिवाम्बरम् ६ एषा घर्मपरिक्लिष्टा नववारिपरिप्लुता । सीतेव शोकसंतप्ता मही बाष्पं विमुञ्चति ७ मेघोदरविनिर्मुक्ताः कर्पूरदलशीतलाः । शक्यमञ्जलिभिः पातुं वाताः केतकगन्धिनः ८ एष फुल्लार्जुनः शैलः केतकैरभिवासितः । सुग्रीव इव शान्तारिर्धाराभिरभिषिच्यते ९ मेघकृष्णाजिनधरा धारा यज्ञोपवीतिनः । मारुतापूरितगुहाः प्राधीता इव पर्वताः १०

---

वालीचा वध करून सुग्रीवाला अभिषेक केल्यानंतर माल्यवान् पर्वतावर वास्तव्य करीत असलेला राम लक्ष्मणाला ह्मणाला १ " तो हा काल ह्मणजे वर्षाऋतु सांप्रत प्राप्त झाला आहे; कारण, पर्वतप्राय मेघांनीं व्याप्त झालेलें आकाश तूं अवलोकन कर २. सूर्याच्या किरणांच्या योगानें समुद्रोदक शोषून घेऊन ( कार्तिकप्रभृति ) नऊ महिनेपर्यंत धारण केलेला व रसायनाप्रमाणें लोकांच्या जीवनास कारण होणारा जलरूप गर्भ आकाशरूप स्त्री टाकून देत आहे ३. मेघरूप जिन्यांच्या समुदायांनीं आकाशावर चढून जाऊन कुडे आणि अर्जुनवृक्ष ह्यांच्या मालांच्या योगानें सूर्याला भूषित करणें शक्य आहे ( असें वाटतें ) ४. संध्याकालच्या आरक्तवर्णानें युक्त झाल्यामुळें ताम्रवर्ण आणि शेंवटीं श्वेतवर्ण असून ( जलसंबंधामुळें ) स्निग्ध ( ह्मणजे ओलसर ) दिसत असलेल्या अभ्ररूप फडक्यांनीं आकाश जसें कांहीं जखम बांधलेल्या पुरुषाप्रमाणें दिसत आहे ५. मंद मंद वहात असलेला वायु हाच ज्याचा निःश्वास आहे, संध्यारूप केशर ज्याला चोपडलेलें आहे आणि सभोंवतीं श्वेतवर्ण असलेले मेघ हेच ज्याचे पांडुरवर्ण झालेले गाल आहेत असें तें आकाश कामातुर पुरुषाप्रमाणें दिसत आहे ६. सूर्याच्या तेजानें संतप्त होऊन नवीन उदकानें परिप्लुत झालेली ही भूमि शोकसंतप्त सीता ज्याप्रमाणें अश्रु ढाळीत असेल त्याप्रमाणें वाफ बाहेर सोडीत आहे ७. मेघांतून बाहेर पडल्यामुळें कर्पूरवृक्षाच्या पानांप्रमाणें शीतल होऊन केवडयाच्या सुवासानें युक्त झालेले वायु ओंजळीनें पितां येतील कीं काय असे भासत आहेत ८. प्रफुल्लित अर्जुनवृक्षांनीं युक्त व केतकवृक्षांच्या योगानें सुगंधयुक्त झालेल्या ह्या पर्वताला शत्रूचा नाश झालेल्या सुग्रीवाप्रमाणें जलधारांनीं अभिषेक

कशाभिरिव हैमीभिर्विद्युद्भिरभिताडितम् । अन्तस्तनितनिर्घोषं सवेदनमिवाम्बरम् ११ नीलमेघाश्रिता विद्युत्स्फुरन्ती प्रतिभाति मे । स्फुरन्ती रावणस्याङ्के वैदेहीव तपस्विनी १२ इमास्ता मन्मथवतां हिताः प्रतिहता दिशः । अनुलिप्ता इव घनैर्नष्टग्रहनिशाकराः १३ क्वचिद्बाष्पाभिसंरुद्धान्वर्षागमसमुत्सुकान् । कुटजान्पश्य सौमित्रे पुष्पितान्गिरिसानुषु । मम शोकाभिभूतस्य कामसंदीपनान्स्थितान् १४ रजः प्रशान्तं सहिमोद्य वायुर्निदाघदोषप्रसराः प्रशान्ताः । स्थिता हि यात्रा वसुधाधिपानां प्रवासिनो यान्ति नराः स्वदेशान् १५ संप्रस्थिता मानसवासलुब्धाः प्रियान्विताः संप्रति चक्रवाकाः । अभीक्ष्णवर्षोदकविक्षतेषु यानानि मार्गेषु न संपतन्ति १६ क्वचित्प्रकाशं क्वचिदप्रकाशं नभः प्रकीर्णाम्बुधरं विभाति । क्वचित्क्वचित्पर्वतसंनिरुद्धं रूपं यथा शान्तमहार्णवस्य १७ व्यामिश्रितं

---

होत आहे ९. मेघरूप कृष्णाजिन आणि पर्जन्यधारारूप यज्ञोपवीत धारण करणारे हे पर्वत वायुप्रपूरित गुहांनीं युक्त झाल्यामुळें अध्ययन सुरू केलेल्या विद्यार्थ्यांप्रमाणें भासत आहेत १०. पीतवर्ण विद्युल्लतांनीं ताडित झालेलें हें आकाश अंतर्गत मेघगर्जनारूप ध्वनीनें युक्त झाल्यामुळें, सोन्याच्या चाबुकांनीं ताडित झाल्याकारणानें अंतस्थ वेदना सोशीत असलेल्या उत्कृष्ट अश्वाप्रमाणें भासत आहे ११. नील मेघाचा आश्रय करून स्फुरण पावणारी ही विद्युल्लता रावणाच्या अंकावर तडफड करणाऱ्या बिचाऱ्या सीतेप्रमाणें मला भासत आहे १२. कामशांतिसाधनरूप स्त्रियांनीं युक्त असलेल्या पुरुषांना सुखकर होणाऱ्या ह्या धुंद झालेल्या दिशा मेघांनीं व्याप्त झाल्या असल्यामुळें त्यांतील ग्रह व चंद्र हे दिसेनासे झाले आहेत १३. हे लक्ष्मणा, जमिनींतून निघणाऱ्या वाफांनीं व्याप्त, प्रफुल्लित, पर्जन्यकाल प्राप्त झाल्यामुळें आनंदित आणि मज शोकग्रस्ताचे ठिकाणीं कामोद्दीपन करणारे कुटजवृक्ष कोठें कोठें पर्वतशिखरावर असलेले तूं अवलोकन कर १४. सांप्रत वातावरणांतील धूळ नाहींशी झाली आहे, वायु शीतल झाला आहे ग्रीष्मऋतूंतील उष्णताप्रभृति दोषांचा प्रसार नाहींसा झाला आहे, राजांच्या स्वाऱ्या बंद झाल्या आहेत, प्रवासी लोक स्वदेशास जात आहेत १५, मानससरोवरावर वास्तव्य करण्याविषयीं उत्सुक असलेले व भार्यांनीं युक्त झालेलें चक्रवाक पक्षी सांप्रत मानससरोवराकडे निघाले आहेत व एकसारख्या पर्जन्याच्या उदकानें बिघडून गेलेल्या मार्गावरून रथादि यानें चालेनाशीं झालीं आहेत १६. शांत झालेल्या महासागराचें रूप ज्याप्रमाणें कोठें कोठें पर्वतांनीं व्याप्त झालेलें दिसतें त्याचप्रमाणें ज्यांत इकडे तिकडे मेघ पसरले आहेत असें हें आकाश कोठें उज्ज्वल आणि कोठें प्रकाशरहित

सर्जकदम्बपुष्पैर्नवं जलं पर्वतधातुताम्रम् । मयूरकेकाभिरनुप्रयातं शैलापगाः शीघ्रतरं वहन्ति १८ रसाकुलं षट्पदसंनिकाशं प्रभुज्यते जम्बुफलं प्रकामम् । अनेकवर्णं पवनावधूतं भूमौ पतत्याम्रफलं विपक्वम् १९ विद्युत्पताकाः सबलाकमालाः शैलेन्द्रकूटाकृतिसंनिकाशाः । गर्जन्ति मेघाः समुदीर्णनादा मत्ता गजेन्द्रा इव संयुगस्थाः २० वर्षोदकाप्यायितशाद्वलानि प्रवृत्तनृत्तोत्सवबर्हिणानि । वनानि निर्वृष्टबलाहकानि पश्यापराह्णेष्वधिकं विभान्ति २१ समुद्वहन्तः सलिलातिभारं बलाकिनो वारिधरा नदन्तः । महत्सु शृङ्गेषु महीधराणां विश्रम्य विश्रम्य पुनः प्रयान्ति २२ मेघाभिकामा परिसंपतन्ती संमोदिता भाति बलाकपङ्क्तिः । वातावधूता वरपौण्डरीकी लम्बेव माला रुचिराम्बरस्य २३ बालेन्द्रगोपान्तरचित्रितेन विभाति भूमिर्नवशाद्वलेन । गात्रानुपृक्तेन शुकप्रभेण नारीव लाक्षोक्षितकम्बलेन २४ निद्रा शनैः केशवमभ्युपैति द्रुतं नदी सागरमभ्युपैति ।

---

दिसत आहे १७. शाल व कदंब ह्यांच्या पुष्पांनीं मिश्रित व पर्वतावरील धातूंच्या योगानें ताम्रवर्ण असें नवीन उदक पर्वतावरील नद्या फारच सत्वर वाहून नेत आहेत आणि त्या शीघ्र जाणाऱ्या उदकाबरोबरच मयूरपक्ष्यांचा ध्वनि लांब जात आहे १८. भ्रमराप्रमाणें कृष्णवर्ण झालेलीं जांभळें वनचर यथेष्ट खात आहेत आणि नानाप्रकारच्या वर्णांनीं युक्त झालेलीं परिपक्व आम्रफळें वाऱ्याचा धक्का लागतांक्षणीं भूमीवर पडत आहेत १९. विद्युल्लतारूप पताकांनीं व बगळ्यांच्या रांकांनीं युक्त असून महापर्वताच्या शिखरांप्रमाणें दिसत असलेले मेघ समरांगणामध्यें स्थित असलेल्या मत्त गजेंद्राप्रमाणें उच्चस्वरानें गर्जना करीत आहेत २०. पर्जन्याच्या उदकामुळें ज्यांतील तृण वृद्धिंगत झालें आहे, ज्यांच्यांतील मयूर पक्षी नृत्यरूप उत्साह करण्यास प्रवृत्त झाले आहेत आणि ज्यांमध्यें मेघांनीं अतिशय वृष्टि केलेली आहे अशीं अपराह्णकालीं फारच शोभूं लागणारीं वनें अवलोकन कर. २१. बगळ्यांनीं युक्त, गर्जना करणारे व उदकाचें प्रचंड ओझें वाहून नेणारे मेघ पर्वतांच्या मोठमोठ्या शिखरांवर, वारंवार विश्रांति घेत घेत जात आहेत २२. गर्भधारणेकरितां मेघांची इच्छा धरून आकाशामध्यें संचार करणारी आणि ह्मणूनच आनंदित झालेली ही बगळ्यांची माळका मनोहर आकाशाला घातलेली व वायूनें हलत असलेली श्वेत कमलांची दीर्घ माळाच कीं काय अशी भासत आहे २३. लहान लहान इंद्रगोपसंज्ञक कीटकांनीं मधून मधून चित्रविचित्र झालेल्या हिरव्यागार गवतानें युक्त झालेली भूमि लाक्षाबिंदुयुक्त अशी पोपटी रंगाची

हृष्टा बलाका घनमभ्युपैति कान्ता सकामा प्रियमभ्युपैति २५ जाता वनान्ताः शिखिसुप्रनृत्ता जाताः कदम्बाः सकदम्बशाखाः । जाता वृषा गोषु समानकामा जाता मही सस्यवनाभिरामा २६ वहन्ति वर्षन्ति नदन्ति भान्ति ध्यायन्ति नृत्यन्ति समाश्वसन्ति । नद्यो घना मत्तगजा वनान्ताः प्रियाविहीनाः शिखिनः प्लवंगमाः २७ प्रहर्षिताः केतकिपुष्पगन्धमाघ्राय मत्ता वननिर्झरेषु । प्रपातशब्दाकुलिता गजेन्द्राः सार्धं मयूरैः समदा नदन्ति २८ धारानिपातैरभिहन्यमानाः कदम्बशाखासु विलम्बमानाः । क्षणार्जितं पुष्परसावगाढं शनैर्मदं षट्चरणास्त्यजन्ति २९ अङ्गारचूर्णोत्करसंनिकाशैः फलैः सुपर्याप्तरसैः समृद्धैः । जम्बूद्रुमाणां प्रविभान्ति शाखा निपीयमाना इव षट्पदौघैः ३० तडित्पताकाभिरलंकृतानामुदीर्णगम्भीरमहारवाणाम् । विभान्ति रूपाणि बलाहकानां रणोत्सुकाना-

---

शालजोडी अंगासरशी पांघरून बसलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत आहे २४. निद्रा हळू हळू केशवाकडे जात आहे, नदी सागराकडे सत्वर चालली आहे, आनंदित झालेली बगळ्यांची रांग मेघाकडे निघाली आहे आणि कामवासना उत्पन्न झालेली स्त्री आपल्या प्रियाकडे गमन करीत आहे २५. वनप्रदेशामध्यें मयूरपक्ष्यांचीं नृत्यें सुरू झालीं आहेत. कदंबवृक्ष प्रफुल्लित शाखांनीं युक्त झालेले आहेत. कामवासना उत्पन्न झालेल्या गाईंविषयीं बैलहि त्यांच्याचसारिखे सकाम झाले आहेत आणि पिकांमुळें व वनांमुळें भूमि मनोहर बनली आहे २६. नद्या वाहूं लागल्या आहेत, मेघांनीं वर्षाव सुरू केला आहे, मत्तगजांनीं गर्जना करण्यास सुरवात केली आहे, वनप्रदेशामध्यें शोभा येत चालली आहे, प्रिय स्त्रियांचा वियोग झालेले पति चिंताक्रांत होऊं लागले आहेत, मयूरपक्षी नृत्य करण्यास प्रवृत्त झाले आहेत आणि (सुग्रीवाला राज्य प्राप्त झाल्याकारणानें ) वानरांनाही धीर येऊं लागला आहे २७. केतकीपुष्पांचा वास घेऊन आनंदित झालेले आणि धबधब्याच्या ध्वनींनीं गोंधळून गेलेले मोठे मोठे मत्त गज मयूरपक्ष्यांसहवर्तमान वनांतील जलप्रवाहामध्यें गर्जना करीत आहेत २८. जलधारांनीं ताडित होत असलेल्या व कदंबवृक्षांच्या शाखांवर लोंबत असलेल्या भृंगांचा उत्साहामुळें प्राप्त व पुष्परसाच्या आस्वादानें वृद्धिंगत झालेला मद हळूं हळूं कमी होत आहे २९. कृष्णवर्ण राखेच्या पुंजक्यांप्रमाणें दिसत असलेलीं आणि रसानें भरलेलीं टपोरीं फळें जंबुवृक्षांच्या शाखांना लटकलेलीं आहेत आणि त्यामुळें शाखांतील रस शोषून घेण्याकरितां भृंगसमुदायच ठिकठिकाणीं त्यांना लगटून राहिलेले आहेत असें दिसत आहे ३०. विद्युल्लतारूप पताकांनीं विभूषित आणि

मिव वानराणाम् ३१ मार्गानुगः शैलवनानुसारी संप्रस्थितो मेघरवं निशम्य । युद्धाभिकामः प्रतिनादशङ्की मत्तो गजेन्द्रः प्रतिसंनिवृत्तः ३२ क्वचित्प्रगीता इव षट्पदौघैः क्वचित्प्रनृत्ता इव नीलकण्ठैः । क्वचित्प्रमत्ता इव वारणेन्द्रैर्विभान्त्यनेकाश्रयिणो वनान्ताः ३३ कदम्बसर्जार्जुनकन्दलाढ्या वनान्तभूमिर्मधुवारिपूर्णा । मयूरमत्ताभिरुतप्रनृत्तैरापानभूमिप्रतिमा विभाति ३४ मुक्तासमाभं सलिलं पतद्वै सुनिर्मलं पत्रपुटेषु लग्नम् । हृष्टा विवर्णच्छदना विहंगाः सुरेन्द्रदत्तं तृषिताः पिबन्ति ३५ षट्पादतन्त्रीमधुराभिधानं प्लवंगमोदीरितकण्ठतालम् । आविष्कृतं मेघमृदङ्गनादैर्वनेषु संगीतमिव प्रवृत्तम् ३६ क्वचित्प्रनृत्तैः क्वचिदुन्नदद्भिः क्वचिच्च वृक्षाग्रनिषण्णकायैः । व्यालम्बबर्हाभरणैर्मयूरैर्वनेषु संगीतमिवप्रवृत्तम् ३७

---

मोठ्या गंभीर गर्जनेनें युक्त असलेल्या मेघांच्या मुद्रा युद्धाला उत्सुक झालेल्या वानरांच्या मुद्रांप्रमाणें दिसत आहेत ३१. पर्वतावरील वनामध्यें संचार करणारा मत्त गजेंद्र आपल्या मार्गानें जात असतांना मेघगर्जना कानावर आल्यामुळें कोणीं प्रतिपक्षी गजानेंच गर्जना केली आहे अशी शंका येऊन त्याच्याशीं युद्ध करण्याकरितां परत फिरला आहे ३२. भृंगसमुदायांच्या योगानें कोठें कोठें गायनयुक्त, मयूरपक्ष्यांच्या योगानें कोठें कोठें जसें कांहीं नृत्य करण्यास प्रवृत्त आणि गजेंद्रांच्या योगानें कोठें कोठें जसे कांहीं मत्त झालेले वनप्रदेश गायन, नृत्य इत्यादि अनेक कलांनीं युक्त असल्यासारिखे दिसत आहेत ३३. कळंब, शाल, अर्जुन आणि स्थलकमल ह्यांच्या पुष्पांनीं समृद्ध झालेली व मधुतुल्य जलानें परिपूर्ण झालेली ही वनभूमि मयूरपक्ष्यांच्या मत्तावस्थेंतील गर्जना आणि नृत्यें ह्यांच्या योगानें पानभूमीप्रमाणें भासत आहे ( कारण, पानभूमीवरही पुष्पांचा सडा, मद्याची समृद्धि, मत्तजनांचा शब्द आणि नृत्य इतक्या गोष्टी होत असतात. ) ३४. पर्जन्यवृष्टीमुळें पत्यांच्या रंगांत फेरबदल झालेले तृषाक्रांत पक्षी, पडतां पडतां वृक्षांच्या पानांवर चिकटून राहिलेलें आणि मोत्यांप्रमाणें दिसत असलेलें अत्यंत निर्मल असें इंद्रदत्त जल आनंदित होऊन पीत असतात ३५. वनामध्यें गायन सुरू झाल्यासारिखें दिसत आहे. कारण, भृंग गुंजारव करीत असल्यामुळें तंतुवाद्यांच्या मधुर ध्वनीचा भास होत आहे. बेडूक शब्द करीत असल्यामुळें कोणी गवईच आपल्या कंठांतून तालसूर काढीत असल्यासारिखें भासत आहे आणि मेघांची गर्जना चालू असल्यामुळें मृदंगवादनच सुरू असल्याचा भास होत आहे ३६. मस्तकावरील तुरा व पिसारा ह्या भूषणांनीं युक्त असलेले मयूरपक्षी कोठें कोठें नृत्य करीत असल्यामुळें, कोठें कोठें उच्चस्वरानें गर्जना करीत असल्या-

स्वनैर्घनानां प्लवगाः प्रबुद्धा विहाय निद्रां चिरसंनिरुद्धाम्। अनेक-
रूपाकृतिवर्णनादा नवाम्बुधाराभिहता नदन्ति ३८ नद्यः समुद्वाहितचक्र-
वाकास्तटानि शीर्णान्यपवाहयित्वा। दृप्ता नवप्रावृतपूर्णभोगा द्रुतं स्वभर्ता-
रमुपोपयान्ति ३९ नीलेषु नीला नववारिपूर्णा मेघेषु मेघाः प्रतिभान्ति
सक्ताः। दवाग्निदग्धेषु दवाग्निदग्धाः शैलेषु शैला इव बद्धमूलाः ४०
प्रमत्तसंनादितबर्हिणानि सशक्रगोपाकुलशाद्वलानि। चरन्ति नीपार्जुन-
वासितानि गजाः सुरम्याणि वनान्तराणि ४१ नवाम्बुधाराहतकेसराणि
ध्रुवं परिष्वज्य सरोरुहाणि। कदम्बपुष्पाणि सकेसराणि नवानि हृष्टा
भ्रमराः पिबन्ति ४२ मत्ता गजेन्द्रा मुदिता गवेन्द्रा वनेषु विक्रान्ततरा
मृगेन्द्राः। रम्या धरेन्द्रा निभृता नरेन्द्राः प्रक्रीडितो वारिधरैः सुरेन्द्रः ४३

---

मुळें आणि कोठें कोठें ( प्रेक्षक ह्मणूनच कीं काय ) वृक्षांवर बसले असल्यामुळें वनामध्यें संगीतच सुरू झाल्यासारिखें दिसत आहे ३७. नानाप्रकारचे आकार, वर्ण व ध्वनि ह्यांनीं युक्त असलेले बेडूक मेघांच्या ध्वनींमुळें फार वेळपर्यंत प्राप्त झालेल्या निद्रेचा त्याग करून जागे झाले आहेत आणि नवीन उदकांच्या धारांनीं ताडित झाल्यामुळें गर्जना करीत आहेत ३८. मदमत्त झालेल्या नदीरूप कामातुर स्त्रिया आपले चक्रवाकरूप स्तन उन्नत करून आणि भर्त्याकडे जाण्याला आडकाठी आणणाऱ्या तटरूप वृद्ध स्त्रियांना लोटून देऊन विषयाचा उपभोग परिपूर्ण घेतां यावा एतदर्थ,पुष्पादि नवीन शेले पांघरून मोठ्या उत्सुकतेनें आपल्या समुद्ररूप भर्त्याकडे जात आहेत ३९. दावाग्नीनें दग्ध झालेल्या पर्वताचे ठिकाणीं दावाग्नीनें दग्ध झालेले पर्वत चिकटून राहिले असतां ते जसे मुळें खोल गेल्यामुळें उभे असल्यासारिखे दिसतील तसे नीलमेघांचे ठिकाणीं आसक्त झालेले व नूतन जलानें परिपूर्ण असलेले हे नीलमेघ मुळें धरून राहिल्यासारिखे दिसत आहेत ४० मदमत्त झालेले मयूरपक्षी ज्यांमध्यें गर्जना करीत आहेत, इंद्रगोपसंज्ञक कीटकांच्या योगानें ज्यांतील हिरवें चार गवत भरून गेलेलें आहे आणि कदंब व अर्जुन ह्या वृक्षांच्या पुष्पांनीं जीं सुवासिक झालेलीं आहेत अशा त्या अत्यंत रमणीय वनांमध्यें गज संचार करीत आहेत ४१. पर्जन्याच्या धारांमुळें ज्यांतील पराग झडून गेले आहेत अशा कमलपुष्पांना घट्ट धरून आनंदित झालेले भ्रमर परागयुक्त नूतन कदंबपुष्पांतील मकरंदाचें पान करीत आहेत ४२. वनामध्यें जिकडे तिकडे गजेंद्र मत्त झालेले आहेत, मोठमोठे वृषभ आनंदित झालेले आहेत, सिंह आपला पराक्रम जास्त जास्तच गाजवूं लागले आहेत, मोठे मोठे पर्वत रमणीय दिसूं लागले आहेत, राजे लोक उद्योग सोडून स्वस्थ बसले आहेत आणि देवराज इंद्र मेघांच्या योगानें क्रीडा

मेघाः समुद्भूतसमुद्रनादा महाजलौघैर्गगनावलम्बाः । नदीस्तटाकानि सरांसि वापीर्महीं च कृत्स्नामपवाहयन्ति ४४ वर्षप्रवेगा विपुलाः पतन्ति प्रवान्ति वाताः समुदीर्णवेगाः । प्रनष्टकूलाः प्रवहन्ति शीघ्रं नद्यो जलं विप्रतिपन्नमार्गाः ४५ नरैर्नरेन्द्रा इव पर्वतेन्द्राः सुरेन्द्रनीतैः पवनोपनीतैः । घनाम्बुकुम्भैरभिषिच्यमाना रूपं श्रियं स्वामिव दर्शयन्ति ४६ घनोपगूढं गगनं न तारा न भास्करो दर्शनमभ्युपैति । नवैर्जलौघैर्धरणी वितृप्ता तमोविलिप्ता न दिशः प्रकाशाः ४७ महान्ति कूटानि महीधराणां धाराविधौतान्यधिकं विभान्ति । महाप्रमाणैर्विपुलैः प्रपातैर्मुक्ताकलापैरिव लम्बमानैः ४८ शैलोपलप्रस्खलमानवेगाः शैलोत्तमानां विपुलाः प्रपाताः । गुहासु संनादितबर्हिणासु हारा विकीर्यन्त इवावभान्ति ४९ शीघ्रं प्रवेगा विपुलाः प्रपाता निर्धौतशृङ्गोपतला गिरीणाम् । मुक्ताकलाप

---

करीत बसला आहे ४३. समुद्राच्या गर्जनेलाही ज्यांनीं मागें टाकिलें आहे असे गगनाचा आश्रय करून राहिलेले मेघ आपल्या प्रचंड जलप्रवाहांच्या योगानें नद्या, तडाग, सरोवरें, वापी आणि ही संपूर्ण पृथ्वी जलानें परिपूर्ण करून टाकीत आहेत ४४. उदकवर्षाव अतिशय होत आहे, वायु फारच सोंसाट्यानें वाहत आहेत आणि नद्यांचीं तीरें ढासळून जाऊन त्यांचें उदक वेगानें वाहूं लागलें आहे व त्या नद्यांनीं लोकांचे मार्ग बंद पाडिले आहेत ४५. लोक राजांना अभिषेक करूं लागले असतां ज्याप्रमाणें ते राजे आपलें निर्मल रूप व सौंदर्य प्रकट करितात त्याप्रमाणें देवराजानें दिलेल्या व वायूनें जवळ आणिलेल्या अशा मेघोदकपरिपूर्ण कलशांच्या योगानें अभिषिक्त होत असलेले महापर्वत जसें कांहीं आपलें निर्मल स्वरूप व सौंदर्य प्रकट करीत आहेत ४६. आकाश मेघांनीं व्याप्त झालें असल्यामुळें नक्षत्रें व सूर्य हे दिसेनासे झाले आहेत, नूतन जलप्रवाहांनीं भूमि भरून गेली आहे आणि दिशा अंधकारानें व्याप्त झाल्यामुळें प्रकाशरहित झाल्या आहेत ४७. जलधारांच्या योगानें धुपून गेलेलीं पर्वतांचीं प्रचंड शिखरें–उंचवट्यावरून पडत असल्यामुळें लोंबणाऱ्या मोत्यांच्या सरांप्रमाणें दिसणाऱ्या मोठमोठ्या असंख्य धबधब्यांच्या योगानें फारच शोभूं लागलीं आहेत ४८. पर्वतावरील पाषाणांमुळें ठिकठिकाणीं ज्यांच्या वेगाला अडथळा होत आहे असे अनेक धबधबे गर्जना करणाऱ्या मयूरपक्ष्यांनीं युक्त असलेल्या उत्कृष्ट पर्वतांच्या गुहांमध्यें जसे कांहीं तुटून पडत असलेल्या हारांप्रमाणें दिसत आहेत ४९. पर्वतशिखरांवरील प्रदेश ज्यांनीं धुवून काढिले आहेत अशा सत्वर वाहणाऱ्या व मोत्यांच्या हारांप्रमाणें दिसणाऱ्या पर्वतावरील असंख्य धबधब्यांना पडतां

प्रतिमाः पतन्तो महागुहोत्सङ्गतलैर्भ्रियन्ते ५० सुरतामर्दविच्छिन्नाः स्वर्गस्त्रीहारमौक्तिकाः। पतन्ति चातुला दिक्षु तोयधाराः समन्ततः ५१ विलीयमानैर्विहगैर्निमीलद्भिश्च पङ्कजैः। विकसन्त्या च मालत्या गतोऽस्तं ज्ञायते रविः ५२ वृत्ता यात्रा नरेन्द्राणां सेना पथ्येव वर्तते। वैराणि चैव मार्गाश्च सलिलेन समीकृताः ५३ मासि प्रौष्ठपदे ब्रह्म ब्राह्मणानां विवक्षताम्। अयमध्यायसमयः सामगानामुपस्थितः ५४ निवृत्तकर्मायतनो नूनं संचितसंचयः। आषाढीमभ्युपगतो भरतः कोशलाधिपः ५५ नूनमापूर्यमाणायाः सरय्वा वर्धते रयः। मां समीक्ष्य समायान्तमयोध्याया इव स्वनः ५६ इमाः स्फीतगुणा वर्षाः सुग्रीवः सुखमश्नुते। विजितारिः सदारश्च राज्ये महति च स्थितः ५७ अहं तु हृतदारश्च राज्याच्च महतश्च्युतः। नदीकूलमिव क्लिन्नमवसीदामि लक्ष्मण ५८ शोकश्च मम विस्तीर्णो वर्षाश्च भृशदुर्गमाः। रावणश्च महाञ्छत्रुरपारः प्रतिभाति

---

पडतांच मोठमोठ्या गुहांतील उन्नत प्रदेश धारण करीत आहेत ५०. सर्व दिशेस आसमंताद्भागीं पडत असलेल्या अनुपम जलधारा स्वर्गनिवासी स्त्रियांच्या हारांतील रतियुद्धामध्यें तुटलेल्या आणि ह्मणूनच खालीं गळत असलेल्या मोत्यांप्रमाणें भासत आहेत ५१. पक्षी आपआपल्या घरट्यांत जाऊं लागले असल्यामुळें, सूर्यविकासी कमलें मिटूं लागल्यामुळें आणि मालती विकसित होऊं लागल्यामुळें सूर्य अस्ताचलास गेल्याचें अनुमान होत आहे ५२. राजांच्या स्वाऱ्या तहकूब झाल्या आहेत, सेना मार्गांतच तळ देऊन राहिली आहे आणि अंतःकरणांत धुमसत असलेलीं वैरें आणि मार्ग ह्यांना उदकांच्या योगानें एकसारिखाच अडथळा आलेला आहे ५३. भाद्रपदमहिना संनिध आल्यामुळें वेदाध्ययन करणाऱ्या सामवेदी ब्राह्मणांच्या श्रावणीचा हा काल जवळच आला आहे ५४. निवासस्थानाची शाकारणी वगैरे करून आणि वर्षाकालापुरती बेगमी करून ठेवून आषाढीपौर्णिमा लागल्यावर कोसलदेशाधिपति भरत खरोखर चातुर्मास्यसंबंधीं कांहीं तरी नेम करून बसला असेलच ५५. उदकाची भर पडत असल्यामुळें सरयू नदीचा वेग खरोखर येत असलेल्या मला पाहून अयोध्यावासी जनांच्या स्वराप्रमाणें वृद्धिंगत होत आहे ५६. शत्रूंना पादाक्रांत करून मोठ्या राज्यावर आरूढ झालेल्या सुग्रीवाला ह्या पावसाळ्यांत पीकपाणी चांगलें असल्यामुळें, पत्नीसहवर्तमान सुख होत असेल ५७. परंतु, हे लक्ष्मणा, स्त्रीचा अपहार झाल्यामुळें आणि मोठ्या राज्याला मुकावें लागलें असल्यामुळें माझी मात्र भिजून गेलेल्या नदीच्या तीराप्रमाणें दैना झाली

मे ५९ अयात्रां चैव दृष्ट्वेमां मार्गांश्च भृशदुर्गमान् । प्रणते चैव सुग्रीवे न मया किंचिदीरितम् ६० अपि चापिपरिक्लिष्टं चिराद्दारैः समागतम् । आत्मकार्यगरीयस्त्वाद्वक्तुं नेच्छामि वानरम् ६१ स्वयमेव हि विश्रम्य ज्ञात्वा कालमुपागतम् । उपकारं च सुग्रीवो वेत्स्यते नात्र संशयः ६२ तस्मात्कालप्रतीक्षोऽहं स्थितोऽस्मि शुभलक्षण । सुग्रीवस्य नदीनां च प्रसादमभिकाङ्क्षयन् ६३ उपकारेण वीरो हि प्रतीकारेण युज्यते । अकृतज्ञोऽप्रतिकृतो हन्ति सत्त्ववतां मनः ६४ अथैवमुक्तः प्रणिधाय लक्ष्मणः कृताञ्जलिस्तत्प्रतिपूज्य भाषितम् । उवाच रामं स्वभिरामदर्शनं प्रदर्शयन्दर्शनमात्मनः शुभम् ६५ यदुक्तमेतत्तव सर्वमीप्सितं नरेन्द्र कर्ता न चिराद्धरीश्वरः । शरत्प्रतीक्षः क्षमतामिदं भवाञ्जलप्रपातं रिपुनिग्रहे धृतः ६६ [ ११९३ ] इत्यार्षे श्रीमद्रा-

---

आहे ५८. माझा शोक तर पुष्कळ वृद्धिंगत झाला आहे, पर्जन्यकालाचे दिवस फारच असल्यामुळें ते पारपडणें फारच दुर्घट झालें आहे आणि प्रचंड शत्रु रावणही मला अजिंक्य भासत आहे ५९. सुग्रीव जरी नम्र होऊन माझ्या आज्ञेची वाट पहात होता तरी सांप्रत प्रवास बंद पडल्याचें पाहून आणि मार्गही अत्यंत दुर्गम झाल्याचें अवलोकन करून मीं त्याला ( सीतेचा शोध लावण्याच्या संबंधानें वगैरे ) कांहीं एक सांगितलें नाहीं ६०. शिवाय, माझें कार्य थोडक्या वेळांत न उरकण्यासारिखें मोठें असल्यामुळें अतिशय क्लेश सोसून पुष्कळ दिवसांनीं स्त्रीची गांठ पडलेल्या सुग्रीव वानराला काम सांगण्याचें मीं मनामध्यें आणिलें नाहीं ६१. ( पर्जन्यकाल संपेपर्यंत ) विश्रांति घेतल्यानंतर प्राप्त झालेला प्रवासकाल स्वतःच जाणून सुग्रीव माझा उपकार जाणील ह्यांत संशय नाहीं ६२. तस्मात्, हे शुभलक्षणसंपन्न लक्ष्मणा, सुग्रीवाचें मन स्वस्थ होऊन नद्यांचें जल निर्मल होण्याची इच्छा धरणारा मी प्रस्थानकालीचा वाट पहात राहिलों आहें ६३. कोणीं उपकार केला असतां वीर पुरुष त्याच्यावर प्रत्युपकार अवश्य करीतच असतो. कारण, दुसऱ्याचा उपकार झाला असतां जो कृतघ्न बनून त्याच्यावर प्रत्युकार करीत नाहीं त्याची उपकार करणाऱ्या सामर्थ्यवानाशीं मैत्री रहात नाहीं ६४. ह्याप्रमाणें रामांनीं लक्ष्मणाला सांगितलें असतां त्यांच्या भाषणाला मान देऊन व तें लक्ष्यांत आणून लक्ष्मणानें हात जोडिले आणि आपला सुविचार दर्शविण्याच्या उद्देशानें तो लक्ष्मण मनोहर स्वरूपानें युक्त असलेल्या रामचंद्रांना ह्मणाला ६५ " हे राजा, ह्या ह्मणण्याप्रमाणें आपला सर्व मनोरथ थोडक्याच दिवसांनीं वानरराज सुग्रीव सिद्धीस नेईल. ह्याकरितां शत्रूचा निग्रह करण्याचा निश्चय करून आपण शरदृतूची प्रतीक्षा करीत रहा आणि एवढा हा पर्जन्यकाल संपेपर्यंत धीर धरा ६६. " ह्याप्रमाणें

मायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

समीक्ष्य विमलं व्योम गतविद्युद्बलाहकम् । सारसाकुलसंघुष्टं रम्य-ज्योत्स्नानुलेपनम् १ समृद्धार्थं च सुग्रीवं मन्दधर्मार्थसंग्रहम् । अत्यर्थं चासतां मार्गमेकान्तगतमानसम् २ निवृत्तकार्यं सिद्धार्थं प्रमदाभिरतं सदा । प्राप्तवन्तमभिप्रेतान्सर्वानेव मनोरथान् ३ स्वां च पत्नीमभिप्रेतां तारां चापि समीप्सिताम् । विहरन्तमहोरात्रं कृतार्थं विगतज्वरम् ४ क्रीडन्तमिव देवेशं गन्धर्वाप्सरसां गणैः । मन्त्रिषु न्यस्तकार्यं च मन्त्रिणामनवेक्षकम् ५ उच्छिन्नराज्यसंदेहं कामवृत्तमिव स्थितम् । निश्चितार्थोऽर्थतत्त्वज्ञः कालधर्मविशेषवित् ६ प्रसाद्य वाक्यैर्विविधैर्हेतुमद्भिर्मनोरमैः । वाक्यविद्वाक्यतत्त्वज्ञं हरीशं मारुतात्मजः ७ हितं तथ्यं च पथ्यं

---

महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

ज्यांतील विद्युल्लता व मेघ नाहींसे झाले आहेत, जेथें सारसपक्ष्यांच्या समुदायांचा ध्वनि सुरू झाला आहे आणि रमणीय चंद्रिकेचा थर ज्यामध्यें बसून राहिलेला आहे असें निर्मल आकाश अवलोकन करून हनूमान् सुग्रीवाकडे गेला १. तेव्हां त्या सुग्रीवाचा मनोरथ परिपूर्ण झालेला होता, धर्म आणि अर्थ ह्यांचा संग्रह करण्याकडे त्याचें विशेषसें लक्ष्य नव्हतें, कामप्रवृत्तिरूप दुर्जनमार्गाचें अवलंबन तो अतिशयच करीत होता, विषयोपभोगाला योग्य अशा एकांत प्रदेशाचे ठिकाणीं त्याचें चित्त अगदीं वेधून गेलेलें होतें २, कार्यसिद्धि होऊन राज्यप्राप्तीचाही त्याचा उद्देश सिद्धीस गेलेला होता, इतकेंच नव्हे; परंतु, दुसरेही त्याचे सर्व इष्ट मनोरथ परिपूर्ण झालेले होते. तो सर्वदा तरुण स्त्रियांचेच ठिकाणीं रममाण होऊन राहिलेला होता ३, योग्य व इष्ट अशी स्वतःची स्त्री व तारा त्याला प्राप्त झालेली होती, कृतकृत्य झाल्यामुळें निश्चिंत होऊन तो अहोरात्र क्रीडा करण्यामध्येंच दंग झालेला होता ४ आणि ह्मणूनच गंधर्व व अप्सरा ह्यांच्या समुदायासहवर्तमान क्रीडा करीत असलेल्या देवराज इंद्राप्रमाणें तो भासत होता, मंत्र्यांवर त्यानें सर्व कामें सोंपविलेलीं होतीं, इतकेंच नव्हे; परंतु, मंत्र्यांची तो कधीं भेटही घेईनासा झाला होता ५ आणि राज्याविषयीं सर्व प्रकारची भीति नाहींशी झाली असल्यामुळें विषयलंपट पुरुषाप्रमाणें त्याची अवस्था झालेली होती. तेव्हां भाषणाचें सार जाणणाऱ्या वानरराज सुग्रीवाचें मन मुद्देसूत आणि मनोहर अशा नानाप्रकारच्या भाषणांनीं वळवून सर्व शास्त्रार्थांविषयीं निश्चय झालेला, कोणत्याही गोष्टीचें तत्त्व जाणणारा आणि कालाला अनुसरून असणारे

च सामधर्मार्थनीतिमत् । प्रणयप्रीतिसंयुक्तं विश्वासकृतनिश्चयम् ८ हरीश्वरमुपागम्य हनूमान्वाक्यमब्रवीत् ९ राज्यं प्राप्तं यशश्चैव कौली श्रीरभिवर्धिता । मित्राणां संग्रहः शेषस्तद्भवान्कर्तुमर्हति १० यो हि मित्रेषु कालज्ञः सततं साधु वर्तते । तस्य राज्यं च कीर्तिश्च प्रतापश्चापि वर्धते ११ यस्य कोशश्च दण्डश्च मित्राण्यात्मा च भूमिप । समान्येतानि सर्वाणि स राज्यं महदश्नुते १२ तद्भवान्वृत्तसंपन्नः स्थितः पथि निरत्यये । मित्रार्थमभिनीतार्थं यथावत्कर्तुमर्हति १३ संत्यज्य सर्वकर्माणि मित्रार्थे यो न वर्तते । संभ्रमाद्विकृतोत्साहः सोनर्थेनावरुध्यते १४ योहि कालव्यतीतेषु मित्रकार्येषु वर्तते । स कृत्वा महतोप्यर्थान्न मित्रार्थेन युज्यते १५ तदिदं मित्रकार्यं नः कालातीतमरिन्दम । क्रियतां राघवस्यैतद्वैदेह्याः परिमार्गणम् १६ न च कालमतीतं ते निवेदयति कालवित् ।

---

विशेष धर्म जाणणारा संभाषणज्ञ वायुपुत्र हनूमान् विनय आणि प्रेम ह्यांनीं संपन्न असून स्वतःचें वचन खरें करण्याविषयीं निश्चित असलेल्या वानरराज सुग्रीवाचेसमीप गेला आणि तात्काल व परिणामींही हितकारक, सत्य, साम, धर्म, अर्थ आणि नीति ह्यांनीं भरलेलें भाषण त्याच्याशीं करूं लागला ६,७,८,९. (तो ह्मणाला) " राज्य व यश प्राप्त झालें असून कुलपरंपरागत वैभवही आपण वाढविलें आहे. आतां फक्त मित्रांचा संग्रह उरलेला आहे; ह्यास्तव, तेवढें कार्य आपण सांप्रत करावें १०. जो प्रसंग जाणणारा पुरुष मित्राशीं नेहमीं चांगल्या रीतीनें वागतो त्याचें राज्य, कीर्ति व प्रताप ह्यांची अभिवृद्धि होत असते ११ आणि त्याचप्रमाणें, हे भूपाला, खाजिना, सैन्य, मित्र आणि मन हीं ज्याचीं एकसारखीं स्वाधीन असतात त्याला मोठें राज्य प्राप्त होत असतें १२. तस्मात्, ज्याअर्थी आपण सदाचार संपन्न असून निर्भय मार्गाचें अवलंबन करणारे आहांत त्याअर्थीं मित्राकरितां केलेली प्रतिज्ञा योग्य रीतीनें आतां आपण शेवटास न्यावी १३. कारण, सर्व कामें एका बाजूला ठेवून मित्रकार्याकरितां विशेष उत्साह धरून जो सत्वर झटत नाहीं तो संकटानें घेरून जात असतो १४. मित्रकार्याची वेळ निघून गेल्यावर जो ती सिद्धीस नेण्याकरितां झटतो त्याच्या हातून मोठमोठीं कार्यें झालीं असतांही मित्रकार्य सिद्धीस नेल्याचें फल त्याला प्राप्त होत नाहीं १५. ह्यास्तव, हे शत्रुदमना, हें आपलें मित्रकार्य करण्याची वेळ निघून जाणार आहे. तस्मात्, सीतेचा शोध लावणें हें राघवाचें कार्य आतां केलें पाहिजे १६. काळ—वेळ जाणणाऱ्या व तुझ्या स्वाधीन असलेल्या त्या रामचंद्राला जरी स्वतःचें काम सिद्धीस नेण्याची त्वरा आहे तरी तो

त्वरमाणोपि स प्राज्ञस्तव राजन्वशानुगः १७ कुलस्य हेतुः स्फीतस्य दीर्घबन्धुश्च राघवः। अप्रमेयप्रभावश्च स्वयं चाप्रतिमो गुणैः १८ तस्य त्वं कुरु वै कार्यं पूर्वं तेन कृतं तव। हरीश्वर कपिश्रेष्ठानाज्ञापयितुमर्हसि १९ न हि तावद्भवेत्कालो व्यतीतश्चोदनादृते। चोदितस्य हि कार्यस्य भवेत्कालव्यतिक्रमः २० अकर्तुरपि कार्यस्य भवान्कर्ता हरीश्वर। किं पुनः प्रतिकर्तुस्ते राज्येन च वधेन च २१ शक्तिमानतिविक्रान्तो वानरर्क्षगणेश्वर। कर्तुं दाशरथेः प्रीतिमाज्ञायां किं नु सज्जसे २२ कामं खलु शरैः शक्तः सुरासुरमहोरगान्। वशे दाशरथिः कर्तुं त्वत्प्रतिज्ञामवेक्षते २३ प्राणत्यागाविशङ्केन कृतं तेन महत्प्रियम्। तस्य मार्गाम वैदेहीं पृथिव्यामपि चाम्बरे २४ देवदानवगन्धर्वा असुराः समरुद्गणाः। न च यक्षा भयं

---

एकाद्याला ओळखून चालणारा असल्यामुळें कार्याचा समय निघून जात असल्याविषयीं सुग्रीवाला सूचना करणार नाहीं १७. रघुवंशज रामाचा प्रभाव अतुल असून तो स्वतःही गुणांनीं अप्रतिम आहे. इतकेंच नव्हे; परंतु, तुझा तर तो नेहमीं कायम रहाणारा बंधु असून तुझ्या मोठ्या कुलाच्या अभिवृद्धीला कारण होणारा आहे १८. शिवाय, त्यानें तुमचें कार्य आधींच केलेलें आहे. ह्यास्तव, त्याचें कार्य आपण आतां करा आणि, हे वानरराज, ( रामचंद्राची आज्ञा होण्याचेपूर्वी ) तें सिद्धीस नेण्याविषयीं श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांना आपण आज्ञा करा १९. कार्य करण्याविषयीं पुनरपि जोंपर्यंत सूचना झाली नाहीं तोंपर्यंत त्या कार्याची वेळ निघून गेली असें ह्मणतां येणार नाहीं; कार्य करण्याविषयीं फिरून सूचना झाली ह्मणजे मात्र कालातिक्रम होईल २०. हे वानरराज, अनुपकारी पुरुषाचेंही आपण कार्य करणारे आहांत, मग वालीचा वध करून आणि राज्य प्राप्त करून देऊन ज्यानें आपणावर उपकार केला त्याचें कार्य आपणाला केलेंच पाहिजे हें सांगण्याची काय बरें आवश्यकता आहे ? २१. हे वानरकुलाधीश, हे ऋक्षगणाधिपते, आपण शक्तिमान् असून अतिशय पराक्रमी आहांत; तेव्हां दशरथपुत्र रामाची प्रीति संपादण्याकरितां आपण त्याच्या आज्ञेची कां बरें वाट पहात आहांत? २२. खरोखर दशरथपुत्र रामचंद्र देव, दैत्य आणि महोरग ह्या सर्वांना बाणांच्या योगानें जिंकण्याला अगदीं समर्थ आहे; परंतु, तो फक्त आपली प्रतिज्ञा शेंवटास जाण्याची वाट पहात आहे २३. वालीच्या वधाविषयीं युक्तायुक्ततेची शंका मनामध्यें न आणिल्यानें त्यानें तुझा मोठा मनोरथ सिद्धीस नेला आहे; ह्याकरितां आपण त्याची भार्या विदेहराजकन्या सीता ही पृथ्वीमध्यें किंवा आकाशामध्यें जरी असली तरी शोधून काढूं २४. देव, दानव, गंधर्व, असुर, मरुद्गण आणि यक्ष हे ( सर्व मिळूनही )

तस्य कुर्युः किमिव राक्षसाः २५ तदेवं शक्तियुक्तस्य पूर्वं प्रतिकृतस्तथा । रामस्यार्हसि पिङ्गेश कर्तुं सर्वात्मना प्रियम् २६ नाधस्तादवनौ नाप्सु गतिर्नोपरि चाम्बरे । कस्यचित्सज्जतेस्माकं कपीश्वर तवाज्ञया २७ तदाज्ञापय कः किं ते कुतो वापि व्यवस्यतु । हरयो ह्यप्रधृष्यास्ते सन्ति कोट्यग्रतोनघ २८ तस्य तद्वचनं श्रुत्वा काले साधु निरूपितम् । सुग्रीवः सत्त्वसंपन्नश्चकार मतिमुत्तमाम् २९ संदिदेशातिमतिमान्नीलं नित्यकृतोद्यमम् । दिक्षु सर्वासु सर्वेषां सैन्यानामुपसंग्रहे ३० यथा सेना समग्रा मे यूथपालाश्च सर्वशः । समागच्छन्त्यसङ्गेन सेनाग्र्येण तथा कुरु ३१ ये त्वन्तपालाः प्लवगाः शीघ्रगा व्यवसायिनः । समानयन्तु ते शीघ्रं त्वरिताः शासनान्मम ॥ स्वयं चानन्तरं कार्यं भवानेवानुपश्यतु ३२ त्रिपञ्चरात्रादूर्ध्वं यः प्राप्नुयादिह वानरः । तस्य प्राणान्तिको दण्डो नात्र कार्या विचारणा ३३ हरींश्च वृद्धानुपयातु साङ्गदो भवान्ममाज्ञामधिकृत्य निश्चितम् । इति व्यवस्थां हरिपुङ्गवेश्वरो विधाय वेश्म प्रविवेश

---

त्याला भीति उत्पन्न करण्यास समर्थ नाहींत, मग राक्षसांची गोष्ट कशाला पाहिजे ? २५. तस्मात्, हे वानरराजा, पूर्वींच तुझ्यावर उपकार केलेल्या आणि ह्याप्रमाणें सामर्थ्यवान् असलेल्या रामाचें तुला अगदीं मनापासून प्रिय केलें पाहिजे २६. हे वानराधिपते, तुझा हुकूम झाला असतां तो बजाविण्याला आमच्यापैकीं ज्याच्या हातून विलंब होईल त्याला पाताल, पृथ्वी, जल आणि आकाश ह्यांमध्यें कोठेंही थारा मिळणार नाहीं २७. तस्मात् कोणीं कोठून तुझें काय करावें ह्याविषयीं तूं आज्ञा कर. हे निष्पापा, संख्येनें कोठ्यावधींपेक्षांही जास्त असे अजिंक्य वानर आज तुझ्या पदरीं आहेत " २८. हें कालाला उचित झालेलें त्याचें भाषण श्रवण करून सत्त्वगुणसंपन्न सुग्रीवानें मनामध्यें उत्कृष्ट विचार आणिला २९ आणि त्या अत्यंत विचारी सुग्रीवानें नेहमीं उद्योगशील असलेल्या नीलाला चोहोंकडील सर्व सेना जमविण्याविषयीं आज्ञा केली ३०. ( तो ह्मणाला )" माझ्या सर्व सेना आणि सर्व सेनापति विलंब न करितां मुख्य सेनाधिपतींसहवर्तमान येथें येतील अशी व्यवस्था कर ३१. सरहद्दीचें रक्षण करणारे जे कोणी उद्योगी व शीघ्रगामी वानर असतील तेही सत्वर माझ्या आज्ञेवरून येथें येवोत आणि नंतर काय करावयाचें ह्याची तजवीज तूं स्वतःच ठेव ३२. पंधरा दिवसांनंतर जो वानर येथें येईल त्याला प्राणांतिक दंड होईल ह्याविषयीं मुळींच संशय घेण्याचें कारण नाहीं ३३. निश्चयपूर्वक केलेल्या हा माझ्या आज्ञेला अनुसरून तूं अंगदासहवर्तमान वृद्ध वृद्ध वानरांकडे जा". अशी व्यवस्था करून तो वानरश्रेष्ठांचा

वीर्यवान् ३४ [ १२२७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

गृहं प्रविष्टे सुग्रीवे विमुक्ते गगने घनैः । वर्षरात्रे स्थितो रामः कामशोकाभिपीडितः १ पाण्डुरं गगनं दृष्ट्वा विमलं चन्द्रमण्डलम् । शारदीं रजनीं चैव दृष्ट्वा ज्योत्स्नानुलेपनाम् २ कामवृत्तं च सुग्रीवं नष्टां च जनकात्मजाम् । दृष्ट्वा कालमतीतं च मुमोह परमातुरः ३ स तु संज्ञामुपागम्य मुहूर्तान्मतिमान्नृपः । मनस्थामपि वैदेहीं चिन्तयामास राघवः ४ दृष्ट्वा च विमलं व्योम गतविद्युद्बलाहकम् । सारसारवसंघुष्टं विललापार्तया गिरा ५ आसीनः पर्वतस्याग्रे हेमधातुविभूषिते । शारदं गगनं दृष्ट्वा जगाम मनसा प्रियाम् ६ सारसारावसंनादैः सारसारावनादिनी । याश्रमे रमते बाला साद्य मे रमते कथम् ७ पुष्पितांश्चासनान्दृष्ट्वा काञ्चनानिव निर्मलान् । कथं सा रमते बाला पश्यन्ती मामपश्यती ८ या पुरा कलहंसानां कलेन कलभाषिणी । बुध्यते चारुसर्वाङ्गी साद्य मे

---

अधिपति वीर्यवान् सुग्रीव घरामध्यें गेला ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकुणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥२९॥

सुग्रीव घरांत शिरल्यावर आणि वर्षाकाल संपूर्ण झाल्यामुळें आकाश मेघनिर्मुक्त झाल्यावर इकडे पर्वतावर वास्तव्य करीत असलेला राम कामातुर व शोकाकुल झाला १. शुभ्रवर्ण आकाश, निर्मल चंद्रमंडल आणि चंद्रिकारूप अनुलेपन यांनीं युक्त असलेली शरदृतूंतील रात्र अवलोकन करून २ आणि त्याचप्रमाणें सुग्रीव स्वेच्छाचारी झाला आहे, जनककन्येचा पत्ता लागत नाहीं व सेना जमविण्याचीही वेळ जात चालली आहे हें लक्ष्यांत आणून त्या अत्यंत दुःखित झालेल्या रामाला कांहीं सुचेनासें झालें ३. नंतर क्षणाभरानें मन स्वस्थ झाल्यावर तो रघुवंशज भूपाल राम मनामध्यंच वास्तव्य करणाऱ्या सीतेविषयीं चिंता करूं लागला ४. विद्युल्लता व मेघ नाहींसे झाल्यामुळें निर्मल आणि सारसपक्ष्यांच्या ध्वनीनें नादित असें आकाश दृष्टीं पडतांक्षणीं आर्त वाणीनें तो विलाप करूं लागला ५. सुवर्णवर्ण धातूंनीं भूषित असलेल्या पर्वतशिखरावर तो बसला असतांना शरदृतूंतील निर्मल आकाशाकडे दृष्टि जाऊन त्याला प्रियेची आठवण झाली ( आणि तो ह्मणाला ) ६ " सारसपक्ष्याप्रमाणें शब्द करणारी जी माझी बाला सारसपक्ष्यांच्या नादामुळें आश्रमामध्यें रममाण होत असे तिचें चित्तरंजन आज कसें बरें होत असेल ! ७. कांचनपुष्पाप्रमाणें निर्मल असलेले प्रफुल्लित असनवृक्ष अवलोकन करून मी दृष्टीं पडत नसल्यामुळें त्या बालेच्या मनाला

रमते कथम् ९ निःस्वनं चक्रवाकानां निशम्य महचारिणाम् । पुण्डरीकविशालाक्षी कथमेषा भविष्यति १० सरांसि सरितो वापीः काननानि वनानि च । तां विना मृगशावाक्षीं चरन्नाद्य सुखं लभे ११ अपि तां मद्वियोगाच्च सौकुमार्याच्च भामिनीम् । सुदूरं पीडयत्कामः शरद्गुणनिरन्तरः १२ एवमादि नरश्रेष्ठो विललाप नृपात्मजः । विहंग इव सारङ्गः सलिलं त्रिदशेश्वरात् १३ ततश्चञ्चूर्यरम्येषु फलार्थी गिरिसानुषु । ददर्श पर्युपावृत्तो लक्ष्मीवांल्लक्ष्मणोग्रजम् १४ स चिन्तया दुःसहया परीतं विसंज्ञमेकं विजने मनस्वी । भ्रातुर्विषादात्त्वरितोतिदीनः समीक्ष्य सौमित्रिरुवाच दीनम् १५ किमार्य कामस्य वशंगतेन किमात्मपौरुष्यपराभवेन । अयं ह्रिया संह्रियते समाधिः किमत्र योगेन निवर्तते न १६ क्रियाभियोगं मनसः प्रसादं समाधियोगानुगतं च कालम् । सहायसामर्थ्यमदी-

---

कशी बरें करमणूक होत असेल ! ८. जी मधुर भाषण करणारी सर्वांगसुंदरी माझी प्रिया पूर्वी कलहंसांच्या शब्दानें जागी होत असे ती आज कशी बरें करमणूक करून घेत असेल ! ९. भार्येसहवर्तमान संचार करणाऱ्या चक्रवाकपक्ष्यांचा स्वर कानीं पडला असतां कमलांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या ह्या प्रियेची काय बरें अवस्था होईल ! १० हरिणबालकांसारिखे जिचे नेत्र आहेत अशा त्या प्रियेवांचून मला सरोवरें, नद्या, वापी, अरण्यें आणि वनें हिंडतां हिंडतां सांप्रत सुख होत नाहीं ११. शरदृतूंतील निर्मल आकाशप्रभृति गोष्टींमुळें एकसारिखा प्रवृत्त असलेला काम सुकुमारपणा आणि माझा वियोग ह्या दोन कारणांमुळें त्या माझ्या स्त्रीला अतिशयच पीडा देईल " १२. इंद्रापासून उदक प्राप्त होण्याची आशा धरून राहिलेला तृषाक्रांत चातकपक्षी ज्याप्रमाणें विलाप करीत रहातो त्याप्रमाणें तो राजकुमार पुरुषश्रेष्ठ राम अशा प्रकारचा विलाप करीत बसला १३. तदनंतर रमणीय पर्वतशिखरावर फलांकरितां हिंडून हिंडून वैभवशाली लक्ष्मण परत आला असतां ज्येष्ठ भ्रात्याकडे त्याची दृष्टि गेली १४ आणि भ्राता खेद करीत बसला आहे असें आढळून आल्यामुळें अतिदीन होऊन त्वरेचें अवलंबन केलेला तो सुमित्रापुत्र विचारी लक्ष्मण दुःसह चिंतेनें घेरल्यामुळें कांहीं एक सुचेनासें होऊन व दीन होऊन निर्जन प्रदेशामध्यें एकाकी बसलेल्या त्या रामाला अवलोकन करून ह्मणाला १५ " हे आर्य, कामाधीन झाल्यानें आणि त्यामुळें स्वतःचें पौरुष व्यर्थ झाल्यानें आपलें कोणतें कार्य सिद्धीस जाणार आहे ? शोकामुळें हें आपलें चित्तस्वास्थ्य नाहींसें होत आहे. अशा स्थितीमध्यें समाधीच्या योगानें कोणतेंही दुःख निवृत्त होणार नाहीं काय? १६.

नसत्त्वः स्वकर्महेतुं च कुरुष्व तात १७ न जानकी मानववंशनाथ त्वया सनाथा सुलभा परेण । न चाग्निचूडां ज्वलितामुपेत्य न दह्यते वीर वरार्ह कश्चित् १८ सलक्षणं लक्ष्मणमप्रधृष्यं स्वभावजं वाक्यमुवाच रामः । हितं च पथ्यं च नयप्रसक्तं ससाम धर्मार्थसमाहितं च १९ निःसंशयं कार्यमवेक्षितव्यं क्रियाविशेषोऽप्यनुवर्तितव्यः । न तु प्रवृद्धस्य दुरासदस्य कुमार वीर्यस्य फलं च चिन्त्यम् २० अथ पद्मपलाशाक्षीं मैथिलीमनुचिन्तयन् । उवाच लक्ष्मणं रामो मुखेन परिशुष्यता २१ तर्पयित्वा सहस्राक्षः सलिलेन वसुंधराम् । निर्वर्तयित्वा सस्यानि कृतकर्मा व्यवस्थितः २२ दीर्घगम्भीरनिर्घोषाः शैलद्रुमपुरोगमाः । विसृज्य सलिलं मेघाः परिशान्ता नृपात्मज २३ नीलोत्पलदलश्यामाः श्यामीकृत्वा दिशो दश । विमदा इव मातंगाः शान्तवेगाः पयोधराः २४ जलगर्भा महा-

---

कर्मानुष्ठान आणि मनाची प्रसन्नता ह्यांचें अवलंबन करून तूं आपला वेळ समाधियोगामध्येंच घालवीत जा आणि, हे रामा, धैर्य न सोडितां आपल्या पौरुषवृद्धीला कारण होणारें आणि मित्रलाभ करून देणारें जें स्वकर्म तें तूं करीत जा १७. हे मनुवंशाधिपते, तुझ्यामुळें सनाथ झालेली जानकी इतराला प्राप्त होणें सुलभ नाहीं. कारण, हे महामान्य वीरा, प्रज्वलित असलेल्या अग्नीच्या ज्वालेसमीप आल्यावर कोणी दग्ध होत नाहीं असें कधीं घडत नाहीं " १८. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां राजलक्षणांनीं युक्त असलेल्या त्या अजिंक्य लक्ष्मणाला राम ह्मणाले "तुझें हें भाषण तात्काल व परिणामींही हितावह, स्वाभाविक, राजनीतीनें युक्त आणि साम, धर्म आणि अर्थ ह्यांनाही धरून आहे १९. तस्मात्, तूं जें कर्तव्य सांगितलेंस तें तर निःसंशय केलेंच पाहिजे आणि कर्मयोगाचेंही अनुष्ठान केलें च पाहिजे. हे राजकुमारा, ( कर्म आणि ज्ञान ह्यांची पर्वा न करितां ) वृद्धिंगत आणि ह्मणूनच अत्यंत प्रबल झालेलें जें कर्म त्याच्या फलाची अपेक्षा धरितां उपयोगाची नाहीं २०. तदनंतर कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या मैथिलीचें पुनरपि स्मरण झालें असतां रामाचें मुख निस्तेज झालें आणि तो लक्ष्मणाला ह्मणाला २१ " उदकानें पृथ्वी तृप्त केल्यामुळें आणि धान्यें उत्पन्न केल्यामुळें इंद्र तर आपलें काम आटोपून बसला आहे २२. हे राजकुमारा, पर्वतसमुदाय आणि वृक्षगण ह्यांचें अवलंबन करणारे आणि दीर्घ व गंभीर घोषानें युक्त असलेले मेघ जलवृष्टि करून शांत झाले आहेत २३. नील कमलांच्या पाकळ्यांप्रमाणें श्यामवर्ण असलेले मेघ दश दिशा श्यामवर्ण करून मदरहित झालेल्या गजांप्रमाणें सांप्रत वेगरहित झालेले आहेत २४. हे विनयसंपन्न लक्ष्मणा, ज्यांच्या उद-

मेघाः कुटजार्जुनगन्धिनः । चरित्वा विरताः सौम्य वृष्टिवाताः समुद्यताः २५ घनानां वानराणां च मयूराणां च लक्ष्मण । नादः प्रस्रवणानां च प्रशान्तः सहसानघ २६ अभिवृष्टा महामेघैर्निर्मलाश्चित्रसानवः । अनुलिप्ता इवाभान्ति गिरयश्चन्द्ररश्मिभिः २७ शाखासु सप्तच्छदपादपानां प्रभासु तारार्कनिशाकराणाम् । लीलासु चैवोत्तमवारणानां श्रियं विभज्याद्य शरत्प्रवृत्ता २८ संप्रत्यनेकाश्रयचित्रशोभा लक्ष्मीः शरत्कालगुणोपपन्ना । सूर्याग्रहस्तप्रतिबोधितेषु पद्माकरेष्वभ्यधिकं विभाति २९ सप्तच्छदानां कुसुमोपगन्धी षट्पादवृन्दैरनुगीयमानः । मत्तद्विपानां पवनानुसारी दर्पं विनेष्यन्नधिकं विभाति ३० अभ्यागतैश्चारुविशालपक्षैः स्मरप्रियैः पद्मरजोविकीर्णैः । महानदीनां पुलिनोपयातैः क्रीडन्ति हंसाः सह चक्रवाकैः ३१ मदप्रगल्भेषु च वारणेषु गवां समूहेषु च दर्पितेषु । प्रसन्नतोयासु च निम्नगासु विभाति लक्ष्मीर्बहुधा विभक्ता ३२ नभः समी-

---

रांमध्यें उदक आहे असे मोठमोठे मेघ आणि कुडा व अर्जुनवृक्ष ह्यांच्या पुष्पगंधानें आणि वृष्टीनें युक्त झालेले वायु वर्षाकालीं प्रवृत्त झाले असतांही चोहोंकडे संचार करून सांप्रत स्वस्थ झाले आहेत २५. सारांश, हे निष्पापा लक्ष्मणा, मेघ, वानर, मयूर आणि जलप्रवाह ह्यांचा ध्वनि एकाएकीं बंद झाला आहे २६. अद्भुत शिखरांनीं युक्त असलेले पर्वत मोठमोठ्या मेघांची वृष्टि झाल्यामुळें निर्मल झाले असून चंद्रकिरणांनीं चोपडल्यासारिखे भासत आहेत २७. सप्तपर्णवृक्षांच्या शाखा, सूर्यचंद्र व तारा ह्यांच्या प्रभा आणि उत्कृष्ट गजांच्या लीला ह्यांचे ठिकाणीं सौंदर्य वांटून देऊन सांप्रत शरदृतु प्रवृत्त झाला आहे २८. अनेक पदार्थांच्या आश्रयाला रहाणारी जिची अद्भुत शोभा आहे अशीही सौंदर्यलक्ष्मी सांप्रत शरदृतूंतील गुणांनीं संपन्न असून सूर्याच्या पहिल्या किरणांनीं प्रफुल्लित झालेल्या सरोवरांचे ठिकाणीं अतिशय झळकत आहे २९. सप्तपर्णसंज्ञक वृक्षांच्या पुष्पांतील गंधानें युक्त आणि ह्मणूनच वायूचें अनुकरण करणारा हा शरदृतु गुंजारव करणाऱ्या भृंगांनीं युक्त झाल्यामुळें व मत्त गजांचा मद वृद्धिंगत करण्यास व जल शुष्क करण्यास उद्युक्त झाल्यामुळें शोभत आहे ३०. सुंदर व विशाल पक्षांनीं युक्त, मदनप्रिय, कमलपरागांनीं व्याप्त स्वतःबरोबर मानससरोवरापासून आलेल्या आणि महानद्यांच्या वाळवंटांवर जुळलेल्या चक्रवाकपक्ष्यांसहवर्तमान हंस क्रीडा करीत आहेत ३१. नानाप्रकारांनीं विभागून गेलेली सौंदर्यलक्ष्मी—मदामुळें गंभीर झालेले गज, मदमत्त झालेले गोसमुदा

---

१ सांत्वण

क्ष्याम्बुधरैर्विमुक्तं विमुक्तबर्हाभरणा वनेषु । प्रियास्वरक्ता विनिवृत्तशोभा गतोत्सवा ध्यानपरा मयूराः ३३ मनोज्ञगन्धैः प्रियकैरनल्पैः पुष्पाग्रभारावनताग्रशाखैः । सुवर्णगौरैर्नयनाभिरामैरुद्द्योतितानीव वनान्तराणि ३४ प्रियान्वितानां नलिनीप्रियाणां वनप्रियाणां कुसुमोद्गतानाम् । मदोत्कटानां मदलालसानां गजोत्तमानां गतयोद्य मन्दाः ३५ व्यक्तं नभः शस्त्रविधौतवर्णं कृशप्रवाहानि नदीजलानि । कह्लारशीताः पवनाः प्रवान्ति तमोविमुक्ताश्च दिशः प्रकाशाः ३६ सूर्यातपक्रामणनष्टपङ्का भूमिश्चिरोद्घाटितसान्द्ररेणुः । अन्योन्यवैरेण समायुतानामुद्योगकालोद्य नराधिपानाम् ३७ शरद्गुणाप्यायितरूपशोभाः प्रहर्षिताः पांसुसमुत्थिताङ्गाः । मदोत्कटाः संप्रति युद्धलुब्धा वृषा गवां मध्यगता नदन्ति ३८ समन्मथा तीव्रतरानुरागा कुलान्विता मन्दगतिः करेणूः । मदान्वितं

---

आणि निर्मल उदकानें युक्त झालेल्या नद्या—ह्यांचे ठिकाणीं झळकत आहे ३२. आकाश मेघनिर्मुक्त झालेलें अवलोकन करून पिच्छरूप भूषणाचा त्याग केल्यामुळें शोभारहित झालेले उत्साहशून्य मयूरपक्षी प्रियांविषयीं आसक्ति सोडून देऊन वनामध्यें ध्याननिष्ठ झालेले आहेत ३३. मनोहर गंध व सुवर्णासारिखा गौरवर्ण ह्यांनीं युक्त असल्यामुळें दृष्टीला रमणीय भासणाऱ्या आणि पुष्पभारांच्या योगानें नम्र अशा शाखांनीं युक्त झालेल्या मोठमोठ्या सालवृक्षांच्या योगानें वनें जशीं कांहीं प्रकाशित झालेलीं आहेत ३४. सरोवरें व वनें ज्यांना प्रिय आहेत असे प्रियांसहवर्तमान असलेले व पुष्पांचा सुवास घेण्यास प्रवृत्त झालेले हे श्रेष्ठ गज त्यांचा मद उत्कट झाल्यामुळें विषयवासनेनें युक्त झाले आहेत आणि ह्मणूनच सांप्रत त्यांच्या गति मंद झाल्या आहेत ३५. घासून लकलकीत केलेल्या शस्त्राप्रमाणें आकाशाचा वर्ण अगदीं निर्मल झालेला आहे, नद्यांच्या उदकांचे प्रवाह कमी झालेले आहेत, वायु कमलपुष्पांच्या योगानें थंडगार वाहूं लागले आहेत आणि दिशा अंधकारापासून मुक्त झाल्यामुळें स्वच्छ झाल्या आहेत ३६. सूर्याचें ऊन पडूं लागल्यामुळें भूमीवरील चिखल नाहींसा झाला असून पुष्कळ दिवसांनीं तिच्यावर घट्ट धूळ दृष्टीं पडत आहे आणि एकमेकांशीं वैर बांधून राहिलेल्या राजांच्या चळवळींचा काल सांप्रत प्राप्त झाला आहे ३७. शरदृतूंतील गुणांमुळें ज्यांच्या स्वरूपाची शोभा वृद्धिंगत झाली आहे व ज्यांचीं शरीरें धुळीनें भरलीं आहेत असे मदमत्त झालेले युद्धलुब्ध बैल मोठ्या अनंदानें गाईंच्या मध्यें डरकण्या फोडीत आहेत ३८. कामवासना, अत्यंत प्रेम, मंदगति आणि स्वतःचा परिवार ह्यांनीं युक्त असलेली हत्तीण मदमत्त होऊन वनामध्यें चाललेल्या आपल्या

संपरिवार्य यान्तं वनेषु भर्तारमनुप्रयाति ३९ त्यक्त्वा वराण्यात्मविभूषितानि बर्हाणि तीरोपगता नदीनाम् । निर्भर्त्स्यमाना इव सारसौघैः प्रयान्ति दीना विमना मयूराः ४० वित्रास्य कारण्डवचक्रवाकान्महारवैर्भिन्नकटा गजेन्द्राः । सरःसु बुद्धाम्बुजभूषणेषु विक्षोभ्य विक्षोभ्य जलं पिबन्ति ४१ व्यपेतपङ्कासु सवालुकासु प्रसन्नतोयासु सगोकुलासु । ससारसारावविनादितासु नदीषु हंसा निपतन्ति हृष्टाः ४२ नदीघनप्रस्रवणोदकानामतिप्रवृद्धानिलबर्हिणानाम् । प्लवंगमानां च गतोत्सवानां ध्रुवं रवाः संप्रति संप्रनष्टाः ४३ अनेकवर्णाः सुविनष्टकाया नवोदितेष्वम्बुधरेषु नष्टाः । क्षुधार्दिता घोरविषा बिलेभ्यश्चिरोषिता विप्रसरन्ति सर्पाः ४४ चञ्चच्चन्द्रकरस्पर्शहर्षोन्मीलिततारका । अहो रागवती संध्या जहातु स्वयमम्बरम् ४५ रात्रिः शशाङ्कोदितसौम्यवक्त्रा तारागणोन्मीलितचारुनेत्रा । ज्योत्स्नांशुकप्रावरणा विभाति नारीव शुक्लांशुकसंवृताङ्गी ४६ विपक्क-

---

भर्त्याला वेढून टाकून त्याच्या मागोमाग चालली आहे ३९. नदीतीरावर असलेले मयूरपक्षी स्वतःचें भूषण असलेलीं उत्कृष्ट पिसें टाकून देऊन सारसपक्ष्यांच्या कळपाकडून निंदा होऊं लागल्यामुळेंच कीं काय मनामध्यें खिन्न व दीन होऊन जात आहेत ४०. ज्यांच्या गंडस्थलांतून मद चालला आहे असे मोठे मोठे गज आपल्या प्रचंड गर्जनांनीं कारंडव आणि चक्रवाकपक्ष्यांना त्रासवून सोडून विकसित कमलांनीं युक्त असलेल्या सरोवरामध्यें ढवळून ढवळून पाणी पीत आहेत ४१. वाळुका, निर्मल उदक, गाईंचे कळप आणि सारसपक्षी ह्यांनीं युक्त असून सारसपक्ष्यांच्या ध्वनीनें नादित व पंकरहित झालेल्या नद्यांकडे हंस आनंदित होऊन धांवत आहेत ४२. नदीजल, मेघोदक, ओढ्यांचें पाणी, प्रचंड वायु, मयूरपक्षी व आनंदरहित झालेले बेडूक ह्यांचे ध्वनि सांप्रत अगदीं पूर्णपणें नाहींसे झाले आहेत ४३. नवीन मेघ प्रकट होतांक्षणीं उपजीविकेचें साधन नाहींसें झाल्यामुळें मृतप्राय बनलेले व भयंकर विषानें युक्त असलेले रंगीबेरंगी सर्प पुष्कळ दिवसपर्यंत आंत राहिले असून आतां बिळांतून बाहेर पडूं लागले आहेत ४४. सुशोभित चंद्रकिरणांचा समुदाय हाच एक कोणी प्रियपतीचा हात व त्याचा स्पर्श झाल्यामुळें जिला हर्ष झालेला आहे आणि म्हणूनच नक्षत्ररूप नेत्रतारका जी किंचित् प्रकट करूं लागली आहे अशी ही रक्तवर्णरूप अनुरागानें युक्त असलेली संध्यारूप कामुक स्त्री आपोआपच आकाशरूप वस्त्राचा त्याग करीत आहे ४५. चंद्ररूप प्रसन्न व सौम्य मुखानें, तारागणरूप उघडलेल्या मनोहर नेत्रांनीं आणि चंद्रिकारूप वस्त्रानें युक्त असलेली रात्रि शुभ्रशेला पांघरलेल्या स्त्रीप्रमाणें

शालिप्रसवानि भुक्त्वा प्रहर्षिता सारसचारुपङ्क्तिः । नभः समाक्रामति शीघ्रवेगा वातावधूता ग्रथितेव माला ४७ सुप्तैकहंसं कुमुदैरुपेतं महाह्रदस्थं सलिलं विभाति । घनैर्विमुक्तं निशि पूर्णचन्द्रं तारागणाकीर्णमिवान्तरिक्षम् ४८ प्रकीर्णहंसाकुलमेखलानां प्रबुद्धपद्मोत्पलमालिनीनाम् । वाप्युत्तमानामधिकाद्य लक्ष्मीर्वराङ्गनानामिव भूषितानाम् ४९ वेणुस्वरव्यञ्जिततूर्यमिश्रः प्रत्यूषकालेनिलसंप्रवृत्तः । संमूर्च्छितो गह्वरगोवृषाणामन्योन्यमापूरयतीव शब्दः ५० नवैर्नदीनां कुसुमप्रहासैर्व्याधूयमानैर्मृदुमारुतेन । धौतामलक्षौमपटप्रकाशैः कूलानि काशैरुपशोभितानि ५१ वनप्रचण्डा मधुपानशौण्डाः प्रियान्विताः षट्चरणाः प्रहृष्टाः । वनेषु मत्ताः पवनानुयात्रां कुर्वन्ति पद्मासनरेणुगौराः ५२ जलं प्रसन्नं कुसुमप्रहासं क्रौञ्चस्वनं शालिवनं विपक्वम् । मृदुश्च वायुर्विमलश्च चन्द्रः शंसन्ति वर्षव्यपनीतकालम् ५३ मीनोपसंदर्शितमेखलानां नदीवधूनां गतयोऽद्य मन्दाः । कान्तो-

---

भासत आहे ४६. परिपक्व झालेलीं भाताचीं लोंबटीं खाऊन आनंदित झालेली सारसपक्ष्यांची मनोहर रांक वाऱ्यानें उडालेल्या पुष्पगुंफित मालेप्रमाणें मोठ्या वेगावेगानें आकाशामध्यें चालली आहे ४७. निद्रिस्थ हंसपक्ष्यांनीं व कमलांनीं युक्त असलेलें मोठ्या सरोवरांतील उदक रात्रीं पूर्णचन्द्रानें युक्त होऊन नक्षत्रगणांनीं व्याप्त झालेल्या मेघशून्य आकाशाप्रमाणें दिसत आहे ४८. उत्कृष्ट वापींची शोभा, भूषित झालेल्या उत्कृष्ट स्त्रियांप्रमाणें सांप्रत अधिकच भासत आहे. कारण, इकडे तिकडे असलेले हंसपक्षी हेच त्यांचे रत्नांनीं मजवजून गेलेले कमरपट्टे आहेत आणि विकसित कमलें हाच कमलपुष्पांच्या माला त्यांनीं धारण केलेल्या आहेत ४९. कीचकसंज्ञक वेणूंचा ध्वनि हाच एक कोणी स्पष्ट वाद्यघोष व त्याच्या योगानें मिश्र झालेले आणि प्रातःकाळीं वायूमुळें प्रवृत्त होऊन आसपासचा प्रदेश व्यापून राहिलेले पर्वतसंबंधीं गुहांचे व बैलांचे शब्द परस्परांना वृद्धिंगत करीत आहेत ५०. मंदवायूनें कंपित, नूतन व विकाररहित अशा पुष्पभरांनीं युक्त आणि धुवून स्वच्छ केलेल्या शालूप्रमाणें भासणाऱ्या काशसंज्ञक तृणांच्या योगानें नद्यांचीं तीरें सुशोभित झालीं आहेत ५१. मधुपान करण्यामध्यें निपुण आणि कमलपुष्पांतील व असनपुष्पांतील परागांमुळें पीतवर्ण झालेले वनांतील प्रचंड भृंग प्रियांनीं युक्त असल्यामुळें आनंदित व मत्त होऊन ( गंधलोभानें ) वाऱ्याच्या मागोमाग चालले आहेत ५२. स्वच्छ उदक, पुष्पविकासानें व क्रौंच पक्ष्यांचा ध्वनीनें युक्त होऊन परिपक्व दशेस आलेलें व्रीहींचें शेत, मंद वायु आणि निर्मल चंद्र हीं पर्जन्यरहित असा शरत्काल प्राप्त झाल्याचें सुचवीत आहेत ५३. प्रिय पतींनीं उपभोग घेतल्यामुळें आळसत

पभुक्तालसगामिनीनां प्रभातकालेष्विव कामिनीनाम् ५४ सचक्रवाकानि सशैवलानि काशैर्दुकूलैरिव संवृतानि । सपत्ररेखाणि सरोचनानि वधूमुखानीव नदीमुखानि ५५ प्रफुल्लबाणासनचित्रितेषु प्रहृष्टषट्पादनिकूजितेषु । गृहीतचापोद्यतदण्डचण्डः प्रचण्डचापोऽद्य वनेषु कामः ५६ लोकं सुवृष्ट्या परितोषयित्वा नदीस्तटाकानि च पूरयित्वा । निष्पन्नसस्यां वसुधां च कृत्वा त्यक्त्वा नभस्तोयधराः प्रनष्टाः ५७ दर्शयन्ति शरन्नद्यः पुलिनानि शनैः शनैः । नवसंगमसव्रीडा जघनानीव योषितः ५८ प्रसन्नसलिलाः सौम्य कुररामिविनादिताः । चक्रवाकगणाकीर्णा विभान्ति सलिलाशयाः ५९ अन्योन्यबद्धवैराणां जिगीषूणां नृपात्मज । उद्योगसमयः सौम्य पार्थिवानामुपस्थितः ६० इयं सा प्रथमा यात्रा पार्थिवानां नृपात्मज । न च पश्यामि सुग्रीवमुद्योगं च तथाविधम् ६१ असनाः

---

आळसत चालणाऱ्या कामिनी स्त्रियांचे वेग ज्याप्रमाणें प्रभातकालीं मंद झालेले असतात त्याप्रमाणें मत्स्यरूप कमरपट्टा दृष्टोत्पत्तीस आणूं लागलेल्या नदीरूप स्त्रियांचे वेग सांप्रत मंद झालेले आहेत ५४. चक्रवाकपक्षी व शेवाळें ह्यांनीं युक्त असून काशसंज्ञक तृणांनीं आच्छादित झालेलीं नद्यांचीं मुखें केशराचा वगैरे रंग लावून वर वेलबुटी काढिलेल्या आणि शेल्यांनीं आच्छादिलेल्या स्त्रियांच्या मुखांप्रमाणें दिसत आहेत ५५. प्रफुल्लित कोऱ्हांट्या आणि असाणे ह्यांच्या योगानें चित्रविचित्र होऊन आनंदित भृंगांच्या गुंजारवानें युक्त झालेल्या वनामध्यें कामानें प्रचंड धनुष्य धारण करून त्या धारण केलेल्या धनुष्याच्या योगानें सांप्रत विरही जनांना दंड करण्यास त्यानें आरंभ केला आहे ५६. योग्य वृष्टीनें लोक संतुष्ट, नद्यांचीं तीरें उदकानें परिपूर्ण आणि पृथ्वी धान्यानें युक्त केल्यावर मेघ आकाशाचा त्याग करून नाहींसे झाले आहेत ५७. पतीशीं नवीनच समागम होऊं लागल्याकारणानें लज्जायुक्त झालेल्या स्त्रिया ज्याप्रमाणें हलकें हलकें ( लाज कमी कमी होत चालल्यामुळें एकांतस्थलीं पतीला ) कटिप्रदेश दर्शवूं लागतात त्याप्रमाणें शरदृतूंतील नद्या हळूं हळूं आपलीं वाळवंटें दर्शवूं लागल्या आहेत ५८. हे विनयसंपन्न लक्ष्मणा, चक्रवाकपक्ष्याच्या समुदायांनीं व्याप्त आणि कुररपक्ष्यांनीं नादित होऊन निर्मल जलानें युक्त झालेले जलाशय रमणीय दिसत आहेत ५९. हे नम्र लक्ष्मणा, परस्परांशीं वैर बांधून एकमेकाला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या राजांची उद्योग करण्याची वेळ प्राप्त झाली आहे ६०. हे राजकुमारा, राजांच्या स्वारीचा हा समय प्राप्त झाला असून सुग्रीव माझ्या दृष्टीं पडत नाहीं आणि तशा प्रकारचा त्याचा कांहीं उद्योगही माझ्या आढळण्यांत येत नाहीं ६१.

सप्तपर्णाश्च कोविदाराश्च पुष्पिताः । दृश्यन्ते बन्धुजीवाश्च श्यामाश्च गिरि-
सानुषु ६२ हंससारसचक्राह्वैः कुररैश्च समन्ततः । पुलिनान्यवकीर्णानि
नदीनां पश्य लक्ष्मण ६३ चत्वारो वार्षिका मासा गता वर्षशतोपमाः ।
मम शोकाभितप्तस्य तथा सीतामपश्यतः ६४ चक्रवाकीव भर्तारं पृष्ठ-
तोनुगता वनम् । विषमं दण्डकारण्यमुद्यानमिव चाङ्गना ६५ प्रियावि-
हीने दुःखार्ते हृतराज्ये विवासिते । कृपां न कुरुते राजा सुग्रीवो मयि
लक्ष्मण ६६ अनाथो हृतराज्योयं रावणेन च धर्षितः । दीनो दूरगृहः
कामी मां चैव शरणं गतः ६७ इत्येतैः कारणैः सौम्य सुग्रीवस्य दुरा-
त्मनः । अहं वानरराजस्य परिभूतः परंतपः ६८ स कालं परिसंख्याय
सीतायाः परिमार्गणे । कृतार्थः समयं कृत्वा दुर्मतिर्नावबुध्यते ६९ स
किष्किन्धां प्रविश्य त्वं ब्रूहि वानरपुंगवम् । मूर्खं ग्राम्यसुखे सक्तं सुग्रीवं
वचनान्मम ७० अर्थिनामुपपन्नानां पूर्वं चाप्युपकारिणाम् । आशां संश्रुत्य

---

असाणे, सांत्वण, कांचन, दुपारी आणि तमाल हे पर्वतशिखरांवर प्रफुल्लित झालेले दिसत आहेत ६२. हंस, सारस, चक्रवाक आणि कुरर ह्या पक्ष्यांच्या योगानें सर्व बाजूंनीं गजबजून गेलेलीं नद्यांचीं वाळवंटें, हे लक्ष्मणा, तूं अवलोकन कर ६३. अरे, सीता दृष्टीआड झाल्यामुळें शोकाकुल झालेल्या मला पर्जन्यकालाचे हे गेलेले चार महिने शेंकडों वर्षांप्रमाणें झाले आहेत ६४. कारण, ती स्त्री दंडकारण्यसंज्ञक गहन वन उपवन आहे असें जाणून भर्त्याच्या मागोमाग जाणाऱ्या चक्रावकपक्षिणीप्रमाणें माझ्या मागोमाग आली होती ६५. हे लक्ष्मणा, राज्याचा अपहार होऊन अरण्यांत हांकून लाविलेल्या आणि त्यांतूनही प्रियेचा वियोग झाल्यामुळें दुःखाकुल झालेल्या माझ्यावर राजा सुग्रीव दया करीत नाहीं ६६. " राज्याचा अपहार झाल्यामुळें हा अनाथ झालेला आहे, रावणानें ह्याचा अपमान केलेला आहे, ह्याचें घर दूर राहिलें आहे आणि हा विषयवासनेनें ग्रस्त झाल्यामुळें दीन बनून मला शरण आला आहे " ६७. अशा प्रकारचीं कारणें दुरात्म्या वानरराज सुग्रीवाच्या मनांत येत असल्यामुळें मी शत्रूंना ताप देणारा असूनही माझी तो बेपर्वा करीत आहे ६८. अमुक अमुक दिवस लोटले म्हणजे सीतेचा शोध लावावयाचा अशा रीतीनें कालगणनापूर्वक सुग्रीवानें माझ्याशीं ठराव केला असूनही कृतकृत्य झाल्यामुळें आतां त्या दुष्टाला त्याची ओळख राहिलेली नाहीं ६९. ह्यास्तव, तूं किष्किंधानगरीमध्यें जा आणि विषयसुखाचें ठिकाणीं आसक्त झालेल्या त्या मूर्ख वानरश्रेष्ठ सुग्रीवाला माझ्या आज्ञेनें असें सांग ७०:—पूर्वी ज्यांनीं आपल्यावर उपकार केला आहे आणि नंतर कांहीं इच्छा

यो हन्ति स लोके पुरुषाधमः ७१ शुभं वा यदि वा पापं यो हि वाक्यमुदीरितम् । सत्येन परिगृह्णाति स वीरः पुरुषोत्तमः ७२ कृतार्था ह्यकृतार्थानां मित्राणां न भवन्ति ये । तान्मृतानपि क्रव्यादाः कृतघ्नान्नोपभुञ्जते ७३ नूनं काञ्चनपृष्ठस्य विकृष्टस्य मया रणे । द्रष्टुमिच्छसि चापस्य रूपं विद्युद्गणोपमम् ७४ घोरं ज्यातलनिर्घोषं क्रुद्धस्य मम संयुगे । निर्घोषमिव वज्रस्य पुनः संश्रोतुमिच्छसि ७५ काममेवंगतेऽप्यस्य परिज्ञाते पराक्रमे । त्वत्सहायस्य मे वीर न चिन्ता स्यान्नृपात्मज ७६ यदर्थमयमारम्भः कृतः परपुरंजय । समयं नाभिजानाति कृतार्थः प्लवगेश्वरः ७७ वर्षाः समयकालं तु प्रतिज्ञाय हरीश्वरः । व्यतीतांश्चतुरो मासान्विहरन्नावबुध्यते ७८ सामात्यपरिषत्क्रीडन्पानमेवोपसेवते । शोकदीनेषु नास्मासु सुग्रीवः कुरुते दयाम् ७९ उच्यतां गच्छ सुग्रीवस्त्वया वीर महाबल ॥

---

परिपूर्ण होण्याच्या आशेनें जे आपणाकडे आलेले आहेत त्यांची इच्छा परिपूर्ण करण्याचें वचन देऊन जो त्यांच्या आशेचा विघात करितो तो पुरुष जगतामध्यें अधम होय ७१. तोंडांतून काढिलेलें बरें-वाईट भाषण जो खरें करून दाखवितो तोच वीर पुरुषांमध्यें उत्कृष्ट होय ७२. आपला मनोरथ सिद्धीस गेला असूनही मनोरथ परिपूर्ण न झालेल्या मित्रांच्या कार्याकरितां जे झटत नाहींत ते कृतघ्न मृत झाले असतां त्यांना श्वापदेंही खात नाहींत ७३. सुवर्णपृष्ठानें युक्त व प्रत्यंचा चढवून ताणिलेल्या अशा माझ्या धनुष्याचें विद्युत्समुदायतुल्य स्वरूप संग्रामामध्यें पहाण्याचीच तुला खरोखर इच्छा झाली आहे ७४. संग्रामामध्यें क्रुद्ध झालेल्या माझ्या प्रत्यंचेचा वज्राच्या ध्वनीप्रमाणें भयंकर टणत्कार पुनरपि श्रवण करण्याची तुला हाव सुटली आहे ७५. असो. हे वीरा, राजकुमारा लक्ष्मणा, इतकें झालें असूनही ह्मणजे तुझें साहाय्य असलेल्या माझा पराक्रम माहीत झाला असूनही सुग्रीवाच्या मनाला त्याबद्दल कांहींच विकल्प वाटूं नये हें खरोखर आश्चर्य आहे ७६. हे शत्रुसमूहविजयी लक्ष्मणा, ज्याच्याकरितां ही खटपट केली त्याविषयीं केलेल्या प्रतिज्ञेचें ह्या कृतकृत्य झालेल्या वानरराजाला भान राहिलें नाहीं ७७. पावसाळा निघून गेला ह्मणजे उद्योगाला लागावयाचें अशी संकेतविषयक कालाची प्रतिज्ञा प्रथम करूनही क्रीडा करण्यामध्यें दंग झालेल्या त्या वानरराजाला चार महिने लोटून गेल्याचें भान राहिलेलें नाहीं ७८. अरे, मंत्रिमंडळासहवर्तमान क्रीडा करण्यांत दंग झालेला हा सुग्रीव मद्यपानच करीत बसला आहे; शोकामुळें दीन झालेल्या आह्मांवर तो दया करीत नाहीं ७९. ह्मास्तव, हे महाबलाढ्य वीरा, जा आणि माझ्या क्रोधाचें स्वरूप

मम रोषस्य यद्रूपं ब्रूयाश्चैनमिदं वचः ८० न स संकुचितः पन्था येन
वाली हतो गतः । समये तिष्ठ सुग्रीव मा वालिपथमन्वगाः ८१ एक एव
रणे वाली शरेण निहतो मया । त्वां तु सत्यादतिक्रान्तं हनिष्यामि सबा-
न्धवम् ८२ यदेवं विहिते कार्ये यद्धितं पुरुषर्षभ । तत्तद्ब्रूहि नरश्रेष्ठ त्वरा
कालव्यतिक्रमः ८३ कुरुष्व सत्यं मम वानरेश्वर प्रतिश्रुतं धर्ममवेक्ष्य
शाश्वतम् । मा वालिनं प्रेतगतो यमक्षये त्वमद्य पश्येर्मम चोदितः शरैः ८४
स पूर्वजं तीव्रविवृद्धकोपं लालप्यमानं प्रसमीक्ष्य दीनम् । चकार तीव्रां
मतिमुग्रतेजा हरीश्वरे मानववंशवर्धनः ८५ [१३१२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे त्रिंशः सर्गः ॥ ३० ॥

स कामिनं दीनमदीनसत्त्वं शोकाभिपन्नं समुदीर्णकामम् । नरेन्द्रसू-
नुर्नरदेवपुत्रं रामानुजः पूर्वजमित्युवाच १ न वानरः स्थास्यति साधुवृत्ते

---

वाला निवेदन करून त्याला आणखी असेंही सांग कीं ८०, "वाली वध पावून ज्या मार्गानें गेला तो मार्ग कांहीं अगदीं संकुचित नाहीं ( वाली जात असतांना तुलाही त्याच्याबरोबर जातां येईल इतका तो मार्ग मोठा आहे). तस्मात्, हे सुग्रीवा, आपल्या वचनाविषयीं खबरदार रहा आणि वालीच्या मार्गाला जाऊं नकोस ८१. अरे, संग्रामामध्यें बाणाच्या योगानें वालीचा एकट्याचाच वध मीं केला; परंतु, तूं सत्यापासून भ्रष्ट झाल्यामुळें मी तुझा मात्र बांधवांसहवर्तमान वध करीन" ८२. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, उपस्थित झालेल्या कार्यसंबंधानें जें जें कांहीं त्याला व आपणांला हितावह असेल तें तें तूं त्याला सांग आणि त्वरा कर. कारण, कालातिक्रम होत आहे ८३. सारांश, "हे वानरराजा, सनातन धर्म लक्ष्यांत आणून मला दिलेलें आपलें वचन खरें कर; माझ्या बाणांनीं विद्ध होऊन तूं आज प्रेत बनूं नकोस आणि यमाच्या घरीं जाऊन वालीची भेट घेऊं नकोस". ( इतकें तूं सुग्रीवाला सांग ) ८४. ह्याप्रमाणें प्रचंड व वृद्धिंगत झालेल्या क्रोधानें युक्त होऊन भाषण करीत असलेल्या आपल्या दीन ज्येष्ठ भ्रात्याकडे पाहून मनुवंशाची कीर्ति वृद्धिंगत करणाऱ्या महातेजस्वी लक्ष्मणानें वानरराज सुग्रीवाविषयीं भयंकर विचार मनामध्यें आणिला ८५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडांतील तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

मनाचा उदार परंतु विषयासक्त झाल्यामुळें दीन होऊन शोकग्रस्त झालेल्या आणि उत्कट कामवासनेनें युक्त झालेल्या आपल्या राजपुत्र ज्येष्ठ भ्रात्याला तो रामाचा कनिष्ठ भ्राता राजकुमार लक्ष्मण म्हणाला १ "वानर सज्जनांप्रमाणें वागणारा नाहीं आणि

न मन्यते कर्मफलानुषङ्गान् । न भोक्ष्यते वानरराजलक्ष्मीं तथा हि नातिक्रमतेस्य बुद्धिः २ मतिक्षयाद्ग्राम्यसुखेषु सक्तस्तव प्रसादात्प्रतिकारबुद्धिः । हतोग्रजं पश्यतु वीरवालिनं न राज्यमेवं विगुणस्य देयम् ३ न धारये कोपमुदीर्णवेगं निहन्मि सुग्रीवमसत्यमद्य । हरिप्रवीरैः सह वालिपुत्रो नरेन्द्रपुत्र्या विचयं करोतु ४ तमात्तबाणासनमुत्पतन्तं निवेदितार्थं रणचण्डकोपम् । उवाच रामः परवीरहन्ता स्ववीक्षितं सानुनयं च वाक्यम् ५ न हि वै त्वद्विधो लोके पापमेवं समाचरेत् । कोपमार्येण यो हन्ति स वीरः पुरुषोत्तमः ६ नेदमत्र त्वया ग्राह्यं साधुवृत्तेन लक्ष्मण । तां प्रीतिमनुवर्तस्व पूर्ववृत्तं च संगतम् ७ सामोपहितया वाचा रूक्षाणि परिवर्जयन् । वक्तुमर्हसि सुग्रीवं व्यतीतं कालपर्यये ८ सोग्रजेनानुशिष्टार्थो यथावत्पुरुषर्षभः । प्रविवेश पुरीं वीरो लक्ष्मणः परवीरहा ९ ततः शुभमतिः प्राज्ञो भ्रातुः प्रियहिते रतः । लक्ष्मणः प्रतिसंरब्धो जगाम भवनं

---

ह्मणूनच कोणाच्या पराक्रमामुळें हीं ( निष्कंटक राज्यभोगविषयक ) फलें त्याला प्राप्त झालीं आहेत हें त्याच्या गांवींही नाहीं. तस्मात्, ज्याअर्थीं झालेलें सख्य रक्षण करण्याकडे त्याचें फारसें लक्ष्य नाहीं त्याअर्थीं वानरसंबंधीं राज्यवैभवाचा उपभोग तो घेणार नाहीं २. तुमच्या प्रसादामुळें विचारमूढ बनून ग्राम्यसुखांविषयीं आसक्त झालेल्या ह्या वानराचे ठिकाणीं प्रत्युपकारबुद्धि राहिलेली नाहीं. 'ह्मास्तव, असल्या गुणहीनाला राज्य देणें योग्य नाहीं. माझ्या हातून वध पावून आज ज्येष्ठ भ्रात्या वीर वालीशींच ह्याची भेट होऊं दे ३. हा अनावर झालेला कोप आंवरून धरण्यास मी समर्थ नाहीं. ह्या सत्यभ्रष्ट सुग्रीवाचा मी आजच वध करणार. वानरश्रेष्ठासहवर्तमान वालिपुत्र अंगद राजकन्या जानकीचा शोध लावील " ४. ह्याप्रमाणें सुग्रीवाच्या वधाची प्रतिज्ञा केल्याचें कळवून संग्रामविषयक प्रचंड शोकानें युक्त झालेल्या आणि धनुष्य घेऊन झपाट्यानें चालूं लागलेल्या लक्ष्मणाशीं परवीरघातक राम सांत्वनपूर्वक व समयोचित भाषण करू लागले ५. ( ते ह्मणाले ) " तुझ्यासारख्यानें अशा प्रकारचें पाप करूं नये. उत्कृष्ट विवेकाच्या योगानें जो कोणाचा घात करितो तोच ह्या जगतामध्यें वीर व श्रेष्ठ गुरु होय ६. हे लक्ष्मणा, त्वां सद्वर्तनी पुरुषानें ह्या प्रसंगीं असें मनामध्यें आणितां उपयोगीं नाहीं. सुग्रीवाचे ठिकाणीं तूं पर्वीप्रमाणेंच प्रेम ठेव आणि त्याच्याशीं जें आपलें पूर्वीं सख्य झालें आहे त्याची आठवण ठेव ७. कठोर शब्द न उच्चारितां कालातिक्रमण होत आहे येवढेंच तूं सुग्रीवाला सौम्य भाषेनें सांग " ८. ह्याप्रमाणें ज्येष्ठ भ्रात्यानें यथायोग्य उपदेश केला असतां शत्रुपक्षीय वीरघातक वीर लक्ष्मण

कृपे: १० शक्रबाणासनप्रख्यं धनुः कालान्तकोपमम् । प्रगृह्य गिरिशृ-
ङ्गाभं मन्दरः सानुमानिव ११ यथोक्तकारी वचनमुत्तरं चैव सोत्तरम् ।
बृहस्पतिसमो बुद्ध्या मत्वा रामानुजस्तदा १२ कामक्रोधसमुत्थेन भ्रातुः
क्रोधाग्निना वृतः । प्रभञ्जन इवाप्रीतः प्रययौ लक्ष्मणस्ततः १३ सालता-
लाश्वकर्णांश्च तरसा पातयन्बलात् । पर्यस्यन्गिरिकूटानि द्रुमानन्यांश्च
वेगितः १४ शिलाश्च शकलीकुर्वन्पद्भ्यां गज इवाशुगः । दूरमेकपदं
त्यक्त्वा ययौ कार्यवशाद्द्रुतम् १५ तामपश्यद्बलाकीर्णां हरिराजमहापुरीम् ।
दुर्गामिक्ष्वाकुशार्दूलः किष्किन्धां गिरिसंकटे १६ रोषात्प्रस्फुरमाणोष्ठः
सुग्रीवं प्रति लक्ष्मणः । ददर्श वानरान्भीमान्किष्किन्धायां बहिश्चरान् १७
तं दृष्ट्वा वानराः सर्वे लक्ष्मणं पुरुषर्षभम् । शैलशृङ्गाणि शतशः प्रवृद्धांश्च
महीरुहान् १८ जगृहुः कुञ्जरप्रख्या वानराः पर्वतान्तरे १९ तान्गृहीत-

---

किष्किंधा नगरीमध्यें गेला ९ आणि तदनंतर भ्रात्याचें प्रिय व हित करण्याविषयीं दक्ष असलेला तो सुविचारी व समंजस लक्ष्मण क्रुद्ध होऊन सुग्रीवाच्या घरीं गेला १०. सारांश, काल व अंतक ह्यांप्रमाणें भयंकर असें इंद्रचापतुल्य आणि पर्वतशिखरासारिखें धनुष्य हातांत घेतल्यामुळें शिखरयुक्त मंदरपर्वताप्रमाणें दिसूं लागलेला ११, रामचंद्रांच्या आज्ञेप्रमाणें वागणारा आणि बुद्धीनें बृहस्पतीची बरोबरी करणारा तो रामचंद्राचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण भ्रात्याच्या मनोरथाचा विघात झाल्यामुळें उत्पन्न झालेला जो क्रोध त्याच्यापासून निघालेल्या क्रोधाग्नीनें व्याप्त झाल्याकारणानें क्षुब्ध झाला आणि आपण सुग्रीवाशीं काय भाषण करावयाचें व त्यानें उत्तर दिल्यानंतर त्याला पुनरपि प्रत्युत्तर काय द्यावयाचें ह्याचा विचार करून तो वायुसारखा झपाट्यानें चालला १२, १३. तो वेगवान् लक्ष्मण साल, ताल, व अश्वकर्ण हे वृक्ष चालण्याच्या वेगानें उलथून पाडूं लागला, पर्वतशिखरें व इतर वृक्ष स्वसामर्थ्यानें अस्ताव्यस्त करूं लागला १४, पायांच्या योगानें शिळांचे तुकडे तुकडे करूं लागला आणि जरूरीचें काम असल्या-मुळें जलद चालणाऱ्या गजाप्रमाणें एकेक ढांग लांब लांब टाकून सत्वर चालता झाला १५. नंतर प्रवेश होण्यास दुर्घट, सैन्यानें गजबजलेली व पर्वतामध्यें असलेली ती वानरराजाची महानगरी किष्किंधा अवलोकन केल्यावर १६ सुग्रीवाविषयीं क्रोध उत्पन्न झाल्यामुळें ओंठ स्फुरण पावूं लागलेल्या लक्ष्मणानें किष्किंधेमध्यें बाहेर हिंड-णारे भयंकर वानर अवलोकन केले १७. तेव्हां पर्वतामध्यें वास्तव्य करणाऱ्या व आका-रानें गजतुल्य असलेल्या त्या सर्व वानरांनीं त्या पुरुषश्रेष्ठ लक्ष्मणाला अवलोकन करि-तांक्षणीं शेंकडों पर्वतशिखरें व मोठमोठे वाढलेले वृक्ष हातांत घेतले १८, १९. ह्याप-

प्रहरणान्सर्वान्दृष्ट्वा तु लक्ष्मणः । बभूव द्विगुणं क्रुद्धो बह्विन्धन इवानलः २०
तं ते भयपरीताङ्गाः क्षुब्धं दृष्ट्वा प्लवंगमाः । कालमृत्युयुगान्ताभं
शतशो विद्रुता दिशः २१ ततः सुग्रीवभवनं प्रविश्य हरिपुंगवाः । क्रोध-
मागमनं चैव लक्ष्मणस्य न्यवेदयन् २२ तारया सहितः कामी सक्तः
कपिवृषस्तदा । न तेषां कपिसिंहानां शुश्राव वचनं तदा २३ ततः सचि-
वसंदिष्टा हरयो रोमहर्षणाः । गिरिकुञ्जरमेघाभा नगरान्निर्ययुस्तदा २४
नखदंष्ट्रायुधाः सर्वे वीरा विकृतदर्शनाः । सर्वे शार्दूलदंष्ट्राश्च सर्वे
विवृतदर्शनाः २५ दशनागबलाः केचित्केचिद्दशगुणोत्तराः । केचिन्ना-
गसहस्रस्य बभूवुस्तुल्यवर्चसः २६ ततस्तैः कपिभिर्व्याप्तां द्रुमहस्तैर्महा-
बलैः । अपश्यल्लक्ष्मणः क्रुद्धः किष्किन्धां तां दुरासदाम् २७ ततस्ते हरयः
सर्वे प्राकारपरिखान्तरात् । निष्क्रम्योदग्रसत्त्वास्तु तस्थुराविष्कृतं तदा २८

---

मार्णे हातांमध्यें आयुधें घेतलेल्या त्या सर्व वानरांना अवलोकन केल्यावर विपुल इंधनांनीं युक्त झालेल्या अग्नीप्रमाणें लक्ष्मण दुप्पट क्रुद्ध झाला २०. तेव्हां काल, मृत्यु अथवा युगांतकालीं संहार करण्यास उद्युक्त झालेला रुद्र ह्यांप्रमाणें क्षुब्ध झालेल्या त्या लक्ष्मणाला पहातांक्षणीं ते वानर भीतीनें लटलट कापूं लागले आणि शेंकडों बाजूंनीं पळून गेले २१. तदनंतर सुग्रीवाच्या घरीं जाऊन ते वानरश्रेष्ठ लक्ष्मणाचें आगमान व क्रोध त्याला निवेदन करूं लागले २२. परंतु, ग्राम्यसुखाविषयीं तारेसहवर्तमान आसक्त होऊन राहिलेल्या त्या विषयलंपट वानर-श्रेष्ठ सुग्रीवानें त्या श्रेष्ठ वानरांच्या सांगण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं २३. तदनंतर ( सुग्रीवाला वर्तमान कळवून त्याच्या अनुमतीनें लक्ष्मणाला आह्मी अतां घेऊन येई-पर्यंत तुह्मी लक्ष्मणाचा प्रवेश नगरींत होऊं देऊं नका अशी हनूमान् वगैरे ) मंत्र्यांची आज्ञा झाल्यावर आकारानें पर्वत, गज व मेघ ह्यांसारिखे असलेले आणि ह्मणूनच पहाणाऱ्याच्या अंगावर कांटा उठविणारे ते वानर नगरांतून बाहेर पडले २४. त्या सर्वही वीर वानरांचें स्वरूप उग्र असून सर्वांच्या दाढा व्याघ्रासारिख्या होत्या, नखें व दाढा ह्या स्वाभाविकच आयुधांनीं ते सर्व युक्त होते आणि सर्वही आपले दांत लक्ष्मणाला दाखवूं लागले होते २५. त्यांपैकीं कांहींना दहा दहा हत्तींचें सामर्थ्य असून कांहीं तर त्यांच्याही पेक्षां दसपट दसपट सामर्थ्यवान् होते आणि कांहींचें बल तर सहस्र गजांच्या बलाची बरोबरी करणारें होतें २६. असो. तदनंतर हाता-मध्यें वृक्ष घेऊन सज्ज झालेल्या त्या महाबलाढ्य वानरांनीं व्याप्त आणि ह्मणूनच प्रवेश होण्यास अशक्य झालेली ती किष्किंधा नगरी क्रुद्ध लक्ष्मणानें अवलोकन

सुग्रीवस्य प्रमादं च पूर्वजस्यार्थमात्मवान् । दृष्ट्वा क्रोधवशं
वीरः पुनरेव जगाम सः २९ स दीर्घोष्णमहोच्छ्वासः कोपसंरक्तलोचनः ।
बभूव नरशार्दूलः सधूम इव पावकः ३० बाणशल्यस्फुरज्जिह्वः साय-
कासनभोगवान् । स्वतेजोविषसंभूतः पञ्चास्य इव पन्नगः ३१ तं दीप्त-
मेव कालाग्निं नागेन्द्रमिव कोपितम् ।॰ समासाद्याङ्गदस्त्रासाद्विषादमग-
मत्परम् ३२ साङ्गदं रोषताम्राक्षः संदिदेश महायशाः । सुग्रीवः
कथ्यतां वत्स ममागमनमित्युत ३३ एष रामानुजः प्राप्तस्त्वत्सकाशम-
रिंदम । भ्रातुर्व्यसनसंतप्तो द्वारि तिष्ठति लक्ष्मणः ३४ तस्य वाक्यं यदि
रुचिः क्रियतां साधु वानर । इत्युक्त्वा शीघ्रमागच्छ वत्स वाक्यम-
रिंदम ३५ लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा शोकाविष्टोऽङ्गदो ब्रवीत् । पितुः
समीपमागम्य . सौमित्रिरयमागतः ३६ अथाङ्गदस्तस्य सुतीव्रवाचा
संभ्रान्तभावः परदीनवक्त्रः । निर्गत्य पूर्वं नृपतेस्तरस्वी ततो रुमाया-

---

केली २७. तेव्हां ते सर्व महाबलाढ्य वानरही कोटाच्या भोंवतीं असलेल्या खंदकांतून निघून उघडपणें बाहेर येऊन उभे राहिले असतां २८ सुग्रीवाचा प्रमाद, वानरांचा अडथळा आणि ज्येष्ठ भ्रात्याचें कार्य ह्यांचा विचार करून तो वीर लक्ष्मण पुनरपि क्रोधाधीन झाला २९. त्याचे नेत्र कोपानें लाल झाले, तो दीर्घ, ऊष्ण व भयंकर सुस्कारे टाकूं लागला आणि त्यामुळें तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण धूमयुक्त अग्नीप्रमाणें भासूं लागला ३०. बाणशल्यरूप चंचल जिह्वेनें व चापरूप वेटोळ्यानें युक्त असलेला आणि तेजोरूप विषानें व्याप्त झालेला तो लक्ष्मण पंचमुखी भुजंगाप्रमाणें दिसूं लागला ३१. तेव्हां कालाग्नीप्रमाणें प्रदीप्त व नागराजाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या त्या लक्ष्मणाची गांठ पडल्यावर अंगद भीतीमुळें पराकाष्ठेचा दुःखित झाला ३२. इतक्यांत क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असा तो महाकीर्तिमान् लक्ष्मण अंगदाला ह्मणाला "हे वत्सा, सुग्रीवाला माझ्या आगमनाची वर्दी दे आणि त्याला सांग कीं ३३, "हे शत्रुदमना, हा रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण तुझ्याकडे आला आहे आणि तो भ्रात्याच्या दुःखामुळें संतप्त झाला असून दाराशीं उभा आहे ३४. तेव्हां मर्जी असेल तर त्याच्या ह्मणण्याप्रमाणें आपण वागा. ह्याप्रमाणें सुग्रीवाला चांगलें सांग आणि असें सांगितल्यानंतर, हे शत्रुदमना वत्सा, तो काय सांगतो तें ऐकून घेऊन तूं सत्वर इकडे ये" ३५. हें लक्ष्मणाचें भाषण ऐकून घेतल्यावर शोकाकुल झालेला अंगद पितृस्थानीं असलेल्या सुग्रीवाजवळ गेला आणि "हा सुमित्रापुत्र लक्ष्मण आला आहे" असें त्याला ह्मणाला ३६. सारांश, लक्ष्मणाच्या त्या

श्चरणौ ववन्दे ३७ संगृह्य पादौ पितुरुग्रतेजा जग्राह मातुः पुनरेव पादौ । पादौ रुमायाश्च निपीडयित्वा निवेदयामास ततस्तदर्थम् ३८ स निद्राक्लान्तसंवीतो वानरो न विबुद्धवान् । बभूव मदमत्तश्च मदनेन च मोहितः ३९ ततः किलकिलां चक्रुर्लक्ष्मणं प्रेक्ष्य वानराः । प्रसादयन्तस्तं क्रुद्धं भयमोहितचेतसः ४० ते महौघनिभं दृष्ट्वा वज्राशनिसमस्वनम् । सिंहनादं समं चक्रुर्लक्ष्मणस्य समीपतः ४१ तेन शब्देन महता प्रत्यबुध्यत वानरः । मदविह्वलताम्राक्षो व्याकुलः स्रग्विभूषणः ४२ अथाङ्गदवचः श्रुत्वा तेनैव च समागतौ । मन्त्रिणौ वानरेन्द्रस्य संमतोदारदर्शनौ ४३ यक्षश्चैव प्रभावश्च मन्त्रिणावर्थधर्मयोः । वक्तुमुच्चावचं प्राप्तं लक्ष्मणं तौ शशंसतुः ४४ प्रसादयित्वा सुग्रीवं वचनैः सार्थनिश्चितैः । आसीनं पर्युपासीनौ यथा शक्रं मरुत्पतिम् ४५ सत्यसंधौ महाभागौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । मनु-

---

अत्यंत तीक्ष्ण वाणीमुळें मनामध्यें गोंधळून गेलेला आणि ह्मणूनच अत्यंत दीन वदन झालेला अंगद तेथून निघाला आणि प्रथम राजा सुग्रीवाचे आणि नंतर रुमेचे चरण त्या वेगवान् अंगदानें वंदिले ३७. तात्पर्य, पितृस्थानीं असलेल्या सुग्रीवाचे पाय धरून नंतर त्यानें आपल्या मातेचे पाय धरिले आणि तदनंतर रुमेच्याही चरणकमलीं लीन होऊन त्या उग्र तेजस्वी अंगदानें तो लक्ष्मणाचा वृत्तांत निवेदन केला ३८. तथापि, निद्रेनें जर्जर व व्याप्त करून टाकिलेल्या त्या वानरानें त्याच्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. कारण, तो विषयवासनेनें मोहित व मदमत्त झालेला होता ३९. अंगद सुग्रीवाकडे गेल्यानंतर इकडे त्या क्रुद्ध लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं वानर भीतीमुळें मनामध्यें अगदीं गांगरून गेले आणि लक्ष्मणाची कृपा संपादन करण्याकरितां किलकिलाट करूं लागले ४०. सारांश, त्यांनीं लक्ष्मणाला अवलोकन केल्यावर त्याच्यासमीपच महाप्रवाहासारिखा आणि वज्र व विद्युल्लता ह्यांच्यासारिखा एकदम सिंहनाद केला ४१. तेव्हां मदनानें विह्वल करून टाकलेला, आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला, कांहीं सुचेनासें झालेला आणि पुष्पमाला धारण केलेला तो सुग्रीव वानर त्या प्रचंड ध्वनीनें देहभानावर आला ४२. तदनंतर अंगदाचें भाषण श्रवण करून त्याच्याच बरोबर त्या वानरराजाचे दोन मंत्री त्या वानरराजाकडे आले. ते उभयतांही त्या सुग्रीवाला संमत असून उभयतांचीही मति उत्कृष्ट होती ४३. तात्पर्य, अर्थ व धर्म ह्यांसंबंधानें कांहीं बरावाईट प्रकार राजाला कळविण्याकरितां प्राप्त झालेल्या लक्ष्मणाची त्या यक्ष व प्रभाव ह्या नांवांच्या मंत्र्यांनीं प्रशंसा केली ४४. प्रथमतः निश्चित अर्थानें संपन्न असलेल्या भाषणांनीं सुग्रीवाचें मन प्रसन्न करून घेऊन मरुद्गणाधिपति इंद्राप्रमाणें बसलेल्या त्या

ऽव्ययभावं संप्राप्तौ राज्यार्हौ राज्यदायिनौ ४६ तयोरेको धनुष्पाणिर्द्वारि तिष्ठति लक्ष्मणः । यस्य भीताः प्रवेपन्तो नादान्मुञ्चन्ति वानराः ४७ स एष राघवभ्राता लक्ष्मणो वाक्यसारथिः । व्यवसायरथः प्राप्तस्तस्य रामस्य शासनात् ४८ अयं च तनयो राजंस्ताराया दयितोङ्गदः । लक्ष्मणेन सकाशं ते प्रेषितस्त्वरयानघ ४९,सोयं रोषपरीताक्षो द्वारि तिष्ठति वीर्यवान् । वानरान्वानरपते चक्षुषा निर्दहन्निव ५० तस्य मूर्ध्ना प्रणामं त्वं सपुत्रः सहबान्धवः । गच्छ शीघ्रं महाराज रोषो ह्यद्योपशाम्यताम् ५१ यथा हि रामो धर्मात्मा तत्कुरुष्व समाहितः । राजंस्तिष्ठ स्वसमये भव सत्यप्रतिश्रवः ५२ [ १३६४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकत्रिंशः सर्गः ॥ ३१ ॥

अङ्गदस्य वचः श्रुत्वा सुग्रीवः सचिवैः सह । लक्ष्मणं कुपितं श्रुत्वा मुमोचासनमात्मवान् १ स च तानब्रवीद्वाक्यं निश्चित्य गुरुलाघवम् ।

---

सुग्रीवाचे समीप ते बसले ( आणि ह्मणाले ) ४५ "त्रैलोक्याचें राज्य करण्यास पात्र असूनही तुला राज्य अर्पण करणारे, मनुष्यरूप धारण केलेले, सत्यवचनी आणि महाभाग्यवान् रामलक्ष्मण अरण्यामध्यें आहेत ४६ व त्या उभयतांपैकीं एक लक्ष्मण हातामध्यें धनुष्य घेऊन किष्किंधानगरीच्या द्वाराशीं उभा आहे आणि त्यालाच भिऊन लटलट कापू लागलेले वानर आरोळ्या मारीत आहेत ४७. रामाच्या आज्ञेवरून हा त्याचा भ्राता लक्ष्मण निश्चयरूप रथावर आरूढ होऊन रामवचनरूप सारथ्यासहवर्तमान येथें प्राप्त झाला आहे ४८; इतकेंच नव्हे; परंतु, हे निष्पापा राजा, तारेचा हा प्रिय पुत्र अंगद लक्ष्मणानें तुझ्यासमीप पाठविला आहे ४९. सारांश, हे वानराधिपते, क्रोधानें ज्याचे नेत्र व्याप्त झालेले आहेत असा तो हा वीर्यवान् लक्ष्मण आपल्या दृष्टीच्या योगानें वानरांना दग्ध करीतच कीं काय द्वाराशीं उभा आहे ५०. त्याच्याकडे तूं पुत्र व बांधव ह्यांसहवर्तमान सत्वर जाऊन त्याला मस्तकानें प्रणाम कर. हे महाराजा, त्याचा क्रोध आजच्या आजच शांत होऊं दे ५१. हे राजा, धर्मात्मा राम सांगेल त्याप्रमाणें तूं स्वस्थांतःकरणपूर्वक वाग आणि स्वतः जो संकेत तूं त्याच्याशीं केला आहेस त्याला धरून राहून आपली प्रतिज्ञा खरी कर ५२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

मंत्र्यांसहवर्तमान असलेला विचारी सुग्रीव अंगदाचें भाषण श्रवण करून लक्ष्मण क्रुद्ध झाल्याचें ऐकिल्यावर आसनावरून सरला १. नंतर मसलतींविषयीं निपुण अस-

मन्त्रज्ञान्मन्त्रकुशलो मन्त्रेषु परिनिष्ठितः २ न मे दुर्व्याहृतं किंचिन्नापि मे दुरनुष्ठितम् । लक्ष्मणो राघवभ्राता क्रुद्धः किमिति चिन्तये ३ असुहृद्भिर्ममामित्रैर्नित्यमन्तरदर्शिभिः । मम दोषानसंभूताञ्श्रावितो राघवानुजः ४ अत्र तावद्यथाबुद्धिः सर्वैरेव यथाविधि । भावस्य निश्चयस्तावद्विज्ञेयो निपुणं शनैः ५ न खल्वस्ति मम त्रासो लक्ष्मणान्नापि राघवात् । मित्रं त्वस्थानकुपितं जनयत्येव संभ्रमम् ६ सर्वथा सुकरं मित्रं दुष्करं प्रतिपालनम् । अनित्यत्वात्तु चित्तानां प्रीतिरल्पेपि भिद्यते ७ अतोनिमित्तं त्रस्तोहं रामेण तु महात्मना । यन्ममोपकृतं शक्यं प्रतिकर्तुं न तन्मया ८ सुग्रीवेणैवमुक्ते तु हनूमान्हरिपुङ्गवः । उवाच स्वेन तर्केण मध्ये वानरमन्त्रिणाम् ९ सर्वथा नैतदाश्चर्यं यत्त्वं हरिगणेश्वर । न विस्मरस्यविस्रब्धमुपकारं कृतं शुभम् १० राघवेण तु वीरेण भयमुत्सृज्य दूरतः ।

---

लेला आणि सल्लामसलतींना धरून चालणारा तो सुग्रीव बऱ्या वाईटपणाचा विचार करून त्या सल्लामसलत जाणणाऱ्या मंत्र्यांना ह्मणाला २ " मीं कांहीं अनुचित भाषण केलें नाहीं व कांहीं अयोग्य कृत्यही माझ्याहातून झालेलें नाहीं. तेव्हां राघवभ्राता लक्ष्मण कां क्रुद्ध झाला ह्याविषयीं मला विचार पडला आहे ३. नेहमीं माझें छिद्र पहाण्यास टपून बसून माझा अपकार करणाऱ्या माझ्या शत्रूंनीं माझे नसते दोष खरोखर राघवाच्या कनिष्ठ भ्रात्याला सांगितले आहेत ४. ह्यास्तव, सर्वांनाच आपआपल्या बुद्धिप्रमाणें योग्य विचार करून लक्ष्मणाच्या कोपाचें कारण काय हें विचारपूर्वक चांगल्या रीतीनें ठरविलें पाहिजे ५. वास्तविक विचार केला असतां ( माझ्या हातून कांहीं अपराध घडल्यामळें ) लक्ष्मणापासून अथवा रघुवंशज रामापासून आज मला भीति उत्पन्न झालेली नाहीं, मित्र विनाकारण क्रुद्ध झाला आहे ह्यामुळें मात्र मला भीति उत्पन्न झाली आहे ६. मित्र संपादन करणें सुलभ आहे परंतु, त्याच्याशीं सख्य कायम राखणें मात्र सर्वप्रकारें कठिण आहे. कारण, अंतःकरणें स्थिर नसल्यामुळें शत्रूंनीं अल्पस्वल्प जरी कांहीं मित्राच्या कानांत सांगितलें तरी सुद्धां उभयतांतील प्रेमाला व्यत्यय येतो ७. ह्यामुळें मी भयभीत झालों आहें. ( रामाचा माझ्या हातून कांहीं अपराध घडला असेल आणि त्यामुळें तो क्रुद्ध झाला असें समजून मी भयभीत झालों नाहीं. माझ्या हातुन रामाचा अपराध होईल कसा ? ) कारण, महात्म्या रामानें जो माझ्यावर उपकार केला आहे त्याची फेड माझ्या हातून होणें शक्य नाहीं " ८. ह्याप्रमाणें सुग्रीवानें भाषण केलें असतां वानरश्रेष्ठ हनूमान् स्वतःच्या तर्कानें वानरमंत्र्यांमध्यें ह्मणाला ९ " हे वानरगणाधिपते, रामचंद्रानें केलेला चांगला उपकार तूं विश्वासघातकीपणानें

त्वत्प्रियार्थं हतो वाली शक्रतुल्यपराक्रमः ११ सर्वथा प्रणयात्क्रुद्धो
राघवो नात्र संशयः । भ्रातरं संप्रहितवाँल्लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम् १२
त्वं प्रमत्तो न जानीषे कालं कालविदां वर । फुल्लसप्तच्छदश्यामा प्रवृत्ता
तु शरच्छुभा १३ निर्मलग्रहनक्षत्रा द्यौः प्रनष्टबलाहका । प्रसन्नाश्च
दिशः सर्वाः सरितश्च सरांसि च १४ प्राप्तमुद्योगकालं तु नावैषि हरि-
पुङ्गव । त्वं प्रमत्त इति व्यक्तं लक्ष्मणोऽयमिहागतः १५ आर्तस्य हृतदा-
रस्य परुषं पुरुषान्तरात् । वचनं मर्षणीयं ते राघवस्य महात्मनः १६
कृतापराधस्य हि ते नान्यत्पश्याम्यहं क्षमम् । अन्तरेणाञ्जलिं बद्ध्वा
लक्ष्मणस्य प्रसादनात् १७ नियुक्तैर्मन्त्रिभिर्वाच्यो ह्यवश्यं पार्थिवो
हितम् । इत एव भयं त्यक्त्वा ब्रवीम्यवधृतं वचः १८ अभिक्रुद्धः
समर्थो हि चापमुद्यम्य राघवः । सदेवासुरगन्धर्वं वशे स्थापयितुं
जगत् १९ न स क्षमः कोपयितुं यः प्रसाद्यः पुनर्भवेत् । पूर्वोपकारं

---

विसरत नाहींस हें कांहीं आश्चर्य नव्हे १०. वीर राघवानें वालीच्या पराक्रमाची भीति यत्किंचितही न बाळगितां तुझें प्रिय करण्याकरितां इंद्रतुल्यपराक्रमी वालीचा वध केला आहे ११. ह्यावरून तो राघव खास प्रेमामुळें क्रुद्ध झाला असून त्यानें आपला लक्ष्मीवर्धक भ्राता लक्ष्मण तुझ्याकडे पाठविला आहे ह्यांत संशय नाहीं १२. कारण, हे कालवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, मदमत्त झाल्यामुळें तुला कालाचें भान राहिलें नाहीं. प्रफुल्लित सप्तच्छदवृक्षांच्या योगानें श्यामवर्ण प्रदेशांनीं युक्त असलेला शुभ शरदृतु जवळ जवळ निघून गेल्यासारिखाच आहे १३. आकाशांतील मेघ नाहींसे झाले असून ग्रह व नक्षत्रें निर्मल झालीं आहेत आणि त्याचप्रमाणें सर्व दिशा, नद्या आणि सरोवरें स्वच्छ झालीं आहेत १४. हे वानरश्रेष्ठा, उद्योगसमय प्राप्त झाल्याचें तूं जाणीत नाहींस तेव्हां तूं मदमत्त झाला आहेस असें स्पष्ट समजून हा लक्ष्मण येथें आला आहे १५. तस्मात्, भार्येचा अपहार झाल्यामुळें दुःखाकुल झालेल्या महात्म्या रघुवंशज रामाचें दुसऱ्याच्या द्वारानें झालेलें हें कठोर भाषण तुला सहनच केलें पाहिजे १६. (प्रतिज्ञा केल्याप्रमाणें योग्य वेळीं हजर न राहण्याचा) तुझ्या हातून अपराध झाला असल्यामुळें हात जोडून लक्ष्मणाची कृपा संपादन करण्याशिवाय तुला गत्यंतर नाहीं असें मला वाटतें १७. हितोपदेशाविषयीं नेमिलेल्या मंत्र्यांनीं जें कांहीं हित असेल तें राजाला अवश्य सांगितलें पाहिजे आणि ह्मणूनच मी भय न बाळगितां निश्चित भाषण करीत आहें १८. रामानें क्रुद्ध होऊन हातामध्यें धनुष्य घेतलें असतां देव, असुर आणि गंधर्व ह्यांसहवर्तमान हें सर्व जगत् आपल्या अधीन ठेवण्यास तो समर्थ

स्मरता कृतज्ञेन विशेषतः २० तस्य मूर्ध्ना प्रणम्य त्वं स पुत्रः ससुहृज्जनः । राजंस्तिष्ठ स्वसमये भर्तुर्भार्येव तद्वशे २१ न रामरामानुजशासनं त्वया कपीन्द्र युक्तं मनसाप्यपोहितुम् । मनो हि ते ज्ञास्यति मानुषं बलं स राघवस्यास्य सुरेन्द्रवर्चसः २२ [ १३८६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

अथ प्रतिसमादिष्टो लक्ष्मणः परवीरहा । प्रविवेश गुहां रम्यां किष्किन्धां रामशासनात् १ द्वारस्था हरयस्तत्र महाकाया महाबलाः । बभूवुर्लक्ष्मणं दृष्ट्वा सर्वे प्राञ्जलयः स्थिताः २ निःश्वसंतं तु तं दृष्ट्वा क्रुद्धं दशरथात्मजम् । बभूवुर्हरयस्त्रस्ता न चैनं पर्यवारयन् ३ स तां रत्नमयीं दिव्यां श्रीमान्पुष्पितकाननाम् । रम्यां रत्नसमाकीर्णां ददर्श महतीं गुहाम् ४ हर्म्यप्रासादसंबाधां ननारत्नोपशोभिताम् । सर्वकाम-

---

आहे १९. ज्याची पुनरपि कृपा संपादन करण्याचा प्रसंग यावयाचा असेल त्याला क्रोध आणणेंच योग्य नाहीं आणि विशेषतः स्वतः वर पूर्वी झालेला उपकार स्मरणाऱ्या कृतज्ञ पुरुषानें तर ही गोष्ट करितांच उपयोगीं नाहीं २०. ह्यास्तव, हे राजा, तूं त्याला मस्तकानें प्रणाम कर आणि आपल्या संकेताला धरून राहून, भार्या ज्याप्रमाणें भर्त्यांच्या अधीन होऊन राहते त्याप्रमाणें पुत्र व सुहृद्गण ह्यांसहवर्तमान तूं त्याच्या अधीन होऊन रहा २१. हे वानरराजा, राम आणि रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण ह्यांच्या आज्ञेची उपेक्षा करण्याचें मनामध्यें आणणेंही तुला योग्य नाहीं; कारण, रघुवंशज लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या ह्या इंद्रतुल्य पराक्रमी रामाचें अमानुष सामर्थ्य तुझ्या मनाला ठाऊक आहेच. २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

तदनंतर अंगदानें परत निरोप सांगितला असतां शत्रुपक्षीयवीरघातक लक्ष्मण रामाच्या आज्ञेनें रमणीय अशा किष्किंधानामक नगरीमध्यें गेला १. त्या ठिकाणीं देवडीवर असलेले धिप्पाड व महाबलाढ्य वानर लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं, सर्वही हात जोडून उभे राहिले २. क्रुद्ध होऊन दीर्घ सुस्कारे टाकूं लागलेल्या त्या दशरथपुत्र लक्ष्मणाला अवलोकन करितांक्षणीं वानर भिऊन गेल्यामुळें किष्किंधानगरीमध्यें शिरण्यास त्याला कोणीही आडकाठी केली नाहीं ३. तेव्हां त्या वैभवशाली लक्ष्मणानें प्रफुल्लित वनांनीं युक्त, रत्नांनीं व्याप्त व उत्कृष्ट वस्तूंनीं भरलेली अशी ती दिव्य, रमणीय व प्रचंड गुहा अवलोकन केली ४. ती गुहा नानाप्रकारच्या रत्नांनीं सुशोभित झालेली होती, धनिक लोकांच्या निवासस्थानांनीं व राजवाड्यांनीं

फलैर्वृक्षैः पुष्पितैरुपशोभिताम् ५ देवगन्धर्वपुत्रैश्च वानरैः कामरूपिभिः। दिव्यमाल्याम्बरधरैः शोभितां प्रियदर्शनैः ६ चन्दनागुरुपद्मानां गन्धैः सुरभिगन्धिताम् । मैरेयाणां मधूनां च संमोदितमहापथाम् ७ विन्ध्यमेरुगिरिप्रख्यैः प्रासादैर्नैकभूमिभिः । ददर्श गिरिनद्यश्च विमलास्तत्र राघवः ८ अङ्गदस्य गृहं रम्यं मैन्दस्य द्विविदस्य च । गवयस्य गवाक्षस्य गजस्य शरभस्य च ९ विद्युन्मालेश्च संपातेः सूर्याक्षस्य हनूमतः । वीरबाहोः सुबाहोश्च नलस्य च महात्मनः १० कुमुदस्य सुषेणस्य तारजाम्बवतोस्तथा । दधिवक्त्रस्य नीलस्य सुपाटलसुनेत्रयोः ११ एतेषां कपिमुख्यानां राजमार्गे महात्मनाम् । ददर्श गृहमुख्यानि माहासाराणि लक्ष्मणः १२ पाण्डुराभ्रप्रकाशानि गन्धमाल्ययुतानि च । प्रभूतधनधान्यानि स्त्रीरत्नैः शोभितानि च १३ पाण्डुरेण तु शैलेन परिक्षिप्तं दुरासदम् । वानरेन्द्रगृहं रम्यं महेन्द्रसदनोपमम् १४ शुक्लैः प्रासादशिखरैः कैलासशिखरोपमैः ।

---

ती गजबजून गेलेली होती आणि सर्वदां मनोरथानुरूप फलांनीं युक्त असलेल्या प्रफुल्लित वृक्षांनींही तिला शोभा आलेली होती ५. दिव्य पुष्पें आणि वस्त्रें धारण करीत असल्यामुळें ज्यांचें दर्शन प्रिय झालेलें आहे अशा यथेष्ट रूप धारण करणाऱ्या देवपुत्र व गंधर्वपुत्र वानरांच्या योगानेंही ती सुशोभित झालेली होती ६. चंदन, अगुरु व पद्मक ह्यांच्या गंधांमुळें आणि उंसाच्या रसापासून व मोहापासून तयार केलेल्या मद्यसमुदायामुळें त्या किष्किंधानगरींत जिकडे तिकडे सुवास सुटलेला होता; आंतील राजमार्गांवर तर जिकडे तिकडे सुवासाचा कडेलोटच झालेला होता ७ आणि विंध्याचल व मेरुपर्वत ह्यांसारिख्या अनेक मजली उंच राजवाड्यांनीं ती किष्किंधा नगरी भरलेली होती. असो. प्रथमतः पर्वतावरील निर्मल नद्या रघुवंशज लक्ष्मणानें अवलोकन केल्या ८ व नंतर अंगदाचें रम्य गृह त्यानें पाहिलें. तदनंतर मैंद, द्विविद, गवय, गवाक्ष, गज, शरभ ९, विद्युन्मालि, संपाति, सूर्याक्ष, हनुमान् , वीरबाहु, सुबाहु, महात्मा नल १०, कुमुद, सुषेण, तार आणि जांबवान्, दधिवक्त्र, नील आणि सुपाटल व सुनेत्र ११ ह्यांहीं महात्म्या वानरश्रेष्ठांचीं मोठीं मजबूत व उत्कृष्ट गृहें राजमार्गामध्यें लक्ष्मणानें अवलोकन केलीं १२. हीं गृहें श्वेतवर्ण अभ्राप्रमाणें प्रकाशणारीं असून सुगंधि द्रव्यांनीं व पुष्पांनीं भरलेलीं होतीं आणि त्याचप्रमाणें विपुल धनधान्यांनीं तीं संपन्न असून सर्वोत्कृष्ट स्त्रियांनीं सुशोभित झालेलीं होतीं १३. वानरराज सुग्रीवाचें घर तर इंद्रभवनासारिखें रम्य होतें व श्वेत पर्वतानें तें परिवेष्टित असल्यामुळें त्यांत दुसऱ्याचा प्रवेश होणेंही कठिण होतें १४; कैलासपर्वताच्या शिखरांप्रमाणें

सर्वकामफलैर्वृक्षैः पुष्पितैरुपशोभितम् १५ महेन्द्रदत्तैः श्रीमद्भिर्नीलजीमूतसंनिभैः । दिव्यपुष्पफलैर्वृक्षैः शीतच्छायैर्मनोरमैः १६ हरिभिः संवृतद्वारं बलिभिः शस्त्रपाणिभिः । दिव्यमाल्यावृतं शुभ्रं तप्तकाञ्चनतोरणम् १७ सुग्रीवस्य गृहं रम्यं प्रविवेश महाबलः । अवार्यमाणः सौमित्रिर्महाभ्रमिव भास्करः १८ स सप्तकक्ष्या धर्मात्मा यानासनसमावृताः । ददर्श सुमहद्गुप्तं ददर्शान्तःपुरं महत् १९ हैमराजतपर्यङ्कैर्बहुभिश्च वरासनैः । महार्हास्तरणोपेतैस्तत्र तत्र समावृतम् २० प्रविशन्नेव सततं शुश्राव मधुरस्वनम् । तन्त्रीगीतसमाकीर्णं समतालपदाक्षरम् २१ बह्वीश्च विविधाकारा रूपयौवनगर्विताः । स्त्रियः सुग्रीवभवने ददर्श स महाबलः २२ दृष्ट्वाभिजनसंपन्नास्तत्र माल्यकृतस्रजः । वरमाल्यकृतव्यग्रा भूषणोत्तमभूषिताः २३ नातृप्तान्नाति च व्यग्राननुदात्तपरिच्छदान् ।सुग्रीवानुचरां-

शुभ्रवर्ण असलेल्या राजवाड्यांच्या शिखरांनीं आणि सर्वदा मनोरथरूप फलें देणाऱ्या प्रफुल्लित वृक्षांनीं तें सुशोभित झालेलें होतें १५; दिव्य पुष्पें व फलें आणि शीतल छाया ह्यांनीं युक्त असून आकारानें नीलमेघांप्रमाणें असलेल्या इंद्रदत्त मनोहर भव्य वृक्षांनीं त्याला शोभा आलेली होती १६; हातांमध्यें शस्त्रें घेतलेल्या बलाढ्य वानरांनीं त्याच्या द्वाराचें रक्षण केलेलें होतें आणि तें शुभ्रवर्ण गृह दिव्य पुष्पांनीं व्याप्त झालेलें असून उत्कृष्ट सुवर्णाच्या तोरणांनीं युक्त होतें १७. असो. मोठ्या मेघामध्यें प्रविष्ट होणारा सूर्यच कीं काय अशा रीतीनें कोणाचीही आडकाठी न होतां महाबलाढ्य लक्ष्मण सुग्रीवाच्या रम्य गृहामध्यें प्रविष्ट झाला १८ आणि रथ व बैठकी ह्यांनीं गजबजून गेलेले सात चौक ओलांडून गेल्यावर त्या महात्म्या लक्ष्मणानें फारच विस्तीर्ण व सुरक्षित असें मोठें अंतःपुर अवलोकन केलें १९. त्या अंतःपुरांत सोन्यारुप्याचे अनेक पलंग ठिकठिकाणीं ठेविलेले असून मोठमोठ्या मूल्यवान् चादरी ज्याच्यावर पसरलेल्या आहेत अशीं सिंहासनेंही ठिकठिकाणीं ठेविलेलीं होतीं २०. अशा प्रकारच्या त्या अंतःपुरामध्यें शिरतां शिरतांच ताल व शब्दांतील अक्षरें ह्यांचा ज्यांत मेळ आहे असा एकसारखा तेथें सुरू असलेला व विण्याच्या स्वरानें युक्त असलेला मधुर ध्वनि त्याच्या कानीं पडला २१ आणि सौंदर्याच्या व तारुण्याच्या तोऱ्यांत असलेल्या आणि नानाप्रकारच्या आकारांनीं युक्त असलेल्या अनेक स्त्रिया सुग्रीवाच्या अंतःपुरामध्यें त्या महाबलाढ्य लक्ष्मणानें अवलोकन केल्या २२. कुलीन, पुष्पमाला धारण केलेल्या, उत्कृष्ट माला गुंफण्यामध्यें गढून गेलेल्या आणि उत्तम उत्तम भूषणांनीं भूषित झालेल्या स्त्रिया तेथें अवलोकन केल्यावर २३ संतुष्ट, विशेष

श्चापि लक्षयामास लक्ष्मणः २४ कूजितं नूपुराणां च काञ्चीनां निःस्वनं तथा । स निशम्य ततः श्रीमान्सौमित्रिर्लज्जितोभवत् २५ रोषवेगप्रकुपितः श्रुत्वा चाभरणस्वनम् । चकार ज्यास्वनं वीरो दिशः शब्देन पूरयन् २६ चारित्रेण महाबाहुरपकृष्टः स लक्ष्मणः । तस्थावेकान्तमाश्रित्य रामकोपसमन्वितः २७ तेन चापस्वनेनाथ सुग्रीवः प्लवगाधिपः । विज्ञायागमनं त्रस्तः स चचाल वरासनात् २८ अङ्गदेन यथा मह्यं पुरस्तात्प्रतिवेदितम् । सुव्यक्तमेष संप्राप्तः सौमित्रिर्भ्रातृवत्सलः २९ अङ्गदेन समाख्यातो ज्यास्वनेन च वानरः । बुबुधे लक्ष्मणं प्राप्तं मुखं चास्योपशुष्यत ३० ततस्तारां हरिश्रेष्ठः सुग्रीवः प्रियदर्शनाम् । उवाच हितमव्यग्रस्त्रासमसंभ्रान्तमानसः ३१ किं नु रुट्कारणं सुभ्रु प्रकृत्या मृदुमानसः । सरोष इव संप्राप्तो येनायं राघवानुजः ३२ किं पश्यसि कुमारस्य रोषस्थानमनिन्दिते । न खल्वकारणं

गडबडींत नसलेलें आणि साधारणच पोषाख व अलंकार घातलेले सुग्रीवाचे सवकही लक्ष्मणानें अवलोकन केले २४. तदनंतर तोरड्यांचा छुमूछुमू शब्द व कमरपट्यांचा ध्वनि कानीं पडल्यामुळें वैभवशाली सुमित्रापुत्र लक्ष्मण लज्जित झाला २५ आणि भूषणध्वनि कानावर आल्यामुळें अधिकच रोष चढलेला तो वीर लक्ष्मण धनुष्याच्या ध्वनीनें दशदिशा नादित करीत करीत प्रत्यंचेचा टणत्कार करूं लागला २६. सुग्रीवाचे हातून रामकार्य होत नसल्याकारणानें क्रुद्ध झालेला तो महापराक्रमी लक्ष्मण सदाचार लक्ष्यांत आणून अंतःपुरामध्यें प्रवेश न करितां परत फिरला आणि स्त्रीजनरहित अशा एका प्रदेशामध्यें (प्रत्यंचेचा टणत्कार करीत करीत ) उभा राहिला २७. तेव्हां, लक्ष्मणाचें आगमन झालें आहे असें त्या ध्वनीवरून वानरराज सुग्रीवानें जाणिलें आणि त्या ध्वनीनें त्रस्त होऊन तो सुग्रीव आपल्या सिंहासनापासून दूर झाला २८ व " अंगदानें पूर्वी मला कळविल्याप्रमाणें निःसंशय हा भ्रातृवत्सल सुमित्रापुत्र लक्ष्मण प्राप्त झाला आहे ( असा आपल्याशीं विचार करूं लागला )" २९. ह्याप्रमाणें अंगदानें व प्रत्यंचेच्या टणत्कारानें सुग्रीववानराला सुचविलें असतां लक्ष्मण प्राप्त झाला आहे असें त्याला समजलें व तें समजतांक्षणीं त्याच्या तोंडचें पाणी पळालें ३०. तदनंतर भीतीमुळें मनाची धांदल उडून गेलेला तो वानरश्रेष्ठ सुग्रीव दुसऱ्या कामाकडे गुंतून न राहतां मनोहर मुद्रेनें युक्त असलेल्या तारेला आपल्या हिताची गोष्ट विचारूं लागला ३१. ( तो ह्मणाला, ) " हे सुभ्रु, स्वभावतः सौम्य मनानें युक्त असलेल्या पुरुषाला राग येण्याचें काय बरें कारण असावें ? हा रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण

१ जिच्या भिंवया सुंदर आहेत अशी.

कोपमाहरेन्नरपुंगवः ३३ यद्यस्य कृतमस्माभिर्बुध्यसे किंचिदप्रियम् । तद्बुद्ध्या संप्रधार्याशु क्षिप्रमेवाभिधीयताम् ३४ अथवा स्वयमेवैनं द्रष्टुमर्हसि भामिनि । वचनैः सान्त्वयुक्तैश्च प्रसादयितुमर्हसि ३५ त्वद्दर्शने विशुद्धात्मा न स्म कोपं करिष्यति । न हि स्त्रीषु महात्मानः क्वचित्कुर्वन्ति दारुणम् ३६ त्वया सान्त्वैरुपक्रान्तं प्रसन्नेन्द्रियमानसम् । ततः कमलपत्राक्षं द्रक्ष्याम्यहमरिंदमम् ३७ सा प्रस्खलन्ती मदविह्वलाक्षी प्रलम्बकाञ्चीगुणहेमसूत्रा । सलक्षणा लक्ष्मणसंनिधानं जगाम तारा नमिताङ्गयष्टिः ३८ स तां समीक्ष्यैव हरीशपत्नीं तस्थावुदासीनतया महात्मा । अवाङ्मुखोऽभून्मनुजेन्द्रपुत्रः स्त्रीसंनिकर्षाद्विनिवृत्तकोपः ३९ सा पानयोगाच्च निवृत्तलज्जा दृष्टिप्रसादाच्च नरेन्द्रसूनोः । उवाच तारा प्रणयप्रगल्भं वाक्यं महार्थं परिसान्त्वरूपम् ४० किं कोपमूलं मनुजेन्द्रपुत्र कस्ते न संति-

---

कोणत्या कारणामुळें येथें क्रुद्ध होऊन आल्यासारिखा दिसत आहे ? ३२. हे निर्दोष स्त्रिये, ह्या राजपुत्राच्या रोषाचें कारण तुझ्या लक्ष्यांत काय येत आहे ? खरोखर हा पुरुषश्रेष्ठ कधींही विनाकारण क्रोधाचें अवलंबन करणार नाहीं ३३. ह्यास्तव, आमच्या हातून जर कांहीं ह्याचा अपराध झाला असेल तर तो कोणता झाला आहे हें तूं विचार करून सत्वर ठरीव आणि त्याला प्रसन्न करून घेण्याचा उपायही मला सत्वर सांग ३४; अथवा, हे स्त्रिये, तूं स्वतःच त्याची भेट घेऊन सांत्वनयुक्त भाषणांनीं त्याची कृपा संपादन कर ३५. शुद्ध मनानें युक्त असलेला हा लक्ष्मण तूं दृष्टीं पडल्यावर रागावणार नाहीं. कारण, महात्मे कधींही स्त्रियांवर ( विनाकारण ) क्रुद्ध होत नाहींत ३६. तूं सौम्य शब्दांनीं त्याच्याशीं संभाषण करून त्याचीं क्षुब्ध झालेलीं इंद्रियें व मन हीं स्वस्थ केलीं ह्मणजे मी त्या शत्रुदमन करणाऱ्या कमलनयन लक्ष्मणाची भेट घेईन " ३७. ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां मद्यपानाचा मद चढल्यामुळें जिची दृष्टि धुंद झाली आहे, जिचा कमरपट्टा व तो आवळण्याची सोन्याची साखळी हीं दोन्ही लोंबत आहेत आणि स्तनभारामुळें जिचें शरीर नम्र झालेलें आहे, अशी ती सुलक्षणी तारा अडखळत अडखळत लक्ष्मणासमीप गेली असतां ३८ त्या वानरराजाच्या पत्नीला अवलोकन करितांक्षणीं तो महात्मा लक्ष्मण उदासीनपणानें स्तब्ध राहिला. इतकेंच नव्हे; परंतु, स्त्री जवळ आल्यामुळें क्रोधाचा त्याग करून तो राजपुत्र वर पाहीनासा झाला ३९. स्वतः मद्यपान केलें असल्यामुळें आणि राजकुमार लक्ष्मणाची मुद्रा प्रसन्न दिसल्यामुळें ती तारा सौम्य शब्द व महत्त्वाचा अर्थ ह्यांनीं भरलेलें आणि मैत्री कायम करण्यास समर्थ असें भाषण

इति वाङ्गिनिर्देशे । कः शुष्कवृक्षं वनमापतन्तं दवाग्निमासीदति निर्विशङ्कः ४१ स तस्या वचनं श्रुत्वा सान्त्वपूर्वमशङ्कितः । भूयः प्रणयदृष्टार्थं लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् ४२ किमयं कामवृत्तस्ते लुप्तधर्मार्थसंग्रहः । भर्ता भर्तृहिते युक्ते न चैवमवबुध्यसे ४३ न चिन्तयति राज्यार्थं सोस्माञ्छोकपरायणान् । सामान्यपरिषत्तारे काममेवोपसेवते ४४ स मासांश्चतुरः कृत्वा प्रमाणं प्लवगेश्वरः । व्यतीतांस्तान्मदोदग्रो विहरन्नावबुध्यते ४५ न हि धर्मार्थसिद्ध्यर्थं पानमेव प्रशस्यते । पानादर्थश्च कामश्च धर्मश्च परिहीयते ४६ धर्मलोपो महांस्तावत्कृते ह्यप्रतिकुर्वतः । अर्थलोपश्च मित्रस्य नाशे गुणवतो महान् ४७ मित्रं ह्यर्थगुणश्रेष्ठं सत्यधर्मपरायणम् । तद्द्वयं तु परित्यक्तं न तु धर्मे व्यवस्थितम् ४८ तदेवं प्रस्तुते कार्ये कार्यमस्माभिरुत्तरम् । तत्कार्यं.कार्यतत्त्वज्ञे त्वमुदाहर्तुमर्हसि ४९ सा तस्य धर्मार्थसमा-

---

(लक्ष्मणाशीं) करूं लागली ४०. (ती ह्मणाली) "हे राजकुमारा, तुझ्या क्रोधाचें कारण काय ? तुझ्या आज्ञेमध्यें कोण वागत नाहीं ? अरे, शुष्कवृक्षांनीं युक्त असलेलें वन दग्ध करून बसलेल्या दावाग्नीवर कोण बरें निःशंकपणें बसणार आहे ?" ४१. मैत्री कायम राखणें हा ज्यांतील मुख्य उद्देश आहे असें तें तिचें सांत्वनपूर्वक भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मण निर्भयपणें तिला ह्मणाला ४२ "हे भर्तृहिताविषयीं तत्पर असणारे स्त्रिये, धर्म व अर्थ संपादन करण्याचें मुळींच सोडून देऊन हा तुझा भर्ता कामाच्याच मागें लागलेला आहे हें तूं जाणीत नाहींस काय ? ४३. हे तारे, अमात्य व इतरही सभासद ह्यांसहवर्तमान हा केवळ राज्याच्या स्थैर्याकरितांच झटणारा असून कामाचेंच सेवन करीत आहे व शोकाकुल असलेल्या आमची गोष्टही मनामध्यें आणीत नाहीं ४४. चार महिन्यांनीं येण्याचा ह्यानेंच ठराव केला असून ते लोटून गेले तरी मदमत्त होऊन क्रीडा करण्यामध्यें दंग झालेल्या ह्या वानरराज सुग्रीवाच्या तें गांवींही नाहीं ४५. धर्म व अर्थ सिद्धीस जाण्याकरितां केवल मद्यपानच करून राहणें प्रशस्त नाहीं. मद्यपानामुळें धर्म, अर्थ व काम ह्या सर्वांचाच ऱ्हास होतो ४६. उपकार करणाऱ्यावर प्रत्युपकार न करणें ही आधीं मोठीच धर्महानि होत असून गुणवान् मित्राची मैत्री नाहींशी होणें ही मोठीच अर्थहानि होत आहे ४७. मित्रकार्यसंपादन आणि सत्य धर्माविषयीं तत्परता हे दोन गुण मित्राचे ठिकाणीं असणें अवश्य आहे; परंतु, तुझ्या भर्त्यानें ह्या दोन्ही गुणांचा त्याग केला असून मैत्रीपरिपालनरूप धर्मानेंही त्यानें अवलंबन केलेलें नाहीं ४८. तस्मात्; हे कार्यतत्त्वज्ञ तारे, सांप्रत अशी गोष्ट झाली असतांना आमचें ह्यानंतर कर्तव्य काय तें तूं कथन

धियुक्तं निशम्य वाक्यं मधुरस्वभावम् । ताराऽगतार्थे मनुजेन्द्रकार्ये विश्वासयुक्तं तमुवाच भूयः ५० न कोपकालः क्षितिपालपुत्र न चापि कोपः स्वजने विधेयः । त्वदर्थकामस्य जनस्य तस्य प्रमादमप्यर्हसि वीर सोढुम् ५१ कोपं कथं नाम गुणप्रकृष्टः कुमार कुर्यादपकृष्टसत्त्वे । कस्त्वद्विधः कोपवशं हि गच्छेत्सत्त्वावरुद्धस्तपसः प्रसूतिः ५२ जानामि कोपं हरिवीरबन्धोर्जानामि कार्यस्य च कालसङ्गम् । जानामि कार्यं त्वयि यत्कृतं नस्तच्चापि जानामि यदत्र कार्यम् ५३ तच्चापि जानामि तथाविषह्यं बलं नरश्रेष्ठ शरीरजस्य । जानामि यस्मिंश्च जनेवबद्धं कामेन सुग्रीवमसक्तमद्य ५४ न कामतन्त्रे तव बुद्धिरस्ति त्वं वै यथा मन्युवशं प्रपन्नः । न देशकालौ हि यथार्थधर्मावबेक्षते कामरतिर्मनुष्यः ५५ तं कामवृत्तं मम संनिकृष्टं कामाभियोगाच्च विमुक्तलज्जम् । क्षमस्व तावत्परवीरहन्त-

कर" ४९. धर्म व अर्थ ह्यांना धरून असलेलें आणि स्वभावतःच मधुर असलेलें त्याचें तें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीवाच्या हातून सिद्धीस न गेलेलें राजकार्य शेंवटास नेण्याविषयीं निश्चय करून राहिलेल्या त्या लक्ष्मणाला ती तारा पुनरपि ह्मणाली ५० "हे राजपुत्रा, क्रोधाचा हा समय नव्हे आणि स्वजनाचे ठिकाणीं कोप करणेंही योग्य नाहीं; हे वीर, तुझाच मनोरथ सिद्धीस नेण्याची इच्छा धरणाऱ्या त्या सुग्रीवाचा प्रमादही सहन करणें तुला योग्य आहे ५१. हे राजकुमारा, गुणांनीं श्रेष्ठ असलेला पुरुष क्षुद्र प्राण्यावर कसा बरें कोप करील? सत्त्वगुणानें व्याप्त आणि ह्मणूनच केवळ तपाचें स्थान असलेला तुझ्यासारिखा पुरुष कोण बरें क्रोधाधीन होईल? ५२. वानरवीर सुग्रीवाचा मित्र जो राम त्याच्या कोपाचें कारण काय हें मी जाणीत आहें; त्याचें कार्य होण्याला विलंब लागला आहे ही गोष्ट माझ्या लक्ष्यांत आहे; तूं जें आमचें कार्य केलें आहेस तेंही मी समजून आहें आणि ह्यासंबंधानें आह्मीं प्रत्युपकार काय केला पाहिजे तेंही मला माहित आहे ५३. हे पुरुषश्रेष्ठा, कामाचें दुःसह सामर्थ्यही मी ओळखून आहें आणि त्याचप्रमाणें सांप्रत सुग्रीवाचें दुसरीकडे लक्ष्य नसून कामवासनेमुळें तो कोणाचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिला आहे हेंही मला ठाऊक आहे ५४. तूं क्रोधाधीन झाल्याचें दिसत आहे; ह्यावरून कामाचा प्रभाव तुला माहीत नाहीं अशी माझी अटकळ होत आहे. अरे, कामासक्त झालेल्या मनुष्याला देशकालांचें भान रहात नसून धर्म व अर्थ ह्यांचीही पर्वा रहात नाहीं, हें प्रसिद्ध आहे ५५. ह्यास्तव, कामाधीनतेमुळें लाज सोडून माझ्याजवळ असणारा आणि कामाच्याच मागें लागणारा जो तुझा वानरवंशाधिपति भ्राता त्याला, हे शत्रु-

स्त्वद्भ्रातरं वानरवंशनाथम् ५६ महर्षयो धर्मतपोभिरामाः कामानुकामाः प्रतिबद्धमोहाः । अयं प्रकृत्या चपलः कपिस्तु कथं न सज्जेत सुखेषु राजा ५७ इत्येवमुक्त्वा वचनं महार्थं सा वानरी लक्ष्मणमप्रमेयम् । पुनः सखेदं मदविह्वलाक्षी भर्तुर्हितं वाक्यमिदं बभाषे ५८ उद्योगस्तु चिराज्ञप्तः सुग्रीवेण नरोत्तम । कामस्यापि विधेयेन तवार्थप्रतिसाधने ५९ आगता हि महावीर्या हरयः कामरूपिणः । कोटीः शतसहस्राणि नानानगनिवासिनः ६० तदागच्छ महाबाहो चारित्रं रक्षितं त्वया । अच्छलं मित्रभावेन सतां दारावलोकनम् ६१ तारया चाप्यनुज्ञातस्त्वरया वापि चोदितः । प्रविवेश महाबाहुरभ्यन्तरमरिंदमः ६२ ततः सुग्रीवमासीनं काञ्चने परमासने । महार्हास्तरणोपेते ददर्शादित्यसंनिभम् ६३ दिव्याभरणचित्राङ्गं दिव्यरूपं यशस्विनम् । दिव्यमाल्याम्बरधरं महेन्द्रमिव

---

वीरनाशक लक्ष्मणा, सांप्रत क्षमा कर ५६. अरे, धर्म व तपश्चर्या ह्यांचे ठिकाणींच सर्वस्वीं तत्पर राहणारे महर्षिही विषयवासनेनें युक्त झाल्यामुळें स्त्रियांचे ठिकाणीं मोहानें आसक्त होऊन राहिलेले असतात. तेव्हां जातीनेंच चंचल असलेला हा वानर आणि त्यांतूनही राजा असतांना विषयसुखांविषयीं कसा बरें आसक्त होणार नाहीं ? " ५७. गभीर अर्थानें भरलेलें असें हें भाषण अतर्क्य लक्ष्मणाशीं केल्यानंतर मद चढल्यामुळें जिचे डोळे धुंद झाले आहेत अशी ती वानरी भर्त्याला हितावह असें हें खेदपूर्वक भाषण पुनरपि लक्ष्मणाशीं करूं लागली ५८. ( ती ह्मणाली ) " हे पुरुषश्रेष्ठा, कामाचा दास होऊन राहिलेल्याही सुग्रीवानें तुझें कार्य सिद्धीस नेण्याचा उद्योग सुरू करण्याविषयीं कधींच आज्ञा केलेली आहे ५९ आणि त्याप्रमाणें नानाप्रकारच्या पर्वतांवर वास्तव्य करणारे व यथेष्ट रूप धारण करणारे महावीर्यवान् वानर लाखों क्रोडों आलेले आहेत ६०. तस्मात्, हे महापराक्रमी लक्ष्मणा, तूं आंत ये. ( एकाएकीं अंतःपुरांत प्रविष्ट न होण्यानें ) तूं आपलें ब्रीद निष्कलंकपणें राखिलें आहेस. कारण, ( कामविकार मनामध्यें न आणितां ) मित्रबुद्धीनेंच परदारा अवलोकन करणें हेंच सज्जनांचें ब्रीद होय " ६१. ह्याप्रमाणें तारेनें अनुज्ञा दिल्यामुळें आणि रामाची आज्ञा सत्वर सिद्धीस नेण्याविषयींही उत्सुक झाल्यामुळें तो शत्रुदमन करणारा महापराक्रमी लक्ष्मण अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला ६२ आणि आंत प्रविष्ट झाल्यानंतर मोठें मूल्यवान् आस्तरण ज्यावर घातलें आहे अशा सुवर्णाच्या उत्कृष्ट सिंहासनावर बसलेला सूर्यासारिखा तेजस्वी सुग्रीव त्यानें अवलोकन केला ६३. दिव्य अलंकारांनीं ज्याचें शरीर भूषित झालेलें आहे, दिव्य पुष्पें आणि

दुर्जयम् ६४ दिव्याभरणमालाभिः प्रमदाभिः समन्ततः । संरब्धतरर-क्ताक्षो बभूवान्तकसंनिभः ६५ रुमां तु वीरः परिरभ्य गाढं वरासनस्थो वरहेमवर्णः । ददर्श सौमित्रिमदीनसत्त्वं विशालनेत्रः स विशालनेत्रम् ६६ [ १४५७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्कि-न्धाकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥३३॥

तमप्रतिहतं क्रुद्धं प्रविष्टं पुरुषर्षभम् । सुग्रीवो लक्ष्मणं दृष्ट्वा बभूव व्यथि-तेन्द्रियः १ क्रुद्धं निःश्वसमानं तं प्रदीप्तमिव तेजसा । भ्रातुर्व्यसनसंतप्तं दृष्ट्वा दशरथात्मजम् २ उत्पपात हरिश्रेष्ठो हित्वा सौवर्णमासनम् । महा-न्महेन्द्रस्य यथा स्वलंकृत इव ध्वजः ३ उत्पतन्तमनूत्पेतू रुमाप्रभृतयः स्त्रियः । सुग्रीवं गगने पूर्णं चन्द्रं तारागणा इव ४ संरक्तनयनः श्रीमा-न्संचचार कृताञ्जलिः । बभूवावस्थितस्तत्र कल्पवृक्षो महानिव ५

---

वस्त्रें ज्यानें धारण केलेलीं आहेत, ज्याचें रूपही दिव्य आहे आणि इंद्राप्रमाणें जो अजिंक्य आहे असा तो यशस्वी सुग्रीव दिव्य अलंकार व माला धारण केलेल्या तरुणी स्त्रियांनीं आसमंताद्भागीं परिवेष्टित असल्याचें अवलोकन करून लक्ष्मणाचे नेत्र अधिकच क्षुब्ध व आरक्तवर्ण दिसूं लागले आणि तो तर साक्षात् मृत्यूप्रमाणेंच भासूं लागला ६४,६५. असो. ( तारा लक्ष्मणाला आंत घेऊन आली तरी ) उत्कृष्ट सुव-र्णासारिखी कांति आणि विशाल नेत्र ह्यांनीं युक्त असलेला तो वीर सुग्रीव रुमेलाच दृढ आलिंगन देऊन सिंहासनावर बसला होता व त्यानें तेथूनच विशालनयन महा-शय लक्ष्मणाला अवलोकन केलें ६६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रा-मायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥३३॥

—कोणाचीही आडकाठी न होतां आंत प्रविष्ट झालेल्या त्या पुरुषश्रेष्ठ क्रुद्ध लक्ष्मणाला अवलोकन करून सुग्रीवाची मनामध्यें गाळण उडून गेली १ आणि तेजानें जसा कांहीं प्रदीप्त असून भ्रात्याच्या दुःखानें संतप्त झाल्यामुळें सुस्कारे टाकीत असलेल्या त्या क्रुद्ध दशरथपुत्राला अवलोकन करितांक्षणीं २ उत्तम प्रकारें भूषित केलेल्या प्रचंड इंद्रध्वजाप्रमाणें दिसत असलेला तो वानरश्रेष्ठ सुग्रीव सोन्याचें सिंहासन सोडून देऊन उठला ३ व आकाशामध्यें असलेल्या पूर्णचंद्राचे मागोमाग जाणाऱ्या नक्षत्रपंक्तीच कीं काय अशा त्या रुमाप्रभृति स्त्रियाही सुग्रीवानें सिंहासनावरून उडी टाकितांक्षणीं त्याच्या मागोमाग पटापट उड्या टाकूं लागल्या ४. आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त अस-लेला तो वैभवशाली सुग्रीव सिंहासनावरून खालीं उतरतांक्षणीं हात जोडून लक्ष्म-णाचे संमुख आला असतां तो लक्ष्मण मोठ्या कल्पवृक्षाप्रमाणें तेथें तसाच उभा

रुमाद्वितीयं सुग्रीवं नारीमध्यगतं स्थितम् । अब्रवील्लक्ष्मणः क्रुद्धः
सतारं शशिनं यथा ६ सत्त्वाभिजनसंपन्नः सानुक्रोशो जितेन्द्रियः ।
कृतज्ञः सत्यवादी च राजा लोके महीयते ७ यस्तु राजा स्थितो धर्मे
मित्राणामुपकारिणाम् । मिथ्या प्रतिज्ञां कुरुते को नृशंसतरस्ततः ८
शतमश्वानृते हन्ति सहस्रं तु गवानृते । आत्मानं स्वजनं हन्ति पुरुषः
पुरुषानृते ९ पूर्वं कृतार्थो मित्राणां न तत्प्रतिकरोति यः । कृतघ्नः सर्व-
भूतानां स वध्यः प्लवगेश्वर १० गीतोयं ब्रह्मणा श्लोकः सर्वलोकन-
मस्कृतः । दृष्ट्वा कृतघ्नं क्रुद्धेन तन्निबोध प्लवङ्गम ११ गोघ्ने चैव सुरापे
च चौरे भग्नव्रते तथा । निष्कृतिर्विहिता सद्भिः कृतघ्ने नास्ति निष्कृतिः १२
अनार्यस्त्वं कृतघ्नश्च मिथ्यावादी च वानर । पूर्वं कृतार्थो रामस्य न
तत्प्रतिकरोषि यत् १३ ननु नाम कृतार्थेन त्वया रामस्य वानर । सीताया

---

राहिला ५ आणि तारांनीं युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें रुमेसहवर्तमान स्त्रियांच्या मध्यें असलेल्या सुग्रीवाला तो क्रुद्ध लक्ष्मण ह्मणाला ६ " सत्त्वस्थ, कुलीन, दयाळू, जितेंद्रिय, कृतज्ञ आणि सत्यवादी असा जो राजा असल त्याची जगतामध्यें मानमान्यता होत असते ७. जो राजा अधर्माचें अवलंबन करून राहिलेला असतो आणि उपकार करणाऱ्या मित्रांशीं केलेली प्रतिज्ञा शेंवटास नेत नाहीं त्यापेक्षां अधिक दुष्ट कोण बरें आढळणार आहे ? ८. एका अश्वाकरितां असत्य भाषण केलें असतां शंभर अश्वांचा वध केल्याचें आणि एका गाईकरितां अनृत भाषण केलें असतां सहस्र गाईंचा वध केल्याचें पातक पुरुषाला लागत असतें आणि दुसऱ्या पुरुषाशीं केलेली कांहीं प्रतिज्ञा शेंवटास न नेली तर प्रतिज्ञा करणारा पुरुष स्वतःच्या व स्वजनांच्या उत्तम गतीचा विघात करितो ९. हे वानरराजा, मित्रांच्या हातून पूर्वीं स्वतःचें कार्य झालें असतांनाही त्यांच्यावर जो ( प्रतिज्ञा केल्याप्रमाणें ) प्रत्युपकार करीत नाहीं तो कृतघ्न असून सर्व लोकांना वध्य आहे १०. हे वानरा, कृतघ्नाला अवलोकन करून क्रुद्ध झालेल्या ब्रह्मदेवानें हा एक सर्व लोकांना मान्य असलेला श्लोक उच्चारिलेला आहे ११. " गोवध करणाऱ्याला, सुरापान करणाऱ्याला, ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणाऱ्याला आणि व्रतभंग करणाऱ्यालाही धर्मशास्त्रवेत्त्या सज्जनांनीं निष्कृति सांगितलेली आहे; परंतु, कृतघ्नाला प्रायश्चित सांगितलेले नाहीं (हा तो श्लोक होय.)१२. तेव्हां रामानें पूर्वीं तुझें कार्य केलें असतांही ज्यांअर्थीं तूं त्याची ( बोलल्याप्रमाणें ) फेड करीत नाहींस त्याअर्थीं, हे वानरा, तूं दुष्ट, कृतघ्न व असत्यवादी आहेस १३. हे वानरा, अरे, रामाच्या हातून जर तुझें कार्य झालेलें आहे तर प्रत्युपकार कर-

मार्गणे यत्नः कर्तव्यः कृतमिच्छता १४ स त्वं ग्राम्येषु भोगेषु सक्तो मिथ्याप्रतिश्रवः । न त्वां रामो विजानीते सर्पं मण्डूकराविणम् १५ महाभागेन रामेण पापः करुणवेदिना । हरीणां प्रापितो राज्यं त्वं दुरात्मा महात्मना १६ कृतं चेन्नापि जानीषे राघवस्य महात्मनः । सद्यस्त्वं निशितैर्बाणैर्हतो द्रक्ष्यसि वालिनम् १७ न स संकुचितः पन्था येन वाली हतो गतः । समये तिष्ठ सुग्रीव मा वालिपथमन्वगाः १८ न नूनमिक्ष्वाकुवरस्य कार्मुकाच्छरांश्च तान्पश्यसि वज्रसंनिभान् । ततः सुखं नाम निषेवसे सुखी न रामकार्यं मनसाप्यवेक्षसे १९ [१४७१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥३४॥

तथा ब्रुवाणं सौमित्रिं प्रदीप्तमिव तेजसा । अब्रवील्लक्ष्मणं तारा ताराधिपनिभानना १ नैवं लक्ष्मण वक्तव्यो नायं परुषमर्हति । हरीणामीश्वरः

---

ण्याची इच्छा धरून सीतेचा शोध लावण्याविषयीं तूं यत्न करणें खरोखर अवश्य असतांना १४ खोटी प्रतिज्ञा करणारा तूं ग्राम्य अशा विषयोपभोगांचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिला आहेस; परंतु, बेडूक पकडण्याकरितां त्याच्यासारिखा शब्द करणाऱ्या सर्पाप्रमाणें तूं वंचक आहेस ही गोष्ट रामाला ठाऊक नाहीं १५. अरे, तूं वास्तविक पापी व दुष्ट असूनही परदुःख जाणणाऱ्या महाभाग्यवान् महात्म्या रामानें तुला वानरांचें राज्य प्राप्त करून दिलें आहे १६. तेव्हां महात्म्या राघवाचा उपकार जर तूं जाणणार नाहींस तर तीक्ष्ण बाणांच्या योगानें वध पावून तूं आतांच्या आतांच वालीची भेट घेशील १७. वाली वध पावून ज्या मार्गानें चालता झाला तो मार्ग कांहीं अगदींच संकुचित नाहीं ( वालीच्या बरोबर तुलाही जातां येईल इतका तो विस्तीर्ण आहे. तात्पर्य, वालीचा वध करण्याला ज्याप्रमाणें मुळींच वेळ लागला नाहीं त्याप्रमाणें तुझाही वध होण्याला कांहीं वेळ लागेल ही गोष्ट तूं सोडून दे.) तस्मात्, हे सुग्रीवा, तूं जो संकेत केला आहेस त्याला अनुसरून वाग आणि वालीच्या मार्गाचें अवलंबन करूं नकोस १८. अरे, इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ रामाचें धनुष्यापासून सुटलेलें वज्रतुल्य बाण खरोखर तुझ्या दृष्टीं पडले नाहींत ह्मणूनच तूं खुशाल चैनी बनून विषयसुखाचा उपभोग घेत पडला आहेस आणि रामकार्य करण्याचें मनांतही आणीत नाहींस १९. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चौतिसावा सर्ग समाप्त झाला ॥३४॥

तेजानें जसा कांहीं जळत असलेला तो सुमित्रापुत्र लक्ष्मण तशा प्रकारें भाषण करीत असतांना चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली तारा त्याला ह्मणाली १

श्रोतुं तव वक्त्राद्विशेषतः २ नैवाकृतज्ञः सुग्रीवो न शठो नापि दारुणः ।
नैवानृतकथो वीर न जिह्मश्च कपीश्वरः ३ उपकारं कृतं वीरो नाप्ययं
विस्मृतः कपिः । रामेण वीर सुग्रीवो यदन्यैर्दुष्करं रणे ४ रामप्रसादा-
त्कीर्तिं च कपिराज्यं च शाश्वतम् । प्राप्तवानिह सुग्रीवो रुमां मां च
परंतप ५ सुदुःखशयितः पूर्वं प्राप्येदं सुखमुत्तमम् । प्राप्तकालं न जानीते
विश्वामित्रो यथा मुनिः ६ घृताच्यां किल संसक्तो दश वर्षाणि लक्ष्मण ।
अहो मन्यत धर्मात्मा विश्वामित्रो महामुनिः ७ स हि प्राप्तं न जानीते
कालं कालविदां वरः । विश्वामित्रो महातेजाः किं पुनर्यः पृथग्जनः ८
देहधर्मगतस्यास्य परिश्रान्तस्य लक्ष्मण । अवितृप्तस्य कामेषु रामः क्षन्तु-
मिहार्हति ९ न च रोषवशं तात गन्तुमर्हसि लक्ष्मण । निश्चयार्थमवि-
ज्ञाय सहसा प्राकृतो यथा १० सत्त्वयुक्ता हि पुरुषास्त्वद्विधाः पुरुष-
र्षभ । अविमृश्य न रोषस्य सहसा यान्ति वश्यताम् ११ प्रमादये

"हे लक्ष्मणा, ह्या वानरराजाशीं तूं ह्याप्रमाणें कठोर भाषण करूं नकोस. कठोर भाषण ऐकून घेण्याला आणि त्यांतूनही विशेषतः तुझ्या मुखांतून निघालेलें कठोर भाषण ऐकून घेण्याला हा पात्र नाहीं २. हे वीरा, वानरराज सुग्रीव कृतघ्न नाहीं; शठ नाहीं, क्रूर नाहीं, असत्य भाषण करणारा नाहीं आणि गैर मार्गानें चालणाराही नाहीं ३. हे वीरा, संग्रामामध्यें इतरांना दुर्घट असें जें कार्य रामानें केलें आहे तो झालेला रामाचा उपकार हा वीर वानर विसरलाही नाहीं ४. हे शत्रुतापना लक्ष्मणा, रामाच्या प्रसादामुळेंच कीर्ति, रुमा, मी आणि अक्षय्य वानरराज्य हीं सुग्रीवाला इहलोकीं प्राप्त झालेलीं आहेत. ५ पूर्वी अतिशयच दुःख भोगिलेल्या ह्या सुग्रीवाला हें उत्कृष्ट सुख मिळाल्यामुळें विश्वामित्रमुनींप्रमाणें हा ग्राम्य सुखांत दंग झाला आहे आणि ह्मणूनच ह्याला प्रतिज्ञा शेवटास नेण्याचा समय प्राप्त झाल्याचें भान राहिलेलें नाहीं ६. हे लक्ष्मणा, घृताचीनामक अप्सरेचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिलेल्या धर्मात्म्या विश्वामित्र महामुनींना दहा वर्षें लोटलेलीं एका दिवसाप्रमाणें भासलीं ७. सारांश, कालवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या महातेजस्वी विश्वामित्रमुनींना जर प्राप्त झालेल्या कालाचें भान राहिलें नाहीं तर जो बोलून चालून क्षुद्र योनींतील सुग्रीव त्याची अशी अवस्था झाली ह्यांत आश्चर्य तें काय? ८. हे लक्ष्मणा, विषयोपभोगाविषयीं तृप्त न झाल्यामुळें मैथुनरूप देहधर्मामध्यें गढून राहिलेल्या ह्या खिन्न सुग्रीवाला रामानें क्षमा करावी ९. बा लक्ष्मणा, खरी गोष्ट समजून न घेतां ज्याप्रमाणें एकादा साधारण मनुष्य क्रोधाधीन होतो त्याप्रमाणें तूं क्रोधाधीन होऊं नको १०. कारण, हे पुरुषश्रेष्ठा,

त्वां धर्मज्ञ सुग्रीवार्थे समाहिता । महाक्रोपसमुत्पन्नः संरम्भस्त्यज्यतामयम् १२ रुमां मां चाङ्गदं राज्यं धनधान्यपशूनि च । रामप्रियार्थं सुग्रीवस्त्यजेदिति मतिर्मम १३ समानेष्यति सुग्रीवः सीतया सह राघवम् । शशाङ्कमिव रोहिण्या हत्वा तं राक्षसाधमम् १४ शतकोटिसहस्राणि लङ्कायां किल रक्षसाम् । अयुतानि च षट्त्रिंशत्सहस्राणि शतानि च १५ अहत्वा तांश्च दुर्धर्षान्राक्षसान्कामरूपिणः । अशक्यं रावणं हन्तुं येन सा मैथिली हृता १६ ते न शक्या रणे हन्तुमसहायेन लक्ष्मण । रावणः क्रूरकर्मा च सुग्रीवेण विशेषतः १७ एवमाख्यातवान्वाली स ह्यभिज्ञो हरीश्वरः । आगमस्तु न मे व्यक्तः श्रवात्तस्य ब्रवीम्यहम् १८ त्वत्सहायनिमित्तं हि प्रेषिता हरिपुंगवाः । आनेतुं वानरान्युद्धे सुबहून्हरिपुंगवान् १९ तांश्च प्रतीक्षमाणोऽयं विक्रान्तान्सुमहाबलान् । राघवस्यार्थसिद्ध्यर्थं न निर्याति हरीश्वरः २० कृता सुसंस्था सौमित्रे

---

तुझ्यासारखे सत्त्वगुणसंपन्न पुरुष विचार केल्यावांचून एकाएकीं क्रोधाच्या तावडींत सांपडत नाहींत ११. तस्मात्, हे धर्मवेत्त्या, सुग्रीवाचें हित करण्याविषयीं तत्पर असलेली ही मी तुम्ही प्रार्थना करीत आहें. ह्यास्तव, ह्या क्रोधजन्य प्रचंड क्षोभाचा तूं त्याग कर १२. रामाचें प्रिय करण्याकरितां रुमा, मी, अंगद, राज्य, धन, धान्य व पशु ह्या सर्वांचाही सुग्रीव त्याग करील असें मला वाटतें १३. त्या राक्षसाधमाचा वध करून रोहिणीशीं संमत झालेल्या चंद्राप्रमाणें सुग्रीव रामाचा सीतेशीं समागम करवून देईल १४. १ महापद्म, ३ लक्ष आणि ९९ हजार ६ शें ( ह्मणजे १०००००३९९६०० ) राक्षस लंकेमध्यें आहेत १५. तेव्हां त्या यथेष्ट रूप धारण करणाऱ्या अजिंक्य राक्षसांचा वध केल्यावांचून सीतेचा अपहार केलेल्या रावणाचा वध होणें शक्य नाहीं १६. आणि, हे लक्ष्मणा, त्या राक्षसांचा संग्रामामध्यें कोणाचें साहाय्य नसेल तर रामाच्या हातून वध होणें शक्य नाहीं आणि रावणही क्रूरकर्मी आहे. तस्मात्, रामाला सुग्रीवाच्या मदतीची विशेषच जरूर आहे १७. ह्याप्रमाणें मला वालीनें सांगितलें होतें; तो वानरराज माहीतगार होता हा प्रकार मला कांहीं पुरतासा माहित नाहीं; त्या वालीपासून ऐकिलें असल्यामुळें मी सांगत आहें १८. तुला साहाय्य करण्याकरितां ह्मणजे रावणाशीं होणाऱ्या युद्धामध्यें तुझ्या बाजूला असंख्य मोठे मोठे वानर आणण्याकरितां वानरश्रेष्ठ बाहेर पाठविले आहेत १९ आणि रामाचा मनोरथ परिपूर्ण व्हावा एतदर्थ त्या अत्यंत महाबलाढ्य व पराक्रमी वानरांची हा वानरराज सुग्रीव प्रतीक्षा करीत आहे व ह्मणून इतक्यांतच

सुग्रीवेण पुरा यथा । अद्य तैर्वानरैः सर्वैरागन्तव्यं महाबलैः २१ ऋक्ष-
कोटिसहस्राणि गोलाङ्गूलशतानि च । अद्य त्वामुपयास्यन्ति जहि
कोपमरिंदम । कोट्योनेकास्तु काकुत्स्थ कपीनां दीप्ततेजसाम् २२ तव
हि मुखमिदं निरीक्ष्य कोपात्क्षतजसमे नयने निरीक्षमाणाः । हरिवरव-
निता न यान्ति शान्तिं प्रथमभयस्य हि शङ्किताः स्म सर्वाः २३ [१४९७]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे पञ्च-
त्रिंशः सर्गः ॥ ३५ ॥

इत्युक्तस्तारया वाक्यं प्रश्रितं धर्मसंहितम् । मृदुस्वभावः सौमित्रिः
प्रतिजग्राह तद्वचः १ तस्मिन्प्रतिगृहीते तु वाक्ये हरिगणेश्वरः । लक्ष्म-
णात्सुमहत्त्रासं वस्त्रं क्लिन्नमिवात्यजत् २ ततः कण्ठगतं माल्यं चित्रं बहु-
गुणं महत् । चिच्छेद विमदश्चासीत्सुग्रीवो वानरेश्वरः ३ स लक्ष्मणं
भीमबलं सर्ववानरसत्तमः । अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं सुग्रीवः संप्रहर्षयन् ४

---

हा बाहेर पडत नाहीं २०. हे लक्ष्मणा, सुग्रीवानें ज्याप्रमाणें वानर येथें येण्याची कालमर्यादा करून ठविली आहे त्याप्रमाणें ते सर्वही महाबलाढ्य वानर आज येथें येतील २१. हे शत्रुदमना, हजार कोट ऋक्ष आणि शेंकडों गोलांगूल आज तुझ्या-कडे येतील; तूं क्रोधाचा त्याग कर. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना लक्ष्मणा, उज्ज्वल तेजानें युक्त असे कोट्यावधि वानर सुग्रीवाचे ताब्यांत आहेत २२. हें तुझें मुख आणि कोपामुळें रक्तासारिखे लाल झालेले हे तुझे नेत्र दृष्टीं पडल्यापासून मोठमोठ्या वानर-स्त्रियांचीं मनें अस्वस्थ झालेलीं आहेत. कारण, वालीचा वधरूप जें कृत्य तुझ्या ज्येष्ठ भ्रात्यानें केलें आहे तें लक्ष्यांत आणून आह्मी सर्वही भयभीत झालों आहों आणि सुग्रीवाचीही तुझ्या हातून तीच अवस्था होईल कीं काय अशी आह्मांला शंका वाटत आहे" २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण संज्ञक आदि-काव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पास्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

ह्याप्रमाणें तारेनें धर्माला अनुसरून लक्ष्मणाशीं विनययुक्त भाषण केलें असतां स्वभावानें सौम्य असलेल्या लक्ष्मणानें तिचें तें बोलणें ऐकून घेतलें १ आणि तें तिचें भाषण लक्ष्मणाला मान्य झाल्यावर वानरसमूहाधिपति सुग्रीवानें, अंगावरील ओलें वस्त्र ज्याप्रमाणें टाकून देतात त्याप्रमाणें, लक्ष्मणापासून वाटत असलेली फारच मोठी भीति टाकून दिली २. तदनंतर कंठामध्यें असलेली मोठी व अनेक पदरी, अद्भुत पुष्प-माला वानरराज सुग्रीवानें तोडून टाकिली व त्यामुळें त्याचा विषयमद लगेच नाहींसा झाला ३. तेव्हां सर्व वानरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या सुग्रीवानें भयंकर शक्तीनें युक्त अस-

प्रनष्टा श्रीश्च कीर्तिश्च कपिराज्यं च शाश्वतम् । रामप्रसादात्सौमित्रे पुनश्चाप्तमिदं मया ५ कः शक्तस्तस्य देवस्य ख्यातस्य स्वेन कर्मणा । तादृशं प्रतिकुर्वीत अंशेनापि नृपात्मज ६ सीतां प्राप्स्यति धर्मात्मा वधिष्यति च रावणम् । सहायमात्रेण मया राघवः स्वेन तेजसा ७ सहायकृत्यं किं तस्य येन सप्त महाद्रुमाः । गिरिश्च वसुधा चैव बाणेनैकेन दारिताः ८ धनुर्विस्फारयाणस्य यस्य शब्देन लक्ष्मण । सशैला कम्पिता भूमिः सहायैः किं नु तस्य वै ९ अनुयात्रां नरेन्द्रस्य करिष्येऽहं नरर्षभ । गच्छतो रावणं हन्तुं वैरिणं सपुरःसरम् १० यदि किंचिदतिक्रान्तं विश्वासात्प्रणयेन वा । प्रेष्यस्य क्षमितव्यं मे न कश्चिन्नापराध्यति ११ इति तस्य ब्रुवाणस्य सुग्रीवस्य महात्मनः । अभवल्लक्ष्मणः प्रीतः प्रेम्णा चेदमुवाच ह १२ सर्वथा हि मम भ्राता सनाथो वानरेश्वर । त्वया नाथेन सुग्रीव प्रश्रितेन विशेषतः १३ यस्ते प्रभावः सुग्रीव यच्च ते शौचमीदृ-

---

लेल्या त्या लक्ष्मणाला हर्ष उत्पन्न करीत करीत विनययुक्त शब्दांनीं भाषण केलें ४ " हे लक्ष्मणा, वैभव, कीर्ति आणि अक्षय्य वानरराज्य हें सर्व नाहींसें झालें होतें; परंतु, रामाच्या कृपेमुळें मला हें पुनरपि प्राप्त झालें ५. तेव्हां, हे राजकुमारा, स्वपराक्रमानें प्रख्यात असलेल्या त्या देवावतारी रामाच्या उपकाराची तशा प्रकारें फेड अंशतः तरी करण्यास कोण समर्थ आहे ? ६. माझें एक नांवाला मात्र सहाय्य त्याला होणार आहे; परंतु, वास्तविक विचार केला असतां तो धर्मात्मा रघुवंशज राम स्वतः- च्याच तेजानें रावणाचा वध करील आणि सीता प्राप्त करून घेईल ७. अरे, ज्यानें एकाच बाणानें सात प्रचंड वृक्ष पर्वत व पृथ्वी हीं विदीर्ण केलीं त्याला दुसऱ्याच्या साहाय्याचा खरोखर काय बरें उपयोग होणार आहे ? ८. हे लक्ष्मणा, जो धनुष्य ओढूं लागला असतां ज्याच्या ध्वनीनें भूमि पर्वतांसहवर्तमान कंपित झाली त्याला इतर सहाय्य करणाऱ्यांची काय बरें गरज आहे ? ९. तथापि, हे पुरुषश्रेष्ठा, युद्धामध्यें पुढारीपणा करणाऱ्या इतर राक्षसांसहवर्तमान शत्रु रावणाचा वध करण्यास राजा राम निघाला असतां त्याच्या मागोमाग मी येणार १०. ह्यास्तव, हा स्वभावाचा सौम्य आहे ह्या विश्वासामुळें किंवा सलगीमुळें ह्या दासाचा जर कांहीं अपराध झाला असेल तर तो क्षमा करावा. कारण, हातून अपराध घडणारच नाहीं असा कोणीही नाहीं " ११. ह्याप्रमाणें तो महात्मा सुग्रीव बोलूं लागला असतां लक्ष्मण संतुष्ट झाला आणि प्रेमानें त्याला ह्मणाला १२ " हे वानरराज सुग्रीवा, तूं नाथ प्राप्त झाल्यामुळें आणि विशेषतः विनयसंपन्न नाथ प्राप्त झाल्यामुळें माझा

शम् । अर्हस्त्वं कपिराज्यस्य श्रियं भोक्तुमनुत्तमाम् १४ सहायेन तु सुग्रीव त्वया रामः प्रतापवान् । वधिष्यति रणे शत्रूनचिरान्नात्र संशयः १५ धर्मज्ञस्य कृतज्ञस्य सङ्ग्रामेष्वनिवर्तिनः । उपपन्नं च युक्तं च सुग्रीव तव भाषितम् १६ दोषज्ञः प्रतिसामर्थ्ये कोन्यो भाषितुमर्हति । वर्जयित्वा मम ज्येष्ठं त्वां च वानरसत्तम १७ सदृशश्चासि रामेण विक्रमेण बलेन च । सहायो दैवतैर्दत्तश्चिराय हरिपुंगव १८ किं तु शीघ्रमितो वीर निष्क्रम त्वं मया सह । सान्त्वयस्व वयस्यं च भार्याहरणदुःखितम् १९ यच्च शोकाभिभूतस्य दृष्ट्वा रामस्य भाषितम् । मया त्वं परुषाण्युक्तस्तत्क्षमस्व सखे मम २० [ १५१७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

एवमुक्तस्तु सुग्रीवो लक्ष्मणेन महात्मना । हनूमन्तं स्थितं पार्श्वे वचनं चेदमब्रवीत् १ महेन्द्रहिमवद्विन्ध्यकैलासशिखरेषु च । मन्दरे पाण्डुशिखरे पञ्चशैलेषु ये स्थिताः २ तरुणादित्यवर्णेषु भ्राजमानेषु नित्यशः ।

---

भ्राता रामचंद्र खरोखर आज सर्वप्रकारें सनाथ झालेला आहे १३. हे सुग्रीवा, तुझा प्रभाव आणि अशा प्रकारचें तुझें हें निर्मल आचरण लक्ष्यांत घेतलें असतां तूं वानरराज्याच्या अनुपम वैभवाचा उपभोग घेण्यास योग्यच आहेस १४. हे सुग्रीवा, तुझें साहाय्य मिळाल्यामुळें राम प्रतापी होईल आणि संग्रामामध्यें लवकरच शत्रूंचा वध करील ह्यांत शंका नाहीं १५. हे सुग्रीवा, धर्मज्ञ, कृतज्ञ आणि समरांगणांतून परत न फिरणाऱ्या तुला हें सयुक्तिक भाषण योग्यच आहे १६. हे वानरश्रेष्ठा, माझा ज्येष्ठ भ्राता आणि तूं ह्यांशिवाय दुसरा कोण बरें समंजस पुरुष दुसऱ्याच्या सामर्थ्याविषयीं प्रशंसा करणार आहे? १७. हे वानरश्रेष्ठा, बल व पराक्रम ह्यांनीं तूं रामाची बरोबरी करणारा आहेस आणि देवतांनीं तुला चिरकाल सौहाय्यकर्ता ह्मणून रामाचे स्वाधीन केलेला आहे १८. तथापि, हे वीरा, माझ्याबरोबर तूं येथून लवकर बाहेर नीघ आणि भार्येचा अपहार झाल्यामुळें दुःखित झालेल्या आपल्या मित्राचें सांत्वन कर व शोकाकुल झालेल्या रामाचें भाषण लक्ष्यांत आणून मीं जे कठोर शब्द तुला उद्देशून उच्चारिले त्यांची, हे मित्रा, मला क्षमा कर १९, २०. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रारामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें सुग्रीवाशीं भाषण केलें असतां तो सुग्रीव शेजारीं असलेल्या हनूमानाला ह्मणाला १ " महेंद्र, हिमालय, विंध्य व कैलास ह्यांचीं शिखरें

पर्वतेषु समुद्रान्ते पश्चिमस्यां तु ये दिशि ३ आदित्यभवने चैव गिरौ संध्याभ्रसंनिभे । पद्माचलवनं भीमाः संश्रिता हरिपुंगवाः ४ अञ्जनाम्बुदसंकाशाः कुञ्जरेन्द्रमहौजसः । अञ्जने पर्वते चैव ये वसन्ति प्लवंगमाः ५ महाशैलगुहावासा वानराः कनकप्रभाः । मेरुपार्श्वगताश्चैव ये च धूम्रगिरिं श्रिताः ६ तरुणादित्यवर्णाश्च पर्वते ये महारुणे । पिबन्तो मधु मैरेयं भीमवेगाः प्लवंगमाः ७ वनेषु च सुरम्येषु सुगन्धिषु महत्सु च । तापसाश्रमरम्येषु वनान्तेषु समन्ततः ८ तांस्तांस्त्वमानय क्षिप्रं पृथिव्यां सर्ववानरान् । सामदानादिभिः कल्यैर्वानरैर्वेगवत्तरैः ९ प्रेषिताः प्रथमं ये च मयाज्ञाता महाजवाः । त्वरणार्थं तु भूयस्त्वं संप्रेषय हरीश्वरान् १० ये प्रसक्ताश्च कामेषु दीर्घसूत्राश्च वानराः । इहानयस्व ताञ्छीघ्रं सर्वानेव कपीश्वरान् ११ अहोभिर्दशभिर्ये च नागच्छन्ति ममाज्ञया । हन्तव्यास्ते दुरात्मानो राजशासनदूषकाः १२ शतान्यथ सह-

---

आणि श्वेतवर्ण शिखरांनीं युक्त असलेला मंदर अशा पांच पर्वतांवर जे आहेत २, बालसूर्यासारिख्या आरक्तवर्ण व समुद्राच्या तीरीं पश्चिम दिशेला नेहमीं झळकत असलेल्या पर्वतांचे ठिकाणीं जे वास्तव्य करीत आहेत ३, सायंकालसमयीं पश्चिम दिशेस दिसणाऱ्या अभ्राप्रमाणें आरक्तवर्ण असलेल्या उदयाचलावर ज्यांचें वास्तव्य आहे, पद्माचलाच्या वनाचा आश्रय करून जे भयंकर वानरश्रेष्ठ राहिलेले आहेत ४, कांतीनें नीलमेघांप्रमाणें असून गजेंद्रांप्रमाणें महाबलाढ्य असलेले जे वानर अंजनपर्वतावर रहात आहेत ५, सुवर्णासारिखे देदीप्यमान असे जे वानर मोठमोठ्या पर्वतांच्या गुहांमध्यें वस्ती करून राहिलेले आहेत, मेरुपर्वतासमीप जे रहात आहेत, धूम्रपर्वताचा ज्यांनीं आश्रय केलेला आहे ६, कांतीनें बालसूर्यासारिखे असून प्रचंड वेग धारण करणारे असे जे वानर मैरेय मद्य पीत महारुणपर्वतावर राहिले आहेत ७ आणि अत्यंत रमणीय व सुगंधी अशा मोठमोठ्या वनांतून व तापशांच्या आश्रमामुळें मनोहर बनलेल्या वनप्रदेशांतून सर्व बाजूंनीं ज्यांनीं तळ दिलेला आहे ८ अशा पृथ्वींतील ठिकठिकाणच्या सर्व वानरांना तूं, पूर्वीं पाठविलेल्या वानरांपेक्षां शीघ्र गमन करणारे दुसरे वानर पाठवून आणि सामदानप्रभृति योग्य उपाय योजण्याविषयीं त्यांना सांगून, सत्वर येथें जमीव ९. मोठे वेगवान् म्हणून जे मला माहीत होते ते मीं प्रथम पाठविलेच आहेत. तेव्हां आतां त्यांना त्वरा करण्याकरितां तूं आणखीही श्रेष्ठ श्रेष्ठ वानर तिकडे पाठवून दे १०. विषयोपभोगांविषयीं आसक्त आणि चेंगट असे जे कोणी असतील त्या सर्व वानरश्रेष्ठांना तूं सत्वर इकडे घेऊन ये ११. दहा दिवसांत माझ्या

आणि कोट्यश्च मम शासनात् । प्रयान्तु कपिसिंहानां निदेशे मम ये
स्थिताः १३ मेघपर्वतसंकाशाश्छादयन्त इवाम्बरम् । घोररूपाः कपि-
श्रेष्ठा यान्तु मच्छासनादितः १४ ते गतिज्ञा गतिं गत्वा पृथिव्यां सर्व-
वानराः । आनयन्तु हरीन्सर्वांस्त्वरिताः शासनान्मम १५ तस्य वानर-
राजस्य श्रुत्वा वायुसुतो वचः । दिक्षु सर्वासु विक्रान्तान्प्रेषयामास वान-
रान् १६ ते पदं विष्णुविक्रान्तं पतत्रिज्योतिरध्वगाः । प्रयाताः प्रहिता
राज्ञा हरयस्तु क्षणेन वै १७ ते समुद्रेषु गिरिषु वनेषु च सरःसु च । वानरा
वानरान्सर्वान्रामहेतोरचोदयन् १८ मृत्युकालोपमस्याज्ञां राजराजस्य
वानराः । सुग्रीवस्याययुः श्रुत्वा सुग्रीवभयशङ्किताः १९ ततस्तेऽञ्जनसं-
काशा गिरेस्तस्मान्महाबलाः । तिस्रः कोट्यः प्लवंगानां निर्ययुर्यत्र
राघवः २० अस्तं गच्छति यत्रार्कस्तस्मिन्गिरिवरे रताः । संतप्तहेमवर्णा-
भास्तस्मात्कोट्यो दश च्युताः २१ कैलासशिखरेभ्यश्च सिंहकेसरवर्च-
साम् । ततः कोटिसहस्राणि वानराणां समागमन् २२ फलमूलेन

---

आज्ञेप्रमाणें जे येणार नाहींत त्या राजाज्ञा भंग करणाऱ्या दुष्टांचा वधच केला पाहिजे १२. माझ्या हुकुमांत असलेले शेंकडों, हजारों, क्रोडों वानरश्रेष्ठ माझ्या आज्ञेनें चालते होऊं द्या १३. शरीरानें मेघ व पर्वत ह्यांच्यासारिखे असल्यामुळें जातांना जसे कांहीं आकाश आच्छादन करणारे आणि दिसण्यांतही भयंकर असलेले वानरश्रेष्ठ माझ्या आज्ञेनें येथून चालते होऊं द्या १४ आणि शीघ्रगति ह्मणजे काय हें समजणारे ते सर्वही वानर माझ्या आज्ञेनें येथून सर्व चालते होऊन पृथ्वींतील सर्व वानर माझ्या हुकमावरून सत्वर घेऊन येवोत" १५. ह्याप्रमाणें त्या वानरराज सुग्रीवाचें भाषण श्रवण केल्यावर वायुपुत्र हनु-मानानें सर्व दिशेस पराक्रमी वानर पाठवून दिले १६. तेव्हां पक्षी व नक्षत्रें ह्यांच्या मार्गानें गमन करणारे असे ते राजानें पाठविलेले वानर एका क्षणांत आकाशामध्यें उडून गेले १७ आणि समुद्र, पर्वत, वनें आणि सरोवरें ह्या ठिकाणीं जाऊन तेथील सर्वही वानरांना त्या वानरांनीं रामाकरितां सुग्रीवाकडे जमण्यास सांगितलें १८ व मृत्यूची अथवा कालाचीच उपमा ज्याला योग्य आहे अशा राजाधिराज सुग्रीवाची आज्ञा श्रवण करितांक्षणीं त्याचें भय बाळगून वानर सुग्रीवाकडे आले १९. सारांश, कांतीनें कज्जलासारिखे असलेले तीन कोट महाबलाढ्य वानर अंजनपर्वतापासून निघून रामाकडे आले २०. जिकडे सूर्याचा अस्त होतो त्या श्रेष्ठ पर्वताचे ठिकाणीं क्रीडा करणारे आणि कांतीनें तप्त सुवर्णाप्रमाणें असलेले असे दहा कोट वानर त्या अस्ताचल पर्वतापासून निघाले २१. नंतर सिंहाच्या आयाळेप्रमाणें ज्यांची कांति आहे असे सहस्र

जीवन्तो हिमवन्तमुपाश्रिताः । तेषां कोटिसहस्राणां सहस्रं समवर्तत २३
अङ्गारकसमानानां भीमानां भीमकर्मणाम् । विन्ध्याद्वानरकोटीनां सह-
स्राण्यपतन्द्रुतम् २४ क्षीरोदवेलानिलयास्तमालवनवासिनः । नारिके-
लासनाश्चैव तेषां संख्या न विद्यते २५ वनेभ्यो गह्वरेभ्यश्च सरिद्भ्यश्च
महाबलाः । आगच्छद्वानरीसेना पिबन्तीव दिवाकरम् २६ ये तु त्वर-
यितुं याता वानराः सर्ववानरान् । ते वीरा हिमवच्छैले ददृशुस्तं महा-
द्रुमम् २७ तस्मिन्गिरिवरे पुण्ये यज्ञो माहेश्वरः पुरा । सर्वदेवमनस्तोषो
बभूव सुमनोरमः २८ अन्ननिस्यन्दजातानि मूलानि च फलानि च । अमृ-
तस्वादुकल्पानि ददृशुस्तत्र वानराः २९ तदन्नसंभवं दिव्यं फलमूलं मनो-
हरम् । यः कश्चित्सकृदश्नाति मासं भवति तर्पितः ३० तानि मूलानि
दिव्यानि फलानि च फलाशनाः । औषधानि च दिव्यानि जगृहुर्हरिपुं-
गवाः ३१ तस्माच्च यज्ञायतनात्पुष्पाणि सुरभीणि च । आनिन्युर्वानरा गत्वा
सुग्रीवप्रियकारणात् ३२ ते तु सर्वे हरिवराः पृथिव्यां सर्ववानरान् । संचो-

---

कोटि वानर कैलासपर्वताच्या शिखरांपासून आले २२. फलमूलांवर उपजीविका करून जे हिमालय पर्वताचा आश्रय करून राहिले होते असे एक शंकु वानर तेथून निघाले २३. अग्नीसारिखे तेजस्वी आणि पराक्रमानें व आकृतीनेंही भयंकर असे हजारों कोट वानर विंध्यपर्वतापासून सत्वर निघाले २४. क्षीरसमुद्राच्या तीरीं वास्तव्य करणारे, तमालवनामध्यें रहाणारे आणि नारिकेलवनांत वसति करणारे वानर किती आले ती संख्याच करितां येत नाहीं २५. सारांश, वनें, पर्वताच्या गुहा आणि नद्या ह्यांपासून महाबलाढ्य वानर आले आणि ती वानरसेना सूर्याला गिळूनच टाकीत आहे कीं काय अशा रीतीनें आकाशांत उड्डाण करीत करीत तेथें येऊन थडकली २६. सर्व वानरांना त्वरा करण्याकरितां मागाहून जे वीर वानर गेले होते त्यांनीं हिमालयपर्वतावर एक अति प्रसिद्ध महावृक्ष अवलोकन केला २७. त्या पवित्र व श्रेष्ठ पर्वतावर पूर्वी अत्यंत मनोहर असा माहेश्वर यज्ञ झाला व त्याच्या योगानें सर्व देवतांचें मन संतुष्ट झाले होतें २८. होम-द्रव्यांच्या स्रावापासून उत्पन्न झालेलीं व अमृतासारखीं मधुर असलेलीं मुळें व फळें वानरांनीं तेथें अवलोकन केलीं २९. त्या होमद्रव्यापासून उत्पन्न झालेलीं दिव्य व मनोहर फळेंमुळें जो कोणी एकदां खातो तो एक महिनाभर तृप्त राहतो ३०. तीं दिव्य मुळें व फलें आणि दिव्य औषधें फलावर उपजीविका करणाऱ्या वानरश्रेष्ठांनीं घेतलीं ३१ आणि सुग्रीवाला संतुष्ट करण्याकरितां त्या यज्ञस्थलापासून वानरांनीं सुगंधि पुष्पेंही जाऊन आणिलीं ३२. नंतर पृथ्वींतील सर्व वानरांना येण्याची आज्ञा कळवून ते सर्वही वानरश्रेष्ठ

दर्यित्वा त्वरितं यूथानां जग्मुरग्रतः ३३ ते तु तेन मुहूर्तेन कपयः शीघ्रचारिणः । किष्किन्धां त्वरया प्राप्ताः सुग्रीवो यत्र वानरः ३४ ते गृहीत्वौषधीः सर्वाः फलमूलं च वानराः । तं प्रतिग्राहयामासुर्वचनं चेदमब्रुवन् ३५ सर्वे परिसृताः शैलाः सरितश्च वनानि च । पृथिव्यां वानराः सर्वे शासनादुपयान्ति ते ३६ एवं श्रुत्वा ततो हृष्टः सुग्रीवः प्लवगाधिपः । प्रतिजग्राह च प्रीतस्तेषां सर्वमुपायनम् ३७ [१५५४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७॥

प्रतिगृह्य च तत्सर्वमुपायनमुपाहृतम् । वानरान्सान्त्वयित्वा च सर्वानेव व्यसर्जयत् १ विसर्जयित्वा स हरीन्सहस्रान्कृतकर्मणः । मेने कृतार्थमात्मानं राघवं च महाबलम् २ स लक्ष्मणो भीमबलं सर्ववानरसत्तमम् । अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं सुग्रीवं संप्रहर्षयन् ३ किष्किन्धाया विनिष्क्राम यदि ते सौम्य रोचते । तस्य तद्वचनं श्रुत्वा लक्ष्मणस्य सुभाषितम् ४ सुग्रीवः परमप्रीतो वाक्यमेतदुवाच ह । एवं भवतु गच्छाम स्थेयं त्वच्छासने

---

वानरांचे समुदाय येण्याचेपूर्वी सत्वर पुढें निघून आले ३३. सारांश, ते शीघ्रगामी वानर इतर वानरांना आज्ञा कळविल्याबरोबर जेथें सुग्रीव होता तेथें किष्किंधानगरीमध्यें त्वरेनें एका क्षणांत निघून आले ३४. नंतर सर्व ओषधि, फळें व मुळें घेऊन आलेल्या त्या वानरांनीं सुग्रीवाला तीं अर्पण केलीं आणि ते ह्मणाले ३५ " सर्व पर्वत, नद्या व वनें आह्मीं धुंडाळिलीं. पृथ्वींतील सर्व वानर आपल्या आज्ञेप्रमाणें इकडे येत आहेत " ३६. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण श्रवण करितांक्षणीं वानरराज सुग्रीवाला हर्ष झाला आणि संतुष्ट होऊन त्यानें त्यांच्या सर्व नजराण्याचा स्वीकार केला ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

वानरांनीं आणिलेला तो सर्व नजराणा घेऊन व त्यांचें सांत्वन करून सुग्रीवानें त्या सर्वांना ( तळावर जाण्यास ) निरोप दिला १ आणि पराक्रम गाजविलेल्या हजारों वानरांना निरोप दिल्यावर तो आपल्याला व महाबलाढ्य रामाला कृतार्थ मानूं लागला ( ह्मणजे उभयतांचेंही काम झालेंच असें समजूं लागला ) २. नंतर प्रचंड बलानें युक्त असून सर्व वानरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या विनयसंपन्न सुग्रीवाला हर्ष उत्पन्न करीत करीत तो लक्ष्मण ह्मणाला ३ " हे विनयसंपन्न सुग्रीवा, तुला बरें दिसत असल्यास किष्किंधानगरींतून तूं आतां बाहेर चल ". हें लक्ष्मणाचें उत्कृष्ट भाषण श्रवण करून ४ सुग्रीव अत्यंत संतुष्ट झाला आणि ह्मणाला " ठीक आहे,

मया ५ तमेवमुक्त्वा सुग्रीवो लक्ष्मणं शुभलक्षणम् । विसर्जयामास तदा ताराद्याश्चैव योषितः ६ एहीत्युच्चैर्हरिवरान्सुग्रीवः समुदाहरत् ७ तस्य तद्वचनं श्रुत्वा हरयः शीघ्रमाययुः । बद्धाञ्जलिपुटाः सर्वे ये स्युः स्त्रीदर्शनक्षमाः ८ तानुवाच ततः प्राप्तान्राजार्कसदृशप्रभः । उपस्थापयत क्षिप्रं शिबिकां मम वानराः ९ श्रुत्वा तु वचनं तस्य हरयः शीघ्रविक्रमाः । समुपस्थापयामासुः शिबिकां प्रियदर्शनाम् १० तामुपस्थापितां दृष्ट्वा शिबिकां वानराधिपः । लक्ष्मणारुह्यतां शीघ्रमिति सौमित्रिमब्रवीत् ११ इत्युक्त्वा काञ्चनं यानं सुग्रीवः सूर्यसंनिभम् । बहुभिर्हरिभिर्युक्तमारुरोह सलक्ष्मणः १२ पाण्डुरेणातपत्रेण ध्रियमाणेन मूर्धनि । शुक्लैश्च व्यालव्यजनैर्धूयमानैः समन्ततः १३ शङ्खभेरीनिनादैश्च बन्दिभिश्चाभिनन्दितः। निर्ययौ प्राप्य सुग्रीवो राज्यश्रियमनुत्तमाम् १४ स वानरशतैस्तीक्ष्णैर्बहुभिः शस्त्रपाणिभिः । परिकीर्णो ययौ तत्र यत्र रामो व्यवस्थितः १५ स तं देशमनुप्राप्य श्रेष्ठं रामनिषेवितम् । अवातरन्महातेजाः शिबिकायाः

आह्मी चलतों; मला तुझ्या आज्ञेप्रमाणें वागलेंच पाहिजे ५." असें सांगून शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या लक्ष्मणाला आणि ताराप्रभृति स्त्रियांना सुग्रीवानें जाण्यास सांगितलें ६ आणि नंतर "इकडे या." अशी उच्च स्वरानें त्या सुग्रीवानें मुख्य मुख्य वानरांना हांक मारिली ७. तेव्हां स्त्रिया दृष्टीं पडण्यास ज्यांना हरकत नव्हती असे ( खासगीपैकीं ) जे कांहीं वानर तेथें होते ते त्याची हांक ऐकतांक्षणीं लगेंच हात जोडून तेथें आले असतां ८ सूर्यासमान तेजस्वी सुग्रीव राजा त्या तेथें आलेल्या वानरांना ह्मणाला "हे वानरहो, माझी पालखी लवकर तयार करा" ९. ही त्याची आज्ञा श्रवण करितांक्षणीं शीघ्रगामी वानरांनीं दिसण्यांत मनोहर असलेली पालखी तेथें आणिली १०. तेव्हां ती पालखी आणिलेली पाहून "हे लक्ष्मणा, सत्वर आरोहण कर." असें तो वानरराज सुग्रीव लक्ष्मणाला ११ ह्मणाला आणि असें लक्ष्मणाला सांगितल्यानंतर तो सुग्रीव लक्ष्मणासहवर्तमान अनेक वानरांनीं युक्त अशा त्या सूर्यासारिख्या तेजस्वी वाहनामध्यें आरूढ झाला १२ व मस्तकीं धारण केलेलें श्वेत छत्र, सभोंवतीं वारल्या जाणाऱ्या शुभ्र चवऱ्या १३, शंख व भेरी ह्यांचे ध्वनी आणि भाट ह्यांच्या योगानें आनंदित झालेला व अशा प्रकारें अनुपम राज्यवैभव प्राप्त झालेला तो सुग्रीव किष्किंधानगरींतून निघाला १४ आणि हातांमध्यें शस्त्रें धारण केलेल्या अनेक ह्मणजे शेंकडों प्रचंड वानरांनीं परिवेष्टिलेला तो सुग्रीव जिकडे राम होता तिकडे गेला १५. रामानें

१ स्त्रियांना पडदा असण्याची पद्धति अति प्राचीन कालापासून असल्याचें ह्यावरून उघड होत आहे.

सलक्ष्मणः १६ आसाद्य च ततो रामं कृताञ्जलिपुटोभवत् । कृताञ्जलौ स्थिते तस्मिन्वानराश्चाभवंस्तथा १७ तटाकमिव तं दृष्ट्वा रामः कुड्मलपङ्कजम् । वानराणां महत्सैन्यं सुग्रीवे प्रीतिमानभूत् १८ पादयोः पतितं मूर्ध्ना तमुत्थाप्य हरीश्वरम् । प्रेम्णा च बहुमानाच्च राघवः परिषस्वजे १९ परिष्वज्य च धर्मात्मा निषीदेति ततोऽब्रवीत् । निषण्णं तं ततो दृष्ट्वा क्षितौ रामोऽब्रवीत्ततः २० धर्ममर्थं च कामं च काले यस्तु निषेवते । विभज्य सततं वीर स राजा हरिसत्तम २१ हित्वा धर्मं तथार्थं च कामं यस्तु निषेवते । स वृक्षाग्रे यथा सुप्तः पतितः प्रतिबुध्यते २२ अमित्राणां वधे युक्तो मित्राणां संग्रहे रतः । त्रिवर्गफलभोक्ता च राजा धर्मेण युज्यते २३ उद्योगसमयस्त्वेष प्राप्तः शत्रुनिषूदन । संचिन्त्यतां हि पिङ्गेश हरिभिः सहमन्त्रिभिः २४ एवमुक्तस्तु सुग्रीवो रामं वचनमब्रवीत् । प्रनष्टा श्रीश्च कीर्तिश्च कपिराज्यं च शाश्वतम् ॥ त्वत्प्र-

---

आश्रय केलेल्या त्या श्रेष्ठ प्रदेशावर आल्यानंतर तो महातेजस्वी सुग्रीव लक्ष्मणासहवर्तमान पालखींतून खालीं उतरला १६ आणि रामाजवळ जाऊन हात जोडून उभा राहिला तेव्हां तो हात जोडून उभा राहिल्यावर बरोबर आलेले वानरही त्याच्याचप्रमाणें हात जोडून उभे राहिले १७. कमलकलिकांनीं भरून गेलेल्या तटाकाप्रमाणें वानरांचें तें प्रचंड सैन्य अवलोकन करून आणि त्या सुग्रीवालाही पाहून राम त्याच्यावर संतुष्ट झाला १८. नंतर चरणीं मस्तक ठेविलेल्या त्या वानरराजाला उठवून बहुमानपूर्वक रामानें त्याला सप्रेम आलिंगन दिलें १९ व आलिंगन दिल्यावर "बैस" असें तो धर्मात्मा त्याला ह्मणाला आणि तो जमिनीवर बसल्याचें पाहून राम त्याला ह्मणाला २० "धर्म, अर्थ व काम ह्यांचें जो योग्य वेळीं नेहमीं कालविभागपूर्वक सेवन करितो तो, हे वानरश्रेष्ठा वीरा, (खरा) राजा होय २१. परंतु धर्म व अर्थ ह्यांची पर्वा न करितां जो कामाचेंच सेवन करितो तो वृक्षाग्रावर झोंपीं गेलेला पुरुष ज्याप्रमाणें खालीं पडल्यावर जागा होतो त्याप्रमाणें ऐश्वर्यापासून भ्रष्ट झाल्यानंतर शुद्धीवर येतो २२. शत्रूंच्या वधाविषयीं तत्पर, मित्र जुळविण्याविषयीं दक्ष आणि धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गाच्याही फलाचा उपभोग घेणारा असा जो पुरुष असेल तोच धर्मदृष्ट्या राजा होणें योग्य आहे २३. हे शत्रुनाशका, हा उद्योगाचा समय प्राप्त झाला आहे. तेव्हां, हे वानराधिपते, तूं आपल्या वानरमंत्र्यांसहवर्तमान काय तो विचार कर" २४. ह्याप्रमाणें रामचंद्रांनीं सांगितलें असतां सुग्रीव त्यांना ह्मणाला "हे पराक्रमी रामा, वैभव, कीर्ति आणि अक्षय्य वानरराज्य हें सर्व नाहींसें झालें असूनही

सादान्महाबाहो पुनः प्राप्तमिदं मया २५ तव देव प्रसादाच्च भ्रातुश्च जयतां वर । कृतं न प्रतिकुर्याद्यः पुरुषाणां हि दूषकः २६ एते वानरमुख्याश्च शतशः शत्रुसूदन । प्राप्ताश्चादाय बलिनः पृथिव्यां सर्ववानरान् २७ ऋक्षाश्च वानराः शूरा गोलाङ्गूलाश्च राघव । कान्तारवनदुर्गाणामभिज्ञा घोरदर्शनाः २८ देवगन्धर्वपुत्राश्च वानराः कामरूपिणः । स्वैः स्वैः परिवृताः सैन्यैर्वर्तन्ते पथि राघव २९ शतैः शतसहस्रैश्च वर्तन्ते कोटिभिस्तथा । अयुतैश्चावृता वीर शङ्कुभिश्च परंतप ३० अर्बुदैरर्बुदशतैर्मध्यैश्चान्त्यैश्च वानराः । समुद्राश्च परार्धाश्च हरयो हरियूथपाः ३१ आगमिष्यन्ति ते राजन्महेन्द्रसमविक्रमाः । मेघपर्वतसंकाशा मेरुविन्ध्यकृतालयाः ३२ ते त्वामभिगमिष्यन्ति राक्षसं योद्धुमाहवे । निहत्य रावणं युद्धे ह्यानयिष्यन्ति मैथिलीम् ३३ ततः समुद्योगमवेक्ष्य वीर्यवान्हरिप्रवीरस्य निदेशवर्तिनः । बभूव हर्षाद्वसुधाधिपात्मजः प्रबुद्धनीलोत्पलतुल्य-

---

तुझ्या प्रसादामुळें मला पुनरपि प्राप्त झालें आहे २५. हे देवा, हे विजयिश्रेष्ठा, तुझ्या व तुझ्या भ्रात्याच्या कृपेमुळें माझ्यावर जे उपकार झाले आहेत त्याविषयीं कृतज्ञता न बाळगणारा जो असेल तोच सर्व पुरुषांमध्यें धर्मनाशक समजला पाहिजे २६. हे शत्रुनाशका, हे शेंकडों श्रेष्ठ श्रेष्ठ वानर पृथ्वींतील सर्व बलाढ्य वानरांना घेऊन येथें आले आहेत २७. हे राघवा, अरण्यांतील आणि वनांतील दुर्गम प्रदेशांचे माहीतगार व दिसण्यांत भयंकर असे हे शूर ऋक्ष, वानर व गोलांगूल येथें आले आहेत २८ आणि त्याचप्रमाणें, हे राघवा, यथेष्ट रूप धारण करणारे देवपुत्र व गंधर्वपुत्र वानर आपआपल्या सैन्यांनीं परिवेष्टित असल्यामुळें मार्गामध्येंच तळ देऊन आहेत २९. हे शत्रूतापना वीरा, वानरसेनाधिपति वानर शंभराशंभरांच्या, लाखालाखांच्या, कोटीकोटींच्या, दहा दहा हजारांच्या, शंकूशंकूंच्या, कोटीकोटींच्या, अब्जाअब्जांच्या, खर्वाखर्वांच्या आणि निखर्वानिखर्वांच्या टोळ्यांनीं परिवेष्टित झालेले आहेत आणि अशा सैन्यांनीं परिवेष्टित झालेले सेनाधिपति अब्ज व महापद्म ह्या संख्यांनीं मोजितां येण्यासारखे आहेत ३०, ३१. हे राजा, मेरु व विंध्य ह्यांवर ठाणें देऊन राहिलेले पराक्रमानें इंद्राची बरोबरी करणारे आणि शरीरानें मेघ व पर्वत ह्यांप्रमाणें असलेले वानर तुझ्याकडे येतील ३२. सारांश, समरांगणामध्यें राक्षसांशीं युद्ध करण्याकरितां ते तुझ्याबरोबर येतील आणि युद्धांत रावणाचा वध करून सीतेला तुझ्याकडे आणून देतील ३३. ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितल्यानंतर आपल्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाचा उद्योग अवलोकन करून वीर्यवान् राजकुमार रामाची मुद्रा हर्षा-

दर्शनः ३४ [१५८८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ॥ ३८ ॥

इति ब्रुवाणं सुग्रीवं रामो धर्मभृतां वरः । बाहुभ्यां संपरिष्वज्य प्रत्युवाच कृताञ्जलिम् १ यदिन्द्रो वर्षते वर्षं न तच्चित्रं भविष्यति । आदित्योसौ सहस्रांशुः कुर्याद्वितिमिरं नभः २ चन्द्रमा रजनीं कुर्यात्प्रभया सौम्य निर्मलाम् । त्वद्विधो वापि मित्राणां प्रीतिं कुर्यात्परंतप ३ एवं त्वयि न तच्चित्रं भवेद्यत्सौम्य शोभनम् । जानाम्यहं त्वां सुग्रीव सततं प्रियवादिनम् ४ त्वत्सनाथः सखे सङ्ख्ये जेतास्मि सकलानरीन् । त्वमेव मे सुहृन्मित्रं साहाय्यं कर्तुमर्हसि ५ जहारात्मविनाशाय मैथिलीं राक्षसाधमः । वञ्चयित्वा तु पौलोमीमनुह्रादो यथा शचीम् ६ न चिरात्तं वधिष्यामि रावणं निशितैः शरैः । पौलोम्याः पितरं दृप्तं शतक्रतुरिवारिहा ७ एतस्मिन्नन्तरे चैव रजः समभिवर्तत । उष्णतीव्रां सहस्रांशो-

---

मुळें विकसित झालेल्या नीलकमलासारखी आह्लादकारक दिसूं लागली ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३८ ॥

ह्याप्रमाणें हात जोडून भाषण करणाऱ्या सुग्रीवाला दोन्ही हातांनीं कडकडून भेटल्यावर धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेले राम त्याला ह्मणाले १ " अरे, इंद्रानें जर पर्जन्यवृष्टि केली किंवा ह्या हजारों किरणांनीं युक्त असलेल्या सूर्यानें आकाश अंधकाररहित केलें, चंद्रानें आपल्या प्रभेच्या योगानें रात्र निर्मल करून टाकिली किंवा, हे विनयसंपन्न शत्रुतापना, तुझ्यासारिख्यानें मित्रांवर प्रेम केलें तर तें कांहीं आश्चर्य ह्मणतां येणार नाहीं २, ३. सारांश, हे विनयसंपन्न सुग्रीवा, प्रत्युपकार करण्याकरितां तूं जें हें आपलें उत्कृष्ट आचरण दाखविलें आहेस हेंही कांहीं तुझ्यासंबंधानें आश्चर्य नव्हे. हे सुग्रीवा, तूं नेहमीं प्रिय भाषण करणारा आहेस हे मी जाणीत आहें ४. हे मित्रा, तुझ्याच योगानें मी सनाथ झालों असून तुझ्याच साहाय्यानें मी संग्रामामध्यें सर्व शत्रूंना जिंकणार आहें व माझा सुहृद् व मित्र काय तो तूंच आहेस. ह्यास्तव, तूं मला साहाय्य कर ५. शचीच्या पित्याला फसवून स्वतःच्या नाशाकरितां पुलोमकन्या शचीचा अपहार करणाऱ्या अनुह्लादाप्रमाणें ज्या राक्षसाधमानें सीता हरण केली ६ त्या रावणाचा मी, शत्रुघातक इंद्रानें ज्याप्रमाणें गर्वानें चढलेल्या शचीच्या पित्याचा व अनुह्लादाचा वध केला त्याप्रमाणें, तीक्ष्ण बाणांच्या योगानें लवकरच वध करीन ७. " असें रामचंद्राचें बोलणें चाललें आहे तोंच वायधूळ सुटली आणि

श्छादयद्गगने प्रभाम् ८ दिशः पर्याकुलाश्चासंस्तमसा तेन दूषिताः । चचाल च मही सर्वा सशैलवनकानना ९ ततो नरेन्द्रसंकाशैस्तीक्ष्णदंष्ट्रैर्महाबलैः । कृत्स्ना संछादिता भूमिरसंख्येयैः प्लवंगमैः १० निमेषान्तरमात्रेण ततस्तैर्हरियूथपैः । कोटीशतपरीवारैर्वानरैर्हरियूथपैः ११ नादेयैः पार्वतेयैश्च सामुद्रैश्च महाबलैः । हरिभिर्मेघनिर्ह्रादैरन्यैश्च वनवासिभिः १२ तरुणादित्यवर्णैश्च शशिगौरैश्च वानरैः । पद्मकेसरवर्णैश्च श्वेतैर्हेमकृतालयैः १३ कोटीसहस्रैर्दशभिः श्रीमान्परिवृतस्तदा । वीरः शतबलिर्नाम वानरः प्रत्यदृश्यत १४ ततः काञ्चनशैलाभस्ताराया वीर्यवान्पिता । अनेकैर्बहुसाहस्रैः कोटिभिः प्रत्यदृश्यत १५ तथापरेण कोटीनां सहस्रेण समन्वितः । पिता रुमायाः संप्राप्तः सुग्रीवश्वशुरो विभुः १६ पद्मकेसरसंकाशस्तरुणार्कनिभाननः । बुद्धिमान्वानरश्रेष्ठः सर्ववानरसत्तमः १७ अनेकैर्बहुसाहस्रैर्वानराणां समन्वितः । पिता हनुमतः श्रीमान्केसरी प्रत्यदृश्यत १८

---

तिनें अंतरिक्षामध्यें असलेल्या सूर्याच्या उष्ण व तीव्र प्रभेला आच्छादित करून टाकिलें ८. त्या अंधारानें दिशा भरून गेल्यामुळें ही कोणची व ती कोणची हें समजेनासें झालें व पर्वत, वनें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी डळमळूं लागली ९. इतक्यांत तीक्ष्ण दंष्ट्रांनीं युक्त व नृपतुल्य अशा महाबलाढ्य असंख्य वानरांनीं सर्व भूमि व्यापून गेली १०. नंतर एका क्षणांतच शतबली' नांवाचा वैभवशाली वीर वानर दृष्टीं पडूं लागला. तो वानर प्रसिद्ध प्रसिद्ध वानरसेनानायकांनीं व शेंकडों कोट परिवार बरोबर असलेल्या दुसऱ्याही वानरसेनाधिपति वानरांनीं परिवेष्टित झालेला होता व त्याचप्रमाणें नद्या, पर्वत व समुद्र ह्या ठिकाणीं वास्तव्य करणारे महाबलाढ्य वानर मेघांसारखी गर्जना करणारे दुसरेही अरण्यवासी वानर त्याला वेढून राहिलेले होते. इतकेंच नव्हे; परंतु, दुसरेही एक निखर्व वानर त्याच्याभोंवतीं होते. त्यांपैकीं कांहींचा वर्ण बालसूर्याप्रमाणें होता, कांहीं चंद्रासारिखे गौरवर्ण होते, कांहींचा वर्ण कमलांतील परागाप्रमाणें होता आणि कांहीं श्वेतवर्ण असून हिमालय पर्वतावर घर करून राहिलेले होते ११,१२,१३,१४. असो. शतबली वानर आल्यानंतर सुवर्णपर्वतासारिखा असलेला तारेचा बलाढ्य पिताही हजारों कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला दृष्टीं पडूं लागला १५. त्याचप्रमाणें दुसरे एक खर्व वानर बरोबर घेऊन रुमेचा समर्थ पिता ह्मणजे सुग्रीवाचा श्वशुर प्राप्त' झाला १६. नंतर कांतीनें कमलपरागांप्रमाणें असलेला व बालसूर्यासारिख्या तेजस्वी मुखानें युक्त असलेला सर्व वानरांमध्यें उत्कृष्ट आणि वानरश्रेष्ठ असा वैभवशाली बुद्धिमान् केसरी ह्मणजे हनुमानाचा पित

गोलाङ्गूलमहाराजो गवाक्षो भीमविक्रमः । वृतः कोटिसहस्रेण वानराणामदृश्यत १९ ऋक्षाणां भीमवेगानां धूम्रः शत्रुनिबर्हणः । वृतः कोटिसहस्राभ्यां द्वाभ्यां समभिवर्तत २० महाबलनिभैर्घोरैः पनसो नाम यूथपः । आजगाम महावीर्यस्तिसृभिः कोटिभिर्वृतः २१ नीलाञ्जनचयाकारो नीलो नामैष यूथपः । अदृश्यत महाकायः कोटिभिर्दशभिर्वृतः २२ ततः काञ्चनशैलाभो गवयो नाम यूथपः । आजगाम महावीर्यः कोटिभिः पञ्चभिर्वृतः २३ दरीमुखश्च बलवान्यूथपोऽभ्याययौ तदा । वृतः कोटिसहस्रेण सुग्रीवं समवस्थितः २४ मैन्दश्च द्विविदश्चोभावश्विपुत्रौ महाबलौ । कोटिकोटिसहस्रेण वानराणामदृश्यताम् २५ गजश्च बलवान्वीरस्तिसृभिः कोटिभिर्वृतः २६ ऋक्षराजो महातेजा जाम्बवान्नाम नामतः । कोटिभिर्दशभिर्व्याप्तः सुग्रीवस्य वशे स्थितः २७ रुमणो नाम तेजस्वी विक्रान्तैर्वानरैर्वृतः । आगतो बलवांस्तूर्णं कोटीशतसमावृतः २८ ततः कोटिसहस्राणां सहस्रेण शतेन च । पृष्ठतोऽनुगतः प्राप्तो

---

हजारों वानर बरोबर घेऊन आलेला दृष्टीं पडूं लागला १७,१८. गोलांगूलसंज्ञक वानरांचा अधिपति जो भयंकर पराक्रमी गवाक्ष तो एक खर्व वानरांनीं परिवेष्टित असलला दृष्टीं पडला १९. नंतर प्रचंड वेग धारण करणारे दोन खर्व ऋक्ष बरोबर घेऊन शत्रुनाशक धूम्र पुढें आला २०. प्रचंड पर्वताप्रमाणें धिप्पाड असे तीन कोट भयंकर वानर बरोबर घेऊन महावीर्यवान् पनसनामक वानरसेनाधिपति तेथें आला २१. आकारानें नीलपर्वतासारिखा असलेला नीलनामक धिप्पाड वानरसेनाधिपति दहा कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला दिसूं लागला २२. तदनंतर सुवर्णपर्वताप्रमाणें दिसत असलेला महावीर्यवान् गवयनामक सेनाधिपति पांच कोट वानरांसहवर्तमान तेथें आला २३. नंतर एक खर्व वानरांनीं परिवेष्टित असलेला दरीमुखनामक बलाढ्य सेनाधिपति तेथें आला व सुग्रीवाजवळ येऊन उभा राहिला २४. नंतर मैंद व द्विविद हे उभयतां महाबलाढ्य अश्विनीकुमारांचे पुत्र एक एक खर्व वानर बरोबर घेऊन तथें आलेले दृष्टीं पडूं लागले २५. नंतर तीन कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला बलाढ्य वीर गज तेथें आला २६. नंतर जांबवान् नांवाचा महातेजस्वी ऋक्षराज सुग्रीवाच्या आज्ञेंत असलेला दहा कोट वानर बरोबर घेऊन तेथें आला २७. रुमणनामक तेजस्वी व महाबलाढ्य वानर एक अब्ज सैन्य बरोबर घेऊन सत्वर तेथें आला; तो पराक्रमी वानरांनीं परिवेष्टित झालेला होता २८. नंतर

हरिभिर्गन्धमादनः २९ ततः पद्मसहस्रेण वृत्तः शङ्कुशतेन च । युवराजोऽङ्गदः प्राप्तः पितुस्तुल्यपराक्रमः ३० ततस्ताराद्युतिस्तारो हरिभिर्भीमविक्रमैः । पञ्चभिर्हरिकोटीभिर्दूरतः पर्यदृश्यत ३१ इन्द्रजानुः कपिर्वीरो यूथपः प्रत्यदृश्यत । एकादशानां कोटीनामीश्वरस्तैश्च संवृतः ३२ ततो रम्भस्त्वनुप्राप्तस्तरुणादित्यसंनिभः । अयुतेन वृतश्चैव सहस्रेण शतेन च ३३ ततो यूथपतिर्वीरो दुर्मुखो नाम वानरः । प्रत्यदृश्यत कोटीभ्यां द्वाभ्यां परिवृतो बली ३४ कैलासशिखराकारैर्वानरैर्भीमविक्रमैः । वृतः कोटिसहस्रेण हनुमान्प्रत्यदृश्यत ३५ नलश्चापि महावीर्यः संवृतो द्रुमवासिभिः । कोटीशतेन संप्राप्तः सहस्रेण शतेन च ३६ ततो दरीमुखः श्रीमान्कोटिभिर्दशभिर्वृतः । संप्राप्तोऽभिनदंस्तस्य सुग्रीवस्य महात्मनः ३७ शरभः कुमुदो वह्निर्वानरो रम्भ एव च । एते चान्ये च बहवो वानराः कामरूपिणः ३८ आवृत्य पृथिवीं सर्वां पर्वतांश्च वनानि च । यूथपाः समनुप्राप्ता येषां संख्या न विद्यते ३९ आगताश्च निविष्टाश्च पृथिव्यां

---

त्याच्या मागोमाग निघालेला गंधमादन एक शंकु व एक महापद्म वानर बरोबर घेऊन तेथें आला २९. तदनंतर हजार पद्म व शंभर शंख वानर बरोबर घेऊन पित्यासारिखा पराक्रमी युवराज अंगद प्राप्त झाला ३०. तदनंतर नक्षत्रासारिखा तेजस्वी तार भयंकर पराक्रम करणाऱ्या पांच कोट वानरांसहवर्तमान लांबून दिसूं लागला ३१. ज्ञानी आणि वीर असा इंद्रजानुनामक सेनाधिपति नंतर दृष्टीं पडूं लागला; तो अकरा कोट वानरांचा अधिपति असून त्यांनीं परिवेष्टित झालेला होता ३२. तदनंतर मध्याह्न कालच्या सूर्याप्रमाणें प्रखर तेजानें युक्त असलेला रंभ तेथें आला; त्याच्याबरोबर शंभर, हजार आणि दहा हजार अशा वानरांच्या तीन टोळ्या होत्या ३३. तदनंतर वीर व बलाढ्य असा दुर्मुखनामक सेनाधिपतिवानर दोन कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला दृष्टीं पडूं लागला ३४. नंतर आकारानें कैलासशिखराप्रमाणें असलेले भयंकर पराक्रमी एक खर्व वानर बरोबर घेऊन आलेला हनुमान् दृष्टीं पडला ३५. नंतर वृक्षांवर वास्तव्य करणाऱ्या वानरांची एक अब्जाची, एक हजाराची आणि एक शंभराची अशा तीन टोळ्या बरोबर घेऊन महावीर्यवान् नल तेथें आला ३६. तदनंतर दहा कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला श्रीमान् दरीमुख गर्जना करीत करीत त्या महात्म्या सुग्रीवासमीप आला ३७ व नंतर शरभ, कुमुद, वह्नि आणि रंभ हेही वानर तेथें आले. सारांश, हे व दुसरेही यथेष्ट रूप धारण करणारे पुष्कळच सेनाधिपति वानर सर्व पृथ्वी, पर्वत व वनें व्याप्त करून राहिलेले

सर्ववानराः । आप्लुवन्तः प्लुवन्तश्च गर्जन्तश्च प्लवंगमाः ॥ अभ्यवर्तन्त सुग्रीवं सूर्यमभ्रगणा इव ४० कुर्वाणा बहुशब्दांश्च प्रहृष्टा बाहुशालिनः । शिरोभिर्वानरेन्द्राय सुग्रीवाय न्यवेदयन् ४१ अपरे वानरश्रेष्ठाः संगम्य च यथोचितम् । सुग्रीवेण समागम्य स्थिताः प्राञ्जलयस्तदा ४२ सुग्रीवस्त्वरितो राम सर्वांस्तांस्त्वरितांस्तदा । निवेदयित्वा धर्मज्ञः स्थितः प्राञ्जलिरब्रवीत् ४३ यथासुखं पर्वतनिर्झरेषु वनेषु सर्वेषु च वानरेन्द्राः । निवेशयित्वा विधिवद्बलानि बलं बलज्ञः प्रतिपत्तुमर्हति ४४ [ १६३२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे एकोनचत्वारिंशः सर्गः ॥ ३९ ॥

अथ राजा समृद्धार्थः सुग्रीवः प्लवगेश्वरः । उवाच नरशार्दूलं रामं परबलार्दनम् १ आगता विनिविष्टाश्च बलिनः कामचारिणः । वानरेन्द्रा महेन्द्राभा ये मद्विषयवासिनः २ त इमे बहुविक्रान्तैर्बलिभिर्भीमविक्रमैः ।

---

तर्थे आले. त्यांचा तर गणनाच करितां येत नाहीं ३८, ३९. तात्पर्य, पृथ्वीमध्यें वास्तव्य करून राहिलेले सर्वही उड्या मारणारे वानर लहान मोठ्या उड्या टाकीत टाकीत व गर्जना करीत करीत तेथें आले आणि मेघसमुदाय ज्याप्रमाणें सूर्याला आच्छादून टाकितात त्याप्रमाणें ते सुग्रीवाच्या भोंवतीं गराडा देऊन उभे राहिले ४०. दूरदूरच्या प्रदेशांतून अनेक प्रकारच्या गर्जना करीत आलेले पराक्रमी वानर मस्तकें नम्र करून राजा सुग्रीवाला आपण आल्याचें निवेदन करूं लागले ४१. दुसरे श्रेष्ठ श्रेष्ठ वानर यथायोग्य रीतीनें सुग्रीवाची भेट घेऊन पलीकडे झाले व दुसरे कांहीं सुग्रीवाची भेट झाल्यावर तसेंच उभे राहिले ४२. नंतर धर्मवेत्त्या सुग्रीवानें त्वरा करून सत्वर आलेल्या त्या वानरांची रामाला खबर दिली आणि तो जवळच हात जोडून उभा राहिला व तदनंतर "हे वानरसेनानायकहो, पर्वत, जलप्रवाह व सर्व वनें ह्या ठिकाणीं योग्य रीतीनें आपआपल्या सैन्यांचा तळ देऊन कोण आला आणि कोण नाहीं आला हें जाणणारा असा तुमच्यामध्यें सैन्यांतील खडा आणि खडा माहित असलेला असा कोण आहे तो मला सांगा." असें तो त्या सेनाधिपतींना विचारूं लागला ४३, ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

सैन्य जुळविण्याचा उद्देश ज्याचा सिद्धीस गेला आहे असा तो वानराधिपति सुग्रीव राजा शत्रुसैन्यनाशक पुरुषश्रेष्ठ रामाला ह्मणाला १ "वाटेल तिकडे गमन करणारे असे जे इंद्रतुल्य व बलाढ्य श्रेष्ठ श्रेष्ठ वानर माझ्या राज्यांत रहाणारे आहेत ते सर्व

आगता वानरा घोरा दैत्यदानवसंनिभाः ३ ख्यातकर्मापदानाश्च बलवन्तो जितक्लमाः । पराक्रमेषु विख्याता व्यवसायेषु चोत्तमाः ४ पृथिव्यम्बुचरा राम नानानगनिवासिनः । कोट्योघाश्च इमे प्राप्ता वानरास्तव किंकराः ५ निदेशवर्तिनः सर्वे सर्वे गुरुहिते स्थिताः । अभिप्रेतमनुष्ठातुं तव शक्ष्यन्त्यरिंदम ६ त इमे बहुसाहस्रैरनेकैर्बहुविक्रमैः । आगता वानरा घोरा दैत्यदानवसंनिभाः ७ यन्मन्यसे नरव्याघ्र प्राप्तकालं तदुच्यताम् । त्वत्सैन्यं त्वद्वशे युक्तमाज्ञापयितुमर्हसि ८ काममेवमिदं कार्यं विदितं मम तत्त्वतः । तथापि तु यथायुक्तमाज्ञापयितुमर्हसि ९ तथा ब्रुवाणं सुग्रीवं रामो दशरथात्मजः । बाहुभ्यां संपरिष्वज्य इदं वचनमब्रवीत् १० ज्ञायतां सौम्य वैदेही यदि जीवति वा न वा । स च देशो महाप्राज्ञ यस्मिन्वसति रावणः ११ अभिगम्य तु वैदेहीं निलयं रावणस्य च । प्राप्तकालं विधास्यामि तस्मिन्काले सह त्वया १२ नाहमस्मिन्प्रभुः कार्ये वानरेन्द्र न

---

आले असून आपआपल्या गोटामध्यें उतरले आहेत २. इतकेंच नव्हे; परंतु, अनेक वेळां पराक्रम गाजविलेले असे महापराक्रमी बलाढ्य वानर बरोबर घेऊन दैत्य व दानव ह्यांप्रमाणें भयंकर असलेले ते हे वानर येथें आले आहेत ३. युद्धामध्यें ज्यांचें शौर्य गाजलेलें आहे, ज्यांना ग्लानि ठाऊक नाहीं आणि पराक्रमासंबंधानें ज्यांची ख्याति असून उद्योगांतही जे श्रेष्ठ आहेत असे बलाढ्य वानर येथें आले आहेत ४. हे रामा, समुद्रांतील बेटांत राहणारे आणि त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या पर्वतांवरून वास्तव्य करणारे हे तुझे दास वानर कोटीकोटींच्या टोळ्यांनीं येथें आले आहेत ५. हे शत्रुदमना रामा, स्वामिहिताविषयीं तत्पर असे हे सर्वही आज्ञेप्रमाणें वागणारे आहेत आणि तुझा मनोरथ सिद्धीस नेण्याला समर्थ आहेत ६. सारांश, दैत्य व दानव ह्यांसारिखे भयंकर असलेले ते हे वानर दुसरेही अनेक प्रकारचे महापराक्रमी हजारों वानर बरोबर घेऊन येथें आले आहेत ७. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठा, जें कार्य करण्याचा आतां समय असेल त्याची आज्ञा व्हावी; हें सैन्य तुझें असून तुझ्या अधीन आहे. तेव्हां ह्याला काय ती आज्ञा कर ८. सीतेचा शोध लावणें हें कार्य जरी खरोखर मला वास्तविक ठाऊक आहे तरी त्यासंबंधानें यथायोग्य जी कांहीं आज्ञा कर्तव्य असेल ती तू कर." ९. ह्याप्रमाणें सुग्रीव बोलूं लागला असतां दशरथपुत्र राम त्याला हातांनीं कवटाळून ह्मणाला १० "हे विनयसंपन्न महाबुद्धिमान् सुग्रीवा, सीता जिवंत आहे किंवा नाहीं ह्याचा आणि रावण कोणत्या प्रदेशांत रहातो ह्याचा शोध लागला पाहिजे ११. सीतेजवळ आणि रावणाच्या निवासस्थानाकडे गेल्यावर त्यावेळीं जें

लक्ष्मणः । त्वमस्य हेतुः कार्यस्य प्रभुश्च प्लवगेश्वर १३ त्वमेवाज्ञापय विभो मम कार्यविनिश्चयम् । त्वं हि जानासि मे कार्यं मम वीर न संशयः १४ सुहृद्द्वितीयो विक्रान्तः प्राज्ञः कालविशेषवित् । भवानस्मद्धिते युक्तः सुहृदामार्थवित्तमः १५ एवमुक्तस्तु सुग्रीवो विनतं नाम यूथपम् । अब्रवीद्रामसांनिध्ये लक्ष्मणस्य च धीमतः १६ शैलाभं मेघनिर्घोषमूर्जितं प्लवगेश्वरम् । सोमसूर्यनिभैः सार्धं वानरैर्वानरोत्तम १७ देशकालनयैर्युक्तो विज्ञः कार्यविनिश्चये । वृतः शतसहस्रेण वानराणां तरस्विनाम् १८ अधिगच्छ दिशं पूर्वां सशैलवनकाननाम् । तत्र सीतां च वैदेहीं निलयं रावणस्य च १९ मार्गध्वं गिरिदुर्गेषु वनेषु च नदीषु च । नदीं भागीरथीं रम्यां सरयूं कौशिकीं तथा २० कालिन्दीं यमुनां रम्यां यामुनं च महागिरिम् । सरस्वतीं च सिन्धुं च शोणं मणिनिभोदकम् २१ महीं कालमहीं चापि शैलकाननशोभिताम् । ब्रह्ममालान्विदेहांश्च माल-

---

कांहीं समयाला उचित असेल तें मी तुझ्या मदतीनें करीन १२. हे वानरराजा, वानरांना आज्ञा करण्याचें जें हें काम तें करण्यास मी अथवा लक्ष्मण समर्थ नाहीं. हे वानराधिपते, ह्या कार्याचा उत्पादक तूंच असून तें करण्यास समर्थही तूंच आहेस १३. तेव्हां, हे प्रभो, कर्तव्यासंबंधानें झालेला माझा निश्चय काय आहे तो लक्ष्यांत आणून तूंच ह्या सैन्याला आज्ञा कर. हे वीरा, तूं माझें कार्य जाणीत आहेस ह्यांत संशय नाहीं १४. पराक्रमी, समंजस, विशेष प्रसंग जाणणारा, विचारी, आप्त आणि माझा उद्देश काय आहे हें सर्वोत्कृष्ट रीतीनें जाणणारा आणि आमच्या हिताविषयीं दक्ष असा तूं माझा दुसरा मित्र आहेस " १५. ह्याप्रमाणें रामचंद्रांनीं सांगितल्यावर राम आणि बुद्धिमान् लक्ष्मण ह्यांचे समीपच असलेला सुग्रीव शरीरानें पर्वततुल्य असून मेघांप्रमाणें गर्जना करणाऱ्या व चंद्रसूर्यासारिखे वानर बरोबर घेऊन आलेल्या वानराधिपति विनतनामक सेनापतीला ह्मणाला " हे वानरश्रेष्ठा, १६, १७, देश, काल व राजनीति ह्यांनीं तूं संपन्न असून काय करण्याचा निश्चय झालेला आहे हेंही तूं जाणीत आहेस आणि वेगवान् असे शेंकडों हजारों वानर तुझ्याबरोबर आहेत १८. ह्याकरितां, पर्वत व अरण्यें ह्यांसहवर्तमान जो कांहीं पूर्व दिशेला प्रदेश आहे तिकडे तूं जा आणि तेथें पर्वतसंबंधीं दुर्गम प्रदेश, वनें व नद्या ह्यांचे ठिकाणीं विदेहराजकन्या सीतेचा व रावणाच्या निवासस्थानाचा शोध लाव. त्याचप्रमाणें भागीरथी नदी, रम्य अशी सरयू, कौशिकी १९,२०, कलिंदपर्वतापासून निघालेली रमणीय यमुना, यमुनेचें उगमस्थान असलेला महापर्वत कलिंद, सरस्वती, सिंधु, रत्नाप्रमाणें तेजस्वी

वान्काशिकोसलान् २२ मागधांश्च महाग्रामान्पुण्ड्रांस्त्वङ्गांस्तथैव च । भूमिं च कोशकाराणां भूमिं च रजताकराम् २३ सर्वं च तद्विचेतव्यं मृगयद्भिस्ततस्ततः । रामस्य दयितां भार्यां सीतां दशरथस्नुषाम् २४ समुद्रमवगाढांश्च पर्वतान्पत्तनानि च । मन्दरस्य च ये कोटिं संश्रिताः केचिदालयाः २५ कर्णप्रावरणाश्चैव, तथा चाप्योष्ठकर्णकाः । घोरलोहमुखाश्चैव जवनाश्चैकपादकाः २६ अक्षया बलवन्तश्च तथैव पुरुषादकाः । किरातास्तीक्ष्णचूडाश्च हेमाभाः प्रियदर्शनाः २७ आममीनाशनाश्चापि किराता द्वीपवासिनः । अन्तर्जलचरा घोरा नरव्याघ्रा इति स्मृताः २८ एतेषामाश्रयाः सर्वे विचेयाः काननौकसः । गिरिभिर्ये च गम्यन्ते प्लवनेन प्लवेन च २९ यत्नवन्तो यवद्वीपं सप्तराज्योपशोभितम् । सुवर्णरूप्यकद्वीपं सुवर्णकर-

---

उदकानें युक्त असलेला शोणनद २१ मही आणि पर्वत व अरण्यें ह्यांनीं सुशोभित झालेली कालमही ह्या नद्या; त्याचप्रमाणें ब्रह्ममाल, विदेह, मालव, काशिकोसल २२, मागध, महाग्राम, पुंड्र व अंग हे देश आणि त्याचप्रमाणें रेशीम उत्पन्न करणाऱ्या किड्यांचीं जेथें जोगवणूक होते असा प्रदेश व ज्या ठिकाणीं रुप्याच्या वगैरे खाणी २३ आहेत असा प्रदेश तुह्मी आक्रमण करा आणि सर्वप्रकारें शोध लावा. सारांश, दशरथाची स्नुषा आणि रामाची प्रिय भार्या जी सीता तिचा शोध लावा २४. समुद्रांतील पर्वत, शहरें आणि मंदरपर्वताचें शिखर ह्या प्रदेशांचे ठिकाणीं जे गांव वसलेले आहेत ते तुह्मी शोधा २५. नंतर कर्णप्रावरण, ओष्ठकर्णक, घोर असे लोहमुख, वेगवान् असे एकपादक २६ आणि बलाढ्य अक्षय, त्याचप्रमाणें मनुष्यमांसभक्षक, ज्यांच्या शेंडींचे केश तीक्ष्ण आहेत आणि ज्यांची मुद्रा सौम्य असून कांति सुवर्णासारखी आहे असे किरात २७, अपक्व मत्स्य भक्षण करीत असलेले बेटांत राहणारे किरात आणि ( खालची आकृति माणसाप्रमाणें असून वरची व्याघ्राप्रमाणें असल्यामुळें ) नरव्याघ्र ह्मणून प्रसिद्ध असलेले भयंकर जलचर प्राणी २८ ह्यांचीं सर्व सिद्धस्थानें, हे अरण्यनिवासी वानरहो, तुह्मी शोधून काढा. त्याचप्रमाणें ज्या देशांना पर्वतांतून जावें लागतें, ज्या ठिकाणीं उड्या मारूनच जावें लागतें आणि जेथें नौका वगैरेंनीं जातां येतें ते प्रदेश तुह्मी धुंडा २९. तुह्मी प्रयत्नशील व्हा आणि सप्तराज्यानें सुशोभित झालेलें यवद्वीप, सुवर्णाच्या खाणींनीं भूषित झालेले सुवर्णद्वीप व रूप्यकद्वीप

---

१ वस्त्राप्रमाणें ज्यांचे कान विशाल आहेत असे. २ ओंठापर्यंत ज्यांचे कान लांब लांब आहेत असे. ३ लोखंडाप्रमाणें ज्यांचें मुख कठीण व कृष्णवर्ण आहे असे. ४ ज्यांना एकच पाय आहे असे. ५ ज्यांच्या संततीचा कधींही विच्छेद होत नाहीं असे.

मण्डितम् ३० यवद्वीपमतिक्रम्य शिशिरो नाम पर्वतः । दिवं स्पृशति शृङ्गेण देवदानवसेवितः ३१ एतेषां गिरिदुर्गेषु प्रपातेषु वनेषु च । मार्गध्वं सहिताः सर्वे रामपत्नीं यशस्विनीम् ३२ ततो रक्तजलं प्राप्य शोणाख्यं शीघ्रवाहिनम् । गत्वा पारं समुद्रस्य सिद्धचारणसेवितम् ३३ तस्य तीर्थेषु रम्येषु विचित्रेषु वनेषु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्य-स्ततस्ततः ३४ पर्वतप्रभवा नद्यः सुभीमबहुनिष्कुटाः । मार्गितव्या दरीमन्तः पर्वताश्च वनानि च ३५ ततः समुद्रद्वीपांश्च सुभीमान्द्रष्टुम-र्हथ । ऊर्मिमन्तं महारौद्रं क्रोशन्तमनिलोद्धतम् ३६ तत्रासुरा महा-कायाश्छायां गृह्णन्ति नित्यशः । ब्रह्मणा समनुज्ञाता दीर्घकालं बुभु-क्षिताः ३७ तं कालमेघप्रतिमं महोरगनिषेवितम् । अभिगम्य महानादं तीर्थेनैव महोदधिम् ३८ ततो रक्तजलं भीमं लोहितं नाम सागरम् । गत्वा प्रेक्ष्यथ तां चैव बृहतीं कूटशाल्मलीम् ३९ गृहं च वैनतेयस्य

---

तुह्मी धुंडाळून काढा ३०. यवद्वीप ओलांडून गेलें ह्मणजे शिशिर ह्मणून एक पर्वत आहे. त्याचीं शिखरें स्वर्गमंडलापर्यंत गेलीं असून देवदानवांनीं त्याचा आश्रय केलेला आहे ३१. असो. ह्या द्वीपांतील पर्वतसंबंधीं गहन प्रदेश, कडे आणि वनें ह्या ठिकाणीं तुह्मी सर्वजण एक निश्चय करून यशस्विनी रामभार्या आहे किंवा नाहीं हें शोधून काढा ३२. तदनंतर समुद्र ओलांडून गेल्यावर शीघ्र प्रवाहानें व आरक्तवर्ण जलानें युक्त असून सिद्धचारणांनीं आश्रय केलेल्या शोणनामक नदाला तुह्मी जा ३३. त्या नदाचे तीरीं उताराचीं जीं ठिकाणें आहेत तेथें असलेल्या रम्य व चित्रविचित्र वनांमध्यें सीतेसहवर्तमान रावणाचा तुह्मी ठिकठिकाणीं शोध करा ३४. भयंकर आणि अनेक उपवनप्रदेशांनीं युक्त अशा पर्वतांपासून निघालेल्या नद्या, त्याचप्रमाणें गुहांनीं युक्त असलेले पर्वत व वनें तुह्मी हुडका ३५. तदनंतर फारच घोर अशीं समुद्रांतील बेटें तुह्मी अवलोकन करा. समुद्राच्या लाटा आदळत असल्यामुळें जसें कांहीं एक-सारखे गर्जना करीत असलेले महाभयंकर अनिलोद्धत बेट तुह्मी शोधा ३६. त्या ठिकाणीं मोठे मोठे धिप्पाड दैत्य नेहमीं तेथून जाणाऱ्या प्राण्यांना छायेच्या योगानें आकर्षण करीत असतात. ते नेहमीं बुभुक्षितच असून ब्रह्मदेवानें त्यांना छायेच्या योगानें आकर्षण करून घेतलेले प्राणी भक्षण करण्याची अनुज्ञा दिली आहे ३७. असो. महोरगांनीं आश्रय केलेला, नीलमेघाप्रमाणें दिसत असलेला आणि प्रचंड गर्जनेनें युक्त असलेला तो मोठा इक्षुसागर उपायानेंच ओलांडून गेल्यानंतर ३८ आरक्तवर्ण जलानें युक्त अशा लोहितनामक सागराला तुह्मी जा, ह्मणजे त्या ठिकाणीं

नानारत्नविभूषितम् । तत्र कैलाससंकाशं विहितं विश्वकर्मणा ४० तत्र शैलनिभा भीमा मन्देहा नाम राक्षसाः । शैलशृङ्गेषु लम्बन्ते नानारूपा भयावहाः ४१ ते पतन्ति जले नित्यं सूर्यस्योदयनं प्रति । अभितप्ताः स्म सूर्येण लम्बन्ते स्म पुनः पुनः ४२ निहता ब्रह्मतेजोभिरहन्यहनि

---

तो मोठा कूटशाल्मलीचा ( अर्थात् काळ्या सावरीचा ) वृक्ष तुमच्या दृष्टीं पडेल ३९ व त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित असें जें कैलासपर्वतासारिखें गरुडाचें गृह विश्वकर्म्यानें निर्माण केलें आहे तेंही तुमच्या दृष्टीं पडेल ४०. तेथें मंदेहनामक पर्वततुल्य क्रूरकर्मी व भयंकर राक्षस नानाप्रकारचीं रूपें धारण करून पर्वतशिखरांचे ठिकाणीं अधोमुख होऊन लोंबत असतात ४१. सूर्योदयसमयीं ते नेहमीं ऊर्ध्वमुख होऊन सूर्याशीं युद्ध करूं लागतात आणि सूर्यमंडलगत ब्रह्मतेजानें ते तप्त होऊन व

---

१रक्षांꣳसि ह वा पुरोनुवाके तपोग्रमतिष्ठन्त तान्प्रजापतिर्वरेणोपामन्त्रयत तानि वरमवृणीतादित्यो नो योद्धा इति तान्प्रजापतिरब्रवीद्योधयध्वमिति तस्मादुत्तिष्ठन्तꣳ ह वा तानि रक्षाꣳस्यादित्यं योधयन्ति यावदस्तमन्वगात्तानि ह वा एतानि रक्षाꣳसि गायत्रियाभिमन्त्रितेनाम्भसा शाम्यन्ति तदु ह वा एते ब्रह्मवादिनः पूर्वाभिमुखाः संध्यायां गायत्रियाभिमन्त्रिता आप ऊर्ध्वं विक्षिपन्ति ता एता आपो वज्री भूत्वा तानि रक्षांꣳसि मन्देहारुणे द्वीपे प्रक्षिपन्ति यत्प्रदक्षिणं प्रक्रमन्ति तेन पाप्मानमवधून्वन्त्युद्यन्तमस्तं यन्तमादित्यमभिध्यायन्कुर्वन्ब्राह्मणो विद्वान्सकलं भद्रमश्नुतेसावादित्यो ब्रह्मेति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति य एवं वेद॥ २ ॥

( तैत्तिरीयारण्यक, प्रपाठक २, अनुवाक २)

तात्पर्य:—पूर्वकालीं राक्षसांनीं उग्र तपश्चर्या केली असतां त्या तपश्चर्येच्या योगानें ब्रह्मदेव संतुष्ट झाला आणि " वर मागा " असें त्यांना ह्मणाला. तेव्हां " सूर्य आमचा प्रतियोद्धा असावा. " असा त्यांनीं वर मागितला. तेव्हां ब्रह्मदेवानेंही " तुह्मी सूर्याबरोबर युद्ध कराल. " ह्मणून त्यांना वर दिला. ह्या कारणामुळें सूर्य उदय पावल्यापासून तों अस्तास जाईपर्यंत ते राक्षस सूर्याबरोबर युद्ध करीत असतात; परंतु, ते सूर्याशीं युद्ध करूं लागले असतां दुसऱ्या कोणत्याही उपायानें त्यांचा प्रतीकार होत नसून गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित केलेलें जें जल त्याच्याच योगानें त्या राक्षसांचा वध होत असतो तस्मात् , ज्याअर्थी ह्या गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित झालेल्या जलानें राक्षसांची शांति होत असते त्याअर्थी ह्या वेदाध्ययन करणाऱ्यांनीं प्रात:संध्यासमयीं पूर्वाभिमुख होऊन गायत्रीनें अभिमंत्रित केलेलें उदक वर फेंकावें. ह्मणजे तें वर फेंकलेलें उदक गायत्रीमंत्राच्या सामर्थ्यानें वज्ररूप बनतें आणि सूर्याबरोबर युद्ध करण्याकरितां आलेल्या मंदेहनामक राक्षसांना त्यांच्याच मालकीच्या एका अरुणनामक द्वीपामध्यें फेंकून देतें. ह्याप्रमाणें वेदाध्ययन करणाऱ्या द्विजांनीं गायत्रीमंत्रानें उदक वर फेंकिल्यावर प्रदक्षिणक फिरावें ह्मणजे त्याच्या योगानें पापाचा क्षय होतो. ह्यास्तव, हा दृग्गोचर होणारा सूर्यच ब्रह्म आहे असें जाणणारा जो द्विज नेहमीं उदयसमयीं व अस्तसमयीं ह्याप्रमाणें सूर्याची उपासना करीत असतो त्याचें सर्वप्रकारें कल्याण होतें. इतकेंच नव्हे; परंतु, आदित्यच ब्रह्म आहे असें जो जाणितो त्याला ज्ञानप्राप्ति होऊन अज्ञानाचा निरास झाला असतां तोही ब्रह्माचेच ठिकाणीं मिळून जातो.

राक्षसाः ४३ ततः पाण्डुरमेघाभं क्षीरोदं नाम सागरम् । गत्वा द्रक्ष्यथ दुर्धर्षा मुक्ताहारमिवोर्मिभिः ४४ तस्य मध्ये महाञ्छ्वेतो ऋषभो नाम पर्वतः । दिव्यगन्धैः कुसुमितैराचितैश्च नगैर्वृतः । सरश्च राजतैः पद्मैर्ज्वलितैर्हेमकेसरैः । नाम्ना सुदर्शनं नाम राजहंसैः समाकुलम् ४६ विबुधाश्चारणा यक्षाः किंनराश्चाप्सरोगणाः । हृष्टाः समधिगच्छन्ति नलिनीं तां रिरंसवः ४७ क्षीरोदं समतिक्रम्य तदा द्रक्ष्यथ वानराः । जलोदं सागरं शीघ्रं सर्वभूतभयावहम् ४८ तत्र तत्कोपजं तेजः कृतं हयमुखं महत् । अस्याहुस्तं महावेगमोदनं सचराचरम् ४९ तत्र विक्रोशतां नादो भूतानां सागरौकसाम् । श्रूयते चासमर्थानां दृष्ट्वाभूद्वडवामुखम् ५० स्वादूदस्योत्तरे तीरे योजनानि त्रयोदश । जातरूपशिलो नाम सुमहान्कनकप्रभः ५१ तत्र चन्द्रप्रतीकाशं पन्नगं धरणीधरम् । पद्मपत्र-

---

प्रत्यहीं द्विजांच्या हातून होणारीं जी अर्घ्यदानादि कर्मे त्यांच्या सामर्थ्यानें वध पावून उदकामध्यें पडत असतात व पुनरपि ( सूर्यास्त झाल्यावर जिवंत होऊन पर्वतशिखरांचे ठिकाणीं ) लोंबकळूं लागतात ४२, ४३. तदनंतर श्वेतवर्ण मेघाप्रमाणें दिसत असलेल्या क्षीरसागराकडे जा आणि, हे अजिंक्य वानरहो, लाटांमुळें मोत्यांच्या हारांनीं भूषित झाल्याप्रमाणें भासत असलेल्या त्या सागराला तुम्ही अवलोकन करा ४४. त्या सागरामध्यें ऋषभ म्हणून एक मोठा श्वेत पर्वत आहे. तो दिव्यगंधांनीं युक्त व प्रफुल्लित असून ठिकठिकाणीं भूप्रदेश व्यापून राहिलेल्या वृक्षांनीं परिवेष्टित झालेला असतो ४५. राजहंसांनीं गजबजून गेलेलें असें एक सुदर्शननामक प्रसिद्ध सरोवरही तेथें आहे व तें पीतवर्ण परागांनीं युक्त अशा उज्ज्वल श्वेतकमलांनीं भरलेलें आहे ४६. देव, चारण, यक्ष, किन्नर आणि अप्सरांचे समुदाय आनंदित होऊन क्रीडा करण्याच्या उद्देशानें त्या सरोवरावर येत असतात ४७. असो. क्षीरसागर ओलांडिल्यावर, हे वानरहो, सर्व प्राण्यांना भय उत्पन्न करणारा असा एक नेहमीं चंचल असलेला जलसमुद्र तुमच्या दृष्टीं पडेल ४८. त्या जलसमुद्रामध्यें और्वब्रह्मर्षीच्या कोपापासून ब्रह्मदेवानें एक घोडीच्या मुखासारिखें प्रचंड तेज करून ठेविलें आहे. त्या तेजोरूप मुखाचें हें अद्भुत व महावेगानें युक्त असलेलें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् प्रलयसमयीं भक्ष्य होत असतें ४९. वडवामुख दृष्टीं पडतांक्षणीं त्यांत पडूं कीं काय ह्या भीतीनें आक्रोश करूं लागलेल्या दुर्बल जलचर प्राण्यांचा ध्वनि कानावर येत असतो ५०. शुद्धजलसमुद्राच्या उत्तर तीरावर तेरा योजनेंपर्यंत लांब असलेला एक जातरूपशिल म्हणून फारच मोठा सुवर्णासारिखा उज्ज्वल पर्वत आहे ५१. त्या पर्वतावर चंद्रासारिखा श्वेतवर्ण व कम-

विशालाक्षं ततो द्रक्ष्यथ वानराः ५२ आसीनं पर्वतस्याग्रे सर्वदेवनम-स्कृतम्। सहस्रशिरसं देवमनन्तं नीलवाससम् ५३ त्रिशिराः काञ्चनः केतुस्तालस्तस्य महात्मनः। स्थापितः पर्वतस्याग्रे विराजति सवेदिकः ५४ पूर्वस्यां दिशि निर्माणं कृतं तत्त्रिदशेश्वरैः। ततः परं हेममयः श्रीमानुद-यपर्वतः ५५ तस्य कोटिर्दिवं स्पृष्ट्वा शतयोजनमायता। जातरूपमयी दिव्या विराजति सवेदिका ५६ सालैस्तालैस्तमालैश्च कर्णिकारैश्च पुष्पितैः। जातरूपमयैर्दिव्यैः शोभते सूर्यसंनिभैः ५७ तत्र योजनविस्तारमुच्छ्रितं दशयोजनम्। शृङ्गं सौमनसं नाम जातरूपमयं ध्रुवम् ५७ तत्र पूर्वं पदं कृत्वा पुरा विष्णुस्त्रिविक्रमे। द्वितीयं शिखरे मेरोश्चकार पुरुषोत्तमः ५९ उत्तरेण परिक्रम्य जम्बूद्वीपं दिवाकरः। दृश्यो भवति भूयिष्ठं शिखरं तन्महोच्छ्रयम् ६० तत्र वैखानसा नाम वालखिल्या महर्षयः। प्रकाश-माना दृश्यन्ते सूर्यवर्णास्तपस्विनः ६१ अयं सुदर्शनो द्वीपः पुरो यस्य

लपत्राप्रमाणें विशालनेत्रांनीं युक्त असा धरणीधर नाग, हे वानरहो, तुह्मी अवलोकन कराल ५२. सर्व देवतांना पूज्य, सहस्र मस्तकें धारण करणारा आणि नील वस्त्र परिधान करणारा तो अनंत देव पर्वताचे अग्रभागीं बसलेला असतो ५३. त्या प्रचंड पर्वताच्या अग्रभागीं तीन खांडांनीं युक्त असा जो सुवर्णवर्ण ध्वजाप्रमाणें तालवृक्ष स्थापित केला आहे तो खालच्या पारासहवर्तमान झळकत असतो ५४. स्वर्गाधिपति देवांनीं पूर्व दिशेला तें एक–ओळख पटण्याकरितां स्थापित केलेल्या शंकूप्रमाणें–पूर्व दिशेचें प्रमाण ह्मणून निर्माण केलेलें आहे. त्याच्यापुढें सुवर्णमय व भव्य असा उदयपर्वत आहे ५५. त्या पर्वताचें शंभर योजनें उच्च असलेलें सुवर्णमय दिव्य शिखर स्वर्गाला स्पर्श करून खालच्या आधारभूत पर्वतासहवर्तमान झळकत राहिलेलें आहे ५६ व साल, ताल, तमाल, प्रफुल्लित कर्णिकार आणि सूर्यासारिखे उज्ज्वल असे दुसरेही सुवर्णमय दिव्य वृक्ष ह्यांनीं तें शिखर शोभत आहे ५७. त्या उदयगिरीच्या शंभर योजनें उच्च असलेल्या शिखरावर एक योजन रुंद आणि दहा योजनें उंच असें एक सौमनस नामक सुवर्णमय अचल शिखर आहे ५८. पूर्वी तीन पादांनीं त्रैलोक्य व्यापून टाकण्याचे वेळीं पुरुषश्रेष्ठ विष्णूंनीं ( सत्ययुगीं ) त्या सौमनस शिखरावर पहिलें पाऊल ठेवून दुसरें पाऊल मेरुपर्वताच्या शिखरावर ठेविलें होतें ५९. उत्त-रेच्या बाजूनें जंबुद्वीपाला जाऊन त्या अति उंच सौमनस शिखरावर गेलें असतां जंबुद्वीपवर्ती प्राण्यांना सूर्य पुष्कळ दृग्गोचर होतो ६०. त्या ठिकाणीं कांतीनें सूर्या-समान व तपस्वी असे वैखानसनामक वालखिल्य महर्षि प्रकाशत असलेले दृष्टीं पडत

प्रकाशते । तस्मिंस्तेजश्च चक्षुश्च सर्वप्राणभृतामपि ६२ शैलस्य तस्य पृष्ठेषु कंदरेषु वनेषु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः ६३ काञ्चनस्य च शैलस्य सूर्यस्य च महात्मनः । आविष्टा तेजसा संध्या पूर्वा रक्ता प्रकाशते ६४ पूर्वमेतत्कृतं द्वारं पृथिव्या भुवनस्य च । सूर्यस्योदयनं चैव पूर्वा ह्येषा दिगुच्यते ६५ तस्य शैलस्य पृष्ठेषु निर्झरेषु गुहासु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः ६६ ततः परमगम्या स्यादिक्पूर्वा त्रिदशावृता । रहिता चन्द्रसूर्याभ्यामदृश्या तमसावृता ६७ शैलेषु तेषु सर्वेषु कन्दरेषु नदीषु च । ये च नोक्ता मयोद्देशा विचेया तेषु जानकी ६८ एतावद्वानरैः शक्यं गन्तुं वानरपुंगवाः । अभास्करममर्यादं न जानीमस्ततः परम् ६९ अभिगम्य तु वैदेहीं निलयं रावणस्य च । मासे पूर्णे निवर्तध्वमुदयं प्राप्य पर्वतम् ७० ऊर्ध्वं मासान्न वस्तव्यं वसन्वध्यो भवेन्मम । सिद्धार्थाः संनिवर्तध्वमधिगम्य च मैथि-

असतात ६१. त्याच्यापुढें हें सुदर्शन बेट झळकत आहे व त्या सौमनस शिखरावर सूर्याचा उदय झाला असतां सर्व प्राणी सतेज होत असून त्यांचे नेत्र प्रकाशमान होऊं लागतात ६२. त्या पर्वताच्या पृष्ठभागावर त्याच्या गुहांतून आणि वनांतून सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे ६३. सुवर्णपर्वत आणि महात्मा सूर्य ह्यांच्या तेजानें सकाळीं सूर्योदयसमयीं आरक्तवर्ण झालेली पूर्व दिशा प्रकाशत असते ६४. सूर्योदय अवलोकन करून वरील लोकांना पृथ्वीमध्यें प्रवेश करण्याचें आणि पृथ्वींतील लोकांना ब्रह्मलोकामध्यें प्रवेश करण्याचें हें उदयगिरिरूप द्वार पूर्वी केलेलें आहे ह्यामुळें हिला पूर्व दिशा ह्मणत असतात ६५. त्या उदयाचलाचे पृष्ठभाग, जलप्रवाह आणि गुहा ह्यांमध्यें रावणासहवर्तमान सीतेचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे ६६. त्याच्यापुढें देवतांनीं व्याप्त झालेल्या त्या पूर्वदिशेस जातां येणार नाहीं. कारण, तेथें चंद्रसूर्यांचा प्रकाश नसल्यामुळें ती अंधकारानें व्याप्त असून अदृश्य असते ६७. असो. ते सर्व पर्वत, गुहा आणि नद्या ह्यांमध्यें व मीं ज्यांचा उल्लेख केला नाहीं असेही जे कांहीं प्रदेश राहिले असतील त्यांमध्यें जानकी शोधिली पाहिजे ६८. हे वानरश्रेष्ठहो, येथपर्यंत वानरांचें गमन होणें शक्य आहे. सूर्याचा प्रकाश ज्या ठिकाणीं नाहीं आणि जेथें कसली मर्यादा नाहीं असा त्याच्या पुढला प्रदेश आह्मांला ठाऊक नाहीं ६९. रावणाच्या वसतिस्थानामध्यें जाऊन व सीतेची भेट घेऊन तुह्मी एका महिन्यांत उदयपर्वतावर जाऊन परत फिरा ७०. महिन्यापेक्षां जास्त वेळपर्यंत बाहेर राहतां उपयोगीं नाहीं; जो राहील त्याचा माझ्या हातून वध

लीम् ७१ महेन्द्रकान्तां वनषण्डमण्डितां दिशं चरित्वा निपुणेन वानराः। अवाप्य सीतां रघुवंशजप्रियां ततो निवृत्ताः सुखिनो भविष्यथ ७२ [ १७०४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

ततः प्रस्थाप्य सुग्रीवस्तन्महद्वानरं बलम् । दक्षिणां प्रेषयामास वानरानभिलक्षितान् १ नीलमग्निसुतं चैव हनूमन्तं च वानरम् । पितामहसुतं चैव जाम्बवन्तं महौजसम् २ सुहोत्रं च शरारिं च शरगुल्मं तथैव च । गजं गवाक्षं गवयं सुषेणं वृषभं तथा ३ मैन्दं च द्विविदं चैव सुषेणं गन्धमादनम् । उल्कामुखमनङ्गं च हुताशनसुतावुभौ ४ अङ्गदप्रमुखान्वीरान्वीरः कपिगणेश्वरः । वेगविक्रमसंपन्नान्संदिदेश विशेषवित् ५ तेषामग्रेसरं चैव बृहद्बलमथाङ्गदम् । विधाय हरिवीराणामादिशद्दक्षिणां दिशम् ६ ये केचन समुद्देशास्तस्यां दिशि सुदुर्गमाः। कपीशः कपिमुख्यानां स तेषां समुदाहरत् ७ सहस्रशिरसं विन्ध्यं नानाद्रुमलतायुतम् । नर्मदां च नदीं रम्यां महोरगनिषेविताम् ८ ततो गोदावरीं रम्यां

---

होइल. ह्याकरितां सीतेचा शोध लावून ह्मणजे अर्थात् कार्यसिद्धि करून तुह्मी इतक्या मुदतींत परत फिरा ७१. सारांश, हे वानरहो, वनप्रदेशांनीं भूषित अशा इंद्रप्रिय पूर्व दिशेमध्यें चातुर्यानें संचार करून व रघुवंशज रामाची प्रिया सीता प्राप्त करून घेऊन तुह्मी परत फिरा आणि सुखी व्हा ७२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

ह्याप्रमाणें तें प्रचंड वानरसैन्य पूर्वदिशेला पाठविल्यानंतर सुग्रीवानें कार्य करण्यास समर्थ ह्मणून ठरलेले असे वानर दक्षिण दिशेस पाठविले १. अग्निपुत्र नील, हनूमान् वानर, महाबलाढ्य ब्रह्मपुत्र जांबवान् २, सुहोत्र, शरारि, शरगुल्म, गज, गवाक्ष, गवय, सुषेण, वृषभ ३, मैंद, द्विविद, दुसरा सुषेण, गंधमादन, अग्निपुत्र उल्कामुख व अनंग ४ आणि महावेगवान् व महापराक्रमी असे अंगदप्रभृति वीर शोधण्याला योग्य असे विशेष प्रदेश जाणणाऱ्या वानरगणाधिपति वीर सुग्रीवानें पाठविले ५ आणि महाबलाढ्य अंगदाला त्या वानरवीरांचा अग्रणी करून त्यांना दक्षिण दिशेस जाण्यास सांगितलें ६ आणि त्या दिशेला जे कांहीं अत्यंत दुर्गम प्रदेश आहेत ते सर्व त्या वानराधिपतीनें त्या वानरश्रेष्ठांना सांगून दिले ७. (तो ह्मणाला) "हजारों शिखरांनीं आणि नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेला विंध्याद्रि, महासर्पांनीं आश्रय केलेली रमणीय नर्मदा नदी ८, रम्य गोदावरी, महानदी, कृष्णवेणी,

कृष्णवेर्णीं महानदीम्। मेखलानुत्कलांश्चैव दशार्णनगराण्यपि॥ आब्रवन्तीमवन्तीं च सर्वमेवानुपश्यत ९ विदर्भानृष्टिकांश्चैव रम्यान्माहिषकानपि। तथा मत्स्यकलिङ्गांश्च कौशिकांश्च समन्ततः १० अन्वीक्ष्य दण्डकारण्यं सपर्वतनदीगुहम्। नदीं गोदावरीं चैव सर्वमेवानुपश्यत ११ तथैवान्ध्रांश्च पुण्ड्रांश्च चोलान्पाण्ड्यांश्च केरलान्। अयोमुखश्च गन्तव्यः पर्वतो धातुमण्डितः १२ विचित्रशिखरः श्रीमांश्चित्रपुष्पितकाननः। सुचन्दनवनोद्देशो मार्गितव्यो महागिरिः १३ ततस्तामापगां दिव्यां प्रसन्नसलिलाशयाम्। तत्र द्रक्ष्यथ कावेरीं विहृतामप्सरोगणैः १४ तस्यासीनं नगस्याग्रे मलयस्य महौजसः। द्रक्ष्यथादित्यसंकाशमगस्त्यमृषिसत्तमम् १५ ततस्तेनाभ्यनुज्ञाताः प्रसन्नेन महात्मना। ताम्रपर्णीं ग्राहजुष्टां तरिष्यथ महानदीम् १६ सा चन्दनवनैश्चित्रैः प्रच्छन्नद्वीपवारिणी। कान्तेव युवती कान्तं समुद्रमवगाहते १७ ततो हेममयं दिव्यं मुक्तामणिविभूषितम्। युक्तं कवाटं पाण्ड्यानां गता द्रक्ष्यथ वानराः १८ ततः

---

मेखल व उत्कल देश, दशार्णदेशांतील शहरें, आब्रवती आणि अवंती हीं सर्व तुह्मी पहा ९. विदर्भ, ऋष्टिक, रम्य माहिषक, मत्स्य, कलिंग आणि कौशिक हेही देश सर्व बाजूंनीं तुह्मी धुंडून काढा १०. पर्वत, नद्या व गुहा ह्यांसहवर्तमान दंडकारण्य व गोदावरी नदी शोधून तुह्मी सर्व कांहीं हुडका ११. त्याचप्रमाणें आंध्र, पुंड्र, चोल, पांड्य आणि केरल हे देश धुंडून काढा. धातूंनीं भूषित असलेल्या अयोमुख पर्वतावरही गेलें पाहिजे १२ आणि अद्भुत शिखरें, मनोहर व प्रफुल्लित वनें आणि उत्कृष्ट चंदनवृक्षांच्या वनांनीं संपन्न असलेले प्रदेश ह्यांनीं युक्त असलेला तो भव्य महापर्वत शोधून काढिला पाहिजे १३. तदनंतर निर्मल जलाशयांनीं जी युक्त आहे आणि अप्सरांचे समुदाय जिचे ठिकाणीं क्रीडा करीत असतात ती दिव्य कावेरी नदी तुह्मी अवलोकन कराल १४. त्या महातेजस्वी मलयपर्वताच्या अग्रभागीं सूर्यतुल्य ऋषिश्रेष्ठ अगस्त्य बसलेले तुह्मी पहा १५ आणि त्या सुप्रसन्न महात्म्याची अनुज्ञा झाल्यावर मकरांनीं युक्त असलेली महानदी ताम्रपर्णी तुह्मी तरून जा. १६ जिच्यांतील बेटें व उदक अद्भुत चंदनवनांनीं आच्छादित झालेलीं आहेत अशी ती ताम्रपर्णी नदी, वस्त्रादिकांनीं शरीर आच्छादिलेली तरुणी स्त्री ज्याप्रमाणें आपल्या प्रियपतीला आलिंगन देते त्याप्रमाणें, समुद्राला आलिंगन देत आहे १७. तदनंतर मोत्यें व रत्नें ह्यांनीं भूषित केलेलें व किल्ल्याला जडलेलें असें पांड्यदेशाचें सुवर्णमय दिव्य द्वार तुह्मी अवलोकन करा १८. नंतर समुद्रापाशीं गेल्यावर तो तरून

समुद्रमानाद्य संप्रधार्यार्थनिश्चयम् । अगस्त्येनान्तरे तत्र सागरे विनिवे-
शितः १९ चित्रभानुनगः श्रीमान्महेन्द्रः पर्वतोत्तमः । जातरूपमयः श्रीमा-
नवगाढो महार्णवम् २० नानाविधैर्नगैः फुल्लैर्लताभिश्चोपशोभितम् ।
देवर्षियक्षप्रवरैरप्सरोभिश्च शोभितम् २१ सिद्धचारणसङ्घैश्च प्रकीर्णं
सुमनोरमम् । तमुपैति सहस्राक्षः सदा पर्वसु पर्वसु २२ द्वीपस्तस्यापरे
पारे शतयोजनविस्तृतः । अगम्यो मानुषैर्दीप्तस्तं मार्गध्वं समन्ततः २३
तत्र सर्वात्मना सीता मार्गितव्या विशेषतः । स हि देशस्तु वध्यस्य राव-
णस्य दुरात्मनः २४ राक्षसाधिपतेर्वासः सहस्राक्षसमद्युतेः । दक्षिणस्य
समुद्रस्य मध्ये तस्य तु राक्षसी २५ अङ्गारकेति विख्याता छायामा-
क्षिप्य भोजनी । एवं निःसंशयान्कृत्वा संशयान्नष्टसंशयाः २६ मृगयध्वं
नरेन्द्रस्य पत्नीममिततेजसः । तमतिक्रम्य लक्ष्मीवान्समुद्रं शतयोजनं २७
गिरिः पुष्पितको नाम सिद्धचारणसेवितः । चन्द्रसूर्यांशुसंकाशः सागरा-

---

जाण्याविषयीं तुम्ही आपल्या सामर्थ्याचा विचार करून काय तें करा. त्या समुद्रामध्यें अगस्त्यमुनींनीं श्रेष्ठ पर्वत महेंद्र स्थापित केलेला आहे. अद्भुत शिखरें व वृक्ष ह्यांनीं युक्त असलेला तो सुंदर व भव्य पर्वत सुवर्णमय असून त्याची एक बाजू समुद्रांत गेलेली आहे १९,२०. नानाप्रकारच्या प्रफुल्लित वृक्षांनीं व लतांनीं सुशोभित, श्रेष्ठ श्रेष्ठ देव, ऋषि आणि यक्ष व अप्सरा ह्यांच्या योगानें शोभायुक्त २१ आणि सिद्ध व चारण ह्यांच्या समुदायांनीं गजबजलेला असा जो अत्यंत मनोहर महेंद्रपर्वत त्यावर नेहमीं प्रत्येक पर्वदिवशीं इंद्र येत असतो २२. त्याच्या पश्चिम तीराला मनुष्यांनीं जाण्यास अशक्य असें एक उज्ज्वल बेट शंभर योजनें विस्तृत आहे तें सर्व बाजूंनीं शोधून काढा २३. तेथें सर्व प्रकारानें विशेषकरून तुम्ही सीतेचा शोध लाविला पाहिजे. कारण, तेजानें इंद्रतुल्य असलेला जो दुरात्मा राक्षसाधिपति वध्य रावण त्याचें तो प्रदेश निवासस्थान आहे. दक्षिणसमुद्रामध्यें त्या रावणाची एक राक्षसी आहे २४,२५. ती अंगारका ह्या नांवानें विख्यात असून वरून जाणाऱ्या प्राण्यांना खालीं पडलेल्या त्यांच्या छायेच्या योगानें ओढून घेऊन खात असते. ह्याप्रमाणें जेथें जेथें मिळून सीता असण्याचा संशय आहे ते सर्व देश धुंडाळून निःसंशय केल्यावर ती आहे किंवा नाहीं ह्याचा काय तो तुम्ही निश्चय करा २६ आणि तेथें नाहीं असें ठरल्यानंतर त्या महातेजस्वी राजाच्या पत्नीचा तें लंका बेट ओलांडून तुम्ही शोध लावा. त्या बेटाच्या पलीकडे शंभर योजनें समुद्रप्रदेश आक्रमण केल्यावर सिद्ध व चारण ह्यांनीं आश्रय केलेला असा एक पुष्पितक नांवाचा सुंदर पर्वत तुम्हाला लागेल. त्याची

न्बुसमाश्रयः २८ भ्राजते विपुलैः शृङ्गैरम्बरं विलिखन्निव । तस्यैकं काञ्चनं शृङ्गं सेवते यं दिवाकरः २९ न तं कृतघ्नाः पश्यन्ति न नृशंसा न नास्तिकाः। प्रणम्य शिरसा शैलं तं विमार्गथ वानराः ३० तमतिक्रम्य दुर्धर्षं सूर्यवान्नाम पर्वतः । अध्वना दुर्विगाहेन योजनानि चतुर्दश ३१ ततस्तमप्यतिक्रम्य वैद्युतो नाम पर्वतः । सर्वकामफलैर्वृक्षैः सर्वकालमनोहरैः ३२ तत्र भुक्त्वा वरार्हाणि मूलानि च फलानि च । मधूनि पीत्वा जुष्टानि परं गच्छत वानराः ३३ तत्र नेत्रमनःकान्तः कुञ्जरो नाम पर्वतः । अगस्त्यभवनं यत्र निर्मितं विश्वकर्मणा ३४ तत्र योजनविस्तारमुच्छ्रितं दशयोजनम् । शरणं काञ्चनं दिव्यं नानारत्नविभूषितम् ३५ तत्र भोगवती नाम सर्पाणामालयः पुरी । विशालरथ्या दुर्धर्षा सर्वतः परिरक्षिता ३६ रक्षिता पन्नगैर्घोरैस्तीक्ष्णदंष्ट्रैर्महाविषैः । सर्पराजो महाघोरो यस्यां वसति वासुकिः ३७ निर्याय मार्गितव्या च सा च भोगवती

---

प्रभा चंद्रसूर्यांच्या किरणांप्रमाणें असून समुद्राच्या उदकाचा त्याला आश्रय आहे २७, २८ आणि आपल्या विपुल शिखरांच्या योगानें आकाश विदीर्ण करीतच कीं काय तो झळकत राहिलेला आहे. त्या पर्वताच्या ज्या एका सुवर्णशिखरासमीप सूर्य नेहमीं असतो २९ तें शिखर कृतघ्न, दुष्ट व नास्तिक ह्यांच्या दृष्टींही पडत नाहीं. तेव्हां त्या पर्वताला मस्तकानें प्रणाम करून, हे वानरहो, तुम्ही तो शोधून काढा ३०. जेथं कोणाचेंही कांहीं चालावयाचें नाहीं असा तो पर्वत ओलांडून गेल्यावर सूर्यवान् म्हणून दुसरा एक पर्वत तुम्हाला लागेल त्याचा मार्ग फारच कठिण आहे व तो पर्वत चौदा योजनें आहे ३१. तो पर्वत ओलांडिल्यानंतर सर्वकाल मनोहर अशा कल्पवृक्षांनीं युक्त असलेला एक वैद्युतनामक पर्वत तुम्हाला लागेल ३२. त्या ठिकाणीं उत्कृष्ट मुळें व फळें भक्षण करून आणि तेथं असलेलें मध पिऊन, हे वानरहो, तुम्ही पुढें चालते व्हा ३३. तेथं नेत्रांना व मनाला सुंदर दिसणारा असा एक कुंजरनामक पर्वत आहे व त्या पर्वतावर विश्वकर्म्यानें अगस्त्यमुनींचें गृह निर्माण केलेलें आहे ३४. त्या घराची लांबीरुंदी चार कोस असून उंची चाळीस कोस आहे व तें सुवर्णमय दिव्य गृह नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित केलेलें आहे ३५. तेथं सर्पांचें निवासस्थान अशी एक भोगवतीनामक नगरी आहे; तिच्यांतील रस्ते रुंद आहेत आणि सर्व बाजूंनीं ती सुरक्षित असल्यामुळें तिच्यावर शत्रूंचा हल्ला होणें अशक्य आहे ३६. तीक्ष्ण दंष्ट्रा आणि प्रचंड विष ह्यांनीं युक्त असलेल्या भयंकर भुजंगांनीं तिचें संरक्षण केलेलें असून महाभयंकर सर्पराज वासुकी तिच्यामध्यें वास्तव्य

पुरी । तत्र चानन्तरोद्देशा ये केचन समावृताः ३८ तं च देशमतिक्रम्य महानृषभसंस्थितिः । सर्वरत्नमयः श्रीमानृषभो नाम पर्वतः ३९ गोशीर्षकं पद्मकं च हरिश्यामं च चन्दनम् । दिव्यमुत्पद्यते यत्र तच्चैवाग्निसमप्रभम् ४० न तु तच्चन्दनं दृष्ट्वा स्प्रष्टव्यं तु कदाचन । रोहिता नाम गन्धर्वा घोरं रक्षन्ति तद्वनम् ४१ तत्र गन्धर्वपतयः पञ्च सूर्यसमप्रभाः । शैलूषो ग्रामणीः शिक्षः शुको बभ्रुस्तथैव च ४२ रविसोमाग्निवपुषां निवासः पुण्यकर्मणाम् । अन्ते पृथिव्या दुर्धर्षास्ततः स्वर्गजितः स्थिताः ४३ ततः परं न वः सेव्यः पितृलोकः सुदारुणः । राजधानी यमस्यैषा कष्टेन तमसावृता ४४ एतावदेव युष्माभिर्वीरवानरपुंगवाः । शक्यं विचेतुं गन्तुं वा नातो गतिमतां गतिः ४५ सर्वमेतत्समालोक्य यच्चान्यदपि दृश्यते । गतिं विदित्वा वैदेह्याः संनिवर्तितुमर्हथ ४६ यश्च मासान्निवृत्तोऽग्रे दृष्टा सीतेति वक्ष्यति । मत्तुल्यविभवो

---

करीत आहे ३७. त्या भोगवतीनगरीमध्यें तुह्मी जा आणि ती नगरी व तिच्या आसपास असलेले जे कांहीं इतर सुरक्षित प्रदेश तेही सर्व तुह्मी धुंडून काढा ३८. तो प्रदेश ओलांडिल्यानंतर मोठ्या बैलाप्रमाणें ज्याचा आकार आहे असा एक ऋषभनामक भव्य आणि सर्व रत्नांनीं परिपूर्ण असलेला पर्वत तुह्माला लागेल ३९. त्या पर्वतावर गोशीर्षक, पद्मक व हरिश्याम असा तिन्ही प्रकारचा दिव्य चंदन उत्पन्न होत असतो ४० व त्याचें तेज अग्नीसारिखें असतें; तो चंदन अवलोकन केल्यावर तुह्मी त्याला स्पर्श करूं नका. कारण, रोहितनामक गंधर्व त्या घोर वनाचें रक्षण करीत असतात ४१. शैलूष, ग्रामणी, शिक्ष, शुक व बभ्रु असे पांच सूर्यासारिखे तेजस्वी गंधर्वाधिपति तेथें असतात ४२. ऋषभपर्वताच्या पलीकडे पृथ्वीचे शेवटीं सूर्य, चंद्र व अग्नि ह्यांप्रमाणें ज्यांच्या शरीरांची कांति आहे अशा पुण्यवान् लोकांचें निवासस्थान आहे व त्या ठिकाणीं स्वर्गप्राप्ति झालेलेच लोक वास्तव्य करीत असतात; त्यांच्यासमीप जाणें शक्य नाहीं ४३ आणि ह्मणूनच त्याच्यापुढें असलेला जो अतिभयंकर पितृलोक तिकडेही तुह्माला जाण्याचें प्रयोजन नाहीं; कारण, ती दुःसह अंधकारानें व्याप्त झालेली यमाची राजधानी आहे ४४. हे वीर वानरश्रेष्ठहो, येथपर्यंतच तुमचें जाणें व तुमच्या हातून शोध लागणें शक्य आहे. भूतलावर गमन करण्यास समर्थ असलेल्या प्राण्यांनें ह्याच्यापुढें गमन होणें शक्य नाहीं ४५. तेव्हां हें सर्व पाहून दुसरें जें कांहीं दृश्य आहे तेंही तुह्मी धुंडाळा आणि सीतेचा पत्ता लागल्यावर परत फिरा ४६. जो एका महिन्याचे आंत पुढें येऊन "सीता दृष्टीं पडली." असें सांगेल त्याचें वैभव माझ्यासारिखें होईल आणि तो

भोगैः सुखं स विहरिष्यति ४७ ततः प्रियतरो नास्ति मम प्राणाद्विशेषतः । कृतापराधो बहुशो मम बन्धुर्भविष्यति ४८ अमितबलपराक्रमा भवन्तो विपुलगुणेषु कुलेषु च प्रसूताः । मनुजपतिसुतां यथा लभध्वं तदधिगुणं पुरुषार्थमारभध्वम् ४९ [ १७५३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥४१॥

अथ प्रस्थाप्य स हरीन्सुग्रीवो दक्षिणां दिशम् । अब्रवीन्मेघसंकाशं सुषेणं नाम वानरम् १ तारायाः पितरं राजा श्वशुरं भीमविक्रमम् । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यमभिगम्य प्रणम्य च २ महर्षिपुत्रं मारीचमर्चिष्मन्तं महाकपिम् । वृतं कपिवरैः शूरैर्महेन्द्रसदृशद्युतिम् ३ बुद्धिविक्रमसंपन्नं वैनतेयसमद्युतिम् । मरीचिपुत्रान्मारीचानर्चिर्माल्यान्महाबलान् ४ ऋषिपुत्रांश्च तान्सर्वान्प्रतीचीमादिशद्दिशम् । द्वाभ्यां शतसहस्राभ्यां कपीनां कपिसत्तमाः ५ सुषेणप्रमुखा यूयं वैदेहीं परिमार्गथ । सौराष्ट्रान्सहबाह्लीकांश्चन्द्रचित्रांस्तथैव च ६ स्फीताञ्जनपदान्रम्यान्विपुलानि

---

सुखानें विषयांचा उपभोग घेईल ४७. त्यापेक्षां अधिक प्रिय असा मला कोणीही नाहीं; प्राणापेक्षांही तो मला विशेष होईल आणि त्याच्या हातून .री वारंवार अपराध झालेले असले तरी तो माझा बंधु होईल ४८. ह्यास्तव, अपरिमित बल व पराक्रम ह्यांनीं युक्त असलेले तुह्मी ज्याअर्थी बहुगुणसंपन्न कुलांमध्यें जन्मास आलेले आहां त्याअर्थी राजकन्या सीता प्राप्त होईल अशा प्रकारचा उत्कृष्ट प्रयत्न तुह्मी सुरू करा ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

ह्याप्रमाणें दक्षिण दिशेस वानरांना पाठविल्यानंतर कांतीनें मेघाप्रमाणें असलेल्या सुषेणनामक वानराशीं सुग्रीव बोलूं लागला १. सारांश, तारेचा पिता आणि आपला श्वशुर असा जो भयंकर पराक्रमी सुषेण त्याच्याकडे जाऊन वानरराज सुग्रीवानें प्रणाम केला आणि हात जोडून त्याच्याशीं संभाषण केलें २. नंतर शूर वानरश्रेष्ठांनीं परिवेष्टित, इंद्रासारिखा तेजस्वी, गरुडासारिखा कांतिमान् आणि बुद्धि व पराक्रम ह्यांनीं संपन्न असा जो मरीचिमहर्षींचा पुत्र महाकपि अर्चिष्मान् त्याला, इतरही अर्चिर्माल्यसंज्ञक महाबलाढ्य मारीचांना ह्मणजे मरीचिऋषींच्या पुत्रांना आणि त्याचप्रमाणें इतर सर्व ऋषिपुत्रांना त्यानें पश्चिम दिशेस जाण्यास सांगितलें आणि ह्मणाला " हे सुषेणप्रभृति वानरश्रेष्ठहो, तुह्मी दोन लक्ष वानर बरोबर घेऊन सीतेचा शोध लावा. बाह्लीकासह वर्तमान सौराष्ट्रदेश, समृद्ध व रमणीय असा चंद्र-

पुराणि च । पुंनागगहनं कुक्षिं बकुलोद्दालकाकुलम् ७ तथा केतकखण्डांश्च मार्गध्वं हरिपुंगवाः । प्रत्यक्स्रोतोवहाश्चैव नद्यः शीतजलाः शिवाः ८ तापसानामरण्यानि कान्तारगिरयश्च ये । तत्र स्थलीर्मरुप्राया अत्युच्चशिशिराः शिलाः ९ गिरिजालावृतां दुर्गां मार्गित्वा पश्चिमां दिशम् । ततः पश्चिममागम्य समुद्रं द्रष्टुमर्हथ १० तिमिनक्राकुलजलं गत्वा द्रक्ष्यथ वानराः । ततः केतकखण्डेषु तमालगहनेषु च ११ कपयो विहरिष्यन्ति नारिकेलवनेषु च । तत्र सीतां च मार्गध्वं निलयं रावणस्य च १२ वेलातलनिविष्टेषु पर्वतेषु वनेषु च । मुरचीपत्तनं चैव रम्यं चैव जटापुरम् १३ अवन्तीमङ्गलेपां च तथा चालक्षितं वनम् । राष्ट्राणि च विशालानि पत्तनानि ततस्ततः १४ सिंधुसागरयोश्चैव संगमे तत्र पर्वते । महान्सोमगिरिर्नाम शतशृङ्गो महाद्रुमः १५ तत्र प्रस्थेषु रम्येषु सिंहाः पक्षगमास्थिताः । तिमिमत्स्यगजांश्चैव नीडान्यारोपयन्ति च १६ तानि नीडानि सिंहानां गिरिशृङ्गताश्च ये ।

---

चित्रदेश, मोठमोठीं नगरें, पुन्नागवृक्षांनीं भरलेला आणि बकुळाच्या व भोंकरीच्या झाडांनीं गजबजलेला कुक्षिनामक प्रदेश ३, ४, ५, ६, ७ आणि त्याचप्रमाणें केतकवृक्षांचीं वनें, हे वानरश्रेष्ठहो, तुह्मी धुंडाळा; पश्चिमाभिमुख वाहणाऱ्या व शीत जलानें युक्त असलेल्या पवित्र नद्या ८, तपस्व्यांचीं अरण्यें, गहनप्रदेशयुक्त पर्वत व त्या पर्वतांवर जवळ जवळ निर्जल असलेलीं ठिकाणें व अतिशय उंच व शीतल शिला हींही सर्व तुह्मी शोधून काढा ९. ह्याप्रमाणें पर्वतसमूहानें परिवेष्टित असलेली दुर्गम पश्चिम दिशा शोधून काढिल्यावर तुह्मी किंचित् पश्चिमेस गेलां असतां समुद्र तुमच्या दृष्टीं पडेल १०. हे वानरहो, जरा पश्चिमेला गेल्यावर तिमिसंज्ञक मत्स्य व मगर ह्यांनीं ज्याचें उदक व्याप्त झालेलें आहे असा समुद्र तुमच्या दृष्टीं पडणारच. नंतर केतकवृक्षांचीं वनें, तमालवृक्षांचीं अरण्यें ११ आणि नारिकेलवृक्षांचीं वनें ह्यांतून तुमच्या सैन्यांतील वानरांना विहार करूं द्या. तेथें सीतेचा व रावणाच्या निवासस्थानाचा तुह्मी शोध करा १२. समुद्राचे कांठीं असलेले पर्वत व वनें ह्यांतूनही तुह्मी शोध करा आणि मुरचीपत्तन, रम्य जटापुर १३, अवंती आणि अंगलेपा ह्या नगऱ्या, आलक्षित वन व त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं असलेलीं विशाल राष्ट्रें व नगरें हीं सर्व तुह्मी धुंडून काढा १४. सिंधु व सागर ह्याच्या संगमाचे ठिकाणीं असलेल्या सोमगिरी नांवाच्या पर्वतावर शतशृंग ह्मणून एक मोठा वृक्ष आहे १५. त्या पर्वताचा आश्रय केलेले सिंह तेथील रम्य अशा कड्यांवर असलेल्या गुहांमध्यें तिमिसंज्ञक मासे व गज ह्यांना नेऊन

द्विपास्तृप्ताश्च मातङ्गास्तोयदस्वननिःस्वनाः १७ विचरन्ति विशालेऽस्मिं-
स्तोयपूर्णे समन्ततः । तस्य शृङ्गं दिवस्पर्शं काञ्चनं चित्रपादपम् १८
सर्वमाशु विचेतव्यं कपिभिः कामरूपिभिः । कोटिं तत्र समुद्रस्य काञ्चनीं
शतयोजनाम् १९ दुर्दर्शां पारियात्रस्य गत्वा द्रक्ष्यथ वानराः । कोट्य-
स्तत्र चतुर्विंशद्गन्धर्वाणां तपस्विनाम् २० वसन्त्यग्निनिकाशानां घोराणां
पापकर्मणाम् । पावकार्चिःप्रतीकाशाः समवेताः समन्ततः २१ नात्या-
सादयितव्यास्ते वानरैर्भीमविक्रमैः । नादेयं च फलं तस्माद्देशात्किंचि-
त्प्लवंगमैः २२ दुरासदा हि ते वीराः सत्त्ववन्तो महाबलाः । फलमूलानि
ते तत्र रक्षन्ते भीमविक्रमाः २३ तत्र यत्नश्च कर्तव्यो मार्गितव्या च
जानकी । न हि तेभ्यो भयं किंचित्कपित्वमनुवर्तताम् २४ तत्र वैदूर्यव-
र्णाभो वज्रसंस्थानसंस्थितः । नानाद्रुमलताकीर्णो वज्रो नाम महा-
गिरिः २५ श्रीमान्समुदितस्तत्र योजनानां शतं समम् । गुहास्तत्र विचे-

ठेवीत असतात १६. पर्वतशिखरावर वास्तव्य करणारे जे सिंह आहेत त्यांचीही निवास-स्थानें त्या रमणीय शिखरावरूनच आहेत. मदमत्त व तृप्त असून मेघांप्रमाणें गर्जना करणारे गज १७ ह्या जलपरिपूर्ण विशाल शिखरावर संचार करीत असतात. त्या सोमगिरीला अद्भुत वृक्षांनीं युक्त असें एक आकाशांत गेलेलें सुवर्णशिखर आहे १८. तें सर्व यथेष्ट रूप धारण करणाऱ्या वानरांनीं सत्वर शोधून काढिलें पाहिजे. त्या ठिकाणीं समुद्रा-मध्यें एक शंभर योजनें उंचीचें दृष्टीं पडण्यालाही अशक्य असलेलें पारियात्र पर्वताचें सुवर्णशिखर आहे. तें, हे वानरहो, तुह्मी तेथें जाऊन अवलोकन करा. त्या शिखरावर अग्नितुल्य तेजस्वी, भयंकर व संहार करणारे चोवीस कोट तपस्वी गंधर्व आहेत. ते गंधर्व अग्नीच्या ज्वालेप्रमाणें कडक असून तपश्चर्याकरण्याकरितां चोहोंकडून तेथें जुळलेले आहेत १९,२०,२१. त्यांचें भयंकर पराक्रमी वानरांनीं अतिक्रमण करितां उपयोगीं नाहीं आणि त्या प्रदेशापासून कोणतेंही फल वानरांनीं घेतां उपयोगीं नाहीं २२. कारण, त्या धैर्यवान् व महाबलाढ्य वीर गंधर्वांचा पराजय होणें अशक्य आहे. ते भयंकर पराक्रमी गंधर्व त्या शिखरावर फलांचें व मुळांचें रक्षण करीत असतात २३. त्या ठिकाणीं यत्न करून जानकीचा शोध लाविला पाहिजे. त्या गंधर्वांपासून वानरांना यत्किंचितही भय नाहीं २४. तेथें एक वज्रनामक महापर्वत आहे. त्याची कांति वैदूर्य-मण्या सारिखीं असून वज्रासारिख्या दृढ आकृतीनें तो युक्त आहे आणि नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं तो व्याप्त झालेला आहे २५. इतकेंच नव्हे; परंतु, शंभर योजनेंपर्यंत तो भव्य पर्वत एकसारिखा पसरलेला आहे. त्या ठिकाणीं, हे वानरहो,

तस्याः प्रयत्नेन प्लवंगमाः २६ चतुर्भागे समुद्रस्य चक्रवान्नाम पर्वतः । तत्र चक्रं सहस्रारं निर्मितं विश्वकर्मणा २७ तत्र पञ्चजनं हत्वा हयग्रीवं च दानवम् । आजहार ततश्चक्रं शङ्खं च पुरुषोत्तमः २८ तत्र सानुषु रम्येषु विशालासु गुहासु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः २९ योजनानि चतुःषष्टिर्वराहो नाम पर्वतः । सुवर्णशृङ्गः सुमहानगाधे वरुणालये ३० तत्र प्राग्ज्योतिषं नाम जातरूपमयं पुरम् । तस्मिन्वसति दुष्टात्मा नरको नाम दानवः ३१ तत्र सानुषु रम्येषु विशालासु गुहासु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः ३२ तमतिक्रम्य शैलेन्द्रं काञ्चनान्तरदर्शनम् । पर्वतः सर्वसौवर्णो धाराप्रस्रवणायुतः ३३ तं गजाश्च वराहाश्च सिंहा व्याघ्राश्च सर्वतः । अभिगर्जन्ति सततं तेन शब्देन दर्पिताः ३४ यस्मिन्हरिहयः श्रीमान्महेन्द्रः पाकशासनः । अभिषिक्तः सुरै राजा मेघो नाम स पर्वतः ३५ तमतिक्रम्य शैलेन्द्रं महेन्द्रपरिपालितम् । षष्टिं गिरिसहस्राणि काञ्चनानि गमिष्यथ ३६ तरुणा-

---

प्रयत्नपूर्वक गुहा शोधून काढिल्या पाहिजेत २६ समुद्राच्या एका चतुर्थांशावर चक्रवान् ह्या नांवाचा पर्वत आहे व त्या पर्वतावर विश्वकर्म्यानें एक हजार पाकळ्यांचें चक्र निर्माण केलें आहे २७. त्या पर्वतावर पंचजन नामक हयग्रीव दानवाचा वध करून पुरुषोत्तमानें शंख व चक्र हीं घेतलीं २८. त्या पर्वतावरील रमणीय शिखरांवरून आणि विशाल गुहांतून सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे २९. त्या अगाध समुद्रामध्यंच सुवर्णशृंगांनीं युक्त असा एक फारच मोठा वराहनामक पर्वत आहे व तो चौसष्ट योजनें आहे ३०. त्या पर्वतावर प्राग्ज्योतिषनामक सुवर्णमय नगर असून त्या नगरामध्यें दुरात्मा नरकनामक दानव वास्तव्य करीत आहे ३१. त्याही पर्वतावरील रमणीय शिखरांवरून आणि विशाल गुहांतून सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे ३२. त्या महापर्वताच्या पलीकडे गेल्यानंतर दुसरा एक सुवर्ण पर्वत तुमच्या दृष्टीं पडेल. कारण, त्या महापर्वताच्या पलीकडे सर्व बाजूंनीं सुवर्णाचा आणि धबधब्यांनीं व जलप्रवाहांनीं युक्त असा एक पर्वत आहे ३३. त्या पर्वतावरील शब्दानें मदमत्त झालेले गज, वराह, सिंह आणि व्याघ्र हे सर्व बाजूंनीं नेहमीं त्याच्या संमुख गर्जना करीत असतात ३४. त्या पर्वतावर हरिसंज्ञक अश्वांनीं युक्त असलेल्या वैभवशाली पाकशासन इंद्राला देवांनीं राज्याभिषेक केला होता तो पर्वत मेघ ह्या नांवानें प्रसिद्ध आहे ३५. त्या इंद्ररक्षित महापर्वताला ओलांडून गेल्यानंतर साठ हजार पर्वताकडे तुह्मी जाल ३६. ते सर्वही पर्वत

दित्यवर्णानि भ्राजमानानि सर्वशः । जातरूपमयैर्वृक्षैः शोभितानि सुपुष्पितैः ३७ तेषां मध्ये स्थितो राजा मेरुरुत्तमपर्वतः । आदित्येन प्रसन्नेन शैलो दत्तवरः पुरा ३८ तेनैवमुक्तः शैलेन्द्रः सर्व एव त्वदाश्रयाः । मत्प्रसादाद्भविष्यन्ति दिवा रात्रौ च काञ्चनाः ३९ त्वयि ये चापि वत्स्यन्ति देवगन्धर्वदानवाः । ते भविष्यन्ति भक्ताश्च प्रभया काञ्चनप्रभाः ४० विश्वेदेवाश्च वसवो मरुतश्च दिवौकसः । आगत्य पश्चिमां संध्यां मेरुमुत्तमपर्वतम् ४१ आदित्यमुपतिष्ठन्ति तैश्च सूर्योभिपूजितः । अदृश्यः सर्वभूतानामस्तं गच्छति पर्वतम् ४२ योजनानां सहस्राणि दश तानि दिवाकरः । मुहूर्तार्धेन तं शीघ्रमभियाति शिलोच्चयम् ४३ शृङ्गे तस्य महद्दिव्यं भवनं सूर्यसंनिभम् । प्रासादगणसंबाधं विहितं विश्वकर्मणा ४४ शोभितं तरुभिश्चित्रैर्नानापक्षिसमाकुलैः । निकेतं पाशहस्तस्य वरुणस्य महात्मनः ४५ अन्तरा मेरुमस्तं च तालो दशशिरा महान् । जातरूपमयः श्रीमान्भ्राजते चित्रवेदिकः ४६ तेषु सर्वेषु दुर्गेषु सरःसु च सरित्सु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः ४७ यत्र तिष्ठति धर्म-

---

कांतीनें बालसूर्यप्रमाणें असून सर्व बाजूंनीं झळकणारे आहेत आणि सुवर्णमय प्रफुल्लित वृक्षांनीं सुशोभित झालेले आहेत ३७. त्या पर्वतांच्या मध्यभागीं मेरु ह्मणून एक श्रेष्ठ पर्वत त्यांचा राजा आहे व त्या पर्वताला सूर्यानें प्रसन्न होऊन पूर्वीं वर दिलेला आहे ३८. सूर्य त्या पर्वतराजाला असें ह्मणाला कीं " तुझ्या आश्रयाला राहणारे सर्वही रात्रंदिवस माझ्या प्रसादामुळें सुवर्णमय होतील ३९ आणि तुझ्यावर जे देव, गंधर्व आणि दानव वास्तव्य करितील तेही माझे भक्त होतील व त्यांची कांति सुवर्णासारिखी होईल ४०." विश्वेदेव, वसु आणि देव, मरुद्गण हे उत्कृष्ट मेरुपर्वतावर संध्याकाळीं येऊन ४१ सूर्याची उपासना करीत असतात व त्यांनीं पूजन केलें असतां सर्व प्राण्यांना अदृश्य असलेला सूर्य अस्ताचलाला जातो ४२. दहा हजार योजनें असलेल्या त्या पर्वताचें उल्लंघन एका अर्ध्या मुहूर्तांत करून सूर्य सत्वर चालता होतो ४३. त्या पर्वताच्या शिखरावर सूर्यासारिखें तेजस्वी असें एक मोठें दिव्य मंदिर विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें आहे, तें मोठमोठ्या वाड्यांच्या समुदायांनीं गजबजून गेलेलें आहे ४४. नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं व्याप्त झालेल्या अद्भुत वृक्षांनीं तें सुशोभित झालेलें आहे आणि पाश धारण करणाऱ्या महात्म्या वरुणाचें तें निवासस्थान आहे ४५. मेरु आणि अस्ताचलपर्वत ह्यांच्यामध्यें दहा स्कंधांनीं युक्त असा एक मोठा सुवर्णमय तालवृक्ष आहे व तो सौंदर्यसंपन्न वृक्ष अद्भुत पारानें युक्त असून झळकत राहिलेला आहे ४६. असो. ते सर्व

स्तपसा स्वेन भावितः । मेरुसावर्णिरित्येष ख्यातो वै ब्रह्मणा समः ४८
प्रष्टव्यो मेरुसावर्णिर्महर्षिः सूर्यसंनिभः । प्रणम्य शिरसा भूमौ प्रवृत्तिं
मैथिलीं प्रति ४९ एतावज्जीवलोकस्य भास्करो रजनीक्षये । कृत्वा विति-
मिरं सर्वमस्तं गच्छति पर्वतम् ५० एतावद्वानरैः शक्यं गन्तुं वानरपुं-
गवाः । अभास्करममर्यादं न जानीमस्ततः परम् ५१ अवगम्य तु वैदेहीं
निलयं रावणस्य च । अस्तं पर्वतमासाद्य पूर्णे मासे निवर्तत ५२ ऊर्ध्वं
मासान्न वस्तव्यं वसन्वध्यो भवेन्मम । सहैव शूरो युष्माभिः श्वशुरो मे
गमिष्यति ५३ श्रोतव्यं सर्वमेतस्य भवद्भिर्दिष्टकारिभिः । गुरुरेष महाबाहुः
श्वशुरो मे महाबलः ५४ भवन्तश्चापि विक्रान्ताः प्रमाणं सर्व एव हि ।
प्रमाणमेनं संस्थाप्य पश्यध्वं पश्चिमां दिशम् ५५ कृतकृत्या भविष्यामः
कृतस्य प्रतिकर्मणा ५६ अतोन्यदपि यत्कार्यं कार्यस्यास्य प्रियं भवेत् ।
संप्रधार्य भवद्भिश्च देशकालार्थसंहितम् ५७ ततः सुषेणप्रमुखाः प्लवंगमाः

---

दुर्गम प्रदेश, सरोवरें आणि नद्या ह्या ठिकाणीं सीतेसहवर्तमान रावणाचा जेथें तेथें शोध केला पाहिजे ४७. त्या मेरुपर्वतावर स्वतःच्या तपःसामर्थ्यानें सुरक्षित असलेला व मेरुसावर्णि ह्मणून प्रसिद्ध असलेला एक धर्मवेत्ता आहे; तो योग्यतेनें ब्रह्मदेवाची बरोबरी करणारा आहे ४८. त्या सूर्यतुल्य मेरुसावर्णी महर्षीला मस्तकानें भूमीवर प्रणाम करून सीतेसंबंधीं वार्ता विचारावी ४९. येथपर्यंत हा जीवलोकावरील सर्व प्रदेश रात्र समाप्त झाल्यावर प्रकाशित करून सूर्य अस्ताचलाला जात असतो ५० आणि येथपर्यंतच, हे वानरश्रेष्ठहो, वानरांचें गमन होणें शक्य आहे. सूर्यरहित आणि मर्यादारहित असा ह्याच्या पुढला प्रदेश आह्मांला माहीत नाहीं ५१. रावणाच्या निवासस्थानामध्यें व सीतेसमीप जाऊन आणि अस्ताचलपर्वताकडे गमन करून एका पूर्ण महिन्यांत तुह्मी परता ५२. एक महिन्याच्या मुदतीपेक्षां अधिक कालपर्यंत बाहेर रहातां उपयोगीं नाहीं; जो राहील तो माझ्या हातून वध पावण्यास पात्र होईल. तुमच्याबरोबरच माझा शूर श्वशुरही जाईल ५३. आज्ञेप्रमाणें वागणारे तुह्मी ह्याचें सर्व कांहीं ऐका, हा महापराक्रमी व महाबलाढ्य श्वशुर मला पितृस्थानीं आहे ५४. तुह्मीही पराक्रमी असून सर्वही कर्तव्याकर्तव्यासंबंधानें इतरांना प्रमाणभूत आहां. तथापि ह्या सुषेणाला मुख्य प्रमाणभूत समजून तुह्मी पश्चिम दिशा अवलोकन करा ५५. असो. ह्याप्रमाणें रामचंद्रानें जें आमचें कार्य केलें आहे त्याबद्दल आमच्या हातून प्रत्युपकार झाला असतां आह्मी कृतकृत्य होऊं ५६. ह्यास्तव, हें कार्य शेवटास नेण्याकरितां दुसरेंही जें कांहीं करणें इष्ट असेल तेंही देशकालानुरूप

सुग्रीववाक्यं निपुणं निशम्य । आमन्त्र्य सर्वे प्लवगाधिपास्ते जग्मुर्दिशं तां वरुणाभिगुप्ताम् ५८ [ १८११ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥ ४२ ॥

ततः संदिश्य सुग्रीवः श्वशुरं पश्चिमां दिशम् । वीरं शतबलं नाम वानरं वानरेश्वरः १ उवाच राजा सर्वज्ञः सर्ववानरसत्तमः । वाक्यमात्महितं चैव रामस्य च हितं तदा २ वृतः शतसहस्रेण त्वद्विधानां वनौकसाम् । वैवस्वतसुतैः सार्धं प्रविष्टः सर्वमन्त्रिभिः ३ दिशं ह्युदीचीं विक्रान्त हिमशैलावतंसिकाम् । सर्वतः परिमार्गध्वं रामपत्नीं यशस्विनीम् ४ अस्मिन्कार्ये विनिर्वृत्ते कृते दाशरथेः प्रिये । ऋणान्मुक्ता भविष्यामः कृतार्थार्थविदां वर ५ कृतं हि प्रियमस्माकं राघवेण महात्मना । तस्य चेत्प्रतिकारोस्ति सफलं जीवितं भवेत् ६ अर्थिनः कार्यनिर्वृत्तिमकर्तुरपि यश्चरेत् । तस्य स्यात्सफलं जन्म किं पुनः पूर्वकारिणः ७ एतां बुद्धिं समास्थाय दृश्यते जानकी यथा । तथा भवद्भिः

---

आहे असें समजून तुह्माला केलें पाहिजे " ५७. ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां त्याचें योग्य भाषण श्रवण करून सुषेणप्रभृति वानरांनीं त्याची अनुज्ञा घेतली आणि ते सर्वही वानराधिपति त्या वरुणरक्षित पश्चिम दिशेकडे चालते झाले ५८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

ह्याप्रमाणें श्वशुराला पश्चिम दिशेस पाठविल्यानंतर शतबलनामक वीर वानराशीं वानराधिपति व सर्व वानरांमध्यें श्रेष्ठ असा सर्वज्ञ सुग्रीव राजा आपल्याला व रामालाही हितावह असें भाषण करूं लागला १, २. ( तो ह्मणाला ) " हे महापराक्रमी शतबला, स्वतःसारखे एक लक्ष अरण्यवासी वानर मदतीला असतांना यमपुत्र सर्व मंत्र्यांसहवर्तमान तूं हिमालयपर्वतरूप कर्णभूषणानें युक्त असलेल्या उत्तर दिशेला जा आणि यशस्विनी रामपत्नीला तुह्मी सर्व बाजूंनीं शोधा ३, ४. हें कार्य होऊन दशरथपुत्र रामाचा मनोरथ परिपूर्ण झाला असतां, हे अर्थवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, आपण ऋणमुक्त व कृतकृत्य होऊं ५. महात्म्या रघुवंशज रामानें आपला मनोरथ परिपूर्ण केला आहे. त्याची फेड जर आपल्या हातून झाली तर आपलें जीवित सफल होईल ६. वास्तविक विचार केला असतां ज्याच्या हातून आपलें कांहीं एक कार्य झालेलें नाहीं अशा अडलेल्या पुरुषाचें कार्य जो करितो त्याचा जन्म सफल होतो. पूर्वीं ज्यानें उपकार केला त्याच्यावर प्रत्युपकार करणाऱ्याची कांहीं विशेषशीं मातब्बरी नाहीं ७.

कर्तव्यमस्मत्प्रियहितैषिभिः ८ अयं हि सर्वभूतानां मान्यस्तु नरसत्तमः ।
अस्मासु च गतः प्रीतिं रामः परपुञ्जयः ९ इमानि बहुदुर्गाणि नद्यः
शैलान्तराणि च । भवन्तः परिमार्गन्तु बुद्धिविक्रमसंपदा १० तत्र
म्लेच्छान्पुलिन्दांश्च शूरसेनांस्तथैव च । प्रस्थलान्भरतांश्चैव कुरूंश्च सह
मद्रकैः ११ काम्बोजयवनांश्चैव शकानां पत्तनानि च । अन्वीक्ष्य वरदांश्चैव हिमवन्तं विचिन्वथ १२ लोध्रपद्मकखण्डेषु देवदारुवनेषु च ।
रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः १३ ततः सोमाश्रमं गत्वा देवगन्धर्वसेवितम् । कालं नाम महासानुं पर्वतं तं गमिष्यथ १४ महत्सु
तस्य शैलेषु पर्वतेषु गुहासु च । विचिन्वत महाभागां रामपत्नीमनिन्दिताम् १५ तमतिक्रम्य शैलेन्द्रं हेमगर्भं महागिरिम् । ततः सुदर्शनं
नाम पर्वतं गन्तुमर्हथ १६ ततो देवसखा नाम पर्वतः पतगालयः ।
नानापक्षिसमाकीर्णो विविधद्रुमभूषितः १७ तस्य काञ्चनखण्डेषु निर्दरेषु गुहासु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः १८ तमति-

---

हा विचार मनामध्यें आणून आणि आमचें प्रिय व हित होण्याची इच्छा धरून तुह्मी ज्या रीतीनें सीता दृग्गोचर होईल त्या रीतीनें वागा ८. हा शत्रुसमुदाय जिंकणारा पुरुषश्रेष्ठ राम सर्व भूतांना मान्य असून आमच्यावर प्रीति करीत आहे ९. वास्तव, हीं अनेक दुर्गम स्थलें, नद्या व भिन्न भिन्न पर्वत बुद्धीच्या व पराक्रमाच्या जोरावर तुह्मी शोधून काढा १०. म्लेच्छ, पुलिंद, शूरसेन, प्रस्थल, भरत, कुरु, मद्र ११, कांबोजयवन व वरद हे देश आणि शकांचीं नगरें हुडाकिल्यावर तुह्मी हिमालयपर्वत शोधा १२. हिमालयपर्वतावरील लोध्र, पद्मक आणि देवदारु ह्या वृक्षांच्या वनांमध्यें सीतेसहवर्तमान रावणाचा ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे १३. तदनंतर देवगंधर्वांनीं आश्रय केलेल्या सोमाश्रमाला गेल्यावर मोठ्या मोठ्या शिखरांनीं युक्त असलेल्या त्या कालनामक पर्वताकडे तुह्मी जा १४ आणि त्या पर्वताच्या शेजारीं जे आणखी मोठे मोठे पर्वत व गुहा आहेत त्यांतूनही तुह्मी महाभाग्यवती व निष्कलंक रामपत्नीचा शोध करा १५. ज्याच्या अंतर्भागामध्यें सुवर्ण आहे व पर्वतांमध्यें जो श्रेष्ठ आहे असा तो महागिरी ओलांडून गेल्यानंतर सुदर्शननामक पर्वताला तुह्मी जा १६. तदनंतर पक्ष्यांचें निवासस्थान असलेला देवसखा ह्या नांवाचा पर्वत तुह्माला लागेल. तो नानाप्रकारच्या वृक्षांनीं भूषित झालेला असून अनेक प्रकारच्या पक्ष्यांनीं गजबजून गेलेला असतो १७. त्याच्या सुवर्णप्रदेशांत आणि दऱ्यांतून व गुहांतून सीतेसहवर्तमान रावणाचा तुह्मी ठिकठिकाणीं शोध करा १८. तो देवसखपर्वत ओलांडिल्यावर

क्रम्य चाकाशं सर्वतः शतयोजनम् । अपर्वतनदीवृक्षं सर्वसत्त्वविवर्जितम् १९ तत्तु शीघ्रमतिक्रम्य कान्तारं रोमहर्षणम् । कैलासं पाण्डुरं प्राप्य हृष्टा यूयं भविष्यथ २० तत्र पाण्डुरमेघाभं जाम्बूनदपरिष्कृतम् । कुबेरभवनं रम्यं निर्मितं विश्वकर्मणा २१ विशाला नलिनी यत्र प्रभूतकमलोत्पला । हंसकारण्डवाकीर्णा अप्सरोगणसेविता २२ तत्र वैश्रवणो राजा सर्वलोकनमस्कृतः । धनदो रमते श्रीमान्गुह्यकैः सह यक्षराट् २३ तस्य चन्द्रनिकाशेषु पर्वतेषु गुहासु च । रावणः सह वैदेह्या मार्गितव्यस्ततस्ततः २४ क्रौञ्चं तु गिरिमासाद्य बिलं तस्य सुदुर्गमम् । अप्रमत्तैः प्रवेष्टव्यं दुष्प्रवेशं हि तत्स्मृतम् २५ वसन्ति हि महात्मानस्तत्र सूर्यसमप्रभाः । देवैरभ्यर्थिताः सम्यग्देवरूपा महर्षयः २६ क्रौञ्चस्य तु गुहाश्चान्याः सानूनि शिखराणि च । दर्दराश्च नितम्बाश्च विचेतव्यास्ततस्ततः २७ अवृक्षं कामशैलं च मानसं विहगालयम् । न

---

औरसचौरस शंभर योजनें असलेला एक शून्य प्रदेश तुह्माला लागेल. त्या प्रदेशांत पर्वत, नद्या अथवा वृक्ष मुळींच नसून एकही प्राणी तेथें वास्तव्य करीत नाहीं १९. तेव्हां शरीरावर रोमांच उठविणाऱ्या त्या अरण्यांतून तुह्मी सत्वर पलीकडे गेलां ह्मणजे श्वेतवर्ण कैलासपर्वत तुह्माला लागेल आणि मग तुह्मी आनंदित व्हाल २०. त्या कैलासपर्वतावर श्वेतवर्ण मेघासारिखें दिसत असलेलें आणि सोन्याचें काम केलेलें असें एक विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें रम्य कुबेरगृह आहे २१. त्या ठिकाणीं अप्सरांच्या समुदायांनीं सेवित, हंस व कारंडव पक्ष्यांनीं व्याप्त आणि नानाप्रकारच्या कमलांनीं भरलेलें असें एक विशाल सरोवर आहे २२. असो. तेथें सर्व लोकमान्य यक्षाधिपति श्रीमान् वैश्रवण कुबेर गुह्यकांसहवर्तमान क्रीडा करीत असतो २३. त्या कैलासपर्वताला लागून असलेल्या चंद्रासारिख्या शुभ्र पर्वतांवरून व गुहांतून सीतेसहवर्तमान रावणाचा तुह्माला ठिकठिकाणीं शोध केला पाहिजे २४. क्रौंचपर्वतासमीप गेल्यावर प्रवेश करण्यास अत्यंत कठिण असें एक त्याला विवर आहे. त्या विवरामध्यें तुह्मी सावध राहून प्रवेश करा. तें विवर आंत प्रवेश होण्यास अशक्य ह्मणून प्रसिद्ध आहे २५ व त्या ठिकाणीं सूर्यासारिखे तेजस्वी आणि देवरूप धारण करणारे महात्मे देवर्षि, देवांनीं उत्तम प्रकारें प्रार्थना केल्यामुळें, वास्तव्य करीत आहेत २६. क्रौंचपर्वताच्या इतरही ज्या कांहीं गुहा, सपाट प्रदेश, शिखरें, कडे व दऱ्या असतील त्या तुह्मी सर्व बाजूंनीं शोधून काढा २७. कामदेवानें ज्या ठिकाणीं तपश्चर्या केली असा एक मानसनामक पर्वत आहे; तो पक्ष्यांचें स्थान असून वृक्षरहित

गतिस्तत्र भूतानां देवानां न च रक्षसाम् २८ स च सर्वैर्विचेतव्यः ससानुप्रस्थभूधरः । क्रौञ्चं गिरिमतिक्रम्य मैनाको नाम पर्वतः २९ मयस्य भवनं तत्र दानवस्य स्वयंकृतम् । मैनाकस्तु विचेतव्यः ससानुप्रस्थकन्दरः ३० स्त्रीणामश्वमुखीनां तु निकेतस्तत्र तत्र तु । तं देशं समतिक्रम्य आश्रमं सिद्धसेवितम् ३१ सिद्धा वैखानसा यत्र वालखिल्याश्च तापसाः । वन्दितव्यास्ततः सिद्धास्तपसा वीतकल्मषाः ॥ प्रष्टव्या चापि सीतायाः प्रवृत्तिर्विनयान्वितैः ३२ हिमपुष्करसंछन्नं तत्र वैखानसं सरः । तरुणादित्यसंकाशैर्हंसैर्विचरितं शुभैः ३३ औपवाह्यः कुबेरस्य सार्वभौम इति स्मृतः । गजः पर्येति तं देशं सदा सह करेणुभिः ३४ तत्सरः समतिक्रम्य नष्टचन्द्रदिवाकरम् । अनक्षत्रगणं व्योम निष्पयोदमनादितम् ३५ गभस्तिभिरिवार्कस्य स तु देशः प्रकाशते । विश्राम्यद्भिस्तपःसिद्धैर्देवकल्पैः स्वयंप्रभैः ३६ तं तु देशमति-

---

आहे व त्या ठिकाणीं सामान्य प्राण्यांची, देवतांची व राक्षसांचीही गति नाहीं २८. असो. सपाट प्रदेश, शिखरें आणि भोंवतीं असलेले लहान लहान पर्वत ह्यांसहवर्तमान तो क्रौंचपर्वत तुह्मी सर्व मिळून शोधून काढा. क्रौंचपर्वत ओलांडिल्यावर मैनाकनामक पर्वत लागेल २९. तेथें मयासुराचें स्वतः निर्माण केलेलें गृह आहे. तो मैनाकपर्वत सपाट प्रदेश, शिखरें व गुहा ह्यांसहवर्तमान शोधून काढिला पाहिजे ३०. अश्वमुखी स्त्रियांचें वसतिस्थानही ठिकठिकाणीं त्याच पर्वतावर आहे. तो प्रदेश ओलांडिल्यानंतर सिद्धांनीं आश्रय केलेल्या अशा एका आश्रमाला तुह्मी जाल ३१. त्या ठिकाणीं सिद्ध, वैखानस, तपस्वी, वालखिल्य आणि तपश्चर्येच्या योगानें पापरहित झालेले इतरही सिद्ध आहेत त्यांना तुह्मी वंदन करा व विनयसंपन्न होऊन सीतेची खातमी विचारा ३२. सुवर्णकमलांनीं आच्छादित असें एक वैखानसनामक सरोवर तेथें आहे. त्या सरोवरावर बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असलेले मंगलकारक हंस संचार करीत असतात ३३. सार्वभौम ह्मणून प्रसिद्ध असलेला कुबेराचा बसावयाचा हत्ती हत्तिणींबरोबर नेहमीं त्या प्रदेशामध्यें फिरत असतो ३४. तें सरोवर ओलांडिल्यावर सूर्यचंद्रांच्या प्रकाशाची जेथें मातब्बरी नाहीं आणि नक्षत्रसमुदायालाही जेथें कोणी विचारीत नाहीं असा एक मेघरहित व शब्दरहित प्रदेश तुह्माला लागेल ३५. तो प्रदेश देवतुल्य महर्षींच्या स्वतःच्या किरणांच्या योगानें, सूर्यकिरणांनीं प्रकाशित होणाऱ्या इतर प्रदेशांप्रमाणें, प्रकाशित झालेला असतो. कारण, तेथें विश्रांतीकरितां राहिलेले महर्षि स्वयंप्रकाश असून ते तपश्चर्येच्या

क्रम्य शैलोदा नाम निम्नगा । उभयोस्तीरयोस्तस्याः कीचका नाम वेणवः ३७ ते नयन्ति परं तीरं सिद्धान्प्रत्यानयन्ति च ३८ उत्तराः कुरवस्तत्र कृतपुण्यप्रतिश्रयाः । ततः काञ्चनपद्माभिः पद्मिनीभिः कृतोदकाः ३९ नीलवैदूर्यपत्राढ्या नद्यस्तत्र सहस्रशः । रक्तोत्पलवनैश्चात्र मण्डिताश्च हिरण्मयैः ४० तरुणादित्यसंकाशा भान्ति तत्र जलाशयाः । महार्हमणिरत्नैश्च काञ्चनप्रभकेसरैः ४१ नीलोत्पलवनैश्चित्रैः स देशः सर्वतो वृतः । निस्तुलाभिश्च मुक्ताभिर्मणिभिश्च महाधनैः ४२ उद्भूतपुलिनास्तत्र जातरूपैश्च निम्नगाः । सर्वरत्नमयैश्चित्रैरवगाढा नगोत्तमैः ४३ जातरूपमयैश्चापि हुताशनसमप्रभैः । नित्यपुष्पफलास्तत्र नगाः पत्ररथाकुलाः ४४ दिव्यगन्धरसस्पर्शाः सर्वकामान्स्रवन्ति च । नानाकाराणि वासांसि फलन्त्यन्ये नगोत्तमाः ४५ मुक्तावैदूर्यचित्राणि भूषणानि तथैव च । स्त्रीणां

---

योगानें सिद्ध झाले आहत ३६. तो प्रदेश ओलांडिल्यानंतर शैलोदा नांवाची एक नदी तुम्हाला लागेल; तिच्या दोन्ही तिरांवर कीचक नांवाचे ( आंत छिद्रें असलेले ) वेळू आहेत ३७. त्यांच्या योगानें नदीच्या परतीराला जातां येत असून सिद्धांकडे परतहीं येतां येतें ३८. पुण्यवान् लोकांचें वसतिस्थान बनून राहिलेला उत्तर कुरु प्रदेश तिकडेच आहे. त्या देशामध्यें सुवर्णकमलांनीं युक्त असलेल्या सरोवरांमुळेंच लोकांचें उदकसंबंधीं कार्य होतें. ( सारांश, तिकडे विहिरी वगैरे नसून सरोवराच्याच पाण्याचा उपयोग जो तो करीत असतो ) ३९. कांतीनें नील आणि वैदूर्यमणि ह्यांप्रमाणें दिसत असलेल्या पानांची समृद्धि ज्यांत आहे अशा हजारों नद्या तेथें असून आरक्त कमलांच्या रमणीय वनांनीं त्या भूषित झालेल्या आहेत ४०. सुवर्णवर्ण परागांनीं युक्त असलेलीं कमलपुष्पें आणि मोठमोठीं मूल्यवान् रत्नें व माणकें यांच्या योगानें तेथील ( वापी, तडाग, वगैरे ) जलाशय बालसूर्यासारिखे तेजस्वी दिसत असतात ४१. अद्भुत नीलकमलांचीं वनें, वर्तुल मोत्यें आणि मोठमोठीं मूल्यवान् माणकें ह्यांच्या योगानें तो प्रदेश सर्व बाजूंनीं व्याप्त झालेला आहे ४२. सर्व रत्नें व सुवर्ण ह्यांनीं परिपूर्ण, अग्नितुल्य तेजस्वी आणि ह्मणूनच आश्चर्यकारक अशा उत्कृष्ट पर्वतांनीं तेथील नद्या व्याप्त झालेल्या आहेत आणि त्यांचीं वाळवंटें सुवर्णयुक्त झालेलीं आहेत. नित्य येणारीं पुष्पें व फलें ह्यांनीं युक्त असलेले तेथील वृक्ष पक्ष्यांनीं गजबजून गेलेले असतात ४३, ४४ आणि दिव्य गंध, रस व स्पर्श ह्यांनीं युक्त असून सर्व भोग्य वस्तु ते देत असतात. दुसरे कांहीं उत्कृष्ट वृक्ष, नानाप्रकारचीं वस्त्रेंच फलें ह्मणून देत असतात ४५. मोत्यें आणि वैदूर्यमणि यांनीं युक्त असल्यामुळें मनो-

यान्यनुरूपाणि पुरुषाणां तथैव च ४६ सर्वर्तुसुखसेव्यानि फलन्त्यन्ये नगोत्तमाः । महार्हमणिचित्राणि फलन्त्यन्ये नगोत्तमाः ४७ शयनानि प्रसूयन्ते चित्रास्तरणवन्ति च । मनःकान्तानि माल्यानि फलन्त्यत्रापरे द्रुमाः ४८ पानानि च महार्हाणि भक्ष्याणि विविधानि च । स्त्रियश्च गुणसंपन्ना रूपयौवनलक्षिताः ४९ गन्धर्वाः किंनराः सिद्धा नागा विद्याधरास्तथा । रमन्ते सततं तत्र नारीभिर्भास्वरप्रभाः ५० सर्वे सुकृतकर्माणः सर्वे रतिपरायणाः । सर्वे कामार्थसहिता वसन्ति सह योषितः ५१ गीतवादित्रनिर्घोषः सोत्कृष्टहसितस्वरैः । श्रूयते सततं तत्र सर्वभूतमनोरमः ५२ तत्र नामुदितः कश्चिन्नात्र कश्चिदसत्प्रियः । अहन्यहनि वर्धन्ते गुणास्तत्र मनोरमाः ५३ तमतिक्रम्य शैलेन्द्रमुत्तरः पयसां निधिः । तत्र सोमगिरिर्नाम मध्ये हेममयो महान् ५४ स तु देशो विसूर्योपि तस्य भासा प्रकाशते । सूर्यलक्ष्म्याभिविज्ञेयस्तपतेव विवस्वता ५५ भगवांस्तत्र विश्वात्मा शंभुरेकादशात्मकः । ब्रह्मा वसति देवेशो ब्रह्मर्षिपरि-

---

हर, स्त्रियांना व पुरुषांना अनुरूप आणि कोणत्याही ऋतूमध्यें धारण केलीं असतां सुखावह अशीं भूषणें तेथील कांहीं वृक्षांपासून प्राप्त होत असतात. मोठमोठ्या मूल्यवान् रत्नांनीं चित्रविचित्र आणि मनोहर आस्तरणांनीं युक्त अशा शय्या दुसऱ्या कांहीं उत्कृष्ट वृक्षांपासून प्राप्त होत असतात. दुसरे कांहीं वृक्ष मनोहर पुष्पें धारण करीत असतात ४६, ४७, ४८ आणि कांहीं वृक्ष उत्कृष्ट पेयें, नानाप्रकारचीं भक्ष्यें आणि सौंदर्य व यौवन ह्यांनीं युक्त असून गुणांनीं संपन्न असलेल्या स्त्रिया देत असतात ४९. तेजानें झळकत असलेले गंधर्व, किन्नर, सिद्ध, नाग आणि विद्याधर नेहमीं स्त्रियांसहवर्तमान तेथें रममाण होत असतात ५०. सर्वही पुण्यकर्मी असून सर्वही रतिक्रीडेविषयीं तत्पर असतात आणि सर्वही द्रव्य व भोग्य वस्तु ह्यांनीं संपन्न असून सर्वही स्त्रियांसहवर्तमान वास्तव्य करीत असतात ५१. उत्कृष्ट हास्यध्वनीसहवर्तमान प्राणिमात्रांचें मन रमविणारा असा गायनांचा व वाद्यांचा घोष तेथें सतत कानावर येत असतो ५२. त्या ठिकाणीं आनंदरहित अथवा प्रिय वस्तु जवळ नसलेला असा कोणीही नाहीं. तेथें चित्तवेधक गोष्टींची प्रत्येक दिवशीं वृद्धिच होत असते ५३. तो महापर्वत ओलांडून गेल्यावर उत्तर समुद्र लागेल. त्या उत्तर समुद्रामध्यें सोमगिरि म्हणून एक सुवर्णमय प्रचंड पर्वत आहे ५४. तो प्रदेश जरी सूर्यरहित आहे तरी तो त्या पर्वताच्या प्रभेमुळें जसा कांहीं सूर्यानें युक्त असल्यासारिखाच प्रकाशित झालेला असतो आणि सूर्याच्या प्रभेनें युक्त असलेल्या देशाला जशी शोभा आलेली असते

वारितः ५६ न कथंचन गन्तव्यं कुरूणामुत्तरेण वः । अन्येषामपि
भूतानां नानुक्रामति वै गतिः ५७ स हि सोमगिरिर्नाम देवानामपि
दुर्गमः । तमालोक्य ततः क्षिप्रमुपावर्तितुमर्हथ ५८ एतावद्वानरैः शक्यं
गन्तुं वानरपुंगवाः । अभास्करममर्यादं न जानीमस्ततः परम् ५९ सर्व-
मेतद्विचेतव्यं यन्मया परिकीर्तितम् । यदन्यदपि नोक्तं च तत्रापि
क्रियतां मतिः ६० ततः कृतं दाशरथेर्महत्प्रियं महत्प्रियं चापि ततो मम
प्रियम् । कृतं भविष्यत्यनिलानलोपमा विदेहजादर्शनजेन कर्मणा ६१
ततः कृतार्थाः सहिताः सबान्धवा मयार्चिताः सर्वगुणैर्मनोरमैः । चरि-
ष्यथोर्वीं प्रति शान्तशात्रवाः सहप्रिया भूतधराः प्लवंगमाः ६२ [१८७३]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे त्रिच-
त्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

विशेषेण तु सुग्रीवो हनूमत्यर्थमुक्तवान् । स हि तस्मिन्हरिश्रेष्ठे

---

तशी त्याला आलेली असते ५५. एकादशमूर्तींनीं युक्त व ब्रह्मर्षींनीं परिवेष्टित असलेला, जगदात्मा, जगत्स्रष्टा आणि षड्गुणैश्वर्यसंपन्न असा देवाधिदेव शंकर त्या सोमगिरीवर वास्तव्य करीत असतो ५६. कुरुदेशाच्या उत्तरेस तुह्मी कांहीं झालें तरी जाऊं नका. इतर प्राण्यांचीही गति तेथें कुंठितच होत असते ५७. तो सोमगिरि देवांनाही दुर्गम आहे. ह्यास्तव, तो दृष्टी पडतांक्षणीं तेथून सत्वर परत फिरा ५८. हे वानरश्रेष्ठहो, येथपर्यंत वानरांनीं जाणें शक्य आहे. मर्यादा आणि सूर्य ह्यांनीं रहित असलेलें त्याच्या पलीकडील स्थल आह्मी जाणीत नाहीं ५९. मीं जें हें सांगितलें तें सर्व शोधून काढा आणि मीं न सांगितलेलेंही जें कांहीं राहिलें असेल तेथेंही सीतेला शोधण्याचा विचार करा ६०. वायु आणि अग्नि ह्यांच्या उपमेला पात्र असलेले हे वानरहो, सीता दृष्टीं पडण्याकरितां केलेला प्रयत्न सफल झाला असतां दशरथपुत्र रामाचा मोठा मनोरथ सिद्धीस गेल्यासारिखें होईल आणि त्याचा मोठा मनोरथ सिद्धीस गेल्यामुळें माझाही मनोरथ सिद्धीस गेल्यासारिखें होईल ६१. हे प्राणिमात्रावर उपकार करणारे वानरहो, सीतेचा शोध लागला असतां सर्व प्रकारच्या मनोहर भोग्य वस्तूंनीं तुमच्या बांधवांसहवर्तमान मी तुह्मां सर्वांचें पूजन करणार असल्यामुळें तुह्मी कृतकृत्य व्हाल आणि शत्रुरहित होऊन आपआपल्या प्रिय स्त्रियांसहवर्तमान पृथ्वीवर संचार करूं लागाल ६२.

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

निश्चितार्थोर्थसाधने १ अब्रवीच्च हनूमन्तं विक्रान्तमनिलात्मजम्
सुग्रीवः परमप्रीतः प्रभुः सर्ववनौकसाम् २ न भूमौ नान्तरिक्षे व
नाम्बरे नामरालये । नाप्सु वा गतिसङ्गं ते पश्यामि हरिपुंगव ३ सासुरा
सहगन्धर्वाः सनागनरदेवताः । विदिताः सर्वलोकास्ते ससागरधराधराः ४
गतिर्वेगश्च तेजश्च लाघवं च महाकपे । पितुस्ते सदृशं वीर मारुतस्य
महौजसः ५ तेजसा वापि ते भूतं न समं भुवि विद्यते । तद्यथा लभ्यते सीता
तत्त्वमेवानुचिन्तय ६ त्वय्येव हनुमन्नस्ति बलं बुद्धिः पराक्रमः । देशका-
लानुवृत्तिश्च नयश्च नयपण्डित ७ ततः कार्यसमासङ्गमवगम्य हनूमति
विदित्वा हनुमन्तं च चिन्तयामास राघवः ८ सर्वथा निश्चितार्थोऽ
हनूमति हरीश्वरः । निश्चितार्थतरश्चापि हनूमान्कार्यसाधने ९ तदेव प्रस्थि-
तस्यास्य परिज्ञातस्य कर्मभिः । भर्त्रा परिगृहीतस्य ध्रुवः कार्यफलोदयः १०

---

सुग्रीवानें विशेषतः जो कांहीं आपला उद्देश सांगावयाचा होता तो हनुमानाजवळ सांगितला. कारण, कार्यसिद्धीविषयीं सुग्रीवाला त्या वानरश्रेष्ठ हनूमानासंबंधानें फार खात्री होती १. ह्यास्तव, सर्व वनचर वानरांचा प्रभु जो सुग्रीव तो अत्यंत संतुष्ट होऊन महापराक्रमी वायुपुत्र हनूमानाला ह्मणाला २ " हे वानरश्रेष्ठा, पृथ्वी, अंतरिक्ष, मेघमार्ग, स्वर्ग आणि उदक ह्यांपैकीं कोठेंही तुझी गति कुंठित होत असल्याचें माझ्या कधीं दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं ३. असुर, गंधर्व, नाग, मनुष्य, देवता, सागर आणि पर्वत ह्यांसहवर्तमान सर्व लोक तुला विदित आहेत ४. हे महावानरा, हे वीरा, महाबलाढ्य वायु जो तुझा पिता त्याच्याचप्रमाणें तुझी गति, वेग, तेज आणि त्वरा आहे ५. तेजानें तर तुझी बरोबरी करणारा प्राणि ह्या भूतलावर कोणीही नाहीं. तस्मात् , सीता कशी प्राप्त होईल ह्याचा विचार तूच कर ६. हे नीतिनिपुण हनूमाना, बल, बुद्धि, पराक्रम, युक्ति आणि देशकालानुरूप वर्तन हें सर्व तुझ्याच ठिकाणीं आहे " ७. ह्याप्रमाणें सुग्रीवानें हनूमानाला सांगितल्यावर सुग्रीवाच्या सांगण्यावरून हनूमानाच्या हातून सीतेचा शोध लावण्याचें कार्य शेंवटास जाईल असें रघुवंशज रामांना समजून आल्यावर त्याच्या हातून कार्य शेंवटास जाईल अशी खात्री बाळगून राम आपल्याशीं विचार करूं लागले ८ कीं, " ह्या वानरराज सुग्रीवाला तर हनूमानाच्या हातून कार्यसिद्धि होण्याची सर्वस्वीं खात्री आहे आणि आपल्या हातून कार्य शेंवटास जाईल ह्याविषयीं स्वतः हनूमानाला तर त्याच्याहीपेक्षां जास्त खात्री वाटत आहे ९. तेव्हां, हातून कार्य झाल्यामुळें परीक्षेस उतरलेला आणि धन्याकडून श्रेष्ठ ह्मणून समजला गेलेला हा हनूमान् सीतेच्या

तं समीक्ष्य महातेजा व्यवसायोत्तरं हरिम् । कृतार्थ इव संहृष्टः प्रहृष्टे-
न्द्रियमानसः ११ ददौ तस्य ततः प्रीतः स्वनामाङ्कोपशोभितम् । अङ्गु-
लीयमभिज्ञानं राजपुत्र्याः परंतपः १२ अनेन त्वां हरिश्रेष्ठ चिह्नेन जन-
कात्मजा । मत्सकाशादनुप्राप्तमनुद्विग्नानुपश्यति १३ व्यवसायश्च ते वीर
सत्त्वयुक्तश्च विक्रमः । सुग्रीवस्य च संदेशः सिद्धिं कथयतीव मे १४
स तद्गृह्य हरिश्रेष्ठः कृत्वा मूर्ध्नि कृताञ्जलिः । वन्दित्वा चरणौ चैव प्रस्थितः
प्लवगर्षभः १५ स तत्प्रकर्षन्हरिणां महद्बलं बभूव वीरः पवनात्मजः कपिः ।
गताम्बुदे व्योम्नि विशुद्धमण्डलः शशीव नक्षत्रगणोपशोभितः १६ अतिबल
बलमाश्रितस्तवाहं हरिवर विक्रम विक्रमैरनल्पैः । पवनसुत यथाधिगम्यते
सा जनकसुता हनुमंस्तथा कुरुष्व १७ [१८९०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ॥ ४४ ॥

---

शोधाकरितां गेला असतां ह्याच्या हातून कार्यसिद्धि होणार हें निश्चित ठरलेलेंच आहे १०." असा विचार मनांत आणून कार्यसिद्धि करण्याविषयीं अतिशय उद्युक्त झालेल्या त्या हनूमानाकडे पाहून महातेजस्वी रामचंद्र कृतार्थ झाल्यासारिखे आनंदित झाले, त्यांची इंद्रियवृत्ति व मनोवृत्ति प्रफुल्लित झाल्या ११ आणि आपल्या नांवानें सुशोभित झालेली एक आंगठी राजकन्या सीतेच्या खुणेकरितां शत्रुतापन रामांनीं संतुष्ट होऊन त्या हनूमानाच्या स्वाधीन केली १२ आणि (स्वाधीन करितांना) ते त्याला ह्मणाले "हे वानरश्रेष्ठा, ह्या चिह्नाच्या योगानें ती जनककन्या सीता—तूं माझ्याकडून आला आहेस असें समजून कांहीं एक भीति मनामध्यें न धरितां—तुझ्याकडे पाहील १३. हे वीरा, तुझी ही उद्युक्तता, धैर्ययुक्त पराक्रम आणि मनांत खात्री बाळगून सुग्रीवानें तुला केलेली आज्ञा ह्यांवरून तुझ्या हातून कार्यसिद्धि होणार असें मला वाटत आहे" १४. ह्याप्रमाणें रामचंद्रांनीं सांगितल्यावर वानरश्रेष्ठ हनुमानानें त्या अंगठीचा स्वीकार केला आणि मस्तकीं हात जोडून व रामचंद्रांच्या चरणांना वंदन करून तो वानरश्रेष्ठ चालता झाला १५. ह्याप्रमाणें वानरांचें तें प्रचंड सैन्य बरोबर घेऊन निघालेला तो वायुपुत्र वीर वानर नक्षत्रगणांनीं सुशोभित आणि आकाश मेघनिर्मुक्त झाल्यामुळें शुद्ध मंडलानें युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें शोभूं लागला १६ व तो जातां जातां "हे अतिबलाढ्य, हे वानरश्रेष्ठ, हे पराक्रमी वायुपुत्रा, मी तुझ्याच सामर्थ्यावर अवलंबून आहें. ह्यास्तव, मोठमोठ्या पराक्रमांच्या योगानें त्या जनककन्येचा शोध लागेल अशा रीतीनें, हे हनुमाना, तूं व्यवस्था कर." असें राम आणि सुग्रीव हे उभयतां त्याला ह्मणाले १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत

सर्वांश्चाहूय सुग्रीवः प्लवगान्प्लवगर्षभः । समस्तांश्चाब्रवीद्राजा राम-
कार्यार्थसिद्धये १ एवमेतद्विचेतव्यं भवद्भिर्वानरोत्तमैः । तदुग्रशासनं
भर्तुर्विज्ञाय हरिपुंगवाः २ शलभा इव संछाद्य मेदिनीं संप्रतस्थिरे । रामः
प्रस्रवणे तस्मिन्न्यवसत्सहलक्ष्मणः ३ प्रतीक्षमाणस्तं मासं सीताधिगमने
कृतः । उत्तरां तु दिशं रम्यां गिरिराजसमावृताम् ४ प्रतस्थे सहसा
वीरो हरिः शतबलिस्तदा । पूर्वां दिशं प्रतिययौ विनतो हरियूथपः ५
ताराङ्गदादिसहितः प्लवगः पवनात्मजः । अगस्त्याचरितामाशां दक्षिणां
हरियूथपः ६ पश्चिमां च दिशं घोरां सुषेणः प्लवगेश्वरः । प्रतस्थे हरि-
शार्दूलो दिशं वरुणपालिताम् ७ ततः सर्वा दिशो राजा चोदयित्वा
यथातथम् । कपिसेनापतिर्वीरो मुमोद सुखितः सुखम् ८ एवं संचोदिताः
सर्वे राज्ञा वानरयूथपाः । स्वां स्वां दिशमभिप्रेत्य त्वरिताः संप्रतस्थिरे ९
नदन्तश्चोन्नदन्तश्च गर्जन्तश्च प्लवंगमाः । क्ष्वेडन्तो धावमानाश्च विनदन्तो

---

श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चव्वचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

नंतर वानरश्रेष्ठ राजा सुग्रीव रामकार्य सिद्धीस जाण्याकरितां सर्व वानरांना बोलावून आणून त्या सर्वांना ह्मणाला १ " तुह्मी सर्व वानरश्रेष्ठांनीं ह्याप्रमाणें हें जगत् शोधून काढिलें पाहिजे. " ही धन्याची कडकडीत आज्ञा समजून येतांक्षणीं वानरश्रेष्ठ २ टोळांप्रमाणें पृथ्वी आच्छादित करून जाऊं लागले. इकडे सीतेचा शोध लावण्याविषयीं जो महिना मुदत ह्मणून ठरविलेला होता त्या महिन्यामध्यें सुग्रीवाची प्रतीक्षा करीत करीत लक्ष्मणासहवर्तमान रामचंद्र त्या प्रस्रवणपर्वतावरच राहिले होते. हिमालयपर्वतानें व्यापून टाकिलेल्या रमणीय उत्तर दिशेस ३, ४ शतबलिनामक वीर वानर एकदम चालता झाला; वानरसेनाधिपति विनत पूर्व दिशेस निघून गेला ५; तार व अंगद इत्यादिकांसहवर्तमान वानरसेनाधिपति वायुपुत्र हनुमान् वानर अगस्त्यमुनींनीं आश्रय केलेल्या दक्षिण दिशेस गेला ६ आणि वानरश्रेष्ठ व वानरराज सुषेण वरुणानें संरक्षण केलेल्या घोर पश्चिम दिशेस निघून गेला ७. ह्याप्रमाणें सर्व दिशेस योग्य रीतीनें वानर पाठविणारा वानरसेनाधिपति वानरराज वीर सुग्रीव सुखी होऊन आनंदानें क्रीडा करूं लागला ८ व ह्याप्रमाणें राजा सुग्रीवाची आज्ञा झालेले ते सर्वही वानरसेनाधिपति त्वरेचें अवलंबन करून आपआपल्या दिशेकडे चालते झाले ९. कोणी सामान्य शब्द करूं लागले, कोणी उच्चस्वरानें ओरडूं लागले, कोणी गर्जना करूं लागले आणि कोणी महाबलाढ्य वानर गर्जना व माकडचेष्टा करीत

महाबलाः १० एवं संचोदिताः सर्वे राज्ञा वानरयूथपाः । आनयिष्यामहे सीतां हनिष्यामश्च रावणम् ११ अहमेको वधिष्यामि प्राप्तं रावणमाहवे । ततश्चोन्मथ्य सहसा हरिष्ये जनकात्मजाम् १२ वेपमानां श्रमेणाद्य भवद्भिः स्थीयतामिति । एक एवाहरिष्यामि पातालादपि जानकीम् १३ विधमिष्याम्यहं वृक्षान्दारयिष्याम्यहं गिरीन् । धरणीं दारयिष्यामि क्षोभयिष्यामि सागरान् १४ अहं योजनसंख्यायाः प्लवियं नात्र संशयः । शतयोजनसंख्यायाः शतं समधिकं ह्यहम् १५ भूतले सागरे वापि शैलेषु च वनेषु च । पातालस्यापि वा मध्ये न ममाच्छिद्यते गतिः १६ इत्येकैकस्तदा तत्र वानरा बलदर्पिताः । ऊचुश्च वचनं तस्य हरिराजस्य संनिधौ १७ [१९०७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ॥ ४५ ॥

गतेषु वानरेन्द्रेषु रामः सुग्रीवमब्रवीत् । कथं भवान्विजानीते सर्वं वै मण्डलं भुवः १ सुग्रीवश्च ततो राममुवाच प्रणतात्मवान् । श्रूयतां सर्वमा-

---

करीत इकडे तिकडे धांवूं लागले १०. ह्याप्रमाणें सर्व वानरसेनाधिपतींना राजा सुग्रीवाची आज्ञा झाली असतां "आह्मी सीतेला आणूं व रावणाला मारून टाकूं असे उद्गार त्यांनीं काढिले ११. (एक ह्मणाला) समरांगणामध्यें प्राप्त झालेल्या रावणाचा मी एकटाच वध करीन आणि एकाएकीं त्याचा वध केल्यावर सीतेला घेऊन येईन" १२. (ह्यावर दुसरा ह्मणाला) "तुह्मी स्वस्थ रहा; तुमच्या श्रमाची आज जरूर नाहीं. भीतीनें थरथर कांपत असलेली जानकी पातालांतूनसुद्धां मी एकटाच घेऊन येईन १३. (हें ऐकून आणखी एकजण ह्मणाला) "मी वृक्ष उडवून देईन; पर्वताचे तुकडे तुकडे करून टाकीन; पृथ्वी विदीर्ण करीन; सागर क्षुब्ध करीन" १४. (ह्यावर दुसरा एकजण ह्मणाला) "मी योजनेंच्या योजनें उड्या टाकीत जाईन ह्याविषयीं मुळींच संशय नाहीं." (हें ऐकून दुसरा ह्मणाला) "अरे जा! शंभर योजनेंच नव्हे; परंतु, शंभरापेक्षांही जास्त योजनें मी उडी मारीन" १५. (हें ऐकून दुसरा ह्मणाला. "पुरे! पुरे!) पृथ्वी, सागर, पर्वत, वनें आणि पाताल ह्यांमध्यें माझी गति कोठेंही कुंठित होत नाहीं" १६. ह्याप्रमाणें स्वसामर्थ्याचा गर्व वाहणारे वानर त्या वानरराज सुग्रीवाचे समीप एकएकटे बोलूं लागले १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडांपैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४५ ॥

वानरश्रेष्ठ गेल्यावर रामचंद्र सुग्रीवाला ह्मणाले " सर्व भूमंडळ तुला कसें माहीत,

ख्यास्ये विस्तरेण वचो मम २ यदा तु दुन्दुभिं नाम दानवं महिषाकृतिम् । प्रतिकालयते वाली मलयं प्रति पर्वतम् ३ तदा विवेश महिषो मलयस्य गुहां प्रति । विवेश वाली तत्रापि मलयं तज्जिघांसया ४ ततोहं तत्र निक्षिप्तो गुहाद्वारि विनीतवत् । न च निष्क्रामते वाली तदा संवत्सरे गते ५ ततः क्षतजवेगेन आपुपूरे तदा बिलम् । तदहं विस्मितो दृष्ट्वा भ्रातुः शोकविषार्दितः ६ अथाहं गतबुद्धिस्तु सुव्यक्तं निहतो गुरुः । शिला पर्वतसंकाशा बिलद्वारि मया कृता ७ अशक्नुवन्निष्क्रमितुं महिषो विनशिष्यति । ततोहमागां किष्किन्धां निराशस्तस्य जीविते ८ राज्यं च सुमहत्प्राप्य तारां च रुमया सह । मित्रैश्च सहितस्तस्य वसामि विगतज्वरः ९ आजगाम ततो वाली हत्वा तं वानरर्षभः । ततोहमददां राज्यं गौरवाद्भययन्त्रितः १० स मां जिघांसुर्दुष्टात्मा वाली प्रव्यथितेन्द्रियः । परिकालयते वाली धावन्तं सचिवैः सह ११ ततोहं वालिना तेन

---

आहे ? " १. ह्यावर विनयसंपन्न सुग्रीव त्यांना ह्मणाला " माझें ह्मणणें ऐका; मी सर्व सविस्तर सांगतों २ जेव्हां महिषरूप धारण करणाऱ्या दुंदुभिनामक दानवाकडे वाली मलयपर्वतावर धांवून गेला ३. तेव्हां तो महिषरूपी दानव मलयपर्वताच्या गुहेमध्यें शिरला असतां वालीही त्याचा वध करण्याच्या उद्देशानें त्या मलयपर्वतामध्येंच प्रविष्ट झाला ४. आंत जातांना वालीनें मला गुहेच्या द्वाराजवळ गोडीगुलाबीनें ठेविलें. परंतु, आंत जाऊन एक संवत्सर लोटला तरी वाली बाहेर येईना ५. एक वर्ष झाल्यानंतर रक्ताच्या प्रवाहानें तें बीळ अगदीं भरून गेलें तेव्हां तें अवलोकन करून मी विस्मित झालों आणि भ्रात्याकरितां अतिशय शोकाकुल झालों ६. नंतर पितृसमान असलेला ज्येष्ठ भ्राता वाली निःसंशय वध पावला असें समजून एक पर्वतप्राय शिला, महिषरूप धारण करणाऱ्या दानवाला बाहेर येण्याची अडचण पडून तो आंतल्या आंतच मरून जावा ह्या उद्देशानें, गुहेच्या द्वाराशीं मीं लावून ठेविली. नंतर त्या वालीच्या जीविताविषयीं मी निराश होऊन किष्किंधानगरीला परत आलों ७,८ आणि अतिशय मोठें वानरराज्य व रुमेसहवर्तमान तारा प्राप्त झाल्यावर त्या वालीच्या मित्रांसहवर्तमान मी निर्भय होऊन तेथें राहूं लागलों ९. पुढें त्या दानवाचा वध करून वानरश्रेष्ठ वाली परत आला असतां गुरुबुद्धीमुळें मी भयभीत झालों आणि राज्य त्याच्या स्वाधीन केलें १०. परंतु, अंतःकरणामध्यें क्षुब्ध झालेल्या दुरात्म्या वालीनें माझा वध करण्याचें मनांत आणिलें आणि सचिवांसहवर्तमान मी धांवूं लागलों असतां तो माझा पाठलाग करूं लागला ११.

अनुबद्धः प्रधावितः । नदीश्च विविधाः पश्यन्वनानि नगराणि च १२ आदर्शतलसंकाशा ततो वै पृथिवी मया । अलातचक्रप्रतिमा दृष्टा गोष्पदवत्कृता १३ पूर्वां दिशं ततो गत्वा पश्यामि विविधान्द्रुमान् । पर्वतान्सदरीन्रम्यान्सरांसि विविधानि च १४ उदयं तत्र पश्यामि पर्वतं धातुमण्डितम् । क्षीरोदं सागरं चैव नित्यमप्सरसालयम् १५ परिकाल्यमानस्तु तदा वालिनाभिद्रुतो ह्यहम् । पुनरावृत्य सहसा प्रस्थितोऽहं तदा विभो १६ दिशस्तस्यास्ततो भूयः प्रस्थितो दक्षिणां दिशम् । विन्ध्यपादपसंकीर्णां चन्दनद्रुमशोभिताम् १७ द्रुमशैलान्तरे पश्यन्भूयो दक्षिणतोपराम् । अपरां च दिशं प्राप्तो वालिना समभिद्रुतः १८ स पश्यन्विविधान्देशानस्तं च गिरिसत्तमम् । प्राप्य चास्तं गिरिश्रेष्ठमुत्तरं संप्रधावितः १९ हिमवन्तं च मेरुं च समुद्रं च तथोत्तरम् । यदा न विन्दे शरणं वालिना समभिद्रुतः ॥ ततो मां बुद्धिसंपन्नो हनुमान्वाक्यमब्रवीत् २०

---

तेव्हां तो वाली पाठलाग करीत असतांना नानाप्रकारच्या नद्या, वनें व नगरें अवलोकन करीत करीत मी पुढें चाललों १२. ह्याप्रमाणें हिंडतां हिंडतां गाईचें पाऊल ओलांडून जाण्याप्रमाणें कांहीं एक आयास न पडतां मीं सर्व पृथ्वीभर पर्यटण केलें. मी फार वेगानें जात असल्यामुळें पृथ्वी मला वेगानें फिरत असलेल्या अलातचक्रासारखी भासली आणि प्रमण्यांमध्यें असलेल्या सर्व कांहीं गोष्टी माझ्या प्रत्यक्ष अनुभवाला आल्यामुळें पृथ्वी हा एक सर्व वस्तूंचें प्रतिबिंब दर्शविणारा आरसाच आहे कीं काय असें मला वाटूं लागलें १३. प्रथमतः पूर्व दिशेला गेल्यावर नानाप्रकारचे वृक्ष, नानाप्रकारचीं सरोवरें आणि दऱ्यांसहवर्तमान रम्य पर्वत मीं अवलोकन केले १४. धातूंनीं भूषित असलेला उदयाचल आणि अप्सरांचें नेहमींचें निवासस्थान असलेला क्षीरसागर हे मीं त्या दिशेसच पाहिले १५. परंतु, वाली पाठलाग करीत असतांना, हे प्रभो, मी पळतां पळतां एकदम वळून जाऊं लागलों १६ आणि ती दिशा सोडून देऊन विंध्याचलावरील वृक्षांनीं व्याप्त आणि चंदनवृक्षांनीं सुशोभित अशा दक्षिण दिशेकडे चालता झालों १७. नंतर वृक्षांच्या अथवा पर्वतांच्या पलीकडे वालीला पहात पहात मी दक्षिणदिशा सोडून वाली तसाच पाठलाग करीत असतांना दुसऱ्या पश्चिम दिशेकडे धावूं लागलों १८. तेव्हां नानाप्रकारचे देश आणि श्रेष्ठ अस्ताचल पर्वत पहातां पहातां शेवटीं मी त्या श्रेष्ठ अस्ताचलावर आलों आणि तेथून उत्तरेकडे पळालों १९. हिमालयपर्वत, मेरुपर्वत आणि उत्तर समुद्र जरी मी हिंडलों तरी वाली मागोमाग धांवत येत असल्यामुळें आपणाला

इदानीं मे स्मृतं राजन्यथा वाली हरीश्वरः । मतङ्गेन तदा शप्तो ह्यस्मि-
न्नाश्रममण्डले २१ प्रविशेद्यदि वा वाली मूर्धास्य शतधा भवेत् । तत्र
वासः सुखोऽस्माकं निरुद्विग्नो भविष्यति २२ तत्र पर्वतमासाद्य ऋष्य-
मूकं नृपात्मज । न विवेश तदा वाली मतङ्गस्य भयात्तदा २३ एवं मया
तदा राजन्प्रत्यक्षमुपलक्षितम् । पृथिवीमण्डलं सर्वं गुहामस्म्यागत-
स्ततः २४ [ १९३१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
किष्किन्धाकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ॥ ४६ ॥

दर्शनार्थं तु वैदेह्याः सर्वतः कपिकुञ्जराः । व्यादिष्टाः कपिराजेन
यथोक्तं जग्मुरञ्जसा १ ते सरांसि सरित्कक्षानाकाशं नगराणि च ।
नदीदुर्गांस्तथा देशान्विचिन्वन्ति समन्ततः २ सुग्रीवेण समाख्याताः
सर्वे वानरयूथपाः । तत्र देशान्विचिन्वन्ति सशैलवनकाननान् ३ विचित्य
दिवसं सर्वे सीताधिगमने धृताः । समायान्ति स्म मेदिन्यां निशाका-
लेषु वानराः ४ सर्वर्तुकांश्च देशेषु वानराः सफलद्रुमान् । आसाद्य

---

कोठेंही आश्रय मिळत नाहीं असें जेव्हां माझ्या लक्ष्यांत आलें तेव्हां बुद्धिमान् हनुमान् मला ह्मणाला २० "हे राजा, मला आतां स्मरण झालें. 'ह्या आश्रमामध्यें जर वाली प्रवेश करील तर त्याच्या मस्तकाचे शेंकडों तुकडे होतील.' असा मतंगऋषींनीं वानरराज वालीला त्या वेळीं शाप दिलेला आहे. ह्यास्तव, त्या मतंगाश्रमामध्यें आपलें वास्तव्य निर्भय व सुखावह होईल" २१, २२. हे राजपुत्रा रामचंद्रा, ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितल्यावर ऋष्यमूकपर्वतावर जाऊन मी राहिलों असतां मतंगमुनींच्या भयामुळें वाली माझ्यासमीप येण्यास समर्थ झाला नाहीं २३. सारांश, हे राजा, ह्याप्रमाणें त्या वेळीं सर्व भूमंडल मीं प्रत्यक्ष अवलोकन केलें आणि शेवटीं ऋष्यमूकपर्वताच्या गुहेचा आश्रय करून राहिलों २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

सीतेच्या शोधाकरितां वानरराज सुग्रीवानें चोहोंकडे जाण्यास आज्ञा केलेले ते वानरश्रेष्ठ आज्ञेप्रमाणें लगेच चालते झाले १ आणि सरोवरें, नद्यांचीं तीरें, मैदानें, नगरें आणि नद्यांच्या प्रवाहांमुळें जाण्यास दुर्गम झालेले प्रदेश चोहोंकडे शोधूं लागले २. सारांश, सुग्रीवाची आज्ञा झालेले ते सर्वही वानरसेनाधिपति पर्वत, वनें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान तिकडील देश शोधूं लागले ३. सीतेचा शोध लावण्याकरितां उद्युक्त झालेले सर्वही वानर दिवसा शोधीत असत आणि रात्रीं ( निद्रा

रजनीं शय्यां चक्रुः सर्वेष्वहःसु ते ५ तदहः प्रथमं कृत्वा मासे प्रस्रवणं गताः । कपिराजेन संगम्य निराशाः कपिकुञ्जराः ६ विचित्य तु दिशं पूर्वां यथोक्तां सचिवैः सह । अदृष्ट्वा विनतः सीतामाजगाम महाबलः ७ दिशमप्युत्तरां सर्वां विविच्य स महाकपिः । आगतः सह सैन्येन भीतः शतबलिस्तदा ८ सुषेणः पश्चिमामाशां विविच्य सह वानरैः। समेत्य मासे पूर्णे तु सुग्रीवमुपचक्रमे ९ तं प्रस्रवणपृष्ठस्थं समासाद्याभिवाद्य च । आसीनं सह रामेण सुग्रीवमिदमब्रुवन् १० विचिताः पर्वताः सर्वे वनानि गहनानि च । निम्नगाः सागरान्ताश्च सर्वे जनपदाश्च ये ११ गुहाश्च विचिताः सर्वा याश्च ते परिकीर्तिताः । विचिताश्च महागुल्मा लताविततसंतताः १२ गहनेषु च देशेषु दुर्गेषु विषमेषु च । सत्त्वान्यातिप्रमाणानि विचितानि हतानि च ॥ ये चैव गहना देशा विचितास्ते पुनः पुनः १३ उदारसत्त्वाभिजनो हनुमान्स मैथिलीं ज्ञास्यति वानरेन्द्र ।

---

घेण्याकरितां ) पृथ्वीवर पडत असत ४. ज्या ज्या देशांत वानर सीतेचा शोध लावण्याकरितां गेले त्या त्या देशांत जिकडे तिकडे त्यांना प्रत्यहीं सर्व ऋतूंतील फलें धारण करणारे वृक्ष आढळूं लागले आणि ते वानर रात्रीं निद्रा घेऊं लागले ५. तो निघण्याचाच दिवस पहिला धरून प्रस्रवणपर्वतावर सीतेला शोधण्याकरितां गेलेले वानर एक महिन्याची मुदत भरूं लागतांक्षणीं निराश होऊन परत फिरले आणि वानरराज सुग्रीवासमीप येऊन राहिले ६. सुग्रीवानें आज्ञा केल्याप्रमाणें सचिवांसहवर्तमान पूर्व दिशेस गेलेला महाबलाढ्य विनत सर्व पूर्व दिशा शोधिल्यावरही सीतेचा शोध लागत नाहीं असें पाहून परत आला ७. सर्व उत्तर दिशा धुंडाळून महाकपि शतबलिही मुदतीला भिऊन सैन्यासहवर्तमान परत आला ८. वानरांसहवर्तमान गेलेला सुषेणही पश्चिम दिशा धुंडाळून महिना पूर्ण होतांक्षणीं सुग्रीवाकडे परत आला ९ आणि रामासहवर्तमान प्रस्रवणपर्वतावर बसलेल्या सुग्रीवाकडे येऊन अभिवंदनपूर्वक त्याला ह्मणाला १० "सर्व पर्वत, गहन वनें, नद्या, समुद्रांतील बेटें आणि सर्व प्रदेश धुंडाळून काढिले ११, आपण सांगितल्याप्रमाणें सर्व गुहा शोधून काढिल्या, लतांच्या वेलांनीं सर्व बाजूंनीं व्याप्त झालेलीं लतागृहें हुडकिलीं १२, गहन प्रदेशांमध्यें आणि दुर्गम असलेल्या अवघड ठिकाणींही जाऊन अत्यंत बलाढ्य प्राण्यांचीं स्थलें धुंडाळून त्यांचा वधही केला आणि जे ह्मणून कांहीं गहन प्रदेश तेही आह्मीं फिरून फिरून शोधून काढिले १३. आतां, हे वानरराजा, मनानें उदार आणि महाकुलीन असा जो हनूमान् तोच सीतेचा पत्ता लावील; कारण, ज्या दिशेला सीता गेली आहे.

दिशं तु यामेव गता तु सीता तामास्थितो वायुसुतो हनूमान् १४ [१९४५]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥ ४७ ॥

सह ताराङ्गदाभ्यां तु सहसा हनुमान्कपिः। सुग्रीवेण यथोद्दिष्टं गन्तुं
देशं प्रचक्रमे १ स तु दूरमुपागम्य सर्वैस्तैः कपिसत्तमैः। ततो विचित्य
विन्ध्यस्य गुहाश्च गहनानि च २ पर्वताग्रनदीदुर्गान्सरांसि विपुलद्रुमान्।
वृक्षखण्डांश्च विविधान्पर्वतान्वनपादपान् ३ अन्वेषमाणास्ते सर्वे वानराः
सर्वतोदिशम्। न सीतां ददृशुर्वीरा मैथिलीं जनकात्मजाम् ४ ते भक्ष-
यन्तो मूलानि फलानि विविधान्यपि। निर्जलं निर्जनं शून्यं गहनं घोर-
दर्शनम् ५ तादृशान्यप्यरण्यानि विचित्य भृशपीडिताः। स देशश्च दुर-
न्वेष्यो गुहागहनवान्महान् ६ त्यक्त्वा तु तं ततो देशं सर्वे वै हरियूथपाः।
देशमन्यं दुराधर्षं विविशुश्चाकुतोभयाः ७ यत्र वन्ध्यफला वृक्षा विपुष्पाः
पर्णवर्जिताः। निस्तोयाः सरितो यत्र मूलं यत्र सुदुर्लभम् ८ न सन्ति

---

त्याच दिशेला तो वायुपुत्र हनूमान् गेला आहे" १४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४७ ॥

तार आणि अंगद ह्यांसहवर्तमान हनूमान् वानर सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें उद्दिष्ट प्रदेशाकडे एकदम जाण्यास निघाला १. त्या वानरश्रेष्ठांसहवर्तमान दूर जाऊन विंध्यपर्वताच्या गुहा आणि वनें २ आणि त्याचप्रमाणें पर्वतावरील नद्यांमुळें दुर्गम झालेले प्रदेश, मोठमोठ्या वृक्षांनीं भरलेलीं वनें, नानाप्रकारचे पर्वत आणि अरण्यांतील वृक्षही त्यानें धुंडाळून काढिले ३. सारांश, हनूमान् आणि त्याच्याबरोबर गेलेले ते सर्वही वानर नानाप्रकारचीं मुळें व फळें ह्यांवर उपजीविका करून चोहोंकडून दक्षिण दिशा शोधीत होते; तथापि, त्या वीरांना जनककन्या सीतेचा शोध लागला नाहीं. निर्जल, निर्जन आणि ह्मणूनच शून्य व दिसण्यांतही भयंकर असें वन ४,५ आणि त्याच्याच सारखीं निर्जल व निर्जन असलेलीं शून्य अरण्येंही त्यांनीं शोधून काढिलीं. गुहा आणि अरण्यें ह्यांनीं युक्त असलेला जो जो मोठा प्रदेश शोधून काढण्याला कठिण असे तो तोही त्यांनीं शोधून काढिला ६ आणि शोधून काढिल्यानंतर त्या देशाचा त्याग करून ते सर्वही वानरसेनाधिपति कसल्याही प्रकारची भीति न बाळगितां प्रवेश होण्यास कठिण अशा दुसऱ्याच एका प्रदेशामध्यें गेले ७. त्या ठिकाणचे वृक्ष फळें, पुष्पें व पानें ह्यांनीं रहित असून नद्याही निर्जल झालेल्या होत्या व मुळें-

महिषा यत्र न मृगा न च हस्तिनः । शार्दूलाः पक्षिणो वापि ये चान्ये वनगोचराः ९ न चात्र वृक्षा नौषध्यो न वल्ल्यो नापि वीरुधः । स्निग्धपत्राः स्थले यत्र पद्मिन्यः फुल्लपङ्कजाः १० प्रेक्षणीयाः सुगन्धाश्च भ्रमरैश्च विवर्जिताः ११ कण्डुर्नाम महाभागः सत्यवादी तपोधनः । महर्षिः परमामर्षी नियमैर्दुष्प्रधर्षणः १२ तस्य तस्मिन्वने पुत्रो बालको दशवार्षिकः । प्रनष्टो जीवितान्ताय क्रुद्धस्तेन महामुनिः १३ तेन धर्मात्मना शप्तं कृत्स्नं तत्र महद्वनम् । अशरण्यं दुराधर्षं मृगपक्षिविवर्जितम् १४ तस्य ते काननान्तांस्तु गिरीणां कंदराणि च । प्रभवानि नदीनां च विचिन्वन्ति समाहिताः १५ तत्र चापि महात्मानो नापश्यञ्जनकात्मजाम् । हर्तारं रावणं वापि सुग्रीवप्रियकारिणः १६ ते प्रविश्य तु तं भीमं लतागुल्मसमावृतम् । ददृशुर्भीमकर्माणमसुरं सुरनिर्भयम् १७ तं दृष्ट्वा वानरा घोरं स्थितं शैलमिवासुरम् । गाढं परिहिताः सर्वे दृष्ट्वा तं पर्व-

---

पाळेंही अत्यंत दुर्लभ होतीं ८. महिष, मृग, गज, व्याघ्र, पक्षी अथवा दुसरेही वनामध्यें रहाणारे प्राणी तेथें नव्हत ९; वृक्ष, औषधि, वृक्षाच्या आश्रयानें राहणाऱ्या वेली आणि स्निग्ध पर्णांनीं युक्त अशा भूमीवरही पसरलेल्या वेली तेथें मुळींच नसून कमळें प्रफुल्लित झाल्यामुळें प्रेक्षणीय, सुगंधयुक्त आणि भ्रमरांनीं व्याप्त झालेलीं सरोवरेंही तेथें नव्हतीं १०,११. अशा त्या वनप्रदेशामध्यें कंडु ह्मणून एक महाभाग्यवान् सत्यवादी तपोधन महर्षि रहात होते; ते फारच रागीट होते आणि तपश्चर्येसंबंधीं नियमांमुळें त्यांच्यासमोर दुसऱ्यांनीं जाणेंही अशक्य झालें होतें १२. त्या वनामध्यें त्यांचा एक दहा वर्षांचा मुलगा मृत्यु पावला होता आणि त्यामुळें ते महर्षि क्रुद्ध झाले होते १३. इतकेंच नव्हे; परंतु त्या धर्मात्म्या महर्षींनीं तें सर्व प्रचंड वन मृगरहित व पक्षिरहित होऊन कोणालाही आश्रय करण्याला उपयोगीं पडणार नाहीं व ह्यांत प्रवेश करणेंही अत्यंत कठिण होईल असा शापही देऊन टाकिला होता १४. त्या प्रदेशांतीलही वनें, पर्वतांच्या गुहा आणि नद्यांचे उगम त्यांनीं लक्ष्य लावून शोधिले १५. तथापि सुग्रीवाच्या मर्जीप्रमाणें वागणाऱ्या महात्म्यांना तेथें सीतेचा अथवा तिचा अपहार करणाऱ्या रावणाचाही पत्ता लागला नाहीं १६. नंतर लता व झांकरें ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या भयंकर प्रदेशामध्यें प्रवेश केल्यावर उग्र कर्म करणाऱ्या आणि देवांची मुळींच भीति नसलेल्या एका असुराला त्यांनीं तेथें अवलोकन केलें १७. पर्वताप्रमाणें असलेल्या त्या घोर असुराला वानरांनीं अवलोकन केलें. इतकेंच नव्हे ; परंतु, त्या पर्वतप्राय असुराला अवलोकन करितांक्षणीं सर्वेही

तोपमम् १८ सोपि तान्वानरान्सर्वान्नष्टाः स्थेत्यब्रवीद्बली । अभ्यधावत संक्रुद्धो मुष्टिमुद्यम्य संगतम् १९ तमापतन्तं सहसा वालिपुत्रोङ्गदस्तदा। रावणोयमिति ज्ञात्वा तलेनाभिजघान ह २० स वालिपुत्राभिहतो वक्त्राच्छोणितमुद्वमन् । असुरो न्यपतद्भूमौ पर्यस्त इव पर्वतः २१ ते तु तस्मिन्निरुच्छ्वासे वानरा जितकाशिनः । विचिन्वन्प्रायशस्तत्र सर्वं ते गिरिगह्वरम् २२ विचितं तु ततः सर्वं सर्वे ते काननौकसः । अन्यदेवापरं घोरं विविशुर्गिरिगह्वरम् २३ ते विचित्य पुनः खिन्ना विनिष्पत्य समागताः । एकान्ते वृक्षमूले तु निषेदुर्दीनमानसाः २४ [१९६९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डेष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

अथाङ्गदस्तदा सर्वान्वानरानिदमब्रवीत् । परिश्रान्तो महाप्राज्ञः समाश्वास्य शनैर्वचः १ वनानि गिरयो नद्यो दुर्गाणि गहनानि च । दरी गिरिगुहाश्चैव विचिताः सर्वमन्ततः २ तत्र तत्र महात्माभिर्जानकी न च दृश्यते ।

---

चांगल्या तयारीनें राहिले १८ व तो बलाढ्य असुरही " मेलांत. " असें त्या सर्व वानरांना ह्मणाला आणि क्रुद्ध होऊन व मूठ वळलेला एक हात उगारून त्यांच्या अंगावर धांवला १९. परंतु, तो एकाएकीं धांवून येत असतांना हा रावण आहे असें समजून वालिपुत्र अंगदानें त्याला एक चपराक लगाविली २०. तेव्हां वालिपुत्र अंगदाची चपराक बसतांक्षणीं तोंडांतून रक्ताच्या गुळण्या टाकीत टाकीत तो असुर फेंकून दिलेल्या पर्वताप्रमाणें भूमीवर पडला २१; ह्याप्रमाणें तो निश्चेष्ट पडला असतां ते सर्व विजयी वानर त्या देशांतील बहुतेक पर्वत व गुहा शोधूं लागले २२. तो सर्व प्रदेश शोधून निघाला असें समजून आल्यानंतर ते सर्वही वनवासी वानर दुसऱ्याच एका पर्वतावरील घोर अरण्यामध्यें शिरले २३ आणि तें शोधून काढिल्यावर पुनरपि सीतेचा शोध लागत नाहीं ह्मणून ते खिन्न झाले आणि उड्या टाकीत टाकीत एकांत प्रदेशामध्यें सर्व एकत्र जुळून एका वृक्षाखालीं मन खट्टू होऊन बसले २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४८ ॥

नंतर शोधून शोधून थकून गेलेला महाबुद्धिमान् अंगद सर्व वानरांना धीर देऊन हलकें हलकें त्यांना ह्मणाला १ " वनें, पर्वत, नद्या, दुर्गम प्रदेश, अरण्यें, दऱ्या आणि पर्वतावरील गुहा हें सर्व आपण चोहोंकडून शोधिलें २; परंतु, ठिकठिकाणीं आपण एकत्र जुळून शोध केला तरी जानकीचा शोध लागत नाहीं आणि त्याचप्रमाणें त्या

तथा रक्षोपहर्ता च सीतायाश्चैव दुष्कृती ३ कालश्च नो महान्यातः सुग्री-
वश्चोग्रशासनः । तस्माद्भवन्तः सहिता विचिन्वन्तु समन्ततः ४ विहाय तन्द्रीं
शोकं च निद्रां चैव समुत्थिताम् । विचिनुध्वं तथा सीतां पश्यामो जनका-
त्मजाम् ५ अनिर्वेदं च दाक्ष्यं च मनसश्चापराजयम् । कार्यसिद्धिकरा-
ण्याहुस्तस्मादेतद्ब्रवीम्यहम् ६ अद्यापीदं वनं दुर्गं विचिन्वन्तु वनौकसः ।
खेदं त्यक्त्वा पुनः सर्वं वनमेव विचिन्वताम् ७ अवश्यं कुर्वतां तस्य
दृश्यते कर्मणः फलम् । परं निर्वेदमागम्य न हि नोन्मीलनं क्षमम् ८
सुग्रीवः क्रोधनो राजा तीक्ष्णदण्डश्च वानराः । भेतव्यं तस्य सततं
रामस्य च महात्मनः ९ हितार्थमेतदुक्तं वः क्रियतां यदि रोचते ।
उच्यतां हि क्षमं यत्तत्सर्वेषामेव वानराः १० अङ्गदस्य वचः श्रुत्वा
वचनं गन्धमादनः । उवाच व्यक्तया वाचा पिपासाश्रमखिन्नया ११
सदृशं खलु वो वाक्यमङ्गदो यदुवाच ह । हितं चैवानुकूलं च क्रिय-
तामस्य भाषितम् १२ पुनर्मार्गामहे शैलान्कन्दरांश्च शिलास्तथा ।

---

सीतेचा अपहार करणारा पापी राक्षसही दृष्टीं पडत नाहीं ३. काळ तर आपला पुष्कळ गेला आणि सुग्रीवाची आज्ञा तर फारच कडक पडली. तेव्हां तुह्मी आतां एका जुटीनें चोहोंकडे शोध करा ४. आळस, प्रवासामुळें होणारें दुःख आणि निद्रा ह्यांची पर्वा न करितां जनककन्या सीता दृष्टीं पडेल अशा रीतीनें आतां आपण शोध करूं ५. खेदराहित्य, दक्षता आणि मनाच्या उत्साहाचा भंग न होऊं देणें हीं कार्य-सिद्धि करणारीं आहेत आणि ह्मणूनच मी तुह्माला हें सांगत आहें ६. हें दुर्गम वन वानरांनीं अद्यापि शोधून काढिलें पाहिजे सारांश, मनामध्यें खेद न बाळगितां सर्व वन तुह्मीं शोधून काढा ७. वानर प्रयत्न करूं लागले असतां त्या प्रयत्नकर्माचें फल अवश्य दृष्टीं पडणारच. ह्याकरितां मनामध्यें खिन्न होऊन उद्योग सोडून देणें योग्य नाहीं ८. शिवाय, हे वानरहो, राजा सुग्रीव रागीट असून त्याचें शासन फार कडक आहे; तेव्हां त्याची व त्याचप्रमाणें महात्म्या रामाची आपणाला नेहमीं भीति बाळ-गिली पाहिजे ९. मीं हें हिताकरितां तुह्मांला सांगितलें आहे; तुह्मांला रुचल्यास ह्याप्रमाणें करा अथवा हें माझें सांगणें जर रुचत नसेल तर, हे वानरहो, ह्या प्रसंगीं सर्वांना काय योग्य आहे तें तरी एकदां कळूं द्या " १०. हें अंगदाचें भाषण श्रवण करून तृषा व श्रम ह्यांच्यामुळें स्वरानें हळू पण स्पष्ट अशा वाणीनें गंधमादन ह्मणाला ११ " अंगदानें सांगितलेलें करणें तुह्माला योग्य आहे, तें हितकारक आहे आणि अनुकूल आहे. ह्यास्तव, ह्याचें ऐकिलें पाहिजे १२. महात्म्या सुग्रीवानें सांगि-

कानना‍नि च शून्यानि गिरिप्रस्रवणानि च १३ यथोद्दिष्टानि सर्वाणि
सुग्रीवेण महात्मना । विचिन्वन्तु वनं सर्वे गिरिदुर्गाणि संगताः १४
ततः समुत्थाय पुनर्वानरास्ते महाबलाः । विन्ध्यकाननसंकीर्णां विचे-
युर्दक्षिणां दिशम् १५ ते शारदाभ्रप्रतिमं श्रीमद्रजतपर्वतम् । शृङ्गवन्तं
दरीवन्तमधिरुह्य च वानराः १६ तत्र लोध्रवनं रम्यं सप्तपर्णवनानि च ।
विचिन्वन्तो हरिवराः सीतादर्शनकाङ्क्षिणः १७ तस्याग्रमधिरूढास्ते
श्रान्ता विपुलविक्रमाः । न पश्यन्ति स्म वैदेहीं रामस्य महिषीं
प्रियाम् १८ ते तु दृष्टिगतं दृष्ट्वा तं शैलं बहुकंदरम् । अध्यारोहन्त हरयो
वीक्षमाणाः समन्ततः १९ अवरुह्य ततो भूमिं श्रान्ता विगतचेतसः ।
स्थित्वा मुहूर्तं तत्राथ वृक्षमूलमुपाश्रिताः २० ते मुहूर्तं समाश्वस्ताः
किञ्चिद्भग्नपरिश्रमाः । पुनरेवोद्यताः कृत्स्नां मार्गितुं दक्षिणां दिशम् २१
हनुमत्प्रमुखास्तावत्प्रस्थिताः प्लवगर्षभाः । विन्ध्यमेवादितः कृत्वा विचे-

---

तल्याप्रमाणें पुनरपि पर्वत, गुहा, टेंकड्या, शून्य वनें आणि पर्वतावरील जलप्रवाह आपणाला शोधिले पाहिजेत. ह्याकरितां एक जूट होऊन सर्वांनीं वन आणि पर्वतसंबंधीं दुर्गम प्रदेश धुंडाळिले पाहिजेत " १३,१४. असें गंधमादनानें सांगितल्यानंतर ते महाबलाढ्य वानर तेथून उठले आणि विंध्यपर्वतसंबंधीं वनांनीं व्याप्त झालेल्या दक्षिण दिशेमध्यें हिंडूं लागले १५. प्रथमतः शिखरें आणि दऱ्या ह्यांनीं युक्त आणि शरत्कालच्या मेघाप्रमाणें भासणाऱ्या भव्य रजतपर्वतावर ते वानर गेले १६ आणि सीतेचा शोध लावण्याची इच्छा धरणारे ते वानरश्रेष्ठ त्या पर्वतावरील रमणीय लोध्रवन व सप्तपर्ण वृक्षांचीं वनें शोधूं लागले १७. त्या पर्वताच्या माथ्यावर चढलेले ते महापराक्रमी वानर शोधून शोधून जरी थकले तरी सुद्धां रामाची प्रिय पट्टराणी सीता त्यांच्या दृष्टीं पडली नाहीं १८. अनेक गुहांनीं युक्त असलेला तो पर्वत जितका ह्मणून त्यांना दृग्गोचर होता तितक्यावर आरूढ होऊन ते वानर चोहोंकडे शोधूं लागले १९ आणि नंतर खालीं उतरल्यावर भांबावून गेलेले व कांहीं एक मुर्चेनास झालेले ते वानर एका वृक्षाजवळ येऊन मुहूर्तभर तेथें बसले २० व एक मुहूर्तभर विश्रांति घेतल्यानंतर, किंचित् श्रमपरिहार झालेले ते वानर पुनरपि सर्व दक्षिण दिशा शोधून काढण्यास तयार झाले २१ आणि हनूमान् आदिकरून शोध करण्याकरितां निघालेले ते सर्वही वानरश्रेष्ठ विंध्यपर्वतच शोधून काढण्याचें प्रथम मनामध्यें योजून त्या पर्वतावर चोहोंकडे संचार करूं लागले २२. ह्याप्रमाणें महामुनि-

स्थ समन्ततः २२ [१९९१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकोनपञ्चाशः सर्गः ॥ ४९ ॥

सह ताराङ्गदाभ्यां तु संगम्य हनुमान्कपिः । विचिनोति च विन्ध्यस्य गुहाश्च गहनानि च १ सिंहशार्दूलजुष्टाश्च गुहाश्च परितस्तथा । विषमेषु नगेन्द्रस्य महाप्रस्रवणेषु च २ आसेदुस्तस्य शैलस्य कोटिं दक्षिणपश्चिमाम् । तेषां तत्रैव वसतां स कालो व्यत्यवर्तत ३ स हि देशो दुरन्वेष्यो गुहागहनवान्महान् । तत्र वायुसुतः सर्वं विचिनोति स्म पर्वतम् ४ परस्परेणरहिता अन्योन्यस्याविदूरतः । गजो गवाक्षो गवयः शरभो गन्धमादनः ५ मैन्दश्च द्विविदश्चैव हनूमाञ्जाम्बवानपि । अङ्गदो युवराजश्च तारश्च वनगोचरः ६ गिरिजालावृतान्देशान्मार्गित्वा दक्षिणां दिशम् । विचिन्वन्तस्ततस्तत्र ददृशुर्विवृतं बिलम् ७ दुर्गमृक्षबिलं नाम दानवेनाभिरक्षितम् ८ क्षुत्पिपासापरीतास्तु श्रान्तास्तु सलिलार्थिनः । अवकीर्णं लतावृक्षैर्ददृशुस्ते महाबिलम् ९ तत्र क्रौञ्चाश्च हंसाश्च सार-

---

वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकुणपन्नासावाँ सर्ग समाप्त झाला ॥ ४९ ॥

तार व अंगद ह्यांच्याशीं मिळून हनूमान् वानर विंध्यपर्वताच्या गुहा व वनें धुंडाळूं लागला १. सिंहव्याघ्रांनीं भरलेल्या अशाही त्या श्रेष्ठ पर्वतावरील गुहा तो शोधूं लागला आणि क्लेशदायक असलेल्या मोठमोठ्या ओढ्यांतूनही तो शोध करूं लागला २. शेवटीं त्या पर्वताच्या नैर्ऋत्य भागाला ते वानर गेले आणि तेथेंच वास्तव्य करीत असतांना त्यांची ती परत येण्याची मुदत भरून गेली ३. तो प्रचंड प्रदेश गुहा व अरण्यें ह्यांनीं युक्त असल्यामुळें जरी धुंडाळण्यास फारच अशक्य होता तरी वायुपुत्र हनुमानानें तो सर्व पर्वत शोधून काढण्याचा क्रम सुरू ठेविलाच होता ४. एकमेकांपासून विशेष दूर न रहातां वेगळे वेगळे होऊन गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन ५, मैंद, द्विविद, हनूमान् , जांबवान्, युवराज अंगद आणि वनामध्यें हिंडणारा तार ६ हे पर्वतसमुदायांनीं युक्त असलेले प्रदेश शोधून काढून दक्षिण दिशा ठिकठिकाणीं हुडकूं लागले असतां एक आच्छादित विवर त्यांनीं अवलोकन केलें ७. तें विवर आंत प्रवेश करण्याला कठिण असून ऋक्षबिल असें त्याचें नांव होतें आणि एका दानवानें त्याचें रक्षण केलेलें होतें ८. असो. क्षुधा व तृषा ह्यांनीं व्याप्त होऊन श्रांत झालेल्या त्या उदकार्थी वानरांनीं लता व वृक्ष ह्यांनीं गजबजून गेलेलें तें मोठें बीळ अवलोकन केलें ९. त्या बिळांतून क्रौंच, हंस, सारस आणि कमलपुष्पांच्या परागामुळें शरीर रंगून गेलेले

साश्चापि निष्क्रमन् । जलार्द्राश्चक्रवाकाश्च रक्ताङ्गाः पद्मरेणुभिः १०
ततस्तद्बिलमासाद्य सुगन्धि दुरतिक्रमम् । विस्मयव्यग्रमनसो बभूवुर्वान-
रर्षभाः ११ संजातपरिशङ्कास्ते तद्बिलं प्लवगोत्तमाः । अभ्यपद्यन्त संहृष्टा-
स्तेजोवन्तो महाबलाः १२ नानासत्त्वसमाकीर्णं दैत्येन्द्रनिलयोपमम् ।
दुर्दर्शमिव घोरं च दुर्विगाह्यं च सर्वशः १३ ततः पर्वतकूटाभो हनूमा-
न्मारुतात्मजः । अब्रवीद्वानरान्घोरान्कान्तारवनकोविदः १४ गिरिजा-
लावृतान्देशान्मार्गित्वा दक्षिणां दिशम् । वयं सर्वे परिश्रान्ता न च पश्याम
मैथिलीम् १५ अस्माच्चापि बिलाद्धंसाः क्रौञ्चाश्च सह सारसैः । जला-
र्द्राश्चक्रवाकाश्च निष्पतन्ति स्म सर्वशः १६ नूनं सलिलवानत्र कूपो वा
यदि वा ह्रदः । तथा चेमे बिलद्वारे स्निग्धास्तिष्ठन्ति पादपाः १७ इत्युक्त्वा-
स्तद्बिलं सर्वे विविशुस्तिमिरावृतम् । अचन्द्रसूर्यं हरयो ददृशू रोमहर्ष-
णम् १८ निशाम्य तस्मात्सिंहांश्च तांस्तांश्च मृगपक्षिणः । प्रविष्टा हरि-

---

व उदकानें आर्द्र झालेले चक्रवाक पक्षी बाहेर पडत होते १०. अशा प्रकारें ओलांडून जाण्यास अशक्य असलेल्या त्या सुगंधी बिळाजवळ येऊन वानरश्रेष्ठ मनामध्यें विस्मयचकित झाले ११ आणि येथें उदक असेल अशी त्यांची अटकळ झाल्यामुळें तेजस्वी व महाबलाढ्य असे ते वानरश्रेष्ठ आनंदित होऊन अगदीं त्या बिळाजवळ गेले १२. दैत्यराज बलीच्या निवासस्थानासारिखें ( ह्मणजे अर्थात् पातालासारिखें ) असलेलें तें विवर नानाप्रकारच्या प्राण्यांनीं भरलेलें होतें. त्या घोर विवराकडे पहाण्याची सोय नव्हती आणि त्यांत प्रवेश करणें तर फार अशक्यच होतें १३. तदनंतर आकृतीनें पर्वतशिखराप्रमाणें असलेला आणि अरण्यें व वनें ह्यांच्याविषयीं माहितगार असलेला वायुपुत्र हनुमान् घोर वानरांना ह्मणाला १४ " पर्वतसमुदायांनीं व्याप्त झालेले देश धुंडाळितां धुंडाळितां सर्व दक्षिण दिशा हुडकून आपण सर्व अगदीं थकून गेलों; तथापि सीतेचा आपल्याला पत्ता लागत नाहीं १५. ह्या विवरांतून हंस, सारसपक्ष्यांसहवर्तमान क्रौंच आणि चक्रवाक असे पक्षी उदकानें आर्द्र होऊन सर्व बाजूंनीं बाहेर पडत आहेत १६. ह्यावरून येथें उदकयुक्त कूप अथवा सरोवर हें खास असलेंच पाहिजे. शिवाय, ह्या विवराच्या द्वाराशीं असलेले हे वृक्षही टवटवीत दिसत आहेत " १७ ह्याप्रमाणें हनूमानानें सांगितलें असतां ते सर्वही वानर त्या अंधकारानें व्याप्त झालेल्या विवरामध्यें प्रविष्ट झाले आणि चंद्रसूर्यप्रकाशरहित व ह्मणूनच अंगावर कांटा आणणारें असें तें विवर पाहूं लागले १८. असो. त्या विवरांतून सिंह आणि नानाप्रकारचे पशुपक्षी बाहेर पडत असलेले अवलोकन

शार्दूला बिलं तिमिरसंवृतम् १९ न तेषां सज्जते दृष्टिर्न तेजो न पराक्रमः । वायोरिव गतिस्तेषां दृष्टिस्तमसि वर्तते २० ते प्रविष्टास्तु वेगेन तद्बिलं कपिकुञ्जराः । प्रकाशं चाभिरामं च ददृशुर्देशमुत्तमम् २१ ततस्तस्मिन्बिले भीमे नानापादपसंकुले । अन्योन्यं संपरिष्वज्य जग्मुर्योजनमन्तरम् २२ ते नष्टसंज्ञास्तृषिताः संभ्रान्ताः सलिलार्थिनः । परिपेतुर्बिले तस्मिन्कंचित्कालमतन्द्रिताः २३ ते कृशा दीनवदनाः परिश्रान्ताः प्लवंगमाः । आलोकं ददृशुर्वीरा निराशा जीविते यदा २४ ततस्तं देशमागम्य सौम्या वितिमिरं वनम् । ददृशुः काञ्चनान्वृक्षान्दीप्तवैश्वानरप्रभान् २५ सालांस्तालांस्तमालांश्च पुंनागान्वञ्जुलान्धवान् । चम्पकान्नागवृक्षांश्च कर्णिकारांश्च पुष्पितान् २६ स्तबकैः काञ्चनैश्चित्रै रक्तैः किसलयैस्तथा । आपीडैश्च लताभिश्च हेमाभरणभूषितान् २७ तरुणादित्यसंकाशान्वैदुर्यमयवेदिकान् । विभ्राजमानान्वपुषा पादपांश्च हिरण्मयान् २८

---

केल्यावर अंधकारानें व्याप्त अशा त्या विवरामध्यें ते श्रेष्ठ श्रेष्ठ वानर प्रविष्ट झाले असतां १९ त्यांची दृष्टि, प्रभाव आणि पराक्रम ह्यांनें तेथें कांहींही चालेना. ह्यामुळें त्यांची गति वायूप्रमाणें होती तरी दृष्टिच अंधकारामध्यें कुंठित झाल्याकारणानें एकमेकांचे हात धरूनच त्या वानरश्रेष्ठांना वेगावेगानें त्या विवरामध्यें प्रवेश करणें भाग पडलें; तेव्हां पुढें बऱ्याच वेळानें त्यांना प्रकाशयुक्त व रमणीय असा उत्कृष्ट देश दृष्टीं पडला २०, २१. नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त झालेल्या त्या भयंकर विवरामध्यें एकमेकांचे हात वगैरे घट्ट धरून सुमारें एक योजनभर ते गेले असतां २२ तृषाक्रांत आणि ह्मणूनच उदकार्थी बनलेले ते वानर अतिशय गोंधळून गेले आणि त्यांना कांहीं एक सुचेनासें झालें. सारांश, कांहीं वेळपर्यंत ते सावध राहून त्या विवरामध्यें चालत राहिले. २३; परंतु, शेवटीं चालतां चालतां अतिशय थकून जाऊन दीनवदन व कृश झालेले ते वीर वानर जीविताविषयींही निराश झाले असतां त्यांना प्रकाश दिसूं लागला २४. तदनंतर जेथें अंधकाररहित वन आहे अशा त्या प्रदेशाला आल्यावर प्रदीप्त अग्नीसारिखे तेजस्वी असे सुवर्णवृक्ष त्या विनयसंपन्न वानरांनीं अवलोकन केले २५. साल, ताल, तमाल, पुन्नाग, वंजुल, धव, चंपक, नागवृक्ष आणि प्रफुल्लित कर्णिकार वृक्ष त्यांनीं अवलोकन केले २६; सुवर्णमय आणि आश्चर्यकारक अशा झुबक्यांनीं, आरक्तवर्ण नूतन पल्लवांनीं, पुष्पगुच्छरूप गजऱ्यांनीं आणि लतांनीं युक्त, सुवर्णालंकारांनीं भूषित २७, बालसूर्याप्रमाण तेजस्वी, वैदूर्यरत्नमय आधारप्रदेशांनीं युक्त व आकृतीनें देदीप्यमान असे सुवर्णमय वृक्ष त्यांनीं पाहिले २८. नील

नीलवैदूर्यवर्णाश्च पद्मिनीः पतगैर्वृताः । महद्भिः काञ्चनैर्वृक्षैर्वृता बाला-
र्कसंनिभैः २९ जातरूपमयैर्मत्स्यैर्महद्भिश्चाथ पङ्कजैः । नलिनीस्तत्र
ददृशुः प्रसन्नसलिलायुताः ३० काञ्चनानि विमानानि राजतानि तथैव
च । तपनीयगवाक्षाणि मुक्ताजालावृतानि च ३१ हैमराजतभौमानि वैदूर्य-
मणिमन्ति च । ददृशुस्तत्र हरयो गृहमुख्यानि सर्वशः ३२ पुष्पितान्फलिनो
वृक्षान्प्रवालमणिसंनिभान् । काञ्चनभ्रमरांश्चैव मधूनि च समन्ततः ३३
मणिकाञ्चनचित्राणि शयनान्यासनानि च । विविधानि विशालानि
ददृशुस्ते समन्ततः ३४ हैमराजतकांस्यानां भाजनानां च राशयः । अगु-
रूणां च दिव्यानां चन्दनानां च संचयान् ३५ शुचीन्यभ्यवहाराणि
मूलानि च फलानि च । महार्हाणि च यानानि मधूनि रसवन्ति च ३६
दिव्यानामम्बराणां च महार्हाणां च संचयान् । कम्बलानां च चित्राणा-
मजिनानां च संचयान् ३७ तत्र तत्र विचिन्वन्तो बिले तत्र महाप्रभाः ।
ददृशुर्वानराः शूराः स्त्रियं कांचिददूरतः ३८ तां च ते ददृशुस्तत्र चीर-

आणि वैदूर्य ह्या रत्नांप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे, पक्षी आणि बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असे मोठे मोठे सुवर्णवृक्ष ह्यांनीं जीं व्याप्त आहेत २९, सुवर्णमय मत्स्यांनीं आणि त्याचप्रमाणें मोठमोठ्या कमलपुष्पांनीं जीं भरलेलीं आहेत आणि निर्मल उदकानें जीं युक्त आहेत अशीं कमलयुक्त सरोवरें त्यांनीं अवलोकन केलीं ३०. सुवर्णाच्या खिडक्यांनीं युक्त आणि मोत्यांच्या सरांनीं व्याप्त अशीं सोन्याचीं व रुप्याचीं विमानें त्यांच्या दृष्टीं पडलीं ३१. सुवर्ण, रजत आणि मृत्तिका ह्यांच्या योगानें तयार करून वैदूर्य मण्यांनीं भूषित केलेलीं श्रेष्ठ गृहें सर्व बाजूंनीं त्या वानरांच्या अवलोकनांत येऊं लागलीं ३२. फलांनीं व पुष्पांनीं भरलेले, सुवर्णवर्ण भ्रमरांनीं गजबजलेले आणि कांतीनें पोंवळ्याप्रमाणें असलेले वृक्ष, मध ३३, रत्नें व सुवर्ण ह्यांच्या योगानें आश्चर्यकारक झालेलीं नानाप्रकारचीं मोठमोठीं आसनें व शय्याही त्यांनीं चोहोंकडे अवलोकन केलीं ३४. सुवर्ण, रौप्य व कांस्य ह्या धातूंच्या भांड्यांच्या राशी, दिव्य अगुरु आणि चंदन ह्यांचे ढीग ३५, पवित्र व भक्षण करण्यास योग्य अशीं मुळें व फळें, मोठीं मूल्यवान् पालखी वगैरे यानें, माधुर्ययुक्त मध ३६, मोठमोठ्या मूल्यवान् दिव्य वस्त्रांचे ढीग व अद्भुत ऊर्णावस्त्रांच्या आणि अजिनांच्या राशी हीं त्यांनीं अवलोकन केलीं ३७. पुढें ठिकठिकाणीं धुंडाळितां धुंडाळितां त्या महातेजस्वी शूर वानरांनीं बिवरामध्यें जवळच कोणी स्त्री अवलोकन केली ३८ आणि वल्कल व कृष्णाजिन परिधान केलेली व शुद्ध आहार करून तेजानें झळकत असलेली ती तपस्विनी

कृष्णाजिनाम्बराम् । तापसीं नियताहारां ज्वलन्तीमिव तेजसा ३९
विस्मिता हरयस्तत्र व्यवतिष्ठन्त सर्वशः । पप्रच्छ हनुमांस्तत्र कासि त्वं
कस्य वा बिलम् ४० ततो हनूमान्गिरिसंनिकाशः कृताञ्जलिस्तामभि-
वाद्य वृद्धाम् । पप्रच्छ का त्वं भवनं बिलं च रत्नानि चेमानि वदस्व
कस्य ४१ [२०३२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये
किष्किन्धाकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥ ५० ॥

इत्युक्त्वा हनुमांस्तत्र चीरकृष्णाजिनाम्बराम् । अब्रवीत्तां महाभागां
तापसीं धर्मचारिणीम् १ इदं प्रविष्टाः सहसा बिलं तिमिरसंवृतम् ।
क्षुत्पिपासापरिश्रान्ताः परिखिन्नाश्च सर्वशः २ महद्धरण्या विवरं प्रविष्टा
स्म पिपासिताः । इमांस्त्वेवंविधान्भावान्विविधानद्भुतोपमान् ३ दृष्ट्वा वयं
प्रव्यथिताः संभ्रान्ता नष्टचेतसः । कस्यैते काञ्चना वृक्षास्तरुणादित्यसंनिभाः ४
शुचीन्यभ्यवहाराणि मूलानि च फलानि च । काञ्चनानि विमानानि राज-
तानि गृहाणि च ५ तपनीयगवाक्षाणि मणिजालावृतानि च । पुष्पिताः
फलवन्तश्च पुण्याः सुरभिगन्धयः ६ इमे जाम्बूनदमयाः पादपाः कस्य

---

अवलोकन करितांक्षणीं ३९ ते वानर सर्वस्वीं विस्मयचकित होऊन उभे राहिले व हनूमान् " तूं कोण व हें विवर कोणाचें ? " ह्मणून तिला प्रश्न करूं लागला ४०. असो. ती स्त्री अवलोकन करितांक्षणीं शरीरानें पर्वतप्राय असलेल्या हनूमानानें हात जोडिले आणि अभिवंदन करून " तूं कोण व हें गृह, हीं रत्नें आणि हें विवर कोणाचें ?" असें त्यानें तिला विचारिलें ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ५० ॥

वल्कल व कृष्णाजिन परिधान केलेल्या त्या महाभाग्यवती धर्मचारिणी तपस्वी स्त्रीला ह्याप्रमाणें विचारिल्यानंतर हनूमान् तिला ह्मणाला १ " अंधकारानें व्याप्त झालेल्या विवरामध्यें आह्मी विचार न करितां प्रविष्ट झालों असून क्षुधेनें व्याकुल झाल्यामुळें सर्वप्रकारें खिन्न झालों आहोंत २. सारांश, तृषाक्रांत झाल्यामुळें आह्मी भूमीच्या ह्या प्रचंड विवरामध्यें प्रविष्ट झालों आहोंत आणि अशा रीतीनें ह्या नानाप्रकारच्या अद्भुत गोष्टी ३ पाहून आह्मी अगदीं गोंधळून गेलों आहों व व्याकुल झाल्यामुळें आह्मांला भानही राहिलेलें नाहीं. तेव्हां बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असलेले हे सुवर्णवृक्ष ४, पवित्र व भक्षण करण्यास योग्य अशीं मुळें व फळें, सोन्याचीं विमानें, सुवर्णाच्या खिडक्यांनीं युक्त व रत्नसमुदायांनीं व्याप्त असलेलीं रुप्याचीं घरें आणि पुष्पें, फलें व सुगंध ह्यांनीं युक्त असलेले हे पवित्र

तेजसा । काञ्चनानि च पद्मानि जातानि विमले जले ७ कथं मत्स्याश्च सौवर्णा दृश्यन्ते सह कच्छपैः । आत्मनस्त्वनुभावाद्वा कस्य वै तत्तपोबलम् ८ अजानतां नः सर्वेषां सर्वमाख्यातुमर्हसि ९ एवमुक्ता हनुमता तापसी धर्मचारिणी । प्रत्युवाच हनूमन्तं सर्वभूतहिते रता १० मयो नाम महातेजा मायावी वानरर्षभ । तेनेदं निर्मितं सर्वं मायया काञ्चनं वनम् ११ पुरा दानवमुख्यानां विश्वकर्मा बभूव ह । येनेदं काञ्चनं दिव्यं निर्मितं भवनोत्तमम् १२ स तु वर्षसहस्राणि तपस्तप्त्वा महद्वने । पितामहाद्वरं लेभे सर्वमौशनसं धनम् १३ विधाय सर्वं बलवान्सर्वकामेश्वरस्तदा । उवास सुखितः कालं कंचिदस्मिन्महावने १४ तमप्सरसि हेमायां सक्तं दानवपुङ्गवम् । विक्रम्यैवाशनिं गृह्य जघानेशः पुरंदरः १५ इदं च ब्रह्मणा दत्तं हेमायै वनमुत्तमम् । शाश्वतः कामभोगश्च गृहं चेदं हिरण्मयम् १६ दुहिता मेरुसावर्णेरहं तस्याः स्वयंप्रभा । इदं रक्षामि भवनं हेमाया वानरोत्तम १७ मम प्रियसखी हेमा नृत्तगीतविशारदा । तया

---

सुवर्णमय वृक्ष कोणाचे आहेत, निर्मल उदकामध्यें सुवर्णकमलें कोणाच्या प्रभावानें उत्पन्न झालीं आहेत ५, ६, ७ आणि सुवर्णमय कूर्म व मत्स्य कसे दृष्टीं पडत आहेत हें तूं आह्मांला सांग. तात्पर्य, हें तुझ्या स्वतःच्याच प्रभावामुळें झालेलें आहे किंवा हें दुसऱ्या कोणाच्या तपाचें बल आहे ८ हें कांहींच माहीत नसलेल्या आह्मा सर्वांना तूं सर्व कथन कर " ९. ह्याप्रमाणें हनूमान् तिला ह्मणाला असतां प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर असलेली ती धर्मचारिणी तपस्विनी स्त्री त्याला ह्मणाली १० " हे वानरश्रेष्ठा, मय ह्मणून एक महातेजस्वी मायावी आहे आणि त्यानें मायेच्या योगानें हें सर्व सौवर्ण वन निर्माण केलें आहे ११. पूर्वी श्रेष्ठ श्रेष्ठ दानवांचा तो शिल्पी होता हें प्रसिद्ध आहे आणि त्यानेंच दिव्य व सर्वोत्कृष्ट असें हें सुवर्णमय वसतिस्थान तयार केलें आहे १२. मोठ्या अरण्यामध्यें हजारों वर्षें तपश्चर्या केल्यावर ब्रह्मदेवापासून त्याला वर प्राप्त झाला आणि त्यामुळें उशनमहर्षींनीं ग्रथित केलेलें सर्व शिल्पशास्त्र त्याला मिळालें १३. हवा तो भोग्य पदार्थ उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असलेला तो बलाढ्य मय हें सर्व निर्माण करून त्या महावनामध्यें कांहीं वेळपर्यंत सुखानें राहिला होता १४. तो दानवश्रेष्ठ मय हेमानामक अप्सरेचे ठिकाणीं लंपट झाला असल्यामुळें देवराज इंद्रानें वज्र हातांत घेऊन युद्धामध्येंच त्याचा वध केला १५ आणि ह्याप्रमाणें त्याचा वध झाल्यावर ब्रह्मदेवानें हें उत्कृष्ट वन अक्षय्य भोग्य पदार्थ आणि हें सुवर्णमय वसतिस्थान त्या हेमानामक अप्सरेला दिलें १६. असो. हे वानरश्रेष्ठा, मी मेरुसाव-

दत्तवरा चास्मि रक्षामि भवनं महत् १८ किं कार्यं कस्य वा हेतोः कान्ताराणि प्रपद्यथ । कथं चेदं वनं दुर्गं युष्माभिरुपलक्षितम् १९ शुचीन्यभ्यवहाराणि मूलानि च फलानि च । भुक्त्वा पीत्वा च पानीयं सर्वं मे वक्तुमर्हसि २० [ २०५२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

अथ तानब्रवीत्सर्वान्विश्रान्तान्हरियूथपान् । इदं वचनमेकाग्रा तापसी धर्मचारिणी १ वानरा यदि वः खेदः प्रनष्टः फलभक्षणात् । यदि चैतन्मया श्राव्यं श्रोतुमिच्छामि तां कथाम् २ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः । आर्जवेन यथातत्त्वमाख्यातुमुपचक्रमे ३ राजा सर्वस्य लोकस्य महेन्द्रवरुणोपमः । रामो दाशरथिः श्रीमान्प्रविष्टो दण्डकावनम् ४ लक्ष्मणेन सह भ्रात्रा वैदेह्या सह भार्यया । तस्य भार्या जनस्थानाद्रावणेन हृता बलात् ५ वीरस्तस्य सखा राज्ञः सुग्रीवो नाम वानरः । राजा वानरमुख्यानां येन प्रस्थापिता वयम् ६ अगस्त्यचरितामाशां

---

र्णीची स्वयंप्रभा कन्या आहें आणि हें त्या हेमा अप्सरेचें वसतिस्थान सभाळीत आहें १७. नृत्य आणि गायन ह्यांमध्यें निष्णात असलेली ती हेमा माझी प्रियसखी आहे आणि ( रक्षणसामर्थ्याविषयीं ) तिनें मला वर दिला असल्यामुळें मी ह्या प्रचंड गृहाचें रक्षण करीत आहें १८. असो. भक्षण करण्यास योग्य अशीं पवित्र मुळें व फळें भक्षण करून जलप्राशन केल्यावर तुमचें काय कार्य आहे, तुह्मी कशाकरितां अरण्यांतून हिंडत आहां आणि हें दुर्गम वन तुमच्या कसें दृष्टीं पडलें हें सर्व तुह्मी मला कथन करा १९,२०." ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

( फळें व मुळें भक्षण केल्या )नंतर श्रमपरिहार झालेल्या त्या सर्व वानरश्रेष्ठांना ती स्वकार्यदक्ष धर्मचारिणी तपस्विनी ह्मणाली १ "हे वानरहो, फलभक्षणानें तुमचा थकवा जर गेला असेल आणि हें जर मीं तुह्माला विचारिलेलें ऐकण्यासारिखें असेल तर तुमची सर्व हकीकत श्रवण करण्याची माझी इच्छा आहे" २. हें तिचें भाषण श्रवण करून वायुपुत्र हनूमान् सरळपणानें तिला इत्थंभूत वर्तमान सांगूं लागला ३. ( तो ह्मणाला ) "इंद्र व वरुण ह्यांच्याच उपमेस पात्र असलेला सर्व लोकांचा राजा दशरथपुत्र वैभवशाली राम, भार्या सीता आणि भ्राता लक्ष्मण ह्यांसहवर्तमान, दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला असतां त्याची भार्या रावणानें जनस्थानांतून बलात्कारानें हरण करून नेली ४,५. वानरश्रेष्ठांचा राजा जो सुग्रीवनामक वीर वानर तो

दक्षिणां यमरक्षिताम् । सहैभिर्वानरैर्मुख्यैरङ्गदप्रमुखैर्वयम् ७ रावणं सहिताः सर्वे राक्षसं कामरूपिणम् । सीतया सह वैदेह्या मार्गध्वमिति चोदिताः ८ विचित्य तु वनं सर्वं समुद्रं दक्षिणां दिशम् । वयं बुभुक्षिताः सर्वे वृक्षमूलमुपाश्रिताः ९ विवर्णवदनाः सर्वे सर्वे ध्यानपरायणाः । नाधिगच्छामहे पारं मग्नाश्चिन्तामहार्णवे १० चारयन्तस्ततश्चक्षुर्दृष्टवन्तो महद्बिलम् । लतापादपसंपन्नं तिमिरेण समावृतम् ११ अस्माद्धंसा जलक्लिन्नाः पक्षैः सलिलरेणुभिः । कुरराः सारसाश्चैव निष्पतन्ति पतत्रिणः ॥ साध्वत्र प्रविशामेति मया तूक्ताः प्लवंगमाः १२ तेषामपि हि सर्वेषामनुमानमुपागतम् । अस्मिन्निपतिताः सर्वेऽप्यथ कार्यत्वरान्विताः १३ ततो गाढं निपतिता गृह्य हस्तैः परस्परम् । इदं प्रविष्टाः सहसा बिलं तिमिरसंवृतम् १४ एतन्नः कार्यमेतेन कृत्येन वयमागताः । त्वां चैवोपगताः सर्वे परिद्यूना बुभुक्षिताः १५ आतिथ्यधर्मदत्तानि

---

त्या राजाचा सखा असून त्यानें आह्माला पाठविलें आहे ६ आणि ह्मणूनच अगस्त्यमुनींनीं स्वीकारिलेल्या व यमानें रक्षण केलेल्या दाक्षिण दिशेस ह्या अंगदप्रभृति श्रेष्ठ वानरांसहवर्तमान आह्मी आलों आहोंत ७. सारांश, सर्वजण मिळून यथेष्ट रूप धारण करणाऱ्या रावण राक्षसाचा आणि विदेहराजकन्या सीतेचा तुह्मी शोध लावा अशी त्याची आह्माला आज्ञा झाली आहे ८. त्याप्रमाणें सर्व वनें व समुद्र ह्यांसहवर्तमान दक्षिण दिशा धुंडाळिल्यावर आह्मी सर्व बुभुक्षित होऊन एका वृक्षाखालीं बसलों होतों ९. आह्मां सर्वांचीं मुखें निस्तेज झालीं होतीं आणि चिंतारूप महासागरामध्यें आह्मी मग्न झालों असून ह्या महासागरांतून पार कसें पडावें हें कांहीं सुचत नसल्यामुळें आह्मी सर्वजण विचार करीत बसलों होतों १०; तों इतक्यांत इकडे तिकडे दृष्टि फेकितां फेकितां अंधकारानें व्याप्त आणि लतावृक्षांनीं गजबजलेलें मोठें विवर आह्मीं अवलोकन केलें ११. ह्या विवरांतून जलबिंदूंनीं युक्त असे ज्यांचे पंख झालले आहेत आणि ज्यांचें इतर शरीरही जलानें आर्द्र झालेलें आहे असे हंस, कुरर व सारसपक्षी बाहेर पडले. तेव्हां " येथें आपण खुशाल प्रवेश करावा. " असें मीं वानरांना सांगितलें असतां १२ ( उदकाच्या संभवाविषयीं ) हें माझें अनुमान त्यांनाही सर्वांना पटलें आणि कार्याची त्वरा असल्यामुळें ह्याविषयीं सर्वांचें एक मत झालें १३. नंतर एकमेकांचे हात घट्ट धरून गुहेमध्यें आल्यावर अंधकारानें व्याप्त झालेल्या त्या विवरामध्यें आह्मीं एकदम प्रविष्ट झालों १४. सारांश, सीतेचा शोध लावणें हें आमचें कार्य आहे आणि ह्याच कार्याकरितां आह्मी अरण्यामध्यें आलों आहोंत. आह्मी

मूलानि च फलानि च । अस्माभिरुपयुक्तानि बुभुक्षापरिपीडितैः १६
यत्त्वया रक्षिताः सर्वे म्रियमाणा बुभुक्षया । ब्रूहि प्रत्युपकारार्थं किं ते
कुर्वन्तु वानराः १७ एवमुक्ता तु सर्वज्ञा वानरैस्तैः स्वयंप्रभा । प्रत्यु-
वाच ततः सर्वानिदं वानरयूथपान् १८ सर्वेषां परितुष्टास्मि वानराणां
तरस्विनाम् । चरन्त्या मम धर्मेण न कार्यमिह केनचित् १९ एवमुक्तः
शुभं वाक्यं तापस्या धर्मसंहितम् । उवाच हनुमान्वाक्यं तामनिन्दित-
लोचनाम् २० शरणं त्वां प्रपन्नाः स्मः सर्वे वै धर्मचारिणीम् । यः
कृतः समयोस्माकं सुग्रीवेण महात्मना २१ स तु कालो व्यतिक्रान्तो
बिले च परिवर्तताम् । सा त्वमस्माद्बिलादस्मानुत्तारयितुमर्हसि २२
तस्मात्सुग्रीववचनादतिक्रान्तान्गतायुषः । त्रातुमर्हसि नः सर्वान्सुग्रीवभ-
यशङ्कितान् २३ महच्च कार्यमस्माभिः कर्तव्यं धर्मचारिणि । तच्चापि न
कृतं कार्यमस्माभिरिह वासिभिः २४ एवमुक्ता हनुमता तापसी वाक्य-
मब्रवीत् । जीवता दुष्करं मन्ये प्रविष्टेन निवर्तितुम् २५ तपसः सुप्रभा-

---

सर्वजण बुभुक्षित व खिन्न होऊन तुझ्या समीप आलों आहांत ह्याचें तरी कारण हेंच १५. आह्मी अतिथि असें समजून तूं आह्मांला दिलेलीं मुळें व फळें क्षुधेनें व्याकुल झाल्यामुळें आह्मीं भक्षण केलीं १६. तस्मात्, क्षुधेनें आह्मी मृत्युपंथाला लागलों असतांना ज्याअर्थी तूं सर्व वानरांचें रक्षण केलें आहेस त्याअर्थी ह्या उपकाराची फेड होण्याकरितां वानरांनीं तुझें काय काम करावें हें तूं सांग" १७. ह्याप्रमाणें ( हनुमानाला पुढें करून ) त्या सर्व वानरांनीं तिला सांगितलें असतां ती सर्वज्ञ स्वयंप्रभा त्या सर्व वानरसेनाधिपतींना ह्मणाली १८ "सर्व बलाढ्य वानरांवर मी प्रसन्न झालें आहें. धर्मानें वागत असलेल्या मला कोणाच्याही हातून कसलेंही कार्य करून घेण्याचें उरलें नाहीं" १९. ह्याप्रमाणें त्या तपस्विनीनें धर्माला अनुसरून असें शुभ भाषण हनुमानाशीं केलें असतां मनोहर नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या तपस्विनीला हनुमान् ह्मणाला २० "आह्मी सर्व तुज धर्मचारिणीला शरण आलों आहों. महात्म्या सुग्रीवानें जी आह्मांला मुदत दिली होती २१ ती विवरामध्यें असतांनाच संपून गेली. ह्यास्तव, तूं ह्या विवरांतून आह्मांला सुखरूप पार पाड २२. सुग्रीवाच्या आज्ञेबाहेर गेलेल्या आणि ह्मणूनच आयुष्याचे दिवस भरलेल्या आह्मा सर्वांचें तूं रक्षण कर. सुग्रीवाची आह्मांला भीति बसून गेली आहे २३. हे धर्मचारिणि, आह्मांला मोठें कार्य कर्तव्य आहे. परंतु, ह्या विवरामध्यें वास्तव्य झाल्यामुळें आमचे हातून तें कार्य झालें नाहीं" २४. ह्याप्रमाणें हनुमानानें

वेण नियमोपार्जितेन च । सर्वानेव बिलादस्मात्तारयिष्यामि वानरान् २६
निमीलयत चक्षूंषि सर्वे वानरपुंगवाः । न हि निष्क्रमितुं शक्यमनिमीलि-
तलोचनैः २७ ततो निमीलिताः सर्वे सुकुमाराङ्गुलैः करैः । सहसा
पिदधुर्दृष्टिं हृष्टा गमनकाङ्क्षया २८ वानरास्तु महात्मानो हस्तरुद्धमुखा-
स्तदा । निमेषान्तरमात्रेण बिलादुत्तारितास्तया २९ उवाच सर्वांस्तां-
स्तत्र तापसी धर्मचारिणी । निःसृतान्विषमात्तस्मात्समाश्वास्येदमब्र-
वीत् ३० एष विन्ध्यो गिरिः श्रीमान्नानाद्रुमलतायुतः । एष प्रस्रवणः
शैलः सागरोयं महोदधिः ३१ स्वस्ति वोस्तु गमिष्यामि भवनं वानर-
र्षभाः । इत्युक्त्वा तद्बिलं श्रीमत्प्रविवेश स्वयंप्रभा ३२ [ २०८४ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे
द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

ततस्ते ददृशुर्घोरं सागरं वरुणालयम् । अपारमभिगर्जन्तं घोरैरूर्मि-

---

प्रार्थना केली असतां ती तपस्विनी ह्मणाली " ह्या विवरामध्यें प्रविष्ट झालेला प्राणी जिवंत बाहेर पडणें फार कठीण आहे असें मला वाटतें २५. तथापि, नियमांच्या योगानें संपादन केलेला जो तपाचा महाप्रभाव त्याच्या योगानें मी तुह्मां सर्व वानरांना ह्या विवरांतून पार पाडून नेईन २६. हे वानरश्रेष्ठहो, तुह्मी सर्वजण डोळे मिटा. कारण, डोळे मिटल्यावांचून ह्या विवरांतून पार पडणें शक्य नाहीं." २७. ह्याप्रमाणें तिनें सांगितल्यावर बाहेर जाण्याची उत्कंठा असल्यामुळें त्या सर्व वानरांनीं आनंदित होऊन डोळे मिटले आणि सुकुमार बोटांनीं युक्त असलेल्या हातांनीं ते भरभर गच्च आवळूनही धरिले २८. ह्याप्रमाणें महात्म्या वानरांनीं हातांच्या योगानें आपआपलीं तोंडें झांकिलीं असतां त्या तपस्विनी स्त्रीनें डोळ्याचें पातें लवलें नाहीं तोंच त्या विवरांतून त्यांना पार पाडिलें २९ आणि विवराच्या बाहेर आल्यावर ती धर्मचारिणी तपस्विनी त्या भयंकर विवरांतून पार पडलेल्या त्या सर्व वानरांना धीर देऊन ह्मणाली ३० " नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं सुशोभित व सौंदर्यानें युक्त असा हा विंध्यपर्वत आहे, हा प्रस्रवण पर्वत आहे आणि विपुल उदकाचें भांडार असलेला हा सागर आहे ३१. हे वानरश्रेष्ठहो, तुमचें कल्याण असो; मी आतां स्वस्थानीं परत जातें." असें ह्मणून ती स्वयंप्रभा त्या भव्य विवरामध्यें प्रविष्ट झाली ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५२ ॥

तदनंतर भयंकर लाटांनीं व्याप्त होऊन गर्जना करीत असलेला असा जो अपार

भिराकुलम् १ मयस्य मायाविहितं गिरिदुर्गं विचिन्वताम् । तेषां मासो व्यतिक्रान्तो यो राज्ञा समयः कृतः २ विन्ध्यस्य तु गिरेः पादे संप्रपुष्पितपादपे । उपविश्य महात्मानश्चिन्तामापेदिरे तदा ३ ततः पुष्पातिभाराग्राल्लँताशतसमावृतान् । द्रुमान्वासन्तिकान्दृष्ट्वा बभूवुर्भयशङ्किताः ४ ते वसन्तमनुप्राप्तं प्रतिवेद्य परस्परम् । नष्टसंदेशकालार्था निपेतुर्धरणीतले ५ ततस्तान्कपिवृद्धांश्च शिष्टांश्चैव वनौकसः । वाचा मधुरयाभाष्य यथावदनुमान्य च ६ स तु सिंहवृषस्कन्धः पीनायतभुजः कपिः । युवराजो महाप्राज्ञ अङ्गदो वाक्यमब्रवीत् ७ शासनात्कपिराजस्य वयं सर्वे विनिर्गताः । मासः पूर्णो बिलस्थानां हरयः किं न बुध्यत ८ वयमाश्वयुजे मासि कालसंख्याव्यवस्थिताः । प्रस्थिताः सोपि चातीतः किमतः कार्यमुत्तरम् ९ भवन्तः प्रत्ययं प्राप्तानीतिमार्गविशारदाः । हितेष्वभिरता भर्तुर्निसृष्टाः सर्वकर्मसु १० कर्मस्वप्रतिमाः सर्वे दिक्षु विश्रुतपौ-

---

व घोर वरुणनिवासस्थानरूप सागर तो त्यांनीं अवलोकन केला १. मयासुरानें मायेच्या योगानें निर्माण केलेलें तें ऋक्षबिलसंज्ञक पर्वतसंबंधीं गहन स्थान धुंडाळण्यामध्येंच राजा सुग्रीवानें नेमून दिलेला त्यांचा महिना निघून गेला २. तव्हां प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेल्या विंध्याद्रीच्या पायथ्याशीं बसून ते महात्मे वानर चिंताक्रांत झाले ३. नंतर पुष्पांच्या अतिशय भारांनीं युक्त अशीं ज्यांचीं अग्रें झालेलीं आहेत आणि शेंकडों लतांनीं जे व्याप्त झालेले आहेत असे वसंतऋतूच्या सुमाराला प्रफुल्लित होणारे वृक्ष अवलोकन केल्यावर तर ते भयभीत झाले ४ आणि वसंतसमय जवळ आला असें एकमेकाला सांगून वेळेवर होण्याला योग्य असलेलें राजकार्य शेंवटास न गेल्यामुळें ते भूतलावर निश्चेष्ट पडले ५. तव्हां त्यांतील वृद्ध वानरांना आणि इतरांनाही मधुर वाणीनें मानमान्यतापूर्वक हांक मारून ६ सिंह अथवा वृष ह्यांच्यासारख्या स्कंधांनीं आणि पुष्ट व दीर्घ हातांनीं युक्त असलेला महाबुद्धिमान् युवराज अंगद ह्मणाला ७ " वानरराजाच्या आज्ञेवरून आपण सर्व बाहेर पडलों; परंतु, आपण विवरामध्यें असतांनाच मुदतीचा महिना पूर्ण होऊन गेला, हें, हे वानरहो, तुमच्या गांवीं देखील नाहीं कीं काय ? ८. आश्विन महिना संपल्यावर जी मुदत ठरवून आपण बाहेर पडलों ती ही मुदत निघून गेली. वास्तव आतां पुढें काय करावें ? ९. राजाची आज्ञा समजून घेऊन नीतिमार्गामध्यें निष्णात व स्वामीला हितावह असें कोणतेंही कृत्य करण्याविषयीं दक्ष असलेल्या तुह्माला राजानें पाठविलें १० व चोहोंकडे पराक्रमासंबंधानें प्रख्यात आणि अप्रतिम

रुपाः । मां पुरस्कृत्य निर्याताः पिङ्गाक्षप्रतिचोदिताः ११ इदानीमकृता-
र्थानां मर्तव्यं नात्र संशयः । हरिराजस्य संदेशमकृत्वा कः सुखी भवेत् १२
अस्मिन्नतीते काले तु सुग्रीवेण कृते स्वयम् । प्रायोपवेशनं युक्तं सर्वेषां
च वनौकसाम् १३ तीक्ष्णः प्रकृत्या सुग्रीवः स्वामिभावे व्यवस्थितः ।
न क्षमिष्यति नः सर्वानपराधकृतो गतान् १४ अप्रवृत्तौ च सीतायाः
पापमेव करिष्यति १५ तस्मात्क्षममिहाद्यैव गन्तुं प्रायोपवेशनम् । त्यक्त्वा
पुत्रांश्च दारांश्च धनानि च गृहाणि च १६ ध्रुवं नो हिंसते राजा सर्वा-
न्प्रतिगतानितः । वधेनाप्रतिरूपेण श्रेयान्मृत्युरिहैव नः १७ न चाहं यौवरा-
ज्येन सुग्रीवेणाभिषेचितः । नरेन्द्रेणाभिषिक्तोऽस्मि रामेणाक्लिष्टकर्मणा १८
स पूर्वं बद्धवैरो मां राजा दृष्ट्वा व्यतिक्रमम् । घातयिष्यति
दण्डेन तीक्ष्णेन कृतनिश्चयः १९ किं मे सुहृद्भिर्व्यसनं पश्यद्भिर्जी-
वितान्तरे । इहैव प्रायमासिष्ये पुण्ये सागररोधसि २० एतच्छ्रुत्वा

---

कर्म करणारे असे तुह्मी सर्वही सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें मला पुढें घालून बाहेरही निघालां ११. परंतु, सांप्रत कार्यसिद्धि न झालेल्या आपणांला निःसंशय मरणच अवश्य आहे; कारण, वानरराजाच्या आज्ञेप्रमाणें न वागून कोणाला बरें सुख होणार आहे ? १२. सुग्रीवानें स्वतः ठरविलेली ही मुदत जर निघून गेली आहे तर सर्व वानरांनीं अन्नपाणी न घेतां प्राणत्याग करणेंच योग्य आहे १३. सुग्रीव हा जातीचाच क्रूर आहे व त्यांतूनही तो सांप्रत राजा झालेला आहे. ह्यास्तव, अपराध करून आपण त्याच्यापुढें गेलों असतां तो आपणांपैकीं कोणालाही क्षमा करणार नाहीं १४; सीतेची बातमी न लागल्यामुळें तो आपला घातच करील १५. तस्मात्, पुत्र, भार्या, द्रव्य आणि गृह ह्यांची आशा सोडून येथें आजच्या आजच प्राणत्यागाकरितां अन्नपान सोडून बसणें बरें १६. येथून आपण गेलों असतां राजा सुग्रीव अनुपम रीतीनें आपला निःसंशय वध करील. ह्यास्तव, येथेंच मृत्यु येणें आपणांला श्रेयस्कर आहे १७. सुग्रीवानें मला यौवराज्याचा अभिषेकही केलेला नाहीं. महापराक्रमी रामराजानें मला अभिषेक केला आहे १८. तस्मात्, पूर्वीपासूनच माझ्याशीं वैर बांधून असलेला राजा सुग्रीव आज्ञेचें उल्लंघन माझ्या हातून झालें आहे असें अवलोकन करितांक्षणीं मनाचा पक्का निश्चय करून भयंकर शासनानें माझा घात करील १९; ह्यास्तव, राजाज्ञेमुळें जीव जाण्याचा प्रसंग येऊन ठेपला असतां माझें संकट अवलोकन करणाऱ्या सुहृदांशीं तरी मला काय कर्तव्य आहे ? तस्मात्, येथेंच मी पवित्र अशा समुद्रतीरीं प्राणत्यागाकरितां अन्नपाणी सोडून बसतों " २०. हें युवराज राजकुमार

कुमारेण युवराजेन भाषितम् । सर्वे ते वानरश्रेष्ठाः करुणं वाक्यमब्रुवन् २१ तीक्ष्णः प्रकृत्या सुग्रीवः प्रियारक्तश्च राघवः । समीक्ष्याकृतकार्यांस्तु तस्मिंश्च समये गते २२ अदृष्टायां च वैदेह्यां दृष्ट्वा चैव समागतान् । राघवप्रियकामाय घातयिष्यत्यसंशयम् २३ न क्षमं चापराद्धानां गमनं स्वामिपार्श्वतः । प्रधानभूताश्च वयं सुग्रीवस्य समागताः २४ इहैव सीतामन्वीक्ष्य प्रवृत्तिमुपलभ्य वा । नो चेद्गच्छाम तं वीरं गमिष्यामो यमक्षयम् २५ प्लवंगमानां तु भयार्दितानां श्रुत्वा वचस्तार इदं बभाषे । अलं विषादेन बिलं प्रविश्य वसाम सर्वे यदि रोचते वः २६ इदं हि मायाविहितं सुदुर्गमं प्रभूतपुष्पोदकभोज्यपेयम् । इहास्ति नो नैव भयं पुरंदरान्न राघवाद्वानरराजतोपि वा २७ श्रुत्वाङ्गदस्यापि वचोनुकूलमूचुश्च सर्वे हरयः प्रतीताः । यथा न हन्येम तथा विधानमसक्तमद्यैव विधीयतां नः २८ [ २११२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे

---

अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर ते सर्व वानरश्रेष्ठ करुण स्वरानें त्याला ह्मणाले २१ "सुग्रीव जातीचाच उग्र असून राम आपल्या प्रियेविषयीं अनुरक्त आहे. ह्यास्तव, ती मुदत टळून गेली असूनही सीतेचा पत्ता न लावितां परत गेलेल्या आपणांला अवलोकन करितांक्षणीं आपल्या हातून कार्य झालें नाहीं हें लक्ष्यांत आणून रामाचें प्रिय करण्याकरितां तो निःसंशय आपला वध करील २२,२३. तस्मात्, हातून अपराध झालेल्यांनीं मालकाच्या संनिध जाणें योग्य नव्हे आणि त्यांतूनही येथें आलेले आपण सुग्रीवाचे मुख्य सेवक पडलों २४. ह्यास्तव, येथेंच सीतेला अवलोकन करून अथवा तिची बातमी तरी काढून आपण त्या वीराकडे परत जाऊं आणि असें जर न झालें तर येथेंच यमसदनाच्या मार्गाला लागूं" २५. भयभीत झालेल्या वानरांचें हें भाषण श्रवण करून तार ह्मणाला "आतां खेद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुह्मांला रुचत असेल तर स्वयंप्रभेच्या विवरामध्यें जाऊन आपण वास्तव्य करूं २६. कारण, मायेच्या योगानें निर्माण केलेल्या विवरामध्यें पुष्पें, उदक आणि भोज्य व पेय पदार्थ ह्यांची समृद्धि आहे आणि त्या विवरामध्यें दुसऱ्याचा प्रवेश होणेंही अत्यंत कठिण आहे. ह्याकरितां, आपण त्या विवरांत राहिलों ह्मणजे आपणांला इंद्रापासून, रामापासून अथवा वानरराज सुग्रीवापासून मुळींच भय नाहीं २७." ह्याप्रमाणें अंगदाचें व विशेषतः ताराचें अनुकूल भाषण श्रवण केल्यावर सर्व वानरांना कांहींसा धीर आला आणि ते सर्वही त्याला ह्मणाले "ज्या रीतीनें आपला वध न होईल अशी कांहीं तरी आपणांसंबंधानें तजवीज विलंब न होतां आजच्या आजच

वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥ ५३ ॥

तथा ब्रुवति तारे तु ताराधिपतिवर्चसि । अथ मेने हृतं राज्यं हनूमानङ्गदेन तत् १ बुद्ध्या ह्यष्टाङ्गया युक्तं चतुर्बलसमन्वितम् । चतुर्दशगुणं मेने हनूमान्वालिनः सुतम् २ आपूर्यमाणं शश्वच्च तेजोबलपराक्रमैः । शशिनं शुक्लपक्षादौ वर्धमानमिव श्रिया ३ बृहस्पतिसमं बुद्ध्या विक्रमे सदृशं पितुः । शुश्रूषमाणं तारस्य शुक्रस्येव पुरंदरम् ४ भर्तुरर्थे परिश्रान्तं सर्वशास्त्रविशारदः । अभिसंधातुमारेभे हनूमानङ्गदं ततः ५ स चतुर्णामुपायानां द्वितीयमुपवर्णयन् । भेदयामास तान्सर्वान्वानरान्वाक्यसंपदा ६ तेषु सर्वेषु भिन्नेषु ततोऽभीषयदङ्गदम् । भीषणैर्विविधैर्वाक्यैः कोपोपायसमन्वितैः ७ त्वं समर्थतरः पित्रा युद्धे तारेय वै ध्रुवम् ।

होऊं द्या " २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

चंद्राप्रमाणें तेजस्वी असलेला तार त्याप्रमाणें बोलूं लागला असतां अंगदाला राज्य प्राप्त झालें अशी हनूमानाला खात्रीच वाटूं लागली १. वालिपुत्र अंगद ( शुश्रूषा, श्रवण, ग्रहण, धारण, ऊह, अपोह, अर्थज्ञान आणि तत्त्वज्ञान ह्या ) आठ गुणांनीं युक्त असलेल्या बुद्धीनें, ( साम, दान, भेद व दंड ह्या ) चार उपायांनीं प्राप्त होणाऱ्या बलानें आणि ( देशकालज्ञता, दार्ढ्य, सर्वक्लेशसहिष्णुता, सर्वज्ञता, दक्षता, बल, गुप्त मसलत, मागल्या पुढल्या स्वतःच्या वर्तनाचा मेळ, शौर्य, भक्तिज्ञत्व, कृतज्ञता, शरण आलेल्याविषयीं दया, क्रोधराहित्य व स्थैर्य ह्या ) चवदा गुणांनीं युक्त आहे असें हनूमानाला वाटलें २. नंतर शुक्लपक्षाचे आरंभीं शोभेनें वृद्धिंगत होणाऱ्या चंद्राप्रमाणें तेज, बल व पराक्रम ह्यांच्या योगानें एकसारखा जो वृद्धिंगत होत आहे ३, बुद्धीनें बृहस्पतीची बरोबरी करणारा असून पराक्रमामध्यें जो पित्याची बरोबरी करणारा आहे, बृहस्पतीची शुश्रूषा करणाऱ्या इंद्राप्रमाणें जो ताराची शुश्रूषा करीत आहे ४ आणि स्वामिकार्याकरितां जो सर्वप्रकारें श्रांत झाला आहे अशा त्या अंगदाला हनुमानानें तारप्रभृतींपासून वेगळा काढण्याचा उपक्रम केला ५. प्रथमतः ( साम, दान, भेद व दंड ह्या ) चार उपायांपैकीं शेवटून दुसऱ्या उपायाची प्रशंसा करण्याकरितां त्या हनुमानानें आपल्या भाषणाच्या जोरावर त्या सर्व वानरांना विचारदृष्ट्या अंगदापासून फोडिलें ६ आणि ह्याप्रमाणें त्या सर्वांचें मत अंगदाहून भिन्न केल्यावर चौथा उपाय जो दंड त्यानें युक्त अशा नानाप्रकारच्या भीतिजनक वाक्यांनीं अंग-

दृढं धारयितुं शक्तः कपिराज्यं यथा पिता ८ नित्यमस्थिरचित्ता हि कपयो हरिपुंगव । नाज्ञाप्यं विषहिष्यन्ति पुत्रदारं विना त्वया ९ त्वां नैते ह्यनुरज्येयुः प्रत्यक्षं प्रवदामि ते । यथायं जाम्बवान्नीलः सुहोत्रश्च महाकपिः १० नह्यहं ते इमे सर्वे सामदानादिभिर्गुणैः । दण्डेन न त्वया शक्याः सुग्रीवादपकर्षितुम् ११ विगृह्यासनमप्याहुर्दुर्बलेन बलीयसा । आत्मरक्षाकरस्तस्मान्न विगृह्णीत दुर्बलः १२ यां चेमां मन्यसे धात्रीमेतद्बिलमिति श्रुतम् । एतल्लक्ष्मणबाणानामीषत्कार्यं विदारणम् १३ स्वल्पं हि कृतमिन्द्रेण क्षिपता ह्यशनिं पुरा । लक्ष्मणो निशितैर्बाणैर्भिन्द्यात्पत्रपुटं यथा १४ लक्ष्मणस्य च नाराचा बहवः सन्ति तद्विधाः । वज्राशनिसमस्पर्शा गिरीणामपि दारकाः १५ अवस्थानं यदैव त्वमासिष्यसि परंतप । तदैव

---

दाला तो भय उत्पन्न करूं लागला ७. ( तो ह्मणाला ) " हे तारापुत्रा अंगदा, तूं पित्याची बरोबरी करणारा असल्यामुळें युद्धामध्यें सुग्रीवापेक्षां निःसंशय जास्त आहेस आणि ह्मणूनच ( सर्व वानर जर तुझ्या अनुरोधानें वागूं लागतील तर ) पित्याप्रमाणें वानरांचें राज्य चांगल्या रीतीनें चालविण्यास तूं समर्थ आहेस ८. परंतु, हे वानरश्रेष्ठा, नेहमीं अस्थिर मनाचे असलेले वानर ( तूं स्वयंप्रभेच्या विवरांत जर राहूं लागलास तर ) बायकामुलांचा अवश्य वियोग होणार असल्यामुळें तुझी आज्ञा मान्य करणार नाहींत ९. सारांश, बायकामुलांना सोडून हे तुझ्या मर्जीप्रमाणें वागण्यास तयार होणार नाहींत हें मी तुला हवें तर अगदीं प्रत्यक्ष स्पष्ट करून सांगतों. उदाहरणार्थः—हा जांबवान्, नील, महाकपि सुहोत्र १० व मी ह्या सर्वांना साम, दान, भेद आणि दंड ह्यांपैकीं कोणत्याही उपायानें सुग्रीवापासून परावृत्त करण्यास तूं समर्थ नाहींस ११. दुर्बलाशीं वाद उपस्थित करून बलाढ्य पुरुषानें रहाणें शक्य आहे; परंतु, बलाढ्याशीं स्पर्धा करून दुर्बलाला राहतां येणें शक्य नाहीं असें ह्मणतात. ह्यास्तव, स्वतःच्या रक्षणाची इच्छा असणाऱ्या दुर्बल पुरुषानें बलाढ्याशीं स्पर्धा करूं नये १२. ह्या गुहेमध्यें रक्षण होईल असें जें तुझें ह्मणणें आहे हेंही बरोबर नाहीं. कारण, हें जें ऋक्षबिल निर्भय ह्मणून तूं तारवानरापासून ऐकिलें आहेस त्याचें विदारण करणें हें कार्य लक्ष्मणाच्या बाणासंबंधानें पाहूं गेलें असतां अगदीं क्षुल्लक आहे १३. पूर्वी इंद्रानें वज्र फेंकून त्या विवरामध्यें मयासुराचा वध केला त्यांत कांहींच नाहीं. लक्ष्मण आपल्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें हें विवरच पानाच्या द्रोणासारिखें फोडून टाकील १४. लक्ष्मणाशीं तशा प्रकारचे, ह्मणजे इंद्राच्या वज्रासारिखे अथवा मेघांतील विद्युल्लतेसारिखे, तीक्ष्ण व पर्वताचाही भेद करणारे,

हरयः सर्वे त्यक्ष्यन्ति कृतनिश्चयाः १६ स्मरन्तः पुत्रदाराणां नित्योद्विग्ना
बुभुक्षिताः । खेदिता दुःखशय्याभिस्त्वां करिष्यन्ति पृष्ठतः १७ स त्वं
हीनः सुहृद्भिश्च हितकामैश्च बन्धुभिः । तृणादपि भृशोद्विग्नः स्पन्दमाना-
द्भविष्यसि १८ अत्युग्रवेगा निशिता घोरा लक्ष्मणसायकाः । अपावृत्तं
जिघांसन्तो महावेगा दुरासदाः १९ अस्माभिस्तु गतं सार्धं विनीतवदु-
पस्थितम् । आनुपूर्व्यात्तु सुग्रीवो राज्ये त्वां स्थापयिष्यति २० धर्मराजः
पितृव्यस्ते प्रीतिकामो दृढव्रतः । शुचिः सत्यप्रतिज्ञश्च स त्वां जातु न
नाशयेत् २१ प्रियकामश्च ते मातुस्तदर्थं चास्य जीवितम् । तस्यापत्यं
च नास्त्यन्यत्तस्मादङ्गद गम्यताम् २२ [२१३४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुष्पञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

श्रुत्वा हनूमतो वाक्यं प्रश्रितं धर्मसंहितम् । स्वामिसत्कारसंयुक्तम-

---

नाराच बाण पुष्कळ आहेत १५. तस्मात्, हे शत्रुतापना, ज्या वेळेला तूं विवरामध्यें राहू लागशील त्याच वेळेला सर्व वानर पक्का निश्चय करून तुला सोडून जातील १६. बायकामुलांचा वियोग होऊन दुःखामध्यें रात्रींच्या रात्री काढण्याचा प्रसंग आला ह्मणजे ते त्रासून जातील आणि नेहमीं उद्विग्न झालेल्या त्या वानरांना बायकामुलांचें स्मरण झालें असतां ते उत्सुक होऊन तुझा त्याग करतीलच १७ आणि ह्याप्रमाणें सुहृद् आणि हित इच्छिणारे बंधु ह्यांचा तुला वियोग झाला ह्मणजे जरा कोठें काडी हालली तरी सुद्धां राम आला कीं काय अशी शंका येऊन तूं फारच भयभीत होशील १८. अत्यंत उग्र वेगानें व प्रचंड सामर्थ्यानें युक्त आणि सहन होण्यास अत्यंत अशक्य असे लक्ष्मणाचे घोर व तीक्ष्ण बाण रामकार्यापासून परावृत्त झालेल्या तुझा वध करतील १९. परंतु, आह्मांबरोबर येऊन जर तूं नम्रपणानें सुग्रीवापाशीं उभा राहिलास तर तुला तो रीतीप्रमाणें राज्यावर बसवील २०. तुझा चुलता तुझ्याशीं प्रेमानें वागण्याची इच्छा धरणारा आहे, स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणारा आहे, आचरणानें शुद्ध आहे, प्रतिज्ञा खरी करणारा आहे आणि धर्मानें चालणारा राजा आहे; तो तुझा घात कधींही करणार नाहीं. २१ इतकेंच नव्हे; परंतु, तुझ्या मातेच्या मर्जीप्रमाणें वागणारा असून त्याचें जीवितही तिची प्रीति संपादन करण्याकरितांच आहे आणि त्याला स्वतःला दुसरें अपत्य नाहीं. तस्मात्, हे अंगदा, तूं आमच्याबरोबर तिकडे चल २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

कृशो वाक्यमब्रवीत् १ स्थैर्यमात्ममनःशौचमानृशंस्यमथार्जवम् । विक्रमश्चैव धैर्यं च सुग्रीवे नोपपद्यते २ भ्रातुर्ज्येष्ठस्य यो भार्यां जीवतो महिषीं प्रियाम् । धर्मेण मातरं यस्तु स्वीकरोति जुगुप्सितः ३ कथं स धर्मं जानीते येन भ्रात्रा दुरात्मना । युद्धायाभिनियुक्तेन बिलस्य पिहितं मुखम् ४ सत्यात्पाणिगृहीतश्च कृतकर्मा महायशाः । विस्मृतो राघवो येन स कस्य सुकृतं स्मरेत् ५ लक्ष्मणस्य भयेनेह नाधर्मभयभीरुणा । आदिष्टा मार्गितुं सीता धर्मस्तस्मिन्कथं भवेत् ६ तस्मिन्पापे कृतघ्ने तु स्मृतिभिन्ने चलात्मनि । आर्यः को विश्वसेज्जातु तत्कुलीनो विशेषतः ७ राज्ये पुत्रं प्रतिष्ठाप्य सगुणो विगुणोपि वा । कथं शत्रुकुलीनं मां सुग्रीवो जीवयिष्यति ८ भिन्नमन्त्रोपराद्धश्च भिन्नशक्तिः कथं ह्यहम् । किष्किन्धां प्राप्य जीवेयमनाथ इव दुर्बलः ९ उपांशुदण्डेन हि मां बन्धनेनोप-

---

विनय, धर्म आणि राजाविषयीं आदरबुद्धि ह्यांनीं युक्त असें हनुमानाचें भाषण श्रवण करून अंगद ह्मणाला १ " स्थैर्य, स्वतःच्या मनाची शुद्धता, सज्जनता, सरळपणा, पराक्रम आणि धैर्य हीं सुग्रीवाचे ठिकाणीं असण्याचा संभवच नाहीं २. अहो; ज्येष्ठ भ्रात्याची प्रिय भार्या जी पट्टराणी ती धर्मानें माता असूनही तो जिवंत असतांनाच जो पापी स्वीकारितो ३ तो धर्माची पर्वा कोठून करणार ? युद्धाकरितां बिलामध्यें प्रवेश करणाऱ्या भ्रात्यानें बिलाच्या रक्षणार्थ नेमिलें असतांना ज्या दुष्टानें त्या विवराचें तोंड बंद केलें ४, इतकेंच नव्हे; परंतु, हातावर हात मारून प्रतिज्ञापूर्वक ज्यानें ह्याला मित्र ह्मटलें व ज्यानें ह्याचें कार्य केलें त्या महाकीर्तिमान् राघवालाच जो विसरला तो कोणाचा उपकार स्मरणार आहे ? ५. अधर्माचें भय यत्किंचित्‌ही न बाळगितां केवळ लक्ष्मणाच्या भीतीनेंच ज्यानें ह्या भूतलावर सीतेचा शोध लावण्याविषयीं आह्माला आज्ञा केली त्याचे ठिकाणीं धर्म असणार कसा ? ६. पापी, कृतघ्न, उपकाराचें स्मरणही नसलेला आणि चंचल अशा त्या सुग्रीवावर कोण सज्जन पुरुष आणि विशेषतः त्याच्या कुळांतील पुरुष कधीं विश्वास ठेवण्यास तयार होणार आहे ? ७. सुग्रीव सद्गुणी असो अथवा दुर्गुणी असो; तो कसाही असला तरी शत्रुकुलामध्यें उत्पन्न झालेल्या मला पुत्र ह्मणून राज्यावर बसवून तो कधींही जगविणार नाहीं ८. बिलामध्यें प्रवेश करण्यांत जर मी त्याच्या आज्ञेचा भंग केला आहे आणि ह्मणूनच जर मी त्याचा अपराधी बनलों आहें व हनुमानाच्या सांगण्याप्रमाणें सुग्रीवापेक्षां ज्याला वानरांचें साहाय्यही अगदीं कमी मिळणारें आहे असा तो मी अनाथ व दुर्बल किष्किंधानगरीमध्यें गेलों असतां जगणार कसा ? ९, सारांश,

पादयेत् । शठः क्रूरो नृशंसश्च सुग्रीवो राज्यकारणात् १० बन्धनाच्चा-
वसादान्मे श्रेयः प्रायोपवेशनम् । अनुजानन्तु मां सर्वे गृहं गच्छन्तु
वानराः ११ अहं वः प्रतिजानामि न गमिष्याम्यहं पुरीम् । इहैव प्राय-
मासिष्ये श्रेयो मरणमेव मे १२ अभिवादनपूर्वं तु राजा कुशलमेव च ।
अभिवादनपूर्वं तु राघवौ बलशालिनौ १३ वाच्यस्तातो यवीयान्मे
सुग्रीवो वानरेश्वरः । आरोग्यपूर्वं कुशलं वाच्या माता रुमा च मे ।
मातरं चैव मे तारामाश्वासयितुमर्हथ १४ प्रकृत्या प्रियपुत्रा सा सानु-
क्रोशा तपस्विनी । विनष्टमिह मां श्रुत्वा व्यक्तं हास्यति जीवितम् १५
एतावदुक्त्वा वचनं वृद्धांस्तानभिवाद्य च । विवेश चाङ्गदो भूमौ रुदन्द-
र्भेषु दुर्मुखः १६ तस्य संविशतस्तत्र रुदन्तो वानरर्षभाः । नयनेभ्यः
प्रमुमुचुरुष्णं वै वारि दुःखिताः १७ सुग्रीवं चैव निन्दन्तः प्रशशंसन्त
वालिनम् । परिवार्याङ्गदं सर्वे व्यवसन्प्रायमासितुम् १८ तद्वाक्यं वालि-

---

सुग्रीव हा शठ, क्रूर आणि दुष्ट असल्यामुळें राज्याकरितां बंधनरूप गुपचूप दंडानें माझी व्यवस्था लावून टाकील १०. तस्मात्, बंधनापासून जें मला दुःख होणार त्यापेक्षां अन्नपाणी सोडून देऊन येथें प्राणत्याग करणें फार चांगलें. ह्यास्तव, मला तसें करण्याची अनुज्ञा देऊन, हे वानरहो, तुह्मी सर्व आपआपल्या घरीं जा ११. मी तुह्मांला प्रतिज्ञेनें सांगतों कीं, मी किष्किंधा नगरीला परत जाणार नाहीं; मी येथेंच उपवास करीत बसणार. कारण, मरणच मला श्रेयस्कर आहे १२. असो. तुह्मी अभिवंदनपूर्वक राजाला माझें कुशल वर्तमान सांगा आणि बलाढ्य रामलक्ष्मणांनाही अभिवंदनपूर्वक तसेंच कळवा १३. माझा धाकटा चुलता जो वानराधिपति सुग्रीव त्याला तर विशेषतः आरोग्यपूर्वक माझें कुशल वर्तमान कळवून मला मातेसमान असलेली जी रुमा तिलाही तुह्मी तसेंच कळवा आणि माझी माता जी तारा तिचेंही तुह्मी सांत्वन करा १४. कारण, स्वभावतःच तिला मी प्रिय पुत्र असून ती बिचारी दयाळू असल्यामुळें माझा येथें नाश झाल्याचें ऐकितांक्षणीं निःसंशय जीविताचा त्याग करील १५. इतकें बोलून आणि त्या वृद्ध कपींना अभिवंदन करून दुर्मुखलेला अंगद दर्भांमध्यें शिरून भूमीवर पडला १६ व ह्याप्रमाणें तो तेथें पडला असतां श्रेष्ठ श्रेष्ठ वानर रडूं लागले आणि दुःखी होऊन नेत्रांतून उष्ण अश्रु ढाळूं लागले १७. सारांश, सर्वही वानर सुग्रीवाची निंदा सुरू करून वालीची प्रशंसा करूं लागले आणि अंगदाभोंवतीं जमून सर्वांनीं प्रायोपवेशनाविषयीं निश्चय केला १८. तात्पर्य, वालिपुत्र अंगदाचें तें भाषण श्रवण करितांक्षणीं सर्वही वानर-

पुत्रश्च विज्ञाय प्लवगर्षभाः। उपस्पृश्योदकं सर्वे प्राङ्मुखाः समुपाविशन् १९
दक्षिणाग्रेषु दर्भेषु उदक्तीरं समाश्रिताः। मुमूर्षवो हरिश्रेष्ठा एतत्क्षममिति
स्म ह २० रामस्य वनवासं च क्षयं दशरथस्य च। जनस्थानवधं चैव
वधं चैव जटायुषः २१ हरणं चैव वैदेह्या वालिनश्च वधं तथा। राम-
कोपं च वदतां हरीणां भयमागतम् २२ स संविशद्भिर्बहुभिर्महीधरो
महाद्रिकूटप्रतिमैः प्लवंगमैः। बभूव संनादितनिर्झरान्तरो भृशं नदद्भिर्जल-
दैरिवाम्बरम् २३ [२१५७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
किष्किन्धाकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥५५॥

उपविष्टास्तु ते सर्वे यस्मिन्प्रायं गिरिस्थले। हरयो गृध्रराजश्च तं
देशमुपचक्रमे १ संपातिर्नाम नाम्ना तु चिरजीवी विहंगमः। भ्राता जटा-
युषः श्रीमान्विख्यातबलपौरुषः २ कंदरादभिनिष्क्रम्य स विन्ध्यस्य महा-
गिरेः। उपविष्टान्हरीन्दृष्ट्वा हृष्टात्मा गिरमब्रवीत् ३ विधिः किल नरं
लोके विधानेनानुवर्तते। यथायं विहितो भक्ष्यश्चिरान्मह्यमुपागतः ४

---

श्रेष्ठ स्नान केले आणि पूर्वेकडे तोंड करून बसले १९ व दक्षिणेकडे अग्रें करून पसरलेल्या दर्भांवर उत्तर तीराचें अवलंबन करून व मरणाचा निश्चय करून बसलेले ते वानर हें अंगदाचेंच म्हणणें योग्य आहे असें म्हणूं लागले २०. कारण, रामाचा वनवास, दशरथाचा मृत्यु, जनस्थानांतील राक्षसांचा वध, जटायूचा वध २१, सीतेचा अप-हार, वालीचा वध आणि रामाचा कोप ह्यांसंबंधानें गोष्टी चालतां चालतां वानरांना दुसरेंच एक भय प्राप्त झालें २२. असो. मोठमोठे व पर्वतशिखरांप्रमाणें धिप्पाड असलेले ते असंख्य वानर तेथें बसून अतिशय गर्जना करूं लागले असतां मेघांच्या योगानें नादित होणाऱ्या आकाशाप्रमाणें त्या पर्वतावरील जलप्रवाहांचीं तीरें नादित होऊं लागलीं २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५५ ॥

ज्या पर्वतप्रदेशावर ते सर्व वानर प्रायोपवेशन करण्याकरितां बसले होते तिकडे गृध्रराज येऊं लागला १. तो संपाति ह्या नांवाचा एक चिरजीवी पक्षी असून जटायूचा भ्राता होता आणि तो उदार असून बल व पराक्रम ह्यांसंबंधानें प्रख्यात होता २. विंध्यनामक महापर्वताच्या गुहेंतून निघाल्यानंतर बाहेरच्या बाजूला बसलेल्या वान-रांना अवलोकन करितांक्षणीं मनामध्यें आनंदित होऊन तो म्हणाला ३ "खरोखर ह्या जगतामध्यें कर्माचें फल पुरुषाला प्राक्तनानुसार येत असतें असें जें म्हणतात तें खरोखरीं खरें आहे. कारण, प्राक्तनानें ठरलेलें हें भक्ष्य आज मला पुष्कळ दिवसांनीं

परम्पराणां भक्षिष्ये वानराणां मृतं मृतम् । उवाचैतद्वचः पक्षी तान्नि-
रीक्ष्य प्लवंगमान् ५ तस्य तद्वचनं श्रुत्वा भक्ष्यलुब्धस्य पक्षिणः । अङ्गदः
परमायस्तो हनूमन्तमथाब्रवीत् ६ पश्य गृध्रापदेशेन साक्षाद्वैवस्वतो
यमः । इमं देशमनुप्राप्तो वानराणां विपत्तये ७ रामस्य न कृतं
कार्यं न कृतं राजशासनम् । हरीणामियमज्ञाता विपत्तिः सहसा-
गता ८ वैदेह्याः प्रियकामेन कृतं कर्म जटायुषा । गृध्रराजेन यत्तत्र
श्रुतं वस्तदशेषतः ९ तथा सर्वाणि भूतानि तिर्यग्योनिगतान्यपि । प्रियं
कुर्वन्ति रामस्य त्यक्त्वा प्राणान्यथा वयम् १० अन्योन्यमुपकुर्वन्ति स्नेह-
कारुण्ययन्त्रिताः । ततस्तस्योपकारार्थं त्यजतात्मानमात्मना ११ प्रियं
कृतं हि रामस्य धर्मज्ञेन जटायुषा । राघवार्थे परिश्रान्ता वयं संत्यक्तजी-
विताः १२ कान्ताराणि प्रपन्नाः स्म न च पश्याम मैथिलीम् । स सुखी

---

आपोआप प्राप्त झालें आहे ४. प्रायोपवेशनाकरितां ओळी लांडून बसलेल्या ह्या वानरांमध्यें जो जो मरेल तो तो मी भक्षण करून टाकीन." ह्याप्रमाणें तो संपातिपक्षी त्या वानरांना अवलोकन करून आपल्याशीं बोलूं लागला असतां ५ त्या भक्ष्यलुब्ध पक्ष्याचें तें भाषण श्रवण करून अंगद अतिशय खिन्न झाला आणि हनुमानाला ह्मणाला ६ " पहा, गृध्ररूपानें हा प्रत्यक्ष वैवस्वत यमच वानरांच्या नाशाकरितां येथें प्राप्त झाला आहे ७. रामाचेंही कार्य आपल्या हातून झालें नाहीं आणि राजा सुग्रीवाची आज्ञा ही आपल्या हातून शेवटास गेली नाहीं. अशा प्रकारें कोणतीही गोष्ट सिद्धीस न जातां वानरांच्या कधीं मनांतही नसलेली ही विपत्ति एकाएकीं प्राप्त झाली आहे ८. असो. विदेहराजकन्या सीतेचें प्रिय करण्याची इच्छा धरून गृध्रराज जटायूनें जें कर्म तिकडे मार्गामध्यें केलें तें सर्व तुह्मीं ऐकिलेंच आहे ९. सारांश, आपल्याप्रमाणेंच सर्व तिर्यग्योनींतील प्राणी सुद्धां प्राणत्याग करून रामाचें प्रिय करीत असतात १०. प्रेम आणि दया ह्यांनीं व्याप्त झालेले प्राणी एकमेकांवर उपकार करीत असतात. वास्तव, त्या रामावर उपकार करण्याकरितां ज्याअर्थीं आपण प्रवृत्त झालों आहों त्याअर्थीं आतां मनापासून जीवाची आशा सोडा. ( पूर्वी गृध्रराज जटायूनें जर रामावर उपकार करण्याकरितां आपले प्राण खर्ची घालण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं तर ह्या प्रसंगीं आपणांला ह्या पक्ष्याच्या हातून मरण येत आहे हेंही योग्यच आहे ) ११. धर्मवेत्त्या जटायूनें ( प्राणत्याग करून ) रामाचें प्रिय केलें आणि आपणही त्या रामाकरितां सर्वस्वीं थकून भागून प्राणत्याग करण्यास उद्युक्त झालों आहों १२. आपण अरण्यें हिंडलों; परंतु, मिथिलराज-

गृध्रराजस्तु रावणेन हतो रणे १३ मुक्तश्च सुग्रीवभयाद्गतश्च परमां गतिम् १४ जटायुषो विनाशेन राज्ञो दशरथस्य च । हरणेन च वैदेह्याः संशयं हरयो गताः १५ रामलक्ष्मणयोर्वासमरण्ये सह सीतया । राघवस्य च बाणेन वालिनश्च तथा वधम् १६ रामकोपादशेषाणां रक्षसां च तथा वधम् । कैकेय्या वरदानेन इदं च विकृतं कृतम् १७ तदसुखमनुकीर्तितं वचो भुवि पतितांश्च निरीक्ष्य वानरान् । भृशचकितमतिर्महामतिः कृपणमुदाहृतवान्स गृध्रराजः १८ तत्तु श्रुत्वा तथा वाक्यमङ्गदस्य मुखोद्गतम् । अब्रवीद्वचनं गृध्रस्तीक्ष्णतुण्डो महास्वनः १९ कोऽयं गिरा घोषयति प्राणैः प्रियतरस्य मे । जटायुषो वधं भ्रातुः कम्पयन्निव मे मनः २० कथमासीज्जनस्थाने युद्धं राक्षसगृध्रयोः । नामधेयमिदं भ्रातुश्चिरस्याद्य मया श्रुतम् । इच्छेयं गिरिदुर्गाच्च भवद्भिरवतारितुम् २१ यवीयसो गुणज्ञस्य श्लाघनीयस्य विक्रमैः । अतिदीर्घस्य कालस्य परितुष्टोऽस्मि कीर्त-

---

कन्या सीता आपण अवलोकन केली नाहीं. तर्‍हां ( सीतेला अवलोकन करून ) संग्रामामध्यें रावणाच्या हातून वध पावलेला तो गृध्रराज जटायु सुखी खरा १३. कारण, तो सुग्रीवाच्या भयांतून मुक्त होऊन रामाच्या अनुग्रहामुळें उत्तम गतीला तरी गेला असेल १४. जटायूला व त्याचप्रमाणें दशरथराजाला मृत्यु आल्यामुळें आणि वैदेहीचा अपहार झाल्यामुळें वानरांवर आज संकट आलें आहे ( ह्यांपैकीं एकादी गोष्ट जर न होती तर आपणांवर हें संकट येण्याचें कारणच नव्हतें ) १५. सीतेसहवर्तमान रामलक्ष्मणांचें अरण्यामध्यें वास्तव्य, त्याचप्रमाणें रामाच्या बाणानें वालीचा वध १६ आणि तसाच रामाच्या कोपामुळें सर्व राक्षसांचा वध हा सर्व अनर्थ कैकेयीला दशरथराजानें वर दिल्यामुळें झाला आहे " १७. अंगदानें केलेलें तें दुःखकारक भाषण श्रवण करून आणि भूमीवर पडलेले ते वानर अवलोकन करून महाबुद्धिमान् गृध्रराज संपाति मनामध्यें एकदम चकित झाला आणि दीन वाणीनें बोलूं लागला १८. सारांश, अंगदाच्या मुखांतून निघालेलें तें भाषण श्रवण करून उच्च स्वरानें व तीक्ष्ण चंचूनें युक्त असलेला तो गृध्रराज संपाति ह्मणाला १९ " अरे, प्राणापेक्षांही प्रिय असलेला जो माझा भ्राता जटायु त्याच्या वधाची वार्ता - आपल्या वाणीनें कोण अरे माझें मन कंपित करीत करीत-कथन करीत आहे ? २०. अरे, जनस्थानामध्यें राक्षस रावण आणि गृध्र जटायु ह्यांचें युद्ध झालें तरी कसें ! आज बऱ्याच दिवसांनीं हें भ्रात्याचें नांव माझ्या कानीं आलें आहे २१. पर्वतावरील ह्या दुर्गम प्रदेशावरून तुह्मी मला खालीं उतरावें अशी माझी इच्छा आहे. गुणग्राही व परा-

भ्रातुः २२ तस्मिच्छेयमहं श्रोतुं विनाशं वानरर्षभाः। भ्रातुर्जटायुषस्तस्य जन-
स्थाननिवासिनः २३ तस्यैव च मम भ्रातुः सखा दशरथः कथम् । यस्य
रामः प्रियः पुत्रो ज्येष्ठो गुरुजनप्रियः २४ सूर्यांशुदग्धपक्षत्वान्न शक्नोमि
विसर्पितुम् । इच्छेयं पर्वतादस्मादवतर्तुमरिंदमाः २५ [ २१८१ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे
षट्पञ्चाशः सर्गः ॥ ५६ ॥

शोकाद्भ्रष्टस्वरमपि श्रुत्वा वानरयूथपाः । श्रद्दधुर्नैव तद्वाक्यं कर्मणा
तस्य शङ्किताः १ ते प्रायमुपविष्टास्तु दृष्ट्वा गृध्रं प्लवंगमाः । चक्रुर्बुद्धिं
तदा रौद्रां सर्वान्नो भक्षयिष्यति २ सर्वथा प्रायमासीनान्यदि नो भक्ष-
यिष्यति । कृतकृत्या भविष्यामः क्षिप्रं सिद्धिमितो गताः ३ एतां बुद्धिं
ततश्चक्रुः सर्वे ते हरियूथपाः । अवतार्य गिरेः शृङ्गाद्गृध्रमाहाङ्गदस्तदा ४

---

क्रमामुळें प्रशंसेस पात्र असा जो माझा कनिष्ठ भ्राता त्याचा वृत्तांत पुष्कळ दिव-
सांनीं ऐकावयाला सांपडल्यामुळें मी संतुष्ट झालों आहें २२. तस्मात्, हे वानरश्रे-
ष्ठहो, त्या जनस्थाननिवासी भ्रात्या जटायूचा नाश कसा झाला हें ऐकण्याची माझी
इच्छा आहे २३ व त्याचप्रमाणें गुरुजनांना प्रिय असलेला श्रेष्ठ राम ज्याचा प्रिय-
पुत्र तो दशरथ त्या माझ्या भ्रात्याचा सखा कसा हेंही समजून घेण्याची माझी
मनीषा आहे २४. हे शत्रुदमन करणार वानरहो, सूर्यकिरणांनीं माझे पंख दग्ध
होऊन गेले असल्यामुळें मला उड्डाण करितां येत नाहीं; ह्यास्तव, ह्या पर्वतापासून
तुम्ही मला खालीं उतरावें अशी माझी इच्छा आहे २५. " ह्याप्रमाणें महामुनिवाल्मी-
किप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील किष्किंधाकांडापैकीं छपन्नावा सर्ग
समाप्त झाला ॥ ५६ ॥

शोकाच्या योगानें त्या गृध्रराज संपातीचा शब्द जरी खोल गेला होता तरी
( आयास न पडतां वानरमांस भक्षण करितां यावें एतदर्थ हा शोकाकुल झाल्याचें
कांहीं ढोंग करीत आहे अशी ) शंका येऊन वानरसेनाधिपतींचा त्याच्या भाषणावर
विश्वास बसेना १. प्रायोपवेशनानें प्राणत्यागाचा निश्चय करून ते वानर बसले अस-
तांना गृध्र दृष्टीं पडतांक्षणीं " हा आम्हा सर्वांना भक्षण करून टाकील." असा भयंकर
विचार त्यांच्या मनामध्यें आला २. " प्रायोपवेशनाचा निश्चय करून बसलेल्या आम्हाला
जर हा भक्षण करून टाकील तर आमचा मनोरथ लवकरच सिद्धीस जाणार अस-
ल्यामुळें आम्ही सर्वस्वीं कृतकृत्य होऊं " ३. असा विचार त्या सर्वही वानरसेनाधि-
पतींनीं मनामध्यें आणिला आणि पर्वताच्या शिखरापासून त्या गृध्राला खालीं उतरवून

बभूवर्क्षरजो नाम वानरेन्द्रः प्रतापवान्। ममार्यः पार्थिवः पक्षिन्धार्मिकौ तस्य चात्मजौ ५ सुग्रीवश्चैव वाली च पुत्रौ घनबलावुभौ । लोके विश्रुतकर्माभूद्राजा वाली पिता मम ६ राजा कृत्स्नस्य जगत इक्ष्वाकूणां महारथः। रामो दाशरथिः श्रीमान्प्रविष्टो दण्डकावनम् ७ लक्ष्मणेन सह भ्रात्रा वैदेह्या सह भार्यया। पितुर्निर्देशनिरतो धर्म्यं पन्थानमाश्रितः ८ तस्य भार्या जनस्थानाद्रावणेन हृता बलात् ९ रामस्य तु पितुर्मित्रं जटायुर्नाम गृध्रराट् । ददर्श सीतां वैदेहीं ह्रियमाणां विहायसा १० रावणं विरथं कृत्वा स्थापयित्वा च मैथिलाम् । परिश्रान्तश्च वृद्धश्च रावणेन हतो रणे ११ एवं गृध्रो हतस्तेन रावणेन बलीयसा । संस्कृतश्चापि रामेण जगाम गतिमुत्तमाम्. १२ ततो मम पितृव्येण सुग्रीवेण महात्मना। चकार राघवः सख्यं सोवधीत्पितरं मम १३ मम पित्रा निरुद्धो हि सुग्रीवः सचिवैः सह । निहत्य वालिनं रामस्ततस्तमभिषेचयत् १४ स राज्ये स्थापितस्तेन सुग्रीवो वानरेश्वरः । राजा वानरमु-

अंगद त्याला ह्मणाला ४ " हे पक्ष्या, ऋक्षरज ह्मणून एक प्रतापी वानराधिपति राजा माझा आजा होता. सुग्रीव आणि वालि हे त्याचे दोन महाबलाढ्य पुत्र होत. माझा पिता वालि पराक्रमानें जगतामध्यें प्रख्यात असा वानरांचा राजा होऊन गेला ५,६. पित्याची आज्ञा पाळण्याविषयीं तत्पर असून धर्ममार्गाचें अवलंबन करणारा जो संपूर्ण जगताचा व इक्ष्वाकुवंशजांचा राजा दशरथपुत्र वैभवशाली राम तो, भ्राता लक्ष्मण आणि भार्या वैदेही, ह्यांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला असतां ७,८ रावणानें त्याची भार्या जनस्थानापासून बलात्कारानें हरण करून नेली ९. विदेहराजकन्या सीतेला रावण आकाशमार्गानें घेऊन जात आहे असें रामाच्या पित्याचा मित्र जो गृध्रराज जटायु त्यानें अवलोकन केलें १०. तेव्हां रावणाला विरथ करून त्या गृध्रराजानें मैथिलीलाही भूमीवर ठेवविलें; परंतु, युद्ध करितां करितां श्रांत झाल्यामुळें त्या वृद्धाच्या संग्रामामध्यें रावणानें वध केला ११. ह्याप्रमाणें त्या बलाढ्य रावणानें गृध्राचा वध केला असतां रामानें त्याचा और्ध्वदेहिक संस्कारही केला व त्यामुळें तो गृध्र उत्तम गतीला गेला १२. तदनंतर माझ्या सुग्रीवनामक महात्म्या पितृव्यानें रामाशीं सख्य केलें असतां रामानें माझ्या पित्याचा वध केला १३. सारांश, माझ्या पित्यानें सचिवांसहवर्तमान सुग्रीवाला राज्यांत येण्याची बंदी केली होती, ह्यामुळें रामानें वालीचा वध करून त्याला राज्याभिषेक केला १४. ह्याप्रमाणें वानराधिपति सुग्रीवाला राज्यावर बसवून त्या रामानें त्याला सर्व वानरश्रेष्ठांचा राजा बनविल्यावर

स्थापितो तेन प्रस्थापिता वयम् १५ एवं रामप्रयुक्तास्तु मार्गमाणास्ततस्ततः । वैदेहीं नाधिगच्छामो रात्रौ सूर्यप्रभामिव १६ ते वयं दण्डकारण्यं विचित्य सुसमाहिताः । अज्ञानात्तु प्रविष्टाः स्म धरण्या विवृतं बिलम् १७ मयस्य मायाविहितं तद्बिलं च विचिन्वताम् । व्यतीतस्तत्र नो मासो यो राज्ञा समयः कृतः १८ ते वयं कपिराजस्य सर्वे वचनकारिणः । कृतां संस्थामतिक्रान्ता भयात्प्रायमुपासिताः १९ क्रुद्धे तस्मिंस्तु काकुत्स्थे सुग्रीवे च सलक्ष्मणे । गतानामपि सर्वेषां तत्र नो नास्ति जीवितम् २० [ २२०२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः ॥ ५७ ॥

इत्युक्तः करुणं वाक्यं वानरैस्त्यक्तजीवितैः । सबाष्पो वानरान्गृध्रः प्रत्युवाच महास्वनः १ यवीयान्स मम भ्राता जटायुर्नाम वानराः । यमाख्यात हतं युद्धे रावणेन बलीयसा २ वृद्धभावादपक्षत्वाच्छृण्वंस्त

---

त्यानें आम्हांला सीतेचा शोध लावण्याकरितां बाहेर पाठविलें १५. ह्याप्रमाणें रामाची आज्ञा आम्हांला झाली असतां आम्ही ठिकठिकाणीं विदेहराजकन्या सीतेचा शोध करूं लागलों; परंतु, रात्रीं ज्याप्रमाणें कितीही शोध केला असतां सूर्याची प्रभा सांपडत नाहीं त्याचप्रमाणें विदेहराजकन्या सीतेचा आम्हांला शोध लागत नाहीं १७. प्रथमतः मोठ्या दक्षतेनें राहून आम्हीं दंडकारण्य शोधिलें आणि गैरमाहितीमुळें आम्ही पृथ्वीच्या एका आच्छादित असलेल्या विवरामध्यें प्रविष्ट झालों १७. मायेच्या योगानें निर्माण केलेलें तें मयासुराचें विवर होतें आणि तें शोधितां शोधितांच राजानें आम्हांला दिलेली महिन्याची मुदत तेथें संपून गेली १८. तात्पर्य, वानरराज सुग्रीवाच्या वचनाप्रमाणें वागणाऱ्या आमच्या हातून त्यानें केलेली मुदत टळून गेल्याकारणानें आम्ही सर्वही त्याच्या भीतीमुळें प्रायोपवेशन करण्याचा निश्चय करून येथें बसलों आहों १९. कारण, तो सुग्रीव आणि लक्ष्मणासहवर्तमान ककुत्स्थकुलोत्पन्न राम ( मुदत टळल्यामुळें ) क्रुद्ध झाले असतां तेथें जरी आम्हीं गेलों तरी आमच्यापैकीं कोणीही जिवंत राहणार नाहीं २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५७ ॥

ह्याप्रमाणें जीविताची आशा सोडून वानरांनीं दीन वाणीनें भाषण केलें असतां प्रचंड स्वरानें युक्त असलेला तो गृध्र डोळ्यांत अश्रु आणून म्हणाला; १ "हे वानरहो, बलाढ्य रावणानें युद्धामध्यें ज्याचा वध केला म्हणून तुम्ही सांगत आहां तो माझा

मर्षये । न हि मे शक्तिरस्त्यद्य भ्रातुर्वैरविमोक्षणे ३ पुरा वृत्रवधे वृत्ते स चाहं च जयैषिणौ । आदित्यमुपयातौ स्वो ज्वलन्तं रश्मिमालिनम् ४ आवृत्याकाशमार्गेण जवेन स्वर्गतौ भृशम् । मध्यं प्राप्ते तु सूर्ये तु जटायुरवसीदति ५ तमहं भ्रातरं दृष्ट्वा सूर्यरश्मिभिरर्दितम् । पक्षाभ्यां छादयामास स्नेहात्परमविह्वलम् ६ निर्दग्धपत्रः पतितो विन्ध्येहं वानरर्षभाः । अहमस्मिन्वसन्भ्रातुः प्रवृत्तिं नोपलक्षये ७ जटायुषस्त्वेवमुक्तो भ्रात्रा संपातिना तदा । युवराजो महाप्राज्ञः प्रत्युवाचाङ्गदस्तदा ८ जटायुषो यदि भ्राता श्रुतं ते गदितं मया । आख्याहि यदि जानासि निलयं तस्य रक्षसः ९ अदीर्घदर्शिनं तं वै रावणं राक्षसाधमम् । अन्तिके यदि वा दूरे यदि जानासि शंस नः १० ततोऽब्रवीन्महातेजा भ्राता ज्येष्ठो जटायुषः । आत्मानुरूपं वचनं वानरान्संप्रहर्षयन् ११ निर्दग्धपक्षो गृध्रोहं गतवीर्यः प्लवंगमाः । वाङ्मात्रेणापि रामस्य करिष्ये साह्यमुत्त-

---

जटायुनामक कनिष्ठ भ्राता होय २. मी वृद्ध व पक्षहीन झालों असल्यामुळें हें दुःसह वृत्त कानावर येत असूनही मला तें सहन करणें भाग पडत आहे; कारण, भ्रात्याच्या वैराची फेड करण्याला आज माझी शक्ति नाहीं ३. पूर्वी वृत्रासुराचा इंद्रानें वध केला असतां आह्मी उभयतां त्याला जिंकण्याची इच्छा धरून किरणसमुदायांनीं युक्त असलेल्या देदीप्यमान सूर्याचे समीप गेलों ४. आकाशमार्गानें वेगावेगानें आह्मी वर जाऊन इंद्राला अगदीं घेरून टाकिलें. परंतु, उड्डाण करितां करितां सूर्य मध्याह्नीं आल्यामुळें जटायूचा धीर सुटूं लागला ५. तेव्हां सूर्यकिरणांनीं दग्ध होऊन जाण्याची पाळी आल्यामुळें अत्यंत विह्वल झालेल्या त्या भ्रात्याला अवलोकन करून मीं आपल्या पक्षांनीं त्याच्यावर छाया केली ६. ह्यामुळें, हे वानरश्रेष्ठहो, माझे पंख जळून जाऊन मी विंध्यपर्वतावर पडलों; तेव्हांपासून मी ह्या पर्वतावर वास्तव्य करीत आहें आणि तेव्हांपासून माझ्या जटायु भ्रात्याची हकीकत मला कांहीं एक समजली नाहीं ७. ह्याप्रमाणें जटायूच्या संपातिनामक भ्रात्यानें सांगितलें असतां महाबुद्धिमान् युवराज अंगद त्याला ह्मणाला ८ " तूं जर जटायूचा भ्राता आहेस तर मीं जें कांहीं बोललों हें तूं ऐकिलेंच आहेस. ह्याकरितां त्या राक्षसाचें वसतिस्थान तुला विदित असेल तर तूं आह्मांला सांग ९. अदूरदर्शी राक्षसाधम रावण जवळ अथवा दूर असल्याचें जर तूं जाणीत असशील तर आह्माला सांग " १०. ह्यानंतर तो जटायूचा महातेजस्वी ज्येष्ठ भ्राता वानरांना आनंदित करीत करीत स्वतःला योग्य असें भाषण त्यांच्याशीं करूं लागला ११. ( तो ह्मणाला ) " हे,

मम् १२ जानामि वारुणाँल्लोकान्विष्णोस्त्रैविक्रमानपि । देवासुरविमर्दांश्च ह्यमृतस्य विमन्थनम् १३ रामस्य यदिदं कार्यं कर्तव्यं प्रथमं मया । जरया च हृतं तेजः प्राणाश्च शिथिला मम १४ तरुणी रूपसंपन्ना सर्वाभरणभूषिता । ह्रियमाणा मया दृष्टा रावणेन दुरात्मना १५ क्रोशन्ती रामरामेति लक्ष्मणेति च भामिनी । भूषणान्यपविध्यन्ती गात्राणि च विधुन्वती १६ सूर्यप्रभेव शैलाग्रे तस्याः कौशेयमुत्तमम् । असिते राक्षसे भाति यथा विद्युदिवाम्बरे १७ तां तु सीतामहं मन्ये रामस्य परिकीर्तनात् । श्रूयतां मे कथयतो निलयं तस्य रक्षसः १८ पुत्रो विश्रवसः साक्षाद्भ्राता वैश्रवणस्य च । अध्यास्ते नगरीं लङ्कां रावणो नाम राक्षसः १९ इतो द्वीपे समुद्रस्य संपूर्णे शतयोजने । तस्मिँल्लङ्का पुरी रम्या निर्मिता विश्वकर्मणा २० जाम्बूनदमयैर्द्वारैश्चित्रैः काञ्चनवेदिकैः । प्रासादैर्हेमवर्णैश्च महद्भिः सुसमाकृता २१ प्राका-

---

वानरहो, माझे पंख जळून गेल्याकारणानें मी आतां वीर्यहीन झालों आहें. तथापि, वाणीनें वाणीनेंही मी रामाला उत्कृष्ट साहाय्य करीन १२. वारुणलोक, विष्णूनें त्रिविक्रमावतारीं व्याप्त केलेले पृथ्वीप्रभृति लोक, देवदैत्यांचीं युद्धं आणि अमृताकरितां झालेलें समुद्रमंथन हें सर्व मी जाणीत आहें १३. रामाचें जर हें कार्य असेल तर तें मी प्रथमच करणें अवश्य आहे; परंतु, जरेच्या योगानें माझें तेज नाहींसें झालें असून सांप्रत माझे प्राणही व्याकुल झाले आहेत १४. सर्वालंकारानें भूषित व सौंदर्यसंपन्न अशी एक तरुण स्त्री दुरात्मा रावण घेऊन जात असतांना मीं पाहिली आहे १५. ती स्त्री रामा, रामा, लक्ष्मणा, असा आक्रोश करीत होती आणि सुटण्याकरितां तडफड करीत असून आपल्या शरीरावरील भूषणें खालीं टाकीत होती १६. पर्वताच्या शिखरावर ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा दिसत असते अथवा आकाशामध्यें मेघपटलाचे ठिकाणीं ज्याप्रमाणें विद्युल्लता झळकत असते त्याप्रमाणें कृष्णवर्ण राक्षसाचे ठिकाणीं तिची उत्कृष्ट ( पिंवळी ) पैठणी झळकत होती १७. रामनामाचा उच्चार तिच्या मुखांतून चालला असल्यामुळें ती सीता असावी असें मला वाटतें. असो. आतां त्या राक्षसाचें वसतिस्थान मी सांगत आहें तें श्रवण करा १८. विश्रवसमुनींचा प्रत्यक्ष पुत्र आणि कुबेराचा भ्राता रावणनामक राक्षस लंकानगरीमध्यें रहात आहे १९. येथून तब्बल शंभर योजनांवर समुद्रांतील बेटामध्यें विश्वकर्म्यानें निर्माण केलेली लंकानामक रम्य नगरी आहे २०. सुवर्णाचीं द्वारें आणि सुवर्णाच्या जोत्यांनीं युक्त असलेले मोठमोठे सुवर्णाचे अद्भुत वाडे ह्यांच्या योगानें तिला चांगली शोभा आलेली

रेणार्कवर्णेन महता च समन्विता । तस्यां वसति वैदेही दीना कौशेय-
वासिनी २२ रावणान्तःपुरे रुद्धा राक्षसीभिः सुरक्षिता । जनकस्या-
त्मजां राज्ञस्तस्यां द्रक्ष्यथ मैथिलीम् २३ ज्ञानेन खलु पश्यामि दृष्ट्वा
प्रत्यागमिष्यथ । आद्यः पन्थाः कुलिङ्गानां ये चान्ये धान्यजीविनः २४
द्वितीयो बलिभोजानां ये च वृक्षफलाशनाः । भासास्तृतीयं गच्छन्ति
क्रौञ्चाश्च कुररैः सह २५ श्येनाश्चतुर्थं गच्छन्ति गृध्रा गच्छन्ति पञ्च-
मम् । बलवीर्योपपन्नानां रूपयौवनशालिनाम् २६ षष्ठस्तु पन्था हंसानां
वैनतेये गतिः परा । वैनतेयाच्च नो जन्म सर्वेषां वानरर्षभाः २७ गर्हितं
तु कृतं कर्म येन स्म पिशिताशिनः । प्रतिकार्यं च मे तस्य वैरं भ्रातृ-
कृतं भवेत् २८ इहस्थोहं प्रपश्यामि रावणं जानकीं तथा । अस्माक-
मपि सौपर्णं दिव्यं चक्षुर्बलं तथा २९ तस्मादाहारवीर्येण निसर्गेण च
वानराः । आयोजनशतात्साग्राद्वयं पश्याम नित्यशः ३० अस्माकं

---

आहे २१ आणि सूर्यासारिख्या तेजस्वी प्रचंड कोटानें ती युक्त आहे. त्या लंकेमध्यें पैठणी नेसलेली विदेहराजकन्या सीता दीन होऊन वास्तव्य करीत आहे २२. रावणाच्या अंतःपुरामध्यें तिला अडकवून ठेविली असून राक्षसींनीं तिचें चांगल्या प्रकारें रक्षण केलें आहे. तस्मात् , राजा जनकाची कन्या जी मैथिली ती त्या लंकानगरीमध्यें तुह्मांला दृष्टीं पडेल २३. ज्ञानाच्याच योगानें मी तिला अवलोकन करीत आहें व तुह्मीही तिला पाहून परत या. असो. आकाशामध्यें चिमण्या व इतरही जे कांहीं धान्यावर उपजीविका करणारे पक्षी आहेत ते पहिल्या मार्गांत संचार करीत असतात २४, कावळे आणि वृक्षांच्या फलावर उपजीविका करणारे पक्षी दुसऱ्या मार्गामध्यें हिंडत असतात, क्रौंच कुरर आणि भासपक्षी तिसऱ्या मार्गामध्यें उड्डाण करीत असतात २५. श्येन पक्षी चवथ्या मार्गाचें अवलंबन करीत असतात, गृध्र पक्षी पांचव्या मार्गामध्यें गमन करीत असतात, बल, वीर्य, रूप आणि यौवन ह्यांनीं संपन्न असलेल्या २६ हंसांचा सहावा मार्ग होय. विनतापुत्र गरुडाची गति त्यांच्याही पेक्षां पलीकडे आहे आणि, हे वानरश्रेष्ठहो, विनतापुत्र अरुणापासूनच आह्मा सर्वांची उत्पत्ति झाली आहे २७ असो. ज्या रावणानें हें निंद्य कर्म करून माझ्या भ्रात्याचा वध केला त्या रावण राक्षसाचा भ्रात्याकरितां मी आपला सूड तुमच्या द्वारानें लवकरच उगवून घेईन २८. मला येथून रावण व जनककन्या सीता दिसत आहे. आह्मांला चक्षुष्मती विद्येनें प्राप्त होणारें दिव्य दृष्टिसामर्थ्य आहे २९ आणि त्यामुळें आहाराच्या सामर्थ्यानें व जातिधर्मानें आह्मांला नेहमीं शंभर योजनांपेक्षांही लांबची वस्तु दृष्टीं पडत

विहिता वृत्तिर्निसर्गेण च दूरतः । विहिता वृक्षमूले तु वृत्तिश्चरणयोधिनाम् ३१ उपायो दृश्यतां कश्चिल्लङ्घने लवणाम्भसः । अभिगम्य तु वैदेहीं समृद्धार्था गमिष्यथ ३२ समुद्रं नेतुमिच्छामि भवद्भिर्वरुणालयम् । प्रदास्याम्युदकं भ्रातुः स्वर्गतस्य महात्मनः ३३ ततो नीत्वा तु तं देशं तीरे नदनदीपतेः । निर्दग्धपक्षं संपातिं वानराः सुमहौजसः ३४ तं पुनः प्रापयित्वा च तं देशं पतगेश्वरम् । बभूवुर्वानरा हृष्टाः प्रवृत्तिमुपलभ्य ते ३५ [२२३७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

ततस्तदमृतास्वादं गृध्रराजेन भाषितम् । निशम्य वदतो हृष्टास्ते वचः प्लवगर्षभा १ जाम्बवान्वानरश्रेष्ठः सह सर्वैः प्लवंगमैः । भूतलात्सहसोत्थाय गृध्रराजानमब्रवीत् २ क सीता केन वा दृष्टा को वा हरति मैथिलीम् । तदाख्यातु भवान्सर्वं गतिर्भव वनौकसाम् ३ को दाशरथिबाणानां वज्रवेगनिपातिनाम् । स्वयं लक्ष्मणमुक्तानां न चिन्तयति

---

असते ३०. जातिधर्मानेंच आमची उपजीविका लांब दिसणाऱ्या भक्ष्यावर ठरलेली आहे आणि कुक्कुटादिकांची उपजीविका वसतिस्थानभूत वृक्षाचे समीपच विधात्यानें ठरवून टाकिलेली आहे ३१. असो. क्षारजलानें युक्त असलेल्या समुद्राच्या उल्लंघनाविषयीं कांहीं उपाय शोधून काढा आणि सीतेची भेट झाल्यावर कृतकृत्य होऊन तुह्मी परत चालते व्हा ३२. तुह्मी मला वरुणालय समुद्राकडे घेऊन जावें अशी माझी इच्छा आहे. कारण, स्वर्गाला गेलेल्या महात्म्या भ्रात्याला उद्देशून तर्पण करण्याचा माझा विचार आहे " ३३. ह्याप्रमाणें संपातीनें सांगितलें असतां त्या महा बलाढ्य वानरांनीं पंखजळून गेलेल्या संपातीला समुद्रतीरीं त्यानें सांगितलेल्या प्रदेशावर नेऊन ठेविलें ३४ आणि त्या पक्षिराजाला त्या प्रदेशावर नेऊन ठेविल्यानंतर सीतेची बातमी लागल्यामुळें ते वानर आनंदित झाले ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

तदनंतर अमृताप्रमाणें मधुर असलेलें तें गृध्रराजाचें भाषण श्रवण करून ते वानरश्रेष्ठ आनंदित झाले आणि तेच बोलूं लागले १; वानरश्रेष्ठ जांबवान् इतर सर्व वानरांसहवर्तमान भूतलावरून एकदम उडी माकून गृध्रराज संपातीला ह्मणाला २ " सीता कोठें आहे, तिला कोणी पाहिलें आहे व तिला कोण हरण करून नेत आहे हें सर्व तूं आह्मांला सांग आणि आह्मा वानरांना आधारभूत हो ( ह्मणजे आह्मा वान-

विक्रमम् ४ स हरीन्प्रति संमुक्तान्सीताश्रुतिसमाहितान् । पुनराश्वासय-न्प्रीत इदं वचनमब्रवीत् ५ श्रूयतामिह वैदेह्या यथा मे हरणं श्रुतम् । येन चापि ममाख्यातं यत्र चायतलोचना ६ अहमस्मिन्गिरौ दुर्गे बहुयोजनमायते । चिरान्निपतितो वृद्धः क्षीणप्राणपराक्रमः ७ तं मामेवंगतं पुत्रः सुपार्श्वो नाम नामतः । आहारेण यथा कालं बिभर्ति पततां वरः ८ तीक्ष्णकामास्तु गन्धर्वास्तीक्ष्णकोपा भुजंगमाः । मृगाणां तु भयं तीक्ष्णं ततस्तीक्ष्णक्षुधा वयम् ९ स कदाचित्क्षुधार्तस्य ममाहाराभिकाङ्क्षिणः । गतः सूर्येहनि प्राप्तो मम पुत्रो ह्यनामिषः १० स मयाहारसंरोधात्पीडितः प्रीतिवर्धनः । अनुमान्य यथातत्त्वमिदं वचनमब्रवीत् ११ अहं तात यथाकालमामिषार्थी खमाप्लुतः । महेन्द्रस्य गिरेर्द्वारमावृत्य सुसमाश्रितः १२ तत्र सत्त्वसहस्राणां सागरान्तरचारिणाम् । पन्थानमेको-

---

रांना जीवदान दे ) ३. अरे, वज्राप्रमाणें वेगावेगानें पडणाऱ्या दशरथपुत्र रामाच्या बाणांचें आणि त्याचप्रमाणें स्वतः लक्ष्मणानें सोडिलेल्या बाणांचें सामर्थ्य कोण बरें लक्ष्यांत आणीत नाहीं ? " ४. ह्यानंतर प्रायोपवेशनाचा बेत रहित केलेल्या आणि सीतेची वार्ता कानीं पडल्यामुळें मनामध्यें स्वस्थ झालेल्या वानरांना पुनरपि धीर देण्याकरितां तो गृध्रराज संतुष्ट होऊन ह्मणाला ५ " विदेहराजकन्या सीता रावणानें हरण करून नेल्याचें मीं कसें ऐकिलें, मला तें कोणी सांगितलें आणि दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता कोठें आहे हें तुह्मी श्रवण करा ६. अनेक योजनें लांब असलेल्या ह्या दुर्गम पर्वतावर शक्तीचा व पराक्रमाचा ऱ्हास होऊन मी वृद्ध पडल्याला पुष्कळ दिवस झाले ७. ह्याप्रमाणें अवस्था मला प्राप्त झाली असतांना सुपार्श्व ह्मणून प्रसिद्ध असलेला एक श्रेष्ठ पक्षी वेळोंवेळीं आहाराच्या योगानें माझें पोषण करीत असे ८. गंधर्वांची कामवासना, सर्पांचा कोप आणि मृगांचें भय ज्याप्रमाणें तीक्ष्ण असतें त्याचप्रमाणें आह्मा गृध्र पक्ष्यांची क्षुधा तीक्ष्ण असते ९. एकदा क्षुधेनें व्याकुल होऊन मी आहाराची वाट पहात असतां दिवसा सूर्योदयसमयीं भक्ष्य आणण्याकरितां गेलेला तो माझा पुत्र सायंकालीं मांस न आणितां ( रिक्तहस्तीच ) परत आला १०. तेव्हां भक्ष्य न मिळाल्यामुळें मीं त्याला बोलून बोलून बरेंच दुःख दिलें. तेव्हां तो आनंदवर्धक माझी क्षमा मागून खरें खरें माझ्याशीं बोलूं लागला ११. ( तो ह्मणाला ) " संपाते, मांसाकरितां मी वेळवर आकाशामध्यें उड्डाण केलें होतें आणि महेंद्रपर्वताचें द्वार रोखून मी स्वस्थ राहिलों होतों १२. सागरासमीप संचार करणाऱ्या हजारों प्राण्यांचा मार्ग रोखण्याचा निश्चय करून मी एकटा

ध्यवसं संनिरोद्धुमवाङ्मुखः १३ तत्र कश्चिन्मया दृष्टः सूर्योदयसमप्र-
भाम् । स्त्रियमादाय गच्छन्वै भिन्नाञ्जनचयोपमः १४ सोहमभ्यवहारार्थं
तौ दृष्ट्वा कृतनिश्चयः । तेन साम्ना विनीतेन पन्थानमनुयाचितः १५
न हि सामोपपन्नानां प्रहर्ता विद्यते भुवि । नीचेष्वपि जनः कश्चित्किमङ्ग
बत मद्विधः १६ स यातस्तेजसा व्योम संक्षिपन्निव वेगितः । अथाहं
खेचरैर्भूतैरभिगम्य सभाजितः १७ दिष्ट्या जीवति सीतेति अब्रुवन्मां
महर्षयः । कथंचित्सकलत्रोसौ गतस्ते स्वस्त्यसंशयम् १८ एवमुक्त-
स्ततोहं तैः सिद्धैः परमशोभनैः । स च मे रावणो राजा रक्षसां प्रति-
वेदितः १९ पश्यन्दाशरथेर्भार्यां रामस्य जनकात्मजाम् । भ्रष्टाभरणकौ-
शेयां शोकवेगपराजिताम् २० रामलक्ष्मणयोर्नाम क्रोशन्तीं मुक्तमूर्ध-
जाम् । एष कालात्ययस्तात इति वाक्यविदां वरः २१ एतदर्थं समग्रं

---

अधोमुख होऊन बसलों होतों १३; तों इतक्यांत उदयकालच्या सूर्याप्रमाणें जिची प्रभा आहे अशी एक स्त्री घेऊन कज्जलपर्वताप्रमाणें दिसणारा कोणी एक पुरुष जातांना माझ्या दृष्टीं पडला १४. तेव्हां त्या उभयतांना अवलोकन करितांक्षणीं ह्यांनाच पित्याच्या आहाराकरितां घेऊन जावें असा मीं निश्चय केला; परंतु, त्यानें नम्र होऊन दीन 'वाणीनें मार्ग' दे ह्मणून माझी प्रार्थना केल्यामुळें मीं त्याला सोडून दिलें १५. कारण, गरीबीनें वागणाऱ्यांचा घात करणारा नीचांमध्येंही कोणी ह्या जगतांत सांपडणार नाहीं; मग माझ्यासारिख्याची गोष्ट कशाला पाहिजे ? १६. असो. मीं सोडून दिल्यावर तेजानें आकाश व्याप्त करीतच कीं काय तो पुरुष सत्वर चालता झाला. तो गेल्यानंतर आकाशामध्यें संचार करणाऱ्या सिद्धचारणादिकांनीं माझ्यासमीप येऊन त्या उभयतांना जीवदान दिल्याबद्दल माझी प्रशंसा केली १७. आणि " सीता तुझ्या हातून जिवंत राहिली हें फारच चांगलें झालें आणि कसा तरी रावण रासभार्येसहवर्तमान जिवंत निघून गेला ह्याबद्दल तुझें निःसंशय कल्याण होईल " १८ ह्याप्रमाणें त्या परमश्रेष्ठ सिद्धांनीं मला सांगितलें आणि स्त्रीला घेऊन जाणारा तो राक्षसांचा राजा रावण होता असें मला कळविलें १९. सारांश, दशरथ-पुत्र रामाची भार्या सीता शोकावेगानें व्याकुल झालेली होती, तिच्या शरीरावरील भूषणें वस्त्रासहवर्तमान अस्ताव्यस्त झालेलीं होतीं २० आणि तिचे केंस मोकळे सुटले असून रामलक्ष्मणांच्या नांवानें ती आक्रोश करीत चालली होती. हें पहाण्यांत गुंत-ल्यामुळें, हे तात, मला येण्याला इतका उशीर झाला ( आणि रिक्तहस्तीं परत येण्याचें कारण तरी हेंच ). ह्याप्रमाणें वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या २१ सुपार्श्वानें हा

मे सुपार्श्वः प्रत्यवेदयत् । तच्छ्रुत्वापि हि मे बुद्धिर्नासीत्काचित्पराक्रमे २२
अपक्षो हि कथं पक्षी कर्म किंचित्समारभेत् । यत्तु शक्यं मया कर्तुं
वाग्बुद्धिगुणवर्तिना २३ श्रूयतां तत्र वक्ष्यामि भवतां पौरुषाश्रयम् ।
वाङ्मतिभ्यां हि सर्वेषां करिष्यामि प्रियं हि वः २४ यद्धि दाशरथेः कार्यं
मम तन्नात्र संशयः । तद्भवन्तो मतिश्रेष्ठा बलवन्तो मनस्विनः २५
प्रहिताः कपिराजेन देवैरपि दुरासदाः २६ रामलक्ष्मणबाणाश्च विहिताः
कङ्कपत्रिणः । त्रयाणामपि लोकानां पर्याप्तास्त्राणनिग्रहे २७ कामं खलु
दशग्रीवस्तेजोबलसमन्वितः। भवतां तु समर्थानां न किंचिदपि दुष्करम् २८
तदलं कालसङ्गेन क्रियतां बुद्धिनिश्चयः । न हि कर्मसु सज्जन्ते बुद्धि-
मन्तो भवद्विधाः २९ [२२६६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये
आदिकाव्ये किष्किंधाकाण्डे एकोनषष्टितमः सर्गः ॥ ५९ ॥

ततः कृतोदकं स्नातं तं गृध्रं हरियूथपाः । उपविष्टा गिरौ रम्ये परि-
वार्य समन्ततः १ तमङ्गदमुपासीनं तैः सर्वैर्हरिभिर्वृतम् । जनितप्रत्ययो

---

सर्व वृत्तांत मला निवेदन केला; परंतु, तो ऐकून घेऊनही पराक्रम गाजविण्याविषयीं माझ्या मनांत कांहीं एक विचार आला नाहीं २२. कारण, पंख नाहींस झालेला पक्षी कांहीं पराक्रमाचें कृत्य करण्यास प्रवृत्त होणार कसा ? वाणी आणि बुद्धि ह्यांच्या गुणां-वर अवलंबून असलेल्या माझ्या हातून जें होणें शक्य आहे २३ तें तुम्ही श्रवण करा. तें होणें तुमच्या पराक्रमावर अवलंबून आहे. मी फक्त वाणी व मती ह्यांच्या योगानें तुम्हा सर्वांचें प्रिय करीन २४. दशरथपुत्र रामाचें जें कार्य आहे तें माझेंच आहे ह्याबद्दल संशय नाहीं. शिवाय, वानरराज सुग्रीवानें पाठविलेले तुम्ही बुद्धीनें श्रेष्ठ, बलाढ्य व विचारी असून देवांनाही अजिंक्य आहांत २५,२६ आणि कंकपक्ष्यांच्या पंखांनीं युक्त अस-लेले रामलक्ष्मणांचे धनुष्यापासून सुटलेले बाण त्रैलोक्याचें रक्षण व निग्रह करण्यास समर्थ आहेत २७. तेव्हां दशकंठ रावण जरी तेजस्वी व बलाढ्य आहे तरी तुम्हा-समर्थांना कांहींच कठिण नाहीं २८. तस्मात्, आतां कालविलंब पु;( सीतेचा शोध लावण्याविषयीं ) तुम्ही आपल्या मनाचा निश्चय करा. अरे, तुमच्यासारिखे बुद्धिमान् पुरुष कधीं कृत्यांना आळस करीत नाहींत २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रा-मायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला॥५९॥

तदनंतर स्नान करून व भ्रात्याच्या नांवानें पाणी सोडून तो संपाति गृध्र रमणीय पर्वतावर बसला असतां वानरसेनाधिपति त्याच्या सभोंवतीं गराडा देऊन बसले १. तेव्हां त्या सर्व वानरांनीं परिवेष्टित असलेला अंगद तेथें बसला असतांना विश्वास आल्या-

हर्षात्संपातिः पुनरब्रवीत् २ कृत्वा निःशब्दमेकाग्राः शृण्वन्तु हरयो मम । तथ्यं संकीर्तयिष्यामि यथा जानामि मैथिलीम् ३ अस्य विन्ध्यस्य शिखरे पतितोस्मि पुरानघ । सूर्यतापपरीताङ्गो निर्दग्धः सूर्यरश्मिभिः ४ लब्धसंज्ञस्तु षड्रात्राद्विवशो विह्वलन्निव । वीक्षमाणो दिशः सर्वा नाभिजानामि किंचन ५ ततस्तु सागराञ्शैलान्नदीः सर्वाः सरांसि च । वनानि च प्रदेशांश्च निरीक्ष्य मतिरागता ६ हृष्टपक्षिगणाकीर्णः कंदरोदरकूटवान् । दक्षिणस्योदधेस्तीरे विन्ध्योयमिति निश्चितः ७ आसीच्चात्राश्रमं पुण्यं सुरैरपि सुपूजितम् । ऋषिर्निशाकरो नाम यस्मिन्नुग्रतपाभवत् ८ अष्टौ वर्षसहस्राणि तेनास्मिन्नृषिणा गिरौ । वसतो मम धर्मज्ञ स्वर्गते तु निशाकरे ९ अवतीर्य च विन्ध्याग्रात्कृच्छ्रेण विषमाच्छनैः । तीक्ष्णदर्भां वसुमतीं दुःखेन पुनरागतः १० तमृषिं द्रष्टुकामोस्मि दुःखेनाभ्यागतो भृशम् । जटायुषा मया चैव बहुशोधिगतो हि सः ११ तस्याश्रमपदाभ्याशे ववुर्वाताः सुगन्धिनः । वृक्षो नापुष्पितः कश्चिद-

---

मुळें संपाति आनंदानें पुनरपि त्याला ह्मणाला २ "कांहीं एक गडबड न करितां वानरांनीं माझें ह्मणणें ऐकून घ्यावें. मिथिलराजकन्या सीतेचा पत्ता मला कसा लागला हें मी खरें खरें सांगतों ३. हे निष्पापा अंगदा, सूर्याच्या तापानें व्याकुल होऊन सूर्यकिरणांनीं दग्ध झाल्यामुळें पूर्वीं मी ह्या विंध्यपर्वताच्या शिखरावर पडलों ४. अगदीं मूर्च्छित होऊन मी विवळत पडलों असतां सहा दिवसांनंतर मी शुद्धीवर आलों आणि चोहोंकडे पाहूं लागलों तों माझ्या कांहींच ओळखीचें दिसेना ५. तदनंतर सागर, पर्वत, सर्व नद्या, सरोवरें, वनें आणि प्रदेश अवलोकन केल्यावर माझी मति चालूं लागली ६ आणि आनंदित पक्षिसमुदायांनीं व्याप्त, गुहा व शिखरें ह्यांनीं युक्त, आणि दक्षिण समुद्राच्या तीरीं असलेला हा विंध्याद्रि अशी माझी खात्री झाली ७. ह्या ठिकाणीं देवांनाही अत्यंत पूज्य असा एक पवित्र आश्रम होता व त्या आश्रमामध्यें उग्र तपश्चर्या करणारा एक निशाकरनामक ऋषि रहात असे ८. तो धर्मज्ञ निशाकर स्वर्गाला गेल्यानंतर त्या ऋषीवांचून ह्या पर्वतावर वास्तव्य करीत असतांना माझीं आठ हजार वर्षें लोटलीं ९. मी येथें येऊन पडल्यानंतर मोठ्या संकटानें व दुःखानें हळूं हळूं विंध्यशिखरापासून खालीं उतरून तीक्ष्णाग्र दर्भांनीं युक्त असलेल्या पृथ्वीवर पुनरपि येऊन पोंचलों १०. अत्यंत दुःखित झालेल्या मला त्या ऋषींचें दर्शन घेण्याची इच्छा प्राप्त झाली होती. कारण, जटायूनें व मीं त्याची पुष्कळ वेळां सेवा केलेली होती ११. त्याच्या आश्रमस्थानासमीपच सुगंधि

फला वा न दृश्यते १२ उपेत्य चाश्रमं पुण्यं वृक्षमूलमुपाश्रितः । द्रष्टु-
कामः प्रतीक्षे च भगवन्तं निशाकरम् १३ अथ पश्यामि दूरस्थमृषिं
ज्वलिततेजसम् । कृताभिषेकं दुर्धर्षमुपावृत्तमुदङ्मुखम् १४ तमृक्षाः
सृमरा व्याघ्राः सिंहा नानासरीसृपाः । परिवार्योपगच्छन्ति दातारं प्राणिनो
यथा १५ ततः प्राप्तमृषिं ज्ञात्वा तानि सत्त्वानि वै ययुः । प्रविष्टे राजनि
यथा सर्वं सामात्यकं बलम् १६ ऋषिस्तु दृष्ट्वा मां तुष्टः प्रविष्टश्चाश्रमं
पुनः । मुहूर्तमात्रान्निर्गम्य ततः कार्यमपृच्छत १७ सौम्य वैकल्यतां दृष्ट्वा
रोम्णां ते नावगम्यते । अग्निदग्धाविमौ पक्षौ प्राणाश्चापि शरीरके १८
गृध्रौ द्वौ दृष्टपूर्वौ मे मातरिश्वसमौ जवे । गृध्राणां चैव राजानौ भ्रातरौ
कामरूपिणौ १९ ज्येष्ठोऽवितस्त्वं संपाते जटायुरनुजस्तव । मानुषं रूप-
मास्थाय गृह्णीतां चरणौ मम २० किं ते व्याधिसमुत्थानं पक्षयोः पतनं

---

वायु वहात असत आणि पुष्परहित अथवा फलरहित असा एकही वृक्ष तेथें दृष्टीं पडत नसे १२. असो. त्या पवित्र आश्रमासमीप येऊन मी एका वृक्षाखालीं भगवान् निशाकरमुनींच्या दर्शनाची वाट पहात बसलों १३. तेव्हां उज्ज्वल तेजानें युक्त असे ते ऋषि स्नान करून व उत्तरेकडे तोंड करून वळलेले मीं दूर अवलोकन केले. ते ऋषि फारच तेजस्वी असल्यामुळें अनोळखी प्राण्यानें त्यांच्यासमोर जाणेंही अशक्य होतें १४. तथापि, उदार पुरुषाचे भोंवतीं गराडा देऊन ज्याप्रमाणें याचक लोक जात असतात त्याचप्रमाणें ऋक्ष, सृमर, व्याघ्र, सिंह आणि नानाप्रकारचे सर्प त्याला गराडा देऊन चालले होते १५. तदनंतर राजा राजवाड्यामध्यें प्रविष्ट झाला असतां ज्याप्रमाणें अमात्यांसहवर्तमान सर्व सैन्य परत फिरतें त्याप्रमाणें ते निशाकर-ऋषि आश्रमांत प्रविष्ट झाल्याचें समजन आल्यावर सर्वही प्राणी परत गेले १६. येतां येतां मला अवलोकन करितांक्षणीं ते ऋषि संतुष्ट होऊन आश्रमामध्यें गेले; परंतु, एका क्षणांत पुनरपि बाहेर येऊन मला त्यांनीं कार्याविषयीं प्रश्न केला १७. ( ते म्हणाले ) “ हे विनयसंपन्न गृध्रा, केंस विकल झालेले पाहिल्यावर तुम्ही एकाएकीं ओळख पटत नाहीं. हे तुझे पंख अग्नीनें दग्ध झालेले असून शरीरांतील प्राणही दग्ध झाल्यासारिखेच झाले आहेत १८. वेगामध्यें वायूची बरोबरी करणारे असे दोन सामान्य गृध्रच नव्हे परंतु, यथेष्ट रूप धारण करणारे व उभयतां भ्राते असलेले गृध्रांचे राजे पूर्वीं माझ्या अवलोकनांत होते १९. हे संपाते, त्यांतील तूं ज्येष्ठ भ्राता आहेस हें मीं ओळखिलें. जटायु हा तुझा कनिष्ठभ्राता होय. तुम्ही मनुष्यरूप धारण करून माझे पाय धरीत होतां २०. तुला काय व्याधि उत्पन्न झाली आहे, तुझे पंख

कथम् । दण्डो वायं धृतः केन सर्वमाख्याहि पृच्छतः २१ [ २२८७ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

ततस्तद्दारुणं कर्म दुष्करं सहसा कृतम् । आचचक्षे मुनेः सर्वं सूर्यानुगमनं तथा १ भगवन्व्रणयुक्तत्वाल्लज्जया चाकुलेन्द्रियः । परिश्रान्तो न शक्नोमि वचनं परिभाषितुम् २ अहं चैव जटायुश्च संघर्षाद्दर्पमोहितौ । आकाशं पतितौ दूराज्जिज्ञासन्तौ पराक्रमम् ३ कैलासशिखरे बद्ध्वा मुनीनामग्रतः पणम् । रविः स्यादनुयातव्यो यावदस्तं महागिरिम् ४ अप्यावां युगपत्प्राप्तावपश्याव महीतले । रथचक्रप्रमाणानि नगराणि पृथक्पृथक् ५ क्वचिद्वादित्रघोषश्च क्वचिद्भूषणनिःस्वनः । गायन्तीः स्माङ्गना बह्वीः पश्यावो रक्तवाससः ६ तूर्णमुत्पत्य चाकाशमादित्यपदमास्थितौ । आवामालोकयावस्तद्वनं शाद्वलसंस्थितम् ७ उपलैरिव संछन्ना

---

कशान झडले आहेत अथवा हा कोणीं प्रहारच तुझ्यावर केला आहे कीं काय, हें सर्व मी विचारीत आहें तें तूं मला कथन कर २१." ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥६०॥

तदनंतर इंद्रासहवर्तमान युद्ध करणें हें जें दुष्कर व भयंकर कर्म अविचारामुळें झालें होतें तें आणि त्याचप्रमाणें सूर्यासमीप जाणें हें सर्व कृत्य संपातीनें त्या मुनींना कथन केलें १. ( तो ह्मणाला ) " हे भगवन्, इंद्राशीं झालेल्या युद्धामध्यें वज्रप्रहारानें मला जखमा झाल्यामुळें मी थकून गेलों आहें आणि पंख नाहींसे होण्यासारिखें अनुचित कर्म केल्याची लाज वाटत असल्यामुळें माझ्या मनाला कांहीं सुचेनासें झालें. ह्या कारणामुळें जरी मी कांहीं भाषण करण्यास समर्थ नाहीं तथापि कांहीं कांहीं सांगतों २. मी व जटायु गर्वानें मोहित होऊन स्पर्धेनें आकाशामध्यें गेलों आणि ' जो लांब उडून जाईल तो श्रेष्ठ. ' असा पण लावून आपलें सामर्थ्य किती आहे हें पाहूं लागलों ३. कैलासपर्वताच्या शिखरावर ' सूर्य अस्ताचलाला जाण्याचे पूर्वींच त्याला गाठावयाचा. ' असा मुनींच्या समक्ष पण करून ४ आह्मीं एकदम आकाशामध्यें उड्डाण केलें असतां भूतलावरील वेगळीं वेगळीं नगरें रथांच्या चाकांप्रमाणें आह्मांला दिसूं लागलीं ५ आणि वर वर जातांना कोठें वाद्यांचा घोष व कोठें भूषणांचा ध्वनि कानीं पडूं लागला असून कोठें कोठें रक्त वस्त्र परिधान केलेल्या पुष्कळच स्त्रिया गात असतांना आह्मीं अवलोकन केल्या ६. एकदम आकाशामध्यें उडून सूर्यमंडळासमीप आह्मी जाऊं लागलों असतां गवतानें भरलेलें वन जसें

दृश्यते भूः शिलोच्चयैः । आपगाभिश्च संवीता सूत्रैरिव वसुंधरा ८ हिमवांश्चैव विन्ध्यश्च मेरुश्च सुमहागिरिः । भूतले संप्रकाशन्ते नागा इव जलाशये ९ तीव्रः स्वेदश्च खेदश्च भयं चासीत्तदावयोः । समाविशत मोहश्च ततो मूर्छा च दारुणा १० न च दिग्ज्ञायते याम्या न चाग्नेयी न वारुणी । युगान्ते नियतो लोको हतो दग्ध इवाग्निना ११ मनश्च मे हतं भूयश्चक्षुः प्राप्य तु संश्रयम् । यत्नेन महता ह्यस्मिन्मनः संधाय चक्षुषी १२ यत्नेन महता भूयो भास्करः प्रतिलोकितः । तुल्यपृथ्वीप्रमाणेन भास्करः प्रतिभाति नौ १३ जटायुर्मामनापृच्छ्य निपपात महीं ततः । तं दृष्ट्वा तूर्णमाकाशादात्मानं मुक्तवानहम् १४ पक्षाभ्यां च मया गुप्तो जटायुर्न प्रदह्यत । प्रमादात्तत्र निर्दग्धः पतन्वायुपथादहम् १५

दिसतें तसें देशांनीं भरलेलें भूतल आह्मांला दिसूं लागलें. सारांश, भूतलावरील प्रदेश तृणासारिखे आह्मांला सूक्ष्म दिसूं लागले ७. पर्वतांनीं आच्छादित असलेली ही भूमि लहान लहान धोंड्यांनीं आच्छादित झाल्यासारिखी दिसूं लागली आणि त्याचप्रमाणें पृथ्वी वास्तविक नद्यांनीं व्याप्त झाली असतांना ती सुतांनीं व्याप्त झाल्यासारखी दिसूं लागली ८. हिमालय, विंध्य आणि सर्वांत मोठा असा मेरुपर्वत हे सर्व जलाशयामध्यें क्रीडा करीत असलेल्या गजांप्रमाणें दिसूं लागले ९. वर जातां जातां मध्याह्नसमय आला असतां आह्मांला फारच उष्मा भासूं लागला, आह्मी अतिशय थकून गेलों, भयही अतिच वाटूं लागलें, पूर्व कोणती व पश्चिम कोणती हें कांहीं एक समजेनासें झालें आणि नंतर मूर्छाही आली १०. दक्षिण दिशा कोणती तें समजेना, आग्नेय कोणती हें ओळखूं येईना आणि पश्चिम कोणती ह्याचीही अटकळ होईना; सारांश, जगताचा दाह प्रलयकालीं व्हावयाचा हें जरीं ठरलेलें आहे तरी जगत् अग्नीनें दग्ध झाल्याचा आह्मांला तेव्हां अनुभव येऊं लागला ११. माझ्या मनाला तर कांहींच सुचेनासें झालें आणि मनाचाच आधार असा डळमळीत झाल्यावर दृष्टीचीही गति खुंटली १२; तथापि मोठ्या यत्नानें आह्मीं ह्या सूर्यासंबंधानें मन व दृष्टि स्थिर करण्याचा प्रयत्न केला आणि मोठ्या प्रयत्नानें आह्मीं आणखी एकदां सूर्याकडे पाहिलें, तों सूर्य आह्मांला पृथ्वीएवढा मोठा दिसूं लागला[१] १३. जटायु मला कांहीं एक न सांगतां भूमीवर पडला आणि तो पडल्याचें अवलोकन करितांक्षणीं मीही ( त्याच्या रक्षणाकरितां पंख पसरून ) आपलें अंग सोडून दिलें १४. जटायूचें मीं पंखांनीं रक्षण केलें

१ वर जातां जातां सूर्य पृथ्वीएवढा दिसूं लागला असें जें येथें सांगितलें आहे तें विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

आशङ्के तं निपतितं जनस्थाने जटायुषम् । अहं तु पतितो विन्ध्ये दग्धपक्षो जडीकृतः १६ राज्याच्च हीनो भ्रात्रा च पक्षाभ्यां विक्रमेण च । सर्वथा मर्तुमेवेच्छन्पतिष्ये शिखराद्गिरेः १७ [२३०४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्ड एकषष्टितमः सर्गः ॥ ६१ ॥

एवमुक्त्वा मुनिश्रेष्ठमरुदं भृशदुःखितः । अथ ध्यात्वा मुहूर्तं च भगवानिदमब्रवीत् १ पक्षौ च ते प्रपक्षौ च पुनरन्यौ भविष्यतः । चक्षुषी चैव प्राणाश्च विक्रमश्च बलं च ते २ पुराणे सुमहत्कार्यं भविष्यं हि मया श्रुतम् । दृष्टं मे तपसा चैव श्रुत्वा च विदितं मम ३ राजा दशरथो नाम कश्चिदिक्ष्वाकुवर्धनः । तस्य पुत्रो महातेजा रामो नाम भविष्यति ४ अरण्यं च सह भ्रात्रा लक्ष्मणेन गमिष्यति । तस्मिन्नर्थे नियुक्तः सन्पित्रा सत्यपराक्रमः ५ नैर्ऋतो रावणो नाम तस्य भार्यां हरिष्यति । राक्षसेन्द्रो जनस्थाने अवध्यः सुरदानवैः ६ सा च कामैः प्रलोभ्यन्ती

---

असत्यामुळें तो दग्ध झाला नाहीं; परंतु, आकाशांतून पडतां पडतां निष्काळजीपणामुळें मी मात्र दग्ध होऊन गेलों १५. जटायु जनस्थानामध्यें पडला असावा असा माझा अदमास आहे. मी तर पंख जळून गेल्यामुळें ह्या विंध्यपर्वतावर जड गोळा होऊन पडलों १६. सांप्रत मी राज्यापासून भ्रष्ट झालों असून भ्रात्याचा मला वियोग झाला आणि पंख नाहींसे झाले असून माझे ठिकाणीं पराक्रमही राहिलेला नाहीं. ह्यास्तव, सर्वथा मरणाचीच इच्छा धरून मी ह्या पर्वतशिखरावरून खालीं उडी घेतों १७." ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं एकसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

ह्याप्रमाणें अत्यंत दुःखित झालेल्या संपातीनें मुनिश्रेष्ठ निशाकरांना सांगितलें व तो रोदन करूं लागला. तेव्हां क्षणभर विचार करून भगवान् निशाकरमुनि त्याला ह्मणाले १ "तुला मुख्य पक्ष व उपपक्ष पुनरपि दुसरे फुटतील आणि त्याचप्रमाणें चक्षु, प्राण, पराक्रम व बल हींही तुझीं उत्कृष्ट होतील २. पुराणामध्यें पुढें होणारें एक फारच मोठें कार्य मीं श्रवण केलें आहे आणि ज्याप्रमाणें पुराणांत श्रवण करून तें कार्य मला विदित झालें आहे त्याप्रमाणें तपश्चर्येच्या योगानेंही तें मीं अवलोकन केलें आहे ३. इक्ष्वाकुकुलाची कीर्ति वृद्धिंगत करणारा कोणी दशरथ ह्मणून राजा होईल आणि त्याला राम ह्या नांवाचा महातेजस्वी पुत्र होईल ४. तो अमोघपराक्रमी पित्याची आज्ञा झाल्यावरून भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान अरण्यामध्यें जाईल ५; देवदानवांना अवध्य आणि राक्षसांचा अधिपति असा रावणनामक राक्षस त्याची

भक्ष्यैर्भोज्यैश्च मैथिलीं । न भोक्ष्यति महाभागा दुःखमग्ना यशस्विनी ७ परमान्नं च वैदेह्या ज्ञात्वा दास्यति वासवः । यदन्नममृतप्रख्यं सुराणामपि दुर्लभम् ८ तदन्नं मैथिली प्राप्य विज्ञायेन्द्रादिदं त्विति । अग्रमुद्धृत्य रामाय भूतले निर्वापिष्यति ९ यदि जीवति मे भर्ता लक्ष्मणो वापि देवरः । देवत्वं गच्छतोर्वापि तयोरन्नमिदं त्विति १० एष्यन्ति प्रेषितास्तत्र रामदूताः प्लवंगमाः । आख्येया राममहिषी त्वया तेभ्यो विहंगम ११ सर्वथा तु न गन्तव्यमीदृशः क्व गमिष्यसि । देशकालौ प्रतीक्षस्व पक्षौ त्वं प्रतिपत्स्यसे १२ उत्सहेयमहं कर्तुमद्यैव त्वां सपक्षकम् । इहस्थस्त्वं हि लोकानां हितं कार्यं करिष्यसि १३ त्वयापि खलु तत्कार्यं तयोश्च नृपपुत्रयोः । ब्राह्मणानां गुरूणां च मुनीनां वासवस्य च १४ इच्छाम्यहमपि द्रष्टुं भ्रातरौ रामलक्ष्मणौ । नेच्छे चिरं धारयितुं प्राणांस्त्यक्ष्ये

---

भार्या जनस्थानांतून हरण करून नेईल ६ व हरण करून नेल्यानंतर भोग्य वस्तु, भक्ष्य आणि भोज्य पदार्थ ह्यांच्या योगानें तो तिचें मन वळविण्याचाही प्रयत्न करील. तथापि, दुःखामध्यें मग्न झालेली ती महाभाग्यवती यशस्विनी रामपत्नी कांहीं एक खाणार नाहीं ७. तदनंतर विदेहराजकन्या सीता क्षुधित आहे हें जाणून अमृततुल्य आणि देवांनाही दुर्लभ असें परमान्नसंज्ञक अन्न इंद्र तिला देईल ८. तें अन्न "इंद्रापासून हें प्राप्त झालें आहे" असें समजून सीता स्वीकारील आणि प्रथमतः त्यांतील कांहीं अंश काढून रामाच्या उद्देशानें ती भूतलावर अर्पण करील ९ व तें भूतलावर अर्पण करितांना "माझा भर्ता आणि देवर लक्ष्मण जर जिवंत असतील किंवा देवत्व पावले असतील तर त्यांना हें अन्न प्राप्त होवो." असें ती ह्मणेल १०. तेथें सीतेच्या शोधाकरितां पाठविलेले रामदूत वानर येतील. त्यांना, हे पक्ष्या, रामपत्नी सीता कोठें आहे तें तूं निवेदन कर ११. सारांश, कांहीं जरी झालें तरी तुला येथून जातां उपयोगी नाहीं. तूं अशा प्रकारचा असतांना कोठें जाशील ? देश आणि काल ह्यांची तूं वाट पहा ह्मणजे आपोआप तुला पंख प्राप्त होतील १२. तुला आजच्या आजच पक्षयुक्त करण्याचा माझा उद्देश आहे ( परंतु, पक्ष प्राप्त झाल्यावर तूं हें स्थान सोडून जाण्याचा संभव असल्यामुळें कदाचित् देवकार्य तुझ्या हातून होणार नाहीं. ह्यास्तव, सांप्रत मी तसें करीत नाहीं ). तूं येथें राहूनच लोकांना हितावह असें कृत्य करशील १३. तें कार्य साधारण लोकांचेंच नसून श्रेष्ठ ब्राह्मण मुनि, इंद्र आणि ते राजकुमार रामलक्ष्मण ह्यांचेंही आहे आणि तें तुझ्या हातून होण्यास योग्य आहे १४. भ्रात्या रामलक्ष्मणांना अवलोकन करण्याची माझीही

कलेवरम् १५महर्षिस्त्वब्रवीदेवं दृष्टतत्त्वार्थदर्शनः १६[२३२०]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥६२॥

एतैरन्यैश्च बहुभिर्वाक्यैर्वाक्यविशारदः। मां प्रशस्याभ्यनुज्ञाप्य प्रविष्टः स स्वमालयम् १ कंदरात्तु विसर्पित्वा पर्वतस्य शनैः शनैः। अहं विन्ध्यं समारुह्य भवतः प्रतिपालये २ अद्य त्वेतस्य कालस्य वर्षं साग्रशतं गतम्। देशकालप्रतिक्षोस्मि हृदि कृत्वा मुनेर्वचः ३ महाप्रस्थानमासाद्य स्वर्गते तु निशाकरे। मां निर्दहति संतापो वितर्कैर्बहुभिर्वृतम्। उदितां मरणे बुद्धिं मुनिवाक्यैर्निवर्तये ४ बुद्धिर्या तेन मे दत्ता प्राणानां रक्षणे मम। सा मेपनयते दुःखं दीप्तेवाग्निशिखा तमः ५ बुद्ध्यता च मया वीर्यं रावणस्य दुरात्मनः। पुत्रः संतर्जितो वाग्भिर्न त्राता मैथिलीं कथम् ६ तस्या विलपितं श्रुत्वा

---

इच्छा आहे; परंतु, इतका दीर्घकाल लोटेपर्यंत प्राण धारण करून राहण्याची माझी इच्छा नाहीं; ह्मणून मी आता लवकरच ह्या देहाचा त्याग करीन " १५. ह्याप्रमाणें तत्त्वज्ञानसंपन्न झालेल्या त्या निशाकरमहर्षींनीं त्याला सांगितलें १६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पुष्कळ वाक्यांनीं माझी प्रशंसा करून आणि मला निरोप देऊन तें संभाषण करण्यामध्यें श्रेष्ठ असलेले निशाकरमुनि आपल्या निवासस्थानामध्यें प्रविष्ट झाले १. नंतर मी हळू हळू पर्वताच्या गुहेपासून बाहेर निघालों आणि विंध्याचलाच्या शिखरावर आरूढ होऊन तुमची वाट पहात बसलों २. आज त्या गोष्टीला पुरीं पुरीं शेंकडों वर्षे लोटून गेलीं आहेत आणि तेव्हांपासून मी त्या मुनींचें वचन मनांत धरून तुह्मी केव्हां व कोठें दृष्टीं पडतां ह्याची वाट पहात बसलों आहें ३. महाप्रस्थानाचें अवलंबन करून निशाकरमुनि स्वर्गाला चालते झाल्यानंतर अनेक विचारांनीं व्याप्त झालेल्या माझ्या अंगाचा एकसारखा संतापामुळें दाह होत आहे आणि प्राण देण्याचा जो विचार माझ्या मनांत आला होता तो त्या मुनींच्या शब्दावरून मी रहित करून बसलों आहें ४. अग्नीची उज्ज्वल ज्वाला ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करिते त्याप्रमाणें माझ्या प्राणरक्षणाकरितां त्या महर्षींनीं जी मला बुद्धि दिली ती माझ्या दुःखाचा परिहार करीत आहे ५. दुरात्म्या रावणाचें वीर्य ( माझ्या पुत्राच्या वीर्यापेक्षां कमी आहे हें ) मला ठाऊक असल्यामुळें " तूं मैथिलीचें रक्षण कसें केलें नाहींस ? " ह्मणून मीं पुत्राची शब्दांच्या योगानें चांगलीच खरडपट्टी काढिली ६. ('हे रामा, हे लक्ष्मणा,' अशा प्रकारचा )

तौ च सीतावियोजितौ । न मे दशरथस्नेहात्पुत्रेणोत्पादितं प्रियम् ७ तस्य त्वेवं ब्रुवाणस्य संहतैर्वानरैः सह । उत्पेततुस्तदा पक्षौ समक्षं वनचारिणाम् ८ स दृष्ट्वा स्वां तनुं पक्षैरुद्गतैररुणच्छदैः । प्रहर्षमतुलं लेभे वानरांश्चेदमब्रवीत् ९ निशाकरस्य राजर्षेः प्रसादादमितौजसः । आदित्यरश्मिनिर्दग्धौ पक्षौ पुनरुपस्थितौ १० यौवने वर्तमानस्य ममासीद्यः पराक्रमः । तमेवाद्यावगच्छामि बलं पौरुषमेव च ११ सर्वथा क्रियतां यत्नः सीतामधिगमिष्यथ । पक्षलाभो ममायं वः सिद्धिप्रत्ययकारकः १२ इत्युक्त्वा तान्हरीन्सर्वान्संपातिः पतगोत्तमः । उत्पपात गिरेः शृङ्गाज्जिज्ञासुः खगमो गतिम् १३ तस्य तद्वचनं श्रुत्वा प्रतिसंहृष्टमानसाः । बभूवुर्हरिशार्दूला विक्रमाभ्युदयोन्मुखाः १४ अथ पवनसमानविक्रमाः प्लवगवराः प्रतिलब्धपौरुषाः । अभिजिदभिमुखां दिशं ययुर्जनकसुतापरि-

---

तिचा विलाप श्रवण करून आणि अर्थातूच सीतेचा त्यांना वियोग झाला आहे असें ऐकून दशरथाचे ठिकाणीं असलेल्या प्रेमामुळें मला प्रिय अशी जी अवश्य कर्तव्य गोष्ट ती माझ्या पुत्रानें केली नाहीं ७. ह्याप्रमाणें एकत्र जमलेल्या वानरांसहवर्तमान तो संपाति भाषण करीत असतांना त्या वनचर वानरांसमक्ष त्याला पंख फुटले ८. तेव्हां आपलें शरीर नूतन फुटलेल्या अरुणवर्ण पक्षांनीं युक्त झालें आहे असें अवलोकन करून त्या संपातीला अनुपम हर्ष झाला आणि तो वानरांना ह्मणाला ९ " अपरिमित सामर्थ्यवान् निशाकरराजर्षींच्या प्रसादानें सूर्यकिरणांनीं दग्ध झालेले पंख मला पुनरपि फुटले १०, त्यामुळें यौवनावस्थेमध्यें असतांना माझ्या ठिकाणीं जो पराक्रम वसत होता तोच पराक्रम व सामर्थ्य आज मला प्राप्त झालें आहे असें मला वाटतें ११; ह्यास्तव, तुह्मीं सर्वप्रकारें यत्न करा ह्मणजे सीतेचा शोध लागेल. कारण, ( ज्या गोष्टी निशाकरमहर्षींनीं सांगितल्या त्यांपैकीं ) मला, पंखांचा लाभ झाला ही गोष्ट तुमचा प्रयत्न सिद्धीस जाईल असा विश्वास तुमचे ठिकाणीं उत्पन्न करण्यासारखी झाली आहे १२. ह्याप्रमाणें त्या सर्व वानरांना सांगून तो आकाशामध्यें संचार करणारा पक्षिश्रेष्ठ संपाति आपणाला पूर्वीप्रमाणें गति प्राप्त झाली आहे किंवा नाहीं हें पाहण्याकरितां विंध्याचलाच्या शिखरापासून उडून गेला १३. तेव्हां त्याचें भाषण श्रवण करून मनामध्यें संतुष्ट झालेले वानरश्रेष्ठ प्रयत्नसाध्य जो सीताप्राप्तिरूप अभ्युदय तो करून घेण्याविषयीं उद्युक्त झाले १४. सारांश, ( संपातीचें भाषण श्रवण केल्या ) नंतर, गतीनें वायूची बरोबरी करणारे आणि त्याच्या भाषणामुळें धैर्य आलेले ते वानरश्रेष्ठ जनककन्येचा शोध लावण्याविषयीं

मार्गणोन्मुखाः १५ [२३३५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

आख्याता गृध्रराजेन समुत्प्लुत्य प्लवंगमाः। संगताः प्रतिसंयुक्ता विनेदुः सिंहविक्रमाः १ संपातेर्वचनं श्रुत्वा हरयो रावणक्षयम्। हृष्टाः सागरमाजग्मुः सीतादर्शनकाङ्क्षिणः २ अभिगम्य तु तं देशं ददृशुर्भीमविक्रमाः। कृत्स्नं लोकस्य महतः प्रतिबिम्बमवस्थितम् ३ दक्षिणस्य समुद्रस्य समासाद्योत्तरां दिशम्। संनिवेशं ततश्चक्रुर्हरिवीरा महाबलाः ४ प्रसुप्तमिव चान्यत्र क्रीडन्तमिव चान्यतः। क्वचित्पर्वतमात्रैश्च जलराशिभिरावृतम् ५ संकुलं दानवेन्द्रैश्च पातालतलवासिभिः। रोमहर्षकरं दृष्ट्वा विषेदुः कपिकुञ्जराः ६ आकाशमिव दुष्पारं सागरं प्रेक्ष्य वानराः। विषेदुः सहिताः सर्वे कथं कार्यमिति ब्रुवन् ७ विषण्णां वाहिनीं दृष्ट्वा सागरस्य निरीक्षणात्। आश्वासयामास हरीन्भयार्तान्हरिसत्तमः ८

---

उत्सुक होऊन अभिजित् नक्षत्राचे संमुख असलेल्या (दक्षिण) दिशेकडे चालते झाले १५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

गृध्रराज संपातीनें सीतेचा वृत्तांत सांगितला असतां आनंदित झालेले ते सिंहासारखे पराक्रमी वानर उड्या मारून एकत्र जुळले आणि गर्जना करूं लागले १. संपातीचें भाषण श्रवण करितांक्षणीं रावणक्षयाचा उद्देश मनांत धरून सीतेच्या दर्शनाची इच्छा करणारे वानर आनंदित होऊन समुद्राकडे गेले २ आणि त्या सागरतीररूप प्रदेशाला जाऊन पोंचल्यानंतर ज्या ठिकाणीं चंद्रसूर्यप्रभृति ग्रहांसहवर्तमान सर्व द्युलोकाचें पूर्णपणें प्रतिबिंब पडलेलें असतें तो समुद्र त्या भयंकरपराक्रमी वानरांनीं अवलोकन केला ३. नंतर त्या महाबलाढ्य वानरवीरांनीं दक्षिण समुद्राच्या उत्तर तीरावर तळ दिला ४. कोठें कोठें लाटा मुळींच नसल्यामुळें तो समुद्र गाढ निद्रिस्थ झाल्यासारिखा भासत होता, कोठें कोठें लाटा उसळत असल्यामुळें क्रीडा करीत आहे असा दिसत होता, कोठें कोठें पर्वतप्राय जलतरंगांनीं व्याप्त झालेला दिसत होता ५ आणि कोठें कोठें पातालनिवासी दानवाधिपतींनीं तो गजबजून गेलेला होता. अशाप्रकारें शरीरावर रोमांच उठविणारा तो समुद्र अवलोकन करितांक्षणीं वानरश्रेष्ठ मनामध्यें खिन्न झाले ६. सारांश, आकाशाप्रमाणें तो दुस्तर सागर अवलोकन करून सर्व वानर खिन्न झाले, आणि एकत्र जुळून " पुढें काय करावें " म्हणून एकमेकांशीं बोलूं लागले ७. तेव्हां समुद्र अवलोकन करितांक्षणीं वानरसेना

न विषादे मनः कार्यं विषादो दोषवत्तरः । विषादो हन्ति पुरुषं बालं क्रुद्ध
इवोरगः ९ यो विषादं प्रसहते विक्रमे समुपस्थिते । तेजसा तस्य हीनस्य
पुरुषार्थो न सिद्ध्यति १० तस्यां रात्र्यां व्यतीतायामङ्गदो वानरैः सह ।
हरिवृद्धैः समागम्य पुनर्मन्त्रममन्त्रयत् ११ सा वानराणां ध्वजिनी परि-
वार्याङ्गदं बभौ । वासवं परिवार्येव मरुतां वाहिनीस्थितम् १२ कोऽन्यस्तां
वानरीं सेनां शक्तः स्तम्भयितुं भवेत् । अन्यत्र वालितनयादन्यत्र च हनू-
मतः १३ ततस्तान्हरिवृद्धांश्च तच्च सैन्यमरिन्दमः । अनुमान्याङ्गदः श्रीमा-
न्वाक्यमर्थवदब्रवीत् १४ क इदानीं महातेजा लङ्घयिष्यति सागरम् । कः
करिष्यति सुग्रीवं सत्यसंधमरिंदमम् १५ को वीरो योजनशतं लङ्घयेत
प्लवंगमः । इमांश्च यूथपान्सर्वान्मोचयेत्को महाभयात् १६ कस्य
प्रसादाद्दारांश्च पुत्रांश्चैव गृहाणि च । इतो निवृत्ताः पश्येम सिद्धार्थाः
सुखिनो वयम् १७ कस्य प्रसादाद्रामं च लक्ष्मणं च महाबलम् ।
अभिगच्छेम संहृष्टाः सुग्रीवं च वनौकसम् १८ यदि कश्चित्समर्थो वः

---

खिन्न झालेली पाहून भयभीत झालेल्या वानरांना वानरश्रेष्ठ अंगद धीर देऊं लागला ८. ( तो म्हणाला ) " तुम्ही मनामध्यें खेद करूं नका; खेद हा फार वाईट आहे. कारण, क्रुद्ध झालेला सर्प ज्याप्रमाणें बालकाचा घात करितो त्याप्रमाणें खेद पुरुषाचा घात करितो ९. पराक्रम करण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां जो पुरुष विचार न करितां खिन्न होऊन बसतो त्या तेजोहीन पुरुषाचा मनोरथ कधींही सिद्धीस जात नाहीं" १०. असो. ती रात्र निघून गेल्यानंतर वृद्ध वृद्ध वानरांसहवर्तमान अंगद पुनरपि मसलत करूं लागला ११. सारांश, मरुद्गणांच्या सैन्यामध्यें बसलेला इंद्रच कीं काय अशा रीतीनें शोभत असलेल्या अंगदाचे भोंवतीं गराडा देऊन वानरांची ती सर्व सेना बसली १२. कारण, वालिपुत्र अंगद आणि हनुमान् ह्यांवांचून ती वानरी सेना आंवरून धरण्याला दुसरा कोण बरें समर्थ झाला असता ? १३. असो. तदनंतर त्या वृद्ध वृद्ध कपींचें आणि त्या सैन्याचें अनुमोदन घेऊन शत्रूला जेरीस आणणारा वैभवशाली अंगद मुद्देसूत भाषण करूं लागला १४. (तो म्हणाला ) "ह्या वेळेस कोण महातेजस्वी वानर समुद्राचें उल्लंघन करील आणि शत्रुदमन करणाऱ्या सुग्रीवाला सत्यप्रतिज्ञ कोण करील ! १५. कोणता बरें वीर वानर शंभर योजनें समुद्र ओलांडून जाईल आणि ह्या सर्व वानरसेनाधिपतींना मोठ्या भयापासून कोण बरें मुक्त करील ? १६. कोणाच्या बरें प्रसादामुळें भार्या, पुत्र व गृहें आपण, येथून मनोरथ परिपूर्ण होऊन परत गेल्यावर, सुखानें अवलोकन करूं ? १७. कोणाच्या बरें प्रसादामुळें आम्हाला आनंदानें महा-

सागरप्लवने हरिः । स ददात्विह नः शीघ्रं पुण्यामभयदक्षिणाम् १९
अङ्गदस्य वचः श्रुत्वा न कश्चित्किंचिदमब्रवीत् । स्तिमितेवाभवत्सर्वा
सा तत्र हरिवाहिनी २० पुनरेवाङ्गदः प्राह तान्हरीन्हरिसत्तमः २१ सर्वे
बलवतां श्रेष्ठा भवन्तो दृढविक्रमाः । व्यपदेशकुले जाताः पूजिताश्चाप्य-
भीक्ष्णशः २२ न हि वो गमने सङ्गः कदाचित्कस्यचिद्भवत् । ब्रुवध्वं
यस्य या शक्तिः प्लवने प्लवगर्षभाः २३ [२३५८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥ ६४ ॥
अथाङ्गदवचः श्रुत्वा ते सर्वे वानरर्षभाः । स्वं स्वं गतौ समुत्साहमू-
चुस्तत्र यथाक्रमम् १ गजो गवाक्षो गवयः शरभो गन्धमादनः । मैन्दश्च
द्विविदश्चैव अङ्गदो जाम्बवांस्तथा २ आबभाषे गजस्तत्र प्लवेयं दशयो-
जनम् । गवाक्षो योजनान्याह गमिष्यामीति विंशतिम् ३ शरभो वान-
रस्तत्र वानरांस्तानुवाच ह । त्रिंशतं तु गमिष्यामि योजनानां प्लवंगमाः ४
ऋषभो वानरस्तत्र वानरांस्तानुवाच ह । चत्वारिंशद्गमिष्यामि योजनानां न

---

बलाढ्य राम, लक्ष्मण आणि वनचर सुग्रीव यांचे समीप जातां येईल ? १८. तुह्मां-पैकीं जर कोणी वानर समुद्राचें उल्लंघन करून जाण्याविषयीं समर्थ असेल तर त्यानें येथल्या येथें आह्मांला सत्वरच पवित्र अशी अभयदक्षिणा द्यावी " १९. हें अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर कोणीही वानर कांहीं एक बोलेना. ती सर्वही वानरसेना तेथें जशी कांहीं स्तिमित होऊन राहिली २०. तेव्हां पुनरपि वानरश्रेष्ठ अंगद त्या वानरांना ह्मणाला २१ " तुह्मी सर्वही बलवानांमध्यें श्रेष्ठ असून सर्वही महापराक्रमी आहांत. इतकेंच नव्हे; परंतु, सर्वही निष्कलंक कुळामध्यें उत्पन्न झालेले असून पराक्रमासंबंधानें तुह्मी सर्व वारंवार प्रशंसेसही पात्र झालां आहांत २२. तात्पर्य, तुह्मांपैकीं कोणाचीही गति कधींही कुंठित होत नाहीं. ह्यास्तव, हे वानरश्रेष्ठहो, मार्ग उल्लंघन करून जाण्याविषयीं आपआपल्या सामर्थ्याला अनुसरून तुह्मी काय तें सांगा २३." ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६४ ॥

नंतर अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर ते सर्वही वानरश्रेष्ठ गतीसंबंधानें अनुक्रमें आपआपलें सामर्थ्य कथन करूं लागले १. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, अंगद आणि जांबवान् ह्यांनीं आपआपलें सामर्थ्य कथन केलें २. पैकीं गज ह्मणाला " मी दहा योजनें उडी मारीन. ", गवाक्ष ह्मणाला " मी वीस योजनें मारीन " ३. हें ऐकून शरभवानर तेथें जुळलेल्या वानरांना ह्मणाला " हे वानरहो,

संशयः ५ वानरांस्तु महातेजा अब्रवीद्गन्धमादनः । योजनानां गमिष्यामि
पञ्चाशत्तु न संशयः ६ मैन्दस्तु वानरस्तत्र वानरांस्तानुवाच ह । योजनानां
परं षष्टिमहं प्लवितुमुत्सहे ७ ततस्तत्र महातेजा द्विविदः प्रत्यभाषत । गमि-
ष्यामि न संदेहः सप्ततिं योजनान्यहम् ८ सुषेणस्तु महातेजाः सत्त्ववा-
न्कपिसत्तमः । अशीतिं प्रतिजानेहं योजनानां पराक्रमे ९ तेषां कथयतां
तत्र सर्वांस्ताननुमान्य च । ततो वृद्धतमस्तेषां जाम्बवान्प्रत्यभाषत १०
पूर्वमस्माकमप्यासीत्कश्चिद्गतिपराक्रमः । ते वयं वयसः पारमनुप्राप्ताः स्म
सांप्रतम् ११ किं तु नैवं गते शक्यमिदं कार्यमुपेक्षितुम् । यदर्थं कपि-
राजश्च रामश्च कृतनिश्चयौ १२ सांप्रतं कालमस्माकं या गतिस्तां
निबोधत । नवतिं योजनानां तु गमिष्यामि न संशयः १३ तांश्च सर्वा-
न्हरिश्रेष्ठाञ्जाम्बवानिदमब्रवीत् । न खल्वेतावदेवासीद्गमने मे पराक्रमः १४
मया वैरोचने यज्ञे प्रभविष्णुः सनातनः । प्रदक्षिणीकृतः पूर्वं क्रममाण-
स्त्रिविक्रमः १५ स इदानीमहं वृद्धः प्लवने मन्दविक्रमः । यौवने च तदा-

मी तीस योजनें उड्डाण करीन " ४. तदनंतर ऋषभवानर त्या वानरांना ह्मणाला "मी एका उडीसरसा चाळीस योजनें निःसंशय जाइन " ५. नंतर महातेजस्वी गंधमादन वानरांना ह्मणाला " मी पन्नास योजनें उडी मारीन ह्यांत संशय नाहीं" ६. तदनंतर मैंदवानर तेथें जुळलेल्या वानरांना ह्मणाला " माझ्या अंगीं साठ योजनें उल्लंघून जाण्याचें सामर्थ्य आहे " ७. तें ऐकून महातेजस्वी द्विविद ह्मणाला " मी सत्तर योजनें उडी मारीन ह्यांत संदेह नाहीं " ८. तेव्हां महातेजस्वी व धैर्यवान् वानरश्रेष्ठ सुषेण ह्मणाला " गमनाविषयीं ऐंशीं योजनांची तर मी प्रतिज्ञाच करितों "९. ह्याप्रमाणें ते वानर सांगत असतांना त्या सर्वांना अनुमोदन देऊन त्यांतील सर्वांत श्रेष्ठ जांबवान् ह्मणाला १० " पूर्वी आमच्याही अंगांत बरीच लांब उडी मारण्याचा कांहीं पराक्रम होता; परंतु, सांप्रत आमच्या वयाची अगदीं पराकाष्ठा झालेली आहे ११. तथापि, असा जरी प्रकार आहे तरी ज्या कार्याकरितां वानरराज सुग्रीव आणि राम ह्यांचा निश्चय झालेला आहे त्या ह्या कार्याची उपेक्षा करणें योग्य नाहीं १२. तस्मात्, सांप्रतकालीं गमनाविषयीं आमचें काय सामर्थ्य आहे हें तुह्मी ऐकून घ्या. मी अद्यापिही नव्वद योजनें उडी मारीन ह्यांत संशय नाहीं " १३. ह्यानंतर त्या सर्व वानरश्रेष्ठांना जांबवान् पुनरपि ह्मणाला " गमनाविषयीं माझें सामर्थ्य कांहीं येवढेंच नव्हतें १४. विरोचनपुत्र बलि यज्ञ करण्यास उद्युक्त झाला असतांना जयशील असा जो विष्णु तो पूर्वी जेव्हां तीन पायांनीं त्रैलोक्य

सीन्मे बलमप्रतिमं परम् १६ संप्रत्येतावदेवाद्य शक्यं मे गमने स्वतः।
नैतावता च संसिद्धिः कार्यस्यास्य भविष्यति १७ अथोत्तरमुदारार्थम-
ब्रवीदङ्गदस्तदा। अनुमान्य तदा प्राज्ञो जाम्बवन्तं महाकपिम् १८ अह-
मेतद्गमिष्यामि योजनानां शतं महत्। निवर्तने तु मे शक्तिः स्यान्न वेति
न निश्चितम् १९ तमुवाच हरिश्रेष्ठं जाम्बवान्वाक्यकोविदः। ज्ञायते
गमने शक्तिस्तव हर्यृक्षसत्तम २० कामं शतसहस्रं वा नह्येष विधिरु-
च्यते। योजनानां भवाञ्छक्तो गन्तुं प्रतिनिवर्तितुम् २१ न हि प्रेषयिता
तात स्वामी प्रेष्यः कथंचन। भवतायं जनः सर्वः प्रेष्यः प्लवगसत्तम २२
भवान्कलत्रमस्माकं स्वामिभावे व्यवस्थितः। स्वामी कलत्रं सैन्यस्य
गतिरेषा परंतप २३ अपि वै तस्य कार्यस्य भवान्मूलमरिंदम। तस्मात्क-
लत्रवत्तात प्रतिपाल्यः सदा भवान् २४ मूलमर्थस्य संरक्ष्यमेष कार्य-

---

व्याप्त करूं लागला तेव्हां मीं त्याला प्रदक्षिणा केलेली आहे १५. परंतु, सांप्रत मी वृद्ध झालों असल्यामुळें गमनाविषयीं माझें सामर्थ्य कमी झालें आहे. त्या वेळीं यौवनावस्थेमध्यें माझ्या ठिकाणीं मोठें अप्रतिम सामर्थ्य होतें १६. सांप्रत एका उडीसरसें काय तें नव्वद योजनेंच उल्लंघून जाण्याचें माझें सामर्थ्य आहे; परंतु, येवढ्यानें ह्या कार्याची सिद्धि होणार नाहीं" १७. ह्यानंतर जांबवानाला अनुमोदन देऊन अंगदानें उदार अर्थानें भरलेलें असें भाषण केलें. सारांश, ज्ञानी अंगद महा-कपि जांबवानाचें ह्मणणें मान्य करून ह्मणाला १८ "मीही प्रचंड शंभर योजनें उडून जाईन; परंतु, फिरून परत येण्याला माझें अंगीं सामर्थ्य राहील किंवा नाहीं ह्याची खात्री वाटत नाहीं" १९. ह्यावर वानरश्रेष्ठ अंगदाला संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला जांबवान् ह्मणाला "हे ऋक्षवानरश्रेष्ठा, गमनाविषयीं तुझें सामर्थ्य किती आहे हें मी जाणीत आहें २०. तूं शंभर अथवा हजार योजनेंही जाऊन परत येण्यास समर्थ आहेस; परंतु, असें करणें योग्य नाहीं २१. कारण, बा अंगदा, दुस-ऱ्यांना पाठविणारा जो स्वामी त्यालाच इतरांनीं पाठविणें योग्य नाहीं. हे वानरश्रेष्ठा, हा सर्वही वानरसमुदाय, तुझा सेवक आहे २२. स्वामी ह्या नात्यानें असलेला तूं आह्माला भार्येच्या स्थानीं आहेस (ह्मणजे जिवंत जीव आहे तोंपर्यंत पतीनें ज्याप्र-माणें भार्येचें रक्षण करणें योग्य आहे त्याप्रमाणें आह्मी सर्व वानरांनीं जिवंत जीव आहे तोंपर्यंत तुझें रक्षण करणें योग्य आहे). तात्पर्य, हे शत्रुतापना, स्वामी हीच सैन्याची भार्या होय. तोच सैन्याचा आधार आहे २३. हे शत्रुदमना, तें कार्य सिद्धीस जाण्याला मुख्य आधार तूंच आहेस. तस्मात्, बा अंगदा, भार्येप्रमाणें

विदां नयः । मूले हि सति सिद्ध्यन्ति गुणाः सर्वे फलोदयाः २५ तद्भवानस्य कार्यस्य साधनं सत्यविक्रम । बुद्धिविक्रमसंपन्नो हेतुरत्र परंतप २६ गुरुश्च गुरुपुत्रश्च त्वं हि नः कपिसत्तम । भवन्तमाश्रित्य वयं समर्था ह्यर्थसाधने २७ उक्तवाक्यं महाप्राज्ञं जाम्बवन्तं महाकपिः । प्रत्युवाचोत्तरं वाक्यं वालिसूनुरथाङ्गदः २८ यदि नाहं गमिष्यामि नान्यो वानरपुंगवः । पुनः खल्विदमस्माभिः कार्यं प्रायोपवेशनम् २९ न ह्यकृत्वा हरिपतेः संदेशं तस्य धीमतः । तत्रापि गत्वा प्राणानां न पश्ये परिरक्षणम् ३० स हि प्रसादे चात्यर्थं कोपे च हरिरीश्वरः । अतीत्य तस्य संदेशं विनाशो गमने भवेत् ३१ तत्तथा ह्यस्य कार्यस्य न भवत्यन्यथा गतिः । तद्भवानेव दृष्टार्थः संचिन्तयितुमर्हति ३२ सोऽङ्गदेन तदा वीरः प्रत्युक्तः प्लवगर्षभः । जाम्बवानुत्तमं वाक्यं प्रोवाचेदं ततोऽङ्गदम् ३३

---

आह्माला तुझें सर्वदा रक्षण केलें पाहिजे २४. कोणत्याही गोष्टीचें मूळ रक्षण करून ठेविलें पाहिजे, असा कार्यवेत्त्या पुरुषांचा न्याय आहे. कारण, मूळ जर कायम असल तर इतर सर्व किरकोळ गोष्टी सिद्धीस जातात २५. तस्मात्, हे अमोघपराक्रमी शत्रुतापना अंगदा, बुद्धि आणि पराक्रम ह्यांनीं संपन्न असलेला तूच ह्या कार्यसिद्धीचें साधन व मूळ आहेस २६. हे वानरश्रेष्ठा, तूं आमचा गुरु असून गुरुपुत्रही आहेस आणि ह्मणूनच तुझा आश्रय धरून आह्मी कोणतीही गोष्ट सिद्धीस नेण्यास समर्थ आहोंत " २७. ह्याप्रमाणें महाबुद्धिमान् जांबवान् अंगदाशीं भाषण करून स्वस्थ बसला असतां महाकपि वालिपुत्र अंगदानें त्याला उत्तर केलें कीं २८, मी जर गेलों नाहीं तर समुद्र उल्लंघून जाण्यास समर्थ असा दुसरा कोणीही वानरश्रेष्ठ नाहीं. तेव्हां पुनरपि हें प्रायोपवेशनच आह्मांला करणें भाग येईल २९. कारण, त्या विचारी वानरराज सुग्रीवाची आज्ञा आपल्या हातून शेवटास गेली नाहीं तर प्राणाचें रक्षण होण्याचा संभव मला दिसत नाहीं आणि लंकेमध्यें जरी मी गेलों तरी पुनरपि परत येण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें प्राणरक्षण होईल असें मला वाटत नाहीं ३०. सारांश, एकाद्यावर कृपा करण्याविषयीं आणि एकाद्यावर अत्यंत क्रुद्ध होण्याविषयीं तो सुग्रीववानर समर्थ आहे. तेव्हां त्याच्या आज्ञेचें उल्लंघन करून आपण किष्किंधानगरींत गेलों असतां आपला घात हा होणारच ३१. तात्पर्य, हें समुद्रलंघनरूप कार्य सिद्धीस जाईल अशा रीतीनें तूंच अनुभवी असल्यामुळें कांहीं उपाय शोधून काढावास हें योग्य आहे " ३२. ह्याप्रमाणें अंगदानें त्या वीर वानरश्रेष्ठ जांबवानाला सांगितलें असतां जांबवानानें अशा रीतीनें अंगदाशीं उत्कृष्ट भाषण

तस्य ते वीर कार्यस्य न किंचित्परिहास्यते । एष संचोदयाम्येनं यः कार्यं साधयिष्यति ३४ ततः प्रतीतं प्लवतां वरिष्ठमेकान्तमाश्रित्य सुखोपविष्टम् । संचोदयामास हरिप्रवीरो हरिप्रवीरं हनुमन्तमेव ३५ [२३९३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

अनेकशतसाहस्रीं विषण्णां हरिवाहिनीम् । जाम्बवान्समुदीक्ष्यैवं हनूमन्तमथाब्रवीत् १ वीर वानरलोकस्य सर्वशास्त्रविदां वर । तूष्णीमेकान्तमाश्रित्य हनूमन्किं न जल्पसि २ हनूमन्हरिराजस्य सुग्रीवस्य समो ह्यसि। रामलक्ष्मणयोश्चापि तेजसा च बलेन च ३ अरिष्टनेमिनः पुत्रो वैनतेयो महाबलः । गरुत्मानिव विख्यात उत्तमः सर्वपक्षिणाम् ४ बहुशो हि मया दृष्टः सागरे स महाबलः । भुजंगानुद्धरन्पक्षी महाबाहुर्महाबलः ५ पक्षयोर्यद्बलं तस्य भुजवीर्यबलं तव । विक्रमश्चापि तेजश्च न ते तेनापहीयते ६ बलं बुद्धिश्च तेजश्च सत्त्वं च हरिपुंगव । विशिष्टं सर्वभूतेषु किमात्मानं

---

केलें ३३. ( तो ह्मणाला ) " हे वीरा, तुझ्या ह्या कार्यांत कांहीं कमी पडणार नाहीं. हें कार्य जो सिद्धीस नेणारा आहे त्याला हा मी आतांच सांगतों " ३४. ह्याप्रमाणें अंगदाला सांगितल्यानंतर उडी मारणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ ह्मणून कसोटीला उतरलेल्या आणि एकांत स्थलाचा आश्रय करून स्वस्थ बसलेल्या वानरश्रेष्ठ हनुमानाशीं वानरवीर जांबवान् भाषण करूं लागला ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडांपैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

अनेक लक्ष वीरांनीं युक्त असलेली ती वानरसेना खिन्न झालेली अवलोकन करून जांबवान् हनूमानाला ह्मणाला १ " हे वीरा हनुमाना, तूं सर्व शास्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असतांना एकांताचा आश्रय करून स्वस्थ बसला आहेस आणि वानरांच्या कर्तव्यासंबंधानें कांहींच भाषण करीत नाहींस हें काय ? २. हे हनुमाना, तेज आणि बल ह्यांच्या योगानें तूं वानरराज सुग्रीव आणि रामलक्ष्मण ह्यांची बरोबरी करणारा आहेस ३. काश्यपांचा पुत्र जो महाबलाढ्य वैनतेय गरुड सर्व पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें तूं सर्वोत्तम ह्मणून विख्यात आहेस ४. तो महापराक्रमी व महाबलाढ्य गरुडपक्षी भुजंगांना उचलून सागर ओलांडून जात असतांना मीं अनेक वेळां पाहिला आहे ५ आणि त्याच्या पक्षांचे ठिकाणीं जें सामर्थ्य आहे तेंच सामर्थ्य तुझ्या बाहूंचेही ठिकाणीं आहे; तस्मात् , पराक्रम आणि तेज ह्यांसंबंधानें तूं त्या गरुडापेक्षां कमी नाहींस ६ हे वानरश्रेष्ठा, बल, बुद्धि, तेज आणि धैर्य हीं तुझे ठिकाणीं

न सज्जसे ७ अप्सराप्सरसां श्रेष्ठा विख्याता पुञ्जिकस्थला । अञ्जनेति
परिख्याता पत्नी केसरिणो हरेः ८ विख्याता त्रिषु लोकेषु रूप-
णाप्रतिमा भुवि । अभिशापादभूत्तात कपित्वे कामरूपिणी ९ दुहिता
वानरेन्द्रस्य कुञ्जरस्य महात्मनः । मानुषं विग्रहं कृत्वा रूपयौ-
वनशालिनी १० विचित्रमाल्याभरणा कदाचित्क्षौमधारिणी । अचर-
त्पर्वतस्याग्रे प्रावृडम्बुदसंनिभे ११ तस्या वस्त्रं विशालाक्ष्याः पीतं रक्त-
दशं शुभम् । स्थितायाः पर्वतस्याग्रे मारुतोऽपहरच्छनैः १२ स ददर्श
ततस्तस्या वृत्तावूरू सुसंहितौ । स्तनौ च पीनौ सहितौ सुजातं चारु
चाननम् १३ तां बलादायतश्रोणीं तनुमध्यां यशस्विनीम् । दृष्ट्वैव शुभ-
सर्वाङ्गीं पवनः काममोहितः १४ स तां भुजाभ्यां दीर्घाभ्यां पर्यष्वजत
मारुतः । मन्मथाविष्टसर्वाङ्गो गतात्मा तामनिन्दिताम् १५ सा तु तत्रैव
संभ्रान्ता सुव्रता वाक्यमब्रवीत् । एकपत्नीव्रतमिदं को नाशयितुमिच्छति १६

असल्यामुळें सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या स्वतःला तूं समुद्रलंघनाविषयीं कां बरें सज्ज करीत नाहींस ? ७. अप्सरांमध्यें श्रेष्ठ आणि पुंजिकस्थला ह्या नांवानें विख्यात अशी जी अप्सरा होती तीच केसरीनामक वानराची अंजना ह्या नांवाची पत्नी होती ८. ती रूपानें सर्व पृथ्वींत अप्रतिम असून त्रैलोक्यामध्यें विख्यात होती. बा हनुमाना, ऋषीच्या शापामुळें तिला जरी वानरीचा जन्म प्राप्त झाला होता तरी त्या वानर-जन्मामध्येंही तिला स्वच्छंदप्रमाणें रूप धारण करण्याचें सामर्थ्य होतें ९. महात्म्या कुंजरनामक वानराधिपतीची ती कन्या एकदां मनुष्यरूप धारण करून पर्जन्यकालच्या मेघांप्रमाणें दिसत असलेल्या पर्वतशिखरावर संचार करीत होती, रूप आणि यौवन ह्यांच्या योगानें ती झळकत होती, अद्भुत पुष्पें आणि भूषणें तिनें धारण केलीं होतीं आणि ती पैठणी नेसली होती १०, ११. ह्याप्रमाणें ती विशालनयना स्त्री पर्वतशि-खरावर असतांना आरक्तवर्ण दशांनीं युक्त व शुभ असें तिचें पीत वस्त्र हळू हळू वायूनें उडविलें १२ आणि नंतर तिच्या चांगल्या घट्ट व गरगरीत मांड्या, पुष्ट आणि एकमेकांला लागलेले स्तन व आकृतीनें उत्कृष्ट आणि दिसण्यांतही सुंदर असें मुख त्यानें अवलोकन केलें १३ व जिचा जघनप्रदेश विस्तृत आहे, जिचा मध्यभाग कृश आहे आणि जिचे सर्व अवयव उत्कृष्ट आहेत अशा त्या स्त्रीला अवलोकन करितां-क्षणीं वायु मदनानें अतिशयच मोहित झाला १४. इतकेंच नव्हे; परंतु, आपल्या दीर्घ बाहूंनीं त्यानें तिला आलिंगनही दिलें आणि मदनानें ज्याचें सर्व शरीर व्याप्त झालें आहे अशा वायूनें त्या निर्दोष स्त्रीच्या गर्भाशयामध्यें आपलें तेज प्रविष्ट केलें १५.

अञ्जनाया वचः श्रुत्वा मारुतः प्रत्यभाषत । न त्वां हिंसामि सुश्रोणि
माभूत्ते मनसो भयम् १७ मनसास्मि गतो यत्त्वां परिष्वज्य यशस्विनि ।
वीर्यवान्बुद्धिसंपन्नस्तव पुत्रो भविष्यति १८ महासत्त्वो महातेजा महा-
बलपराक्रमः । लङ्घने प्लवने चैव भविष्यति मया समः १९ एवमुक्ता
ततस्तुष्टा जननी ते महाकपे । गुहायां त्वां महाबाहो प्रजज्ञे प्लवगर्षभ २०
अभ्युत्थितं ततः सूर्यं बालो दृष्ट्वा महावने । फलं चेति जिघृक्षुस्त्वमुत्प-
त्याभ्युत्पतो दिवम् २१ शतानि त्रीणि गत्वाथ योजनानां महाकपे ।
तेजसा तस्य निर्धूतो न विषादं गतस्ततः २२ त्वामप्युपगतं तूर्णमन्तरिक्षं
महाकपे । क्षिप्तमिन्द्रेण ते वज्रं कोपाविष्टेन तेजसा २३ तदा शैलाग्र-
शिखरे वामो हनुरभज्यत । ततोभिनामधेयं ते हनुमानिति कीर्तितम् २४
ततस्त्वां निहतं दृष्ट्वा वायुर्गन्धवहः स्वयम् । त्रैलोक्यं भृशसंक्रुद्धो न
ववौ वै प्रभञ्जनः २५ संभ्रान्ताश्च सुराः सर्वे त्रैलोक्ये क्षुभिते सति ।

---

तेव्हां तेथल्या तेथेंच ती पतिव्रता स्त्री गोंधळून गेली आणि ह्मणाली " माझें हें पाति-व्रत्य भ्रष्ट करण्याची कोण इच्छा करीत आहे ? " १६. हें अंजनेचें भाषण श्रवण करून वायु ह्मणाला " हे सुंदरि, मी तुझा घात करीत नाहीं; तूं मनामध्यें भय बाळगूं नकोस १७. हे यशस्विनि, तुला आलिंगन देऊन ज्याअर्थीं मीं मानसिक भोगाच्याच योगानें तुझ्या गर्भाशयामध्यें आपलें तेज ठेविलें आहे त्याअर्थीं तुला वीर्यवान् आणि बुद्धिमान् पुत्र होईल १८. तो पुत्र महाधैर्यवान् , महातेजस्वी, महाबलाढ्य व महा-पराक्रमी होऊन मार्ग उल्लंघून जाण्यांत आणि उडी मारण्यांत माझी बरोबरी करील " १९. हे महाकपे, ह्याप्रमाणें वायूनें तुझ्या मातेला सांगितलें असतां ती संतुष्ट झाली आणि, हे महापराक्रमी वानरश्रेष्ठा, गुहेमध्यें ती तुला प्रसवली २०. नंतर महावनामध्यें सूर्य उदयाचलास आलेला पाहतांक्षणीं हें फल आहे असें समजून तें तुज बालाला घेण्याची इच्छा झाली आणि उडी मारून तूं तें घेण्याकरितां स्वर्गा-मध्यें गेलास २१. हे महाकपे, तीनशें योजनें जरी तूं उडी मारून अंतरिक्षांत गेला होतास आणि रवीच्या तेजानें जरी ग्रस्त झाला होतास तरी वायूच्या साम-र्थ्यामुळें तुला ग्लानि आली नाहीं २२. हे महाकपे, तूं अंतरिक्षामध्यें प्राप्त झाला आहेस असें अवलोकन करून तुझ्या तेजानें क्रुद्ध झालेल्या इंद्रानें तुझ्या शरीरावर वज्र फेकिलें २३. तेव्हां पर्वताच्या उच्च शिखरावर तुझा डावा हनु ह्मणजे गुडघा मोडला आणि ह्मणूनच तेव्हांपासून हनूमान् असें तुझें नांव लोकांनीं ठेविलें २४. तदनंतर तुला वज्रप्रहार झाल्यानें पाहून गंध वहाणारा वायु स्वतः अत्यंत

प्रसादयन्ति संक्रुद्धं मारुतं भुवनेश्वराः २६ प्रसादिते च पवने ब्रह्मा तुभ्यं वरं ददौ । अशस्त्रवध्यतां तात समरे सत्यविक्रम २७ वज्रस्य च निपातेन विरुजं त्वां समीक्ष्य च । सहस्रनेत्रः प्रीतात्मा ददौ ते वरमुत्तमम् २८ स्वच्छन्दतश्च मरणं तव स्यादिति वै प्रभो । स त्वं केसरिणः पुत्रः क्षेत्रजो भीमविक्रमः २९ मारुतस्यौरसः पुत्रस्तेजसा चापि तत्समः । त्वं हि वायुसुतो वत्स प्लवने चापि तत्समः ३० वयमद्य गतप्राणा भवानस्मासु सांप्रतम् । दाक्ष्यविक्रमसंपन्नः कपिराज इवापरः ३१ त्रिविक्रमे मया तात सशैलवनकानना । त्रिःसप्तकृत्वः पृथिवी परिक्रान्ता प्रदक्षिणम् ३२ तदा चौषधयोस्माभिः संचिता देवशासनात् । निर्मथ्यममृतं याभिस्तदानीं नो महद्बलम् ३३ स इदानीमहं वृद्धः परिहीनपराक्रमः । सांप्रतं कालमस्माकं भवान्सर्वगुणान्वितः ३४ तद्विजृम्भस्व विक्रान्त प्लवतामुत्तमो ह्यसि । त्वद्वीर्यं द्रष्टुकामा हि सर्वा वानरवा-

---

क्रुद्ध झाला आणि त्रैलोक्यामध्यें संचार करीनासा झाला २५. तेव्हां त्रैलोक्य क्षुब्ध झालें असतां भुवनाधिपति सर्व देव अगदीं घाबरून गेले आणि क्रुद्ध झालेल्या वायूला प्रसन्न करून घेऊं लागले २६. ह्याप्रमाणें देवांनीं वायूला प्रसन्न करून घेतलें असतां, बा अमोघपराक्रमी हनुमाना, "समरांगणामध्यें शस्त्राच्या योगानें तुझा वध होणार नाहीं." असा ब्रह्मदेवानें तुला वर दिला २७ आणि वज्रप्रहार झाला असतांही तुला कांहीं एक इजा झाली नाहीं असें अवलोकन करून इंद्राचें मन प्रसन्न झालें आणि, हे प्रभो, "तू इच्छामरणी होशील." असा त्यानें तुला उत्कृष्ट वर दिला. सारांश, भयंकर पराक्रम करणारा तूं केसरीचा क्षेत्रज पुत्र असून २८,२९ वायूचा औरस पुत्र आहेस व तेजानेंही त्याची बरोबरी करणारा आहेस. हे वत्सा, तूं वायुपुत्र आहेस आणि उडी मारण्यामध्यें त्याची बरोबरी करणारा आहेस ३०. आम्ही आज मेल्यासारखेच आहोंत आणि सांप्रत आह्मांमध्यें दक्षता व पराक्रम ह्यांनीं संपन्न असलेला दुसरा वानरराज सुग्रीवच कीं काय असा तूं आहेस ३१. बा हनुमाना, त्रिविक्रमावतारसमयीं मीं पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान पृथ्वीला (एका सप्ताच्यासरशा) एकवीस प्रदक्षिणा केल्या होत्या ३२. त्या वेळेला देवांच्या आज्ञेवरून आम्हीं पुष्कळ ओषधि जमा केल्या होत्या व त्यांच्याच योगानें समुद्रमंथन करून देवांना अमृत प्राप्त झालें. सारांश, त्या वेळीं आमचें सामर्थ्य मोठें होतें ३३; परंतु, सध्यां मी आतां वृद्ध झालों असून माझ्या अंगीं पराक्रम मुळींच राहिला नाहीं. सांप्रत काळीं आह्मांमध्यें तूंच सर्वगुणसंपन्न आहेस ३४. तस्मात्, हे परा-

हिनी ३५ उत्तिष्ठ हरिशार्दूल लङ्घयस्व महार्णवम् । परा हि सर्वभूतानां हनुमन्या गतिस्तव ३६ विषण्णा हरयः सर्वे हनुमन्किमुपेक्षसे । विक्रमस्व महावेग विष्णुस्त्रीन्विक्रमानिव ३७ ततः कपीनामृषभेण चोदितः प्रतीतवेगः पवनात्मजः कपिः । प्रहर्षयंस्तां हरिवीरवाहिनीं चकार रूपं पवनात्मजस्तदा ३८ [२४३१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥

तं दृष्ट्वा जृम्भमाणं ते क्रमितुं शतयोजनम् । वेगेनापूर्यमाणं च सहसा वानरोत्तमम् १ सहसा शोकमुत्सृज्य प्रहर्षेण समन्विताः । विनेदुस्तुष्टुवुश्चापि हनूमन्तं महाबलम् २ प्रहृष्टा विस्मिताश्चापि ते वीक्षन्ते समन्ततः । त्रिविक्रमं कृतोत्साहं नारायणमिव प्रजाः ३ संस्तूयमानो हनुमान्व्यवर्धत महाबलः । समाविद्ध्य च लाङ्गूलं हर्षा-

---

क्रमी हनुमाना, स्वतःचे अंगीं जें काय बल असेल तें तूं प्रकट कर. उडी मारणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ तूंच आहेस आणि सर्व वानरसेना तुझें सामर्थ्य अवलोकन करण्यास उत्सुक झाली आहे ३५. तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, ऊठ आणि महासागर उल्लंघन कर. हे हनुमाना, सर्व प्राण्यांपेक्षां तुझी गति अधिक आहे ३६. हे हनुमाना, सर्व वानर खिन्न होऊन बसले आहेत. आतां तूं कां बरें यांचा अंत पहात आहेस ? हे महावेगवान् हनुमाना, विष्णूनें ज्याप्रमाणें तीन पाउलें टाकिलीं त्याप्रमाणें तूं आतां गतीचें अवलंबन कर " ३७. ह्याप्रमाणें वानरश्रेष्ठ जांबवानानें हनुमानाला प्रेरणा केली असतां स्वतःच्या वेगासंबंधानें खात्री असलेल्या त्या वायुपुत्र कपीनें त्या वानरवीरांच्या सेनेला हर्ष उत्पन्न करीत करीत प्रचंड रूप धारण केलें ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

शंभर योजनें समुद्र उल्लंघून जाण्याकरितां वृद्धिंगत होऊं लागलेल्या आणि वेगावेगानें एकाएकीं अंतरिक्ष व्याप्त करूं लागलेल्या त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला अवलोकन करितांक्षणीं १ वानर दुःखाचा एकदम त्याग करून हर्षयुक्त झाले आणि गर्जना करून महाबलाढ्य हनुमानाची स्तुति करूं लागले २. आनंदित व विस्मित झालेले ते वानर, त्रैलोक्य व्याप्त करण्याकरितां उद्युक्त झालेल्या त्रिविक्रमावतारधारी नारायणाकडे पाहूं लागलेल्या लोकांप्रमाणें, सर्व बाजूंनीं त्याच्याकडे पाहूं लागले ३. वानर हनुमानाची स्तुति करूं लागले असतां तो महाबलाढ्य हनुमान् जास्त जास्तच वाढूं लागला आणि हर्षानें शेंपूट हापटूं लागला असतां त्याचें सामर्थ्य अधिकाधिकच

द्बलमुपेयिवान् ४ तस्य संस्तूयमानस्य वृद्धैर्वानरपुङ्गवैः । तेजसापूर्यमाणस्य रूपमासीदनुत्तमम् ५ यथा विजृम्भते सिंहो विवृते गिरिगह्वरे । मारुतस्यौरसः पुत्रस्तथा संप्रति जृम्भते ६ अशोभत मुखं तस्य जृम्भमाणस्य धीमतः । अम्बरीषोपमं दीप्तं विधूम इव पावकः ७ हरीणामुत्थितो मध्यात्संप्रहृष्टतनूरुहः । अभिवाद्य हरीन्वृद्धान्हनूमानिदमब्रवीत् ८ आरुजन्पर्वताग्राणि हुताशनसखोऽनिलः । बलवानप्रमेयश्च वायुराकाशगोचरः ९ तस्याहं शीघ्रवेगस्य शीघ्रगस्य महात्मनः । मारुतस्यौरसः पुत्रः प्लवेनेनास्मि तत्समः १० उत्सहेयं हि विस्तीर्णमालिखन्तमिवाम्बरम् । मेरुं गिरिमसङ्गेन परिगन्तुं सहस्रशः ११ बाहुवेगप्रणुन्नेन सागरेणाहमुत्सहे । समाप्लावयितुं लोकं सपर्वतनदीह्रदम् १२ ममोरुजङ्घावेगेन भविष्यति समुत्थितः । समुत्थितमहाग्राहः समुद्रो वरुणालयः १३ पन्नगाशनमाकाशे पतन्तं पक्षिसेवितम् । वैनतेयमहं शक्तः परिगन्तुं सहस्रशः १४ उदयात्प्रस्थितं वापि ज्वलन्तं

---

वृद्धिंगत होऊं लागलें ४. सारांश, वृद्ध वृद्ध वानरश्रेष्ठ त्याची स्तुति करूं लागले असतां तेजानें व्याप्त होणाऱ्या त्या हनुमानाचें रूप अनुपम झालें ५ आणि पर्वताच्या उघड्या गुहेमध्यें सिंह ज्याप्रमाणें जांभया देऊं लागतो त्याप्रमाणें वायूचा औरस पुत्र हनुमान् त्यावेळीं जांभया देऊं लागला ६. तेव्हां तो बुद्धिमान् हनुमान् जांभया देऊं लागला असतां त्यानें मुख पेटलेल्या भट्टीप्रमाणें शोभूं लागलें आणि तो स्वतः धूमरहित अग्नीप्रमाणें दिसूं लागला ७. नंतर शरीरावर रोमांच उठलेला तो हनुमान् वानरांमधून उठला आणि वृद्ध वानरांना अभिवंदन करून ह्मणाला ८ " आकाशामध्यें संचार करणारा वायु अतर्क्य, बलाढ्य, गमनशील व पर्वतशिखरें फोडून टाकणारा असून अग्नीचा सखा आहे ९ आणि त्या शीघ्र वेगानें युक्त व शीघ्रगामी महात्म्या वायूचा मी औरस पुत्र असून उडी मारण्यांत त्याची बरोबरी करणारा आहें १०. गगनचुंबित विस्तीर्ण मेरुपर्वताला मध्यें कोठेंहीन थांबतां एकदम हजारों प्रदक्षिणा करण्यास मी समर्थ आहें. ११ बाहूंच्या वेगामुळें सागर क्षुब्धकरून टाकून त्याच्या योगानें पर्वत, नद्या व सरोवरें ह्यांसहवर्तमान सर्व जगत् बुडवून टाकण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे १२. माझ्या मांड्यांच्या व पोटऱ्यांच्या वेगानें वरुणालय असलेला समुद्र मर्यादेचें अतिक्रमण करून जाईल आणि त्यांतील मोठमोठे मकर क्षुब्ध होऊन जातील १३. आकाशामध्यें उड्डाण करणाऱ्या सर्पभक्षक पक्षिराज गरुडापेक्षां एकदम हजारोंपट गमन करण्यास मी समर्थ आहें १४. किरणसमुदायांनीं यु... असलेला उज्ज्वल सूर्य उदयाचलापासून

रश्मिमालिनम् । अनस्तमितमादित्यमहं गन्तुं समुत्सहे १५ ततो भूमि-
मसंस्पृष्ट्वा पुनरागन्तुमुत्सहे । प्रवेगेनैव महता भीमेन प्लवगर्षभाः १६
उत्सहेयमतिक्रान्तुं सर्वानाकाशगोचरान् । सागराञ्छोषयिष्यामि दार-
यिष्यामि मेदिनीम् १७ पर्वतांश्चूर्णयिष्यामि प्लवमानः प्लवंगमः । हरि-
ष्याम्युरुवेगेन प्लवमानो महार्णवम् १८ लतानां विविधं पुष्पं पादपानां
च सर्वशः । अनुयास्यति मामद्य प्लवमानं विहायसा । भविष्यति हि मे
पन्थाः स्वातेः पन्था इवाम्बरे १९ चरन्तं घोरमाकाशमुत्पतिष्यन्तमेव च ।
द्रक्ष्यन्ति निपतन्तं च सर्वभूतानि वानराः २० महामेरुप्रतीकाशं मां
द्रक्ष्यध्वं प्लवंगमाः । दिवमावृत्य गच्छन्तं ग्रसमानमिवाम्बरम् २१ विध-
मिष्यामि जीमूतान्कम्पयिष्यामि पर्वतान् । सागरं शोषयिष्यामि प्लव-
मानः समाहितः २२ वैनतेयस्य वा शक्तिर्मम वा मारुतस्य वा । ऋते
सुपर्णराजानं मारुतं वा महाबलम् २३ न तद्भूतं प्रपश्यामि यन्मां प्लुत-

---

निवाल्यानंतर अस्ताचलाला जाण्याचे पूर्वीच मी येथून जाऊन त्याला स्पर्श करण्यास समर्थ आहें १५. इतकेंच नव्हे; परंतु, हे वानरश्रेष्ठहो, सूर्याला स्पर्श केल्यानंतर पुनरपि भूमीपर्यंत येऊन तिला स्पर्श न करितां मोठ्या प्रचंड वेगानें मी पुनरपि सूर्याला स्पर्श करण्यास समर्थ आहें १६. आकाशामध्यें दिसणाऱ्या सर्व ग्रहनक्षत्रादिकांचें उल्लंघन करण्यास मी समर्थ आहें आणि वेळ पडली असतां सागर शुष्क करून पृथ्वीही विदीर्ण करणारा आहें १७. मी वानर उड्या मारूं लागलों असतां पर्वतांचें चूर्ण करून टाकीन आणि उडी मारितां मारितां आपल्या मांड्यांच्या वेगानें महासागरालाही मागोमाग ओढून नेईन १८. मी आज आकाशमार्गानें उड्डाण करूं लागलों असतां लता व वृक्ष ह्यांचीं नानाप्रकारचीं पुष्पें माझ्या मागोमाग येऊं लागतील आणि असें होऊं लागलें असतां आकाशामध्यें असलेल्या स्वातीच्या मार्गाप्रमाणें माझा मार्ग दिसूं लागेल १९. हे वानरहो, सर्व प्राणी भयंकर रूप धारण करणाऱ्या मला आज मार्गामध्यें संचार करीत असतांना, आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना आणि समुद्राच्या पैलतीरावर उतरीत असतांना अवलोकन करितील २०. हे वानरहो, मी आज आकाश व्याप्त करून जाऊं लागलों असतां आकाश ग्रस्त करणारा प्रचंड मेरुपर्वतच कीं काय असा तुम्ही मला अवलोकन कराल २१. मी मन स्वस्थ करून उड्डाण करूं लागलों असतां मेघ उडवून देईन, पर्वत कंपित करीन आणि सागर शुष्क करून टाकीन २२. हें सामर्थ्य गरुडाचे ठिकाणीं, माझ्या अंगीं अथवा वायूपाशींच आहे. मीं उडी मारिली असतां माझ्या मागोमाग येणारा गरुडाशिवाय अथवा महाबलाढ्य वायूशिवाय

मनुव्रजेत् २४ निमेषान्तरमात्रेण निरालम्बनमम्बरम् । सहसा निपति-
ष्यामि घनाद्विद्युदिवोत्थिता २५ भविष्यति हि मे रूपं प्लवमानस्य साग-
रम् । विष्णोः प्रक्रममाणस्य तदा त्रीन्विक्रमानिव २६ बुद्ध्या चाहं प्रप-
श्यामि मनश्चेष्टा च मे तथा । अहं द्रक्ष्यामि वैदेहीं प्रमोदध्वं प्लवंगमाः २७
मारुतस्य समो वेगे गरुडस्य समो जवे । अयुतं योजनानां तु गमिष्या-
मीति मे मतिः २८ वासवस्य सवज्रस्य ब्रह्मणो वा स्वयंभुवः । विक्रम्य
सहसा हस्तादमृतं तदिहानये । लङ्कां वापि समुत्क्षिप्य गच्छेयमिति मे
मतिः २९ तमेवं वानरश्रेष्ठं गर्जन्तममितप्रभम् । प्रहृष्टा हरयस्तत्र समुदै-
क्षन्त विस्मिताः ३० तच्चास्य वचनं श्रुत्वा ज्ञातीनां शोकनाशनम् ।
उवाच परिसंहृष्टो जाम्बवान्प्लवगेश्वरः ३१ वीर केसरिणः पुत्र वेगव-
न्मारुतात्मज । ज्ञातीनां विपुलः शोकस्त्वया तात प्रणाशितः ३२ तव
कल्याणरुचयः कपिमुख्याः समागताः । मङ्गलान्यर्थसिद्ध्यर्थं करिष्यन्ति
समाहिताः ३३ ऋषीणां च प्रसादेन कपिवृद्धमतेन च । गुरूणां च
प्रसादेन संप्लव त्वं महार्णवम् ३४ स्थास्यामश्चैकपादेन यावदागमनं तव ।

---

दुसरें कोणताही प्राणी मला दिसत नाहीं २३, २४. मेघापासून निघालेल्या विद्यु-
ल्लतेप्रमाणें एका निमेषामध्यें मी निराधार आकाशांत एकदम उडून जाईन २५
आणि मी सागराचें उल्लंघन करूं लागलों असतां तीन पावलांनीं त्रैलोक्य व्याप्त
करण्यास उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणें माझें रूप होईल २६. हे वानरहो, तुह्मी
आनंदित व्हा ; मी सीतेचा शोध लावीन. कारण, माझ्या बुद्धीला तसें वाटत असून
माझ्या मनाचाही कल तसाच दिसत आहे २७. वेगामध्यें वायूची व गरुडाची बरोबरी
करणारा मी एकदम दहा हजार योजनेंही उडीसरसा निघून जाईन असें मला वाटतें २८.
वज्रपाणि इंद्राच्या अथवा स्वयंभू ब्रह्मदेवाच्या हातांत जर अमृत असेल तर मी
आपला पराक्रम गाजवून तें एकाएकीं येथें घेऊन येईन आणि कदाचित् लंकाही
उपटून चालता होईन असें मला वाटतें " २९. ह्याप्रमाणें तो अतुल तेजस्वी वानर-
श्रेष्ठ हनुमान् गर्जना करीत असतांना तेथें असलेले सर्वही वानर आनंदित व विस्मित
होऊन त्याच्याकडे पाहूं लागले ३० आणि जातभाईंच्या दुःखाचा परिहार करणारें तें
त्याचें भाषण श्रवण करून वानराधिपति जांबवानाला फारच हर्ष झाला व तो
ह्मणाला ३१ " हे वेगयुक्त वीरा, हे वायुनंदना केसरीपुत्रा, जातभाईंचें प्रचंड दुःख
तूं नाहींसें केलेंस ३२. तुझा मनोरथ सिद्धीस जाण्याकरितां येथें जुळलेले मुख्य
मुख्य मंगलप्रिय वानर तुझें मंगल करितील ३३. ऋषींचा प्रसाद, वानरवृद्धांचा

त्वद्गतानि च सर्वेषां जीवनानि वनौकसाम् ३५ ततश्च हरिशार्दूलस्ता-
नुवाच वनौकसः । कोपि लोके न मे वेगं प्लवने धारयिष्यति ३६
एतानीह नगस्यास्य शिलासंकटशालिनः । शिखराणि महेन्द्रस्य
स्थिराणि च महान्ति च ३७ येषु वेगं गमिष्यामि महेन्द्रशिखरेष्वहम् ।
नानाद्रुमविकीर्णेषु धातुनिष्यन्दशोभिषु ३८ एतानि मम वेगं हि शिखराणि
महान्ति च । प्लवतो धारयिष्यन्ति योजनानामितः शतम् ३९ ततस्तु
मारुतप्रख्यः स हरिर्मारुतात्मजः । आरुरोह नगश्रेष्ठं महेन्द्रमरिमर्दनः ४०
वृतं नानाविधैः पुष्पैर्मृगसेवितशाद्वलम् । लताकुसुमसंबाधं नित्यपुष्पफ-
लद्रुमम् ४१ सिंहशार्दूलसहितं मत्तमातङ्गसेवितम् । मत्तद्विजगणोद्घुष्टं
सलिलोत्पीडसंकुलम् ४२ महद्भिरुच्छ्रितः शृङ्गैर्महेन्द्रस्य महाबलः ।
विचचार हरिश्रेष्ठो महेन्द्रसमविक्रमः ४३ बाहुभ्यां पीडितस्तेन महाशैलो

---

आशीर्वाद आणि गुरुजनांची कृपा यांच्या योगानें तूं महासागर उल्लंघून जाशील ३४. तूं परत येईपर्यंत आह्मी अगदीं एका पायावर (तुझी वाट पहात) उभे राहूं. सर्व वानरांचे प्राण तुझ्यावर अवलंबून आहेत" ३५. तदनंतर वानरश्रेष्ठ हनुमान् त्या वनवासी वानरांना ह्मणाला "उड्डाण करीत असतांना वेगानें माझी बरोबरी करणारा जगतामध्यें कोणीही नाहीं ३६. शिलासमुदायांनीं युक्त असलेल्या ह्या महेंद्र-पर्वताचीं हीं शिखरें मोठीं मोठीं असून अचल आहेत ३७. नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त आणि धातुसमुदायांनीं सुशोभित असलेल्या ह्या महेंद्रपर्वताच्या शिखरावर मी वेगानें गमन करीन ३८. कारण, येथून शंभर योजनें जरी उडी मारिली तरी हीं प्रचंड शिखरें मी उडी मारीत असतांना माझा वेग सहन करितील" ३९. असें सांगि-तल्यानंतर तो वायुतुल्य व वायुपुत्र शत्रुनाशक हनुमान् महेंद्रनामक श्रेष्ठ पर्वतावर आरूढ झाला ४०. तो पर्वत नानाप्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झालेला होता, तेथील तृणयुक्त प्रदेशावर मृगांनीं वास्तव्य केलेलें होतें, लता व पुष्पें ह्यांनीं तो गजबजलेला होता आणि नेहमीं प्रफुल्लित व फलयुक्त असणाऱ्या वृक्षांनीं तो भरून गेलेला होता ४१. सिंह व व्याघ्र ह्यांनीं तो युक्त होता, मत्त गजांनीं त्याचा आश्रय केलेला होता, मद-मत्त पक्षिगणांनीं तो नादित करून टाकिलेला होता आणि झऱ्यांच्या योगानें तो गज-बजून गेलेला होता ४२. असो. तो इंद्रतुल्यपराक्रमी, महाबलाढ्य व उन्नत वानरश्रेष्ठ हनुमान् महेंद्रपर्वताच्या मोठमोठ्या शिखरांवरून संचार करूं लागला ४३. सिंहाचा तडाका बसला असतां मोठा मत्त गज ज्याप्रमाणें गर्जना करितो त्याप्रमाणें त्या महा-त्म्यानें आपल्या बाहूंनीं तो महापर्वत आवळून धरिला असतां (प्राण्यांच्या द्वारानें) तो

महात्मना। ररास सिंहाभिहतो महान्मत्त इव द्विपः ४४ मुमोच सलि-
लोत्पीडान्विप्रकीर्णशिलोच्चयः। वित्रस्तमृगमातङ्गः प्रकम्पितमहाद्रुमः ४५
नानागन्धर्वमिथुनैः पानसंसर्गकर्कशैः। उत्पतद्भिर्विहङ्गैश्च विद्याधरगणै-
रपि ४६ त्यज्यमानमहासानुः संनिलीनमहोरगः। शैलशृङ्गशिलोत्पात-
स्तदाभूत्स महागिरिः ४७ निःश्वसद्भिस्तदा तैस्तु भुजगैरर्धनिःसृतैः।
सपताक इवाभाति स तदा धरणीधरः ४८ ऋषिभिस्त्राससंभ्रान्तैस्त्यज्य-
मानः शिलोच्चयः। सीदन्महति कान्तारे सार्थहीन इवाध्वगः ४९ स
वेगवान्वेगसमाहितात्मा हरिप्रवीरः परवीरहन्ता। मनः समाधाय महा-
नुभावो जगाम लङ्कां मनसा मनस्वी ५० [२४८१][११६१४] इत्यार्षे श्री०
वाल्मीकीय आदिकाव्ये किष्किन्धाकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः॥ ६७ ॥

॥ समाप्तमिदं किष्किंधाकाण्डम् ॥

---

आक्रोश करूं लागला ४४. इतकेंच नव्हे; परंतु, हनुमानानें तो पर्वत आवळून धरितांक्षणीं त्याच्यावरील पाषाणसमुदाय अस्ताव्यस्त पडले, मृग व गज अगदीं त्रस्त होऊन गेले, मोठमोठे वृक्ष कंपित होऊं लागले आणि शेंवटीं त्या पर्वतापासून जलप्रवाहही वाहूं लागले ४५. पान आणि विषयोपभोग ह्यांविषयीं अत्यंत आसक्त असलेलीं गंधर्वांचीं अनेक जोडपीं, उड्डाण करणारे पक्षी आणि विद्याधरांचेही समुदाय ४६ त्या पर्वतावरील मोठमोठीं शिखरें सोडून जाऊं लागले, मोठमोठे भुजंग दडून बसूं लागले आणि त्या महापर्वतावरील शिखरें व शिला ह्यांचेंही पतन होऊं लागलें ४७. बिळांतून अर्धवट बाहेर निघून सुस्कारे टाकूं लागलेल्या भुजगांच्या योगानें तो पर्वत पताकांनीं युक्त असल्यासारिखा दिसूं लागला ४८ आणि त्रासानें गांगरून गेलेले ऋषि त्या पर्वताला सोडून जाऊं लागले असतां तो पर्वत प्रचंड अरण्यामध्यें तांड्यांतून चुकलेल्या मार्गस्थाप्रमाणें खिन्न दिसूं लागला ४९. असो. चलाख आकृतीनें युक्त आणि शत्रुपक्षीय वीरनाशक असा जो महापराक्रमी, विचारी, वेगवान् आणि वानरश्रेष्ठ हनुमान् त्यानें मन स्वस्थ ठेवून लंकेचें स्मरण केलें ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील किष्किंधाकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला॥६७॥

॥ येथें किष्किंधाकांडही संपूर्ण झालें ॥

॥ श्रीः ॥

मोदवृत्तावरून प्रसिद्ध झालेलें

# मराठी भाषांतरासह रामायण.

## सुंदरकांड.

भाषांतर कर्ते

काशीनाथ वामन लेले



वाई मोदवृत्त छापखान्यांत छापिलें.



शके १८२१

॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं श्रीरामायणम् ।



## सुन्दरकाण्डम् ।



ततो रावणनीतायाः सीतायाः शत्रुकर्षणः । इयेष पदमन्वेष्टुं चारणा-
चरिते पथि १ दुष्करं निष्प्रतिद्वन्द्वं चिकीर्षन्कर्म वानरः । समुदग्रशि-
रोग्रीवो गवां पतिरिवाबभौ २ अथ वैदूर्यवर्णेषु शाद्वलेषु महाबलः ।
धीरः सलिलकल्पेषु विचचार यथासुखम् ३ द्विजान्वित्रासयन्धीमानु-
रसा पादपान्हरन् । मृगांश्च सुबहून्निघ्नन्प्रवृद्ध इव केसरी ४ नीललोहि-
तमाञ्जिष्ठपद्मवर्णैः सितासितैः । स्वभावसिद्धैर्विमलैर्धातुभिः समलंकृतम् ५

---

ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम् । भृत्यार्तिह प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सित-राज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् । मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ रावणानें हरण करून नेलेल्या सीतेचें वसतिस्थान हुडकून काढण्याकरितां शत्रुनाशक हनुमानानें चारण ज्या मार्गानें संचार करीत असतात त्या आकाशमार्गानें जाण्याचें मनांत आणिलें १. ज्याचें मस्तक आणि कंठ हीं उन्नत आहेत असा तो दुष्कर आणि ज्यांत कोणाचेंही साहाय्य होण्याचें संभवनीय नाहीं असें कार्य करण्यास उद्युक्त झालेला वानर वृषभाप्रमाणें शोभूं लागला २. प्रथमतः वैदूर्य-रत्नासारिखा ज्याचा वर्ण आहे अशा कोमल तृणयुक्त आणि म्हणूनच जलाप्रमाणें मृदु असलेल्या प्रदेशावरून तो महाबलाढ्य धैर्यवान् हनुमान् अनायासें संचार करूं लागला ३. जातां जातां तो बुद्धिमान् हनुमान् पक्ष्यांना भय उत्पन्न करूं लागला, वक्षःस्थळाच्या जोरानें वृक्ष बरोबर घेऊन जाऊं लागला आणि मदमत्त झालेल्या सिंहा-प्रमाणें असंख्य मृगांचा वध करूं लागला ४. नील, आरक्त, गुलाबी, शुभ्र, कृष्ण आणि पद्मवर्ण इत्यांच्या स्वतःसिद्ध निर्मळ धातूंच्या योगानें भूषित असून ५ ज्येष्ठ

कामरूपिभिराविष्टमभीक्ष्णं सपरिच्छदैः । यक्षकिंनरगन्धर्वैर्देवकल्पैः
सपन्नगैः ६ स तस्य गिरिवर्यस्य तले नागवरायुते । तिष्ठन्कपिवरस्तत्र
ह्रदे नाग इवाबभौ ७ स सूर्याय महेन्द्राय पवनाय स्वयंभुवे । भूतेभ्य-
श्चाञ्जलिं कृत्वा चकार गमने मतिम् ८ अञ्जलिं प्राङ्मुखः कुर्वन्पवना-
यात्मयोनये । ततो हि ववृधे गन्तुं दक्षिणो दक्षिणां दिशम् ९ प्लवगप्रव-
रैर्दृष्टः प्लवने कृतनिश्चयः । ववृधे रामवृद्ध्यर्थं समुद्र इव पर्वसु १०
निष्प्रमाणशरीरः संल्लिलङ्घयिषुरर्णवम् । बाहुभ्यां पीडयामास चरणाभ्यां
च पर्वतम् ११ स चचालाचलश्चाशु मुहूर्तं कपिपीडितः । तरूणां पुष्पि-
ताग्राणां सर्वं पुष्पमशातयत् १२ तेन पादपमुक्तेन पुष्पौघेण सुगन्धिना ।
सर्वतः संवृतः शैलो बभौ पुष्पमयो यथा १३ तेन चोत्तमवीर्येण पीड्य-

---

रूप धारण करणारे आणि परिवारासहवर्तमान असलेले देवतुल्य यक्ष, किन्नर, गंधर्व आणि पन्नग ह्यांनीं वारंवार सेवित ६ असा एक सपाट प्रदेश त्या श्रेष्ठ पर्वतावर हनुमानाला जातां जातां लागला आणि उत्तम उत्तम गजांनीं आसमंताद्भागीं युक्त असलेल्या त्या श्रेष्ठ पर्वताच्या सपाट प्रदेशावर तो वानरश्रेष्ठ हनुमान् उभा राहिला असतां सरोवरामध्यें स्थित असलेल्या गजाप्रमाणें तो शोभूं लागला ७. त्या प्रदेशावर गेल्यानंतर प्रथमतः सूर्य, इंद्र, वायु, ब्रह्मदेव आणि इतरही भूतें ह्यांना हात जोडून नंतर त्यानें पुढें जाण्याचें मनांत आणिलें ८. प्राङ्मुख होऊन स्वतःचा जनक जो वायु त्याला उद्देशून हनुमानानें हात जोडिले आणि नंतर तो कुशल हनुमान् दक्षिण दिशेस जाण्याकरितां वृद्धिंगत झाला ९. वानरश्रेष्ठांनीं उत्सुकतेनें ज्याला अवलोकन केलें आहे आणि ज्यानें समुद्रांतून पोहून जाण्याचा निश्चय केला आहे असा तो हनुमान् पर्वदिवशीं वृद्धिंगत होणाऱ्या समुद्राप्रमाणें रामाच्या अभ्युदयाकरितां वृद्धिंगत झाला १०. सारांश, ज्याला कांहीं प्रमाणच नाहीं असें प्रचंड शरीर धारण करून समुद्र उल्लंघन करण्यास प्रवृत्त झालेला तो वानर हातांनीं व पायांनीं त्या पर्वताला पीडा देऊं लागला ११. ह्याप्रमाणें समुद्र उल्लंघन करण्यास उद्युक्त झाल्याकारणानें हनुमानाच्या अंगांत आवेशाचा संचार झाल्यामुळें तो सहज संचार करीत असतांनाच पीडित झालेला तो पर्वत एकाएकीं क्षणभर हालूं लागला आणि प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेल्या वृक्षांवरील सर्वही पुष्पें त्या पर्वतानें एका क्षणांत पाडून टाकिलीं १२. ह्याप्रमाणें वृक्षावरून सुगंधि पुष्पांच्या राशी वाऱ्यानें चोहोंकडे पसरल्या असतां सर्व बाजूंनीं तो पर्वत पुष्पांच्या योगानें व्याप्त झाल्यामुळें पुष्पमयच दिसूं लागला १३. इतकेंच नव्हे; परंतु, महावीर्यवान् हनुमा-

मानः स पर्वतः । सलिलं संप्रसुस्राव मदमत्त इव द्विपः १४ पीड्यमानस्तु बलिना महेन्द्रस्तेन पर्वतः । रीतीर्निर्वर्तयामास काञ्चनाञ्जनराजतीः १५ मुमोच च शिलाः शैलो विशालाः समनःशिलाः । मध्यमेनार्चिषा जुष्टो धूमराजिरिवानलः १६ हरिणा पीड्यमानेन पीड्यमानानि सर्वतः । गुहाविष्टानि सत्त्वानि विनेदुर्विकृतैः स्वरैः १७ स महान्सत्त्वसंनादः शैलपीडानिमित्तजः । पृथिवीं पूरयामास दिशश्चोपवनानि च १८ शिरोभिः पृथुभिर्नागा व्यक्तस्वस्तिकलक्षणैः । वमन्तः पावकं घोरं ददंशुर्दशनैः शिलाः १९ तास्तदा सविषैर्दष्टाः कुपितैस्तैर्महाशिलाः । जज्वलुः पावकोद्दीप्ता बिभिदुश्च सहस्रधा २० यानि त्वौषधजालानि तस्मिञ्जातानि पर्वते । विषघ्नान्यपि नागानां न शेकुः शमितुं विषम् २१ भिद्यतेऽयं गिरिर्भूतैरिति मत्वा तपस्विनः । त्रस्ता विद्याधरास्तस्मादुत्पेतुः स्त्रीगणैः

---

त्याच्या योगानें तो पर्वत दबूं लागला असतां मत्त गजाच्या गंडस्थलांतून ज्याप्रमाणें मदाचा स्राव होऊं लागतो त्याप्रमाणें त्या पर्वतांतून उदकाचा स्राव होऊं लागला १४. त्या बलाढ्य हनुमानाच्या योगानें तो पर्वत दडपून जाऊं लागला असतां पीतवर्ण, कृष्णवर्ण आणि श्वेतवर्ण जलप्रवाह त्यांतून निघूं लागले १५. हनुमानाच्या योगानें पीडित होऊं लागलेल्या त्या पर्वतापासून मनःशिलेसहवर्तमान मोठमोठ्या विस्तीर्ण शिला बाहेर पडूं लागल्या आणि ह्मणूनच मध्यभागीं ज्वालेनें युक्त असलेल्या अग्नीच्या धुराच्या लोटासारिखा तो दिसूं लागला १६. हनुमान् वानराच्या योगानें पर्वताला पीडा होऊं लागली असतां त्या पर्वतावर चोहोंकडे गुहांतून असलेल्या प्राण्यांनाही पीडा होऊं लागली आणि तेही विकारयुक्त शब्दांनीं गर्जना करूं लागले १७. पर्वताला पीडा होऊं लागल्यामुळें एकाएकीं श्वापदांनीं ह्याप्रमाणें प्रचंड गर्जना केली असतां दिशा आणि उपवनें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी त्या ध्वनीनें दुमदुमून गेली १८. स्पष्ट स्वस्तिक चिह्नें ज्यांवर आहेत अशा विशाल मस्तकांतून नाग भयंकर अग्नि बाहेर टाकूं लागले आणि दांतांच्या योगानें शिलांना दंश करूं लागले १९. ह्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या त्या विषयुक्त नागांनीं मोठमोठ्या शिलांना दंश केला असतां त्या शिलाही अग्नीच्या योगानें प्रदीप्त होऊन जळूं लागल्यामुळें त्यांचे हजारों तुकडे तुकडे होऊं लागले २०. त्या पर्वतावर जे कांहीं विषघ्न औषधिसमूह उत्पन्न झाले होते तेही नागांचें विष शमन करण्यास समर्थ झाले नाहींत २१. महाराक्षसप्रभृति महाभूतें ह्या पर्वताचे तुकडे तुकडे उडवीत आहेत असें समजून भिणारे भयभीत झालेले विद्याधरही स्त्रीगणांसहवर्तमान त्या पर्वतावरून आकाशमार्गानें निघून

सह २२ पानभूमिगतं हित्वा हैममासनभाजनम् । पात्राणि च महार्हाणि करकांश्च हिरण्मयान् २३ लेह्यानुच्चावचान्भक्ष्यान्मांसानि विविधानि च । आर्षभाणि च चर्माणि खड्गांश्च कनकत्सरून् २४ कृतकण्ठगुणाः क्षीबा रक्तमाल्यानुलेपनाः । रक्ताक्षाः पुष्कराक्षाश्च गगनं प्रतिपेदिरे २५ हारनूपुरकेयूरपारिहार्यधराः स्त्रियः । विस्मिताः सस्मितास्तस्थुराकाशे रमणैः सह २६ एष पर्वतसंकाशो हनूमान्मारुतात्मजः । तितीर्षति महावेगः समुद्रं वरुणालयम् २७ रामार्थं वानरार्थं च चिकीर्षन्कर्म दुष्करम् । समुद्रस्य परं पारं दुष्प्रापं प्राप्तुमिच्छति २८ इति विद्याधरा वचः श्रुत्वा तेषां तपस्विनाम् । तमप्रमेयं ददृशुः पर्वते वानरर्षभम् २९ दुधुवे च स रोमाणि चकम्पे चानलोपमः । ननाद च महानादं सुमहानिव तोयदः ३० आनुपूर्व्या च वृत्तं तल्लाङ्गूलं लोमभिश्चितम् । उत्प-

---

गेले २२. पानभूमीवर असलेलीं सुवर्णाचीं आसनें, सुवर्णपात्रें, दुसरे ठिकाणीं असलेलींही मोठीं मोठीं मूल्यवान् भांडीं, सुवर्णमय उदकपात्रें २३, नानाप्रकारचे लेह्य व भक्ष्य पदार्थ, नानाप्रकारचीं मांसें, वृषभचर्माच्या तयार केलेल्या ढाली आणि सोन्याच्या मुठी लाविलेल्या तरवारी २४ हें सर्व टाकून देऊन कंठामध्यें माला धारण केलेले, रंगी बेरंगी फुलें व उट्या शरीरांवर असलेले आणि कमलतुल्य नेत्रांनीं युक्त असलेले मत्त विद्याधर आकाशमार्गानें चालते झाले २५. तेव्हां चंद्रहार, तोरड्या, बाजूबंद, गोट वगैरे अलंकार धारण केलेल्या आणि गालांतल्या गालांत हंसत असलेल्या विद्याधरस्त्रियाही एकाएकीं विस्मयचकित झाल्या आणि आकाशामध्यें आपआपल्या पतींच्या शेजारीं जाऊन उभ्या राहिल्या २६. असो. " हा महावेगवान् पर्वतप्राय वायुपुत्र हनुमान् वरुणाचें निवासस्थान जो समुद्र तो उल्लंघून जाण्यास उद्युक्त झाला आहे २७. सारांश, रामाकरितां आणि वानरांकरितां दुष्कर कर्म करण्यास उद्युक्त झालेला हा हनुमान् जाण्यास अशक्य असलेल्या समुद्राच्या पलीकडल्या तीरास जाण्याची इच्छा करीत आहे २८. " अशा प्रकारचीं आकाशामध्यें संचार करणाऱ्या तपस्व्यांचीं भाषणें कानावर आल्यानंतर विद्याधर खालीं पाहूं लागले तों त्या पर्वतावर असलेला तो अतर्क्य देह धारण करणारा वानरश्रेष्ठ त्यांच्या दृष्टीं पडला २९. तेजानें अग्नितुल्य असलेल्या त्या हनुमानानें आपलें अंग हालवून रोम हालविले आणि प्रचंड मेघाप्रमाणें मोठी गर्जनाही केली ३० व आरंभापासून क्रमाक्रमानें वर्तुल आणि लोमांनीं व्याप्त असलेलें आपलें शेंपूट, पक्षिराज गरुड ज्याप्रमाणें सर्पाला वरचेवर उडवून खालीं टाकीत असतो त्याप्रमाणें,

तिर्यग्विचिक्षेप पक्षिराज इवोरगम् ३१ तस्य लाङ्गूलमाविद्धमतिवे-
गस्य पृष्ठतः । ददृशे गरुडेनेव ह्रियमाणो महोरगः ३२ बाहू संस्तम्भ-
यामास महापरिघसंनिभौ । आससाद कपिः कट्यां चरणौ संचुकोच
च ३३ संहृत्य च भुजौ श्रीमांस्तथैव च शिरोधराम् । तेजः सत्त्वं तथा
वीर्यमाविवेश स वीर्यवान् ३४ मार्गमालोकयन्दूरादूर्ध्वप्रणिहितेक्षणः ।
रुरोध हृदये प्राणानाकाशमवलोकयन् ३५ पद्भ्यां दृढमवस्थानं कृत्वा
स कपिकुञ्जरः । निकुञ्च्य कर्णौ हनुमानुत्पतिष्यन्महाबलः ३६ वानरा-
न्वानरश्रेष्ठ इदं वचनमब्रवीत् । यथा राघवनिर्मुक्तः शरः श्वसनवि-
क्रमः ३७ गच्छेत्तद्वद्गमिष्यामि लङ्कां रावणपालिताम् । न हि द्रक्ष्यामि
यदि तां लङ्कायां जनकात्मजाम् ३८ अनेनैव हि वेगेन गमिष्यामि
सुरालयम् । यदि वा त्रिदिवे सीतां न द्रक्ष्यामि कृतश्रमः ३९ बद्ध्वा
राक्षसराजानमानयिष्यामि रावणम् । सर्वथा कृतकार्योऽहमेष्यामि सह
सीतया ४० आनयिष्यामि वा लङ्कां समुत्पाट्य सरावणाम् । एवमुक्त्वा

---

वारंवार उचलून भूमीवर हापटूं लागला ३१. ह्याप्रमाणें त्याचें तें पृष्ठभागीं असलेलें अत्यंत वेगयुक्त शेंपूट वारंवार भूमीवर आवळूं लागलें असतां गरुडाच्या तावडींत सांपडलेल्या मोठ्या भुजंगाप्रमाणें दिसूं लागलें ३२. अशा रीतीनें शेंपूट खालीं वर केल्यानंतर मोठ्या मोठ्या आडसरांसारखे असलेले हात त्या हनुमान् वानरानें पर्वतावर ठेविले आणि वर अवसान घेतल्यामुळें कटिप्रदेशाचे ठिकाणीं कृश बनून त्यानें आपले पाय संकुचित केले ३३. नंतर त्या वीर्यवान् भव्य हनुमानानें खांद्यांजवळ आपले हात संकुचित करून कंठप्रदेशाचे ठिकाणीं मानही संकुचित केली आणि नंतर आपल्या अंगीं असलेलें तेज, शारीरबल आणि वीर्य, हें सर्व कांहीं त्यानें एकत्र केलें ३४. नंतर दूरचा मार्ग अवलोकन करण्याकरितां त्यानें आपली दृष्टि जरा वर केली आणि आकाशाकडे पहात पहात हृदयामध्यें प्राणवायूंचा निरोध केला ३५. नंतर पर्वतावर पाय घट्ट ठेवून व कान संकुचित करून उडी मारण्यास तयार झालेला तो महाबलाढ्य कपिराज ३६ वानरश्रेष्ठ हनुमान् वानरांना म्हणाला " ज्याप्रमाणें रामानें सोडिलेला बाण वायुगतीनें ३७ जाईल त्याप्रमाणें मी, रावणानें संरक्षण केलेल्या लंका नगरीमध्यें जाईन आणि लंकेमध्यें जर ती जनककन्या सीता माझ्या दृष्टीं पडली नाहीं तर ३८ याच वेगानें मी स्वर्गाला चालता होईन; परंतु, स्वर्गांतही प्रयत्न करून जर सीता माझ्या अवलोकनांत आली नाहीं ३९ तर राक्षसराज रावणाला मी बांधून आणीन आणि सर्वस्वीं कृतकार्य होऊन मी सीतेसहवर्तमान परत

तु हनुमान्वानरो वानरोत्तमः ४१ उत्पपाताथ वेगेन वेगवानविचारयन् ।
सुपर्णमिव चात्मानं मेने स कपिकुञ्जरः ४२ समुत्पतति वेगात्तु वेगात्ते
नगरोहिणः । संहृत्य विटपान्सर्वान्समुत्पेतुः समन्ततः ४३ स मत्तको-
यष्टिभकान्पादपान्पुष्पशालिनः । उद्वहन्नूरुवेगेन जगाम विमलेम्बरे ४४
ऊरुवेगोत्थिता वृक्षा मुहूर्तं कपिमन्वयुः । प्रस्थितं दीर्घमध्वानं स्वबन्धु-
मिव बान्धवाः ४५ तमूरुवेगोन्मथिताः सालाश्चान्ये नगोत्तमाः । अनु-
जग्मुर्हनूमन्तं सैन्या इव महीपतिम् ४६ सुपुष्पिताग्रैर्बहुभिः पादपैरन्वितः
कपिः । हनुमान्पर्वताकारो बभूवाद्भुतदर्शनः ४७ सारवन्तोथ ये वृक्षा
न्यमज्जँल्लवणाम्भसि । भयादिव महेन्द्रस्य पर्वता वरुणालये ४८ स नाना-
कुसुमैः कीर्णः कपिः साङ्कुरकोरकैः । शुशुभे मेघसंकाशः खद्योतैरिव

---

येईन अथवा रावणासहवर्तमान लंकाच उपटून घेऊन येईन " ४०. ह्याप्रमाणें वानरांना सांगून तो कपिश्रेष्ठ व वेगवान् हनुमान् वानर दुसरें तिसरें कांहीं एक मनामध्यें न आणितां वेगानें उडाला आणि तो कपिश्रेष्ठ स्वतःला ( उड्डाण करण्यांत ) गरुडाप्रमाणें मानूं लागला ४१,४२. हनुमान् वेगानें उड्डाण करूं लागला असतां त्याच्या वेगामुळें त्या पर्वतावरील वृक्षही आपआपल्या सर्व शाखा एकत्र करून सर्व बाजूंनीं उड्डाण करूं लागले ४३. ह्याप्रमाणें मत्त टिट्टिभ पक्ष्यांनीं युक्त असलेले प्रफुल्लित वृक्ष आपल्या प्रचंड वेगानें बरोबर नेत नेत निर्मल आकाशामध्यें हनुमानानें उड्डाण केलें ४४. हनुमानाच्या मांड्यांच्या वेगामुळें जमीन उखळून बाहेर निघालेले वृक्ष एक मुहूर्तपर्यंत, दूर प्रदेशाला निघालेल्या आपल्या बंधूच्या मागोमाग ज्याप्रमाणें बांधव जात असतात त्याप्रमाणें, त्याच्या मागोमाग गेले ४५. अथवा राजाच्या मागोमाग ज्याप्रमाणें सैन्यें जातात त्याप्रमाणें मांड्यांच्या वेगामुळें उपटून बाहेर आलेले साल व इतरही मोठे मोठे वृक्ष त्या हनुमानाच्या मागोमाग चालते झाले ४६ व ह्याप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें ज्यांच्या अग्रशाखा प्रफुल्लित झाल्या आहेत असे असंख्य वृक्ष हनुमानाच्या बरोबर चालते झाले असतां पर्वताकृति बनलेल्या त्या हनुमानाची मुद्रा आश्चर्यकारक दिसूं लागली ४७. ( हलके सालके वृक्ष तर शेंवटपर्यंत त्याच्याबरोबर निघून गेलेच; परंतु, खैर वगैरेंसारखे ) जे कांहीं जड जड वृक्ष होते ते तेवढे शेंवटपर्यंत बरोबर न जातां इंद्राच्या भीतीमुळें समुद्रामध्यें बुडून जाणाऱ्या पर्वताप्रमाणें जातां जातां वरुणालयरूप क्षारसमुद्रांत पडून बुडून गेले ४८. कळ्या व किंचित् किंचित् उमललेलीं पुष्पें ह्यांसहवर्तमान पूर्णपणें विकास पावलेल्या पुष्पांनीं व्याप्त झालेला तो मेघतुल्य हनुमान् काजव्यांनीं व्याप्त झालेल्या पर्वतासारखा

पर्वतः ४९ विमुक्तास्तस्य वेगेन मुक्त्वा पुष्पाणि ते द्रुमाः । व्यवशीर्यन्त सलिले निवृत्ताः सुहृदो यथा ५० लघुत्वेनोपपन्नं तद्विचित्रं सागरेऽपतत् । द्रुमाणां विविधं पुष्पं कपिवायुसमीरितम् ५१ पुष्पौघेण सुगन्धेन नानावर्णेन वानरः । बभौ मेघ इवोद्यन्वै विद्युद्गणविभूषितः ५२ तस्य वेगसमुद्भूतैः पुष्पैस्तोयमदृश्यत । ताराभिरिव रामाभिरुदिताभिरिवाम्बरम् ५३ तस्याम्बरगतौ बाहू ददृशाते प्रसारितौ । पर्वताग्राद्विनिष्क्रान्तौ पञ्चास्याविव पन्नगौ ५४ पिबन्निव बभौ चापि सोर्मिजालं महार्णवम् । पिपासुरिव चाकाशं ददृशे स महाकपिः ५५ तस्य विद्युत्प्रभाकारे वायुमार्गानुसारिणः । नयने विप्रकाशेते पर्वतस्थाविवानलौ ५६ पिङ्गे पिङ्गाक्षमुख्यस्य बृहती परिमण्डले । चक्षुषी संप्रकाशेते चन्द्रसूर्याविव स्थितौ ५७ मुखं नासिकया तस्य ताम्रया ताम्रमाबभौ । संध्यया

---

शोभूं लागला ४९ आणि त्याच्या वेगाच्या तडाक्यांतून ते प्रफुल्लित वृक्ष सुटल्यावर, मित्राला पोंचविण्याकरितां बरोबर गेलेले इतर मित्र ज्याप्रमाणें मध्यें जलप्रवाह आला असतां परत फिरतात त्याप्रमाणें, समुद्राचें उदक मध्यंतरीं आल्याबरोबर आपलीं पुष्पें टाकून देऊन उदकामध्यें गडप झाले ५०. वानराच्या वेगवायूनें वृक्षांपासून सुटलेलीं नानाप्रकारचीं अद्भुत पुष्पें फारच हलकीं असल्यामुळें सागरावरच पडून राहिलीं ५१ ( आणि वृक्ष मात्र आंत बुडून गेले ). असो. तो उड्डाण करणारा हनूमान् वानर नानाप्रकारच्या सुगंधि पुष्पसमुदायांच्या योगानें विद्युद्गणविभूषित मेघाप्रमाणें दिसूं लागला ५२ आणि त्याच्या वेगामुळें वृक्षांपासून निघालेल्या पुष्पांनीं आच्छादित झालेलें तें समुद्राचें उदक उदय पावलेल्या रमणीय ताऱ्यांच्या योगानें जसें आकाश शोभूं लागतें तसें शोभूं लागलें ५३. हनुमानानें उड्डाण केलें असतां आकाशामध्यें असलेले व मोठें पसरलेले त्याचे हात पर्वतशिखरापासून निघालेल्या पंचमुखी नागांप्रमाणें दिसूं लागले ५४ आणि तो अंतरिक्षामध्यें असलेला महाकपि हनूमान् ( अधोमुख झाला असतां ) तरंगसमुदायांनीं भरलेला महासागरच पिऊन टाकण्यास उद्युक्त झाल्यासारिखा दिसे आणि ( ऊर्ध्वमुख झाला असतां ) आकाशच गट्ट करण्याच्या बेतांत असल्यासारिखा भासे ५५. आकाशमार्गानें संचार करणाऱ्या त्या हनुमानाचे विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी असलेले नेत्र पर्वतावर लागलेले दोन वणवेच कीं काय असे भासूं लागले ५६. आसमंताद्भागीं प्रभामंडलानें युक्त असलेल्या त्या कपिश्रेष्ठ हनुमानाचे पिंगट वर्णाचे प्रचंड डोळे आकाशांत असलेले चंद्रसूर्यच कीं काय असे दिसूं लागले ५७. संधिकालीन आकाशानें युक्त असलेलें सूर्यमंडल ज्याप्रमाणें आरक्तवर्ण दिसूं लागतें

समभिस्पृष्टं यथा स्यात्सूर्यमण्डलम् ५८ लाङ्गूलं च समाविद्धं प्लवमानस्य शोभते । अम्बरे वायुपुत्रस्य शक्रध्वज इवोच्छ्रितम् ५९ लाङ्गूलचक्रो हनुमाञ्छुक्लदंष्ट्रोनिलात्मजः । व्यरोचत महाप्राज्ञः परिवेषीव भास्करः ६० स्फिग्देशेनातिताम्रेण रराज स महाकपिः । महता दारितेनेव गिरिर्गैरिकधातुना ६१ तस्य वानरसिंहस्य प्लवमानस्य सागरम् । कक्षान्तरगतो वायुर्जीमूत इव गर्जति ६२ खे यथा निपतत्युल्का उत्तरान्ताद्विनिःसृता । दृश्यते सानुबन्धा च तथा स कपिकुञ्जरः ६३ पतत्पतङ्गसंकाशो व्यायतः शुशुभे कपिः । प्रवृद्ध इव मातङ्गः कक्ष्यया बध्यमानया ६४ उपरिष्टाच्छरीरेण छायया चावगाढया । सागरे मारुताविष्टा नौरिवासीत्तदा कपिः ६५ यं यं देशं समुद्रस्य जगाम स महाकपिः । स तु तस्याङ्गवेगेन सोन्माद इव लक्ष्यते ६६ सागरस्योर्मिजालानामुरसा शैलव-

---

त्याप्रमाणें ताम्रवर्ण नासिकेच्या योगानें त्याचें मुखही ताम्रवर्ण दिसूं लागलें ५८. तो वायुपुत्र हनूमान् आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना अग्रभागीं आकडी करून उभारलेलें त्याचें पुच्छ अंतरिक्षांत उभारलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें शोभूं लागलें ५९. पुच्छमंडलानें आणि शुक्लवर्ण दंष्ट्रांनीं युक्त असलेला तो महाबुद्धिमान् वायुपुत्र हनूमान् प्रभामंडलानें युक्त असलेल्या सूर्यासारिखा दिसूं लागला ६०. खाणींतून काढलेल्या गैरिक धातूच्या विशाल शिलेनें ज्याप्रमाणें एकादा पर्वत दिसत असतो त्याप्रमाणें अत्यंत ताम्रवर्ण असलेल्या ढुंगणाच्या योगानें तो महाकपि हनुमान् शोभूं लागला ६१. तो वानरश्रेष्ठ हनूमान् समुद्र उल्लंघन करूं लागला असतां त्याच्या खांकांमध्यें सांपडलेला वायु मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला ६२. आकाशामध्यें उत्तर दिशेकडून निघालेली इतर लहान लहान उल्कांनीं व्याप्त झालेली उल्का ज्याप्रमाणें पडतां पडतां दृष्टीस पडते त्याप्रमाणें तो पुच्छयुक्त वानर दिसूं लागला ६३. पूर्ण वृद्धिंगत झालेला गज मध्यभागीं बांधिल्या जाणाऱ्या रज्जूच्या योगानें जसा शोभूं लागतो तसा गमन करणारा सूर्यच कीं काय असा दिसत असलेला तो दीर्घ कपि ( कटिप्रदेशाला गुंडाळिलेल्या वस्त्राच्या योगानें ) शोभूं लागला ६४. शरीर ऊर्ध्व भागीं असल्यामुळें आणि अधोभागीं सागरामध्यें स्वतःचें प्रतिबिंब पडलें असल्यामुळें तो कपि हनूमान् त्या वेळीं वायूच्या तडाक्यांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें दिसूं लागला ६५. समुद्रावरील ज्या ज्या प्रदेशावर तो महाकपि गेला तो तो प्रदेश त्याच्या शरीरवेगानें उन्मादयुक्त झाल्यासारिखा दिसूं लागला ६६. तो अतिवेगवान् महाकपि आपल्या पर्वतप्राय वक्षःस्थलाच्या योगानें समुद्रांतील तरंगसमुदायांना ताडण करीत करीत

र्मणा । अभिघ्नंस्तु महावेगः पुप्लुवे स महाकपिः ६७ कपिवातश्च बलवा-
न्मेघवातश्च निर्गतः । सागरं भीमनिर्ह्रादं कम्पयामासतुर्भृशम् ६८ विक-
र्षन्नूर्मिजालानि बृहन्ति लवणाम्भसि । पुप्लुवे कपिशार्दूलो विकिरन्निव
रोदसी ६९ मेरुमन्दरसंकाशानुद्गतान्सुमहार्णवे । अत्यक्रामन्महावेगस्तरङ्गा-
न्गणयन्निव ७० तस्य वेगसमुद्धूतं जलं सजलदं तदा । अम्बरस्थं विबभ्राजे
शरदभ्रमिवाततम् ७१ तिमिनक्रझषाः कूर्मा दृश्यन्ते विवृतास्तदा । वस्त्रा-
पकर्षणेनेव शरीराणि शरीरिणाम् ७२ क्रममाणं समीक्ष्याथ भुजगाः
सागरंगमाः । व्योम्नि तं कपिशार्दूलं सुपर्णमिव मेनिरे ७३ दशयोजन-
विस्तीर्णा त्रिंशद्योजनमायता । छाया वानरसिंहस्य जवे चारुतराभ-
वत् ७४ श्वेताभ्रघनराजीव वायुपुत्रानुगामिनी । तस्य सा शुशुभे छाया
पतिता लवणाम्भसि ७५ शुशुभे स महातेजा महाकायो महाकपिः ।
वायुमार्गे निरालम्बे पक्षवानिव पर्वतः ७६ येनासौ याति बलवान्वेगेन

---

समुद्र उल्लंघन करूं लागला ६७. हनुमान् कपीनें आपल्या गतीनें उत्पन्न केलेला प्रचंड वायु आणि मेघमंडलांतील बाहेर पडलेला वायु ह्या उभयतांनीं भयंकर गर्जना करणाऱ्या सागरांना अतिशय कंपित करून सोडिलें ६८. समुद्रांतील मोठमोठ्या लाटा उंच उंच होण्यास कारणीभूत होणारा तो श्रेष्ठ कपि हनुमान् पृथ्वी आणि आकाश आहेत ह्यापेक्षांही जास्त जास्त पृथक् करीतच कीं काय समुद्र उल्लघून जाऊं लागला ६९. महासागरामध्यें मेरु आणि मंदर ह्या पर्वतांप्रमाणें उसळूं लागलेल्या प्रचंड लाटा मोजीत मोजीतच कीं काय तो महावेगवान् हनुमान् सागर ओलांडून जाऊं लागला ७०. त्या हनुमानाच्या वेगानें समुद्रांतून उसळलेलें आणि मेघमंडलापर्यंत उंच गेलेलें जल आकाशामध्यें असतांना शरदृतूंतील विशाल मेघाप्रमाणें दिसूं लागलें ७१. वस्त्र दूर केलें असतां प्राण्यांचीं शरीरें ज्याप्रमाणें उघडीं दिसतात त्याप्रमाणें त्या हनुमानाच्या वेगानें समुद्रांतून उसळून वर आलेले तिमिसंज्ञक जलचर प्राणी, सुसरी, मत्स्य आणि कूर्म उघडे दिसूं लागले ७२. आकाशांतून तो कपि-श्रेष्ठ हनुमान् जाऊं लागलेला अवलोकन करून समुद्रांतील भुजंगांना हा गरुडपक्षीच जात आहे कीं काय असें वाटूं लागलें ७३. दहा योजनें रुंद आणि तीस योजनें लांब असलेली त्या वानरश्रेष्ठ हनुमानाची छाया वेगामुळें फारच मनोहर दिसत होती ७४. वायुपुत्र हनुमान् आकाशांतून जाऊं लागला असतां समुद्रामध्यें पडलेली आणि त्याच्या बरोबर जाणारी त्याची ती छाया श्वेतवर्ण अभ्रांनीं युक्त झालेल्या मेघपंक्ती-प्रमाणें शोभूं लागली ७५. तो अत्यंत तेजस्वी व धिप्पाड महाकपि हनुमान् निरा-

कपिकुञ्जरः । तेन मार्गेण सहसा द्रोणीकृत इवार्णवः ७७ आपाते पक्षि-सङ्घानां पक्षिराज इव व्रजन् । हनुमान्मेघजालानि प्रकर्षन्मारुतो यथा ७८ पाण्डुरारुणवर्णानि नीलमाञ्जिष्ठकानि च । कपिनाकृष्यमाणानि महाभ्राणि चकाशिरे ७९ प्रविशन्नभ्रजालानि निष्पतंश्च पुनः पुनः । प्रच्छन्नश्च प्रकाशश्च चन्द्रमा इव दृश्यते ८० प्लवमानं तु तं दृष्ट्वा प्लवगं त्वरितं तदा । ववृषुस्तत्र पुष्पाणि देवगन्धर्वदानवाः ८१ तताप न हि तं सूर्यः प्लवन्तं वानरेश्वरम् । सिषेवे च तदा वायू रामकार्यार्थसिद्धये ८२ ऋषयस्तुष्टुवुश्चैनं प्लवमानं विहायसा । जगुश्च देवगन्धर्वाः प्रशंसन्तो वनौकसम् ८३

आणि आकाशांतून जात असतां पक्षयुक्त पर्वतच कीं काय असा शोभूं लागला ७६. ज्या मार्गानें वेगावेगानें तो बलाढ्य कपिश्रेष्ठ हनुमान् जात होता त्या मार्गानें तो समुद्र एकदम ( मेघांना हनुमानाचा धक्का बसत असल्याकारणानें त्यापासून होणाऱ्या जल-स्रावामुळें ) कृत्रिम पर्जन्ययंत्रांतून पडणाऱ्या जलधारांनीं युक्त झाल्यासारिखा दिसत असे ७७. पक्षिगणांच्या मार्गानें पक्षिराज गरुडच जात आहे कीं काय अशा रीतीनें गमन करणारा तो हनुमान् वायूप्रमाणें आपल्याबरोबर मेघसमुदायांना ओढून नेऊं लागला ७८. श्वेतवर्ण, आरक्तवर्ण, नीलवर्ण आणि पाटलवर्ण अशीं मोठमोठीं अभ्रें वानर हनुमान् ओढून नेऊं लागला असतां तीं वायूच्या योगानें आकृष्ट होत असल्या-सारखीं दिसूं लागलीं ७९ आणि वारंवार मेघसमुदायामध्यें प्रविष्ट होणारा व वारं-वार त्यांतून बाहेर पडणारा हनुमान् फिरून फिरून मेघांनीं आच्छादित होणाऱ्या व त्यांतून बाहेर पडणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसूं लागला ८०. असो. ह्याप्रमाणें आकाशमार्गानें सत्वर उड्डाण करून जात असलेल्या त्या वानराला अवलोकन करून देव, गंधर्व, दानव ह्यांनीं त्या हनुमानावर पुष्पवृष्टि केली ८१. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या वानराधिपतीला सूर्यानें ताप दिला नाहीं आणि रामाचें कार्य सिद्धीस जावें एतदर्थ वायूनेंही ( श्रमपरिहार होण्या-करितां ) त्याची सेवा केली ८२. आकाशमार्गानें उड्डाण करून जात असलेल्या त्या हनुमानाची ऋषि स्तुति करूं लागले आणि देवगंधर्वही त्या वानराची प्रशंसा करण्या-करितां गायन करूं लागले ८३. नाग, यक्ष आणि नानाप्रकारचे राक्षस हे सर्वही

१ राजेरजवाड्यांच्या बागांतून नानाप्रकारचीं क्रीडास्थानें केलेलीं असतात आणि ह्या अनेक क्रीडा-स्थानांमध्यें, ज्यांत वरच्या बाजूला हजारे बसविलेल्या पाण्याच्या नळ्या नेल्या असून इच्छेस येईल तेव्हां कृत्रिम पर्जन्य पाडितां येण्याची व्यवस्था केलेली असते, असेंही एकादें क्रीडास्थान असतें.

नामपश्च तुष्टुवुर्यक्षा रक्षांसि विविधानि च । प्रेक्ष्य सर्वे कपिवरं सहसा विगतक्लमम् ८४ तस्मिन्प्लवगशार्दूले प्लवमाने हनूमति । इक्ष्वाकुकुलमानार्थी चिन्तयामास सागरः ८५ साहाय्यं वानरेन्द्रस्य यदि नाहं हनूमतः । करिष्यामि भविष्यामि सर्ववाच्यो विवक्षताम् ८६ अहमिक्ष्वाकुनाथेन सागरेण विवर्धितः । इक्ष्वाकुसचिवश्चायं तन्नार्हत्यवसादितुम् ८७ तथा मया विधातव्यं विश्रमेत यथा कपिः । शेषं च मयि विश्रान्तः सुखी सोऽतितरिष्यति ८८ इति कृत्वा मतिं साध्वीं समुद्रश्छन्नमम्भसि । हिरण्यनाभं मैनाकमुवाच गिरिसत्तमम् ८९ त्वमिहासुरसङ्घानां देवराज्ञा महात्मना । पातालनिलयानां हि परिघः संनिवेशितः ९० त्वमेषां ज्ञातवीर्याणां पुनरेवोत्पतिष्यताम् । पातालस्याप्रमेयस्य द्वारमावृत्य तिष्ठसि ९१ तिर्यगूर्ध्वमधश्चैव शक्तिस्ते शैल वर्धितुम् । तस्मात्संचोदयामि त्वामुत्तिष्ठ गिरिसत्तम ९२ स एष कपिशार्दूलस्त्वामुपर्येति वीर्यवान् । हनुमान्रा-

---

कपिश्रेष्ठ हनुमान् क्लेशरहित आहे असें अवलोकन करून एकदम त्याची स्तुति करूं लागले ८४. तो वानरश्रेष्ठ हनुमान् आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना इक्ष्वाकुकुलाचा सत्कार करण्याची इच्छा धरणारा सागर आपल्याशीं विचार करूं लागला कीं ८५, " मीं जर वानरराज हनुमानाला सहाय्य केलें नाहीं तर ज्यांना म्हणून वाणी आहे त्या सर्व प्राण्यांच्या निंदेस मी पात्र होईन ८६. इक्ष्वाकुकुलाधिपति सगरपुत्रानें मला वाढविलें आहे आणि हा इक्ष्वाकुवंशजालाच मदत करणारा आहे. तस्मात्, हा थकून जाणें योग्य नाहीं ८७. ह्यास्तव, ह्या कपीला विश्रांति घेतां येईल अशी व्यवस्था मला केली पाहिजे. कारण, माझे ठिकाणीं ह्यानें विश्रांति घेतली असतां अवशिष्ट राहिलेल्या मार्गाचें आक्रमण हा सहज करील " ८८. असा उत्कृष्ट विचार केल्यानंतर तो समुद्र आपल्या उदकामध्यें आच्छादित होऊन राहिलेल्या सुवर्णमय पर्वतश्रेष्ठ मैनाकाला म्हणाला ८९. " महात्म्या देवराजानें तुला ह्या ठिकाणीं पातालनिवासी असुरगणांचा निरोध करण्याकरितां अडसर म्हणून ठेविला आहे ९० आणि त्याप्रमाणें देवराज इंद्राला ज्यांचें वीर्य माहीत झालें आहे व जे फिरून फिरून वर येण्याची इच्छा करीत असतात त्या राक्षसांचें अतर्क्य जें पातालस्थान त्याच्या द्वाराचा निरोध करून तूं राहिला आहेस ९१. हे पर्वता, बाजूंना, ऊर्ध्वमार्गी आणि अधोमार्गी वृद्धिंगत होण्याचें तुझ्या अंगीं सामर्थ्य आहे. तस्मात्, हे पर्वतश्रेष्ठा, मी तुला सांगतों, तूं वर ये ९२. म्हणजे हा कपिश्रेष्ठ वीर्यवान् हनुमान् तुझ्या प्रदेशावर प्राप्त होईल. हा भयंकर कर्म करणारा हनुमान् रामकार्य करण्याचा उद्देश मनांत धरून आकाशामध्यें उड्डाण करून येथें

मकार्यार्थी भीमकर्मा प्लवगोत्तम ॥ अयं च प्लवगेन्द्रस्य समीक्ष्योत्थातु-
मर्हसि ९३ हिरण्यगर्भो मैनाको निशम्य लवणाम्भसः । उत्पपात जला-
तूर्णं महाद्रुमलतावृतः ९४ स सागरजलं भित्त्वा बभूवात्युच्छ्रितस्तदा ।
यथा जलधरं भित्त्वा दीप्तरश्मिर्दिवाकरः ९५ स महात्मा मुहूर्तेन पर्वतः
सलिलावृतः । दर्शयामास शृङ्गाणि सागरेण नियोजितः ९६ शातकु-
म्भमयैः शृङ्गैः सकिंनरमहोरगैः । आदित्योदयसंकाशैरालिखद्भिरिवा-
म्बरम् ९७ तस्य जाम्बूनदैः शृङ्गैः पर्वतस्य समुत्थितैः । आकाशं शस्त्रसं-
काशमभवत्काञ्चनप्रभम् ९८ जातरूपमयैः शृङ्गैर्भ्राजमानैर्महाप्रभैः ।
आदित्यशतसंकाशः सोभवद्गिरिसत्तमः ९९ समुत्थितमसङ्गेन हनूमा-
नग्रतः स्थितम् । मध्ये लवणतोयस्य विघ्नोयमिति निश्चितः १०० स
तमुच्छ्रितमत्यर्थं महावेगो महाकपिः । उरसा पातयामास जीमूतमिव
मारुतः १ स तदासादितस्तेन कपिना पर्वतोत्तमः । बुद्ध्वा तस्य हरेर्वेगं
जहर्ष च ननाद च २ तमाकाशगतं वीरमाकाशे समुपस्थितः । प्रीतो

---

आहे. तस्मात्, ह्या वानरराजाच्या श्रमाकडे लक्ष्य देऊन तूं उठावेंस हें बरें ".९३.
हें समुद्राचें भाषण श्रवण केल्यावर मोठमोठ्या वृक्षांनीं व लतांनीं व्याप्त झालेला तो
सुवर्णमय मैनाकपर्वत उदकांतून सत्वर वर आला ९४ आणि सागराचें उदक भेदून
वर आलेला तो मैनाकपर्वत अतिशय उंच झाला असतां मेघाचा भेद करून बाहेर
पडणाऱ्या उज्ज्वलकिरणयुक्त सूर्याप्रमाणें दिसूं लागला ९५. सारांश, सागरानें आज्ञा
केली असतां उदकानें आच्छादित झालेल्या त्या महात्म्या मैनाकपर्वतानें एका मुहू-
र्तामध्यें आपलीं शिखरें प्रकट केलीं ९६. तो मैनाकपर्वत सुवर्णमय शिखरांनीं युक्त
होता. तीं शिखरें उदयाचलाप्रमाणें गगनचुंबित होतीं आणि किन्नर व महोरग हे
त्यांचे ठिकाणीं वास्तव्य करीत होते ९७. शस्त्राप्रमाणें श्यामवर्ण असलेलें आकाश त्या
पर्वतापासून निघालेल्या सुवर्णमय शिखरांनीं व्याप्त झाल्यामुळें सुवर्णासारिखें तेजस्वी
दिसूं लागलें ९८ आणि झळकूं लागलेल्या त्या महातेजस्वी सुवर्णमय शिखरांच्या
योगानें तो श्रेष्ठ पर्वतही शेंकडों सूर्यासारिखा दिसूं लागला ९९. ह्याप्रमाणें एकाएकीं
आपल्यापुढें समुद्रामध्यें उद्भवलेल्या मैनाकपर्वताला अवलोकन केल्यावर हें एक विघ्न
उत्पन्न झालें आहे असा हनुमानाचा पक्का ग्रह झाला १०० व ह्मणूनच वायु ज्याप्रमाणें
मेघाला उडवून लावितो त्याप्रमाणें त्या अत्यंत वेगवान् महाकपीनें समुद्रांतून अति-
शय वर आलेल्या त्या मैनाकपर्वताला वक्षःस्थलाच्या योगानें खालीं पाडिलें १. ह्याप्र-
माणें त्या कपीनें पर्वतश्रेष्ठ मैनाकाला खालीं पाडिलें असतां त्या वानराचा वेग त्याला

हृष्टमना वाक्यमब्रवीत्पर्वतः कपिम् ३ मानुषं धारयन्रूपमात्मनः शिखरे स्थितः । दुष्करं कृतवान्कर्म त्वमिदं वानरोत्तम ४ निपत्य मम शृङ्गेषु सुखं विश्रम्य गम्यताम् । राघवस्य कुले जातैरुदधिः परिवर्धितः ५ स त्वां रामहिते युक्तं प्रत्यर्चयति सागरः । कृते च प्रतिकर्तव्यमेष धर्मः सनातनः ६ सोयं तत्प्रतिकारार्थी त्वत्तः संमानमर्हति । त्वन्निमित्तमनेनाहं बहुमानात्प्रचोदितः ७ योजनानां शतं चापि कपिरेष समाप्लुतः । तव सानुषु विश्रान्तः शेषं प्रक्रमतामिति ८ तिष्ठ त्वं हरिशार्दूल मयि विश्रम्य गम्यताम् । तदिदं गन्धवत्स्वादु कन्दमूलफलं बहु ९ तदास्वाद्य हरिश्रेष्ठ विश्रान्तोथ गमिष्यसि । अस्माकमपि संबन्धः कपिमुख्य त्वयास्ति वै ११० प्रख्यातस्त्रिषु लोकेषु महागुणपरिग्रहः ११ वेगवन्तः प्लवन्तो ये प्लवगा मारुतात्मज । तेषां मुख्यतमं मन्ये त्वामहं कपिकु-

---

समजून आल्यामुळें तो मैनाकपर्वत हर्षयुक्त होऊन गर्जना करूं लागला २. इतकेंच नव्हे; परंतु, मनाला हर्ष वाटून प्रसन्न झालेला तो पर्वत पुनरपि वर आला आणि मनुष्यरूप धारण करून आपल्या शिखरावर स्थित झाल्यानंतर अंतरिक्षामध्यें असलेल्या त्या वीर कपीला ह्मणाला " हे वानरश्रेष्ठा, तूं हें दुर्घट कर्म केलें आहेस ३, ४. ह्याकरितां माझ्या शिखरांवर तूं खुशाल उतरून विश्रांति घे आणि मग पुढें जा. रामाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या सगरांनीं समुद्राला वाढविलें आहे ५ आणि ह्मणून तो सागर रामहिताविषयीं उद्युक्त झालेल्या तुझा आदरसत्कार करीत आहे. कारण, एकाद्यानें आपल्यावर उपकार केला असतां त्याच्यावर प्रत्युपकार करावा हा सनातन धर्म आहे ६. ह्यास्तव, त्या उपकाराकरितां प्रत्युपकाराची इच्छा करणाऱ्या ह्या समुद्राचा तुझ्याकडून मान राहणें योग्य आहे. ' शंभर योजनें उल्लंघून जाण्याचा उद्देश मनांत धरून ह्या कपीनें आकाशामध्यें उड्डाण केलें आहे. करितां, तुझ्या शिखरांचे ठिकाणीं विश्रांति घेतल्यावर अवशिष्ट राहिलेल्या मार्गाचें ह्यानें आक्रमण करावें ' ह्मणून तुझ्याकरितां ह्यानें बहुमानानें मला विनंति केली आहे ७, ८. तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, तूं जरा स्वस्थ रहा आणि माझे ठिकाणीं विश्रांति घेऊन मग पुढें जा. सारांश, हीं सुगंधी व स्वादिष्ट असलेलीं अनेक प्रकारचीं मुळें, कंद व फळें ९ सेवन करून विश्रांति घेतल्यानंतर, हे वानरश्रेष्ठा, तूं पुढें जावेस. शिवाय, हे वानरश्रेष्ठा, तुझ्याशीं आमचा संबंधही आहे ११०. मोठे मोठे गुण तुझे अंगीं असल्यामुळें तू त्रैलोक्यामध्यें प्रख्यात आहेस ११. हे वायुपुत्रा, हे वानरश्रेष्ठा, उड्डाण करणारे जे कांहीं वेगवान् वानर आहेत त्यांमध्यें तूं मुख्यांतीलही मुख्य आहेस असें मी समजतों १२.

अर्ह १२. अतिथिः किल पूजार्हः प्राकृतोपि विजानता । धर्मं जिज्ञासमानेन किं पुनर्यादृशो भवान् १३ त्वं हि देववरिष्ठस्य मारुतस्य महात्मनः । पुत्रस्तस्यैव वेगेन सदृशः कपिकुञ्जर १४ पूजिते त्वयि धर्मज्ञ पूजां प्राप्नोति मारुतः । तस्मात्त्वं पूजनीयो मे शृणु चाप्यत्र कारणम् १५ पूर्वं कृतयुगे तात पर्वताः पक्षिणोभवन् । तेपि जग्मुर्दिशः सर्वा गरुडा इव वेगिनः १६ ततस्तेषु प्रयातेषु देवसङ्घाः सहर्षिभिः । भूतानि च भयं जग्मुस्तेषां पतनशङ्कया १७ ततः क्रुद्धः सहस्राक्षः पर्वतानां शतक्रतुः । पक्षांश्चिच्छेद वज्रेण ततः शतसहस्रशः १८ स मामुपगतः क्रुद्धो वज्रमुद्यम्य देवराट् । ततोहं सहसा क्षिप्तः श्वसनेन महात्मना १९ अस्मिंल्लवणतोये च प्रक्षिप्तः प्लवगोत्तम । गुप्तपक्षः समग्रश्च तव पित्राभिरक्षितः १२० ततोहं मानयामि त्वां मान्योसि मम मारुते । त्वया ममैष संबन्धः कपिमुख्य महागुणः २१ अस्मिन्नेवंगते कार्ये सागरस्य ममैव च । प्रीतिं प्रीतमनाः कर्तुं त्वमर्हसि महामते २२ श्रमं मोक्षय पूजां च

---

धर्माची अपेक्षा धरणाऱ्या विचारी पुरुषाला साधारण अतिथीही खरोखर पूज्य आहे, मग तुझ्यासारिख्याची तर गोष्ट कशाला पाहिजे ? १३. हे वानरश्रेष्ठा, तूं देवांमध्यें वरिष्ठ असलेल्या महात्म्या वायूचा पुत्र असून वेगानें त्याची बरोबरी करणारा आहेस १४ आणि तुज धर्मवेत्त्या पुत्राची पूजा झाली असतां वायूचीही पूजा झाल्यासारिखें होणार आहे. तस्मात्, तूं मला पूज्य आहेस. ह्याविषयीं आणखीही एक कारण तूं श्रवण कर १५. बा हनुमाना, पूर्वी कृतयुगामध्यें पर्वत पक्षयुक्त होते आणि ते वेगवान् गरुडपक्ष्याप्रमाणें सर्व दिशेस गमनही करीत असत १६. एकदां ते उड्डाण करून गेले असतां ऋषींसहवर्तमान देवगण आणि इतरही प्राणी ह्यांना त्यांच्या पडण्याची शंका येऊन भय उत्पन्न झालें १७. तेव्हां सहस्रनयन इंद्र क्रुद्ध झाला आणि वज्राच्या योगानें त्यानें पर्वतांच्या पक्षांचे लक्षावधि तुकडे करून टाकिले १८. शेवटीं तो क्रुद्ध झालेला देवराज वज्र उगारून माझ्याकडेही आला असतां महात्म्या वायूनें मला एकाएकीं आकाशांत उडवून दिलें १९ आणि, हे वानरश्रेष्ठा, ह्या समुद्रामध्यें टाकिलें. अशा रीतीनें तुझ्या पित्यानें संपूर्ण शरीर व पक्ष ह्यांसहवर्तमान माझें रक्षण केलें १२०. ह्यामुळें मी तुला मान देत आहें आणि ह्मणून, हे वायुपुत्रा, तूं मला मान्य आहेस. हे वानरश्रेष्ठा, तुझ्याशीं ह्या माझा संबंध फारच महत्त्वाचा आहे २१. तेव्हां ज्याअर्थी असा प्रकार आहे त्याअर्थी, हे महाबुद्धिमान् हनुमाना, ह्या सत्पुरुषकारक कार्याविषयीं तूं प्रसन्न मनानें समुद्राचा

गृहाण हरिसत्तम । प्रीतिं च मम मान्यस्य प्रीतोस्मि तव दर्शनात् २३
एवमुक्तः कपिश्रेष्ठस्तं नगोत्तममब्रवीत् । प्रीतोस्मि कृतमातिथ्यं मन्युरे-
षोपनीयताम् २४ त्वरते कार्यकालो मे अहश्चाप्यतिवर्तते । प्रतिज्ञा च
मया दत्ता न स्थातव्यमिहान्तरा २५ इत्युक्त्वा पाणिना शैलमालभ्य
हरिपुंगवः । जगामाकाशमाविश्य वीर्यवान्प्रहसन्निव २६ स पर्वतसमु-
द्राभ्यां बहुमानादवेक्षितः । पूजितश्चोपपन्नाभिराशीर्भिरभिनन्दितः २७
अथोर्ध्वं दूरमाप्लुत्य हित्वा शैलमहार्णवौ । पितुः पन्थानमासाद्य जगाम
विमलेम्बरे २८ भूयश्चोर्ध्वं गतिं प्राप्य गिरिं तमवलोकयन् । वायुसूनु-
र्निरालम्बो जगाम कपिकुञ्जरः २९ तद्द्वितीयं हनुमतो दृष्ट्वा कर्म सुदु-
ष्करम् । प्रशशंसुः सुराः सर्वे सिद्धाश्च परमर्षयः १३० देवताश्चाभव-
न्हृष्टास्तत्रस्थास्तस्य कर्मणा । काञ्चनस्य सुनाभस्य सहस्राक्षश्च

---

व माझा मनोरथ परिपूर्ण कर २२. तात्पर्य, हे वानरश्रेष्ठा, श्रम परिहार करून तूं माझ्या सत्काराचा स्वीकार कर; मी तुझ्या दर्शनामुळें संतुष्ट झालों आहें आणि वायुसंबंधामुळें माझें ह्मणणें मान्य करणेंच तुला यथार्थ आहे. तस्मात्, तूं एवढा माझा मनोरथ परिपूर्ण कर " २३. ह्याप्रमाणें मैनाकानें सांगितलें असतां तो वानरश्रेष्ठ त्या पर्वतश्रेष्ठाला ह्मणाला " मी संतुष्ट झालों आहें आणि तूंही माझा सत्कार केला आहेस. आतां ( तुझ्या ह्मणण्याप्रमाणें मला वेळ मोडतां येत नाहीं ) ह्याबद्दल तूं क्रोध करूं नको २४. माझी कार्य करण्याची वेळ थोडी आहे, दिवसही जात चालला आहे आणि येथें मध्यंतरीं थांबावयाचें नाहीं ह्मणून मीं प्रतिज्ञा केली आहे " २५. असें ह्मणून त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें पर्वताला हातानें स्पर्श केला आणि हंसल्यासारिखें करीत करींत पुनरपि आकाशाचें अवलंबन करून तो वीर्यवान् हनुमान् पुढें चालता झाला २६. पर्वत आणि समुद्र ह्यांनीं ह्याप्रमाणें बहुमानपूर्वक त्याला अवलोकन केलें, त्याचा सत्कार केला आणि योग्य आशीर्वादांनीं त्याचें अभिनंदनही केलें २७. नंतर पर्वत व महासागर ह्यांना सोडून त्या हनुमानानें उंच उड्डाण केलें आणि ह्याप्रमाणें आपल्या पित्याच्या मार्गाचें अवलंबन करून तो निर्मल आकाशामध्यें गमन करूं लागला २८. नंतर पहिल्यापेक्षांही उंच उड्डाण करून त्या पर्वताकडे पहात पहात तो निराधार वायुपुत्र वानरश्रेष्ठ चालता झाला २९. तेव्हां हनुमानाचें अत्यंत दुष्कर असें तें दुसरेंही कर्म पाहून सर्व 'देव,' सिद्ध आणि महर्षि त्याची स्तुति करूं लागले १३० मनोहर मध्यभागानें युक्त असलेल्या त्या सुवर्ण-मय मैनाकपर्वताचें तें उत्थानरूप कर्म पाहून सहस्रनयन इंद्रासहवर्तमान तेथें

वासवः ३१ उवाच वचनं धीमान्परितोषात्सगद्गदम् । सुनाभं पर्वतश्रेष्ठं स्वयमेव शचीपतिः ३२ हिरण्यनाभ शैलेन्द्र परितुष्टोऽस्मि ते भृशम् । अभयं ते प्रयच्छामि गच्छ सौम्य यथासुखम् ३३ साह्यं कृतं ते सुमहद्विक्रान्तस्य हनूमतः । क्रमतो योजनशतं निर्भयस्य भये सति ३४ रामस्यैष हितायैव याति दाशरथेः कपिः । सत्क्रियां कुर्वता शक्त्या तोषितोऽस्मि दृढं त्वया ३५ स तत्प्रहर्षमलभद्विपुलं पर्वतोत्तमः । देवतानां पतिं दृष्ट्वा परितुष्टं शतक्रतुम् ३६ स वै दत्तवरः शैलो बभूवावस्थितस्तदा । हनुमांश्च मुहूर्तेन व्यतिचक्राम सागरम् ३७ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । अब्रुवन्सूर्यसंकाशां सुरसां नागमातरम् ३८ अयं वातात्मजः श्रीमान्प्लवते सागरोपरि । हनूमान्नाम तस्य त्वं मुहूर्तं विघ्नमाचर ३९ राक्षसं रूपमास्थाय सुघोरं पर्वतोपमम् । दंष्ट्राकरालं पिङ्गाक्षं वक्त्रं कृत्वा नभः स्पृशम् १४० बलमिच्छामहे ज्ञातुं भूयश्चास्य

---

असलेले देवही संतुष्ट झाले ३१. नंतर बुद्धिमान् इंद्र उत्कृष्ट मध्यप्रदेशानें युक्त असलेल्या त्या पर्वतश्रेष्ठाला संतोषामुळें हास्यपूर्वक ह्मणाला ३२ "हे सुवर्णमय पर्वतराजा, मी तुझ्यावर अत्यंत संतुष्ट झालों आहें. मी तुला अभय देतों. हे विनयसंपन्न, तूं खुशाल चालता हो ३३. शंभर योजनेंपर्यंत आकाशमार्गानें जाण्यास उद्युक्त झालेला आणि जातां जातां श्रमलेला हनुमान् निर्भय असतांनाही त्याला भीति उत्पन्न झाली असेल असें समजून तूं त्याला फारच मोठें साहाय्य केलेंस ह्यामुळें मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें ३४. दशरथपुत्र रामाच्याच हिताकरितां हा कपि चालला आहे. आणि ह्याचा यथाशक्ति सत्कार करण्यास तूं उद्युक्त झाल्यामुळें मलाही अतिशय संतुष्ट केलें आहेस" ३५. देवराज इंद्र संतुष्ट झाला आहे असें पाहून त्या पर्वतश्रेष्ठाला फारच हर्ष झाला ३६. इंद्रानें "तुला अभय आहे" असा वर दिल्यानंतर तो मैनाकपर्वत पूर्वीप्रमाणेंच जलामध्यें मग्न झाला आणि हनुमान्ही त्याच्याशीं बोलण्याकरितां क्षणभर थांबून सागराचें उल्लंघन करीत पुढें चालला ३७. तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षि तेजानें सूर्याप्रमाणें असलेल्या सुरसानामक नागमातेला ह्मणाले ३८ "हा भव्य वायुपुत्र हनुमान् समुद्रावरून जात आहे त्याला तूं एक क्षणभर विघ्न कर ३९. सारांश, कराल दंष्ट्रा आणि पिंगटवर्ण नेत्र ह्यांनीं युक्त असें अत्यंत भयंकर पर्वतप्राय राक्षसरूप धारण करून व आकाशाला स्पर्श करण्यासारखें मुख मोठें करून तूं ह्याला विघ्न आण १४०. आह्माला ह्याचें बल आणि विशेषतः ह्याचा पराक्रम जाणण्याची इच्छा आहे; तेव्हां युक्ति योजून हा तुला जिंक-

पराक्रमम् । त्वां विजेष्यत्युपायेन विषादं वा गमिष्यति ४१ एवमुक्ता तु सा देवी दैवतैरभिसत्कृता । समुद्रमध्ये सुरसा बिभ्रती राक्षसं वपुः ४२ विकृतं च विरूपं च सर्वस्य च भयावहम् । प्लवमानं हनुमन्तमावृत्येदमुवाच ह ४३ मम भक्ष्यः प्रदिष्टस्त्वमीश्वरैर्वानरर्षभः । अहं त्वां भक्षयिष्यामि प्रविशेदं ममाननम् ४४ वर एष पुरा दत्तो मम धात्रेति सत्वरा । व्यादाय वक्त्रं विपुलं स्थिता सा मारुतेः पुरः ४५ एवमुक्तः सुरसया प्रहृष्टवदनोऽब्रवीत् । रामो दाशरथिर्नाम प्रविष्टो दण्डकावनम् ॥ लक्ष्मणेन सह भ्रात्रा वैदेह्या चापि भार्यया ४६ अस्य कार्यविषक्तस्य बद्धवैरस्य राक्षसैः । तस्य सीता हृता भार्या रावणेन यशस्विनी ४७ तस्याः सकाशं दूतोऽहं गमिष्ये रामशासनात् । कर्तुमर्हसि रामस्य साह्यं विषयवासिनि ४८ अथवा मैथिलीं दृष्ट्वा रामं चाक्लिष्टकारिणम् । आगमिष्यामि ते वक्त्रं सत्यं प्रतिशृणोमि ते ४९ एवमुक्ता हनुमता सुरसा कामरूपिणी । अब्रवीन्नातिवर्तेन्मां कश्चिदेष वरो मम ५०

---

ण्यार किंवा जेरीस येणार हें काय होतें तें पाहूं " ४१. ह्याप्रमाणें देवांनी आदरपूर्वक तिची विनंति केली असतां त्या सुरसा देवीनें विकृत, विरूप आणि सर्वांना भय उत्पन्न करणारें असें राक्षसरूप धारण केलें आणि आकाशमार्गानें जाणाऱ्या हनुमानाचा मार्ग आडवून धरून त्याला ती ह्मणाली ४२,४३ ' ईश्वरांनीं तुज वानरश्रेष्ठाला माझें भक्ष्य नेमिलें आहे. ह्यास्तव, मी तुला भक्षण करणार; ह्या माझ्या मुखामध्यें तूं प्रविष्ट हो ४४. कारण, जो समोर येईल तो तुझ्या मुखामध्यें प्रविष्ट होईल ह्मणून विधात्यानें मला हा पूर्वीं वरच देऊन ठेविला आहे " असें ह्मणून ह्मणून आपलें विशाल मुख पसरून ती सुरसा सत्वर त्या वायुपुत्राच्या पुढें उभी राहिली ४५. परंतु, सुरसेनें त्याच्याशीं असें भाषण केल्यावर प्रसन्न मुद्रेनें तो हनुमान् तिला ह्मणाला " रामनामक दशरथपुत्र, भ्राता लक्ष्मण आणि भार्या विदेहराजकन्या ह्यांसहवर्तमान दण्डकारण्यामध्यें प्रविष्ट झाला होता ४६. राक्षसांशीं वैर बांधून राहिलेला तो राम मायावी मृगाचा वध करण्याविषयीं आसक्त झाला असतां त्याची यशस्विनी भार्या सीता रावणानें हरण करून नेली आहे ४७. तिच्या समीप रामाच्या आज्ञेवरून मी दूत जात आहें. तस्मात्, हे रामप्रदेशवासिनी, रामाच्या कार्याला मदत करणें हेंच तुला योग्य आहे ४८. अथवा ( माझी सुटका तुला करणेंच नसेल तर ) सीतेला आणि उदार कृत्यें करणाऱ्या रामाला अवलोकन करून मी तुझ्या मुखाकडे परत येईन, हें मी तुला प्रतिज्ञेवर खरें सांगून ठेवितों " ४९. ह्याप्रमाणें हनुमानानें विनंति केली

तं प्रयान्तं समुद्वीक्ष्य सुरसा वाक्यमब्रवीत् । बलं जिज्ञासमाना सा
नागमाता हनूमतः ५१ निविश्य वदनं मेद्य गन्तव्यं वानरोत्तम । वर एष
पुरा दत्तो मम धात्रेति सत्वरा ५२ व्यादाय विपुलं वक्त्रं स्थिता सा
मारुतेः पुरः । एवमुक्तः सुरसया क्रुद्धो वानरपुंगवः ५३ अब्रवीत्कुरु
वै वक्त्रं येन मां विषहिष्यसि । इत्युक्त्वा सुरसां क्रुद्धो दशयोजनमाय-
ताम् ५४ दशयोजनविस्तारो हनुमानभवत्तदा । चकार सुरसाप्यास्यं
विंशद्योजनमायतम् ५५ तद्दृष्ट्वा व्यादितं त्वास्यं वायुपुत्रः स बुद्धिमान् ।
दीर्घजिह्वं सुरसया सुभीमं नरकोपमम् ५६ स संक्षिप्यात्मनः कायं
जीमूत इव मारुतिः । तस्मिन्मुहूर्ते हनुमान्बभूवाङ्गुष्ठमात्रकः ५७ सोभि-
पद्याथ तद्वक्त्रं निष्पत्य च महाबलः । अन्तरिक्षे स्थितः श्रीमानिदं वच-
नमब्रवीत् ५८ प्रविष्टोस्मि हि ते वक्त्रं दाक्षायणि नमोस्तु ते । गमिष्ये यत्र
वैदेही सत्यश्चासीद्वरस्तव ५९ तं दृष्ट्वा वदनान्मुक्तं चन्द्रं राहुमुखादिव ।

---

असतां यथेष्टरूप धारण करणारी ती सुरसा त्याला ह्मणाली "माझ्या तावडींतून सुटून कोणीही जाणार नाहीं हा तर मला वर मिळालेला आहे" १५०. असें सुरसा सांगत असतांनाही जेव्हां तो हनुमान् पुढें जाऊं लागला तेव्हां हनुमानाचें बल किती आहे हें पहाण्याची इच्छा धरून ती नागमाता सुरसा त्याच्या तोंडाकडे पाहून ह्मणाली ५१ "हे वानर-श्रेष्ठा, आतां माझ्या मुखामध्यें प्रवेश करून नंतर तूं चालता हो. कारण, विधात्यानें मला हा पूर्वी वरच दिलेला आहे." असें त्याला सांगतांक्षणीं ५२ सुरसा आपलें प्रचंड मुख पसरून मारुतीपुढें उभी राहिली. परंतु, ह्याप्रमाणें सुरसा त्याला बोलली असतां वानर-श्रेष्ठ हनुमान् क्रुद्ध होऊन ५३ तिला ह्मणाला "तर मग ज्या मुखानें तूं मला सहन करशील तें आपलें मुख एकदां हवें तेवढें पसर." ह्याप्रमाणें तो हनुमान् क्रुद्ध होऊन दहा योजनें लांब असलेल्या त्या सुरसेला ह्मणाला ५४ आणि स्वतःहीं दहा योजनें मोठा झाला; परंतु, सुरसेनें आपलें मुख वीस योजनें मोठें केलें १५५. तेव्हां दीर्घ जिह्वेनें युक्त, अत्यंत भयंकर आणि नरकाच्याच उपमेला योग्य असें तें त्या सुरसेचें पसरलेलें मुख अवलोकन करून त्या बुद्धिमान् वायुपुत्र ५६ मारुतीनें आपलें शरीर लहान केलें. इतकेंच नव्हे; परंतु, तो हनुमान् तत्क्षणीं अगदीं अंगुष्ठायेवढाच झाला ५७. नंतर तो महाबलाढ्य व भव्य हनुमान् तिच्या मुखामध्यें प्रविष्ट होऊन व पुनरपि बाहेर पडून अंतरिक्षामध्यें स्थित झाल्यावर ह्मणाला ५८ "हे दाक्षायणि, नमो नमः! ( तुझ्या ह्मणण्याप्रमाणें ) मी तुझ्या मुखामध्यें प्रविष्ट झालों होतों. आतां मी जिकडे विदेहराजकन्या सीता आहे तिकडे जातों. तुला मिळालेला वर खरा झाला" ५९.

अब्रवीत्सुरसा देवी स्वेन रूपेण वानरम् १६० अर्थसिद्ध्यै हरिश्रेष्ठ गच्छ सौम्य यथासुखम् । समानय च वैदेहीं राघवेण महात्मना ६१ तत्तृतीयं हनुमतो दृष्ट्वा कर्म सुदुष्करम् । साधुसाध्विति भूतानि प्रशशंसुस्तदा हरिम् ६२ स सागरमनाधृष्यमभ्येत्य वरुणालयम् । जगामाकाशमाविश्य वेगेन गरुडोपमः ६३ सेविते वारिधाराभिः पतगैश्च निषेविते । चरिते कैशिकाचार्यैरैरावतनिषेविते ६४ सिंहकुञ्जरशार्दूलपतगोरगवाहनैः । विमानैः संपतद्भिश्च विमलैः समलंकृते ६५ वज्राशनिसमस्पर्शैः पावकैरिव शोभिते । कृतपुण्यैर्महाभागैः स्वर्गजिद्भिरधिष्ठिते ६६ वहता हव्यमत्यन्तं सेविते चित्रभानुना । ग्रहनक्षत्रचन्द्रार्कतारागणविभूषिते ६७ महर्षिगणगन्धर्वनागयक्षसमाकुले । विविक्ते विमले विश्वे विश्वावसुनिषेविते ६८ देवराजगजाक्रान्ते चन्द्रसूर्यपथे शिवे । विताने जीवलोकस्य विमले ब्रह्मनिर्मिते ६९ बहुशः सेविते वीरैर्विद्याधरगणैर्वृते । जगाम वायुमार्गे च गरुत्मानिव मारुतिः १७० हनुमान्मेघजालानि प्राकर्षन्मारुतो

---

असो. ह्याप्रमाणें राहुमुखापासून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें आपल्या मुखांतून पार पडलेल्या त्या वानराला अवलोकन केल्यावर सुरसादेवी आपलें नेहमींचें रूप धारण करून त्याला ह्मणाली १६० " हे वानरश्रेष्ठा, कार्यसिद्धीकरितां तूं आतां खुशाल जा आणि, हे विनयसंपन्न हनुमाना, महात्म्या रघुवंशज रामाशीं सीतेचा समागम करून दे " ६१ असो. हनुमानाचें अत्यंत दुष्कर असें हें तिसरें कर्म आढळून आल्यावर " शाबास, शाबास ! " ह्मणून त्या वानराची सर्व प्राण्यांनीं प्रशंसा केली ६२. ह्याप्रमाणें वरुणाचें निवासस्थान असलेल्या दुस्तर सागरापाशीं आल्यानंतर तो गरुडतुल्य हनुमान् आकाशामध्यें वेगानें उड्डाण करून चालता झाला ६३. जलधारा, पक्षी, संगीताचार्य, गंधर्व आणि इंद्रधनुष्य ह्यांनीं युक्त ६४; सिंह, गज, व्याघ्र, पक्षी आणि उरग हीं वाहनें ज्यांना लाविलेलीं आहेत अशा दाटीदाटीनें चाललेल्या निर्मल विमानांनीं भूषित ६५; वज्र व विद्युल्लता ह्यांच्या आघाताप्रमाणें ज्यांचा स्पर्श भयंकर अशा अग्नींनीं शोभित; पुण्यवान् आणि महाभाग्यवान् अशा स्वर्ग जिंकिलेल्या लोकांनीं अधिष्ठित ६६, देवांकडे एकसारखें हव्य नेणाऱ्या अग्नीनें आश्रित; ग्रह, नक्षत्रें, चंद्र, सूर्य आणि तारागण ह्यांनीं विभूषित ६७; महर्षिगण, गंधर्व, नाग आणि यक्ष ह्यांनीं व्याप्त; अलग, निर्मल, विश्वाला आश्रयभूत; विश्वावसुनामक गंधर्वराजानें सेवित ६८; देवराजाच्या गजांनीं व्याप्त; मंगलावह; चंद्रसूर्यांचा मार्ग; जीवलोकावर बांधिलेली ब्रह्मनिर्मित निर्मल चांदणी ६९; वीरांनीं वारंवार सेवित आणि विद्याधरगणांनीं व्याप्त

यथा ७१ कालागुरुसवर्णानि रक्तपीतसितानि च । कपिना कृष्यमाणानि महाभ्राणि चकाशिरे ७२ प्रविशन्नभ्रजालानि निष्पतंश्च पुनः पुनः । प्रावृषीन्दुरिवाभाति निष्पतन्प्रविशंस्तथा ७३ प्रदृश्यमानः सर्वत्र हनूमान्मारुतात्मजः । भेजेम्बरं निरालम्बं पक्षयुक्त इवाद्रिराट् ७४ प्लवमानं तु तं दृष्ट्वा सिंहिका नाम राक्षसी । मनसा चिन्तयामास प्रवृद्धा कामरूपिणी ७५ अद्य दीर्घस्य कालस्य भविष्याम्यहमाशिता । इदं मम महासत्त्वं चिरस्य वशमागतम् ७६ इति संचिन्त्य मनसा च्छायामस्य समाक्षिपत् । छायायां गृह्यमाणायां चिन्तयामास वानरः ७७ समाक्षिप्तोऽस्मि सहसा पङ्गूकृतपराक्रमः । प्रतिलोमेन वातेन महानौरिव सागरे ७८ तिर्यगूर्ध्वमधश्चैव वीक्षमाणस्तदा कपिः । ददर्श स महासत्त्वमुत्थितं लवणाम्भसि ७९ तद्दृष्ट्वा चिन्तयामास मारुतिर्विकृताननाम् ।

---

रा वायुमार्गाला आकाशांतून तो वायुपुत्र हनुमान् वायुप्रमाणें मेघसमुदाय आकर्षण रीत करीत गरुडासारिखा चालता झाला १७०,७१. रक्तवर्ण, पीतवर्ण, श्वेतवर्ण आणि गागुरुतुल्यवर्ण अशीं मोठीं मोठीं अभ्रें वायुपुत्र हनुमानाच्या मागोमाग त्याच्या नुळें जाताना झळकूं लागलीं ७२. पुन्हां पुन्हां मेघजालामध्यें प्रविष्ट होत असतांना आणि फिरून फिरून बाहेर पडत असतांना तो हनुमान् पर्जन्यकालीं मेघपटां वारंवार प्रविष्ट होणाऱ्या व पुनरपि त्यांतून बाहेर निघणाऱ्या चंद्राप्रमाणें शोभूं गला ७३ व सर्व ठिकाणांहून दृष्टीं पडणारा तो वायुपुत्र हनुमान् पक्षयुक्त पर्वतन कीं काय असा लोकांना भासत असतांना निराधार आकाशाचंच लंबन करून राहिला ७४. अकाशांतून उड्डाण करणाऱ्या त्या हनुमानाला अवन केल्यावर यथेष्ट रूप धारण करणारी सिंहिकानामक अति वृद्ध राक्षसी मनां विचार करूं लागली ७५ कीं "बराच काल लोटल्यानंतर आज आपणाला मिळणार आहे. कारण, पुष्कळ दिवसांनीं हा मोठा प्राणी माझ्या तावडींत ला आहे" ७६. असा मनामध्यें विचार करून त्या सिंहिका राक्षसीनें त्या हनुमानाची पकडली. तेव्हां छाया आकृष्ट होत असतांना हनुमान् वानर मनामध्यें ह्मणाला ७७ एकाएकीं ओढूं लागली असून माझा पराक्रमही एकदम कुंठित झालेला हामुळें सागरामध्यें उलट दिशेच्या वाऱ्यानें ज्याप्रमाणें नौकेची स्थिति होते गें माझी स्थिति झाली आहे" ७८. असें चिंतन करून तो कपि बाजूला खालीं वर पाहूं लागला असतां समुद्रामध्यें वर आलेला एक मोटाच प्राणी दृष्टीं पडला ७९. तेव्हां कराल वदनानें युक्त असलेली राक्षसी आढळल्या-

कपिराज्ञा यथाख्यातं सत्त्वमद्भुतदर्शनम् १८० छायाग्राहि महावीर्यं
तदिदं नात्र संशयः । स तां बुद्ध्वार्थतत्त्वेन सिंहिकां मतिमान्कपिः ८१
व्यवर्धत महाकायः प्रावृषीव बलाहकः । तस्य सा कायमुद्वीक्ष्य वर्धमानं
महाकपेः ८२ वक्त्रं प्रसारयामास पातालाम्बरसंनिभम् । घनराजीव गर्जन्ती
वानरं समभिद्रवत् ८३ ददर्श स ततस्तस्या विकृतं सुमहन्मुखम् । कायमात्रं
च मेधावी मर्माणि च महाकपिः ८४ स तस्या विकृते वक्त्रे वज्रसंहननः
कपिः । संक्षिप्य मुहुरात्मानं निपपात महाकपिः ८५ आस्ये तस्या निमज्जन्तं
ददृशुः सिद्धचारणाः । ग्रस्यमानं यथा चन्द्रं पूर्णं पर्वणि राहुणा ८६
ततस्तस्या नखैस्तीक्ष्णैर्मर्माण्युत्कृत्य वानरः । उत्पपाताथ वेगेन मनः
संपातविक्रमः ८७ तां तु दिष्ट्या च धृत्या च दाक्षिण्येन निपात्य सः ।
कपिप्रवीरो वेगेन ववृधे पुनरात्मवान् ८८ हृतहृत्सा हनुमता पपात विधु-

---

वर मारुति मनामध्यें ह्मणाला " अद्भुत आकारानें युक्त, महावीर्यवान् आणि छायेच्या योगानें वस्तु ग्रहण करण्यास समर्थ असा जो प्राणी वानरराजानें मला सांगितला होता तो हाच असावा ह्यांत संशय नाहीं. ह्याप्रमाणें छायाकर्षणाचा अनुभव आल्यामुळें त्या बुद्धिमान् कपीनें त्या सिंहिकेला ओळखिलें ८०, ८१ आणि पर्जन्यकालीं वृद्धिंगत होणाऱ्या मेघाप्रमाणें प्रचंड शरीरानें युक्त असलेला तो कपि वृद्धिंगत होऊं लागला. तेव्हां वृद्धिंगत होणारें त्या महाकपीचें शरीर अवलोकन करून ८२ त्या सिंहिकेनें पाताल आणि आकाश ह्यांतील मध्यभागासारिखें असलेलें आपलें मुख पसरिलें आणि मेघपंक्तीप्रमाणें गर्जना करीत करीत ती त्या वानराकडे धांवली ८३. ह्याप्रमाणें ती हनुमानाच्या अंगावर धांवून गेली असतां तिचें तें अक्राळविक्राळ अजस्र मुख अवलोकन करून तिचा नखशिखांत देह आणि मर्मस्थानें हीं त्या बुद्धिमान् महाकपीनें निरखून पाहिलीं ८४. नंतर आपला देह अतिशयच संकुचित करून त्या वज्रतुल्य दृढशरीरी महाकपि हनुमानानें तिच्या अक्राळविक्राळ मुखामध्यें उडी घातली ८५. ह्याप्रमाणें तिच्या मुखामध्यें तो कपि बुडून जाऊं लागला असतां पौर्णिमेचे दिवशीं राहूनें ग्रस्त होत असलेल्या चंद्राप्रमाणें सिद्धचारणांनीं त्याला अवलोकन केलें ८६. तिच्या मुखामध्यें प्रविष्ट झाल्यानंतर गतीनें मनाच्या उड्डाणाची बरोबरी करणारा तो वानर तीक्ष्ण नखांनीं तिच्या मर्मस्थानांचे लचके काढून वेगावेगानें बाहेर पडला ८७. असो. सुदैव, धैर्य आणि प्रसंगावधान ह्यांच्या योगानें अशा प्रकारें तिचा वध करून तो जितेंद्रिय कपिश्रेष्ठ पुनरपि वेगावेगानें वृद्धिंगत होऊं लागला ८८ व हनुमानानें जिचें काळीज काढून नेलें आहे अशी

राम्भसि । स्वयंभुवैव हनुमान्सृष्टस्तस्या निपातने ८९ तां हतां वानरे-
णाशु पतितां वीक्ष्य सिंहिकाम् । भूतान्याकाशचारीणि तमूचुः प्लवगो-
त्तमम् १९० भीममद्य कृतं कर्म महत्सत्त्वं त्वया हतम् । साधयार्थमभि-
प्रेतमरिष्टं प्लवतां वर ९१ यस्य त्वेतानि चत्वारि वानरेन्द्र यथा तव ।
धृतिर्दृष्टिर्मतिर्दाक्ष्यं स कर्मसु न सीदति ९२ स तैः संपूजितः पूज्यः
प्रतिपन्नप्रयोजनैः । जगामाकाशमाविश्य पन्नगाशनवत्कपिः ९३ प्राप्त-
भूयिष्ठपारस्तु सर्वतः परिलोकयन् । योजनानां शतस्यान्ते वनराजीं ददर्श
सः ९४ ददर्श च पतन्नेव विविधद्रुमभूषितम् । द्वीपं शाखामृगश्रेष्ठो
मलयोपवनानि च ९५ सागरं सागरानूपान्सागरानूपजान्द्रुमान् । साग-
रस्य च पत्नीनां मुखान्यपि विलोकयत् ९६ स महामेघसंकाशं समी-
क्ष्यात्मानमात्मवान् । निरुन्धन्तमिवाकाशं चकार मतिमान्मतिम् ९७
कायवृद्धिं प्रवेगं च मम दृष्ट्वैव राक्षसाः । मयि कौतूहलं कुर्युरिति मेने

---

ती सिंहिकाराक्षसी समुद्रामध्यें ( त्याच्या हातूनच ) मरण पावली. कारण, तिचा वध करण्याकरितांच ब्रह्मदेवानें हनुमानाला उत्पन्न केला होता ८९. वानरानें मारिलेली आणि ह्मणूनच एकाएकीं पडलेली ती सिंहिका अवलोकन करून आकाशामध्यें संचार करणारे प्राणी त्या वानरश्रेष्ठाला ह्मणाले १९० " हे उड्डाण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ हनुमाना, तूं आज ह्या मोठ्या राक्षसीचा वध केलास हें एक प्रचंडच कृत्य केलेंस. आतां तूं आपला मनोरथ निर्विघ्नपणें सिद्धीस ने ९१. हे वानराधिपते, धैर्य, प्रसंगावधान, मति आणि दक्षता हे चार गुण तुझ्याप्रमाणें ज्याचे ठिकाणीं असतात तो उपस्थित झालेल्या कार्यासंबंधानें कधींही पंचाइतींत पडत नाहीं " ९२. ह्याप्रमाणें स्तुतीस पात्र असलेल्या कपीची हातीं घेतलेल्या कार्याला अनुमोदन देऊन त्यांनीं प्रशंसा केली असतां तो कपि हनुमान् गरुडाप्रमाणें आकाशाचेंच अवलंबन करून पुढें चालला ९३ आणि जवळ जवळ पलीकडल्या तीराशीं पोंचल्यावर तो चोहोंकडे दृष्टि फेंकूं लागला असतां शंभर योजनांचे शेवटीं एक वनपंक्ति त्यानें अवलोकन केली ९४. आकाशामध्यें उड्डाण करीत असतांनाच त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें नानाप्रकारच्या वृक्षांनीं भूषित असें एक बेट आणि मलयसंज्ञक पर्वतसंबंधीं उपवनें पाहिलीं ९५ व सागर, समुद्रतीरावरील प्रदेश, त्या प्रदेशावरील वृक्ष आणि नद्यांची मुखें हींही त्यानें अवलोकन केलीं ९६. तदनंतर मोठ्या मेघासारखें आणि ह्मणूनच जसें कांहीं आकाश व्याप्त करणारें असें आपलें शरीर अवलोकन करून तो जितेंद्रिय बुद्धिमान् हनुमान् मनामध्यें विचार करूं लागला असतां ९७ " माझी शरीरवृद्धि आणि

महामतिः १८ ततः शरीरं संक्षिप्य तन्महीधरसंनिभम् । पुनः प्रकृति-
मापेदे वीतमोह इवात्मवान् १९ तद्रूपमतिसंक्षिप्य हनूमान्प्रकृतौ स्थितः ।
त्रीन्क्रमानिव विक्रम्य बलिवीर्यहरो हरिः २०० स चारुनानाविधरूप-
धारी परं समासाद्य समुद्रतीरम् । परैरशक्यं प्रतिपन्नरूपः समीक्षि-
तात्मा समवेक्षितार्थः १ ततः स लम्बस्य गिरेः समृद्धे विचित्रकूटे
निपपात कूटे । सकेतकोद्दालकनारिकेले महाभ्रकूटप्रतिमो महात्मा २
ततस्तु संप्राप्य समुद्रतीरं समीक्ष्य लङ्कां गिरिवर्यमूर्ध्नि । कपिस्तु तस्मि-
न्निपपात पर्वते विधूय रूपं व्यथयन्मृगद्विजान् ३ स सागरं दानवपन्न-
गायुतं बलेन विक्रम्य महोर्मिमालिनम् । निपत्य तीरे च महोदधेस्तदा
ददर्श लङ्काममरावतीमिव ४ [ २०४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

---

वेग अवलोकन करितांक्षणींच राक्षस आश्चर्यबुद्धीनें मला पाहण्यास उत्सुक होतील" असें त्या महाविचारी हनुमानाला वाटलें १८. तेव्हां वासनेच्या तावडींत सांपडल्यामुळें प्राप्त झालेला मोह नाहींसा झाला असतां जीवन्मुक्त योगी ज्याप्रमाणें जीव ब्रह्मैक्यानुभवरूप स्वभावाचें अवलंबन करितो त्याप्रमाणें तें आपलें पर्वतप्राय शरीर संकुचित करून हनुमान् स्वाभाविक शरीराचें अवलंबन करून राहिला १९. सारांश, बलीचें वीर्य हरण करणारा श्रीहरी ज्याप्रमाणें तीन पावलें टाकिल्यावर वृद्धिंगत केलेलें शरीर संकुचित करून राहिला त्याप्रमाणें हनुमानही तें आपलें रूप अतिशय संकुचित करून व स्वाभाविक वानर-रूपाचें अवलंबन करून राहिला २००. दुसऱ्यांना प्राप्त होण्यास अशक्य अशा त्या समुद्राच्या परतीराला गेल्यानंतर आपलें वृद्धिंगत झालेलें अतिप्रचंड शरीर अवलोकन करून व हातीं घेतलेल्या कार्याचा विचार करून नानाप्रकारचें मनोहर रूप धारण करण्यास समर्थ असलेल्या त्या हनुमानानें आपलें नेहमीचें रूप धारण केलें १. तदनंतर मोठ्या मेघपटलाप्रमाणें असलेला तो महात्मा हनुमान् केवडे, भोकरी आणि नारळी ह्या वृक्षांनीं व इतर लहान लहान विचित्र शिखरांनीं युक्त असलेला लंबसंज्ञक त्रिकूटाचलाच्या समृद्ध शिखरावर उतरला. २. तात्पर्य, समुद्रतीराला जाऊन पोंचल्यानंतर त्या श्रेष्ठ पर्वताच्या शिखरावर असलेली लंका अवलोकन करून व आपलें अतिप्रचंड रूप सोडून देऊन तो कपि पशुपक्ष्यांना त्रस्त करीत करीत त्या पर्वतावर येऊन उतरला ३ व ह्याप्रमाणें दानव आणि पन्नग ह्यांनीं युक्त असून मोठ्या मोठ्या तरंगसमुदायांनीं भरून गेलेल्या सागराचें स्वपराक्रमानें उल्लं-

स सागरवनाधृष्यमतिक्रम्य महाबलः। त्रिकूटस्य तटे लङ्कां स्थितः
स्वस्थां ददर्श ह १ ततः पादपमुक्तेन पुष्पवर्षेण वीर्यवान्। अभिवृष्टस्त-
तस्तत्र बभौ पुष्पमयो हरिः २ योजनानां शतं श्रीमांस्तीर्त्वाप्युत्तमवि-
क्रमः। अनिःश्वसन्कपिस्तत्र न ग्लानिमधिगच्छति ३ शतान्यहं योज-
नानां क्रमेयं सुबहून्यपि। किं पुनः सागरस्यान्तं संख्यातं शतयोजनम् ४
स तु वीर्यवतां श्रेष्ठः प्लवतामपि चोत्तमः। जगाम वेगवाँल्लङ्कां लङ्घ-
यित्वा महोदधिम् ५ शाद्वलानि च नीलानि गन्धवन्ति वनानि च।
मधुमन्ति च मध्येन जगाम नगवन्ति च ६ शैलांश्च तरुसंछन्नान्वनरा-
जींश्च पुष्पिताः। अभिचक्राम तेजस्वी हनूमान्प्लवगर्षभः ७ स तस्मिन्न-
चले तिष्ठन्वनान्युपवनानि च। स नगाग्रे स्थितां लङ्कां ददर्श पवना-
त्मजः ८ सरलान्कर्णिकारांश्च खर्जूरांश्च सुपुष्पितान्। प्रियालान्मुचु-

---

घन करून पर्वतशिखरावर उतरल्यानंतर महासागराच्या पैलतीरीं अमरावतीप्रमाणें असलेली लंका त्यानें अवलोकन केली २०४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला. ॥१॥

दुस्तर सागराचें उल्लंघन करून त्रिकूटाचल पर्वताच्या शिखरावर जाऊन स्वस्थ बसलेल्या त्या महाबलाढ्य हनुमानानें लंका अवलोकन केली १. तदनंतर वृक्षापासून निघालेल्या पुष्पवृष्टीचा हनुमानावर सर्व बाजूंनीं वर्षाव झाला असतां त्या ठिकाणीं तो वीर्यवान् कपि पुष्पमयच बनून गेला २. तो महापराक्रमी भव्य हनुमान् एकदम शंभर योजनें समुद्र उल्लघून जरी गेला होता तरी त्याला थकवा मुळींच आलेला नव्हता आणि ह्मणूनच पूर्वीपेक्षां अधिक वेगानें त्याचा श्वासोच्छ्वासही चालू झाला नव्हता ३. इतकेंच नव्हे; परंतु, " योजनांचीं मी अशीं पुष्कळ शतकें उल्लघन करून जाण्यास समर्थ आहें; मग परिमित शंभर योजनेंच असलेल्या समुद्राच्या पैलतीराची कथा काय ! " असाही विचार त्याच्या मनामध्यें चाललाच होता ४. असो. वीर्यवानां-मध्यें श्रेष्ठ आणि उड्डाण करणाऱ्यांमध्यें ही वरिष्ठ असा तो वेगवान् वानर महासागराचें उल्लंघन केल्यानंतर ( पर्वतशिखरावर उतरून ) लंकेकडे निघाला ५. कोमल तृणांनीं युक्त असलेले नीलवर्ण प्रदेश आणि मध, सुगंध व वृक्ष ह्यांनीं युक्त असलेलीं वनें अवलोकन करीत करीत मध्यमार्गानें तो जाऊं लागला ६. तो तेजस्वी वानरश्रेष्ठ हनुमान् वृक्षांनीं व्याप्त झालेले पर्वत आणि प्रफुल्लित झालेल्या वनपंक्ति ओलांडून जाऊं लागला ७. प्रथमतः त्या त्रिकुटाचलपर्वतावर तो वायुपुत्र बसला असतांना वनें, उपवनें आणि पर्वतशिखरावर असलेली लंका हीं त्यानें अवलोकन केलीं ८. तात्पर्य,

लिम्बांश्च कुटजान्केतकानपि ९ प्रियङ्गुगन्धपूर्णांश्च नीपान्सप्तच्छदां-
स्तथा । असनान्कोविदारांश्च करवीरांश्च पुष्पितान् १० पुष्पभारनिब-
द्धांश्च तथा मुकुलितानपि । पादपान्विहगाकीर्णान्पवनाधूतमस्तकान् ११
हंसकारण्डवाकीर्णान्वापीः पद्मोत्पलावृताः । आक्रीडान्विविधान्रम्या-
न्विविधांश्च जलाशयान् १२ संततान्विविधैर्वृक्षैः सर्वर्तुफलपुष्पितैः ।
उद्यानानि च रम्याणि ददर्श कपिकुञ्जरः १३ समासाद्य च लक्ष्मीवा-
ल्लँङ्कां रावणपालिताम् । परिखाभिः सपद्माभिः सोत्पलाभिरलंकृताम् १४
सीतापहरणार्थेन रावणेन सुरक्षिताम् । समन्ताद्विचरद्भिश्च राक्षसैरुग्र-
धन्वभिः १५ काञ्चनेनावृतां रम्यां प्राकारेण महापुरीम् । गृहैश्च गिरि-
संकाशैः शारदाम्बुदसंनिभैः १६ पाण्डुराभिः प्रतोलीभिरुच्चाभिरभिसं-
वृताम् । अट्टालकशताकीर्णां पताकाध्वजशोभिताम् १७ तोरणैः काञ्च-
नैर्दिव्यैर्लतापङ्क्तिविराजितैः । ददर्श हनुमाल्लँङ्कां देवो देवपुरीमिव १८

---

सुरु, प्रफुल्लित पांगारे, खर्जूर, चार, ईडलिंब, कुडे, केवडे, वाघटी, सुगंधयुक्त कळंब, सांतवण, असाणा, कांचन, प्रफुल्लित कण्हेर ९,१० आणि त्याचप्रमाणें पुष्पभारांनीं व कळ्यांनीं भरलेले, पक्ष्यांनीं व्याप्त झालेले आणि वायूमुळें चंचल अग्रांनीं युक्त झालेले इतरही वृक्ष ११, हंस व कारंडव पक्ष्यांनीं आणि नानाप्रकारच्या कमलांनीं व्याप्त असलेल्या वापी, नानाप्रकारचे रमणीय क्रीडापर्वत, सर्व ऋतुंमध्यें पुष्पांनीं व फलांनीं युक्त असलेल्या नानाप्रकारच्या वृक्षांनीं गजबजून गेलेले अनेक प्रकारचे जलाशय व मनोहर उपवनें त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केलीं १२, १३. नंतर रावणानें संरक्षण केलेल्या लंकेसमीप तो भव्य हनुमान् जाऊन पोंचला. ती लंका अनेक प्रकारच्या कमलांनीं भरलेल्या खंदकांनीं भूषित झालेली होती १४. आंत सीतेला हरण करून आणून ठेविलें असल्यामुळें त्या रावणानें सभोंवतीं संचार करणाऱ्या प्रचंड धनुर्धारी राक्षसांच्या योगानें तिचें संरक्षण केलें होतें १५. सुवर्णप्राकारानें ती महानगरी रम्य लंका व्याप्त झालेली होती आणि शरदृतूंतील मेघाप्रमाणें दिसत असलेल्या पर्वतप्राय गृहांनीं ती युक्त होती १६. मोठमोठ्या शुभ्रवर्ण रस्त्यांनीं ती व्याप्त झालेली होती, शेंकडों वाड्यांनीं गजबजून गेलेली होती, पताका आणि ध्वज ह्यांच्या योगानें ती सुशोभित झालेली होती १७ आणि लतागणांनीं भूषित केलेल्या सुवर्णमय दिव्य तोरणांनीं ती शृंगारिलेली होती. अशा प्रकारची ती लंका, अमरावती नगरी अवलोकन करणाऱ्या इंद्राप्रमाणें, हनुमानानें अवलोकन केली १८. शुभ्रवर्ण शुभ गृहांनीं भरून गेलेली आणि पर्वताच्या माथ्यावर असलेली ती लंका भव्य हनुमानानें आकाशांतील

पुत्रस्य नीलस्य मम राज्ञश्च धीमतः २८ यावज्जानामि वैदेहीं यदि जीवति वा नवा । तत्रैव चिन्तयिष्यामि दृष्ट्वा तां जनकात्मजाम् २९ ततः स चिन्तयामास मुहूर्तं कपिकुञ्जरः । गिरेः शृङ्गे स्थितस्तस्मिन्रामस्याभ्युदयं ततः ३० अनेन रूपेण मया न शक्या रक्षसां पुरी । प्रवेष्टुं राक्षसैर्गुप्ता क्रूरैर्बलसमन्वितैः ३१ महौजसो महावीर्या बलवन्तश्च राक्षसाः । वञ्चनीया मया सर्वे जानकीं परिमार्गता ३२ लक्ष्यालक्ष्येण रूपेण रात्रौ लङ्कापुरी मया । प्राप्तकालं प्रवेष्टुं मे कृत्यं साधयितुं महत् ३३ तां पुरीं तादृशीं दृष्ट्वा दुराधर्षां सुरासुरैः । हनूमांश्चिन्तयामास विनिःश्वस्य मुहुर्मुहुः ३४ केनोपायेन पश्येयं मैथिलीं जनकात्मजाम् । अदृष्टो राक्षसेन्द्रेण रावणेन दुरात्मना ३५ न विनश्येत्कथं कार्यं रामस्य विदितात्मनः । एकामेकस्तु पश्येयं रहिते जनकात्मजाम् ३६ भूताश्चार्था विनश्यन्ति देशकालविरोधिताः । विक्लवं दूतमासाद्य तमः

---

नाहीं २७. वालिपुत्र अंगद, नील, मी व विचारी राजा सुग्रीव ह्या कायत्या बलाढ्य चार वानरांचीच मति येथें होण्यासारखी आहे २८. असो. तूर्त आधीं विदेहराजकन्या सीता जिवंत आहे किंवा नाहीं ह्याचा शोध केला पाहिजे. त्या जनककन्येला अवलोकन केल्यानंतर मग तेथेंच मला जो काय विचार करावयाचा तो करीन " २९. असें मनांत आणिल्या-नंतर त्या पर्वताच्या शिखरावर स्थित असलेल्या त्या कपिश्रेष्ठ हनुमान् वानरानें रामाच्या अभ्युदयासंबंधानें सुमारें एक मुहूर्तपर्यंत विचार केला ३०. (तो ह्मणाला) " ह्या रूपानें राक्षसांच्या नगरीमध्यें माझा प्रवेश होणें शक्य नाहीं. कारण, बलाढ्य व क्रूर राक्षसांनीं तिचें रक्षण केलेलें आहे ३१. महातेजस्वी, महावीर्यवान् आणि बलाढ्य जे राक्षस त्या सर्वांना फसवून मला सीतेचा शोध लाविला पाहिजे ३२. चक्षुरिंद्रियाला अगोचर आणि कृत्यामुळेंच अनुपमेय असें रूप धारण करून रात्रीं हातीं घेतलेलें मोठें कृत्य सिद्धीस नेण्याकरितां लंकानगरीमध्यें प्रवेश करणें मला उचित दिसतें " ३३. असा विचार केल्यानंतर देवदैत्यांनाही जिच्यावर हल्ला करितां येणार नाहीं अशा प्रकारची ती लंकानगरी अवलोकन करून आणि वारंवार सुस्कारे टाकून हनुमान् विचार करूं लागला ३४. (तो ह्मणाला) " दुरात्म्या राक्षसाधि-पति रावणाच्या स्वतः दृष्टीस न पडतां जनककन्या मैथिली कोणत्या उपायानें माझ्या दृष्टीस पडेल ? ३५. उदार अंतःकरणानें युक्त असलेल्या रामाचें कार्य न बिघडतां एकांतामध्यें एकट्या सीतेशीं माझ्या एकट्याची कशी भेट होईल ! ३६. सूर्योदय झाला असतां ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो त्याप्रमाणें अयोग्य दूताचें अवलं-

सूर्योदये यथा ३७ अर्थानर्थान्तरे बुद्धिर्निश्चितापि न शोभते । घातयन्तीह कार्याणि दूताः पण्डितमानिनः ३८ न विनश्येत्कथं कार्यं वैक्लव्यं न कथं भवेत् । लङ्घनं च समुद्रस्य कथं नु न भवेद्वृथा ३९ मयि दृष्टे तु रक्षोभी रामस्य विदितात्मनः । भवेद्व्यर्थमिदं कार्यं रावणानर्थमिच्छतः ४० न हि शक्यं क्वचित्स्थातुमविज्ञातेन राक्षसैः । अपि राक्षसरूपेण किमुतान्येन केनचित् ४१ वायुरप्यत्र नाज्ञातश्चरेदिति मतिर्मम । नह्यत्राविदितं किंचिद्रक्षसां भीमकर्मणाम् ४२ इहाहं यदि तिष्ठामि स्वेन रूपेण संवृतः । विनाशमुपयास्यामि भर्तुरर्थश्च हास्यति ४३ तदहं स्वेन रूपेण रजन्यां ह्रस्वतां गतः । लङ्कामभिपतिष्यामि राघवस्यार्थसिद्धये ४४ रावणस्य पुरीं रात्रौ प्रविश्य सुदुरासदाम् । प्रविश्य भवनं सर्वं द्रक्ष्यामि जनकात्मजाम् ४५ इति निश्चित्य हनुमान्सूर्यस्यास्तमयं कपिः । आचकाङ्क्षे तदा वीरो वैदेह्या दर्शनोत्सुकः ४६ सूर्ये

---

वन केल्यामुळें देश व काल विरुद्ध झाल्याकारणानें जवळ जवळ सिद्धीस गेलेलींही कार्ये नाहींशीं होत असतात ३७. कार्याकार्याविषयीं स्वामीनें मंत्र्यासहवर्तमान जरी एकदा विचार निश्चित केला असला तरी अयोग्य दूताशीं गांठ पडल्यावर त्या विचारापासून कांहीं एक निष्पन्न होत नाहीं. कारण, शहाणपणाच्या घमेंडींत असणारे दूत स्वामिकार्याचा घात करितात ३८. तेव्हां काय केलें असतां कार्यविघात होणार नाहीं, कसें वागलें असतां बुद्धिभ्रंश होणार नाहीं आणि कोणता उपाय योजिला असतां मीं केलेलें हें समुद्राचें उल्लंघन व्यर्थ होणार नाहीं ? ३९. मी राक्षसांच्या दृष्टीस पडलों असतां रावणाच्या नाशाची इच्छा करणाऱ्या महात्म्या रामाचें हें कार्य व्यर्थ होईल ४०. राक्षसांच्या समजण्यांत न येतां राक्षसरूपानेंही मला कोठें राहतां येणें शक्य नाहीं; मग दुसरें रूप धारण करून रहातां येण्याची गोष्ट पाहिजे कशाला ! ४१. कोणाच्या समजण्यांत न येतां वायूलाही ह्या ठिकाणीं संचार करितां येणार नाहीं असें मला वाटतें. कारण, भयंकर कर्म करणाऱ्या राक्षसांना अज्ञात असें कांहीं एक नाहीं ४२ मी स्वतःच्याच रूपाचें अवलंबन करून जर ( दिवसां ) येथें राहीन तर माझा नाश होईल आणि स्वामिकार्याचाही विघात होईल ४३. तस्मात्, लघुत्वाचें अवलंबन करून मी स्वतःच्याच रूपानें रामाचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां रात्रीं लंकेमध्यें जाईन ४४. जिच्यामध्यें प्रवेश होणें अत्यंत दुर्घट आहे अशा त्या रावणाच्या नगरीमध्यें रात्रीं प्रवेश करून आंतील सर्व घरांमध्यें मी जाईन आणि जनककन्या सीता अवलोकन करीन " ४५. ह्याप्रमाणें निश्चय केल्यावर वैदेहीच्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेला

चास्तं गते रात्रौ देहं संक्षिप्य मारुतिः । वृषदंशकमात्रोथ बभूवाद्भुत-
दर्शनः ४७ प्रदोषकाले हनुमांस्तूर्णमुत्पत्य वीर्यवान् । प्रविवेश पुरीं रम्यां
प्रविभक्तमहापथाम् ४८ प्रसादमालावितता स्तम्भैः काञ्चनसंनिभैः ।
शातकुम्भनिभैर्जालैर्गन्धर्वनगरोपमाम् ४९ सप्तभौमाष्टभौमैश्च स ददर्श
महापुरीम् ५० स्थलैः स्फटिकसंकीर्णैः कार्तस्वरविभूषितैः । तैस्तैः
शुशुभिरे तानि भवनान्यत्र रक्षसाम् ५१ काञ्चनानि विचित्राणि तोर-
णानि च रक्षसाम् । लङ्कामुद्योतयामासुः सर्वतः समलंकृताम् ५२
अचिन्त्यामद्भुताकारां दृष्ट्वा लङ्कां महाकपिः । आसीद्विषण्णो हृष्टश्च
वैदेह्या दर्शनोत्सुकः ५३ स पाण्डुराविद्धविमानमालिनीं महार्हजाम्बू-
नदजालतोरणाम् । यशस्विनीं रावणबाहुपालितां क्षपाचरैर्भीमबलैः

---

तो वीर हनुमान् वानर सूर्यास्ताची वाट पाहूं लागला ४६. नंतर सूर्यास्त झाल्यावर वायुपुत्र हनुमानानें आपला देह अगदीं संकुचित केला आणि विचित्र रूप धारण करणारा तो हनुमान् अगदीं मांजराएवढा झाला ४७. रात्र पडल्याबरोबर तो वीर्यवान् हनुमान् सत्वर उडी मारून प्रशस्त अशा मोठमोठ्या मार्गांनीं युक्त असलेल्या रम्यनगरीमध्यें प्रविष्ट झाला ४८. मोठमोठ्या वाड्यांच्या रांकांनीं ती नगरी लांबलचक झालेली होती आणि सुवर्णतुल्य स्तंभांनीं व सुवर्णसदृश जाळ्यांनीं ती गंधर्वनगरासारिखी दिसत होती ४९. अशाप्रकारची सात, सात आठ आठ मजली हवेल्यांनीं युक्त असलेली ती प्रचंड नगरी त्या हनुमानानें अवलोकन केली ५०. सुवर्णभूषित आणि स्फटिकांनीं व्याप्त अशा अनेक प्रकारच्या स्थलांमुळें त्या लंकेंतील राक्षसांचीं घरें सुशोभित झालेलीं होतीं ५१. इतकेंच नव्हे; परंतु, राक्षसांच्या घरांचे द्वारांसमीप जीं सुवर्णमय अद्भुत तोरणें होतीं त्यांनीं तर सर्व बाजूंनीं भूषित असलेल्या त्या लंकेला प्रभामयच करून सोडिलेली होती ५२. अशा प्रकारें विचित्र आकारानें युक्त असलेली ती अतर्क्य लंका अवलोकन करून सीतेच्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला तो हनुमान् खिन्न झाला व आनंदितही झाला ( येवढ्या मोठ्या नगरीमध्यें सीतेचा शोध कसा लागणार असें मनांत येऊन तो खिन्न झाला आणि अद्भुत नगरी दृष्टीं पडल्यामुळें तो आनंदितही झाला ) ५३. जिकडे तिकडे सफेती दिल्यामुळें शुभ्र आणि एकमेकांशीं खेटून राहिलेल्या सात सात मजली वाड्यांच्या रांका ज्या नगरीमध्यें आहेत, उत्तम प्रकारच्या सुवर्णजालांनीं व तोरणांनीं जी नगरी युक्त आहे आणि रावणाच्या बाहुबलानें सुरक्षित असूनही भयंकर सामर्थ्ययुक्त राक्षसांनींही जिचें विशेष रक्षण केलेलें आहे अशा त्या प्रख्यात नगरीमध्यें

सुपालिताम् ५४ चन्द्रोऽपि साचिव्यमिवास्य कुर्वंस्तारागणैर्मध्यगतो विराजन् । ज्योत्स्नावितानेन वितत्य लोकानुत्तिष्ठतेऽनेकसहस्ररश्मिः ५५ शङ्खप्रभं क्षीरमृणालवर्णमुद्गच्छमानं व्यवभासमानम् । ददर्श चन्द्रं स कपिप्रवीरः पोप्लूयमानं सरसीव हंसम् ५६ [ २६० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

स लम्बशिखरे लम्बे लम्बतोयदसंनिभे । सत्त्वमास्थाय मेधावी हनुमान्मारुतात्मजः १ निशि लङ्कां महासत्त्वो विवेश कपिकुञ्जरः । रम्यकाननतोयाढ्यां पुरीं रावणपालिताम् २ शारदाम्बुधरप्रख्यैर्भवनैरुपशोभिताम् । सागरोपमनिर्घोषां सागरानिलसेविताम् ३ सुपुष्टबलसंपुष्टां यथैव विटपावतीम् । चारुतोरणनिर्यूहां पाण्डुरद्वारतोरणाम् ४ भुजगाचरितां गुप्तां शुभां भोगवतीमिव । तां सविद्युद्घनाकीर्णां ज्योतिर्गणनिषेविताम् ५ चण्डमारुतनिर्ह्रादां यथा चाप्यमरावतीम् । शात-

---

हनुमानानें प्रवेश केला ५४. इतक्यांत हनुमानाला साह्य करण्याकरितांच कीं काय हजारों किरणांनीं युक्त असलेला आणि स्वतः तारांगणाचे मध्यभागीं असून तारांगणांच्या योगानें झळकत असलेला चंद्रही चंद्रिकारूप छताच्या योगानें लोकांना व्याप्त करून वर येऊं लागला ५५. तव्हां शंखासारखी ज्याची प्रभा आहे, दुग्ध अथवा कमलतंतु ह्याप्रमाणें ज्याचा वर्ण आहे आणि सरोवरांत पोहणाऱ्या हंसाप्रमाणें जो भासत आहे असा चंद्र त्या वानरवीर हनुमानानें अवलोकन केला ५६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

उंच उंच शिखरांनीं युक्त आणि ह्मणूनच लोंबत असलेल्या मेघाप्रमाणें दिसणाऱ्या त्या लंबनामक पर्वतावर धैर्य धरून राहिलेला तो बुद्धिमान् व महाबलाढ्य कपिश्रेष्ठ वायुपुत्र हनुमान् रात्रीं लंकेमध्यें प्रविष्ट झाला. ती लंका रावणानें रक्षिलेली असून रमणीय वनें व उदक ह्यांची तिच्यामध्यें समृद्धि होती १, २. शरदृतूंतील मेघांप्रमाणें असलेल्या गृहांच्या योगानें तिला शोभा आलेली होती, सागराप्रमाणें तिच्यामध्यें घोष चालला होता, समुद्रावरील वायु तिच्यामध्यें वहात होता ३, अलकानगरीप्रमाणें उत्तम रीतीनें पोषण केलेल्या सैन्यानें तिचें रक्षण केलेलें होतें, मुख्य मुख्य द्वारांतून सुंदर मत्त गज ठेविलेले होते, सुवर्ण द्वारांनीं व तोरणांनीं ती युक्त होती ४, सर्पांनीं व्याप्त झालेल्या भोगवती नगरीप्रमाणें ती शुभ नगरी सुरक्षित होती, विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघांनीं ती व्यापलेली होती, तारांगणांनीं ती युक्त होती ५,

कुम्भेन महता प्राकारेणाभिसंवृताम् ६ किङ्किणीजालघोषाभिः पताका-
भिरलंकृताम् । आसाद्य सहसा हृष्टः प्राकारमभिपेदिवान् ७ विस्मया-
विष्टहृदयः पुरीमालोक्य सर्वतः । जाम्बूनदमयैर्द्वारैर्वैदूर्यकृतवेदिकैः ८
मणिस्फटिकमुक्ताभिर्मणिकुट्टिमभूषितैः । तप्तहाटकनिर्यूहै राजतामल-
पाण्डुरैः ९ वैदूर्यकृतसोपानैः स्फाटिकान्तरपांसुभिः । चारुसंजवनो-
पेतैः खमिवोत्पतितैः शुभैः १० क्रौञ्चबर्हिणसंघुष्टै राजहंसनिषेवितैः ।
तूर्याभरणनिर्घोषैः सर्वतः परिनादिताम् ११ वस्वोकसारप्रतिमां समीक्ष्य
नगरीं ततः । खमिवोत्पतितां लङ्कां जहर्ष हनुमान्कपिः १२ तां समीक्ष्य
पुरीं लङ्कां राक्षसाधिपतेः शुभाम् । अनुत्तमामृद्धिमतीं चिन्तयामास
वीर्यवान् १३ नेयमन्येन नगरी शक्या धर्षयितुं बलात् । रक्षिता रावण-
बलैरुद्यतायुधपाणिभिः १४ कुमुदाङ्गदयोर्वापि सुषेणस्य महाकपेः ।

---

प्रचंड वायूचा शब्द तिच्यामध्यें सुरू होता, सुवर्णमय प्रचंड प्राकारानें अमरावती नगरीप्रमाणें ती परिवेष्टित होती ६ आणि लहान लहान घटांचा घोष ज्यामध्यें आहे अशा पताकांनी ती भूषित झालेली होती. अशा प्रकारच्या लंकेसमीप जातांक्षणीं आनंदित झालेला तो हनुमान् एकदम प्राकारावर ह्मणजे तिच्या भोंवतीं असलेल्या तटावर जाऊन बसला ७ आणि सर्व बाजूंनी नगरी अवलोकन करितांक्षणीं तो अंतः-करणामध्यें चकित झाला. वैडूर्यरत्नाच्या देवड्या ज्यामध्यें बांधिलेल्या आहेत अशीं सुवर्णमय द्वारें त्या नगरीला होतीं ८; हिरे, स्फटिक आणि मोत्यें त्यांना लाविलेलीं होतीं, रत्नखचित फरश्यानीं तीं भूषित झालेलीं होतीं. उत्कृष्ट सुवर्णाचे गज त्यांतून बसविलेले होते, त्यांचे ऊर्ध्व प्रदेश रौप्यमय असल्यामुळे निर्मल व शुभ्र होते ९, वैडूर्यरत्नांच्या जिन्यांनी तीं युक्त होतीं, त्यांतील मध्यप्रदेश धूलिरहित असून स्फटि-कानीं तयार केलेला होता आणि मनोहर सभास्थानांनीं युक्त, क्रौंच व मयूरपक्षी ह्यांनीं नादित व राजहंसांनीं आश्रित अशा आकाशामध्यें उडून गेलेल्याच की काय शुभ गृहांनीं तीं भूषित झालेलीं होतीं. असो. नृत्यगीतसंबंधीं वाद्यें व भूषणें ह्यांच्या घोषामुळें सर्व बाजूंनीं नादित झालेली १०, ११ आणि ह्मणूनच अलकापुरीप्रमाणें असलेली ती लंकानगरी आकाशामध्यें उड्डाण करूनच राहिली आहे कीं काय अशी अवलोकन करून हनुमान् वानराला हर्ष झाला १२. धनधान्यांनीं समृद्ध आणि अनु-पम अशी ती राक्षसाधिपति रावणाची शुभ लंकानगरी अवलोकन करून वीर्यवान् हनुमान् आपल्याशीं विचार करूं लागला १३. (तो ह्मणाला) "उगारलेलीं आयुधें हातांमध्यें तयार ठेवून असलेल्या रावणसैन्यांनीं जिचें रक्षण केलेलें आहे अशा ह्या

प्रसिद्धेयं भवेद्भूमिर्मैन्दद्विविदयोरपि १५ विवस्वतस्तनूजस्य हरेश्च कुशपर्वणः। ऋक्षस्य कपिमुख्यस्य मम चैव गतिर्भवेत् १६ समीक्ष्य च महाबाहो राघवस्य पराक्रमम्। लक्ष्मणस्य च विक्रान्तमभवत्प्रीतिमान्कपिः १७ तां रत्नवसनोपेतां गोष्ठागारावतंसिकाम्। यन्त्रागारस्तनीमृद्धां प्रमदामिव भूषिताम् १८ तां नष्टतिमिरां दीपैर्भास्वरैश्च महाग्रहैः। नगरीं राक्षसेन्द्रस्य स ददर्श महाकपिः १९ अथ सा हरिशार्दूलं प्रविशन्तं महाकपिम्। नगरी स्वेन रूपेण ददर्श पवनात्मजम् २० सा तं हरिवरं दृष्ट्वा लङ्का रावणपालिता। स्वयमेवोत्थिता तत्र विकृताननदर्शना २१ पुरस्तात्तस्य वीरस्य वायुसूनोरतिष्ठत। मुञ्चमाना महानादमब्रवीत्पवनात्मजम् २२ कस्त्वं केन च कार्येण इह प्राप्तो वनालय। कथयस्वेह यत्तत्त्वं यावत्प्राणा धरन्ति ते २३ न शक्यं खल्वियं लङ्का प्रवेष्टुं वानर त्वया। रक्षिता रावणबलैरभिगुप्ता समन्ततः २४

लंका नगरीवर दुसऱ्याचा एकाएकीं हल्ला होणें शक्य नाहीं १४. कुमुद, अंगद, महाकपि सुषेण, मैंद आणि द्विविद ह्यांचा फार तर मोठ्या संकटानें ह्या नगरीमध्यें प्रवेश होईल १५ आणि विशेष आयास न पडतां दर्भाच्या पेऱ्याप्रमाणें ज्याचे लोम आहेत असा जो सूर्यपुत्र कपिश्रेष्ठ वानर त्याची आणि माझी मात्र ह्या नगरीमध्यें गति होणारी आहे " १६. ह्याप्रमाणें विचार केल्यानंतर महापराक्रमी रामाचा व लक्ष्मणाचा पराक्रम मनामध्यें आणून तो हनुमान् वानर आनंदित झाला १७. रत्नखचित प्राकाररूप वस्त्रांनीं युक्त, गोठे व गृहें ह्या कर्णभूषणांनीं संपन्न आणि तोफा ठेवण्याचे बुरूज ह्या स्तनांनीं युक्त असलेली तरुण स्त्रीच कीं काय अशी १८ ती राक्षसाधिपति रावणाची उज्ज्वल महाग्रहांनीं व दीपांनीं अंधकाररहित झालेली नगरी वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केली १९. तदनंतर वानरश्रेष्ठ महाकपि वायुपुत्र हनुमान् आंत प्रवेश करूं लागला असतां स्वतःचें ह्मणजे अधिष्ठात्र्या देवतेचें रूप धारण करून नगरीनं त्याची भेट घेतली २०. सारांश, त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला अवलोकन करून ती रावणरक्षित लंका स्वतःच उठली आणि अक्राळविक्राळ मुद्रा धारण करून २१ त्या वीर वायुपुत्र हनुमानाच्या पुढें येऊन उभी राहिली. इतकेंच नव्हे; परंतु, प्रचंड गर्जना करीत करीत ती त्या वायुपुत्राला ह्मणाली २२ " हे वनचरा, तूं कोण आणि कोणत्या कार्याकरितां येथें आला आहेस हें मला जिवंत आहेस तोंच काय तें खरें खरें सांग २३. हे वानरा, सर्व बाजूंनीं रावणाच्या सैन्यांनीं रक्षिलेल्या ह्या लंकेमध्यें तुझा प्रवेश होणें खरोखर शक्य नाहीं " २४.

अथ तामब्रवीद्वीरो हनुमानग्रतः स्थिताम् । कथयिष्यामि तत्तत्त्वं यन्मां त्वं परिपृच्छसे २५ का त्वं विरूपनयना पुरद्वारेवतिष्ठसे । किमर्थं चापि मां क्रोधान्निर्भर्त्सयसि दारुणे २६ हनुमद्वचनं श्रुत्वा लङ्का सा कामरूपिणी । उवाच वचनं क्रुद्धा परुषं पवनात्मजम् २७ अहं राक्षसराजस्य रावणस्य महात्मनः । आज्ञाप्रतीक्षा दुर्धर्षा रक्षामि नगरीमिमाम् २८ न शक्यं मामवज्ञाय प्रवेष्टुं नगरीमिमाम् । अद्य प्राणैः परित्यक्तः स्वप्स्यसे निहतो मया २९ अहं हि नगरी लङ्का स्वयमेव प्लवंगम । सर्वतः परिरक्षामि अतस्ते कथितं मया ३० लङ्काया वचनं श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः । यत्नवान्स हरिश्रेष्ठः स्थितः शैल इवापरः ३१ स तां स्त्रीरूपविकृतां दृष्ट्वा वानरपुंगवः । आबभाषेथ मेधावी सत्त्ववान्प्लवगर्षभः ३२ द्रक्ष्यामि नगरीं लङ्कां साट्टप्राकारतोरणाम् । इत्यर्थमिह संप्राप्तः परं कौतूहलं हि मे ३३ वनान्युपवनानीह लङ्कायाः काननानि

---

ह्यानंतर समोर उभ्या राहिलेल्या त्या लंकादेवतेला वीर हनुमान् ह्मणाला " तूं जें मला विचारीत आहेस तें मी काय तें खरें खरें तुला सांगेन २५; परंतु, हे क्रूरे, भयंकर नेत्रांनीं युक्त असलेली अशी तूं कोण ह्या नगरीच्या द्वाराशीं उभी राहिली आहेस आणि कशाकरितां तूं क्रोधानें माझी निर्भर्त्सना करीत आहेस ? ( हें आधीं कळूं दे ) " २६. हें हनुमानाचें भाषण श्रवण केल्यावर ती यथेष्ट रूप धारण करणारी लंका क्रुद्ध झाली आणि कठोर शब्दांनीं त्या वायुपुत्राला ह्मणाली २७ " मी स्वतः अजिंक्य असून महात्म्या राक्षसाधिपति रावणाच्या आज्ञेचें परिपालन करणारी आहें आणि ( त्याच्या आज्ञेनें ) ह्या नगरीचें मी रक्षण करीत आहें २८. तस्मात्, माझी अवज्ञा करून ह्या नगरीमध्यें तुझा प्रवेश होणें शक्य नाहीं. आज तूं माझ्याहातून वध पावशील आणि येथें गतप्राण होऊन निद्रा करशील २९. हे वानरा, मी स्वतःच लंकानगरी आहें आणि सर्व बाजूंनीं मी आपलें रक्षण करीत आहें; हें मीं तुला तूं विचारिलेलें कथन केलें " ३०. लंकादेवतेचें हें भाषण श्रवण केल्यावर तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान् तिचा पराजय करण्याविषयीं उद्युक्त झाला आणि दुसरा पर्वतच कीं काय अशा रीतीनें तो तेथें अचल होऊन राहिला ३१. नंतर अक्राळविक्राळ स्त्रीरूप धारण केलेल्या त्या लंकादेवतेकडे पाहून तो धैर्यवान् वानरश्रेष्ठ व वानराधिपति विचारी हनुमान् ह्मणाला ३२ " बुरुज, तट व वेशी ह्यांसहवर्तमान लंकानगरी अवलोकन करावी एवढ्याकरितां मी येथें आलों आहें आणि ती अवलोकन करण्याविषयीं मला फार उत्कंठा आहे ३३. सारांश, ह्या लंकेमध्यें अस-

च । सर्वतो गृहमुख्यानि द्रष्टुमागमनं हि मे ३४ तस्य तद्वचनं श्रुत्वा लङ्का सा कामरूपिणी । भूय एव पुनर्वाक्यं बभाषे परुषाक्षरम् ३५ मामनिर्जित्य दुर्बुद्धे राक्षसेश्वरपालिताम् । न शक्यं ह्यद्य ते द्रष्टुं पुरीयं वानराधम ३६ ततः स हरिशार्दूलस्तामुवाच निशाचरीम् । दृष्ट्वा पुरीमिमां भद्रे पुनर्यास्ये यथागतम् ३७ ततः कृत्वा महानादं सा वै लङ्का भयंकरम् । तलेन वानरश्रेष्ठं ताडयामास वेगिता ३८ ततः स हरिशार्दूलो लङ्कया ताडितो भृशम् । ननाद सुमहानादं वीर्यवान्मारुतात्मजः ३९ ततः संवर्तयामास वामहस्तस्य सोऽङ्गुलीः । मुष्टिनाभिजघानैनां हनुमान्क्रोधमूर्छितः ४० स्त्री चेति मन्यमानेन नातिक्रोधः स्वयं कृतः । सा तु तेन प्रहारेण विह्वलाङ्गी निशाचरी ॥ पपात सहसा भूमौ विकृताननदर्शना ४१ ततस्तु हनुमान्वीरस्तां दृष्ट्वा विनिपातिताम् । कृपां चकार तेजस्वी मन्यमानः स्त्रियं च ताम् ४२ ततो वै भृशमुद्विग्ना लङ्का सा गद्गदाक्षरम् । उवाचागर्वितं वाक्यं हनुमन्तं प्लवंगमम् ४३ प्रसीद सुमहा-

---

लेलीं वनें, उपवनें, अरण्यें आणि श्रेष्ठ श्रेष्ठ गृहें अवलोकन करण्याकरितां माझें येथें आगमन झालें आहे " ३४. हें त्या हनुमानाचें भाषण श्रवण केल्यावर ती यथेष्ट रूप धारण करणारी लंकादेवी पुनरपि कठोर शब्दांनीं त्याला ह्मणाली ३५ " हे दुर्बुद्धे, हे वानराधमा, मला जिंकिल्यावांचून राक्षसाधिपति रावणानें रक्षिलेली ही नगरी आज तुझ्या दृष्टीं पडणें शक्य नाहीं " ३६ ह्यावर तो वानरश्रेष्ठ हनुमान् त्या निशाचरीला ह्मणाला " हे भद्रे, मी आपला ही नगरी अवलोकन करून आल्या मार्गानें ( निमूटपणें ) परत जाईन " ३७. असें हनुमानानें सांगितल्यानंतर त्या लंकेनें भयंकर गर्जना केली आणि वेगावेगानें त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला तिनें एक चपराक लगाविली ३८. ह्याप्रमाणें लंकेनें त्याला अतिशय जोरानें ताडण केलें असतां त्या वीर्यवान् वानरश्रेष्ठ वायुपुत्र हनुमानानें फारच मोठी गर्जना केली ३९ आणि नंतर क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या हनुमानानें डाव्या हाताची मूठ वळून त्या मुष्टीच्या योगानें " ही स्त्री आहे " असें समजून विशेष क्रोध न आणितां तिला एक तडाका दिला; परंतु, त्या प्रहाराच्या योगानें ती अक्राळविक्राळ मुद्रेनें युक्त असलेली निशाचरी विह्वल झाली आणि एकाएकीं भूमीवर पडली ४०, ४१. तेव्हां आपल्या मुष्टिप्रहारानें भूमीवर पाडिलेल्या त्या लंकेला अवलोकन केल्यावर ती स्त्री आहे असें मनांत येऊन त्या तेजस्वी वीर हनुमानाच्या अंतःकरणामध्यें दया उत्पन्न झाली ४२. तों इतक्यांत अत्यंत उद्विग्न झालेली ती लंका गर्व सोडून देऊन स्फुंदत स्फुंदत त्या

बाहो त्रायस्व हरिसत्तम । समये सौम्य तिष्ठन्ति सत्त्ववन्तो महाबलाः ४४
अहं तु नगरी लङ्का स्वयमेव प्लवंगम । निर्जिताहं त्वया वीर विक्रमेण
महाबल ४५ इदं च तथ्यं शृणु मे ब्रुवन्त्या वै हरीश्वर । स्वयं स्वयं-
भुवा दत्तं वरदानं यथा मम ४६ यदा त्वां वानरः कश्चिद्विक्रमाद्वशमा-
नयेत् । तदा त्वया हि विज्ञेयं रक्षसां भयमागतम् ४७ स हि मे समयः
सौम्य प्राप्तोद्य तव दर्शनात् । स्वयंभूविहितः सत्यो न तस्यास्ति व्यति-
क्रमः ४८ सीतानिमित्तं राज्ञस्तु रावणस्य दुरात्मनः । रक्षसां चैव सर्वेषां
विनाशः समुपागतः ४९ तत्प्रविश्य हरिश्रेष्ठ पुरीं रावणपालिताम् ।
विधत्स्व सर्वकार्याणि यानि यानीह वाञ्छसि ५० प्रविश्य शापोपहतां
हरीश्वरः पुरीं शुभां राक्षसमुख्यपालिताम् । यदृच्छया त्वं जनकात्मजां
सतीं विमार्ग सर्वत्र गतो यथासुखम् ५१ [३११] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

स निर्जित्य पुरीं लङ्कां श्रेष्ठां तां कामरूपिणीम् । विक्रमेण महा-

---

हनुमान् वानराला ह्मणाली ४३ " हे अत्यंत महापराक्रमी वानरश्रेष्ठा, प्रसन्न हो आणि माझें रक्षण कर. हे सौम्या, सत्त्वशील असलेले महाबलाढ्य पुरुष शास्त्रमर्यादेला अनुसरून चालत असतात ४४. हे महाबलाढ्य वीर वानरा, मी स्वतः लंकानगरी असून तूं माझा पराजय केलेला आहेस ४५. हे वानराधिपते, हें तथ्य मी तुला कथन करीत आहें तें तू श्रवण कर. ' पराक्रमानें जेव्हां कोणी वानर तुझा पराजय करील तेव्हां राक्षसांना भय प्राप्त झालें आहे असें तूं समज ' ह्मणून स्वतः ब्रह्मदेवानें मला वरदान दिलें होतें ४६, ४७. तो ब्रह्मदेवानें ठरविलेला सत्य समय, हे सौम्या, आज तुझ्या भेटीमुळें प्राप्त झाला आहे; त्याचें उल्लंघन होणें शक्य नाहीं ४८. सारांश, सीतेच्या निमित्तानें दुरात्म्या रावणराजाचा आणि त्याजबरोबर सर्वही राक्षसांचा विनाशकाल आला आहे ४९ तस्मात्, वानरश्रेष्ठा, रावणरक्षित नगरीमध्यें तूं प्रवेश कर आणि जीं जीं कार्यें ह्या नगरीमध्यें उरकून घेण्याची तुझी इच्छा असेल तीं सर्व तूं उरकून घे ५०. तात्पर्य, तूं वानराधिपति मुख्य मुख्य राक्षसांनीं संरक्षण केलेल्या परंतु शापग्रस्त झालेल्या ह्या शुभ नगरीमध्यें प्रवेश कर आणि हवा तिकडे जाऊन साध्वी जनककन्येला तूं आपल्या इच्छेप्रमाणें खुशाल शोधून काढ ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

यथेष्ट रूप धारण करणाऱ्या त्या श्रेष्ठ लंकानगरीला स्वपराक्रमानें जिंकिल्यानंतर तो

तेजा हनुमान्कपिसत्तमः १ अद्वारेण महावीर्यः प्राकारमवपुप्लुवे । निशि लङ्कां महासत्त्वो विवेश कपिकुञ्जरः २ प्रविश्य नगरीं लङ्कां कपिराजहितंकरः । चक्रेऽथ पादं सव्यं च शत्रूणां स तु मूर्धनि ३ प्रविष्टः सत्त्वसंपन्नो निशायां मारुतात्मजः । स महापथमास्थाय मुक्तपुष्पविराजितम् ४ ततस्तु तां पुरीं लङ्कां रम्यामभिययौ कपिः । हसितोत्कृष्टनिनदैस्तूर्यघोषपुरस्कृतैः ५ वज्राङ्कुशनिकाशैश्च वज्रजालविभूषितैः । गृहमेधैः पुरी रम्या बभासे द्यौरिवाम्बुदैः ६ प्रजज्वाल तदा लङ्का रक्षोगणगृहैः शुभैः । सिताभ्रसदृशैश्चित्रैः पद्मस्वस्तिकसंस्थितैः ७ वर्धमानगृहैश्चापि सर्वतः सुविभूषितैः । तां चित्रमाल्याभरणां कपिराजहितंकरः ८ राघवार्थे चरञ्छ्रीमान्ददर्श च ननन्द च । भवनाद्भवनं गच्छन्द-

---

महातेजस्वी, महाधैर्यवान् व महावीर्यवान् वानराधिपति कपिश्रेष्ठ हनुमान् रात्रीं भलत्याच द्वारानें प्राकारावर उडी मारून गेला आणि लंकेमध्यें प्रविष्ट झाला १, २. ह्याप्रमाणें लंकानगरीमध्यें जरी त्यानें प्रवेश केला तरी वानरराज सुग्रीवाचें हित करणाऱ्या त्या हनुमानानें प्रथमतः डावा पाय लंकेमध्यें ठेविला. कारण, ह्या रीतीनें ठेविलेला तो वामपाद शत्रूंच्या मस्तकींच ठेविल्यासारखा होतो ३. रात्रीं तो धैर्यवान् वायुपुत्र हनुमान् लंकेमध्यें प्रविष्ट झाल्यानंतर वर आंथरलेल्या पुष्पांनीं सुशोभित झालेल्या राजमार्गाचें अवलंबन करून चालला ४. नृत्यसंगीतविषयक वाद्यांच्या ध्वनींनीं मिश्र झालेल्या हास्यांच्या उत्कृष्ट ध्वनींनीं युक्त असलेल्या त्या रमणीय लंकानगरीमध्यें तो हनुमान् वानर प्रविष्ट झाला असतां ५ मेघांच्या योगानें ज्याप्रमाणें आकाश रम्य दिसतें त्याप्रमाणें वज्र, अंकुश इत्यादि आयुधांचीं चित्रें ज्यांत काढिलेलीं आहेत आणि रत्नखचित खिडक्यांनीं जीं विभूषित झालेलीं आहेत अशा गृहांच्या योगानें ती नगरी त्याला रमणीय भासूं लागली ६. कमलांचा व स्वस्तिकांचा आकार ज्यांना दिलेला आहे अशा शुभ्र मेघसदृश, चित्रविचित्र व शुभ राक्षसगणांच्या गृहांनीं आणि सर्वबाजूंनीं अत्यंत विभूषित अशा वर्धमानसंज्ञक आकारांनीं युक्त असलेल्या गृहांनीं ती नगरी झळकत होती व रामकार्याकरितां संचार करणाऱ्या व वानरराजसुग्रीवाचें हित करणाऱ्या भव्य वानरानें चित्रविचित्र पुष्पभूषणांनीं युक्त

---

१ प्रयाणकाले स्वगृहप्रवेशे विवाहकालेऽपि च दक्षिणाङ्घ्रिम् । कृत्वाग्रतः शत्रुपुरप्रवेशे वामं निदध्याच्चरणं नृपालयम् ॥ अर्थः—प्रयाणसमयीं, स्वगृहीं प्रवेश कर्तव्य असतांना आणि विवाहार्थ गमन करतेवेळीं उजवा पाय पुढें टाकून जावें; परंतु, राजवाड्यांत अथवा शत्रूच्या नगरामध्यें प्रवेश कर्तव्य असल्यास डावा पाय प्रथम पुढें टाकावा.

दर्श कपिकुञ्जरः ९ विविधाकृतिरूपाणि भवनानि ततस्ततः। शुश्राव रुचिरं गीतं त्रिस्थानस्वरभूषितम् १० स्त्रीणां मदनविद्धानां दिवि चाप्सरसामिव। शुश्राव काञ्चीनिनदं नूपुराणां च निःस्वनम् ११ सोपाननिनदांश्चापि भवनेषु महात्मनाम्। आस्फोटितनिनादांश्च क्ष्वेडितांश्च ततस्ततः १२ शुश्राव जपतां तत्र मन्त्रान्रक्षोगृहेषु वै। स्वाध्यायनिरतांश्चैव यातुधानान्ददर्श सः १३ रावणस्तवसंयुक्तान्गर्जतो राक्षसानपि । राजमार्गं समावृत्य स्थितं रक्षोगणं महत् १४ ददर्श मध्यमे गुल्मे राक्षसस्य चरान्बहून् । दीक्षिताञ्जटिलान्मुण्डान्गोजिनाम्बरवाससः १५ दर्भमुष्टिप्रहरणानग्निकुण्डायुधांस्तथा । कूटमुद्गरपाणींश्च दण्डायुधधरानपि १६ एकाक्षानेकवर्णांश्च चलदेकपयोधरान् । करालान्भुग्नवक्त्रांश्च विकटान्वामनांस्तथा १७ धन्विनः खड्गिनश्चैव शतघ्नीमुसलायुधान् । परिघोत्तमहस्तांश्च विचित्र-

---

असलेली ती नगरी अवलोकन करून तिचें अभिनंदनही केलें. नंतर ह्या घराहून त्या घरावर जातां जातां कपिश्रेष्ठ हनुमानानें नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त असलेलीं घरें ठिकठिकाणीं अवलोकन केलीं आणि मंद्र, मध्य व तार ह्या स्वरांनीं भूषित असलेलें मनोहर गायनही त्यानें श्रवण केलें ७, ८, ९, १०. स्वर्गांतील अप्सराच कीं काय अशा दिसत असलेल्या व मदनानें व्याकूल झालेल्या स्त्रियांच्या तोरड्यांचा व कमरपट्ट्यांचा शब्द त्याच्या कानावर येऊं लागला ११. जिन्याच्या पायऱ्यावरून खालीं घरंगळत जाणाऱ्या भूषणांचे ध्वनि, मोठमोठ्या लोकांच्या घरांमध्यें चाललेली टाळ्यांची गर्जना आणि ठिकठिकाणीं होत असलेले सिंहनाद त्याच्या कानावर येऊं लागले १२. राक्षसांच्या गृहांमध्यें अध्ययन करीत असलेल्यांचे मंत्र त्याला ऐकूं येऊं लागले आणि वेदाध्ययनाविषयीं रत असलेले राक्षसही त्याच्या दृष्टीं पडूं लागले १३. मोठ्यामोठ्यानें गर्जना करून ,रावणाची प्रशंसा करणार राक्षसही त्याच्या अवलोकनांत आले; राजमार्ग व्याप्त करून राहिलेले प्रचंड राक्षससैन्य त्याच्या दृष्टीं पडलें १४; मधल्या चौकामध्यें राक्षसाचे अनेक हेरही कांहीं जटा धारण करून कांहीं दीक्षा घेऊन कांहीं मस्तकें मुंडून आणि कांहीं गोचर्म व कृष्णाजिन परिधान करून संचार करीत असतांना त्यानें पाहिले १५. कांहीं दर्भमुष्टिरूप आयुधें हातांत घेतलेले, कांहीं अग्निकुंडरूप आयुधांनीं युक्त असलेले, कांहीं कूट व मुद्गर हीं आयुधें हातीं घेतलेले, कांहीं दंडरूप आयुधें धारण केलेले १६, कांहीं एकाक्ष, कांहीं एकवर्ण, कांहीं स्फुरण पावणाऱ्या एका स्तनांनीं युक्त, कांहीं दिसण्यांत अक्राळविक्राळ, कांहीं फाटकीं वस्त्रें नेसलेले, कांहीं भयंकर अवयवांनीं युक्त असलेले, कांहीं खुजे १७,

कवचोज्वलान् १८ नातिस्थूलान्नातिकृशान्नातिदीर्घातिह्रस्वकान् ।
नातिगौरान्नातिकृष्णान्नातिकुब्जान्न वामनान् १९ विरूपान्बहुरूपांश्च
सुरूपांश्च सुवर्चसः । ध्वजिनः पताकिनश्चैव ददर्श विविधायुधान् २०
शक्तिवृक्षायुधांश्चैव पट्टिशाशनिधारिणः । क्षेपणीपाशहस्तांश्च ददर्श स
महाकपिः २१ स्रग्विणस्त्वनुलिप्तांश्च वराभरणभूषितान् । नानावेषस-
मायुक्तान्यथास्वैरचरान्बहून् २२ तीक्ष्णशूलधरांश्चैव वज्रिणश्च महाब-
लान् । शतसाहस्रमव्यग्रमारक्षं मध्यमं कपिः २३ रक्षोधिपतिनिर्दिष्टं
ददर्शान्तःपुराग्रतः । स तदा तद्गृहं दृष्ट्वा महाहाटकतोरणम् २४ राक्षसे-
न्द्रस्य विख्यातमद्रिमूर्ध्नि प्रतिष्ठितम् । पुण्डरीकावतंसाभिः परिखाभिः
समावृतम् २५ प्राकारावृतमत्यन्तं ददर्श स महाकपिः । त्रिविष्टपनिभं
दिव्यं दिव्यनादविनादितम् २६ वाजिह्रेषितसंघुष्टमद्भुतैश्च हयैस्तथा ।

---

कांहीं धनुर्धारी, कांहीं खड्गपाणी, कांहीं बंदुका व मुसळें हीं आयुधें धारण करणारे, कांहीं परिघसंज्ञक उत्तम आयुध हातांत घेतलेले, कांहीं चित्रविचित्र कवचांनीं झळकत असलेले १८, कांहीं विशेष स्थूल नसलेले, कांहीं विशेष कृश नसलेले, कांहीं विशेष उंच नसलेले, कांहीं विशेष ठेंगणे नसलेले, कांहीं विशेष गौरवर्ण नसलेले, कांहीं विशेष कृष्णवर्ण नसलेले, कांहीं विशेष कुबडे नसलेले, कांहीं विशेष ठेंगू नसलेले १९, कांहीं कुरूप, कांहीं अनेक रूपें धारण केलेले, कांहीं सुरूप, कांहीं चांगले तेजस्वी, कांहीं ध्वज घेतलेले, कांहीं पताका घेतलेले आणि कांहीं नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले राक्षस त्यानें अवलोकन केले २०. शक्ति आणि वृक्ष हीं आयुधें, पट्ट, वज्र, गोफणी आणि पाश हातामध्यें धारण केलेले राक्षस त्या महाकपि हनुमानानें अवलोकन केले २१. तसेच माला धारण केलेले, अंगाला उटि लावलेले, उत्कृष्ट उत्कृष्ट अलंकारांनीं भूषित झालेले, नानाप्रकारचे वेष घेतलेले, इच्छेप्रमाणें संचार करणारे आणि तीक्ष्ण शूल व वज्र धारण करणारे असेही अनेक महाबलाढ्य राक्षस त्यानें पाहिले. आणि रावणाच्या अंतःपुराचे समीप त्या राक्षसाधिपतीच्या हुकमानें लक्षपूर्वक मधल्या चौकाचें रक्षण करणारें एक लक्ष सैन्य त्यानें पाहिलें व हें स्थान अवलोकन केल्यानंतर उत्कृष्ट सुवर्णमय तोरणांनीं युक्त २२, २३, २४ आणि पर्वताच्या माथ्यावर असलेलें राक्षसाधिपतीचें प्रख्यात गृह त्यानें अवलोकन केलें. श्वेतकमलांनीं भूषित झालेल्या खंदकांनीं व कोटांनीं तें अगदीं परिवेष्टित झालेलें होतें असें त्या महाकपि हनुमानाच्या नजरेस आलें. तदनंतर स्वर्गतुल्य, दिव्य, दिव्य ध्वनींनीं नादित २५, २६, घोड्यांच्या खंकाळण्यांनीं नादयुक्त, अद्भुत

रथैर्यानैर्विमानैश्च तथा हयगजैः शुभैः २७ वारणैश्च चतुर्दन्तैः श्वेताभ्र-
निचयोपमैः । भूषितं रुचिरद्वारं मत्तैश्च मृगपक्षिभिः २८ रक्षितं सुम-
हावीर्यैर्यातुधानैः सहस्रशः । राक्षसाधिपतेर्गुप्तमाविवेश गृहं कपिः २९
स हेमजाम्बूनदचक्रवालं महार्हमुक्तामणिभूषितान्तम् । परार्ध्यकालागुरु-
चन्दनार्हं स रावणान्तःपुरमाविवेश ३० [३४१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

ततः स मध्यंगतमंशुमन्तं ज्योत्स्नावितानं मुहुरुद्वमन्तम् । ददर्श
धीमान्भुवि भानुमन्तं गोष्ठे वृषं मत्तमिव भ्रमन्तम् १ लोकस्य पापानि
विनाशयन्तं महोदधिं चापि समेधयन्तम् । भूतानि सर्वाणि विराजयन्तं
ददर्श शीतांशुमथाभियान्तम् २ या भाति लक्ष्मीर्भुवि मन्दरस्था यथा
प्रदोषेषु च सागरस्था । तथैव तोयेषु च पुष्करस्था रराज सा चारुनि-
शाकरस्था ३ हंसो यथा राजतपञ्जरस्थः सिंहो यथा मन्दरकन्दरस्थः ।

---

अश्व, रथ, दुसरींही वाहनें, विमानें, अश्वाएवढाले शुभ गज २७, शुभ्र मेघसमुदाया-
प्रमाणें दिसत असलेले व शृंगारिलेले चौदंती हत्ती व मत्त पशुपक्षी ह्यांनीं भरलेले,
मनोहर द्वारांनीं युक्त २८ व अत्यंत वीर्यवान् असलेल्या हजारों राक्षसांनीं रक्षण
केलेलें जें त्या राक्षसाधिपतीचें सुरक्षित गृह त्यांत हनुमान् वानरानें प्रवेश केला २९
व गृहामध्यें प्रवेश केल्यानंतर तो वानर रावणाच्या अंतःपुरामध्येंही गेला. त्या अंतः-
पुराभोंवतीं हेम व जांबूनद ह्या दोन प्रकारच्या सुवर्णाचा एक तट बांधिलेला होता, त्याचा
ऊर्ध्वभाग मोठ्या मोठ्या मूल्यवान् मोत्यांनीं व हिऱ्यांनीं भूषित केलेला होता आणि
उत्कृष्ट कृष्णागुरु व चंदन ह्यांच्या योगानें त्याचें पूजन केलें होतें ३०. ह्याप्रमाणें
महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चवथा
सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

तदनंतर तारागणाच्या व आकाशाच्या मध्यभागीं आलेला, एकसारखी चंद्रिका
प्रकट करणारा आणि सूर्यामुळें प्रकाशयुक्त किरणांनीं संपन्न असलेला चंद्र गोठ्यामध्यें
भ्रमण करणाऱ्या मत्त वृषभाप्रमाणें त्या विचारी हनुमानानें अवलोकन केला १. सारांश,
लोकांच्या मानसिक दुःखांचा नाश करणारा, महासागराला वृद्धिंगत करणारा आणि
सर्व भूतांना प्रकाशित करणारा चंद्र आकाशाचे मध्यभागीं येत असलेला त्यानें अवलोकन
केला २. भूमीवर मंदरपर्वताचे ठिकाणीं जी शोभा दिसते, रात्रीं सागराचे ठिकाणीं
जी दृष्टीं पडते आणि त्याचप्रमाणें उदकामध्यें कमलांचे ठिकाणीं जी अवलोकनांत
येते ती शोभा मनोहर चंद्राचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येऊं लागली ३; रुप्याच्या पिंज-

वीरो यथा गर्वितकुञ्जरस्थश्चन्द्रोपि बभ्राज तथाम्बरस्थः ४ स्थितः ककुद्मानिव तीक्ष्णशृङ्गो महाचलः श्वेत इवोर्ध्वशृङ्गः । हस्तीव जाम्बूनदबद्धशृङ्गो विभाति चन्द्रः परिपूर्णशृङ्गः ५ विनष्टशीताम्बुतुषारपङ्को महाग्रहग्राहविनष्टपङ्कः । प्रकाशलक्ष्म्याश्रयनिर्मलाङ्को रराज चन्द्रो भगवाञ्छशाङ्कः ६ शिलातलं प्राप्य यथा मृगेन्द्रो महारणं प्राप्य यथा गजेन्द्रः । राज्यं समासाद्य यथा नरेन्द्रस्तथा प्रकाशो विरराज चन्द्रः ७ प्रकाशचन्द्रोदयनष्टदोषः प्रवृद्धरक्षः पिशिताशदोषः । रामाभिरामेरितचित्तदोषः स्वर्गप्रकाशो भगवान्प्रदोषः ८ तन्त्रीस्वराः कर्णसुखाः प्रवृत्ताः स्वपन्ति नार्यः पतिभिः सुपृक्ताः । नक्तंचराश्चापि तथा प्रवृत्ता विहर्तुमत्यद्भुतरौद्रवृत्ताः ९ मत्तप्रमत्तानि समाकुलानि रथाश्वभद्रासनमंकुलानि । वीरश्रिया चापि समाकुलानि ददर्श धीमान्स कपिः

---

त्यामध्यें असलेला हंस जसा शोभतो, मंदरपर्वताच्या गुहेंत राहिलेला सिंह जसा दिसतो आणि मदमत्त गजावर आरूढ झालेला वीर जसा चमकतो तसा आकाशांत असलेला चंद्र झळकूं लागला ४; तीक्ष्ण शृंगांनीं युक्त असलेला वशिंड्या बैल, उन्नत शिखरांनीं युक्त असलेला श्वेतवर्ण महापर्वत अथवा दंतांना सुवर्णभूषणें घातिलेला हत्ति जसा शोभतो तसा परिपूर्ण कलंकरूप हरिणशृंगांनीं युक्त असलेला चंद्र शोभूं लागला ५; शीतोदकबिंदुरूप पंक ह्मणजे अर्थात् धुकें ज्यांत नाहीं अशा निर्मल आकाशामध्यें प्राप्त झालेला भगवान् चंद्र फारच शोभूं लागला. कारण, सूर्याच्या किरणसंक्रमणानें त्यानें पृथ्वीवरील अंधकाररूप पंक नाहींसा केला होता आणि प्रकाशसपत्ति असल्यामुळें त्याच्यावरील कृष्णचिह्न स्पष्ट चमकत होतें ६. गुहेच्या बाहेरील शिलातलाचें अवलंबन केल्यामुळें ( ह्मणजे गुहेच्या बाहेर येऊन झोकांत उभा राहिल्यामुळें ) जसा सिंह शोभूं लागतो, प्रचंड रणभूमीमध्यें आलेला गजेंद्र जसा दिसतो आणि राज्यावर आलेला नरेंद्र जसा चमकूं लागतो तसा सूर्यप्रकाश प्राप्त झालेला चंद्र झळकूं लागला ७. प्रकाशयुक्त चंद्र वर आल्यामुळें गृहांतीलही अंधकार ज्यानें नाहींसा केला आहे, राक्षसांचे मांस भक्षणरूप दोष ज्यानें वृद्धिंगत केले आहेत आणि विलासिनी स्त्रियांच्या मनांतील वल्लभविषयक किल्बिष ज्यानें नाहींसें केलें आहे असा सुखसाधनभूत पूज्य रात्रिसमय फारच मनोहर दिसूं लागला ८. श्रवणेंद्रियाला सुखावह असे तंतुवाद्यांचे ध्वनि सुरू झाले, स्त्रिया पतींशीं अगदीं संमीलित होऊन निद्रा घेऊं लागल्या आणि अत्यंत आश्चर्यकारक व भयंकर वर्तन करणारे निशाचरही विहार करण्यास प्रवृत्त झाले. ९. ऐश्वर्यानें व मद्यपानानें मत्त झालेले लोक ज्यामध्यें आहेत

कुलानि १० परस्परं चाधिकमाक्षिपन्ति भुजांश्च पीनानधिविक्षिपन्ति। मत्तप्रलापानधिविक्षिपन्ति मत्तानि चान्योन्यमधिक्षिपन्ति ११ रक्षांसि वक्षांसि च विक्षिपन्ति गात्राणि कान्तासु च विक्षिपन्ति। रूपाणि चित्राणि च विक्षिपन्ति दृढानि चापानि च विक्षिपन्ति १२ ददर्श कान्ताश्च समालभन्त्यस्तथापरास्तत्र पुनः स्वपन्त्यः। सुरूपवक्त्राश्च तथा हसन्त्यः क्रुद्धाः पराश्चापि विनिःश्वसन्त्यः १३ महागजैश्चापि तथा नदद्भिः सुपूजितैश्चापि तथा सुसद्भिः। रराज वीरैश्च विनिःश्वसद्भिर्ह्रदा भुजंगैरिव निःश्वसद्भिः १४ बुद्धिप्रधानान्रुचिराभिधानान्संश्रद्दधानाञ्जगतः प्रधानान्। नानाविधानान्रुचिराभिधानान्ददर्श तस्यां पुरि यातुधानान् १५ ननन्द दृष्ट्वा स च तान्सुरूपान्नानागुणानात्मगुणानुरूपान्। विद्योतमानान्स च तान्सुरूपान्ददर्श कांश्चिच्च पुनर्विरूपान् १६ ततो

---

रथ, अश्व व चांगल्या चांगल्या बैठकी ह्यांनीं जीं गजबजून गेलेलीं आहेत, लोकांची ज्यांत अतिशय गर्दी झालेली आहे आणि वीरश्रीनें जीं व्याप्त झालेलीं आहेत अशीं राक्षसांचीं गृहें त्या बुद्धिमान् हनुमान् वानराच्या दृष्टीं पडूं लागलीं १०. मत्त झालेले राक्षस एकमेकांशीं जोराजोरानें उत्तरें प्रत्युत्तरें करूं लागले, आपले लठ्ठ लठ्ठ दंड एकमेकांसमोर थोपटूं लागले, उन्मत्त भाषणें करूं लागले आणि एकमेकांची निर्भर्त्सनाही करूं लागले ११. राक्षस एकमेकांच्या वक्षःस्थलावर प्रहार करूं लागले, हस्तादि अवयव स्त्रियांवर टाकूं लागले, चित्रविचित्र रूपें धारण करूं लागले आणि प्रचंड धनुष्यें आकर्षण करूं लागले १२. कांहीं राक्षसस्त्रिया अगांना उट्या लावूं लागल्या, कांहीं पुनरपि निद्रा घेऊं लागल्या, मनोहर रूपानें व मुखानें युक्त असलल्या अशा कांहीं हसूं लागल्या आणि दुसऱ्या कांहीं क्रुद्ध होऊन सुस्कारे टाकूं लागल्या असें त्या हनुमानाच्या दृष्टीं पडूं लागलें १३. फुस्कारे टाकीत असलेल्या सर्पांच्या योगानें ज्याप्रमाणें सरोवरें शोभूं लागतात त्याप्रमाणें मुसमुसणाऱ्या वीरांच्या योगानें, गर्जना करणाऱ्या महावीरांच्या योगानें आणि अत्यंत पूज्य अशा बिभीषणप्रभृति महासज्जनांच्या योगानें ती लंकानगरी शोभूं लागली १४. त्या लंकानगरीमध्यें बुद्धि हा ज्यांमध्यें मुख्य गुण आहे, ज्यांचें भाषण मनोहर आहे, जे श्रद्धालु आहेत आणि जगतामध्यें जे मुख्य आहेत असे नानाप्रकारचीं रूपें व मनोहर नांवें धारण करणारे राक्षस हनुमानानें अवलोकन केले १५. आपल्या अंगांत असलेला जो सामर्थ्यगुण त्याला अनुरूप ह्मणजे आपणासारखे समर्थ, बहुगुणसंपन्न व सुस्वरूप असे राक्षस अवलोकन करून हनुमानाला आनंद झाला आणि कांहीं

वराहाः सविशुद्धभावास्तेषां स्त्रियस्तत्र महानुभावाः। प्रियेषु पानेषु च सक्तभावा ददर्श तारा इव सुस्वभावाः १७ स्त्रियो ज्वलन्तीस्त्रपयोपगूढा निशीथकाले रमणोपगूढाः। ददर्श काश्चित्प्रमदोपगूढा यथा विहंगा विहगोपगूढाः १८ अन्याः पुनर्हर्म्यतलोपविष्टास्तत्र प्रियाङ्के सुसुखोपविष्टाः। भर्तुः परा धर्मपरा निविष्टा ददर्श धीमान्मदनोपविष्टाः १९ अप्रावृताः काञ्चनराजिवर्णाः काश्चित्परार्ध्यास्तपनीयवर्णाः। पुनश्च काश्चिच्छशलक्ष्मवर्णाः कान्तप्रहीणा रुचिराङ्गवर्णाः २० ततः प्रियान्प्राप्य मनोभिरामान्सुप्रीतियुक्ताः सुमनोभिरामाः। गृहेषु हृष्टाः परमाभिरामा हरिप्रवीरः स ददर्श रामाः २१ चन्द्रप्रकाशाश्च हि वक्त्रमाला वक्राः सुपक्ष्माश्च सुनेत्रमालाः। विभू-

---

राक्षस जरी विरूप होते तरी तेजानें झळकूं लागल्यामुळें त्याला ते सुस्वरूपच भासूं लागले १६. तदनंतर उत्कृष्ट अलंकार वगैरे धारण करण्यास योग्य, नेत्रकटाक्षादि शुद्ध हावभावांनीं युक्त, अंतःकरणानें उदार, नक्षत्रांप्रमाणें सुस्वरूप आणि प्रियांचे ठिकाणीं व मद्यांचे ठिकाणीं आसक्त अशा त्या राक्षसांच्या स्त्रियाही त्यानें अवलोकन केल्या १७. स्वरूपानें अगदीं जशा कांहीं जळत असलेल्या, लज्जेनें व्याप्त झालेल्या, पक्षी ज्याप्रमाणें पक्षिणींना आलिंगन देतात त्याप्रमाणें पतींनीं गाढ आलिंगन दिलेल्या आणि हर्षानें व्याप्त झालेल्या अशा कांहीं स्त्रिया मध्यरात्रीचे सुमारास त्यानें अवलोकन केल्या १८. आपआपल्या वाड्यांच्या गच्च्यांवरून बसलेल्या, इतकेंच नव्हे परंतु, पतींना पराकाष्ठेच्या प्रिय असल्यामुळें त्यांच्या अंकांवर अत्यंत सुखानें बसलेल्या, भर्तृसेवारूप धर्माचरणाविषयीं तत्पर असलेल्या आणि मदनानें ग्रस्त झालेल्या अशा दुसऱ्याही कांहीं विवाहित स्त्रिया त्या बुद्धिमान् हनुमानानें तेथें अवलोकन केल्या १९. कांहीं स्त्रिया वरचें आंग उघडें टाकिलेल्या, कांहीं स्त्रिया सुवर्णरेषेप्रमाणें तेजस्वी व सडपातळ असलेल्या, कांहीं स्वरूपानें उत्तम असलेल्या, कांहीं सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेल्या, कांहीं चंद्रासारख्या आल्हादकारक वर्णानें युक्त असलेल्या, कांहीं प्रियांचा वियोग झालेल्या आणि कांहीं मनोहर देहकांतीनें युक्त असलेल्या स्त्रिया हनुमानानें अवलोकन केल्या २०. तदनंतर मनाप्रमाणें सुंदर पति मिळाल्यामुळें अत्यंत प्रीतियुक्त होऊन आपआपल्या प्रियपतींशीं रममाण होणाऱ्या, पुष्पांच्या योगानें रमणीय दिसूं लागलेल्या, घरामध्यें आनंदानें असलेल्या आणि आपआपल्या पतींना अत्यंत मनोहर वाटणाऱ्या अशाही कांहीं स्त्रिया त्या कपिश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केल्या २१. चंद्रासारख्या तेजस्वी मुखपंक्ति, उत्कृष्ट पापण्यांनीं युक्त अस-

षणानां च ददर्श मालाः शतह्रदानामिव चारुमालाः २२ नत्वेव सीतां परमाभिजातां पथि स्थिते राजकुले प्रजाताम् । लतां प्रफुल्लामिव साधुजातां ददर्श तन्वीं मनसाभिजाताम् २३ सनातने वर्त्मनि संनिविष्टां रामेक्षणीं तां मदनाभिविष्टाम् । भर्तुर्मनः श्रीमदनुप्रविष्टां स्त्रीभ्यः पराभ्यश्च सदा विशिष्टाम् २४ उष्णार्दितां सानुसृतास्रकण्ठीं पुरा वरार्होत्तमनिष्ककण्ठीम् । सुजातपक्ष्मामभिरक्तकण्ठीं वने प्रवृत्तामिव नीलकण्ठीम् २५ अव्यक्तरेखामिव चन्द्रलेखां पांसुप्रदिग्धामिव हेमरेखाम् । क्षतप्ररूढामिव वर्णरेखां वायुप्रभुग्नामिव हेमरेखाम् २६ सीतामपश्यन्मनुजेश्वरस्य रामस्य पत्नीं वदतां वरस्य । बभूव दुःखोपहतश्चिरस्य प्लवंगमो मन्द इवाचिरस्य २७ [ ३६८ ] इत्यार्षे० श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

---

लेल्या मनोहर नेत्रांच्या बक पंक्ति आणि विद्युल्लतांच्या मनोहर समुदायाप्रमाणें झळकत असलेल्या भूषणांच्या पंक्ति त्या हनुमानानें अवलोकन केल्या २२. परंतु, विधात्यानें मनाच्याच योगानें उत्पन्न केलेली, परम कुलीन, धर्ममार्गानें चालणाऱ्या राजकुलामध्यें उत्पन्न झालेली आणि चांगल्या ठिकाणीं उगवलेल्या प्रफुल्लित वेलीप्रमाणें शोभत असलेली कृशोदरी सीता त्याच्या दृष्टीं पडली नाहीं २३. सनातन पातिव्रत्यधर्मानें चालणारी, रामाचें चिंतन करणारी, रामविषयक कामवासनेनें युक्त असलेली, भर्त्याच्या उदार मनामध्यें खिळून राहिलेली, उत्कृष्ट स्त्रियांपक्षांही नेहमीं अधिक असलेली २४, वियोगतापानें पीडित झालेली, अश्रूंनीं कंठ दाटून आलेली, पूर्वी रामचंद्रासमीप असतांना उत्कृष्ट भूषणांना पात्र आणि ह्मणूनच उत्तम अलंकारांनीं भरलेल्या कंठानें युक्त असलेली, मनोहर पापण्या व मधुर स्वर ह्यांनीं युक्त असून मयूरीप्रमाणें वनामध्यें वास्तव्य करण्यास प्रवृत्त झालेली २५, पतीचा वियोग झाला असल्यामुळें अभ्रानें अस्पष्ट झालेल्या चंद्रलेखेप्रमाणें दिसत असलेली, धुळीनें भरलेल्या सुवर्णरेषेप्रमाणें भासत असलेली, क्षत पडल्यामुळें वृद्धिंगत झालेल्या बाणजन्य व्रणाप्रमाणें रामाला दुःखदायक झालेली आणि वायूच्या योगानें लवलेली सुवर्णरेषाच कीं काय अशी दृष्टोत्पत्तीस येऊं लागलेली २६ वक्त्यांमध्यें श्रेष्ठ व प्रजाधिपति रामाची पत्नि सीता जेव्हां पुष्कळ वेळ शोध करूनही दृष्टीं पडेना तेव्हां हनुमान् वानर दुःखाकुल होऊन एकाएकीं जसा कांहीं मंद झाल्यासारिखा दिसूं लागला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

स निकामं विमानेषु विचरन्कामरूपधृक् । विचचार कपिर्लङ्कां लाघवेन समन्वितः १ आससाद च लक्ष्मीवान्राक्षसेन्द्रनिवेशनम् । प्राकारेणार्कवर्णेन भास्वरेणाभिसंवृतम् २ रक्षितं राक्षसैर्भीमैः सिंहैरिव महद्वनम् । समीक्षमाणो भवनं चकाशे कपिकुञ्जरः ३ रूप्यकोपहितैश्चित्रैस्तोरणैर्हेमभूषणैः । विचित्राभिश्च कक्ष्याभिर्द्वारैश्च रुचिरावृतम् ४ गजास्थितैर्महामात्रैः शूरैश्च विगतश्रमैः । उपस्थितमसंहार्यैर्हयैः स्यन्दनयायिभिः ५ सिंहव्याघ्रतनुत्राणैर्दान्तिकाञ्चनराजतैः । घोषवद्भिर्विचित्रैश्च सदा विचरितं रथैः ६ बहुरत्नसमाकीर्णं परार्ध्यासनभूषितम् । महारथसमावापं महारथमहासनम् ७ दृश्यैश्च परमोदारैस्तैस्तैश्च मृगपक्षिभिः । विविधैर्बहुसाहस्रैः परिपूर्णं समन्ततः ८ विनीतैरन्तपालैश्च रक्षाभिश्च सुरक्षितम् । मुख्याभिश्च वरस्त्रीभिः परिपूर्णं समन्ततः ९ मुदितप्रमदारत्नं राक्षसेन्द्रनिवेशनम् । वराभरणसंह्रादैः समुद्रस्वननिःस्वनम् १०

---

यथेष्ट रूप धारण करणारा तो चलाख हनुमान् स्वेच्छेनें सात सात मजली हवेल्या हिंडतां हिंडतां सर्व लंका फिरला १. हिंडतां हिंडतां तो भव्य हनुमान् सूर्यासारिख्या तेजस्वी आणि ह्मणूनच उज्ज्वल अशा प्राकारानें परिवेष्टित असलेल्या राक्षसाधिपति रावणाच्या गृहासमीप गेला २ आणि सिंहांनीं रक्षण केलेल्या महावनाप्रमाणें भयंकर राक्षसांनीं रक्षण केलेलें तें गृह अवलोकन करितां करितां पुनरपि तो कपिश्रेष्ठ हनुमान् सीतेला शोधून काढण्याविषयीं चळवळ करूं लागला ३. रुप्यानें मढविलेल्या व सुवर्णानें भूषित केलेल्या अद्भुत तोरणांनीं, आश्चर्यकारक चौकांनीं आणि मनोहर द्वारांनीं तें गृह युक्त होतें ४; गजारूढ झालेले महात, कधींही थकवा न येणारे शूर आणि अप्रतिहत गतीनें युक्त असलेले रथवाहक अश्व त्या गृहासमीप होते ५; सिंह व व्याघ्र ह्यांच्या चर्मांनीं आच्छादित, घंटांच्या योगानें घोषयुक्त आणि हस्तिदंती सोन्याचीं व रुप्याचीं चित्रें धारण करणारे नानाप्रकारचे रथ एकसारखे तेथून हिंडत होते ६; असंख्य रत्नांनीं तें व्याप्त झालेलें होतें, उत्कृष्ट आसनांनीं तें भूषित झालें होतें, मोठे मोठे रथखाने त्याच्या भोंवतीं बांधिलेले होते आणि महारथी तेथें सर्वदां वास्तव्य करीत होते ७; प्रेक्षणीय व अत्यंत सुंदर अशा नानाप्रकारच्या हजारों पशुपक्ष्यांच्या योगानें तें सर्व बाजूंनीं भरलेलें होतें ८; हद्दींचें रक्षण करणाऱ्या नम्र राक्षसांनीं तें सुरक्षित होतें आणि मुख्य मुख्य उत्कृष्ट स्त्रियांनीं तें सर्व बाजूंनीं गजबजून गेलेलें होतें ९. तें राक्षसाधिपति रावणाचें गृह उत्कृष्ट भूषणांच्या ध्वनीमुळें समुद्रासारखी गर्जनाच करीत आहे कीं काय असें भासत होतें आणि

तद्राजगुणसंपन्नं मुख्यैश्च वरचन्दनैः । महाजनसमाकीर्णं सिंहैरिव महद्वनम् ११ भेरीमृदङ्गाभिरुतं शङ्खघोषविनादितम् । नित्यार्चितं पर्वसु तं पूजितं राक्षसैः सदा १२ समुद्रमिव गम्भीरं समुद्रसमनिःस्वनम् । महात्मनो महद्वेश्म महारत्नपरिच्छदम् १३ महारत्नसमाकीर्णं ददर्श स महाकपिः । विराजमानं वपुषा गजाश्वरथसंकुलम् १४ लङ्काभरणमित्येव सोमन्यत महाकपिः । चचार हनुमांस्तत्र रावणस्य समीपतः १५ गृहाद्गृहं राक्षसानामुद्यानानि च सर्वशः । वीक्षमाणोप्यसंत्रस्तः प्रासादांश्च चचार सः १६ अवप्लुत्य महावेगः प्रहस्तस्य निवेशनम् । ततोन्यत्पुप्लुवे वेश्म महापार्श्वस्य वीर्यवान् १७ अथ मेघप्रतीकाशं कुम्भकर्णनिवेशनम् । विभीषणस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः १८ महोदरस्य च तथा विरूपाक्षस्य चैव हि । विद्युज्जिह्वस्य भवनं विद्युन्मालेस्तथैव च १९ बहुदंष्ट्रस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः । शुकस्य च

---

त्यांतील स्त्रीरत्नें आनंदित झालेलीं होतीं १०. छत्रचामरादि प्रसिद्ध राजचिह्नांनीं आणि मुख्य मुख्य उत्कृष्ट चंदनांनीं तें संपन्न होतें आणि सिंहांनीं व्याप्त झालेल्या महावनाप्रमाणें तें महाजनांनीं व्याप्त झालेलें होतें ११. तेथें नौबदी झडत होत्या, मृदंगाची थाप एकसारखी सुरू होती, शंखांचा घोष दुमदुमून राहिलेला होता, पर्वदिवशीं यज्ञाकरितां त्यांत सोमरस तयार करण्यांत येत असे, नेहमीं त्याचें अर्चन होत असे आणि राक्षस त्याची सर्वदां पूजा करीत असत १२. महात्म्या रावणाच्या त्या प्रचंड गृहामध्यें मोठ्या मोठ्या रत्नांचें सामान भरलेलें होतें आणि समुद्राप्रमाणें तें गंभीर दिसत असून समुद्राप्रमाणें ध्वनीही त्यांत चालू होता १३. अशा प्रकारचें गज, अश्व व रथ ह्यांनीं व्याप्त, आकारानेंही झळकत असलेलें आणि मोठ्या मोठ्या रत्नांनीं भरून गेलेलें तें गृह त्या महाकपि हनुमानानें अवलोकन केलें असतां १४ हें लंकेचें भूषणच आहे असें त्या महाकपीला वाटलें आणि तो हनुमान् रावणाच्या त्या घराजवळूनच संचार करूं लागला १५. तदनंतर त्या घरावरून ह्या घरावर ह्या रीतीनें राक्षसांचे वाडे, घरें आणि बागा हें सर्व पहाण्याकरितां तो हनुमान् निर्भयपणें लंकेमध्यें संचार करूं लागला १६. प्रथमतः त्या महावेगवान् हनुमानानें प्रहस्तनामक राक्षसाच्या घरावर उडी मारिली आणि नंतर त्या वीर्यवान् हनुमानानें महापार्श्वनामक राक्षसाच्या घरावर उड्डाण केलें १७. नंतर कुंभकर्णाच्या मेघतुल्य घरावर उडी मारून त्या महाकपीनें बिभीषणाच्या घरावर उड्डाण केलें १८ आणि नंतर महोदर, विरूपाक्ष विद्युज्जिह्व व विद्युन्माली ह्यांच्या घरांवर उड्या टाकीत टाकीत १९

महावेगः सारणस्य च धीमतः २० तथा चेन्द्रजितो वेश्म जगाम हरियूथपः । जम्बुमालेः सुमालेश्च जगाम हरिसत्तमः २१ रश्मिकेतोश्च भवनं सूर्यशत्रोस्तथैव च । वज्रकायस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः २२ धूम्राक्षस्याथ संपातेर्भवनं मारुतात्मजः । विद्युद्रूपस्य भीमस्य घनस्य विघनस्य च २३ शुकनाभस्य चक्रस्य शठस्य कपटस्य च । ह्रस्वकर्णस्य दंष्ट्रस्य लोमशस्य च रक्षसः २४ युद्धोन्मत्तस्य मत्तस्य ध्वजग्रीवस्य सादिनः । विद्युज्जिह्वद्विजिह्वानां तथा हस्तिमुखस्य च २५ करालस्य विशालस्य शोणिताक्षस्य चैव हि । प्लवमानः क्रमेणैव हनुमान्मारुतात्मजः २६ तेषु तेषु महार्हेषु भवनेषु महायशाः । तेषामृद्धिमतामृद्धिं ददर्श स महाकपिः २७ सर्वेषां समतिक्रम्य भवनानि समन्ततः । आससादाथ लक्ष्मीवान्राक्षसेन्द्रनिवेशनम् २८ रावणस्योपशायिन्यो ददर्श हरिसत्तमः । विचरन्हरिशार्दूलो राक्षसीर्विकृतेक्षणाः २९ शूलमुद्गरहस्ताश्च शक्तितोमरधारिणः । ददर्श विविधान्गुल्मांस्तस्य रक्षःपतेर्गृहे ३० राक्षसांश्च महाकायान्नानाप्रहरणोद्यतान् । रक्ता-

---

तो महावेगवान् महाकपि शेवटीं बहुदंष्ट्र, शुक व बुद्धिमान् सारण ह्यांच्याही घरांवरून उड्या टाकीत चालला २०. त्याचप्रमाणें तो वानरसेनाधिपति हनुमान् इंद्रजिताच्या घरावर गेला आणि नंतर जंबुमाली व सुमाली ह्यांच्याही घरांवर त्या वानरश्रेष्ठानें उड्डाण केलें २१. त्याचप्रमाणें तो महाकपि रश्मिकेतु, सूर्यशत्रु आणि वज्रकाय ह्यांच्या घरांवर उड्या टाकून गेल्यानंतर २२ धूम्राक्ष, संपाति, विद्युद्रूप, भीम, घन व विघन ह्यांच्याही घरांवर त्या वायुपुत्रानें उड्डाण केलें २३ आणि नंतर शुकनाभ, चक्र, शठ, कपट, ऱ्हस्वकर्ण, दंष्ट्र, लोमशराक्षस २४, युद्धोन्मत्त, मत्त, ध्वजग्रीव, सादी, विद्युज्जिह्व, द्विजिह्व, हास्तिमुख २५, कराल, विशाल आणि शोणिताक्ष ह्यांच्याही घरांवर तो वायुपुत्र हनुमान् क्रमाक्रमानें उड्डाण करीत करीत गेला २६. त्या त्या मोठ्या मूल्यवान् घरांवर गेल्यानंतर त्या महायशस्वी महाकपीनें त्या समृद्ध राक्षसांची संपत्ति अवलोकन केली २७ आणि ह्याप्रमाणें वरकड सर्व राक्षसांचीं घरें सर्व बाजूंनीं हिंडल्यानंतर तो तेजःपुंज हनुमान् राक्षसाधिपति रावणाच्या घराकडे आला २८. नंतर संचार करितां करितां वानरराज व वानरश्रेष्ठ हनुमानानें विकृत मुद्रांनीं युक्त अशा राक्षसी रावणाचें शयनस्थान रक्षण करीत असलेल्या अवलोकन केल्या २९ आणि त्याचप्रमाणें त्या राक्षसाधिपतीच्या गृहामध्यें शूल, मुद्गर, शक्ति व तोमर हीं आयुधें धारण करणारे नानाप्रकारचे दुसरेही राक्षसींचे समुदाय त्यानें अवलोकन

ऋष्वेतान्सितांश्चापि हरींश्चापि महाजवान् ३१ कुलीनान्रूपसंपन्नान्गजान्परगजारुजान्। शिक्षितान्गजशिक्षायामैरावतसमान्युधि ३२ निहन्तॄन्परसैन्यानां गृहे तस्मिन्ददर्श सः। क्षरतश्च यथा मेघान्स्रवतश्च यथा गिरीन् ३३ मेघस्वनितनिर्घोषान्दुर्धर्षान्समरे परैः। सहस्रं वाहिनीस्तत्र जाम्बूनदपरिष्कृताः ३४ हेमजालैरविच्छिन्नास्तरुणादित्यसंनिभाः। ददर्श राक्षसेन्द्रस्य रावणस्य निवेशने ३५ शिबिका विविधाकाराः स कपिर्मारुतात्मजः ३६ लतागृहाणि चित्राणि चित्रशालागृहाणि च। क्रीडागृहाणि चान्यानि दारुपर्वतकानि च ३७ कामस्य गृहकं रम्यं दिवागृहकमेव च। ददर्श राक्षसेन्द्रस्य रावणस्य निवेशने ३८ समन्दरसमप्रख्यं मयूरस्थानसंकुलम्। ध्वजयष्टिभिराकीर्णं ददर्श भवनोत्तमम् ३९ अनन्तरत्ननिचयं निधिजालं समन्ततः। धीरनिष्ठितकर्मान्तं गृहं भूतपतेरिव ४० अर्चिर्भिश्चापि रत्नानां तेजसा रावणस्य च। विरराज च

---

केले ३०. तदनंतर आयुधें उगारून सज्ज असलेले मोठमोठे धिप्पाड राक्षस, आरक्तवर्ण, श्वेतवर्ण व पांढुरक्या रंगाचे महावेगवान् अश्व ३१ आणि कुलीन, रूपवान्, गजशिक्षेमध्यें शिकविलेले, युद्धामध्यें ऐरावताची बरोबरी करणारे, शत्रूकडील गजांचा नाश करणारे, शत्रुसैन्याचा घात करणारे, मदस्राव चालला असल्यामुळें वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें अथवा जलस्रावांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें भासणारे, मेघाप्रमाणें गर्जना करणारे व समरंगणामध्यें शत्रूंना जिंकण्यास अशक्य असे गज त्या गृहामध्यें त्यानें अवलोकन केले; त्याचप्रमाणें सुवर्णाचे अलंकार घातलेल्या हजार सेना त्यानें तेथें अवलोकन केल्या ३२, ३३, ३४. सुवर्णालंकारांच्या समुदायांनीं गजबजून गेलेल्या आणि बालसूर्याप्रमाणें उज्ज्वल दिसत असलेल्या नानाप्रकारच्या पालख्या राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्यें त्या वायुपुत्र कपीनें अवलोकन केल्या ३५, ३६. त्याचप्रमाणें चित्रें काढिलेले दिवाणखाने ज्यांत आहेत अशीं गृहें, अद्भुत लतागृहें, क्रीडास्थानें, क्रीडेकरितां काष्ठांचे तयार केलेले पर्वत ३७, रम्य असें रतिगृह आणि दिवसा विहार करण्याचें स्थल त्या राक्षसाधिपति रावणाच्या निवासस्थानामध्यें त्यानें अवलोकन केलें ३८. सारांश, मंदरपर्वतसमान, मयूरपक्ष्यांच्या निवासस्थानांनीं गजबजलेलें, ध्वजदंडांनीं व्याप्त झालेलें, अनंत रत्नांच्या समुदायांनीं भरलेलें, सभोंवतीं द्रव्यभांडारांचा समूहच कीं काय असें भोंवताली भासणारें आणि पुण्यवानांनीं आचरिलेल्या तपश्चर्येचें फलच कीं काय असें अनुभवाला येणारें व कुबेराच्या गृहाची बरोबरी करणारें तें उत्कृष्ट गृह त्यानें अवलोकन केलें ३९, ४०. रत्नांचा प्रभाव व

तद्वेश्म रश्मिवानिव रश्मिभिः ४१ जाम्बूनदमयान्येव शयनान्यासनानि च । भाजनानि च शुभ्राणि ददर्श हरियूथपः ४२ मध्वासवकृतक्लेदं मणिभाजनसंकुलम् । मनोरममसंबाधं कुबेरभवनं यथा ४३ नूपुराणां च घोषेण काञ्चीनां निःस्वनेन च । मृदङ्गतलनिर्घोषैर्घोषवद्भिर्विनादितम् ४४ प्रासादसंघातयुतं स्त्रीरत्नशतसंकुलम् । सुव्यूढकक्ष्यं हनुमान्प्रविवेश महागृहम् ४५ [ ८१३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

स वेश्मजालं बलवान्ददर्श व्यसक्तवैदूर्यसुवर्णजालम् । यथा महत्प्रावृषि मेघजालं विद्युद्विनद्धं सविहंगजालम् १ निवेशनानां विविधाश्च शालाः प्रधानशङ्खायुधचापशालाः । मनोहराश्चापि पुनर्विशाला ददर्श वेश्माद्रिषु चन्द्रशालाः २ गृहाणि नानावसुराजितानि देवासुरैश्चापि सुपूजितानि । सर्वैश्च दोषैः परिवर्जितानि कपिर्ददर्श स्वबलार्जितानि ३ तानि प्रयत्नाभिसमाहितानि मयेन साक्षादिव निर्मितानि । महीतले सर्वगुणा-

---

रावणाचें तेज ह्यांच्या योगानें तें गृह, किरणांच्या योगानें शोभणाऱ्या सूर्याप्रमाणें, शोभूं लागलें ४१; शय्या, आसनें आणि स्वच्छ पात्रें हीं सर्व सुवर्णमयच त्या वानरसेनाधिपतीनें तेथें अवलोकन केलीं ४२ आणि शेवटीं मध व आसव ह्यांच्या योगानें आर्द्र, रत्नपात्रांनीं गजबजलेलें, कुबेराच्या गृहाप्रमाणें विस्तीर्ण व मनोहर ४३, तोरड्यांचा ध्वनि, कमरपट्ट्यांचा शब्द आणि मृदंगावर झडत असलेल्या थापांचा नाद ह्यांच्या योगानें व इतरही घोषयुक्त वाद्यांच्या योगानें नादित ४४, प्रासादसमूहांनीं युक्त, शेंकडों उत्कृष्ट स्त्रियांनीं भरून गेलेलं आणि विस्तीर्ण चौकांनीं युक्त असलेलें असें जें प्रचंड गृह त्यामध्यें हनुमानानें प्रवेश केला ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

वैदूर्यरत्नखचित सुवर्णाच्या खिडक्या ज्यांत बसविलेल्या आहेत आणि ज्यामध्यें पक्ष्यांचे समुदाय आहेत असा गृहसमुदाय, पर्जन्यकालांतील विद्युल्लतेनें व पक्षिसमुदायानें युक्त असलेल्या प्रचंड मेघजालाप्रमाणें, त्या बलाढ्य वानरानें अवलोकन केला १. उत्कृष्ट शंख, आयुधें व धनुष्यें ह्यांच्या योगानें शोभणाऱ्या नानाप्रकारच्या गृहपंक्ति आणि त्याचप्रमाणें पर्वततुल्य उंच उंच घरांवर असलेल्या मनोहर व विशाल गच्च्या त्यानें अवलोकन केल्या २. नानाप्रकारच्या संपत्तींनीं अळंकृत असलेलीं, देवदैत्यांनाही अत्यंत मान्य असलेलीं, कोणत्याही दोषानें लिप्त नसलेलीं आणि रावणानें स्वतःच्या बलानें संपादिलेलीं गृहें त्या वानरानें अवलोकन केलीं ३. लंकाधिपति रावणाचीं जीं

वराणि ददर्श कक्ष्याधिपतेर्गृहाणि ४ ततो ददर्शोच्छ्रितमेघरूपं मनोहरं काञ्चनचारुरूपम् । रक्षोधिपस्यात्मबलानुरूपं गृहोत्तमं ह्यप्रतिरूपरूपम् ५ महीतले स्वर्गमिव प्रकीर्णं श्रिया ज्वलन्तं बहुरत्नकीर्णम् । नानातरूणां कुसुमावकीर्णं गिरेरिवाग्रं रजसावकीर्णम् ६ नारीप्रवेकैरिव दीप्यमानं तडिद्भिरम्भोधरमर्च्यमानम् । हंसप्रवेकैरिव वाह्यमानं श्रिया युतं खे सुकृतं विमानम् ७ यथा नगाग्रं बहुधातुचित्रं यथा नभश्च ग्रहचन्द्रचित्रम् । ददर्श युक्तीकृतचारुमेघचित्रं विमानं बहुरत्नचित्रम् ८ मही कृता पर्वतराजिपूर्णा शैलाः कृता वृक्षवितानपूर्णाः । वृक्षाः कृताः पुष्पवितानपूर्णाः पुष्पं कृतं केसरपत्रपूर्णम् ९ कृतानि वेश्मानि च पाण्डुराणि तथा सुपुष्पा अपि पुष्करिण्यः । पुनश्च पद्मानि सकेसराणि वनानि चित्राणि सरोवराणि १० पुष्पाह्वयं नाम विराजमानं रत्नप्रभाभिश्च

---

गृहें हनुमानानें अवलोकन केलीं त्यांची रचना प्रयत्नपूर्वक चांगल्या रीतीनें केलेलीं होतीं; प्रत्यक्ष मयासुरानेंच निर्माण केलेलीं आहेत कीं काय अशीं तीं अद्भुत दिसत होतीं आणि ह्या भूतलावरील सर्व गुणांनीं तीं संपन्न होतीं ४. तदनंतर मेघासारिखें उन्नत, सुवर्णासारिखें उज्ज्वल, मनोहर, अप्रतिम, मुख्य गृहांमध्येंही उत्कृष्ट व आपल्या सामर्थ्याला अनुरूप असें एक त्या राक्षसाधिपति रावणाचें गृह त्यानें अवलोकन केलें ५. वैभवानें झळकत असलेलें, अनेक प्रकारच्या रत्नांनीं भरलेलें, अनेक वृक्षांच्या पुष्पांनीं व्याप्त झालेलें आणि पुष्पपरागांनीं व्याप्त झालेल्या पर्वतशिखराप्रमाणें दिसत असलेलें तें गृह भूतलावर पाडिलेला स्वर्गच कीं काय असें भासत होतें ६. स्त्रीरत्नांमुळें देदीप्यमान असलेलें तें वैभवसंपन्न गृह विद्युल्लतांनीं झळकत असलेल्या मेघाप्रमाणें अथवा श्रेष्ठ श्रेष्ठ हंसपक्ष्यांनीं युक्त असलेल्या आकाशांतील उत्कृष्ट विमानाप्रमाणें दिसत होतें ७. नंतर अनेक धातूंनीं चित्रविचित्र झालेल्या पर्वतशिखराप्रमाणें, अथवा ग्रह व चंद्र ह्यांच्या योगानें सुशोभित झालेल्या आकाशाप्रमाणें, किंवा अनेक वर्णांनीं युक्त व मनोहर मेघाप्रमाणें, आश्चर्यकारक असलेलें बहुरत्नखचित पुष्पक विमान त्यानें अवलोकन केलें ८. त्या पुष्पकविमानांतील भूमि पर्वतपंक्तींनें भरून काढिलेली होती; आंतील रत्नमय पर्वत तशाच प्रकारच्या वृक्षसमुदायांनीं भरलेले होते; ते वृक्ष पुष्पसमूहांनीं भरून काढिलेले होते; आणि तीं पुष्पेंही पराग व पाकळ्या ह्यांनीं भरून काढिलेलीं होतीं ९. आंतील गृहें शुभ्रवर्ण केलेलीं होतीं, पुष्करिणी उत्कृष्ट पुष्पांनीं युक्त केलेल्या होत्या; त्यांतील कमलें केसरांनीं भरलेलीं होतीं आणि अद्भुत वनें व सरोवरेंही त्यामध्यें होतीं १०. असो. हनुमानानें जें पुष्पकसंज्ञक मोठें उज्ज्वल

सुमध्यमः। अपश्यतोऽभवदतिदुःखितं मनः सचक्षुषः प्रविचरतो महात्मनः १७ [ ४६७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

स तस्य मध्ये भवनस्य संस्थितो महद्विमानं मणिरत्नचित्रितम्। प्रतप्तजाम्बूनदजालकृत्रिमं ददर्श धीमान्पवनात्मजः कपिः १ तदप्रमेयाप्रतिकारकृत्रिमं कृतं स्वयं साध्विति विश्वकर्मणा। दिवं गते वायुपथे प्रतिष्ठितं व्यराजतादित्यपथस्य लक्ष्म तत् २ न तत्र किंचिन्न कृतं प्रयत्नतो न तत्र किंचिन्न महार्घरत्नवत्। न ते विशेषा नियताः सुरेष्वपि न तत्र किंचिन्न महाविशेषवत् ३ तपःसमाधानपराक्रमार्जितं मनःसमाधानविचारचारिणम्। अनेकसंस्थानविशेषनिर्मितं ततस्ततस्तुल्यविशेषनिर्मितम् ४ मनः समाधाय तु शीघ्रगामिनं दुरासदं मारुततुल्यगामि च। महात्मनां पुण्यकृतां महर्द्धिनां यशस्विनामग्र्यमुदामिवालयम् ५ विशे-

---

ज्याच्या मनाला चांगलें वळण लागलेलें आहे असा तो सन्मार्गवर्ती महात्मा हनुमान् लक्ष्य लावून संचार करीत असतांनाही जनककन्या जेव्हां त्याच्या दृष्टीं पडेना तेव्हां त्याच्या मनाला अतिशय दुःख झालें १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

तो बुद्धिमान् वायुपुत्र हनुमान् त्या रावणाच्या गृहासमीप बसला असतांना त्या गृहामध्यें एक मोठें विमान त्यानें अवलोकन केलें. तें विमान उत्कृष्ट रत्नांनीं व्याप्त होतें आणि उत्कृष्ट सुवर्णाच्या खिडक्या त्यांत केलेल्या होत्या १. अप्रतिम चित्रांनीं वगैरे सुशोभित केलेलें, विश्वकर्म्यानें स्वतः निर्माण केलेलें आणि आकाशगामी वायुमार्गामध्यें लटकत असलेलें तें विमान सूर्याच्या मार्गाचें चिन्हच होऊन राहिलेलें होतें २. प्रयत्नपूर्वक न केलेलें, अमूल्य रत्नें नसलेलें आणि उत्कृष्ट गुण ज्यांत नाहींत असें त्यांत कांहींएक नव्हतें व त्यांत ज्या विशिष्ट गोष्टी होत्या त्यांचा देवांचे ठिकाणींही अभाव होता ३. तप आणि समाधि ह्यांच्या योगानें प्राप्त झालेल्या पराक्रमानें तें विमान रावणानें संपादन केलेलें होतें; आंत बसणाऱ्याच्या मनास वाटेल त्या प्रदेशांत संचार करण्यास तें समर्थ होतें; नानाप्रकारच्या रचना त्यांत केलेल्या होत्या, आणि भिन्न भिन्न ठिकाणीं असलेल्या सर्व कांहीं विशेष गोष्टी त्यामध्यें बसविलेल्या होत्या ४. वजनाच्या इच्छेप्रमाणें तें शीघ्र गमन करणारें होतें; पापी जनांना तें लभ्य होणें दुष्कर होतें; गमनामध्यें तें वायूशीं बरोबरी करणारें होतें आणि महात्मे, पुण्यवंत, कीर्तिमान् व अत्यंत सुखी अशा पुण्यवान् लोकांनाच मिळणारें तें

समालम्ब्य विशेषसंस्थितं विचित्रकूटं बहुकूटमण्डितम् । मनोभिरामं शरदिन्दुनिर्मलं विचित्रकूटं शिखरं गिरेर्यथा ६ वहन्ति यत्कुण्डलशोभिताननाः महाशना व्योमचरा निशाचराः । विवृत्तविध्वस्तविशाललोचना महाजवा भूतगणाः सहस्रशः ७ वसन्तपुष्पोत्करचारुदर्शनं वसन्तमासादपि चारुदर्शनम् । स पुष्पकं तत्र विमानमुत्तमं ददर्श तद्वानरवीरसत्तमः ८ [ ४३८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

तस्यालयवरिष्ठस्य मध्ये विमलमायतम् । ददर्श भवनश्रेष्ठं हनुमान्मारुतात्मजः १ अर्धयोजनविस्तीर्णमायतं योजनं महत् । भवनं राक्षसेन्द्रस्य बहुप्रासादसंकुलम् २ मार्गमाणस्तु वैदेहीं सीतामायतलोचनाम् । सर्वतः परिचक्राम हनूमानरिसूदनः ३ उत्तमं राक्षसावासं हनूमानवलो-

---

पात्र होतें ५. विशिष्ट गतीचें अवलंबन करून तें विमान राहिलेलें होतें; आकाशरूप विशेष प्रदेशामध्यें तें ठेविलेलें होतें; आश्चर्यकारक वस्तूंच्या समुदायाचें तें एक भांडारच होतें; नानाप्रकारच्या दालनांनीं तें भूषित केलेलें होतें; पहाणाऱ्याचें मन तें रमविणारें होतें; शरदृतूंतील चंद्राप्रमाणें तें निर्मल होतें आणि आश्चर्यकारक वस्तूंनीं भरलेलें पर्वताचें शिखरच कीं काय असें तें भासत होतें ६ कुंडलांच्या योगानें ज्यांचीं मुखें सुशोभित झालेलीं आहेत आणि पापणीही न हालणारे असे विशाल व तारवटलेले डोळे ज्यांचे आहेत अशा प्रकारचे बहुभक्षक, महावेगवान्, आकाशगामी व निशाचर असे हजारों भूतगण त्याचे वाहक होते ७. असो. त्या वानरवीरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या हनुमानानें अशा प्रकारचें उत्कृष्ट पुष्पक विमान जें तेथें अवलोकन केलें तें वसंतऋतूंतील शोभेपेक्षांही दिसण्यांत मनोहर होतें आणि वसंतऋतूंतील पुष्पसमुदायांच्या योगानें त्याची आकृति तर फारच सुंदर झालेली होती ८. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

लंकेच्या मध्यभागीं असलेलें आणि गृहसमुदायांनीं व्याप्त झालेलें जें मोठें गृह त्यामध्यें निर्मल आणि विस्तीर्ण असें एक उत्कृष्ट गृह वायुपुत्र हनुमानानें अवलोकन केलें १. तें गृह राक्षसाधिपति रावणाचें असून अनेक राजवाड्यांनीं घेरलेलें होतें आणि त्या प्रचंड गृहाची रुंदी अर्धे योजन असून लांबी एक योजन होती २. दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली विदेहराजकन्या सीता शोधण्याकरितां शत्रुनाशक हनुमान् चोहोंकडे फिरला ३. तेव्हां फिरतां फिरतां राक्षसांचेंच ज्यामध्यें वास्तव्य आहे

कयन् । आससादाथ लक्ष्मीवान्राक्षसेन्द्रनिवेशनम् ४ चतुर्विषाणैर्द्विरदै-
स्त्रिविषाणैस्तथैव च । परिक्षिप्तमसंबाधं रक्ष्यमाणमुदायुधैः ५ राक्षसी-
भिश्च पत्नीभी रावणस्य निवेशनम् । आहृताभिश्च विक्रम्य राजकन्या-
भिरावृतम् ६ तन्नक्रमकराकीर्णं तिमिङ्गिलझषाकुलम् । वायुवेगसमाधूतं
पन्नगैरिव सागरम् ७ या हि वैश्रवणे लक्ष्मीर्या चन्द्रे हरिवाहने । सा
रावणगृहे रम्या नित्यमेवानपायिनी ८ या च राज्ञः कुबेरस्य यमस्य
वरुणस्य च । तादृशी तद्विशिष्टा वा ऋद्धी रक्षोगृहेष्विह ९ तस्य हर्म्यस्य
मध्यस्थवेश्म चान्यत्सुनिर्मितम् । बहुनिर्यूहसंयुक्तं ददर्श पवनात्मजः १०
ब्रह्मणोर्थे कृतं दिव्यं दिवि यद्विश्वकर्मणा । विमानं पुष्पकं नाम सर्वर-
त्नविभूषितम् ११ परेण तपसा लेभे यत्कुबेरः पितामहात् । कुबेरमो-
जसा जित्वा लेभे तद्राक्षसेश्वरः १२ ईहामृगसमायुक्तैः कार्तस्वरहिर-
ण्मयैः । सुकृतै राजितं स्तम्भैः प्रदीप्तमिव च श्रिया १३ मेरुमन्दरसंका-

असें उत्तम उत्तम घर तो हनुमान टिपीत चालला असतां शेवटीं राक्षसाधिपति रावणाचेंही तें घर त्या भव्य हनुमानाला लागलें ४. चार, तीन व दोन दांतांनीं युक्त असलेले गज जरी तेथें भरलेले होते तथापि त्या घरांत खेंचाखेंच झालेली नव्हती आणि हातामध्यें आयुधें सज्ज ठेवून राक्षस त्याचें रक्षण करीत होते ५. राक्षसजातीय भार्या आणि पराक्रमानें जिंकून आणिलेल्या राजकन्या ह्यांच्या योगानें तें रावणाचें गृह व्याप्त झालेलें होतें ६. सारांश, नक्र, मकर, तिमिंगिल व इतरही मत्स्य ह्यांनीं व्याप्त, वायुवेगानें क्षुब्ध आणि भुजंगांनीं युक्त अशा सागराप्रमाणें तें दिसत होतें ७. कुबेर, चंद्र आणि गरुड ह्यांचे ठिकाणीं जी शोभा आहे ती मनोहर शोभा कधींही नष्ट न होतां रावणाचें घरीं नित्य होती ८ आणि लंकेंतील राक्षसांच्या गृहांमध्यें असलेली संपत्ति राजा कुबेर, यम आणि वरुण ह्यांच्या संपत्तीप्रमाणें होती इतकेंच नव्हे परंतु, किंबहुना जास्तही होती ९. त्या गृहाचे मध्यभागीं उत्कृष्ट रीतीनें तयार केलेलें आणि अनेक मत्त गजांनीं युक्त असलेलें विमान वायुपुत्र हनुमानानें अवलोकन केलें १०. तें पुष्पकनामक विमान सर्व रत्नांनीं भूषित झालेलें होतें व तें दिव्य विमान पूर्वीं विश्वकर्म्यानें स्वर्गामध्यें ब्रह्मदेवाकरितां तयार केलेलें होतें ११. तें विमान ब्रह्मदेवापासून कुबेराला पराकाष्ठेच्या तपश्चर्येनें प्राप्त झालें होतें; परंतु, राक्षसाधिपति रावणानें तर तें पराक्रमानें कुबेराला जिंकूनच प्राप्त करून घेतलेलें होतें १२. लांडगे ज्यावर काढलेले आहेत अशा सोन्यारुप्यांच्या उत्कृष्ट स्तंभांनीं तें विमान झळकत असून कांतीनें जसें कांहीं पेटलेलेंच होतें १३. मेरुमंदरतुल्य गगनचुंबित अद्भुत गृहांनीं आणि शुभ अशा

शैलश्लिष्टाद्रिरिवाम्बरम् । कूटागारैः शुभागारैः सर्वतः समलंकृतम् १४
ज्वलनार्कप्रतीकाशैः सुकृतं विश्वकर्मणा । हेमसोपानयुक्तं च चारुप्रव-
रवेदिकम् १५ जालवातायनैर्युक्तं काञ्चनैः स्फाटिकैरपि । इन्द्रनील-
महानीलमणिप्रवरवेदिकम् १६ विद्रुमेण विचित्रेण मणिभिश्च महाधनैः ।
निस्तुलाभिश्च मुक्ताभिस्तलेनाभिविराजितम् १७ चन्दनेन च रक्तेन
तपनीयनिभेन च । सुपुण्यगन्धिना युक्तमादित्यतरुणोपमम् ॥ विमानं पुष्पकं
दिव्यमारुरोह महाकपिः १८ तत्रस्थः सर्वतो गन्धं पानभक्ष्यान्नसंभवम् ।
दिव्यं संमूर्छितं जिघ्रन्रूपवन्तमिवानिलम् १९ स गन्धस्तं महासत्त्वं
बन्धुर्बन्धुमिवोत्तमम् । इत एहीत्युवाचेव तत्र यत्र स रावणः २०
ततस्तां प्रस्थितः शालां ददर्श महतीं शिवाम् । रावणस्य महाकान्तां
कान्तामिव वरस्त्रियम् २१ मणिसोपानविकृतां हेमजालविराजिताम् ।
स्फाटिकैरावृततलां दन्तान्तरितरूपिकाम् २२ मुक्तावज्रप्रवालैश्च रूप्य-

---

विहारगृहांनीं तें विमान सर्व बाजूंनीं अलंकृत केलेलें होतें १४. विश्वकर्म्यानें उत्तम रीतीनें तयार केलेलें तें विमान सूर्य व अग्नि ह्यांच्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या सुवर्णमय व स्फटिकमय जाळ्यांनीं व खिडक्यांनीं युक्त होतें; सोन्याचे जिने त्यांत केलेले होते; सुंदर आणि श्रेष्ठ अशा बसावयाच्या जागा त्यांत तयार केलेल्या होत्या आणि इंद्रनील महानील व इतरही श्रेष्ठ रत्नें ह्यांच्याही जागा त्यांत बसविलेल्या होत्या १५, १६. नानाप्रकारचीं पोंवळीं, महामूल्यवान् रत्नें व निरुपम मोत्यें ह्यांच्या योगानें तयार केलेल्या फरशीनें तें विमान झळकत होतें १७. आरक्तवर्ण आणि सुवर्णवर्ण अशा अत्यंत सुगंधी चंदनानें तें युक्त असून बालसूर्याप्रमाणें तेजस्वी होतें. अशा प्रकारच्या दिव्य पुष्पकविमानामध्यें तो महाकपि हनुमान् आरूढ झाला १८ व ह्याप्रमाणें त्या विमानांत आरूढ झालेला तो हनुमान् पान- भक्ष्य व अन्न एतद्विषयक, दिव्य व मूर्तिमान् वायुच कीं काय अशारीतीनें सर्व प्रदेशांत व्याप्त होऊन राहिलेला गंध सर्व बाजूंनीं घेऊं लागला १९. ज्याप्रमाणें एखादा बंधु दुसऱ्या आपल्या उत्कृष्ट बंधूला हाक मारीत असतो त्याप्रमाणें तो गंध त्या महावीर्यवान् हनुमानाला इकडे ये म्हणून जिकडे रावण होता तिकडे जसा कांहीं हाकच मारूं लागला. ( सारांश, दिव्य गंधामुळें रावणाचें शयनगृह येथेंच कोठें तरी असावें अशी हनुमानानें अटकळ केली ) २०. तदनंतर तो हनुमान् तेथून निघाला असतां उत्कृष्ट स्त्रीप्रमाणें प्रिय असलेल्या अत्यंत रमणीय व विशाल अशा त्या रावणाच्या कल्याणकारक दिवाणखान्याकडे त्याचें लक्ष्य गेलें २१. त्या दिवाण-

चामीकरैरपि । विभूषितां मणिस्तम्भैः सुबहुस्तम्भभूषिताम् २३
समैर्ऋजुभिरत्युच्चैः समन्तात्सुविभूषितैः । स्तम्भैः पक्षैरिवात्युच्चैर्दिवं
संप्रस्थितामिव २४ महत्या कुशयास्तीर्णां पृथिवीलक्षणाङ्कया ।
पृथिवीमिव विस्तीर्णां सराष्ट्रगृहशालिनीम् २५ नादितां मत्तविहगै-
र्दिव्यगन्धाधिवासिताम् । परार्ध्यास्तरणोपेतां रक्षोधिपनिषेविताम् २६
धूम्रामगुरुधूपेन विमलां हंसपाण्डुराम् । पत्रपुष्पोपहारेण कल्मा-
षीमिव सुप्रभाम् २७ मनसो मोदजननीं वर्णस्यापि प्रसाधिनीम् ।
तां शोकनाशनीं दिव्यां श्रियः संजननीमिव २८ इन्द्रियाणी-
न्द्रियार्थैस्तु पञ्च पञ्चभिरुत्तमैः । तर्पयामास मातेव तदा रावणपा-
लिता २९ स्वर्गोऽयं देवलोकोऽयमिन्द्रस्यापि पुरी भवेत् । सिद्धिर्वेयं परा

---

खान्याला रत्नांचे जिनें विशेष रीतीनें केलेलें होतें; सुवर्णजालामुळें त्याला शोभा आलेली होती; स्फटिकांच्या योगानें त्यांतील भूमि मढविलेली होती; मध्यें मध्यें हस्तिदंत, मोत्यें, हिरे, पोंवळीं, रौप्य व सुवर्ण ह्यांचीं चित्रें बसविलेलीं होतीं; रत्नस्तंभांनीं तो भूषित असून इतरही पुष्कळ स्तंभांच्या योगानें त्याला सुशोभित केलेलें होतें २२,२३; सरळ, एकसारखे, अतिशय उंच आणि सर्व बाजूंनीं भूषित अशा स्तंभांनीं तो दिवाणखाना युक्त असल्यामुळें अतिशय उंच पक्षांच्या योगानें तो स्वर्गलोकीं जाण्यासच निघाला आहे कीं काय असा भासत होता २४. पृथ्वीवरील वस्तूंचीं रूपें हें चिन्ह ज्याच्यावर काढिलेलें आहे असा एक मोठा गालिच्या त्या, राष्ट्र व गृहें ह्यांनीं युक्त असलेल्या पृथ्वीसारिख्या, विस्तीर्ण दिवाणखान्यामध्यें पसरलेला होता २५; मत्त पक्ष्यांनीं तो नादित झालेला होता; दिव्य गंधांचा त्यांत जिकडे तिकडे घमघमाट सुटलेला होता; मोठ्या मोठ्या मूल्यवान् बैठकी त्यांत घातलेल्या होत्या; राक्षसाधिपति रावण त्यांत होता २६; वस्तुतः हंसपक्ष्याप्रमाणें शुभ्र व निर्मल असूनही कृष्णागुरूचा धूप जळत असल्यामुळें तो धूम्रवर्ण बनलेला होता आणि पत्रें व पुष्पें ह्यांची तेथें समृद्धि असल्यामुळें वसिष्ठांच्या चित्रविचित्रवर्ण गायीप्रमाणें त्याची कांति उत्कृष्ट झालेली होती २७. आंत असणाऱ्याच्या देहाची कांति उत्कृष्ट करून त्याच्या मनाला आनंद देणारा, त्याचा शोक नाहींसा करणारा आणि वैभवाची दिव्य खाणच कीं काय असा भासणारा तो दिवाणखाना होता २८. (शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हा) उत्कृष्ट पांच विषयांच्या योगानें हनुमानाचीं पांचहीं ज्ञानेंद्रियें त्या रावणरक्षित दिवाणखान्यानें मातेप्रमाणें तृप्त केलीं असतां २९, " हा कां स्वर्गलोक आहे ? कां देवलोक आहे ? किंवा इंद्राची अमरावती नगरी आहे ? अथवा ही कांहीं पराका-

हि स्यादित्यमन्यत मारुतिः ३० प्रध्यायत इवापश्यत्प्रदीपांस्तत्र काञ्च-
नान् । धूर्तानिव महाधूर्तैर्देवनेन पराजितान् ३१ दीपानां च प्रकाशेन
तेजसा रावणस्य च । अर्चिर्भिर्भूषणानां च प्रदीप्तेत्यभ्यमन्यत ३२ ततो-
पश्यत्कुथासीनं नानावर्णाम्बरस्रजम् । सहस्रं वरनारीणां नानावेषवि-
भूषितम् ३३ परिवृत्तेर्धरात्रे तु पाननिद्रावशंगतम् । क्रीडित्वोपरतं
रात्रौ प्रसुप्तं बलवत्तदा ३४ तत्प्रसुप्तं विरुरुचे निःशब्दान्तरभूषितम् ।
निःशब्दहंसभ्रमरं यथा पद्मवनं महत् ३५ तासां संवृतदान्तानि मीलि-
ताक्षीणि मारुतिः । अपश्यत्पद्मगन्धीनि वदनानि सुयोषिताम् ३६ प्रबु-
द्धानीव पद्मानि तासां भूत्वा क्षपाक्षये । पुनः संवृतपत्राणि रात्राविव
बभुस्तदा ३७ इमानि मुखपद्मानि नियतं मत्तषट्पदाः । अम्बुजानीव
फुल्लानि प्रार्थयन्ति पुनः पुनः ३८ इति वामन्यत श्रीमानुपपत्त्या महाकपिः ।
मेने हि गुणतस्तानि समानि सलिलोद्भवैः ३९ सा तस्य शुशुभे शाला

---

इची गंधर्वमाया आहे ? " असें मारुतीला वाटूं लागलें ३०. तदनंतर तेथें असलेले सुवर्णदीप, अट्टल जुगारांनीं जुगारींनं जिंकल्यामुळें विचार करीत बसलेल्या जुगाराप्रमाणें, त्यानें अवलोकन केले ३१ आणि दीपांचा प्रकाश, रावणाचें तेज व भूषणांच्या प्रभा यांच्या योगानें तो दिवाणखाना त्याला जसा कांहीं पेटलेलाच भासूं लागला ३२. नंतर अनेकवर्णांचीं वस्त्रं व माला धारण करून नानाप्रकारचे वेष व भूषणें धारण केलेल्या हजार उत्कृष्ट स्त्रिया गालिच्यावर निजलेल्या त्याच्या दृष्टीं पडल्या ३३. मध्यरात्रीचा समय झाल्यावर मद्यपान आणि निद्रा यांच्या अधीन झालेल्या त्या स्त्रिया रात्रीं क्रीडा करून श्रमल्यामुळें फारच गाढ निद्रिस्थ झालेल्या होत्या ३४. त्या हजार स्त्रियांना गाढ झोंप लागली असल्यामुळें त्यांच्या नूपुरप्रभृति भूषणांचा ध्वनि अगदीं बंद पडलेला होता आणि ह्यामुळें शब्दरहित हंस व भ्रमर ज्यामध्यें आहेत अशा प्रचंड पद्मवनाप्रमाणें तो स्त्रीसमुदाय शोभत होता ३५. त्या उत्कृष्ट स्त्रियांचीं मारुतीनं अवलोकन केलेलीं मुखें कमलगंधानें युक्त होतीं; कांहीं मुखांवरील नेत्र अर्धवट मिटलेले असून तीं ग्लानी आल्यासारिखीं दिसत होतीं आणि कांहीं मुखांवरील नेत्र पूर्णपणें मिटलेले होते ३६. त्या स्त्रियांचीं मुखें रात्र उजाडल्यावर कमलांप्रमाणें विकसित होऊन पुनरपि रात्र पडली असतां पाकळ्या मिटलेल्या कमलांप्रमाणें मिटत होतीं ३७. प्रफुल्लित कमलांची ज्याप्रमाणें मत्त भ्रमर वारंवार इच्छा करीत असतात त्याप्रमाणें ते एकसारखे ह्या मुखकमलांची इच्छा करीत आहेत ३८ असेंही त्या भव्य महाकपीला कमलांशीं त्यांचें साम्य दिसून आल्यामुळें वाटूं लागलें आणि

ताभिः स्त्रीभिर्विराजिता । शरदीव प्रसन्ना द्यौस्ताराभिरभिशोभिता ४०
स च ताभिः परिवृतः शुशुभे राक्षसाधिपः । यथा ह्युडुपतिः श्रीमांस्ता-
राभिरिव संवृतः ४१ याश्च्यवन्तेम्बरात्ताराः पुण्यशेषसमावृताः । इमास्ताः
संगताः कृत्स्ना इति मेने हरिस्तदा ४२ ताराणामिव सुव्यक्तं महतीनां
शुभार्चिषाम् । प्रभावर्णप्रसादाश्च विरेजुस्तत्र योषिताम् ४३ व्यावृत्तक-
चपीनस्रक्प्रकीर्णवरभूषणाः । पानव्यायामकालेषु निद्रापहतचेतसः ४४
व्यावृत्ततिलकाः काश्चित्काश्चिदुद्भ्रान्तनूपुराः । पार्श्वे गलितहाराश्च
काश्चित्परमयोषितः ४५ मुक्ताहारवृताश्चान्याः काश्चित्प्रस्रस्तवाससः ।
व्याविद्धरशनादामाः किशोर्य इव वाहिताः ४६ अकुण्डलधराश्चान्या
विच्छिन्नमृदितस्रजः । गजेन्द्रमृदिताः फुल्ला लता इव महावने ४७
चन्द्रांशुकिरणाभाश्च हाराः कासांचिदुद्गताः । हंसा इव बभुः सुप्ताः

---

गुणांमध्येंही तीं कमलांचीच बरोबरी करणारीं आहेत असें त्या हनुमानाचें मत झालें ३९. असो. शरदृतूमध्यें निर्मल झालेलें नभोमंडल ज्याप्रमाणें तारागणांनीं सुशोभित दिसतें त्याप्रमाणें त्या रावणाची ती शयनशाला त्या स्त्रियांच्या योगानें सुशोभित झालेली होती ४०. नक्षत्राधिपति श्रीमान् चंद्रमा तारांच्या योगानें व्याप्त झाला असतां जसा शोभतो तसा तो राक्षसाधिपति रावण त्या स्त्रियांनीं परिवेष्टित झाला असल्यामुळें शोभूं लागला ४१. ज्या तारा आकाशापासून च्युत होत असतात त्याच ह्या, परंतु कांहीं पुण्यांश शिलक असल्यामुळें, सर्व एकत्र जमलेल्या आहेत असें त्या वानराला वाटलें ४२. कारण, त्या ठिकाणीं ज्या स्त्रिया होत्या त्यांची देहकांति, रूप आणि उज्ज्वलता हीं उत्कृष्ट कांतीनें युक्त असलेल्या मोठ्या तारांप्रमाणें फारच स्पष्ट रीतीनें झळकत होतीं ४३. पान आणि गायनप्रभृति क्रीडा चालल्या असतांना निद्रेनें घेरून गेलेल्या त्या स्त्रियांचे केश आणि भव्य माला इकडे तिकडे उडवल्या असून त्यांच्या अंगावरील श्रेष्ठ श्रेष्ठ भूषणेंही अस्ताव्यस्त झालेलीं होतीं ४४. कांहीं उत्कृष्ट स्त्रियांचे तिलक नाहींसे झाले होते; कांहींच्या पायांतील तोरड्या गळून गेलेल्या होत्या आणि कांहींच्या कंठांतील हारही बाजूला पडले होते ४५. कांहींच्या गळ्यांतील मोत्यांचे हार तुटलेले होते; कांहींचीं वस्त्रें गळालेलीं होतीं आणि कमरपट्टे अस्ताव्यस्त झाले असल्यामुळें कांहीं, भार वाहून थकलेल्या घोड्यांप्रमाणें अस्ताव्यस्त लोळत पडल्यासारख्या दिसत होत्या ४६. कांहींचीं कुंडलें जाग्यावर नव्हतीं; कांहींच्या माळा चुरगळून तुटून गेलेल्या होत्या आणि त्यामुळें त्या स्त्रिया गजेंद्रांनीं तुडविलेल्या महावनांतील प्रफुल्लित लतांप्रमाणें दिसत होत्या ४७. चंद्राच्या लहान मोठ्या

स्तनमध्येषु योषिताम् ४८ अपरासां च वैदूर्याः कादम्बा इव पक्षिणः ।
हेमसूत्राणि चान्यासां चक्रवाका इवाभवन् ४९ हंसकारण्डवोपेताश्चक्र-
वाकोपशोभिताः । आपगा इव ता रेजुर्जघनैः पुलिनैरिव ५० किङ्कि-
णीजालसंकाशास्ता हेमविपुलाम्बुजाः । भावग्राहा यशस्तीराः सुप्ता
नद्य इवाबभुः ५१ मृदुष्वङ्गेषु कासांचित्कुचाग्रेषु च संस्थिताः । बभूवु-
र्भूषणानीव शुभा भूषणराजयः ५२ अंशुकान्ताश्च कासांचिन्मुखमारुत-
कम्पिताः । उपर्युपरि वक्त्राणां व्याधूयन्ते पुनः पुनः ५३ ताः पताका
इवोद्धूताः पत्नीनां रुचिरप्रभाः । नानावर्णसुवर्णानां वक्त्रमूलेषु रेजिरे ५४
ववल्गुश्चात्र कासांचित्कुण्डलानि शुभार्चिषाम् । मुखमारुतसंकम्पैर्मन्दं
मन्दं च योषिताम् ५५ शर्करासवगन्धः स प्रकृत्या सुरभिः सुखः । तासां
वदननिःश्वासः सिषेवे रावणं तदा ५६ रावणाननशङ्काश्च काश्चिद्रा-

---

र्किरणांप्रमाणें ज्यांची प्रभा आहे असे कांहीं स्त्रियांच वर आलेले मोत्यांचे हार त्या स्त्रियांच्या स्तनांमध्यें निद्रिस्थ झालेल्या हंसाप्रमाणें शोभूं लागले ४८. दुसऱ्या स्त्रियांच्या वैदूर्यरत्नमाला स्तनांच्या मध्यभागीं आल्या असल्यामुळें बदकांप्रमाणें दिसत होत्या आणि इतर स्त्रियांच्या कंठांतील सोन्याचे पदर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणें दिसत होते ४९. हंस, कारंडव आणि चक्रवाक ह्या पक्ष्यांनीं सुशोभित झालेल्या नद्या ज्याप्रमाणें वाळवंटामुळें झळकत असतात त्याप्रमाणें त्या स्त्रिया कटिप्रदेशामुळें चमकत होत्या ५०. घुंगुरांप्रमाणें ज्यांचे डोळे मिटलेले आहेत अशा त्या स्त्रिया निद्रिस्थ झालेल्या नद्याच कीं काय अशा दिसत होत्या. कारण, सुवर्णभूषणरूप असंख्य कमलांनीं, स्वप्नविषयकसुरतक्रीडारूप मकरांनीं आणि कांतिरूप तीरांनीं त्या युक्त होत्या ५१. कांहीं स्त्रियांच्या कोमल अवयवांचे ठिकाणीं आणि कांहींच्या स्तनाग्रांचे ठिकाणीं गडबडीमध्यें उठलेले भूषणाचे ओरखडेही उत्कृष्ट भूषणांप्रमाणेंच शोभूं लागले ५२. कांहींच्या वस्त्रांचे पदर मुखांतील वायूनें कंपित होत असल्यामुळें मुखाच्या वर वर वारंवार उडतच राहिलेले होते ५३. ह्यामुळें रावणभार्यांच्या मुखांसमीप नानाप्रकारच्या सुवर्णतंतूंनीं बनविलेल्या वस्त्रांच्या उत्कृष्ट तेजस्वी पताकाच फडफडत आहेत कीं काय असे ते वस्त्रांचे पदर झळकूं लागले ५४. उत्कृष्ट कांतीनें युक्त असलेल्या कांहीं स्त्रियांचीं कुंडलें मुखवायूच्या संपर्कामुळें हलूं लागून हळूं हळूं वाजूं लागलीं ५५. त्यांच्या मुखांतून बाहेर पडणारा निःश्वास शर्करासवाच्या गंधानें युक्त असून स्वभावतःच सुगंधी व सुखावह होता आणि तो रावणाची सेवा करीत होता. (सारांश, त्यांच्या मुखांपासून निघालेला सुगंधी व सुखावह वायु

वणयोषितः । मुखानि च सपत्नीनामुपाजिघ्रन्पुनः पुनः ५७ अत्यर्थं सक्तमनसो रावणे ता वरस्त्रियः । अस्वतन्त्राः सपत्नीनां प्रियमेवाचरंस्तदा ५८ बाहू उपनिधायान्याः पारिहार्यविभूषिताः । अंशुकानि च रम्याणि प्रमदास्तत्र शिश्यिरे ५९ अन्या वक्षसि चान्यस्यास्तस्याः काचित्पुनर्भुजम् । अपरा त्वङ्कमन्यस्यास्तस्याश्चाप्यपरा कुचौ ६० ऊरुपार्श्वकटीपृष्ठमन्योन्यस्य समाश्रिताः । परस्परनिविष्टाङ्ग्यो मदस्नेहवशानुगाः ६१ अन्योन्यस्याङ्गसंस्पर्शात्प्रीयमाणाः सुमध्यमाः । एकीकृतभुजाः सर्वाः सुषुपुस्तत्र योषितः ६२ अन्योन्यभुजसूत्रेण स्त्रीमाला ग्रथिता हि सा । मालेव ग्रथिता सूत्रे शुशुभे मत्तषट्पदा ६३ लतानां माधवे मासि फुल्लानां वायुसेवनात् । अन्योन्यमालाग्रथितं संसक्तकु-

रावणाकडे जात होता ) ५६. ( मद्यपानाचा मद आणि निद्रा ह्यांनीं घेरून गेलेल्या ) कांहीं रावणस्त्रिया रावणाचींच मुखें आहेत असें समजून वारंवार आपल्या सवतींच्याही मुखांचा वास घेऊं लागल्या ५७. तेव्हां रावणाचे ठिकाणीं मन अतिशय आसक्त झालें असल्यामुळें सर्वस्वीं परतंत्र बनलेल्या उत्कृष्ट स्त्रियाही ( सवतींनीं आपल्या मुखांचा वास घेतल्यामुळें क्रुद्ध न होतां त्या ) सवतींचें प्रियच करूं लागल्या; ( तात्पर्य, त्याही निद्रेनें व मद्यपानजन्य मदानें घेरल्या असल्यामुळें रावणच आपल्या मुखांचा वास घेत आहे असें समजून उलट त्या सवतींच्या मुखांचा वास घेऊं लागल्या व त्या सवतीही रावणच आपल्या मुखांचा वास घेत आहे असें समजूं लागल्या ) ५८. मोट, तोडे वगैरे अलंकार धारण केलेल्या दुसऱ्या कांहीं तरुण स्त्रिया उशाला हात घेऊन तेथें निजल्या होत्या आणि कांहीं उशाखालीं वस्त्रें घेऊन निजल्या होत्या ५९. एक दुसरीच्या वक्षस्थलावर शयन करीत आहे, तिचा हात उशाशीं घेऊन दुसरीच कोणी निजली आहे, एक दुसरीच्या मांडीवर डोकें ठेवून झोंप घेत आहे आणि तिच्याही स्तनावर पडून दुसरी शयन करीत आहे ६० अशा रीतीनें एकमेकींच्या मांड्यांवर, बरगड्यांवर, कमरेवर आणि पाठीवर मस्तक ठेवून पडलेल्या त्या स्त्रिया मद व रावणसंबंधीं प्रेम ह्यांच्या अधीन झाल्या असल्यामुळें एकमेकींच्या अंगावर पडल्या होत्या ६१. एकमेकींच्या अंगसंगामुळें आनंदित होणाऱ्या त्या सर्वही अत्यंत सुंदर स्त्रिया हातांनीं एकमेकींना आलिंगन देऊन तेथें शयन करीत होत्या ६२. एकमेकींच्या हस्तरूप दोऱ्यांनीं ग्रथित झालेली ती स्त्रियांची माला, सूत्रामध्यें ग्रथित केलेली पुष्पमाला मत्त भ्रमरांनीं युक्त झाली असतां जशी शोभते तशी शोभूं लागली ६३. रावणाच्या स्त्रियांचा तो समुदाय, वैशाखमासामध्यें

सुमोच्चयम् ६४ प्रतिवेष्टितसुस्कन्धमन्योन्यभ्रमराकुलम् । आसीद्वनमिवोद्धूतं स्त्रीवनं रावणस्य तत् ६५ उचितेष्वपि सुव्यक्तं न तासां योषितां तदा । विवेकं शक्यमाधातुं भूषणाङ्गाम्बरस्रजाम् ६६ रावणे सुखसंविष्टे ताः स्त्रियो विविधप्रभाः । ज्वलन्तः काञ्चना दीपाः प्रेक्षन्तोनिमिषा इव ६७ राजर्षिविप्रदैत्यानां गन्धर्वाणां च योषितः । रक्षसां चाभवन्कन्यास्तस्य कामवशंगताः ६८ युद्धकामेन ताः सर्वा रावणेन हृताः स्त्रियः । समदा मदनेनैव मोहिताः काश्चिदागताः ६९ न तत्र काश्चित्प्रमदाः प्रसह्य वीर्योपपन्नेन गुणेन लब्धाः । न चान्यकामापि न चान्यपूर्वा विना वरार्हां जनकात्मजां तु ७० न चाकुलीना न च

---

वायूच्या संपर्कामुळें प्रफुल्लित झालेल्या लतांच्या वनाप्रमाणें दिसत होता. कारण, एकमेकींचा संबंध झाला असल्यामुळें माळी ज्याप्रमाणें माला गुंफितो त्याप्रमाणें त्या स्त्रियांची एक मालाच गुंफिल्यासारखी दिसत होती; त्यांच्या अंगावरील भूषणसमुदाय हेच त्या वनांतील परस्पर संलग्न झालेल्या पुष्पराशींप्रमाणें दिसत होते; वल्लभांच्या स्कंधांभोंवतीं त्यांनीं आपल्या भुजांचें आलिंगन दिलें असल्यामुळें वृक्षाला वेष्टन करून राहिलेल्या लतांप्रमाणें त्या शोभत होत्या आणि एकमेकींचे केशपाश वगैरे एकमेकींवर पडले असल्यामुळें त्या भ्रमरांनीं भरून गेलेल्या लतांप्रमाणें भासतही होत्या ६४,६५. त्या स्त्रियांचीं भूषणें वगैरे जरी प्रथम योग्य ठिकाणीं चांगल्या रीतीनें व्यवस्थित घातलेलीं होतीं तरी त्या निद्रेच्या वगैरे अधीन झाल्यामुळें भूषणें, अवयव, आणि माला हिच्या कोणत्या आणि तिच्या कोणत्या हें स्पष्टपणें ठरविणें अशक्य झालें होतें ६६. रावण सुखानें निजला असतांना त्या दिवाणखान्यामध्यें जळत असलेले सुवर्णदीप, डोळ्यांचें पातें न लववितां त्या नानाप्रकारच्या कांतीनें युक्त असलेल्या, स्त्रियांकडे पहात बसलेले कांहीं पुरुषच आहेत कीं काय असे भासूं लागले ६७. राजर्षि, विप्र, दैत्य, गंधर्व आणि राक्षस ह्यांच्या कन्या मदनाधीन होऊन त्या रावणाच्या भार्या झालेल्या होत्या ६८. युद्धाची इच्छा धरणाऱ्या रावणानें त्यांपैकीं पुष्कळ स्त्रिया युद्धामध्यें हरण करून आणिलेल्या होत्या आणि मदनानेंच मोहित झाल्यामुळें कांहीं तरुणी स्त्रिया आपोआपच त्याच्याकडे आलेल्या होत्या ६९. सारांश, रावण जरी सामर्थ्यवान् होता तरी त्यांतील कांहीं तरुणी स्त्रिया त्यानें बलात्कारानें आणिलेल्या नसून ऐश्वर्यप्रभृति गुण त्याचे अंगीं असल्यामुळें त्याला त्या आपोआपच प्राप्त झालेल्या होत्या. प्रथमतः दुसऱ्यानें स्वीकारिलेली अशी एकही स्त्री त्यांमध्यें नसून श्रेष्ठ रामालाच पात्र अशा जनककन्या सीतेवांचून दुसऱ्याची इच्छा करणारीही स्त्री तेथें दुसरी कोणी

हीनरूपा नादक्षिणा नानुपचारयुक्ता । भार्याभवत्तस्य न हीनसत्त्वा न चापि कान्तस्य न कामनीया ७१ बभूव बुद्धिस्तु हरीश्वरस्य यदीदृशी राघवधर्मपत्नी। इमा महाराक्षसराजभार्याः सुजातमस्येति हि साधुबुद्धेः ७२ पुनश्च सोऽचिन्तयदार्तरूपो ध्रुवं विशिष्टा गुणतो हि सीता । अथायमस्यां कृतवान्महात्मा लंकेश्वरः कष्टमनार्यकर्म ७३ [ ५११ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे नवमः सर्गः ॥९॥

तत्र दिव्योपमं मुख्यं स्फाटिकं रत्नभूषितम् । अवेक्षमाणो हनुमान्ददर्श शयनासनम् १ दान्तकाञ्चनचित्राङ्गैर्वैदूर्यैश्च वरासनैः । महार्हास्तरणोपेतैरुपपन्नं महाधनैः २ तस्य चैकतमे देशे दिव्यमालोपशोभि-

---

नव्हती. ( सारांश, तेथें असलेल्या सर्वही स्त्रिया रावणाचे ठिकाणींच आसक्त होत्या आणि फक्त एक जनककन्या सीतेचें मात्र मन बिलकुल त्याच्यावर नसून रामाचेच ठिकाणीं आसक्त झालेलें होतें ) ७०. असो. त्या स्त्रियांमध्यें कुलीन नसलेली, कुरूप, दुःशील, उत्तम भूषणें–वस्त्रें वगैरे नसलेली, हलक्यामनाची आणि वल्लभाला अप्रिय अशी एकही त्या रावणाची भार्या नव्हती ७१. त्या स्त्रिया अवलोकन केल्यानंतर सद्बुद्धि वानराधिपति हनुमानाच्याही मनांत प्रथम "ह्या प्रचंड राक्षसराज रावणाच्या भार्या आहेत. तेव्हां ह्यांच्याप्रमाणें जर राघवाची धर्मपत्नी झाली असेल ( ह्मणजे तिलाही जर ह्यांच्याचप्रमाणें रावणाचा उपभोग घडला असेल) तर मात्र ह्या रावणाचें चांगलेंच झालें ह्मणावयाचें. ( कारण, रावणानें आपल्या पत्नीचा उपभोग घेतला असें रामाला कळल्यावर ती मेली असें समजून राम तिच्याविषयीं उदासीन राहील आणि तसें झालें असतां अर्थातच रावणाचा वध त्याच्या हातून होणार नाहीं )" असें आलें ७२; परंतु, नंतर लगेच "लंकाधिपति महात्मा रावणानें मायिकरूप धारण करून जरी सीतेच्या संबंधानें अपहार करण्याचें निंद्य अनार्य कर्म केलें आहे तरी गुणांनीं सीता इतर स्त्रियांपेक्षां निःसंशय अधिक आहे ( आणि ह्मणूनच रावणाचा तिला उपभोग घडण्याचा संभव नाहीं )" असेंही त्यानें आपल्या मनामध्यें निश्चित ठरविलें ७३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

त्या दिवाणखान्यामध्यें हनुमान् पाहूं लागला असतां दिव्यस्थानतुल्य असा एक पलंग ठेवण्याचा उत्कृष्ट चौरंग त्याच्या दृष्टीं पडला. तो चौरंग स्फटिकाचा असून रत्नांनीं भूषित केलेला होता १. त्या चौरंगावर स्त्रियांचे मोठे मोठे मूल्यवान् पलंग ठेविलेले होते. त्या पलंगांचे अवयव हस्तिदंती व सुवर्णाचे असे चित्रयुक्त केलेले असून

तम् । ददर्श पाण्डुरं छत्रं ताराधिपतिसंनिभम् ३ जातरूपपरिक्षिप्तं चित्रभानोः समप्रभम् । अशोकमालाविततं ददर्श परमासनम् ४ वालव्यजनहस्ताभिर्वीज्यमानं समन्ततः । गन्धैश्च विविधैर्जुष्टं वरधूपेन धूपितम् ५ परमास्तरणास्तीर्णमाविकाजिनसंवृतम् । दामभिर्वरमाल्यानां समन्तादुपशोभितम् ६ तस्मिञ्जीमूतसंकाशं प्रदीप्तोज्ज्वलकुण्डलम् । लोहिताक्षं महाबाहुं महारजतवाससम् ७ लोहितेनानुलिप्ताङ्गं चन्दनेन सुगन्धिना। संध्यारक्तमिवाकाशे तोयदं सतडिद्गुणम् ८ वृतमाभरणैर्दिव्यैः सुरूपं कामरूपिणम् । सवृक्षवनगुल्माढ्यं प्रसुप्तमिव मन्दरम् ९ क्रीडित्वोपरतं रात्रौ वराभरणभूषितम्। प्रियं राक्षसकन्यानां राक्षसानां सुखावहम् १० पीत्वाप्युपरतं चापि ददर्श स महाकपिः। भास्वरे शयने वीरं प्रसुप्तं राक्षसाधिपम् ११

---

वैडूर्यप्रभृति रत्नें जडलेलीं मोठीं मोठीं मूल्यवान् आस्तरणेंही त्यांच्यावर घातलेलीं होतीं २. त्या चौरंगावर एका बाजूला दिव्य मालांनीं सुशोभित आणि चंद्रासारिखें आल्हादकारक श्वेतवर्ण छत्र हनुमानानें अवलोकन केलें ३. नंतर त्याच चौरंगावर एके ठिकाणीं एक उत्कृष्ट पलंग त्याच्या दृष्टीं पडला. तो सुवर्णानें मढविलेला होता; त्याची प्रभा अग्नीप्रमाणें होती आणि अशोकपुष्पांच्या मालांनीं तो युक्त होता ४. हातांमध्यें चौऱ्या घेऊन स्त्रिया त्या पलंगासभोंवतीं वारीत उभ्या राहिल्या होत्या; नानाप्रकारच्या सुगंधांनीं तो पलंग युक्त होता आणि उत्कृष्ट प्रकारच्या धूपानें तो धुपविलेला होता ५. उत्कृष्ट आस्तरणें त्यावर पसरलेलीं होतीं; लोकरीचीं वस्त्रें आणि अजिनें ह्यांनीं तो व्याप्त झालेला होता आणि उत्कृष्ट पुष्पांच्या मालांनीं तो सर्व बाजूंनीं सुशोभित केलेला होता ६. त्या पलंगावर शयन करीत असलेला रावण त्यानें अवलोकन केला. तो मेघासारिखा दिसत होता; देदीप्यमान् व उज्ज्वल कुंडलें त्यानें धारण केलेलीं होतीं; त्याचे नेत्र आरक्तवर्ण होते; बाहु दीर्घ होते; सुवर्णतंतूंनीं निर्माण केलेलीं वस्त्रें त्यानें परिधान केलेलीं असल्यामुळें ७ आणि आरक्तवर्ण सुगंधी चंदन त्याच्या अंगाला चोपडला असल्यामुळें विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या आकाशांतील संध्याकाळच्या आरक्तवर्ण मेघाप्रमाणें तो दिसत होता ८; तो यथेष्ट रूप धारण करणारा व सौंदर्यसंपन्न असून दिव्य भूषणांनीं व्याप्त झाला असल्यामुळें वृक्षसमुदाय आणि झुडपें ह्यांनीं युक्त असलेला मंदरपर्वतच गाढ निद्रिस्थ झाला आहे कीं काय असा दिसत होता ९. उत्कृष्ट भूषणांनीं तो भूषित झालेला असून सुरतक्रीडा करून श्रांत झालेला होता; राक्षसकन्यांना तो प्रिय असून राक्षसांनाही सुखावह होता १० आणि मद्यपान करून व सुरतक्रीडा करून तो पडला होता. अशाप्रकारें महाकपि हनुमानानें त्याला अवलोकन केलें;

निःश्वसन्तं यथा नागं रावणं वानरोत्तमः । आसाद्य परमोद्विग्नः सोपा-
सर्पत्सुभीतवत् १२ अथारोहणमासाद्य वेदिकान्तरमाश्रितः । क्षीबं राक्ष-
सशार्दूलं प्रेक्षते स्म महाकपिः १३ शुशुभे राक्षसेन्द्रस्य स्वपतः शयनं
शुभम् । गन्धहस्तिनि संविष्टं यथा प्रस्रवणं महत् १४ काञ्चनाङ्गदसंनद्धौ
ददर्श स महात्मनः । विक्षिप्तौ राक्षसेन्द्रस्य भुजाविन्द्रध्वजोपमौ १५
ऐरावतविषाणाग्रैरापीडनकृतव्रणौ । वज्रोल्लिखितपीनांसौ विष्णुचक्रपरि-
क्षतौ १६ पीनौ समसुजातांसौ संगतौ बलसंयुतौ । सुलक्षणनखाङ्गुष्ठौ
स्वङ्गुलीयकलाक्षितौ १७ संवृतौ परिघाकारौ वृत्तौ करिकरोपमौ ।
विक्षिप्तौ शयने शुभ्रे पञ्चशीर्षाविवोरगौ १८ शशक्षतजकल्पेन सुशीतेन
सुगन्धिना । चन्दनेन परार्ध्येन स्वनुलिप्तौ स्वलंकृतौ १९ उत्तमस्त्रीवि-
मृदितौ गन्धोत्तमनिषेवितौ । यक्षपन्नगगन्धर्वदेवदानवराविणौ २० ददर्श

---

परंतु, उज्ज्वल पलंगावर निद्रिस्थ झालेल्या आणि भुजगाप्रमाणें निःश्वास टाकीत असलेल्या त्या वीरराक्षसाधिपति रावणाच्या समीप गेल्यानंतर तो वानरश्रेष्ठ हनुमान् अत्यंत उद्विग्न झाला व अतिशय भयभीत झाल्याप्रमाणें तो एकदम दूर झाला ११, १२. नंतर एका जिन्यावर चढून व त्याच्या मधल्या पायरीवर बसून तो महाकपि हनुमान् मत्त होऊन पडलेल्या राक्षसश्रेष्ठ रावणाकडे पाहूं लागला १३. मत्त गज नेहमीं ज्याच्या संनिध असतो अशा प्रचंड जलप्रवाहाप्रमाणें तें शयन करणाऱ्या राक्षसाधिपति रावणाचें शुभ शयनस्थान शोभत होतें १४. त्या हनुमानानें महात्म्या राक्षसाधिपति रावणाचें इंद्रध्वजतुल्य असे पसरलेले हात सुवर्णबाहुभूषणांनीं युक्त झालेले अवलोकन केले १५. युद्धामध्यें ऐरावत गजाच्या दंताग्रांनीं पडलेल्या क्षतांच्या खुणा त्यांच्यावर होत्या; इंद्राच्या वज्रामुळें त्यांच्या पुष्ट स्कंधांवर ओरखडे उठलेले होते; विष्णूच्या सुदर्शनचक्रामुळें पडलेल्या क्षतांच्याही खुणा त्यांच्यावर होत्या १६; ते बाहु जात्याच पुष्ट असून त्यांवरील स्कंध सारखे व उत्कृष्ट होते; त्या बाहूंचे ठिकाणीं बल असून त्यांचे स्नायुही दृढ होते; त्यांचीं नखें व अंगुष्ठ सुलक्षणांनीं युक्त होते; उत्कृष्ट उत्कृष्ट आंगठ्या त्या हातांत घातलेल्या होत्या १७; आच्छादित असलेल्या त्या बाहूंचा आकार अडसरांप्रमाणें असून गजशुंडेप्रमाणें ते वर्तुल होते; शुभ्र शय्येवर पसरले असल्यामुळें ते पंचमुखी नागांप्रमाणें दिसत होते १८; सशाच्या रक्ताप्रमाणें अत्यंत लाल, अतिशयच गार आणि फारच सुगंधी अशा महामूल्यवान् चंदनाची उटी त्यांना लाविलेली असून उत्तमप्रकारचे अलंकार त्यांवर घातलेले होते १९. उत्कृष्ट स्त्रियांचा आलिंगनादि संपर्क त्यांना झालेला होता; उत्तम उत्तम सुगंध त्यांना लाविलेले होते

स कपिस्तस्य बाहू शयनसंस्थितौ । मन्दरस्यान्तरे सुप्तौ महाही रुषिताविव २१ ताभ्यां स परिपूर्णाभ्यामुभाभ्यां राक्षसेश्वरः । शुशुभेचलसंकाशः शृङ्गाभ्यामिव मन्दरः २२ चूतपुंनागसुरभिर्बकुलोत्तमसंयुतः । मृष्टान्नरससंयुक्तः पानगन्धपुरःसरः २३ तस्य राक्षसराजस्य निश्चक्राम महामुखात् । शयानस्य विनिःश्वासः पूरयन्निव तद्गृहम् २४ मुक्तामणिविचित्रेण काञ्चनेन विराजता । मुकुटेनापवृत्तेन कुण्डलोज्ज्वलिताननम् २५ रक्तचन्दनदिग्धेन तथा हारेण शोभिना । पीनायतविशालेन वक्षसाभिविराजता २६ पाण्डुरेणापविद्धेन क्षौमेण क्षतजेक्षणम् । महार्हेण सुसंवीतं पीतेनोत्तरवाससा २७ माषराशिप्रतीकाशं निःश्वसन्तं भुजङ्गवत् । गाङ्गे महति तोयान्ते प्रसुप्तमिव कुञ्जरम् २८ चतुर्भिः काञ्चनैर्दीपैर्दीप्यमानं चतुर्दिशम् । प्रकाशीकृतसर्वाङ्गं मेघं विद्युद्गणैरिव २९

---

आणि यक्ष, पन्नग, गंधर्व, देव व दानव ह्यांना ते भय उत्पन्न करणारे होते २०. असो. अशाप्रकारचे त्या रावणाचे शय्येवर असलेले बाहु मंदरपर्वताच्या गुहेमध्यें अंगाला उटी लावून निद्रिस्थ झालेल्या महासर्पाप्रमाणें त्या कपीनें अवलोकन केले २१. त्या सर्व गुणांनीं परिपूर्ण असलेल्या उभयतां बाहूंच्या योगानें तो पर्वततुल्य राक्षसाधिपति रावण शिखरांच्या योगानें शोभणाऱ्या मंदरपर्वताप्रमाणें शोभूं लागला २२. आम्रगंधाप्रमाणें आणि उंडीच्या वासाप्रमाणें त्याच्या शरीराला सुवास येत होता; उत्कृष्ट बकुलाप्रमाणें त्याचा श्वास सुगंधि होता आणि षड्रसांनीं युक्त असलेल्या उत्तम अन्नाचा व मद्याचा गंध त्याचे ठिकाणीं येत होता २३. त्या शयन करीत असलेल्या राक्षसाधिपति रावणाच्या प्रचंड मुखांतून निघालेला निःश्वास जसा कांहीं तें अंतःपुर भरूनच टाकीत होता २४. त्याचे मस्तकीं मोत्यें व रत्नें जडल्यामुळें चित्रविचित्र बनलेला आणि, तो रावण स्वतः निद्रावस्थेंत असल्यामुळें, अस्ताव्यस्त झालेला सुवर्णाचा मुकुट झळकत होता २५. पुष्ट, रुंद आणि विशाल असें त्याचें वक्षःस्थल रक्तचंदनानें चोपडलेलें असून उत्कृष्ट हारानें झळकत होतें २६. आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या रावणानें नेसलेला पांढरा पीतांबर अस्ताव्यस्त झालेला होता आणि महामूल्यवान् अशा पीतवर्ण उत्तरीय वस्त्रानें तो अगदीं गुरफटून गेलेला होता २७. उडदाच्या राशीप्रमाणें असलेला आणि भुजंगाप्रमाणें फों फों करीत शय्येवर पडलेला तो रावण गंगेच्या अगाध उदकामध्यें निद्रिस्थ झालेल्या गजाप्रमाणें शोभत होता २८. चारी दिशेस ठेविलेल्या चार सुवर्ण दीपांचा प्रकाश त्याच्यावर पडत असल्यामुळें विद्युल्लतांच्या समुदायांनीं सर्व अवयव प्रकाशित

पादमूलगताश्चापि ददर्श सुमहात्मनः । पत्नीः स प्रियभार्यस्य तस्य रक्षः-पतेर्गृहे ३० शशिप्रकाशवदना वरकुण्डलभूषणाः । अम्लानमाल्याभरणा ददर्श हरियूथपः ३१ नृत्यवादित्रकुशला राक्षसेन्द्रभुजाङ्कगाः । वराभरणधारिण्यो निषण्णा ददृशे कपिः ३२ वज्रवैदूर्यगर्भाणि श्रवणान्तेषु योषिताम् । ददर्श तापनीयानि कुण्डलान्यङ्गदानि च ३३ तासां चन्द्रोपमैर्वक्त्रैः शुभैर्ललितकुण्डलैः । विराजते विमानं तन्नभस्तारागणैरिव ३४ मदव्यायामखिन्नास्ता राक्षसेन्द्रस्य योषितः । तेषु तेष्ववकाशेषु प्रसुप्तास्तनुमध्यमाः ३५ अङ्गहारैस्तथैवान्या कोमलैर्नृत्यशालिनी । विन्यस्तशुभसर्वाङ्गी प्रसुप्ता वरवर्णिनी ३६ काचिद्वीणां परिष्वज्य प्रसुप्ता संप्रकाशते । महानदीप्रकीर्णेव नलिनी पोतमाश्रिता ३७ अन्या कक्षगतेनैव मड्डुकेनासितेक्षणा । प्रसुप्ता भामिनी भाति बालपुत्रेव वत्सला ३८

---

झालेल्या मेघाप्रमाणें तो दिसत होता २९. भार्या ज्याला प्रिय आहेत आणि ज्याचें शरीर फारच मोठें आहे अशा त्या रावणाच्या पायाशीं असलेल्या त्याच्या भार्याही त्या हनुमानानें अवलोकन केल्या आणि त्याचप्रमाणें त्या राक्षसाधिपतीच्या गृहामध्यें ३० चंद्राप्रमाणें तेजस्वी मुखानें युक्त, श्रेष्ठ कुंडलें व भूषण धारण केलेल्या व कधींही न कोमेजणारीं पुष्पभूषणें घातलेल्या देवकन्या त्या वानरसेनाधिपति हनुमानानें अवलोकन केल्या ३१. नृत्य आणि वाद्यें ह्यांमध्यें निपुण आणि श्रेष्ठ भूषणें धारण करणाऱ्या रावणाच्या प्रिय स्त्रिया त्या राक्षसाधिपतीच्या हातांवर आणि मांड्यांवर शयन करीत पडलेल्या हनुमानानें अवलोकन केल्या ३२. हिरे आणि वैडूर्यमणि ज्यांत बसविलेले आहेत अशीं स्त्रियांचीं सुवर्णकुंडलें आणि रावणाच्या हातांतील बाहूभूषणें हीं दोन्हीं स्त्रियांच्या कानापाशींच हनुमानानें अवलोकन केलीं ३३. त्यांच्या चंद्रतुल्य मुखांनीं आणि अद्भुत शुभ कुंडलांनीं तो 'मंचक' तारागणांनीं झळकणाऱ्या आकाशाप्रमाणें झळकत होता ३४. सुरतक्रीडाविषयक व्यायाम झाल्यामुळें श्रमलेल्या त्या राक्षसाधिपतीच्या कृशोदरी स्त्रिया ठिकठिकाणीं निद्रिस्थ पडल्या होत्या ३५. ब्रह्मदेवानें जिचे सर्व अवयव उत्कृष्ट रीतीनें रचलेले होते अशी एक नृत्य करण्याविषयीं तत्पर असलेली उत्कृष्ट स्त्री मनोहर असे हावभाव करितां करितांच झोंपीं गेलेली होती ३६. हातांमध्यें वीणा घेऊन निद्रिस्थ झालेली एक स्त्री महानदीमध्यें जिचीं पुष्पें व पानें अस्ताव्यस्त पडलीं आहेत अशी 'कमलिनीच नावेचा आश्रय करून राहिली आहे कीं काय अशाप्रकारें दिसत होती' ३७. खाकेमध्यें मड्डुकवाद्य तसेंच असून झोंपीं गेलेली दुसरी एक कृष्णनयना स्त्री आपलें लहान मूल कुशीत

पटहं चारुसर्वाङ्गी न्यस्य शेते शुभस्तनी । चिरस्य रमणं लब्ध्वा परिष्वज्येव कामिनी ३९ काचिद्वीणां परिष्वज्य सुप्ता कमललोचना । वरं प्रियतमं गृह्य सकामेव हि कामिनी ४० विपञ्चीं परिगृह्यान्या नियता नृत्यशालिनी । निद्रावशमनुप्राप्ता सहकान्तेव भामिनी ४१ अन्या कनकसंकाशैर्मृदुपीनैर्मनोरमैः । मृदङ्गं परिविद्ध्याङ्गैः प्रसुप्ता मत्तलोचना ४२ भुजपाशान्तरस्थेन कक्षगेन कृशोदरी । पणवेन सहानिन्द्या सुप्ता मदकृतश्रमा ४३ डिण्डिमं परिगृह्यान्या तथैवासक्तडिण्डिमा । प्रसुप्ता तरुणं वत्समुपगुह्येव भामिनी ४४ काचिदाडम्बरं नारी भुजसंभोगपीडितम् । कृत्वा कमलपत्राक्षी प्रसुप्ता मदमोहिता ४५ कलशीमपविद्ध्यान्या प्रसुप्ता भाति भामिनी । वसन्ते पुष्पशबला मालेव परिमार्जिता ४६ पाणिभ्यां

---

घेऊन निजलेल्या पुत्रवत्सल स्त्रीप्रमाणें भासत होती ३८. जिचे सर्व अवयव मनोहर असून स्तन उत्कृष्ट आहेत अशी एक स्त्री, पुष्कळ दिवसांनीं गांठ पडल्यामुळें प्रियाला गाढ आलिंगन देऊन शयन करणाऱ्या कामिनीप्रमाणें डग्गा कवटाळून शयन करीत होती ३९. विषयोपभोगाची इच्छा झालेली कामिनी स्त्री ज्याप्रमाणें अत्यंत प्रिय अशा आपल्या वल्लभाला कवटाळून झोपीं जाते त्याप्रमाणें कोणी एक कमललोचना स्त्री वीणा कवटाळून निद्रिस्थ झाली होती ४० ज्याप्रमाणें एकादी स्त्री आपल्या वल्लभासहवर्तमान शयन करीत पडलेली असते त्याप्रमाणें दुसरी एक नृत्यामध्यें निष्णात असलेली व वर्तनानें शुद्ध असलेली स्त्री शेजारी सतार घेऊन शयन करीत पडलेली होती ४१. सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल, मृदु आणि पुष्ट अशा अवयवांच्या योगानें मृदंग कवटाळून धरून मदानें डोळे तारवटून गेलेली दुसरी एक स्त्री निद्रा घेत पडली होती ४२. जिच्या स्वरूपाला नांव ठेवण्यास कोठेंही जागा नाहीं व जिचें उदर कृश आहे अशी एक मदमत्त झालेली स्त्री खाकेमध्यें असलेलें पणव वाद्य दोन्ही हातांनीं कवटाळून धरून झोंप घेत होती ४३. पाठीशीं एक डिंडिम वाद्य बांधून व दुसरें एक डिंडिम वाद्य पुढें कवटाळून धरून एक स्त्री शयन करीत होती; ती, पाठीशीं तरुण पतीला घेऊन व पुढें लहान मूल घेऊन निद्रा करीत असलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत होती ४४. कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र विशाल आहेत अशी एक मदमोहित झालेली स्त्री आडंबर वाद्याला बाहूंनें घट्ट आलिंगन देऊन निजलेली होती ४५. आपलें जलपात्र झोंपेमध्यें अंगावर सांडून दुसरी एक स्त्री तेथें शयन करीत पडली होती ती वसंत ऋतूमध्यें टवटवी येण्याकरितां पाणी शिंपडून ठेविलेल्या चित्रविचित्र पुष्पांच्या मालेप्रमाणें दिसत होती ४६. निद्रेच्या तडाक्यांत सांपडलेली

च कुचौ काचित्सुवर्णकलशोपमौ । उपगुह्याबला सुप्ता निद्राबलमुपागता ४७ अन्या कमलपत्राक्षी पूर्णेन्दुसदृशानना । अन्यामालिङ्ग्य सुश्रोणीं निद्रावशमुपागता ४८ आतोद्यानि विचित्राणि परिष्वज्य वरस्त्रियः । निपीड्य च कुचैः सुप्ताः कामिन्यः कामुकानिव ४९ तासामेकान्तविन्यस्ते शयानां शयने शुभे । ददर्श रूपसंपन्नामथ तां स कपिः स्त्रियम् ५० मुक्तामणिसमायुक्तैर्भूषणैः सुविभूषिताम् । विभूषयन्तीमिव च स्वश्रिया भवनोत्तमम् ५१ गौरीं कनकवर्णाभामिष्टामन्तःपुरेश्वरीम् । कपिर्मन्दोदरीं तत्र शयानां चारुरूपिणीम् ५२ स तां दृष्ट्वा महाबाहुर्भूषितां मारुतात्मजः । तर्कयामास सीतेति रूपयौवनसंपदा ॥ हर्षेण महता युक्तो ननन्द हरियूथपः ५३ आस्फोटयामास चुचुम्ब पुच्छं ननन्द चिक्रीड जगौ जगाम । स्तम्भानरोहन्निपपात भूमौ निदर्शयन्स्वां प्रकृतिं कपीनाम् ५४ [ ५६५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

---

दुसरी एक अबला सुवर्णकलशासारिखे आपले स्तन आपल्याच हातांनीं घट्ट धरून शयन करीत होती ४७. निद्रेनें घेरलेली आणि पूर्णचंद्राप्रमाणें आह्लादकारक मुख व कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्र ह्यांनीं युक्त असलेली एक स्त्री दुसऱ्याच एका सुंदरीला कवटाळून निद्रिस्थ झाली होती ४८. कामुक स्त्रिया ज्याप्रमाणें आपल्या स्तनांनीं आपल्या कामुक पतींना दृढ आलिंगन देऊन निद्रा घेत असतात त्याप्रमाणें नानाप्रकारचीं वाद्यें कवटाळून धरून उत्कृष्ट उत्कृष्ट स्त्रिया तेथें निद्रा घेत होत्या ४९. नंतर त्यांच्या शय्यांपासून दुसरीकडे पसरलेल्या एका शुभ शय्येवर शयन करीत असलेली ती रूपवती मुख्य स्त्री त्या हनुमानानें अवलोकन केली ५०. मोत्यें आणि रत्नें ह्यांनीं युक्त असलेल्या भूषणांनीं उत्कृष्ट रीतीनें भूषित झालेली, आपल्या कांतीच्या योगानें त्या उत्कृष्ट गृहाला जशी कांहीं शोभा आणीत असलेली ५१, सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल, गौरवर्ण, पतीला प्रिय, अंतःपुराची मालकीण, रूपानें सुंदर व अलंकारांनीं भूषित होऊन शयन करीत असलेली ती मंदोदरी अवलोकन करितांक्षणीं तिचें रूप व यौवन ह्यांवरून त्या महापराक्रमी वायुपुत्र हनुमानाचा " ही सीता असावी " असा तर्क झाला आणि त्यामुळें त्या वानरसेनाधिपति हनुमानाला मोठा हर्ष होऊन तो मनामध्यें प्रसन्नही झाला ५२, ५३. सारांश, वानरांना योग्य असा आपला जातिस्वभाव दर्शविण्यास उद्युक्त झालेला तो हनुमान् आपलें पुच्छ आपटूं लागला, त्याचें चुंबन घेऊं लागला, मनामध्यें आनंदित होऊन क्रीडा करूं लागला, गाऊं

अवधूय च तां बुद्धिं बभूवावस्थितस्तदा । जगाम चापरां चिन्तां सीतां प्रति महाकपिः १ न रामेण वियुक्ता सा स्वप्तुमर्हति भाविनी। न भोक्तुं नाप्यलंकर्तुं न पानमुपसेवितुम् २ नान्यं नरमुपस्थातुं सुराणामपि चेश्वरम् । नहि रामसमः कश्चिद्विद्यते त्रिदशेष्वपि ३ अन्येयमिति निश्चित्य भूयस्तत्र चचार सः । पानभूमौ हरिश्रेष्ठः सीतासंदर्शनोत्सुकः ४ क्रीडितेनापराः क्लान्ता गीतेन च तथापराः । नृत्येन चापराः क्लान्ताः पानविप्रहतास्तथा ५ मुरजेषु मृदङ्गेषु चेलिकासु च संस्थिताः । तथास्तरणमुख्येषु संविष्टाश्चापराः स्त्रियः ६ अङ्गनानां सहस्रेण भूषितेन विभूषणैः। रूपसंलापशीलेन युक्तगीतार्थभाषिणा ७ देशकालाभियुक्तेन युक्तवाक्याभिधायिना । रताधिकेन संयुक्तां ददर्श हरियूथपः ८ अन्यत्रापि वर-

---

लागला, इकडे तिकडे धांवाधांव करूं लागला आणि खांबावर चढून फिरून जमिनीवरही उड्या मारूं लागला ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

तदनंतर तो तर्क सोडून देऊन तो महाकपि हनुमान् स्वस्थ राहिला आणि सीतेसंबधानें मनामध्यें दुसरीच एक चिंता करूं लागला १. " रामाचा वियोग झाला असल्यामुळें त्या सीतास्त्रीला गाढ झोंप लागणें शक्य नाहीं व भोग्य वस्तूंचा उपभोग घेणें, अलंकार धारण करणें आणि मद्यपानाचें सेवन करणें ह्याही गोष्टी तिच्या हातून घडणें शक्य नाहींत २. शिवाय, देवाधिपति जरी झाला तरी रामावांचून दुसऱ्या पुरुषाचें अवलंबन तिच्या हातून कधींही होणार नाहीं. कारण, देवांमध्येंही रामाची बरोबरी करणारा कोणी नाहीं " ३. असा विचार मनांत आणून " ही कोणी तरी दुसरी असावी " असा त्यानें निश्चय केला आणि सीतेच्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् पुनरपि त्या पानभूमीवर इकडे तिकडे संचार करूं लागला ४. तेव्हां कांहीं स्त्रिया सोंगट्या वगैरे खेळून, कांहीं गाऊन आणि कांहीं नृत्य करून श्रमल्यामुळें आणि कांहीं मद्यपानाच्या मदानें घेरून टाकिल्यामुळें निद्रिस्थ झालेल्या त्यानें पाहिल्या ५ आणि त्याचप्रमाणें मृदंग, मुरज, व चेलिका हीं वाद्यें वाजवीत वाजवीत बसल्या असतांनाच झोंपीं गेलेल्या स्त्रिया आणि तशाच मोठ्या मोठ्या रुजाम्यांवर निद्रिस्थ झालेल्या दुसऱ्याही कांहीं स्त्रिया त्यानें अवलोकन केल्या ६. सारांश, झोंपेमध्यें एकमेकींच्या सौंदर्यासंबधानें बोलत असून योग्य रीतीनें गायनाचा अर्थ बोलून दाखविणाऱ्या, स्थल व काल ह्यांना अनुरूप असें योग्य भाषण करणाऱ्या, उत्कृष्ट रीतीनें सुरतक्रीडा करणाऱ्या आणि अलंकारांनीं

स्त्रीणां रूपसंलापशायिनाम्। सहस्रं युवतीनां तु प्रसुप्तं स ददर्श ह ९
देशकालाभियुक्तं तु युक्तवाक्याभिधायि तत्। रताविरतसंसुप्तं ददर्श
हरियूथपः १० तासां मध्ये महाबाहुः शुशुभे राक्षसेश्वरः। गोष्ठे महति
मुख्यानां गवां मध्ये यथा वृषः ११ स राक्षसेन्द्रः शुशुभे ताभिः परि-
वृतः स्वयम्। करेणुभिर्यथारण्ये परिकीर्णो महाद्विपः १२ सर्वकामैरु-
पेतां च पानभूमिं महात्मनः। ददर्श कपिशार्दूलस्तस्य रक्षःपतेर्गृहे १३
मृगाणां महिषाणां च वराहाणां च भागशः। तत्र न्यस्तानि मांसानि
पानभूमौ ददर्श सः १४ रौक्मेषु च विशालेषु भाजनेष्वप्यभक्षितान्।
ददर्श कपिशार्दूलो मयूरान्कुक्कुटांस्तथा १५ वराहवाध्रीणसकान्दधिसौ-
वर्चलायुतान्। शल्यान्मृगमयूरांश्च हनुमानन्ववैक्षत १६ क्रक-
लान्विविधांश्छागाञ्छशकानर्धभक्षितान्। महिषानेकशल्यांश्च च्छगांश्च

---

भूषित झालेल्या हजार स्त्रिया त्या पानभूमीवर असल्याचें त्या वानरसेनाधिपति हनुमा-
नानें अवलोकन केलें ७, ८ आणि त्याचप्रमाणें एकमेकींच्या सौंदर्याविषयीं झोंपेमध्यें
वादविवाद करणाऱ्या अशा दुसऱ्याही एक हजार श्रेष्ठ तरुणी स्त्रिया झोंप घेत पड-
लेल्या त्यानें दुसरीकडे अवलोकन केल्या ९. ह्या ज्या स्त्रिया वानरसेनाधिपति हनुमा-
नानें अवलोकन केल्या त्या स्थल व समय ह्यांना उचित असें योग्य भाषण करणाऱ्या
व सुरतक्रीडेनंतर गाढ झोंप लागलेल्या त्यानें अवलोकन केल्या १०. मोठ्या गोठ्यांत
श्रेष्ठ गायींच्या मध्यभागीं शोभणाऱ्या बैलाप्रमाणें महापराक्रमी राक्षसाधिपति रावण
त्या स्त्रियांमध्यें शोभत होता ११. सारांश, हत्तिणींनीं परिवेष्टिलेला महागज ज्याप्र-
माणें अरण्यामध्यें शोभतो त्याप्रमाणें तो राक्षसाधिपति रावण स्वतः त्या स्त्रियांनीं
परिवेष्टित झाला असल्यामुळें शोभूं लागला १२. त्या राक्षसाधिपति महात्म्या राव-
णाच्या गृहामध्यें त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केलेली पानभूमि सर्व भोग्य
पदार्थांनीं युक्त होती १३. मृग, महिष आणि वराह ह्यांचीं मांसें त्या पानभूमीमध्यें
वेगळीं वेगळीं ठेविलेलीं त्यानें अवलोकन केलीं १४. त्याचप्रमाणें विस्तीर्ण सुवर्ण
पात्रांमध्यें कोणीही न उष्टावितां ठेविलेले मयूर व कुक्कुट त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें
अवलोकन केले १५ व तसेच संचळखार व दही घालून तयार केलेले वराह, वाध्रीणस
शल्य, मृग आणि मयूर ह्यांचें मांस हनुमानानें तेथें पाहिलें १६. गरड, नानाप्रकारचे

---

१ कृष्णग्रीवो रक्तशिराः श्वेतपक्षो विहङ्गमः। स वै वाध्रीणसः प्रोक्तः॥ विष्णुधर्म॥ त्रिःपिबं त्विन्द्रियक्षीणं श्वेतं वृद्धप्रजापतिम्। वाध्रीणसं च तं प्राहुर्याज्ञिकाः श्राद्धकर्मणि॥ त्रिःपिब म्हणजे मुख व दोन्ही कान पाणी पितेवेळीं ज्याचे पाण्याला लागतात तो.

कृतनिष्ठितान् १७ लेह्यानुच्चावचान्पेयान्भोज्यान्युच्चावचानि च १८ तथा-
म्ललवणोत्तंसैर्विविधै रागखाण्डवैः । महानूपुरकेयूरैरपविद्धैर्महाधनैः १९
पानभाजनविक्षिप्तैः फलैश्च विविधैरपि । कृतपुष्पोपहारा भूरधिकां
पुष्यति श्रियम् २० तत्र तत्र च विन्यस्तैः सुश्लिष्टशयनासनैः । पानभूमि-
र्विना वह्निं प्रदीप्तेवोपलक्ष्यते २१ बहुप्रकारैर्विविधैर्वरसंस्कारसंस्कृतैः ।
मांसैः कुशलसंयुक्तैः पानभूमिगतैः पृथक् २२ दिव्याः प्रसन्ना विविधाः
सुराः कृतसुरा अपि । शर्करासवमाध्वीकाः पुष्पासवफलासवाः २३
वासचूर्णैश्च विविधैर्मृष्टास्तैस्तैः पृथक्पृथक् । संतता शुशुभे भूमिर्मा-
ल्यैश्च बहुसंस्थितैः २४ हिरण्मयैश्च कलशैर्भाजनैः स्फाटिकैरपि । जाम्बू-
नदमयैश्चान्यैः करकैरभिसंवृता २५ राजतेषु च कुम्भेषु जाम्बूनदमयेषु

---

बोकड, अर्धवट खालेले ससे, महिष आणि शिजवून तयार केलेले एकशल्य व छेद् ह्या नांवांचे मांस १७ आणि बरें वाईट लेह्य, पेय व भोज्य पदार्थ त्यानें तेथें अवलोकन केले १८. जिह्वाजाड्य नाहींसें करणारा लवणरस व अम्लरस ज्यांमध्यें आहेत असे नानाप्रकारचे [१]रागखांडव, अस्ताव्यस्त पडलेल्या भारी किंमतीच्या मोठ्या मोठ्या तोरड्या व बाहुभूषणें १९ आणि पानपात्रांतून पडलेलीं नानाप्रकारचीं फळें ह्यांच्या योगानें त्या पुष्पांची अरास केलेल्या भूमीला अधिकच शोभा आलेली होती २०. उत्तम प्रकारें तयार केलेल्या शय्या व आसनें ठिकठिकाणीं ठेविलेलीं असल्यामुळें ती पानभूमि अग्नीवांचूनच प्रदीप्त झाल्यासारखी दिसत होती २१. नानाप्रकारचे पदार्थ ज्यांत मिश्र केलेले आहेत आणि उत्तम प्रकारचे मसाले घालून जीं तयार केलेलीं आहेत अशीं पटाईत आचाऱ्यांनीं शिजविलेलीं मांसें त्या पानभूमीमध्यें वेगळीं वेगळीं ठेविलेलीं होतीं २२; नानाप्रकारच्या दिव्य व स्वच्छ सुरा, तयार केलेल्या सुरा आणि साखरेपासून, मधापासून, पुष्पांपासून व फलांपासून तयार केलेलीं आसवें त्या ठिकाणीं ठेविलेलीं होतीं २३. नानाप्रकारचीं द्रव्यें घालून तयार केलेले व वेगवेगळे ठेविलेले अनेकप्रकारचे स्वच्छ अरगजे आणि नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त असलेलीं पुष्पें ह्यांच्या योगानें ती भूमि व्याप्त झाल्यामुळें शोभत होती २४. सुवर्णकलश, स्फटिकपात्रें आणि दुसरेही सुवर्णमय कमंडलु ह्यांच्या योगानें ती पानभूमि आच्छादिलेली होती २५. सोन्यारुप्याच्या कुंभांतून प्रतिबिंबित झालेली आणि पेयद्रव्यांच्या योगानें

---

१ सितामध्वादिमधुरो द्राक्षादाडिमजो रसः । विरलश्चेत्कृतो रागः सान्द्रश्चेत्खाण्डवः स्मृतः ॥
अर्थः—सडीसाखर, मध वगैरे पदार्थ घालून मधुर केलेला द्राक्षें व डाळिंबें यांचा रस पातळ असल्यास त्याला राग असें म्हणतात आणि घट्ट असल्यास त्याला खांडव असें म्हणतात.

च । पानश्रेष्ठां तथा भूमिं कपिस्तत्र ददर्श ह २६ सोपश्यच्छातकुम्भानि सीधोर्मणिमयानि च । तानि तानि च पूर्णानि भाजनानि महाकपिः २७ क्वचिदर्धावशेषाणि क्वचित्पीतान्यशेषतः । क्वचिन्नैव प्रपीतानि पानानि स ददर्श ह २८ क्वचिभक्ष्यांश्च विविधान्क्वचित्पानं विभागतः । क्वचिदर्धावशेषानि पश्यन्वै विचचार ह २९ शयनान्यत्र नारीणां शून्यानि बहुधा पुनः । परस्परं समाश्लिष्य काश्चित्सुप्ता वराङ्गनाः ३० काचिच्च वस्त्रमन्यस्य अपहृत्योपगुह्य च । उपगम्याबला सुप्ता निद्राबलपराजिता ३१ तासामुच्छ्वासवातेन वस्त्रं माल्यं च गात्रजम् । नात्यर्थं स्पन्दते चित्रं प्राप्य मन्दमिवानिलम् ३२ चन्दनस्य च शीतस्य सीधोर्मधुरसस्य च । विविधस्य च माल्यस्य पुष्पस्य विविधस्य च ३३ बहुधा मारुतस्तस्य गन्धं विविधमुद्वहन् । स्नानानां चन्दनानां च धूपानां चैव मूर्छितः ॥ प्रववौ सुरभिर्गन्धो विमाने पुष्पके तदा ३४ श्यामावदातास्तत्रान्याः काश्चित्कृष्णा वराङ्गनाः । काश्चित्काञ्चनवर्णाङ्ग्यः प्रमदा राक्षसालये ३५

---

उत्कृष्ट झालेली ती भूमि हनुमान् वानरानें अवलोकन केली २६ नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त असलेलीं सोन्याचीं व हिऱ्याचीं मद्यपात्रें मद्यानें भरलेलीं त्या महाकपि हनुमानानें तेथें अवलोकन केलीं २७. कांहीं ठिकाणीं अर्धवट प्यायलेलीं, कांहीं ठिकाणीं सर्व पिऊन टाकिलेलीं आणि कांहीं ठिकाणीं मुळींच न प्यायलेलीं मद्यपात्रें त्यानें अवलोकन केलीं २८ आणि त्याचप्रमाणें कांहीं ठिकाणीं नानाप्रकारचे भक्ष्य पदार्थ, कांहीं ठिकाणीं वेगळीं वेगळीं ठविलेलीं पेय द्रव्यें व कांहीं ठिकाणीं अर्धवट पिऊन टाकिलेलीं पेयें अवलोकन करीत करीत तो संचार करूं लागला २९. ह्या ठिकाणीं स्त्रियांच्या पुष्कळ शय्या मोकळ्याच पडलेल्या होत्या. काहीं श्रेष्ठ श्रेष्ठ स्त्रिया एकमेकीला कवटाळून निजल्या होत्या ३०. निद्रेनें घेरून टाकिल्यामुळें कोणी एक स्त्री दुसरीचेंच वस्त्र हिसकावून घेऊन व तें पांघरून तिच्या शय्येवर जाऊन निजलेली होती ३१. वाऱ्याची मंदमंद झुळुक लागत आहे कीं काय अशारीतीनें त्या स्त्रियांच्या शरीरावरील वस्त्रें व चित्रविचित्र पुष्पें त्यांच्या श्वासवायूच्या योगानें किंचित् हलत होतीं ३२. शीत चंदन, मद्य, मध, नानाप्रकारच्या माला आणि नानाप्रकारचीं पुष्पें ३३ ह्यांचा अनेकप्रकारचा सुवास ठिकठिकाणीं अनेक मार्गांनीं नेऊन पोंचविणारा वायु तेथें वहात होता आणि ह्यामुळें पुष्पक विमानामध्यें स्नानाला योग्य अशा चंदनांचा व धूपांचा सुगंध व्याप्त होऊन राहिलेला होता ३४. त्या राक्षसाच्या निवासस्थानामध्यें कांहीं स्त्रिया श्यामवर्ण होत्या;

तासां निद्रावशत्वाच्च मदनेन विमूर्छितम्। पद्मिनीनां प्रसुप्तानां रूपमासीद्यथैव हि ३६ एवं सर्वमशेषेण रावणान्तःपुरं कपिः। ददर्श स महातेजा न ददर्श च जानकीम् ३७ निरीक्षमाणश्च ततस्ताः स्त्रियः स महाकपिः। जगाम महतीं शङ्कां धर्मसाध्वसशङ्कितः ३८ परदारावरोधस्य प्रसुप्तस्य निरीक्षणम्। इदं खलु ममात्यर्थं धर्मलोपं करिष्यति ३९ न हि मे परदाराणां दृष्टिर्विषयवर्तिनी। अयं चात्र मया दृष्टः परदारपरिग्रहः ४० तस्य प्रादुरभूच्चिन्ता पुनरन्या मनस्विनः। निश्चितैकान्तचित्तस्य कार्यनिश्चयदर्शिनी ४१ कामं दृष्टा मया सर्वा विश्वस्ता रावणस्त्रियः। न तु मे मनसा किंचिद्वैकृत्यमुपपद्यते ४२ मनो हि हेतुः सर्वेषामिन्द्रियाणां प्रवर्तने। शुभाशुभास्ववस्थासु तच्च मे सुव्यवस्थितम् ४३ नान्यत्र हि मया शक्या वैदेही परिमार्गितुम्। स्त्रियो हि स्त्रीषु दृश्यन्ते सदा संपरिमार्गणे ४४

---

कांहीं गौरवर्ण होत्या; कांहीं उत्कृष्ट स्त्रिया कृष्णवर्ण होत्या आणि कांहीं तरुणी स्त्रियांची कांति सुवर्णाप्रमाणें होती ३५. मदनानें व्याप्त करून टाकिलेलें त्या स्त्रियांचें रूप त्या निद्रेच्या अधीन झाल्यामुळें गाढ निद्रा लागलेल्या कमलिनींचें रूप जसें दिसावें तसें दिसूं लागलें ३६. ह्याप्रकारें रावणाचें अंतःपुर त्या महातेजस्वी हनुमान् कपीनें अगदीं झाडून सर्व अवलोकन केलें; परंतु, जनककन्या सीता तेथें त्याच्या कोठेंच दृष्टीं पडली नाहीं ३७. ह्याप्रमाणें तो महाकपि हनुमान् त्या स्त्रियांकडे पाहूं लागला असतां धर्माविषयीं भयभीत होऊन त्याला मोठीच शंका आली ( व तो मनामध्यें ह्मणाला ) ३८ " धर्मानें वागणाऱ्या व कुलीन अशा ज्या परस्त्रिया निद्रिस्थ असलेल्या मीं पाहिल्या त्या ह्या माझ्या पहाण्याच्या योगानें खरोखर माझा अतिशय धर्मलोप होईल ३९. बरें, आज माझ्या दृष्टीच्या अटोक्यांत नुसत्या परस्त्रियाच आल्या आहेत असेंही नसून परस्त्रियांचा 'स्वीकार करणारा हा अति पापी रावणही येथें माझ्या दृष्टीं पडला आहे " ४०. असा विचार मनामध्यें आणीत आहे तों संदेहरहित सिद्धांत समजण्याकडे ज्याच्या चित्ताची प्रवृत्ति आहे अशा त्या विवेकी हनुमानाच्या मनामध्यें पुनरपि दुसरा एक विचार आला आणि त्याच्या योगानें बऱ्यावाईटाविषयीं त्याच्या मनाची खात्री झाली ४१. ( तो ह्मणाला ) " निःशंकपणें पडलेल्या ह्या सर्व रावणस्त्रिया मीं हव्या तशा पाहिल्या खऱ्या; परंतु, ह्या पहाण्यामुळें माझ्या मनामध्यें कांहींएक विकार उत्पन्न झालेला नाहीं ४२. बऱ्यावाईट स्थितीमध्यें कोणत्याही इंद्रियाची प्रवृत्ति होण्याचें मन हेंच कारण आहे आणि तें माझें मन तर अगदीं स्वस्थ आहे ४३. स्त्रीसमुदायाशिवाय दुसऱ्या ठिकाणीं मला विदेहराजकन्येचा शोध लागणें शक्य

यस्य सत्त्वस्य या योनिस्तस्यां तत्परिमार्गते । न शक्यं प्रमदा नष्टा मृगीषु
परिमार्गितुम् ४५ तदिदं मार्गितं तावच्छुद्धेन मनसा मया । रावणान्तः-
पुरं सर्वं दृश्यते न च जानकी ४६ देवगन्धर्वकन्याश्च नागकन्याश्च
वीर्यवान् । अवेक्षमाणो हनुमान्नैवापश्यत जानकीम् ४७ तामपश्यन्क-
पिस्तत्र पश्यंश्चान्या वरस्त्रियः । अपक्रम्य तदा वीरः प्रस्थातुमुपचक्रमे ४८
स भूयः सर्वतः श्रीमान्मारुतिर्यत्नमाश्रितः । आपानभूमिमुत्सृज्य तां
विचेतुं प्रचक्रमे ४९ [६१४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्ये सुन्दरकाण्डे एकादशः सर्गः ॥ ११ ॥

स तस्य मध्ये भवनस्य संस्थितो लतागृहांश्चित्रगृहान्निशागृहान् ।
जगाम सीतां प्रतिदर्शनोत्सुको न चैव तां पश्यति चारुदर्शनाम् १ स
चिन्तयामास ततो महाकपिः प्रियामपश्यन्रघुनन्दनस्य ताम् । ध्रुवं न
सीता ध्रियते यथा न मे विचिन्वतो दर्शनमेति मैथिली २ सा राक्ष-

---

नाहीं. कारण, शोधण्याचा प्रसंग आला असतां नेहमीं स्त्रियांचेच ठिकाणीं स्त्रिया आढळून येत असतात ४४. ज्या प्राण्याची जी जाति असेल त्याच जातीचा आश्रय करून तो प्राणी रहात असतो. तस्मात्, नाहींशा झालेल्या स्त्रीचा शोध मृगींमध्यें लागणें शक्य नाहीं ४५. ह्यास्तव, शुद्ध मनानें मीं हें रावणाचें अंतःपुर सर्व धुंडाळून काढिलें आहे; परंतु, येथें कोठेंही जनककन्या दृष्टीं पडत नाहीं ४६. सारांश, तो वीर्यवान् हनुमान् सीतेला पाहूं लागला असतां देवकन्या, गंधर्वकन्या आणि नागकन्या त्याच्या अवलोकनांत आल्या; परंतु, जनककन्या सीता त्याच्या आढळण्यांत आलीच नाहीं ४७. ह्याप्रमाणें इतर उत्कृष्ट स्त्रिया अवलोकनांत येऊन सीता जेव्हां तेथें त्याच्या दृष्टीं पडेना तेव्हां तो वीर ती पानभूमि सोडून दुसरीकडे जावयास उद्युक्त झाला ४८. तात्पर्य, सर्व बाजूंनीं प्रयत्नपूर्वक तें स्थान अवलोकन केल्यानंतर पानभूमि सोडून देऊन पुनरपि तो हनुमान् त्या सीतेचा शोध करूं लागला ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

त्या रावणाच्या गृहामध्यें असलेला तो हनुमान् सीतेच्या दर्शनाविषयीं उत्सुक होऊन रात्रीं ज्यांमध्यें वस्ति करण्यांत येते अशा आश्चर्यकारक लतागृहांमध्यें तो गेला; परंतु, मनोहर मुद्रेनें युक्त असलेली ती सीता त्याच्या दृष्टीं पडली नाहीं १. ह्याप्रमाणें रघुनंदन रामाची ती प्रिया जेव्हां त्याच्या दृष्टीं पडेना तेव्हां तो महाकपि हनुमान् मनामध्यें ह्मणाला " ज्याअर्थीं मिथिलराजकन्या सीता मी शोधीत असतांनाही माझ्या दृष्टीं

सानर्थ मक्षेण बाला स्वशीलसंरक्षणतत्परा सती। अनेन नूनं प्रति दुष्टक-
र्मणा हता मेवदार्यपथे परे स्थिता ३ विरूपरूपा विकृता विवर्चसो
महानना दीर्घविरूपदर्शनाः। समीक्ष्य ता राक्षसराजयोषितो भयाद्विनष्टा
जनकेश्वरात्मजा ४ सीतामदृष्ट्वा ह्यनवाप्य पौरुषं विहृत्य कालं मह
वानरैश्चिरम् । न मेस्ति सुग्रीवसमीपगा गतिः सुतीक्ष्णदण्डो बलवांश्च
वानरः ५ दृष्टमन्तःपुरं सर्वं दृष्टा राक्षसयोषितः । न सीता दृश्यते साध्वी
वृथा जातो मम श्रमः ६ किं नु मां वानराः सर्वे गतं वक्ष्यन्ति संगताः।
गत्वा तत्र त्वया वीर किं कृतं तद्वदस्व नः ७ अदृष्ट्वा किं प्रवक्ष्यामि
तामहं जनकात्मजाम् । ध्रुवं प्रायमुपासिष्ये कालस्य व्यतिवर्तने ८ किं
वा वक्ष्यति वृद्धश्च जाम्बवानङ्गदश्च सः । गतं पारं समुद्रस्य वानराश्च
समागताः ९ अनिर्वेदः श्रियो मूलमनिर्वेदः परं सुखम् । भूयस्तत्र विचे-

---

पडत नाहीं त्याअर्थी ती निःसंशय जिवंतच नाहीं २. उत्कृष्ट पतिव्रतामार्गाचें अवलंबन करणारी आणि स्वतःच्या शीलाचें रक्षण करण्याविषयीं दक्ष असलेली ती साध्वी बाला खरोखर दुष्ट कर्म करणाऱ्या त्या राक्षसश्रेष्ठ रावणानें मारून टाकिली असावी ३; अथवा मुद्रेनें कुरूप, अक्राळविक्राळ, निस्तेज आणि प्रचंड मुख व दीर्घ आणि विरूप नेत्र ह्यांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसराज रावणाच्या स्त्रिया अवलोकन करून ती जनककन्या भीतीनेंही मृत्यु पावली असेल ४. समुद्राचें उल्लंघन करून येण्याचा जो पराक्रम मीं केला तो सीतेचें दर्शन न झाल्यामुळें निष्फल झाला असून वानरांसहवर्तमान हिंडल्यामुळें ठरलेली मुदत टळूनहीं बरेच दिवस झाले आहेत. तेव्हां आतां सुग्रीवाच्या समीप माझें गमन होणें नाहीं. कारण, तो वानर बलाढ्य असून त्याची शिक्षाही फारच कडक आहे ५. सर्व अंतःपुर अवलोकन केलें आणि सर्व राक्षसस्त्रिया अवलोकन केल्या; तथापि, साध्वी सीता दृष्टीं पडत नाहीं. ह्यामुळें, माझे श्रम व्यर्थ झाले आहेत ६. मी तेथें गेल्यावर सर्व वानर एकत्र जुळून मला काय बरें विचारितील ? "हे वीरा, तूं तेथें जाऊन काय केलेंस? हें आह्मांला सांग " असें विचारितील ७. परंतु, ती जनककन्या सीता जर माझ्या दृष्टीं पडलीच नाहीं तर मी तरी त्यांना काय सांगूं ? सारांश विनाकारण मुदत टळून गेल्यामुळें मला आतां निःसंशय अन्नपानाचा त्याग करूनच प्राण सोडिला पाहिजे ८. समुद्र मी उल्लंघिला; परंतु, तेथें परत गेल्यावर एकत्र जुळलेले वानर मला काय ह्मणतील ? तो वृद्ध जांबवान् काय ह्मणेल ? आणि तो अंगद तरी काय ह्मणेल ? ९. ( छेः ! पण असा खेद करणें उपयोगी नाहीं ) उत्साह धरणें हेंच ऐश्वर्याचें मूळ आहे आणि उत्साह हेंच उत्कृष्ट

ष्यामि न यत्र विचयः कृतः १० अनिर्वेदो हि सततं सर्वार्थेषु प्रवर्तकः ॥ करोति सफलं जन्तोः कर्म यच्च करोति सः ११ तस्मादनिर्वेदकरं यत्नं चेष्टेहमुत्तमम् । अदृष्टांश्च विचेष्यामि देशान्रावणपालितान् १२ आपानशाला विचितास्तथा पुष्पगृहाणि च । चित्रशालाश्च विचिता भूयः क्रीडागृहाणि च १३ निष्कुटान्तररथ्याश्च विमानानि च सर्वशः । इति संचिन्त्य भूयोपि विचेतुमुपचक्रमे १४ भूमीगृहांश्चैत्यगृहान्गृहातिगृहकानपि । उत्पतन्निपतंश्चापि तिष्ठन्गच्छन्पुनः क्वचित् १५ अपवृण्वंश्च द्वाराणि कपाटान्यवघट्टयन् । प्रविशन्निष्पतंश्चापि प्रपतन्नुत्पतन्निव १६ सर्वमप्यवकाशं स विचचार महाकपिः १७ चतुरङ्गुलमात्रोपि नावकाशः स विद्यते । रावणान्तःपुरे तस्मिन्यं कपिर्न जगाम सः १८ प्राकारान्तरवीथ्यश्च वेदिकाश्चैत्यसंश्रयाः । श्वभ्राश्च पुष्करिण्यश्च सर्वं तेनावलोकितम् १९ राक्षस्यो विविधाकारा विरूपा विकृतास्तथा । दृष्टा

---

सुखाचें कारण आहे. तस्मात्, ज्या ठिकाणीं शोध केलेला नाहीं तेथें तिला पुनरपि मीं शोधीन १०. सर्व गोष्टींची प्रवृत्ति होण्याला उत्साह हेंच एक नेहमींचें कारण आहे आणि प्राणी जें कांहीं कर्म करीत असतो तेंही उत्साहामुळेंच सफल होत असतें ११. तस्मात्, उत्साहकारक अशा उत्कृष्ट यत्नाचें अवलंबन करून रावणानें रक्षण केलेले जे प्रदेश मीं अवलोकन केलेले नाहींत ते मीं आतां शोधून काढीन १२. पानशाला शोधिल्या; पुष्पगृहें पाहिलीं; चित्रशाला हुडकल्या आणि क्रीडागृहेंही अवलोकन केलीं १३; इतकेंच नव्हे परंतु, गृहांतील आरामस्थानांचे मार्ग व पुष्पकादि विमानेंही सर्वप्रकारें धुंडाळून पाहिलीं." असा विचार करून तो पुनरपि सीतेचा शोध करण्यास उद्युक्त झाला १४. तळघरें, चिरेबंदी वाडे आणि स्वैरक्रीडा करण्याकरितां घर सोडून जवळच तयार केलेलीं दुसरीं घरें ह्यांवर उंच उंच उड्या मारून, पुनरपि खालीं येऊन, उभा राहून, कोठें कोठें पुन्हां पुन्हां जाऊन १५, दारें उघडून, खिडक्या लावून, आंत शिरून, बाहेर पडून, उड्या टाकून व उड्या मारून १६ सर्व प्रदेशावर त्या महाकपि हनुमानानें संचार केला १७. रावणाच्या अंतःपुरांतील चार बोटें सुद्धां जागा, जेथें तो हनुमान् गेलेला नाहीं अशी, शिलक राहिली नाहीं १८. किल्ल्यांतील मार्ग, मोठमोठ्या वृक्षांचे पार, खंदक आणि पुष्करिणी हें सर्व कांहीं त्यानें अवलोकन केलें १९. कुरूप आणि अक्राळविक्राळ अशा नानाप्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या राक्षसी त्यानें पाहिल्या; परंतु, त्या ठिकाणीं ती जनककन्या सीता त्या हनुमानाच्या कोठेंही दृष्टीं

हनुमता तत्र न तु सा जनकात्मजा २० रूपेणाप्रतिमा लोके वरा विद्याधरस्त्रियः । दृष्टा हनुमता तत्र न तु राघवनन्दिनी २१ नागकन्या वरारोहाः पूर्णचन्द्रनिभाननाः । दृष्टा हनुमता तत्र न तु सा जनकात्मजा २२ प्रमथ्य राक्षसेन्द्रेण नागकन्या बलाद्धृताः । दृष्टा हनुमता तत्र न सा जनकनन्दिनी २३ सोपश्यंस्तां महाबाहुः पश्यंश्चान्या वरस्त्रियः । विषसाद महाबाहुर्हनूमान्मारुतात्मजः २४ उद्योगं वानरेन्द्राणां प्लवनं सागरस्य च । व्यर्थं वीक्ष्यानिलसुतश्चिन्तां पुनरुपागतः २५ अवतीर्य विमानाच्च हनुमान्मारुतात्मजः। चिन्तामुपजगामाथ शोकोपहतचेतनः २६ [ ६४० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२॥

विमानात्तु स संक्रम्य प्राकारं हरियूथपः।हनूमान्वेगवानासीद्यथा विद्युद्घनान्तरे १ संपरिक्रम्य हनुमान्रावणस्य निवेशनात् । अदृष्ट्वा जानकीं सीतामब्रवीद्वचनं कपिः २ भूयिष्ठं लोलिता लङ्का रामस्य चरता प्रियम्।

---

पडली नाहीं २०. रूपानें जगतामध्यें अप्रतिम अशा विद्याधरांच्या उत्कृष्ट स्त्रिया हनुमानाच्या पहाण्यांत आल्या; परंतु, रघुवंशज रामाला आनंद देणारी ती सीता त्याला आढळली नाहीं २१. उत्कृष्ट कटिप्रदेशांनीं आणि पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखांनीं युक्त असलेल्या नागकन्या तेथें हनुमानाच्या दृष्टीं पडल्या; परंतु, ती जनककन्या त्याच्या दृष्टोत्पत्तीस आली नाहीं २२. त्याचप्रमाणें राक्षसाधिपति रावणानें नागांना जिंकून बलात्कारानें हरण करून आणिलेल्या दुसऱ्या नागकन्याही त्या हनुमानाच्या अवलोकनांत आल्या; परंतु, ती जनककन्या सीता त्याला आढळली नाहीं २३. त्याप्रमाणें त्या आजानुबाहु महापराक्रमी वायुपुत्र हनुमानाला उत्कृष्ट स्त्रिया दिसत असूनही जेव्हां ती सीता त्याच्या दृष्टीं पडेना तेव्हां तो खिन्न झाला २४ आणि वानराधिपतींचा उद्योग व सागराचें उल्लंघन व्यर्थ झाल्याचें अवलोकन करून तो वायुपुत्र पुनरपि चिंताक्रांत झाला २५. सारांश, पुनरपि विमानामध्यें चढून उतरल्यावर त्या वायुपुत्र हनुमानाचें चित्त शोकग्रस्त झालें आणि तो चिंता करूं लागला २६. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

तो वेगवान् वानरसेनाधिपति हनुमान् विमानावरून तटावर गेला असतां मेघामध्यें असलेल्या विद्युल्लतेप्रमाणें शोभूं लागला १. परंतु, रावणाचीं गृहें हिंडूनही जेव्हां जनककन्या सीता हनुमानाच्या दृष्टीं पडेना तेव्हां तो कपि आपल्याशीं

न हि पश्यामि वैदेहीं सीतां सर्वाङ्गशोभनाम् ३ पल्वलानि तटाकानि सरांसि सरितस्तथा । नद्योनूपवनान्ताश्च दुर्गाश्च धरणीधराः ॥ लोलिता वसुधा सर्वा न च पश्यामि जानकीम् ४ इह संपातिना सीता रावणस्य निवेशने । आख्याता गृध्रराजेन न च सा दृश्यते तु किम् ५ किं तु सीताथ वैदेही मैथिली जनकात्मजा । उपतिष्ठेत विवशा रावणेन हृता बलात् ६ क्षिप्रमुत्पततो मन्ये सीतामादाय रक्षसः । बिभ्यतो रामबाणानामन्तरा पतिता भवेत् ७ अथवा ह्रियमाणायाः पथि सिद्धनिषेविते । मन्ये पतितमार्याया हृदयं प्रेक्ष्य सागरम् ८ रावणस्योरुवेगेन भुजाभ्यां पीडितेन च । तया मन्ये विशालाक्ष्या त्यक्तं जीवितमार्यया ९ उपर्युपरि सा नूनं सागरं क्रमतस्तदा । विचेष्टमाना पतिता समुद्रे जनकात्मजा १० आहो क्षुद्रेण चानेन रक्षन्ती शीलमात्मनः । अबन्धुर्भक्षिता सीता रावणेन तपस्विनी ११ अथवा राक्षसेन्द्रस्य पत्नीभिरसितक्षणा । अदुष्टा दुष्ट-

---

ह्मणाला २ " रामाचें प्रिय करण्याकरितां लंका मीं बहुतेक धुंडाळून काढिली; परंतु, सर्व उत्कृष्ट अवयवांनीं युक्त असलेली ती विदेहराजकन्या सीता कोठें माझ्या दृष्टीं पडत नाहीं ३. तळीं, तडाग, सरोवरें, ओढे, नद्या, नदीतीरावरील वनें आणि दुर्गम पर्वत अशी सर्व पृथ्वी मीं धुंडाळून काढिली; परंतु, जनककन्या सीता माझ्या दृष्टीं पडली नाहीं ४. गृध्रराज संपातीनें सीता येथें रावणाच्या गृहामध्यें नेली ह्मणून सांगितलें आहे; परंतु, ती दृष्टीं पडत नाहीं हें काय ! ५. विदेहवंशाशीं संबद्ध असलेली मिथिलाधिपति जनकराजाची कन्या सीता अनाथ झाल्यामुळें जरी रावणानें बलात्कारानें हरण करून नेली आहे तरी ती त्याचें अवलंबन करून राहील हें तर असंभवनीयच आहे ६. मला वाटतें सीतेला घेऊन तो राक्षस आकाशमार्गानें सत्वर जाऊं लागला असतांना रामबाणांचें त्याला भय वाटल्यामुळें त्याच्या हातांतून ती कोठेंतरी मार्गामध्येंच पडलेली आहे ७. अथवा सिद्धांनीं सेवित अशा आकाशमार्गानें रावण सीतेला हरण करून नेत असतांना सागराकडे पाहून त्या साध्वीनें प्राण सोडिला असावा असें मला वाटतें ८. रावणाच्या मांड्यांचा वेग आणि त्याच्या हातांचें आवळणें ह्यांच्या योगानें मला वाटतें त्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या साध्वीला मृत्यु आला असावा ९. रावण समुद्राचें उल्लंघन करून जात असतांना त्याच्या हांतून सुटण्याकरितां तडफडत असलेली ती जनककन्या सीता खरोखर समुद्रांत पडली असेल १०. किंवा आपलें शील रक्षण करणारी ती बिचारी अनाथ सीता या क्षुद्र रावणानें कदाचित् खाऊनही टाकिली असेल ११. अथवा ज्यांचा हेतु दुष्ट

भार्याभिर्भक्षिता सा भविष्यति १२ अथवा निहता मन्ये रावणस्य निवेशने । भृशं लालप्यते बाला पञ्जरस्थेव सारिका १३ जनकस्य कुले जाता रामपत्नी सुमध्यमा । कथमुत्पलपत्राक्षी रावणस्य वशं व्रजेत् १४ विनष्टा वा प्रणष्टा वा मृता वा जनकात्मजा । रामस्य प्रियभार्यस्य न निवेदयितुं क्षमम् १५ निवेद्यमाने दोषः स्याद्दोषः स्यादनिवेदने । कथं नु खलु कर्तव्यं विषमं प्रतिभाति मे १६ अस्मिन्नेवंगते कार्ये प्राप्तकालं क्षमं च किम् । भवेदिति मतिं भूयो हनुमान्प्रविचारयन् १७ यदि सीतामदृष्ट्वाहं वानरेन्द्रपुरीमितः । गमिष्यामि ततः को मे पुरुषार्थो भविष्यति १८ ममेदं लङ्घनं व्यर्थं सागरस्य भविष्यति । प्रवेशश्चैव लङ्कायां राक्षसानां च दर्शनम् १९ किं वा वक्ष्यति सुग्रीवो हरयो वापि संगताः। किष्किन्धामनुसंप्राप्तं तौ वा दशरथात्मजौ २० गत्वा तु यदि काकुत्स्थं वक्ष्यामि परुषं वचः । न दृष्टेति मया सीता ततस्त्यक्ष्यति जीवितम् २१

---

आहे अशा त्या राक्षसाधिपतीच्या भार्यांनींच त्या कृष्णनयना सुशील सीतेचा कदाचित् फन्ना उडविला असेल १२. अथवा पिंजऱ्यांत ठेविलेली सारिका ज्याप्रमाणें एकसारिखी भाषण करीत असते त्याप्रमाणें रावणाच्याच गृहामध्यें कोठेंतरी गुप्त ठिकाणीं ठेविलेली ती बाला सीता राम राम ह्मणून एकसारखा कंठशोष करून घेत असेल १३. छे: ! कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ती सुंदरी ज्याअर्थी जनकाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेली आहे आणि रामाची पत्नी आहे त्याअर्थी ती रावणाला कोठून वश होणार ! १४. भार्या ज्याला प्रिय आहे अशा रामाला " जनककन्या सीता कोठें असेल; परंतु पत्ता लागत नाहीं; अथवा ती नाहींशीं झाली आहे किंवा ती मृत झाली आहे असें निवेदन करणेंही योग्य नाहीं १५. खरें खरें वर्तमान निवेदन करूं लागलों तर त्यांतही दोष आहे आणि निवेदन न केलें तरी दोष आहे ! तेव्हां आतां करावें कसें ? मला तर हा मोठा बिकट प्रसंग दिसत आहे १६. तस्मात्, आपण हातीं घेतलेल्या कार्याची अशाप्रकार स्थिति झाली असतांना कालाला अनुरूप आणि योग्य असें काय होईल ह्याविषयीं हनुमान् पुनरपि विचार करूं लागला १७. ( तो ह्मणाला ) " सीतेला अवलोकन केल्यावांचून मी जर येथून वानरराज सुग्रीवाच्या नगरीमध्यें गेलों तर माझा त्या जाण्यामध्यें पुरुषार्थ तो काय ? १८. सागराचें हें मीं केलेलें उल्लंघन, लंकेमध्यें केलेला प्रवेश आणि राक्षसांचें दर्शन हें सर्वच व्यर्थ होईल १९. मीं किष्किंधानगरीमध्यें गेल्यावर एकत्र जुळलेले वानर, सुग्रीव अथवा ते दशरथपुत्र रामलक्ष्मण मला ह्मणतील काय ? २० ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे जाऊन " सीता

परुषं दारुणं तीक्ष्णं क्रूरमिन्द्रियतापनम् । सीतानिमित्तं दुर्वाक्यं श्रुत्वा स न भविष्यति २२ तं तु कृच्छ्रगतं दृष्ट्वा पञ्चत्वगतमानसम् । भृशानुरक्तमेधावी न भविष्यति लक्ष्मणः २३ विनष्टौ भ्रातरौ श्रुत्वा भरतोपि मरिष्यति । भरतं च मृतं दृष्ट्वा शत्रुघ्नो न भविष्यति २४ पुत्रान्मृतान्समीक्ष्याथ न भविष्यन्ति मातरः । कौसल्या च सुमित्रा च कैकेयी च न संशयः २५ कृतज्ञः सत्यसंधश्च सुग्रीवः प्लवगाधिपः । रामं तथागतं दृष्ट्वा ततस्त्यक्ष्यति जीवितम् २६ दुर्मना व्यथिता दीना निरानन्दा तपस्विनी । पीडिता भर्तृशोकेन रुमा त्यक्ष्यति जीवितम् २७ वालिजेन तु दुःखेन पीडिता शोककर्शिता । पञ्चत्वमागता राज्ञी तारापि न भविष्यति २८ मातापित्रोर्विनाशेन सुग्रीवव्यसनेन च । कुमारोऽप्यङ्गदस्तस्माद्विजहिष्यति जीवितम् २९ भर्तृजेन तु दुःखेन अभिभूता वनौकसः । शिरांस्यभिहनिष्यन्ति तलैर्मुष्टिभिरेव च ३० सान्त्वेनानुप्रदानेन मानेन च यशस्विना । लालिताः कपिनाथेन प्राणांस्त्यक्ष्यन्ति वानराः ३१ न वनेषु न शैलेषु न निरोधेषु

---

माझ्या दृष्टीं पडली नाहीं" असें कठोर भाषण जर मीं त्याच्याशीं केलें तर तो प्राण सोडील २१. कठोर, भयंकर, असह्य, उग्र आणि इंद्रियांना संताप देणारें असें सीतेसंबंधीं दुर्भाषण ऐकिल्यावर तो प्राण ठेवणार नाहीं २२. विपन्नावस्थेंत सांपडून मृत्यु पावलेल्या त्या रामाला अवलोकन केल्यावर त्याचे ठिकाणीं अत्यंत अनुरक्त असलेला विचारी लक्ष्मणही प्राण सोडील २३. आपले भ्राते नाहींसे झाल्याचें ऐकून भरतही मरून जाईल आणि भरत मेल्याचें पाहून शत्रुघ्नही जीव ठेवणार नाहीं २४. पुत्र मृत झाल्याचें अवलोकन करून कौसल्या, सुमित्रा व कैकेयी ह्या त्यांच्या माता निःसंशय प्राणत्याग करितील २५. रामाची तशी अवस्था झाल्याचें पाहून कृतज्ञ व सत्यवचनी वानरराज सुग्रीव प्राण देईल २६ आणि त्याच्यानंतर खिन्न, क्षुब्ध, दीन, दुःखित आणि पतिशोकानें व्याप्त झालेली बिचारी रुमाही जीविताचा त्याग करील २७. वालीच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेल्या दुःखानें व्याप्त होऊन शोकानें जर्जर झालेली आणि ह्मणूनच मरणाच्या दारीं बसलेली राजपत्नी ताराही इहलोक सोडून जाईल २८. मातापितरांचा नाश आणि सुग्रीवाचा मृत्यु ह्यांच्या योगानें कुमार अंगदही आपल्या जीविताचा त्याग करील २९. राजाच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेल्या दुःखानें वानर व्याप्त होतील आणि हातांनीं व मुठींनीं आपआपलीं डोकीं बडवून घेऊं लागतील ३०. सौम्य भाषण करून, देणग्या देऊन आणि मानमान्यता राखून वानराधिपति यशस्वी सुग्रीवानें ज्यांचे लाड पुरविले आहेत असे वानर प्राण-

वा पुनः । क्रीडामनुभविष्यन्ति समेत्य कपिकुञ्जराः ३२ सपुत्रदाराः सामात्या भर्तृव्यसनपीडिताः । शैलाग्रेभ्यः पतिष्यन्ति समेषु विषमेषु च ३३ विषमुद्बन्धनं वापि प्रवेशं ज्वलनस्य वा । उपवासमथो शस्त्रं प्रचरिष्यन्ति वानराः ३४ घोरमारोदनं मन्ये गते मयि भविष्यति । इक्ष्वाकुकुलनाशश्च नाशश्चैव वनौकसाम् ३५ सोहं नैव गमिष्यामि किष्किन्धां नगरीमितः । न हि शक्ष्याम्यहं द्रष्टुं सुग्रीवं मैथिलीं विना ३६ मय्यगच्छति चेहस्थे धर्मात्मानौ महारथौ । आशया तौ धरिष्येते वानराश्च तरस्विनः ३७ हस्तादानो मुखादानो नियतो वृक्षमूलिकः । वानप्रस्थो भविष्यामि अदृष्ट्वा जनकात्मजाम् ३८ सागरानूपजे देशे बहुमूलफलोदके । चितिं कृत्वा प्रवेक्ष्यामि समिद्धमरणीसुतम् ३९ उपविष्टस्य वा सम्यग्लिङ्गिनं साधयिष्यतः । शरीरं भक्षयिष्यन्ति वायसाः श्वापदानि च ४० इदमप्यृषिभिर्दृष्टं निर्याणमिति मे मतिः । सम्यगापः प्रवेक्ष्यामि न चेत्प-

---

त्याग करितील ३१. वनें, पर्वत, अथवा गुप्त स्थलें ह्यांमध्यें एकत्र जुळून श्रेष्ठ श्रेष्ठ वानर पुनरपि क्रीडा करितांना दृष्टीं पडनासे होतील ३२. कारण, सर्वही श्रेष्ठ वानर राजाच्या मरणामुळें पुत्र, स्त्रिया व अमात्य ह्यांसहवर्तमान दुःखाकुल होतील आणि पर्वतशिखरांपासून सपाट अथवा विषम प्रदेशावर उड्या घेतील ३३. सारांश, वानर विषप्राशन करितील, गळ्याला फांस लावून घेतील, अग्नीमध्यें उड्या घालतील, उपवास करून प्राण सोडतील अथवा शस्त्रानें आपलीं मस्तकें तोडून टाकितील ३४. तात्पर्य, मी तेथें गेलों असतां इक्ष्वाकुकुलाचा नाश आणि वानरांचा घात असा घोर अनर्थ प्राप्त होईल ३५. तस्मात्, मी येथून किष्किंधा नगरीला परत जाणारच नाहीं आणि सीता दृष्टीं पडल्यावांचून सुग्रीवाला तोंड दाखविणेंही मला उचित होणार नाहीं ३६. मी तिकडे न जातां येथेंच राहिलों ह्मणजे ते धर्मात्मे व महारथी रामलक्ष्मण आणि वेगवान् वानर आशेनें जीव धरून राहतील ३७. ह्याकरितां जनककन्या जर दृष्टीं पडली नाहीं तर वृक्षमूलाचा आश्रय करून मी आपला इकडेच वानप्रस्थ बनून राहीन आणि जितेंद्रिय राहून हातांत अथवा मुखांत येऊन पडलेल्या फलादिकांवर आपली उपजीविका करीत जाईन ३८. अथवा फळें, मुळें व उदक ह्यांची जेथें समृद्धि आहे अशा एखाद्या समुद्रतीरासमीप असलेल्या प्रदेशावर चिता रचून प्रज्वलित झालेल्या अग्नीमध्यें मी प्रवेश करीन ३९. किंवा प्रायोपवेशनाचा संकल्प करून प्राणत्याग करण्याकरितां मी बसलों असतां पक्षी व श्वापदें माझें शरीर भक्षण करून टाकितील ४०. अथवा हाही एक मरणाचा उपाय ऋषींना

श्यामि जानकीम् ४१ सुजातमूला सुभगा कीर्तिमाला यशस्विनी ।
प्रभग्ना चिररात्राय मम सीतामपश्यतः ४२ तापसो वा भविष्यामि
नियतो वृक्षमूलिकः । नेतः प्रतिगमिष्यामि तामदृष्ट्वासितेक्षणाम् ४३
यदि तु प्रतिगच्छामि सीतामनधिगम्य ताम् । अङ्गदः सहितः सर्वैर्वा-
नरैर्न भविष्यति ४४ विनाशे बहवो दोषा जीवन्प्राप्नोति भद्रकम् ।
तस्मात्प्राणान्धरिष्यामि ध्रुवो जीवति संगमः ४५ एवं बहुविधं दुःखं
मनसा धारयन्बहु । नाध्यगच्छत्तदा पारं शोकस्य कपिकुञ्जरः ४६
ततो विक्रममासाद्य धैर्यवान्कपिकुञ्जरः ४७ रावणं वा वधिष्यामि दशग्रीवं
महाबलम् । काममस्तु हृता सीता प्रत्याचीर्णं भविष्यति ४८ अथ
वैनं समुत्क्षिप्य उपर्युपरि सागरम् । रामायोपहरिष्यामि पशुं पशुपते-
रिव ४९ इति चिन्तासमापन्नः सीतामनधिगम्य ताम् । ध्यानशोकपरी-
तात्मा चिन्तयामास वानरः ५० यावत्सीतां न पश्यामि रामपत्नीं यश-

स्तमत आहे असें मला वाटतें. ह्यास्तव, जनककन्या जर माझ्या दृष्टीं पडली नाहीं तर मी स्वस्थ मनानें उदकामध्यें उडी घालीन ४१. कारण, सीता जर माझ्या दृष्टीं पडली नाहीं तर अक्षय, उत्कृष्ट आणि चोहोंकडे गाजलेली माझी कीर्तिपरंपरा कायमचीच नाहींशी होणार ४२. अथवा जितेंद्रिय राहून व वृक्षमूलाचा आश्रय करून मी येथें तपस्वीच बनून राहीन. कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता जर दृष्टीं पडली नाहीं तर मी येथून परत जाणार नाहीं ४३. त्या सीतेचा शोध लागल्या-शिवाय मी जर येथून परत जाईन तर सर्व वानरांसहवर्तमान अंगद प्राणत्याग करील ४४. छे ! प्राणत्याग करण्यामध्यें पुष्कळच दोष असून पुरुष जिवंत राहिला असतां त्याचें कधीं तरी कल्याण होतेंच. तस्मात् , मी प्राण धारण करून राहीन. कारण, पुरुष कायम राहिल्यास त्याला इष्ट असलेली गोष्ट कधींतरी निःसंशय प्राप्त होतच असते " ४५. ह्याप्रमाणें नानाप्रकारचें दुःख मनामध्यें आणूं लागलेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् शोकांतून पार पडेना ४६. तथापि तो धैर्यवान् वानरश्रेष्ठ धैर्य धरून आपल्याशींच ह्मणाला ४७ " चिंता नाहीं, सीतेचें हरण झालें आहे ना ? खुशाल होऊं दे ! मी महाबलाढ्य दशानन रावणाचा वध करीन ? ह्मणजे सीतेबद्दल सूड तरी उगविल्यासारिखें होईल ४८; अथवा ह्या रावणाला समुद्रावरून फेंकून देऊन पशुपतीकडे ज्याप्रमाणें पशु नेतात त्याप्रमाणें मी रामाकडे घेऊन जाईन ." ४९. ह्याप्रमाणें सीतेचा शोध न लागल्यामुळें चिंताक्रांत झालेला तो वानर पुनरपि काळजी व दुःख ह्यांनीं मन व्याप्त झाल्यामुळें चिंता करूं लागला ५०. " यशस्विनी रामपत्नी सीतेचा जोंपर्यंत

स्विनीम् । तावदेतां पुरीं लङ्कां विचिनोमि पुनःपुनः ५१ संपातिवचना-
च्चापि रामं यद्यानयाम्यहम् । अपश्यन्राघवो भार्यां निर्दहेत्सर्ववानरान् ५२
इहैव नियताहारो वत्स्यामि नियतेन्द्रियः । न मत्कृते विनश्येयुः सर्वे ते
नरवानराः ५३ अशोकवनिका चापि महतीयं महाद्रुमा । इमामधिगमि-
ष्यामि न हीयं विचिता मया ५४ वसून्रुद्रांस्तथादित्यानश्विनौ मरुतोपि
च । नमस्कृत्वा गमिष्यामि रक्षसां शोकवर्धनः ५५ जित्वा तु राक्षसा-
न्देवीमिक्ष्वाकुकुलनन्दिनीम् । संप्रदास्यामि रामाय सिद्धीमिव तप-
स्विने ५६ स मुहूर्तमिव ध्यात्वा चिन्ताविग्रथितेन्द्रियः । उदतिष्ठन्महा-
बाहुर्हनूमान्मारुतात्मजः ५७ नमोस्तु रामाय सलक्ष्मणाय देव्यै च तस्यै
जनकात्मजायै । नमोस्तु रुद्रेन्द्रयमानिलेभ्यो नमोस्तु चन्द्राग्निमरुद्ग-
णेभ्यः ५८ स तेभ्यस्तु नमस्कृत्वा सुग्रीवाय च मारुतिः । दिशः सर्वाः
समालोक्य सोशोकवनिकां प्रति ५९ स गत्वा मनसा पूर्वमशोकवनिकां
शुभाम् । उत्तरं चिन्तयामास वानरो मारुतात्मजः ६० ध्रुवं तु रक्षोब-

---

शोध लागला नाहीं तोंपर्यंत मी ही लंकानगरी वारंवार शोधीन ५१. ( सीता येथें खास आहे ह्या ) संपातीच्या वचनावर विश्वास ठेवून मी जर रामाला येथें घेऊन आलों आणि भार्या जर त्याच्या दृष्टीं पडली नाहीं तर तो सर्व वानरांना दग्ध करून टाकील ५२. तस्मात्, मी येथेंच नियमित आहाराचें अवलंबन करून व इंद्रियसंयमन करून राहीन. तेथं गेल्यावर माझ्याकरितां त्या सर्व वानरांचा नाश होणें योग्य नाहीं ५३. मोठ्या मोठ्या वृक्षांनीं युक्त असलेलें हें प्रचंड अशोकवन मी पहातों. हें मीं अद्यापि शोधिलेलें नाहीं ५४. वसु, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार आणि मरुद्गण ह्यांना नमस्कार करून मी, राक्षसांचा शोक वृद्धिंगत करणारा, अशोक वनांत जाईन ५५ आणि तपश्चर्येनें प्रसन्न झालेल्या देवता ज्याप्रमाणें तपस्वी पुरुषाला तपाचें फल देत असतात त्याप्रमाणें राक्षसांना जिंकून, इक्ष्वाकुकुलाला आनंद देणारी सीता मी रामाला अर्पण करीन" ५६. ह्याप्रमाणें मुहूर्तपर्यंत विचार करून मन चिंताक्रांत झालेला तो महापराक्रमी वायुपुत्र हनुमान् उठला ( आणि ह्मणाला ) ५७ "लक्ष्मणासहवर्तमान राम, ती देवी जनककन्या, रुद्र, इंद्र, यम, वायु, चंद्र, अग्नि आणि मरुद्गण ह्यांना नमस्कार असो" ५८. ह्याप्रमाणें त्या रामादिकांना व सुग्रीवाला नमस्कार करून व सर्व दिशा अवलोकन करून तो मारुति अशोकवनामध्यें गेला ५९. प्रथमतः त्या शुभ अशोकवनामध्यें जाण्याचें ठरविल्यानंतर पुढें काय करावयाचें त्याविषयीं तो वायुपुत्र वानर आपल्याशीं ह्मणाला ६० " सर्व संस्कारांनीं

हुला भविष्यति वनाकुला। अशोकवनिका पुण्या सर्वसंस्कारसंस्कृता ६१ रक्षिणश्चात्र विहिता नूनं रक्षन्ति पादपान्। भगवानपि विश्वात्मा नातिक्षोभं प्रवायति ६२ संक्षिप्तोऽयं मयात्मा च रामार्थे रावणस्य च। सिद्धिं दिशन्तु मे सर्वे देवाः सर्षिगणास्त्विह ६३ ब्रह्मा स्वयंभूर्भगवान्देवाश्चैव तपस्विनः। सिद्धिमग्निश्च वायुश्च पुरुहूतश्च वज्रभृत् ६४ वरुणः पाशहस्तश्च सोमादित्यौ तथैव च। अश्विनौ च महात्मानौ मरुतः सर्व एव च ६५ सिद्धिं सर्वाणि भूतानि भूतानां चैव यः प्रभुः। दास्यन्ति मम ये चान्येऽप्यदृष्टाः पथि गोचराः ६६ तदुन्नसं पाण्डुरदन्तमव्रणं शुचिस्मितं पद्मपलाशलोचनम्। द्रक्ष्ये कदार्यावदनं कदा न्वहं प्रसन्नताराधिपतुल्यवर्चसम् ६७ क्षुद्रेण हीनेन नृशंसमूर्तिना सुदारुणालंकृतवेषधारिणा। बलाभिभूता ह्यबला तपस्विनी कथं नु मे दृष्टिपथेऽद्य सा भवेत् ६८ [ ७०८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

स मुहूर्तमिव ध्यात्वा मनसा चाधिगम्य ताम्। अवप्लुतो महा-

युक्त असें तें उत्कृष्ट अशोकवन वृक्षसमुदायांनीं व्याप्त असून खरोखर राक्षसांनीं भरलेलें असेल ६१. ह्या वनामध्यें नेमिलेले रक्षक खरोखर वृक्षांचें रक्षण करीत आहेत आणि भगवान् वायुही विशेष जोरानें येथें वहात नाहीं ६२. रामाकरितां आणि रावणाकरितां मीं हें आपलें शरीर संकुचित केलें आहे. ह्या ठिकाणीं ऋषिगणांसह सर्व देव माझा मनोरथ सिद्धीस नेवोत ६३. त्याचप्रमाणें भगवान् स्वयंभु ब्रह्मदेव, तपस्वी देव, अग्नि, वायु, वज्रपाणि इंद्र ६४, हातामध्यें पाश धारण करणारा वरुण, चंद्र, सूर्य, महात्मे अश्विनीकुमार व सर्व मरुद्गण माझा यत्न सिद्धीस नेवोत ६५. सर्व भूतें, भूताधिपति आणि माझ्या दृष्टीस न पडलेल्या अशा मार्गांतील देवता मला सिद्धि देतील ६६ उन्नत नासिका, शुभ्र दंत, पवित्र हास्य, पद्मपत्रासारिखे विशाल नेत्र आणि निर्मल चंद्रासारिखी कांति ह्यांनीं युक्त असलेलें; तें साध्वीचें अखंड मुख माझ्या केव्हां बरें दृष्टीं पडेल ! ६७. क्षुद्र, नीच, दुष्ट आणि अत्यंत भयंकर असूनही विश्वसनीय वेष धारण करणाऱ्या रावणानें बलात्कारानें हरण करून नेलेली ती बिचारी अबला आज कशी बरें माझ्या दृष्टीं पडेल!" ६८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

एक मुहूर्तपर्यंत विचार करून आणि मनानें सीतेची भेट घेऊन तो महातेजस्वी

तेजाः प्राकारं तस्य वेश्मनः १ स तु संहृष्टसर्वाङ्गः प्राकारस्थो महाकपिः। पुष्पिताग्रान्वसन्तादौ ददर्श विविधान्द्रुमान् २ सालानशोकान्भव्यांश्च चम्पकांश्च सुपुष्पितान्। उद्दालकान्नागवृक्षांश्चूतान्कपिमुखानपि ३ तथाम्रवणसंपन्नां लताशतसमन्विताम्। ज्यामुक्त इव नाराचः पुप्लुवे वृक्षवाटिकाम् ४ स प्रविश्य विचित्रां तां विहगैरभिनादिताम्। राजतैः काञ्चनैश्चैव पादपैः सर्वतो वृताम् ५ विहगैर्मृगसङ्घैश्च विचित्रां चित्रकाननाम्। उदितादित्यसंकाशां ददर्श हनुमान्बली ६ वृतां नानाविधैर्वृक्षैः पुष्पोपगफलोपगैः। कोकिलैर्भृङ्गराजैश्च मत्तैर्नित्यनिषेविताम् ७ प्रहृष्टमनुजां काले मृगपक्षिमदाकुलाम्। मत्तबर्हिणसंघुष्टां नानाद्विजगणायुताम् ८ मार्गमाणो वरारोहां राजपुत्रीमनिन्दिताम्। सुखप्रसुप्तान्विहगान्बोधयामास वानरः ९ उत्पतद्भिर्द्विजगणैः पक्षैर्वातैः समाहताः। अनेकवर्णा विविधा मुमुचुः पुष्पवृष्टयः १० पुष्पावकीर्णः

---

हनुमान् त्या रावणाच्या गृहापासून उडी मारून अशोकवनाच्या भोंवतीं असलेल्या कोटावर गेला १. प्राकारावर जाऊन तो महाकपि बसला असतां त्याच्या सर्वांगावर रोमांच उठले आणि तेथून त्यानें वसंत ऋतूचे आरंभीं प्रफुल्लित झालेले नानाप्रकारचे वृक्ष ह्मणजे साल, भव्य अशोक, प्रफुल्लित चंपक, उद्दालक, नागकेसरवृक्ष आणि आकृतीनें वानरांच्या मुखासारिखीं फळें धारण करणार आं[illegible] अवलोकन केले २, ३. नंतर शेंकडों लतांनीं व आंबरायांनीं युक्त असलेल्या त्या [illegible] प्रत्यंचेपासून सुटलेल्या बाणाप्रमाणें त्यानें उडी मारिली ४ आणि ह्याप्रमाणें त्या आश्चर्यकारक अशोकवनामध्यें प्रवेश केल्यानंतर त्या बलाढ्य हनुमानानें तें वन अवलोकन केलें. तें पक्षिगणांनीं नादित झालेलें होतें; रौप्यवर्ण आणि सुवर्णवर्ण वृक्षांनीं तें सर्व बाजूंनीं व्याप्त झालेलें होतें; आश्चर्यकारक असून अद्भुत वृक्षसमुदायांनीं आणि पशुसमुदायांनीं व पक्ष्यांनीं तें युक्त होतें आणि उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें तें झळकत होतें ५, ६. त्याचप्रमाणें पुष्पफलांनीं युक्त असलेल्या नानाप्रकारच्या वृक्षांनीं तें युक्त असून मत्त भृंग व कोकिल त्यांत नेहमीं वास्तव्य करीत होते ७. त्यांतील लोक सर्वदां आनंदित होते; मत्त झालेल्या मयूरांनीं तें नादित झालेलें होतें; नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं तें युक्त होतें आणि मदमत्त झालेल्या इतरही पशुपक्ष्यांनीं तें व्याप्त होतें ८. असो. तो वानर हनुमान् निर्दोष आणि सौंदर्यसंपन्न अशा त्या राजकन्येचा शोध करूं लागला असतां स्वस्थ निजलेल्या पक्ष्यांची त्यानें झोंप मोडिली ९ आणि पक्षांच्या योगानें पक्षिगण उड्डाण करूं लागले असतां

शुशुभे हनूमान्मारुतात्मजः । अशोकवनिकामध्ये यथा पुष्पमयो
गिरिः ११ दिशः सर्वाभिधावन्तं वृक्षखण्डगतं कपिम् । दृष्ट्वा सर्वाणि
भूतानि वसन्त इति मेनिरे १२ वृक्षेभ्यः पतितैः पुष्पैरवकीर्णा पृथ-
ग्विधैः । रराज वसुधा तत्र प्रमदेव विभूषिता १३ तरस्विना ते तरव-
स्तरसा बहु कम्पिताः । कुसुमानि विचित्राणि ससृजुः कपिना तदा १४
निर्धूतपत्रशिखराः शीर्णपुष्पफलद्रुमाः । निक्षिप्तवस्त्राभरणा धूर्ता इव
पराजिताः १५ हनूमता वेगवता कम्पितास्ते नगोत्तमाः । पुष्पपत्रफला-
न्याशु मुमुचुः फलशालिनः १६ विहङ्गसङ्घैर्हीनास्ते स्कन्धमात्राश्रया
द्रुमाः । बभूवुरगमाः सर्वे मारुतेन विनिर्धुताः १७ विधूतकेशी युवति-
र्यथा मृदितवर्णका । निपीतशुभदन्तोष्ठी नखैर्दन्तैश्च विक्षता १८ तथा
लाङ्गूलहस्तैस्तु चरणाभ्यां च मर्दिता । तथैवाशोकवनिका प्रभग्नव-
नपादपा १९ महालतानां दामानि व्यधमत्तरसा कपिः । यथा प्रावृषि

त्यांच्या पंखांच्या वायूंनीं ताडित झाल्यामुळें वृक्षांपासून अनेक वर्णांच्या व
नानाप्रकारच्या पुष्पवृष्टि होऊं लागल्या १०. तेव्हां पुष्पांनीं भरून गेलेला तो वायु-
पुत्र हनुमान् पुष्पमय पर्वताप्रमाणें त्या अशोक वनांत शोभूं लागला ११. वनामध्यें
येऊन सर्व दिशेस धांवाधांव करूं लागलेल्या त्या कपीला अवलोकन केल्यावर वनां-
तील सर्व प्राणी तो वसंत ऋतुच (वानररूपानें) आला असावा असें मानूं लागले १२.
(त्याच्या धांवाधांवीमुळें) वृक्षांपासून पडलेल्या नानाप्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झालेली तेथील
भूमि अलंकार घातलेल्या तरुणी स्त्रीप्रमाणें चमकूं लागली १३. तो बलाढ्य कपि संचार
करूं लागला असतां त्याच्या वेगानें अतिशय कंपित झालेले वृक्ष चित्रविचित्र पुष्पांचा वर्षाव
करूं लागले १४ आणि ज्यांचीं पानें झडून जाऊन पुष्पें व फळेंही ज्यांचीं झडून गेलेलीं
आहेत असे तेथील वृक्ष, जुगारींत हरल्यामुळें वस्त्रें व भूषणें शरीरापासून काढून ठेविलेल्या
जुगाराप्रमाणें दिसूं लागले १५. फळांनीं भरलेले ते उत्कृष्ट वृक्ष, वेगवान् हनुमानाच्या
योगानें कंपित झाले असतां त्यांनीं एकदम पुष्पांचा, पानांचा व फळांचा त्याग
केला १६ आणि वायुपुत्र हनुमानानें कंपित केलेले ते सर्वही वृक्ष पक्षिगणांनींही
शून्य झाल्यामुळें त्यांचीं नुसतीं खोडेंच तेथें दिसूं लागलीं १७. जिच्या अंगाला
लाविलेली उटी चोळवटून गेलेली आहे, शुभ दंतांनीं युक्त असलेल्या जिच्या अधरो-
ष्ठाचें पान केलेलें आहे व (सुरतक्रीडेच्या वहरांत) जिला नखांनीं व दातांनीं क्षतें
पडलेलीं आहेत अशी केश अस्ताव्यस्त झालेली तरुणी स्त्री ज्याप्रमाणें दिसत
असते १८ त्याप्रमाणें आंतील वृक्ष मोडून पडून पुच्छ, हस्त आणि पाद ह्यांच्या

वेगेन मेघजालानि मारुतः २० स तत्र मणिभूमीश्च राजतीश्च मनोरमाः । तथा काञ्चनभूमीश्च विचरन्ददृशे कपिः २१ वापीश्च विविधाकाराः पूर्णाः परमवारिणा । महार्हैर्मणिसोपानैरुपपन्नास्ततस्ततः २२ मुक्ताप्रवालसिकताः स्फाटिकान्तरकुट्टिमाः । काञ्चनैस्तरुभिश्चित्रैस्तीरजैरुपशोभिताः २३ बुद्धपद्मोत्पलवनाश्चक्रवाकोपशोभिताः । नत्यूहरुतसंघुष्टा हंससारसनादिताः २४ दीर्घाभिर्द्रुमयुक्ताभिः सरिद्भिश्च समन्ततः । अमृतोपमतोयाभिः शिवाभिरुपसंस्कृताः २५ लताशतैरवतताः संतानकुसुमावृताः । नानागुल्मावृतवनाः करवीरकृतान्तराः २६ ततोम्बुधरसंकाशं प्रवृद्धशिखरं गिरिम् । विचित्रकूटं कूटैश्च सर्वतः परिवारितम् २७ शिलागृहैरवततं नानावृक्षसमावृतम् । ददर्श कपिशार्दूलो रम्यं जगति पर्वतम् २८ ददर्श च नगात्तस्मान्नदीं निपतितां

---

योगानें चोळवटून गेलेली ती अशोकवनिका दिसूं लागली १९. पर्जन्यकालामध्यें वायु ज्याप्रमाणें आपल्या वेगानें अभ्रपटलें उडवून देतो त्याप्रमाणें मोठ्या मोठ्या लतांचीं झांकरें आपल्या वेगाच्या योगानें त्या कपीनें उडवून दिलीं २०. त्या वनामध्यें संचार करितां करितां रौप्यमय, सुवर्णमय व रत्नमय मनोहर स्थलें त्या कपीनें अवलोकन केलीं २१. त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त, उत्कृष्ट उदकानें परिपूर्ण आणि ठिकठिकाणीं मोठ्या मोठ्या मूल्यवान् रत्नांच्या पायऱ्यांनीं युक्त अशा वापीही त्यानें अवलोकन केल्या २२. त्या वापींतील वाळु मोत्यांची व पोवळ्यांची होती; आंतील फरशी स्फटिकाची होती; तीरावरील चित्रविचित्र सुवर्णवृक्षांनीं त्यांना शोभा आलेली होती २३, प्रफुल्लित झालेले नानाप्रकारचे कमलसमुदाय त्यांमध्यें होते; चक्रवाक पक्ष्यांच्या योगानें त्यांना शोभा आलेली होती; जलकाक, हंस व सारस पक्षी ह्यांच्या ध्वनीनें त्या नादित झालेल्या होत्या २४; वृक्षयुक्त, दीर्घ आणि अमृततुल्य उदकानें परिपूर्ण अशा पवित्र नद्यांनीं सभोंवतीं त्या व्याप्त होत्या २५; शेंकडों लता त्यांवर पसरलेल्या होत्या; कल्पवृक्षांच्या पुष्पांनीं त्या आच्छादिलेल्या होत्या; नानाप्रकारच्या झांकरांनीं त्यांतील उदक आच्छादिलेलें होतें आणि त्यांत मधून मधून नेवतीचींही पुष्पें होतीं २६. तदनंतर मोठ्या मोठ्या शिखरांनीं युक्त असा विचित्रकूट पर्वत वानरश्रेष्ठ हनुमानानें तेथें अवलोकन केला. तो दिसण्यांत मेघासारिखा असून शिखरांच्या योगानें सर्व बाजूंनीं व्याप्त झालेला होता २७; त्याच्यावर जिकडे तिकडे शिलागृहें असून नानाप्रकारच्या वृक्षांनीं तो आच्छादिलेला होता आणि तो जगतामध्यें रम्य होता २८. रागारागानें प्रियाच्या अंकावरून उठून भूमीवर

कपिः । अङ्कादिव समुत्पत्य प्रियस्य पतितां प्रियाम् २९ जलेन पतिताग्रैश्च पादपैरुपशोभिताम् । वार्यमाणामिव क्रुद्धां प्रमदां प्रियबन्धुभिः ३० पुनरावृत्ततोयां च ददर्श स महाकपिः । प्रसन्नामिव कान्तस्य कान्तां पुनरुपस्थिताम् ३१ तस्यादूरात्स पद्मिन्यो नानाद्विजगणायुताः । ददर्श कपिशार्दूलो हनूमान्मारुतात्मजः ३२ कृत्रिमां दीर्घिकां चापि पूर्णां शीतेन वारिणा । मणिप्रवरसोपानां मुक्तासिकतशोभिताम् ३३ विविधैर्मृगसङ्घैश्च विचित्रां चित्रकाननाम् । प्रासादैः सुमहद्भिश्च निर्मितैर्विश्वकर्मणा ३४ काननैः कृत्रिमैश्चापि सर्वतः समलंकृताम् । ये केचित्पादपास्तत्र पुष्पोपगफलोपगाः ३५ सच्छत्राः सवितर्दीकाः सर्वे सौवर्णवेदिकाः। लताप्रतानैर्बहुभिः पर्णैश्च बहुभिर्वृताम् ३६ काञ्चनीं शिंशपामेकां ददर्श स महाकपिः । वृतां हेममयीभिस्तु वेदिकाभिः समन्ततः ३७ सोपश्यद्भूमिभागांश्च नगप्रस्रवणानि च । सुवर्णवृक्षानपरान्ददर्श शिखिसंनि-

शयन करीत पडलेल्या प्रियेप्रमाणें त्या पर्वतापासून निघालेली एक नदी त्या कपीनें अवलोकन केली २९. ज्यांचीं अग्रें उदकामध्यें गेलेलीं आहेत अशा तीरस्थ वृक्षांनीं सुशोभित असलेली ती नदी, पतीवर क्रुद्ध होऊन जाऊं लागल्यामुळें प्रिय बांधव जिचें निवारण करीत आहेत अशा तरुणी स्त्रीप्रमाणें दिसत होती ३०; वृक्षाग्रांची वगैरे आडकाठी आल्यामुळें त्या नदीचें उदक कोठें कोठें परत फिरल्यासारिखें झालें होतें आणि त्यामुळें प्रथमतः रागावून निघालेली परंतु, मागून प्रसन्न झाल्यावर पतिसंनिध आलेली स्त्रीच कीं काय अशी ती नदी त्या महाकपीला दिसली ३१. त्या पर्वतासमीपत्र नानाप्रकारच्या पक्षिगणांनी युक्त असलेलीं सरोवरें त्या कपिश्रेष्ठ वायुपुत्र हनुमानानें अवलोकन केलीं ३२. त्याचप्रमाणें शीत जलानें परिपूर्ण अशी एक तयार केलेली वापीही तेथें त्यानें अवलोकन केली. त्या वापीला उत्कृष्ट रत्नांच्या पायऱ्या केलेल्या होत्या; मोत्यांच्या वाळूनें ती सुशोभित झालेली होती ३३; नानाप्रकारच्या पशुसमुदायांनीं ती मनोहर दिसत होती; सभोंवतीं असलेल्या चित्रविचित्र वनांनीं ती युक्त होती आणि विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या प्रचंड राजवाड्यांनीं ३४ व कृत्रिम वनांनींही ती सर्व बाजूंनीं भूषित झालेली होती. तेथें जे कांहीं वृक्ष होते ते सर्व पुष्पांनीं व फलांनीं भरलेले होते ३५; त्यांचा आकार छत्राप्रमाणें होता आणि त्या सर्वांनाही खालीं मोठे मोठे रुप्याचे पार बांधिलेले असून त्यांवर सोन्याचे पार बांधिलेले होते. असंख्य लतावेलींनीं व असंख्य पत्रांनीं आच्छादित ३६ आणि सभोंवतीं सुवर्णमय पारांनीं परिवेष्टित असा एक सुवर्णवर्ण शिंशपावृक्ष ( ह्मणजे शिसवा ) त्या महाकपीनें

भान् ३८ तेषां द्रुमाणां प्रभया मेरोरिव महाकपिः । अमन्यत तदा वीरः काञ्चनोस्मीति सर्वतः ३९ तान्काञ्चनान्वृक्षगणान्मारुतेन प्रकम्पितान् । किङ्किणीशतनिर्घोषान्दृष्ट्वा विस्मयमागमत् ४० सुपुष्पिताग्रान्रुचिरांस्तरुणाङ्कुरपल्लवान् । तामारुह्य महावेगः शिंशपां पर्णसंवृताम् ४१ इतो द्रक्ष्यामि वैदेहीं रामदर्शनलालसाम् । इतश्चेतश्च दुःखार्तां संतपन्तीं यदृच्छया ४२ अशोकवनिका चेयं दृढं रम्या दुरात्मनः । चन्दनैश्चम्पकैश्चापि बकुलैश्च विभूषिता ४३ इयं च नलिनी रम्या द्विजसङ्घनिषेविता । इमां सा राजमहिषी नूनमेष्यति जानकी ४४ सा रामा राजमहिषी राघवस्य प्रिया सदा । वनसंचारकुशला ध्रुवमेष्यति जानकी ४५ अथवा मृगशावाक्षी वनस्यास्य विचक्षणा । वनमेष्यति सार्येह रामचिन्तासुकर्शिता ४६ रामशोकाभिसंतप्ता सा देवी वामलोचना । वनवासरता नित्य-

अवलोकन केला ३७ व त्याचप्रमाणे सुप्रदेश, पर्वतावरील जलप्रवाह आणि अग्नीसारिखे उज्ज्वल असे दुसरही सुवर्णवृक्ष त्याने अवलोकन केले ३८. मेरुपर्वताच्या प्रभेप्रमाणें असलेल्या त्या वृक्षांच्या प्रभेमुळें तो वीर महाकपि हनुमान् आपलें शरीर सर्व बाजूंनीं सुवर्णमयच आहे असें समजूं लागला ३९. साहजिक फलाप्रमाणें लहानलहान घंटा ज्यांना आहेत असे सुवर्णवृक्षसमुदाय वायूनें कंपित आणि ह्मणूनच शेंकडों घंटानादांनीं युक्त झालेले अवलोकन करून त्याला आश्चर्य वाटलें ४०. कारण, ते सुवर्णमय वृक्षगण मनोहर असून प्रफुल्लित अग्रें आणि कोमल अंकुर व पल्लव ह्यांनींही युक्त होते. असो. पर्णांनीं आच्छादिलेल्या त्या शिंशपा वृक्षावर तो महावेगवान् हनुमान् आरूढ झाला ( आणि मनामध्यें ह्मणाला ) ४१ " रामदर्शनाविषयीं उत्सुक आणि ह्मणूनच दुःखाकुल व संतप्त झालेली विदेहराजकन्या सीता स्वेच्छेनें इकडे तिकडे हिंडतां हिंडतां कदाचित् ह्या बाजूला आलेली माझ्या दृष्टीं पडेल ४२. त्या दुरात्म्या रावणाची ही अशोकवनिका अत्यंत रम्य असून चंदन, चंपक व बकुल वृक्ष ह्यांनीं विभूषित आहे ४३ आणि तिच्यामध्यें द्विजगणांनीं आश्रय केलेलें असें हें रम्य सरोवरही आहे. तस्मात्, ती राजपत्नी जानकी निःसंशय ह्या सरोवराकडे येईल ४४. रामाला सर्वदां प्रिय परंतु, सांप्रत त्याचा वियोग झालेली ती राजपत्नी जानकी वनामध्यें संचार करण्यांत निरढावलेली असल्यामुळें निःसंशय इकडेही येईल ४५. सारांश, हरणाच्या बछड्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती रामाच्या चिंतेनें अत्यंत कृश झालेली जानकी आज ह्या वनांत (आपल्या शोधार्थ कोणी आलें आहे कीं काय हें) पाहण्याकरितां तरी येथें येईल ४६. मनोहर नेत्रांनीं युक्त, वनवासाविषयीं तत्पर व

मेष्यते वनचारिणी ४७ वनेचराणां सततं नूनं स्पृहयते पुरा । रामस्य दयिता भार्या जनकस्य सुता सती ४८ संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी । नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ४९ तस्याश्चाप्यनुरूपेयमशोकवनिका शुभा । शुभायाः पार्थिवेन्द्रस्य पत्नी रामस्य संमता ५० यदि जीवति सा देवी ताराधिपतिभानना । आगमिष्यति सावश्यमिमां शीतजलां नदीम् ५१ एवं तु गत्वा हनुमान्महात्मा प्रतीक्षमाणो मनुजेन्द्रपत्नीम् । अवेक्षमाणश्च ददर्श सर्वं सुपुष्पिते पर्णघने निलीनः ५२ [ ७६० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

स वीक्षमाणस्तत्रस्थो मार्गमाणश्च मैथिलीम् । अवेक्षमाणश्च महीं सर्वां तामन्ववैक्षत १ संतानकलताभिश्च पादपैरुपशोभिताम् । दिव्यगन्धरसोपेतां सर्वतः समलंकृताम् २ तां स नन्दनसंकाशां मृगपक्षिभिरावृताम् । हर्म्यप्रासादसंबाधां कोकिलाकुलनिःस्वनाम् ३ काञ्चनोत्पलप-

---

रामाच्या शोकामुळें संतप्त झालेली ती सीता देवी वनामध्यें संचार करणारी असल्यामुळें नित्य इकडे येत असेल ४७. ती जनकाची कन्या साध्वी रामभार्या पूर्वी नेहमीं वनामध्यें संचार करणाऱ्या मृगपक्ष्यादिकांना पहाण्याची इच्छा करीत असेल ४८. संध्याकाळचें कर्म करण्याचें मनांत आणून त्याकरितां ती श्रेष्ठ स्त्री जानकी ह्या पवित्र उदकानें युक्त असलेल्या नदीवर निःसंशय येईल ४९. राजाधिराज रामाची जी प्रियपत्नी तिला योग्य अशी ही शुभ अशोकवनिका आहे ५०. चंद्राप्रमाणें आल्हादकारक जिचें मुख आहे अशी ती देवी सीता जर जिवंत असेल तर ह्या शीतजलानें भरलेल्या नदीप्रत अवश्य येईल" ५१. राजपत्नीला शोधण्याकरितां अशोकवनिकेमध्यें गेलेला तो महात्मा हनुमान् पानांनीं गच्च भरलेल्या प्रफुल्लित शिंशपा वृक्षामध्यें दडून बसून मनामध्यें ह्याप्रमाणें विचार करून पाहूं लागला तों पहातां पहातां तेथील सर्व काहीं त्याच्या दृष्टीं पडलें ५२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चवदावा सर्ग समाप्त झाला ॥ १४ ॥

शिंशपावृक्षावर बसून इकडे तिकडे दृष्टि फेंकीत असलेला तो हनुमान् मैथिलीचा शोध लावण्याकरितां खालीं पाहूं लागला असतां ती सर्व भूमि त्यानें अवलोकन केली १. कल्पलतांनीं युक्त असलेल्या वृक्षांनीं त्या भूमीला शोभा आलेली होती; दिव्य गंध आणि रस ह्यांनीं ती युक्त असून सर्व बाजूंनीं शृंगारिलेली होती २; मृग आणि पक्षी ह्यांनीं ती गजबजून गेलेली असून नंदनवनाप्रमाणें दिसत होती,

आभिर्वापीभिरुपशोभिताम् । बह्वासनकुथोपेतां बहुभूमिगृहायुताम् ४
सर्वर्तुकुसुमै रम्यैः फलवद्भिश्च पादपैः । पुष्पितानामशोकानां श्रिया
सूर्योदयप्रभाम् ५ प्रदीप्तामिव तत्रस्थो मारुतिः समुदैक्षत । निष्पत्रशाखां
विहगैः क्रियमाणामिवासकृत् ६ विनिष्पतद्भिः शतशश्चित्रैः पुष्पावतं-
सकैः । समूलपुष्परचितैरशोकैः शोकनाशनैः ७ पुष्पभारातिभारैश्च स्पृश-
द्भिरिव मेदिनीम् । कर्णिकारैः कुसुमितैः किंशुकैश्च सुपुष्पितैः ८ स देशः
प्रभया तेषां प्रदीप्त इव सर्वतः । पुंनागाः सप्तपर्णाश्च चम्पकोद्दालकास्तथा ९
विवृद्धमूला बहवः शोभन्ते स्म सुपुष्पिताः । शातकुम्भनिभाः केचित्के-
चिदग्निशिखप्रभाः १० नीलाञ्जननिभाः केचित्तत्राशोकाः सहस्रशः ।
नन्दनं विबुधोद्यानं चित्रं चैत्ररथं यथा ११ अतिवृत्तमिवाचिन्त्यं दिव्यं

---

कोकिलपक्ष्यांच्या शब्दांनें ती दुमदुमून गेलेली असून मोठ्यामोठ्या इमारती व वाडे ह्यांची तेथें गर्दी झालेली होती ३; अनेक प्रकारच्या सुवर्णकमलांनीं युक्त असलेल्या वापींच्या योगानें ती सुशोभित झालेली होती; अनेक प्रकारचीं आसनें व आस्तरणें तेथें घातलेलीं होतीं; पुष्कळ मजल्यांच्या गृहांनीं ती युक्त होती ४; सर्व ऋतूंतील मनोहर पुष्पांनीं व प्रफुल्लित वृक्षांनीं ती युक्त असून प्रफुल्लित अशोक वृक्षांच्या कांतीमुळें तिची प्रभा सूर्यासारिखी दिसत होती ५; आणि अशोकपुष्पांच्या योगानें ती जशी कांहीं प्रदीप्त झाल्यासारिखीच भासत होती. अशी जी अशोकवनांतील भूमि त्या शिंशपावृक्षावर बसून मारुतीनें अवलोकन केली तिच्यांतील वृक्ष पक्ष्यांच्या योगानें वारंवार पानें व खांद्या ह्यांनीं रहित होत होते ६; कारण, पुष्पें ज्यांना कर्णभूषणा-प्रमाणें शोभा देत होतीं असे शेंकडों अद्भुत पक्षी वारंवार तेथील वृक्षांवर येऊन बसत असल्यामुळें त्यांचीं पानें व शाखा आच्छादून जात असत; मुळें व पुष्पें ह्यांनीं युक्त असलेले शोकनाशक अशोकवृक्ष ७, पुष्पसमुदायांचा ज्यांना अति-शय भार झालेला आहे आणि ह्मणूनच भूमीला जे स्पर्श करीत आहेत असे प्रफुल्लित कर्णिकार वृक्ष आणि प्रफुल्लित पलाशवृक्ष ह्यांनीं युक्त असलेला ८ तो प्रदेश त्यांच्या प्रभेमुळें सर्व बाजूंनीं जसा कांहीं पेटल्यासारिखाच दिसत होता. उंडणी, सांतवण, चाफा आणि भोंकरी असे ९ मुळें खोल गेलेले पुष्कळच प्रफुल्लित वृक्ष तेथें शोभत होते; कांहीं सुवर्णासारिखे उज्ज्वल, कांहीं अग्नीच्या ज्वालेसा-रिखे देदीप्यमान १० आणि कांहीं कज्जलतुल्य असे हजारों अशोकवृक्ष तेथें होते. मनोहर शोभेनें युक्त, दिव्य व अचिंत्य असें एक उपवन त्या अशोकवनामध्यें त्या हनुमानानें अवलोकन केलें. तें देवांचें उपवन नंदन व कुबेराचें अद्भुत उपवन चैत्ररथ

रम्यश्रिया युतम्। द्वितीयमिव चाकाशं पुष्पज्योतिर्गणायुतम् १२ पुष्परत्नशतैश्चित्रं पञ्चमं सागरं यथा। सर्वर्तुपुष्पैर्निचितं पादपैर्मधुगन्धिभिः १३ नानानिनादैरुद्यानं रम्यं मृगगणद्विजैः। अनेकगन्धप्रवहं पुण्यगन्धं मनोहरम् १४ शैलेन्द्रमिव गन्धाढ्यं द्वितीयं गन्धमादनम्। अशोकवनिकायां तु तस्यां वानरपुंगवः १५ स ददर्शाविदूरस्थं चैत्यप्रासादमूर्जितम्। मध्ये स्तम्भसहस्रेण स्थितं कैलासपाण्डुरम् १६ प्रवालकृतसोपानं तप्तकाञ्चनवेदिकम्। मुष्णन्तमिव चक्षूंषि द्योतमानमिव श्रिया १७ निर्मलं प्रांशुभावत्वादुल्लिखन्तमिवाम्बरम्। ततो मलिनसंवीतां राक्षसीभिः समावृताम् १८ उपवासकृशां दीनां निःश्वसन्तीं पुनः पुनः। ददर्श शुक्लपक्षादौ चन्द्ररेखामिवामलाम् १९ मन्दप्रख्यायमानेन रूपेण रुचिरप्रभाम्। पिनद्धां धूमजालेन शिखामिव विभावसोः २० पीतेनैकेन संवीतां क्लिष्टे-

ह्यांनाही मागें टाकणारें होतें. पुष्परूप ज्योतिर्गणांनीं तें युक्त असल्यामुळें दुसरें आकाशच कीं काय असें दिसत होतें ११,१२; पुष्परूप शेंकडों रत्नांनीं युक्त असल्यामुळें तें अद्भुत वन पांचवा सागरच कीं काय असें भासत होतें; मधुर गंध आणि सार्वकालिक पुष्पें ह्यांनीं युक्त असलेल्या वृक्षांनीं तें उपवन अगदीं खेंचलेलें होतें १३; नानाप्रकारच्या ध्वनींनीं युक्त असलेल्या मृगसमुदायांनीं व पक्ष्यांनीं तें उपवन रम्य झालेलें होतें; अनेक प्रकारचे सुगंध त्यांत सुटलेले होते; उत्कृष्ट गंधांनीं तें युक्त असून मनोहर होतें १४ आणि सुगंधांनीं भरून गेलें असल्यामुळें तें दुसरा पर्वतराज गंधमादनच कीं काय असें भासत होतें. असो. त्या अशोकवनिकेमध्यें त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें १५ जवळच एक चिरेबंदी भव्य वाडा अवलोकन केला. मध्यें असलेल्या सहस्रस्तंभांच्या आधारानें तो राहिलेला होता; कैलासपर्वताप्रमाणें तो श्वेतवर्ण होता १६; पोंवळ्यांचे जिने त्यांत केलेले होते; शुद्ध सुवर्णाच्या भुया त्यांत केलेल्या होत्या; कांतीनें झळकत असल्यामुळें तो डोळे दिपवीत होता १७ आणि निर्मल असून उंच असल्यामुळें आकाश विदीर्णच करीत आहे कीं काय असा तो दिसत होता. तदनंतर राक्षसींनीं परिवेष्टित, मलिन वस्त्र परिधान केलेली १८, उपवासानें कृश झाल्यामुळें शुक्लपक्षाच्या आरंभीं असणाऱ्या निर्मल चंद्रकलेप्रमाणें भासत असलेली आणि वारंवार दुःखाचे सुस्कारे टाकीत असलेली दीन सीता लांबून त्याच्या दृष्टीं पडली १९. धुराच्या लोटानें व्याप्त झालेल्या अग्नीची ज्वाला ज्याप्रमाणें सुंदर प्रभेनें युक्त असूनही सरासरीच दृष्टोत्पत्तीस येत असते त्याचप्रमाणें मनोहर कांतीनें युक्त असलेल्या त्या सीतेचें रूपही सरासरीच मारुतीला ओळखूं येत होतें २०. उत्कृष्ट प्रकारचें एक जीर्ण पीत वस्त्र तिनें परिधान

नोत्तमवाससा। सपङ्कामनलंकारां विपद्मामिव पद्मिनीम् २१ पीडितां
दुःखसंतप्तां परिक्षीणां तपस्विनीम्। ग्रहेणाङ्गारकेणेव पीडितामिव रोहि-
णीम् २२ अश्रुपूर्णमुखीं दीनां कृशामनशनेन च। शोकध्यानपरां दीनां
नित्यं दुःखपरायणाम् २३ प्रियं जनमपश्यन्तीं पश्यन्तीं राक्षसीगणम्।
स्वगणेन मृगीं हीनां श्वगणेनावृतामिव २४ नीलनागाभया वेण्या जघनं
गतयैकया। नीलया नीरदापाये वनराज्या महीमिव २५ सुखार्हां दुःख-
संतप्तां व्यसनानामकोविदाम्। तां विलोक्य विशालाक्षीमधिकं मलिनां
कृशाम् २६ तर्कयामास सीतेति कारणैरुपपादिभिः। ह्रियमाणा तदा
तेन रक्षसा कामरूपिणा २७ यथारूपा हि दृष्टा सा तथारूपेयमङ्गना।
पूर्णचन्द्राननां सुभ्रूं चारुवृत्तपयोधराम् २८ कुर्वतीं प्रभया देवीं सर्वा
वितिमिरा दिशः। तां नीलकण्ठीं बिम्बोष्ठीं सुमध्यां सुप्रतिष्ठिताम् २९

---

केलेलें होतें व अंगावर विशेषसे अलंकार नसल्यामुळें ती पंकयुक्त आणि कमलरहित कमलिनीप्रमाणें दिसत होती २१. रावणानें पीडित, दुःखसंतप्त आणि अतिशय क्षीण झालेली ती बिचारी सीता मंगलतुल्य केतुग्रहानें पीडित झालेली रोहिणीच कीं काय अशी दिसत होती २२. तिचें मुख अश्रूंनीं भरून गेलेलें होतें; ती दीन असून उप-वासामुळें कृश झालेली होती आणि एकसारखी शोक व काळजी करीत असून ती अनाथ झालेली सीता नेहमीं अतिशय दुःख करीत होती २३. आपणाला प्रिय अस-लेलें कोणीच दृष्टीं न पडतां राक्षसस्त्रियांचा समुदायच कायतो तिच्या दृष्टीं पडत असल्यामुळें मृगांच्या कळपांतून चुकून श्वानसमूहानें परिवेष्टित झालेल्या हरिणीप्रमाणें तिची स्थिति झाली होती २४ आणि पाठीवरून कटिप्रदेशापर्यंत लोंबत असलेली तिची मोकळी वेणी नीलवर्ण नागाप्रमाणें दिसत असल्यामुळें ती पर्जन्यकालानंतर नीलवर्ण वनपं-क्तीच्या योगानें शोभणाऱ्या भूमीप्रमाणें शोभत होती २५. सुखोपभोगास योग्य असू-नही दुःखसंतप्त, संकटाचा पूर्वीं अनुभव नसलेली, विशाल नेत्रांनीं युक्त आणि पूर्वी-पेक्षां फारच कृश व मलीन झालेली ती दृष्टोत्पत्तीस आल्यावर २६ "ही सीताच असावी" असा त्यानें कांहीं संदेहनाशक गोष्टीवरून तर्क केला. स्वेच्छेप्रमाणें रूप धारण करणारा तो रावणराक्षस तिला घेऊन चालला असतांना २७ ती ज्याप्रमाणें दृष्टीं पडली तशा प्रकारची ही स्त्री दिसत आहे ( असा हनुमानानें तर्क केला ). ती देवी उत्कृष्ट भिवया, पूर्णचंद्राप्रमाणें मुख आणि सुंदर व वर्तुल स्तन ह्यांनीं युक्त असून आपल्या प्रभेनें सर्व दिशा प्रकाशित करीत होती; ( इंद्रनीलमण्यांच्या कंठभूषणांचे प्रभेनें ) तिचा कंठ नीलवर्ण दिसत होता; तिचे ओंठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें होते;

सीतां पद्मपलाशाक्षीं मन्मथस्य रतिं यथा । इष्टां सर्वस्य जगतः पूर्णच-
न्द्रप्रभामिव ३० भूमौ सुतनुमासीनां नियतामिव तापसीम् । निःश्वास-
बहुलां भीरुं भुजगेन्द्रवधूमिव ३१ शोकजालेन महता विततेन न राज-
तीम् । संसक्तां धूमजालेन शिखामिव विभावसोः ३२ तां स्मृतीमिव
संदिग्धामृद्धिं निपतितामिव । विहतामिव च श्रद्धामाशां प्रतिहतामिव ३३
सोपसर्गां यथा सिद्धिं बुद्धिं सकलुषामिव । अभूतेनापवादेन कीर्तिं निप-
तितामिव ३४ रामोपरोधव्यथितां रक्षोगणनिपीडिताम् । अबलां मृग-
शावाक्षीं वीक्षमाणां ततस्ततः ३५ बाष्पाम्बुपरिपूर्णेन कृष्णवक्राक्षिप-
क्ष्मणा । वदनेनाप्रसन्नेन निःश्वसन्तीं पुनः पुनः ३६ मलपङ्कधरां दीनां
मण्डनार्हाममण्डिताम् । प्रभां नक्षत्रराजस्य कालमेघैरिवावृताम् ३७ तस्य
संदिदिहे बुद्धिस्तथा सीतां निरीक्ष्य च । आम्नायानामयोगेन विद्यां प्रशि-

तिचा बांधा उत्कृष्ट होता २८,२९; कमलपत्राप्रमाणें विस्तीर्ण नेत्रांनीं युक्त असून मदनाच्या रतीप्रमाणें ती सीता दिसत होती; पूर्णचंद्राच्या प्रभेप्रमाणें ती सर्व जगताला प्रिय होती ३०; तिच्या शरीराची काठी सडपातळ असून जितेंद्रिय तापसीप्रमाणें ती भूमीवर बसली होती; नागराजाच्या पत्नीप्रमाणें ती भयभीत होऊन एकसारिखे सुस्कारे टाकीत होती ३१; प्रचंड व वृद्धिंगत झालेल्या शोकजालांत सांपडल्या कारणानें धुराच्या लोटांत सांपडलेल्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ती निस्तेज दिसत होती ३२; अर्थाविषयीं संदेह असलेली स्मृतिच कीं काय, अन्यायानें हरण करून आणिलेली संपत्तिच कीं काय, नास्तिकबुद्धीनें हाणून पाडिलेली श्रद्धाच कीं काय, निष्फल झालेली आशाच कीं काय ३३, विघ्नानें घेरून टाकिलेली सिद्धिच कीं काय, (रागद्वेषादिकांनीं) कलुषित झालेली बुद्धिच कीं काय अथवा केवल असत्याचें अवलंबन करून दिलेल्या दूषणानें हाणून पाडिलेली कीर्तिच कीं काय अशी ती दिसत होती ३४. रामाच्या सेवेला अंतरल्यामुळें ती दुःखित झालेली होती; राक्षसगणांनीं तिला त्रस्त करून सोडिली होती; हरिणाच्या छाव्याप्रमाणें मनोहर नेत्रांनीं युक्त असलेली ती अबला इकडे तिकडे पहात होती ३५; अश्रुजलानें परिपूर्ण, कृष्णवर्ण व कुटिल पापण्यांनीं युक्त व अप्रसन्न अशा मुखानें ती युक्त असून वारंवार सुस्कारे टाकीत होती ३६ आणि अंगाला मळ व चिखल लागला असल्याकारणानें शृंगार घालण्यास योग्य असूनही शृंगाररहित असल्यामुळें ती कृष्णवर्ण मेघांनीं आच्छादिलेल्या चंद्राच्या प्रभेप्रमाणें दीन दिसत होती ३७. असो. अभ्यास नसल्यामुळें फारच शिथिल झालेल्या विद्येप्रमाणें अस्ताव्यस्त झालेल्या त्या सीतेला अवलोकन करून ( आपण ऐकिलेली सीता हीच आहे किंवा काय

थिलामिव ३८ दुःखेन बुबुधे सीतां हनुमाननलंकृताम् । संस्कारेण यथा हीनां वाचमर्थान्तरं गताम् ३९ तां समीक्ष्य विशालाक्षीं राजपुत्रीमनिन्दिताम् । तर्कयामास सीतेति कारणैरुपपादयन् ४० वैदेह्या यानि चाङ्गेषु तदा रामोन्वकीर्तयत् । तान्याभरणजालानि गात्रशोभीन्यलक्षयत् ४१ सुकृतौ कर्णवेष्टौ च श्वदंष्ट्रौ च सुसंस्थितौ । मणिविद्रुमचित्राणि हस्तेष्वाभरणानि च ४२ श्यामानि चिरयुक्तत्वात्तथा संस्थानवन्ति च । तान्येवैतानि मन्येहं यानि रामोन्वकीर्तयत् ४३ तत्र यान्यवहीनानि तान्यहं नोपलक्षये । यान्यस्या नावहीनानि तानीमानि न संशयः ४४ पीतं कनकपट्टाभं स्रस्तं तद्वसनं शुभम् । उत्तरीयं नगासक्तं तदा दृष्टं प्लवङ्गमैः ४५ भूषणानि च मुख्यानि दृष्टानि धरणीतले । अनयैवापविद्धानि स्वनवन्ति महान्ति च ४६ इदं चिरगृहीतत्वाद्वसनं क्लिष्टवत्तरम् । तथाप्यनूनं तद्वर्णं तथा श्रीमद्यथेतरत् ४७ इयं कन-

---

असा ) मारुतीला संशय आला ३८; परंतु, पदच्छेदादि संस्कारानें रहित आणि विवक्षित अर्थाशिवाय अन्यार्थाची वाचक असलेली उक्ति ज्याप्रमाणें मोठ्या कष्टानें ध्यानांत येते त्याप्रमाणें शृंगाररहित असलेल्या त्या सीतेची मोठ्या कष्टानें हनुमानाला ओळख पटली ३९. सारांश, विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या निर्दोष राजकन्येला अवलोकन करून प्रमाणांनीं निश्चय करणाऱ्या हनुमानानें " ही सीताच असावी " असा तर्क केला ४०. विदेहराजकन्येच्या अंगावरील जीं भूषणें रामानें कथन केलीं होतीं तींच शरीराला शोभा देणारीं भूषणें तेथें हनुमानाच्या दृष्टीं पडलीं ४१. (तेव्हां तो मनामध्यें ह्मणाला )" उत्तम रीतीनें तयार केलेलीं कुंडलें, चांगले डौलदार काप आणि हिरे व पोंवळीं बसविल्यामुळें चित्रविचित्र दिसत असलेलीं हस्तभूषणें ४२ फार दिवस साफसूफ केलीं नसल्यामुळें जरी श्यामवर्ण झालेलीं आहेत तरी आकार तसाच कायम असल्यामुळें रामानें जीं सांगितलीं तींच हीं आहेत असें मला वाटतें ४३. रामानें सांगितल्यापैकीं मार्गामध्यें जीं भूषणें पडून गेलीं आहेत तीं माझ्या दृष्टीं पडत नाहींत; परंतु, मार्गामध्यें सीतेच्या अंगावरून जीं गळून पडलेलीं नाहींत तीं हींच ह्याविषयीं संशय नाहीं ४४. सुवर्णतंतूंनीं निर्माण केलेल्या वस्त्राप्रमाणें सीतेचें गळून पडलेलें पीतवर्ण व शुभ उत्तरीय वस्त्र वृक्षाला अडकलेलें त्यावेळीं वानरांनीं अवलोकन केलें होतें ४५ आणि त्याचप्रमाणें हिनेंच टाकिलेलीं मोठीं मोठीं ध्वनियुक्त उत्कृष्ट भूषणेंही भूतलावर पडलेलीं त्यांनीं पाहिलीं होतीं ४६. हिनें नेसलेलें हें वस्त्र धारण करून पुष्कळ दिवस झाल्यामुळें जरी ह्याची फारच दुर्दशा झालेली आहे तरी ह्याचा

कवर्णाङ्गी रामस्य महिषी प्रिया । प्रणष्टापि सती यस्य मनसो न प्रणश्यति ४८ इयं सा यत्कृते रामश्चतुर्भिरिह तप्यते। कारुण्येनानृशंस्येन शोकेन मदनेन च ४९ स्त्री प्रणष्टेति कारुण्यादाश्रितेत्यानृशंस्यतः । पत्नी नष्टेति शोकेन प्रियेति मदनेन च ५० तस्या देव्या यथारूपमङ्गप्रत्यङ्गसौष्ठवम् । रामस्य च यथारूपं तस्येयमसितेक्षणा ५१ अस्या देव्या मनस्तस्मिंस्तस्य चास्यां प्रतिष्ठितम् । तेनेयं स च धर्मात्मा मुहूर्तमपि जीवति ५२ दुष्करं कृतवान्रामो हीनो यदनया प्रभुः । धारयत्यात्मनो देहं न शोकेनावसीदति ५३ एवं सीतां तथा दृष्ट्वा हृष्टः पवनसंभवः । जगाम मनसा रामं प्रशशंस च तं प्रभुम् ५४ [ ८१४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥

---

वर्ण जवळ जवळ त्याच्याप्रमाणेंच हें शोभत आहे ४७. दृष्टीचे आड झाली असतांही जी साध्वी रामाच्या मनांतून नाहींशी होत नाहीं तीच ही सुवर्णवर्ण शरीरानें युक्त असलेली रामाची प्रिय पत्नी होय ४८. जिच्याकरितां कारुण्य, आनृशंस्य, शोक आणि मदनबाधा ह्या चोहोंनीं राम संतप्त झाला आहे तीच ही ४९. तिला दुसऱ्यानें दुःख दिलें ह्मणून कारुण्यानें तो संतप्त झाला आहे; आपल्या आश्रयाला ती असूनही तिचें रक्षण झालें नाहीं ह्मणून आनृशंस्यबुद्धीनें ( ह्मणजे आश्रिताचें संरक्षण करावें ह्या बुद्धीनें ) त्याला कांहीं सुचेनासें झालें आहे; आपली धर्मपत्नी नष्ट झाली ह्मणून शोकानें तो क्षुब्ध झाला आहे आणि आपली प्रियाच नाहींशी झाली ह्मणून ( पूर्वी तिच्यासहवर्तमान अनुभविलेल्या विषयोपभोगाचें एकसारिखें स्मरण होत असल्यामुळें उत्पन्न झालेल्या ) मदनाच्या योगानें त्याला फारच ताप झालेला आहे ५०. कृष्ण नेत्रांनीं युक्त असलेली ही त्या रामाचीच पत्नी असून रामाचें व त्याच्या पत्नीचें रूप आणि लहान मोठ्या अवयवांचेंही सौंदर्य हीं अगदीं एकसारखींच आहेत ५१. ह्या देवीचें मन त्याचे ठिकाणीं आसक्त झालेलें असून त्याचें मन हिचे ठिकाणीं खिळून गेलेलें आहे आणि ह्मणूनच त्याच्यावांचून ही व हिच्यावांचून तो धर्मात्मा मुहूर्तभरही जिवंत रहाणें मला अशक्य दिसत आहे ५२. हिचा वियोग झाला असूनही शोकानें मृत्युमुखीं न पडतां रामानें आपला देह धारण केला हें त्या प्रभूनें दुर्घटच कर्म केलें " ५३. ह्याप्रमाणें सीतेला अवलोकन केल्यावर वायुपुत्र हनुमान् आनंदित झाला आणि रामाचें स्मरण करून त्या प्रभूची प्रशंसा करूं लागला ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

प्रशस्य तु प्रशस्तव्यां सीतां तां हरिपुङ्गवः। गुणाभिरामं रामं च पुनश्चिन्तापरोभवत् १ स मुहूर्तमिव ध्यात्वा बाष्पपर्याकुलेक्षणः । सीतामाश्रित्य तेजस्वी हनूमान्विललाप ह २ मान्या गुरुविनीतस्य लक्ष्मणस्य गुरुप्रिया । यदि सीता हि दुःखार्ता कालो हि दुरतिक्रमः ३ रामस्य व्यवसायज्ञा लक्ष्मणस्य च धीमतः । नात्यर्थं क्षुभ्यते देवी गङ्गेव जलदागमे ४ तुल्यशीलवयोवृत्तां तुल्याभिजनलक्षणाम् । राघवोर्हति वैदेहीं तं चेयमसितेक्षणा ५ तां दृष्ट्वा नवहेमाभां लोककान्तामिव श्रियम् । जगाम मनसा रामं वचनं चेदमब्रवीत् ६ अस्या हेतोर्विशालाक्ष्या हतो वाली महाबलः । रावणप्रतिमो वीर्ये कबन्धश्च निपातितः ७ विराधश्च हतः संख्ये राक्षसो भीमविक्रमः । वने रामेण विक्रम्य महेन्द्रेणेव शम्बरः ८ चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । निहतानि जनस्थाने शरैरग्निशिखोपमैः ९ खरश्च निहतः संख्ये त्रिशिराश्च निपातितः । दूषणश्च

---

प्रशंसेस पात्र असलेली ती सीता आणि गुणांच्या योगानें मनोहर असलेला राम ह्यांची प्रशंसा करून पुनरपि तो वानरश्रेष्ठ हनुमान् चिंताक्रांत झाला १. सीतेसंबंधानें क्षणभर विचार करितांक्षणीं त्या हनुमानाचे नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून आले आणि तो तेजस्वी असूनही विलाप करूं लागला २. ( तो ह्मणाला ) " गुरुजनांनीं सुशिक्षित केलेल्या लक्ष्मणाला गुरुपत्नी ह्मणून मान्य असलेली सीताही ज्याअर्थीं दुःखानें त्रस्त झाली आहे त्याअर्थीं कालाचें उल्लंघन होणें दुर्घट आहे (हीच गोष्ट खरी. ) ३. राम आणि विचारी लक्ष्मण ह्या दोघांचाही पराक्रम जाणीत असल्यामुळें ही सीता देवी पर्जन्यकालीं क्षुब्ध होणाऱ्या गंगेप्रमाणें बेताबातानेंच क्षुब्ध झाली आहे ४. शील, वय, आचरण, कुल, व लक्षणें ह्यांनीं रामाप्रमाणें असलेली ही विदेहराजकन्या रामालाच योग्य असून तोही ह्या कृष्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या सीतेला अगदीं योग्य आहे " ५. तदनंतर सर्व जगतांतील सौंदर्यसंपन्न लक्ष्मीच कीं काय अशी ती तप्त सुवर्णासारिख्या कांतीनें युक्त असलेली सीता अवलोकन केल्यावर हनुमानाला पुनरपि रामाचें स्मरण झालें आणि तो ह्मणाला ६ " विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या ह्या सीतेकरितांच महाबलाढ्य वालीचा आणि वीर्यामध्यें रावणाची बरोबरी करणाऱ्या कबंधाचा वध झाला ७. इंद्रानें ज्याप्रमाणें शंबरासुराचा वध केला त्याप्रमाणें रामानें वनामध्यें पराक्रम करून भयंकर पराक्रमी विराध राक्षसाचा समरांगणामध्यें हिच्याकरितां वध केला ८. भयंकर पराक्रम करणारे चवदा हजार राक्षस जनस्थानामध्यें अग्निज्वालेसारिख्या तीक्ष्ण बाणांनीं रामाच्या हातून हिच्याकरितां

महातेजा रामेण विदितात्मना १० ऐश्वर्यं वानराणां च दुर्लभं वालिपालितम् । अस्या निमित्ते सुग्रीवः प्राप्तवाँल्लोकविश्रुतः ११ सागरश्च मयाक्रान्तः श्रीमान्नदनदीपतिः । अस्या हेतोर्विशालाक्ष्याः पुरी चेयं निरीक्षिता १२ यदि रामः समुद्रान्तां मेदिनीं परिवर्तयेत् । अस्याः कृते जगच्चापि युक्तमित्येव मे मतिः १३ राज्यं वा त्रिषु लोकेषु सीता वा जनकात्मजा । त्रैलोक्यराज्यं सकलं सीताया नाप्नुयात्कलाम् १४ इयं सा धर्मशीलस्य जनकस्य महात्मनः । सुता मैथिलराजस्य सीता भर्तृदृढव्रता १५ उत्थिता मेदिनीं भित्त्वा क्षेत्रे हलमुखक्षते । पद्मरेणुनिभैः कीर्णा शुभैः केदारपांसुभिः १६ विक्रान्तस्यार्यशीलस्य संयुगेष्वनिवर्तिनः । स्नुषा दशरथस्यैषा ज्येष्ठा राज्ञो यशस्विनी १७ धर्मज्ञस्य कृतज्ञस्य रामस्य विदितात्मनः । इयं सा दयिता भार्या राक्षसीवशमागता १८ सर्वान्भोगान्परित्यज्य भर्तृस्नेहबलात्कृता । अचिन्तयित्वा कष्टानि प्रविष्टा निर्जनं वनम् १९ संतुष्टा फलमूलेन भर्तृशुश्रूषणापरा । या परां भजते प्रीतिं

---

वध पावले ९. त्याचप्रमाणें आत्मवेत्त्या रामानें युद्धामध्यें खर, महातेजस्वी दूषण आणि त्रिशिरा ह्यांचा निःपात केला १० आणि जगद्विख्यात सुग्रीवालाही हिच्यामुळेंच वालीनें रक्षिलेलें वानरांचें दुर्लभ ऐश्वर्य प्राप्त झालें ११. ह्या विशालनयना सीतेकरितांच नद व नद्या ह्यांचा अधिपति जो भव्य सागर त्याचें मीं उल्लंघन करून ही लंकानगरी अवलोकन केली १२. रामानें हिच्याकरितां केवळ समुद्रवलयांकित पृथ्वीच नव्हे परंतु, सर्व ब्रह्मांड जरी उलथें पालथें केलें तरी सुद्धां योग्य आहे असें मला वाटतें १३. त्रैलोक्याचें आधिपत्य आणि जनककन्या सीता ह्या दोहोंची जर तुलना करून पाहिली तर त्रैलोक्याचें संपूर्ण राज्य सीतेच्या पासंगालाही पुरणार नाहीं १४. मिथिलाधिपति महात्म्या धर्मशील जनकराजाची अत्यंत पतिव्रता जी कन्या ती ही १५. नांगराच्या टोकानें डवचलेल्या शेतामध्यें शेतांतील कमलपरागतुल्य अशा रजःकणांनीं व्याप्त असलेली ती सीता भूमीचा भेद करून निघाली १६ आणि पुढें पराक्रमी, सुशील आणि संग्रामामध्यें परत न फिरणाऱ्या दशरथराजाची ही यशस्विनी ज्येष्ठ स्नुषा झाली १७. सारांश, जगद्विख्यात, कृतज्ञ व धर्मज्ञ रामाची ती ही प्रिय भार्या सांप्रत राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडली आहे १८. भर्तृप्रेमाचें प्रबल प्रोत्साहन मिळाल्यामुळें दुःखांचा विचार न करितां सर्व भोग्य वस्तूंचा त्याग करून ती निर्जन वनामध्यें प्रविष्ट झाली १९; इतकेंच नव्हे परंतु, भर्त्याच्या शुश्रूषेविषयीं तत्पर राहून फलमूलांवर संतुष्ट राहूं लागलेल्या त्या सीतेला वनामध्येंही घरांप्रमाणेंच उत्कृष्ट

वनेपि भवने यथा २० सेयं कनकवर्णाङ्गी नित्यं सुस्मितभाषिणी । सहते यातनामेतामनर्थानामभागिनी २१ इमां तु शीलसंपन्नां द्रष्टुमिच्छति राघवः । रावणेन प्रमथितां प्रपामिव पिपासितः २२ अस्या नूनं पुनर्लाभाद्राघवः प्रीतिमेष्यति । राजा राज्यपरिभ्रष्टः पुनः प्राप्येव मेदिनीम् २३ कामभोगैः परित्यक्ता हीना बन्धुजनेन च । धारयत्यात्मनो देहं तत्समागमकाङ्क्षिणी २४ नैषा पश्यति राक्षस्यो नेमान्पुष्पफलद्रुमान् । एकस्थहृदया नूनं राममेवानुपश्यति २५ भर्ता नाम परं नार्याः शोभनं भूषणादपि । एषा हि रहिता तेन शोभनार्हा न शोभते २६ दुष्करं कुरुते रामो हीनो यदनया प्रभुः । धारयत्यात्मनो देहं न दुःखेनावसीदति २७ इमामसितकेशान्तां शतपत्रनिभेक्षणाम् । सुखार्हां दुःखितां ज्ञात्वा ममापि व्यथितं मनः २८ क्षितिक्षमा पुष्करसंनिभेक्षणा या रक्षिता राघवलक्ष्मणाभ्याम् । सा राक्षसीभिर्विकृतेक्षणाभिः संर-

---

आनंद वाटूं लागला २०; परंतु, ती ही सुवर्णासारिख्या शरीरकांतीनें युक्त व नेहमीं उत्कृष्ट हास्यपूर्वक भाषण करणारी सीता संकटें भोगण्यास पात्र नसतांनाही सांप्रत ही यातना सहन करीत आहे २१. रावणानें जरी हिला हरण करून नेलें आहे तरी ही शीलसंपन्न असल्यामुळें एकादा तृषार्त झालेला पुरुष ज्याप्रमाणें पाणपोई पहाण्याची इच्छा करीत असतो त्याप्रमाणें रघुवंशज राम हिच्या दर्शनाची इच्छा करीत आहे २२. रामाला जर ही पुनरपि प्राप्त झाली तर राज्यापासून भ्रष्ट झालेल्या राजाला ज्याप्रमाणें पुनरपि पृथ्वी प्राप्त झाल्यावर आनंद होतो त्याप्रमाणें त्याला खरोखर आनंद होईल २३. चंदन, पुष्पमाला इत्यादि भोग्य वस्तूंनीं सोडिलेली आणि बंधुजनांचाही वियोग झालेली ही सीता त्या रामाचा समागम होईल ह्या आशेवर आपला देह धारण करीत आहे २४. ह्या राक्षसी आणि पुष्पफलांनीं युक्त असलेले हे वृक्ष हिच्या दृष्टीं पडत नाहींत. एका रामाकडेच हिच्या चित्ताचें लय लागलेलें आहे आणि त्यामुळें खरोखर केवल रामालाच ही अवलोकन करीत आहे २५. अलंकारांपेक्षांही भर्ता हेंच उत्कृष्ट भूषण आहे आणि ह्मणूनच त्या भर्त्याचा वियोग झालेली ही सीता शोभेला पात्र असूनही शोभत नाहीं २६. हिचा वियोग झाला असूनही राम दुःखानें नष्ट न होतां आपला देह धारण करीत आहे हें खरोखर मोठें दुर्घटच त्या प्रभूच्या हातून होत आहे २७. कारण, अग्रांसहवर्तमानही कृष्णवर्ण केशांनीं आणि कमलपत्रासारिख्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ही सीता केवल सुखालाच पात्र असूनही दुःखित झाली आहे असें समजल्यामुळें माझ्याही मनाला दुःख झालें आहे २८. अरेरे!

क्ष्यते संप्रति वृक्षमूले २९ हिमहतनलिनीव नष्टशोभा व्यसनपरम्परया निपीड्यमाना । सहचररहितेव चक्रवाकी जनकसुता कृपणां दशां प्रपन्ना ३० अस्या हि पुष्पावनताग्रशाखाः शोकं दृढं वै जनयन्त्यशोकाः । हिमव्यपायेन च शीतरश्मिरभ्युत्थितो नैकसहस्ररश्मिः ३१ इत्येवमर्थं कपिरन्ववेक्ष्य सीतेयमित्येव तु जातबुद्धिः । संश्रित्य तस्मिन्निषसाद वृक्षे बली हरीणामृषभस्तरस्वी ३२ [ ८४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

ततः कुमुदखण्डाभो निर्मलं निर्मलोदयः । प्रजगाम नभश्चन्द्रो हंसो नीलमिवोदकम् १ साचिव्यमिव कुर्वन्स प्रभया निर्मलप्रभः । चन्द्रमा रश्मिभिः शीतैः सिषेवे पवनात्मजम् २ स ददर्श ततः सीतां पूर्णचन्द्रनिभाननाम् । शोकभारैरिव न्यस्तां भारैर्नावमिवाम्भसि ३ दिदृक्षमाणो

---

पृथ्वीसारिखी क्षमा आणि कमलासारिखें नेत्र ह्यांनीं युक्त असलेल्या ज्या सीतेचें रामलक्ष्मणांनीं रक्षण केलें तिचें रक्षण सांप्रत वृक्षाच्या मुळाशीं अक्राळविक्राळ मुद्रेनें युक्त असलेल्या राक्षसस्त्रिया करीत आहेत २९. ( हर ! हर ! ) थंडीचा कडाका पडल्यामुळें शोभारहित झालेल्या कमलिनीप्रमाणें आणि पतीचा वियोग झालेल्या चक्रवाकीप्रमाणें दुःखपरंपरेनें गांजून गेलेल्या ह्या जनककन्येला सांप्रत शोचनीय स्थिति प्राप्त झाली आहे ३०. पुष्पांच्या योगानें ज्यांच्या अग्रशाखा नम्र झालेल्या आहेत असे हे अशोकवृक्ष आणि ( लंकेमध्यें ) शैत्याचा अभाव असल्यामुळें अतिशय प्रकाशमान होऊन राहिलेला व हजारों किरणांनीं युक्त असलेला चंद्र हे हिला अतिशयच दुःख देत आहेत" ३१. अशा प्रकारचे विचार मनामध्यें आणून त्या वानरश्रेष्ठ महाबलाढ्य व वेगवान् हनुमानाला "ही सीताच असावी" असें वाटलें आणि ह्याच बुद्धीचें अवलंबन करून तो त्या शिंशपावृक्षावर राहिला ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६॥

तदनंतर हंसपक्षी ज्याप्रमाणें नीलवर्ण उदकामध्यें जातो त्याप्रमाणें निर्मलप्रभेनें युक्त असलेला व श्वेतकमलांच्या झुबक्याप्रमाणें दिसत असलेला चंद्र निर्मल आकाशामध्यें कांहींसा वर आला १. आपल्या प्रभेच्या योगानें सीतेच्या शोधाला जशी कांहीं मदतच करीत असलेला तो निर्मल चंद्र शीत किरणांच्या योगानें वायुपुत्र हनुमानाची सेवा करूं लागला २. चंद्र वर आल्यानंतर त्या मारुतीनें पूर्णचंद्रासारिख्या आल्हादकारकमुखानें युक्त असलेली ती सीता अवलोकन केली. तेव्हां ओझ्यामुळें उदका

वैदेहीं हनूमान्मारुतात्मजः । स ददर्श विदूरस्था राक्षसीर्घोरदर्शनाः ४
एकाक्षीमेककर्णां च कर्णप्रावरणां तथा । अकर्णां शङ्कुकर्णां च
मस्तकोच्छ्वासनासिकाम् ५ अतिकायोत्तमाङ्गीं च तनुदीर्घशिरो-
धराम् । ध्वस्तकेशीं तथाकेशीं केशकम्बलधारिणीम् ६ लम्ब-
कर्णललाटां च लम्बोदरपयोधराम् । लम्बोष्ठीं चुबुकोष्ठीं च लम्बास्यां
लम्बजानुकाम् ७ ह्रस्वां दीर्घां च कुब्जां च विकटां वामनां तथा ।
करालां भुग्नवक्त्रां च पिङ्गाक्षीं विकृताननाम् ८ विकृताः पिङ्गलाः कालीः
क्रोधनाः कलहप्रियाः । कालायसमहाशूलकूटमुद्गरधारिणीः ९ वराहमृ-
गशार्दूलमहिषाजशिवामुखाः । गजोष्ट्रहयपादाश्च निखातशिरसोपराः १०

---

मध्यें ज्याप्रमाणें नाव बुडून जाते त्याप्रमाणें शोकभारांनीं ती सीता शोकसागरांत बुडूनच जात आहे कीं काय अशी त्याला दिसली ३. प्रथमतः त्या वनांत गेल्यावर वायुपुत्र हनुमान् सीतेला पाहूं लागला असतां भयंकर मुद्रेनें युक्त असलेल्या राक्षसीच लांब बसलेल्या त्याच्या दृष्टीं पडल्या ४. हनुमा-नानें ज्या राक्षसी अवलोकन केल्या त्यांपैकीं कोणाला एकच डोळा तर कोणाला एकच कान. कोणाचे कान वस्त्राप्रमाणें पांघरतां येतील इतके लांब होते तर कोणाला मुळींच नव्हते आणि कोणाला शंकूप्रमाणें होते. त्याचप्रमाणें नाकाचीं भोंकेंच वर असल्यामुळें कोणाचा श्वासोच्छ्वास मस्तकाकडेच चाललेला होता ५; कोणाचें मस्तक शरीराच्या मानानें फारच मोठें होतें तर कोणाची मानच अगदीं बारीक व लांब होती. कोणाचे केशच नाहींसे झाले होते तर कोणाला मुळींच नव्हते आणि कोणी तर केसांच्या योगानें काळी घोंगडीच पांघरून बसल्यासारिखी दिसत होती ६. कोणाचे कान व कपाळ लांब होतें तर कोणाचें उदर व स्तनच लांब होते. कोणाचा ओठ खालीं लोंबत होता तर कोणाचा हनुवटीलाच जखडलेला होता आणि त्याच-प्रमाणें एकीचें मुखच दीर्घ होतें तर दुसरीचे गुडघेच लांब होते ७. कोणी खुजी तर कोणी दांगळ. कोणी कुबडी तर कोणी वाकडी. कोणी अगदींच ठेंगणी तर कोणी भयंकर. कोणाचें वस्त्र वेडेवाकडें तर कोणाचे डोळेच पिंगट वर्णाचे आणि कोणाची तर मुद्राच अक्राळ-विक्राळ ८. त्याचप्रमाणें कोणी छिन्नभिन्न अवयवांनीं युक्त तर कोणी पिंगटवर्ण शरीरानें युक्त; आणि कोणी तर अगदींच काळ्या. कोणी तामसी तर कोणी कलहप्रिय आणि कोणी तर लोखंडाचे मोठे मोठे शूल, कूट व मुद्गर धारण करणाऱ्या ९. कोणाचें तोंड डुकरांसारिखें तर कोणाचें हरिणांसारिखें. कोणाचें वाघांसारिखें तर कोणाचें म्हशींसारिखें आणि कोणाचें शेळ्यांसारिखें तर कोणाचें कोल्ह्यांसारिखें. कोणाचे

एकहस्तैकपादाश्च खरकर्ण्यश्वकर्णिकाः। गोकर्णीर्हस्तिकर्णीश्च हरिकर्णीस्तथापराः ११ अतिनासाश्च काश्चिच्च तिर्यङ्नासा अनासिकाः। गजसंनिभनासाश्च ललाटोच्छ्वासनासिकाः १२ हस्तिपादा महापादा गोपादाः पादचूलिकाः। अतिमात्रशिरोग्रीवा अतिमात्रकुचोदरीः १३ अतिमात्रास्यनेत्राश्च दीर्घजिह्वाननास्तथा। अजामुखीर्हस्तिमुखीर्गोमुखीः सूकरीमुखीः १४ हयोष्ट्रखरवक्त्राश्च राक्षसीर्घोरदर्शनाः। शूलमुद्गरहस्ताश्च क्रोधनाः कलहप्रियाः॥ करालधूम्रकेशिन्यो राक्षसीर्विकृताननाः १५ पिबन्ति सततं पानं सुरामांससदाप्रियाः। मांसशोणितदिग्धाङ्गीर्मांसशोणितभोजनाः १६ ता ददर्श कपिश्रेष्ठो रोमहर्षणदर्शनाः। स्कन्धवन्तमुपासीनाः परिवार्य वनस्पतिम् १७ तस्यश्चाधस्ताच्च तां देवीं राजपुत्रीमनि-

---

पाय हत्तींसारिखे तर कोणाचे उंटासारिखे आणि कोणाचे घोड्यासारिखे तर कांहींचीं तोंडेंच कबंध राक्षसाप्रमाणें आंत गेलेलीं १०. कांहींना एकेकच हात तर कांहींना एकेकच पाय. कांहींचे कान गर्दभांसारिखे लांब तर कांहींचे अश्वांप्रमाणें अखूड. त्याचप्रमाणें कांहींचे गायींसारिखे तर कांहींचे हत्तींसारिखे आणि कांहींचे सिंहांसारिखे ११. कांहींचें नाक अतिच प्रचंड तर कांहींचा श्वासोच्छ्वासच आडवा. कांहीं मुळींच नासिकाहीन तर कांहींचीं नाकें हत्तीच्या सोंडप्रमाणें मोठीं मोठीं आणि कांहींचीं तर कपाळावरच १२. कांहींचे पाय हत्तींसारिखे लठ्ठ तर कांहींचे फारच प्रचंड आणि कांहींचे गायींसारिखे तर कांहींचे शिखाकृति केशांनीं युक्त. कांहींचें मस्तक व मान फारच प्रचंड तर कांहींचे स्तन व उदर अतिच लांब १३. कांहींचें मुख व नेत्र फारच मोठे तर कांहींच्या जिह्वा व मुखें फारच लांब. कांहींचें मुख शेळ्यांसारिखें तर कांहींचें हत्तींसारिखें. कांहींचे गायींसारिखें तर कांहींचें डुकऱ्यांसारिखें १४. कांहींचें मुख घोड्यांसारिखें तर कांहींचें उंटांसारिखें आणि कांहींचें गर्दभांसारिखें. अशा प्रकारच्या भयंकर मुद्रेनें युक्त, तामसी, कलहप्रिय, भयंकर व धूम्रवर्ण केश आणि अक्राळविक्राळ मुद्रा धारण करणाऱ्या आणि दिसण्यांतही भयंकर असून हातांमध्यें शूल व मुद्गल घेतलेल्या राक्षसी त्यानें अवलोकन केल्या १५. ज्यांचें दर्शनही अंगावर कांटा आणणारें आहे; मांसानें व रक्तानें ज्यांचें शरीर चोपडलेलें आहे; ज्यांना सुरा व मांस सर्वदां प्रिय आहे; ज्या सतत मद्यपान करीत आहेत आणि मांस व रक्त हेंच ज्यांचें खाद्य आहे अशा राक्षसस्त्रिया मोठ्या मोठ्या शाखांनीं युक्त असलेल्या एका वृक्षाचे भोंवतीं गराडा देऊन बसल्या आहेत असें वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केलें १६, १७ आणि त्या वृक्षाचे खालीं ती

न्दिताम् । लक्षयामास लक्ष्मीवान्हनूमाञ्जनकात्मजाम् १८ निष्प्रभां
शोकसंतप्तां मलसंकुलमूर्धजाम् । क्षीणपुण्यां च्युतां भूमौ तारां निपति-
तामिव १९ चारित्रव्यपदेशाढ्यां भर्तृदर्शनदुर्गताम् । भूषणैरुत्तमैर्हीनां
भर्तृवात्सल्यभूषिताम् २० राक्षसाधिपसंरुद्धां बन्धुभिश्च विनाकृताम् ।
वियूथां सिंहसंरुद्धां बद्धां गजवधूमिव २१ चन्द्ररेखां पयोदान्ते शारदाभ्रै-
रिवावृताम् । क्लिष्टरूपामसंस्पर्शादयुक्तामिव वल्लकीम् २२ स तां भर्तृ-
हिते युक्तामयुक्तां रक्षसां वशे । अशोकवनिकामध्ये शोकसागरमाप्लु-
ताम् २३ ताभिः परिवृतां तत्र सग्रहामिव रोहिणीम् । ददर्श हनुमांस्तत्र
लतामकुसुमामिव २४ सा मलेन च दिग्धाङ्गी वपुषा चाप्यलंकृता ।
मृणाली पङ्कदिग्धेव विभाति च न भाति च २५ मलिनेन तु वस्त्रेण परि-
क्लिष्टेन भामिनीम् । संवृतां मृगशावाक्षीं ददर्श हनुमान्कपिः २६ तां देवीं

---

दोषरहित राजपुत्री जनककन्या सीतादेवी ही त्या श्रीमान् हनुमानानें अवलोकन केली १८. ती सीता शोकानें संतप्त झाली असल्यामुळें निस्तेज झाली होती; मळामुळें तिच्या केसाची गुंतागुंत झाली होती; पुण्यक्षय झाल्यामुळें आकाशांतून च्युत होऊन भूमी-वर पडलेल्या तारेप्रमाणें ती भासत होती १९; पातिव्रत्यधर्माविषयीं ती विख्यात असून भर्त्याचें दर्शन तिला दुर्लभ झालें होतें; उत्कृष्ट बाह्य अलंकार जरी तिच्या शरीरावर नव्हते तरी भर्तृप्रेमानें ती भूषित झालेली होती २०; बंधुजनांचा तिला वियोग झालेला असून राक्षसाधिपति रावणानें तिला प्रतिबंधांत ठेविलेली होती आणि त्यामुळें कळपांतून चुकलेली व बांधून ठेविलेली हत्तीणच सिंहाच्या अटकेंत आहे कीं काय अशी ती भासत होती २१. पर्जन्यकाल संपल्यावर शरदृतूंतील अभ्रांनीं व्याप्त झालेल्या चंद्रकलेप्रमाणें ती दिसत होती आणि तिची कांति कमी झाली असून भर्त्याचा स्पर्श होत नसल्यामुळें, रद्दी पडलेल्या विण्याप्रमाणें तिची अवस्था झालेली होती २२. असो. भर्त्याच्या हिताविषयीं तत्पर, राक्षसांच्या अधीन होऊन रहाण्यास अयोग्य, शोकसागरांत निमग्न झालेली, अलंकाररहित असल्यामुळें पुष्परहित लते-प्रमाणें दिसत असलेली आणि त्या राक्षसस्त्रियांनीं परिवेष्टिलेली असल्यामुळें क्रूर ग्रहांनीं घेरलेल्या रोहिणीप्रमाणें भासत असलेली ती सीता हनुमानानें त्या अशोकवनामध्यें अवलोकन केली २३, २४. मळानें तिचें शरीर जरी बरबटून गेलें होतें तरी स्वाभाविक सौंदर्यानें भूषित असल्यामुळें ती चिखलानें बरबटलेल्या कमलिनी-प्रमाणें, झळकत नाहीं अशीही दिसत नव्हती आणि झळकत आहे अशीही भासत नव्हती २५. हरणाच्या बछड्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती सीता हनुमान्

दीनवदनामदीनां भर्तृतेजसा । रक्षितां स्वेन शीलेन सीतामसितलोचनाम् २७ तां दृष्ट्वा हनुमान्सीतां मृगशावनिभेक्षणाम् । मृगकन्यामिव त्रस्तां वीक्षमाणां समन्ततः २८ दहन्तीमिव निःश्वासैर्वृक्षान्पल्लवधारिणः। संघातमिव शोकानां दुःखस्योर्मिमिवोत्थिताम् २९ तां क्षामां सुविभक्ताङ्गीं विनाभरणशोभिनीम् । प्रहर्षमतुलं लेभे मारुतिः प्रेक्ष्य मैथिलीम् ३० हर्षजानि च सोश्रूणि तां दृष्ट्वा मदिरेक्षणाम् । मुमोच हनुमांस्तत्र नमश्चक्रे च राघवम् ३१ नमस्कृत्वाथ रामाय लक्ष्मणाय च वीर्यवान् । सीतादर्शनसंहृष्टो हनुमान्संवृतोभवत् ३२ [ ८७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तदशः सर्गः ॥ १७ ॥

तथा विप्रेक्षमाणस्य वनं पुष्पितपादपम्। विचिन्वतश्च वैदेहीं किंचिच्छेषा निशाभवत् १ षडङ्गवेदविदुषां क्रतुप्रवरयाजिनाम् । शुश्राव ब्रह्म-

---

वानरानें जेव्हां अवलोकन केली तेव्हां एका जीर्ण व मलिन वस्त्रानें ती आच्छादिलेली होती २६. भर्त्याच्या पराक्रमाची आठवण असल्यामुळें तिचें अंतःकरण जरी निराश झालें नव्हतें तरी त्या देवीची मुद्रा दीन झाली होती आणि कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेचें रक्षणही तिच्या शीलानेंच झालेलें होतें २७ हरिणाच्या छाव्याप्रमाणें जिचे डोळे पाणीदार आहेत अशी ती सीता जेव्हां हनुमानानें अवलोकन केली तेव्हां ती भयभीत झालेल्या हरिणीप्रमाणें आपल्या भोंवतीं पहात होती २८; आपल्या निःश्वासांच्या योगानें संनिध असलेल्या पल्लवयुक्त वृक्षांना ती जशी कांहीं दग्धच करून टाकीत होती आणि शोकांची राशिच कीं काय अथवा दुःखसागरांतून उसळलेली दुःखाची लाटच कीं काय अशी दिसत होती २९ सुव्यवस्थित अवयवांनीं युक्त, कृश आणि भूषणांवांचूनही शोभणारी ती मिथिलराजकन्या अवलोकन करून मारुतीला अनुपम हर्ष झाला ३०; मदिरेप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशा त्या सीतेला अवलोकन करितांक्षणीं नेत्रांतून आनंदाश्रु ढाळून हनुमानानें रामाला नमस्कार केला ३१ आणि रामाला व लक्ष्मणाला नमस्कार केल्यानंतर सीतेच्या दर्शनामुळें आनंदित झालेला तो वीर्यवान् हनुमान् ( सूक्ष्म रूपाचें अवलंबन करून फांद्यांमध्येंच ) दडून राहिला ३२ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

ज्यांतील वृक्ष प्रफुल्लित झालेले आहेत असें तें वन अवलोकन करितां करितां आणि सीतेची उघडपणें भेट व्हावी एतदर्थ ( राक्षसस्त्रियांना, निद्रा येण्याची )

घोषान्स विरात्रे ब्रह्मरक्षसाम् २ अथ मङ्गलवादित्रैः शब्दैः श्रोत्रमनोहरैः । प्रबोध्यत महाबाहुर्दशग्रीवो महाबलः ३ विबुध्य तु महाभागो राक्षसेन्द्रः प्रतापवान् । स्रस्तमाल्याम्बरधरो वैदेहीमन्वचिन्तयत् ४ भृशं नियुक्तस्तस्यां च मदनेन मदोत्कटः । न तु तं राक्षसः कामं शशाकात्मनि गूहितुम् ५ स सर्वाभरणैर्युक्तो बिभ्रच्छ्रियमनुत्तमाम् । तां नगैर्विविधैर्जुष्टां सर्वपुष्पफलोपगैः ६ वृतां पुष्करिणीभिश्च नानापुष्पोपशोभिताम् । सदा मत्तैश्च विहगैर्विचित्रां परमाद्भुतैः ७ ईहामृगैश्च विविधैर्वृतां दृष्टिमनोहरैः । वीथीः संप्रेक्षमाणश्च मणिकाञ्चनतोरणाम् ८ नानामृगगणाकीर्णां फलैः प्रपतितैर्वृताम् । अशोकवनिकामेव प्राविशत्संततद्रुमाम् ९ अङ्गनाः शतमात्रं तु तं व्रजन्तमनुव्रजन् । महेन्द्रमिव पौलस्त्यं देवगन्धर्वयोषितः १० दीपिकाः काञ्चनीः काश्चिज्जगृहुस्तत्र

---

वाट पहातां पहातां हनुमानाची ती रात्र अगदींच थोडी उरली १ आणि षडंगवेद जाणणाऱ्या व श्रेष्ठ श्रेष्ठ क्रतु करणाऱ्या ब्रह्मराक्षसांचा वेदघोष उत्तररात्रीं त्याच्या कानीं येऊं लागला २. नंतर मंगलवाद्य आणि कानाला मधुर लागणारे इतरही ध्वनि ह्यांच्या योगानें तो महाबलाढ्य व महापराक्रमी दशानन रावण जागा झाला ३ आणि अस्ताव्यस्त झालेल्या पुष्पमाला व वस्त्र धारण करणारा तो महाभाग्यवान् राक्षसराज प्रतापी रावण जागा झाल्यावर सीतेचें चिंतन करूं लागला ४. मदनाच्या योगानें मदमत्त झालेल्या त्या राक्षसाचें मन तिच्याविषयीं अतिशयच आसक्त होऊन राहिलेलें होतें आणि ह्यामुळें ती कामवासनाही आंतल्याआंत दाबून टाकण्यास तो राक्षस समर्थ नव्हता ५. नंतर सर्व भूषणांनीं युक्त आणि अनुपम वैभव धारण करणारा तो रावण सर्व प्रकारच्या पुष्पांनी व फलांनी भरलेल्या नानाप्रकारच्या वृक्षांनीं युक्त असलेल्या त्या अशोकवनामध्यें गेला ६. तें अशोकवन पुष्करिणींनीं व्याप्त झालेलें होतें; नानाप्रकारच्या पुष्पांनीं त्याला शोभा आलेली होती; अत्यंत अद्भुत आणि सर्वदां मत्त अशा पक्ष्यांच्या योगानें तें चित्रविचित्र झालेलें होतें ७ आणि दृष्टीला चकित करून टाकणाऱ्या नानाप्रकारच्या क्रीडाविषयक मृगांनीं तें भरलेलें होतें. असो. अंतःपुरांतून उठून अशोकवनाचे मार्ग अवलोकन करीत करीत तो रावण रत्नखचित सोन्याच्या तोरणांनीं युक्त ८, नानाप्रकारच्या मृगगणांनीं व पडलेल्या फळांनीं व्याप्त आणि एकसारख्या वृक्षपंक्तींनीं भरलेल्या त्या अशोकवनामध्यें गेला ९. देवयोनींतील आणि गंधर्वयोनींतील स्त्रिया ज्याप्रमाणें इंद्र जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग जातात त्याप्रमाणें शंभर स्त्रिया तो पुलस्त्यपुत्र रावण निघाला असतां त्याच्या मागोमाग चालल्या १०. कांहीं

योषितः । वालव्यजनहस्ताश्च तालवृन्तानि चापराः ११ काञ्चनैश्चैव भृङ्गारैर्जह्रुः सलिलमग्रतः । मण्डलाग्रा बृसीश्चैव गृह्यान्याः पृष्ठतो ययुः १२ काचिद्रत्नमयीं पात्रीं पूर्णां पानस्य भ्राजतीम् । दक्षिणा दक्षिणेनैव तदा जग्राह पाणिना १३ राजहंसप्रतीकाशं छत्रं पूर्णशशिप्रभम् । सौवर्णदण्डमपरा गृहीत्वा पृष्ठतो ययौ १४ निद्रामदपरीताक्ष्यो रावणस्योत्तमस्त्रियः । अनुजग्मुः पतिं वीरं घनं विद्युल्लता इव १५ व्याविद्धहारकेयूराः समामृदितवर्णकाः । समागलितकेशान्ताः सस्वेदवदनास्तथा १६ घूर्णन्त्यो मदशेषेण निद्रया च शुभाननाः । स्वेदक्लिष्टाङ्गकुसुमाः सुमाल्याकुलमूर्धजाः १७ प्रयान्तं नैर्ऋतपतिं नार्यो मदिरलोचनाः । बहुमानाच्च कामाच्च प्रियभार्यास्तमन्वयुः १८ स च कामपराधीनः पतिस्तासां महाबलः । सीतासक्तमना मन्दो मन्दाञ्चितगतिर्बभौ १९ ततः काञ्चीनिनादं च नूपुराणां च निःस्वनम् । शुश्राव परमस्त्रीणां कपिर्मारुतन-

---

स्त्रियांनीं सोन्याचे दीप घेतले होते; कांहींनीं आपल्या हातांत चौऱ्या घेतलेल्या होत्या; कांहींनीं पंखे घेतलेले होते ११; कांहीं सोन्याच्या झाऱ्यांमध्यें उदक घेऊन पुढें चालल्या होत्या आणि दुसऱ्या कांहीं वर्तुल आसनें घेऊन मागून चालल्या होत्या १२. पेयद्रव्यानें परिपूर्ण आणि रत्नमय असल्यामुळें झळकत असलेलें पात्र उजव्याच हातांत घेऊन एक त्याच्या मनाप्रमाणें वागणारी स्त्री त्याच्याबरोबर चालली होती १३. पूर्णचंद्राप्रमाणें ज्याची प्रभा आहे, राजहंसाप्रमाणें ज्याचा वर्ण आहे आणि ज्याचा दंड सुवर्णाचा आहे असें छत्र हातांत घेऊन दुसरी एक स्त्री त्याच्या मागोमाग चालली १४ आणि निद्रेनें व मदानें ज्यांची दृष्टि व्याकुल झाली आहे अशा रावणाच्या उत्तम स्त्रिया मेघाच्या मागोमाग जाणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें आपल्या वीर पतीच्या मागोमाग चालल्या १५. ज्यांचे हार व बाहुभूषणें स्थानभ्रष्ट झालीं आहेत; ज्यांची उटी चोळवटून गेलेली आहे; ज्यांचे केश लोंबत आहेत; ज्यांचें मुख घामानें डवडवलें आहे १६; मद कांहींसा शिलक असल्यामुळें आणि निद्रेमुळें ज्या गुंगत आहेत; ज्यांचीं मुखें मनोहर आहेत; घामामुळें ज्यांच्या शरीरावरील पुष्पें खराब झालीं आहेत; ज्यांचे केश पुष्पयुक्त व अस्ताव्यस्त झालेले आहेत १७ आणि ज्यांचे नेत्र मदिरेसारिखे आहेत अशा रावणाच्या प्रिय भार्या असलेल्या कांहीं स्त्रिया राक्षसाधिपति रावण जाऊं लागला असतां बहुमानामुळें आणि कामवासनेमुळें त्याच्या मागोमाग गेल्या १८. कामाचे अधीन झालेला त्यांचा तो महाबलाढ्य अविचारी पति सीतेचे ठिकाणीं मन आसक्त झालें असल्यामुळें सावकाश व डुलत डुलत जाऊं

न्दनः २० तं चाप्रतिमकुर्वाणमचिन्त्यबलपौरुषम् । द्वारदेशमनुप्राप्तं ददर्श हनुमान्कपिः २१ दीपिकाभिरनेकाभिः समन्तादवभासितम् । गन्धतैलावसिक्ताभिर्ध्रियमाणाभिरग्रतः २२ कामदर्पमदैर्युक्तं जिह्मताम्रायतेक्षणम् । समक्षमिव कंदर्पमपविद्धशरासनम् २३ मथितामृतफेनाभमरजोवस्त्रमुत्तमम् । सुपुष्पमवकर्षन्तं विमुक्तं सक्तमङ्गदे २४ तं पत्रविटपे लीनः पत्रपुष्पशतावृतः । समीपमुपसंक्रान्तं विज्ञातुमुपचक्रमे २५ अवेक्षमाणस्तु तदा ददर्श कपिकुञ्जरः । रूपयौवनसंपन्ना रावणस्य वरस्त्रियः २६ ताभिः परिवृतो राजा सुरूपाभिर्महायशाः २७ तन्मृगद्विजसंघुष्टं प्रविष्टः प्रमदावनम् । क्षीबो विचित्राभरणः शङ्कुकर्णो महाबलः २८ तेन विश्रवसः पुत्रः स दृष्टो राक्षसाधिपः । वृतः परमनारीभिस्ताराभिरिव चन्द्रमाः २९ तं ददर्श महातेजास्तेजोवन्तं महाकपिः । रावणोयं

---

लागला १९. इतक्यांत, त्या उत्कृष्ट स्त्रियांच्या कमरपट्ट्यांचा अवाज व तोरड्यांचा शब्द वायुपुत्र वानराच्या कानीं पडला २० आणि लगेच तो अतुलपराक्रमी महाबलाढ्य व महासामर्थ्यवान् रावण अशोकवनिकेच्या दाराशीं प्राप्त झाल्याचेंही त्या हनुमान् वानरानें अवलोकन केलें २१. सुगंधि तेल ज्यांवर ओतलें जात आहे अशा पुढें धरलेल्या अनेक मशालींचा सर्व बाजूंनीं रावणावर प्रकाश पडलेला होता २२. काम, गर्व आणि मद ह्यांनीं युक्त असलेल्या त्या रावणाचे नेत्र, वक्र, ताम्रवर्ण व विशाल असून चापाचा त्याग केलेला प्रत्यक्ष मदनच कीं काय असा तो दिसत होता २३ आणि घुसळलेल्या दुधाच्या फेंसाप्रमाणें शुभ्र व निर्मल पुष्पें आणि उत्तम मोत्यें लाविलेलें व बाहुभूषणाला अडकलेलें असें आपलें उत्कृष्ट वस्त्र तो सावरीत होता २४. तो रावण समीप आला असतां पानानीं गच्च भरलेल्या एका फांदीवर लपून बसलेला आणि शेंकडों पानांनीं व पुष्पांनीं व्याप्त झालेला तो हनुमान् "हा कोण असावा" हें ओळखण्याचा यत्न करूं लागला २५; परंतु, तो वानरश्रेष्ठ हनुमान् पाहूं लागला असतां रावणाच्या रूपवती व यौवनसंपन्न उत्कृष्ट स्त्रिया त्याच्या दृष्टीं पडल्या २६. त्या सुरूप स्त्रियांनीं तो महाकीर्तिमान् रावणराजा परिवेष्टित झालेला होता २७. असो. इतक्यांत मृग व पक्षी ह्यांनीं नादित आणि स्त्रियांच्या क्रीडेकरितां तयार केलेल्या त्या वनामध्यें मद्यपानानें मत्त, अद्भुत अलंकार धारण केलेला आणि महाबलाढ्य असा शंकुकर्णनामक राक्षस प्रविष्ट झाला २८ व तारांच्या योगानें जसा चंद्रमा परिवेष्टित झालेला असतो तसा तो विश्रवस्मुनींचा पुत्र राक्षसाधिपति रावण उत्कृष्ट स्त्रियांनीं परिवेष्टिलेला आहे, असें त्या शंकुकर्णाच्या दृष्टीं पडलें २९. इतक्यांत त्या तेजस्वी रावणाला

महाबाहुरिति संचिन्त्य वानरः ३० सोऽयमेव पुरा शेते पुरमध्ये गृहो-
त्तमे । अवप्लुतो महातेजा हनूमान्मारुतात्मजः ३१ स तथाप्युग्रतेजाः
स निर्धूतस्तस्य तेजसा । पत्रे गुह्यान्तरे सक्तो मतिमान्संवृतोऽभवत् ३२
स तामसितकेशान्तां सुश्रोणीं संहतस्तनीम् । दिदृक्षुरसितापाङ्गीमुपाव-
र्तत रावणः ३३ [ ९११ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्ये सुन्दरकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥ १८ ॥

तस्मिन्नेव ततः काले राजपुत्री त्वनिन्दिता । रूपयौवनसंपन्नं भूषणो
त्तमभूषितम् १ ततो दृष्ट्वैव वैदेही रावणं राक्षसाधिपम् । प्रावेपत वरा-
रोहा प्रवाते कदली यथा २ ऊरुभ्यामुदरं छाद्य बाहुभ्यां च पयोधरौ ।
उपविष्टा विशालाक्षी रुदती वरवर्णिनी ३ दशग्रीवस्तु वैदेहीं रक्षितां
राक्षसीगणैः । ददर्श दीनां दुःखार्तां नावं सन्नामिवार्णवे ४ असंवृतायाः
मासीनां धरण्यां संशितव्रताम् । छिन्नां प्रपतितां भूमौ शाखामिव वन-

---

महातेजस्वी व महाकपि हनुमानानें पूर्वी नगरांत उत्कृष्ट गृहामध्यें जो शयन करीत होता तोच हा महापराक्रमी रावण असें मनामध्यें ओळखिलें आणि लगेंच त्या महातेजस्वी वायुपुत्र हनुमानानें फारच उंच खांदीवर उडी मारिली ३०, ३१. असो. तो बुद्धिमान् हनुमान् जरी महातेजस्वी होता तरी त्या रावणाच्या तेजानें अगदींच दिपून गेला आणि पानांनीं भरलेल्या अशा दुसऱ्या एका दृष्टोत्पत्तीस न येणाऱ्या शाखेचा आश्रय करून तो दडून बसला ३२. तों इतक्यांत कृष्णवर्ण केश, सुंदर कटिप्रदेश, एकमेकाला लागलेले स्तन आणि कृष्णवर्ण नेत्रप्रांत ह्यांनीं युक्त असलेल्या त्या सीतेला पहाण्याकरितां रावणही अगदीं सन्निध आला ३३. ह्याप्रमाणें महामुनि-वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

हनुमान् उंच फांदीवर उडी मारून बसल्यानंतर रावण समीप येतांक्षणींच तो त्या निर्दोष विदेहराजकन्या सीतेच्या दृष्टीं पडला आणि उत्कृष्ट अलंकार धारण केलेला रूपवान् व यौवनसंपन्न असा तो राक्षसाधिपति रावण अवलोकन करितांक्षणीं ती सुंदरी वायूच्या तडाक्यांत सांपडलेल्या केळीप्रमाणें थरथर कापूं लागली १, २ व मांड्यांनीं उदर आणि बाहूंनीं स्तन आच्छादित करून ती विशालनयना सुंदरी रडत बसली ३. रावणानें जेव्हां ती विदेहराजकन्या सीता अवलोकन केली तेव्हां राक्षस-स्त्रियांच्या समुदायांनीं तिचें रक्षण केलेलें होतें आणि महासागरामध्यें मग्न होऊं लागलेल्या नावेंतील लोकांप्रमाणें ती दुःखाकुल व दीन झालेली होती ४; उघड्या

म्पतः ५ मलमण्डनदिग्धाङ्गीं मण्डनार्हाममण्डनाम् । मृणालीपङ्कदिग्धेव विभाति न विभाति च ६ समीपं राजसिंहस्य रामस्य विदितात्मनः । संकल्पहयसंयुक्तैर्यान्तीमिव मनोरथैः ७ शुष्यन्तीं रुदतीमेकां ध्यानशोकपरायणाम् । दुःखस्यान्तमपश्यन्तीं रामां राममनुव्रताम् ८ चेष्टमानामथाविष्टां पन्नगेन्द्रवधूमिव । धूप्यमानां ग्रहेणेव रोहिणीं धूमकेतुना९ वृत्तशीले कुले जातामाचारवति धार्मिके । पुनः संस्कारमापन्नां जातामिव च दुष्कुले १० सन्नामिव महाकीर्तिं श्रद्धामिव विमानिताम् । प्रज्ञामिव परिक्षीणामाशां प्रतिहतामिव ११ आयतीमिव विध्वस्तामाज्ञां प्रतिहतामिव । दीप्तामिव दिशं काले पूजामपहृतामिव १२ पौर्णमासीमिव निशां तमोग्रस्तेन्दुमण्डलाम् । पद्मिनीमिव विध्वस्तां हतशूरां चमूमिव १३ प्रभामिव तमोध्वस्तामुपक्षीणामिवापगाम् । वेदीमिव परामृष्टां

---

जमीनीवर ती बसली असल्यामुळें मोडून भूमीवर पडलेली वृक्षाची शाखाच कीं काय अशी भासत होती ५; तिच्या शरीरावरील अलंकार घालण्याचीं स्थानें मलानें मळून गेलेलीं होतीं; भूषणांना पात्र असूनही ती भूषणरहित होती आणि म्हणूनच चिखलानें बरबटून गेलेल्या कमलिनीप्रमाणें ती धड शोभतही नव्हती आणि धड विशोभीतही दिसत नव्हती ६. आपला पति जो नृपश्रेष्ठ जगद्विख्यात राम त्याच्याकडे चिंतनरूप अश्व जोडिलेल्या मनोरथांच्या योगानें ती जात होती ७; तिचें मुख शुष्क झालें होतें; ती एकटीच रडत बसली होती; एकसारिखें चिंतन व शोक करीत होती आणि रामाचेच ठिकाणीं आसक्त असलेल्या त्या सीतेला दुःखांतून पार पडण्याची कांहीं अटकळच होत नव्हती ८. मंत्रांच्या तावडींत सांपडलेल्या नागराजाच्या भार्येप्रमाणें ती तडफडत होती; धूम्रवर्ण केतु ग्रहामुळें संतप्त होऊं लागलेली रोहिणीच कीं काय अशी ती भासत होती ९; आचारसंपन्न, सुशील, धार्मिक आणि सद्वर्तनानें युक्त अशा कुलामध्यें उत्पन्न होऊन तशाच प्रकारच्या कुलामध्यें तिचा पाणिग्रहणसंस्कारही झाला असतांना हीन कुलामध्यें उत्पन्न झालेल्या स्त्रीप्रमाणें तिची दशा झालेली होती १०; उतरती कळा लागलेली मोठी कीर्तिच कीं काय, मानखंडना झालेली प्रत्यक्ष श्रद्धाच कीं काय, क्षीण झालेली बुद्धिच कीं काय, भग्न झालेली आशाच कीं काय ११, विध्वंस करून टाकिलेली संपत्तिच कीं काय, हाणून पाडिलेली आज्ञाच कीं काय, उत्पातसमयीं प्रदीप्त झालेली दिशाच कीं काय, लथडून दिलेली देवपूजाच कीं काय १२, अंधकारानें चंद्रमंडल ग्रस्त झालेली पौर्णिमेची रात्रिच कीं काय, तुडवून टाकिलेली कमलिनीच कीं काय, शूरांचा वध झालेली सेनाच कीं

शान्तामग्निशिखामिव १४ उत्कृष्टपर्णकमलां वित्रासितविहंगमाम् । हस्तिहस्तपरामृष्टामाकुलामिव पद्मिनीम् १५ पतिशोकातुरां शुष्कां नदीं विस्रावितामिव । परया मृजया हीनां कृष्णपक्षे निशामिव १६ सुकुमारीं सुजाताङ्गीं रत्नगर्भगृहोचिताम् । तप्यमानामिवोष्णेन मृणालीमचिरोद्धृताम् १७ गृहीतां लाडितां स्तम्भे यूथपेन विनाकृताम् । निःश्वसन्तीं सुदुःखार्तां गजराजवधूमिव १८ एकया दीर्घया वेण्या शोभमानामयत्नतः । नीलया नीरदापाये वनराज्या महीमिव १९ उपवासेन शोकेन ध्यानेन च भयेन च । परिक्षीणां कृशां दीनामल्पाहारां तपोधनाम् २० आयाचमानां दुःखार्तां प्राञ्जलिं देवतामिव । भावेन रघुमुख्यस्य दशग्रीवपराभवम् २१ समीक्षमाणां रुदतीमनिन्दितां सुपक्ष्मताम्रायतशुक्ललोचनाम् । अनुव्रतां राममतीव मैथिलीं प्रलोभयामास वधाय

---

काय १३, अंधकारानें ग्रस्त केलेली सूर्याची प्रभाच कीं काय, आटून गेलेली नदीच कीं काय, पतितांनीं व्याप्त झालेली वेदिच कीं काय, शांत झालेली अग्नीची ज्वालाच कीं काय १४, जिचीं पानें व कमलें तोडिलेलीं आहेत, जिच्या सांनिध असलेले पक्षी उडवून लाविलले आहेत आणि हत्तींच्या सोंडांचे तडाके बसल्यामुळें जी अगदीं जर्जर झालेली आहे अशी कमलिनीच कीं काय १५, पतिशोकानें व्याकुल व शुष्क झाल्यामुळें दुसरीकडे पाणी काढून लाविलेली शुष्क नदीच कीं काय आणि अभ्यंगप्रभृति चांगले शरीरसंस्कार होत नसल्यामुळें कृष्णपक्षांतील रात्रिच कीं काय अशी ती दिसत होती १६. ती फारच सुकुमार होती; तिचें रूप फारच मनोहर होतें; रत्नखचित गृहामध्यें रहाण्यासच ती योग्य होती; नुकतीच उपटून टाकिलेली व उन्हानें तापत असलेली कमलिनीच कीं काय अशी ती भासत होती १७; गजसमुदायाचें रक्षण करणाऱ्या गजेंद्राचा वियोग झाल्याकारणानें धरिली जाऊन स्तंभाशीं डांबून टाकिल्यामुळें अत्यंत दुःखाकुल होऊन सुस्कारे टाकीत असलेल्या गजेंद्रभार्येप्रमाणें ती दिसत होती १८; एकच लांब वेणी असल्यामुळें पर्जन्यकाल संपल्यानंतर नीलवर्ण वनपंक्तीच्या योगानें शोभणाऱ्या पृथ्वीप्रमाणें तिला अनायासें शोभा आलेली होती १९. उपवास, शोक, चिंता आणि भय ह्यांच्या योगानें त्या बिचारीचा आहारही अल्प झाला असून ती क्षीण, कृश व दीन झालेली होती २० आणि रघुकुलश्रेष्ठ रामाच्या हातून रावणाचा पराभव व्हावा असें अगदीं मनापासून देवतेपाशीं ती दुःखाकुल झालेली सीता हात जोडून मागतच आहे कीं काय अशी दिसत होती २१. असो. उत्कृष्ट पापण्यांनीं युक्त असलेले जिचे दीर्घ व स्वच्छ नेत्र ताम्रवर्ण झाले आहेत; जी

रावणः २२ [ ९३३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकोनविंशः सर्गः ॥ १९ ॥

स तां परिवृतां दीनां निरानन्दां तपस्विनीम् । साकारैर्मधुरैर्वाक्यै-र्न्यदर्शयत रावणः १ मां दृष्ट्वा नागनासोरु गूहमाना स्तनोदरम् । अद-र्शनमिवात्मानं भयान्नेतुं त्वमिच्छसि २ कामये त्वां विशालाक्षि बहु मन्यस्व मां प्रिये । सर्वाङ्गगुणसंपन्ने सर्वलोकमनोहरे ३ नेह किंचिन्म-नुष्या वा राक्षसाः कामरूपिणः । व्यपसर्पतु ते सीते भयं मत्तः समुत्थि-तम् ४ स्वधर्मो रक्षसां भीरु सर्वदैव न संशयः । गमनं वा परस्त्रीणां हरणं संप्रमथ्य वा ५ एवं चैवमकामां त्वां न च स्प्रक्ष्यामि मैथिलि । कामं कामः शरीरे मे यथाकामं प्रवर्तताम् ६ देवि नेह भयं कार्यं मयि विश्वसिहि प्रिये । प्रणयस्व च तत्त्वेन मैवं भूः शोकलालसा ७ एकवेणी अधःशय्या ध्यानं मलिनमम्बरम् । अस्थानेऽप्युपवासश्च नैतान्यौपयि-

---

स्वतः निर्दोष असून इकडे तिकडे पहात रडत बसली आहे आणि रामाचे ठिकाणीं जी अतिशयच अनुरक्त आहे अशा त्या मिथिलराजकन्या सीतेला रावण आपल्या वधाकरितां वश करूं लागला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

राक्षसस्त्रियांनीं परिवेष्टित असलेल्या त्या बिचाऱ्या आनंदरहित दीन सीतेला सहे-तुक अशा मधुर शब्दांनीं रावण आपला अभिप्राय दर्शवूं लागला १. ( तो ह्मणाला ) " हे सीते, तुझ्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणें गरगरीत आहेत; परंतु, तूं मला अवलोकन करून स्तन व उदर झांकितां झांकितां भीतीनें आपलें शरीरच माझ्या मुळींच दृष्टीं न पडण्याची इच्छा करीत आहेस हें काय ? २. हे विशालनयने, हे प्रिये, हे सर्वांगसुंदरि, हे त्रैलोक्यमोहिनि, मी तुझी इच्छा करीत आहें. ह्यास्तव, तूं मला बहुमान दे ३. हे सीते, माझ्यामुळें जें तुझे ठिकाणीं भय उत्पन्न झालें आहे तें तूं सोडून दे. कारण, ह्याठिकाणीं मनुष्य आणि यथेष्ट रूप धारण करणारे राक्षस ह्यां-पैकीं कोणीही नाहींत ४. हे भित्र्ये, बलात्कारानें परस्त्रिया हरण करणें आणि त्यांचा उपभोग घेणें हा राक्षसांचा सर्वदा स्वधर्मच आहे ह्यांत संशय नाहीं ५; परंतु, हे मैथिलि, असें जरी आहे तरी तुला माझी इच्छा झाल्याशिवाय मी तुला स्पर्शही कर-णार नाहीं. माझ्या शरीरामध्यें मदनाला वाटेल तशी विषयवासना प्रवृत्त करूं दे ६. हे देवि, ह्या ठिकाणीं भिण्याचें मुळींच कारण नाहीं. हे प्रिये, माझ्यावर विश्वास ठेवून तूं खऱ्या रीतीनें माझ्यावर प्रेम कर; अशी शोकाकुल होऊं नको ७. एक वेणी,

कानि ते ८ विचित्राणि च माल्यानि चन्दनान्यगुरूणि च। विविधानि च वासांसि दिव्यान्याभरणानि च ९ महार्हाणि च पानानि शयनान्यासनानि च। गीतं नृत्यं च वाद्यं च लभ मां प्राप्य मैथिलि १० स्त्रीरत्नमसि मैवं भूः कुरु गात्रेषु भूषणम्। मां प्राप्य हि कथं वा स्यास्त्वमनर्हा सुविग्रहे ११ इदं ते चारुसंजातं यौवनं ह्यतिवर्तते। यदतीतं पुनर्नैति स्रोतः स्रोतस्विनामिव १२ त्वां कृत्वोपरतो मन्ये रूपकर्ता स विश्वकृत्। नहि रूपोपमा ह्यन्या तवास्ति शुभदर्शने १३ त्वां समासाद्य वैदेहि रूपयौवनशालिनीम्। कः पुनर्नातिवर्तेत साक्षादपि पितामहः १४ यद्यत्पश्यामि ते गात्रं शीतांशुसदृशानने। तस्मिंस्तस्मिन्पृथुश्रोणि चक्षुर्मम निबध्यते १५ भव मैथिलि भार्या मे मोहमेतं विसर्जय। बह्वीनामुत्तमस्त्रीणां ममाग्रमहिषी भव १६ लोकेभ्यो यानि रत्नानि संप्रमथ्याहृतानि मे। तानि ते भीरु सर्वाणि राज्यं चैव ददामि ते १७ विजित्य

---

भूमीवर शय्या, चिंता, मलिन वस्त्र आणि विनाकारण उपवास हीं तुझ्या कांहींएक उपयोगीं पडणार नाहींत ८. हे मैथिलि, चित्रविचित्र पुष्पें, नानाप्रकारचें चंदन, अनेकप्रकारचे अगुरु, नानाप्रकारचीं वस्त्रें, दिव्य भूषणें, मोठ्या मोठ्या किंमतींचीं पेयें, शय्या, आसनें, गीत, नृत्य आणि वाद्य ह्यांची तूं माझा स्वीकार करून, प्राप्ति करून घे ९, १०. हे सुंदरि, तूं स्त्रियांमध्यें रत्न आहेस. तस्मात्, असें करूं नकोस. तूं आपल्या अंगावर अलंकार घाल. माझा स्वीकार केल्यावर तुला अशा प्रकारें अलंकाररहित रहाण्याची पाळी कोठून बरें येईल ? ११. उत्कृष्ट दशेला आलेलें हें तुझें यौवन व्यर्थ जात आहे आणि जलप्रवाहांचें वाहणारें उदक ज्याप्रमाणें फिरून परत येत नाहीं त्याप्रमाणें हें तुझें यौवन पुनरपि परत येण्याची आशा नाहीं ( तस्मात्, तूं माझ्या म्हणण्याप्रमाणें विषयांचा उपभोग घे, ) १२. हे सुंदरि, तुला निर्माण केल्यानंतर दिव्य रूपें उत्पन्न करणाऱ्या जगत्स्रष्ट्यानें तें काम सोडूनच दिलें असें मला वाटतें. कारण, तुझ्या रूपाला दुसरी उपमाच नाहीं १३. हे वैदेहि, सौंदर्य आणि यौवन ह्यांनीं शोभत असलेल्या तुझी गांठ पडली असतां प्रत्यक्ष ब्रह्मदेव जरी झाला तरी कोण बरें क्षुब्ध झाल्यावांचून रहाणार आहे ? १४. हे चंद्रमुखि, तुझा कटिप्रदेश विशाल आहे आणि जो जो मी तुझा अवयव पहातें आहें त्याचे त्याचे ठिकाणीं माझी दृष्टि अगदीं खिळून जात आहे. १५. तस्मात्, हे मैथिलि, तूं माझी भार्या हो. हें वेड सोडून दे आणि माझ्या उत्कृष्ट स्त्रिया जरी बहुत आहेत तरी त्या सर्वांमध्यें माझी पट्टराणी तूंच हो १६. हे विनयशील, त्रैलोक्यांतून जीं रत्नें मीं

पृथिवीं सर्वां नानानगरमालिनीम् । जनकाय प्रदास्यामि तव हेतोर्वि-
लासिनि १८ नेह पश्यामि लोकेऽन्यं यो मे प्रतिबलो भवेत् । पश्य मे
सुमहद्वीर्यमप्रतिद्वन्द्वमाहवे १९ असकृत्संयुगे भग्ना मया विमृदितध्वजाः ।
अशक्ताः प्रत्यनीकेषु स्थातुं मम सुरासुराः २० इच्छ मां क्रियतामद्य
प्रतिकर्म तवोत्तमम् । सुप्रभाण्यवसज्जन्तां तवाङ्गे भूषणानि हि २१ साधु
पश्यामि ते रूपं सुयुक्तं प्रतिकर्मणा । प्रतिकर्माभिसंयुक्ता दाक्षिण्येन वरा-
नने २२ भुङ्क्ष्व भोगान्यथाकामं पिब भीरु रमस्व च । यथेष्टं च
प्रयच्छ त्वं पृथिवीं वा धनानि च २३ ललस्व मयि विस्रब्धा धृष्टमाज्ञा-
पयस्व च । मत्प्रसादाल्लुलन्त्याश्च ललतां बान्धवस्तव २४ ऋद्धिं ममा-
नुपश्य त्वं श्रियं भद्रे यशस्विनि । किं करिष्यसि रामेण सुभगे चीरवा-
सिना २५ निक्षिप्तविजयो रामो गतश्रीर्वनगोचरः । व्रती स्थण्डिल-

---

बलात्कारानें हरण करून आणिलेलीं आहेत तीं सर्व मी तुला देतों आणि आपलें राज्यही अर्पण करितों १७. हे विलासिनि, नानाप्रकारच्या नगरसमुदायांनीं युक्त असलेली ही सर्व पृथ्वी जिंकून मी पाहिजेतर तुझ्याकरितां जनकाला अर्पण करीन १८. ह्या जगतामध्यें समरांगणांत माझ्याशीं युद्ध करणारा मला कोणी दिसत नाहीं. तस्मात्, युद्धामध्यें अप्रतिहत ठरलेल्या माझ्या अतिप्रचंड सामर्थ्याचा तूं एकदां विचार तर करून पहा १९. अनेकवेळां मीं ध्वज उध्वस्त करून संग्रामामध्यें जिंकिलेले देवदैत्य माझ्यासमोर प्रतिपक्षी ह्या नात्यानें नुसते उभे रहाण्यासही समर्थ नाहींत २०. ह्यास्तव, तूं माझा स्वीकार कर आणि उत्कृष्ट प्रकारें आपलें शरीर भूषित कर. सारांश, आज तुझ्या शरीरावर तेजस्वी भूषणें लगटून राहोत २१ तुझें रूप मला फारच उत्कृष्ट व अलंकार घालण्यास फारच योग्य दिसत आहे. तस्मात्, हे सुंदरि, तूं माझ्या कृपेमुळें आपलें शरीर भूषित करून टाक २२. हे विनयसंपन्न सीते, इच्छेप्रमाणें तूं विषयांचा उपभोग घे; इच्छेस येईल तें पेय सेवन कर आणि माझ्याशीं रममाण होऊन पृथ्वी अथवा संपत्ति तूं यथेष्ट लोकांना दे २३. माझी इच्छा परिपूर्ण कर; धिटाईनें वागणाऱ्या मला तूं निःशंकपणें हवी ती आज्ञा कर आणि माझ्या कृपेमुळें तुझा भाग्योदय होऊं लागला असतां तुझ्या बांधवाचेही मनोरथ परिपूर्ण होऊं दे २४. हे कल्याणि, हे यशस्विनि, तूं माझी पराक्रमादि समृद्धि आणि वैभव पहा तर खरी. हे भाग्यवति, वल्कलें परिधान करणाऱ्या रामाशीं तुला काय बरें कर्तव्य आहे ? २५ विजयाचें साधनही रामापाशीं कांहींएक ठरलेलें नाहीं व त्याच्यापाशीं संपत्तिही नाहीं; इतकेंच नव्हे परंतु, तो वनचर व व्रतस्थ बनला असून भूमीवर शयन

शायी च शङ्के जीवति वा न वा २६ न हि वैदेहि रामस्त्वां द्रष्टुं वाप्युपलभ्यते । पुरोबलाकैरसितैर्मेघैर्ज्योत्स्नामिवावृताम् २७ न चापि मम हस्तात्त्वां प्राप्तुमर्हति राघवः । हिरण्यकशिपुः कीर्तिमिन्द्रहस्तगतामिव २८ चारुस्मिते चारुदति चारुनेत्रे विलासिनि । मनो हरसि मे भीरु सुपर्णः पन्नगं यथा २९ क्लिष्टकौशेयवसनां तन्वीमप्यनलंकृताम् । त्वां दृष्ट्वा स्वेषु दारेषु रतिं नोपलभाम्यहम् ३० अन्तःपुरनिवासिन्यः स्त्रियः सर्वगुणान्विताः । यावत्यो मम सर्वासामैश्वर्यं कुरु जानकि ३१ मम ह्यसितकेशान्ते त्रैलोक्यप्रवरस्त्रियः । तास्त्वां परिचरिष्यन्ति श्रियमप्सरसो यथा ३२ यानि वैश्रवणे सुभ्रु रत्नानि च धनानि च । तानि लोकांश्च सुश्रोणि मया भुङ्क्ष्व यथासुखम् ३३ न रामस्तपसा देवि न बलेन च विक्रमैः । न धनेन मया तुल्यस्तेजसा यशसापि वा ३४ पिब विहर रमस्व भुङ्क्ष्व भोगान्धननिचयं प्रदिशामि मेदिनीं च । मयि लल

---

करीत आहे. तस्मात् अशा अवस्थेमध्यें तो जिवंत राहण्याचा तरी संभव आहे किंवा नाहीं ही मला शंकाच आहे २६. बगळे ज्यांचे अग्रेसर आहेत अशा कृष्णमेघांनीं आच्छादित झालेल्या चंद्रिकेप्रमाणें राक्षसस्त्रियांनीं आच्छादून टाकिलेल्या तुझें नुसतें दर्शन करून घेण्यासही राम समर्थ होणार नाहीं ( मग तुझ्या प्राप्तीची तर गोष्ट दूरच आहे ) २७. इंद्राच्या हस्तगत झालेली भार्या ज्याप्रमाणें हिरण्यकशिपूला ( नारदमुनींच्या द्वारानें प्रार्थना केल्यामुळें ) प्राप्त झाली त्याप्रमाणें माझ्या हातांतून तुला प्राप्त करून घेण्यास राम समर्थ नाहीं २८. हे सुहास्यवदने, हे सुंदरि, हे चारुनयने, हे विलासिनि, गरुड ज्याप्रमाणें सर्पाला हरण करून नेतो त्याप्रमाणें तूं माझें मन हरण करीत आहेस २९. अंगानें सडपातळ, अलंकाररहित आणि जीर्ण पैठणी नेसलेल्या तुला अवलोकन करून स्वतःच्या स्त्रियांवर माझें मनच जाईनासें झालें आहे ३०. हे जानकि, सर्वगुणसंपन्न अशा जितक्या स्त्रिया माझ्या अंतःपुरामध्यें वास्तव्य करीत आहेत त्या सर्वांचें आधिपत्य तूं कर ३१. हे कृष्णकेशयुक्त सीते, त्रैलोक्यांतील उत्कृष्ट अशा ज्या स्त्रिया माझ्यापाशीं आहेत त्या, लक्ष्मीची सेवा करणाऱ्या अप्सरांप्रमाणें, तुझी सेवा करितील ३२. हे सुंदरि, कुबेरापाशीं जीं कांहीं उत्कृष्ट रत्नें व नानाप्रकारचीं उत्कृष्ट धनें आहेत तीं सर्व आणि त्याचप्रमाणें त्रैलोक्यांतील सर्वही उत्कृष्ट वस्तु ह्यांचा तूं माझ्यासहवर्तमान खुशाल उपभोग घे ३३. हे देवि, तप, बल, पराक्रम, धन, तेज आणि कीर्ति ह्यांपैकीं राम माझ्याशीं एकाही गुणानें बरोबरी करणारा नाहीं ३४. हे प्रिये, माझ्यावर प्रेम

ललव यथासुखं त्वं त्वयि च समेत्य ललन्तु बान्धवास्ते ३५ कुसुमित-
तरुजालसंततानि भ्रमरयुतानि समुद्रतीरजानि । कनकविमलहारभूषि-
ताङ्गी विहर मया सह भीरु काननानि ३६ [ ९६९ ] इत्यार्षे श्रीम-
द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे विंशः सर्ग ॥ २० ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा सीता रौद्रस्य रक्षसः । आर्ता दीनस्वरा दीनं
प्रत्युवाच ततः शनैः १ दुःखार्ता रुदती सीता वेपमाना तपस्विनी ।
चिन्तयन्ती वरारोहा पतिमेव पतिव्रता ॥ तृणमन्तरतः कृत्वा प्रत्युवाच
शुचिस्मिता २ निवर्तय मनो मत्तः स्वजने प्रीयतां मनः । न मां प्रार्थ-
यितुं युक्तस्त्वं सिद्धिमिव पापकृत् ३ अकार्यं न मया कार्यमेकपत्न्या
विगर्हितम् । कुलं संप्राप्तया पुण्यं कुले महति जातया ४ एवमुक्त्वा
तु वैदेही रावणं तं यशस्विनी । रावणं पृष्ठतः कृत्वा भूयो वचनमब्र-
वीत् ५ नाहमौपयिकी भार्या परभार्या सती तव । साधु धर्ममवेक्षस्व

---

करून तूं यथेष्ट विहार कर; क्रीडा कर; इच्छेप्रमाणें पान कर; भोग्य वस्तूंचा उपभोग घे; धनराशि देऊन टाक आणि पृथ्वीही कोणाला अर्पण कर व असें झालें ह्मणजे तुझे बांधवही तुझी भेट घेऊन आपले सर्व मनोरथ इच्छेप्रमाणें परिपूर्ण करून घेवोत ३५. हे विनयसंपन्न सीते, प्रफुल्लित वृक्षसमुदाय एकसारिखे ज्यांत आहेत आणि भ्रमरांनीं जीं युक्त आहेत अशा समुद्रतीरावरील वनांमध्यें माझ्यासहवर्तमान तूं सुवर्णाच्या उज्ज्वल हारानें भूषित होऊन विहार कर ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

त्या क्रूर राक्षसाचें तें भाषण श्रवण केल्यावर दुःखाकुल झालेली सीता दीनवाणीनें आणि मोठ्या काकुळतीनें हळू हळू त्याला ह्मणाली १. सारांश, दुःखाकुल झालेली, रडत असलेली, भीतीनें कांपत असलेली व पतिव्रता असल्यामुळें पतीचेंच चिंतन करीत असलेली आणि ( राम समीप असतांना ) शुभ हास्य करणारी ती बिचारी सुंदरी सीता तृण आड धरून रावणाला ह्मणाली २ " तुझें मन माझ्यापासून निवृत्त होऊन स्वस्त्रियांचे ठिकाणीं प्रीतियुक्त होऊं दे. पापी पुरुष ज्याप्रमाणें ब्रह्मलोकप्राप्तीला योग्य होत नाहीं त्याप्रमाणें तूं माझी इच्छा करण्याला योग्य नाहींस ३. मोठ्या कुलामध्यें जन्मास येऊन पुण्य कुलामध्यें प्राप्त झालेल्या मज पतिव्रतेच्या हातून निंद्य अकार्य होणार नाहीं ".४. ह्याप्रमाणें रावणाला सांगितल्यानंतर ती यशस्विनी विदेहराजकन्या त्याच्याकडे पाठ करून पुनरपि ह्मणाली ५ " तुझी योग्य भार्या मी नव्हे; मी परस्त्री आहें आणि पतिव्रता आहें. ह्यास्तव, तूं चांगल्या रीतीनें धर्माकडे

साधुसाधु मतं चर ६ यथा तव तथान्येषां रक्ष्या दारा निशाचर ।
आत्मानमुपमां कृत्वा स्वेषु दारेषु रम्यताम् ७ अतुष्टं स्वेषु दारेषु चपलं
चपलेन्द्रियम् । नयन्ति निकृतिप्रज्ञं परदाराः पराभवम् ८ इह सन्तो न वा
सन्ति सतो वा नानुवर्तसे । यथा हि विपरीता ते बुद्धिराचारवर्जिता ९
वचो मिथ्या प्रणीतात्मा पथ्यमुक्तं विचक्षणैः । राक्षसानामभावाय त्वं वा
न प्रतिपद्यसे १० अकृतात्मानमासाद्य राजानमनये रतम् । समृद्धानि विन-
श्यन्ति राष्ट्राणि नगराणि च ११ तथैव त्वां समासाद्य लङ्का रत्नौघसंकुला ।
अपराधात्तवैकस्य न चिराद्विनशिष्यति १२ स्वकृतैर्हन्यमानस्य रावणादी-
र्घदर्शिनः । अभिनन्दन्ति भूतानि विनाशे पापकर्मणः १३ एवं त्वां पापक-
र्माणं वक्ष्यन्ति निकृता जनाः । दिष्ट्यैतद्व्यसनं प्राप्तो रौद्र इत्येव हर्षिताः १४
शक्या लोभयितुं नाहमैश्वर्येण धनेन वा । अनन्या राघवेणाहं भास्करेण

---

दृष्टि देऊन उत्तमोत्तम प्रकारानें आपलें आचरण ठेव ६. हे निशाचरा, जशा तुझ्या स्त्रिया तुला संरक्षणीय आहेत तशाच दुसऱ्यांच्याही आहेत. तस्मात्, जें आपणाला दुःख तेंच दुसऱ्याला दुःख असें समजून तूं स्वतःच्याच स्त्रीजनाचे ठिकाणीं रममाण हो ७. स्वस्त्रीचे ठिकाणीं असंतुष्ट, चंचल आणि क्षुब्ध इंद्रियांनीं युक्त व सज्जनांना तिरस्करणीय वाटणारी बुद्धि धारण करणारा जो पुरुष असतो त्याच्या पराजयाला परस्त्रिया कारण होत असतात ८. ज्याअर्थी तुझी बुद्धि सदाचार-रहित व विपरीत दिसत आहे त्याअर्थी येथें कोणी सज्जनच नसावेत अथवा ते असले तरी तूं त्यांची पर्वा करीत नसावास असें मला वाटतें ९. दूरदर्शी लोकांनीं सांगितलेला हितकारक उपदेश, तुझ्या बुद्धीचा ग्रह विपरीत झाला असल्यामुळें, तूं ऐकत नाहींस; ह्यामुळें राक्षसांचा नाश होईल १०. चांगला उपदेश एकणें ज्याच्या बुद्धीला नीट दिसत नाहीं व जो नेहमीं अन्याय करीत असतो अशा राजाचें अवलंबन केलें असतां ज्याप्रमाणें समृद्ध असलेलींही राष्ट्रें व नगरें नाश पावतात ११ त्याचप्रमाणें तुझा आश्रय केल्यामुळें रत्नसमुदायांनीं व्याप्त झालेली ही लंका तुझ्या एकट्याच्या अपराधानें लवकरच नाश पावेल १२. हे रावणा, दूरवर विचार ज्याचे ठिकाणीं नसतो आणि ह्मणूनच स्वतःच्या कृत्यांनींच ज्याचा नाश होणें ठरलेलें असतें त्या दुष्कर्मी पुरुषाचा घात झाला असतां सर्व प्राणी ज्याप्रमाणें आनंद मानित असतात १३ त्याप्रमाणें "ह्या क्रूराला हें संकट आलें हीं मोठी सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे" असेंच तूं दुःख दिलेले सर्व लोक तुला दुष्कर्म्याला उद्देशून ह्मणूं लागतील १४. ऐश्वर्याच्या योगानें अथवा धनाच्या योगानें माझें मन कोणालाही वळवितां येणें

यथा प्रभा १५ उपधाय भुजं तस्य लोकनाथस्य सत्कृतम् । कथं नामोपधा-
स्यामि भुजमन्यस्य कस्यचित् १६ अहमौपयिकी भार्या तस्यैव च धरापतेः ।
व्रतस्नातस्य विद्येव विप्रस्य विदितात्मनः १७ साधु रावण रामेण मां समानय
दुःखिताम् । वने वासितया सार्धं करेण्वेव गजाधिपम् १८ मित्रमौपयिकं
कर्तुं रामः स्थानं परीप्सता । बन्धं चानिच्छता घोरं त्वयासौ पुरुष-
र्षभः १९ विदितः सर्वधर्मज्ञः शरणागतवत्सलः । तेन मैत्री भवतु ते यदि
जीवितुमिच्छसि २० प्रसादयस्व त्वं चैनं शरणागतवत्सलम् ॥ मां चास्मै
प्रयता भूत्वा निर्यातयितुमर्हसि २१ एवं हि ते भवेत्स्वस्ति संप्रदाय रघू-
त्तमे । अन्यथा त्वं हि कुर्वाणः परां प्राप्स्यसि चापदम् २२ वर्जयेद्वज्र-
मुत्सृष्टं वर्जयेदन्तकश्चिरम् । त्वद्विधं न तु संक्रुद्धो लोकनाथः स राघवः २३
रामस्य धनुषः शब्दं श्रोष्यसि त्वं महास्वनम् । शतक्रतुविसृष्टस्य निर्घो-

शक्य नाहीं. कारण, सूर्यापासून जशी प्रभा भिन्न नाहीं तशीच मी रामापासून भिन्न नाहीं १५. त्या लोकनाथ रामाचा मान्य हात उशाशीं घेऊन एकदां शयन केल्यावर दुसऱ्या कोणाचाही हात मस्तकाखालीं घेऊन मी कोठून बरें शयन करणार ? १६. ज्याप्रमाणें ब्रह्मविद्या ब्राह्मणालाच योग्य आहे त्याप्रमाणें ब्रह्मचर्यव्रतपूर्वक समावर्तन झाल्यावर यथाविधि माझें पाणिग्रहण केलेल्या त्या पृथ्वीपति रामाचीच मी भोग्य भार्या आहे १७. तस्मात् , हे रावणा, वनामध्यें वास्तव्य केलेल्या हत्तिणीची ज्याप्रमाणें गजेंद्राशीं गांठ घालून देणें योग्य आहे त्याप्रमाणें तूं दुःखाकुल झालेल्या माझी, बऱ्या विचारानें, रामाशीं गांठ घालून दे १८. हें लंकास्थान सुरक्षित रहावें आणि आपणाला भयंकर प्रतिबंध प्राप्त होण्याचा प्रसंग न यावा अशी जर तुझी इच्छा असेल तर ह्या पुरुषश्रेष्ठ रामाला मित्र करून घेणेंच तुला योग्य आहे १९. जगद्विख्यात राम सर्वधर्मवेत्ता असून शरणागतावर प्रेम करणारा आहे. तस्मात् , तुला जर जिवंत राहण्याची इच्छा असेल तर त्याच्याशीं तुझी मैत्री होऊं दे २०. शरणागतावर कृपा करणाऱ्या ह्या रामाला तूं प्रसन्न करून घे आणि मनानें शुद्ध राहून तूं मला त्याच्या स्वाधीन कर २१. सारांश, ह्याप्रमाणें रघुवंशजश्रेष्ठ रामाचे स्वाधीन मला केल्यानें तुझें कल्याण होईल आणि ह्या माझ्या सांगण्याचेविरुद्ध जर तूं वागूं लागलास तर तुला पराकाष्ठेचें संकट प्राप्त होईल २२. इंद्राच्या हातून सुटलेलें वज्र अथवा प्रत्यक्ष मृत्युही पुष्कळ दिवसपर्यंत कदाचित् तुझी उपेक्षा करील; परंतु, तो लोकनाथ राघव क्रुद्ध झाला असतां तुझ्यासारख्याचा नाश केल्यावांचून राहणार नाहीं २३. इंद्रानें सोडिलेल्या वज्राच्या भयंकर घोषाप्रमाणें रामाच्या धनुष्याचा

श्मशनेरिव २४ इह शीघ्रं सुपर्वाणो ज्वलितास्य इवोरगाः । इषवो निप-
तिष्यन्ति रामलक्ष्मणलक्षिताः २५ रक्षांसि निहनिष्यन्तः पुर्यामस्यां न
संशयः । असंपातं करिष्यन्ति पतन्तः कङ्कवाससः २६ राक्षसेन्द्रमहा-
सर्पान्स रामगरुडो महान् । उद्धरिष्यति वेगेन वैनतेय इवोरगान् २७
अपनेष्यति मां भर्ता त्वत्तः शीघ्रमरिन्दमः । असुरेभ्यः श्रियं दीप्तां विष्णु-
स्त्रिभिरिव क्रमैः २८ जनस्थाने हतस्थाने निहते रक्षसां बले । अशक्तेन
त्वया रक्षः कृतमेतदसाधु वै २९ आश्रमं तत्तयोः शून्यं प्रविश्य नरसिं-
हयोः । गोचरं गतयोर्भ्रात्रोरपनीता त्वयाधम ३० न हि गन्धमुपाघ्राय
रामलक्ष्मणयोस्त्वया । शक्यं संदर्शने स्थातुं शुना शार्दूलयोरिव ३१
तस्य ते विग्रहे ताभ्यां युगग्रहणमस्थिरम् । वृत्रस्येवेन्द्रबाहुभ्यां बाहोरेकस्य
विग्रहे ३२ क्षिप्रं तव सनाथो मे रामः सौमित्रिणा सह । तोयमल्पमि-

---

अति प्रचंड शब्द तूं श्रवण करशील २४. उत्कृष्ट पर्यांनीं युक्त व प्रदीप्त मुखांनीं युक्त असलेल्या भुजंगाप्रमाणें दिसत असलेले आणि रामलक्ष्मणांच्या नांवांनीं चिन्हित झालेले बाण सत्वरच तेथें तुझ्यावर येऊन पडतील २५. कंकपक्ष्यांच्या पिसांनीं युक्त असलेले बाण राक्षसांचा घात करण्याकरितां ह्या नगरींतील यत्किंचितही जागा मोकळी ठेवणार नाहींत २६. विनतापुत्र गरुड ज्याप्रमाणें वेगानें मोठे मोठे सर्प सत्वर उचलून नेत असतो त्याप्रमाणें राक्षसराजरूप मोठे मोठे सर्प तो रामरूप गरुड ह्या नगरींतून वेगानें उचलून नेईल २७. तीन पाउलें टाकून ज्याप्रमाणें विष्णूनें दैत्यांपासून उज्ज्वल लक्ष्मी हरण करून नेली त्याप्रमाणें शत्रूंना जेरीस आणणारा माझा भर्ता तुझ्यापासून मला सत्वर घेऊन जाईल २८. हे राक्षसा, राक्षसांच्या सैन्याचा रामाच्या हातून वध होऊन जनस्थानांतील सर्व राक्षसस्थानें उद्ध्वस्त झाल्यामुळें तूं शक्तिहीन झाल्यावरही मला येथें हरण करून आणिलीस हें नीट केलें नाहींस २९. हे अधमा, ते पुरुषश्रेष्ठ भ्राते वनामध्यें गेले असतांना त्यांच्या शून्य आश्रमामध्यें प्रवेश करून तूं मला तेथून घेऊन गेलास हें खरोखर वाईट केलेंस ३०. अरे, वाघांच्या दृष्टीसमोर उभा रहाण्यास ज्याप्रमाणें (क्षुद्र) श्वान समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें रामलक्ष्मणांचा वास आल्यावर त्यांच्यासमोर उभा रहाण्यास तूं समर्थ होणार नाहींस ३१. वज्रानें एक हात तुटून पडल्यानंतर वृत्रासुराचा शिलक राहिलेला दुसरा हात ज्याप्रमाणें युद्धामध्यें इंद्राच्या दोन हातांशीं टिकाव धरण्यास समर्थ झाला नाहीं त्याप्रमाणें त्या रामलक्ष्मणांशीं तुझें युद्ध सुरू झालें असतां तुला साहाय्य करणारें तुझें सैन्य टिकाव धरणार नाहीं ३२. ज्याप्रमाणें

वादित्यः प्राणानादास्यते शरैः ३३ गिरिं कुबेरस्य गतोथवालयं सभां गता वा वरुणस्य राज्ञः । असंशयं दाशरथेर्विमोक्षसे महाद्रुमः कालहतोशनेरिव ३४ [ १००३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकविंशः सर्गः ॥ २१ ॥

सीताया वचनं श्रुत्वा परुषं राक्षसेश्वरः । प्रत्युवाच ततः सीतां विप्रियं प्रियदर्शनाम् १ यथा यथा सान्त्वयिता वश्यः स्त्रीणां तथा तथा । यथा यथा प्रियं वक्ता परिभूतस्तथा तथा २ संनियच्छति मे क्रोधं त्वयि कामः समुत्थितः । द्रवतोमार्गमासाद्य हयानिव सुसारथिः ३ वामः कामो मनुष्याणां यस्मिन्किल निबध्यते । जने तस्मिंस्त्वनुक्रोशः स्नेहश्च किल जायते ४ एतस्मात्कारणान्न त्वां घातयामि वरानने । वधार्हामवमानार्हां मिथ्या प्रव्रजने रताम् ५ परुषाणि हि

---

उदक अल्प असल्यास तें सूर्य आपल्या किरणांच्या योगानें सत्वरच हरण करितो त्याप्रमाणें लक्ष्मणासहवर्तमान तो माझा नाथ राम बाणांच्या योगानें सत्वरच तुझे प्राण हरण करील ३३. सारांश, कुबेराचें निवासस्थान जो कैलासपर्वत तेथें जरी तूं गेलास किंवा वरुणराजाच्या सभेमध्यें जरी जाऊन बसलास तरी विजेचा तडाका बसला असतां महावृक्ष ज्याप्रमाणें प्राण सोडितो त्याप्रमाणें कालालाच तडाका बसलेला तूं दाशरथी रामाची गांठ पडल्याबरोबर निःसंशय प्राण सोडिशील" ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

सीतेचें कठोर भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण अप्रिय शब्दांनीं त्या प्रियदर्शना सीतेला ह्मणाला १ " पुरुष जों जों स्त्रियांचें सांत्वन करीत जातो तों तों त्यांना आवडूं लागतो ( असें जगतामध्यें दृष्टोत्पत्तीस येत असतें ); परंतु, मी जसें जसें तुझ्याशीं प्रिय भाषण करीत आहें तसा तसा तुझ्या हातून माझा अनादरच होत आहे २. रस्ता सोडून धांवत सुटलेल्या अश्वांचें ज्याप्रमाणें चांगला सारथि संयमन करितो त्याप्रमाणें तुझ्यासंबंधानें माझ्या मनामध्यें उत्पन्न झालेला काम क्रोधाचें संयमन करीत आहे ३. मनुष्यांचा कामच खरोखर क्रोधापेक्षां क्रूर आहे. कारण, अत्यंत क्रोध करण्यास योग्य अशाही ज्या व्यक्तीचे ठिकाणीं तो बद्ध होऊन राहतो त्या व्यक्तीविषयीं दया आणि प्रेम हीं खरोखर उत्पन्न होतात ४. ह्या कारणामुळेंच, हे सुंदरि, वधाला आणि तिरस्काराला पात्र असून ब्रह्मचर्याविषयीं व्यर्थ तत्पर असलेल्या तुझा मी घात करीत नाहीं ५. हे मैथिलि, जीं जीं कठोर भाषणें तूं माझ्याशीं करीत

वाक्यानि यानि यानि ब्रवीषि माम् । तेषु तेषु वधो युक्तस्तव मैथिलि दारुणः ६ एवमुक्त्वा तु वैदेहीं रावणो राक्षसाधिपः । क्रोधसंरम्भसंयुक्तः सीतामुत्तरमब्रवीत् ७ द्वौ मासौ रक्षितव्यौ मे योवधिस्ते मया कृतः । ततः शयनमारोह मम त्वं वरवर्णिनि ८ द्वाभ्यामूर्ध्वं तु मासाभ्यां भर्तारं मामनिच्छतीम् । मम त्वां प्रातराशार्थे सूदाश्छेत्स्यन्ति खण्डशः ९ तां भर्त्स्यमानां संप्रेक्ष्य राक्षसेन्द्रेण जानकीम् । देवगन्धर्वकन्यास्ता विषेदुर्विकृतेक्षणाः १० ओष्ठप्रकारैरपरा नेत्रैर्वक्त्रैस्तथापराः । सीतामाश्वासयामासुस्तर्जितां तेन रक्षसा ११ ताभिराश्वासिता सीता रावणं राक्षसाधिपम् । उवाचात्महितं वाक्यं वृत्तशौटीर्यगर्वितम् १२ नूनं न ते जनः कश्चिदस्मिन्निःश्रेयसि स्थितः । निवारयति यो न त्वां कर्मणोस्माद्विगर्हितात् १३ मां हि धर्मात्मनः पत्नीं शचीमिव शचीपतेः । त्वदन्यस्त्रिषु लोकेषु प्रार्थयेन्मनसापि कः १४ राक्षसाधम रामस्य भार्याममिततेजसः । उक्त-

---

आहेस त्यां त्यांबद्दल भयंकर रीतीनें तुझा वध करणेंच योग्य आहे " ६. ह्याप्रमाणें विदेहराजकन्या सीतला सांगितल्यानंतर क्रोधावेशानें युक्त झालेला तो राक्षसाधिपति रावण पुनरपि तिला ह्मणाला ७ " हे सुंदरि, वाट पहाण्याची जी कालमर्यादा मीं तुला सांगितली आहे ती संपूर्ण होण्यास मला सुमारें दोन महिने पाळिले पाहिजेत. ह्या दोन महिन्यांनंतर तुला माझ्या शय्येवर आरोहण करणें भाग पडेल ८. अथवा दोन महिन्यानंतरही जर भर्ता ह्या नात्यानें तूं माझा स्वीकार केला नाहींस तर माझ्या न्याहारीकरितां आचारी तुझे तुकडे तुकडे करून टाकितील " ९. ह्याप्रमाणें राक्षसराज रावण सीतेची निर्भर्त्सना करूं लागला असतां तेथें असलेल्या देवकन्यांच्या व गंधर्वकन्यांच्या मुद्रा फिरून गेल्या; त्या खिन्न झाल्या १० आणि त्या राक्षसानें सीतेला धमकी दिल्यानंतर दुसऱ्या देवकन्यांनीं व गंधर्वकन्यांनीं ओठांच्या योगानें, नेत्रांच्या योगानें व मुखांच्या योगानें तिला आश्वासन दिलें ११ व त्यांनीं आश्वासन दिलें असतां सदाचरण आणि पतीचें शौर्य ह्यांच्यामुळें गर्वयुक्त परंतु रावणाला हितावह असें भाषण त्या राक्षसाधिपति रावणाशीं त्या सीतेनें केलें १२. ( ती ह्मणाली ) " ह्या नगरामध्यें तुझें कल्याण करण्याविषयीं तत्पर असलेला असा कोणीही पुरुष खरोखर नाहीं. कारण, ह्या निंद्य कर्मापासून तुझें कोणी निवारणच करीत नाहीं १३. अरे, इंद्राच्या शचीप्रमाणें, मज, धर्मात्म्या रामाच्या पत्नीची प्रार्थना करण्याचें मनामध्येंही आणणारा तुझ्याशिवाय त्रैलोक्यामध्यें दुसरा कोण बरें सांपडणार आहे ? १४. हे राक्षसाधमा, ज्याच्या तेजाला अंत नाहीं अशा

वानासि यत्पापं क गतस्तस्य मोक्ष्यसे १५ यथा दृप्तश्च मातङ्गः शशश्च सहितौ वने । तथा द्विरदवद्रामस्त्वं नीच शशवत्स्मृतः १६ स त्वमिक्ष्वाकुनाथं वै क्षिपन्निह न लज्जसे । चक्षुषो विषये तस्य न यावदुपगच्छसि १७ इमे ते नयने क्रूरे विकृते कृष्णपिङ्गले । क्षितौ न पतिते कस्मान्मामनार्य निरीक्षतः १८ तस्य धर्मात्मनः पत्नीं स्नुषां दशरथस्य च । कथं व्याहरतो मां ते न जिह्वा पाप शीर्यति १९ असंदेशात्तु रामस्य तपसश्चानुपालनात् । न त्वां कुर्मि दशग्रीव भस्म भस्मार्हतेजसा २० नापहर्तुमहं शक्या तस्य रामस्य धीमतः । विधिस्तव वधार्थाय विहितो नात्र संशयः २१ शूरेण धनदभ्रात्रा बलैः समुदितेन च । अपोह्य रामं कस्माच्चिद्दारचौर्यं त्वया कृतम् २२ सीताया वचनं श्रुत्वा रावणो राक्षसाधिपः । विवृत्य नयने क्रूरे जानकीमन्ववैक्षत २३ नीलजीमूतसंकाशो

---

रामाच्या भार्येला उद्देशून ज्याअर्थी तू पापाचा उच्चार केलेला आहेस त्याअर्थी कोठें गेल्यानें तूं त्याच्या हातून सुटणार आहेस बरें ? १५. ज्याप्रमाणें मत्त गज आणि ससा ह्यांची वनामध्यें दुर्दैवानें प्रतिपक्षी ह्या नात्यानें एकत्र गांठ पडावी त्याप्रमाणें सांप्रत प्रकार झालेला आहे. राम हा मत्त गजाप्रमाणें आहे आणि, हे नीचा, तूं सशाप्रमाणें आहेस १६. त्याच्या दृष्टीचे आटोक्यांत जोंपर्यंत तूं गेला नाहींस तोंपर्यंत त्या इक्ष्वाकुनाथाची येथें निंदा करितांना तुला लाज वाटत नाहीं (हें ठीक आहे) १७; परंतु, हे अनार्या, तूं माझ्याकडे निरखून पहात असताना हे तुझे क्रूर, विकृत आणि कृष्णवर्ण व पिंगटवर्ण नेत्र अद्यापि पृथ्वीवर कसे पडले नाहींत ? १८. अरे, मी त्या धर्मात्म्या रामाची पत्नी व दशरथाची स्नुषा असून माझ्याशीं (अयोग्य) भाषण करीत असतांना, हे पाप्या, तुझ्या जिह्वेचे तुकडे तुकडे कसे होत नाहींत? १९. रामाची आज्ञा नसल्यामुळें आणि तपाचें परिपालन कर्तव्य असल्यामुळें, हे दशानना, भस्म करण्यास समर्थ अशा पातिव्रत्यतेजाच्या योगानें मी तुझें भस्म करून टाकीत नाहीं २०. वस्तुतः त्या विवेकी रामाची जर मी भार्या आहें तर तुझ्या हातून माझा अपहार होणें शक्यच नाहीं; परंतु, तुझा वध व्हावा एतदर्थ दैवानेंच हा प्रकार घडवून आणिला आहे ह्यांत संशय नाहीं २१. सैन्यांच्या योगानें प्रबल झालेला तूं कुबेराचा भ्राता मोठा शूर पडलास; ह्मणूनच मारीच राक्षसाच्या मायेनें रामाला दूर घालवून स्त्रीचौर्य करण्याचें शौर्य तुझ्या हातून घडलें!" २२. हें सीतेचें भाषण श्रवण केल्यावर तो राक्षसाधिपति रावण आपले उग्र डोळे वटारून तिच्याकडे पाहूं लागला २३. मोठे मोठे हात व मस्तकें धारण करणारा

महाभुजशिरोधरः । सिंहसत्त्वगतिः श्रीमान्दीप्तजिह्वोग्रलोचनः २४ चला-ग्रमुकुटप्रांशुश्चित्रमाल्यानुलेपनः । रक्तमाल्याम्बरधरस्तप्ताङ्गदविभू-षणः २५ श्रोणीसूत्रेण महता मेचकेन सुसंवृतः । अमृतोत्पादने नद्धो भुजङ्गेनेव मन्दरः २६ ताभ्यां स परिपूर्णाभ्यां भुजाभ्यां राक्षसेश्वरः । शुशुभेचलसंकाशः शृङ्गाभ्यामिव मन्दरः २७ तरुणादित्यवर्णाभ्यां कुण्ड-लाभ्यां विभूषितः । रक्तपल्लवपुष्पाभ्यामशोकाभ्यामिवाचलः २८ स कल्पवृक्षप्रतिमो वसन्त इव मूर्तिमान् । श्मशानचैत्यप्रतिमो भूषितोपि भयङ्करः २९ अवेक्षमाणो वैदेहीं कोपसंरक्तलोचनः । उवाच रावणः सीतां भुजङ्ग इव निःश्वसन् ३० अनयेनाभिसंपन्नमर्थहीनमनुव्रते । नाश-याम्यहमद्य त्वां सूर्यः संध्यामिवौजसा ३१ इत्युक्त्वा मैथिलीं राजा रावणः शत्रुरावणः । संददर्श ततः सर्वा राक्षसीर्घोरदर्शनाः ३२ एकाक्षीमेककर्णी

---

तो भव्य रावण नीलमेघाप्रमाणें दिसत होता; त्याचा पराक्रम व चालण्याची ढब ही सिंहाप्रमाणें होती; त्याच्या जिह्वा प्रदीप्त झाल्या असून नेत्र उग्र दिसत होते २४; मुकुटाचा अग्रभाग वर वर सरत असल्यामुळें तो अधिकच उंच दिसत होता; चित्र-विचित्र पुष्पमाला व उट्या त्यानें सेवन केल्या होत्या; रक्तवर्ण पुष्पें आणि वस्त्रें त्यानें धारण केलीं असून उत्कृष्ट सुवर्णाचीं बाहुभूषणें त्यानें घातलेलीं होतीं २५; मोठ्या कृष्णवर्ण कटिसूत्रानें तो चांगलाच बद्ध झाला असल्यामुळें अमृत उत्पन्न करण्याक-रितां वासुकिनामक भुजंगानें बद्ध झालेला मंदरपर्वतच कीं काय असा दिसत होता २६ आणि शक्तीनें परिपूर्ण असलेल्या त्या आपल्या भुजांच्या योगानें तो पर्वतप्राय राक्ष-साधिपति शिखरांच्या योगानें शोभणाऱ्या मंदरपर्वताप्रमाणें शोभत होता २७. बाल-सूर्याप्रमाणें तेजस्वी कुंडलांनीं तो भूषित झाला असल्यामुळें आरक्तवर्ण पानें व पुष्पें धारण करणाऱ्या अशोकांच्या योगानें भूषित झालेला पर्वतच कीं काय असा दिसत होता २८. ( सर्व भोग्य पदार्थ जवळ असल्यामुळें ) तो रावण कल्पवृक्षतुल्य असून अलंकार धारण केलेला असल्यामुळें जरी मूर्तिमान् वसंत ऋतुच कीं काय असा भासत होता तरी श्मशानांतील प्रसिद्ध ठिकाणच्या वृक्षाप्रमाणें तो भयंकर होता २९. असो. क्रोधानें ज्याचे डोळे लाल झाले आहेत असा तो रावण भुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकीत टाकीत सीतेकडे दृष्टि देऊन ह्मणाला ३० "सूर्य ज्याप्रमाणें संधिकालीन अंधःकाराचा नाश करितो त्याप्रमाणें, मर्यादा सोडून वागणाऱ्या दरिद्री रामाचें अवलंबन करणाऱ्या तुझा मी आज आपल्या सामर्थ्याच्या योगानें नाश करून टाकीन " ३१. असें सीतेला सांगितल्यानंतर शत्रूला गर्भगळित करणाऱ्या रावणराजानें, दिसण्यांतही भयंकर

च कर्णप्रावरणां तथा । गोकर्णी हस्तिकर्णी च लम्बकर्णीमकर्णिकाम् ३३
हस्तिपद्यश्वपद्यौ च गोपदीं पादचूलिकाम् । एकाक्षीमेकपादीं च पृथुपादी-
मपादिकाम् ३४ अतिमात्रशिरोग्रीवामतिमात्रकुचोदरीम् । अतिमात्रा-
स्यनेत्रां च दीर्घजिह्वानखामपि ३५ अनासिकां सिंहमुखीं गोमुखीं सूक-
रीमुखीम् ३६ यथा मद्वशगा सीता क्षिप्रं भवति जानकी । तथा कुरुत
राक्षस्यः सर्वाः क्षिप्रं समेत्य वा ३७ प्रतिलोमानुलोमैश्च सामदानादिभे-
दनैः । आवर्जयत वैदेहीं दण्डस्योद्यमनेन च ३८ इति प्रतिसमादिश्य
राक्षसेन्द्रः पुनः पुनः । काममन्युपरीतात्मा जानकीं प्रति गर्जत ३९
उपगम्य ततः क्षिप्रं राक्षसी धान्यमालिनी । परिष्वज्य दशग्रीवमिदं
वचनमब्रवीत् ४० मया क्रीड महाराज सीतया किं तवानया । विव-
र्णया कृपणया मानुष्या राक्षसेश्वर ४१ नूनमस्यां महाराज न देवा

---

असलेल्या त्या सर्व राक्षसस्त्रिया अवलोकन केल्या ३२. कोणाला एकच नेत्र, कोणाला एकच कान, कोणाचे कान उत्तरीयवस्त्राप्रमाणें शरीर आच्छादन करितां येण्यासारिखे विशाल, कोणाचे कान गाईसारिखे, कोणाचे हत्तीसारिखे, कोणाचे लांब, कोणी मुळींच कानाशिवाय ३३, कोणाचे पाय हत्तीसारिखे, कोणाचे अश्वासारिखे, कोणाचे बैलासारिखे, कोणाच्या पायाला कानाप्रमाणें पाळ्या फुटलेल्या, कोणाला एकच नेत्र, कोणाला एकच पाय, कोणाचे पाय स्थूल, कोणी मुळींच पायाशिवाय ३४, कोणाच्या मस्तकाचें व मानेचें प्रमाण फारच मोठें, कोणाचे स्तन व उदर अतिशयच प्रचंड, कोणाचें मुख व नेत्र फारच मोठे, कोणाची जीभ व नखें फारच लांब ३५, कोणी मुळींच नासिकाहीन, कोणाचें मुख सिंहासारिखें, कोणाचें बैलासारिखें आणि कोणाचें डुकरासारिखें ३६. अशा प्रकारच्या राक्षसस्त्रिया अवलोकन केल्यावर "जनककन्या सीता मला सत्वर वश होईल अशा रीतीनें, हे राक्षसस्त्रियांनो, तुह्मी सर्व लवकर व्यवस्था करा; तुह्मी एकत्र जुळून तिला उपदेश करा ३७ आणि प्रतिकूल व अनुकूल हे दोन्ही प्रकार ज्यांमध्यें आहेत अशा साम, दान, प्रभृति भेदक उपायांनीं अथवा दंड उगारूनही तुह्मी सीतेचें मन वळवा" ३८. असें त्यांना सांगून विषयवासना व क्रोध ह्यांनीं व्याप्त झालेला तो राक्षसराज पुन्हां पुन्हां जानकीला उद्देशून गर्जना करूं लागला ३९. तेव्हां धान्यमालिनी राक्षसी सत्वर रावणाच्या जवळ गेली आणि त्याला आलिंगन देऊन ह्मणाली ४० "हे महाराजा, तूं माझ्यासहवर्तमान क्रीडा कर. हे राक्षसाधिपते, कळकट व भिकारड्या ह्या मानवी सीतेशीं तुला काय कर्तव्य आहे ? ४१. हे महाराजा, आपल्या बाहुबलानें तूं ज्या सर्वोत्कृष्ट भोग्य वस्तु संपादन

भोगसत्तमान् । विदधत्यमरश्रेष्ठास्तव बाहुबलार्जितान् ४२ अकामां कामयानस्य शरीरमुपतप्यते । इच्छतीं कामयानस्य प्रीतिर्भवति शोभना ४३ एवमुक्तस्तु राक्षस्या समुत्क्षिप्तस्ततो बली । प्रहसन्मेघसंकाशो राक्षसः स न्यवर्तत ४४ प्रस्थितः स दशग्रीवः कम्पयन्निव मेदिनीम् । ज्वलद्भास्करसंकाशं प्रविवेश निवेशनम् ४५ देवगन्धर्वकन्याश्च नागकन्याश्च तास्ततः । परिवार्य दशग्रीवं प्रविशुस्ता गृहोत्तमम् ४६ स मैथिलीं धर्मपरामवस्थितां प्रवेपमानां परिभर्त्स्य रावणः । विहाय सीतां मदनेन मोहितः स्वमेव वेश्म प्रविवेश रावणः ४७ [१०५०]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥ २२ ॥

इत्युक्त्वा मैथिलीं राजा रावणः शत्रुरावणः । संदिश्य च ततः सर्वा राक्षसीर्निर्जगाम ह १ निष्क्रान्ते राक्षसेन्द्रे तु पुनरन्तःपुरं गते । राक्षस्यो भीमरूपास्ताः सीतां समभिदुद्रुवुः २ ततः सीतामुपागम्य राक्षस्यः क्रोधमूर्च्छिताः । परं परुषया वाचा वैदेहीमिदमब्रुवन् ३ पौलस्त्यस्य वरि-

---

केल्यां आहेस त्यांचा हिचे ठिकाणीं व्यय करण्यास खरोखर अमरश्रेष्ठ देवही अनुमोदन देणार नाहींत ४२. शिवाय, निष्काम स्त्रीची इच्छा धरणाऱ्याचें शरीर मात्र संतप्त होत असून सकाम स्त्रीची इच्छा धरणाऱ्याला चांगला आनंद प्राप्त होत असतो " ४३. ह्याप्रमाणें बोलून राक्षसीनें त्याला तेथून दूर सारिलें असतां तो मेघतुल्य बलाढ्य राक्षस तेथून हंसत हंसत परत फिरला ४४. पृथ्वी कंपित करीतच कीं काय तो रावण तेथून निघाला आणि उज्ज्वल सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या आपल्या गृहामध्यें प्रविष्ट झाला ४५ आणि देवकन्या, गंधर्वकन्या व नागकन्या ज्या त्याच्या भोंवतीं गराडा देऊन उभ्या होत्या त्याही त्याच्याबरोबर त्या श्रेष्ठ गृहामध्यें प्रविष्ट झाल्या ४६. सारांश, धर्माविषयीं तत्पर आणि लटलट कांपत असलेल्या त्या मिथिलराजकन्या सीतेची निर्भर्त्सना केल्यानंतर तिला सोडून देऊन तो काममोहित झालेला रावण स्वतःच्याच गृहामध्यें प्रविष्ट झाला ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥२२॥

शत्रूंमध्यें हाहाकार करून टाकणारा तो रावण ह्याप्रमाणें सीतेली बोलून आणि त्या सर्व राक्षसींना सांगून तेथून निघाला १ आणि तो राक्षसराज तेथून निघून पुनरपि अंतःपुरामध्यें गेल्यावर भयंकर रूप धारण करणाऱ्या त्या राक्षसस्त्रिया सीतेकडे धांवल्या २. क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या राक्षसस्त्रिया सीतेसमीप गेल्यानंतर आ...

ष्ठस्य रावणस्य महात्मनः । दशग्रीवस्य भार्यात्वं सीते न बहु मन्यसे ४
ततस्त्वेकजटा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् । आमन्त्र्य क्रोधताम्राक्षी
सीतां करतलोदरीम् ५ प्रजापतीनां षण्णां तु चतुर्थोयं प्रजापतिः । मानसो
ब्रह्मणः पुत्रः पुलस्त्य इति विश्रुतः ६ पुलस्त्यस्य तु तेजस्वी महर्षिर्मानसः
सुतः । नाम्ना स विश्रवा नाम प्रजापतिसमप्रभः ७ तस्य पुत्रो विशा-
लाक्षि रावणः शत्रुरावणः । तस्य त्वं राक्षसेन्द्रस्य भार्या भवितुमर्हसि ।
मयोक्तं चारुसर्वाङ्गि वाक्यं किं नानुमन्यसे ८ ततो हरिजटा नाम
राक्षसी वाक्यमब्रवीत् । विवृत्य नयने कोपान्मार्जारसदृशेक्षणा ९ येन
देवास्त्रयस्त्रिंशद्देवराजश्च निर्जितः । तस्य त्वं राक्षसेन्द्रस्य भार्या भवितुम-
र्हसि १० वीर्योत्सिक्तस्य शूरस्य संग्रामेष्वनिवर्तिनः । बलिनो वीर्ययु-
क्तस्य भार्या त्वं किं न लिप्ससे ११ प्रियां बहुमतां भार्यां त्यक्त्वा राजा
महाबलः । सर्वासां च महाभागां त्वामुपैष्यति रावणः १२ समृद्धं स्त्रीस-
हस्रेण नानारत्नोपशोभितम् । अन्तःपुरं तदुत्सृज्य त्वामुपैष्यति रावणः १३

---

कठोर वाणीनें तिला ह्मणाल्या ३ "पुलस्त्य पुत्र व श्रेष्ठ असा जो महात्मा दशानन रावण त्याची भार्या होणें, हे सीते, तुला बरें वाटत नाहीं ( हें नीट नव्हे ) ४. तदनंतर क्रोधानें जिचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशी एक जटानामक राक्षसी त्या सडपातळ सीतेला हाक मारून ह्मणाली ५ " सहा प्रजापतींपैकीं पुलस्त्य ह्मणून प्रसिद्ध असलेला हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र चवथा प्रजापति होय ६. कांतीनें प्रजापतीसारिखा असून विश्रवा ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला तेजस्वी महर्षि पुलस्त्याचा मानसपुत्र होय ७ आणि, हे विशालनयने सीते, शत्रूमध्यें हाहाकार उडवून देणारा हा रावण त्या पुलस्त्याचा पुत्र होय. तस्मात्, त्या राक्षसराजाची भार्या होणें तुला योग्य आहे. हे सर्वांगसुंदरि, मीं केलेला हा उपदेश तुला कां बरें संमत होत नाहीं ? " ८. तदनंतर मार्जारासारिख्या नेत्रांनीं युक्त असलेली हरिजटानामक राक्षसी क्रोधानें डोळे वटारून ह्मणाली ९ " ज्यानें तेहेतीस देव आणि देवराज इंद्र ह्यांचा पराभव केला त्या राक्षसराज रावणाची भार्या होणें तुला योग्य आहे १०. वीर्यानें उचंबळत असलेला आणि संग्रामामध्यें कधींही परावृत्त न होणारा जो शूर, बलाढ्य व वीर्यवान् रावण त्याची भार्या होणें तुझ्या मनांत कसें बरें येत नाहीं ? ११ महाबलाढ्य रावणराजा अतिशय मान्य असलेल्या आपल्या प्रिय भार्येचा त्याग करून सर्वांमध्यें भाग्यानें थोर असलेल्या तुझाच स्वीकार करील १२. सहस्र स्त्रियांनीं परिपूर्ण आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं सुशोभित असलेलें तें अंतःपुर सोडून

अन्या तु विकटा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् १४ असकृद्भीमवीर्येण नागा गन्धर्वदानवाः । निर्जिताः समरे येन स ते पार्श्वमुपागतः १५ तस्य सर्वसमृद्धस्य रावणस्य महात्मनः । किमर्थं राक्षसेन्द्रस्य भार्या त्वं नेच्छसेधमे । ततस्तां दुर्मुखी नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् १६ यस्य सूर्यो न तपति भीतो यस्य स मारुतः १७ न वाति स्मायतापाङ्गि किं त्वं तस्य न तिष्ठसे १८ पुष्पवृष्टिं च तरवो मुमुचुर्यस्य वै भयात् । शैलाः सुस्रुवुः पानीयं जलदाश्च यदेच्छति १९ तस्य नैर्ऋतराजस्य राजराजस्य भामिनि । किं त्वं न कुरुषे बुद्धिं भार्यार्थे रावणस्य हि २० साधु ते तत्त्वतो देवि कथितं साधु भामिनि । गृहाण सुस्मिते वाक्यमन्यथा न भविष्यसि २१ [१०७१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥

ततः सीतां समस्तास्ता राक्षस्यो विकृताननाः । परुषं परुषानर्हामूचुस्तद्वाक्यमप्रियम् १ किं त्वमन्तः पुरे सीते सर्वभूतमनोरमे । महार्हशय-

---

देऊन रावण तुझाच परिग्रह करील" १३. ह्यानंतर विकटानामक राक्षसी ह्मणाली १४ "ज्या भयंकर पराक्रमी रावणानें नाग, गंधर्व आणि दानव समरांगणामध्यें जिंकिले तो तुझ्या संनिध आला आहे १५. तस्मात्, हे अधमे, सर्वगुणसंपन्न अशा त्या महात्म्या राक्षसराज रावणाची भार्या होणें तुझ्या कसें बरें मनांत येत नाहीं ?" तदनंतर दुर्मुखीनामक राक्षसी तिला ह्मणाली १६ "ज्याला भिऊन जाऊन सूर्य प्रकाशत नाहीं आणि तो वायुही वहात नाहीं १७ त्याला वश होऊन, हे विशालनयने सीते, तूं कां बरें रहात नाहींस ? १८. ज्याच्या भीतीनें वृक्ष पुष्पांचा वर्षाव करितात आणि ज्याला इच्छा झाली असतां पर्वत व मेघ जलस्राव करूं लागतात १९ त्या राजाधिराज राक्षसाधिपति रावणाची भार्या होण्याची बुद्धि, हे स्त्रिये, तुला कां होत नाहीं? २०. हे देवि, हे भामिनि, खरोखर हितकर आणि उत्कृष्ट असा उपदेश मीं तुला केला आहे; ह्यास्तव, हे सुहास्यवदने, तूं हा उपदेश ऐक; नाहीं तर तूं कायम रहाणार नाहींस २१." ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

तदनंतर अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या त्या सर्व राक्षसस्त्रिया कठोर भाषणाला पात्र नसलेल्या त्या सीतेला उद्देशून कठोर व अप्रिय भाषण करूं लागल्या १. (त्या ह्मणाल्या) "सर्व प्राण्यांचें मन वेधून टाकणाऱ्या आणि मोठ्या मोठ्या मूल्यवान् शय्यांनीं युक्त असलेल्या अंतःपुरामध्यें वास्तव्य करणें, तुला कां बरें संमत

मोपेते न वासमनुमन्यसे २ मानुषे मानुषस्यैव भार्यात्वं बहु मन्यसे । प्रत्याहर मनो रामान्नैवं जातु भविष्यति ३ त्रैलोक्यवसुभोक्तारं रावणं राक्षसेश्वरम् । भर्तारमुपसंगम्य विहरस्व यथासुखम् ४ मानुषी मानुषं तं तु राममिच्छसि शोभने । राज्याद्भ्रष्टमसिद्धार्थं विक्लवं तमनिन्दिते ५ राक्षसीनां वचः श्रुत्वा सीता पद्मनिभेक्षणा । नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यामिदं वचनमब्रवीत् ६ यदिदं लोकविद्विष्टमुदाहरत संगताः । नैतन्मनसि वाक्यं मे किल्बिषं प्रतितिष्ठति ७ न मानुषी राक्षसस्य भार्या भवितुमर्हति । कामं खादत मां सर्वा न करिष्यामि वो वचः ८ दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः । तं नित्यमनुरक्तास्मि यथा सूर्यं सुवर्चला९ यथा शची महाभागा शक्रं समुपतिष्ठति । अरुन्धती वसिष्ठं च रोहिणी शशिनं यथा १० लोपामुद्रा यथागस्त्यं सुकन्या च्यवनं यथा । सावित्री सत्यवन्तं च कपिलं श्रीमती यथा ११ सौदासं मदयन्तीव केशिनी सगरं यथा । नैषधं दमयन्तीव भैमी पतिमनुव्रता १२ तथाहमिक्ष्वाकुवरं रामं

---

होत नाहीं ? २. हे मानुषे, मनुष्याचीच भार्या होऊन रहाणें तुला उत्तम वाटत आहे; परंतु, रामापासून तूं आपलें मन निवृत्त कर. कारण, तुझ्या मनाप्रमाणें आतां पुनरपि रामाचा समागम तुला कधींही होणार नाहीं ३. सारांश, त्रैलोक्यांतील संपत्तीचा उपभोग घेणाऱ्या राक्षसाधिपति रावणाचा, भर्ता ह्या नात्यानें, समागम करून तूं खुशाल क्रीडा कर ४. हे कल्याणि, हे सुंदरि, तूं स्वतः मानुषी असून राज्यापासून भ्रष्ट व मनोरथ भग्न झाल्यामुळें दुःखित झालेल्या त्या मनुष्य रामाची तूं इच्छा करीत आहेस ( हें नीट नाहीं ) " ५. हें राक्षसस्त्रियांचें भाषण श्रवण केल्यावर त्या कमलनयना सीतेचे नेत्र अश्रूंनीं भरून आले आणि ती ह्मणाली ६ " तुह्मी एकत्र जुळून जो हा जगतामध्यें निंद्य ठरलेला उपदेश मला करीत आहां तो पातकावह असल्यामुळें माझ्या मनामध्यें ठसत नाहीं ७. मनुष्यस्त्री राक्षसाची भार्या होणें योग्य नाहीं. ह्यास्तव, तुह्मी सर्व मिळून मला खाऊन टाका; मी तुमचें ह्मणणें ऐकणार नाहीं ८. दीन असो अथवा राज्यहीन असो, भर्ता हेंच माझें उपास्यदैवत आहे. तस्मात्, सूर्यपत्नी सुवर्चला ज्याप्रमाणें सूर्याचे ठिकाणीं अनुरक्त असते त्याप्रमाणें मी नेहमीं त्या रामाचेच ठिकाणीं अनुरक्त आहें ९. ज्याप्रमाणें महाभाग्यवती शची इंद्राचें, अरुंधती वसिष्ठाचें, रोहिणी चंद्राचें १०, लोपामुद्रा अगस्त्याचें, सुकन्या च्यवनाचें, सावित्री सत्यवानाचें, श्रीमती कपिलाचें ११, मदयंती सौदासाचें, केशिनी सगराचें अथवा भीमराजाची कन्या दमयंती निषधराज नलपतीचें अवलंबन करून

पतिमनुव्रता १३ सीताया वचनं श्रुत्वा राक्षस्यः क्रोधमूर्छिताः । भर्त्स-
यन्ति स्म परुषैर्वाक्यै रावणचोदिताः १४ अवलीनः स निर्वाक्यो हनु-
माञ्शिंशपाद्रुमे । सीतां संतर्जयन्तीस्ता राक्षसीरशृणोत्कपिः १५ ताम-
भिक्रम्य संरब्धा वेपमानां समन्ततः । भृशं संलिलिहुर्दीप्तान्प्रलम्बान्दश-
नच्छदान् १६ ऊचुश्च परमक्रुद्धाः प्रगृह्याशु परश्वधान् । नेयमर्हति
भर्तारं रावणं राक्षसाधिपम् १७ सा भर्त्स्यमाना भीमाभी राक्षसीभिर्व-
राङ्गना । सा बाष्पमपमार्जन्ती शिंशपान्तामुपागमत् १८ ततस्तां शिंशपां
सीता राक्षसीभिः समावृता । अभिगम्य विशालाक्षी तस्थौ शोकपरि-
प्लुता १९ तां कृशां दीनवदनां मलिनाम्बरवासिनीम् । भर्त्सयाञ्चक्रिरे
भीमा राक्षस्यस्ताः समन्ततः २० ततस्तु विनता नाम राक्षसी भीमद-
र्शना । अब्रवीत्कुपिताकारा कराला निर्णतोदरी २१ सीते पर्याप्तमेताव-
द्भर्तुः स्नेहः प्रदर्शितः । सर्वत्रातिकृतं भद्रे व्यसनायोपकल्पते २२ परि-

---

राहिली १२ त्याप्रमाणें मी इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ रामपतीचेंच अवलंबन करून राहि-
लेली आहें " १३. हें सीतेचें भाषण श्रवण करून त्या राक्षसस्त्रिया क्रोधानें व्याप्त
झाल्या आणि रावणाची त्यांना आज्ञा झाली असल्यामुळें कठोर भाषणांनीं तिची
निर्भर्त्सना करूं लागल्या १४. असो. त्या राक्षसस्त्रिया सीतेला धमकी देऊं लागल्या
असतांना त्यांचीं भाषणें, शिंशपावृक्षावर कांहीं एक न बोलतां दडून बसलेल्या, त्या
हनुमान् वानरानें श्रवण केलीं १५. लटलट् कांपत असलेल्या व सभोंवतीं बसलेल्या त्या
राक्षसस्त्रिया क्रुद्ध होऊन तिच्याजवळ आल्या आणि आपले प्रदीप्त व दीर्घ ओठ
एकसारिख्या चाटूं लागल्या १६. नंतर त्या अत्यंत क्रुद्ध होऊन व हातामध्यें
कुऱ्हाडी घेऊन ह्मणाल्या " राक्षसाधिपति रावण भर्ता होण्याइतकी हिची योग्य-
ताच नाहीं " १७. ह्याप्रमाणें भयंकर राक्षसस्त्रिया तिची निर्भर्त्सना करूं लागल्या
असतां ती श्रेष्ठ स्त्री सीता अश्रु पुशीत पुशीत त्या शिंशपावृक्षाजवळ गेली १८.
सारांश, राक्षसस्त्रियांनीं परिवेष्टिलेली व शोकानें घेरलेली ती विशालनयना सीता
त्या शिंशपावृक्षासमीप जाऊन उभी राहिली १९. तथापि, दीनवदन होऊन मलिन
वस्त्र परिधान करणाऱ्या त्या कृश सीतेच्या भोंवतीं जमून त्या भयंकर राक्षसस्त्रिया
तिची निर्भर्त्सना करूं लागल्याच २०. (शिंशपावृक्षासमीप गेल्या) नंतर भयंकर नेत्र,
रागीट मुद्रा व खबदाडीला गेलेले पोट ह्यांनीं युक्त असलेली विनतानामक अक्राळ-
विक्राळ राक्षसी तिला ह्मणाली २१ " हे सीते, झालें इतकें पुरें झालें. तूं भर्त्या-
विषयीं आपलें प्रेम दर्शविलेंस. हे कल्याणि, कोणतीही गोष्ट अति झाली

तुष्टास्मि भद्रं ते मानुषस्ते कृतो विधिः । ममापि तु वचः पथ्यं ब्रुवन्त्याः कुरु मैथिलि २३ रावणं भज भर्तारं भर्तारं सर्वरक्षसाम् । विक्रान्तमापतन्तं च सुरेशमिव वासवम् २४ दक्षिणं त्यागशीलं च सर्वस्य प्रियवादिनम् । मानुषं कृपणं रामं त्यक्त्वा रावणमाश्रय २५ दिव्याङ्गरागा वैदेहि दिव्याभरणभूषिता । अद्यप्रभृति लोकानां सर्वेषामीश्वरी भव २६ अग्नेः स्वाहा यथा देवी शचीवेन्द्रस्य शोभने । किं ते रामेण वैदेहि कृपणेन गतायुषा २७ एतदुक्तं च मे वाक्यं यदि त्वं न करिष्यसि । अस्मिन्मुहूर्ते सर्वास्त्वां भक्षयिष्यामहे वयम् २८ अन्या तु विकटा नाम लम्बमानपयोधरा । अब्रवीत्कुपिता सीतां मुष्टिमुद्यम्य तर्जती २९ बहून्यप्रतिरूपाणि वचनानि सुदुर्मते । अनुक्रोशान्मृदुत्वाच्च सोढानि तव मैथिलि ३० न च नः कुरुषे वाक्यं हितं कालपुरस्कृतम् । आनीतासि समुद्रस्य पारमन्यैर्दुरासदम् । रावणान्तःपुरे घोरे प्रविष्टा चासि मैथिलि ३१ राव-

---

असतां ती संकटाला कारण होत असते २२. हे मैथिलि, तुझें देव बरें करो, मनुष्यजातीला योग्य असें वर्तन तूं केलें आहेस. आतां मी तुझ्यावर संतुष्ट झालें आहें. ह्यास्तव, तुझ्या हिताचें भाषण करणाऱ्या माझ्या सांगण्याप्रमाणें तूं वाग २३. देवराज इंद्राप्रमाणें पराक्रमी व शत्रूवर चाल करून जाणाऱ्या सर्व राक्षसाधिपति रावणाचा तूं भर्ता ह्मणून अंगीकार कर २४. सारांश, दरिद्री व मनुष्य जो राम त्याचा त्याग करून सरळ, दानशूर आणि सर्वांशीं प्रिय भाषण करणाऱ्या रावणाचा तूं आश्रय कर २५. हे विदेहराजकन्ये, दिव्य अलंकारांनीं भूषित होऊन आणि दिव्य उटी अंगाला लावून तूं आजपासून सर्व लोकांची स्वामिनी हो २६. हे कल्याणि, अग्नीची ज्याप्रमाणें स्वाहा अथवा इंद्राची ज्याप्रमाणें शची त्याप्रमाणें तूं रावणाची भार्या हो. हे वैदेहि, तुला त्या कृपाळकरंट्या मुमूर्षु रामाशीं काय कर्तव्य आहे ? २७. ह्या माझ्या सांगण्याप्रमाणें जर तूं न वागशील तर ह्या क्षणामध्येंच आह्मी साऱ्या मिळून तुला भक्षण करून टाकूं " २८. ह्यानंतर जिचे स्तन खालीं लोंबत आहेत अशी एक मूठ उगारून सीतेला धमकी देत असलेली विकटानामक क्रुद्ध राक्षसी ह्मणाली २९. "हे महादुष्टे मैथिलि, दयेमुळें आणि आमचा स्वभाव गरीब पडल्यामुळें तुझीं पुष्कळच अयोग्य भाषणें ह्या वेळेपर्यंत आह्मीं सहन केलीं ३०. परंतु, कालाला योग्य व हितावह असा आमचा उपदेश जर तूं न ऐकशील तर इतरांचें जेथें गमन होणेंही दुर्घट आहे अशा समुद्राच्या परतीराला तुला आणिलें असून, हे मैथिलि, रावणाच्या घोर अंतःपुरामध्यें तुला नेऊन ठेविलें

णस्य गृहे रुद्धा अस्माभिस्त्वभिरक्षिता । न त्वां शक्तः परित्रातुमपि साक्षात्पुरन्दरः ३२ कुरुष्व हितवादिन्या वचनं मम मैथिलि । अलमश्रुनिपातेन त्यज शोकमनर्थकम् ३३ भज प्रीतिं प्रहर्षं च त्यजन्ती नित्यदैन्यताम् । सीते राक्षसराजेन परिक्रीड यथासुखम् ३४ जानीमहे यथा भीरु स्त्रीणां यौवनमध्रुवम् । यावन्न ते व्यतिक्रामेत्तावद्दुःखमवाप्नुहि ३५ उद्यानानि च रम्याणि पर्वतोपवनानि च । सह राक्षसराजेन चर त्वं मदिरेक्षणे ३६ स्त्रीसहस्राणि ते देवि वशे स्थास्यन्ति सुन्दरि । रावणं भज भर्तारं भर्तारं सर्वरक्षसाम् ३७ उत्पाट्य वा ते हृदयं भक्षयिष्यामि मैथिलि। यदि मे व्याहृतं वाक्यं न यथावत्करिष्यसि ३८ ततश्चण्डोदरी नाम राक्षसी क्रूरदर्शना । भ्रामयन्ती महच्छूलमिदं वचनमब्रवीत् ३९ इमां हरिणशावाक्षीं त्रासोत्कम्पपयोधराम् । रावणेन हृतां दृष्ट्वा दौर्हृदो मे महानयम् ४० यकृत्प्लीहं महत्क्रोडं हृदयं च सबन्धनम् । गात्राण्यपि तथा शीर्षं खादेयमिति मे मतिः ४१ ततस्तु प्रघसा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् । कण्ठ-

आहे ३१. इतकेंच नव्हे परंतु, रावणाच्या गृहामध्यें डांबून ठेविलेल्या तुझ्या पहाऱ्यावर आह्मी आहों. तस्मात्, साक्षात् इंद्रही तुझें रक्षण करण्यास समर्थ नाहीं ३२, ( हें तूं पक्कें समजून ठेव आणि ) हे मैथिलि, तुझ्या हिताची गोष्ट मी सांगत आहें ती ऐक; अश्रु ढाळणें आतां पुरें झालें; ह्या शोकांत कांहीं अर्थ नाहीं ३३. नेहमींचा दैन्यपणा सोडण्याची इच्छा असल्यास रावणाचे ठिकाणीं प्रेमबुद्धि धारण करून तूं आनंदित हो आणि, हे सीते, त्या राक्षसराजासहवर्तमान तूं खुशाल क्रीडा करीत रहा ३४. हे विनयसंपन्न सीते, स्त्रियांचें यौवन अशाश्वत आहे असें आह्मी समजतों. तस्मात्, जोंपर्यंत तें कायम आहे तोंपर्यंत तूं दुःख प्राप्त करून घेऊं नको २५. हे मदिरेक्षणे, राक्षसराज रावणासहवर्तमान तूं रम्य उद्यानांतून आणि पर्वतावरील उपवनांतून संचार कर ३६. हे देवि, हजारों स्त्रिया तुझ्या आज्ञेंत रहातील. ह्यास्तव, हे सुंदरि, सर्व राक्षसाधिपति रावणाचें तूं भर्ता ह्मणून अवलंबन कर ३७. हे मैथिलि, मीं सांगितल्याप्रमाणें जर तूं वागली नाहींस तर मी तुझें हृदय फाडून खाऊन टाकीन" ३८. तदनंतर क्रूर मुद्रेनें युक्त अशी एक चंडोदरीनामक राक्षसी मोठा शूल फिरवीत फिरवीत ह्मणाली ३९ " हरणाच्या पाडस्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत आणि भीतीमुळें जिचे स्तन कंपित होत आहेत, अशी ही स्त्री रावणानें हरण करून आणिलेली अवलोकन केल्यापासूनच मलाही एक प्रबल इच्छा झाली आहे ४०. सारांश, यकृत्, प्लीहा, वक्षस्थल, शिराबंधनासहवर्तमान हृदय, मस्तक आणि इतरही हिचे

मस्या नृशंसायाः पीडयामः ऽंकिमास्यते ४२ निवेद्यतां ततो राज्ञे मानुषी सा मृतेति च । नात्र कश्चिच्च संदेहः खादतेति स वक्ष्यति ४३ ततस्त्वजामुखी नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् । विशस्येमां ततः सर्वान्समान्कुरुत पिण्डकान् ४४ विभजाम ततः सर्वा विवादो मे न रोचते । पेयमानीयतां क्षिप्रं माल्यं च विविधं बहु ४५ ततः शूर्पणखा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् । अजामुख्या यदुक्तं वै तदेव मम रोचते ४६ सुरा चानीयतां क्षिप्रं सर्वशोकविनाशिनी । मानुषं मांसमासाद्य नृत्यामोथ निकुम्भिलाम् ४७ एवं निर्भर्त्स्यमाना सा सीता सुरसुतोपमा । राक्षसीभिर्विरूपाभिर्धैर्यमुत्सृज्य रोदिति ४८ [१११९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥ २४ ॥

अथ तासां वदन्तीनां परुषं दारुणं बहु । राक्षसीनामसौम्यानां रुरोद जनकात्मजा १ एवमुक्ता तु वैदेही राक्षसीभिर्मनस्विनी । उवाच परमत्रस्ता बाष्पगद्गदया गिरा २ न मानुषी राक्षसस्य भार्या भवितुमर्हति ।

---

अवयव खाऊन टाकावे अशी माझी इच्छा आहे " ४१. तदनंतर प्रघसानामक राक्षसी ह्मणाली " तुह्मी अशा बसलां काय ? ह्या दुष्टेचें नरडें आपण आवळून टाकूं ४२ आणि मग ती मनुष्यस्त्री मेली ह्मणून राजाला निवेदन करूं; ह्मणजे ' तुह्मी खाऊन टाका ' असें तो सांगेल, ह्यांत मुळींच संशय नाहीं " ४३. तदनंतर अजामुखीनामक राक्षसी ह्मणाली " हिला प्रथम चिरा आणि नंतर हिचे सर्व सारखे गोळे करा ४४; ह्मणजे आपण सर्वजणी वांटून घेऊं; मला हा वाद रुचत नाहीं. नानाप्रकारचीं पुष्पें आणि पुष्कळसें पेय लवकर घेऊन या " ४५. तदनंतर दुसरी एक शूर्पणखानामक राक्षसी ह्मणाली " अजामुखीनें जें सांगितलें तेंच मला बरें दिसतें ४६. सर्व दुःखविनाशक सुरा सत्वर आणवा ह्मणजे आपण ह्या मानुषमांसाचें सेवन करून निकुंभिला देवीपुढें नृत्य करूं " ४७. ह्याप्रमाणें देवकन्यातुल्य सीतेची अकाळविक्राळ राक्षसस्त्रिया निर्भर्त्सना करूं लागल्या असतां ती धैर्य सोडून रडूं लागली ४८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

ह्याप्रमाणें त्या क्रूर राक्षसी फारच कठोर व क्रूर भाषण करूं लागल्या असतां जनककन्या सीता रडूं लागली १; परंतु, राक्षसस्त्रियांनीं ह्याप्रमाणें तिला सांगितलें असतां ती विचारी सीता फारच भिऊन गेली आणि अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अस्पष्ट शब्दांनीं ह्मणाली २ " मनुष्यजातीची स्त्री राक्षसाची भार्या होण्यास समर्थ

कामं खादत मां सर्वा न करिष्यामि वो वचः ३ सा राक्षसीमध्यगता सीता सुरसुतोपमा । न शर्म लेभे शोकार्ता रावणेनेव भर्त्सिता ४ वेपते स्माधिकं सीता विशन्तीवाङ्गमात्मनः । वने यूथपरिभ्रष्टा मृगी कोकैरिवार्दिता ५ सा त्वशोकस्य विपुलां शाखामालम्ब्य पुष्पिताम् । चिन्तयामास शोकेन भर्तारं भग्नमानसा ६ सा स्नापयन्ती विपुलौ स्तनौ नेत्रजलस्रवैः । चिन्तयन्ती न शोकस्य तदान्तमधिगच्छति ७ सा वेपमाना पतिता प्रवाते कदली यथा। राक्षसीनां भयत्रस्ता विवर्णवदनाभवत् ८ तस्याः सा दीर्घबहुला वेपन्त्याः सीतया तदा । ददृशे कम्पिता वेणी व्यालीव परिसर्पती ९ सा निःश्वसन्ती शोकार्ता कोपोपहतचेतना । आर्ता व्यसृजदश्रूणि मैथिली विललाप च १० हा रामेति च दुःखार्ता हा पुनर्लक्ष्मणेति च । हा श्वश्रूर्मम कौसल्ये हा सुमित्रेति भामिनी ११ लोकप्रवादः सत्योऽयं पण्डितैः समुदाहृतः । अकाले दुर्लभो मृत्युः स्त्रिया वा

---

नाहीं. तुह्मी सर्व मिळून मला खुशाल खाऊन टाका. मी तुमचें ह्मणणें ऐकणार नाहीं" ३. राक्षसस्त्रियांच्यामध्यें सांपडलेल्या आणि "जशी कांहीं रावणानेंच निर्भर्त्सना केली आहे कीं काय असें समजून शोकाकुल झालेल्या त्या देवकन्यातुल्य सीतेला मुळींच बरें वाटेना ४. वनामध्यें कळपांतून चुकलेल्या आणि लांडग्यांनीं भंडावून सोडिलेल्या हरिणीप्रमाणें भीतीनें आपलें शरीर संकुचित करूं लागलेली सीता फारच कांपूं लागली ५; शोकानें तिचें मन खिन्न होऊन गेलें आणि ती अशोकवृक्षाच्या एका मोठ्या प्रफुल्लित शाखेचें अवलंबन करून भर्त्यासंबंधानें मनामध्यें चिंतन करूं लागली ६. नेत्रांतून चाललेल्या जलस्रावांनीं आपल्या मोठ्या मोठ्या स्तनांना स्नान घालीत असलेली ती सीता चिंतन करूं लागली असतांना तिचा शोक आवरेना ७. राक्षसस्त्रियांच्या भीतीनें त्रस्त झाल्यामुळें सीतेचें मुख निस्तेज झालें आणि प्रचंड वाऱ्यामध्यें सांपडलेल्या केळीप्रमाणें लट् लट् हालतां हालतां ती शेवटीं भूमीवरही पडली ८. लट् लट् कांपत असलेल्या त्या सीतेची ती लांब व मोठी वेणी कंपित झाली असतां इकडे तिकडे चळवळ करणाऱ्या नागिणीप्रमाणें भासूं लागली ९. कोपानें त्या मैथिलीचें अंतःकरण अगदीं व्याप्त होऊन गेलें; ती शोकाकुल झाली; दुःखानें जर्जर झाल्यामुळें दीर्घ सुस्कारे टाकूं लागली आणि अश्रु ढाळून विलापही करूं लागली १०. "हे रामा, हे लक्ष्मणा, अहो सासूबाई, हे कौसल्ये, हे सुमित्रे" ह्याप्रमाणें दुःखाकुल झालेली ती सुंदरी शोक करूं लागली (आणि ह्मणाली) ११. "स्त्रीला अथवा पुरुषाला वेळ आल्यावांचून मृत्यु दुर्लभ आहे- ही जी पंडितांनीं

पुरुषस्य वा १२ यत्राहमाभिः क्रूराभी राक्षसीभिरिहार्दिता। जीवामि हीना रामेण मुहूर्तमपि दुःखिता १३ एषाल्पपुण्या कृपणा विनशिष्याम्यनाथवत्। समुद्रमध्ये नौः पूर्णा वायुवेगैरिवाहता १४ भर्तारं तमपश्यन्ती राक्षसीवशमागता। सीदामि खलु शोकेन कूलं तोयहतं यथा १५ तं पद्मदलपत्राक्षं सिंहविक्रान्तगामिनम्। धन्याः पश्यन्ति मे नाथं कृतज्ञं प्रियवादिनम् १६ सर्वथा तेन हीनाया रामेण विदितात्मना। तीक्ष्णं विषमिवास्वाद्य दुर्लभं मम जीवनम् १७ कीदृशं तु महापापं मया देहान्तरे कृतम्। येनेदं प्राप्यते घोरं महादुःखं सुदारुणम् १८ जीवितं त्यक्तुमिच्छामि शोकेन महता वृता। राक्षसीभिश्च रक्षन्त्या रामो नासाद्यते मया १९ धिगस्तु खलु मानुष्यं धिगस्तु परवश्यताम्। न शक्यं यत्परित्यक्तुमात्मच्छन्देन जीवितम् २० [११३९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चविंशः सर्गः॥ २५॥

---

लिहून ठेविलेली ह्मण ती अगदीं खरी आहे १२. कारण, रामाचा वियोग होऊन मी दुःखित झालें असतांना आणि ह्या क्रूर राक्षसस्त्रियांनीं मला येथें गांजिलें असतांना मुहूर्तभर कां होईना परंतु, मी जिवंत आहें १३. मज कपाळकरंटीच्या पदरीं पुण्य अगदींच थोडें आहे आणि ह्यामुळें तब्बल भरलेली नौका वायुवेगांनीं ताडित झाली असतां जशी समुद्रामध्यें नष्ट होऊन जाते तशी मी अनाथाप्रमाणें नाहींशी होईन १४. तो जगत्प्रसिद्ध भर्ता माझ्या दृष्टीं पडत नसून मी राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडल्यामुळें खरोखर उदकाचे धक्के बसलेल्या तीराप्रमाणें शोकाच्या योगानें खचून जात आहे १५. कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आहेत आणि सिंहासारखी ज्याची गति पराक्रमसूचक आहे असा तो कृतज्ञ व प्रिय भाषण करणारा माझा नाथ ज्यांच्या दृष्टीं पडत असेल ते धन्य आहेत १६. जालीम विष सेवन केल्यावर ज्याप्रमाणें जीवन दुर्लभ आहे त्याचप्रमाणें सर्व प्रकारें त्या जगद्विख्यात रामाचा वियोग झालेल्या माझें जीवन दुर्लभ आहे १७. ज्याअर्थीं मला हे अत्यंत दारुण, घोर व प्रचंड दुःख प्राप्त झालें आहे त्याअर्थीं माझ्या हातून जन्मांतरीं कसलें बरें महापातक घडलें आहे ? १८. प्रचंड शोकानें ग्रस्त झालेली मी आतां जीविताचा त्याग करण्याची इच्छा करीत आहें. कारण, मी राक्षसस्त्रियांच्या प्रतिबंधांत असल्यामुळें रामाची भेट मला होत नाहीं १९. आपल्या इच्छेप्रमाणें ज्याअर्थीं जीविताचाही त्याग करितां येणें शक्य नाहीं त्याअर्थीं खरोखर मनुष्यपणाला आणि त्याचप्रमाणें परतंत्रतेला धिक्कार असो २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीम-

प्रसक्ताश्रुमुखी त्वेवं ब्रुवती जनकात्मजा । अधोगतमुखी बाला विलप्तुमुपचक्रमे १ उन्मत्तेव प्रमत्तेव भ्रान्तचित्तेव शोचती । उपावृत्ता किशोरीव विचेष्टन्ती महीतले २ राघवस्य प्रमत्तस्य रक्षसा कामरूपिणा । रावणेन प्रमथ्याहमानीता क्रोशती बलात् ३ राक्षसीवशमापन्ना भर्त्स्यमाना च दारुणम् । चिन्तयन्ती सुदुःखार्ता नाहं जीवितुमुत्सहे ४ न हि मे जीवितेनार्थो नैवार्थैर्न च भूषणैः । वसन्त्या राक्षसीमध्ये विना रामं महारथम् ५ अश्मसारमिदं नूनमथवाप्यजरामरम् । हृदयं मम येनेदं न दुःखेन विशीर्यते ६ धिङ्मामनार्यामसतीं याहं तेन विना कृता । मुहूर्तमपि जीवामि जीवितं पापजीविका ७ चरणेनापि सव्येन न स्पृशेयं निशाचरम् । रावणं किं पुनरहं कामयेयं निशाचरम् ८ प्रत्याख्यानं न जानाति नात्मानं नात्मनः कुलम् । यो नृशंस-

---

द्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५॥

जिच्या मुखावर अश्रु आलले आहेत अशी ती जनककन्या बाला सीता ह्याप्रमाणें बोलतां बोलतां खालीं मान घालून विलाप करूं लागली १. पिशाचादिकांनीं झपाटल्याप्रमाणें, ( पित्ताचा अतिरेक वगैरे झाल्यामुळें ) मत्त झाल्याप्रमाणें आणि मनाला भ्रांति झाल्याप्रमाणें शोक करीत असलेली ती सीता भूतलावर लोळूं लागली असतां श्रमपरिहार करण्याकरितां लोळणाऱ्या शिंगीप्रमाणें दिसूं लागली ( आणि म्हणाली ) २ " इच्छेप्रमाणें रूप धारण करणाऱ्या मारीच राक्षसानें राघवाला मोह पाडिल्यामुळें रावणानें माझे हाल हाल करून मी आक्रोश करीत असतांना बलात्कारानें मला येथें आणिलें ३. मी राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडलें असून भयंकर रीतीनें माझी निर्भर्त्सना चालली आहे आणि मी अत्यंत दुःखाकुल झालें असून चिंताक्रांत बसलें आहें. ह्यामुळें आतां मला जगावेंसें वाटत नाहीं ४. राक्षसस्त्रियांमध्यें महारथी रामावांचून ज्याअर्थी मी वास्तव्य करीत आहें त्याअर्थी जीविताशीं, संपत्तीशीं आणि भूषणांशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं ५. खरोखर माझें हें हृदय अगदीं बळकट पाषाणाचें तरी आहे अथवा अजरामर तरी आहे आणि म्हणूनच तें दुःखामें विदीर्ण होत नाहीं ६. त्या रामाचा वियोग झाला असतां मुहूर्तभरसुद्धां मला जिवंत रहाणें योग्य नसतांना पाप्याप्रमाणें उपजीविका करून मी जिवंत राहिलें आहें, तस्मात्, मज असाध्वी दुष्टेला धिक्कार असो ७. निशाचराला डाव्या पायानेंही मी कधीं स्पर्श करणार नाहीं मग निशाचर रावणाची मी इच्छा काढून करणार ? ८. रावण आपण कोण हें जाणीत नाहीं आणि आपल्या कुलाची ह्यांत

स्वभावेन मां प्रार्थयितुमिच्छति ९ छिन्ना भिन्ना प्रभिन्ना वा दीप्ता वाग्नौ प्रदीपिता । रावणं नोपतिष्ठेयं किं प्रलापेन वश्चिरम् १० ख्यातः प्राज्ञः कृतज्ञश्च सानुक्रोशश्च राघवः । सद्वृत्तो निरनुक्रोशः शङ्के मद्भाग्यसंक्षयात् ११ राक्षसानां जनस्थाने सहस्राणि चतुर्दश । एकेनैव निरस्तानि स मां किं नाभिपद्यते १२ कामं मध्ये समुद्रस्य लङ्केयं दुष्प्रधर्षणा । न तु राघवबाणानां गतिरोधो भविष्यति १३ किं नु तत्कारणं येन रामो दृढपराक्रमः । रक्षसापहृतां भार्यामिष्टां यो नाभिपद्यते १४ इहस्थां मां न जानीते शङ्के लक्ष्मणपूर्वजः । जानन्नपि स तेजस्वी धर्षणां मर्षयिष्यति १५ हृतेति मां योऽधिगत्य राघवाय निवेदयेत् । गृध्रराजोऽपि स रणे रावणेन निपातितः १६ कृतं कर्म महत्तेन मां तदाभ्यवपद्यता । तिष्ठता रावणवधे वृद्धेनापि जटायुषा १७ यदि मामिह जानीयाद्वर्तमानां हि राघवः । अद्य बाणैरभिक्रुद्धः कुर्याल्लोकमराक्षसम् १८ निर्दहेच्च पुरीं

---

अपकीर्ति होत आहे हेंही त्याला समजत नाहीं. कारण, तो आपल्या दुष्ट स्वभावाला अनुसरून ( राक्षसस्त्रियांच्या द्वारानें ) मला वश करून घेण्याची इच्छा करीत आहे ९. ( हे राक्षसस्त्रियांनों, ) तुमच्या ह्या बडबडीचा उपयोग काय ? मी छिन्नभिन्न झालें असतां, माझे तुकडे तुकडे झाले असतां, भाजून गेलें असतां अथवा पेटलें असतांही रावणाचा स्वीकार करणार नाहीं १०. राघव प्राज्ञ, कृतज्ञ, दयाळु आणि सद्वर्तनी ह्मणून प्रसिद्ध आहे; परंतु, आज माझें भाग्य नाहींसें झाल्यामुळेंच कीं काय कोण जाणें तो निर्दय झाला आहे अशी मला शंका येते ११. जनस्थानामध्यें ज्या एकट्यानें चवदा हजार राक्षसांचा नाश केला तो आज मला घेऊन कां जात नाहीं ? १२. समुद्रामध्यें असलेली ही लंका इतरांना खुशाल अजिंक्य असो; परंतु, रामबाणांची गति येथें कुंठित होणार नाहीं १३. राम महापराक्रमी असतांना राक्षसानें हरण करून नेलेल्या आपल्या प्रिय भार्येला घेऊन जात नाहीं, ह्याचें कारण तरी काय बरें असावें? १४. मी येथें आहें, हें लक्ष्मणाच्या ज्येष्ठ भ्रात्याला ठाऊकच नाहीं अशी मला शंका येते. कारण, जाणून बुजून तो तेजस्वी राम एवढा अपमान कसा सहन करील ? १५. राक्षसानें मला हरण करून नेलें ह्मणून ज्याला रामाकडे जाऊन सांगतां आलें असतें त्या गृध्रराज जटायूचाही रावणानें रणामध्यें वध केला १६. माझ्यावर अनुग्रह करण्याकरितां जटायूनें वृद्ध असतांनाही रावणाचा वध करण्याविषयीं तत्परता दर्शविली हें त्यानें मोठेंच कृत्य केलें १७. मी येथें विद्यमान असल्याचें जर राघवाला समजेल तर आजच्या आजच तो क्रुद्ध राम बाणांच्या योगानें

लङ्कां निर्दहेच्च महोदधिम् । रावणस्य च नीचस्य कीर्तिं नाम च नाश-
येत् १९ ततो निहतनाथानां राक्षसीनां गृहे गृहे । यथाहमेवं रुदती
तथा भूयो न संशयः २० अन्विष्य रक्षसां लङ्कां कुर्याद्रामः
सलक्ष्मणः । न हि ताभ्यां रिपुर्दृष्टो मुहूर्तमपि जीवति २१ चिता
धूमाकुलपथा गृध्रमण्डलमण्डिता । अचिरेणैव कालेन श्मशानसदृशी
भवेत् २२ अचिरेणैव कालेन प्राप्स्याम्येनं मनोरथम् । दुष्प्रस्थानोऽयमा-
भाति सर्वेषां वो विपर्ययः २३ यादृशानि तु दृश्यन्ते लङ्कायामशुभानि
तु । अचिरेणैव कालेन भविष्यति हतप्रभा २४ नूनं लङ्का हते पापे रावणे
राक्षसाधिपे । शोषमेष्यति दुर्धर्षा प्रमदा विधवा यथा २५ पुण्योत्सवस-
मृद्धा च नष्टभर्त्री सराक्षसा । भविष्यति पुरी लङ्का नष्टभर्त्री यथा-
ङ्गना २६ नूनं राक्षसकन्यानां रुदतीनां गृहे गृहे । श्रोष्यामि न चिरा-
देव दुःखार्तानामिह ध्वनिम् २७ सान्धकारा हतद्योता हतराक्षसपुंगवा ।

---

सर्व जगत् राक्षसशून्य करून टाकील १८. इतकेंच नव्हे परंतु, तो लंकानगरी जाळून टाकील; महासागर दग्ध करील आणि ह्या नीच रावणाची कीर्ति व नांवही नष्ट करून टाकील १९ व असें झालें ह्मणजे पतींचा वध झालेल्या राक्षसस्त्रियांच्या घरोघर ज्याप्रमाणें मी येथें रडत बसलें आहें त्याप्रमाणें माझ्यापेक्षांही अधिक रडारड होईल ह्यांत संशय नाहीं २०. लंकेचा शोध लावून लक्ष्मणासहवर्तमान राम राक्षसांचा नाश करील. ) परंतु, मी येथें आहें हें त्याला समजावें कसें ? ) बाकी शत्रु त्या रामलक्ष्मणांच्या दृष्टीस पडला असतां एक मुहूर्तभरही जिवंत रहाणार नाहीं २१. थोडक्याच कालामध्यें रामलक्ष्मण लंका जिंकून टाकितील; तिच्यांतील मार्ग धूमानें व्याप्त होऊन जातील; गृध्रपक्ष्यांच्या समुदायांनीं ती भूषित होईल आणि लवकरच ती श्मशानासारिखी दिसूं लागेल २२. सारांश, थोडक्याच कालांत माझा हा मनोरथ सिद्धीस जाणार आहे; आणि तुह्मां सर्वांच्या ह्या विपरीत बुद्धीचा परिणाम मला नीट दिसत नाहीं २३. लंकेमध्यें जीं अशुभ चिन्हें दिसत आहेत त्यांवरून पाहूं गेलें असतां थोडक्याच काळानें ही लंका निस्तेज होऊन जाईल २४. खरोखर राक्षसाधिपति पापी रावणाचा वध होऊन ही अजिंक्य लंका वैधव्य प्राप्त झालेल्या तरुण स्त्रीप्रमाणें शुष्क होऊन जाईल २५. आज आनंदकारक उत्सवसमारंभांनीं भरलेली आणि राक्षसांनीं युक्त असलेली ही लंकानगरी अधिपति वध पावला असतां विधवा स्त्रीप्रमाणें शोचनीय होऊन जाईल २६. खरोखर ह्या लंकेमध्यें घरोघर शोकाकुल झालेल्या आणि ह्मणूनच रडूं लागलेल्या राक्षसकन्यांचा

भविष्यति पुरी लङ्का निर्दग्धा रामसायकैः २८ यदि नाम स शूरो मां
रामो रक्तान्तलोचनः । जानीयाद्वर्तमानां यां राक्षसस्य निवेशने २९
अनेन तु नृशंसेन रावणेनाधमेन मे । समयो यस्तु निर्दिष्टस्तस्य कालो-
यमागतः ३० स च मे विहितो मृत्युरस्मिन्दुष्टेन वर्तते । अकार्यं ये न
जानन्ति नैर्ऋताः पापकारिणः ३१ अधर्मात्तु महोत्पातो भविष्यति हि
सांप्रतम् । नैते धर्मं विजानन्ति राक्षसाः पिशिताशनाः ३२ ध्रुवं मां
प्रातराशार्थं राक्षसः कल्पयिष्यति । साहं कथं करिष्यामि तं विना
प्रियदर्शनम् ३३ रामं रक्तान्तनयनमपश्यन्ती सुदुःखिता । क्षिप्रं वैवस्वतं
देवं पश्येयं पतिना विना ३४ नाजानाज्जीवतीं रामः स मां भरतपूर्वजः ।
जानन्तौ तु न कुर्यातां नोर्व्यां हि परिमार्गणम् ३५ नूनं ममैव शोकेन स
वीरो लक्ष्मणाग्रजः । देवलोकमितो यातस्त्यक्त्वा देहं महीतले ३६
धन्या देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । मम पश्यन्ति ये वीरं रामं

---

ध्वनि लवकरच माझ्या कानीं येईल २७. रामबाणांच्या योगानें ह्या लंका नगरींतील राक्षसश्रेष्ठांचा वध होईल; ही निस्तेज होईल आणि दग्ध होऊन अंधकारानें भरून जाईल २८. परंतु, आरक्तवर्ण प्रांतांनीं युक्त असलेले ज्याचे नेत्र आहेत अशा त्या शूर रामाला मी राक्षसाच्या घरीं विद्यमान असल्याचें जर समजेल तर ( ह्या सर्व गोष्टी घडणार ) २९. ह्या दुष्ट व अधम रावणानें जी मला मुदत सांगितली होती ती भरण्याचा हा समय तर येऊन ठेपला ३०. दुष्ट राक्षसानें ठरवून ठेविलेला तो माझा मृत्यु आतां मात्र प्राप्त झालाच. कारण, पापकर्म करणाऱ्या राक्षसांना करण्यास अयोग्य म्हणून कांहीं ठाऊकच नसतें ३१. सांप्रत जो हा परस्त्रीहरणरूप अनर्थ झाला आहे त्या अनर्थापासून मोठा उत्पात होईल. कारण, हे मांसभक्षक राक्षस धर्म मुळींच जाणीत नाहींत ३२. तो राक्षस निःसंशय माझी न्याहारीकडे योजना करील. तस्मात्, अशी संकटावस्थेंत सांपडलेली मी ज्याचें दर्शनही प्रिय आहे अशा त्या रामावांचून आतां कसें बरें करूं ? ३३. ज्याचे नेत्रप्रांत आरक्तवर्ण आहेत असा राम दृष्टीं पडत नसल्यामुळें अत्यंत दुःखित झालेली मी पतीवांचून सत्वरच देव यमधर्माला अवलोकन करीन ३४. रामाला आणि त्या लक्ष्मणालाही मी जिवंत असल्याचें ठाऊक नाहीं. कारण, त्यांना जर समजलें असतें तर सर्व पृथ्वीमध्यें माझा शोध केल्यावांचून ते कधींही न राहते ३५. खरोखर माझ्याच शोकामुळें तो वीर राम भूतलावर देह टाकून येथून देवलोकीं चालता झाला आहे ३६. माझ्या कमलनयन वीर रामाला अवलोकन करणारे देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षि

राजीवलोचनम् ३७ अथवा न हि तस्यार्थो धर्मकामस्य धीमतः । मया रामस्य राजर्षेर्भार्यया परमात्मनः ३८ दृश्यमाने भवेत्प्रीतिः सौहृदं नास्त्यदृश्यतः । नाशयन्ति कृतघ्नास्तु न रामो नाशयिष्यति ३९ किं वा मय्यगुणाः केचित्किं वा भाग्यक्षयो हि मे । या हि सीता वरार्हेण हीना रामेण भामिनी ४० श्रेयो मे जीवितान्मर्तुं विहीनाया महात्मना । रामादक्लिष्टचारित्राच्छूराच्छत्रुनिबर्हणात् ४१ अथवा न्यस्तशस्त्रौ तौ वने मूलफलाशनौ । भ्रातरौ हि नरश्रेष्ठौ चरन्तौ वनगोचरौ ४२ अथवा राक्षसेन्द्रेण रावणेन दुरात्मना । छद्मना घातितौ शूरौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४३ साहमेवंविधे काले मर्तुमिच्छामि सर्वतः । न च मे विहितो मृत्युरस्मिन्दुःखेतिवर्तति ४४ धन्याः खलु महात्मानो मुनयः सत्यसंमताः । जितात्मानो महाभागा येषां न स्तः प्रियाप्रिये ४५ प्रियान्न संभवेद्दुःखमप्रियादधिकं भवेत् । ताभ्यां हि ते वियुज्यन्ते नमस्तेषां महात्म-

---

धन्य आहेत ३७. अथवा त्या विवेकी, धर्मनिष्ठ व परमात्म्या रामराजर्षीला माझें कांहीं प्रयोजनच उरलें नसावें ३८. दृष्टीसमोर असलेल्या मनुष्याचे ठिकाणीं प्रेम कायम असतें; तेंच मनुष्य दृष्टीआड झालें असतां त्याच्यासंबंधानें प्रेम कायम रहात नाहीं. परंतु, ( सांप्रत असेंही ह्मणतां येणार नाहीं. कारण, ) कृतघ्न पुरुष दृष्टीआड झालेल्या मनुष्यावरील प्रेम नाहींसें करितात, तसें राम करणार नाहीं ३९. कदाचित् माझे ठिकाणीं ( पतीनें माझी उपेक्षा करण्यासारिखे ) कांहीं दोषही असतील; अथवा उत्कृष्ट वस्तूंनाच पात्र असलेल्या रामाचा ज्याअर्थी मला वियोग झाला आहे त्याअर्थी मज सीतानामक स्त्रीचें भाग्यच संपलें ह्मणावयाचें ४०. त्या महात्म्या रामाशिवाय जगण्यापेक्षां निर्दोष वर्तनानें युक्त असलेल्या त्या शूर शत्रुनाशक रामाचे हातून मरण येणेंच मला श्रेयस्कर आहे ४१. अथवा वनामध्यें वास्तव्य करणारे व हिंडणारे ते पुरुषश्रेष्ठ भ्राते वनामध्यें शस्त्रांचा त्याग करून फलमूलांवर उपजीविका करणारे बनले असतील ( तेव्हां हाही आपला मनोरथ सिद्धीस जाण्याचा संभव नाहीं ) ४२. किंवा दुरात्म्या राक्षसाधिपति रावणानें त्या शूर भ्रात्या रामलक्ष्मणांचा कपटानें वधही करविला असेल ४३. तस्मात्, अशा प्रसंगीं मला मरणच बरें वाटत आहे. परंतु, ह्या पराकाष्ठेच्या दुःखामध्यें माझा मृत्यु नेमिलेला नाहीं ४४. ज्यांना प्रिय आणि अप्रिय हीं दोन्हीं नाहींत ते महात्मे, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय व महाभाग्यवान् मुनि खरोखर धन्य आहेत ४५. प्रिय वस्तूंचा वियोग झाला असतां ज्यांना दुःख होत नाहीं आणि अप्रिय गोष्ट प्राप्त झाली असतां ज्याला अधिक कांहीं होत नाहीं

नाम् ४६ साहं त्यक्ता प्रियेणैव रामेण विदितात्मना । प्राणांस्त्यक्ष्यामि पापस्य रावणस्य गता वशम् ४७ [११८६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

इत्युक्ताः सीतया घोरं राक्षस्यः क्रोधमूर्छिताः । काश्चिज्जग्मुस्तदाख्यातुं रावणस्य दुरात्मनः १ ततः सीतामुपागम्य राक्षस्यो भीमदर्शनाः। पुनः परुषमेकार्थमनर्थार्थमथाब्रुवन् २ अद्येदानीं तवानार्ये सीते पापविनिश्चये । राक्षस्यो भक्षयिष्यन्ति मांसमेतद्यथासुखम् ३ सीतां ताभिरनार्याभिर्दृष्ट्वा संतर्जितां तदा । राक्षसी त्रिजटा वृद्धा प्रबुद्धा वाक्यमब्रवीत् ४ आत्मानं खादतानार्या न सीतां भक्षयिष्यथ । जनकस्य सुतामिष्टां स्नुषां दशरथस्य च ५ स्वप्नो ह्यद्य मया दृष्टो दारुणो रोमहर्षणः। राक्षसानामभावाय भर्तुरस्या भवाय च ६ एवमुक्तास्त्रिजटया राक्षस्यः क्रोधमूर्छिताः । सर्वा एवाब्रुवन्भीतास्त्रिजटां तामिदं वचः । कथयस्व

---

आणि ह्मणूनच प्रिय आणि अप्रिय ह्या दोन्ही गोष्टींपासून जे अलग असतात त्या महात्म्यांना नमस्कार असो ४६. सारांश, आत्मवेत्त्या प्रिय रामानेंच त्याग केल्यामुळें दुष्ट रावणाच्या अधीन झालेली मी प्राणत्यागच करीन ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

ह्याप्रमाणें सीतेनें राक्षसस्त्रियांशीं कठोर भाषण केलें असतां त्या राक्षसस्त्रिया क्रोधानें व्याप्त झाल्या आणि त्यांपैकीं कांहीं दुरात्म्या रावणाला तें सांगण्याकरितां गेल्या १. तदनंतर दिसण्यांतही भयंकर अशा दुसऱ्या राक्षसस्त्रिया सीतेच्या समीप आल्या आणि परिणामीं अनर्थावह होणारें व एकाच अर्थाचें असें कठोर भाषण पुनरपि तिच्याशीं करूं लागल्या २. ( त्या ह्मणाल्या ) :" हे दुष्टे सीते, तुझा हेतु वाईट आहे. ह्यास्तव, आज ह्या राक्षसस्त्रिया आतांच्या आतांच हें तुझें मांस खुशाल भक्षण करितील " ३. ह्याप्रमाणें त्या दुष्ट राक्षसींनीं सीतेला धमकी दिलेली अवलोकन करून त्रिजटानामक वृद्ध व समंजस राक्षसी त्यांना ह्मणाली ४ " दुष्ट राक्षसस्त्रियांनों, तुह्मी आपल्यालाच खाऊन टाका. जनकाची प्रिय कन्या आणि दशरथाची प्रिय स्नुषा जी सीता तिला भक्षण करणें तुमच्या हातून होणार नाहीं ५. कारण, शरीरावर रोमांच उठविणारें असें एक भयंकर स्वप्न राक्षसांच्या नाशाचें व हिच्या भर्त्याच्या अभ्युदयाचें सूचक असें मीं आज अवलोकन केलें " ६. ह्याप्रमाणें त्रिजटेनें सांगितलें असतां क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या राक्षसस्त्रिया सर्वही भयभीत होऊन

त्वया दृष्टः स्वप्नोयं कीदृशो निशि ७ तासां श्रुत्वा तु वचनं राक्षसीनां
मुखोद्गतम्। उवाच वचनं काले त्रिजटा स्वप्नसंश्रितम् ८ गजदन्तमयीं
दिव्यां शिबिकामन्तरिक्षगाम्। युक्तां वाजिसहस्रेण स्वयमास्थाय राघवः९
शुक्लमाल्याम्बरधरो लक्ष्मणेन समागतः। स्वप्ने चाद्य मया दृष्टा सीता
शुक्लाम्बरावृता १० सागरेण परिक्षिप्तं श्वेतपर्वतमास्थिता। रामेण संगता
सीता भास्करेण प्रभा यथा ११ राघवश्च पुनर्दृष्टश्चतुर्दन्तं महागजम्।
आरूढः शैलसंकाशं चकास सहलक्ष्मणः १२ ततस्तु सूर्यसंकाशौ दीप्य-
मानौ स्वतेजसा। शुक्लमाल्याम्बरधरौ जानकीं पर्युपस्थितौ १३ ततस्तस्य
नगस्याग्रे ह्याकाशस्थस्य दन्तिनः। भर्त्रा परिगृहीतस्य जानकी स्कन्ध-
माश्रिता १४ भर्तुरङ्कात्समुत्पत्य ततः कमललोचना। चन्द्रसूर्यौ मया
दृष्टौ पाणिभ्यां परिमार्जती १५ ततस्ताभ्यां कुमाराभ्यामास्थितः स गजो-
त्तमः। सीतया च विशालाक्ष्या लङ्कायाउपरिस्थितः १६ पाण्डुरर्षभ-

---

त्या त्रिजटेला ह्मणाल्या " रात्रीं हें तुला कशा प्रकारचें स्वप्न पडलें तें तूं आह्मांला कथन कर " ७. हें त्या राक्षसस्त्रियांच्या मुखांतून निघालेलें भाषण श्रवण केल्यावर त्याचवेळीं ती त्रिजटा स्वप्नासंबंधानें त्यांच्याशीं भाषण करूं लागली ८. ( ती ह्मणाली ) " सहस्र अश्वांनीं युक्त आणि हस्तिदंतमय अशा आकाशगामी दिव्य शिबिकेमध्यें राम आरूढ झाला आहे; श्वेतवर्ण पुष्पें आणि वस्त्रें त्यानें धारण केलेलीं आहेत आणि लक्ष्मण त्याच्याबरोबर आहे, असें मीं आज स्वप्नामध्यें अवलोकन केलें. त्याचप्रमाणें श्वेतवर्ण वस्त्रांनीं आच्छादिलेली सीता सागरानें परिवेष्टिलेल्या श्वेतपर्वता-वर आरूढ झालेली मीं आज स्वप्नामध्यें अवलोकन केली. ती सीता सूर्याशीं संगत होणाऱ्या प्रभेप्रमाणें रामाशीं युक्त झालेली होती ९, १०, ११. त्याचप्रमाणें पुन-रपि मोठ्या पर्वतप्राय चौदंती गजावर, लक्ष्मणासहवर्तमान बसलेला राम झळकत आहे असें मीं अवलोकन केलें १२. त्याचप्रमाणें स्वतःच्या तेजानें देदीप्यमान असलेले आणि शुभ्र वस्त्रें व पुष्पें धारण केलेले सूर्यतुल्य रामलक्ष्मण सीतेसमीप उभे आहेत असेंही मीं पाहिलें १३. तदनंतर आकाशामध्यें असलेल्या त्या श्वेतपर्वताच्या अग्र-भागीं भर्त्यानें जिला अंकावर घेतलें आहे अशी जानकी गजाच्या स्कंदावर आरूढ झालेली मीं पाहिली १४. तदनंतर कमलासारिख्या नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता हातांनीं चंद्रसूर्यांना झाडीत असल्याचेंही मीं अवलोकन केलें १५. नंतर ते राजकुमार रामलक्ष्मण आणि विशालनयना सीता हीं ज्यावर आरूढ झालीं आहेत असा तो गज लंकेवर उभा असल्याचें मीं अवलोकन केलें १६. श्वेतवर्ण आठ वृषभ ज्याला जोडिले

युक्तेन रथेनाष्टयुजा स्वयम् । शुक्लमाल्याम्बरधरो लक्ष्मणेन सहागतः१७ ततोऽन्यत्र मया दृष्टो रामः सत्यपराक्रमः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया सह वीर्यवान् १८ आरुह्य पुष्पकं दिव्यं विमानं सूर्यसंनिभम् । उत्तरां दिशमालोच्य प्रस्थितः पुरुषोत्तमः १९ रावणश्च मया दृष्टो मुण्डस्तैलसमुक्षितः । रक्तवासाः पिबन्मत्तः करवीरकृतस्रजः २० विमानात्पुष्पकादद्य रावणः पतितः क्षितौ । कृष्यमाणः स्त्रिया मुण्डो दृष्टः कृष्णाम्बरः पुनः २१ रथेन खरयुक्तेन रक्तमाल्यानुलेपनः । पिबंस्तैलं हसन्नृत्यन्भ्रान्तचित्ताकुलेन्द्रियः २२ गर्दभेन ययौ शीघ्रं दक्षिणां दिशमाश्रितः । पुनरेव मया दृष्टो रावणो राक्षसेश्वरः २३ पतितो विशिरा भूमौ गर्दभाद्भयमोहितः । सहसोत्थाय संभ्रान्तो भयार्तो मदविह्वलः २४ उन्मत्तरूपो दिग्वासा दुर्वाक्यं प्रलपन्बहु । दुर्गन्धं दुःसहं घोरं तिमिरं नरकोपमम्२५ मलपङ्कं प्रविश्याशु मग्नस्तत्र स रावणः । प्रस्थितो दक्षिणामाशां प्रविष्टो-

---

आहेत अशा रथावर श्वेतवर्ण पुष्पें व वस्त्रें धारण केलेला राम लक्ष्मणासहवर्तमान आरूढ होऊन येथें आलेला मीं अवलोकन केला १७. तदनंतर अमोघपराक्रमी व वीर्यवान् पुरुषश्रेष्ठ राम भ्राता लक्ष्मण आणि सीता ह्यांसहवर्तमान सूर्याप्रमाणें उज्ज्वल अस-लेल्या दिव्य पुष्पकविमानामध्यें आरूढ होऊन व उत्तरदिशेला अनुलक्षून निघालेला मीं पाहिला १८,१९. रावण तांबड्या कण्हेराच्या माळा घालून आरक्तवर्ण वस्त्रें परिधान केलेला, अंगाला तेल चोपडलेला, श्मश्रु करविलेला आणि मत्त होऊन तेल पीत असलेला मीं अवलोकन केला २०. रावण पुष्पकविमानापासून पृथ्वीवर पडलेला मीं आज अवलोकन केला. त्याचप्रमाणें त्याचें मुंडण केलेलें असून त्यानें कृष्णवस्त्रें परिधान केलेलीं आहेत आणि एक स्त्री त्याला ओढून नेत आहे असेंही मीं अवलोकन केलें २१. त्याचप्रमाणें आरक्तवर्ण पुष्पें धारण करून आणि आरक्त-वर्ण उटी लावून रावण गर्दभ जोडिलेल्या रथावर आरूढ झाला आहे; आणि त्याचें मन व इंद्रियें भ्रांतिग्रस्त झालीं असून तो तेल पीत आहे, हंसत आहे व नृत्य करीत आहे असेंही मीं अवलोकन केलें २२. तसाच तो राक्षसाधिपति रावण गर्दभावर आरूढ होऊन दक्षिणदिशेस जात असलेला पुनरपि स्वप्नामध्यें माझ्या दृष्टीं पडला २३. शिरश्छेद होऊन भयानें मोहित झालेला रावण गर्दभावरून भूमीवर पडला; तेथून लगबगीनें उठून तो अतिशय भ्रांतिग्रस्त झाला आणि भयभीत व मदमत्त झाला असेंही मीं अवलोकन केलें २४. उन्मत्त, दिगंबर आणि हवें तितकें अभद्र भाषण बोलणारा असा तो रावण दुर्गंधि, दुःसह, घोर, नरकतुल्य आणि मळ व चिखल

कर्दमं ह्रदम् २६ कण्ठे बद्ध्वा दशग्रीवं प्रमदा रक्तवासिनी । काली कर्दमलिप्ताङ्गी दिशं याम्यां प्रकर्षति २७ एवं तत्र मया दृष्टः कुम्भकर्णो महाबलः । रावणस्य सुताः सर्वे मुण्डास्तैलसमुक्षिताः २८ वराहेण दशग्रीवः शिशुमारेण चेन्द्रजित् । उष्ट्रेण कुम्भकर्णश्च प्रयातो दक्षिणां दिशम् २९ एकस्तत्र मया दृष्टः श्वेतच्छत्रो विभीषणः । चतुर्भिः सचिवैः सार्धं वैहायसमुपस्थितः ३० समाजश्च महान्वृत्तो गीतवादित्रनिःस्वनः । पिबतां रक्तमाल्यानां रक्षसां रक्तवाससाम् ३१ लङ्का चेयं पुरी रम्या सवाजिरथकुञ्जरा । सागरे पतिता दृष्टा भग्नगोपुरतोरणा ३२ पीत्वा तैलं प्रमत्ताश्च प्रहसन्त्यो महास्वनाः । लङ्कायां भस्मरुक्षायां सर्वा राक्षसयोषितः ३३ कुम्भकर्णादयश्चेमे सर्वे राक्षसपुङ्गवाः । रक्तं निवसनं गृह्य प्रविष्टा गोमयह्रदम् ३४ अपगच्छत पश्यध्वं सीतामाप्नोति राघवः ।

---

ह्यांनीं युक्त असलेल्या अंधकारामध्यें सत्वर प्रविष्ट होऊन त्यांत गडप झाल्याचेंही मीं अवलोकन केलें. त्याचप्रमाणें दक्षिणदिशेस निघालेला रावण कर्दमरहित तळ्यामध्यें प्रविष्ट झाल्याचें मीं पाहिलें २५.२६ आणि आरक्तवर्ण वस्त्र जिनें नेसलें आहे व जिचें शरीर चिखलानें भरलेलें आहे अशी एक कृष्णवर्ण तरुण स्त्री रावणाच्या गळ्याला फांस लावून दक्षिणदिशेस त्याला ओढून नेत आहे असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें २७. ह्याप्रमाणें महाबलाढ्य कुंभकर्णही स्वप्नामध्यें माझ्या दृष्टीं पडला. रावणाच्या सर्व पुत्रांचें मुंडण केलें असून त्यांच्या अंगावर तेल शिंपडलेलें आहे असेंही मीं पाहिलें २८. रावण सूकरावर, इंद्रजित शिशुमारसंज्ञक जलचर प्राण्यावर आणि कुंभकर्ण उंटावर आरूढ होऊन दक्षिणदिशेस गेल्याचें मीं अवलोकन केलें २९. एक बिभीषण मात्र श्वेतवर्ण छत्रांनीं युक्त असून चार सचिवांसहवर्तमान आकाशमार्गानें गमन करणाऱ्या विमानामध्यें आरूढ झालेला मीं अवलोकन केला ३० आणि त्याच्या भोंवतीं गायन व वादन ह्यांच्या ध्वनींनीं युक्त असलेला एक प्रचंड समाजही मीं अवलोकन केला. आरक्तवर्ण वस्त्रें आणि आरक्तवर्ण पुष्पें धारण करून तेल पीत असलेल्या राक्षसांची ही रम्य लंकानगरी गोपुरें व तोरणें मोडून जाऊन अश्व, रथ व गज ह्यांसहवर्तमान सागरामध्यें पडलेली मीं अवलोकन केली ३१, ३२. तेल पिऊन सर्व राक्षसस्त्रिया मत्त झाल्या आहेत आणि भस्मानें रुक्ष झालेल्या ह्या लंकेमध्यें उच्च स्वरानें हंसत आहेत असेंही मीं अवलोकन केलें ३३. हे सर्व कुंभकर्णप्रभृति राक्षसश्रेष्ठ आरक्तवर्ण वस्त्र नेसून शेणखळ्यांच्या डबक्यांत शिरलेले मीं अवलोकन केले ३४. तस्मात्, हे राक्षसस्त्रियांनों, तुह्मी दूर व्हां. पहा, राघव आतां

घातयेत्परमामर्षी युष्मान्सार्धं हि राक्षसैः ३५ प्रियां बहुमतां भार्यां वनवासमनुव्रताम् । भर्त्सितां तर्जितां वापि नानुमंस्यति राघवः ३६ तदलं क्रूरवाक्यैश्च सान्त्वमेवाभिधीयताम् । अभियाचाम वैदेहीमेतद्धि मम रोचते ३७ यस्या ह्येवंविधः स्वप्नो दुःखितायाः प्रदृश्यते । सा दुःखैर्बहुभिर्मुक्ता प्रियं प्राप्नोत्यनुत्तमम् ३८ भर्त्सितामपि याचध्वं राक्षस्यः किं विवक्षया । राघवाद्धि भयं घोरं राक्षसानामुपस्थितम् ३९ प्रणिपातप्रसन्ना हि मैथिली जनकात्मजा । अलमेषा परित्रातुं राक्षस्यो महतो भयात् ४० अपि चास्या विशालाक्ष्या न किंचिदुपलक्षये । विरूपमपि चाङ्गेषु न सूक्ष्ममपि लक्षणम् ४१ छायावैगुण्यमात्रं तु शङ्के दुःखमुपस्थितम् । अदुःखार्हामिमां देवीं वैहायसमुपस्थिताम् ४२ अर्थसिद्धिं तु वैदेह्याः पश्याम्यहमुपस्थिताम् । राक्षसेन्द्रविनाशं च विजयं राघवस्य च ४३ निमित्तभूतमेतत्तु श्रोतुमस्या महत्प्रियम् । दृश्यते च

सीतेला लवकरच प्राप्त करून घेणार असून अतिशय संतप्त झाल्यामुळें तो राक्षसांसहवर्तमान तुमचाही वध करील ३५. वनवासामध्येंही बरोबर असलेल्या त्याच्या प्रिय व बहुमत भार्येची तुह्मी निर्भर्त्सना केल्याचें अथवा तिला धमकी दिल्याचें त्या राघवाला सहन होणार नाहीं ३६. तस्मात्, आतां क्रूर भाषणें बंद करून सौम्य भाषणच केलें पाहिजे. इतकेंच नव्हे परंतु, वैदेहीची आपण क्षमाही मागितली पाहिजे हें मला बरें दिसतें ३७. दुःखामध्यें असतांनाही जिच्यासंबंधानें अशा प्रकारचें स्वप्न दृष्टीं पडत आहे ती सर्व दुःखांपासून मुक्त होत असते आणि तिचा सर्वोत्कृष्ट मनोरथ परिपूर्ण होत असतो ३८. हे राक्षसस्त्रियांनों, तुह्मी जरी हिची निर्भर्त्सना केली आहे तरी आतां क्षमा मागा. हिच्याशीं कुत्सित भाषण करण्याची इच्छा धरून कांहींएक उपयोग नाहीं. रघुवंशज रामापासून राक्षसांना घोर भय उपस्थित झालें आहे (हें तुह्मी पक्कें समजा) ३९. प्रणिपातानें ही जनककन्या मैथिली प्रसन्न झाली असतां, हे राक्षसस्त्रियांनों, तुमचें मोठ्या भयापासून संरक्षण करील ४०. शिवाय, विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या ह्या सीतेच्या अवयवांचे ठिकाणीं सूक्ष्महीं दुश्चिन्ह मला कांहींच आढळत नाहीं ४१. सारांश, दुःखाचा उपभोग घेण्यास योग्य नसलेल्या आणि स्वप्नामध्यें विमानांत आरूढ होऊन माझ्या दृष्टोत्पत्तीस आलेल्या ह्या सीतेच्या शरीराचे ठिकाणीं दुःखाचा परिणाम कांहींएक झालेला नसून फक्त (स्नान वगैरे नसल्यामुळें) देहाच्या कांतींत मात्र वैगुण्य दिसत असल्याची मला शंका येत आहे ४२. वैदेहीचा मनोरथ लवकरच सिद्धीस जाणार असून राक्षसाधिपतीचा नाश आणि राघवाचा जय ह्या गोष्टीही

स्फुरच्चक्षुः पद्मपत्रमिवायतम् ४४ ईषच्च हृषितो वास्या दक्षिणाया ह्यदक्षिणः । अकस्मादेव वैदेह्या बाहुरेकः प्रकम्पते ४५ करेणुहस्तप्रतिमः सव्यश्चोरुरनुत्तमः । वेपन्कथयतीवास्या राघवं पुरतः स्थितम् ४६ पक्षी च शाखानिलयं प्रविष्टः पुनः पुनश्चोत्तमसान्त्ववादी । सुस्वागतां वाचमुदीरयाणः पुनः पुनश्चोदयतीव हृष्टः ४७ ततः सा ह्रीमती बाला भर्तुर्विजयहर्षिता । अवोचद्यदि तत्तथ्यं भवेयं शरणं हि वः ४८ [ १२३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

सा राक्षसेन्द्रस्य वचो निशम्य तद्रावणस्याप्रियमप्रियार्ता । सीता वितत्रास यथा वनान्ते सिंहाभिपन्ना गजराजकन्या १ सा राक्षसीमध्यगता च भीरुर्वाग्भिर्भृशं रावणतर्जिता च । कान्तारमध्ये विजने विसृष्टा बालेव कन्या

---

अगदीं जवळच येऊन पोंचल्या आहेत असें मला दिसतें ४३. ह्या सीतेचा श्रेष्ठ मनोरथ सिद्धीस गेल्याचें श्रवण करण्याची पाळी आपणांला लवकरच येणार आहे असेंही एक चिन्ह मला दिसत आहे. कमलपत्राप्रमाणें विशाल असलेला हिचा डावा डोळा स्फुरण पावत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत आहे ४४. वर्तनानें सरळ असलेल्या ह्या वैदेहीचा वामबाहु किंचित् रोमांचयुक्त झाला असून एकाएकीं स्फुरण पावत आहे ४५. त्याचप्रमाणें गजशुंडेप्रमाणें असलेली हिची उत्कृष्ट डावी मांडी स्फुरण पावत आहे आणि त्यामुळें तो राम येऊन पुढें उभा राहिल्याचेंच जसें कांहीं सुचवीत आहे ४६. पक्षी वृक्षशाखेवरील आपल्या घरट्यामध्यें जाऊन वारंवार उत्कृष्ट व सौम्य शब्द करीत आहेत आणि आनंदित होऊन वारंवार मनोरथसिद्धिसूचक वाणीचा उच्चार करणारे ते पक्षी सीतेला ( राघवाचें दर्शन घेण्यास ) जशी कांहीं प्रेरणाच करीत आहेत " ४७. ह्याप्रमाणें त्रिजटेनें सांगितल्यानंतर लज्जेनें युक्त असलेली ती बाला सीता पतिविजयासंबंधानें आनंदित झाली आणि " त्या त्रिजटेचें बोलणें जर खरें होईल तर मी तुमचें रक्षण करीन असें त्या राक्षसींना ह्मणाली ४८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

असो. राक्षसाधिपति रावणाचें तें अप्रिय भाषण श्रवण करून दुःखाकुल झालेली सीता वनामध्यें सिंहांनीं घेरून टाकिलेल्या गजेंद्रकन्येप्रमाणें त्रस्त होऊन गेली १. राक्षसस्त्रियांच्या कचाट्यांत सांपडलेली आणि रावणानें शब्दांनीं अतिशय धमकी दिलेली ती भित्री सीता निर्जन अरण्यामध्यें सोडून दिलेल्या अल्पवयी कन्येप्रमाणें विलाप

विललाप सीता २ सत्यं बतेदं प्रवदन्ति लोके नाकालमृत्युर्भवतीति सन्तः । यत्राहमेवं परिभर्त्स्यमाना जीवामि यस्मात्क्षणमप्यपुण्या ३ सुखाद्विहीनं बहुदुःखपूर्णमिदं तु नूनं हृदयं स्थिरं मे । विदीर्यते यन्न सहस्रधाद्य वज्राहतं शृङ्गमिवाचलस्य ४ नैवास्ति नूनं मम दोषमत्र वध्याहमस्याप्रियदर्शनस्य । भावं न चास्याहमनुप्रदातुमलं द्विजो मन्त्रमिवाद्विजाय ५ तस्मिन्ननागच्छति लोकनाथे गर्भस्य जन्तोरिव शल्यकृन्तः । नूनं ममाङ्गान्यचिरादनार्यः शरैः शितैश्छेत्स्यति राक्षसेन्द्रः ६ दुःखं बतेदं ननु दुःखिताया मासौ चिरायाभिगमिष्यतो द्वौ । बद्धस्य वध्यस्य यथा निशान्ते राजोपरोधादिव तस्करस्य ७ हा राम हा लक्ष्मण हा सुमित्रे हा राममातः सह मे जनन्यः । एषा विपद्याम्यह-

---

करूं लागली २. ( ती ह्मणाली ) “ अशा प्रकारें निर्भर्त्सना होत असून क्षणभर कां होईना, मी पापिणी जर जिवंत रहात आहें तर अकालीं मृत्यु प्राप्त होत नाहीं असें जें जगतामध्यें सज्जन ह्मणत असतात तें अगदीं खरें आहे ३. सुखाला मुकलेल्या आणि अपार दुःखानें भरलेल्या ह्या माझ्या हृदयाचे ज्याअर्थी वज्राचा तडाका बसलेल्या पर्वताप्रमाणें हजारों तुकडे होऊन जात नाहींत त्याअर्थी हें खरोखर बळकट आहे ४. ज्याचें दर्शनही दुःखदायक आहे अशा ह्या रावणाच्या हातून जर माझा वध व्हावयाचाच आहे तर ह्या प्रसंगीं आत्मघाताचाही मला खरोखर दोष लागणार नाहीं. (कारण ब्राह्मणाच्या हातून वध पावलेला आणि आत्मघाती ह्या उभयतांनाही अग्निसंस्काराचा अधिकार नसल्यामुळें ब्राह्मणकुलामध्यें जन्मास आलेल्या रावणाच्या हातून वध पावण्यापेक्षां आत्मघात करून घेणें ह्यांत वाईट तें काय ? ). द्विजेतराला वेद देणें ज्याप्रमाणें द्विजाला शक्य नसतें त्याप्रमाणें मी आपलें प्रेम ह्याला समर्पण करण्यास समर्थ नाहीं ५. तो जगन्नाथ राम ( रावणानें दिलेली मुदत भरण्यापूर्वीं ) जर न येईल तर गर्भामध्यें असलेल्या रोगरूप प्राण्यांचे ज्याप्रमाणें शस्त्रवैद्य तुकडे करून टाकितो त्याप्रमाणें राक्षसाधिपति दुष्ट रावण तीक्ष्ण बाणांनीं खरोखर माझ्या अवयवांचे तुकडे तुकडे करून टाकील ६. पुष्कळ दिवसपर्यंत रामवियोगानें आधींच दुःखित झालेल्या मला हें वधदुःखही भोगावें लागणार आहे. कारण, हे मुदतीचे दोन महिने लवकरच संपून जातील आणि राजाला त्रास दिल्यामुळें वधाला पात्र झालेल्या व ह्मणूनच प्रतिबंधांत ठेविलेल्या चोराचा ज्याप्रमाणें रात्र संपल्यानंतर वध होत असतो त्याप्रमाणें माझाही वध निःसंशय होईल ७. हे रामा, हे लक्ष्मणा, हे सुमित्रे, हे राममाते, हे माझ्या मातांनो, वादळाच्या तडाक्यांत सांपडलेली नौका ज्याप्रमाणें महासागरामध्यें मग्न होऊन

मल्पभाग्या महार्णवे नौरिव मूढवाता ८ तरस्विनौ धारयता मृगस्य सत्त्वेन रूपं मनुजेन्द्रपुत्रौ । नूनं विशस्तौ मम कारणात्तौ सिंहर्षभौ द्वाविव वैद्युतेन ९ नूनं स कालो मृगरूपधारी मामल्पभाग्यां लुलुभे तदानीम् । यत्रार्यपुत्रौ विससर्ज मूढा रामानुजं लक्ष्मणपूर्वजं च १० हा राम सत्यव्रत दीर्घबाहो हा पूर्णचन्द्रप्रतिमानवक्त्र । हा जीवलोकस्य हितः प्रियश्च वध्यां न मां वेत्सि हि राक्षसानाम् ११ अनन्यदेवत्वमियं क्षमा च भूमौ च शय्या नियमश्च धर्मे । पतिव्रतात्वं विफलं ममेदं कृतं कृतघ्नेष्विव मानुषाणाम् १२ मोघं हि धर्मश्चरितो ममायं तथैकपत्नीत्वमिदं निरर्थकम् । या त्वां न पश्यामि कृशा विवर्णा हीना त्वया संगमने निराशा १३ पितुर्निर्देशं नियमेन कृत्वा वनान्निवृत्तश्चरितव्रतश्च । स्त्रीभिस्तु मन्ये विपुलेक्षणाभिः संरंस्यसे वीतभयः कृतार्थः १४ अहं तु राम त्वयि जातकामा चिरं विनाशाय निबद्धभावा । मोघं चरित्वाथ तपो व्रतं च त्यक्ष्यामि

---

नाते त्याप्रमाणें ही मी भाग्यहीन स्त्री मरण पावणार ८. विद्युल्लतेच्या तेजानें ज्याप्रमाणें दोन श्रेष्ठ सिंहांचा वध व्हावा त्याप्रमाणें मृगरूप धारण करणाऱ्या त्या राक्षसानें त्या बलाढ्य राजपुत्रांचा खरोखर माझ्याकरितां वध केला असून त्यांना फाडून टाकिलें आहे ९. आर्यपुत्र राम आणि लक्ष्मण ह्या उभयतांचाही ज्याच्या योगानें मज मूढ स्त्रीला वियोग झाला तो खरोखर मृगवेष धारण करणारा कालच होता; व त्यानेंच त्यावेळीं भाग्यहीन अशा मला लुब्ध करून टाकिलें १०. हे रामा, हे सत्यनिष्ठा, हे महापराक्रमी, हे पूर्णचंद्रतुल्यसुहास्यवदना, तूं जगतांतील सर्व प्राण्यांचें हित करणारा. व त्यांना प्रिय असूनही मी राक्षसांना वध्य झाल्याचें तुला कसें समजत नाहीं ? ११. मनुष्यांनीं कृतघ्नांचे ठिकाणीं केलेला उपकार ज्याप्रमाणें व्यर्थ जातो त्याप्रमाणें पतिहेंच मुख्य दैवत मानून रहाणें अशा प्रकारची क्षमा, भूमीवर शय्या, धर्माचे ठिकाणीं निष्ठा आणि पातिव्रत्य हें सर्व व्यर्थ झालें आहे १२. आपला वियोग झाल्यामुळें मी कृश व निस्तेज झालें आहें; आपण माझ्या दृष्टीं पडत नाहीं ह्यामुळें मी भेटीविषयीं निराश झालें आहें आणि, ह्मणूनच हें माझें धर्माचरण व्यर्थ झालें असून हें पातिव्रत्यही निष्फळ झालें आहे १३. नियमानें आणि व्रतस्थ राहून पित्याची आज्ञा पार पाडिल्यानंतर आपण वनांतून निवृत्त व्हाल आणि निर्भय व कृतार्थ होऊन विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या स्त्रियांसहवर्तमान रममाण व्हाल असें मला वाटतें १४. हे राम, माझ्या सर्व कांहीं इच्छा आपणांवरच अवलंबून आहेत आणि चिरकालपर्यंत मी आपल्या ठिकाणीं प्रेम ठेवून राहिलें आहें; परंतु, प्राणांतिक दुःख हा ह्याचा परिणाम

धिग्जीवितमल्पभाग्याम् १५ संजीवितं क्षिप्रमहं त्यजेयं विषेण शस्त्रेण शितेन वापि। विषस्य दाता न तु मेस्ति कश्चिच्छस्त्रस्य वा वेश्मनि राक्षसस्य १६ शोकाभितप्ता बहुधा विचिन्त्य सीताथ वेणीग्रथनं गृहीत्वा । उद्बद्ध्य वेण्युद्ग्रथनेन शीघ्रमहं गमिष्यामि यमस्य मूलम् १७ उपस्थिता सा मृदुसर्वगात्री शाखां गृहीत्वा च नगस्य तस्य । तस्यास्तु रामं परिचिन्तयन्त्या रामानुजं स्वं च कुलं शुभाङ्ग्याः १८ तस्या विशोकानि तदा बहूनि धैर्यार्जितानि प्रवराणि लोके। प्रादुर्निमित्तानि तदा बभूवुः पुरापि सिद्धान्युपलक्षितानि १९ [ १२५३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

तथागतां तां व्यथितामनिन्दितां व्यतीतहर्षां परिदीनमानसाम् । शुभां निमित्तानि शुभानि भेजिरे नरं श्रिया जुष्टमिवोपसेविनः १ तस्याः शुभं वाममरालपक्ष्मराज्यावृतं कृष्णविशालशुक्लम् । प्रास्पन्दतैकं नयनं

---

होणार आहे. तस्मात्, आचरिलेलं व्रत व तप व्यर्थ झाल्यामुळें मी ह्या जीविताचा त्याग करितें. धिक्कार असो ह्या भाग्यहीन स्त्रीला ! १५. विषानें अथवा तीक्ष्ण शस्त्रानें जीविताचा मी सत्वर त्याग करणार आहें; परंतु, राक्षसाच्या गृहामध्यें मला विष अथवा शस्त्र देणारा कोणीही नाहीं १६. शोकानें तप्त झालेल्या त्या सीतेनें ह्याप्रमाणें नानाप्रकारांनीं विचार केल्यानंतर अगवळ हातीं घेतला आणि " ह्या अगवळानें मी सत्वर यमाचे समीप जाईन " १७ असें ह्मणून सर्व कोमल अवयवांनीं युक्त असलेली ती सीता त्या वृक्षाची एक शाखा हातीं धरून आपला बेत शेवटास नेण्यास तयार झाली; परंतु, ह्याप्रमाणें जीविताचा अंत करण्यास तयार झालेली ती सीता राम, लक्ष्मण आणि आपलें कुल ह्यांविषयीं विचार करूं लागली असतां शुभ अवयवांनीं युक्त असलेल्या तिला शोकनाशक आणि धैर्यवर्धक अशीं सुचिन्हें पुष्कळचं होऊं लागलीं. तीं सुचिन्हें जगतामध्यें उत्कृष्ट ठरलेलीं होतीं; आणि पूर्वींही अनुभव आला असल्यामुळें अभ्युदयसूचक ह्मणून मनाला खात्री पटविणारीं होतीं १८, १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

दुःखपीडित आणि हर्षरहित अशी ती सीता मनामध्यें अतिशय दीन होऊन तशा स्थितींत असतांना वैभवसंपन्न पुरुषाची ज्याप्रमाणें सेवा करण्यास सेवक उद्युक्त होऊं लागतात त्याप्रमाणें त्या निर्दोष व शुभ सीतेला शुभ शकुन होऊं लागले १. वक्र पापण्यांनीं व्याप्त, काळीभोर बुबुळें व सभोंवतीं श्वेतवर्ण ह्यांनीं युक्त आणि दोन्ही

सुकेश्या मीनाहतं पद्ममिवाभिताम्रम् २ भुजश्च चार्वञ्चितवृत्तपीनः परा-
र्ध्यकालागुरुचन्दनार्हः । अनुत्तमेनाध्युषितः प्रियेण चिरेण वामः सम-
वेपताशु ३ गजेन्द्रहस्तप्रतिमश्च पीनस्तयोर्द्वयोः संहतयोः सुजातः ।
प्रस्पन्दमानः पुनरूरुरस्या रामं पुरस्तात्स्थितमाचचक्षे ४ शुभं पुनर्हेम-
समानवर्णमीषद्रजोध्वस्तमिवातुलाक्ष्याः । वासः स्थितायाः शिखराग्र-
दन्त्याः किंचित्परिस्रंसत चारुगात्र्याः ५एतैर्निमित्तैरपरैश्च सुभ्रूः संचोदिता
प्रागपि साधुसिद्धैः । वातातपक्लान्तमिव प्रणष्टं वर्षेण बीजं प्रतिसंजहर्ष ६
तस्याः पुनर्बिम्बफलोपमोष्ठं स्वक्षिभ्रुकेशान्तमरालपक्ष्म । वक्त्रं बभासे
सितशुक्लदंष्ट्रं राहोर्मुखाच्चन्द्र इव प्रमुक्तः ७ सा वीतशोका व्यपनीततन्द्रा
शान्तज्वरा हर्षविबुद्धसत्त्वा । अशोभतार्या वदनेन शुक्ले शीतांशुना रात्रि-
रिवोदितेन ८ [१२६१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
सुन्दरकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

---

बाजूंना आरक्तवर्ण असा—उत्कृष्ट केशपाशानें युक्त असलेल्या—त्या सीतेचा शुभ डावा डोळा सभोंवतीं आरक्तवर्ण असून मत्स्याचा धक्का लागल्यामुळें स्फुरण पावत असलेल्या कमलाप्रमाणें स्फुरण पावूं लागला २. मनोहर, रोमांचयुक्त, वर्तुल, पुष्ट, उत्कृष्ट प्रकारच्या कृष्णागुरूची व चंदनाची उटी लावण्यास योग्य आणि पुष्कळ दिवसपर्यंत सर्वोत्कृष्ट प्रिय रामाचा संपर्क झालेला तिचा वामबाहु एकदम स्फुरण पावूं लागला ३. दृढ अशा तिच्या दोन पायांपैकीं एक गजशुंडेप्रमाणें वर्तुल, पुष्ट व सुंदर पाय स्फुरण पावूं लागला आणि ह्मणूनच राम अगदीं पुढें उभाच राहिला आहे कीं काय असें तिला सुचवूं लागला ४. त्याचप्रमाणें अनुपम नेत्र, डाळिंबाच्या बियांच्या अग्रासारिखे दंत आणि मनोहर स्वरूप ह्यांनीं युक्त असलेली ती सीता तेथें असतांना किंचित् मलिन झालेलें परंतु सुवर्णासारिखें पीतवर्ण असलेलें तिचें वस्त्र थोडेंसें स्थानापासून च्युत झालें ५. पूर्वीं ज्यांचें चांगलें प्रत्यंतर आलेलें आहे असे हे व दुसरेही शुभ शकुन होऊं लागले असतां वाऱ्यानें व उन्हानें कोमेजून जाऊन जवळ जवळ नाश पावलेलें बीज ज्याप्रमाणें वृष्टीच्या योगानें हर्षयुक्त होतें त्याप्रमाणें ती हर्षयुक्त झाली ६. पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें लाल ओंठ, उत्कृष्ट नेत्र, भिंवया, कुरळे केस, बक्र पापण्या आणि पांढऱ्या स्वच्छ दाढा ह्यांनीं युक्त असलेली तिची मुद्रा राहूच्या जबड्यांतून मुक्त झालेला चंद्रच कीं काय अशी दिसूं लागली ७. असो. ( वर निर्दिष्ट केलेले शुभ शकुन होऊं लागल्यामुळें ) तिचा शोक नाहींसा झाला; सुस्ती गेली; संताप शांत झाला व हर्षानें अंतःकरण प्रफुल्लित झालें आणि ह्यामुळें शुक्लपक्षामध्यें ज्याप्रमाणें

हनुमानपि विक्रान्तः सर्वं शुश्राव तत्त्वतः । सीतायास्त्रिजटायाश्च
राक्षसानां च गर्जितम् १ अवेक्षमाणस्तां देवीं देवतामिव नन्दने । ततो
बहुविधां चिन्तां चिन्तयामास वानरः २ यां कपीनां सहस्राणि सुबहू-
न्ययुतानि च । दिक्षु सर्वासु मार्गन्ते सेयमासादिता मया ३ चारेण तु
सुयुक्तेन शत्रोः शक्तिमवेक्षता । गूढेन चरता तावदवेक्षितमिदं मया ४
राक्षसानां विशेषश्च पुरी चेयं निरीक्षिता । राक्षसाधिपतेरस्य प्रभावो
रावणस्य च ५ यथा तस्याप्रमेयस्य सर्वसत्त्वदयावतः । समाश्वासयितुं
भार्यां पतिदर्शनकाङ्क्षिणीम् ६ अहमाश्वासयाम्येनां पूर्णचन्द्रनिभाननाम् ।
अदृष्टदुःखां दुःखस्य न ह्यन्तमधिगच्छतीम् ७ यदि ह्यहं सतीमेनां शोको-
पहतचेतनाम् । अनाश्वास्य गमिष्यामि दोषवद्गमनं भवेत् ८ गते हि मयि
तत्रेयं राजपुत्री यशस्विनी । परित्राणमपश्यन्ती जानकी जीवितं त्यजेत् ९

---

उदय पावलेल्या चंद्राच्या योगानें रात्र शोभूं लागते, त्याप्रमाणें ती साध्वी सीता आपल्या मुखानें शोभूं लागली. ८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकोणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

महापराक्रमी हनुमानानें सीतेचें भाषण आणि त्रिजटा व राक्षस ह्यांची गर्जना हें सर्व इत्थंभूत श्रवण केलें १ आणि नंदनवनामध्यें दृष्टीं पडणारी देवताच कीं काय अशा रीतीनें ती सीता देवी तो वानर अवलोकन करूं लागला असतां नानाप्रकारचे विचार त्याच्या मनामध्यें येऊं लागले २. ( तो ह्मणाला ) " जिला हजारों लाखों किंबहुना असंख्य वानर सर्व दिशेस शोधीत आहेत ती ही माझ्या आढळण्यांत आली ३. शत्रूचें सामर्थ्य अवलोकन करण्याकरितां मोठ्या बंदोबस्तानें हेराचा वेष धारण करून गुप्तपणें संचार करितां करितां माझ्या असें आढळण्यांत आलें ४. राक्षसांचे ठिकाणीं विशेष काय आहे हें दिसून आलें; ही नगरी पाहिली; ह्या राक्षसाधिपति रावणाचा प्रभावही आढळून आला ५ आणि प्राणिमात्रावर दया करणाऱ्या त्या अतर्क्यस्वरूप रामानें पतिदर्शनाची इच्छा धरून राहिलेल्या आपल्या असल्या भार्येकरितां त्रैलोक्य पालथें घालण्याचेंही मनामध्यें आणणें योग्य आहे ह्याविषयीं माझी खात्री झाली ६. असो. पूर्णचंद्राप्रमाणें जिचें मुख आल्हादकारक आहे आणि पतिवियोगदुःखाचा अनुभव नसल्यामुळें शोक करितां करितांही जी थांबत नाहीं अशा ह्या सीतेला मी धीर देतों ७. शोकानें जिचें अंतःकरण व्याकुळ झालेलें आहे अशा ह्या साध्वी सीतेचें सांत्वन केल्यावांचून मी जर जाईन तर माझें जाणें अनर्थावह होईल ८. कारण, मी तिकडे गेल्यावर रक्षण करणारा कोणी नाहीं असें आढळून आलें ह्मणजे ही यशस्वी राजकन्या

यथा च स महाबाहुः पूर्णचन्द्रनिभाननः । समाश्वासयितुं न्याय्यः सीतादर्शनलालसः १० निशाचरीणां प्रत्यक्षमक्षमं चाभिभाषितम् । कथं नु खलु कर्तव्यमिदं कृच्छ्रगतो ह्यहम् ११ अनेन रात्रिशेषेण यदि नाश्वास्यते मया । सर्वथा नास्ति संदेहः परित्यक्ष्यति जीवितम् १२ रामस्तु यदि पृच्छेन्मां किं मां सीताब्रवीद्वचः । किमहं तं प्रतिब्रूयामसंभाष्य सुमध्यमाम् १३ सीतासंदेशरहितं मामितस्त्वरया गतम् । निर्दहेदपि काकुत्स्थः क्रोधतीव्रेण चक्षुषा १४ यदि वोद्योजयिष्यामि भर्तारं रामकारणात् । व्यर्थमागमनं तस्य ससैन्यस्य भविष्यति १५ अन्तरं त्वहमासाद्य राक्षसीनामवस्थितः । शनैराश्वासयाम्यद्य संतापबहुलामिमाम् १६ अहं ह्यतितनुश्चैव वानरश्च विशेषतः । वाचं चोदाहरिष्यामि मानुषीमिह संस्कृताम् १७ यदि वाचं प्रदास्यामि द्विजाति-

---

जानकी जीविताचा त्याग करील ९. पूर्णचंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त आणि सीतेच्या दर्शनाची उत्कंठा लागलेल्या महापराक्रमी रामचंद्राला ज्याप्रमाणें ( सीतेचा शोध लागला हें कळवून ) धीर देणें न्याय्य आहे त्याचप्रमाणें हिलाही धीर देणें न्याय्य आहे १०. शिवाय, राक्षसस्त्रियांनीं समक्ष केलेलें हें भाषणही उपेक्षा करण्यासारिखें नाहीं. तेव्हां आतां कसें करावें ? ह्या मोठ्या अडचणींत मी सांप्रत पडलों आहें ११. ही रात्र शिलक आहे तोंच जर मी हिला धीर दिला नाहीं तर ती जीविताचा त्याग करील ह्याविषयीं मुळींच शंका नाहीं १२. बरें, सुंदरी सीतेशीं भाषण न करितां जर मी रामाकडे गेलों आणि " सीतेनें मला काय निरोप सांगितला आहे ?," असें जर रामानें मला विचारिलें तर मी त्याला काय उत्तर देऊं ? १३. सीतेचा निरोप घेतल्याशिवाय जर मी येथून त्वरेनें गेलों तर ककुत्स्थकुलोत्पन्न राम क्रोधानें संतप्त झालेल्या दृष्टीच्या योगानें मला दग्धही करून टाकील १४. ( सीतेशीं संभाषण न करितां ती अमुक अमुक ठिकाणीं आहे असा वृत्तांत ) वानराधिपति सुग्रीवाला कळवून रामाकरितां जर मी त्याला उद्योग करण्यास लावीन तर सैन्यासहवर्तमान त्याचें येथें येणेंच व्यर्थ होऊन जाईल. ( कारण, इतका काल लोटेपर्यंत सीता आश्वासन न मिळेल तर जिवंत रहाण्याचाच संभव नाहीं ) १५. राक्षसी इकडे तिकडे पहात आहेत असा समय साधून मी येथें येऊन बसलों आहें. ह्याकरितां, अतिशय संतप्त झालेल्या हिचें आजच हलकें हलकें मी सांत्वन करीन १६. मीं जरी अतिसूक्ष्म रूप धारण केलें आहे आणि विशेषतः मी जरी वानर आहें तरी ह्या ठिकाणीं संस्कृत अशा मनुष्यवाणीनेंच मी बोलेन १७; परंतु, ब्राह्मणाप्रमाणें संस्कृत भाषण मी जर

रिव संस्कृताम् । रावणं मन्यमाना मां सीता भीता भविष्यति १८ अवश्यमेव वक्तव्यं मानुषं वाक्यमर्थवत् । मया सान्त्वयितुं शक्या नान्यथेयमनिन्दिता १९ सेयमालोक्य मे रूपं जानकी भाषितं तथा । रक्षोभिस्त्रासिता पूर्वं भूयस्त्रासमुपैष्यति २० ततो जातपरित्रासा शब्दं कुर्यान्मनस्विनी । जानाना मां विशालाक्षी रावणं कामरूपिणम् २१ सीतया च कृते शब्दे सहसा राक्षसीगणः । नानाप्रहरणो घोरः समेयादन्तकोपमः २२ ततो मां संपरिक्षिप्य सर्वतो विकृताननाः । वधे च ग्रहणे चैव कुर्युर्यत्नं महाबलाः २३ तं मां शाखाः प्रशाखाश्च स्कन्धांश्चोत्तमशाखिनाम् । दृष्ट्वा च परिधावन्तं भवेयुः परिशङ्किताः २४ मम रूपं च संप्रेक्ष्य वने विचरतो महत् । राक्षस्यो भयवित्रस्ता भवेयुर्विकृतस्वराः २५ ततः कुर्युः समाह्वानं राक्षस्यो रक्षसामपि । राक्षसेन्द्रनियुक्तानां राक्षसेन्द्रनिवेशने २६ ते शूलशरनिस्त्रिंशविविधायुधपाणयः । आपतेयुर्विमर्देऽस्मिन्वेगेनोद्वेगकारणात् २८ संरुद्धस्तैस्तु परितो विधमे

---

करूं लागलों तर मला रावण समजून सीता भयभीत होईल १८. तथापि, कांहीं झालें तरी अर्थयुक्त असें भाषण मनुष्यवाणीचें अवलंबन करूनच मला अवश्य केलें पाहिजे. नाहींतर माझ्या हातून ह्या साध्वीचें सांत्वन होणेंच शक्य नाहीं १९. परंतु, ह्या जानकीला अगोदरच राक्षसांनीं त्रासवून सोडिलें आहे. तेव्हां माझें रूप अवलोकन केल्यावर आणि भाषण श्रवण केल्यावरही कदाचित् अधिकच त्रास होईल २०. आणि त्रस्त झाल्यानंतर विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ही विचारी सीता हा यथेष्ट रूप धारण करणारा रावण आहे असें मला समजून आक्रोश करूं लागेल २१. सीतेनें आक्रोश केल्यावर राक्षसस्त्रियांचा घोर समुदाय नानाप्रकारचीं शस्त्रें घेऊन मृत्यूप्रमाणें एकदम तिच्यावर तुटून पडेल २२. तदनंतर अक्राळविक्राळ मुखांनीं युक्त असलेल्या त्या महाबलाढ्य राक्षसांनीं चोहोंकडे पहातां पहातां मला हुडकून काढिल्यावर ते माझा वध करण्याविषयीं अथवा मला पकडण्याविषयीं प्रयत्न करितील २३. मोठ्या मोठ्या वृक्षांच्या शाखा, उपशाखा व खोडें ह्यांवरून धांवतां धांवतां मला अवलोकन करून ते राक्षस शंकित होतील २४ आणि वनामध्यें मी संचार करूं लागलों असतां माझें प्रचंड स्वरूप अवलोकन करून राक्षसस्त्रियाही भयभीत होतील व भयंकर सूर काढूं लागतील २५. इतकेंच नव्हे परंतु, राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्यें रक्षणाकरितां त्या राक्षसराजानें नेमिलेल्या राक्षसांनाही त्यां हाका मारितील २६ व शूल, बाण, खड्ग वगैरे नानाप्रकारचीं आयुधें

राक्षसं बलम्। शक्नुयां न तु संप्राप्तुं परं पारं महोदधेः २८ मां वा गृह्णीयुरावृत्य बहवः शीघ्रकारिणः। स्यादियं चागृहीतार्था मम च ग्रहणं भवेत् २९ हिंसाभिरुचयो हिंस्युरिमां वा जनकात्मजाम्। विपन्नं स्यात्ततः कार्यं रामसुग्रीवयोरिदम् ३० उद्देशे नष्टमार्गेऽस्मिन्राक्षसैः परिवारिते। सागरेण परिक्षिप्ते गुप्ते वसति जानकी ३१ विशस्ते वा गृहीते वा रक्षोभिर्मयि संयुगे। नान्यं पश्यामि रामस्य सहायं कार्यसाधने ३२ विमृशंश्च न पश्यामि यो हते मयि वानरः। शतयोजनविस्तीर्णं लङ्घयेत महोदधिम् ३३ कामं हन्तुं समर्थोऽस्मि सहस्राण्यपि रक्षसाम्। न तु शक्ष्याम्यहं प्राप्तुं परं पारं महोदधेः ३४ असत्यानि च युद्धानि संशयो मे न रोचते। कश्च निःसंशयं कार्यं कुर्यात्प्राज्ञः ससंशयम् ३५ एष दोषो महान्हि स्यान्मम सीताभिभाषणे। प्राणत्यागश्च वैदेह्या भवेदन-

---

हातांमध्यें घेऊन ते राक्षस उद्वेग उत्पन्न झाल्यामुळें वेगावेगानें ह्या गर्दीमध्यें लोटतील २७. त्यांनीं मला सर्व बाजूंनीं जखडून टाकिलें असतां मी राक्षससैन्याचा नाश करीन; परंतु, नंतर महासागराच्या परतीराला परत जाण्याचें मला सामर्थ्य रहाणार नाहीं २८. कदाचित् सत्वर पराक्रम गाजविणारे असंख्य राक्षस सभोंवतीं वेढा देऊन मलाही पकडतील आणि त्यामुळें मात्र कांहींच सिद्धीस जाणार नाहीं. मी येथें कशाकरितां आलों हें ह्या सीतेला समजणार नाहीं आणि पकडलों गेलों ह्मणजे सीतेचा वृत्तांतही रामाला कळणार नाहीं २९. अथवा हिंसाप्रिय राक्षसांनीं जर ह्या जनककन्येचा वध केला तर राम आणि सुग्रीव ह्या दोघांच्याही कार्याचा घात होईल ३०. ज्याच्या भोंवतीं सागराचा वेढा आहे, ज्याच्या सभोंवतीं राक्षसांचा पहारा आहे व ज्याला कोणीकडूनही मार्ग नाहीं अशा ह्या गुप्त प्रदेशामध्यें जानकी वास्तव्य करीत आहे ३१. तस्मात्, संग्रामामध्यें राक्षसांनीं जर माझा वध केला किंवा मला धरून ठेविलें तर कार्य सिद्धीस नेण्याविषयीं रामाला दुसरा कोणी साहाय्य करणारा मला दिसत नाहीं ३२. कारण, माझा जर वध झाला तर शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या ह्या महासागराचें उल्लंघन करणारा वानर मी विचार करीत असतांनाही माझ्या आढळण्यांत येत नाहीं ३३. हजारोंही राक्षसांचा वध करण्यास मी खरोखर समर्थ आहें; परंतु, ( राक्षसांशीं युद्ध करून श्रांत झाल्यावर ) महासागराच्या परतीराला जाण्यास मी समर्थ होणार नाहीं ३४. युद्धामध्यें कोणाला जय येईल हें निश्चित नसतें आणि ह्या प्रसंगीं संशयांत पडणें तर मला बरें दिसत नाहीं. बरें, जें कार्य संशयग्रस्त आहे तें निःसंशय सिद्धीस जाण्याची

भिभाषणे ३६ भूताश्चार्था विरुध्यन्ति देशकालविरोधिताः। विक्लवं दूतमासाद्य तमः सूर्योदये यथा ३७ अर्थानर्थान्तरे बुद्धिर्निश्चितापि न शोभते। घातयन्ति हि कार्याणि दूताः पण्डितमानिनः ३८ न विनश्येत्कथं कार्यं वैक्लव्यं न कथं मम। लङ्घनं च समुद्रस्य कथं नु न वृथा भवेत् ३९ कथं नु खलु वाक्यं मे शृणुयान्नोद्विजेत च। इति संचिन्त्य हनुमांश्चकार मतिमान्मतिम् ४० राममक्लिष्टकर्माणं सुबन्धुमनुकीर्तयन्। नैनामुद्वेजयिष्यामि तद्बन्धुगतचेतनाम् ४१ इक्ष्वाकूणां वरिष्ठस्य रामस्य विदितात्मनः। शुभानि धर्मयुक्तानि वचनानि समर्पयन् ४२ श्रावयिष्यामि सर्वाणि मधुरां प्रब्रुवन्गिरम्। श्रद्धास्यति यथा सीता तथा सर्वं समादधे ४३ इति स बहुविधं महाप्रभावो जगतिपतेः प्रमदामवेक्षमाणः।

---

खात्री तरी कोणाला देतां येणार आहे? ३५. सारांश, आधींच भिऊन गेलेल्या ह्या सीतेशीं मीं भाषण केलें असतां हा मोठा अनर्थ गुदरण्याचा संभव आहे आणि मी जर भाषण न करीन तर सीतेच्या हातून प्राणत्यागच होण्याचा संभव आहे ३६. सूर्योदय झाला असतां ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो त्याप्रमाणें अयोग्य दूताशीं प्रसंग पडला असतां देश व काल विरुद्ध झाल्याकारणानें जवळ जवळ सिद्धीस गेलेलींही कार्यें नाहींशीं होत असतात ३७. कार्याकार्याविषयीं स्वामीनें मंत्र्यांसहवर्तमान जरी एखादा विचार निश्चित केला असला तरी अयोग्य दूताशीं गांठ पडल्यावर त्या विचारापासून कांहीं एक निष्पन्न होत नाहीं. कारण, शहाणपणाच्या घमेंडींत असणारे दूत स्वामिकार्याचा घात करितात ३८. तेव्हां काय केलें असतां कार्यविघात होणार नाहीं? कसें वागलें असतां बुद्धिभ्रंश होणार नाहीं? कोणता उपाय योजिला असतां मीं केलेलें हें समुद्राचें उल्लंघन व्यर्थ जाणार नाहीं? ३९ आणि कशाचें अवलंबन केलें असतां सीता उद्विग्न न होतां माझें भाषण ऐकून घेईल?" असें चिंतन करितां करितां बुद्धिमान् हनुमानाला एक विचार सुचला ४०. "उत्कृष्ट संबंधी जो सत्कर्मनिष्ठ राम त्याचें वर्णन केलें असतां त्या रामाचेच ठिकाणीं मनाचें लय लागून राहिलेल्या ह्या सीतेला उद्वेग होणार नाहीं ४१. तस्मात्, इक्ष्वाकुवंशजांमध्यें श्रेष्ठ आणि स्वपराक्रमानें प्रसिद्ध अशा रामाला अनुलक्षून असलेलीं धर्मयुक्त शुभ भाषणें मी करूं लागलों असतां सीतेला उद्वेग होणार नाहीं ४२. ह्यास्तव, मधुर वाणीनें बोलतां बोलतांच मी सर्व कांहीं सीतेला ऐकवीन आणि तिचा विश्वास बसेल अशा रीतीनें मी सर्व कांहीं तिला कथन करीन" ४३. ह्याप्रमाणें जगन्नाथ रामाची तरुण भार्या अवलोकन करण्याकरितां

मधुरमवितथं जगाद वाक्यं द्रुमविटपान्तरमास्थितो हनुमान् ॥४४॥ [ १३०५ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिंशः सर्गः ॥३०॥

एवं बहुविधां चिन्तां चिन्तयित्वा महामतिः । संश्रवे मधुरं वाक्यं वैदेह्या व्याजहार ह १ राजा दशरथो नाम रथकुञ्जरवाजिमान् । पुण्यशीलो महाकीर्तिरिक्ष्वाकूणां महायशाः २ अहिंसारतिरक्षुद्रो घृणी सत्यपराक्रमः । मुख्यस्येक्ष्वाकुवंशस्य लक्ष्मीवाँल्लक्ष्मिवर्धनः ३ पार्थिवव्यञ्जनैर्युक्तः पृथुश्रीः पार्थिवर्षभः । पृथिव्यां चतुरन्तायां विश्रुतः सुखदः सुखी ४ तस्य पुत्रः प्रियो ज्येष्ठस्ताराधिपनिभाननः । रामो नाम विशेषज्ञः श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ५ रक्षिता स्वस्य वृत्तस्य स्वजनस्यापि रक्षिता । रक्षिता जीवलोकस्य धर्मस्य च परंतपः ६ तस्य सत्याभिसंधस्य वृद्धस्य वचनात्पितुः । सभार्यः सह च भ्रात्रा वीरः प्रव्रजितो वनम् ७ तेन तत्र महारण्ये मृगयां परिधावता । राक्षसा निहताः शूरा बहवः कामरूपिणः ८ जनस्थानवधं श्रुत्वा निहतौ खरदूषणौ । ततस्त्वमर्षापहृता

---

वृक्षशाखांमध्यें बसलेला तो महापराक्रमी हनुमान् अशाप्रकारें नानाप्रकारचें मधुर व सत्य भाषण करूं लागला ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

ह्याप्रमाणें अनेक प्रकारांनीं चिंतन केल्यावर तो महाबुद्धिमान् हनुमान् सीतेलाच ऐकूं येईल अशा जवळच्या प्रदेशामध्यें जाऊन मधुर भाषण करूं लागला १. ( तो ह्मणाला ) " रथ, गज आणि अश्व ह्यांनीं युक्त, पुण्यशील, महाकीर्तिमान् व महायशस्वी असा एक इक्ष्वाकुवंशजांमध्यें दशरथनामक राजा होऊन गेला २. तो अहिंसेविषयीं तत्पर असे; मनाचा उदार असे; दयाळु असे; त्याचा पराक्रम अमोघ असे आणि तो वैभवसंपन्न राजा, श्रेष्ठ इक्ष्वाकुवंशाचें वैभव वृद्धिंगत करणारा असे ३. राजचिन्हांनीं तो युक्त असे; त्यांची संपत्ति मोठी असे आणि तो नृपश्रेष्ठ संपूर्ण पृथ्वीमध्यें विख्यात, प्रजेला सुख देणारा व सुखी असे ४. त्याचा एक राम ह्मणून महाज्ञानी व प्रिय असा ज्येष्ठ पुत्र आहे. त्याचें मुख नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें आल्हादकारक आहे; सर्व धनुर्धरांमध्यें तो श्रेष्ठ आहे ५ आणि स्वतःच्या शीलाचें, स्वजनाचें, जीवलोकाचें व धर्माचें तो शत्रुतापन राम रक्षण करणारा आहे ६. त्याचा जो सत्यप्रतिज्ञ वृद्ध पिता त्याच्या आज्ञेवरून तो वीर राम भार्या आणि भ्राता ह्यांसहवर्तमान वनामध्यें निघून गेला ७ व त्या महावनामध्यें मृगया करितां करितां यथेष्ट रूप धारण करणाऱ्या असंख्य शूर राक्षसांचाही त्यानें वध केला ८; परंतु, जनस्थानांतील

जानकी रावणेन तु । वञ्चयित्वा वने रामं मृगरूपेण मायया ९ स मार्गमाणस्तां देवीं रामः सीतामनिन्दिताम् । आससाद वने मित्रं सुग्रीवं नाम वानरम् १० ततः स वालिनं हत्वा रामः परपुरञ्जयः । आयच्छत्कपिराज्यं तु सुग्रीवाय महात्मने ११ सुग्रीवेणाभिसंदिष्टा हरयः कामरूपिणः । दिक्षु सर्वासु तां देवीं विचिन्वन्तः सहस्रशः १२ अहं संपातिवचनाच्छतयोजनमायतम् । तस्या हेतोर्विशालाक्ष्याः समुद्रं वेगवान्प्लुतः १३ यथारूपां यथावर्णां यथालक्ष्मवतीं च ताम् । अश्रौषं राघवस्याहं सेयमासादिता मया १४ विररामैवमुक्त्वा स वाचं वानरपुङ्गवः। जानकी चापि तच्छ्रुत्वा विस्मयं परमं गता १५ ततः सा वक्रकेशान्ता सुकेशी केशसंवृतम् । उन्नम्य वदनं भीरुः शिंशपामन्ववैक्षत १६ निशम्य सीता वचनं कपेश्च दिशश्च सर्वाः प्रदिशश्च वीक्ष्य । स्वयं प्रहर्षं परमं जगाम सर्वात्मना राममनुस्मरन्ती १७ सा तिर्यगूर्ध्वं च तथा ह्यधस्ता-

---

राक्षसांचा वध व त्याचप्रमाणें खरदूषणांचा वध झाल्याचें ऐकून रावणानें जानकीचा क्रोधानें अपहार केला आणि तो अपहार मायेनें मृगरूप धारण करून वनामध्यें रामाला फसवून केला ९. तेव्हां त्या निर्दोष सीता देवीचा शोध लावण्याकरितां हिंडतां हिंडतां वनामध्यें त्या रामाला सुग्रीवनामक एक वानर मित्र मिळाला १०. तदनंतर वालीचा वध करून शत्रुसमूह जिंकणाऱ्या रामानें महात्म्या सुग्रीवाला वानरांचें राज्य अर्पण केलें ११. इतकें झाल्यावर यथेष्ट रूप धारण करणाऱ्या वानरांना सुग्रीवानें त्या सीतेचा शोध लावण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें हजारों वानर सर्व दिशेस त्या सीता देवीचा शोध करीत हिंडत आहेत १२. विशालनेत्रांनीं युक्त असलेल्या त्याच सीतेकरितां मीं वेगानें संपातीच्या सांगण्यावरून शंभर योजनें विस्तृत असलेल्या समुद्राचें उल्लंघन केलें १३ आणि रामाच्या मुखांतून सीता ज्या रूपाची, ज्या वर्णाची व ज्या चिन्हांनीं युक्त असलेली मीं श्रवण केली होती ती ही शेवटीं माझ्या दृष्टीं पडली " १४. असें भाषण बोलून तो वानरश्रेष्ठ हनुमान् स्वस्थ राहिला व तें ऐकून जनककन्या सीतेलाही पराकाष्ठेचा विस्मय झाला १५. तदनंतर वक्र केशाग्रें आणि उत्कृष्ट केशपाश ह्यांनीं युक्त असलेली ती विनयशील सीता केशांनीं आच्छादित झालेलें आपलें मुख वर करून शिंशपावृक्षाकडे पाहूं लागली १६. सारांश, वानराचें भाषण श्रवण केल्यावर सीता सर्व दिशा व उपदिशा ह्यांकडे पाहूं लागली आणि अगदीं मनापासून ती रामाचा ध्यास घेऊन बसली असल्यामुळें तिला स्वतःला पराकाष्ठेचा हर्षही झाला १७. तदनंतर इकडे तिकडे आणि खालीं

न्निरीक्षमाणा तमचिन्त्यबुद्धिम् । ददर्श पिङ्गाधिपतेरमात्यं वातात्मजं सूर्यमिवोदयस्थम् १८ [ १३२३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकत्रिंशः सर्गः ॥ ३१ ॥

ततः शाखान्तरे लीनं दृष्ट्वा चलितमानसा । वेष्टितार्जुनवस्त्रं तं विद्युत्संघातपिङ्गलम् १ सा ददर्श कपिं तत्र प्रश्रितं प्रियवादिनम् । फुल्लाशोकोत्कराभासं तप्तचामीकरेक्षणम् २ साथ दृष्ट्वा हरिश्रेष्ठं विनीतवदवस्थितम् । मैथिली चिन्तयामास विस्मयं परमं गता ३ अहो भीममिदं सत्त्वं वानरस्य दुरासदम् । दुर्निरीक्ष्यमिदं मत्वा पुनरेव मुमोह सा ४ विललाप भृशं सीता करुणं भयमोहिता । रामरामेति दुःखार्ता लक्ष्मणेति च भामिनी ५ रुरोद सहसा सीता मन्दमन्दस्वरा सती ६ साथ दृष्ट्वा हरिवरं विनीतवदुपागतम् । मैथिली चिन्तयामास स्वप्नोयमिति भामिनी ७ सा वीक्षमाणा पृथुभग्नवक्त्रं शाखामृगेन्द्रस्य यथोक्त-

---

वर पहातां पहातां उदयाचलावर आलेला सूर्यच कीं काय अशा प्रकारें वानराधिपति सुग्रीवाचा अमात्य तो अतर्क्यबुद्धिमान् वायुपुत्र हनुमान् तिच्या दृष्टीं पडला १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

तदनंतर वृक्षशाखांमध्यें श्वेत वस्त्र गुंडाळून दडून बसलेल्या आणि विद्युद्गणाप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या हनुमानाला अवलोकन करून सीतेच्या मनामध्यें ( ह्याही मायामृगच असेल कीं काय अशी ) शंका आली १. विनयसंपन्न, प्रिय भाषण करणारा, अशोकवृक्षाच्या प्रफुल्लित पुष्पसमुदायाप्रमाणें भासणारा आणि सुवर्णतुल्य नेत्रांनीं युक्त असलेला तो कपि तिनें अवलोकन केला २; परंतु, नम्रपणें वृक्षावर राहिलेल्या त्या वानरश्रेष्ठाला अवलोकन करून सीतेला पराकाष्ठेचा विस्मय झाला आणि ती मनामध्यें चिंता करूं लागली ३ " अहो; वानराचें हें भयंकर धूड इतरांना अजिंक्य आहे इतकेंच नव्हे परंतु, इतरांची ह्याकडे पहाण्याचीही सोय नाहीं " असें मनामध्यें आणून ती पुनरपि गांगरून गेली ४ आणि भयानें गोंधळून जाऊन दुःखानें व्याकुल झाल्यामुळें ती उत्कृष्ट स्त्री सीता " हे रामा, हे रामा, हे लक्ष्मणा, " असा करुण स्वरानें एकसारिखा विलाप करूं लागली ५; व उत्तरोत्तर तोंडांतून ध्वनिही जरी निघेनासा झाला तरी ती साध्वी एकाएकीं रडूं लागली ६. तदनंतर नम्रपणें समीप आलेल्या त्या वानरश्रेष्ठाला अवलोकन केल्यावर हें स्वप्न आहे असें ती मनामध्यें आणूं लागली ७. ( आपले हे शब्द राक्षसस्त्रियांनीं ऐकिले आहेत कीं काय अशी शंका

कारम् । ददर्श पिङ्गप्रवरं महार्हं वातात्मजं बुद्धिमतां वरिष्ठम् ८ सा तं समीक्ष्यैव भृशं विपन्ना गतासुकल्पेव बभूव सीता । चिरेण संज्ञां प्रतिलभ्य चैवं विचिन्तयामास विशालनेत्रा ९ स्वप्नो मयायं विकृतोद्य दृष्टः शाखामृगः शास्त्रगणैर्निषिद्धः । स्वस्त्यस्तु रामाय सलक्ष्मणाय तथा पितुर्मे जनकस्य राज्ञः १० स्वप्नो हि नायं न हि मेऽस्ति निद्रा शोकेन दुःखेन च पीडितायाः । सुखं हि मे नास्ति यतो विहीना तेनेन्दुपूर्णप्रतिमाननेन ११ रामेति रामेति सदैव बुद्ध्या विचिन्त्य वाचा ब्रुवती तमेव । तस्यानुरूपं च कथां तदर्थामेवं प्रपश्यामि तथा शृणोमि १२ अहं हि तस्याद्य मनोभवेन संपीडिता तद्गतसर्वभावा । विचिन्तयन्ती सततं तमेव तथैव पश्यामि तथा शृणोमि १३ मनोरथः स्यादिति चिन्तयामि तथापि बुद्ध्यापि वितर्कयामि । किं कारणं तस्य हि नास्ति रूपं सुव्य-

---

घेऊन ) ती सीता इकडे तिकडे पाहूं लागली असतां वानरराज सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें वागणारा महायोग्य वायुपुत्र वानरश्रेष्ठ तिनें अवलोकन केला. तो बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ होता आणि वज्रप्रहारामुळें त्याच्या विशाल मुखाचा भंग झालेला होता ८. त्याला अवलोकन करितांक्षणीं तिला अतिशयच धडकी भरली आणि ( हा रूपांतर करून रावणच आला असावा ह्या भीतीनें ) ती अगदीं मृतवत् निश्चेष्ट पडली; परंतु, विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता बऱ्याच वेळानें शुद्धीवर येऊन विचार करूं लागली ९; " हें आज मला स्वप्न वाईट पडलें. कारण, शास्त्रगणांनीं निषिद्ध सांगितलेला वानर मीं स्वप्नामध्यें अवलोकन केला. ह्यास्तव, लक्ष्मणासहवर्तमान रामाचें आणि त्याचप्रमाणें माझ्या पित्या जनकराजाचें कुशल असो १०. परंतु, शोकानें व दुःखानें पीडित झालेल्या माझा जर मुळीं डोळाच लागत नाहीं तर हें स्वप्न नव्हे. कारण, पूर्णचंद्रतुल्य आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या त्या रामाचा वियोग झाला असल्यामुळें ( डोळा लागण्या इतकें ) सुख माझे ठिकाणीं नाहीं ११. हे रामा, हे रामा, असें एकसारिखें मी मनामध्यें चिंतन करीत असून वाणीनेंही त्याचाच उच्चार करीत आहें. त्याला त्यांत संबंध आहे अशीच गोष्ट ऐकण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे आणि माझ्या दृष्टीपुढेंही त्याचीच गोष्ट दिसत आहे १२. सारांश, त्या रामासंबंधानें उत्कट इच्छा उत्पन्न झाल्यामुळें मी आज अगदीं पीडलें आहें; माझें सर्व मन त्याचे ठिकाणींच लीन होऊन राहिलें आहे; एकसारिखें चिंतनहीं त्याचेंच करीत आहें व दृष्टीपुढेंही सर्व कांहीं त्याचाच प्रकार आसून कानानेंही सर्व कांहीं त्याच्याचसंबंधाचें ऐकूं येत असल्याचा भास होत आहे १३. झालेला हा सर्व प्रकार मनोराज्य असेल असें समजावें तर विचार

करूपश्च वदत्ययं माम् १४ नमोस्तु वाचस्पतये सवज्रिणे स्वयंभुवे चैव हुताशनाय । अनेन चोक्तं यदिदं ममाग्रतो वनौकसा तच्च तथास्तु नान्यथा १५ [ १३३८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

सोवतीर्य द्रुमात्तस्माद्विद्रुमप्रतिमाननः । विनीतवेषः कृपणः प्रणिपत्योपसृत्य च १ तामब्रवीन्महातेजा हनूमान्मारुतात्मजः । शिरस्यञ्जलिमाधाय सीतां मधुरया गिरा २ का नु पद्मपलाशाक्षि क्लिष्टकौशेयवासिनि । द्रुमस्य शाखामालम्ब्य तिष्ठसि त्वमनिन्दिता ३ किमर्थं तव नेत्राभ्यां वारि स्रवति शोकजम् । पुण्डरीकपलाशाभ्यां विप्रकीर्णमिवोदकम् ४ सुराणामसुराणां च नागगन्धर्वरक्षसाम् । यक्षाणां किंनराणां च का त्वं भवसि शोभने ५ का त्वं भवसि रुद्राणां मरुतां वा वरानने । वसूनां वा वरारोहे देवता प्रतिभासि मे ६ किं नु चन्द्रमसा

---

अंतःकरणवृत्तीनेंही मला तसेंच वाटत आहे. तेव्हां असें होण्याचें कारण काय ? हा सर्व मनोराज्यांतीलच प्रकार आहे असें ह्मणावें तर तसल्या प्रकाराचा प्रत्यक्ष अनुभव कधीं येत नसतो; परंतु, हा जो मला उद्देशून भाषण करीत आहे ह्याचें रूप अगदीं स्पष्ट दिसत आहे १४. असो. बृहस्पति, इंद्र, ब्रह्मदेव आणि अग्नि ह्यांना नमस्कार असो. ह्या वनचर वानरानें माझ्या समोर केलेलें हें भाषण ( ह्यांच्या कृपेनें ) सत्य असो; अन्यथा न होवो १५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

नूतन पल्लवाप्रमाणें ज्याचें मुख आहे असा तो नम्र मुद्रा धारण केलेला बिचारा हनुमान् झाडावरच्या झाडावरच उंच फांदीवरून एका अगदीं जवळच्या फांदीवर आला आणि समीप येऊन प्रणिपात केल्यानंतर १ तो महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् मस्तकीं हात जोडून मधुर वाणीनें त्या सीतेला ह्मणाला २ " कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र आहेत, मलिन रेशमी वस्त्र जिनें परिधान केलेलें आहे आणि जिला नांवें ठेवण्यास जागा नाहीं अशी कोण, बरें तूं वृक्षशाखेचें अवलंबन करून राहिली आहेस ? ३. वर पडलेलें उदक ज्याप्रमाणें कमलपत्रांपासून खालीं गळत असतें त्याप्रमाणें तुझ्या नेत्रांपासून शोकजन्य उदक कशाकरितां स्रवत आहे ? ४. हे कल्याणि, देव, दैत्य, नाग, गंधर्व, राक्षस, यक्ष आणि किन्नर ह्यांपैकीं तूं कोणत्या जातीची आहेस ? ५. हे सुंदरि, तूं मला देवलोकस्त्री भासत आहेस, तस्मात्, हे सुमुखि, रुद्रांची, मरुद्गणांची अथवा अष्टवसूंची तूं अधिष्ठात्री देवता आहेस कीं काय ? ६. नक्षत्रांमध्यें श्रेष्ठ आणि

हीना पतिता विबुधालयात् । रोहिणी ज्योतिषां श्रेष्ठा श्रेष्ठसर्वगुणाधिका ७ कोपाद्वा यदि वा मोहाद्भर्तारमसितेक्षणे । वसिष्ठं कोपयित्वा त्वं वासि कल्याण्यरुन्धती ८ को नु पुत्रः पिता भ्राता भर्ता वा ते सुमध्यमे । अस्माल्लोकादमुं लोकं गतं त्वमनुशोचसि ९ रोदनादतिनिःश्वासाद्भूमिसंस्पर्शनादपि । न त्वा देवीमहं मन्ये राज्ञः संज्ञावधारणात् १० व्यञ्जनानि हि ते यानि लक्षणानि च लक्षये । महिषी भूमिपालस्य राजकन्या च मे मता ११ रावणेन जनस्थानाद्बलात्प्रमथिता यदि । सीता त्वमसि भद्रं ते तन्ममाचक्ष्व पृच्छतः १२ यथा हि तव वै दैन्यं रूपं चाप्रतिमानुषम् । तपसा चान्वितो वेषस्त्वं राममहिषी ध्रुवम् १३ सा तस्य वचनं श्रुत्वा रामकीर्तनहर्षिता । उवाच वाक्यं वैदेही हनूमन्तं द्रुमाश्रितम् १४ पृथिव्यां राजसिंहानां मुख्यस्य विदितात्मनः । स्नुषा दशरथस्याहं शत्रुसैन्यप्रणाशिनः १५ दुहिता जनकस्याहं वैदेहस्य महात्मनः । सीतेति नाम्ना चोक्ताहं भार्या रामस्य धीमतः १६

---

श्रेष्ठ अशा सर्व गुणांनीं अधिक अशी चंद्राचा वियोग होऊन स्वर्गांतून खालीं पडलेली त रोहिणी तर नाहींस नां ? ७. हे कृष्णनयने, क्रोधानें अथवा मोहानें वसिष्ठाला कोप आणवून तूं कल्याणी अरुंधती तर येथें आली नाहींस नां ? ८. हे सुंदरि, इहलोकापासून परलोकीं गेलेल्या कोणाचा तरी तूं शोक करीत आहेस. तेव्हां परलोकीं गेलेला तो कां तुझा पुत्र होता ? पिता होता ? भ्राता होता ? किंवा भर्ता होता ? ९. रोदन, अतिशय श्वासोच्छ्वास , भूमिस्पर्श आणि रामराजाचें नांव घेणें ह्यांवरून तूं देवता नव्हेस असें मला वाटतें १०. राजपत्नीत्वसूचक अशीं जीं लक्षणें तुझीं मला दिसत आहेत त्यांवरून तूं पृथ्वीपति रामाची पट्टराणी व जनकराजाची कन्या असावीस असें मला वाटतें ११. सारांश, रावणानें जनस्थानापासून बलात्कारानें अपहार करून आणिलेली सीता जर तूं असशील तर, तुझें देव बरें करो, मज विचारणाऱ्याला तूं तसें सांग १२. तुझी ही दैन्यावस्था, मनुष्यांमध्यें ज्याला कोठेंही प्रतिमा नाहीं असें हें तुझें रूप आणि तपश्चर्येला योग्य असा हा तुझा वेष ह्यांवरून तूं निःसंशय रामाची पट्टराणी आहेस " १३. त्या हनुमानाचें भाषण श्रवण केल्यावर रामराजाचा उच्चार झाल्यामुळें सीतेला हर्ष झाला आणि वृक्षशाखेवर बसलेल्या त्या हनुमानाशीं ती विदेहराजकन्या बोलूं लागली १४. ( ती ह्मणाली ) " पृथ्वींतील श्रेष्ठ राजांमध्यें मुख्य, स्वपराक्रमानें प्रसिद्ध आणि शत्रुसैन्यघातक अशा दशरथाची मी स्नुषा आहें १५; महात्म्या विदेहराज जनकाची मी कन्या आहें आणि बुद्धिमान्

समा द्वादश तत्राहं राघवस्य निवेशने । भुञ्जाना मानुषान्भोगान्सर्वका-
मसमृद्धिनी १७ ततस्त्रयोदशे वर्षे राज्ये चेक्ष्वाकुनन्दनम् । अभिषेच-
यितुं राजा सोपाध्यायः प्रचक्रमे १८ तस्मिन्संभ्रियमाणे तु राघवस्या-
भिषेचने । कैकेयी नाम भर्तारमिदं वचनमब्रवीत् १९ न पिबेयं न
खादेयं प्रत्यहं मम भोजनम् । एष मे जीवितस्यान्तो रामो यद्य-
भिषिच्यते २० यत्तदुक्तं त्वया वाक्यं प्रीत्या नृपतिसत्तम । तच्चेन्न
वितथं कार्यं वनं गच्छतु राघवः २१ स राजा सत्यवाग्देव्या
वरदानमनुस्मरन् । मुमोह वचनं श्रुत्वा कैकेय्याः क्रूरमप्रियम् २२
ततस्तं स्थविरो राजा सत्यधर्मे व्यवस्थितः । ज्येष्ठं यशस्विनं पुत्रं रुद-
न्राज्यमयाचत २३ स पितुर्वचनं श्रीमानभिषेकात्परं प्रियम् । मनसा
पूर्वमासाद्य वाचा प्रतिगृहीतवान् २४ दद्यान्न प्रतिगृह्णीयात्सत्यं ब्रूयान्न
चानृतम् । अपि जीवितहेतोर्हि रामः सत्यपराक्रमः २५ स विहायोत्त-
रीयाणि महार्हाणि महायशाः । विसृज्य मनसा राज्यं जनन्यै मां समा-

रामाची मी भार्या असून सीता ह्या नांवानें मला हाक मारीत असतात १६. सर्व इच्छा परिपूर्ण होत असतांना आणि मनुष्यजातीला योग्य अशा सर्वही भोग्य वस्तूंचा उपभोग घडत असतांना राघवाच्या गृहामध्यें मी बारा वर्षेंपर्यंत राहिलें होतें १७. तदनंतर तेरावे वर्षीं इक्ष्वाकुवंशज रामाला राज्याभिषेक करण्याचा उपाध्यायांसहवर्तमान दशरथराजानें उपक्रम केला १८; परंतु, राघवाच्या राज्याभिषेकाची ती तयारी चालली असतां कैकेयीनामक स्त्री आपल्या भर्त्या दशरथाला ह्मणाली १९ "रामाला जर राज्याभिषेक व्हावयाचा असेल तर माझें नेहमीचें भोजनही मी घेणार नाहीं व जलप्राशनही करणार नाहीं २०. हे नृपश्रेष्ठा, त्यावेळेला जें तूं (वरप्रदानरूप) माझ्याशीं प्रेमानें भाषण केलेंस तें जर व्यर्थ करावयाचें नसेल तर रामाला वनांत जाऊं दे" २१. हें कैकेयीचें क्रूर व अप्रिय भाषण श्रवण केल्यावर तिला वर दिल्याचें त्याला स्मरण झालें; आणि तो सत्यवचनी राजा मूर्छित झाला २२. तदनंतर सत्यधर्माचें अवलंबन करून राहिलेला तो वृद्ध राजा रडत रडत आपल्या त्या यशस्वी ज्येष्ठ पुत्रापाशीं राज्याची याचना करूं लागला २३; व त्या श्रीमान् रामानें राज्याभिषेकापेक्षांही तें पित्याचें भाषण मनामध्यें अधिक प्रिय मानून तसें वाणीनेंही उच्चारून दाखविलें २४. "सत्यपराक्रमी राम जीविताकरितांही कधीं खोटें बोलणार नाहीं; सत्यच बोलेल आणि त्याचप्रमाणें कधीं प्रतिग्रह करणार नाहीं; परंतु, दानच देईल २५." असें ह्मणून त्या महायशस्वी रामानें मोठींमोठीं मूल्यवान् प्रावरणें काढून टाकिलीं आणि

दिशत् २६ साहं तस्याग्रतस्तूर्णं प्रस्थिता वनचारिणी। न हि मे तेन हीनाया वासः स्वर्गेऽपि रोचते २७ प्रागेव तु महाभागः सौमित्रिर्मित्रनन्दनः। पूर्वजस्यानुयात्रार्थे कुशचीरैरलंकृतः २८ ते वयं भर्तुरादेशं बहुमान्य दृढव्रताः। प्रविष्टाः स्म पुरादृष्टं वनं गम्भीरदर्शनम् २९ वसतो दण्डकारण्ये तस्याहममितौजसः। रक्षसापहृता भार्या रावणेन दुरात्मना ३० द्वौ मासौ तेन मे कालो जीवितानुग्रहः कृतः। ऊर्ध्वं द्वाभ्यां तु मासाभ्यां ततस्त्यक्ष्यामि जीवितम् ३१ [१३६९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः॥ ३३॥

तस्यास्तद्वचनं श्रुत्वा हनूमान्हरिपुङ्गवः। दुःखाद्दुःखाभिभूतायाः सान्त्वमुत्तरमब्रवीत् १ अहं रामस्य संदेशाद्देवि दूतस्तवागतः। वैदेहि कुशली रामः स त्वां कौशलमब्रवीत् २ यो ब्राह्ममस्त्रं वेदांश्च वेद वेदविदां वरः। स त्वां दाशरथी रामो देवि कौशलमब्रवीत् ३ लक्ष्मणश्च महातेजा भर्तुस्तेनुचरः

---

मनापासून राज्याचा त्याग करून माझें रक्षण करण्याविषयीं मातेची प्रार्थना केली २६; परंतु, मी त्याच्यापुढेंच वनामध्यें संचार करण्यास सिद्ध होऊन सत्वर चालूं लागलें. कारण, त्याच्याशिवाय स्वर्गामध्येंही वास्तव्य करणें मला रुचत नाहीं २७. मित्रांना आनंद देणारा महाभाग्यवान् सुमित्रापुत्र लक्ष्मण माझ्याही पूर्वी आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या मार्गोमाग जाण्याकरितां दर्भ व वल्कलें ह्यांनीं सजून तयार झाला होता २८. सारांश, स्वीकारिलेल्या व्रताचें परिपालन करणारे ते आह्मी त्रिवर्गही स्वामी दशरथाच्या आज्ञेला बहुमान देऊन पूर्वी कधींही न पाहिलेल्या आणि दिसण्यांतही भयंकर असलेल्या अशा एका वनामध्यें प्रविष्ट झालों २९. अतुलसामर्थ्यवान् राम दंडकारण्यामध्यें वास्तव्य करीत असतांना दुरात्म्या रावणानें त्याची भार्या जी मी तिला हरण करून आणिलें आहे ३०. दोन महिने काल लोटेपर्यंत त्या रावणानें माझ्या जीवितरक्षणाची मुदत केलेली आहे; आणि दोन महिन्यानंतर मला प्राणत्याग करण्याचा प्रसंग येणार आहे" ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

दुःखपरंपरेनें घेरून टाकिलेल्या त्या सीतेचें भाषण श्रवण करून वानरश्रेष्ठ हनुमान् सौम्य शब्दांनीं तिला ह्मणाला १ " हे देवि, रामाच्या आज्ञेनें मी तुझ्यासमीप आलों आहें. हे वैदेहि, राम कुशल आहे आणि त्यानें तुलाही कुशलप्रश्न केला आहे २. वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असून जो वेद व ब्रह्मास्त्र जाणीत आहे त्या दाशरथी रामानें, हे देवि, तुला कुशलप्रश्न केला आहे ३. तुझ्या भर्त्याचा प्रिय अनुयायी महातेजस्वी

प्रियः । कृतवाञ्छोकसंतप्तः शिरसा तेऽभिवादनम् ४ सा तयोः कुशलं देवी निशम्य नरसिंहयोः । प्रतिसंहृष्टसर्वाङ्गी हनूमन्तमथाब्रवीत् ५ कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मा । एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ६ तयोः समागमे तस्मिन्प्रीतिरुत्पादिताद्भुता । परस्परेण चालापं विश्वस्तौ तौ प्रचक्रतुः ७ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः । सीतायाः शोकतप्तायाः समीपमुपचक्रमे ८ यथा यथा समीपं स हनूमानुपसर्पति । तथा तथा रावणं सा तं सीता परिशङ्कते ९ अहोधिग्धिक्कृतमिदं कथितं हि यदस्य मे । रूपान्तरमुपागम्य स एवायं हि रावणः १० तामशोकस्य शाखां तु विमुक्त्वा शोककर्शिता । तस्यामेवानवद्याङ्गी धरण्यां समुपाविशत् ११ अवन्दत महाबाहुस्ततस्तां जनकात्मजाम् । सा चैनं भयसंत्रस्ता भूयो नैनमुदैक्षत १२ तं दृष्ट्वा वन्दमानं च सीता शशिनिभानना । अब्रवीद्दीर्घमुच्छ्वस्य वानरं मधुरस्वरा १३ मायां प्रविष्टो

---

लक्ष्मण शोकानें संतप्त झाला असून त्यानें तुला शिरसाष्टांग नमस्कार सांगितला आहे " ४. ह्याप्रमाणें त्या उभयतां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांचें कुशल ऐकून त्या सीता देवीच्या सर्व शरीरावर आनंदानें रोमांच उठले आणि ती हनुमानाला ह्मणाली ५ " मनुष्य कायम राहील तर शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंदाचे दिवस येतील, ही लोकप्रसिद्ध ह्मण खरोखर मला मोठी कल्याणकारक दिसत आहे " ६. त्यावेळीं रामलक्ष्मणांची भेट झाल्याप्रमाणेंच सीतेला कांहीं अनिर्वचनीय आनंद झाला आणि सीता व हनुमान् ह्या उभयतांनीं एकमेकांशीं विश्वासानें भाषण करण्यास आरंभ केला ७. शोकसंतप्त झालेल्या सीतेचें हें भाषण श्रवण केल्यावर वायुपुत्र हनुमान् तिच्याजवळ जाऊं लागला ८; परंतु, जसा जसा तो हनुमान् जवळ येऊं लागला तशी तशी तो रावण असावा ह्मणून सीतेला शंका येऊं लागली ९ ( आणि ती ह्मणाली )" अहो, धिक्कार असो; धिक्कार असो ह्या माझ्या करण्याला. ह्याला मीं हें कथन केलें; हें नीट झालें नाहीं. कारण, तो हा रावणच दुसरें रूप घेऊन येथें आला आहे " १०. ह्याप्रमाणें बोलून शोकानें व्याकुल झालेल्या त्या सीतेनें अशोकवृक्षाची ती शाखा सोडून दिली आणि निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली ती सीता त्या भूमीवर तेथेंच बसली ११. तदनंतर महापराक्रमी हनुमानानें त्या जनककन्येला वंदन केलें; परंतु, त्याला पाहून भयभीत झाल्यामुळें पुनरपि त्याच्याकडे पहाण्याचेंही तिला धैर्य होईना १२. तेव्हां तो वंदन करीत आहे असें अवलोकन करून मधुर स्वर आणि चंद्रासारखे आल्हादकारक मुख ह्यांनीं युक्त असलेली ती सीता ( दुःखानें ) लांब सुस्कारा टाकून त्या

मायावी यदि त्वं रावणः स्वयम् । उत्पादयसि मे भूयः संतापं तन्न शोभ-
नम् १४ स्वं परित्यज्य रूपं यः परिव्राजकरूपवान् । जनस्थाने मया
दृष्टस्त्वं स एव हि रावणः १५ उपवासकृशां दीनां कामरूप निशाचर।
संतापयसि मां भूयः संतापं तन्न शोभनम् १६ अथवा नैतदेवं हि
यन्मया परिशङ्कितम् । मनसो हि मम प्रीतिरुत्पन्ना तव दर्शनात् १७
यदि रामस्य दूतस्त्वमागतो भद्रमस्तु ते । पृच्छामि त्वां हरिश्रेष्ठ प्रिया
रामकथा हि मे १८ गुणान्रामस्य कथय प्रियस्य मम वानर । चित्तं
हरसि मे सौम्य नदीकूलं यथा रयः १९ अहो स्वप्नस्य सुखता याहमेव
चिराहृता । प्रेषितं नाम पश्यामि राघवेण वनौकसम् २० स्वप्नेपि यद्यहं
वीरं राघवं सहलक्ष्मणम् । पश्येयं नावसीदेयं स्वप्नोपि मम मत्सरी २१
नाहं स्वप्नमिमं मन्ये स्वप्ने दृष्ट्वा हि वानरम् । न शक्योभ्युदयः प्राप्तुं

---

वानराला ह्मणाली १३ " मायेचें अवलंबन करून जर तूं स्वतः मायावी रावण मला पुनरपि संताप उत्पन्न करीत असशील तर तें तुझें करणें चांगलें नाहीं १४. अरे, आपल्या रूपाचा त्याग करून संन्याशाचें रूप धारण केलेला जो जनस्थानामध्यें मीं अवलोकन केला तो रावणच तूं आहेस १५. हे यथेष्ट रूप धारण करणाऱ्या निशाचरा, उपवासानें कृश होऊन ( वियोगदुःखानें ) दीन झालेल्या मला तूं पुनरपि संताप उत्पन्न करीत आहेस; परंतु, तुझें हें संताप उत्पन्न करणें चांगलें नव्हे १६. अथवा ज्याअर्थी तुझें दर्शन झाल्यामुळें माझ्या मनाला आनंद झाला आहे त्याअर्थी मला शंका आल्यप्रमाणें हा प्रकार नाहीं १७. ह्यास्तव, तूं जर रामदूत आला असशील तर तुझें कल्याण असो. हे वानरश्रेष्ठा, मी तुला रामकथा विचारीत आहें. कारण, ती मला प्रिय आहे १८. तस्मात्, हे वानरा, तूं मला प्रिय रामाचे गुण कथन कर. हे विनयशील, उदकाचा वेग ज्याप्रमाणें नदीचें तीर शिथिल करून टाकीत असतो त्याप्रमाणें ( तुझा मला पक्का विश्वास येत नसल्यामुळें ) तूं माझें अंतःकरण घाबरें करीत आहेस १९. अहो, किती तरी ह्या स्वप्नाचा सुखकारक परिणाम झाला आहे पहा. रावणानें मला आणून बरेच दिवस झाले असतांनाही रघुवंशज रामानें पाठविलेला वानर मी स्वप्नामध्यें अवलोकन करीत आहें २०. ह्याचप्रमाणें लक्ष्मणासहवर्तमान वीर राम स्वप्नामध्येंही जरी माझ्या दृष्टीं पडला तरी सुद्धां मी निराश होणार नाहीं; परंतु, स्वप्न देखील ह्या वेळेला माझ्याशीं वैर करीत आहे २१. छे! छे! हें स्वप्न असावें असें मला वाटत नाहीं. कारण, स्वप्नामध्यें वानर अवलोकन केल्यावर अभ्युदय प्राप्त होणें शक्य नाहीं; आणि मला तर ( मन आनंदित

प्राप्तश्चाभ्युदयो मम २२ किं नु स्याच्चित्तमोहोऽयं भवेद्वातगतिस्त्वियम् ।
उन्मादजो विकारो वा स्यादियं मृगतृष्णिका २३ अथवा नायमुन्मादो
मोहोऽप्युन्मादलक्षणः । संबुध्ये चाहमात्मानमिमं चापि वनौकसम् २४
इत्येवं बहुधा सीता संप्रधार्य बलाबलम् । रक्षसां कामरूपत्वान्मेने तं
राक्षसाधिपम् २५ एतां बुद्धिं तदा कृत्वा सीता सा तनुमध्यमा । न प्रति-
व्याजहाराथ वानरं जनकात्मजा २६ सीतायाः निश्चितं बुद्ध्वा हनूमा-
न्मारुतात्मजः । श्रोत्रानुकूलैर्वचनैस्तदा तां संप्रहर्षयन् २७ आदित्य
इव तेजस्वी लोककान्तः शशी यथा । राजा सर्वस्य लोकस्य देवो वैश्रवणो
यथा २८ विक्रमेणोपपन्नश्च यथा विष्णुर्महायशाः । सत्यवादी मधुर-
वाग्देवो वाचस्पतिर्यथा २९ रूपवान्सुभगः श्रीमान्कन्दर्प इव मूर्तिमान् ।
स्थानक्रोधे प्रहर्ता च श्रेष्ठो लोके महारथः ३० बाहुच्छायामवष्टब्धो यस्य
लोको महात्मनः । अपकृष्याश्रमपदान्मृगरूपेण राघवम् ॥ शून्ये येनापनी-

---

झाल्यामुळें ) अभ्युदय लवकरच होण्याचीं चिन्हें दिसत आहेत २२. अरे, पण हा चित्त-
मोह तर नव्हेना ? कदाचित् वायूच्या झटक्याचाही हा परिणाम असेल. न जाणो,
उन्मादामुळें मनाला हा काहीं विकारही झाला असेल; किंवा मृगजलाप्रमाणें हा कदा-
चित् प्रत्यक्ष भ्रमही असेल २३. अँ हॅं: ! हा उन्माद नव्हे आणि मोह व उन्माद
ह्यांचीं लक्षणें जवळ जवळ सारिखींच असल्यामुळें हा मोहही नव्हे. कारण, मी
स्वतःला पूर्णपणें जाणीत आहें आणि हा वानरही मला स्पष्टपणें दिसत आहे " २४.
ह्याप्रमाणें सीतेनें नानाप्रकारांनीं सारासार विचार करून पाहिला; परंतु, राक्षस इच्छेस
येईल त्याप्रमाणें रूप धारण करणार असल्यामुळें तो राक्षसाधिपति रावणच असावा
असेंच शेवटीं तिला वाटलें २५; आणि ह्याप्रमाणें निश्चय झाल्यानंतर ती जनककन्या
कृशोदरी सीता त्या वानराशीं कांहींएक बोलेनाशी झाली २६. सीतेचा तो निश्चय
जाणून वायुपुत्र हनुमान् कर्णाला मधुर लागणाऱ्या शब्दांनीं हर्ष उत्पन्न करीत करीत
तिला ह्मणाला २७ " सूर्याप्रमाणें तेजस्वी, चंद्राप्रमाणें जगताला आल्हादकारक, देव
कुबेराप्रमाणें सर्व लोकांचें ( धनधान्य वगैरे देऊन ) रंजन करणारा २८, महायशस्वी
विष्णूप्रमाणें पराक्रमसंपन्न, सत्यवादी, देवगुरु बृहस्पतीप्रमाणें मधुर भाषण करणारा २९,
प्रत्यक्ष मदनाप्रमाणें रूपवान् , महाभाग्यवान् , वैभवशाली, क्रोध करणें योग्य असेल
अशा ठिकाणींच प्रहार करणारा आणि जगतामध्यें श्रेष्ठ महारथी ३० असा जो
आहे आणि ज्या महात्म्याच्या बाहूंचा आश्रय करून जगत् राहिलेलें आहे त्या राघ-
वाला मृगरूपानें आश्रमांतून काढून नेल्यानंतर शून्य झालेल्या आश्रमामध्यें येऊन

तासि तस्य द्रक्ष्यसि तत्फलम् ३१ अचिराद्रावणं संख्ये यो वधिष्यति वीर्यवान् । क्रोधप्रमुक्तैरिषुभिर्ज्वलद्भिरिव पावकैः ३२ तेनाहं प्रेषितो दूतस्त्वत्सकाशमिहागतः । त्वद्वियोगेन दुःखार्तः स त्वां कौशलमब्रवीत् ३३ लक्ष्मणश्च महातेजाः सुमित्रानन्दवर्धनः । अभिवाद्य महाबाहुः स त्वां कौशलमब्रवीत् ३४ रामस्य च सखा देवि सुग्रीवो नाम वानरः । राजा वानरमुख्यानां स त्वां कौशलमब्रवीत् ३५ नित्यं स्मरति ते रामः ससुग्रीवः सलक्ष्मणः । दिष्ट्या जीवसि वैदेहि राक्षसीवशमागता ३६ न चिराद्द्रक्ष्यसे रामं लक्ष्मणं च महारथम् । मध्ये वानरकोटीनां सुग्रीवं चामितौजसम् ३७ अहं सुग्रीवसचिवो हनूमान्नाम वानरः । प्रविष्टो नगरीं लङ्कां लङ्घयित्वा महोदधिम् ३८ कृत्वा मूर्ध्नि तदा न्यासं रावणस्य दुरात्मनः । त्वां द्रष्टुमुपयातोऽहं समाश्रित्य पराक्रमम् ३९ नाहमस्मि तथा देवि यथा मामवगच्छसि । विशङ्का त्यज्यतामेषा श्रद्धत्स्व वदतो मम ४० [१४०९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥ ३४ ॥

---

ज्यानें तुझा अपहार केला त्याला आपल्या त्या कर्माचें फल प्राप्त होत असल्याचें लवकरच तुझ्या दृष्टीं पडेल ३१. जो वीर्यवान् लवकरच रागारागानें सोडिलेल्या आणि प्रज्वलित अग्नीप्रमाणें भासत असलेल्या बाणांच्या योगानें संग्राममध्यें रावणाचा वध करणार आहे ३२ त्यानें तुझ्याकडे पाठविलेला मी दूत येथें आलों आहें. तुझ्या वियोगानें दुःखाकुल झालेल्या त्या रामानें तुला कुशल सांगितलें असून ३३ सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या त्या महातेजस्वी व महापराक्रमी लक्ष्मणानेंही तुला कुशल सांगितलें आहे ३४; आणि त्याचप्रमाणें, हे देवि, रामाचा सखा आणि वानरश्रेष्ठांचा राजा जो सुग्रीवनामक वानर त्यानेंही तुला कुशल प्रश्न केला आहे ३५. सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान राम नित्य तुझी आठवण काढीत असतो. हे वैदेहि, राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडून तूं जिवंत राहिली आहेस ही मोठ्या भाग्याचीच गोष्ट समजली पाहिजे ३६. आतां राम, महारथी लक्ष्मण आणि अतुलसामर्थ्यवान् सुग्रीव हे लवकरच कोट्यावधि वानरांमध्यें तुझ्या दृष्टीं पडतील ३७. मी हनुमान्नामक वानर सुग्रीवाचा मंत्री आहें आणि महासागराचें उल्लंघन करून ह्या लंकानगरीमध्यें प्रविष्ट झालों आहें ३८. इतकेंच नव्हे परंतु, स्वपराक्रमाच्या जोरावर त्या दुरात्म्या रावणाच्या मस्तकीं पाय देऊन मी तुझें दर्शन घेण्याकरितां तुझ्या समीप आलों आहें ३९. ह्यास्तव, हे देवि, तूं हा संशय सोडून दे आणि मी सांगत आहें ह्यावर विश्वास ठेव.

तां तु रामकथां श्रुत्वा वैदेही वानरर्षभात् । उवाच वचनं सान्त्व-
मिदं मधुरया गिरा १ क्व ते रामेण संसर्गः कथं जानासि लक्ष्मणम् ।
वानराणां नराणां च कथमासीत्समागमः २ यानि रामस्य चिह्नानि
लक्ष्मणस्य च वानर । तानि भूयः समाचक्ष्व न मां शोकः समाविशत् ३
कीदृशं तस्य संस्थानं रूपं तस्य च कीदृशम् । कथमूरू कथं बाहू लक्ष्म-
णस्य च शंस मे ४ एवमुक्तस्तु वैदेह्या हनूमान्मारुतात्मजः । ततो रामं
यथातत्त्वमाख्यातुमुपचक्रमे ५ जानन्ती बत दिष्ट्या मां वैदेहि परिपृच्छसि ।
भर्तुः कमलपत्राक्षि संस्थानं लक्ष्मणस्य च ६ यानि रामस्य चिह्नानि
लक्ष्मणस्य च यानि वै । लक्षितानि विशालाक्षि वदतः शृणु तानि मे ७ रामः
कमलपत्राक्षः पूर्णचन्द्रनिभाननः । रूपदाक्षिण्यसंपन्नः प्रसूतो जनकात्मजे ८
तेजसादित्यसंकाशः क्षमया पृथिवीसमः । बृहस्पतिसमो बुद्ध्या यशसा
वासवोपमः ९ रक्षिता जीवलोकस्य स्वजनस्य च रक्षिता । रक्षिता स्वस्य

---

माझ्यासंबंधानें जशी तुला शंका आली आहे तसा मी नाहीं ४०. ह्याप्रमाणें महामु-
निवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चौतिसावा सर्ग
समाप्त झाला ॥ ३४ ॥

वानरश्रेष्ठ हनुमानाच्या मुखांतून ती रामकथा श्रवण केल्यानंतर विदेहराजकन्या
सीता मधुर वाणीनें सौम्य शब्दांनीं त्याला ह्मणाली १ " रामाची व तुझी गांठ कोठें
पडली ? लक्ष्मण तुला कशावरून विदित झाला आणि वानर व मनुष्य ह्यांचा समागम
कसा झाला ? ( हें तूं मला कथन कर )२. हे वानरा, राम आणि लक्ष्मण ह्यांचीं जीं लक्षणें
आहेत तीं तूं मला पुनरपि नीट कथन कर; ह्मणजे मला शोक ग्रस्त करून टाकणार
नाहीं ३. सारांश, त्या रामाची ठेवण कशी आहे, त्याचें रूप कसें आहे, त्याच्या
मांड्या कशा आहेत, हात कसे आहेत आणि त्याचप्रमाणें लक्ष्मणाची ठेवण वगैरे
कशी आहे हें तूं मला श्रवण कर " ४. ह्याप्रमाणें सीतेनें सांगितलें असतां वायपुत्र
हनुमान् रामाचें होतें तसें वर्णन करूं लागला ५. ( तो ह्मणाला ) " हे वैदेहि, मी
रामदूत आहें असें सुदैवानें जाणून ज्याअर्थीं, हे कमलनयने, तूं मला भर्त्याची व लक्ष्म-
णाचीं ठेवण वगैरे विचारीत आहेस त्याअर्थीं ६, हे विशालनयने सीते, रामाचीं व लक्ष्म-
णाची जीं चिन्हें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलीं आहेत तीं मी तुला सांगतो; तूं श्रवण
कर ७. हे जनककन्ये, रामाचे नेत्र कमलपत्राप्रमाणें आहेत; त्याचें मुख पूर्णचंद्राप्र-
माणें आल्हादकारक आहे आणि तो जातीचाच रूपवान् व सरळ आहे ८. तेजानें तो
सूर्याची बरोबरी करणारा आहे; क्षमेनें तो पृथ्वीसारिखा आहे; बुद्धीनें तो बृहस्पतीची

वृत्तस्य धर्मस्य च परंतपः १० रामो भामिनि लोकस्य चातुर्वर्ण्यस्य
रक्षिता । मर्यादानां च लोकस्य कर्ता कारयिता च सः ११ अर्चिष्मा-
नर्चितोत्यर्थं ब्रह्मचर्यव्रते स्थितः । साधूनामुपकारज्ञः प्रचारज्ञश्च कर्म-
णाम् १२ राजनीत्यां विनीतश्च ब्राह्मणानामुपासकः । ज्ञानवाञ्शीलसं-
पन्नो विनीतश्च परंतपः १३ यजुर्वेदविनीतश्च वेदविद्भिः सुपूजितः । धनु-
र्वेदे च वेदे च वेदाङ्गेषु च निष्ठितः १४ विपुलांसो महाबाहुः कम्बुग्रीवः
शुभाननः । गूढजत्रुः सुताम्राक्षो रामो नाम जनैः श्रुतः १५ दुन्दुभिस्व-
ननिर्घोषः स्निग्धवर्णः प्रतापवान् । समश्च सुविभक्ताङ्गो वर्णं श्यामं समा-
श्रितः १६ त्रिस्थिरस्त्रिप्रलम्बश्च त्रिसमस्त्रिषु चोन्नतः । त्रिताम्रस्त्रिषु च

---

बरोबरी करणारा आहे; आणि कीर्तीनें इंद्राशींच त्याची तुलना होणारी आहे ९.
तो शत्रुतापन राम जीवलोक, स्वजन, स्वतःचें वर्तन आणि धर्म ह्यांचें रक्षण करणारा
असून १०, बाई सीते, जगतांतील चातुर्वर्ण्यांचेंही तो राम परिपालन करणारा आहे;
आणि त्याचप्रमाणें जगतामध्यें तो मर्यादा घालून देणारा असून त्या मर्यादेप्रमाणें तो
लोकांना वागविणाराही आहे ११. तो तेजस्वी आहे; लोकांना तो अत्यंत पूज्य आहे; तो
ब्रह्मचर्य व्रतानें राहिलेला आहे; साधूंचा उपकार जाणणारा आहे आणि कर्मानुष्ठानही
त्याला विदित आहे १२. राजनीतीमध्यें तो निपुण आहे; ब्राह्मणांचा उपासक आहे;
ज्ञानवान् आहे; सुशील आहे आणि विनयसंपन्न असून शत्रूंना ताप देणारा आहे १३.
यजुर्वेदाचें त्यानें अध्ययन केलेलें आहे; वेदवेत्त्यांना तो फारच मान्य आहे आणि
धनुर्वेद, वेद व वेदांगें ह्यांमध्येंही तो निष्णात आहे १४. त्याचे
स्कंध विशाल आहेत; बाहु मोठे आहेत; कंठ शंखाप्रमाणें तीन रेषांनीं
युक्त आहे ; मुख उत्कृष्ट आहे ; त्याचे स्कंधसंधि गुप्त आहेत ; नेत्र चांगले ताम्रवर्ण
आहेत आणि लोकांमध्यें तो राम ह्मणून प्रसिद्ध आहे १५. दुंदुभीप्रमाणें त्याचा स्वर
गंभीर आहे; वर्ण तुळतुळीत आहे; तो प्रतापी आहे; त्याच्या अवयवांची ठेवण सारखी
आहे; सर्व अवयव चांगले स्पष्ट आहेत आणि त्याच्या शरीराचा वर्ण श्याम
आहे १६. ( मांड्या, मनगट आणि मूठ हीं ) तीन त्याचीं स्थिर आहेत; ( भिंवया,
अंडकोश आणि हात हे ) त्याचे तीन अवयव लांब आहेत; ( केशाग्र, वृषण आणि
गुडघे हीं ) त्याचीं तीन सपाट आहेत; ( नाभीजवळचा प्रदेश, कुशी आणि वक्षस्थल
हीं ) तीन उन्नत आहेत; ( नेत्रप्रांत, नखें आणि हातापायांचे तळवे ह्या ) तीन
ठिकाणीं तो ताम्रवर्ण आहे; ( पायांवरील रेषा, मस्तकावरील केश आणि लिंगमणि
ह्या ) तीन ठिकाणीं तो तुळतुळीत आहे; ( स्वर, गति आणि नाभि हीं ) तीन

स्निग्धो गम्भीरस्त्रिषु नित्यशः १७ त्रिवलीमांस्त्र्यवनतश्चतुर्व्यङ्गस्त्रिशी-
र्षवान् । चतुष्कलश्चतुर्लेखश्चतुष्किष्कुश्चतुःसमः १८ चतुर्दशसमद्वन्द्व-
श्चतुर्दंष्ट्रश्चतुर्गतिः । महोष्ठहनुनासश्च पञ्चस्निग्धोऽष्टवंशवान् १९ दशपद्मो
दशबृहत्त्रिभिर्व्याप्तो द्विशुक्लवान् । षडुन्नतो नवतनुस्त्रिभिर्व्याप्नोति
राघवः २० सत्यधर्मरतः श्रीमान्संग्रहानुग्रहे रतः । देशकालविभागज्ञः
सर्वलोकप्रियंवदः २१ भ्राता चास्य च द्वैमात्रः सौमित्रिरमितप्रभः ।
अनुरागेण रूपेण गुणैश्चापि तथाविधः २२ ससुवर्णच्छविः श्रीमान्नामः

गंभीर आहेत १७; ( उदर आणि कंठ ह्यांचे ठिकाणीं ) त्याला तीन तीन वळवट्या आहेत; ( पायांच्या तळव्यांचा मध्यभाग, पायांवरील रेषा आणि स्तनांचीं अग्रें हीं ) त्याचीं तीन खोलगट आहेत; ( मान, जननेंद्रिय, पाठ आणि पोटऱ्या हे ) त्याचे चार अवयव अखूड आहेत; त्याच्या मस्तकावर तीन भोंवरे आहेत; त्याच्या अंगुष्ठमूलाचे ठिकाणीं चार रेषा आहेत; त्याची उंची चार हात आहे; ( हात, गुडघे, मांड्या आणि गाल हे ) चारी युग्म अवयव त्याचे एकसारिखे आहेत १८; ( भिंवया, नाकपुड्या, नेत्र, कर्ण, ओष्ठ, स्तनाग्रें, कोपरें, मनगटें, गुडघे, वृषणें, कमरेच्या बाजवा, हात, पाय, आणि कुल्ले हे ) चवदा युग्म अवयव त्याचे एकसारिखे आहेत; त्याच्या प्रत्येक बाजूला बरोबर चार चार दाढा आहेत; ( सिंह, व्याघ्र, गज आणि वृषभ ह्या ) चार पशूंप्रमाणें त्याची चालण्याची ढब आहे; त्याचे ओठ, हनुवटी आणि नासिका हीं प्रशस्त आहेत; ( जीभ, मुख, नखें, केंस आणि त्वचा हीं ) त्याचीं पांच स्निग्ध आहेत; ( हात, बोटें, मांड्या आणि पोटऱ्या हे ) आठ अवयव त्याचे कळकाप्रमाणें सरळ आहेत १९; ( मुख, नेत्र, चेहरा, जीभ, ओठ, टाळू, स्तन, नखें, हात आणि पाय ह्या ) त्याच्या दहा ठिकाणीं कमलासारिख्या आकृति आहेत; ( वक्षःस्थल, मस्तक, ललाट, मान, हात, खांद, नाभी, पाय, पाठ आणि कान हे ) दहा अवयव त्याचे मोठे आहेत; ( श्री, यश आणि तेज ह्या ) तिहींनीं तो व्याप्त आहे; ( मातृवंश आणि पितृवंश हीं ) दोन त्याचीं शुद्ध आहेत; ( खाका, कूर्श, वक्षःस्थल, नासिका, स्कंध आणि ललाट हीं ) सहा त्याचीं उन्नत आहेत; ( बोटांचीं पेरें, केश, रोम, नखें, त्वचा, जननेंद्रिय, श्मश्रु, दृष्टि आणि बुद्धि हीं ) नऊ त्याचीं सूक्ष्म आहेत आणि ( धर्म, अर्थ व काम ह्या ) तिघांचेंही तो राम सेवन करणारा आहे २०. सत्य धर्माविषयीं तो तत्पर आहे; श्रीमान् आहे; निग्रहानुग्रहांविषयीं तो दक्ष आहे; कालदेशवर्तमान जाणणारा आहे; आणि सर्व लोकांशीं प्रिय भाषण करणारा आहे २१. याचा अतुलतेजस्वी सुमित्रापुत्र लक्ष्मण भ्राता आहे; तो कौसल्या

श्यामो महायशाः २३ तावुभौ नरशार्दूलौ त्वद्दर्शनकृतोत्सवौ । विचिन्वन्तौ महीं कृत्स्नामस्माभिः सह संगतौ २४ त्वामेव मार्गमाणौ तौ विचरन्तौ वसुंधराम् । ददर्शतुर्मृगपतिं पूर्वजेनावरोपितम् २५ ऋष्यमूकस्य मूले तु बहुपादपसंकुले । भ्रातुर्भयार्तमासीनं सुग्रीवं प्रियदर्शनम् २६ वयं च हरिराजं तं सुग्रीवं सत्यसंगरम् । परिचर्यामहे राज्यात्पूर्वजेनावरोपितम् २७ ततस्तौ चीरवसनौ धनुःप्रवरपाणिनौ । स तौ दृष्ट्वा नरव्याघ्रौ धन्विनौ वानरर्षभः २८ अभिप्लुतो गिरेस्तस्य शिखरं भयमोहितः २९ ततः स शिखरे तस्मिन्वानरेन्द्रो व्यवस्थितः । तयोः समीपं मामेव प्रेषयामास सत्वरम् ३० तावहं पुरुषव्याघ्रौ सुग्रीववचनात्प्रभू । रूपलक्षणसंपन्नौ कृताञ्जलिरुपस्थितः ३१ तौ परिज्ञाततत्त्वार्थौ मया प्रीतिसमन्वितौ । पृष्ठमारोप्य तं देशं प्रापितौ पुरुषर्षभौ ३२

---

व सुमित्रा या दोन्हीही आपल्या माता समजत आहे; आणि रूप, प्रजाजनांचे ठिकाणीं प्रेम व इतरही गुण ह्यांनीं तो रामासारखाच आहे २२ व महायशस्वी आणि वैभवशाली राम श्यामवर्ण असून त्याची कांति सुवर्णासारखी आहे २३. ते उभयतां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेले आहेत आणि आह्मी सुग्रीवमंत्र्यांशीं जूट करून ते सर्व पृथ्वी शोधीत आहेत २४. ते उभयतां तुला पाहण्याकरितां पृथ्वीवर हिंडत असतांना ज्येष्ठ भ्रात्यानें राज्यापासून हांकून लाविलेल्या वानराधिपति सुग्रीवाला त्यांनीं अवलोकन केलें २५. त्यावेळीं आल्हादकारक मुद्रेनें युक्त असलेला परंतु, भ्रात्याच्या भयानें व्याप्त झालेला तो सुग्रीव अनेक वृक्षांनीं गजबजून गेलेल्या ऋष्यमूक पर्वताच्या पायथ्याशीं बसला होता २६. ज्येष्ठ भ्रात्यानें राज्यावरून हुसकून लाविलेल्या त्या सत्यप्रतिज्ञ वानरराज सुग्रीवाची आह्मी सेवा करीत असतां २७. असो. श्रेष्ठ धनुष्यें ज्यांनीं हातांमध्यें घेतलेलीं आहेत व ज्यांनीं वल्कलें परिधान केलेलीं आहेत, अशा त्या पुरुषश्रेष्ठ धनुर्धर रामलक्ष्मणांना अवलोकन करून तो वानरश्रेष्ठ सुग्रीव भीतीनें अगदीं गांगरून गेला आणि त्यानें त्या पर्वताचे शिखरावर उड्डाण केलें २८. तदनंतर त्या शिखरावर बसलेल्या त्या वानरराज सुग्रीवानें त्यांच्याजवळ मला सत्वर पाठवून दिलें २९. तेव्हां सुग्रीवाच्या आज्ञेवरून मी त्या रूपवान्, सुलक्षणी व समर्थ पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांच्या समीप गलों आणि हात जोडून उभा राहिलों ३०. त्यांचा मुख्य उद्देश मला समजून आल्यानंतर त्या परस्परांवर प्रेम करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांना मी पाठीवर बसवून ज्या ठिकाणीं सुग्रीव बसला होता त्या ठिकाणीं घेऊन गेलों ३१. तेथें गेल्यानंतर

निवेदितौ च तत्त्वेन सुग्रीवाय महात्मने । तयोरन्योन्यसंभाषाद्भृशं
प्रीतिरजायत ३३ तत्र तौ कीर्तिसंपन्नौ हरीश्वरनरेश्वरौ । परस्परकृता-
श्वासौ कथया पूर्ववृत्तया ३४ तं ततः सान्त्वयामास सुग्रीवं लक्ष्मणाग्रजः ।
स्त्रीहेतोर्वालिना भ्रात्रा निरस्तं पुरुतेजसा ३५ ततस्त्वन्नाशजं शोकं
रामस्याक्लिष्टकर्मणः । लक्ष्मणो वानरेन्द्राय सुग्रीवाय न्यवेदयत् ३६ स
श्रुत्वा वानरेन्द्रस्तु लक्ष्मणेनेरितं वचः । तदासीन्निष्प्रभोऽत्यर्थं ग्रहग्रस्त
इवांशुमान् ३७ ततस्त्वद्गात्रशोभीनि रक्षसा ह्रियमाणया । यान्याभरण-
जालानि पातितानि महीतले ३८ तानि सर्वाणि रामाय आनीय हरि-
यूथपाः । संहृष्टा दर्शयामासुर्गतिं तु न विदुस्तव ३९ तानि रामाय
दत्तानि मयैवोपहृतानि च । स्वनवन्त्यवकीर्णानि तस्मिन्विहतचेतसि ४०
तान्यङ्के दर्शनीयानि कृत्वा बहुविधं तदा । तेन देवप्रकाशेन देवेन परिदे-
वितम् ४१ प्रादीपयद्दाशरथेस्तदा शोकहुताशनम् । शायितं च चिरं तेन
दुःखार्तेन महात्मना ४२ मयापि विविधैर्वाक्यैः कृच्छ्रादुत्थापितः पुनः ४३

महात्म्या सुग्रीवाला मीं त्यांचें खरें खरें वृत्त निवेदन केलें; तेव्हां एकमेकांचें संभाषण सुरू होऊन सुग्रीव व रामचंद्र यांच्यामध्यें अतिशयच प्रेम उत्पन्न झालें ३३. आपआपला पूर्व वृत्तांत त्या कीर्तिसंपन्न वानराधिपति व प्रजाधिपति रामसुग्रीवांनीं एकमेकाला कळवून परस्पारांनीं परस्पराला आश्वासन दिलें ३४. प्रथमतः स्त्रीकरितां महातेजस्वी वालिनामक भ्रात्यानें हाकून लाविलेल्या त्या सुग्रीवाचें लक्ष्मणाग्रज रामचंद्रानें सांत्वन केलें ३५; आणि तदनंतर सरळ रीतीनें वागणाऱ्या रामाला तूं नाहींशी झाल्यामुळें होत असलेलें दुःख लक्ष्मणानें वानरराज सुग्रीवाला निवेदन केलें ३६. तेव्हां लक्ष्मणाच्या तोंडून निघालेलें भाषण श्रवण करितांक्षणीं तो वानराधिपति सुग्रीव ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें अतिशय निस्तेज झाला ३७. तदनंतर राक्षस तुला घेऊन चालला असतां तुझ्या शरीराला शोभा आणणारे जे भूषणसमुदाय भूमीवर पडले होते ३८ ते सर्व वानरसेनाधिपतींनीं रामाकडे आणून आनंदानें दाखविले; परंतु, तूं कोणीकडे गेलीस हें त्यांना समजलें नाहीं ३९. मींच प्रथम आणिलेले ते ध्वनियुक्त भूषणसमुदाय रामाला दिले असतां ते घेतांक्षणीं त्याला मूर्छा आली ४०; आणि नंतर ते प्रेक्षणीय भूषणसमुदाय मांडीवर ठेवून त्या देवावतारी रामराजानें नानाप्रकारानें शोक केला ४१. सारांश, दाशरथि रामाचा शोकाग्नि त्यावेळीं फारच भडकला आणि दुःखाकुल झालेला तो महात्मा राम पुष्कळ वेळपर्यंत भूमीवर पडला ४२. परंतु, नानाप्रकारच्या गोष्टी सांगून मोठ्या कष्टानें मीं त्याला फिरून उठविलें ४३. नंतर ते

तानि दृष्ट्वा महार्हाणि दर्शयित्वा मुहुर्मुहुः । राघवः सहसौमित्रिः सुग्रीवे संन्यवेशयत् ४४ स त्वादर्शनादार्ये राघवः परितप्यते । महता ज्वलता नित्यमग्निनेवाग्निपर्वतः ४५ त्वत्कृते तमनिद्रा च शोकश्चिन्ता च राघवम् । तापयन्ति महात्मानमग्न्यगारमिवाग्नयः ४६ तवादर्शनशोकेन राघवः परिचाल्यते । महता भूमिकम्पेन महानिव शिलोच्चयः ४७ काननानि सुरम्याणि नदीप्रस्रवणानि च । चरन्न रतिमाप्नोति त्वामपश्यन्नृपात्मजे ४८ स त्वां मनुजशार्दूलः क्षिप्रं प्राप्स्यति राघवः । समित्रबान्धवं हत्वा रावणं जनकात्मजे ४९ सहितौ रामसुग्रीवावुभावकुरुतां तदा । समयं वालिनं हन्तुं तव चान्वेषणं प्रति ५० ततस्ताभ्यां कुमाराभ्यां वीराभ्यां स हरीश्वरः । किष्किन्धां समुपागम्य वाली युद्धे निपातितः ५१ ततो निहत्य तरसा रामो वालिनमाहवे । सर्वर्क्षहरिसङ्घानां सुग्रीवमकरोत्पतिम् ५२ रामसुग्रीवयोरैक्यं देव्येवं समजायत । हनूमन्तं च मां विद्धि तयोर्दूतमुपागतम् ५३ स्वं राज्यं प्राप्य सुग्रीवः स्वानानीय महाकपीन् । त्वदर्थं

---

महामूल्यवान् भूषणसमुदाय वारंवार सुग्रीवाला दाखवून लक्ष्मणासहवर्तमान रामानें तें सुग्रीवापाशीं ठेविलें ४४. असो. हे साध्वि सीते, तूं दृष्टीआड झाल्यामुळें रघुवंशज राम ज्वालामुखी पर्वताप्रमाणें मोठ्या उज्ज्वल अग्नीच्या योगानें जसा कांहीं एकसारिखा जळत राहिला आहे ४५. अग्नि ज्याप्रमाणें होमशाला संतप्त करीत असतात त्याप्रमाणें महात्म्या राघवाला तुझ्याकरितां शोक, चिंता आणि जागरण हीं ताप देत आहेत ४६. मोठ्या भूकंपानें जसा प्रचंड पर्वतही कंपित होऊं लागावा तसा तूं दृष्टीआड झाल्यामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें राम कंपित होत आहे ४७. हे राजकन्ये, अतिरम्य वनांतून आणि नदीप्रवाहांच्या बाजूनें संचार करीत असतांनाही त्याच्या मनाला बरें वाटत नाहीं ४८. हे जनककन्ये, मित्र आणि बांधव ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करून तो पुरुषश्रेष्ठ राम सत्वरच तुला प्राप्त करून घेईल ४९. एकमेकांशीं मैत्री संपादन केलेल्या उभयतां रामसुग्रीवांनीं वालीचा वध करण्याविषयीं आणि तुझा शोध करण्याविषयीं बरोबरच प्रतिज्ञा केली; ५० व तदनंतर तो वानरराज सुग्रीव त्या वीर कुमारांसहवर्तमान किष्किंधानगरीला आल्यावर वालीचा युद्धामध्यें वध झाला ५१. सारांश, युद्धामध्यें वालीचा स्वपराक्रमानें वध करून रामानें सुग्रीवाला सर्व ऋक्ष आणि वानर ह्यांच्या समुदायाचें आधिपत्य दिलें ५२. हे देवि, ह्याप्रमाणें, राम आणि सुग्रीव ह्यांची मैत्री जुडली आहे आणि मी त्यांचा दूत हनुमान् येथें आलों आहें असें तूं समज ५३. स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर सुग्रीवानें महाबलाढ्य महाकपि

प्रेषयामास दिशो दश महाबलान् ५४ आदिष्टा वानरेन्द्रेण सुग्रीवेण महौ-
जसः। अद्रिराजप्रतीकाशाः सर्वतः प्रस्थिता महीम् ५५ ततस्त मार्गमाणा वै
सुग्रीववचनातुराः। चरन्ति वसुधां कृत्स्नां वयमन्ये च वानराः ५६ अङ्गदो नाम
लक्ष्मीवान्वालिसूनुर्महाबलः। प्रस्थितः कपिशार्दूलस्त्रिभागबलसंवृतः ५७
तेषां नो विप्रणष्टानां विन्ध्ये पर्वतसत्तमे। भृशं शोकपरीतानामहोरात्रगणा
गताः ५८ ते वयं कार्यनैराश्यात्कालस्यातिक्रमेण च। भयाच्च कपिराजस्य
प्राणांस्त्यक्तुमुपस्थिताः ५९ विचित्य गिरिदुर्गाणि नदीप्रस्रवणानि च।
अनासाद्य पदं देव्याः प्राणांस्त्यक्तुं व्यवस्थिताः॥ ततस्तस्य गिरेर्मूर्ध्नि वयं
प्रायमुपास्महे ६० दृष्ट्वा प्रायोपविष्टांश्च सर्वान्वानरपुङ्गवान्। भृशं शोका-
र्णवे मग्नः पर्यदेवयदङ्गदः ६१ तव नाशं च वैदेहि वालिनश्च तथा वधम्।
प्रायोपवेशमस्माकं मरणं च जटायुषः ६२ तेषां नः स्वामिसंदेशान्निरा-
शानां मुमूर्षताम्। कार्यहेतोरिहायातः शकुनिर्वीर्यवान्महान् ६३

बोलावून आणिले आणि तुझ्याकरितां चोहोंकडे पाठवून दिले ५४; व वानरराज सुग्रीवानें आज्ञा केली असतां महापर्वताची बरोबरी करणारे ते महाबलाढ्य वानर चोहोंकडे पृथ्वीवर शोध करण्याकरितां गेले ५५. सारांश, सुग्रीवाच्या आज्ञेची भीति बाळगून आह्मी व इतर असे ते सर्वही वानर सर्व पृथ्वी हिंडूं लागले ५६. वैभवशाली आणि महाबलाढ्य वानरश्रेष्ठ वालिपुत्र अंगद एक तृतीयांश सेना बरो-बर घेऊन निघाला ५७; परंतु, विंध्यनामक श्रेष्ठ पर्वतावर ते आह्मी जेव्हां (विवरामध्यें) गडप होऊन गेलों तेव्हां आमच्या कित्येक रात्री व दिवस अत्यंत शोकामध्येंच गेल्या ५८ आणि शेवटीं कार्याविषयीं निराश होऊन व कालातिक्रमण झाल्यामुळें वानरराज सुग्रीवाला भिऊन जाऊन प्राणत्याग करण्याकरितां आह्मी उद्युक्त झालों ५९. सारांश, पर्वतावरील दुर्गम प्रदेश आणि नद्यांचे प्रवाह शोधिले असतांही तुज देवीचा मागमूस सुद्धां जेव्हां लागला नाहीं तेव्हां आह्मीं प्राणत्याग करण्याचा निश्चय केला; व त्या विंध्यपर्वताच्या माथ्यावर आह्मी प्रायोपवेशन करीत बसलों ६०. तेव्हां सर्व वानरश्रेष्ठ प्रायोपवेशनार्थ बसलेले अवलोकन करून अंगद शोकसागरामध्यें अतिशय निमग्न झाला; आणि, हे वैदेहि, वालीचा वध, तुझा थांग न लागणें, आमचें प्रायोपवेशन व जटायूचें मरण ह्यांबद्दल तो विलाप करूं लागला ६१,६२. ह्याप्रमाणें प्रभूची आज्ञा झाली असतां 'कालातिक्रमण होऊन कार्यही शेवटास न गेल्यामुळें ते आह्मी निराश होऊन मरणाच्या द्वारीं बसलों असतां एक मोठा वीर्य-वान् पक्षी तेथें आला ६३; आणि गृध्रराज जटायूचा सहोदर तो संपातिनामक

गृध्रराजस्य सोदर्यः संपातिर्नाम गृध्रराट् । श्रुत्वा भ्रातृवधं कोपादिदं वचनमब्रवीत् ६४ यवीयान्केन मे भ्राता हतः क्व च निपातितः । एतदाख्यातुमिच्छामि भवद्भिर्वानरोत्तमाः ६५ अङ्गदोकथयत्तस्य जनस्थाने महद्वधम् । रक्षसा भीमरूपेण त्वामुद्दिश्य यथार्थतः ६६ जटायोस्तु वधं श्रुत्वा दुःखितः सोरुणात्मजः । त्वामाह स वरारोहे वसन्तीं रावणालये ६७ तस्य तद्वचनं श्रुत्वा संपातेः प्रीतिवर्धनम् । अङ्गदप्रमुखाः सर्वे ततः प्रस्थापिता वयम् ६८ विन्ध्यादुत्थाय संप्राप्ताः सागरस्यान्तमुत्तमम् । त्वद्दर्शने कृतोत्साहा हृष्टाः पुष्टाः प्लवङ्गमाः ६९ अङ्गदप्रमुखाः सर्वे वेलोपान्तमुपागताः । चिन्तां जग्मुः पुनर्भीमां त्वद्दर्शनसमुत्सुकाः ७० अथाहं हरिसैन्यस्य सागरं दृश्य सीदतः । व्यवधूय भयं तीव्रं योजनानां शतं प्लुतः ७१ लङ्का चापि मया रात्रौ प्रविष्टा राक्षसाकुला । रावणश्च मया दृष्टस्त्वं च शोकनिपीडिता ७२ एतत्ते सर्वमाख्यातं

---

गृध्रराज भ्रात्याचा वध श्रवण केल्यावर रागारागानें ह्मणाला ६४ " हे वानरश्रेष्ठहो, माझ्या कनिष्ठ भ्रात्याचा कोणीं वध केला आणि कोठें केला हें तुमच्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे " ६५. ह्याप्रमाणें त्यानें विचारिल्यावर तुझ्याकरितां त्या भयंकर रूप धारण करणाऱ्या राक्षसानें जनस्थानामध्यें त्या महात्म्याचा वध केल्याचें यथार्थ वर्तमान अंगदानें त्याला कळविलें ६६. तेव्हां जटायूचा वध झाल्याचें ऐकून दुःखित झालेल्या अरुणपुत्रानें, हे सुंदरि, रावणाच्या गृहामध्यें तूं वास्तव्य करीत आहेस असें आह्मांला सांगितलें ६७; व तें त्या संपातीचें आल्हादकारक भाषण श्रवण करितांक्षणीं अंगदप्रभृति आह्मी सर्वही तेथून निघालों ६८. तुझ्या दर्शनाविषयीं उत्साह उत्पन्न झाल्यामुळें आमचीं शरीरें टवटवीत होऊन आह्मी आनंदित झालों आणि विंध्यपर्वतापासून उठून ते आह्मी वानर समुद्राच्या उत्कृष्ट तीराशीं आलों ६९. तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेले अंगदप्रभृति सर्वही वानर समुद्राच्या तीरासमीप आले असतां त्यांना पुनरपि भयंकर चिंता उत्पन्न झाली ७०. तेव्हां सागर अवलोकन करितांक्षणीं धीर सोडूं लागलेल्या त्या वानरसैन्याची मोठी भीति दूर करून मीं शंभर योजनें उड्डाण केलें ७१; राक्षसांनीं व्याप्त झालेल्या लंकेमध्यें मीं रात्रींच प्रवेश केला; आणि रावण माझ्या दृष्टीं पडला असून शोकाकुल झालेल्या तुलाही मीं अवलोकन केलें ७२. हे निर्दोष देवि, हें इत्थंभूत सर्व वृत्त मीं तुला कथन केलें आहे. ह्यास्तव, मी दाशरथि रामाचा दूत असल्यामुळें तूं माझ्याशीं संभाषण कर ७३. हे राजपत्नि, रामकार्याकरितां उद्युक्त होऊन तुझ्याकरितां येथें आलेला

यथावृत्तमनिन्दिते । अभिभाषस्व मां देवि दूतो दाशरथेरहम् ७३ तन्मां रामकृतोद्योगं त्वन्निमित्तमिहागतम् । सुग्रीवसचिवं देवि बुद्ध्यस्व पवनात्मजम् ७४ कुशली तव काकुत्स्थः सर्वशस्त्रभृतां वरः । गुरोराराधने युक्तो लक्ष्मणः शुभलक्षणः ७५ तस्य वीर्यवतो देवि भर्तुस्तव हिते रतः । अहमेकस्तु संप्राप्तः सुग्रीववचनादिह ७६ मयेयमसहायेन चरता कामरूपिणा । दक्षिणा दिगनुक्रान्ता त्वन्मार्गविचयैषिणा ७७ दिष्ट्याहं हरिसैन्यानां त्वन्नाशमनुशोचताम् । अपनेष्यामि संतापं तवाभिगमशासनात् ७८ दिष्ट्या हि न मम व्यर्थं सागरस्येह लङ्घनम् । प्राप्स्याम्यहमिदं देवि त्वद्दर्शनकृतं यशः ७९ राघवश्च महावीर्यः क्षिप्रं त्वामभिपत्स्यते । सपुत्रबान्धवं हत्वा रावणं राक्षसाधिपम् ८० माल्यवान्नाम वैदेहि गिरीणामुत्तमो गिरिः । ततो गच्छति गोकर्णं पर्वतं केसरी हरिः ८१ स च देवर्षिभिर्दिष्टः पिता मम महाकपिः । तीर्थे नदीपतेः पुण्ये शम्बसादनमुद्धरन् ८२ यस्याहं हरिणः क्षेत्रे जातो वातेन मैथिलि । हनूमानिति

---

मी वायुपुत्र सुग्रीवमंत्री आहें असें तूं समज ७४. सर्व शस्त्रें धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा तुझा ककुत्स्थकुलोत्पन्न राम खुशाल आहे; आणि त्या ज्येष्ठ भ्रात्याच्या सेवेमध्यें तत्पर असलेला सुलक्षणी लक्ष्मणही सुखरूप आहे ७५. हे राजपत्नि, त्या तुझ्या वीर्यवान् भर्त्याच्या हिताविषयीं दक्ष असलेला मी एकटा सुग्रीवाच्या आज्ञेवरून येथें आलों आहें ७६. कोणीही सोबती नसतांना मीं यथेष्टरूप धारण करून तुझा शोध लावण्याच्या उद्देशानें ही दक्षिण दिशा उल्लंघिली ७७. आतां तुझा शोध लागत नसल्यामुळें शोक करीत बसलेल्या वानरसेनांचें दुःख सुदैवानें तुझा शोध लागल्याची वार्ता कळवून मी नाहींसें करीन ७८. हे देवि, समुद्र उल्लंघन करून माझें येथें येणें व्यर्थ झालें नाहीं हें मोठें भाग्यच ह्मणावयाचें. आतां तुझा शोध लावण्यासंबंधानें मी यश संपादन करीन; ७९ आणि महावीर्यवान् रघुवंशज राम राक्षसाधिपति रावणाचा, पुत्र व बांधव ह्यांसहवर्तमान, वध करून सत्वरच तुला प्राप्त करून घेईल ८०. हे वैदेहि, पर्वतामध्यें माल्यवान् ह्मणून एक श्रेष्ठ पर्वत आहे. तेथून केसरी ह्मणून वानर गोकर्ण पर्वतावर जात होता ८१. कारण, त्या माझ्या महाकपि पित्याला शंबसादननामक असुराचा वध करण्याविषयीं देवर्षींनीं आज्ञा केली होती; आणि त्या आज्ञेप्रमाणें सागराच्या पवित्रतीर्थावर त्यानें त्याचा वधही केला ८२. हे मैथिलि, त्या वानराच्या पत्नीचे ठिकाणीं मी वायूपासून उत्पन्न झालों आहें आणि स्वपराक्रमानेंच मी जगतामध्यें हनुमान् ह्मणून विख्यात झालों आहें ८३. हे विदेह-

विख्यातो लोके स्वेनैव कर्मणा ८३ विश्वासार्थं तु वैदेहि भर्तुरुक्ता मया गुणाः । अचिरात्त्वामितो देवि राघवो नयिता ध्रुवम् ८४ एवं विश्वासिता सीता हेतुभिः शोककर्शिता । उपपन्नैरभिज्ञानैर्दूतं तमधिगच्छति८५ अतुलं च गता हर्षं प्रहर्षेण तु जानकी । नेत्राभ्यां वक्रपक्ष्माभ्यां मुमोचानन्दजं जलम् ८६ चारु तद्वदनं तस्यास्ताम्रशुक्लायतेक्षणम् । अशोभत विशालाक्ष्या राहुमुक्त इवोडुराट् ८७ हनूमन्तं कपिं व्यक्तं मन्यते नान्यथेति सा । अथोवाच हनूमांस्तामुत्तरं प्रियदर्शनाम् ८८ एतत्ते सर्वमाख्यातं समाश्वसिहि मैथिलि । किं करोमि कथं वा ते रोचते प्रतियाम्यहम् ८९ हतेसुरे संयति शम्बसादने कपिप्रवीरेण महर्षिचोदनात् । ततोस्मि वायुप्रभवो हि मैथिलि प्रभावतस्तत्प्रतिमश्च वानरः ९० [ १४९९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः ॥ ३५ ॥

भूय एव महातेजा हनूमान्पवनात्मजः । अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं सीता-

---

राजकन्ये, तुला विश्वास यावा एतदर्थ मीं तुझ्या भर्त्याचे गुण कथन केले; आतां, हे राजपत्नि, रघुवंशज राम निःसंशय तुला येथून लवकरच घेऊन जाईल " ८४. ह्याप्रमाणें विश्वसनीय कारणें देऊन हनुमानानें सीतेचे ठिकाणीं विश्वास उत्पन्न केला असतां शोकानें कृश झालेल्या त्या सीतेलाही रामलक्ष्मणांच्या चिन्हांची वास्तविक ओळख पटल्यावरून तो रामदूत असावा असें वाटलें ८५. इतकेंच नव्हे परंतु, त्या जानकीला अनुपम हर्ष झाला; वक्र पापण्यांनीं युक्त असलेल्या तिच्या नेत्रांतून हर्षामुळें आनंदाश्रुही गळूं लागले ८६; विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेचें आरक्तवर्ण आणि शुक्लवर्ण अशा दीर्घ नयनांनीं युक्त असलेलें तें मुखही ग्रहण सुटलेल्या नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें शोभूं लागलें ८७ आणि भलता सलता समज न होतां तो हनुमान् वानरच आहे असें तिला पक्कें वाटलें. तदनंतर आल्हादकारक मुद्रेनें युक्त असलेल्या त्या सीतेला हनुमान् ह्मणाला ८८ " हे मैथिलि, हें मीं सर्व तुला कथन केलें आहे; आतां तूं धैर्य धर आणि मी काय करूं तें सांग. रामाकडे मी परत जाणार आहें; परंतु, हें करणें तुला कसें काय रुचत आहे तें कळूं दे ८९. असो. हे मैथिलि, संग्रामामध्यें शंबसादन असुराचा महर्षींच्या आज्ञेवरून वानरश्रेष्ठ केसरीनें वध केला असतां महर्षींच्या प्रसादामुळें वायूपासून उत्पन्न झालेला मी वानर प्रभावानेंही त्याच्यासारिखाच निपजलों " ९०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

प्रत्ययकारणात् १ वानरोऽहं महाभागे दूतो रामस्य धीमतः । रामनामा-
ङ्कितं चेदं पश्य देव्यङ्गुलीयकम् २ प्रत्ययार्थं तवानीतं तेन दत्तं महात्मना ।
समाश्वसिहि भद्रं ते क्षीणदुःखफला ह्यसि ३ गृहीत्वा प्रेक्षमाणा सा भर्तुः
करविभूषितम् । भर्तारमिव संप्राप्तं जानकी मुदिताभवत् ४ चारु तद्व-
दनं तस्यास्ताम्रशुक्लायतेक्षणम् । बभूव हर्षोदग्रं च राहुमुक्त इवोडुराट् ५
ततः सा ह्रीमती बाला भर्तुः संदेशहर्षिता । परितुष्टा प्रियं कृत्वा प्रश-
शंस महाकपिम् ६ विक्रान्तस्त्वं समर्थस्त्वं प्राज्ञस्त्वं वानरोत्तम । येनेदं
राक्षसपदं त्वयैकेन प्रधर्षितम् ७ शतयोजनविस्तीर्णः सागरो मकरालयः ।
विक्रमश्लाघनीयेन क्रमता गोष्पदीकृतः ८ नहि त्वां प्राकृतं मन्ये वानरं
वानरर्षभ । यस्य ते नास्ति संत्रासो रावणादपि संभ्रमः ९ अर्हसे च
कपिश्रेष्ठ मया समभिभाषितुम् । यद्यसि प्रेषितस्तेन रामेण विदितात्मना १०
प्रेषयिष्यति दुर्धर्षो रामो नह्यपरीक्षितम् । पराक्रममविज्ञाय मत्सकाशं

---

महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् सीतेला विश्वास येण्याकरितां पुनरपि नम्रपणानें तिला ह्मणाला १ " हे महाभाग्यवति, मी बुद्धिमान् रामाचा दूत वानर आहें. हे राजपत्नि, रामनामानें अंकित अशी ही माझ्यापाशीं असलेली अंगठी तूं पहा २. तुला विश्वास पटण्याकरितां त्या महात्म्यानें दिलेली ही अंगठी मीं तुझ्याकडे आणिली आहे. तुझें दैव बरें करो; तूं आतां धैर्य धर. तुझ्या पूर्वसंचित पापाचें दुःखदायक फल आतां संपलें आहे " ३. भर्त्याचें तें हस्तभूषण हातांत घेऊन ती जानकी पाहूं लागली असतां जशी कांहीं भर्त्याचीच गांठ पडल्याप्रमाणें तिला आनंद झाला ४. आरक्त व शुक्ल वर्णांनीं युक्त असलेले नेत्र ज्याच्यावर आहेत असें तें तिचें सुंदर मुख ग्रहण सुटलेल्या नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें आल्हादकारक झालें ५; आणि हस्तभूषण पाहिल्यानंतर भर्त्याच्या निरोपानें आनंदित झालेली ती विनयशील बाला सीता सर्वस्वीं संतुष्ट होऊन आदरपूर्वक त्या महाकपीची प्रशंसा करूं लागली ६. ( ती ह्मणाली ) " हे वानरश्रेष्ठा, ज्या एकट्यानें तूं ह्या राक्षसस्थानामध्यें प्रवेश केलास तो तूं पराक्रमी, समर्थ व बुद्धिमान् आहेस ७. मकरांचें निवासस्थान असलेला हा सागर शंभर योजनें विस्तीर्ण आहे; परंतु पराक्रमानें स्तुतीस पात्र झालेल्या तूं ह्याला गाईच्या पावलाप्रमाणें करून टाकिलें आहेस ८. हे वानरश्रेष्ठा, ज्या तुला रावणापासूनही त्रास अथवा उद्वेग प्राप्त झाला नाहीं त्या तुला मी कांहीं सामान्य वानर समजत नाहीं ९. हे कपिश्रेष्ठा, स्वपराक्रमानें प्रसिद्ध असलेल्या त्या रामानें जर तुला पाठविलें असेल तर माझ्याशीं भाषण करण्यास तूं योग्य आहेस १०. तो अजिंक्य राम परीक्षा केल्यावांचून आणि पराक्रम पाहिल्यावांचून

विशेषतः ११ दिष्ट्या च कुशली रामो धर्मात्मा सत्यसंगरः । लक्ष्मणश्च महातेजाः सुमित्रानन्दवर्धनः १२ कुशली यदि काकुत्स्थः किं न सागरमेखलाम् । महीं दहति कोपेन युगान्ताग्निरिवोत्थितः १३ अथवा शक्तिमन्तौ तौ सुराणामपि निग्रहे । ममैव तु न दुःखानामस्ति मन्ये विपर्ययः १४ कच्चिन्न व्यथते रामः कच्चिन्न परितप्यते । उत्तराणि च कार्याणि कुरुते पुरुषोत्तमः १५ कच्चिन्न दीनः संभ्रान्तः कार्येषु च न मुह्यति । कच्चित्पुरुषकार्याणि कुरुते नृपतेः सुतः १६ द्विविधं त्रिविधोपायमुपायमपि सेवते । विजिगीषुसुहृत्कच्चिन्मित्रेषु च परंतपः १७ कच्चिन्मित्राणि लभते मित्रैश्चाप्यभिगम्यते । कच्चित्कल्याणमित्रश्च मित्रैश्चापि पुरस्कृतः १८ कच्चिदाशास्ति देवानां प्रसादं पार्थिवात्मजः । कच्चित्पुरुषकारं च दैवं च प्रतिपद्यते १९ कच्चिन्न विगतस्नेहो विवासान्मयि राघवः । कच्चिन्मां व्यसनादस्मान्मोक्षयिष्यति राघवः २०

विशेषतः माझ्याकडे कोणाला पाठविणार नाहीं ११. धर्मात्मा सत्यप्रतिज्ञ राम व त्याचप्रमाणें सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा महातेजस्वी लक्ष्मण कुशल आहे हें सुदैवच समजलें पाहिजे १२. परंतु, ककुत्स्थकुलोत्पन्न राम जर कुशल आहे तर प्रलयकालीं उत्पन्न झालेल्या अग्नीप्रमाणें हा कोपानें समुद्रवलयांकित पृथ्वी दग्ध करून कां टाकीत नाहीं ? १३. अथवा ते उभयतां रामलक्ष्मण देवांचाही निग्रह करण्यास समर्थ आहेत; परंतु, माझ्याच दुःखाचा अंत होण्याची वेळ अद्यापि आली नाहीं असें मला वाटतें १४. राम कष्टी झाला नाहींना ? तो काळजी करीत नाहींना ? तो पुरुषश्रेष्ठ माझी मुक्तता करण्याचे पुढले उद्योग करीत आहेना ? १५. दीन होऊन व गोंधळून जाऊन काय करावें हें त्याला सुचेनासें झालें नाहींना ? तो राजपुत्र वीराला योग्य अशींच कृत्यें करीत आहेना ? १६. सौम्य आणि कडक अशा दोन्हीं प्रकारांनीं धर्म, अर्थ आणि काम हे त्रिविध पुरुषार्थ प्राप्त होण्याचे उपाय आणि त्याचप्रमाणें सामदानादि उपाय ह्यांचें तो अवलंबन करीत आहेना ? त्याच्या मित्रांना विजयाची इच्छा आहेना ? आणि त्याचप्रमाणें मित्रांकरितां तो पराकाष्ठेचा तापही सहन करीत आहेना ? १७. तसाच तो मित्र संपादन करीत असून मित्रही त्याला येऊन मिळत आहेतना ? तसेच त्याचे मित्र कल्याणकर्ते असून ते त्याला मान देत आहेतना ? १८. तो राजपुत्र देवतांची कृपा संपादन करण्याची इच्छा धरीत आहेना; आणि दैव व प्रयत्न ह्या दोहोंचें हे तो अवलंबन करीत आहेना? १९. मी दूर झाल्यामुळें माझ्याविषयीं त्याचें प्रेम नाहींसें तर झालें नाहींना ? व ह्या संकटापासून

सुखानामुचितो नित्यमसुखानामनूचितः । दुःखमुत्तरमासाद्य कच्चिद्रामो न सीदति २१ कौसल्यायास्तथा कच्चित्सुमित्रायास्तथैव च । अभीक्ष्णं श्रूयते कच्चित्कुशलं भरतस्य च २२ मन्निमित्तेन मानार्हः कच्चिच्छोकेन राघवः । कच्चिन्नान्यमना रामः कच्चिन्मां तारयिष्यति २३ कच्चिदक्षौहिणीं भीमां भरतो भ्रातृवत्सलः । ध्वजिनीं मन्त्रिभिर्गुप्तां प्रेषयिष्यति मत्कृते २४ वानराधिपते श्रीमान्सुग्रीवः कच्चिदेष्यति । मत्कृते हरिभिर्वीरैर्वृतो दन्तनखायुधैः २५ कच्चिच्च लक्ष्मणः शूरः सुमित्रानन्दवर्धनः । अस्त्रविच्छरजालेन राक्षसान्विधमिष्यति २६ रौद्रेण कच्चिदस्त्रेण रामेण निहतं रणे । द्रक्ष्याम्यल्पेन कालेन रावणं ससुहृज्जनम् २७ कच्चिच्च तद्धेमसमानवर्णं तस्याननं पद्मसमानगन्धि । मया विना शुष्यति शोकदीनं जलक्षये पद्ममिवातपेन २८ धर्मापदेशात्त्यजतः स्वराज्यं मां चाप्यरण्यं नयतः पदातेः । नासीद्यथा यस्य न भीर्न शोकः कच्चित्स

---

तो राघव मला मुक्त करणार आहेनां ? २०. नेहमीं सुखांचा उपभोग घेण्यामध्येंच ज्याचे पहिले दिवस गेले आणि दुःखांचा अनुभव ज्याला मुळींच आलेला नाहीं तो राम नंतर दुःख प्राप्त झाल्यामुळें धैर्यहीन तर झाला नाहींनां ? २१. कौसल्या, सुमित्रा आणि त्याचप्रमाणें भरत ह्या सर्वांचेंही कुशलवृत्त वारंवार त्याच्या कानावर येत असतेंनां २२. संमानासच पात्र असलेला तो रघुवंशज राम माझ्याकरितां उत्पन्न झालेल्या शोकामुळें संतप्त झाला आहेनां ? माझ्याशिवाय दुसरीकडे त्याचें मन नाहींनां ? तो मला ह्या संकटांतून तारणारा आहेनां ? २३. भ्रातृवत्सल भरत मंत्र्यांनीं रक्षण केलेली एक अक्षौहिणी भयंकर सेना माझ्याकरितां पाठविणार आहेनां ? २४. हे वानराधिपते हनुमाना, वैभवशाली सुग्रीव, दंत व नखें ह्या आयुधांनीं युक्त असलेल्या वीर वानरांनीं परिवेष्टित होऊन माझ्याकरितां इकडे येणार आहेनां ? २५. सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा अस्त्रवेत्ता शूर लक्ष्मण बाणसमूहानें राक्षसांना उडवून देईलनां ? २६. रामाच्या हातून भयंकर अस्त्राच्या योगानें सुहृज्जनांसहवर्तमान वध पावलेला रावण थोडक्याच वेळांत मी अवलोकन करीननां ? २७. प्रखर उन्हानें सरोवरांतील पाणी आटून गेलें असतां कमल ज्याप्रमाणें शुष्क होऊन जातें त्याप्रमाणें सुवर्णासारिखें तेजस्वी आणि पद्मासारिखें सुगंधी असें त्या रामाचें मुख माझ्या वियोगामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें दीन होऊन शुष्क तर होत चाललें नाहींनां ? २८. धर्माकरितां स्वराज्याचा त्याग करून मलाही बरोबर अरण्यामध्यें घेऊन जाणाऱ्या ज्या पादचारी रामाला त्या वेळीं भय अथवा दुःख झालें

धैर्यं कच्चित् करोति २९ न चास्य माता न पिता न चान्यः स्नेहाद्विशि-
ष्टोऽस्ति मया समो वा । तावद्ध्यहं दूत जिजीविषेयं यावत्प्रवृत्तिं शृणुयां
प्रियस्य ३० इतीव देवी वचनं महार्थं तं वानरेन्द्रं मधुरार्थमुक्त्वा ।
श्रोतुं पुनस्तस्य वचोऽभिरामं रामार्थयुक्तं विरराम रामा ३१ सीताया
वचनं श्रुत्वा मारुतिर्भीमविक्रमः । शिरस्यञ्जलिमाधाय वाक्यमुत्तरमब्र-
वीत् ३२ न त्वामिहस्थां जानीते रामः कमललोचनः । तेन त्वां नान-
यत्याशु शचीमिव पुरन्दरः ३३ श्रुत्वैव च वचो मह्यं क्षिप्रमेष्यति राघवः ।
चमूं प्रकर्षन्महतीं हर्यृक्षगणसंयुताम् ३४ विष्टम्भयित्वा बाणौघैरक्षोभ्यं
वरुणालयम् । करिष्यति पुरीं लङ्कां काकुत्स्थः शान्तराक्षसाम् ३५
तत्र यद्यन्तरा मृत्युर्यदि देवा महासुराः । स्थास्यन्ति पथि रामस्य स
तानपि वधिष्यति ३६ तवादर्शनजेनार्ये शोकेन परिपूरितः । न शर्म
लभते रामः सिंहार्दित इव द्विपः ३७ मन्दरेण च ते देवि शपे मूल-

---

नाहीं तो राम मनामध्यें तसेंच धैर्य धरून राहिला आहेनां? २९. हे दूता, माझें ज्याप्रमाणें ह्याच्यावर प्रेम आहे त्याप्रमाणें पित्यानेंही ह्याच्यावर प्रेम नव्हतं; मातेचेंही नाहीं आणि दुसऱ्याही कोणाचें नाहीं; मग माझ्यापेक्षां ह्याच्यावर अधिक प्रेम करणाऱ्याची तर गोष्टच नको आहे. तस्मात्, जोंपर्यंत ह्या प्रिय रामाचा वृत्तांत माझ्या कानावर येत राहील तोंपर्यंतच मी जीविताची आशा धरून राहीन "३०. ह्याप्रमाणें गंभीर अर्थानें युक्त आणि मधुर शब्दांनीं भरलेलें भाषण त्या वानरराजाशीं करून ती राजपत्नी सुंदरी सीता रामाविषयीं ज्यांत हकीकत आहे असें त्याचें चित्त-वेधक भाषण श्रवण करण्याकरितां स्तब्ध राहिली ३१. सीतेचें भाषण श्रवण केल्या-वर महापराक्रमी मारुति मस्तकीं हात जोडून तिला ह्मणाला ३२ "कमलनयन रामाला तू येथें असल्याचें विदित नाहीं आणि ह्मणूनच शचीला घेऊन जाणाऱ्या इंद्राप्रमाणें तो तुला येथून सत्वर घेऊन जात नाहीं ३३. माझें भाषण ऐकतांक्षणीं वानरगण आणि ऋक्षगण ह्यांनीं युक्त असलेली प्रचंड सेना बरोबर घेऊन रघुवंशज राम सत्वर तेथून निघेल ३४ आणि अक्षोभ्य अशा सागराचें बाणसमुदायांनीं स्तंभन करून तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम ह्या लंकानगरींतील राक्षसांचा नाश करून टाकील ३५; इतकेंच नव्हे परंतु, त्याच्या त्या मार्गामध्यें देव, मृत्यु अथवा महादैत्य जरी आड आले तरी त्यांचासुद्धां तो वध करील". ३६. हे साध्वि, सिंहानें जर्जर केलेल्या गजाला ज्याप्रमाणें चैन पडत नाहीं त्याप्रमाणें तूं दृष्टीआड झाल्यामुळें शोकानें व्याप्त झालेल्या रामाला चैन पडत नाहीं ३७. हे राजपत्नि, मनोहर कुंडलें, उत्कृष्ट नेत्र

फलेन च । मलयेन च विन्ध्येन मेरुणा दर्दुरेण च ३८ यथा सुनयनं वल्गु: बिम्बोष्ठं चारुकुण्डलम् । मुखं द्रक्ष्यसि रामस्य पूर्णचन्द्रमिवोदितम् ३९ क्षिप्रं द्रक्ष्यसि वैदेहि रामं प्रस्रवणं गिरौ । शतक्रतुमिवासीनं नागपृष्ठस्य मूर्धनि ४० न मांसं राघवो भुङ्क्ते न चैव मधु सेवते । वन्यं सुविहितं नित्यं भक्तमश्नाति पञ्चमम् ४१ नैव दंशान्न मशकान्न कीटान्न सरीसृपान् । राघवोऽपनयेद्गात्रात्त्वद्गतेनान्तरात्मना ४२ नित्यं ध्यानपरो रामो नित्यं शोकपरायणः । नान्यच्चिन्तयते किंचित्स तु कामवशं गतः ४३ अनिद्रः सततं रामः सुप्तोऽपि च नरोत्तमः । सीतेति मधुरां वाणीं व्याहरन्प्रतिबुध्यते ४४ दृष्ट्वा फलं वा पुष्पं वा यच्चान्यत्स्त्रीमनोहरम् । बहुशो हा प्रियेत्येवं श्वसंस्त्वामभिभाषते ४५ स देवि नित्यं परितप्यमानस्त्वामेव सीतेत्यभिभाषमाणः । धृतव्रतो राजसुतो महात्मा तवैव लाभाय कृतप्रयत्नः ४६ सा रामसंकीर्तनवीतशोका रामस्य शोकेन समानशोका ।

---

आणि परिपक्व तोंडल्याप्रमाणें आरक्तवर्ण ओष्ठ ह्यांनीं युक्त व उदय पावलल्या पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक असें रामाचें मुख तूं ( लवकरच ) अवलोकन करशील. हें मी तुला मुळें, फळें ह्यांची आणि मंदर, मलय, विंध्य, मेरु व दर्दुर ह्या पर्वतांची शपथ वाहून सांगतों ३८, ३९ ऐरावताच्या मस्तकावर बसलेल्या इंद्राप्रमाणे प्रस्रवणपर्वतावर बसलेल्या रामाला, हे वैदेहि, तूं लवकरच अवलोकन करशील ४०. राम मांस भक्षण करीत नाहीं आणि मद्यही सेवन करीत नाहीं. फक्त शास्त्रविहित असें वनांतील ओदनच तो नित्य एक वेळ संध्याकाळीं सेवन करीत असतो ४१. रामाचें अंतःकरण तुझ्या ठिकाणींच खिळून गेलें असल्यामुळें डांस, माशा, कीटक आणि सर्पही तो आपल्या शरीरापाशीं आलेले दूर करीत नाहीं ४२. राम एकसारिखा चिंताक्रांत झालेला असून सर्वदा शोक करीत असतो आणि कामाधीन होऊन गेलेल्या त्या रामाच्या मनांत तुझ्याशिवाय दुसरा कांहीं विचारच येत नाहीं ४३. राम नेहमीं जागाच असतो आणि कदाचित् जरी त्याला झोंप लागली तरी 'सीता' अशी मधुर वाणी उच्चारीत उच्चारीतच तो जागा होतो ४४. फल, पुष्प अथवा स्त्रियांचें मन हरणारी अशी दुसरी कांहीं वस्तु दृष्टीं पडली म्हणजे, 'हे प्रिये,' असें सुस्कारा टाकीत टाकीत तो बोलूं लागतो ४५. हे राजपत्नि, तो नेहमीं शोक करीत असतो. 'सीता' म्हणून तुलाच उद्देशून बोलत असतो आणि ब्रह्मचर्य व्रतानें राहिलेला तो महात्मा राजपुत्र तुझ्याच प्राप्तीकरितां प्रयत्न करीत असतो " ४६. ह्याप्रमाणें प्रथमतः रामाचा वृत्तांत निवेदन केल्यामुळें शोकरहित झालेली परंतु, राम शोक करीत आहे असें ऐकिल्यामुळें पुनरपि त्याच्याचसारिखा

शरन्मुखेनाम्बुदशेषचन्द्रा निशेव वैदेहसुता बभूव ४७ [ १५४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

सा सीता वचनं श्रुत्वा पूर्णचन्द्रनिभानना । हनूमन्तमुवाचेदं धर्मार्थसहितं वचः १ अमृतं विषसंपृक्तं त्वया वानर भाषितम् । यच्च नान्यमना रामो यच्च शोकपरायणः २ ऐश्वर्ये वा सुविस्तीर्णे व्यसने वा सुदारुणे । रज्ज्वेव पुरुषं बद्ध्वा कृतान्तः परिकर्षति ३ विधिर्नूनमसंहार्यः प्राणिनां प्लवगोत्तम । सौमित्रिं मां च रामं च व्यसनैः पश्य मोहितान् ४ शोकस्यास्य कथं पारं राघवोऽधिगमिष्यति । प्लवमानः परिक्रान्तो हतनौः सागरे यथा ५ राक्षसानां वधं कृत्वा सूदयित्वा च रावणम् ।

---

शोक करूं लागलेली ती विदेहराजकन्या सीता, मुद्रा वरचेवर पालटूं लागल्यामुळें आकाशामध्यें थोडे थोडे मेघांचे छट्टे राहिले असतांना शरदृतूंतील चांदणी रात्र ज्याप्रमाणें शोभूं लागते त्याप्रमाणें शोभूं लागली. ( सारांश, रामाला एकसारिखा आपला ध्यास लागून राहिलेला आहे असें एकतांक्षणीं सीतेची मुद्रा आनंदित दिसूं लागली; परंतु, तो शोकाकुल झालला आहे असें कानीं पडतांक्षणीं तिची मुद्रा पुनरपि शोकग्रस्तही दिसूं लागली आणि अशा रीतीनें तिच्या मुद्रेमध्यें वारंवार फेर पडूं लागल्यामुळें शरदृतूमध्यें आकाशांत इकडे तिकडे मेघांचे कांहीं छट्टे अवशिष्ट असतांना चांदण्यारात्रीं चंद्र ज्याप्रमाणें वारंवार मेघानें आच्छादित व मेघनिर्मुक्त होऊं लागल्यामुळें पुन्हां पुन्हां आल्हादकारक व आनंदनाशक भासूं लागतो त्याप्रमाणें तिची ती मुद्रा भासूं लागली ) ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

पूर्ण चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती सीता तें बोलणें ऐकून घेऊन धर्म व अर्थ यांना अनुसरून असलेलें भाषण हनुमानाशीं करूं लागली १. ( ती ह्मणाली ) " हे वानरा, रामाचें मन दुसरीकडे नाहीं आणि तो एकसारिखा शोक करीत आहे हें तूं केलेलें भाषण विषमिश्र अमृताप्रमाणें मला भासत आहे २. प्रचंड ऐश्वर्याचे ठिकाणीं अथवा भयंकर संकटाचे ठिकाणीं पुरुषाला दैव जसें कांहीं दोरी बांधून ओढूनच नेत असतें ३. हे वानरश्रेष्ठा, प्राण्यांना खरोखर दैवाचें उल्लंघन करितां येत नाहीं. कारण, सुमित्रापुत्र लक्ष्मण, मी आणि राम हे सर्व पहा कसे संकटांमध्यें सापडलों आहों ४. ज्याची नाव बुडालेली आहे असा पराक्रमी पुरुष सागरामध्यें पोहवां पोहवां ज्याप्रमाणें मोठ्या पराकाष्ठेनें तीराला जाऊन पोंचतो त्याप्रमाणें रघुवंशज राम कसा बरें हा शोकसमुद्र उल्लंघून जाईल ? ५. राक्षसांचा वध करून

लङ्कामुन्मथितां कृत्वा कदा द्रक्ष्यति मां पतिः ६ स वाच्यः संत्वर-
स्वेति यावदेव न पूर्यते । अयं संवत्सरः कालस्तावद्धि मम जीवितम् ७
वर्तते दशमो मासो द्वौ तु शेषौ प्लवंगम । रावणेन नृशंसेन समयो यः
कृतो मम ८ विभीषणेन च भ्रात्रा मम निर्यातनं प्रति । अनुनीतः प्रय-
त्नेन न च तत्कुरुते मतिम् ९ मम प्रतिप्रदानं हि रावणस्य न रोचते ।
रावणं मार्गते सङ्ख्ये मृत्युः कालवशंगतम् १० ज्येष्ठा कन्या कला नाम
विभीषणसुता कपे । तया ममैतदाख्यातं मात्रा प्रहितया स्वयम् ११
अविन्ध्यो नाम मेधावी विद्वान्राक्षसपुङ्गवः । धृतिमाञ्छीलवान्वृद्धो
रावणस्य सुसंमतः १२ रामक्षयमनुप्राप्तं रक्षसां प्रत्यचोदयत् । न च
तस्य स दुष्टात्मा शृणोति वचनं हितम् १३ आशंसेयं हरिश्रेष्ठ क्षिप्रं
मां प्राप्स्यते पतिः । अन्तरात्मा हि मे शुद्धस्तस्मिंश्च बहवो गुणाः १४
उत्साहः पौरुषं सत्त्वमानृशंस्यं कृतज्ञता । विक्रमश्च प्रभावश्च सन्ति

---

रावणाचाही घात करून आणि लंकेचा विध्वंस करून केव्हां बरें भर्ता मला अवलोकन करील ? ६. असो. 'त्वरा कर' ह्मणून तूं त्या भर्त्याला सांग. कारण, जोंपर्यंत ही वर्षाची मुदत संपली नाहीं तोंपर्यंतच माझें जीवित आहे ७. हे वानरा, दुष्ट रावणानें जी मला मुदत दिली आहे तिचा हा दहावा महिना सुरू असून दोनच महिने अवशिष्ट राहिले आहेत ८. भ्रात्या बिभीषणानें मला परत पाठविण्याविषयीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु, त्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्याची त्याला बुद्धि होत नाहीं ९. मला पुनरपि रामाचे स्वाधीन करणें ही गोष्ट रावणाला रुचत नाहीं. कारण, कालाच्या कचाट्यांत सांपडलेल्या त्या रावणाची मृत्यु युद्धामध्यें वाट पहात आहे १०. हे वानरा, बिभीषणाची कला ह्मणून एक ज्येष्ठ कन्या आहे. त्या कन्येला स्वतः तिच्या मातेनें पाठविलें असतां ती मला ह्मणाली ११ "अविंध्य ह्मणून एक मोठा बुद्धिमान् व विद्वान् राक्षस आहे; तो धैर्यवान्, सुशील व वृद्ध असून रावणाला फारच मान्य आहे १२. त्यानें रामाच्या हातून राक्षसांचा लवकरच क्षय होणार आहे असें रावणाला कळविलें; परंतु, तो दुरात्मा त्याच्या हितकारक भाषणाकडे लक्ष्य देत नाहीं १३. तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, लवकरच मला पति प्राप्त करून घेईल अशी मला आशा वाटत आहे. कारण, माझा अंतरात्मा शुद्ध असून ( हा माझा मनोरथ सिद्धीस नेण्याला योग्य असे ) पुष्कळच गुण त्या माझ्या भर्त्याचे ठिकाणीं आहेत १४. हे वानरा, उत्साह, उद्योग, बल, दया, कृतज्ञता, शौर्य आणि प्रभाव हे गुण राघवाच्या ठिकाणीं

वानर राघवे १५ चतुर्दश सहस्राणि राक्षसानां जघान यः। जनस्थाने विना भ्रात्रा शत्रुः कस्तस्य नोद्विजेत् १६ न स शक्यस्तुलयितुं व्यसनैः पुरुषर्षभः। अहं तस्यानुभावज्ञा शक्रस्येव पुलोमजा १७ शरजालांशुमाञ्छूरः कपे रामदिवाकरः। शत्रुरक्षोमयं तोयमुपशोषं नयिष्यति १८ इति संजल्पमानां तां रामार्थे शोककर्शिताम् । अश्रुसंपूर्णवदनामुवाच हनुमान्कपिः १९ श्रुत्वैव च वचो मह्यं क्षिप्रमेष्यति राघवः। चमूं प्रकर्षन्महतीं हर्यृक्षगणसंकुलाम् २० अथवा मोचयिष्यामि त्वामद्यैव स राक्षसात्। अस्माद्दुःखादुपारोह मम पृष्ठमनिन्दिते २१ त्वां तु पृष्ठगतां कृत्वा संतरिष्यामि सागरम्। शक्तिरस्ति हि मे वोढुं लङ्कामपि सरावणाम् २२ अहं प्रस्रवणस्थाय राघवायाद्य मैथिलि। प्रापयिष्यामि शक्राय हव्यं हुतमिवानलः २३ द्रक्ष्यस्यद्यैव वैदेहि राघवं सहलक्ष्मणम्। व्यवसायसमायुक्तं विष्णुं दैत्यवधे यथा २४ त्वद्दर्शनकृतोत्साहमाश्रमस्थं महाबलम्।

---

आहेत १५. अरे! जनस्थानामध्यें चवदा हजार राक्षसांचा आपल्या भ्रात्याचेंही साहाय्य न घेतां ज्यानें वध केला त्याचा कोणता बरें शत्रु गर्भगळित होणार नाहीं? १६. कितीही संकटें आलीं तरी तो पुरुषश्रेष्ठ त्यांना हार जाणें शक्य नाहीं. इंद्राणीला ज्याप्रमाणें इंद्राचा अनुभव आहे त्याप्रमाणें मला त्याचा प्रभाव विदित आहे १७. हे वानरा, शरसमुदायरूप किरणांनीं युक्त असलेला रामरूप शूर सूर्य राक्षसशत्रुरूप उदक शुष्क करून टाकील " १८. ह्याप्रमाणें रामाकरितां उत्पन्न झालेल्या शोकानें जर्जर झालेली ती सीता भाषण करीत असतांना तिचें मुख अश्रूंनीं भरून गेलें व अशा अवस्थेमध्यें हनुमान् वानर तिला ह्मणाला १९ " माझें भाषण श्रवण करितांक्षणीं वानर आणि ऋक्ष ह्यांच्या समुदायांनीं व्याप्त असलेली प्रचंड सेना बरोबर घेऊन तो राघव सत्वर इकडे येईल २०. अथवा राक्षसामुळें प्राप्त झालेल्या ह्या दुःखापासून तो मीच आजच्या आजच तुझी सुटका करून टाकितों. हे निर्दोष सीते, तूं माझ्या पाठीवर बैस २१. तुला पाठुंगळीस घेऊन मी समुद्र तरून जाईन; इतकेंच नव्हे परंतु, रावणासहवर्तमान लंकाही समुद्राच्या पलीकडे घेऊन जाण्याचें माझें सामर्थ्य आहे २२. हे मैथिलि, हवन केलेलें द्रव्य ज्याप्रमाणें अग्नि इंद्राकडे नेऊन पोंचवितो त्याप्रमाणें प्रस्रवणपर्वतावर बसलेल्या राघवाकडे मी आजच तुला नेऊन पोंचवितों २३. हे वैदेहि, दैत्यवधार्थ उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणें रावणाच्या वधाविषयीं उद्युक्त झालेल्या रामाला लक्ष्मणासहवर्तमान तूं आजच अवलोकन करशील २४. सारांश, तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला महाबलाढ्य राम पर्वतराज प्रस्रवणाच्या माथ्यावरील

पुरन्दरमिवासीनं नगराजस्य मूर्धनि २५ पृष्ठमारोह मे देवि मा विकाङ्क्षस्व
शोभने । योगमन्विच्छ रामेण शशाङ्केनेव रोहिणी २६ कथयन्तीव
शशिना संगमिष्यसि रोहिणी । मत्पृष्ठमधिरोह त्वं तराकाशं महार्णवम् २७
न हि मे संप्रयातस्य त्वामितो नयतोऽङ्गने । अनुगन्तुं गतिं शक्ताः सर्वे
लङ्कानिवासिनः २८ यथैवाहमिह प्राप्तस्तथैवाहमसंशयम् । यास्यामि
पश्य वैदेहि त्वामुद्यम्य विहायसम् २९ मैथिली तु हरिश्रेष्ठाच्छ्रुत्वा
वचनमद्भुतम् । हर्षविस्मितसर्वाङ्गी हनूमन्तमथाब्रवीत् ३० हनुमन्दूरम-
ध्वानं कथं मां नेतुमिच्छसि । तदेव खलु ते मन्ये कपित्वं हरि-
यूथप ३१ कथं चाल्पशरीरस्त्वं मामितो नेतुमिच्छसि । सकाशं मानवे-
न्द्रस्य भर्तुर्मे प्लवगर्षभ ३२ सीतायास्तु वचः श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः ।
चिन्तयामास लक्ष्मीवान्नवं परिभवं कृतम् ३३ न मे जानाति सत्त्वं
वा प्रभावं वासितेक्षणा । तस्मात्पश्यतु वैदेही यद्रूपं मम कामतः ३४ इति

---

आश्रमामध्यें इंद्राप्रमाणें बसलेला तूं अवलोकन करशील २५. ह्यास्तव, हे राजपत्नि, तूं माझ्या पाठीवर बैस. हे कल्याणि, मनामध्यें कसलीही शंका आणूं नको. चंद्राशीं समागम पावणाऱ्या रोहिणीप्रमाणें रामाचा समागम करण्याचें तूं आज मनामध्यें आण २६. " रामाची भेट आजच होऊं दे " इतकीं अक्षरें तुझ्या तोंडून निघालीं कीं नाहीं तोंच चंद्राशीं समागम पावणाऱ्या रोहिणीप्रमाणें तुला रामाची भेट होईल. तस्मात् , तूं माझ्या पाठीवर बैस आणि आकाशमार्गाचें अवलंबन करून महासागर तरून जा २७. बाई, तुला घेऊन मी येथून चालतां झालों असतां लंकेमध्यें वास्तव्य करणाऱ्यांपैकीं कोणीही माझ्या मागोमाग येण्यास समर्थ नाहीं २८. हे वैदेहि, पहा तर खरें; जसा मी येथें आलों तसाच तुला घेऊन निःसंशय आकाशमार्गानें परत जाईन " २९. ह्याप्रमाणें वानरश्रेष्ठ हनुमानाच्या मुखांतून अद्भुत भाषण श्रवण केल्यावर मिथिलराजकन्या सीतेच्या सर्व शरीरावर हर्षानें रोमांच उठले आणि ती हनुमानाला ह्मणाली ३० " हे हनुमाना, इतक्या दीर्घ मार्गाचें उल्लंघन करून तूं मला घेऊन जाण्याचें कसें मनामध्यें आणीत आहेस ? हे वानरसेनाधिपते, ही तुझी मला खरोखर माकडचेष्टाच वाटत आहे ३१. अरे, वानरश्रेष्ठा, तुझें शरीर अल्प असतांना माझ्या मानवराज भर्त्याचे समीप तूं मला येथून नेण्याची इच्छा करीत आहेस ( ह्याला काय ह्मणावें ) ? " ३२ सीतेचें हें भाषण श्रवण केल्यानंतर सीतेनें आपला आतां अपमानच केला आहे असें त्या शरीरसंपत्तिमान् वायुपुत्र हनुमानाला वाटूं लागलें ३३ ( आणि तो मनामध्यें ह्मणाला )

संचिन्त्य हनुमांस्तदा प्लवगसत्तमः।दर्शयामास सीताया:स्वरूपमरिमर्दनः ३५
स तस्मात्पादपाद्धीमानाप्लुत्य प्लवगर्षभः। ततो वर्धितुमारेभे सीताप्रत्ययकारणात् ३६ मेरुमन्दरसंकाशो बभौ दीप्तानलप्रभः।अग्रतो व्यवतस्थे च सीताया वानरर्षभः ३७ हरिः पर्वतसंकाशस्ताम्रवक्त्रो महाबलः । वज्रदंष्ट्रनखो भीमो वैदेहीमिदमब्रवीत् ३८ सपर्वतवनोद्देशां साट्टप्राकारतोरणाम् । लङ्कामिमां सनाथां वा नयितुं शक्तिरस्ति मे ३९ तदवस्थाप्यतां बुद्धिरलं देवि विकाङ्क्षया । विशोकं कुरु वैदेहि राघवं सहलक्ष्मणम् ४० तं दृष्ट्वाचलसंकाशमुवाच जनकात्मजा । पद्मपत्रविशालाक्षी मारुतस्यौरसं सुतम् ४१ तव सत्त्वं बलं चैव विजानामि महाकपे । वायोरिव गतिश्चापि तेजश्चाग्नेरिवाद्भुतम् ४२ प्राकृतोन्यः कथं चेमां भूमिमागन्तुमर्हति । उदधेरप्रमेयस्य पारं वानरयूथप ४३ जानामि गमने शक्तिं नयने चापि ते मम । अवश्यं

---

" कृष्णवर्णनेत्रांनीं युक्त असलेल्या विदेहराजकन्या सीतेला माझें बल अथवा प्रभाव विदित नाहीं; तस्मात्, आज एकदां स्वेच्छेप्रमाणें बनणारें माझें रूप तिला अवलोकन करूं देच " ३४ ह्याप्रमाणें विचार करून शत्रुनाशक वानरश्रेष्ठ हनुमानानें सीतेला आपलें स्वरूप दर्शविलें ३५ तात्पर्य, त्या विचारी वानरश्रेष्ठानें त्या वृक्षावरून उडी मारून सीतेला विश्वास येण्याकरितां आपला देह वृद्धिंगत करण्याला आरंभ केला ३६; आणि मेरुमंदरतुल्य शरीर धारण करून प्रदीप्त अग्नीसारिख्या तेजानें व्याप्त झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् सीतेच्या समोर येऊन उभा राहिला ३७. तदनंतर ताम्रवर्ण मुख आणि वज्रतुल्य दंष्ट्रा व नखें ह्यांनीं युक्त असलेला तो महाबलाढ्य भयंकर वानर सीतेला ह्मणाला ३८ " पर्वत, वनप्रदेश, गच्चा, कोट, वेशी आणि अधिपति ह्यांसहवर्तमान ही लंकानगरी घेऊन जाण्याचें मला सामर्थ्य आहे ३९. तस्मात्, हे राजपत्नि, तुला आलेली शंका सोडून देऊन माझ्या सामर्थ्याविषयीं तूं आपल्या मनाचा निश्चय करून ठेव; आणि लक्ष्मणासहवर्तमान राघवाला ( आपल्या दर्शनानें ) तूं आज शोकमुक्त करून टाक " ४०. इतकें झाल्यावर कमलपत्रांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ती जनककन्या सीता वायूच्या त्या पर्वतप्राय औरस पुत्राला ह्मणाली ४१ " हे महाकपे, तुझें धैर्य व बल मी जाणीत असून वायूप्रमाणें असलेली तुझी गति आणि अग्नीप्रमाणें असलेलें तुझें अद्भुत तेजही मला विदित आहे ४२. हे वानरसेनाधिपते, अरे, दुसरा एखादा सामान्य वानर अपार समुद्राचें उल्लंघन करून ह्या भूमीवर येईल कसा ? ४३. येथून परत जाण्याचें आणि मला घेऊन जाण्याचें तुझें सामर्थ्य मी जाणीत आहें;

संप्रधार्याशु कार्यसिद्धिरिवात्मनः ४४ अयुक्तं तु कपिश्रेष्ठ मया गन्तुं त्वया सह । वायुवेगसवेगस्य वेगो मां मोहयेत्तव ४५ अहमाकाशमासक्ता उपर्युपरि सागरम् । प्रपतेयं हि ते पृष्ठाद्भूयो वेगेन गच्छतः ४६ पतिता सागरे चाहं तिमिनक्रझषाकुले । भवेयमाशु विवशा यादसामन्नमुत्तमम् ४७ न च शक्ष्ये त्वया सार्धं गन्तुं शत्रुविनाशन । कलत्रवति संदेहस्त्वयि स्यादप्यसंशयम् ४८ ह्रियमाणं तु मां दृष्ट्वा राक्षसा भीमविक्रमाः । अनुगच्छेयुरादिष्टा रावणेन दुरात्मना ४९ तैस्त्वं परिवृतः शूरैः शूलमुद्गरपाणिभिः । भवेस्त्वं संशयं प्राप्तो मया वीर कलत्रवान् ५० सायुधा बहवो व्योम्नि राक्षसास्त्वं निरायुधः । कथं शक्ष्यसि संयातुं मां चैव परिरक्षितुम् ५१ युद्ध्यमानस्य रक्षोभिस्ततस्तैः क्रूरकर्मभिः । प्रपतेयं हि ते पृष्ठाद्भयार्ता कपिसत्तम ५२ अथ रक्षांसि भीमानि महान्ति बलवन्ति च । कथंचित्सांपराये त्वां जयेयुः कपिसत्तम ५३ अथवा युद्ध्यमानस्य पतेयं विमुखस्य ते । पतितां च गृहीत्वा मां नयेयुः पापराक्षसाः ५४

परंतु, तूं ज्याप्रमाणें आपल्या कार्यसिद्धीचा सत्वर विचार केला आहेस त्याप्रमाणें मलाही स्वतःसंबंधानें अवश्य विचार केला पाहिजे ४४. सारांश, हे वानरश्रेष्ठा, तुझ्याबरोबर मला जाणें योग्य नाहीं. वायूप्रमाणें तुझा वेग असल्यामुळें तो मला मूर्छा आणील ४५; आकाशामध्यें मी अगदीं उंच उंच गेलें ह्मणजे वेगावेगानें जाणाऱ्या तुझ्या पाठीवरून समुद्रांत पडेन ४६ आणि तिमि, नक्र व मत्स्य ह्यांनीं व्याप्त झालेल्या सागरामध्यें मी निश्चेष्ट पडलें असतां जलचर प्राण्यांचें उत्कृष्ठ अन्न सत्वर होऊन जाईन ४७. शिवाय, हे शत्रुनाशका, तुझ्याबरोबर मला जातांही येणार नाहीं; कारण, स्त्रीसहवर्तमान तूं जाऊं लागलास ह्मणजे इतरांना खचित संशय येईल ४८. तूं मला घेऊन जात आहेस असें दृष्टीं पडल्यावर दुरात्म्या रावणानें पाठविलेले भयंकर पराक्रमी राक्षस मागोमाग येतील ४९; हातामध्यें शूल व मुद्गर घेऊन ते शूर तुला वेढून टाकितील आणि, हे वीरा, माझ्यामुळें तुझ्यावर आणि माझ्यावरही प्राणांत संकट येईल ५०. आयुधें बरोबर घेतलेले असे राक्षस पुष्कळ येतील आणि तुझ्यापाशीं तर आयुध मुळींच नाहीं. तऱ्हां आकाशामध्यें त्यांना तोंड देण्यास आणि माझें रक्षण करण्यास तूं कसा समर्थ होशील ? ५१. हे वानरश्रेष्ठा, त्या क्रूरकर्मी राक्षसांसहवर्तमान तुझें युद्ध होऊं लागलें ह्मणजे मी भयभीत होऊन तुझ्या पाठीवरून खालीं पडेन ५२. अथवा प्रचंड, बलाढ्य व भयंकर राक्षस, हे वानरश्रेष्ठा, युद्धामध्यें कसा तरी तुझा पराभव करितील ५३; किंवा युद्ध करितां

मां वा हरेयुस्त्वद्धस्ताद्विशसेयुरथापि वा । अनवस्थौ हि दृश्येते युद्धे
जयपराजयौ ५५ अहं वापि विपद्येयं रक्षोभिरभितर्जिता । त्वत्प्रयत्नो
हरिश्रेष्ठ भवेन्निष्फल एव तु ५६ कामं त्वमपि पर्याप्तो निहन्तुं सर्वराक्ष-
सान् । राघवस्य यशो हीयेत्त्वया शस्तैस्तु राक्षसैः ५७ अथवादाय
रक्षांसि न्यसेयुः संवृते हि माम् । यत्र ते नाभिजानीयुर्हरयो नापि
राघवः ५८ आरम्भस्तु मदर्थोयं ततस्तव निरर्थकः । त्वया हि सह रामस्य
महानागमने गुणः ५९ मयि जीवितमायत्तं राघवस्यामितौजसः । भ्रातॄणां
च महाबाहो तव राजकुलस्य च ६० तौ निराशौ मदर्थं च शोकसंता-
पकर्शितौ । सह सर्वर्क्षहरिभिस्त्यक्ष्यतः प्राणसंग्रहम् ६१ भर्तुर्भक्तिं पुर-
स्कृत्य रामादन्यस्य वानर । नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरो-
त्तम ६२ यदहं गात्रसंस्पर्शं रावणस्य गता बलात् । अनीशा किं करि-
ष्यामि विनाथा विवशा सती ६३ यदि रामो दशग्रीवमिह हत्वा

करितां तू पराङ्मुख झालास ह्मणजे मी खालीं पडेन आणि खालीं पडलेल्या मला ते दुष्ट राक्षस घेऊन जातील ५४. सारांश, राक्षस तुझ्या हातून मला ओढून तरी नेतील किंवा तेथल्या तेथेंच मला फाडून टाकितील. कारण, युद्धामध्यें जय किंवा पराजय खात्रीनेंच होईल असें सांगतां येत नाहीं ५५. राक्षसांनीं सर्व प्रकारें मला धमकी दिली असतां मीही मरून जाईन आणि, हे वानरश्रेष्ठा, असें झालें ह्मणजे तुझा प्रयत्न निष्फळच होइल ५६. सर्व राक्षसांचा वध करण्यास खरोखर तूंही समर्थ आहेस; परंतु, तूं राक्षसांचा वध केलास तर रामाचा नांवलौकिक जाईल ५७. अथवा त्या वानरांना आणि रामालाही विदित नाहीं अशा एखाद्या गुप्त ठिकाणीं राक्षस मला नेऊन ठेवितील ५८. असें झालें ह्मणजे माझ्याकरितां झालेला हा तुझा खटाटोप व्यर्थ जाईल. तुझ्यासहवर्तमान रामाच्या येण्यांत मोठा लाभ आहे ५९. हे महापरा-क्रमी हनुमाना, अमित तेजस्वी राम, त्याचे भ्राते, तूं आणि राजकुल ह्या सर्वांचें जीवित माझ्यावर अवलंबून आहे ६०. तस्मात्, माझ्याकारितां शोक व संताप ह्यांनीं कृश झालेले ते रामलक्ष्मण माझ्या प्राप्तीविषयीं निराश झाले असतां सर्व ऋक्ष आणि वानर ह्यांसह-वर्तमान प्राणत्याग करितील ६१. हे वानरा, हे वानरश्रेष्ठा, भर्त्याचे ठिकाणीं अतिशयच भक्ति असल्यामुळें त्या रामावांचून दुसऱ्या कोणाच्याही शरीराला आपण होऊन स्पर्श करण्याची माझी इच्छा नाहीं ६२. रावणाच्या शरीराचा स्पर्श मला झाला आहे; परंतु, तो माझ्या इच्छेविरुद्ध झाला आहे. मी अनाथ, स्वतः असमर्थ आणि पराधीन असल्यामुळें करणार काय ? ६३. सारांश, राम राक्षसांसहवर्तमान रावणाचा जर येथें

सराक्षसम् । मामितो गृह्य गच्छेत तत्तस्य सदृशं भवेत् ६४ श्रुताश्च
दृष्टा हि मया पराक्रमा महात्मनस्तस्य रणावमर्दिनः । न देवगन्धर्व-
भुजङ्गराक्षसा भवन्ति रामेण समा हि संयुगे ६५ समीक्ष्य तं संयति
चित्रकार्मुकं महाबलं वासवतुल्यविक्रमम् । सलक्ष्मणं को विषहेत राघवं
हुताशनं दीप्तमिवानिलेरितम् ६६ सलक्ष्मणं राघवमाजिमर्दनं दिशागजं
मत्तमिव व्यवस्थितम् । सहेत को वानरमुख्य संयुगे युगान्तसूर्यप्रतिमं
शरार्चिषम् ६७ स मे कपिश्रेष्ठसलक्ष्मणं प्रियं सयूथपं क्षिप्रमिहोपपा-
दय । चिराय रामं प्रति शोककर्शितां कुरुष्व मां वानरवीर हर्षिताम् ६८
[ १६१४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे
सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

ततः स कपिशार्दूलस्तेन वाक्येन तोषितः । सीतामुवाच तच्छ्रुत्वा
वाक्यं वाक्यविशारदः १ युक्तरूपं त्वया देवि भाषितं शुभदर्शने ।
सदृशं स्त्रीस्वभावस्य साध्वीनां विनयस्य च २ स्त्रीत्वान्न त्वं समर्थासि

---

वध करील आणि येथून मला घेऊन जाईल तर तें त्याला शोभण्यासारखें होईल ६४. रणामध्यें शत्रूंचें मर्दन करणाऱ्या त्या महात्म्या रामाचे पराक्रम मीं ऐकिले आहेत व प्रत्यक्ष पाहिलेही आहेत. त्यावरून देव, गंधर्व, भुजंग आणि राक्षस ह्यांपैकीं कोणाऱ्यानेंही युद्धामध्यें रामाची बरोबरी होणार नाहीं ( अशी माझी खात्री आहे ) ६५. अद्भुत धनुष्य ज्यानें हातांत घेतलें आहे असा तो इंद्रतुल्य पराक्रमी महाबलाढ्य राम लक्ष्मणासहवर्तमान वायूनें प्रोत्साहन दिलेल्या प्रदीप्त अग्निप्रमाणें युद्धामध्यें उभा राहिलेला अवलोकन केल्यावर त्याच्याशीं संग्राम करण्यास कोण बरें समर्थ होणार आहे ? ६६. हे वानरश्रेष्ठा, संग्रामामध्यें शत्रूंचा धुव्वा उडवून देणारा, मत्त गजाप्रमाणें अचल रहाणारा आणि बाणरूप किरणांनीं युक्त झाल्यामुळें प्रलयकालच्या सूर्यासारिखा दिसणारा जो राम त्याला युद्धामध्यें कोण बरें सहन करील? ६७. हे वानरश्रेष्ठा, तो तूं त्या माझ्या प्रियाला लक्ष्मण आणि वानरसेनाधिपति सुग्रीव ह्यांसहवर्तमान सत्वर इकडेच घेऊन ये आणि, हे वानरवीरा, पुष्कळ दिवसपर्यंत रामाकरितां शोक करून कृश झालेल्या मला तूं हर्षयुक्त कर " ६८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

तदनंतर तो संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला वानरश्रेष्ठ हनुमान् सीतेच्या त्या भाषणानें संतुष्ट झाला आणि तिचें भाषण श्रवण करून तिला ह्मणाला १ " हे देवि, हे शुभदर्शने, तूं हें योग्य भाषण केलेंस. हें स्त्रीस्वभावाला आणि पतिव्रतांच्या

सागरं व्यतिवर्तितुम् । मामधिष्ठाय विस्तीर्णं शतयोजनमायतम् ३
द्वितीयं कारणं यच्च ब्रवीषि विनयान्विते । रामादन्यस्य नार्हामि
संसर्गमिति जानकि ४ एतत्ते देवि सदृशं पत्न्यास्तस्य महात्मनः ।
का ह्यन्या त्वामृते देवि ब्रूयाद्वचनमीदृशम् ५ श्रोष्यते चैव काकुत्स्थः
सर्वं निरवशेषतः । चेष्टितं यत्त्वया देवि भाषितं च ममाग्रतः ६ कारणैर्ब-
हुभिर्देवि रामप्रियचिकीर्षया । स्नेहप्रस्कन्नमनसा मयैतत्समुदीरितम् ७
लङ्काया दुष्प्रवेशत्वाद्दुस्तरत्वान्महोदधेः । सामर्थ्यादात्मनश्चैव मयैतत्समु-
दीरितम् ८ इच्छामि त्वां समानेतुमद्यैव रघुनन्दिना । गुरुस्नेहेन भक्त्या
च नान्यथा तदुदाहृतम् ९ यदि नोत्सहसे यातुं मया सार्धमनिन्दिते ।
अभिज्ञानं प्रयच्छ त्वं जानीयाद्राघवो हि यत् १० एवमुक्ता हनुमता
सीता सुरसुतोपमा । उवाच वचनं मन्दं बाष्पप्रग्रथिताक्षरम् ११
इदं श्रेष्ठमभिज्ञानं ब्रूयास्त्वं तु मम प्रियम् । शैलस्य चित्रकूटस्य पादे

---

विनयाला शोभणारेंच आहे २. तूं स्त्री असल्यामुळें माझ्या पाठंगळीस बसून शंभर योजनें विस्तीर्ण असा विशाल समुद्र उल्लंघन करून जाण्यास समर्थ नाहींस ३. हे विनयसंपन्न जनककन्ये सीते, रामाशिवाय दुसऱ्याच्या शरीराला मी स्पर्श करणार नाहीं हें जें तूं दुसरें कारण सांगत आहेस ४ तेंही, हे देवि, त्या महात्म्याच्या तुज पत्नीलाच शोभण्यासारिखें आहे. हे देवि, तुझ्याशिवाय दुसरी कोणती बरें स्त्री (दुर्धर प्रसंग येऊन ठेपला असतांही ) अशा प्रकारचें भाषण करण्यास तयार होईल? ५. हे देवि, तूं जी वागणूक केलीस आणि माझ्यासमक्ष जें भाषण केलेंस तें सर्व अगदीं कांहींएक शिलक न राहतां ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या कानावर जाईल ६. रामाचें प्रिय करण्याची इच्छा, प्रेमामुळें अंतःकरणामध्यें उत्पन्न झालेला द्रव वगैरे अनेक कारणें झाल्यामुळें मीं असें भाषण केलें ७. शिवाय महासागर दुस्तर असल्याकारणानें रामादिकांचा लंकेमध्यें प्रवेश होणें दुर्घट असल्यामुळें आणि (तुला घेऊन जाण्याचें )माझ्या अंगीं सामर्थ्य असल्यामुळें मीं असें बोललों ८. आतां रघुवंशजांना आनंद देणाऱ्या रामाला आजच्या आजच येथें तुझ्याकडे आणावें अशी माझी इच्छा आहे. अतिशय प्रेमानें व भक्तीनें जें तुझ्या मुखांतून निघालें आहे तें खोटें होणार नाहीं ९. हे निर्दोष सीते, माझ्याबरोबर येण्याची जर तुझी इच्छा नसेल तर रामाला ओळखतां येईल अशी कांहीं तरी खूण तूं माझ्या-पाशीं दे" १०. ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां देवकन्येसारिखी असलेली ती सीता अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अस्पष्ट शब्द उच्चारीत उच्चारीत हळूंहळूं हनुमानाला ह्मणाली ११ "चित्रकूटपर्वताच्या पायथ्याशीं ईशान्येच्या

पूर्वोत्तरे पदे १२ तापसाश्रमवासिन्याः प्राज्यमूलफलोदके । तस्मिन्सिद्धाश्रिते देशे मन्दाकिन्यविदूरतः १३ तस्योपवनखण्डेषु नानापुष्पसुगन्धिषु । विहृत्य सलिले क्लिन्नो ममाङ्के समुपाविशः १४ ततो मां स समायुक्तो वायसः पर्यतुण्डयत् । तमहं लोष्टमुद्यम्य वारयामि स्म वायसम् १५ दारयन्स च मां काकस्तत्रैव परिलीयते । न चाप्युपारमन्मांसाद्भक्षार्थी बलिभोजनः १६ उत्कर्षन्त्यां च रशनां क्रुद्धायां मयि पक्षिणे । स्रंसमाने च वसने ततो दृष्टा त्वया ह्यहम् १७ त्वया विहसिता चाहं क्रुद्धा संलज्जिता तदा । भक्ष्यगृद्धेन काकेन दारिता त्वामुपागता १८ ततः श्रान्ताहमुत्सङ्गमासीनस्य तवाविशम् । क्रुध्यन्तीव प्रहृष्टेन त्वयाहं परिसान्त्विता १९ बाष्पपूर्णमुखी मन्दं चक्षुषी परिमार्जती । लक्षिताहं त्वया नाथ वायसेन प्रकोपिता २० परिश्रमाच्च सुप्ताहं राघवाङ्केऽस्म्यहं चिरम् । पर्यायेण प्रसुप्तश्च ममाङ्के भरताग्रजः २१

---

बाजूला तापसाश्रमामध्यें वास्तव्य करीत असतांना जी गोष्ट घडून आली तीच श्रेष्ठ खूण ह्मणून तूं माझ्या प्रियाला कथन कर. ( तूं त्याला माझा निरोप असा सांग कीं, हे रामा*) मंदाकिनीच्या समीपच सिद्धांनीं वास्तव्य केलेल्या त्या प्रदेशांतील १२, १३ नानाप्रकारच्या पुष्पांनीं सुगंधयुक्त झालेल्या उपवनांतून विहार करून तूं उदकानें आर्द्र झाल्यावर एकदां माझ्या अंकावर टेकून बसला होतास १४. तदनंतर तेथें आलेला तो काकपक्षी चोंचीनें मला टोचूं लागला तेव्हां मी मातीचे डिखूळ उगारून त्याला हाकूं लागलें १५; परंतु, तो काकपक्षी मला ओरखडीत ओरखडीत तेथेंच घोंटाळूं लागला. त्याला कांहीं तरी भक्ष्य हवें असल्यामुळें माझ्या वक्षस्थलांतील मांस काढतांना तो बलिभक्षक काकपक्षी थांबेना १६. तेव्हां मी त्या *पक्ष्यावर क्रुद्ध होऊन कमरपट्टा वर० सारूं लागलें असतां माझें नेसण सुटूं लागलें आणि अशा वेळीं तुझी माझ्याकडे दृष्टि गेली १७. तेव्हां तूं मला हंसलास; परंतु, क्रुद्ध आणि भक्ष्यलोलुप काकपक्ष्यानें ओरखडल्यामुळें अतिशय लज्जित झालेली मी तुझ्याजवळ आलें १८. तदनंतर तूं तेथें बसला असतांना मी श्रमलें असल्यामुळें तुझ्या अंकावर बसलें. मला तर राग आल्यासारिखा झाला होता; परंतु, तूं हंसत हंसत माझें सांत्वन केलेंस १९. काकपक्ष्यानें क्षुब्ध करून टाकिल्यामुळें माझें मुख अश्रूंनीं भरून गेलें असतांना आणि हळूं हळूं मी आपले डोळे पुसत असतांना, हे नाथ, तूं मला अवलोकन केलेंस २०. हे राघवा, हे भरताग्रजा रामा, श्रमल्यामुळें पाळीपाळीनें आपल्या अंकावर मी व माझ्या अंकावर आपण ह्या रीतीनें एकमेकांच्या अंकावर

स तत्र पुनरेवाथ वायसः समुपागमत्। ततः सुप्तप्रबुद्धां मां राघवाङ्का-
त्समुत्थिताम् ॥ वायसः सहसागम्य विरराद स्तनान्तरे २२ पुनः पुनर-
थोत्पत्य विरराद स मां भृशम्। ततः समुत्थितो रामो मुक्तैः शोणितबि-
न्दुभिः २३ स मां दृष्ट्वा महाबाहुर्वितुन्नां स्तनयोस्तदा। आशीविष इव
क्रुद्धः श्वसन्वाक्यमभाषत २४ केन ते नागनासोरु विक्षतं वै स्तनान्तरम्।
कः क्रीडति सरोषेण पञ्चवक्त्रेण भोगिना २५ वीक्षमाणस्ततस्तं वै वायसं
समवैक्षत। नखैः सरुधिरैस्तीक्ष्णैर्मामेवाभिमुखं स्थितम् २६ पुत्रः किल स
शक्रस्य वायसः पततां वरः। धरान्तरं गतः शीघ्रं पवनस्य गतौ समः २७
ततस्तस्मिन्महाबाहुः कोपसंवर्तितेक्षणः। वायसे कृतवान्क्रूरां मतिं मति-
मतांवरः २८ स दर्भसंस्तराद्गृह्य ब्राह्मणोस्त्रेण योजयत्। स दीप्त इव काला-
ग्निर्जज्वालाभिमुखो द्विजम् २९ स तं प्रदीप्तं चिक्षेप दर्भं तं वायसं प्रति।
ततस्तु वायसं दर्भः सोम्बरेनुजगाम ह ३० अनुसृष्टस्तदा काको जगाम

---

आपण पुष्कळ वेळ पडलों २१. परंतु, पुनरपि तो काकपक्षी तेथें आला आणि मी झोपेंतून जागी होऊन रामाच्या मांडीवरून उठून बसलें असतां एकाएकीं माझ्याकडे येऊन त्यानें माझें वक्षस्थल ओरखडलें २२. अशा रीतीनें वारंवार तो पक्षी उडून जाई आणि वारंवार माझें वक्षस्थल ओरखडून टाकी. तदनंतर रक्ताचे थेंब अंगावर पडल्यामुळें राम जागा झाला २३ आणि स्तनांचे मध्यभागीं ओरखडलेल्या मला अवलोकन करितांक्षणीं सर्पाप्रमाणें क्रुद्ध होऊन सुस्कारे टाकूं लागलेला तो महापराक्रमी राम मला ह्मणाला २४ " हे गजशुंडेसारिख्या चरणांनीं युक्त असलेले सीते, तुझ्या स्तनांमध्यें कोणी ओरखडले ? पंचमुखी क्रुद्ध नागासहवर्तमान कोण बरें क्रीडा करीत आहे ? " २५. असें मला विचारीत आहे तोंच ज्याचीं तीक्ष्ण नखें रक्तांनीं भरलेलीं आहेत असा तो माझ्यासमोरच बसलेला काकपक्षी, राम इकडे तिकडे पाहूं लागला असतां, त्याच्या दृष्टोत्पत्तीस आला २६. खरोखर पक्ष्यांमध्यें वस्ताद असलेला तो काकपक्षी इंद्राचा पुत्र होता आणि वायूसारिख्या गतीनें युक्त असलेला तो पक्षी रामाला अवलोकन करितांक्षणीं भूमीच्या बिळामध्यें सत्वर प्रविष्ट झाला २७. तदनंतर महापराक्रमी रामाचे नेत्र कोपानें चढून गेले आणि, बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाच्या मनांत त्या काकपक्ष्याविषयीं क्रूर विचार आला २८. तेव्हां दर्भास्तरणापैकीं एक दर्भ घेऊन रामानें त्याचें ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण केलें असतां तो प्रदीप्त झालेल्या कालाग्नीप्रमाणें त्या पक्ष्याचे संमुख प्रज्वलित होऊं लागला २९. तदनंतर त्या काकपक्ष्यावर तो प्रदीप्त दर्भ रामानें सोडिला असतां भूमीच्या बिळांतून

विविधां गतिम् । त्राणकाम इमं लोकं सर्वं वै विचचार ह ३१ स पित्रा च परित्यक्तः सर्वैश्च परमर्षिभिः । त्रीँल्लोकान्संपरिक्रम्य तमेव शरणं गतः ३२ स तं निपतितं भूमौ शरण्यः शरणागतम् । वधार्हमपि काकुत्स्थः कृपया पर्यपालयत् ३३ परिद्यूनं विवर्णं च पतमानं तमब्रवीत् । मोघमस्त्रं न शक्यं तु ब्राह्मं कर्तुं तदुच्यताम् ३४ ततस्तस्याक्षि काकस्य हिनस्ति स्म स दक्षिणम् । दत्त्वा तु दक्षिणं नेत्रं प्राणेभ्यः परिरक्षितः ३५ स रामाय नमस्कृत्वा राज्ञे दशरथाय च । विसृष्टस्तेन वीरेण प्रतिपेदे स्वमालयम् ३६ मत्कृते काकमात्रेपि ब्रह्मास्त्रं समुदीरितम् । कस्माद्यो माहरत्त्वत्तः क्षमसे तं महीपते ३७ स कुरुष्व महोत्साहां कृपां मयि नरर्षभ । त्वया नाथवती नाथ अनाथा इव दृश्यते ३८ आनृशंस्यं परो धर्मस्त्वत्त एव मया श्रुतम् । जानामि त्वां

---

निघून आकाशामध्यें उड्डाण केलेल्या काकपक्ष्याच्या मागोमाग तो दर्भही चालला ३०. ह्याप्रमाणें दर्भ मागें लागला असतां नानाप्रकारच्या गतीचें अवलंबन करून तो पक्षी उडूं लागला आणि आपलें रक्षण व्हावें एतदर्थ ह्या सर्व जगतामध्यें तो हिंडला ३१; परंतु, पित्यानें आणि त्याचप्रमाणें सर्व महर्षींनींही जेव्हां त्याचा त्याग केला तेव्हां त्रैलोक्य हिंडून शेवटीं तो त्या रामालाच शरण गेला ३२. तेव्हां शरण येऊन भूमीवर पडलेला तो काकपक्षी कृतीनें जरी वधासच पात्र होता तरी शरणागताचें रक्षण करणाऱ्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें दयेमुळें त्याचें रक्षण केलें ३३. सारांश, शक्तिपात होऊन निस्तेज झालेल्या आणि उड्डाण करितां करितांही खालीं पडूं लागलेल्या त्या काकपक्ष्याला तो ह्मणाला "हें ब्रह्मास्त्र व्यर्थ होणें शक्य नाहीं. तेव्हां ह्या अस्त्रापासून कोणत्या वस्तूचा नाश व्हावा हें तूं मला कथन कर" ३४. असें रामानें विचारिल्यानंतर ठरल्याप्रमाणें त्या काकपक्ष्याचा उजवा नेत्र त्या रामानें नाहींसा केला आणि ह्याप्रमाणें उजवा नेत्र देऊन काकपक्ष्यानें आपल्या प्राणांचें रक्षण केलें ३५. तदनंतर त्या वीर रामानें जाण्याची अनुज्ञा दिली असतां तो इंद्रपुत्र जयंत रामाला आणि दशरथराजाला नमस्कार करून स्वस्थानीं परत गेला ३६. (हे हनुमाना, तस्मात्, तूं माझा असा निरोप रामाला कळीव कीं,) हे भूपते, माझ्याकरितां यःकश्चित् काकपक्ष्यावर सुद्धां जर तूं ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला होतास तर ज्यानें तुझ्यापासून मला हरण करून नेलें त्याची तूं कशाकरितां क्षमा करीत आहेस ? ३७. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठा, जिच्या योगानें मला मोठा आनंद होणार आहे अशी कृपा तूं माझ्यावर कर. हे नाथ, तुझ्यामुळें मी खरोखर सनाथ असतांनाही

महावीर्यं महोत्साहं महाबलम् ३९ अपारवारमक्षोभ्यं गाम्भीर्यात्साग-
रोपमम् । भर्तारं स समुद्राय धरण्या वासवोपमम् ४० एवमस्त्र-
विदां श्रेष्ठो बलवान्सत्त्ववानपि । किमर्थमस्त्रं रक्षःसु न योजयसि
राघव ४१ न नागा नापि गन्धर्वा न सुरा न मरुद्गणाः । रामस्य समरे
वेगं शक्ताः प्रतिसमीहितुम् ४२ तस्य वीर्यवतः कच्चिद्यद्यस्ति मयि
संभ्रमः । किमर्थं न शरैस्तीक्ष्णैः क्षयं नयति राक्षसान् ४३ भ्रातुरादेश-
मादाय लक्ष्मणो वा परंतपः । कस्य हेतोर्न मां वीरः परित्राति महा-
बलः ४४ यदि तौ पुरुषव्याघ्रौ वाय्विन्द्रसमतेजसौ । सुराणामपि
दुर्धर्षौ किमर्थं मामुपेक्षतः ४५ ममैव दुष्कृतं किंचिन्महदस्ति न
संशयः । समर्थावपि तौ यन्मां नावेक्षेते परंतपौ ४६ वैदेह्या वचनं
श्रुत्वा करुणं साश्रुभाषितम् । अथाब्रवीन्महातेजा हनूमान्हारियूथपः ४७
त्वच्छोकविमुखो रामो देवि सत्येन ते शपे । रामे दुःखाभिपन्ने तु

---

आज अनाथाप्रमाणें झालें आहें ३८ अरे, दया हाच श्रेष्ठधर्म ह्मणून तुझ्या मुखांतूनच मीं ऐकिलें आहे; आणि तूं महावीर्यवान्, मोठा उत्साही, महाबलाढ्य, आदिअंत न लागणारा, मनामध्यें न कचरणारा व गांभीर्यामुळें साग-राची बरोबरी करणारा असा समुद्रवलयांकित पृथ्वीचा इंद्रतुल्य भर्ता असल्याचें मी जाणीत आहें ३९,४०. परंतु, हे राघवा, ह्याप्रमाणें तूं अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, बलाढ्य व धैर्यवान् असतांनाही राक्षसांवर अस्त्रप्रयोग कशाकरितां करीत नाहींस ? ४१. नाग, गंधर्व, देव आणि मरुद्गण ह्यांपैकीं कोणीही प्रतिपक्षी ह्या नात्यानें रामाशीं संग्रामा-मध्यें युद्ध करण्यास आणि त्याचा वेग सहन करण्यास समर्थ नाहींत ४२. त्या वीर्य-वान् रामाला माझ्यासंबंधानें जर कांहीं क्षोभ उत्पन्न झाला असेल तर तीक्ष्ण बाणांनीं तो राक्षसाचा नाश कां करून टाकीत नाहीं ? ४३. किंवा भ्रात्याची अनुज्ञा घेऊन तो महाबलाढ्य शत्रुतापन वीर लक्ष्मण तरी कशाकरितां माझें रक्षण करीत नाहीं ? ४४. वायु आणि इंद्र ह्यांसारिखे तेजस्वी व देवां-नाही अजिंक्य असे ते उभयतां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण कशाकरितां माझी उपेक्षा करीत आहेत ? ४५ ज्याअर्थी ते शत्रुतापन रामलक्ष्मण समर्थ असूनही माझी परवा बाळगीत नाहींत त्याअर्थी माझ्या हातूनच कांहीं तरी मोठें पातक घडलें आहे ह्यांत संशय नाहीं " ४६. अश्रु ढाळीत ढाळीत करुण स्वरानें सीतेनें केलेलें हें भाषण श्रवण करून वानरसेनाधिपति महातेजस्वी हनुमान् तिला ह्मणाला ४७ " हे देवि, रामाला तुझ्या शोकामुळें अगदीं कांहीं एक सुचेनासें झालें आहे; आणि राम दुःखित झाल्यामुळें

लक्ष्मणः परितप्यते ४८ कथंचिद्भवती दृष्टा न कालः परिशोचितुम्। इमं मुहूर्तं दुःखानामन्तं द्रक्ष्यसि शोभने ४९ तावुभौ पुरुषव्याघ्रौ राजपुत्रौ महाबलौ। त्वद्दर्शनकृतोत्साहौ लोकान्भस्मीकरिष्यतः ५० हत्वा च समरक्रूरं रावणं सहबान्धवम्। राघवस्त्वां विशालाक्षि स्वां पुरीं प्रति नेष्यति ५१ ब्रूहि यद्राघवो वाच्यो लक्ष्मणश्च महाबलः। सुग्रीवो वापि तेजस्वी हरयो वा समागताः ५२ इत्युक्तवति तस्मिंश्च सीता पुनरथाब्रवीत्। कौसल्या लोकभर्तारं सुषुवे यं मनस्विनी ५३ तं ममार्थे सुखं पृच्छ शिरसा चाभिवादय। स्रजश्च सर्वरत्नानि प्रिया याश्च वराङ्गनाः ५४ ऐश्वर्यं च विशालायां पृथिव्यामपि दुर्लभम्। पितरं मातरं चैव संमान्याभिप्रसाद्य च ५५ अनुप्रव्रजितो रामं सुमित्रा येन सुप्रजाः। आनुकूल्येन धर्मात्मा त्यक्त्वा सुखमनुत्तमम् ५६ अनुगच्छति काकुत्स्थं भ्रातरं पालयन्वने। सिंहस्कन्धो महाबाहुर्मनस्वी प्रियदर्शनः ५७ पितृवद्वर्तते रामे मातृवन्मां समाचरत्। ह्रियमाणां तदा वीरो न तु मां वेद

---

लक्ष्मणही अतिशय चिंताग्रस्त झाला आहे हें मी तुला शपथपूर्वक खरें सांगतों ४८. आतां कशी तरी तूं दृष्टीं पडली आहेस, तेव्हां ह्या क्षणापासून शोक करण्याची वेळ राहिली नाहीं. कारण, हे कल्याणि, तूं आतां दुःखांचा नाश झालेला अवलोकन करिशील ४९. ते उभयतांही तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक असलेले महाबलाढ्य पुरुषश्रेष्ठ राजपुत्र ( तुझ्याकरितां) त्रैलोक्याचेंही भस्म करून टाकितील ५०. हे विशालनयने सीते, संग्रामामध्यें क्रूर कर्म करणाऱ्या त्या रावणाचा बांधवांसहवर्तमान वध करून राम तुला अयोध्यानगरीमध्यें घेऊन जाईल ५१. तेव्हां रामाला काय निरोप सांगावयाचा आहे? महाबलाढ्य लक्ष्मणाला काय विदित करावयाचें आहे? आणि तेजस्वी सुग्रीवाला अथवा तेथें जुळलेल्या वानरांना काय कळवावयाचें आहे? तें मला सांग" ५२. ह्याप्रमाणें त्या हनुमानानें भाषण केलें असता सीता पुनरपि त्याला ह्मणाली, "ज्या लोकनायकाला विचारी कौसल्या प्रसवली ५३ त्याला तूं माझ्याकरितां मस्तकानें प्रणाम करून कुशलप्रश्न कर. माला, सर्व प्रकारचीं रत्नें, प्रिय स्त्रिया ५४ आणि संपूर्ण पृथ्वीमध्येंही दुर्लभ ऐश्वर्य ह्यांचा त्याग करून व मातापितरांना संमानपूर्वक प्रसन्न करून घेऊन ५५ जो रामाचे मागोमाग चालता झाला, ज्याच्या योगानें सुमित्रा सुपुत्रवती झाली, जो धर्मात्मा अनुपम सुखाचा त्याग करून व अनुकूल वर्तन ठेवून ५६ वनामध्यें भ्रात्या रामाचें रक्षण करण्याकरितां त्याच्या मागोमाग जात आहे. सिंहासारिखे स्कंध, आजानुबाहु आणि आल्हादकारक मुद्रा यांनीं युक्त असलेला जो विचारी ५७ रामाशीं पित्याप्रमाणें वागत

लक्ष्मणः ५८ वृद्धोपसेवी लक्ष्मीवाञ्शक्तो न बहुभाषिता । राजपुत्रप्रियश्रेष्ठः सदृशः श्वशुरस्य मे ५९ मत्तः प्रियतरो नित्यं भ्राता रामस्य लक्ष्मणः । न युक्तो धुरि यस्यां तु तामुद्वहति वीर्यवान् ६० यं दृष्ट्वा राघवो नैव वृत्तमार्यमनुस्मरत् । स ममार्थाय कुशलं वक्तव्यो वचनान्मम ६१ मृदुर्नित्यं शुचिर्दक्षः प्रियो रामस्य लक्ष्मणः । यथा हि वानरश्रेष्ठ दुःखक्षयकरो भवत् ६२ त्वमस्मिन्कार्यनिर्वाहे प्रमाणं हरियूथप । राघवस्त्वत्समारम्भान्मयि यत्नपरो भवत् ६३ इदं ब्रूयाश्च मे नाथं शूरं रामं पुनः पुनः । जीवितं धारयिष्यामि मासं दशरथात्मज ६४ ऊर्ध्वं मासान्न जीवेयं सत्येनाहं ब्रवीमि ते । रावणेनोपरुद्धां मां निकृत्या पापकर्मणा । त्रातुमर्हसि वीर त्वं पातालादिव कौशिकीम् ६५ ततो वस्त्रगतं मुक्त्वा दिव्यं चूडामणिं शुभम् । प्रदेयो राघवायेति सीता हनुमते ददौ ६६ प्रतिगृह्य ततो वीरो मणिरत्नमनुत्तमम् । अङ्गुल्या योज-

---

आहे आणि मातप्रमाणें जो माझ्याशीं वागला, त्या वीर लक्ष्मणाला रावण मला घेऊन जात असतांना समजलें नाहीं ५८. जो वृद्धांचा समागम करणारा आहे, वैभवशाली व समर्थ असून जो मित भाषण करणारा आहे, राजपुत्र रामाला जो अति प्रिय आहे, माझ्या सासऱ्यासारखी ज्याची वागणूक आहे ५९, लक्ष्मण हें ज्याचें नांव असून रामाला जो माझ्यापेक्षांही नेहमींच अधिक प्रिय आहे, आजपर्यंत जें कार्य करण्याचा प्रसंग पडला नाहीं तें कार्यहो जो वीर्यवान् असल्यामुळें पार पाडीत आहे ६० आणि ज्याच्याकडे पाहून रामाला आपल्या निवृत्त झालेल्या पित्याचें स्मरण होईनासें झालें आहे, त्याला तूं माझ्याकरितां माझ्या सांगण्यावरून कुशलप्रश्न कर ६१. ह्मणजे, हे वानरश्रेष्ठा, नेहमीं सौम्य, शुचि, दक्ष आणि रामाला प्रिय असा तो लक्ष्मण माझें दुःख नाहींसें करील ६२. हे वानरसेनाधिपते, हें माझें कार्य सिद्धीस जाण्याविषयीं मी तुझ्यावरच अवलंबून आहें. कारण, तूं उपक्रम केलास ह्मणजे राम माझ्याविषयीं यत्न करूं लागेल ६३. माझा नाथ जो शूर राम त्याला पुनःपुनः तूं माझा असा निरोप सांग कीं, "हे दशरथपुत्रा, मी एक महिनाभर जीव धरून राहीन ६४; महिन्याच्यापुढें मी जिवंत राहणार नाहीं हें मी खरें खरें सांगून ठेवितें. तस्मात्, पातालामध्यें बुडून गेलेल्या पृथ्वीला ज्याप्रमाणें भगवानांनीं तारिलें त्याप्रमाणें, हे वीरा, दुराचारी रावणानें कपट करून येथें अडकवून ठेविलेल्या मला तूं तार" ६५. असा निरोप सांगितल्यानंतर पदरांत बांधून ठेविलेलें एक दिव्य व शुभ शिरोरत्न सीतेनें सोडिलें ; आणि 'हें रामाला द्यावयाचें' असें ह्मणून तिनें तें हनुमानाच्या स्वाधीन केलें ६६. तदनंतर तें अनुपम श्रेष्ठ रत्न वीर हनुमानानें घेऊन आपल्या

यामास नयस्य प्राभवद्भुजः ६७ मणिरत्नं कपिवरः प्रतिगृह्याभिवाद्य च ।
सीतां प्रदक्षिणं कृत्वा प्रणतः पार्श्वतः स्थितः ६८ हर्षेण महता युक्तः
सीतादर्शनजेन सः । हृदयेन गतो रामं लक्ष्मणं च सलक्षणम् ६९ मणि-
वरमुपगृह्य तं महार्हं जनकनृपात्मजया धृतं प्रभावात् । गिरिवरपवनाव-
धूतमुक्तः सुखितमनाः प्रतिसंक्रमं प्रपेदे ७० [१६८४] इत्यार्षे श्रीमद्रा-
मायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टात्रिंशः सर्गः ॥ ३८ ॥

मणिं दत्त्वा ततः सीता हनूमन्तमथाब्रवीत् । अभिज्ञानमभिज्ञातमेत-
द्रामस्य तत्त्वतः १ मणिं दृष्ट्वा तु रामो वै त्रयाणां संस्मरिष्यति । वीरो
जनन्या मम च राज्ञो दशरथस्य च २ स भूयस्त्वं समुत्साहचोदितो
हरिसत्तम । अस्मिन्कार्यसमुत्साहे प्रचिन्तय यदुत्तरम् ३ त्वमस्मिन्कार्य-
निर्योगे प्रमाणं हरिसत्तम । तस्य चिन्तय यो यत्नो दुःखक्षयकरो भवेत् ४
हनूमन्यत्नमास्थाय दुःखक्षयकरो भव । स तथेति प्रतिज्ञाय मारुतिर्भीम-
विक्रमः ५ शिरसा वन्द्य वैदेहीं गमनायोपचक्रमे । ज्ञात्वा संप्रस्थितं

---

बाटाला घट्ट बांधून ठेविलें; तथापि तें रत्न स्वीकारण्यास मनापासून त्याचा हात धांवला नाहीं ६७. असो. शेवटीं तें श्रेष्ठ रत्न घेऊन त्यानें सीतेला अभिवंदन केलें; आणि प्रदक्षिणा केल्यावर नम्र होऊन तो तिच्या बाजूस उभा राहिला ६८. सीतेचें दर्शन झाल्यामुळें त्याला मोठा हर्ष झाला; आणि राजलक्षणांनीं युक्त असलेल्या लक्ष्मणाचें व रामाचें त्याला स्मरण झालें ६९. जनकराजाच्या कन्येनें राक्षसींना न दिसेल अशा युक्तीनें जवळ ठेविलेलें तें बहुमूल्य श्रेष्ठ रत्न घेतल्यानंतर प्रथमतः सीतेचें दर्शन न झाल्यामुळें उच्च पर्वतावर असलेल्या पुरुषाप्रमाणें दुःखानें कंपित झालेला आणि नंतर सीतेचें दर्शन झाल्यामुळें कंपरहित झालेला तो हनुमान् मनामध्यें प्रसन्न होऊन तेथून परत फिरण्यास उद्युक्त झाला ७०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३८ ॥

रत्न दिल्यानंतर सीता हनुमानाला ह्मणाली "खरोखर हें रत्न रामाच्या ओळखीचें आहे १. हें रत्न अवलोकन केल्यावर मी, माता कौसल्या आणि दशरथराजा ह्या तिघांचें त्या वीर रामाला स्मरण होईल २. तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, तुला हें कार्य हातीं घेण्याविषयीं प्रेरणा होईल; आणि प्रेरणा झाल्यानंतर पुढें काय करावयाचें त्याचा तूं विचार कर ३. हे वानरश्रेष्ठा, हें कार्य पार पडण्याविषयीं तुझ्यावर भार आहे. ह्यास्तव, रामानें कोणता प्रयत्न केला असतां दुःखाचा नाश होईल हें तूं मनामध्यें आण ४. हे हनुमाना, यत्नाचें अवलंबन करून तूं माझ्या दुःखाचा परिहार कर." ह्यावर "ठीक

देवी वानरं पवनात्मजम् ६ बाष्पगद्गदया वाचा मैथिली वाक्यमब्रवीत् ।
हनूमन्कुशलं ब्रूयाः सहितौ रामलक्ष्मणौ ७ सुग्रीवं च सहामात्यं सर्वा-
न्वृद्धांश्च वानरान् । ब्रूयास्त्वं वानरश्रेष्ठ कुशलं धर्मसंहितम् ८ यथा च
स महाबाहुर्मां तारयति राघवः । अस्माद्दुःखाम्बुसंरोधात्त्वं समाधातुम-
र्हसि ९ जीवन्तीं मां यथा रामः संभावयति कीर्तिमान् । तत्त्वया हनु-
मन्वाच्यं वाचा धर्ममवाप्नुहि १० नित्यमुत्साहयुक्तस्य वाचः श्रुत्वा मये-
रिताः । वर्धिष्यते दाशरथेः पौरुषं मदवाप्तये ११ मत्संदेशयुता वाच-
स्त्वत्तः श्रुत्वैव राघवः । पराक्रमे मतिं वीरो विधिवत्संविधास्यति १२
सीतायास्तद्वचः श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः । शिरस्यञ्जलिमाधाय वाक्य-
मुत्तरमब्रवीत् १३ क्षिप्रमेष्यति काकुत्स्थो हर्यृक्षप्रवरैर्वृतः । यस्ते युधि
विजित्यारीञ्शोकं व्यपनयिष्यति १४ न हि पश्यामि मर्त्येषु नासुरेषु
सुरेषु वा । यस्तस्य वमतो बाणान्स्थातुमुत्सहतेऽग्रतः १५ अप्यर्कमपि

आहे " असें ह्मणून त्या भयंकरपराक्रमी मारुतीनें ५ सीतेला मस्तकानें प्रणाम केला आणि तो तेथून निघण्यास तयार झाला. तेव्हां वायुपुत्र वानर निघाला असें जाणून देवी ६ सीता अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत त्याला ह्मणाली " हे हनुमाना, उभयतां रामलक्ष्मणांना तू कुशल सांग ७; आणि त्याचप्रमाणें हे वानरश्रेष्ठा, अमात्यांसहवर्तमान सुग्रीवाला व सर्व वृद्ध वानरांना तूं धर्माला अनुसरून कुशल सांग ८. सारांश, तो महापराक्रमी राम ह्या दुःखसागरापासून मला तारील अशा रीतीनें तूं त्याचें मन वळीव ९. हे हनुमाना, मी जिवंत असतांना तो कीर्तिमान् राम माझें रक्षण करील असें भाषण तूं त्याच्याशीं कर; आणि संभाषणाच्या योगानें तरी ( मला दुःखांतून पार पाडण्याचा ह्या ) धर्म तुझ्या हातून होऊं दे १०. मी जे शब्द तुझ्याशीं बोललें ते श्रवण केल्यावर, नेहमीं उत्साहयुक्त असलेल्या दशरथपुत्र रामाचा माझ्या प्राप्तीकरितां अधिक अधिकच प्रयत्न होत जाईल ११. माझा निरोप तुझ्या मुखांतून श्रवण करितांक्षणींच वीर राम पराक्रम करण्याचा योग्य विचार करील " १२ सीतेचें हें भाषण श्रवण केल्यानंतर वायुपुत्र हनुमान् मस्तकीं हात जोडून तिला ह्मणाला १३ " श्रेष्ठ श्रेष्ठ वानर आणि अस्वलें बरोबर घेऊन ककुत्स्थकुलोत्पन्न राम सत्वरच इकडे येईल आणि शत्रूंना युद्धामध्यें जिंकून तो लवकरच तुझ्या दुःखाचा परिहार करील १४. राम बाण सोडूं लागला असतां त्याच्या समोर उभा राहण्यास समर्थ असा कोणीही वीर मनुष्यांमध्यें, दैत्यांमध्यें अथवा देवांमध्यें माझ्या आढळण्यांत येत नाहीं १५. संग्रामामध्यें सूर्याशीं, इंद्राशीं अथवा वैवस्वत

पर्जन्यमपि वैवस्वतं यमम् । स हि सोढुं रणे शक्तस्तव हेतोर्विशेषतः १६
स हि सागरपर्यन्तां महीं साधितुमर्हति । त्वन्निमित्तो हि रामस्य जयो
जनकनन्दिनि १७ तस्य तद्वचनं श्रुत्वा सम्यक्सत्यं सुभाषितम् । जानकी
बहु मेने तं वचनं चेदमब्रवीत् १८ ततस्तं प्रस्थितं सीता वीक्षमाणा
पुनः पुनः । भर्तृस्नेहान्वितं वाक्यं सौहार्दादनुमानयत् १९ यदि वा
मन्यसे वीर वसैकाहमरिन्दम । कस्मिंश्चित्संवृते देशे विश्रान्तः श्वो गमि-
ष्यसि २० मम चैवाल्पभाग्यायाः सांनिध्यात्तव वानर । अस्य शोकस्य
महतो मुहूर्तं मोक्षणं भवेत् २१ ततो हि हरिशार्दूल पुनरागमनाय तु ।
प्राणानामपि संदेहो मम स्यान्नात्र संशयः २२ तवादर्शनजः शोको भूयो
मां परितापयेत् । दुःखाद्दुःखपरामृष्टां दीपयन्निव वानर २३ अयं च वीर
संदेहस्तिष्ठतीव ममाग्रतः । सुमहांस्त्वत्सहायेषु हर्यृक्षेषु हरीश्वरः २४ कथं
नु खलु दुष्पारं तरिष्यति महोदधिम् । तानि हर्यृक्षसैन्यानि तौ वा नर-

---

यमाशींही युद्ध करण्यास तो समर्थ आहे. मग विशेषेंकरून तुझ्याकरितां तर तो त्यांच्याशींही युद्ध करण्याचा प्रसंग पडला असतां मागें पुढें पहाणारच नाहीं १६. समुद्रवलयांकित पृथ्वीही जिंकण्यास तो समर्थ आहे. तात्पर्य, हे जनककन्ये, तुझ्याकरितां राम हवा त्याचा पराजय करणारा आहे " १७. ह्याप्रमाणें हनुमानानें केलेलें तें सत्य भाषण श्रवण केल्यावर सीतेला तें उत्कृष्ट भाषण महत्त्वाचें वाटलें; आणि तिनें त्याच्याशीं कांहीं भाषणही केलें १८. सारांश, तो हनुमान निघाला असतां सीता वारंवार त्याच्याकडे पाहूं लागली; आणि भर्त्याच्या प्रेमाचा ज्यांत संबंध आहे अशा त्या हनुमानाच्या भाषणाची प्रेमानें तिनें प्रशंसा केली १९. तदनंतर ती ह्मणाली " हे शत्रुदमना वीरा हनुमाना, कोणत्या तरी गुप्त प्रदेशामध्यें वाटेल तर तूं एक दिवस रहा. तूं विश्रांति घेऊन उद्यां जाशील २०. असें झालें असतां, हे वानरा, मज भाग्यहीन स्त्रीची तुझ्या सान्निध्यामुळें, ह्या प्रचंड शोकांतून क्षणभर सुटका तरी होईल २१. कारण, हे वानरश्रेष्ठा, पुनरपि तुझें आगमन होण्याची पंचाईतच आहे; आणि यदाकदाचित् जरी झालें तरी तोंपर्यंत खरोखर मी जिवंत रहाण्याचाही संशयच आहे २२. हे वानरा, तूं माझ्या दृष्टीआड झालास ह्मणजे माझा शोक अधिकच होईल आणि अत्यंत दुःख भोगीत असलेल्या माझ्या अंगाचा जसा कांहीं भडका करून देईल २३. हे वीरा, माझ्या मनामध्यें हा एक जबरदस्त संशय जसा कांहीं उभाच आहे. तुला साह्य करणारे वानर व अस्वल एकदम जुळले असतां वानराधिपति सुग्रीव २४ हा दुस्तर महासागर

वरात्मजौ २५ त्रयाणामेव भूतानां सागरस्येह लङ्घने । शक्तिः स्याद्वैनतेयस्य तव वा मारुतस्य वा २६ तदस्मिन्कार्यनियोगे वीरैवं दुरतिक्रमे । किं पश्यसे समाधानं त्वं हि कार्यविदां वरः २७ काममस्य त्वमेवैकः कार्यस्य परिसाधने । पर्याप्तः परवीरघ्न यशस्यस्ते फलोदयः २८ बलैः समग्रैर्युधि मां रावणं जित्य संयुगे । विजयी स्वपुरं यायात्तत्तस्य सदृशं भवेत् २९ बलैस्तु संकुलां कृत्वा लङ्कां परबलार्दनः । मां नयेद्यदि काकुत्स्थस्तत्तस्य सदृशं भवेत् ३० तद्यथा तस्य विक्रान्तमनुरूपं महात्मनः । भवदाहवशूरस्य तथा त्वमुपपादय ३१ तदर्थोपहितं वाक्यं प्रश्रितं हेतुसंहितम् । निशम्य हनुमाञ्शेषं वाक्यमुत्तरमब्रवीत् ३२ देवि हर्यृक्षसैन्यानामीश्वरः प्लवतां वरः । सुग्रीवः सत्यसंपन्नस्तवार्थे कृतनिश्चयः ३३ स वानरसहस्राणां कोटीभिरभिसंवृतः । क्षिप्रमेष्यति वैदेहि राक्षसानां निबर्हणः ३४ तस्य विक्रमसंपन्नाः सत्त्ववन्तो महाबलाः ।

---

तरण्यास कसा बरें समर्थ होईल ? किंवा अस्वलवानरांच्या त्या सेना अथवा ते पुरुषश्रेष्ठ दशरथाचे पुत्र तरी महासागराचें उल्लंघन करण्यास कसे समर्थ होतील ? २५. ह्या जगतामध्यें समुद्र उल्लंघन करण्याचें सामर्थ्य तीनच प्राण्यांचे ठिकाणीं असण्याचा संभव आहे. गरुडाचे ठिकाणीं, तुझ्या ठिकाणीं आणि वायूचे ठिकाणीं २६. तस्मात्, हें दुर्घट कार्य पार पाडण्याचा कोणता उपाय तुला दिसत आहे ? हे वीरा, तूं कार्य कसें शेवटास न्यावें हें जाणणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेस २७. हे शत्रुपक्षीयवीरनाशका हनुमाना, तूं एकटाही खरोखर हें कार्य पार पाडण्यास समर्थ आहेस; परंतु, तुझ्या हातून कार्य शेवटास गेलें असतां कीर्तिवर्धक असें विजयरूप फलही तुलाच प्राप्त होईल ( रामाला होणार नाहीं ) २८. परंतु, संपूर्ण सैन्यें बरोबर घेऊन आणि संग्रामामध्यें रावणाला जिंकून विजयी झाल्यावर जर राम मला घेऊन आपल्या राजधानीला जाईल तर तें त्याला शोभण्यासारखें होईल २९. शत्रुसैन्याचें मर्दन करणारा तो राम सैन्यांच्या योगानें लंकेमध्यें दाणादाण उडवून देऊन जर मला घेऊन जाईल तर तें त्याच्या नांवलौकिकाला योग्य दिसेल ३०. तस्मात्, त्या रणशूर महात्म्याला योग्य असा पराक्रम त्याच्या हातून होईल अशी तूं तजवीज कर " ३१. अर्थ, विनय आणि हेतु यांनीं भरलेलें तें सीतेचें भाषण श्रवण करून हनुमान् शेवटीं ह्मणाला ३२ " हे देवि, वानर आणि अस्वलें ह्यांच्या सैन्यांचा अधिपति जो वानरश्रेष्ठ सुग्रीव तो सत्यनिष्ठ आहे; आणि तुझ्या कार्याविषयीं त्याचा निश्चय झाला आहे ३३. हे सीते, हजारों वानरांच्या कोट्यावधि झुंडी बरोबर

मनःसंकल्पसंपाताश्च निदेशे हरयः स्थिताः ३५ येषां नोपरि नाधस्तान्न तिर्यक्सज्जते गतिः । न च कर्मसु सीदन्ति महत्स्वमिततेजसः ३६ असकृत्तैर्महोत्साहैः ससागरधराधरा । प्रदक्षिणीकृता भूमिर्वायुमार्गानुसारिभिः ३७ मद्विशिष्टाश्च तुल्याश्च सन्ति तत्र वनौकसः । मत्तः प्रत्यवरः कश्चिन्नास्ति सुग्रीवसंनिधौ ३८ अहं तावदिह प्राप्तः किं पुनस्ते महाबलाः । न हि प्रकृष्टाः प्रेष्यन्ते प्रेष्यन्ते हीतरे जनाः ३९ तदलं परितापेन देवि शोको व्यपैतु ते । एकोत्पातेन ते लङ्कामेष्यन्ति हरियूथपाः ४० मम पृष्ठगतौ तौ च चन्द्रसूर्याविवोदितौ । त्वत्सकाशं महासङ्घौ नृसिंहावागमिष्यतः ४१ तौ हि वीरौ नरवरौ सहितौ रामलक्ष्मणौ । आगम्य नगरीं लङ्कां सायकैर्विधमिष्यतः ४२ सगणं रावणं हत्वा राघवो रघुनन्दनः । त्वामादाय वरारोहे स्वपुरीं प्रतियास्यति ४३ तदाश्वसिहि भद्रं ते भव त्वं कालकाङ्क्षिणी । न चिराद्द्रक्ष्यसे रामं प्रज्वलन्तमिवान-

---

घेऊन तो राक्षसनाशक सत्वरच इकडे येईल ३४. पराक्रमी, धैर्यवान्, महाबलाढ्य, आणि इच्छेप्रमाणें उड्डाण करणारे वानर त्याच्या आज्ञेंत आहेत ३५. ऊर्ध्वभागीं, अधोभागीं आणि आठही दिशांचे ठिकाणीं त्यांची गति कुंठित होत नाहीं; आणि अपरिमित तेजानें युक्त असलेले ते वानर कसल्याही मोठ्या कर्मामध्यें हार जात नाहींत ३६. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या महोत्साही वानरांनीं सागर आणि पर्वत ह्यांसहवर्तमान अनेक वेळां पृथ्वीला प्रदक्षिणा केली आहे ३७. सुग्रीवाजवळ माझ्यापेक्षां कमी कोणीही नाहीं. जे कांहीं वानर आहेत त्यांपैकीं कांहीं माझ्यापेक्षां जास्त आहेत आणि कांहीं माझ्या बरोबरीचे आहेत ३८. मी ( कनिष्ठ प्रतींतला असूनही ) जर येथें आलों आहें तर त्या महाबलाढ्य वानरांची गोष्ट पाहिजे कशाला ? मोठ्यामोठ्यांना कधींही ( अल्पस्वल्प कामें करण्याकरितां ) पाठवीत नसतात. यःकश्चितांनाच बाहेर पाठवीत असतात ३९. तस्मात्, हे देवि, तूं संताप करून घेऊं नको. तुझा शोक आतां पुरे झाला. ते वानरसेनाधिपति एका उड्डाणानेंच लंकेमध्यें येतील ४०. उदय पावलेल्या चंद्रसूर्याप्रमाणें, असलेले ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण माझ्या पाठीवर बसून आणि मोठ्या मोठ्या सेना बरोबर घेऊन तुझ्याकडे येतील ४१. एकत्र असलेले ते उभयतां वीर पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण येथें येऊन लंकानगरी बाणांनीं उडवून देतील ४२. सारांश, रघुनंदन राम अनुयायांसहवर्तमान रावणाचा वध करील आणि, हे सुंदरि, तुला घेऊन आपल्या राजधानीला परत जाईल ४३. तस्मात्, तूं धीर धर आणि कालाची प्रतीक्षा करीत रहा. तुझें कल्याण होईल; आणि प्रज्वलित अग्निप्रमाणें असलेल्या रामाला तूं

लम् ४४ निहते राक्षसेन्द्रे च सपुत्रामात्यबान्धवे । त्वं समेष्यसि रामेण शशाङ्केनेव रोहिणी ४५ क्षिप्रं त्वं देवि शोकस्य पारं द्रक्ष्यसि मैथिलि । रावणं चैव रामेण द्रक्ष्यसे निहतं बलात् ४६ एवमाश्वास्य वैदेहीं हनूमान्मारुतात्मजः । गमनाय मतिं कृत्वा वैदेहीं पुनरब्रवीत् ४७ तमरिघ्नं कृतात्मानं क्षिप्रं द्रक्ष्यसि राघवम् । लक्ष्मणं च धनुष्पाणिं लङ्काद्वारमुपागतम् ४८ नखदंष्ट्रायुधान्वीरान्सिंहशार्दूलविक्रमान् । वानरान्वारणेन्द्राभान्क्षिप्रं द्रक्ष्यसि संगतान् ४९ शैलाम्बुदनिकाशानां लङ्कामलयसानुषु । नर्दतां कपिमुख्यानामार्ये यूथान्यनेकशः ५० स तु मर्मणि घोरेण ताडितो मन्मथेषुणा । न शर्म लभते रामः सिंहार्दित इव द्विपः ५१ रुद मा देवि शोकेन मा भूत्ते मनसो भयम् । शचीव भर्त्रा शक्रेण सङ्गमेष्यसि शोभने ५२ रामाद्विशिष्टः कोऽन्योऽस्ति कश्चित्सौमित्रिणा समः । अग्निमारुतकल्पौ तौ भ्रातरौ तव संश्रयौ ५३ नास्मिंश्चिरं वत्स्यसि देवि देशे

---

लवकरच अवलोकन करिशील ४४; व रोहिणीचा ज्याप्रमाणें चंद्राशीं समागम होत असतो त्याप्रमाणें पुत्र, अमात्य आणि बांधव ह्यांसहवर्तमान राक्षसाधिपति रावणाचा वध झाला असतां रामाशीं तुझा समागम होईल ४५. हे मैथिलि, शोकाचा शेवट पाहण्याची पाळी तुला लवकरच येईल; आणि रामाच्या हातून रावण वध पावल्याचेंही तूं सत्वरच अवलोकन करिशील " ४६. ह्याप्रमाणें सीतेला धीर देऊन वायुपुत्र हनुमानानें तेथून जाण्याचा विचार केला; आणि पुनरपि तो सीतेला ह्मणाला ४७ " शत्रुनाशक महात्मा राम आणि हातामध्यें धनुष्य घेतलेला लक्ष्मण लंकेच्या द्वाराजवळ आल्याचें तूं सत्वरच अवलोकन करिशील ४८. नखें आणि दंष्ट्रा हींच ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र ह्यांप्रमाणें ज्यांचे पराक्रम आहेत आणि गजेंद्रांसारिखीं ज्यांचीं शरीरें आहेत असे वीर वानर येथें जुळलेले तूं सत्वरच पाहशील ४९. हे साध्वि, लंकेंतील मलयपर्वताच्या शिखरावर गर्जना करीत असलेल्या आणि पर्वतांप्रमाणें व मेघांप्रमाणें दिसत असलेल्या मोठ्या मोठ्या वानरांच्या अनेक झुंडीच्या झुंडी तुझ्या दृष्टीं पडतील ५०. मदनाच्या घोर बाणानें मर्मस्थानीं ताडित झालेल्या त्या रामाला सिंहानें जर्जर केलेल्या गजाप्रमाणें सुख मुळींच होत नाहीं ५१. हे देवि, तूं रडूं नको; आणि शोकामुळें तूं आपल्या मनामध्यें धास्तीही बाळगूं नको. हे कल्याणि, इंद्राणीचा ज्याप्रमाणें इंद्राशीं समागम होतो त्याप्रमाणें तुझा भर्त्याशीं समागम होईल ५२. रामापेक्षां अधिक कोण आहे; आणि लक्ष्मणाची बरोबरी करणारा तरी कोण आढळणार आहे ? तुझ्यावरच अवलंबून राहणारे ते उभयतां भ्राते

[र]क्षोगणैरध्युषितेतिरौद्रे । न ते चिरादागमनं प्रियस्य क्षमस्व मत्संगमकालमात्रम् ५४ [१७३८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकोनचत्वारिंशः सर्गः ॥ ३९ ॥

श्रुत्वा तु वचनं तस्य वायुसूनोर्महात्मनः । उवाचात्महितं वाक्यं सीता सुरसुतोपमा १ त्वां दृष्ट्वा प्रियवक्तारं संप्रहृष्यामि वानर । अर्धसंजातसस्येव वृष्टिं प्राप्य वसुंधरा २ यथा तं पुरुषव्याघ्रं गात्रैः शोकाभिकर्शितैः। संस्पृशेयं सकामाहं तथा कुरु दयां मयि ३ अभिज्ञानं च रामस्य दद्या हरिगुणोत्तम । क्षिप्तामिषीकां काकस्य कोपादेकाक्षिशातनीम् ४ मनःशिलायास्तिलको गण्डपार्श्वे निवेशितः । त्वया प्रणष्टे तिलके तं किल स्मर्तुमर्हसि ५ स वीर्यवान्कथं सीतां हृतां समनुमन्यसे । वसन्तीं रक्षसां मध्ये महेन्द्रवरुणोपम ६ एष चूडामणिर्दिव्यो मया सुपरिरक्षितः । एतं दृष्ट्वा प्रहृष्यामि व्यसने त्वामिवानघ ७ एष निर्यातितः श्रीमान्मया ते

---

अग्नि व वायु ह्यांप्रमाणें आहेत ५३. हे देवि, राक्षसगणांनीं वास्तव्य केलेल्या या अति भयंकर प्रदेशामध्यें तुला आतां फार दिवस राहावें लागणार नाहीं. सत्वरच तुझ्या प्रियाचें आगमन इकडे होईल. माझी व त्याची भेट होण्यास अवश्यक इतकाच काळ लोटेपर्यंत तूं आतां वाट पहा ह्मणजे झालें ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९॥

त्या महात्म्या वायुपुत्र हनुमानाचें तें आपल्या हिताचें भाषण श्रवण केल्यावर देवकन्येप्रमाणें असलेली ती सीता त्याला ह्मणाली १ 'हे वानरा, अर्धवट धान्यें जिच्यामध्यें उगवलीं आहेत अशा पृथ्वीला ज्याप्रमाणें पर्जन्यवृष्टि प्राप्त झाली असतां आनंद होतो त्याप्रमाणें प्रिय भाषण करणाऱ्या तुला अवलोकन करून मला आनंद होत आहे २. तस्मात्, शोकांनीं कृश झालेल्या ह्या गात्रांच्या योगानें त्या पुरुषश्रेष्ठ रामाला स्पर्श करून मी कृतकृत्य होईन अशा प्रकारची तूं मजवर दया कर ३. हे महागुणवान् वानरा, काकपक्ष्याचा एक नेत्र नाहींसा करून टाकणारी इषीकास्त्र सोडिल्याची खूण तूं रामाला दे आणि त्याला असेंही सांग कीं ४ "पूर्वींचा तिलक पुसून गेला असतां माझ्या गालावर तूं एक जो मनःशिलेचा तिलक लाविला होतास त्याची आठवण करून पहा ५. हे इंद्रवरुणतुल्य रामा, तूं वीर्यवान् असतांही रावणानें हरण करून नेल्यामुळें राक्षसांमध्यें सीता वास्तव्य करीत आहे हें तुला सहन कसें होत आहे ? ६. हे निष्पापा रामा, हें दिव्य शिरोरत्न मीं फारच जपून ठेविलें होतें; कारण संकटामध्यें तुझें दर्शन झाल्यावर जसा मला आनंद होत असतो

वारिसंभवः । अतः परं न शक्ष्यामि जीवितुं शोकलालसा ८ असह्यानि च दुःखानि वाचश्च हृदयच्छिदः । राक्षसैः सह संवासं त्वत्कृते मर्षयाम्यहम् ९ धारयिष्यामि मासं तु जीवितं शत्रुसूदन । मासादूर्ध्वं न जीविष्ये त्वया हीना नृपात्मज १० घोरो राक्षसराजोऽयं दृष्टिश्च न सुखा मयि । त्वां च श्रुत्वा विषज्जन्तं न जीवेयमपि क्षणम् ११ वैदेह्या वचनं श्रुत्वा करुणं साश्रुभाषितम् । अथाब्रवीन्महातेजा हनूमान्मारुतात्मजः १२ त्वच्छोकविमुखो रामो देवि सत्येन ते शपे । रामे शोकाभिभूते तु लक्ष्मणः परितप्यते १३ दृष्टा कथंचिद्भवती न कालः परिदेवितुम् । इमं मुहूर्तं दुःखानामन्तं द्रक्ष्यसि भामिनि १४ तावुभौ पुरुषव्याघ्रौ राजपुत्रावनिन्दितौ । त्वद्दर्शनकृतोत्साहौ लङ्कां भस्मीकरिष्यतः १५ हत्वा तु समरे रक्षो रावणं सहबान्धवैः । राघवौ त्वां विशालाक्षि स्वां पुरीं प्रापयिष्यतः १६ यत्तु रामो विजानीयादभिज्ञानमनिन्दिते । प्रीतिसंजननं

---

तसा हें रत्न अवलोकन करून मला आनंद होत असतो ७. परंतु, उदकामध्यें उत्पन्न झालेलें हें भव्य रत्न मीं तुझ्याकडे पाठविलें आहे. ह्यामुळें आजपासून पुढें शोकाकुल झालेली मी जिवंत राहणें शक्य नाहीं ८. असह्य दुःखें, मर्मभेदक भाषणें आणि राक्षसांसहवर्तमान वास्तव्य मी तुझ्याकरितां सहन करीत आहें ९. हे राजपुत्रा, एक महिनाभर मी जीव धरून राहीन. महिन्यानंतर तुझ्यावांचून मी जिवंत राहणार नाहीं १०. हा राक्षसाधिपति रावण क्रूर आहे; माझ्यावर ह्याची दृष्टिही चांगली नाहीं. तेव्हां इतकें असून तूंही आणखी इकडे येण्यास विलंब करीत आहेस हें माझ्या कानावर आलें म्हणजे मी एक क्षणभरही जिवंत राहणार नाहीं" ११. डोळ्यामध्यें अश्रु आणून सीतेनें केलेलें हें दीन भाषण श्रवण केल्यावर महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् तिला म्हणाला १२ "हे देवि, तुझ्या शोकामुळें रामाची मुखचर्या अगदीं पालटून गेली आहे; आणि राम शोकाकुल झाला असल्यामुळें लक्ष्मणही दुःखित झाला आहे हें मी तुला शपथपूर्वक खरें सांगतों १३. परंतु, आतां कसा तरी तुझा शोध लागला आहे; तेव्हां शोक करण्याचा काल सांप्रत उरला नाहीं. हे साध्वि, ह्या घटकेलाच तुझ्या दुःखांचा शेवट होईल १४. निंदेला पात्र नसलेले ते उभयतां पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक असल्यामुळें लंका भस्म करून टाकितील १५. हे विशाललनयने, संग्रामामध्यें बांधवांसहवर्तमान रावणाचा वध करून ते रामलक्ष्मण तुला आपल्या राजधानीला घेऊन जातील १६. हे निर्दोष सीते, ज्याची रामाला चांगली ओळख पटेल आणि ज्याच्या योगानें त्याला आनंद होईल अशी आणखी एक खूण

भूयस्तस्य त्वं दातुमर्हसि १७ साब्रवीद्दत्तमेवाहो मयाभिज्ञानमुत्तमम् । एत-
देव हि रामस्य दृष्ट्वा यत्नेन भूषणम् १८ श्रद्धेयं हनुमन्वाक्यं तव वीर
भविष्यति । स तं मणिवरं गृह्य श्रीमान्प्लवगसत्तमः १९ प्रणम्य शिरसा
देवीं गमनायोपचक्रमे । तमुत्पातकृतोत्साहमवेक्ष्य हरियूथपम् २० वर्ध-
मानं महावेगमुवाच जनकात्मजा । अश्रुपूर्णमुखी दीना बाष्पगद्गदया
गिरा २१ हनूमन्सिंहसंकाशौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । सुग्रीवं च सहा-
मात्यं सर्वान्ब्रूया अनामयम् २२ यथा च स महाबाहुर्मां तारयति राघवः ।
अस्माद्दुःखाम्बुसंरोधात्त्वं समाधातुमर्हसि २३ इदं च तीव्रं मम शोक-
वेगं रक्षोभिरेभिः परिभर्त्सनं च । ब्रूयास्तु रामस्य गतः समीपं शिवश्च
तेऽध्वास्तु हरिप्रवीर २४ स राजपुत्र्या प्रतिवेदितार्थः कपिः कृतार्थः परि-
हृष्टचेताः । तदल्पशेषं प्रसमीक्ष्य कार्यं दिशं ह्युदीचीं मनसा जगाम २५
[ १७६३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे
चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

---

तूं रामाला दे" १७. ह्यावर ती ह्मणाली "अरे, मीं उत्कृष्ट खूण दिलीच आहे. हेंच भूषण नीट अवलोकन केल्यावर, हे वीर हनुमाना, रामाला तुझें बोलणें विश्वसनीय वाटेल." असें सीतेनें सांगितल्यानंतर तें श्रेष्ठ रत्न घेऊन त्या श्रीमान् वानरश्रेष्ठ हनुमानानें १८, १९ त्या देवीला मस्तकानें प्रणाम केला आणि तो जाण्यास तयार झाला. तेव्हां उड्डाण करण्यास सिद्ध होऊन वृद्धिंगत होऊं लागलेल्या त्या महावेगवान् वानरसेनाधिपतीकडे पाहिल्यावर त्या दीन सीतेचें मुख अश्रूंनीं व्याप्त झालें आणि कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत ती त्याला ह्मणाली २०,२१ "हे हनुमाना, सिंहतुल्य भ्राते रामलक्ष्मण आणि अमात्यांसहवर्तमान सुग्रीव ह्या सर्वांना तूं माझ्या वतीनें आरोग्यविषयक प्रश्न कर २२; आणि तो महापराक्रमी राम ह्या दुःखसागरापासून माझा सत्वर उद्धार करील अशा प्रकारची तूं कांहीं युक्ति योज २३. हे वानरश्रेष्ठा, तूं रामाचेसमीप गेल्यावर हा माझा तीव्र शोकातिरेक आणि ह्या राक्षसांकडून होत असलेली ही माझी निर्भर्त्सना तूं त्याला सांग. तुला मार्ग सुखकर होवो" २४. ह्याप्रमाणें त्या राजकन्येनें निरोप सांगितल्यावर अंतःकरणामध्यें अतिशय आनंदित झालेला तो कपि सीतेचा शोध लागल्यामुळें कृतार्थ झाला आणि राहिलेलें कार्य अगदींच थोडें आहे असें समजून त्यानें उत्तरदिशेकडे जाण्याचें मनामध्यें आणिलें २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४०॥

स च वाग्भिः प्रशस्ताभिर्गमिष्यन्पूजितस्तया । तस्माद्देशादपाक्रम्य चिन्तयामास वानरः१अल्पशेषमिदं कार्यं दृष्टेयमसितेक्षणा । त्रीनुपायान-तिक्रम्य चतुर्थ इह दृश्यते २ न साम रक्षःसु गुणाय कल्पते न दानमर्थोप-चितेषु युज्यते । न भेदसाध्या बलदर्पिता जनाः पराक्रमस्त्वेष ममेह रोचते ३ न चास्य कार्यस्य पराक्रमादृते विनिश्चयः कश्चिदिहोपपद्यते । हतप्रवी-राश्च रणे तु राक्षसाः कथंचिदीयुर्यदिहाद्य मार्दवम् ४ कार्ये कर्मणि निर्वृत्ते यो बहून्यपि साधयेत् । पूर्वकार्याविरोधेन स कार्यं कर्तुमर्हति ५ न ह्येकः साधको हेतुः स्वल्पस्यापीह कर्मणः । यो ह्यर्थं बहुधा वेद स समर्थोऽर्थसाधने ६ इहैव तावत्कृतनिश्चयो ह्यहं व्रजेयमद्य प्लवगेश्वरालयम्। परात्मसंमर्दविशेषतत्त्ववित्ततः कृतं स्यान्मम भर्तृशासनम् ७ कथं नु खल्वद्य भवेत्सुखागतं प्रसह्य युद्धं मम राक्षसैः सह । तथैव खल्वात्मबलं

---

तो वानर हनुमान् जावयास निघाला असतां प्रशस्त शब्दांनीं सीतेनें त्याची प्रशंसा केली आणि नंतर तो तेथून चालता झाल्यावर मनामध्यें ह्मणाला १ " कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेली ही सीता तर दृष्टीं पडली. आतां हें हातीं घेतलेलें कार्य थोडेंच शिल्लक राहिलेलें आहे. ह्या ठिकाणीं पाहिल्या तीन उपायांचें अवलंबन न करितां चवथाच मला हितावह दिसत आहे २. कारण, राक्षसांचे ठि-काणीं सामाचा कांहीं उपयोग होणार नाहीं ; जे द्रव्यसंपन्न आहेत त्यांना दान देणेंही योग्य होणार नाहीं; बलाचा गर्व झालेले लोक भेदानें साध्य होणें शक्य नाहीं; तस्मात्, ह्या राक्षसांच ठिकाणीं पराक्रम हाच उपाय मला नीट दिसत आहे ३. पराक्रमाचें अवलंबन केल्यावांचून ह्या कार्यसिद्धीला दुसरा कांहींएक निश्चित उपाय येथें चालणार नाहीं. संग्रामामध्यें मोठे मोठे वीर वध पावले ह्मणजेच कसें तरी आज हे राक्षस मऊ येतील ४. मुख्य कार्य पार पडल्यानंतर पहिल्या कार्याशीं विरोध न येतां जो अनेक कार्यें पार पाडितो तोच हातीं घेतलेलें काम शेवटास नेण्यास समर्थ होतो ५. अल्प स्वल्प जरी कार्य असलें तरी एकाच उपायानें ते पार पडेलच असें नाहीं. ह्यास्तव, अनेक प्रकारांनीं उपाय योजण्याचें ज्याला माहीत असतें तोच कार्य शेवटास नेण्यास समर्थ होतो ६. तस्मात्, सीतेचा शोध लावणें एवढेंच जरी कार्य करण्याचा माझा प्रथम निश्चय होता तरी शत्रूंचा व आपला युद्धप्रसंग प्राप्त झाला असतां आपणांमध्यें आणि शत्रूमध्यें विशेष काय आहे हें खरें खरें समजून आल्यानंतर जर मी वानराधिपति सुग्रीवाकडे प्रथमतः गेलों तर यजमानाच्या आज्ञेप्रमाणें खरें खरें काम मीं केल्यासारिखें होईल ७.

च सारवत्समानयेन्मां च रणे दशाननः ८ ततः समासाद्य रणे दशाननं समन्त्रिवर्गं सबलं सयायिनम् । हृदि स्थितं तस्य मतं बलं च सुखेन मत्वाहमितः पुनर्व्रजे ९ इदमस्य नृशंसस्य नन्दनोपममुत्तमम् । वनं नेत्रमनःकान्तं नानाद्रुमलतायुतम् १० इदं विध्वंसयिष्यामि शुष्कं वनमिवानलः । अस्मिन्भग्ने ततः कोपं करिष्यति स रावणः ११ ततो महत्साश्वमहारथद्विपं बलं समानेष्यति राक्षसाधिपः । त्रिशूलकालायसपट्टिशायुधं ततो महद्युद्धमिदं भविष्यति १२ अहं च तैः संयति चण्डविक्रमैः समेत्य रक्षोभिरभङ्गविक्रमः । निहत्य तद्रावणचोदितं बलं सुखं गमिष्यामि हरीश्वरालयम् १३ ततो मारुतवत्क्रुद्धो मारुतिर्भीमविक्रमः । ऊरुवेगेन महता द्रुमान्क्षेप्तुमथारभत् १४ ततस्तद्धनुमान्वीरो बभञ्ज प्रमदावनम् । मत्तद्विजसमाघुष्टं नानाद्रुमलतायुतम् १५ तद्वनं मथितैर्वृक्षैर्भिन्नैश्च सलिलाशयैः । चूर्णितैः पर्वताग्रैश्च बहुधा प्रियदर्शनैः १६ नाना-

---

परंतु, आज ह्या माझ्या येथें येण्याचा परिणाम सुखावह कसा होईल ? राक्षसांसहवर्तमान एकाएकीं माझें युद्ध होण्याचा प्रसंग कसा येईल ? आणि त्याचप्रमाणें संग्रामामध्यें स्वतःचें सामर्थ्य आणि माझें सामर्थ्य यांविषयीं रावणाची चांगल्या रीतीनें खात्री कशी होईल ? ( त्याचा आधीं मला विचार केला पाहिजे ) ८. हा विचार झाला ह्मणजे संग्रामामध्यें सैन्य आणि मंत्रिवर्ग ह्यांसहवर्तमान रावणाची गांठ घेऊन आणि त्याचें बल व मनांतील आशय जाणून मी येथून सुखानें परत जाईन ९. नेत्रांना व मनाला आनंद देणारें असें हें ह्या दुष्टाचें नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेलें नंदनतुल्य उत्कृष्ट वन आहे १०. तेव्हां शुष्क वन दग्ध करून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें मी ह्या वनाचा विध्वंस करून टाकीन; आणि ह्याचा विध्वंस झाला असतां तो रावण क्रुद्ध होईल ११. तदनंतर अश्व, मोठे मोठे रथ आणि गज यांनीं युक्त असें प्रचंड सैन्य घेऊन राक्षसाधिपति रावण येईल व तो आला असतां त्रिशूळ व पोलादी पट्टे ह्यांसहवर्तमान मोठें युद्ध सुरू होईल १२. युद्धामध्यें प्रचंड पराक्रम करणाऱ्या त्या राक्षसांशीं गांठ पडल्यावर आपला पराक्रम मुळींच वाया जाऊं न देतां रावणानें पाठविलेल्या त्या सैन्याचा वध करून वानराधिपति सुग्रीवाच्या घराकडे मी खुशाल चालतां होईन १३. असा बेत केल्यानंतर वायूप्रमाणें भयंकर पराक्रम करणारा तो मारुति क्रुद्ध झाला आणि आपल्या मांड्यांच्या मोठ्या वेगानें तो वृक्ष उलथे पालथे करूं लागला १४. नंतर मत्त पक्ष्यांनीं नादित, नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त आणि अंतःपुरांतील स्त्रियांना विहार करण्यास योग्य असें तें वन वीर हनुमानानें मोडून टाकिलें १५. त्या वनांतील

शकुन्तविरुतैः प्रभिन्नसलिलाशयैः । ताम्रैः किसलयैः क्लान्तैः क्लान्तद्रुमलतायुतैः १७ न बभौ तद्वनं तत्र दावानलहतं यथा । व्याकुलावरणा रेजुर्विह्वला इव ता लताः १८ लतागृहैश्चित्रगृहैश्च सादितैर्व्यालैर्मृगैरार्तरवैश्च पक्षिभिः । शिलागृहैरुन्मथितैस्तथा गृहैः प्रनष्टरूपं तदभून्महद्वनम् १९ सा विह्वलाशोकलताप्रताना वनस्थली शोच्यलताप्रताना । जाता दशास्यप्रमदावनस्य कपेर्बलाद्धि प्रमदावनस्य २० ततः स कृत्वा जगतीपतेर्महान्महद्व्यलीकं मनसो महात्मनः । युयुत्सुरेको बहुभिर्महाबलैः श्रिया ज्वलंस्तोरणमाश्रितः कपिः २१ [१७८४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥४१॥

ततः पक्षिनिनादेन वृक्षभङ्गस्वनेन च । बभूवुस्त्राससंभ्रान्ताः सर्वे लङ्कानिवासिनः १ विद्रुताश्च भयत्रस्ता विनेदुर्मृगपक्षिणः । रक्षसां च

---

वृक्षांचा त्यानें विध्वंस करून टाकिला, जलाशय फोडून टाकिले, दिसण्यांत मनोहर असलेल्या पर्वतशिखरांचे नानाप्रकारानें तुकडे तुकडे करून टाकिले १६, नानाप्रकारचे पक्षी ज्यांमध्यें शब्द करीत असत असे जलाशय फोडून टाकिले, आरक्तवर्ण पल्लव त्यानें चुरगाळून टाकिले व अवशिष्ट राहिलेले वृक्ष आणि लताही त्यानें जर्जर करून टाकिल्या १७. ह्यामुळें तें वन वणवा लागून दग्ध झाल्यासारखें दिसूं लागलें आणि त्यांतील लता अस्ताव्यस्त होऊन शोकाकुल झालेल्या स्त्रियांप्रमाणें दिसूं लागल्या १८. उध्वस्त झालेलीं लतागृहें, धुळधाण झालेलीं क्रीडागृहें, आर्तध्वनि करूं लागलेले व्याघ्र--मृग आणि पक्षी, उलथून टाकिलेले दगडी बंगले आणि सामान्य निवासस्थलें ह्यांच्या योगानें तें महावन जमीनदोस्त झाल्यासारखें दिसूं लागलें १९. रावणाच्या स्त्रियांचे ज्यांत रक्षण होत असे अशा प्रमदावनांतील चंचल अशोकलतांच्या समुदायांनीं युक्त असलेल्या त्या वनभूमींतील लतासमुदायांची स्थिति वानराच्या बळामुळें शोचनीय झाली २०. ह्याप्रमाणें पृथ्वीपति महात्म्या रावणाच्या मनाला अतिशय लागणारी गोष्ट केल्यानंतर कांतीनें देदीप्यमान असलेला तो प्रचंड वानर अनेक महाबलाढ्य राक्षसांशीं एकाकी युद्ध करण्याच्या इच्छेनें दरवाजावर बसला २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

तदनंतर पक्ष्यांच्या स्वरानें आणि मोडतां मोडतां झालेल्या वृक्षांच्या आवाजानें लंकेमध्यें वास्तव्य करणारे सर्वही भीतीनें गांगरून गेले १. भयभीत झालेले मृग व पक्षी कांहीं सैरावैरा धांवूं लागले आणि कांहीं ( फारच घाबरून गेल्यामुळें ) जागच्या जागींच

निमित्तानि क्रूराणि प्रतिपेदिरे २ ततो गतायां निद्रायां राक्षस्यो विकृताननाः । तद्वनं ददृशुर्भग्नं तं च वीरं महाकपिम् ३ स ता दृष्ट्वा महाबाहुर्महासत्त्वो महाबलः । चकार सुमहद्रूपं राक्षसीनां भयावहम् ४ ततस्तु गिरिसंकाशमतिकायं महाबलम् । राक्षस्यो वानरं दृष्ट्वा पप्रच्छुर्जनकात्मजाम् ५ कोयं कस्य कुतो वायं किंनिमित्तमिहागतः । कथं त्वया सहानेन संवादः कृत इत्युत ६ आचक्ष्व नो विशालाक्ष मा भूत्ते सुभगे भयम् । संवादमसितापाङ्गि त्वया किं कृतवानयम् ७ अथाब्रवीत्तदा साध्वी सीता सर्वाङ्गशोभना । रक्षसां कामरूपाणां विज्ञाने का गतिर्मम ८ यूयमेवास्य जानीत योऽयं यद्वा करिष्यति । अहिरेव अहेः पादान्विजानाति न संशयः ९ अहमप्यतिभीतास्मि नैव जानामि कोऽन्वयम् । वेद्मि राक्षसमेवैनं कामरूपिणमागतम् १० वैदेह्या वचनं श्रुत्वा राक्षस्यो विद्रुता द्रुतम् । स्थिताः काश्चिद्गताः काश्चिद्रावणाय निवेदितुम् ११

---

बसले व राक्षसांनाही अपशकुन होऊं लागले २. इतक्यांत अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या राक्षसी जाग्या होऊन पहातात तों तें विध्वंस झालेलें वन आणि तो वीर महाकपि यांकडे त्यांची दृष्टि गेली ३. परंतु, त्यांना अवलोकन करतांक्षणीं त्या महाधैर्यवान् , महापराक्रमी व महाबलाढ्य हनुमानानें राक्षसींना भयप्रद असें फारच मोठें रूप धारण केलें ४. तदनंतर पर्वताप्रमाणें अतिशयच धिप्पाड असलेल्या त्या महाबलाढ्य वानराला अवलोकन करून राक्षसी जनककन्येला ह्मणाल्या ५ " हा कोण ? कोणाचा ? कोठून आला आहे ? कशाकरितां येथें आला आहे ? आणि तुझ्यासहवर्तमान त्यानें संभाषण कशाकरितां केलें ? ६ हें तूं आह्मांला सांग. हे विशालनयने, तूं भय बाळगूं नको. हे महाभाग्यवति सीते, हे कृष्णनयने, तुझ्यासहवर्तमान ह्यानें काय संभाषण केलें हें तूं आह्मांला सांग " ७. ह्याप्रमाणें राक्षसींनीं विचारिल्यानंतर ती सर्वांगसुंदरी साध्वी सीता त्यांना ह्मणाली " यथेष्टरूप धारण करणाऱ्या राक्षसांना ओळखण्याइतकें मला बुद्धिसामर्थ्य कोठून असणार ? ८ हा कोण आहे आणि ह्याच्या मनांतून काय करावयाचें आहे ह्याचा तुह्मीच शोध लावा; कारण, सर्पालाच सर्पाचीं पावलें ओळखतां येतात यांत संशय नाहीं ९. मी तर अतिच भेदरून गेलें असल्यामुळें हा कोण हें मला मुळींच ओळखतां येत नाहीं. इच्छेप्रमाणें रूप धारण करणारा हा कोणी तरी राक्षसच आला असावा असें मला वाटतें " १०. सीतेचें हें भाषण श्रवण करितांक्षणीं कांहीं राक्षसींनीं सत्वर पळ काढिला; कांहीं तेथेंच उभ्या राहिल्या आणि कांहीं रावणाला

रावणस्य समीपे तु राक्षस्यो विकृताननाः । विरूपं वानरं भीमं रावणाय
न्यवेदिषुः १२ अशोकवनिकामध्ये राजन्भीमवपुः कपिः । सीतया कृत-
संवादस्तिष्ठत्यमितविक्रमः १३ न च तं जानकी सीता हरिं हरिणलो-
चना । अस्माभिर्बहुधा पृष्टा निवेदयितुमिच्छति १४ वासवस्य भव-
द्दूतो दूतो वैश्रवणस्य वा । प्रेषितो वापि रामेण सीतान्वेषणकाङ्क्षया १५
तेनैवाद्भुतरूपेण यत्तत्तव मनोहरम् । नानामृगगणाकीर्णं प्रमृष्टं प्रमदा-
वनम् १६ न तत्र कश्चिदुद्देशो यस्तेन न विनाशितः । यत्र सा
जानकी देवी स तेन न विनाशितः १७ जानकीरक्षणार्थं वा
श्रमाद्वा नोपलक्ष्यते । अथवा कः श्रमस्तस्य सैव तेनाभिरक्षिता १८
चारुपल्लवपत्राढ्यं यं सीता स्वयमास्थिता । प्रवृद्धः शिंशपावृक्षः स

---

हा वृत्तांत निवेदन करण्याकरितां निघून गेल्या ११. अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसी रावणाच्या समीप गेल्या आणि विद्रूप व भयंकर वानर तेथें आला असल्याचें त्या रावणाला सांगूं लागल्या १२. ( त्या ह्मणाल्या ) " हे राजा, अशोकवनामध्यें भयंकर शरीर धारण करणारा एक वानर आला आहे; त्याचा पराक्रम अनुपम आहे; आणि सीतेशीं संभाषण करून तो तेथेंच बसला आहे १३. मृगनयना सीतेला आह्मीं नानाप्रकारांनीं विचारून पाहिलें; परंतु, तो कोण आहे हें आह्मांला सांगण्याचा त्या जानकीचा मानस दिसत नाहीं १४. तो इंद्राचा दूत असावा अथवा कुबेराचा दूत असावा किंवा सीतेचा शोध लावण्याच्या उद्देशानें रामानें कोणी पाठविलेला असावा ( असें आह्मांला वाटतें ) १५. नानाप्रकारच्या मृगगणांनीं गजबजलेलें जें आपलें मनोहर प्रमदावन त्याची त्या अद्भुत रूप धारण करणाऱ्या वानरानें नासाडी करून टाकिली १६. ज्या ठिकाणीं देवी जनककन्या आहे तें ठिकाण मात्र त्यानें उध्वस्त केलें नाहीं. बाकी त्यानें विध्वंस करून न टाकिलेला असा कोणताही प्रदेश त्या वनामध्यें शिलक राहिलेला नाहीं १७. जानकी ज्या प्रदेशांत बसली आहे त्या प्रदेशाचा त्यानें तिच्या रक्षणाकरितां विध्वंस केला नाहीं किंवा इतर सर्व प्रदेशांची धुळधाण करितां करितां तो थकून गेल्यामुळें त्याच्या तावडींतून तेवढा भाग शाबूत राहिला आहे, हें कांहींच आमच्या लक्ष्यांत येत नाहीं. परंतु, एवढ्या थोरल्या वनाचा धुव्वा उडवून देणाऱ्या त्या वानराला थकवा कोठला येणार ? तो प्रदेश सुरक्षित ठेवून त्यानें त्या सीतेचेंच रक्षण केलेलें आहे १८. मनोहर पल्लव आणि पानें यांनीं समृद्ध असलेल्या ज्या वृक्षाचा आश्रय करून सीता स्वतः बसली आहे त्या

च तेनाभिरक्षितः १९ तस्योग्ररूपस्योग्रं त्वं दण्डमाज्ञातुमर्हसि । सीता संभाषिता येन वनं तेन विनाशितम् २० मनःपरिगृहीतां तां तव रक्षोगणेश्वर । कः सीतामभिभाषेत यो न स्यात्त्यक्तजीवितः २१ राक्षसीनां वचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः । चिताग्निरिव जज्वाल कोपसंवर्तितेक्षणः २२ तस्य क्रुद्धस्य नेत्राभ्यां प्रापतन्नश्रुबिन्दवः । दीप्ताभ्यामिव दीपाभ्यां सार्चिषः स्नेहबिन्दवः २३ आत्मनः सदृशान्वीरान्किङ्करान्नाम राक्षसान् । व्यादिदेश महातेजा निग्रहार्थं हनूमतः २४ तेषामशीतिसाहस्रं किङ्कराणां तरस्विनाम् । निर्ययुर्भवनात्तस्मात्कूटमुद्गरपाणयः २५ महोदरा महादंष्ट्रा घोररूपा महाबलाः । युद्धाभिमनसः सर्वे हनूमद्ग्रहणोन्मुखाः २६ ते कपिं तं समासाद्य तोरणस्थमवस्थितम् । अभिपेतुर्महाभागाः पतङ्गा इव पावकम् २७ ते गदाभिर्विचित्राभिः परिघैः काञ्चनाङ्गदैः । आजग्मुर्वानरश्रेष्ठं शरैरादित्यसंनिभैः २८ मुद्गरैः पट्टिशैः शूलैः

---

विस्तीर्ण शिंशपावृक्षाला मात्र त्यानें धक्का लाविला नाहीं १९. सारांश, त्या उग्र रूप धारण करणाऱ्या वानराला चांगली कडक शिक्षा देण्याविषयीं आपली आज्ञा होऊं द्या. कारण, त्यानें सीतेचें संरक्षण केलें असून वनाचाही नाश केला आहे २०. हे राक्षसगणाधिपते, आपलें मन जिच्यावर गेलें त्या सीतेशीं जिवावर उदार न झालेला असा कोण बरें भाषण करील !" २१. राक्षसींचें भाषण श्रवण करितांक्षणीं राक्षसाधिपति रावणाची दृष्टि कोपानें चढून गेली आणि चिताग्निप्रमाणें चोहोंकडून त्याच्या अंगाचा भडका होऊं लागला २२; व प्रज्वलित झालेल्या दीपापासून ज्योतीसहवर्तमान ज्याप्रमाणें तेलाचे बिंदु पडूं लागतात त्याचप्रमाणें क्रुद्ध झालेल्या रावणाच्या नेत्रांतून (तेजासहवर्तमान) अश्रुबिंदु पडूं लागले २३. तदनंतर त्या महातेजस्वी रावणानें हनुमानाचा बंदोबस्त करण्याकरितां आत्मतुल्य सामर्थ्यवान् असलेल्या किंकरनामक राक्षसांना जाण्याची आज्ञा केली असतां २४ कूट आणि मुद्गर हीं आयुधें हातांत घेऊन ऐंशीहजार किंकरनामक बलाढ्य राक्षस त्या घरांतून बाहेर पडले २५ मोठें उदर, प्रचंड दंष्ट्रा, घोर रूप आणि भयंकर सामर्थ्य ह्यांनीं युक्त असलेले सर्वही राक्षस युद्धाची इच्छा करून हनुमानाला धरण्याविषयीं उद्युक्त झाले २६. कमानीवर बसलेल्या त्या वानरापाशीं ते आले आणि अग्नीवर उडी घालणाऱ्या पतंगाप्रमाणें ते महाबलाढ्य राक्षस त्याच्या अंगावर चालून गेले २७. चित्रविचित्र गदा, सुवर्णाच्या पट्ट्यांनीं जखडून टाकिलेले परिघ व सूर्यासारिखे उज्ज्वल बाण ह्यांनीं घेऊन ते राक्षस

प्रासतोमरपाणयः । परिवार्य हनूमन्तं सहसा तस्थुरग्रतः २९ हनूमानपि तेजस्वी श्रीमान्पर्वतसंनिभः । क्षितावाविद्ध्य लाङ्गूलं ननाद च महाध्वनिम् ३० स भूत्वा तु महाकायो हनूमान्मारुतात्मजः । पुच्छमास्फोटयामास लङ्कां शब्देन पूरयन् ३१ तस्यास्फोटितशब्देन महता चानुनादिना । पेतुर्विहङ्गा गगनादुच्चैश्चेदमघोषयत् ३२ जयत्यतिबलो रामो लक्ष्मणश्च महाबलः । राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः ३३ दासोऽहं कोसलेन्द्रस्य रामस्याक्लिष्टकर्मणः । हनूमाञ्शत्रुसैन्यानां निहन्ता मारुतात्मजः ३४ न रावणसहस्रं मे युद्धे प्रतिबलं भवेत् । शिलाभिश्च प्रहरतः पादपैश्च सहस्रशः ३५ अर्दयित्वा पुरीं लङ्कामभिवाद्य च मैथिलीम् । समृद्धार्थो गमिष्यामि मिषतां सर्वरक्षसाम् ३६ तस्य सन्नादशब्देन तेऽभवन्भयशङ्किताः । ददृशुश्च हनूमन्तं संध्यामेघमिवोन्नतम् ३७ स्वामिसन्देशनिःशङ्कास्ततस्ते राक्षसाः कपिम् । चित्रैः प्रहरणैर्भीमैरभिपेतुस्तत-

---

वानरश्रेष्ठ हनुमानासमीप आले २८; आणि मुद्गर, पट्टे व शूल बरोबर घेऊन आणि त्याचप्रमाणें भाले व तोमर हातांत घेऊन ते एकाएकीं मारुतीला गराडा देऊन उभे राहिले २९. तेव्हां तेज आणि कांति ह्यांनीं युक्त असलेल्या पर्वतप्राय हनुमानानेंही भूमीवर पुच्छ आपटून मोठी गर्जना केली ३०. सारांश, प्रचंड शरीर धारण करून वायुपुत्र हनुमानानें गर्जनेच्या योगानें लंका दणाणून टाकीत टाकीत पुच्छ भूमीवर आपटलें ३१. तेव्हां प्रतिध्वनीनें युक्त अशा त्या पुच्छ आपटण्याच्या मोठ्या शब्दानें पक्षी आकाशांतून खालीं पडले व तो हनुमान् मोठ्यानें अशी गर्जना करूं लागला कीं ३२ " अतिबलाढ्य राम, महाबलाढ्य लक्ष्मण व रामानें रक्षण केलेला राजा सुग्रीव ह्यांचा विजय आहे ३३. महापराक्रमी कोसलदेशाधिपति रामाचा मी दास आहें. माझें नांव हनुमान् आहे आणि मी वायुपुत्र शत्रुसैन्यांचा नाश करणारा आहे ३४. हजार रावण जरी आले तरी युद्धामध्यें हजारों शिला व वृक्ष ह्यांनीं प्रहार करणाऱ्या माझ्याशीं सामर्थ्यामध्यें बरोबरी करणें त्यांना शक्य होणार नाहीं ३५. सर्व राक्षसांच्या समक्ष लंका नगरीचा विध्वंस करून व सीतेला अभिवंदन करून मनोरथ परिपूर्ण झालेला असा मी परत जाईन " ३६. ह्या त्याच्या गर्जनेमुळें ते राक्षस भयभीत झाले आणि संध्याकाळच्या मेघाप्रमाणें उन्नत असलेल्या हनुमानाकडे पाहूं लागले ३७. हनुमानानें आपल्या स्वामींना निर्देश केला असल्यामुळें हा कोणाचा योद्धा असावा ' ह्याविषयीं राक्षसांना शंका उरली नाहीं व म्हणूनच ते राक्षस भयंकर व अद्भुत शस्त्रें बरोबर घेऊन चोहोंकडून त्याच्यावर

स्ततः ३८ स तैः परिवृतः शूरैः सर्वतः स महाबलः । आससादायसं
भीमं परिघं तोरणाश्रितम् ३९ स तं परिघमादाय जघान रजनीचरान् ।
स पन्नगमिवादाय स्फुरन्तं विनतासुतः ४० विचचाराम्बरे वीरः परिगृह्य
च मारुतिः । सूदयामास वज्रेण दैत्यानिव सहस्रदृक् ४१ स हत्वा राक्ष-
सान्वीरः किङ्करान्मारुतात्मजः । युद्धाकाङ्क्षी महावीरस्तोरणं समव-
स्थितः ४२ ततस्तस्माद्भयान्मुक्ताः कतिचित्तत्र राक्षसाः । निहतान्किङ्क-
रान्सर्वान्रावणाय न्यवेदयन् ४३ स राक्षसानां निहतं महाबलं निशम्य
राजापरिवृत्तलोचनः । समादिदेशाप्रतिमं पराक्रमे प्रहस्तपुत्रं समरे सुदु-
र्जयम् ४४ [ १८२४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
सुन्दरकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥ ४२ ॥

ततः स किङ्करान्हत्वा हनूमान्ध्यानमास्थितः । वनं भग्नं मया चैत्य-
प्रासादो न विनाशितः १ तस्मात्प्रासादमप्येव मिमं विध्वंसयाम्यहम् ।
इति संचिन्त्य हनुमान्मनसा दर्शयन्बलम् २ चैत्यप्रासादमुत्प्लुत्य मेरुशृ-

धांवले ३८. परंतु, ह्याप्रमाणें त्या महाबलाढ्य हनुमानाला सर्व बाजूंनीं त्या शूर राक्षसांनीं वेढून टाकिलें असतां त्यानें कमानीपाशीं ठविलेला एक भयंकर लोखंडी परिघ हातामध्यें घेतला ३९; आणि तरफड करणारा सर्प हातांत धरणाऱ्या गरुडाप्रमाणें तो परिघ हातांत घेऊन त्या मारुतीनें निशाचरांचा वध केला ४०. सारांश, तो वायुपुत्र वीर हनुमान् परिघायुध हातामध्यें घेऊन आकाशामध्यें संचार करूं लागला आणि वज्राच्या योगानें दैत्यांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें त्या परिघानें राक्षसांचा वध केला ४१. इतकेंच नव्हे परंतु, तो वायुपुत्र महावीर शूर हनुमान् किंकरराक्षसांचा वध करून युद्धाच्या इच्छेनें पुनरपि दरवाजावर जाऊन बसला ४२. तदनंतर भीतीमुळें तेथून निघून गेलेल्या कांहीं राक्षसांनीं सर्व किंकरांचा वध झाल्याचें रावणाला जाऊन सांगितलें ४३. तेव्हां राक्षसांचें तें प्रचंड सैन्य वध पावल्याचें ऐकून राक्षसराजाचे आंख फिरून गेले आणि संग्रामामध्यें पराजय पावण्यास अतिच अशक्य व पराक्रमामध्यें अप्रतिम असलेल्या प्रहस्तपुत्र जंबुमालीला त्यानें युद्धाला जाण्याची आज्ञा केली ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

तदनंतर किंकरनामक राक्षसांचा वध केल्यावर, तो हनुमान् आपल्याशीं मनामध्यें ह्मणाला " वनाचा मीं विध्वंस केला; परंतु, राक्षसांच्या कुलदेवतेचें देवालय मीं मोडून टाकिलें नाहीं १. तस्मात्, ह्याचप्रमाणें त्या देवालयाचाही मी आजच विध्वंस करून

ङ्गमिवोन्नतम् । आरुरोह हरिश्रेष्ठो हनूमान्मारुतात्मजः ३ आरुह्य गिरिसंकाशं प्रासादं हरियूथपः । बभौ स सुमहातेजाः प्रतिसूर्य इवोदितः ४ संप्रधृष्य तु दुर्धर्षश्चैत्यप्रासादमुन्नतम् । हनूमान्प्रज्वलँल्लक्ष्म्या पारियात्रोपमोऽभवत् ५ स भूत्वा सुमहाकायः प्रभावान्मारुतात्मजः । धृष्टमास्फोटयामास लङ्कां शब्देन पूरयन् ६ तस्यास्फोटितशब्देन महता श्रोत्रघातिना । पेतुर्विहङ्गमास्तत्र चैत्यपालाश्च मोहिताः ७ अस्त्रविज्जयतां रामो लक्ष्मणश्च महाबलः । राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः ८ दासोऽहं कोसलेन्द्रस्य रामस्याक्लिष्टकर्मणः । हनूमाञ्शत्रुसैन्यानां निहन्ता मारुतात्मजः ९ न रावणसहस्रं मे युद्धे प्रतिबलं भवेत् । शिलाभिश्च प्रहरतः पादपैश्च सहस्रशः १० धर्षयित्वा पुरीं लङ्कामभिवाद्य च मैथिलीम् । समृद्धार्थो गमिष्यामि मिषतां सर्वरक्षसाम् ११ एवमुक्त्वा महाकायश्चैत्यस्थो हरियूथपः । ननाद भीमनिर्ह्रादो रक्षसां जनयन्भयम् १२ तेन नादेन महता चैत्यपालाः शतं ययुः १३ गृहीत्वा विविधानस्त्रान्प्रासान्ख-

---

टाकितों." ह्याप्रमाणें मनामध्यें आणून आपलें सामर्थ्य दाखविण्याकरितां २ मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें उंच असलेल्या त्या राक्षसकुलदेवतेच्या देवालयावर वानरश्रेष्ठ वायुपुत्र हनुमान् उडी मारून उभा राहिला ३; आणि त्या पर्वततुल्य देवालयावर आरोहण केल्यानंतर तो अत्यंतमहातेजस्वी महासेनाधिपति हनुमान् उदय पावलेला दुसरा सूर्यच कीं काय असा दिसूं लागला ४. तें उंच देवालय मोडून टाकिल्यानंतर कांतीनें झळकत असलेला तो अजिंक्य हनुमान् पारियात्रपर्वताप्रमाणें दिसूं लागला ५; आणि पारियात्रपर्वताप्रमाणें फारच मोठें शरीर धारण केल्यानंतर त्या तेजस्वी वायुपुत्र हनुमानानें लंका ध्वनीनें दणाणून टाकीत टाकीत निर्भयपणें दंड ठोकिले असतां ६ कानठळ्या बसविणाऱ्या अशा त्या त्याच्या दंड ठोकण्याच्या प्रचंड ध्वनीनें पक्षी खालीं पडले व देवालयाचे रक्षक मूर्छित झाले ७. तदनंतर " अस्त्रवेत्ता राम, महाबलाढ्य लक्ष्मण आणि रामानें संरक्षण केलेला राजा सुग्रीव ह्यांचा विजय आहे ८. कोसलदेशाधिपति महापराक्रमी रामाचा दास मी वायुपुत्र हनुमान् आहें आणि शत्रुसैन्यांचा मी नाश करणारा आहें ९. हजारों शिळांनीं व वृक्षांनीं मी युद्धामध्यें प्रहार करूं लागलों असतां सहस्र रावणही माझ्यासमोर टिकाव धरण्यास समर्थ होणार नाहींत १०. आतां मी सर्व राक्षसांसमक्ष लंकानगरीचा विध्वंस करून व सीतेला अभिवंदन करून हेतु सिद्धीस गेल्यावर परत चालतां होईन " ११. असें बोलून भयंकर ध्वनीनें युक्त असलेल्या त्या धिप्पाड वानरसेनाधिपति हनुमानानें राक्षसांना भय उत्पन्न

ङ्गान्परश्वधान् । विसृजन्तो महाकाया मारुतिं पर्यवारयन् १४ ते गदा-
भिर्विचित्राभिः परिघैः काञ्चनाङ्गदैः । आजग्मुर्वानरश्रेष्ठं बाणैश्चा-
दित्यसंनिभैः १५ आवर्त इव गङ्गायास्तोयस्य विपुलो महान् । परिक्षिप्य
हरिश्रेष्ठं स बभौ रक्षसां गणः १६ ततो वातात्मजः क्रुद्धो भीमरूपं समास्थितः ।
प्रासादस्य महांस्तस्य स्तम्भं हेमपरिष्कृतम् १७ उत्पाटयित्वा वेगेन हनूमा-
न्मारुतात्मजः । ततस्तं भ्रामयामास शतधारं महाबलः १८ तत्र चाग्निः
समभवत्प्रासादश्चाप्यदह्यत । दह्यमानं ततो दृष्ट्वा प्रासादं हरियूथपः १९
स राक्षसशतं हत्वा वज्रेणेन्द्र इवासुरान् । अन्तरिक्षस्थितः श्रीमानिदं
वचनमब्रवीत् २० मादृशानां सहस्राणि विसृष्टानि महात्मनाम् । बलिनां
वानरेन्द्राणां सुग्रीववशवर्तिनाम् २१ अटन्ति वसुधां कृत्स्नां वयमन्ये च
वानराः । दशनागबलाः केचित्केचिद्दशगुणोत्तराः २२ केचिन्नागसह-
स्रस्य बभूवुस्तुल्यविक्रमाः । सन्ति चौघबलाः केचित्सन्ति वायु-

---

करण्याकरितां देवालयावर असतांनाच गर्जना केली १२. तेव्हां प्रचंड ध्वनि झाल्या-बरोबर नानाप्रकारचीं अस्त्रें हातांत घेऊन देवालयावरील शंभर रक्षक त्याच्याकडे धांवले आणि ते मोठे मोठे धिप्पाड राक्षस भाले, तरवारी व कुऱ्हाडी त्याच्या अंगावर फेंकीत फेंकीत त्याला वेढून उभे राहिले १३, १४. सुवर्णाच्या पट्ट्यांनीं जखडून टाकिलेले परिघ, विचित्र गदा आणि सूर्यासारिखे उज्ज्वल बाण हातांत घेऊन ते राक्षस वानर-श्रेष्ठ हनुमानासमीप आले असतां १५ वानरश्रेष्ठ मारुतीला वेढून उभा राहिलेला तो राक्षसांचा समुदाय गंगाजलाच्या मोठ्या अगाध भोंवऱ्याप्रमाणें दिसूं लागला १६. तदनंतर वायुपुत्र हनुमानानें क्रुद्ध होऊन भयंकर रूप धारण केलें; त्या देवालयाचा सुवर्णानें मढविलेला एक स्तंभ त्या वायुपुत्र प्रचंड हनुमानानें वेगानें उपटला आणि शंभर कोरांनीं युक्त असलेला तो स्तंभ त्या महाबलाढ्य हनुमानानें गरगर फिरविला १७,१८. फिरवितां फिरवितां (दुसऱ्या स्तंभाशीं घर्षण होऊं लागल्यामुळें) तेथें अग्नि उत्पन्न होऊन तें देवालयही जळून गेलें. तेव्हां देवालय जळत असलेलें अव-लोकन केल्यावर वज्रानें असुरांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें मारुतीनें त्या शंभर राक्षसांचा स्तंभाच्या योगानें वध केला आणि अंतरिक्षामध्यें जाऊन तो श्रीमान् हनुमान् ह्मणाला १९,२० " सुग्रीवाच्या आज्ञेंत वागणारे असे माझ्यासारिखें हजारों महात्मे व बलाढ्य वानराधिपति बाहेर पाठविले आहेत् २१. आह्मी आणि इतरही वानर मिळून सर्व पृथ्वी हिंडत आहोंत. आह्मांपैकीं कांहींना दहा हत्तींचें बल आहे; कांहीं त्यांच्याहीपेक्षां दसपट बलाढ्य आहेत २२ आणि कांहीं तर पराक्रमामध्यें

बलोपमाः२३अप्रमेयबलाः केचित्तत्रासन्हरियूथपाः। ईदृग्विधैस्तु हरिभिर्वृतो दन्तनखायुधैः २४ शतैः शतसहस्रैश्च कोटिभिश्चायुतैरपि । आगमिष्यति सुग्रीवः सर्वेषां वो निषूदनः २५ नेयमस्ति पुरी लङ्का न यूयं न च रावणः । यस्य त्विक्ष्वाकुवीरेण बद्धं वैरं महात्मना २६ [१८५०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

संदिष्टो राक्षसेन्द्रेण प्रहस्तस्य सुतो बली । जम्बुमाली महादंष्ट्रो निर्जगाम धनुर्धरः १ रक्तमाल्याम्बरधरः स्रग्वी रुचिरकुण्डलः । महान्विवृत्तनयनश्चण्डः समरदुर्जयः २ धनुः शक्रधनुःप्रख्यं महद्रुचिरसायकम् । विस्फारयाणो वेगेन वज्राशनिसमस्वनम् ३ तस्य विस्फारघोषेण धनुषो महता दिशः । प्रदिशश्च नभश्चैव सहसा समपूर्यत ४ रथेन खरयुक्तेन तमागतमुदीक्ष्य सः । हनूमान्वेगसंपन्नो जहर्ष च ननाद च ५

---

सहस्र गजांची बरोबरी करणारे आहेत. कांहींचे ठिकाणीं हत्तींचे अनेक कळपांइतकें सामर्थ्य आहे; कांहीं वायूसारिखे बलाढ्य आहेत २३ आणि बलाचा अंत लागत नाहीं असेही कांहीं वानरसेनाधिपति त्यांत आहेत. दंत आणि नख ह्या आयुधांनीं युक्त आणि ह्याप्रमाणें बलाढ्य असे शेंकडों, हजारों, लाखों, क्रोडों वानर बरोबर घेऊन तुह्मां सर्वांचा वध करण्याकरितां सुग्रीव येथें येईल २४, २५ आणि तो येथें आला ह्मणजे ही लंकानगरी, तुह्मी आणि महात्म्या इक्ष्वाकुवीर. रामाशीं ज्यानें वैर बांधिलें आहे तो रावण ह्यांपैकीं कोणीच राहणार नाहीं २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतीलें सुंदरकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

राक्षसाधिपति रावणानें आज्ञा केली असतां मोठ्या मोठ्या दंष्ट्रांनीं युक्त असून धनुष्य धारण केलेला बलाढ्य प्रहस्तपुत्र जंबुमाली बाहेर पडला १. त्या धिप्पाड व प्रचंड जंबुमालीचे आंख फिरून गेले होते; समरांगणामध्यें त्याचा पराजय होणें दुर्घट होतें; आरक्तवर्ण पुष्पें व वस्त्र, मनोहर कुंडलें आणि माला त्यानें धारण केल्या होत्या २. इंद्रधनुष्यासारखें मोठें, मनोहर बाणांनीं युक्त आणि वज्राप्रमाणें व विद्युल्लतेप्रमाणें गर्जना करणारें असें मोठें धनुष्य घेऊन तो तसा चमत्कार करूं लागला असतां ३ धनुष्याच्या त्या प्रचंड टणत्कारानें दिशा, उपदिशा आणि आकाश हीं एकदम दणाणून गेलीं ४. इतक्यांत गर्दभ जोडिलेल्या रथावर आरूढ होऊन आलेल्या त्या जंबुमालीला अवलोकन करतांक्षणीं वेगवान् हनुमानाला हर्ष झाला

तं तोरणविटङ्कस्थं हनूमन्तं महाकपिम् । जम्बुमाली महातेजा विव्याध
निशितैः शरैः ६ अर्धचन्द्रेण वदने शिरस्येकेन कर्णिना । बाह्वोर्विव्याध
नाराचैर्दशभिस्तु कपीश्वरम् ७ तस्य तच्छुशुभे ताम्रं शरेणाभिहतं मुखम् ।
शरदीवाम्बुजं फुल्लं विद्धं भास्कररश्मिना ८ तत्तस्य रक्तं रक्तेन रञ्जितं शुशुभे
मुखम् । यथाकाशे महापद्मं सिक्तं काञ्चनबिन्दुभिः ९ चुकोप बाणा-
भिहतो राक्षसस्य महाकपिः । ततः पार्श्वेऽतिविपुलां ददर्श महतीं
शिलाम् १० तरसा तां समुत्पाट्य चिक्षेप जववद्बली । तां शरैर्दशभिः
क्रुद्धस्ताडयामास राक्षसः ११ विपन्नं कर्म तद्दृष्ट्वा हनूमांश्चण्डविक्रमः ।
सालं विपुलमुत्पाट्य भ्रामयामास वीर्यवान् १२ भ्रामयन्तं कपिं दृष्ट्वा
सालवृक्षं महाबलम् । चिक्षेप सुबहून्बाणाञ्जम्बुमाली महाबलः १३ सालं
चतुर्भिश्चिच्छेद वानरं पञ्चभिर्भुजे । उरस्येकेन बाणेन दशभिस्तु स्तना-
न्तरे १४ स शरैः पूरिततनुः क्रोधेन महता वृतः । तमेव परिघं गृह्य

---

व तो गर्जना करूं लागला ५. तदनंतर कमानीखालच्या दोन खांबावरील आडव्या लांक-
डावर बसलेल्या त्या महाकपि हनुमानाला महातेजस्वी जंबुमालीनें तीक्ष्ण बाणांनीं वेध
केला ६. सारांश, जंबुमालीनें अर्धचंद्रबाणानें हनुमानाच्या मुखाचे ठिकाणीं वेध
केला; एका करणी बाणानें मस्तकाचे ठिकाणीं त्यानें वेध केला आणि दहा बाणांनीं
त्यानें त्या वानराधिपतीच्या बाहूंचे ठिकाणीं वेध केला ७. तेव्हां बाणांनीं विद्ध झालेलें
तें त्या हनुमानाचें ताम्रवर्ण मुख शरदृतूमध्यें सूर्याच्या किरणानें विद्ध झालेल्या
प्रफुल्लित कमलाप्रमाणें दिसूं लागलें ८. सुवर्णबिंदूंनें ज्याच्यावर सिंचन झालें आहे
असें आकाशांतील एक मोठें कमलच कीं काय अशा रीतीनें तें त्याचें रक्तानें भरलेलें
आरक्तवर्ण मुख शोभूं लागलें ९. राक्षसांचे बाण लागल्यामुळें महाकपि हनुमान् क्रुद्ध
झाला आणि शेजारींच असलेल्या एका अति विस्तीर्ण व प्रचंड शिलेकडे त्यानें आपली
दृष्टि फेंकिली १०. नंतर ती शिला उपटून बलाढ्य हनुमानानें ती त्या जंबुमालीवर
झुगारून दिली. परंतु, क्रुद्ध राक्षसानें दहा बाणांनीं ती शिला तोडून टाकिली ११.
तेव्हां आपलें तें कर्म व्यर्थ झालेलें अवलोकन करून प्रचंड पराक्रमी वीर्यवान्
हनुमान् एक मोठा सालवृक्ष उपटून गरगर फिरवूं लागला १२. परंतु, तो
महाबलाढ्य वानर सालवृक्ष फिरवीत आहे असें पाहून महाबलाढ्य जंबुमालीनें
पुष्कळ बाण त्याच्यावर टाकिले १३. चार बाणांनीं त्यानें तो शालवृक्ष तोडून टाकिला
आणि पांच बाणांनीं हाताचे ठिकाणीं, एका बाणानें उरांत आणि दहा बाणांनीं
स्तनांमध्यें त्या वानराला वेध केला १४. ह्याप्रमाणें बाणांनीं देह भरून गेला असतां

भ्रामयामास वेगितः १५ अतिवेगोतिवेगेन भ्रामयित्वा महोत्कटः। परिघं पातयामास जम्बुमालेर्महोरसि १६ तस्य चैव शिरो नास्ति न बाहू जानुनी न च । न धनुर्न रथो नाश्वास्तत्रादृश्यन्त नेषवः १७ स हतस्तरसा तेन जम्बुमाली महारथः । पपात निहतो भूमौ चूर्णिताङ्ग इव द्रुमः १८ जम्बुमालिं सुनिहितं किङ्करांश्च महाबलान् । चुक्रोध रावणः श्रुत्वा क्रोधसंरक्तलोचनः १९ स रोषसंवर्तिततामलोचनः प्रहस्तपुत्रे निहते महाबले। अमात्यपुत्रानतिवीर्यविक्रमान्समादिदेशाशु निशाचरेश्वरः२०[१८७०]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ॥ ४४ ॥

ततस्ते राक्षसेन्द्रेण चोदिता मन्त्रिणः सुताः । निर्ययुर्भवनात्तस्मात्सप्त सप्तार्चिवर्चसः १ महद्बलपरीवारा धनुष्मन्तो महाबलाः । कृतास्त्रास्त्रविदां श्रेष्ठाः परस्परजयैषिणः २ हेमजालपरिक्षिप्तैर्ध्वजवद्भिः

---

तो हनुमान् अतिशय क्रुद्ध झाला आणि तोच परिघ हातांत घेऊन वेगावेगानें फिरवूं लागला १५. नंतर त्या अति वेगवान् व महाबलाढ्य हनुमानानें अतिशय वेगानें तो परिघ फिरवून जंबुमालीच्या विशाल वक्षस्थलावर फेंकिला असतां १६ त्या जंबुमालीचें मस्तक, हात, पाय, धनुष्य, रथ, वाहनें आणि बाण ह्यांपैकीं कशाचाच मागमूस राहिला नाहीं १७. सारांश, परिघाच्या त्या वेगानें महारथि जंबुमाली वध पावला आणि शाखा व उपशाखा वगैरेंचा चुराडा होऊन पडलेल्या वृक्षाप्रमाणें भूमीवर पडला १८. नंतर महाबलाढ्य सेवक आणि जंबुमाली ह्यांचा वध झाल्याचें श्रवण करून रावण क्रुद्ध झाला व क्रोधामुळें त्याचे नेत्र आरक्तवर्ण होऊन गेले १९. तात्पर्य, महाबलाढ्य प्रहस्तपुत्र जंबुमाली वध पावला असतां निशाचराधिपति रावणाचे नेत्र क्रोधानें लाल होऊन गेले आणि त्यानें तत्क्षणींच अतिवीर्यवान् व अतिपराक्रमी अमात्यपुत्रांना युद्धाला जाण्याची आज्ञा केली २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

तदनंतर राक्षसाधिपति रावणानें आज्ञा केली असतां ते अग्नीसारखे तेजस्वी सात मंत्रिपुत्र त्या राजवाड्यांतून बाहेर निघाले १. त्यांच्याबरोबर सैन्याचा मोठा परिवार होता; त्यांनीं धनुष्यें धारण केलीं होतीं; ते मोठे बलाढ्य होते; अस्त्रविद्या त्यांना केवल अवगतच नसून ते अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होते आणि जय प्राप्त करून घेण्याविषयीं ते एकमेकांशीं चढाओढ करीत होते २. सुवर्णजालानें आच्छादित ध्वज

पताकिभिः । तोयदस्वननिर्घोषैर्वाजियुक्तैर्महारथैः ३ तप्तकाञ्चनचित्राणि चापान्यमितविक्रमाः । विस्फारयन्तः संहृष्टास्तडिद्वन्त इवाम्बुदाः ४ जनन्यस्तास्ततस्तेषां विदित्वा किङ्करान्हतान् । बभूवुः शोकसंभ्रान्ताः सबान्धवसुहृज्जनाः ५ ते परस्परसङ्घर्षास्तप्तकाञ्चनभूषणाः । अभिपेतुर्हनूमन्तं तोरणस्थमवस्थितम् ६ सृजन्तो बाणवृष्टिं ते रथगर्जितनिःस्वनाः । प्रावृट्काल इवाम्भोदा विचेरुर्नैर्ऋताम्बुदाः ७ अवकीर्णस्ततस्ताभिर्हनूमाञ्शरवृष्टिभिः । अभवत्संवृताकारः शैलराडिव वृष्टिभिः ८ स शरान्वञ्चयामास तेषामाशुचरः कपिः । रथवेगांश्च वीराणां विचरन्विमलेम्बरे ९ स तैः क्रीडन्धनुष्मद्भिर्व्योम्नि वीरः प्रकाशते । धनुष्मद्भिर्यथा मेघैर्मारुतः प्रभुरम्बरे १० स कृत्वा निनदं घोरं त्रासयंस्तां महाचमूम् । चकार हनुमान्वेगं तेषु रक्षःसु वीर्यवान् ११ तलेनाभिहनत्कांश्चित्पद्भिः कांश्चित्परन्तपः । मुष्टिभिश्चाहनत्कांश्चिन्नखैः कांश्चिद्व्यदारयत् १२

---

व पताका ह्यांनीं युक्त आणि अश्व जोडिलेल्या आणि मेघांप्रमाणें गर्जना करणाऱ्या मोठ्या मोठ्या रथांवर ३ ते अतुलपराक्रमी मंत्रिपुत्र आरूढ झाले होते; आणि आनंदित होऊन तप्त सुवर्णानें मढविलेल्या धनुष्यांचा टणत्कार करूं लागल्यामुळें विद्युल्लतेनें युक्त असे मेघच कीं काय असे ते दिसूं लागले ४. असो. तदनंतर रावणाच्या सेवकांचा वध झाल्याचें श्रवण करून त्या मंत्रिपुत्रांच्या माता, बांधव आणि सुहृज्जन ह्यांसहवर्तमान शोकाकुल झाल्या ५; व इकडे प्रथम जय प्राप्त करून घेण्याविषयीं एकमेकांशीं स्पर्धा करीत असलेले आणि उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें धारण केलेले मंत्रिपुत्र दरवाजावर बसलेल्या हनुमानावर चालून गेले ६. रथघोषरूप ध्वनीनें युक्त असलेले ते राक्षसरूप मेघ बाणवृष्टि करूं लागले असतां पर्जन्यकालीं वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें दिसूं लागले ७ आणि त्यां बाणवृष्टींनीं हनुमान् व्याप्त झाला असतां पर्जन्यवृष्टींनीं आच्छादित झालेल्या पर्वतराजाप्रमाणें दिसूं लागला ८. ( राक्षस हनुमानावर बाणवृष्टि करूं लागले; ) परंतु, सत्वर गतीनें युक्त असलेल्या त्या हनुमानानें निर्मल आकाशामध्यें संचार करितां करितां त्या वीरांचे रथवेग व बाण चुकविण्यास आरंभ केला ९; आणि ह्याप्रमाणें तो समर्थ वीर हनुमान् त्या धनुर्धारी राक्षसांसहवर्तमान क्रीडा करूं लागला असतां इंद्रधनुष्यांनीं युक्त असलेल्या मेघांशीं युद्ध करणाऱ्या वायूप्रमाणें दिसूं लागला १०. तदनंतर त्या प्रचंड सेनेला त्रस्त करण्याकरितां भयंकर गर्जना करून तो वीर्यवान् हनुमान् वेगावेगानें त्या राक्षसांवर धांवून गेला ११. त्या शत्रुतापन हनुमानानें कोणाला चपराका मारूनच परलोक दाख-

प्रममाथोरसा कांश्चिदूरुभ्यामपरानपि । केचित्तस्यैव नादेन तत्रैव पतिता भुवि १३ ततस्तेष्ववपन्नेषु भूमौ निपतितेषु च । तत्सैन्यमगमत्सर्वं दिशो दश भयार्दितम् १४ विनेदुर्विस्वरं नागा निपेतुर्भुवि वाजिनः । भग्ननीडध्वजच्छत्रैर्भूश्च कीर्णाभवद्रथैः १५ स्रवता रुधिरेणाथ स्रवन्त्यो दर्शिताः पथि । विविधैश्च स्वनैर्लङ्का ननाद विकृतं तदा १६ स तान्प्रवृद्धान्विनिहत्य राक्षसान्महाबलश्चण्डपराक्रमः कपिः । युयुत्सुरन्यैः पुनरेव राक्षसैस्तदेव वीरोभिजगाम तोरणम् १७ [ १८८७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ॥४५॥

हतान्मन्त्रिसुतान्बुद्ध्वा वानरेण महात्मना । रावणः संवृताकारश्चकार मतिमुत्तमाम् १ स विरूपाक्षयूपाक्षौ दुर्धरं चैव राक्षसम् । प्रघसं भासकर्णं च पञ्चसेनाग्रनायकान् २ संदिदेश दशग्रीवो वीरान्नयविशारदान् । हनूमद्ग्रहणेऽव्यग्रान्वायुवेगसमान्युधि ३ यात सेनाग्रगाः सर्वे महाबल-

---

विला; कोणाची वृक्षांच्या योगानें संभावना केली; कोणाला बुक्या मारूनच त्यानें मृत्युलोकच्या यात्रेंतून मुक्त केलें आणि कोणाला नखांनींच फाडून टाकिलें १२. वक्षस्थलानें ताडन करूनच त्यानें कोणाचा वध केला; कोणाला तर त्यानें पादप्रहारानेंच परलोकीं पाठविलें आणि कांहीं त्याच्या गर्जनेमुळें तेथल्यातेथेंच भूमीवर पडले १३. ह्याप्रमाणें ते राक्षस कांहीं उलथून पडले असतां व कांहीं तसेच भूमीवर पडले असतां भयभीत झालेलें तें सर्वही सैन्य वाट फुटेल तिकडे पळून गेलें १४. गज भेसूर गर्जना करूं लागले, अश्व भूमीवर पडले आणि ध्वज, छत्र व उपवेशनस्थान हीं ज्यांचीं भग्न झालीं आहेत अशा रथांनीं ती रणभूमि आच्छादित झाली १५. राक्षसांच्या शरीरांतून रक्त वाहूं लागल्यामुळें मार्गामध्यें रक्ताच्या नद्याच दृष्टीं पडूं लागल्या; आणि नानाप्रकारच्या शब्दांनीं लंका भेसूर शब्द करूं लागली ?१६. सारांश, तो महाबलाढ्य व प्रचंडपराक्रमी वीर वानर त्या मत्त राक्षसांचा वध करून इतर राक्षसांशीं युद्ध करण्याकरितां पुनरपि त्या दरवाजावरच जाऊन बसला १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४५ ॥

महात्म्या वानरानें मंत्रिपुत्रांचा वध केला असें समजल्यावर अंतःकरणांत भेदरून गेलेल्या रावणानें ( आपल्या समजुतीप्रमाणें ) एक उत्कृष्ट विचार मनामध्यें आणिला १. विरूपाक्ष, यूपाक्ष, दुर्धर राक्षस, प्रघस आणि भासकर्ण अशा पांच कर्तव्यदक्ष सेनाधिपतींना त्या रावणानें हनुमानाला धरण्याविषयीं आज्ञा केली. ते

परिग्रहाः । सवाजिरथमातङ्गाः स कपिः शास्यतामिति ४ यत्तैश्च खलु भाव्यं स्यात्तमासाद्य वनालयम् । कर्म चापि समाधेयं देशकालाविरोधितम् । नह्यहं तं कपिं मन्ये कर्मणा प्रतितर्कयन् ५ सर्वथा तन्महद्भूतं महाबलपरिग्रहम् । वानरोयमिति ज्ञात्वा न हि शुध्यति मे मनः ६ नैवाहं तं कपिं मन्ये यथेयं प्रस्तुता कथा । भवेदिन्द्रेण वा सृष्टमस्मदर्थं तपोबलात् ७ सनागयक्षगन्धर्वदेवासुरमहर्षयः । युष्माभिः प्रहितैः सर्वैर्मया सह विनिर्जिताः ८ तैरवश्यं विधातव्यं व्यलीकं किंचिदेव नः । तदेव नात्र संदेहः प्रसह्य परिगृह्यताम् ९ यात सेनाग्रगाः सर्वे महाबलपरिग्रहाः । सवाजिरथमातङ्गाः स कपिः शास्यतामिति १० नावमन्यो भवद्भिश्च कपिर्धीरपराक्रमः । दृष्टा हि हरयः शीघ्रं मया विपुलविक्रमाः ११ वाली च सहसुग्रीवो जाम्बवांश्च महाबलः । नीलः सेनापतिश्चैव ये चान्ये द्विविदादयः १२ नैव तेषां गतिर्भीमा न तेजो न पराक्रमः ।

---

वीर सेनाधिपति युक्तिमान् होते आणि युद्धामध्यें वेगानें वायूशीं बरोबरी करणारे होते २,३. ( तो ह्मणाला ) " हे सेनाधिपतींनो, तुह्मी सर्वेही मोठें सैन्य आणि अश्व, रथ व गज बरोबर घेऊन जा आणि त्या वानराचा समाचार घ्या ४. त्या वनचर वानराची गांठ पडल्यावर तुह्मी दक्षतेनें असा आणि देशकालाकडे दृष्टि देऊन जें काय करावयाचें असेल तें करा ५. त्याच्या कृतीवरून मी तर्क करूं लागलों ह्मणजे तो वानर असावा असें मला वाटत नाहीं. प्रचंड सामर्थ्यानें युक्त असें तें एक मोठें भूतच आहे. हा वानर असावा असें माझें मन घेत नाहीं ६. सारांश, ही जी मीं आतां हकीकत सांगितली ह्यावरून तो वानर असावा असें मला मुळींच वाटत नाहीं. कदाचित् इंद्रानें तपःसामर्थ्यानें आमच्याकरितां हें एक भूत उत्पन्न केलें असेल ७. कारण, ज्याअर्थी नाग, यक्ष, गंधर्व, देव, असुर आणि महर्षि ह्यांचा मी तुह्मां सर्वांना पाठवून पराजय केला आहे त्याअर्थी ८ ते आमची कांहीं तरी खोडी काढणारच ह्याविषयीं मुळींच संशय नाहीं. तस्मात्, तुह्मी बलात्कारानें त्याला धरा ९. तात्पर्य, त्या वानराला शासन झालें पाहिजे, एतदर्थ तुह्मी सर्व सेनापति मोठें सैन्य आणि अश्व, रथ व गज घेऊन तिकडे जा १०. त्या महापराक्रमी वानराची तुह्मी उपेक्षा करूं नका. महापराक्रमी वानर मीं पुष्कळ अवलोकन केले आहेत ११. उदाहरणार्थ, सुग्रीवासहवर्तमान वाली, महाबलाढ्य जांबवान्, सेनाधिपति नील आणि द्विविदप्रभृति इतरही वानर मीं अवलोकन केले आहेत १२. परंतु, ह्याच्याप्रमाणें त्यांची भयंकर गति नाहीं, तेज नाहीं, पराक्रम

न मतिर्न बलोत्साहो न रूपपरिकल्पनम् १३ महत्सत्त्वमिदं ह्येवं कपिरूपं व्यवस्थितम् । प्रयत्नं महदास्थाय क्रियतामस्य निग्रहः १४ कामं लोकास्त्रयः सेन्द्राः ससुरासुरमानवाः । भवतामग्रतः स्थातुं न पर्याप्ता रणाजिरे १५ तथापि तु नयज्ञेन जयमाकाङ्क्षता रणे । आत्मा रक्ष्यः प्रयत्नेन युद्धसिद्धिर्हि चञ्चला १६ ते स्वामिवचनं सर्वे प्रतिगृह्य महौजसः । समुत्पेतुर्महावेगा हुताशसमतेजसः १७ रथैश्च मत्तैर्नागैश्च वाजिभिश्च महाजवैः । शस्त्रैश्च निशितैस्तीक्ष्णैः सर्वैश्चोपहिता बलैः १८ ततस्तु ददृशुर्वीरा दीप्यमानं महाकपिम् । रश्मिमन्तमिवोद्यन्तं स्वतेजोरश्मिमालिनम् १९ तोरणस्थं महावेगं महासत्त्वं महाबलम् । महामतिं महोत्साहं महाकायं महाभुजम् २० तं समीक्ष्यैव ते सर्वे दिक्षु सर्वास्ववस्थिताः । तैस्तैः प्रहरणैर्भीमैरभिपेतुस्ततस्ततः २१ तस्य पञ्चायसास्तीक्ष्णाः सिताः पीतमुखाः शराः । शिरस्युत्पलपत्राभा दुर्धरेण निपातिताः २२ स तैः पञ्चभिराविद्धः शरैः शिरसि वानरः ।

---

नाहीं, बुद्धि नाहीं, बल नाहीं, उत्साह नाहीं आणि ह्याच्याप्रमाणें यथेष्ट रूपही त्यांना धारण करितां येत नाहीं १३. वानररूपानें हें एक मोठें भूतच उपस्थित झालें आहे असेंच समजलें पाहिजे. तस्मात्, मोठ्या यत्नानें तुह्मी ह्याला धरा १४. देव, दैत्य, मानव आणि इंद्र ह्यांसहवर्तमान त्रैलोक्य सुद्धां खरोखर संग्रामामध्यें तुमच्यासमोर टिकाव धरण्यास जरी समर्थ नाहीं १५ तरी, रणामध्यें जय इच्छिणाऱ्या नीतिवेत्त्या पुरुषानें स्वतःचें रक्षण प्रयत्नानें केलें पाहिजे. कारण, युद्धामध्यें जय कोणाला प्राप्त होणार हें अनिश्चित असतें " १६. आपल्या स्वामीचें भाषण मान्य करून ते सर्वही महाबलाढ्य, महावेगवान् आणि अग्नीसारिखे तेजस्वी सेनाधिपति तेथून उडाले १७. रथ, मत्त गज, महावेगवान् अश्व, धार लाविलेलीं तीक्ष्ण शस्त्रें आणि सर्व प्रकारचीं सैन्यें बरोबर घेऊन १८ ते वीर तिकडे गेले असतां तो देदीप्यमान् महाकपि त्यांनीं अवलोकन केला. स्वतःचेच ठिकाणीं असलेल्या प्रभेच्या किरणसमुदायानें युक्त असल्यामुळें तो वानर उदयाचलावर येत असलेल्या सूर्याप्रमाणें दिसत होता १९. प्रचंड वेग, अनुपम धैर्य, अतर्क्य सामर्थ्य, लोकोत्तर बुद्धि, अद्वितीय उत्साह, अनिर्वचनीय देह व अतुल पराक्रम ह्यांनीं युक्त असलेला तो कपि दरवाजावर बसला होता २०. त्याला अवलोकन करितांक्षणीं ते सर्व दिशेस उभे असलेले राक्षस नानाप्रकारच्या भयंकर अस्त्रांसहवर्तमान चोहोंकडून त्याच्या अंगावर धांवले २१; व प्रथमतः दुर्धर राक्षसानें त्याच्या मस्तकावर मुखाशीं पीतवर्ण असलेले पांच श्वेतवर्ण व तीक्ष्ण बाण टाकिले;

उत्पपात नदन्व्योम्नि दिशो दश विनादयन् २३ ततस्तु दुर्धरो वीरः सरथः सज्जकार्मुकः । किरञ्शरशतैर्नैकैरभिपेदे महाबलः २४ स कपिर्वारयामास तं व्योम्नि शरवर्षिणम् । वृष्टिमन्तं पयोदान्ते पयोदमिव मारुतः २५ अर्द्यमानस्ततस्तेन दुर्धरेणानिलात्मजः । चकार निनदं भूयो व्यवर्धत च वीर्यवान् २६ स दूरं सहसोत्पत्य दुर्धरस्य रथे हरिः । निपपात महावेगो विद्युद्राशिर्गिराविव २७ ततः स मथिताष्टाश्वं रथं भग्नाक्षकूबरम् । विहाय न्यपतद्भूमौ दुर्धरस्त्यक्तजीवितः २८ तं विरूपाक्षयूपाक्षौ दृष्ट्वा निपतितं भुवि । तौ जातरोषौ दुर्धर्षावुत्पेततुररिन्दमौ २९ स ताभ्यां सहसोत्प्लुत्य विष्ठितो विमलेम्बरे । मुद्गराभ्यां महाबाहुर्वक्षस्यभिहतः कपिः ३० तयोर्वेगवतोर्वेगं निहत्य स महाबलः । निपपात पुनर्भूमौ सुपर्ण इव वेगितः ३१ स सालवृक्षमासाद्य समुत्पाट्य च वानरः । तावुभौ राक्षसौ

---

परंतु, ते त्याला कमलपत्रांप्रमाणेंच निरुपद्रवी भासले२२. त्या पांच बाणांनीं ह्याप्रमाणें तो वानर मस्तकाचे ठिकाणीं ताडित झाला असतां गर्जनेनें दश दिशा दणाणून टाकीत टाकीत त्यानें आकाशामध्यें उड्डाण केलें २३. तदनंतर धनुष्य सज्ज करून रथावर आरूढ झालेला महाबलाढ्य वीर दुर्धर शेंकडों बाण टाकीत टाकीत हनुमानाच्या जवळ आला२४. परंतु, वर्षाकाल संपत आला असतां पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाला ज्याप्रमाणें वायु उडवून देतो त्याप्रमाणें बाणवृष्टि करणाऱ्या त्या दुर्धराला त्या कपीनें आकाशामध्यें असतांनाच उडवून दिलें २५. तथापि, दुर्धर पीडा देऊं लागला असतां त्या वायुपुत्र वीर्यवान् हनुमानानें गर्जना करून आणखीही आपलें शरीर वृद्धिंगत केलें २६. इतकेंच नव्हे; परंतु, विजेचा लोळ ज्याप्रमाणें समुद्रावर पडतो त्याप्रमाणें तो महावेगवान् वानर एकाएकीं दुर्धराच्या रथावर पडला २७. तेव्हां त्या रथाचे आठही अश्वांचा चुराडा झाला; दांडीही मोडून गेली; कण्याचेही तुकडे तुकडे झाले आणि अशा प्रकारच्या त्या रथांतून तो दुर्धर गतप्राण होऊन भूमीवर पडला २८. ह्याप्रमाणें भूमीवर पडलेल्या त्या दुर्धराला अवलोकन केल्यावर शत्रूला जेरीस आणणारे ते अजिंक्य विरूपाक्ष व यूपाक्ष क्रुद्ध झाले आणि त्यांनीं उड्डाण केलें २९. इतकेंच नव्हे; परंतु, एकाएकीं उड्डाण करून त्या राक्षसांनीं निर्मल आकाशामध्यें असलेल्या महापराक्रमी हनुमान् वानराला वक्षस्थलाचे ठिकाणीं मुद्गरांच्या योगानें प्रहारही केला ३०. तथापि, त्या महाबलाढ्य वानरानें आपल्या वज्रतुल्य वक्षस्थलानें त्या वेगवान् मुद्गरांचा वेग व्यर्थ केला आणि गरुडासारिखा वेग धारण करून त्यानें पुनरपि भूमीवर उडी टाकिली ३१. नंतर एका सालवृक्षासमीप जाऊन तो

वीरौ जघान पवनात्मजः ३२ ततस्तांस्त्रीन्हतान्ज्ञात्वा वानरेण तरस्विना । अभिगम्य महावेगः प्रहस्य प्रघसो बली ३३ भासकर्णश्च संक्रुद्धः शूलमादाय वीर्यवान् । एकतः कपिशार्दूलं यशस्विनमवस्थितौ ३४ पट्टिशेन शिताग्रेण प्रघसः प्रत्यपोथयत् । भासकर्णश्च शूलेन राक्षसः कपिकुञ्जरम् ३५ स ताभ्यां विक्षतैर्गात्रैरसृग्दिग्धतनूरुहः । अभवद्वानरः क्रुद्धो बालसूर्यसमप्रभः ३६ समुत्पाट्य गिरेः शृङ्गं समृगव्यालपादपम् । जघान हनुमान्वीरो राक्षसौ कपिकुञ्जरः ३७ गिरिशृङ्गसुनिष्पिष्टौ तिलशस्तौ बभूवतुः ३८ ततस्तेष्ववसन्नेषु सेनापतिषु पञ्चसु । बलं तदवशेषं तु नाशयामास वानरः ३९ अश्वैरश्वान्गजैर्नागान्योधैर्योधान्रथै रथान् । स कपिर्नाशयामास सहस्राक्ष इवासुरान् ४० हयैर्नागैस्तुरङ्गैश्च भग्नाक्षैश्च महारथैः । हतैश्च राक्षसैर्भूमी रुद्धमार्गा समन्ततः ४१ ततः कपिस्तान्ध्वजिनीपतीन्रणे निहत्य वीरान्सबलान्सवाहनान् । तथैव वीरः परिगृह्य तोरणं

---

उपटून त्या वायुपुत्र वानरानें त्या उभयतां वीर राक्षसांचा वध केला ३२. तदनंतर (दुर्धर, विरूपाक्ष आणि यूपाक्ष अशा) त्या तिघांचा बलाढ्य वानरानें वध केला असें जाणून महावेगवान् बलाढ्य प्रघस हास्य करून एका बाजूनें हनुमानाच्या जवळ जाऊन उभा राहिला ३३; आणि क्रुद्ध झालेला वीर्यवान् भासकर्णही हातामध्यें शूल घेऊन त्या यशस्वी वानरश्रेष्ठाच्या दुसऱ्या बाजूला उभा राहिला ३४. प्रघसानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या पट्टयानें वानरश्रेष्ठ हनुमानाला वार केला आणि भासकर्ण राक्षसानें त्याला शूलानें प्रहार केला ३५. ह्याप्रमाणें त्या उभयतां राक्षसांनीं शरीराला क्षतें पाडिल्यामुळें ज्याचे केंस रक्तानें भरून गेले आहेत असा तो क्रुद्ध झालेला वानर बालसूर्यासारिखा दिसूं लागला ३६; आणि मृग, श्वापदें व वृक्ष ह्यांसहवर्तमान एक पर्वताचें शिखर उपटून घेऊन वानरश्रेष्ठ वीर हनुमानानें दोन्हीही राक्षसांना प्रहार केला असतां ३७ पर्वत शिखराच्या तडाक्यानें चिरडून गेलेल्या त्या राक्षसांचे तिलप्राय तुकडे तुकडे होऊन गेले ३८. ह्याप्रमाणें ते पांचही सेनापति जमीनदोस्त झाले असतां अवशिष्ट राहिलेल्या त्या राक्षससेनेचा हनुमान् वानरानें वध केला ३९. सहस्रनयन इंद्र ज्याप्रमाणें दैत्यांचा नाश करितो त्याप्रमाणें त्या कपीनें अश्वांच्या योगानें अश्वांचा, गजांच्या योगानें गजांचा, योद्ध्यांच्या योगानें योद्ध्यांचा आणि रथांच्या योगानें रथांचा नाश करून टाकिला ४०; व वध पावलेले राक्षस, शीघ्र गमन करणारे अश्व व गज आणि कणे मोडून गेलेले मोठे मोठे रथ ह्यांच्या योगानें त्या रणभूमींतील सर्वही मार्ग बंद होऊन गेले ४१. सारांश, ह्याप्रमाणें सेना आणि

कृतक्षणः काल इव प्रजाक्षये ४२ [ १९२९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

सेनापतीन्पञ्च स तु प्रमापितान्हनूमता सानुचरान्सवाहनान् । निशम्य राजा समरोद्धतोन्मुखं कुमारमक्षं प्रसमैक्षताक्षम् १ स तस्य दृष्ट्यर्पणसंप्रचोदितः प्रतापवान्काञ्चनचित्रकार्मुकः । समुत्पपाताथ सदस्युदीरितो द्विजातिमुख्यैर्हविषेव पावकः २ ततो महान्बालदिवाकरप्रभं प्रतप्तजाम्बूनदजालसन्ततम् । रथं समास्थाय ययौ स वीर्यवान्महाहरिं तं प्रति नैर्ऋतर्षभः ३ ततस्तपःसंग्रहसंचयार्जितं प्रतप्तजाम्बूनदजालचित्रितम् । पताकिनं रत्नविभूषितध्वजं मनोजवाष्टाश्ववरैः सुयोजितम् ४ सुरासुराधृष्यमसङ्गचारिणं तडित्प्रभं व्योमचरं समाहितम् । सतूणमष्टासिनिबद्धबन्धुरं यथाक्रमावेशितशक्तितोमरम् ५ विराजमानं प्रतिपूर्णवस्तुना

---

वाहनें ह्यांसहवर्तमान त्या वीर सेनाधिपतींचा संग्रामामध्यें वध केल्यावर तो वीर हनुमान् वानर, प्रजेचा संहार केल्यानंतर विश्रांति घेत बसणाऱ्या कालाप्रमाणेंच कीं काय, त्या द्वाराचा आश्रय करून विश्रांति घेत पडला ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

हनुमानानें वाहनें व अनुयायी ह्यांसहवर्तमान पांचही सेनापतींचा वध केल्याचें ऐकून संग्रामामध्यें भयंकर आणि युद्धाविषयीं उत्सुक अशा तेथें प्रत्यक्ष असलेल्या अक्षनामक राक्षसपुत्राला राक्षसराज रावणानें नेत्रसंकेतानें सुचविलें १; आणि त्या रावणाच्या नेत्रसंकेतानें जाण्याची आज्ञा ज्याला झाली आहे असा तो सुवर्णानें शृंगारिलेलें धनुष्य हातांत घेऊन तयार असलेला प्रतापी अक्ष, यज्ञमंडपामध्यें द्विजश्रेष्ठांनीं आज्याच्या योगानें प्रज्वलित केलेला अग्निच कीं काय अशा रीतीनें, तेथून उडाला २. तदनंतर बालसूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे आणि उत्कृष्ट सुवर्णभूषणसमुदायानें जो व्याप्त झालेला आहे अशा रथावर आरूढ होऊन तो प्रचंड राक्षसश्रेष्ठ वीर्यवान् अक्ष त्या महाकपीकडे निघाला ३. तात्पर्य, तपश्चर्येच्या समृद्धीमुळें जो प्राप्त झाला आहे; उत्कृष्ट सुवर्णाच्या भूषणसमुदायानें जो शृंगारिलेला आहे; पताका, रत्नविभूषित ध्वज आणि मनाप्रमाणें वेगवान् श्रेष्ठ अश्व ह्यांनीं जो युक्त आहे ४; ज्याच्यावर देवदैत्यांचा हल्ला होणें दुर्घट आहे; ज्याची गति कोठेंही कुंठित होत नाहीं; विद्युल्लतेसारखी ज्याची प्रभा आहे; युद्धसामुग्रीनें युक्त असून जो आकाशमार्गानें संचार करणारा आहे; ज्याच्यावर भाते ठेविले आहेत; ज्याच्या आठही बाजूस

महमदाम्ना शशिसूर्यवर्चसा ।दिवाकराभं रथमास्थितस्ततः स निर्जगामा-
मरतुल्यविक्रमः ६ स पूरयन्खं च महीं च साचलां तुरङ्गमातङ्ग-
महारथस्वनैः । बलैः समेतैः सह तोरणस्थितं समर्थमासीनमुपा-
गमत्कपिम् ७ स तं समासाद्य हरिं हरीक्षणो युगान्तकालाग्निमिव प्रजाक्षये।
अवस्थितं विस्मितजातसंभ्रमं समैक्षताक्षो बहुमानचक्षुषा ८ स तस्य वेगं
च कपेर्महात्मनः पराक्रमं चारिषु रावणात्मजः । विचारयन्स्वं च बलं
महाबलो युगक्षये सूर्य इवाभिवर्धत ९ स जातमन्युः प्रसमीक्ष्य विक्रमं
स्थितः स्थिरः संयति दुर्निवारणम् । समाहितात्मा हनुमन्तमाहवे प्रचो-
दयामास शितैः शरैस्त्रिभिः १० ततः कपिं तं प्रसमीक्ष्य गर्वितं जितश्रमं
शत्रुपराजयोचितम् । अवैक्षताक्षः समुदीर्णमानसं सबाणपाणिः प्रगृही-
तकार्मुकः ११ स हेमनिष्काङ्गदचारुकुण्डलः समाससादाशुपराक्रमः

---

तरवारी लटकविलेल्या आहेत; शक्ति व तोमर हीं आयुधें ज्यावर योग्य ठिकाणीं ठेवि-लेलीं आहेत ५; सोन्याच्या कड्यांना अडकाविलेल्या आणि चंद्रसूर्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या युद्धोपयोगी वस्तूंनीं जो झळकत आहे आणि सूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे अशा रथावर आरूढ होऊन तो देवतुल्यपराक्रमी अक्ष लंकेंतून बाहेर पडला ६; अश्व, गज आणि मोठे मोठे रथ ह्यांच्या ध्वनींनीं आकाश व पर्वतांसह्वर्तमान पृथ्वी दणाणून टाकीत टाकीत तो अक्ष राक्षस एकत्र जुळलेल्या सैन्यासहवर्तमान द्वारावर बसलेल्या त्या समर्थ वानरासमीप गेला ७. सिंहाप्रमाणें क्रोधदृष्टीनें युक्त असलेला तो अक्ष त्या वानरासमीप जाऊन ऐटीनें पाहूं लागला असतां प्रजेच्या संहारानंतर बसलेला प्रलयकालचा अग्निच कीं काय असा तो हनुमान् विस्मयचकित व क्षुब्ध होऊन बसलेला त्यानें अवलोकन केला ८. तद-नंतर शत्रूंचे ठिकाणीं गाजलेल्या त्या महात्म्या वानराचा पराक्रम आणि वेग व स्वतःचें बल हीं लक्षांत आणून तो महाबलाढ्य रावणपुत्र अक्ष प्रलय-कालीं वृद्धिंगत होणाऱ्या सूर्याप्रमाणें वृद्धिंगत झाला ९. संग्रामामध्यें निवारण होण्यास अशक्य असा त्या हनुमानाचा पराक्रम पाहून क्रुद्ध झालेला तो अक्ष स्वस्थ उभा राहिला; आणि मनामध्यें यत्किंचितही गोंधळून न जातां तीक्ष्ण अशा तीन बाणांनीं हनुमानाला त्यानें युद्धाकरितां प्रेरणा केली १०. तदनंतर हनुमान् वानर शत्रूचा पराजय करण्यास समर्थ, श्रम जिंकिलेला व गर्विष्ट आहे असें अवलोकन केल्यावर हातांमध्यें धनुर्बाण घेतलेला तो अक्ष क्षुब्ध मनानें इकडे तिकडे पाहूं लागला ११; आणि अमोघ पराक्रम करणारा व सौवर्ण उरोभूषणें

कपिमृ । तयोर्बभूवाप्रतिमः समागमः सुरासुराणामपि संभ्रमप्रदः ॥ १२ ॥ ररास भूमिर्न तताप भानुमान्ववौ न वायुः प्रचचाल चाचलः । कपेः कुमारस्य च वीक्ष्य संयुगं ननाद च द्यौरुदधिश्च चुक्षुभे ॥ १३ ॥ स तस्य वीरः सुमुखान्पतत्रिणः सुवर्णपुङ्खान्सविषानिवोरगान् । समाधिसंयोगविमोक्षतत्त्वविच्छरानथ त्रीन्कपिमूर्धन्यताडयत् ॥ १४ ॥ स तैः शरैर्मूर्ध्नि समं निपातितैः क्षरन्नसृग्दिग्धविवृत्तनेत्रः । नवोदितादित्यनिभः शरांशुमान्व्यराजतादित्य इवांशुमालिकः ॥ १५ ॥ ततः प्लवङ्गाधिपमन्त्रिसत्तमः समीक्ष्य तं राजवरात्मजं रणे । उदग्रचित्रायुधचित्रकार्मुकं जहर्ष चापूर्यत चाहवोन्मुखः ॥ १६ ॥ स मन्दराग्रस्थ इवांशुमाली विवृद्धकोपो बलवीर्यसंवृतः । कुमारमक्षं सबलं सवाहनं ददाह नेत्राग्निमरीचिभिस्तदा ॥ १७ ॥ ततः स बाणासनशक्रकार्मुकः शरप्रवर्षो युधि राक्षसाम्बुदः । शरान्मुमोचाशु हरीश्वराचले

---

बाहुभूषण व मनोहर कुंडलें ह्यांनीं युक्त असलेला तो अक्ष त्या वानराला जाऊन भिडला असतां देवदैत्यांनाही मोह उत्पन्न करणारा असा त्या उभयतांमध्यें अप्रतिम युद्धप्रसंग झाला १२. भूमीवरील प्राणी आक्रोश करूं लागले; सूर्याचा प्रकाश पडेनासा झाला; वायु स्तब्ध झाला; पर्वत हालूं लागले आणि कपि व रावणकुमार ह्यांचें तें वीर्यामुळें प्रवृत्त झालेलें युद्ध अवलोकन करून स्वर्ग दुमदुमून राहिला व समुद्रही क्षुब्ध होऊन गेला १३. लक्ष्य, संधान व प्रयोग ह्यांचें तत्त्व जाणणाऱ्या त्या वीर अक्षानें विषयुक्त भुजंगच कीं काय असे, उत्कृष्ट अग्रें व सुवर्णाचीं पिसें ह्यांनीं युक्त असलेले तीन बाण वानराच्या मस्तकावर टाकिले १४. तेव्हां, एकदम मस्तकावर टाकिलेल्या त्या बाणांच्या योगानें ज्याचें शरीर रक्तानें भरून गेलें आहे व ज्याचे नेत्र फिरून गेले आहेत, असा तो बालसूर्यतुल्य तेजस्वी हनुमान् बाणरूप किरणांनीं युक्त झाला असल्यामुळें किरणसमुदाय धारण करणाऱ्या सूर्याप्रमाणें झळकूं लागला १५. तदनंतर राजाधिराज रावणाचा पुत्र संग्रामामध्यें आपलीं अद्भुत आयुधें व चकित करून सोडणारें धनुष्य सज्ज करून उभा असल्याचें अवलोकन केल्यावर वानरराज सुग्रीवाचा तो श्रेष्ठ मंत्री हनुमान् आनंदित झाला आणि युद्धाविषयीं उत्सुक होऊन वृद्धिंगत होऊं लागला १६. असो. मंदरपर्वताच्या शिखरावर आलेल्या ( मध्यान्हकाळच्या ) सूर्याप्रमाणें ज्याचें कोपरूप तेज वृद्धिंगत झालें आहे आणि बल व वीर्य ह्यांनीं जो युक्त आहे तो हनुमान् नेत्रस्थ अग्नीच्या किरणांनीं त्या अक्षकुमाराला सैन्य व वाहनें ह्यांसह वर्तमान दग्ध करूं लागला १७. तदनंतर मेघ ज्याप्रमाणें महापर्वतावर वृष्टि करूं लागतो त्याप्रमाणें शरासनरूप इंद्रधनुष्य व शररूप पर्जन्यवृष्टि ह्यांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसरूप मेघानें

बलाहको वृष्टिमिवाचलोत्तमे १८ कपिस्ततस्तं रणचण्डविक्रमं प्रवृद्धतेजो-
बलवीर्यसंयुतम् । कुमारमक्षं प्रसमीक्ष्य संयुगे ननाद हर्षाद्घनतुल्यनिः-
स्वनः १९ स बालभावाद्युधि वीर्यदर्पितः प्रवृद्धमन्युः क्षतजोपमेक्षणः ।
समाससादाप्रतिमं रणे कपिं गजो महाकूपमिवावृतं तृणैः २० स तेन
बाणैः प्रसभं निपातितैश्चकार नादं घननादनिःस्वनः । समुत्सहेनाशु नभः
समारुजन्भुजोरुविक्षेपणघोरदर्शनः २१ तमुत्पतन्तं समभिद्रवद्बली स
राक्षसानां प्रवरः प्रतापवान् । रथी रथिश्रेष्ठतरः किरञ्छरैः पयोधरः
शैलमिवाश्मवृष्टिभिः २२ स ताञ्छरांस्तस्य हरिर्विमोक्षयंश्चचार वीरः
पथि वायुसेविते । शरान्तरे मारुतवद्विनिष्पतन्मनोजवः संयति भीम-
विक्रमः २३ तमात्तबाणासनमाहवोन्मुखं खमास्तृणन्तं विविधैः
शरोत्तमैः । अवैक्षताक्षं बहुमानचक्षुषा जगाम चिन्तां स च मारुता-
त्मजः २४ ततः शरैर्भिन्नभुजान्तरः कपिः कुमारवर्येण महात्मना नदन् ।

---

वानराधिपतिरूप पर्वतावर जोराजोरानें बाणवृष्टि केली १८. तेव्हां, संग्राममामध्यें प्रचंड
पराक्रम करणाऱ्या आणि प्रवृद्ध तेज, बल व वीर्य ह्यांनीं युक्त असलेल्या त्या अक्ष-
कुमाराला रणामध्यें अवलोकन केल्यावर मेघासारिखी गर्जना करणारा हनुमान्
वानर हर्षानें गर्जना करूं लागला १९. बालपणामुळें युद्धाचा ज्याला गर्व झाला
आहे आणि कोप चढला असल्यामुळें ज्याचे नेत्र रक्ताच्या उपमेस पात्र झाले आहेत
असा तो अक्षकुमार तृणांनीं आच्छादित झालेल्या मोठ्या विहिरीजवळ येणाऱ्या गजा-
प्रमाणें युद्धामध्यें त्या अप्रतिम वानराजवळ आला २०. हातपाय हालवूं लागल्यामुळें
ज्याची मुद्रा भयंकर दिसूं लागली आहे व ज्याचा शब्द मेघाप्रमाणें गंभीर आहे अशा
त्या हनुमानावर त्या अक्षानें एकदम बाणांचा गहजब केला असतां त्यानें गर्जना केली
आणि उत्साहानें तो आकाशामध्यें उड्डाण करूं लागला २१. परंतु, तो हनुमान्
उड्डाण करूं लागला असतां पाषाणवृष्टीनीं पर्वत आच्छादित करणारा मेघच कीं काय
अशा रीतीनें रथावर आरूढ झालेला आणि रथ्यांमध्यें अतिशय श्रेष्ठ असलेला तो
राक्षसश्रेष्ठ बलाढ्य अक्ष बाणांनीं हनुमानाला आच्छादित करीत करीत त्याच्या अंगा-
वर धांवला २२. तेव्हां, त्याचे ते बाण व्यर्थ करण्याकरितां तो संग्रामामध्यें भयंकर परा-
क्रम करणारा व मनाप्रमाणें वेगवान् असलेला वीर हनुमान् आकाशमार्गामध्यें बाणांच्या
अंतरालांतून वायूप्रमाणें सत्वर संचार करूं लागला २३. प्रथमतः धनुष्य घेऊन आणि युद्धा-
विषयीं उत्सुक होऊन नानाप्रकारच्या उत्कृष्ट बाणांनीं आकाश व्याप्त करून टाकीत
असलेल्या त्या अक्षाकडे प्रेमानें पाहिल्यावर, तो वायुपुत्र हनुमान् चिंताक्रांत झाला २४.

महाभुजः कर्मविशेषतत्त्ववित् विचिन्तयामास रणे पराक्रमम् २५ अयमसौ बालदिवाकरप्रभः करोत्ययं कर्म महान्महाबलः । न चास्य सर्वाहवकर्मशालिनः प्रमापणे मे मतिरत्र जायते २६ अयं महात्मा च महांश्च वीर्यतः समाहितश्चातिसहश्च संयुगे । असंशयं कर्मगुणोदयादयं सनागयक्षैर्मुनिभिश्च पूजितः २७ पराक्रमोत्साहविवृद्धमानसः समीक्षते मां प्रमुखोऽग्रतः स्थितः । पराक्रमो ह्यस्य मनांसि कम्पयेत्सुरासुराणामपि शीघ्रकारिणः २८ न खल्वयं नाभिभवेदुपेक्षितः पराक्रमो ह्यस्य रणे विवर्धते । प्रमापणं ह्यस्य ममाद्य रोचते न वर्धमानोऽग्निरुपेक्षितुं क्षमः २९ इति प्रवेगं तु परस्य तर्कयन्स्वकर्मयोगं च विधाय वीर्यवान् । चकार वेगं तु महाबलस्तदा मतिं च चक्रेऽस्य वधे तदानीम् ३० स तस्य तानष्ट वरान्महाहयान्समाहितान्भारसहान्विवर्तने । जघान वीरः पथि वायुसेविते

तदनंतर कुमारश्रेष्ठ महात्म्या अक्षानें बाणांच्या योगानें ज्याचें वक्षस्थल विदीर्ण करून टाकिलें आहे अशा त्या गर्जना करणाऱ्या महापराक्रमी आणि पराक्रमांचें विशेष तत्त्व जाणणाऱ्या वानरानें संग्रामामध्यें पराक्रम करण्याचा विचार चालविला २५. ( तो म्हणाला ) " हा महाबलाढ्य प्रचंड राक्षस बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असून प्रौढाप्रमाणें कृति करीत आहे. ह्यास्तव, युद्धसंबंधीं सर्व प्रकारचे पराक्रम करीत असलेल्या ह्या राक्षसाचा आतांच वध करावा असें मला वाटत नाहीं २६. हा महात्मा वीर्यानें मोठा असून दक्ष व संग्रामामध्यें अतिशय सहनशील आहे. तस्मात्, पराक्रम व गुण ह्याचे ठिकाणीं दृष्टीं पडत असल्यामुळें नाग आणि यक्ष ह्यांसहवर्तमान मुनि निःसंशय त्याची प्रशंसा करीत असतील २७. पराक्रम आणि उत्साह ह्यांच्या योगानें ज्याचें मन विकास पावलें आहे असा हा माझ्यासमोर उभा असलेला राक्षस माझ्याकडे पहात आहे; परंतु, देवदैत्यांच्याही मनामध्यें कांपरें भरविणाऱ्या ह्या चलाख राक्षसाचा पराक्रम आहे २८. ह्याची उपेक्षा केली असतां हा आपला पराभव करण्यास कमी करणार नाहीं; संग्रामामध्यें ह्याचा पराक्रम वाढतच आहे. ह्यास्तव, आज ह्याचा वध करणें मला बरें दिसतें. कारण, वृद्धिंगत होत असलेल्या अग्नीची उपेक्षा करणें योग्य नाहीं " २९. ह्याप्रमाणें शत्रूच्या पराक्रमाचा विचार करून आणि स्वतःचाही पराक्रम मनांत आणून त्या महाबलाढ्य वीर्यवान् हनुमानानें वेगाचें अवलंबन करून त्याचवेळीं त्याचा वध करण्याचा विचार केला ३०. पश्चात् त्या वायुपुत्र वीर हनुमानानें आकाशामध्यें असतांना कोणतीही चाल लाविली तरी मोंडून न जाणाऱ्या व भार सहन करणाऱ्या त्या राक्षसाच्या मोठ्या मोठ्या

तलप्रहारैः पवनात्मजः कपिः ३१ ततस्तलेनाभिहतो महारथः स तस्य पिङ्गाधिपमन्त्रिनिर्जितः। स भग्ननीडः परिमुक्तकूबरः पपात भूमौ हतवाजिरम्बरात् ३२ स तं परित्यज्य महारथो रथं सकार्मुकः सासिधरः समुत्पतन्। ततोऽभियोगादृषिरुग्रवीर्यवान्विहाय देहं मरुतामिवालयम् ३३ कपिस्ततस्तं विचरन्तमम्बरे पतत्रिराजानिलसिद्धसेविते। समेत्य तं मारुततुल्यवेगविक्रमः क्रमेण जग्राह स पादयोर्दृढम् ३४ स तं समाविध्य सहस्रशः कपिर्महोरगं गृह्य इवाण्डजेश्वरः। मुमोच वेगात्पितृतुल्यविक्रमो महीतले संयति वानरोत्तमः ३५ स भग्नबाहूरुकटीपयोधरः क्षरन्नसृङ्निर्मथितास्थिलोचनः। संभिन्नसंधिः प्रविकीर्णबन्धनो हतः क्षितौ वायुसुतेन राक्षसः ३६ महाकपिर्भूमितले निपीड्य तं चकार रक्षोधिपतेर्महद्भयम्। महर्षिभिश्चक्रचरैः समागतैः समेत्य भूतैश्च सयक्षपन्नगैः। सुरैश्च सेन्द्रैर्भृशजातविस्मयैर्हते कुमारे स कपिर्निरीक्षितः ३७ निहत्य

---

श्रेष्ठ आठ अश्वांचा तलप्रहारांनीं वध केला ३१. तेव्हां, तळहाताचा तडाका बसण्याबरोबर रथांतील उपवेशनस्थान मोडून गेलें; दांड्याही उलथ्या झाल्या आणि अशा रीतीनें वानराधिपति सुग्रीवाच्या मंत्र्याचे हातून भग्न झालेला तो महारथ अश्व मृत झाल्यामुळें आकाशांतून भूमीवर पडला ३२. असें झालें असतां धनुष्य व खड्ग धारण करणारा तो महारथी महावीर्यवान् अक्ष त्या रथाचा त्याग करून आकाशामध्यें उड्डाण करूं लागला असतां योगसामर्थ्यानें देहत्याग करून स्वर्गारोहण करणारा ऋषिच कीं काय असा दिसला ३३. तदनंतर पक्षिराज गरुड, वायु आणि सिद्ध यांनीं अवलंबन केलेल्या आकाशामध्यें तो अक्ष संचार करूं लागला असतां तो वायूसारखा वेगवान् व पराक्रमी वानर त्याच्याशीं जाऊन भिडला आणि नंतर त्यानें त्याचे दोन्ही पाय घट्ट धरिले ३४. नंतर मोठा सर्प घेतलेला पक्षिराज गरुडच कीं काय असा त्या पितृतुल्य पराक्रमी वानरश्रेष्ठ हनुमानानें त्याला हजारों वेळां रणामध्यें गरगर फिरवून वेगानें भूतलावर टाकिलें ३५. तेव्हां, त्याचे हात, पाय, कंबर व स्तन यांचा चुराडा होऊन गेला; शरीरांतून रक्तस्राव चालला; डोळ्यांतील हाडें पिचून गेलीं; सांधे फुटून गेले; शिराही अस्ताव्यस्त झाल्या आणि अशा रीतीनें तो राक्षस वायुपुत्र हनुमानाच्या हातून भूमीवर वध पावला ३६. असो. महाकपि हनुमानानें त्याला भूतलावर आपटून राक्षसाधिपति रावणाच्या अंतःकरणांत मोठें भय उत्पन्न केलें आणि कुमाराचा वध झाला असतां एकत्र जुळलेले ग्रह, महर्षि, भूतें, यक्ष, पन्नग, आणि इंद्रासहवर्तमान देव अत्यंत विस्मयचकित होऊन त्या वानराकडे पाहूं

तं वज्रिसुतोपमं रणे कुमारमक्षं क्षतजोपमेक्षणम् । तदेव वीरोऽभि-
जगाम तोरणं कृतक्षणः काल इव प्रजाक्षये ३८ [११९६] इत्यार्षे श्रीम-
द्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥४७॥

ततस्तु रक्षोधिपतिर्महात्मा हनूमताक्षे निहते कुमारे । मनः समाधाय
स देवकल्पं समादिदेशेन्द्रजितं सरोषः १ त्वमस्त्रविच्छस्त्रभृतां वरिष्ठः
सुरासुराणामपि शोकदाता । सुरेषु सेन्द्रेषु च दृष्टकर्मा पितामहाराधन-
संचितास्त्रः २ त्वदस्त्रबलमासाद्य ससुराः समरुद्गणाः । न शेकुः समरे
स्थातुं सुरेश्वरसमाश्रिताः ३ न कश्चित्त्रिषु लोकेषु संयुगे न गतश्रमः ।
भुजवीर्याभिगुप्तश्च तपसा चाभिरक्षितः । देशकालप्रधानश्च त्वमेव मति-
सत्तमः ४ न तेऽस्त्यशक्यं समरेषु कर्मणां न तेऽस्त्यकार्यं मतिपूर्वमन्त्रणे ।
न सोऽस्ति कश्चित्त्रिषु संग्रहेषु न वेद यस्तेऽस्त्रबलं बलं च ५ ममानुरूपं
तपसो बलं च ते पराक्रमश्चास्त्रबलं च संयुगे । न त्वा समासाद्य रणा-
वमर्दे मनः श्रमं गच्छति निश्चितार्थम् ६ निहताः किंकराः सर्वे जम्बु-

---

लागले ३७. असो. इंद्रपुत्र जयंताप्रमाणें असलेल्या आणि क्रोधामुळें नेत्र आरक्तवर्ण झालेल्या त्या कुमार अक्षाचा वध करून तो वीर हनुमान् प्रजेचा संहार केल्यानंतर श्रांत झालेल्या काळाप्रमाणें त्या दरवाजावरच गेला ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४७॥

ह्याप्रमाणें हनुमानानें कुमार अक्षाचा वध केला असतां त्या महात्म्या राक्षसाधिपति रावणानें मन घट्ट करून रागारागानें देवतुल्य इंद्रजिताला जाण्याची अनुज्ञा दिली १. (तो ह्मणाला), "तूं अस्त्रवेत्ता आहेस, शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेस, देवदैत्यांना भय उत्पन्न करणारा आहेस, इंद्रासहवर्तमान देवांचे ठिकाणीं तुझा पराक्रम दृष्टोत्पत्तीस आलेला आहे, आणि ब्रह्मदेवाची शुश्रूषा करून तूं अस्त्रविद्या संपादन केली आहेस २. तुझ्या अस्त्रसामर्थ्यामुळेंच इंद्राचा आश्रय करून राहिलेले मरुद्गणासहवर्तमान देव संग्रामामध्यें टिकाव धरण्यास समर्थ झाले नाहींत ३. संग्रामामध्यें तुझ्याखेरीज श्रांत न होणारा असा त्रैलोक्यांत दुसरा कोणीही नाहीं. बाहुबलानें व तपानें सुरक्षित असून बुद्धिमानांमध्येंही श्रेष्ठ तूंच आहेस आणि सांप्रत तूंच पृथ्वीमध्यें मुख्य आहेस ४. संग्रामामध्यें कर्तव्य जीं कर्मे त्यांत तुला अशक्य असें कोणतेंही नाहीं. बुद्धिपूर्वक राजकार्याचा विचार कर्तव्य असतां तुझ्या बुद्धीला गहन अशी कोणतीही गोष्ट नाहीं आणि तुझें सामर्थ्य व अस्त्रबल न जाणणारा असा त्रैलोक्यामध्यें एकही नाहीं ५. संग्रामामध्यें तुझा पराक्रम, अस्त्रबल आणि तपःसामर्थ्य हीं सर्व माझ्याप्रमाणें आहेत आणि

माली च राक्षसः । अमात्यपुत्रा वीराश्च पञ्च सेनाग्रगामिनः ७ बलानि सुसमृद्धानि साश्वनागरथानि च । महोदरश्च शयितः कुमारोक्षश्च सूदितः ८ न तु तेष्वेव मे सारो यस्त्वय्यरिनिषूदन ९ इदं च हृष्ट्वा निहतं महद्बलं कपेः प्रभावं च पराक्रमं च । त्वमात्मनश्चापि निरीक्ष्य सारं कुरुष्व वेगं स्वबलानुरूपम् १० बलावमर्दैस्त्वयि संनिकृष्टे यथागते शाम्यति शान्तशत्रुः । तथा समीक्ष्यात्मबलं परं च समारभस्वास्त्रभृतां वरिष्ठ ११ न वीर सेना गणशो च्यवन्ति न वज्रमादाय विशालसारम् । न मारुतस्यास्ति गतिप्रमाणं न चाग्निकल्पः करणेन हन्तुम् १२ तमेवमर्थं प्रसमीक्ष्य सम्यक्स्वकर्मसाम्याद्धि समाहितात्मा । स्मरंश्च दिव्यं धनुषोस्य वीर्यं व्रजाक्षतं कर्म समारभस्व १३ न खल्वियं मतिश्रेष्ठ यत्त्वां संप्रेषयाम्यहम् । इयं च राजधर्माणां क्षत्रस्य च मतिर्मता १४

---

म्हणूनच निकरानें युद्ध सुरू झालें असतां जयाविषयीं निःसंशय असलेलें माझें मन तुझ्यावर अवलंबून असल्यामुळें साशंक होत नाहीं ६. सर्व किंकर, जंबुमाली, राक्षस, वीर व सेनाधिपति असे पांचही अमात्यपुत्र ७, अश्व, गज आणि रथ ह्यांसहवर्तमान असलेल्या समृद्ध सेना, महोदर व कुमार अक्ष ह्या सर्वांचा वध झाला आहे ८. परंतु, हे शत्रुनाशका इंद्रजिता, तुझी ज्याप्रमाणें मला खात्री आहे त्याप्रमाणें त्यांची मुळींच नव्हती ९. ह्यास्तव, वध पावलेलें हें प्रचंड सैन्य लक्ष्यांत आणून, वानराचा प्रभाव आणि पराक्रम ह्यांकडे दृष्टि देऊन व आपल्या सामर्थ्याचाही विचार करून तूं आपल्या सामर्थ्याला अनुरूप असा त्या वानरावर भडिमार कर १०. युद्धाकरितां बाहेर पडून तूं संनिध गेल्यावर सैन्याच्या भडिमारांनीं शत्रु जेरीस येऊन नाश होईल अशा रीतीनें तूं आपलें व शत्रूचें बल अवलोकन करून, हे अस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ इंद्रजिता, तूं युद्धाला आरंभ कर ११. हे वीरा, सेनांचा तेथें कांहींएक उपयोग नाहीं. कारण, सेनांच्या झुंडींच्या झुंडी जरी असल्या तरी त्यांच्याशीं गाठ पडली असतां त्या पळून जात असतात. त्याचप्रमाणें प्रचंड सामर्थ्यानें युक्त असलेलें वज्र घेऊनही कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. कारण, वायुपुत्र हनुमानाचें सामर्थ्य किती आहे ह्याची अटकळ करितां येणें अशक्य आहे आणि हा अग्नितुल्य असल्यामुळें शस्त्रादिरूप साधनानेंही ह्याचा वध होणें शक्य नाहीं १२. सारांश, ह्याप्रमाणें मीं सांगितलेल्याचा नीट विचार करून, स्वतःच्या पराक्रमाशीं कपीच्या पराक्रमाचें साम्य असल्यामुळें अंतःकरण स्वस्थ ठेवून आणि ह्या दिव्य धनुष्याच्या सामर्थ्याकडे लक्ष्य देऊन तूं जा आणि शत्रूचा वार न घेतां त्याचा पराभव करण्याचें कृत्य तूं सुरू कर १३. हे बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ इंद्रजिता, अशा

नानाशास्त्रेषु सङ्ग्रामे वैशारद्यमरिन्दम । अवश्यमेव बोद्धव्यं काम्यश्च
विजयो रणे १५ ततः पितुस्तद्वचनं निशम्य प्रदक्षिणं दक्षसुतप्रभावः ।
चकार भर्तारमतित्वरेण रणाय वीरः प्रतिपन्नबुद्धिः १६ ततस्तैः स्वग-
णैरिष्टैरिन्द्रजित्प्रतिपूजितः । युद्धोद्धतकृतोत्साहः सङ्ग्रामं संप्रपद्यत १७
श्रीमान्पद्मविशालाक्षो राक्षसाधिपतेः सुतः । निर्जगाम महातेजाः समुद्र
इव पर्वणि १८ स पक्षिराजोपमतुल्यवेगैर्व्यालैश्चतुर्भिः स तु तीक्ष्णदंष्ट्रैः । रथं
समायुक्तमसह्यवेगः समारुरोहेन्द्रजिदिन्द्रकल्पः १९ स रथी धन्विनां श्रेष्ठः
शस्त्रज्ञोऽस्त्रविदां वरः । रथेनाभिययौ क्षिप्रं हनूमान्यत्र सोऽभवत् २० स तस्य
रथनिर्घोषं ज्यास्वनं कार्मुकस्य च । निशम्य हरिवीरोऽसौ संप्रहृष्टतरोऽभवत् २१
इन्द्रजिच्चापमादाय शितशल्यांश्च सायकान् । हनूमन्तमभिप्रेत्य जगाम
रणपण्डितः २२ तस्मिंस्ततः संयति जातहर्षे रणाय निर्गच्छति बाणपाणौ ।

---

प्रसंगीं मी तुला पाठवीत आहें हा जरी माझा विचार बरोबर नाहीं, तरी राजधर्म आणि क्षात्रधर्म ह्यांना अनुसरूनच हा विचार आहे १४. हे शत्रुदमना, राजानें नानाप्रकारच्या शास्त्रांमध्यें आणि संग्रामामध्यें नैपुण संपादिलें पाहिजे आणि रणामध्यें जय प्राप्त व्हावा अशी ज्याला इच्छा असेल त्यानें नानाप्रकारच्या शास्त्रांचें ज्ञान अवश्य संपादन केलें पाहिजे " १५. हें पित्याचें भाषण श्रवण केल्यावर रणांत जाण्याचा निश्चय करून त्या देवतुल्यपराक्रमी वीर इंद्रजितानें अतित्वरेनें रावणराजाला प्रदक्षिणा केली १६; आणि नंतर आपणाला इष्ट असे आपले गण बरोबर घेऊन युद्धामध्यें वेगुमान आणि उत्साही असलेला व नांवाजलेला तो इंद्रजित् संग्रामामध्यें आला १७. कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आहेत आणि पर्वदिवशीं वृद्धिंगत होणाऱ्या समुद्राप्रमाणें जो वृद्धिंगत होत आहे असा तो राक्षसाधिपति रावणाचा पुत्र महातेजस्वी व वैभवशाली इंद्रजित् युद्धाकरितां बाहेर पडला १८. पक्षिराज गरुडाप्रमाणें ज्यांचा वेग आहे व ज्यांचे दंत तीक्ष्ण आहेत असे चार गज जोडिलेल्या रथावर तो असह्य वेग धारण करणारा इंद्रतुल्य इंद्रजित् आरूढ झाला १९ आणि धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ व अस्त्रवेत्त्यांमध्यें वरिष्ठ असलेला तो रथी व शस्त्रवेत्ता इंद्रजित् जिकडे हनुमान् होता तिकडे रथांत बसून सत्वर गेला २०. तेव्हां त्याच्या रथाचा घोष आणि धनुष्याचा व प्रत्यंचेचा टणत्कार ऐकून त्या वानरवीर हनुमानाला फारच हर्ष झाला २१. असा तो रणपंडित इंद्रजित् फळ पाजलेले बाण व धनुष्य घेऊन हनुमानाकडे गेला २२. तेव्हां हातामध्यें बाण घेऊन तो इंद्रजित् आनंदानें रणामध्यें जाऊं लागला असतां सर्व दिशा धुंद झाल्या आणि

दिशश्च सर्वाः कलुषा बभूवुर्मृगाश्च रौद्रा बहुधा विनेदुः २३
समागतास्तत्र तु नागयक्षा महर्षयश्चक्रचराश्च सिद्धाः । नभः समावृत्य
च पक्षिसङ्घा विनेदुरुच्चैः परमप्रहृष्टाः २४ आयान्तं सरथं दृष्ट्वा पूर्णमिन्द्र-
ध्वजं कपिः । ननाद च महानादं व्यवर्धत च वेगवान् २५ इन्द्रजित्स
रथं दिव्यमाश्रितश्चित्रकार्मुकः । धनुर्विस्फारयामास तडिदूर्जितनिः-
स्वनम् २६ ततः समेतावतितीक्ष्णवेगौ महाबलौ तौ रणनिर्विशङ्कौ ।
कपिश्च रक्षोधिपतेस्तनूजः सुरासुरेन्द्राविव बद्धवैरौ २७ स तस्य वीरस्य
महारथस्य धनुष्मतः संयति संमतस्य । शरप्रवेगं व्यहनत्प्रवृद्धश्चचार मार्गे
पितुरप्रमेयः २८ ततः शरानायततीक्ष्णशल्यान्सुपत्रिणः काञ्चनचित्रपु-
ङ्खान् । मुमोच वीरः परवीरहन्ता सुसन्नताम्वज्रसमानवेगान् २९ ततः स
तत्स्यन्दननिःस्वनं च मृदङ्गभेरीपटहस्वनं च । विकृष्यमाणस्य च कार्मु-
कस्य निशम्य घोषं पुनरुत्पपात ३० शराणामन्तरेष्वाशु व्यावर्तत महा-
कपिः । हरिस्तस्याभिलक्ष्यस्य मोक्षयल्लँक्ष्यसंग्रहम् ३१ शराणामग्रतस्तस्य

---

अशुभसूचक वनचरप्राणी नानाप्रकारें आक्रोश करूं लागले २३. त्याचप्रमाणें तेथें असलेले नाग व यक्ष, महर्षि, ग्रह, सिद्ध आणि आकाश व्याप्त करून राहिलेले पक्षिगण पराकाष्ठेचे आनंदित होऊन उच्च स्वरानें गर्जना करूं लागले २४. रथासहवर्तमान येत असलेला विशाल इंद्रध्वज अवलोकन केल्यावर तो वेगवान् कपि मोठी गर्जना करून वृद्धिंगत झाला असतां २५ त्या दिव्य रथावर आरूढ झालेला आणि अद्भुत धनुष्य धारण केलेला तो इंद्रजित् विद्युल्लतेसारिखें तेजस्वी व मोठा शब्द करणारें आपलें धनुष्य आकर्षण करूं लागला २६. तदनंतर देवदैत्याधिपतींप्रमाणें परस्परांशीं वैर बांधून राहिलेले आणि संग्रामासंबंधानें निःशंक असलेले ते महाबलाढ्य व अत्यंत तीक्ष्ण वेग धारण करणारे उभयतां वानर व राक्षसाधिपति रावणाचा पुत्र, एकमेकांपाशीं येऊन भिडले २७. संग्रामामध्यें निपुण असा जो धनुर्धरमहारथी वीर इंद्रजित् त्याच्या बाणांचा वेग त्या वृद्धिंगत झालेल्या अतर्क्य हनुमानानें व्यर्थ करून टाकिला आणि आकाशामध्यें तो हनुमान् संचार करूं लागला २८. तदनंतर दीर्घ व तीक्ष्ण फळें, उत्कृष्ट पंख आणि सुवर्णाचे चित्रविचित्र पुंख ह्यांनीं युक्त व वेगामध्यें वज्राची बरोबरी करणारे असे एकसारिखे बाण त्या शत्रुपक्षीय वीरनाशक वीर इंद्रजितानें हनुमानावर सोडिले २९. परंतु, त्याच्या रथाचा गडगडाट, मृदंग, नौबदी व पडघम ह्यांचा घोष आणि आकृष्ट होत असलेल्या धनुष्याचा टणत्कार ऐकून त्या वानरानें पुनरपि उड्डाण केलें ३०. तदनंतर नेम धरण्यामध्यें पटाईत असलेल्या त्या इंद्रजिताचा नेम चुकविण्याकरितां तो

पुनः समभिवर्तत । प्रसार्य हस्तौ हनुमानुत्पपातानिलात्मजः ३२
तावुभौ वेगसंपन्नौ रणकर्मविशारदौ । सर्वभूतमनोग्राहि चक्रतुर्युद्धमुत्त-
मम् ३३ हनूमतो वेद न राक्षसोऽन्तरं न मारुतिस्तस्य महात्मनोऽन्तरम् ।
परस्परं निर्विषहौ बभूवतुः समेत्य तौ देवसमानविक्रमौ ३४ ततस्तु लक्ष्ये
स विहन्यमाने शरेष्वमोघेषु च संपतत्सु । जगाम चिन्तां महतीं महात्मा
समाधिसंयोगसमाहितात्मा ३५ ततो मतिं राक्षसराजसूनुश्चकार तस्मि-
न्हरिवीरमुख्ये । अवध्यतां तस्य कपेः समीक्ष्य कथं निगच्छेदिति निग्र-
हार्थम् ३६ ततः पैतामहं वीरः सोऽस्त्रमस्त्रविदां वरः । संदधे सुमहाते-
जास्तं हरिप्रवरं प्रति ३७ अवध्योऽयमिति ज्ञात्वा तमस्त्रेणास्त्रतत्त्ववित् ।
निजग्राह महाबाहुं मारुतात्मजमिन्द्रजित् ३८ तेन बद्धस्ततोऽस्त्रेण राक्ष-
सेन स वानरः । अभवन्निर्विचेष्टश्च पपात च महीतले ३९ ततोऽथ बुद्ध्वा
स तदस्त्रबन्धं प्रभोः प्रभावाद्विगताल्पवेगः । पितामहानुग्रहमात्मनश्च

---

महाकपि हनुमान् वानर बाणांच्या अंतरालांमध्यें मोठ्या चलाखीनें हिंडूं लागला ३१; त्याच्या बाणांपुढें वारंवार येऊं लागला आणि हात पसरून तो वायुपुत्र हनुमान् उड्डाण करूं लागला ३२. संग्रामकर्मामध्यें निपुण असलेल्या त्या उभयतां वेगवान् मारुति व इंद्रजित् ह्यांनीं सर्व प्राण्यांचें मन थक्क करून सोडणारें अनुपम युद्ध केलें ३३. इंद्रजित्राक्षसाला हनुमानाचा अंदाज लागला नाहीं व हनुमानालाही त्या प्रचंड राक्षसाच्या सामर्थ्याचा अदमास झाला नाहीं. ते उभयतांही देवतुल्य पराक्रमी एकमे-काशीं येऊन भिडल्यावर परस्परांना असह्य होणारें असें युद्ध करूं लागले ३४. तद्-नंतर लक्ष्याचे स्थानीं असलेला हनुमान् इकडे तिकडे संचार करीत असल्यामुळें नेम धरिलेला व्यर्थ जाऊन अमोघ बाण कोठें तरी पडूं लागले असतां समाधीनें एकाग्र चित्त करून तो महात्मा इंद्रजित् मोठा विचार करूं लागला. ३५ तदनंतर राक्षसराजपुत्र इंद्रजितानें तो वानर अवध्य आहे असें धर्मबलानें जाणिलें आणि ह्याचा निग्रह करितां यावा एतदर्थ हा कांहीं वेळ स्थिर कसा राहील असा विचार त्या मुख्य वानरवी-रासंबंधानें त्याच्या मनामध्यें आला ३६. नंतर अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या अत्यंतमहातेजस्वी वीर इंद्रजितानें त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला उद्देशून ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला ३७. परंतु, ब्रह्मास्त्रानेंही हा अवध्य आहे असें जाणून त्या अस्त्रतत्त्व-वेत्त्या इंद्रजितानें वायुपुत्र महापराक्रमी हनुमानाला त्या अस्त्रानें नुसतें बांधून टाकिलें ३८; आणि ह्याप्रमाणें ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून त्या राक्षसानें त्या वानराला बद्ध केलें असतां तो निश्चेष्ट होऊन भूतलावर पडला ३९. तदनंतर ब्रह्मास्त्रानें आपणाला बंध

विचिन्तयामास हरिप्रवीरः ४० ततः स्वायंभुवैर्मन्त्रैर्ब्रह्मास्त्रं चाभिमन्त्रितम् । हनूमांश्चिन्तयामास वरदानं पितामहात् ४१ न मेऽस्य बन्धस्य च शक्तिरस्ति विमोक्षणे लोकगुरोः प्रभावात् । इत्येवमेवं विहितोऽस्त्रबन्धो मयात्मयोनेरनुवर्तितव्यः ४२ स वीर्यमस्त्रस्य कपिर्विचार्य पितामहानुग्रहमात्मनश्च । विमोक्षशक्तिं परिचिन्तयित्वा पितामहाज्ञामनुवर्तते स्म ४३ अस्त्रेणापि हि बद्धस्य भयं मम न जायते । पितामहमहेन्द्राभ्यां रक्षितस्यानिलेन च ४४ ग्रहणे चापि रक्षोभिर्महन्मे गुणदर्शनम् । राक्षसेन्द्रेण संवादस्तस्माद्गृह्णन्तु मां परे ४५ स निश्चितार्थः परवीरहन्ता समीक्ष्यकारी विनिवृत्तचेष्टः । परैः प्रसह्याभिगतैर्निगृह्य ननाद तैस्तैः परिभर्त्स्यमानः ४६ ततस्ते राक्षसा दृष्ट्वा विनिश्चेष्टमरिन्दमम् । बबन्धुः शणवल्कैश्च द्रुमचीरैश्च संहतैः ४७ स रोचयामास परैश्च बन्धं प्रसह्य वीरैरभिगर्हणं च । कौतूहलान्मां

---

प्राप्त झाला आहे असें समजून आल्यावर वानरश्रेष्ठ हनुमानानें ब्रह्मदेवाचा अनुग्रह मनासमर्थ्यें आणिला. त्या प्रभूच्या कृपाप्रभावामुळें त्या अस्त्रापासून अल्पही पीडा त्याला प्राप्त झाली नाहीं ४०. सारांश, ब्रह्मविषयक मंत्रांनीं अभिमंत्रण केलेल्या ब्रह्मास्त्राचा बंध आपणाला प्राप्त झाला आहे असें अवलोकन करून हनुमानानें ( माझ्या अस्त्रापासून एकाक्षणांत तूं मुक्त होशील असा ) जो वर ब्रह्मदेवानें दिला होता त्याचें स्मरण केलें ४१. — ब्रह्मास्त्राच्या बंधांतून ब्रह्मदेवाच्या प्रभावानें मुक्त होण्याचें मला सामर्थ्य नाहीं ह्या—असें समजून ह्यानें जो ब्रह्मदेवाचा अस्त्रबंध योजिला आहे तो मला निवृत्त केला पाहिजे" ४२. ह्याप्रमाणें अस्त्राचें वीर्य, त्यासंबंधानें ब्रह्मदेवाचा आपणावर झालेला अनुग्रह आणि अस्त्रबंध सोडण्याची आपली शक्ति ह्या सर्वांचा विचार करून त्या वानरानें एक क्षणभर ब्रह्मदेवाच्याच आज्ञेचें अवलंबन केलें ४३. ( तो ह्मणाला ) "ब्रह्मा, इंद्र आणि वायु ह्यांनीं माझें रक्षण केलें असल्यामुळें ह्या अस्त्रानेंही जरी मी बद्ध झालों आहें तरी मला भीति नाहीं ४४. परंतु, राक्षसांनीं मला बांधून नेलें असतां राक्षसराज रावणाशीं संवाद हा एक मोठाच फायदा आपणाला होणार आहे. ह्यास्तव, शत्रु मला खुशाल अस्त्रानें बांधून नेवो" ४५. ह्याप्रमाणें कोणतेंही कृत्य विचारपूर्वक करणारा तो शत्रुपक्षीय वीरनाशक हनुमान् मनाचा निश्चय करून निश्चेष्ट राहिला; आणि शत्रूंनीं सर्व बाजूंनीं हल्ला करून त्याला धरिलें असतां आणि ते त्याची निर्भर्त्सना करूं लागले असतां तो गर्जना करूं लागला ४६. ( इंद्रजितानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केल्या ) नंतर तो शत्रुदमन वानर निश्चेष्ट झाला आहे असें अवलोकन करून त्या राक्षसांनीं झाडांच्या एकत्र केलेल्या सालींनीं व

यदि राक्षसेन्द्रो द्रष्टुं व्यवस्येदिति निश्चितार्थः ४८ स बद्धस्तेन वल्केन विमुक्तोऽस्त्रेण वीर्यवान् । अस्त्रबन्धः स चान्यं हि न बन्धमनुवर्तते ४९ अथेन्द्रजित्तं द्रुमचीरबद्धं विचार्य वीरः कपिसत्तमं तम् । विमुक्तमस्त्रेण जगाम चिन्तामन्येन बद्धोऽप्यनुवर्ततेऽस्त्रम् ५० अहो महत्कर्म कृतं निरर्थं न राक्षसैर्मन्त्रगतिर्विमृष्टा । पुनश्च नास्त्रे विहतेऽस्त्रमन्यत्प्रवर्तते संशयिताः स्म सर्वे ५१ अस्त्रेण हनुमान्मुक्तो नात्मानमवबुध्यते । कृष्यमाणस्तु रक्षोभिस्तैश्च बन्धैर्निपीडितः ५२ हन्यमानस्ततः क्रूरै राक्षसैः कालमुष्टिभिः । समीपं राक्षसेन्द्रस्य प्राकृष्यत स वानरः ५३ अथेन्द्रजित्तं प्रसमीक्ष्य मुक्तमस्त्रेण बद्धं द्रुमचीरसूत्रैः । व्यदर्शयत्तत्र महाबलं तं हरिप्रवीरं सगणाय राज्ञे ५४ तं मत्तमिव मातङ्गं बद्धं कपिवरोत्तमम् । राक्षसा

---

तागाच्या दोऱ्यांनीं त्याला बांधिलें ४७. तऱ्हां " उत्सुकतेमुळें राक्षसराज रावण मला एकदां तरी अवलोकन करण्याचें मनांत आणील" असा मनामध्यें निश्चय बाळगून शत्रुभूत असलेल्या वीर राक्षसांनीं बलात्कारानें केलेलें बंधन आणि निर्भर्त्सना हीं त्यानें सहन केलीं ४८. असो. तो वीर्यवान् हनुमान् झाडाच्या सालींनीं वगैरे बद्ध झाल्यामुळें अस्त्राच्या बंधांतून मुक्त झाला. कारण, दुसरा बंध प्राप्त झाला असतां तो अस्त्रबंध कायम रहात नाहीं ४९. तदनंतर वृक्षत्वचांनीं तो वानरश्रेष्ठ बद्ध झाला असून अस्त्रबंधांतून मुक्त झाला आहे असें अवलोकन करून आणि इतर बंधानें बद्ध झाला असतांनाही अस्त्रबंधानेंच बद्ध झाल्यासारिखें तो वागवीत आहे हेंही लक्ष्यांत घेऊन तो वीर इंद्रजित् चिंता करूं लागला ५०. ( तो म्हणाला ) " अहो, मीं केलेलें मोठें कर्म राक्षसांनीं व्यर्थ करून टाकिलें. कारण, त्या राक्षसांनीं मंत्रसामर्थ्याचा विचार केला नाहीं. सारांश, इतराचा बंध प्राप्त झाला असतां ब्रह्मास्त्रमंत्रानें झालेला बंध नाहींसा होतो हें त्यांना समजलें नाहीं आणि ब्रह्मास्त्र व्यर्थ झाल्यावर पुनरपि अस्त्रप्रयोग चालतही नाहीं. ह्यास्तव, ज्याविषयीं आह्मां सर्वांनाच संशय उत्पन्न झाला आहे " ५१. असो. हनुमान् ब्रह्मास्त्रापासून मुक्त झाला असूनही तसें त्यानें दर्शविलें नाहीं; व ते राक्षस सालीच्या वगैरे बंधनांनीं त्याला पीडा देऊन रावणाकडे ओढून नेऊं लागले ५२. तदनंतर कालाप्रमाणें ज्यांची मुष्टि भयंकर आहे असे ते क्रूर राक्षस मारीत मारीत त्या वानराला राक्षसराज रावणाचे समीप घेऊन गेले ५३. नंतर वृक्षत्वचेच्या दोऱ्यांनीं बद्ध झालेला तो हनुमान् अस्त्रबंधापासून मुक्त झाल्याचें अवलोकन केल्यावर अनुयायांसहवर्तमान असलेल्या रावणराजाला इंद्रजितानें तो महाबलाढ्य वानरश्रेष्ठ दाखविला ५४. तात्पर्य, मत्त गजाप्रमाणें

राक्षसेन्द्राय रावणाय न्यवेदयन् ५५ कोऽयं कस्य कुतो वापि किं कार्यं
कोऽभ्युपाश्रयः । इति राक्षसवीराणां दृष्ट्वा संजज्ञिरे कथाः ५६
हन्यतां दह्यतां वापि भक्ष्यतामिति चापरे । राक्षसास्तत्र संक्रुद्धाः पर-
स्परमथाब्रुवन् ५७ अतीत्य मार्गं सहसा महात्मा स तत्र रक्षोधिपपाद-
मूले । ददर्श राज्ञः परिचारवृद्धान्गृहं महारत्नविभूषितं च ५८ स ददर्श
महातेजा रावणः कपिसत्तमम् । रक्षोभिर्विकृताकारैः कृष्यमाणमित-
स्ततः ५९ राक्षसाधिपतिं चापि ददर्श कपिसत्तमः । तेजोबलसमायुक्तं
तपन्तमिव भास्करम् ६० स रोषसंवर्तितताम्रदृष्टिर्दशाननस्तं कपिमन्व-
वेक्ष्य । अथोपविष्टान्कुलशीलवृद्धान्समादिशत्तं प्रति मुख्यमन्त्रीन् ६१
यथाक्रमं तैः स कपिश्च पृष्टः कार्यार्थमर्थस्य च मूलमादौ । निवेदयामास
हरीश्वरस्य दूतः सकाशादहमागतोऽस्मि ६२ [२०५८] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

---

बद्ध झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् आणिल्याचें राक्षसांनीं राक्षसाधिपति रावणाला निवेदन केलें ५५; तेव्हां, " हा कोण ? कोणाचा पुत्र ? कोठून आला ? त्यानें काय कार्य आहे ? आणि ह्याला कोणाचा आश्रय आहे ?." अशा गोष्टी त्याला अवलोकन केल्यावर राक्षसवीरांमध्यें सुरू झाल्या ५६ आणि " मारा, जाळा, खाऊन टाका." अशा प्रकारें वेगळे वेगळे राक्षस क्रुद्ध होऊन त्याच्यासंबंधानें एकमेकांशीं बोलूं लागले ५७. असो. एकदम मार्गाचें आक्रमण करून तेथें गेल्यावर राक्षसाधिपति रावणाच्या पायांशीं बसलेले त्या राजाचे वृद्ध सेवक आणि मोठ्या मोठ्या रत्नांनीं भूषित केलेलें गृह त्यानें अवलोकन केलें, ५८. अकाळविकाळ रूपें धारण करणारे राक्षस ज्याला इकडून तिकडे ओढीत आहेत अशा त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला त्या महातेजस्वी रावणानें अवलोकन केलें ५९; व त्या कपिश्रेष्ठ हनुमानानेंही सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेल्या त्या तेजस्वी व बलाढ्य राक्षसाधिपतीला पाहिलें ६०. त्या कपीला अवलोकन केल्यावर क्रोधानें ज्याचे नेत्र लाल होऊन गेले आहेत अशा त्या रावणानें कुलानें व शीलानें श्रेष्ठ अशा आपल्या तेथें बसलेल्या मुख्य मंत्र्यांना त्याची चौकशी करण्याविषयीं आज्ञा केली असतां ६१ त्याचा उद्देश काय आहे व तो उपस्थित होण्याचें कारण काय आहे हें त्या वानराला त्यांनीं प्रथम अनुक्रमें विचारिलें व त्यानेंही " वानरराज सुग्रीवाचा मी दूत आहें व तेथूनच मी येथें आलों आहें " असें त्याला सांगितलें ६२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४८ ॥

ततः स कर्मणा तस्य विस्मितो भीमविक्रमः । हनुमान्क्रोधताम्राक्षो रक्षोधिपमवैक्षत १ भ्राजमानं महार्हेण काञ्चनेन विराजता । मुक्ताजालवृतेनाथ मुकुटेन महाद्युतिम् २ वज्रसंयोगसंयुक्तैर्महार्हमणिविग्रहैः । हैमैराभरणैश्चित्रैर्मनसेव प्रकल्पितैः ३ महार्हक्षौमसंवीतरक्तचन्दनरूषितम् । स्वनुलिप्तं विचित्राभिर्विविधाभिश्च भक्तिभिः ४ विचित्रं दर्शनीयैश्च रक्ताक्षैर्भीमदर्शनैः । दीप्ततीक्ष्णमहादंष्ट्रं प्रलम्बं दशनच्छदैः ५ शिरोभिर्दशभिर्वीरो भ्राजमानं महौजसम् । नानाव्यालसमाकीर्णैः शिखरैरिव मन्दरम् ६ नीलाञ्जनचयप्रख्यं हारेणोरसि राजता । पूर्णचन्द्राभवक्त्रेण सबालार्कमिवाम्बुदम् ७ बाहुभिर्बद्धकेयूरैश्चन्दनोत्तमरूषितैः । भ्राजमानाङ्गदैर्भीमैः पञ्चशीर्षैरिवोरगैः ८ महति स्फाटिके चित्रे रत्नसंयोगचित्रिते । उत्तमास्तरणास्तीर्णे सूपविष्टं वरासने ९ अलंकृताभिरत्यर्थं प्रमदाभिः

---

तदनंतर इंद्रजिताच्या त्या कर्मानें विस्मयचकित झालेल्या भयंकर पराक्रमी हनुमानाचे नेत्र आरक्तवर्ण झाले आणि राक्षसाधिपति रावणाकडे तो पाहूं लागला १. तो महातेजस्वी रावण मोत्यांच्या समुदायांनीं भरलेल्या व चकाकत असलेल्या मोठ्या मूल्यवान् सुवर्ण मुकुटानें झळकत होता २; हिरे बसविलेल्या आणि मुख्य भागावर मोठीं मोठीं रत्नें जडलेल्या अद्भुत सुवर्णभूषणांनीं तो देदीप्यमान् दिसत होता व तीं भूषणं जशीं कांहीं मनःकल्पितच होतीं ३. मोठा मूल्यवान् शेला त्यानें पांघरला होता; त्याच्या शरीराला रक्तचंदनाची उटी लाविलेली होती आणि नानाप्रकारच्या चित्रविचित्र आकृतींनीं त्याचें शरीर भरून काढिलेलें होतें ४. दीप्त, तीक्ष्ण व प्रचंड दंष्ट्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसाधिपतीची मुद्रा ओष्ठांच्या योगानें आणि आरक्तवर्ण व दिसण्यांतही भयंकर अशा मनोहर नेत्रांच्या योगानें विचित्र दिसत होती ५. नानाप्रकारच्या श्वापदांनीं व्याप्त झालेल्या शिखरांच्या योगानें झळकत असलेला मंदरपर्वतच कीं काय असा तो महाबलाढ्य वीर रावण दहा मस्तकांच्या योगानें झळकत होता ६. कज्जलाच्या राशीप्रमाणें तो दिसत होता; वक्षस्थलावर झळकत असलेल्या हारानें तो युक्त होता आणि पूर्णचंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असल्यामुळें तो बालसूर्यासहवर्तमान असलेल्या मेघाप्रमाणें दिसत होता ७. पांच फडांचे भयंकर नागच कीं काय अशा प्रकारच्या हातांनीं तो युक्त होता आणि दंडांमध्यें केयूर व अंगद हीं भूषणें त्यानें घातलीं होतीं ८. वर जडावाचें काम केलें असल्यामुळें अद्भुत आणि उत्कृष्ट आस्तरणांनीं युक्त अशा स्फटिकाच्या मोठ्या अद्भुत सिंहासनावर तो बसलेला होता ९. अतिरिक्त भूषणें धारण केलेल्या तरुणी स्त्रिया हातांमध्यें विंझणे

समन्ततः । वालव्यजनहस्ताभिरारात्समुपसेवितम् १० दुर्धरेण प्रहस्तेन महापार्श्वेन रक्षसा । मन्त्रिभिर्मन्त्रतत्त्वज्ञैर्निकुम्भेन च मन्त्रिणा ११ उपोपविष्टं रक्षोभिश्चतुर्भिर्बलदर्पितम् । कृत्स्नं परिवृतं लोकं चतुर्भिरिव सागरैः १२ मन्त्रिभिर्मन्त्रतत्त्वज्ञैरन्यैश्च शुभदर्शिभिः । आश्वास्यमानं सचिवैः सुरैरिव सुरेश्वरम् १३ अपश्यद्राक्षसपतिं हनूमानतितेजसम् । वेष्टितं मेरुशिखरे सतोयमिव तोयदम् १४ स तैः संपीड्यमानोपि रक्षोभिर्भीमविक्रमैः । विस्मयं परमं गत्वा रक्षोधिपमवैक्षत १५ भ्राजमानं ततो दृष्ट्वा हनूमान्राक्षसेश्वरम् । मनसा चिन्तयामास तेजसा तस्य मोहितः १६ अहो रूपमहो धैर्यमहो सत्त्वमहो द्युतिः । अहो राक्षसराजस्य सर्वलक्षणयुक्तता १७ यद्यधर्मो न बलवान्स्यादयं राक्षसेश्वरः । स्यादयं सुरलोकस्य सशक्रस्यापि रक्षिता १८ अस्य क्रूरैर्नृशंसैश्च कर्मभिर्लोककुत्सितैः । सर्वे बिभ्यति खल्वस्माल्लोकाः सामरदानवाः ॥ अयं ह्युत्सहते क्रुद्धः कर्तुमेकार्णवं जगत् १९ इति चिन्तां बहुविधामकरोन्मतिमान्कपिः । दृष्ट्वा राक्षसराजस्य प्रभावममि-

---

घेऊन सभोंवतीं त्याला वारा घालीत उभ्या राहिल्या होत्या १०; दुर्धर, प्रहस्त आणि महापार्श्वनामक राक्षस हे मंत्रतत्त्वज्ञ मंत्री आणि निकुंभनामक मंत्री ११ हे चार राक्षस शेजारीं बसले असल्यामुळें बलाविषयीं गर्व वाहणारा तो रावण चार सागरांनीं परिवेष्टिलेलें संपूर्ण भूमंडलच कीं काय असा दिसत होता १२. देव ज्याप्रमाणें इंद्राला धीर देत असतात त्याप्रमाणें मंत्रतत्त्वज्ञ मंत्री आणि इतरही चांगला विचार करणारे सचिव त्याला धीर देत होते १३. अशा प्रकारें मंत्र्यांनीं परिवेष्टित असलेल्या त्या अतितेजस्वी राक्षसाधिपति रावणाला हनुमानानें अवलोकन केलें असतां मेरुपर्वताच्या शिखरावरील सजल मेघच कीं काय असा तो त्याला दिसला १४. हनुमानाला ते भयंकर पराक्रमी राक्षस जरी पीडा देत होते तरी तो अतिशय विस्मयचकित होऊन त्या राक्षसाधिपतीकडेच पहात होता १५. ह्याप्रमाणें झळकत असलेल्या त्या राक्षसाधिपतीला अवलोकन केल्यावर त्याच्या तेजानें दिपून गेलेला हनुमान् मनामध्यें ह्मणाला १६ " अहा हा ! काय हो हें रूप ! कायहो हें धैर्य ! कायहो हें बल ! काय हो ही कांति आणि कायहो तरी ही ह्या राक्षसराजाची सर्वलक्षणसंपन्नता ! १७. ह्याचे ठिकाणीं जर हा मोठा अधर्म नसतां तर हा राक्षसाधिपति इंद्रासहवर्तमान देवलोकाच्याही रक्षक होण्यास योग्य झाला असता १८. खरोखर लोकनिंदेस पात्र अशा ह्याच्या क्रूर व घातकी कर्मांमुळें देवदैत्यांसहवर्तमान सर्व लोक ह्यास भीत आहेत; आणि हा क्रुद्ध रावण सर्व जगत् रसातलाला नेण्याचें

तौजसः २० [ २०७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकोनपञ्चाशः सर्गः ॥ ४९ ॥

तमुद्वीक्ष्य महाबाहुः पिङ्गाक्षं पुरतः स्थितम् । रोषेण महताविष्टो रावणो लोकरावणः १ शङ्काहतात्मा दध्यौ स कपीन्द्रं तेजसावृतम् । किमेष भगवान्नन्दी भवेत्साक्षादिहागतः २ येन शप्तोस्मि कैलासे मया प्रहसिते पुरा । सोयं वानरमूर्तिः स्यात्किंस्विद्बाणोपि वासुरः ३ स राजा रोषताम्राक्षः प्रहस्तं मन्त्रिसत्तमम् । कालयुक्तमुवाचेदं वचो विपुलमर्थवत् ४ दुरात्मा पृच्छ्यतामेष कुतः किं वास्य कारणम् । वनभङ्गे च कोस्यार्थो राक्षसानां च तर्जने ५ मत्पुरीमप्रधृष्यां वै गमने किं प्रयोजनम् । आयोधने वा किं कार्यं पृच्छ्यतामेष दुर्मतिः ६ रावणस्य वचः श्रुत्वा प्रहस्तो वाक्यमब्रवीत् । समाश्वसिहि भद्रं ते न भीः कार्या त्वया कपे ७

---

इच्छा करीत आहे" १९. असो. महाबलाढ्य राक्षसाधिपति रावणाचा प्रभाव अवलोकन केल्यावर तो बुद्धिमान् हनुमान् असे नानाप्रकारचे विचार मनामध्यें आणूं लागला २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ४९ ॥

पिंगटवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला तो वानर पुढें बसलेला अवलोकन करून लोकांना भय उत्पन्न करणारा तो महापराक्रमी रावण अतिशय क्रुद्ध झाला १; आणि मन साशंक झाल्यामुळें तो आपल्याशीं त्या तेजस्वी वानराधिपतीसंबंधानें असा विचार करूं लागला:— " अरे, हा प्रत्यक्ष भगवान् नंदीच येथें आला आहे कीं काय ? २. कारण, पूर्वीं मी कैलासपर्वतावर हंसल्यामुळें ( माझ्यासारिखें ज्यांचें मुख आहे अशांच्या हातून तुझा नाश होईल ह्मणून ) त्यानें मला शाप दिला होता. अथवा नंदीनें पाठविलेला हा बाणासुरच वानररूप धारण करून येथें आला आहे कीं काय ? " ३. ह्याप्रमाणें मनामध्यें शंका आल्यानंतर क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असा तो रावणराजा समयाला अनुरूप, गंभीर आणि अर्थानें भरलेलें भाषण मंत्रिश्रेष्ठ प्रहस्ताशीं करूं लागला ४. ( तो ह्मणाला ) " अरे, ह्या दुरात्म्याला विचारा तरी ! हा आला कोठून ? ह्यानें येथें येण्याचें कारण काय ! वनाचा भंग करण्यांत आणि राक्षसांचा नाश करण्यांत ह्याचा काय उद्देश होता ? ५. जिच्यावर कोणाचाही हल्ला होणें शक्य नाहीं अशा माझ्या नगरीमध्यें हा कशाकरितां आला ! आणि युद्ध ह्यानें कशाकरितां केलें ? हें ह्या दुर्बुद्धीला विचारा " ६. हें रावणाचें भाषण श्रवण करून प्रहस्त हनुमानाला ह्मणाला " हे वानरा,

यदि तावत्त्वमिन्द्रेण प्रेषितो रावणालयम्। तत्त्वमाख्याहि मा ते भूद्भयं वानर मोक्ष्यसे ८ यदि वैश्रवणस्य त्वं यमस्य वरुणस्य च। चारुरूपमिदं कृत्वा प्रविष्टो नः पुरीमिमाम् ९ विष्णुना प्रेषितो वापि दूतो विजयकाङ्क्षिणा। न हि ते वानरं तेजो रूपमात्रं तु वानरम् १० तत्त्वतः कथयस्वाद्य ततो वानर मोक्ष्यसे। अनृतं वदतश्चापि दुर्लभं तव जीवितम् ११ अथ वा यन्निमित्तस्ते प्रवेशो रावणालये। एवमुक्तो हरिवरस्तदा रक्षोगणेश्वरम् १२ अब्रवीन्नास्मि शक्रस्य यमस्य वरुणस्य च। धनदेन न मे सख्यं विष्णुना नास्मि चोदितः १३ जातिरेव मम त्वेषा वानरोहमिहागतः। दर्शने राक्षसेन्द्रस्य तदिदं दुर्लभं मया १४ वनं राक्षसराजस्य दर्शनार्थे विनाशितम्। ततस्ते राक्षसाः प्राप्ता बलिनो युद्धकाङ्क्षिणः १५ रक्षणार्थं च देहस्य प्रतियुद्धा मया रणे। अस्त्रपाशैर्न शक्योहं बद्धुं देवासुरैरपि १६ पितामहादेष वरो ममापि हि समागतः। राजानं द्रष्टुकामेन मयास्त्रमनु-

---

तूं स्वस्थ ऐस. तुझें कल्याण असो. तूं भिऊं नको ७. हे वानरा, तुला जर इंद्रानें रावणाच्या निवासस्थानाकडे पाठविलें असेल तर तें तूं खरें खरें सांग; म्हणजे तुझी सुटका होईल. तुला कांहीं संकट प्राप्त व्हावें अशी आमची इच्छा नाहीं ८. कुबेर यम आणि वरुण ह्यांपैकीं एकाद्याचें मनोहर रूप धारण करून तूं आमच्या ह्या नगरीमध्यें प्रविष्ट झाला आहेस कीं काय ? ९ किंवा विजयेच्छु विष्णूनें पाठविलेला तूं दूत आहेस कीं काय ? तुझें रूप मात्र वानरासारिखें दिसत आहे; परंतु, तुझें तेज वानराचें नव्हे १०. ह्यास्तव, हे वानरा, काय असेल तें आज खरें खरें सांग; म्हणजे तूं मुक्त होशील. परंतु, तूं जर अनृत भाषण करिशील, तर तुझें जीवितही दुर्लभ आहे ११. सारांश, रावणाच्या निवासस्थानामध्यें तुझा प्रवेश होण्याचें कारण काय हें तूं सांग." ह्याप्रमाणें प्रहस्त बोलला असतां वानरश्रेष्ठ हनुमान् राक्षसकुलाधिपति रावणाला १२ म्हणाला "इंद्राचें, यमाचें अथवा वरुणाचें रूप धारण करून मी आलों नाहीं; कुबेराशीं माझें सख्य नाहीं; आणि विष्णूनेंही मला पाठविलें नाहीं १३. ही माझी जातिच आहे आणि मी वानरच येथें राक्षसराजाच्या दर्शनाकरितां आलों आहें. तें हें दर्शन मला दुर्लभ आहे असें समजून १४ दर्शनाकरितां मीं राक्षसराजाच्या वनाचा विध्वंस केला. तदनंतर ते बलाढ्य राक्षस युद्धाची इच्छा धरून माझ्या अंगावर आले असतां १५ देहाच्या रक्षणार्थ मीं संग्रामामध्यें त्यांच्याशीं उलट युद्ध केलें. देवदैत्यांच्या हातूनही अस्त्रपाशांच्या योगानें मी बद्ध होणें शक्य नाहीं १६. कारण, ब्रह्मदेवापासून हा वरहि मला प्राप्त झाला आहे. राजाच्या

वर्तितम् १७ विमुक्तोऽप्यहमस्त्रेण राक्षसैस्त्वाभिवेदितः । केनचिद्रामकार्येण आगतोऽस्मि तवान्तिकम् १८ दूतोऽहमिति विज्ञाय राघवस्यामितौजसः । श्रूयतामेव वचनं मम पथ्यमिदं प्रभो १९ [२०१७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥ ५० ॥

तं समीक्ष्य महासत्त्वं सत्त्ववान्हरिसत्तमः । वाक्यमर्थवदव्यग्रस्तमुवाच दशाननम् १ अहं सुग्रीवसंदेशादिह प्राप्तस्तवान्तिके । राक्षसेश हरीशस्त्वां भ्राता कुशलमब्रवीत् २ भ्रातुः शृणु समादेशं सुग्रीवस्य महात्मनः । धर्मार्थसहितं वाक्यमिह चामुत्र च क्षमम् ३ राजा दशरथो नाम रथकुञ्जरवाजिमान् । पितेव बन्धुर्लोकस्य सुरेश्वरसमद्युतिः ४ ज्येष्ठस्तस्य महाबाहुः पुत्रः प्रियतरः प्रभुः । पितुर्निदेशान्निष्क्रान्तः प्रविष्टो दण्डकावनम् ५ लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया सह भार्यया । रामो नाम महातेजा धर्म्यं पन्थानमाश्रितः ६ तस्य भार्या जनस्थाने भ्रष्टा सीतेति विश्रुता । वैदेहस्य सुता राज्ञो जनकस्य महात्मनः ७ मार्गमाणस्तु तां

---

दर्शनाकरितां मीं ह्या अस्त्राला मान दिला १७; आणि ह्मणूनच वास्तविक जरी मी अस्त्रापासून मुक्त झालों आहें तरी अस्त्रानें बद्ध करून मला आणिल्याचें राक्षसांनीं तुला कळविलें आहे. कांहीं रामकार्याकरितां मी तुझ्यासमीप आलों आहें १८. ह्यास्तव, अतुलसामर्थ्यवान् रामाचा मी दूत आहें असें समजून, हे प्रभो, माझें हें हितकारक भाषण तूं श्रवण कर १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ५० ॥

तदनंतर स्वकर्तव्याविषयीं दक्ष असलेला सत्त्वशील वानरश्रेष्ठ हनुमान् रावणाकडे पाहून अर्थयुक्त शब्दांनीं त्याला ह्मणाला १ " हे राक्षसाधिपते, सुग्रीवाच्या आज्ञेनें मी तुझ्या समीप आलों आहें व तुला भ्रात्या वानराधिपति सुग्रीवानें कुशल प्रश्न केला आहे २. आतां धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेला आणि इहलोकीं व परलोकीं हितावह होणारा असा महात्म्या भ्रात्या सुग्रीवाचा निरोप तूं ऐकून घे ३. रथ, गज व अश्व ह्यांनीं संपन्न, इंद्रासारिखा तेजस्वी व प्रजेवर पित्याप्रमाणें प्रेम करणारा असा एक दशरथनामक राजा होऊन गेला ४. त्याचा महापराक्रमी, समर्थ व धर्ममार्गाचें अवलंबन केलेला ज्येष्ठ पुत्र महातेजस्वी राम त्याला अतिशय प्रिय होता. तो पित्याच्या आज्ञेनें दंडकारण्यामध्यें भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान व सीतानामक भार्येसहवर्तमान प्रविष्ट झाला ५, ६. विदेहदेशाधिपति महात्म्या जनकराजाची सीता ह्मणून प्रसिद्ध असलेली कन्या त्याची भार्या आहे ती जनस्थानामध्यें असतांना नाहींशी

देवीं राजपुत्रः सहानुजः । ऋष्यमूकमनुप्राप्तः सुग्रीवेण च सङ्गतः ८ तस्य तेन प्रतिज्ञातं सीतायाः परिमार्गणम् । सुग्रीवस्यापि रामेण हरिराज्यं निवेदितुम् ९ ततस्तेन मृधे हत्वा राजपुत्रेण वालिनम् । सुग्रीवः स्थापितो राज्ये हर्यृक्षाणां गणेश्वरः १० त्वया विज्ञातपूर्वश्च वाली वानरपुङ्गवः । स तेन निहतः सङ्ख्ये शरेणैकेन वानरः ११ स सीतामार्गणेऽव्यग्रः सुग्रीवः सत्यसङ्गरः । हरीन्संप्रेषयामास दिशः सर्वा हरीश्वरः १२ तां हरीणां सहस्राणि शतानि नियुतानि च । दिक्षु सर्वासु मार्गन्ते ह्यधश्चोपरि चाम्बरे १३ वैनतेयसमाः केचित्केचित्तत्रानिलोपमाः । असङ्गगतयः शीघ्रा हरिवीरा महाबलाः १४ अहं तु हनुमान्नाम मारुतस्यौरसः सुतः । सीतायास्तु कृते तूर्णं शतयोजनमायतम् १५ समुद्रं लङ्घयित्वैव त्वां दिदृक्षुरिहागतः । भ्रमता च मया दृष्टा गृहे ते जनकात्मजा १६ तद्भवान्दृष्टधर्मार्थस्तपःकृतपरिग्रहः । परदारान्महाप्राज्ञ नोपरोद्धुं त्वमर्हसि १७ न हि

---

झाली आहे ७. त्या देवीला शोधितां शोधितां राजपुत्र राम कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान ऋष्यमूक पर्वतावर आला असतां सुग्रीवाशीं त्याची भेट झाली ८. तेव्हां सीतेचा शोध लावण्याविषयीं त्या सुग्रीवानें त्याला वचन दिलें व रामानेंही सुग्रीवाला वानरराज्य अर्पण करण्याचें अभिवचन दिलें ९. तदनंतर त्या राजपुत्र रामानें युद्धामध्यें वालीचा वध करून वानर व ऋक्ष ह्यांच्या समुदायांचा अधिपति जो सुग्रीव त्याला राज्यावर बसविलें १०. सारांश, तुला पूर्वीपासूनच विदित असलेल्या वानरश्रेष्ठ वानर वालीचा त्या रामानें एकाच बाणाच्या योगानें संग्रामामध्यें वध केला ११. तदनंतर स्वकर्तव्याविषयीं दक्ष असलेल्या त्या सत्यवचनी वानराधिपति सुग्रीवानें सीतेच्या शोधाकरितां सर्व दिशेस वानर पाठवून दिले १२ व ते शेंकडों, हजारों, लाखों वानर सर्व दिशेस, वर आकाशामध्यें आणि अधोभागीं तिला शोधीत आहेत १३. शीघ्र गमन करणाऱ्या त्या महाबलाढ्य वानर वीरांची गति कोठेंही कुंठित होत नाहीं. त्यांपैकीं कांहीं वेगामध्यें गरुडाची बरोबरी करणारे असून कांहीं वायूची बरोबरी करणारे आहेत १४. मी वायूचा औरसपुत्र हनुमान् वानर सीतेकरितां शंभर योजनें लांब समुद्र सत्वर ओलांडून तुला पाहण्याकरितां येथें आलों आहें व हिंडतां हिंडतां तुझ्या घरीं जनककन्या सीताही माझ्या दृष्टीं पडली आहे १५, १६. तस्मात्, हे महामान्य रावणा, परस्त्रीला अडकवून ठेवणें तुला योग्य नाहीं. कारण, धर्म व अर्थ ह्यांचा अनुभव तुला आलेला आहे आणि तपश्चर्येमुळें तुझ्याजवळ धनधान्यादिकांची समृद्धि झालेली आहे १७. ज्यांच्यामुळें मोठाच अपाय

धर्मविरुद्धेषु बह्वपायेषु कर्मसु । मूलघातिषु सज्जन्ते बुद्धिमन्तो भवद्विधाः १८ कश्च लक्ष्मणमुक्तानां रामकोपानुवर्तिनाम् । शराणामग्रतः स्थातुं शक्तो देवासुरेष्वपि १९ न चापि त्रिषु लोकेषु राजन्विद्येत कश्चन । राघवस्य व्यलीकं यः कृत्वा सुखमवाप्नुयात् २० तत्त्रिकालहितं वाक्यं धर्म्यमर्थानुयायि च । मन्यस्व नरशार्दूल जानकी प्रतिदीयताम् २१ दृष्टा हीयं मया देवी लब्धं यदिह दुर्लभम् । उत्तरं कर्म यच्छेषं निमित्तं तत्र राघवः २२ लक्षितेयं मया सीता तथा शोकपरायणा । गृहे यां नाभिजानासि पञ्चास्यामिव पन्नगीम् २३ नेयं जरयितुं शक्या सा सुरैरमरैरपि । विषसंसृष्टमत्यर्थं भुक्तमन्नमिवौजसा २४ तपःसन्तापलब्धस्ते सोयं धर्मपरिग्रहः । न स नाशयितुं न्याय्य आत्मप्राणपरिग्रहः २५ अवध्यतां तपोभिर्या भवान्समनुपश्यति । आत्मनः सासुरैर्देवैर्हेतुस्तत्राप्ययं महान् २६ सुग्रीवो न च देवोयं न यक्षो न च राक्षसः । मानुषो राघवो राजन्सुग्रीवश्च हरीश्वरः ॥ तस्मात्प्राणपरित्राणं कथं राजन्करिष्यसि २७ न तु धर्मो-

---

होणारा आहे व समूल नाशच ज्यांच्या योगानें होणारा आहे अशा कर्मांचे ठिकाणीं तुमच्यासारिखे विचारी पुरुष कधीं आसक्त होत नाहींत १८. अरे, रामाच्या कोपाचें अनुकरण करणाऱ्या लक्ष्मणाचे हातून सुटलेल्या बाणापुढें टिकाव धरण्यास देवदैत्यांमध्यें तरी कोण समर्थ आहे ? १९. हे राजा, रामाचा अपराध केल्यावर सुखानें रहाणारा त्रैलोक्यामध्येंही कोणी नाहीं २०. तस्मात्, जानकी पुरुषश्रेष्ठ रामाला परत द्यावी हें माझें धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेलें व सर्व कालीं हितावह होणारें भाषण तूं लक्ष्यांत आण २१. दुर्लभ जी गोष्ट ती मला येथें प्राप्त झाली आहे; ह्मणजे ही सीतादेवी माझ्या दृष्टीं पडली आहे. आतां अवशिष्ट राहिलेलें जें कर्म तें रामामुळेंच होणारें आहे २२. पंचमुखी नागिणीप्रमाणें घरीं असलेली जी तूं ओळखीत नाहींस ती ही सीता शोकाकुल झालेली माझ्या दृष्टीं पडली आहे २३. विषसंयुक्त असलेलें अन्न अतिशय भक्षण केलें असतां बलाच्या योगानें ज्याप्रमाणें तें पचणें शक्य नाहीं त्याचप्रमाणें ती ही सीता देवदैत्यांनाही पचणें शक्य नाहीं २४. तपश्चर्या करून जें हें धर्मसाध्य ऐश्वर्य व दीर्घ आयुष्य तुला प्राप्त झालें आहे त्याचा अधर्माच्या योगानें नाश करून टाकणें योग्य नाहीं २५. असुरांसहवर्तमान देवांच्या हातून आज जी तुला तपांमुळें अवध्यता प्राप्त झाली आहे तिचें कारण तरी हें धर्माचरणच होय २६. हा सुग्रीव देव नव्हे, यक्ष नव्हे व राक्षसही नव्हे. हे राजा, सुग्रीव वानरांचा अधिपति आहे आणि राम मनुष्य आहे. वास्तव, हे भूपते, त्या सुग्रीवापासून

पसंहारमधर्मफलसंहितम् । तदेव फलमन्वेति धर्मश्चाधर्मनाशनः २८
प्राप्तं धर्मफलं तावद्भवता नात्र संशयः । फलमस्याप्यधर्मस्य क्षिप्रमेव
प्रपत्स्यसे २९ जनस्थानवधं बुद्ध्वा वालिनश्च वधं तथा । रामसुग्रीव-
सख्यं च बुध्यस्व हितमात्मनः ३० कामं खल्वहमप्येकः सवाजिरथ-
कुञ्जराम् । लङ्कां नाशयितुं शक्तस्तस्यैष तु न निश्चयः ३१ रामेण हि
प्रतिज्ञातं हर्यृक्षगणसंनिधौ । उत्सादनममित्राणां सीता यैस्तु प्रधर्षिता ३२
अपकुर्वन्हि रामस्य साक्षादपि पुरंदरः । न सुखं प्राप्नुयादन्यः किं पुनस्त्वद्विधो
जनः ३३ यां सीतेत्यभिजानासि येयं तिष्ठति ते गृहे । कालरात्रीति तां
विद्धि सर्वलङ्काविनाशिनीम् ३४ तदलं कालपाशेन सीताविग्रहरूपिणा ।
स्वयं स्कन्धावसक्तेन क्षेममात्मनि चिन्त्यताम् ३५ सीतायास्तेजसा दग्धां
रामकोपप्रदीपिताम् । दह्यमानामिमां पश्य पुरीं साट्टप्रतोलिकाम् ३६
स्वानि मित्राणि मन्त्रींश्च ज्ञातीन्भ्रातॄन्सुतान्हितान् । भोगान्दारांश्च लङ्कां
च मा विनाशमुपानय ३७ सत्यं राक्षसराजेन्द्र शृणुष्व वचनं मम ।

---

तूं आपलें प्राणरक्षण कसें करशील ? २७. धर्माचें फल जें सुख तें अधर्मफल-रूप दुःखानें कधींही युक्त होत नाहीं. धर्म केला असतां धर्मफल जें सुख तेंच प्राप्त होत असतें आणि अधर्म केला असतां अधर्मफल जें दुःख तेंच प्राप्त होतें. शिवाय धर्म हा अधर्मनाशक आहे २८,२९. आजपर्यंत धर्माचें फल तुला प्राप्त झालें आहे ह्यांत संशयच नाहीं; आतां ह्या अधर्माचेंही फल सत्वरच तुला प्राप्त होईल ३०. खरोखर अश्व, रथ आणि गज ह्यासहवर्तमान लंकेचा नाश करण्यास मी एकटाही समर्थ आहें. परंतु, त्या रामाचा हा विचार नाहीं ३१. कारण, ज्यांनीं सीतेचा अपहार केलेला आहे त्या शत्रूंचा नाश करण्याची प्रतिज्ञा वानरगण व ऋक्षगण ह्यांचे संनिध रामानें केली आहे ३२. अरे, रामाला अपकार करणाऱ्या प्रत्यक्ष इंद्रालाही सुख होणार नाहीं; मग तुझ्यासारिख्या यःकश्चित् सामान्य जनाची गोष्ट कशाला पाहिजे ? ३३. जिला तूं सीता असें समजत आहेस आणि जी ही तुझ्या घरामध्यें रहात आहे ती सर्व लंकेचा नाश करणारी कालरात्रिच आहे हें तूं समजून ठेव ३४. सारांश, स्वतःच खांद्यावर टाकिलेला हा सीताशरीररूप कालपाश आतां पुरे झाला; आपल्या कल्याणाचा तूं आतां कांहीं तरी विचार कर ३५. नाहीं तर रामाच्या कोपानें प्रदीप्त आणि सीतेच्या तेजानें आधींच दग्ध झालेली ही लंका मार्ग व इमारती ह्यांसहवर्तमान जळत असलेली तुला पाहण्याचा प्रसंग येईल ३६. स्वतःचे मित्र, मंत्री, जातभाई, भ्राते, पुत्र, हितावह भोग्य वस्तु, भार्या आणि लंका ह्यांचा तूं नाश करून घेऊं नको ३७. हे राक्षसराजाधिराज, मज रामदासाचें आणि

रामदासस्य दूतस्य वानरस्य विशेषतः ३८ सर्वांल्लोकान्सुसंहृत्य सभूता-न्सचराचरान् । पुनरेव तथा स्रष्टुं शक्तो रामो महायशाः ३९ देवासुर-नरेन्द्रेषु यक्षरक्षोरगेषु च । विद्याधरेषु नागेषु गन्धर्वेषु मृगेषु च ४० सिद्धेषु किंनरेन्द्रेषु पतत्रिषु च सर्वतः । सर्वत्र सर्वभूतेषु सर्वकालेषु नास्ति सः ४१ यो रामं प्रतियुध्येत विष्णुतुल्यपराक्रमम् ४२ सर्वलोकेश्वर-स्येह कृत्वा विप्रियमीदृशम् । रामस्य राजसिंहस्य दुर्लभं तव जीवितम् ४३ देवाश्च दैत्याश्च निशाचरेन्द्र गन्धर्वविद्याधरनागयक्षाः । रामस्य लोक-त्रयनायकस्य स्थातुं न शक्ताः समरेषु सर्वे ४४ ब्रह्मा स्वयंभूश्चतुराननो वा रुद्रस्त्रिनेत्रस्त्रिपुरान्तको वा । इन्द्रो महेन्द्रः सुरनायको वा स्थातुं न शक्ता युधि राघवस्य ४५ स सौष्ठवोपेतमदीनवादिनः कपेर्निशम्याप्रति-मोऽप्रियं वचः । दशाननः कोपविवृत्तलोचनः समादिशत्तस्य वधं महा-कपेः ४६ [ २१४३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

स तस्य वचनं श्रुत्वा वानरस्य महात्मनः । आज्ञापयद्वधं तस्य रावणः

---

विशेषतः वानरदूताचें सत्य भाषण तूं श्रवण कर ३८. महाकीर्तिमान् राम स्थावरजंगमात्मक प्राण्यांसहवर्तमान व पंचमहाभूतांसहवर्तमान सर्व लोकांचा संहार करून पुनरपि त्यांना उत्पन्न करण्यासही समर्थ आहे ३९. देव, असुर व मनुष्य ह्यांचे अधिपति, यक्ष, राक्षस, उरग, विद्याधर, नाग, गंधर्व, मृग ४०, सिद्ध, किन्नराधिपति, सर्व पक्षी, किंबहुना कोणत्याही वेळीं कोणत्याही ठिकाणचे कोणतेही प्राणी ह्यांमध्यें विष्णुतुल्य पराक्रमी रामाशीं सामना करणारा कोणीही नाहीं ४१, ४२. सर्वलोकाधिपति नृपश्रेष्ठ रामाचा अशा प्रकारें अपराध करून तुझें जीवित कायम रहाणें अशक्य आहे ४३. "हे राक्षसाधिपते, देव, दैत्य, गंधर्व, विद्याधर, नाग आणि यक्ष हे सर्व मिळूनही संग्रामामध्यें त्रैलोक्याधिपति रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहींत ४४. स्वयंभु चतुर्मुख ब्रह्मदेव, त्रिपुरनाशक, त्रिलोचन रुद्र, विष्णु अथवा देवाधिपति इंद्रही युद्धामध्यें रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहीं " ४५. ह्याप्रमाणें दीन वाणीचें अवलंबन न करितां भाषण करणाऱ्या त्या वानराचें तें सयुक्तिक परंतु अप्रिय भाषण श्रवण केल्यावर त्या अतुल रावणाचे नेत्र कोपानें चढून गेले आणि त्यानें त्या महाकपीचा वध करण्याची आज्ञा दिली ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

महात्म्या वानराचें भाषण श्रवण केल्यानंतर क्रोधानें व्याप्त झालेल्या रावणानें त्याच्या

क्रोधमूर्छितः १ वधे तस्य समाज्ञप्ते रावणेन दुरात्मना । निवेदितवतो दौत्यं नानुमेने विभीषणः २ तं रक्षोधिपतिं क्रुद्धं तच्च कार्यमुपस्थितम् । विदित्वा चिन्तयामास कार्यं कार्यविधौ स्थितः ३ निश्चितार्थस्ततः साम्ना पूज्यं शत्रुजिदग्रजम् । उवाच हितमत्यर्थं वाक्यं वाक्यविशारदः ४ क्षमस्व रोषं त्यज राक्षसेन्द्र प्रसीद मे वाक्यमिदं शृणुष्व । वधं न कुर्वन्ति परावरज्ञा दूतस्य सन्तो वसुधाधिपेन्द्राः ५ राजन्धर्मविरुद्धं च लोकवृत्तेश्च गर्हितम् । तव चासदृशं वीर कपेरस्य प्रमापणम् ६ धर्मज्ञश्च कृतज्ञश्च राजधर्मविशारदः । परावरज्ञो भूतानां त्वमेव परमार्थवित् ७ गृह्यन्ते यदि रोषेण त्वादृशोऽपि विचक्षणाः । ततः शास्त्रविपश्चित्त्वं श्रम एव हि केवलम् ८ तस्मात्प्रसीद शत्रुघ्न राक्षसेन्द्र दुरासद । युक्तायुक्तं विनिश्चित्य दूतदण्डो विधीयताम् ९ विभीषणवचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः । कोपेन महताविष्टो वाक्यमुत्तरमब्रवीत् १० न पापानां वधे

---

वधाची आज्ञा केली १; परंतु, दुरात्म्या रावणानें आपलें दूतकर्म योग्य रीतीनें बजावणाऱ्या त्या हनुमानाच्या वधाची आज्ञा केली असतां बिभीषणाचें तिला अनुमोदन मिळालें नाहीं २. तेव्हां उचितकार्य करण्याविषयीं ज्याचा निश्चय झालेला आहे असा तो बिभीषण त्या क्रुद्ध झालेल्या राक्षसाकडे आणि उपस्थित झालेल्या कार्याकडे लक्ष्य देऊन पुढें काय करावें ह्याचा विचार करूं लागला ३; आणि निश्चय झाल्यानंतर तो संभाषणपटु शत्रुविजयी बिभीषण आपल्या पूज्य ज्येष्ठ भ्रात्याशीं सौम्य रीतीनें अत्यंत हितकारक असें भाषण करूं लागला ४. ( तो ह्मणाला ) " हे राक्षसाधिपते, क्षमा असावी; आपण क्रोध सोडून द्या आणि कृपा करून माझें हें भाषण श्रवण करा. सन्मार्गानें वागणारे सदसद्विचारी राजाधिराज दूताचा वध करीत नाहींत ५. तस्मात्, हे वीर राजा, ह्या वानराचा वध करणें हें धर्माला विरुद्ध असून लोकव्यवहारालाही निंद्य आहे आणि आपणांला अयोग्य आहे ६. आपण उत्कृष्ट गोष्ट कोणती हें जाणणारे आहांत. कारण, प्राणिमात्रासंबंधानें सर्व कांहीं बरें वाईट आपण जाणणारे असून धर्मज्ञ, कृतज्ञ व राजधर्मामध्यें निपुण असे आहांत ७. ह्यास्तव, आपणांसारिखे ज्ञानीही जर क्रोधाच्या तावडींत सांपडूं लागले तर शास्त्रांमध्यें पांडित्य संपादन करणें ह्मणजे केवळ व्यर्थ प्रयासच आहे असें समजलें पाहिजे ८. तस्मात्, हे अजिंक्य, हे शत्रुनाशक, हे राक्षसाधिपते, आपण कृपा करा आणि योग्य कोणतें व अयोग्य कोणतें ह्याचा निश्चय करून मग दूताला दंड करा " ९. हें बिभीषणाचें भाषण श्रवण करून राक्षसाधिपति रावण अतिशयच क्रुद्ध झाला आणि ह्मणाला १० " हे

पापं विद्यते शत्रुसूदन । तस्मादिमं वधिष्यामि वानरं पापकारिणम् ११ अधर्ममूलं बहुदोषयुक्तमनार्यजुष्टं वचनं निशम्य । उवाच वाक्यं परमार्थतत्त्वं विभीषणो बुद्धिमतां वरिष्ठः १२ प्रसीद लङ्केश्वर राक्षसेन्द्र धर्मार्थतत्त्वं वचनं शृणुष्व । दूता न वध्याः समयेषु राजन्सर्वेषु सर्वत्र वदन्ति सन्तः १३ असंशयं शत्रुरयं प्रवृद्धः कृतं ह्यनेनाप्रियमप्रमेयम् । न दूतवध्यां प्रवदन्ति सन्तो दूतस्य दृष्टा बहवो हि दण्डाः १४ वैरूप्यमङ्गेषु कशाभिघातो मौण्ड्यं तथा लक्षणसंनिपातः । एतान्हि दूते प्रवदन्ति दण्डान्वधस्तु दूतस्य न नः श्रुतोऽस्ति १५ कथं च धर्मार्थविनीतबुद्धिः परावरप्रत्ययनिश्चितार्थः । भवद्विधः कोपवशे हि तिष्ठेत्कोपं न गच्छन्ति हि सत्त्ववन्तः १६ न धर्मवादे न च लोकवृत्ते न शास्त्रबुद्धिग्रहणेषु वापि । विद्येत कश्चित्तव वीर तुल्यस्त्वं ह्युत्तमः सर्वसुरासुराणाम् १७ न चाप्यस्य कपेर्घाते कंचित्पश्याम्यहं गुणम् । तेष्वयं पात्यतां दण्डो यैरयं प्रेषितः

---

शत्रुनाशका, पाप्याचा वध करण्यांत पातक नाहीं. ह्यास्तव, मी ह्या पापी वानराचा वध करीत आहें " ११. अनेक दोषांनीं भरलेलें, दुष्टांनाच योग्य आणि अधर्माचें मूळ असें हें भाषण श्रवण केल्यावर बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ असलेला बिभीषण उत्कृष्ट तत्त्वांनीं युक्त असलेलें भाषण त्याच्याशीं करूं लागला १२. ( तो ह्मणाला ) " हे लंकाधिपते, हे राक्षसराज, धर्म आणि अर्थ ह्यांच्या तत्त्वाला अनुसरून असलेलें माझें भाषण आपण श्रवण करा. हे राजा, दूत आपलें कर्तव्य करीत असतांना कोणत्याही वेळीं त्यांचा वध करितां उपयोगीं नाहीं असें सर्व ठिकाणीं सज्जन ह्मणत असतात १३. ह्या शत्रु निःसंशय प्रबल झाला असून ह्यानें आपला परीकाष्ठेचा अपराध केला आहे ; परंतु, दूताचा वध सज्जनांनीं सांगितलेला नाहीं. दूताला दुसरे पुष्कळ दंड सांगितलेले आहेत १४. गात्रांचे ठिकाणीं विरूपता, चाबकांचा मार व मुंडन ह्यांपैकीं एकेक अथवा हीं सगळीं हे दंड दूताला सज्जनांनीं सांगून ठेविलेले आहेत. दूताचा वध आमच्या ऐकण्यांत नाहीं १५. धर्मशास्त्र व अर्थशास्त्र ह्यांमुळें ज्याच्या बुद्धीला संस्कार झालेला आहे आणि उत्कृष्ट कोणतें व निकृष्ट कोणतें हें समजत असल्यामुळें कर्तव्यासंबंधानें ज्याचा निश्चय झालेला आहे असा आपणासारिखा पुरुष कोपाच्या अधीन होऊन कसा राहील? १६. हे वीरा, धर्मवाद, लोकवर्तन आणि शास्त्रसिद्धांत ग्रहण करणें ह्यांमध्यें आपली बरोबरी करणारा कोणीही नसून आपणच सर्व देवदैत्यांमध्यें श्रेष्ठ आहांत १७. सारांश, मला ह्या वानराचा वध करण्यांत कांहींएक अर्थ दिसत नाहीं. ज्यांनीं ह्या वानराला पाठविलें त्यांच्यावर ह्या शिक्षेचा अंमल

कपिः १८ साधुर्वा यदि वासाधुः परैरेष समर्पितः । ब्रुवन्परार्थं परवान्न दूतो वधमर्हति १९ अपि चास्मिन्हते नान्यं राजन्पश्यामि खेचरम् । तस्मान्नास्य वधे यत्नः कार्यः परपुरंजय । भवान्सेन्द्रेषु देवेषु यत्नमास्थातुमर्हति २० अस्मिन्विनष्टे न हि भूतमन्यं पश्यामि यस्तौ नरराजपुत्रौ । युद्धाय युद्धप्रिय दुर्विनीतावुद्योजयेद्वै भवता विरुद्धौ २१ पराक्रमोत्साहमनस्विनां च सुरासुराणामपि दुर्जयेन । त्वया मनोनन्दन नैर्ऋतानां युद्धाय निर्नाशयितुं न युक्तम् २२ हिताश्च शूराश्च समाहिताश्च कुलेषु जाताश्च महागुणेषु । मनस्विनः शस्त्रभृतां वरिष्ठाः कोपप्रशस्ताः सुभृताश्च योधाः २३ तदेकदेशेन बलस्य तावत्केचित्तवादेशकृतोद्य यान्तु । तौ राजपुत्रावुपगृह्य मूढौ परेषु ते भावयितुं प्रभावम् २४ निशाचराणामधिपोनुजस्य विभीषणस्योत्तमवाक्यनिष्ठम् । जग्राह बुद्ध्या सुरलोकशत्रुर्महाबलो राक्षसराजमुख्यः २५ [ २१६८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

---

होऊं दे १८. हा बरा असो अथवा वाईट असो; दुसऱ्यांनीं त्याला पाठविलें आहे आणि ह्मणूनच दुसऱ्याचा निरोप सांगणारा हा पराधीन दूत वधास पात्र नाहीं १९. शिवाय, हे शत्रुसमुदायविजयी राजा, ह्याचा वध झाला असतां आकाशमार्गानें येथें येणारा मला दुसरा कोणी दिसत नाहीं. तस्मात्, ह्याच्या वधाविषयीं आपण यत्न करूं नये. इंद्रासहवर्तमान देवासंबंधानें आपण यत्न करणें योग्य आहे २०. हे युद्धप्रिय, हा दूत नाहींसा झाल्यावर तुझ्याशीं विरुद्ध असलेल्या त्या उद्दाम राजपुत्रांना युद्धाविषयीं उद्युक्त करणारा दुसरा कोणी प्राणी मला दिसत नाहीं २१. पराक्रम, उत्साह आणि बुद्धि ह्यांनीं युक्त असलेल्या देवदैत्यांनाही आपण अजिंक्य आहां; ह्यास्तव, हे राक्षसांना आनंद देणाऱ्या, युद्धाकरितां उद्युक्त झालेल्या मनाचा भंग करणें तुला योग्य नाहीं २२. आज आपणांपाशीं असलेले योद्धे मोठ्या मोठ्या गुणवान् कुलांमध्यें उत्पन्न झालेले आहेत; ते हित करणारे आहेत;. शूर आहेत; स्वकर्तव्याविषयीं दक्ष आहेत; विचारी आहेत; शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेत; तूं त्यांचें उत्तम रीतीनें पोषण केलेलें आहेस आणि अपमान सहन न करण्याविषयीं त्यांची प्रसिद्धि आहे २३. ह्यास्तव, थोडेसें सैन्य बरोबर घेऊन आपल्या आज्ञेप्रमाणें वागणारे कांहीं योद्धे शत्रूंचे ठिकाणीं आपला प्रभाव गाजविण्याकरितां आज जाऊं दे आणि त्या मूढ राजपुत्रांना त्यांना घेऊन येऊं दे " २४. ह्याप्रमाणें कनिष्ठ भ्राता बिभीषणाचा उत्कृष्ट शब्दांनीं दर्शविलेला उपदेश त्या मुख्य राक्षसराज व निशाचराधिपति

तस्य तद्वचनं श्रुत्वा दशग्रीवो महात्मनः । देशकालहितं वाक्यं भ्रातुरुत्तरमब्रवीत् १ सम्यगुक्तं हि भवता दूतवध्या विगर्हिता । अवश्यं तु वधादान्यः क्रियतामस्य निग्रहः २ कपीनां किल लाङ्गूलमिष्टं भवति भूषणम् । तदस्य दीप्यतां शीघ्रं तेन दग्धेन गच्छतु ३ ततः पश्यन्त्वमुं दीनमङ्गवैरूप्यकर्शितम् । समित्रज्ञातयः सर्वे बान्धवाः ससुहृज्जनाः ४ आज्ञापयद्राक्षसेन्द्रः पुरं सर्वं सचत्वरम् । लाङ्गूलेन प्रदीप्तेन रक्षोभिः परिणीयताम् ५ तस्य तद्वचनं श्रुत्वा राक्षसाः कोपकर्कशाः । वेष्टन्ते तस्य लाङ्गूलं जीर्णैः कार्पासिकैः पटैः ६ संवेष्ट्यमाने लाङ्गूले व्यवर्धत महाकपिः । शुष्कमिन्धनमासाद्य वनेष्विव हुताशनम् ७ तैलेन परिषिच्याथ तेऽग्निं तत्रोपपादयन् । लाङ्गूलेन प्रदीप्तेन राक्षसांस्तानताडयत् ८ रोषामर्षपरीतात्मा बालसूर्यसमाननः । स भूयः सङ्गतैः क्रूरै राक्षसैर्हरिपुङ्गवः ९ सहस्त्रीबालवृद्धाश्च जग्मुः प्रीतिं निशाचराः । निबद्धः कृत-

---

महाबलाढ्य देवशत्रु रावणानें मनापासून स्वीकारिला २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५२॥

त्या महात्म्या बिभीषणाचें तें भाषण श्रवण केल्यावर रावणानें देशकालाला अनुरूप अशा शब्दांनीं त्या भ्रात्याला उत्तर दिलें १. (तो ह्मणाला) "तूं चांगलें बोललास. दूताचा वध निंद्य मानिला आहे. परंतु, वधाच्याच तोडीचा कांहीं प्रकार करण्याकरितां ह्याला आणखी एकदां अवश्य बांधून टाकावें २. पुच्छ हें खरोखर वानरांना मोठें प्रिय व भूषण असतें; ह्यास्तव, तें पुच्छच तुह्मी ह्याचें सत्वर पेटवून द्या; त्या दग्ध झालेल्या पुच्छासहवर्तमान त्याला जाऊं द्या ३ आणि तदनंतर, मित्रत्वानें वागणारे जातभाई, बांधव, आणि सुहृज्जन ह्या सर्वांना ह्याला दीन आणि शरीराच्या विरूपतेमुळें कृश झालेला अवलोकन करूं द्या" ४. ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर राक्षसाधिपति रावणानें "वानराचें पुच्छ प्रदीप्त करून राक्षसांनीं सर्व नगरांतून व चवाठ्यांवरून त्याला फिरवावें" अशी आज्ञा केली ५. तेव्हां, त्याचें तें भाषण श्रवण केल्यावर क्रोधानें गर्जना करूं लागलेले ते राक्षस त्याच्या पुच्छाला चिंध्या गुंडाळूं लागले ६; आणि शुष्क काष्ठाचा संयोग झाला असतां ज्याप्रमाणें वनामध्यें अग्नि वृद्धिंगत होतो त्याप्रमाणें राक्षस चिंध्या गुडाळूं लागले असतां तो महाकपि हनुमान् वृद्धिंगत होऊं लागला ७. तदनंतर वर तेल ओतून त्या राक्षसांनीं त्याला आग लाविली; आणि त्या प्रदीप्त झालेल्या पुच्छानें त्या राक्षसांना त्यानें ताडन केलें ८. नंतर क्रूर राक्षसांनीं एकत्र मिळून बालसूर्यतुल्य तेजस्वी मुखानें युक्त असलेल्या आणि क्रोध व

वान्वीरस्तत्कालसदृशीं मतिम् १० कामं खलु न मे शक्ता निबद्धस्यापि राक्षसाः । छित्त्वा पाशान्समुत्पत्य हन्यामहमिमान्पुनः ११ यदि भर्तृहितार्थाय चरन्तं भर्तृशासनात् । निबध्नन्ते दुरात्मानो न तु मे निष्कृतिः कृता १२ सर्वेषामेव पर्याप्तो राक्षसानामहं युधि । किं तु रामस्य प्रीत्यर्थं विषहिष्येहमीदृशम् १३ लङ्का चारयितव्या मे पुनरेव भवेदिति । रात्रौ न हि सुदृष्टा मे दुर्गकर्मविधानतः १४ अवश्यमेव द्रष्टव्या मया लङ्का निशाक्षये । कामं बध्नन्तु मे भूयः पुच्छस्योद्दीपनेन च १५ पीडां कुर्वन्ति रक्षांसि न मेस्ति मनसः श्रमः १६ ततस्ते संवृताकारं सत्त्ववन्तं महाकपिम् । परिगृह्य ययुर्हृष्टा राक्षसाः कपिकुञ्जरम् १७ शङ्खभेरीनिनादैश्च घोषयन्तः स्वकर्मभिः । राक्षसाः क्रूरकर्माणश्चारयन्ति स्म तां पुरीम् १८ अन्वीयमानो रक्षोभिर्ययौ सुखमरिन्दमः । हनूमांश्चार-

---

असहिष्णुता यांनीं व्याप्त झालेल्या त्या वानरश्रेष्ठाला अधिकच आवळून टाकिलें ९; आणि स्त्रिया, बाल, व वृद्ध यांसहवर्तमान ते सर्वही राक्षस आनंदित झाले. राक्षसांनीं करकचून बांधलें असतां त्या समयाला योग्य असा विचार त्या वीरानें मनामध्यें आणिला १०. ( तो ह्मणाला ) " मी जरी बद्ध झालों आहें तरी राक्षसांचें खरोखर माझ्यापुढें कांहीं एक चालावयाचें नाहीं; मी हे पाश तोडून टाकून उड्डाणाबरोबर यांना मारून टाकीन ११. स्वामीचें हित करण्याकरितां संचार करणाऱ्या मला जरी आपल्या मालकाच्या आज्ञेनें हे दुरात्मे बांधून टाकीत आहेत तरी मी जें येथें नुकसान केलें आहे त्याची भरपाई यांच्या हांतून होणार नाहीं १२. संग्रामामध्यें सर्वही राक्षसांचा समाचार घेण्यास मी समर्थ आहें; परंतु, रामाचे प्रीत्यर्थ हा अशा प्रकारचा अपमान मला सहन केला पाहिजे १३. शिवाय, मला पुनरपि एकदां लंकेमध्यें संचारही करावयाचा आहेच; कारण, ठिकठिकाणीं दुर्गम स्थलें बांधून ठेविलीं असल्यामुळें रात्रींही लंकानगरी मला चांगलीशी पहावयास सांपडली नाहीं १४. रात्र उजाडल्यावर लंका मला अवश्य पाहिलीच पाहिजे. मला हे खुशाल बांधोत. पुच्छ प्रदीप्त करून १५ हे राक्षस मला पीडा देत आहेत; परंतु, माझ्या मनाला मुळींच खेद होत नाहीं " १६. ह्याप्रमाणें हनुमानानें विचार केला असतां आपलें स्वरूप गुप्त ठेविलेल्या त्या बलाढ्य वानरश्रेष्ठ महाकपीला आनंदानें ते राक्षस घेऊन गेले १७. नतर शंख व नगारे यांच्या ध्वनींनीं आपला पराक्रम गाजवीत गाजवीत ते क्रूरकर्मी राक्षस त्या हनुमानाला नगरींतून हिंडवूं लागले १८. राक्षस मागें लागले असतांना शत्रूला जर्जर करणारा तो हनुमान् खुशाल पुढें चालला आणि अशा

चामास राक्षसानां महापुरीम् १९ यथापश्यद्विमानानि विचित्राणि महाकपिः। संवृतान्भूमिभागांश्च सुविभक्तांश्च चत्वरान् २० रथ्याश्च गृहसंबाधाः कपिः शृङ्गाटकानि च। तथा रथ्योपरथ्याश्च तथैव च गृहान्तरान् २१ चत्वरेषु चतुष्केषु राजमार्गे तथैव च। घोषयन्ति कपिं सर्वे चार इत्येव राक्षसाः २२ दीप्यमाने ततस्तस्य लाङ्गूलाग्रे हनूमतः। राक्षस्यस्ता विरूपाक्ष्यः शंसुर्देव्यास्तदप्रियम् २३ यस्त्वया कृतसंवादः सीते ताम्रमुखः कपिः। लाङ्गूलेन प्रदीप्तेन स एष परिणीयते २४ श्रुत्वा तद्वचनं क्रूरमात्मापहरणोपमम्। वैदेही शोकसंतप्ता हुताशनमुपागमत् २५ मङ्गलाभिमुखी तस्य सा तदासीन्महाकपेः। उपतस्थे विशालाक्षी प्रयता हव्यवाहनम् २६ यद्यस्ति पतिशुश्रूषा यद्यस्ति चरितं तपः। यदि वा त्वेकपत्नीत्वं शीतो भव हनूमतः २७ ततस्तीक्ष्णार्चिरव्यग्रः प्रदक्षिणशिखोनलः। जज्वाल मृगशावाक्ष्याः शंसन्निव शुभं कपेः २८ हनूमज्जनकश्चैव पुच्छानलयुतो-

---

रीतीनें त्या राक्षसांच्या महानगरीमध्यें त्यानें संचार केला १९. जातां जातां त्या महाकपीनें अद्भुत वाडे, इमारतींनीं आच्छादित झालेले भूप्रदेश, सुव्यवस्थितपणें रेखिलेले चौक २०, घरांनीं गजबजून गेलेले रस्ते, चवाठे, लहान मोठे मार्ग आणि घरांमधील मोकळे प्रदेश अवलोकन केले २१. चौकांतून, चवाठ्यांवरून आणि राजमार्गांवरून ते सर्वही राक्षस " हेर " असें ह्मणत ह्मणत त्या वानराची दवंडी पिटूं लागले २२. असो. त्या हनुमानाच्या पुच्छाचें अग्र प्रदीप्त होऊं लागलें असतां कुरूप नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसस्त्रिया सीतादेवीला ती अप्रिय वार्ता कथन करूं लागल्या २३. ( त्या ह्मणाल्या ) " हे सीते ज्या ताम्रमुख वानरानें तुझ्याशीं संभाषण केलें त्याच या वानराला त्याचें पुच्छ प्रदीप्त करून सर्व बाजूंनीं हिंडवीत आहेत " २४. हें आपल्या अपहाराप्रमाणेंच दुःखकारक असलेलें भयंकर भाषण श्रवण करून सीता शोकाकुल झाली आणि अग्नीचें ध्यान करूं लागली २५. सारांश, त्या महाकपीचे कल्याणाची इच्छा धरून त्या विशालनयना जितेंद्रिय सीतेनें " मी जर पतीची शुश्रूषा केली असेल, जर कांहीं तप केलें असेल, अथवा माझे ठिकाणीं जर पातिव्रत्य असेल तर ( हे अग्ने ) तूं हनुमानाला शीतल हो " अशी अग्नीची प्रार्थना केली २६, २७. तेव्हां तीक्ष्ण तेजानें युक्त असलेला आणि कर्तव्याविषयीं दक्ष असलेला तो अग्नि, वानराचें स्वास्तिक्षेम त्या विशालनयना सीतेला सुचवीत सुचवीत, प्रदक्षणीक ज्वाला जातील अशा रीतीनें प्रज्वलित होऊं लागला २८; आणि हनुमानाचा जनक वायु त्याच्या पुच्छांतील अग्नीनें युक्त झाला असूनसुद्धां

निलः । ववौ स्वास्थ्यकरो देव्याः प्रालेयानिलशीतलः २९ दह्यमाने च लाङ्गूले चिन्तयामास वानरः । प्रदीप्तोऽग्निरयं कस्मान्न मां दहति सर्वतः ३० दृश्यते च महाज्वालः करोति च न मे रुजम् । शिशिरस्येव संपातो लाङ्गूलाग्रे प्रतिष्ठितः ३१ अथ वा तदिदं व्यक्तं यद्दृष्टं प्लवता मया । रामप्रभावादाश्चर्यं पर्वतः सरितां पतौ ३२ यदि तावत्समुद्रस्य मैनाकस्य च धीमतः । रामार्थं संभ्रमस्तादृक्किमग्निर्न करिष्यति ३३ सीतायाश्चानृशंस्येन तेजसा राघवस्य च । पितुश्च मम सख्येन न मां दहति पावकः ३४ भूयः स चिन्तयामास मुहूर्तं कपिकुञ्जरः । कथमस्मद्विधस्येह बन्धनं राक्षसाधमैः ॥ प्रतिक्रियास्य युक्ता स्यात्सति मह्यं पराक्रमे ३५ ततश्छित्त्वा च तान्पाशान्वेगवान्वै महाकपिः । उत्पपाताथ वेगेन ननाद च महाकपिः ३६ पुरद्वारं ततः श्रीमाञ्शैलशृङ्गमिवोन्नतम् । विभक्तरक्षःसंबाधमाससादानिलात्मजः ३७ स भूत्वा शैलसंकाशः क्षणेन पुनरात्मवान् । ह्रस्वतां परमां प्राप्तो बन्धनान्यवशातयत् ३८

---

बर्फाच्या प्रदेशावरील वायूप्रमाणें शीतल वाहूं लागल्यामुळेंही सीतादेवीच्या मनाला स्वस्थता वाटूं लागली २९. असो. पुच्छ जळूं लागलें असतां तो वानर मनांमध्यें ह्मणाला " अग्नि प्रदीप्त झाला असूनही सर्व प्रकारें हा मला दग्ध कां करून टाकीत नाहीं ? ३०. याची ज्वाला तर मोठी दिसत आहे. परंतु, हा मला मुळींच पीडा करीत नाहीं. बर्फाच्या गोळ्याप्रमाणें हा माझ्या पुच्छाच्या शेवटीं आहे असें मला भासतें ३१. अथवा रामाच्या प्रभावामुळें, आकाशमार्गानें उड्डाण करीत असतां समुद्रामध्यें ज्याप्रमाणें मला पर्वतरूप आश्चर्य दृष्टीं पडलें, त्याप्रमाणें हेंही एक उघड उघड आश्चर्यच मला आढळून आलें आहे ३२. सारांश, समुद्र आणि विचारी मैनाक पर्वत यांचीही जर रामाकरितां तशा प्रकारची गडबड उडून गेली होती, तर रामाकरितां अग्नि काय करणार नाहीं ? ३३. सीतेचें दयालुत्व, रामाचें तेज आणि माझ्या पित्याशीं असलेलें अग्नीचें सख्य यांच्या योगानें मला अग्नि दग्ध करीत नाहीं " ३४. ह्यानंतर पुनरपि तो वानरश्रेष्ठ आपल्या मनाशीं ह्मणाला " आमच्यासारख्याचें बंधन हे अधम राक्षस याठिकाणीं कसे करीत आहेत ? माझ्या अंगांत जर पराक्रम आहे तर याच्या उलट आपणही कांहीं क्रिया करणें योग्यच होणार आहे " ३५. तदनंतर त्या वेगवान् महाकपीनें ते पाश तोडून टाकून वेगानें उड्डाण केलें आणि गर्जनाही केली ३६. नंतर राक्षसांची ज्या ठिकाणीं गर्दी नाहीं, अशा पर्वतशिखराप्रमाणें उच्च असलेल्या नगरद्वारावर तो श्रीमान् वायुपुत्र जाऊन बसला ३७. तो मनोनिग्रही हनुमान् पर्वतप्राय बनून एका क्षणांत

विमुक्तश्चाभवच्छ्रीमान्पुनः पर्वतसंनिभः। वीक्षमाणश्च ददृशे परिघं तोर-
णाश्रितम् ३९ स तं गृह्य महाबाहुः कालायसपरिष्कृतम् । रक्षिणस्तान्पुनः
सर्वान्सूदयामास मारुतिः ४० स तान्निहत्वा रणचण्डविक्रमः समीक्ष-
माणः पुनरेव लङ्काम्। प्रदीप्तलाङ्गूलकृतार्चिमाली प्रकाशितादित्य इवा-
र्चिमाली ४१ [ २२०९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्ये सुन्दरकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥ ५३ ॥

वीक्ष्यमाणस्ततो लङ्कां कपिः कृतमनोरथः। वर्धमानसमुत्साहः कार्य-
शेषमचिन्तयत् १ किं नु खल्ववशिष्टं मे कर्तव्यमिह सांप्रतम् । यदेषां
रक्षसां भूयः संतापजननं भवेत् २ वनं तावत्प्रमथितं प्रकृष्टा राक्षसा हताः।
बलैकदेशः क्षपितः शेषं दुर्गविनाशनम् ३ दुर्गे विनाशिते कर्म भवेत्सु-
खपरिश्रमम् । अल्पयत्नेन कार्येस्मिन्मम स्यात्सफलः श्रमः ४ यो ह्ययं
मम लाङ्गूले दीप्यते हव्यवाहनः । अस्य संतर्पणं न्याय्यं कर्तुमेभिर्गृ-

पुनरपि अतिशयच लहान झाला आणि अशा रीतीनें त्यानें सर्वही बंधनें दूर केलीं ३८. असो. अशा रीतीनें बंधनांतून मुक्त झाल्यावर पुनरपि तो श्रीमान् हनुमान् पर्वतप्राय बनून आपल्या त्या दरवाज्यावरील परिघाकडे पाहत आहे असा दिसूं लागला ३९; आणि लोखंडानें मढविलेला तो परीघ हातीं घेऊन त्या महापराक्रमी मारुतीनें पुनरपि त्या सर्वही रक्षकांचा वध केला ४०. असो. रणामध्यें भयंकर पराक्रम करणारा हनुमान् याप्रमाणें त्यांचा वध करून पुनरपि लंकेकडे पाहूं लागला, आणि दीप्त झालेल्या पुच्छामुळें किरणसमुदायांनीं तो व्याप्त झाला असल्याकारणानें उदय पावलेल्या तेजोराशि सूर्याप्रमाणें दिसूं लागला ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

तदनंतर मनोरथ सिद्धीस गेलेला तो वानर लंकेकडे पाहूं लागला असतां त्याचा उत्साह वृद्धिंगत होऊं लागला आणि अवशिष्ट राहिलेल्या कार्याविषयीं तो मनामध्यें विचार करूं लागला १. ( तो मनामध्यें ह्मणाला ) "ह्या राक्षसांना आणखीही संताप उत्पन्न करणारें असें माझें सांप्रत काय बरें कर्तव्य खरोखर अवशिष्ट राहिलें आहे ? २. प्रथम वनाचा तर मीं विध्वंस केला; प्रबल राक्षसांचाही वध केला आणि थोडकेसें सैन्यही नाहींसें केलें. आतां किल्याचा नाश करणें अवशिष्ट राहिलें आहे ३. ह्याप्रमाणें किल्याचा नाश झाला असतां केलेल्या कर्माबद्दल आपल्या परिश्रमाचाही परिहार होईल आणि ह्या कृत्यामध्यें जे काहीं मला श्रम पडले तेही थोडक्याच यत्नानें सफल होतील ४. माझ्या पुच्छाचे ठिकाणीं जो अग्नि प्रदीप्त झाला

होत्तमैः ५ ततः प्रदीप्तलाङ्गूलः सविद्युदिव तोयदः। भवनाग्रेषु लङ्काया विचचार महाकपिः ६ गृहाद्गृहं राक्षसानामुद्यानानि च वानरः। वीक्षमाणो ह्यसंत्रस्तः प्रासादांश्च चचार सः ७ अवप्लुत्य महावेगः प्रहस्तस्य निवेशनम्। अग्निं तत्र विनिक्षिप्य श्वसनेन समो बली ८ ततोऽन्यत्पुप्लुवे वेश्म महापार्श्वस्य वीर्यवान्। मुमोच हनुमानग्निं कालानलशिखोपमम् ९ वज्रदंष्ट्रस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः। शुकस्य च महातेजाः सारणस्य च धीमतः १० तथा चेन्द्रजितो वेश्म ददाह हरियूथपः। जम्बुमालेः सुमालेश्च ददाह भवनं ततः ११ रश्मिकेतोश्च भवनं सूर्यशत्रोस्तथैव च। ह्रस्वकर्णस्य दंष्ट्रस्य रोमशस्य च रक्षसः १२ युद्धोन्मत्तस्य मत्तस्य ध्वजग्रीवस्य रक्षसः। विद्युज्जिह्वस्य घोरस्य तथा हस्तिमुखस्य च १३ करालस्य विशालस्य शोणिताक्षस्य चैव हि। कुम्भकर्णस्य भवनं मकराक्षस्य चैव हि १४ नरान्तकस्य कुम्भस्य निकुम्भस्य महात्मनः। यज्ञशत्रोश्च भवनं ब्रह्मशत्रोस्तथैव च १५ वर्जयित्वा महातेजा बिभीषणगृहं प्रति। क्रममाणः क्रमेणैव ददाह हरिपुङ्गवः १६ तेषु तेषु महार्हेषु भवनेषु महायशाः। गृहेष्वृद्धिमतामृद्धिं ददाह

---

आहे त्याला ह्या उत्कृष्ट गृहांनीं तृप्त करणें योग्य आहे " ५. असा विचार केल्यानंतर पुच्छ प्रदीप्त झालेला आणि ह्मणूनच विद्युल्लतेसह वर्तमान असलेल्या मेघाप्रमाणें दिसत असलेला तो महाकपि लंकेंतील घरांवरून संचार करूं लागला ६. मनामध्यें कांहींएक भीति न बाळगितां इकडे तिकडे पहाणारा तो वानर राक्षसांच्या ह्या घरावरून त्या घरावर, बागांतून आणि वाड्यांवरून संचार करूं लागला ७. वायूप्रमाणें बलाढ्य असलेल्या त्या महावेगवान् हनुमानानें प्रथमतः प्रहस्ताच्या घरावर उडी मारून आणि तेथें आग लावून ८ नंतर दुसऱ्या महापार्श्वाच्या घरावर उडी मारिली आणि तेथंही त्या वीर्यवान् हनुमानानें प्रलयकालच्या अग्नीसारिख्या ज्याच्या ज्वाला आहेत असा अग्नि ठेवून दिला ९. तदनंतर वज्रदंष्ट्र, शुक आणि विचारी सारण ह्यांच्याही घरांवर त्या महाकपि वानरानें उड्डाण केलें १०. तदनंतर इंद्रजिताचें घर त्या वानरसेनाधिपति हनुमानानें जाळून टाकिलें आणि नंतर जंबुमालीचें व सुमालीचेंही घर त्यानें दग्ध केलें ११. तदनंतर रश्मिकेतु, सूर्यशत्रु, ऱ्हस्वकर्ण, दंष्ट्र, रोमश राक्षस १२, युद्धोन्मत्त, मत्त, ध्वजग्रीव राक्षस, विद्युज्जिह्व, घोर, हस्तिमुख १३, कराल, विशाल, शोणिताक्ष, कुंभकर्ण, मकराक्ष १४, नरांतक, कुंभ, महात्मा निकुंभ, यज्ञशत्रु, ब्रह्मशत्रु वगैरे राक्षसांचीं गृहें १५, बिभीषणाचें गृह वर्ज्य करून त्या महातेजस्वी वानरश्रेष्ठ

कपिकुञ्जरः १७ सर्वेषां समतिक्रम्य राक्षसेन्द्रस्य वीर्यवान् । आससादाथ लक्ष्मीवान्रावणस्य निवेशनम् १८ ततस्तस्मिन्गृहे मुख्ये नानारत्नविभूषिते । मेरुमन्दरसंकाशे नानामङ्गलशोभिते १९ प्रदीप्तमग्निमुत्सृज्य लाङ्गूलाग्रे प्रतिष्ठितम् । ननाद हनुमान्वीरो युगान्तजलदो यथा २० श्वसनेन च संयोगादतिवेगो महाबलः । कालाग्निरिव जज्वाल प्रावर्धत हुताशनः २१ प्रदीप्तमग्निं पवनस्तेषु वेश्मसु चारयन् । तानि काञ्चनजालानि मुक्तामणिमयानि च २२ भवनानि व्यशीर्यन्त रत्नवन्ति महान्ति च । तानि भग्नविमानानि निपेतुर्वसुधातले २३ भवनानीव सिद्धानामम्बरात्पुण्यसंक्षये । संजज्ञे तुमुलः शब्दो राक्षसानां प्रधावताम् २४ स्वं स्वं गृहपरित्राणे भग्नोत्साहोज्झितश्रियाम् । नूनमेषोऽग्निरायातः कपिरूपेण हा इति २५ क्रन्दन्त्यः सहसा पेतुः स्तनन्धयधराः स्त्रियः । काश्चिदग्निपरीताङ्ग्यो हर्म्येभ्यो मुक्तमूर्धजाः २६ पतन्त्यो

---

हनुमानानें संचार करितां करितां, क्रमाक्रमानें दग्ध करून टाकिलीं १६. सारांश, संपत्तिमान् राक्षसांच्या ठिकठिकाणच्या त्या महामूल्यवान् घरांतील संपत्ति त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें दग्ध करून टाकिली १७; आणि ह्याप्रमाणें सर्वांच्या घरांवरून फिरल्यानंतर तो लक्ष्मीवान् व वीर्यवान् हनुमान् रावणाच्या गृहावर आला १८. तदनंतर नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित, नानाप्रकारच्या मंगलकारक वस्तूंनीं सुशोभित आणि मेरुमंदराप्रमाणें उंच अशा त्या मुख्य गृहावर १९ पुच्छाचे अग्रभागीं असलेला प्रदीप्त अग्नि सोडून तो वीर हनुमान् प्रलयकालच्या मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला २०. वायूचा समागम झाल्यामुळें तो अतिवेगवान् व महाबलाढ्य अग्नि वृद्धिंगत झाला आणि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें प्रज्वलित होऊं लागला २१. त्या घरावर वायु अग्नीला नेऊं लागला असतां सुवर्णजाल, मोत्यें आणि हिरे ह्यांनीं भरलेलीं २२ व रत्नांनीं युक्त असलेलीं तीं मोठीं मोठीं घरें जमीनदोस्त झालीं आणि मजले मोडून तीं घरें भूतलावर पडलीं असतां २३, पुण्यक्षय झाल्यामुळें आकाशांतून पडत असलेलीं सिद्धांचीं घरेंच कीं काय अशीं दिसूं लागलीं. नंतर आपआपल्या घराचें संरक्षण होण्याविषयीं ज्यांचा उत्साह भग्न होऊन तेज नाहींसें झालें आहे असे ते राक्षस धांवाधांव करूं लागले असतां त्यांच्यामध्यें मोठा गलगा सुरू झाला. “ वानररूपानें हा अग्निच आला आहे ” २४, २५ असें ओरडत ओरडत स्त्रिया, स्तनपान करणारीं मुलें जवळ असतांनीच एकाएकीं पडल्या. सर्वांगाला आग लागलेल्या व केश मोकळे सोडलेल्या कांहीं स्त्रिया वाड्यांतून २६ बाहेर पडूं लागल्या असतां, आकाशांतून व मेघापासून

रेजिरेऽभ्रेभ्यः सौदामन्य इवाम्बरात् । वज्रविद्रुमवैदूर्यमुक्तारजतसंहतान् २७
विचित्रान्भवनाद्धातून्स्यन्दमानान्ददर्श सः । नाग्निस्तृप्यति काष्ठानां
तृणानां च यथा तथा २८ हनूमान्राक्षसेन्द्राणां वधे किंचिन्न तृप्यति ।
न हनूमद्विशस्तानां राक्षसानां वसुंधरा २९ हनूमता वेगवता वानरेण
महात्मना । लङ्कापुरं प्रदग्धं तद्रुद्रेण त्रिपुरं यथा ३० ततः स लङ्कापुर-
पर्वताग्रे समुत्थितो भीमपराक्रमोऽग्निः । प्रसार्य चूडावलयं प्रदीप्तो हनूमता
वेगवतोपसृष्टः ३१ युगान्तकालानलतुल्यरूपः स मारुतोऽग्निर्ववृधे दिव-
स्पृक् । विधूमरश्मिर्भवनेषु सक्तो रक्षःशरीराज्यसमर्पितार्चिः ३२ आदि-
त्यकोटीसदृशः सुतेजा लङ्कां समस्तां परिवार्य तिष्ठन् । शब्दैरनेकैरशनि-
प्ररूढैर्भिन्दन्निवाण्डं प्रबभौ महाग्निः ३३ तत्राम्बरादग्निरतिप्रवृद्धो रूक्ष-
प्रभः किंशुकपुष्पचूडः । निर्वाणधूमाकुलराजयश्च नीलोत्पलाभाः प्रच-
काशिरेऽभ्राः ३४ वज्री महेन्द्रस्त्रिदशेश्वरो वा साक्षाद्यमो वा वरुणोऽनिलो वा ।

---

पडणाऱ्या विद्युल्लताच कीं काय अशा दिसूं लागल्या. तदनंतर हिरे, पोंवळीं, वैडूर्यमणि, मोत्यें आणि रौप्य ह्यांनीं युक्त असलेले २७ आश्चर्यकारक धातु घरांतून गळतांना त्या हनुमानानें अवलोकन केले. अग्नि ज्याप्रमाणें काष्ठें व तृण ह्यांच्या दाहाविषयीं तृप्त होत नाहीं २८, त्याप्रमाणें राक्षसश्रेष्ठांच्या वधाविषयीं हनुमान् यत्किंचित्‌ही तृप्त झाला नाहीं; आणि हनुमानानें मारिलेल्या राक्षसांना ती लंकाभूमिही पुरेशी आली नाहीं २९. सारांश, रुद्रानें ज्याप्रमाणें त्रिपुर दग्ध केलें त्याप्रमाणें महात्म्या वेगयुक्त हनुमान् वानरानें तें लंकानगर दग्ध केलें ३०. तदनंतर वेगवान् हनुमानानें सोडिलेला आणि लंकानगररूप पर्वताच्या शिखरावर उसळलेला तो भयंकरपराक्रमी अग्नि आपल्या ज्वालांचा समुदाय चोहोंकडे पसरून प्रदीप्त होऊं लागला ३१. प्रलयकालच्या कालरूप अग्निप्रमाणें ज्याचें रूप आहे, राक्षसशरीररूप घृतामुळें ज्याचें ठिकाणीं ज्वाला उत्पन्न झाल्या आहेत आणि ज्यास धूर मुळींच नाहीं असा तो राक्षसांच्या गृहामध्यें चिकटून राहिलेला अग्नि वायूचें साहाय्य असल्यामुळें स्वर्गाला स्पर्श होण्याइतका वृद्धिंगत होऊं लागला ३२. कोटिसूर्याप्रमाणें दिसत असलेला तो महातेजस्वी अग्नि संपूर्ण लंकानगरी व्याप्त करून राहिला असतां आणि विद्युल्लतेसारख्या अनेक ध्वनींनीं युक्त होऊं लागला असतां, ब्रह्मांडाचा विध्वंस करण्यास उद्युक्त झालेला प्रलयाग्निच कीं काय असा दिसूं लागला ३३. अतिशय वृद्धिंगत झालेला तो अग्नि आकाशापर्यंत जाऊं लागला; त्याची कांति क्रूर दिसूं लागली; ज्वाला पलाशपुष्पाप्रमाणें दिसूं लागल्या आणि अधोभागीं विच्छेद पावून केवल आकाशच व्याप्त करून राहिलेल्या प्रचंड

रौद्रोऽग्निरर्को धनदश्च सोमो न वानरोऽयं स्वयमेव कालः ३५ किं ब्रह्मणः सर्वपितामहस्य लोकस्य धातुश्चतुराननस्य । इहागतो वानररूपधारी रक्षोपसंहारकरः प्रकोपः ३६ किं वैष्णवं वा कपिरूपमेत्य रक्षोविनाशाय परं सुतेजः । अचिन्त्यमव्यक्तमनन्तमेकं स्वमायया सांप्रतमागतं वा ३७ इत्येवमूचुर्बहवो विशिष्टा रक्षोगणास्तत्र समेत्य सर्वे । सप्राणिसङ्घां सगृहां सवृक्षां दग्धां पुरीं तां सहसा समीक्ष्य ३८ ततस्तु लङ्का सहसा प्रदग्धा सराक्षसा साश्वरथा सनागा । सपक्षिसङ्घा समृगा सवृक्षा रुरोद दीना तुमुलं सशब्दम् ३९ हा तात हा पुत्रक कान्त मित्र हा जीवितेशाङ्ग हतं सुपुण्यम् । रक्षोभिरेवं बहुधा ब्रुवद्भिः शब्दः कृतो घोरतरः सुभीतः ४० हुताशनज्वालसमावृता सा हतप्रवीरा परिवृत्तयोधा । हनूमतः क्रोधबलाभिभूता बभूव शापोपहतेव लङ्का ४१ ससंभ्रमं त्रस्तविषण्णराक्षसां समुज्ज्वलज्ज्वालहुताशनाङ्किताम् । ददर्श लङ्कां हनुमा-

---

धूमपंक्ति नीलकमलासारिख्या कांतीनें युक्त असल्यामुळें मेघाप्रमाणें शोभूं लागल्या ३४. तेव्हां, " हा वानर नव्हे. हा स्वर्गाधिपति वज्रपाणि इंद्र असेल; प्रत्यक्ष यमच असेल; वरुण असेल; वायु असेल; प्रलयकालचा भयंकर अग्नि असेल; सूर्य असेल; कुबेर असेल; चंद्र असेल; अथवा प्रत्यक्ष कालच असेल ३५. जगत्स्रष्टा जो सर्वांचा मूळपुरुष चतुर्मुख ब्रह्मदेव त्याचा हा, राक्षसांचा संहार करणारा, कोपच वानररूप धारण करून येथें आला आहे कीं काय ? ३६. अथवा अचिंत्य, अव्यक्त, अनंत व अद्वितीय असें विष्णूचें अत्यंत उज्ज्वल तेजच राक्षसांच्या नाशाकरितां मायेचें अवलंबन करून सांप्रत वानररूपानें येथें आलें आहे कीं काय ? " ३७ ह्याप्रमाणें अनेक महाबलाढ्य राक्षस ह्मणूं लागले आणि प्राणिसमुदाय, गृहें व वृक्ष, ह्यांसहवर्तमान दग्ध झालेली ती नगरी अवलोकन केल्यावर सर्व राक्षसगणही तेथें जुळून तसेंच बोलूं लागले ३८. असो. अशा रीतीनें एकाएकीं दग्ध झालेली ती लंका राक्षस, अश्व, रथ, गज, पक्षिगण, मृग आणि वृक्ष ह्यांसहवर्तमान दीन होऊन व तुमुल आक्रोश करून रोदन करूं लागली ३९. सारांश, "हे तात, हे पुत्रा, हे कांत, हे मित्रा, हे प्राणनाथ, आपलें पुण्य व्यर्थ गेलें " अशा प्रकारें भाषण करणाऱ्या राक्षसांनीं भयपूर्वक अतिच भयंकर आक्रोश केला ४०; आणि हनुमानाच्या क्रोधानें व बलानें ग्रस्त झालेली ती लंका अग्नीच्या ज्वालांनीं व्याप्त झाल्यामुळें, आंतील वीरांचा वध झाल्यामुळें आणि योध्यांची दाणादाण उडून गेल्यामुळें शापदग्ध झाल्यासारिखी दिसूं लागली ४१. असो. जिच्यांतील राक्षस गोंधळून जाऊन त्रस्त व खिन्न झाले आहेत व प्रदीप्त ज्वालांनीं युक्त अशा अग्नीनें जी चिन्हित झालेली आहे

न्महामनाः स्वयम्भुरोषोपहतामिवावनिम् ४२ भङ्क्त्वा वनं पादपरत्नसं-
कुलं हत्वा तु रक्षांसि महान्ति संयुगे । दग्ध्वा पुरीं तां गृहरत्नमालिनीं
तस्थौ हनूमान्पवनात्मजः कपिः ४३ स राक्षसांस्तान्सुबहूंश्च हत्वा वनं
च भङ्क्त्वा बहुपादपं तत् । विसृज्य रक्षोभवनेषु चाग्निं जगाम रामं
मनसा महात्मा ४४ ततस्तु तं वानरवीरमुख्यं महाबलं मारुततुल्यवेगम् ।
महामतिं वायुसुतं वरिष्ठं प्रतुष्टुवुर्देवगणाश्च सर्वे ४५ देवाश्च सर्वे मुनि-
पुङ्गवाश्च गन्धर्वविद्याधरपन्नगाश्च । भूतानि सर्वाणि महान्ति तत्र जग्मुः
परां प्रीतिमतुल्यरूपाम् ४६ भङ्क्त्वा वनं महातेजा हत्वा रक्षांसि संयुगे ।
दग्ध्वा लङ्कापुरीं भीमां रराज स महाकपिः ४७ गृहाग्र्यशृङ्गाग्रतले
विचित्रे प्रतिष्ठितो वानरराजसिंहः । प्रदीप्तलाङ्गूलकृतार्चिमाली व्यराज-
तादित्य इवार्चिमाली ४८ लङ्कां समस्तां संपीड्य लाङ्गूलाग्निं महा-
कपिः । निर्वापयामास तदा समुद्रे हरिपुङ्गवः ४९ ततो देवाः सगन्धर्वाः
सिद्धाश्च परमर्षयः । दृष्ट्वा लङ्कां प्रदग्धां तां विस्मयं परमं गताः ५०
[२२५९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे
चतुःपञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

---

अशी ती लंका उदारबुद्धि हनुमानानें ब्रह्मदेवाच्या क्रोधानें दग्ध झालेल्या पृथ्वीप्रमाणेंच कीं काय अवलोकन केली ४२. उत्कृष्ट वृक्षांनीं गजबजलेलें वन मोडून, मोठमोठ्या राक्षसांचा संग्रामामध्यें वध करून आणि उत्कृष्ट गृहसमुदायांनीं युक्त असलेली ती नगरी जाळून वायुपुत्र हनुमान् वानर स्वस्थ उभा राहिला ४३; आणि ह्याप्रमाणें असंख्य राक्षसांचा वध करून, विपुल वृक्षांनीं युक्त असलेलें तें वन मोडून आणि राक्षसांच्या घरांना आग लावून त्या महात्म्या हनुमानानें रामाचें स्मरण केलें ४४. तदनंतर वायूप्रमाणें ज्याचा वेग आहे व वानरवीरांतील जो मुख्य आहे अशा त्या महाबुद्धिमान् व महाबलाढ्य श्रेष्ठ वायपुत्राची सर्व देवगण स्तुति करूं लागले ४५. कारण, सर्व देव, श्रेष्ठ ऋषि, गंधर्व, विद्याधर पन्नग आणि इतरही सर्व मोठे मोठे प्राणी ह्यांना कांहीं पराकाष्ठेचा अनुपम आनंद झाला होता ४६. ह्याप्रमाणें वनाचा भंग करून, संग्रामामध्यें राक्षसांचा वध करून व भयंकर लंका नगरी दग्ध करून तो महाकपि झळकूं लागला ४७; आणि श्रेष्ठ गृहांच्या शेवटल्या अद्भुत गच्चीवर बसलेला तो श्रेष्ठ वानराधिपति हनुमान् प्रदीप्त पुच्छाच्या ज्वालांनीं युक्त झाला असल्यामुळें किरणसमुदायांनीं युक्त असलेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला ४८. असो. ह्याप्रमाणें सर्व लंका दग्ध केल्यावर त्या वानरश्रेष्ठ महाकपि हनुमानानें समुद्रामध्यें आपल्या पुच्छाचा अग्नि विझविला ४९; व तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षि ती लंका

संदीप्यमानां वित्रस्तां त्रस्तरक्षोगणां पुरीम् । अवेक्ष्य हनुमाल्लँङ्कां चिन्तयामास वानरः १ तस्याभूत्सुमहांस्त्रासः कुत्सा चात्मन्यजायत । लङ्कां प्रदहता कामं किंस्वित्कृतमिदं मया २ धन्याः खलु महात्मानो ये बुद्ध्या कोपमुत्थितम् । निरुन्धन्ति महात्मानो दीप्तमग्निमिवाम्भसा ३ क्रुद्धः पापं न कुर्यात्कः क्रुद्धो हन्याद्गुरूनपि । क्रुद्धः परुषया वाचा नरः साधूनधिक्षिपेत् ४ वाच्यावाच्यं प्रकुपितो न विजानाति कर्हिचित् । नाकार्यमस्ति क्रुद्धस्य नावाच्यं विद्यते क्वचित् ५ यः समुत्पतितं क्रोधं क्षमयैव निरस्यति । यथोरगस्त्वचं जीर्णां स वै पुरुष उच्यते ६ धिगस्तु मां सुदुर्बुद्धिं निर्लज्जं पापकृत्तमम् । अचिन्तयित्वा तां सीतामग्निदं स्वामिघातकम् ७ यदि दग्धा त्वियं सर्वा नूनमार्यापि जानकी । दग्धा तेन मया भर्तुर्हतं कार्यमजानता ८ यदर्थमयमारम्भस्तत्कार्यमवसादितम् । मया

---

दग्ध झाल्याचें अवलोकन करून पराकाष्ठेचे विस्मित झाले ५०. ह्याप्रमाणें महामुनि-वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

जिच्यांतील राक्षसगण त्रस्त झालेले आहेत व जळूं लागल्यामुळें जिच्यामध्यें हलकल्होळ उडून गेलेला आहे अशी ती लंका अवलोकन केल्यावर हनुमान् मनामध्यें विचार करूं लागला १ आणि त्याला अतिशय त्रास होऊन व आपल्या हातून वाईट कृत्य झालें असें वाटून तो मनांत ह्मणाला " यथेष्ट लंका दहन करून मी हें काय बरें केलें ? २. प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणें उदकानें विझवून टाकितात त्याप्रमाणें उत्पन्न झालेल्या कोपाचा जे महात्मे आपल्या बुद्धीनें निरोध करितात ते खरोखर धन्य होत ३. कोणता बरें क्रुद्ध पुरुष पाप करणार नाहीं ? क्रुद्ध पुरुष गुरूंचाही वध करील आणि मर्मभेदक वाणीनें साधूंचीही निंदा करील ४. बोलावें कोणतें आणि न बोलावें कोणतें हें क्रुद्ध झालेल्या पुरुषाला मुळींच समजत नाहीं. सारांश, क्रुद्ध पुरुषाला अकार्य असें कोणतेंही नाहीं आणि अवाच्य असेंही कांहींएक नाहीं ५. सर्प ज्याप्रमाणें आपली जीर्ण त्वचा टाकून देतो त्याप्रमाणें उत्पन्न झालेला क्रोध जो क्षमेच्या योगानें बाहेर फेंकून देतो, त्यालाच पुरुष असें ह्मणतात ६. तस्मात्, त्या सीतेचा विचार न करितां आग लावणाऱ्या आणि अर्थातच स्वामिनीचा घात करणाऱ्या मज अत्यंत दुर्बुद्धि, निर्लज्ज व अत्यंत पाप्याला धिक्कार असो ! ७. अहो ! ही सर्व लंकाच जर दग्ध झाली आहे तर खरोखर साध्वी जानकीही दग्ध झालीच आहे. तेव्हां असें करण्यानें मी न समजतां आपल्या यजमानाच्या कार्याचा मात्र विध्वंस

हि दहता लङ्कां न सीता परिरक्षिता ९ ईषत्कार्यमिदं कार्यं कृत-
मासीन्न संशयः । तस्य क्रोधाभिभूतेन मया मूलक्षयः कृतः १०
विनष्टा जानकी व्यक्तं न ह्यदग्धः प्रदृश्यते । लङ्कायाः कश्चिदुद्देशः सर्वा
भस्मीकृता पुरी ११ यदि तद्विहतं कार्यं मया प्रज्ञाविपर्ययात् । इहैव प्राण-
संन्यासो ममापि ह्यद्य रोचते १२ किमग्नौ निपताम्यद्य आहोस्विद्वडवा-
मुखे । शरीरमिह सत्त्वानां दद्मि सागरवासिनाम् १३ कथं नु जीवता
शक्यो मया द्रष्टुं हरीश्वरः । तौ वा पुरुषशार्दूलौ कार्यसर्वस्वघातिना १४
मया खलु त देवेदं रोषदोषात्प्रदर्शितम् । प्रथितं त्रिषु लोकेषु कपित्वमनव-
स्थितम् १५ धिगस्तु राजसं भावमनीशमनवस्थितम् । ईश्वरेणापि यद्रा-
गान्मया सीता न रक्षिता १६ विनष्टायां तु सीतायां तावुभौ विनशि-
ष्यतः । तयोर्विनाशे सुग्रीवः सबन्धुर्विनशिष्यति १७ एतदेव वचः श्रुत्वा
भरतो भ्रातृवत्सलः । धर्मात्मा सहशत्रुघ्नः कथं शक्ष्यति जीवितुम् १८

---

केला ८. अरेरे ! ज्याच्याकरितां हा यवढा खटाटोप केला त्या कार्याचाच माझ्या हातून घात झाला ! अरे ! लंका दग्ध करितांना मीं सीतेचें रक्षण केलें नाहीं ९. लंका जाळणें हें खरोखर अगदींच क्षुल्लक कार्य माझ्या हातून झालें आहे; परंतु क्रोधग्रस्त झाल्यामुळें त्या रामचंद्राचा मात्र मीं समूळ नाश केला आहे १०. जानकीचा नाश झाला हें स्पष्टच आहे. कारण, लंकेतील कोणताही प्रदेश जळल्यावांचून राहिलेला दिसत नाहीं; सर्व नगरी जळून खाक झाली आहे ११. ह्यास्तव, बुद्धीला विपर्यास पडल्यामुळें जर त्या रामकार्याचा माझ्या हातून घात झालेला आहे तर येथल्यायेथेंच प्राणत्याग करणें हेंच आज मला बरें दिसत आहे १२. तस्मात्, आज मी कां अग्नीमध्यें उडी घालावी ? किंवा वडवानलामध्यें जाऊन पडावें ? अथवा समुद्रनिवासी प्राण्यांना आपलें शरीर अर्पण करावें ? १३. कार्याचा सर्व प्रकारें घात करणारा मी जिवंत राहून आतां मला वानराधिपति सुग्रीवाचें अथवा त्या पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांचें दर्शन होणें शक्य तरी कसें ? १४. सारांश, त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध असलेला वानरांचा अव्यवस्थितपणा मात्र क्रोधरूप दोषामुळें खरोखर मीं दर्शविला आहे १५. अरे, मी समर्थ असूनही ज्याअर्थी रजोगुणमूलक क्रोधाला वश झाल्यामुळें सीतेचें रक्षण करण्यास प्रवृत्त झालों नाहीं त्याअर्थी सत्कार्याला अयोग्य आणि अव्यवस्थित अशा ह्या माझ्या राजसस्वभावाला धिक्कार असो १६. अरेरे ! सीतेचा नाश झाला असल्यामुळें आतां अर्थातच त्या उभयतां रामलक्ष्मणांचा अंत होणार आणि त्यांचा अंत झाला म्हणजे सुग्रीवाचाही बांधवांसहवर्तमान नाश होणार १७. इतकेंच नव्हे परंतु, ही वार्ता ऐकतांक्षणीं भ्रातृवत्सल धर्मात्मा भरत

इक्ष्वाकुवंशे धर्मिष्ठे गते नाशमसंशयः । भविष्यन्ति प्रजाः सर्वाः शोक-
संतापपीडिताः १९ तदहं भाग्यरहितो लुप्तधर्मार्थसंग्रहः । रोषदोषपरी-
तात्मा व्यक्तं लोकविनाशनः २० इति चिन्तयतस्तस्य निमित्तान्युपपेदिरे।
पूर्वमप्युपलब्धानि साक्षात्पुनरचिन्तयत् २१ अथ वा चारुसर्वाङ्गी रक्षिता
स्वेन तेजसा । न नशिष्यति कल्याणी नाग्निरग्नौ प्रवर्तते २२ न हि
धर्मात्मनस्तस्य भार्याममिततेजसः । स्वचारित्राभिगुप्तां तां स्प्रष्टुमर्हति
पावकः २३ नूनं रामप्रभावेण वैदेह्याः सुकृतेन च । यन्मां दहनकर्मायं
नादहद्धव्यवाहनः २४ त्रयाणां भरतादीनां भ्रातॄणां देवता च या । रामस्य
च मनःकान्ता सा कथं विनशिष्यति २५ यद्वा दहनकर्मायं सर्वत्र प्रभु-
रव्ययः । न मे दहति लाङ्गूलं कथमार्यां प्रधक्ष्यति २६ पुनश्चाचिन्तय-
त्तत्र हनूमान्विस्मितस्तदा । हिरण्यनाभस्य गिरेर्जलमध्ये प्रदर्शनम् २७
तपसा सत्यवाक्येन अनन्यत्वाच्च भर्तरि । असौ विनिर्दहेदग्निं न तामग्निः

---

शत्रुघ्नासहवर्तमान जिवंत रहाण्यास कसा समर्थ होईल ? १८. तात्पर्य. इक्ष्वाकुवंशा-
धिपति धर्मिष्ठ राम नाहींसा झाल्यावर सर्व प्रजा शोक व संताप ह्यांनीं ग्रस्त होऊन
जातील ह्यांत संशय नाहीं १९. सारांश, धर्म व अर्थ ह्यांचा सर्वस्वीं माझ्याहातून
लोप झालेला आहे; मी भाग्यहीन आहें आणि रोषरूप दोषानें माझें मन व्याप्त झालें
असल्यामुळें मी उघडच जगताचा घातक ठरलों आहें " २०. ह्याप्रमाणें तो विचार
करूं लागला असतां पूर्वी दृष्टोत्पत्तीस आलेलींच कांहीं कारणें त्याला सुचलीं आणि
पुनरपि तो मनापासून विचार करूं लागला २१. ( तो ह्मणाला ) " स्वतःच्या तेजा-
नेंच सर्वांगसुंदरी सीतेचें रक्षण केलें असल्यामुळें ती कल्याणी नाश पावणार नाहीं.
कारण, अग्नीला अग्नि जाळण्यास कधीं प्रवृत्त होत नाहीं २२. त्या अतुलतेजस्वी
धर्मात्म्या रामाची भार्या स्वतःच्या वर्तनानेंच सुरक्षित असल्यामुळें अग्नि तिला स्पर्श
करण्यास समर्थ नाहीं २३. रामाच्या प्रभावानें आणि वैदेहीच्या पुण्यानें खरोखर
दग्ध करून टाकणें हेंच ज्याचें कर्म आहे अशा अग्नीनेंही मला मुळींच दग्ध केलें
नाहीं २४. तस्मात्, भरतप्रभृति तिन्ही भ्रात्यांची जी देवता आणि मनाप्रमाणें असलेली जी
रामाची कांता ती कशी नाश पावेल ? २५. फार कशाला ! दहन करणें हेंच
ज्याचें कर्म आहे असा हा अक्षय्य अग्नि सर्वत्र आपलें कर्म करण्यास समर्थ असूनही
जर माझें पुच्छ दग्ध करीत नाहीं तर साध्वी सीतेला तो कसा दग्ध करील ? " २६.
असा विचार केल्यानंतर जलामध्यें दृष्टीस पडलेल्या हिरण्यनाभ पर्वताचें त्याला स्मरण
झालें आणि विस्मयचकित होऊन तो पुनरपि 'आपल्या मनामध्यें ह्मणाला २७

प्रधक्ष्यति २८ स तथा चिन्तयंस्तत्र देव्या धर्मपरिग्रहम् । शुश्राव हनुमांस्तत्र चारणानां महात्मनाम् २९ अहो खलु कृतं कर्म दुर्विगाहं हनूमता । अग्निं विसृजता तीक्ष्णं भीमं राक्षससद्मनि ३० प्रपलायितरक्षःस्त्रीबालवृद्धसमाकुला । जनकोलाहलाध्माता क्रन्दतीवाद्रिकन्दरैः ३१ दग्धेयं नगरी लङ्का साट्टप्राकारतोरणा । जानकी न च दग्धेति विस्मयोऽद्भुत एव नः ३२ इति शुश्राव हनुमान्वाचंताममृतोपमाम् । बभूव चास्य मनसो हर्षस्तत्कालसंभवः ३३ स निमित्तैश्च दृष्टार्थैः कारणैश्च महागुणैः । ऋषिवाक्यैश्च हनुमानभवत्प्रीतमानसः ३४ ततः कपिः प्राप्तमनोरथार्थस्तामक्षतां राजसुतां विदित्वा । प्रत्यक्षतस्तां पुनरेव दृष्ट्वा प्रतिप्रयाणाय मतिं चकार ३५ [२२९४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥ ५५ ॥

ततस्तु शिंशपामूले जानकीं पर्यवस्थिताम् । अभिवाद्याब्रवीद्दिष्ट्या

---

" तप, सत्य भाषण आणि भर्त्याचे ठिकाणीं अनन्य प्रेम ह्यांच्या योगानें ही सीताच अग्नीला जाळून टाकील; परंतु, अग्नि तिला दग्ध करण्यास समर्थ होणार नाहीं "२८. ह्याप्रमाणें सीतादेवीच्या धर्माचरणाचा तो हनुमान् विचार करूं लागला असतां महात्म्या चारणांचें असें भाषण त्यानें ऐकिलें २९ " अहो, राक्षसांच्या गृहांवर तीक्ष्ण व भयंकर अग्नि सोडणाऱ्या हनुमानानें खरोखर हें फारच दुर्घट कर्म केलें आहे ३०. अहो, पळत सुटलेल्या राक्षसस्त्रिया, बाल आणि वृद्ध ह्यांनीं व्याप्त झालेली व लोकांच्या हलकल्होळांनीं दुमदुमून गेल्यामुळें पर्वतगुहारूप मुखांनीं जशी कांहीं आक्रोशच करीत असलेली ३१ ही लंका गच्चा, कोट व वेशी ह्यांसहवर्तमान दग्ध झाली असतांही जानकी दग्ध झाली नाहीं ह्यामुळें आह्मांला खरोखर अद्भुत विस्मयच झाला आहे " ३२. ह्याप्रमाणें ती अमृततुल्य वाणी कानीं पडतांक्षणीं त्या हनुमानाच्या मनाला हर्ष झाला ३३; आणि ज्यांचा प्रत्यय आलेला आहे असे शकुन अवलोकन करून, ( रामप्रभावप्रभृति ) मोठीं मोठीं कारणें लक्ष्यांत आणून व आकाशामध्यें झालेल्या ऋषिवाक्यांकडे लक्ष्य देऊन हनुमान् मनामध्यें प्रसन्न झाला ३४; आणि ह्याप्रमाणें मनोरथ परिपूर्ण झालेल्या त्या कपीनें त्या राजकन्येला धक्का लागलेला नाहीं असें जाणून व तिला प्रत्यक्ष पाहून परत जाण्याचें मनामध्यें आणिलें ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५५ ॥

तदनंतर शिंशपावृक्षाखालीं बसलेल्या जानकीला अभिवंदन करून हनुमान् ह्मणाला

पश्यामि त्वामिहाक्षताम् १ ततस्तं प्रस्थितं सीता वीक्षमाणा पुनः पुनः। भर्तुः स्नेहान्विता वाक्यं हनूमन्तमभाषत २ यदि त्वं मन्यसे तात वसैकाहमिहानघ । क्वचित्सुसंवृते देशे विश्रान्तः श्वो गमिष्यसि ३ मम चैवाल्पभाग्यायाः सांनिध्यात्तव वानर । शोकस्यास्याप्रमेयस्य मुहूर्तं स्यादपि क्षयः ४ गते हि हरिशार्दूल पुनः संप्राप्तये त्वयि । प्राणेष्वपि न विश्वासो मम वानरपुङ्गव ५ अदर्शनं च ते वीर भूयो मां दारयिष्यति । दुःखाद्दुःखतरं प्राप्तां दुर्मनःशोककर्शिताम् ६ अयं च वीर संदेहस्तिष्ठतीव ममाग्रतः। सुमहत्सु सहायेषु हर्यृक्षेषु महाबलः ७ कथं नु खलु दुष्पारं संतरिष्यन्ति सागरम् । तानि हर्यृक्षसैन्यानि तौ वा नरवरात्मजौ ८ त्रयाणामेव भूतानां सागरस्यातिलङ्घने । शक्तिः स्याद्वैनतेयस्य तव वा मारुतस्य वा ९ तदत्र कार्यनिर्बन्धे समुत्पन्ने दुरासदे । किं पश्यसि समाधानं त्वं हि कार्यविशारदः १० काममस्य त्वमेवैकः कार्यस्य परिसाधने । पर्याप्तः परवीरघ्न यशस्यस्ते बलोदयः ११ बलैस्तु

---

" सुदैवानें मी आज तुला क्षतरहित अवलोकन करीत आहें " १. इतकें बोलल्यानंतर चालूं लागलेल्या त्या हनुमानाकडे सीता वारंवार पाहू लागली आणि भर्त्याचे ठिकाणीं प्रेम असलेली ती सीता हनुमानाला ह्मणाली २ " बा निष्पापा हनुमाना, तुझी मर्जी असेल तर कोठें तरी चांगल्या गुप्त प्रदेशामध्यें आजच्या दिवस विश्रांति घेऊन तूं उद्यां जा ३. कारण, हे वानरा, तूं जवळ असल्यामुळें मज भाग्यहीन स्त्रीला होत असलेल्या ह्या अनुपम दुःखाचा क्षणभर तरी विसर पडेल ४. हे वानरश्रेष्ठा, तूं एकदां गेल्यावर पुनरपि तुझी भेट होईल ह्मणावें तर, हे वानराधिपते, माझे प्राण रहातील असाही मला विश्वास वाटत नाहीं ५. हे वीरा, तूं दिसेनासा झालास ह्मणजे पूर्वीच्या दुःखाहूनही मला अधिक दुःख प्राप्त होणार असल्यामुळें आणि खेद व शोक ह्यांनीं मी अगदीं जर्जर होऊन गेलें असल्यामुळें माझें हृदय विदीर्ण होऊन जाईल ६. शिवाय, हे वीरा, माझ्या डोळ्यांसमोर हा फारच मोठा संशय अगदीं जसा कांहीं वृत्त ह्मणून उभा आहे. अरे, अतिप्रचंड वानर व ऋक्ष जरी साहाय्य करणारे असले ७ तरी तीं ऋक्षवानरांचीं सैन्यें अथवा ते राजपुत्र रामलक्ष्मण दुस्तर सागर तरून येण्यास खरोखर समर्थ कसे होतील ? ८. सागराचें उल्लंघन करण्याविषयीं तीनच प्राण्यांचें सामर्थ्य आहे; गरुडाचें, तुझें अथवा वायूचें ९. तस्मात्, कार्य होण्याला ही दुस्तर अडचण आली असतांना तुला काय बरें उपाय सुचत आहे ? हातीं घेतलेलें कृत्य पार पाडण्यामध्यें तूं निपुण आहेस १० हे

संकुलां कृत्वा लङ्कां परबलार्दनः । मां नयेद्यदि काकुत्स्थस्तत्तस्य सदृशं भवेत् १२ तद्यथा तस्य विक्रान्तमनुरूपं महात्मनः । भवत्याहवशूरस्य तथा त्वमुपपादय १३ तदर्थोपहितं वाक्यं प्रश्रितं हेतुसंहितम् । निशम्य हनुमान्वीरो वाक्यमुत्तरमब्रवीत् १४ देवि हर्यृक्षसैन्यानामीश्वरः प्लवतां वरः । सुग्रीवः सत्त्वसंपन्नस्तवार्थे कृतनिश्चयः १५ स वानरसहस्राणां कोटीभिरभिसंवृतः । क्षिप्रमेष्यति वैदेहि सुग्रीवः प्लवगाधिपः १६ तौ च वीरौ नरवरौ सहितौ रामलक्ष्मणौ । आगम्य नगरीं लङ्कां सायकैर्विधमिष्यतः १७ सगणं राक्षसं हत्वा न चिराद्रघुनन्दनः । त्वामादाय वरारोहे स्वां पुरीं प्रतियास्यति १८ समाश्वसिहि भद्रं ते भव त्वं कालकाङ्क्षिणी । क्षिप्रं द्रक्ष्यसि रामेण निहतं रावणं रणे १९ निहते राक्षसेन्द्रे च सपुत्रामात्यबान्धवे । त्वं समेष्यसि रामेण शशाङ्केनेव रोहिणी २० क्षिप्रमेष्यति काकुत्स्थो हर्यृक्षप्रवरैर्युतः । यस्ते युधि विनिर्जित्य शोकं व्यपनयिष्यति २१ एवमाश्वास्य वैदेहीं हनूमान्मारुतात्मजः । गमनाय

---

शत्रुपक्षीयवीरनाशका, हें कार्य सिद्धीस नेण्याविषयीं खरोखर तूंच समर्थ आहेस; व तुझ्या बलाचाच प्रभाव यशस्कारक होणारा आहे ११. तथापि, शत्रुसैन्याचें मर्दन करणारा ककुत्स्थकुलोत्पन्न राम सैन्यांच्या योगानें लंकेमध्यें दाणादाण उडवून देऊन जर मला घेऊन जाईल तर तें त्याला साजेसें होईल १२. तस्मात्, त्या महात्म्या रणशूर रामाला अनुरूप असा पराक्रम त्याच्या हातून होईल अशी तूं तजवीज कर" १३. अर्थ, विनय आणि हेतु ह्यांनीं युक्त असलेलें हें भाषण श्रवण करून वीर हनुमान् त्यावर तिला ह्मणाला १४ "हे देवि, वानर आणि ऋक्ष ह्यांच्या सैन्यांचा अधिपति सुग्रीव बलवान् आहे आणि तुझ्याविषयीं त्याचा निश्चय झालेला आहे १५ तो वानराधिपति सुग्रीव हजारों वानरांची कोट्यावधि सैन्यें बरोबर घेऊन, हे वैदेहि, सत्वर इकडे येईल १६. ते पुरुषश्रेष्ठ वीर रामलक्ष्मणही बरोबर येऊन बाणांनीं लंकानगरी उडवून देतील १७; आणि ज्ञातिगणांसहवर्तमान लवकरच रावणराक्षसाचा वध करून व, हे सुंदरि, तुला घेऊन रघुनंदन राम आपल्या राजधानीला परत जाईल १८. तुझें कल्याण असो. तूं धैर्य धर आणि कालप्रतीक्षा करून रहा. संग्रामामध्यें रामाच्या हातून वध पावलेल्या रावणाला तूं लवकरच अवलोकन करिशील १९; आणि राक्षसाधिपति रावणाचा पुत्र, अमात्य व बांधव ह्यांसहवर्तमान वध झाला असतां चंद्राशीं भेट होणाऱ्या रोहिणीप्रमाणें लवकरच तुझी रामाशीं भेट होईल २०. सारांश, श्रेष्ठ श्रेष्ठ वानर व ऋक्ष बरोबर घेऊन ककुत्स्थकुलोत्पन्न राम सत्वर इकडे येईल आणि

मतिं कृत्वा वैदेहीमभ्यवादयत् २२ राक्षसान्प्रवरान्हत्वा नाम विश्राव्य चात्मनः । समाश्वास्य च वैदेहीं दर्शयित्वा परं बलम् २३ नगरीमाकुलां कृत्वा वञ्चयित्वा च रावणम् । दर्शयित्वा बलं घोरं वैदेहीमभिवाद्य च २४ प्रतिगन्तुं मनश्चक्रे पुनर्मध्येन सागरम् । ततः स कपिशार्दूलः स्वामिसंदर्शनोत्सुकः २५ आरुरोह गिरिश्रेष्ठमरिष्टमरिमर्दनः । तुङ्गपद्मकजुष्टाभिर्नीलाभिर्वनराजिभिः २६ सोत्तरीयमिवाम्भोदैः शृङ्गान्तरविलम्बिभिः । बोध्यमानमिव प्रीत्या दिवाकरकरैः शुभैः २७ उन्मिषन्तमिवोद्धूतैर्लोचनैरिव धातुभिः । तोयौघनिःस्वनैर्मन्द्रैः प्राधीतमिव सर्वतः २८ प्रगीतमिव विस्पष्टं नानाप्रस्रवणस्वनैः । देवदारुभिरुद्धूतैरूर्ध्वबाहुमिव स्थितम् २९ प्रपातजलनिर्घोषैः प्राक्रुष्टमिव सर्वतः । वेपमानमिव श्यामैः कम्पमानैः शरद्घनैः ३० वेणुभिर्मारुतोद्धूतैः कूजन्तमिव कीचकैः ।

---

युद्धामध्यें राक्षसांना जिंकून तुझा शोक नाहींसा करील " २१. ह्याप्रमाणें सीतेला धीर देऊन व जाण्याचें मनांत आणून वायुपुत्र हनुमानानें तिला अभिवंदन केलें २२. तात्पर्य, श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचा वध करून, आपलें नांव गाजवून, सीतेला आश्वासन देऊन, अपरिमित सामर्थ्य प्रकट करून २३, लंकानगरीमध्यें दाणादाण उडवून देऊन, रावणाला फसवून, भयंकर बल प्रकट करून आणि सीतेला अभिवंदन करून २४ त्या हनुमानानें पुनरपि समुद्राचें उल्लंघन करून जाण्याचें मनामध्यें आणिलें. सीतेला अभिवदन केल्यानंतर स्वामिदर्शनाविषयीं उत्सुक झालेला तो शत्रुनाशक वानरश्रेष्ठ हनुमान् अरिष्टनामक श्रेष्ठ पर्वतावर आरूढ झाला. उंच उंच पद्मकवृक्षांनीं युक्त असलेल्या नीलवर्ण वनपंक्ति त्याच्यावर असल्यामुळें त्यानें नीलवस्त्र नेसलें आहे कीं काय असें दिसत होतें २५, २६; शिखरांमधून लोंबणाऱ्या मेघांच्या योगानें तो जसा कांहीं उत्तरीय वस्त्रच परिधान केल्यासारिखा दिसत होता; सूर्याचीं शुभ किरणें प्रेमानें त्याला जागें करीत आहेत कीं काय असें दिसत होतें २७; इकडे तिकडे उडालेल्या धातूंच्या योगानें तो जसा कांहीं डोळेच उघडीत आहे कीं काय असें दिसत होतें; जलप्रवाहांचे गंभीर स्वरांच्या योगानें त्याच्यावर जसें कांहीं चोहोंकडे वेदाध्ययनच चाललें आहे कीं काय असा भास होत होता २८; झुळझुळ वहाणाऱ्या अनेक जलप्रवाहांचे स्वरांच्या योगानें त्याच्यावर जसें कांहीं स्पष्ट गायनच चाललें आहे कीं काय असें भासत होतें; उंच उंच देवदारुवृक्षांच्या योगानें जसा कांहीं तो पर्वत हात वर करूनच उभा राहिल्यासारिखा दिसत होता २९; धबधब्यांच्या ध्वनींमुळें सर्व बाजूंनीं त्या प्रदेशावर आरडाओरडा चालल्याचा भास होत होता;

निःश्वसन्तमिवामर्षाद्घोरैराशीविषोत्तमैः ३१ नीहारकृतगम्भीरैर्ध्यायन्त-
मिव गह्वरैः । मेघपादनिभैः पादैः प्रक्रान्तमिव सर्वतः ३२ जृम्भमाण-
मिवाकाशे शिखरैरभ्रमालिभिः । कूटैश्च बहुधाकीर्णं शोभितं बहुक-
न्दरैः ३३ सालतालैश्च कर्णैश्च वंशैश्च बहुभिर्वृतम् । लतावितानैर्विततैः
पुष्पवद्भिरलंकृतम् ३४ नानामृगगणैः कीर्णं धातुनिष्यन्दभूषितम् । बहु-
प्रस्रवणोपेतं शिलासंचयसङ्कटम् ३५ महर्षियक्षगन्धर्वकिंनरोरगसेवितम् ।
लतापादपसंबाधं सिंहाधिष्ठितकन्दरम् ३६ व्याघ्रादिभिः समाकीर्णं स्वादु-
मूलफलद्रुमम् । आरुरोहानिलसुतः पर्वतं प्लवगोत्तमः ३७ रामदर्शनशी-
घ्रेण प्रहर्षेणाभिचोदितः । तेन पादतलक्रान्ता रम्येषु गिरिसानुषु ३८

---

शरदृतूतील श्यामवर्ण वृक्षसमुदाय हालत असल्यामुळें तो पर्वत जसा कांहीं कंपित झाल्यासारिखा दिसत होता ३०; आंत वारा भरलेल्या कीचकसंज्ञक वेळूंच्या योगानें तो जसा कांहीं अलगुजेंच वाजवीत असल्यासारिखा दिसत होता; मोठ्या मोठ्या घोर सर्पांच्या योगानें तो जसा कांहीं रागारागानें सुस्कारे टाकीत असल्यासारिखा भासत होता ३१; दंव पडल्यामुळें गंभीर झालेल्या दऱ्यांच्या योगानें तो ध्यानस्थ बसल्यासारिखा दिसत होता; मेघांच्या फांट्यांप्रमाणें असलेल्या भोंवतालच्या लहान-लहान टेंकड्या जशा कांहीं त्याच्यावरून चालून जाण्यासच प्रवृत्त झाल्या आहेत कीं काय असें दिसत होतें ३२; मेघपटलांनीं युक्त असलेल्या शिखरांच्या योगानें तो जसा कांहीं आकाशामध्यें जांभयाच देत असल्यासारिखा दिसत होता; शिखरांच्या योगानें तो नानाप्रकारांनीं गजबजलेला होता; अनेक दऱ्यांनीं त्याला शोभा आलेली होती ३३; साल, ताल, कर्ण आणि वंश ह्या असंख्य वृक्षांनीं तो व्याप्त झालेला होता; पसरलेल्या पुष्पयुक्त लतांच्या योगानें वर चांदवे पसरून तो शृंगारिल्या-सारिखा दिसत होता ३४; नानाप्रकारच्या मृगगणांनीं तो गजबजून गेलेला होता; धातूंच्या स्रावामुळें तो भूषित झालेला होता; अनेक जलप्रवाह त्याच्यावरून वहात होते; पाषाणसमूहानें त्याच्यावर अगदीं खेंचाखेंच झालेली होती ३५; महर्षि, यक्ष, गंधर्व, किन्नर आणि उरग ह्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता; लता व वृक्ष ह्यांची त्यावर गर्दी उडालेली होती; सिंहांनीं त्याच्या गुहांचा आश्रय केलेला होता ३६; व्याघ्रादि श्वापदांनीं तो व्याप्त झालेला होता आणि मधुर मुळांनीं व फळांनीं युक्त असे वृक्ष त्यावर होते. अशा प्रकारच्या त्या अरिष्ट पर्वतावर तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान् आरूढ झाला ३७. कारण, रामदर्शनाकरितां झालेल्या अतिशय हर्षाच्या योगानें त्याला प्रोत्साहन मिळालेलें होतें.

सघोषाः समशीर्यन्त शिलाश्चूर्णीकृतास्ततः । स तमारुह्य शैलेन्द्रं व्यवर्धत महाकपिः ३९ दक्षिणादुत्तरं पारं प्रार्थयँल्लवणाम्भसः । अधिरुह्य ततो वीरः पर्वतं पवनात्मजः ४० ददर्श सागरं भीमं भीमोरगनिषेवितम् । स मारुत इवाकाशं मारुतस्यात्मसंभवः ४१ प्रपेदे हरिशार्दूलो दक्षिणादुत्तरां दिशम् । स तदा पीडितस्तेन कपिना पर्वतोत्तमः ४२ रराम विविधैर्भूतैः प्राविशद्वसुधातलम् । कम्पमानैश्च शिखरैः पतद्भिरपि च द्रुमैः ४३ तस्योरुवेगोन्मथिताः पादपाः पुष्पशालिनः । निपेतुर्भूतले भग्नाः शक्रायुधहता इव ४४ कन्दरोदरसंस्थानां पीडितानां महौजसाम् । सिंहानां निनदो भीमो नभो भिन्दन्हि शुश्रुवे ४५ स्रस्तव्याविद्धवसना व्याकुलीकृतभूषणाः । विद्याधर्यः समुत्पेतुः सहसा धरणीधरात् ४६ अतिप्रमाणा बलिनो दीप्तजिह्वा महाविषाः । निपीडितशिरोग्रीवा व्यवेष्टन्त महाहयः ४७ किंनरोरगगन्धर्वयक्षविद्याधरास्तथा । पीडितं तं

---

तो हनुमान् पर्वतावर आरूढ झाला असतां पर्वताच्या रमणीय शिखरावरील ज्या ज्या शिलांवर त्याचे पाय पडले त्या त्या शिला ३८ आवाज होऊन अगदीं पीठ होईपर्यंत चुरडून गेल्या. ह्याप्रमाणें त्या पर्वतराजावर आरूढ झाल्यानंतर महाकपि हनुमान् वृद्धिंगत झाला ३९; आणि समुद्राच्या दक्षिण तीरापासून निघून उत्तर तीराला येण्याच्या उद्देशानें तो वायुपुत्र वीर पर्वतावर आरूढ झाला असतां ४० भयंकर सर्पांनीं ज्याचा आश्रय केलेला आहे असा प्रचंड सागर त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां आकाशामध्यें प्रविष्ट होणाऱ्या वायुप्रमाणें तो वायुपुत्र ४१ वानरश्रेष्ठ हनुमान् दक्षिणदिशेपासून निघून उत्तरदिशेस गेला. ह्याप्रमाणें त्या वानरानें त्या श्रेष्ठ पर्वताला चिरडिलें असतां ४२ नानाप्रकारचें प्राण्यांच्या योगानें तो आक्रोश करूं लागला आणि भूतलामध्यें खचूं लागला. त्याचप्रमाणें त्याचीं शिखरें कांपूं लागलीं आणि वृक्ष कोसळून पडूं लागले ४३. त्या हनुमानाच्या मांड्यांच्या वेगानें रपटले गेलेले प्रफुल्लित वृक्ष इंद्राच्या वज्राचा तडाका बसल्यामुळेंच कीं काय मोडून भूमीवर पडले ४४. दऱ्यांतून राहिलेल्या महाबलाढ्य सिंहांना पीडा होऊं लागल्यामुळें आकाश दुमदुमून सोडणारी त्यांची भयंकर गर्जना कानीं येऊं लागली ४५. त्रस्त झाल्यामुळें ज्यांचीं वस्त्रें अस्ताव्यस्त होऊन भूषणांचाही गोंधळ उडून गेलेला आहे अशा विद्याधरस्त्रिया एकाएकीं पर्वतावरून खालीं पडल्या ४६. शरीरानें फारच मोठे, बलाढ्य व प्रदीप्त जिव्हा आणि जालीम विष ह्यांनीं युक्त असलेले प्रचंड सर्प मस्तक व मान चेपल्यामुळें वेटाळी घालूं लागले ४७. किन्नर, उरग, गंधर्व, यक्ष आणि विद्याधर चुरडून गेलेल्या त्या

नगवरं त्यक्त्वा गगनमास्थिताः ४८ स च भूमिधरः श्रीमान्बालिना तेन पीडितः । सवृक्षशिखरोदग्रः प्रविवेश रसातलम् ४९ दशयोजनविस्तारस्त्रिंशद्योजनमुच्छ्रितः । धरण्यां समतां यातः स बभूव धराधरः ५० स लिलङ्घयिषुर्भीमं सलिलं लवणार्णवम् । कल्लोलास्फालवेलान्तमुत्पपात नभो हरिः ५१ [२३४५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥ ५६ ॥

आप्लुत्य च महावेगः पक्षवानिव पर्वतः । भुजङ्गयक्षगन्धर्वप्रबुद्धकमलोत्पलम् १ सचन्द्रकुमुदं रम्यं सार्ककारण्डवं शुभम् । तिष्यश्रवणकादम्बमभ्रशैवलशाद्वलम् २ पुनर्वसुमहामीनं लोहिताङ्गमहाग्रहम् । ऐरावतमहाद्वीपं स्वातीहंसविलासितम् ३ वातसंघातजालोर्मिचन्द्रांशुशिशिराम्बुमत् । हनूमानपरिश्रान्तः पुप्लुवे गगनार्णवम् ४ ग्रसमान इवाकाशं ताराधिपमिवोल्लिखन् । हरन्निव सनक्षत्रं गगनं सार्कमण्डलम् ५

---

श्रेष्ठ पर्वताचा त्याग करून आकाशामध्यें गेले ४८; आणि वृक्ष व शिखरें ह्यांनीं उन्नत असलेला तो भव्य पर्वत त्या बलाढ्य वानरांमुळें चेपला गेला असतां रसातलामध्यें प्रविष्ट झाला ४९. सारांश, चाळीस कोस रुंद आणि एकशें वीस कोस उच असलेला तो पर्वत जमिनीबरोबर होऊन गेला ५०; आणि तदनंतर ज्याच्या तीरावर लाटा मारीत आहेत असा तो भयंकर जलरूप सागर उल्लंघून जाण्याकरितां त्या वानरानें आकाशामध्यें उड्डाण केलें ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं छप्पन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५६ ॥

पक्षयुक्त पर्वतच कीं काय अशा त्या महावेगवान् हनुमानानें उड्डाण करून आकाशरूप समुद्रामध्यें पोहण्यास आरंभ केला. भुजंग, यक्ष आणि गंधर्व हींच त्या सागरांतील उमललेलीं कमलें होतीं; चंद्ररूप श्वेतकमल आणि सूर्यरूप कारंडवपक्षी ह्यांनीं युक्त असल्यामुळें तो आकाशरूप शुभ सागर रमणीय दिसत होता; पुण्यसंज्ञक आणि श्रवणसंज्ञक नक्षत्रें हींच त्याच्यांतील बदकें होतीं; मेघ हेंच त्यांतील शेवाळें व हिरवें गवत होतें; पुनर्वसुनक्षत्राचे तारे हेच त्यांतील मोठे मत्स्य होते; मंगळ हाच त्यांतील मोठा नक्र होता; ऐरावत हाच त्याच्यांतील महागज होता; स्वातीनक्षत्ररूप हंसाचा तेथें विलास चाललेला होता; वावटळींचे समुदाय ह्याच त्यांतील लाटा होत्या आणि चंद्रकिरणें हेंच त्यांतील शीतल उदक होतें. अशा प्रकारच्या आकाशरूप सागरामध्यें हनुमान् श्रांत न होतां पोहूं लागला १, २, ३, ४. आकाश गिळूनच टाकीत आहे कीं काय, ताराधिपति चंद्राला नखांनीं ओरबडीतच आहे कीं काय आणि सूर्यमंडळ व नक्षत्रें

अपारमपरिश्रान्तश्चाम्बुधिं समगाहत । हनूमान्मेघजालानि विकर्षन्निव गच्छति ६ पाण्डुरारुणवर्णानि नीलमाञ्जिष्ठकानि च । हरितारुणवर्णानि महाभ्राणि चकाशिरे ७ प्रविशन्नभ्रजालानि निष्क्रमंश्च पुनःपुनः । प्रकाशश्चाप्रकाशश्च चन्द्रमा इव दृश्यते ८ विविधाभ्रघनापन्नगोचरो धवलाम्बरः । दृश्यादृश्यतनुर्वीरस्तथा चन्द्रायतेम्बरे ९ तार्क्ष्यायमाणो गगने स बभौ वायुनन्दनः १० दारयन्मेघवृन्दानि निष्पतंश्च पुनःपुनः । नदन्नादेन महता मेघस्वनमहास्वनः ११ प्रवरान्राक्षसान्हत्वा नाम विश्राव्य चात्मनः । आकुलां नगरीं कृत्वा व्यथयित्वा च रावणम् १२ अर्दयित्वा महावीरान्वैदेहीमभिवाद्य च । आजगाम महातेजाः पुनर्मध्येन सागरम् १३ पर्वतेन्द्रं सुनाभं च समुपस्पृश्य वीर्यवान् । ज्यामुक्त इव नाराचो महावेगोभ्युपागमत् १४ स किंचिदारात्संप्राप्तः समालोक्य महागिरिम् । महेन्द्रमेघसंकाशो ननाद स महाकपिः १५ स पूरयामास कपिर्दिशो दश

---

ह्यांमहवर्तमान आकाश हरणच करीत आहे कीं काय ५ असा तो हनुमान् श्रांत न होतां अपार समुद्राचें उल्लंघन करूं लागला. तो हनुमान् मेघपटलांना ओढीतच कीं काय जाऊं लागला असतां ६ श्वेतवर्ण, आरक्तवर्ण, नीलवर्ण, रक्तवर्ण, हरितवर्ण आणि अरुणवर्ण असे मोठमोठे मेघ त्याच्या मागोमाग ओढले जात आहेत असें दिसूं लागले ७. वारंवार अभ्रपटलांमध्यें प्रवेश करीत असलेला व त्यांतून बाहेर पडत असलेला तो हनुमान् प्रकाशयुक्त व प्रकाशरहित होणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसूं लागला ८. नानाप्रकारच्या अभ्रसमुदायांतून जात असल्यामुळें आणि शुभ्र वस्त्र परिधान केलें असल्यामुळें वारंवार दृश्य व अदृश्य होत असलेला तो वीर हनुमान् आकाशामध्यें चंद्रासारिखा दिसूं लागला ९. तो वायुपुत्र हनुमान् आकाशामध्यें गरुडासारिखा भासूं लागला १०. मेघसमुदाय वारंवार विदीर्ण करीत करीत आणि पुनरपि त्यांतून बाहेर पडत पडत तो मेघांप्रमाणें गंभीर स्वरानें युक्त असलेला हनुमान् उच्च स्वरानें गर्जना करीत करीत चालला ११. सारांश, श्रेष्ठ राक्षसांचा वध करून, आपलें नांव गाजवून, नगरींत दाणादाण उडवून देऊन, रावणाला व्यथा उत्पन्न करून १२, मोठ्या मोठ्या वीर योध्यांना पीडा देऊन आणि सीतेला अभिवंदन करून तो महातेजस्वी हनुमान् पुनरपि सागराच्या मध्यभागीं आला १३; व त्या पर्वतराज वसुनाथ मैनाकाला स्पर्श करून तो वीर्यवान् व महावेगवान् हनुमान् प्रत्यंचेपासून सुटलेल्या नाराच बाणाप्रमाणें वेगानें पुढें चालता झाला १४. प्रथमतः थोडासा जवळ आल्यावर त्या महापर्वताला अवलोकन करून त्या इंद्रमेघतुल्य महाकपीनें गर्जना केली १५; व उच्च स्वरानें गर्जना करितां करितां

समन्ततः। नदन्नादेन महता मेघस्वनमहास्वनः १६ स तं देशमनुप्राप्तः
सुहृद्दर्शनलालसः। ननाद सुमहानादं लाङ्गूलं चाप्यकम्पयत् १७
तस्य नानद्यमानस्य सुपर्णाचरिते पथि। फलतीवास्य घोषेण गगनं सार्क-
मण्डलम् १८ ये तु तत्रोत्तरे कूले समुद्रस्य महाबलाः। पूर्वं संविष्ठिताः
शूरा वायुपुत्रदिदृक्षवः १९ महतो वायुनुन्नस्य तोयदस्येव निःस्वनम्।
शुश्रुवुस्ते तदा घोषमूरुवेगं हनूमतः २० ते दीनमनसः सर्वे शुश्रुवुः
काननौकसः। वानरेन्द्रस्य निर्घोषं पर्जन्यनिनदोपमम् २१
निशम्य नदतो नादं वानरास्ते समन्ततः। बभूवुरुत्सुकाः सर्वे
सुहृद्दर्शनकाङ्क्षिणः २२ जाम्बवान्स हरिश्रेष्ठः प्रीतिसंहृष्टमानसः।
उपामन्त्र्य हरीन्सर्वानिदं वचनमब्रवीत् २३ सर्वथा कृतकार्योऽसौ
हनूमान्नात्र संशयः। न ह्यस्याकृतकार्यस्य नाद एवंविधो भवेत् २४
तस्य बाहूरुवेगं च निनादं च महात्मनः। निशम्य हरयो हृष्टाः समुत्पे-
तुर्यतस्ततः २५ ते नगाग्रान्नगाग्राणि शिखराच्छिखराणि च। प्रहृष्टाः

---

त्या मेघतुल्य गंभीर स्वरानें युक्त असलेल्या हनुमानानें भोंवतालच्या दशदिशा दणाणून दिल्या १६. तात्पर्य, सुहृदाचें दर्शन घेण्याविषयीं उत्सुक झालेला तो हनुमान् त्या प्रदेशावर येतांक्षणीं उच्चस्वरानें गर्जना करून पुच्छ हालवूं लागला १७; व ह्याप्रमाणें गरुडानें अवलंबन केलेल्या आकाश मार्गामध्यें जातां जातां तो गर्जना करूं लागला असतां त्याच्या गर्जनेनें सूर्यमंडलासहवर्तमान आकाश विदीर्णच होत आहे कीं काय असा भास होऊं लागला १८. जे पूर्वी महाबलाढ्य शूर वानर वायुपुत्राची मार्गप्रतीक्षा करीत समुद्राच्या उत्तर तीरावर बसले होते १९ त्या ठिकाणीं त्यांनीं वायूनें युक्त असलेल्या महामेघाच्या गर्जनेप्रमाणें प्रचंड वेगानें युक्त असलेला हनुमानाचा सिंहनाद श्रवण केला २०. तात्पर्य, प्रथमतः सर्वही दीन होऊन बसलेले ते वानर गर्जना करणाऱ्या वानराधिपति हनुमानाचा मेघासारिखा गंभीर सिंहनाद श्रवण करून सुहृदाच्या दर्शनाकरितां ते सर्वही सर्व प्रकारें उत्सुक झाले २१, २२; आणि प्रेमानें ज्याच्या मनाला अतिशय हर्ष झालेला आहे असा तो वानरश्रेष्ठ जांबवान् सर्व वानरांना हाक मारून ह्मणाला २३ " हा हनुमान् सर्वस्वीं कार्य करून आला आहे ह्यांत संशय नाहीं. कारण, ह्याचा अशा प्रकारचा सिंहनाद हातून कार्य झाल्यावांचून होण्याचा संभव नाहीं " २४. इतकें जांबवानानें सांगितल्यानंतर त्या महात्म्या हनुमानाच्या हातापायांचा वेग व सिंहनाद लक्ष्यांत आणून आनंदित झालेले वानर इकडे तिकडे उड्या मारूं लागले २५. हनुमानाला पाहण्याकरितां उत्सुक झालेले ते वानर

समपद्यन्त हनूमन्तं दिदृक्षवः २६ ते प्रीताः पादपाग्रेषु गृह्य शाखामवस्थिताः । वासांसि च प्रकाशानि समाविध्यन्त वानराः २७ गिरिगह्वरसंलीनो यथा गर्जति मारुतः । एवं जगर्ज बलवान्हनूमान्मारुतात्मजः २८ तमभ्रघनसंकाशमापतन्तं महाकपिम् । दृष्ट्वा ते वानराः सर्वे तस्थुः प्राञ्जलयस्तदा २९ ततस्तु वेगवान्वीरो गिरेर्गिरिनिभः कपिः । निपपात गिरेस्तस्य शिखरे पादपाकुले ३० हर्षेणापूर्यमाणोऽसौ रम्ये पर्वतनिर्झरे । छिन्नपक्ष इवाकाशात्पपात धरणीधरः ३१ ततस्ते प्रीतमनसः सर्वे वानरपुङ्गवाः । हनूमन्तं महात्मानं परिवार्योपतस्थिरे ३२ परिवार्य च ते सर्वे परां प्रीतिमुपागताः । प्रहृष्टवदनाः सर्वे तमागतमुपागमन् ३३ उपायनानि चादाय मूलानि च फलानि च । प्रत्यर्चयन्हरिश्रेष्ठं हरयो मारुतात्मजम् ३४ विनेदुर्मुदिताः केचित्केचित्किलकिलां तथा । हृष्टाः पादपशाखाश्च आनिन्युर्वानरर्षभाः ३५ हनूमांस्तु गुरून्वृद्धाञ्जाम्बवत्प्रमुखांस्तदा । कुमारमङ्गदं चैव सोऽवन्दत

आनंदानें ह्या वृक्षाग्रावरून त्या वृक्षाग्रावर आणि ह्या पर्वतशिखरावरून दुसऱ्या पर्वतशिखरावरी उड्या टाकूं लागले २६. तदनंतर आनंदित होऊन वृक्षांच्या अग्रभागीं शाखा धरून राहिलेले ते वानर आपलीं उज्ज्वल वस्त्रें हालवूं लागले २७. तों इतक्यांत पर्वताच्या गुहेमध्यें लीन झालेला वायु ज्याप्रमाणें गर्जना करितो त्याप्रमाणें वायुपुत्र बलाढ्य हनुमान् गर्जना करूं लागला २८; आणि अतिशय उंच असलेल्या व मेघपटलाप्रमाणें घनअसलेल्या त्या महाकपीला अवलोकन करून ते सर्वही वानर हात जोडून उभे राहिले २९; तों इतक्यांत अरिष्ट पर्वतापासून निघालेला तो पर्वतप्राय वेगवान् वीर हनुमान् वानर त्या, वृक्षांनीं गजबजलेल्या, महेंद्रपर्वताच्या शिखरावर येऊन धडकला ३०. सारांश, हर्षानें उचंबळत असलेला तो हनुमान् जलप्रवाहांनीं युक्त अशा रम्य पर्वतशिखरावर पंख तुटलेल्या पर्वताप्रमाणेंच कीं काय आकाशांतून पडला ३१. तेव्हां मनामध्यें प्रसन्न झालेले ते सर्वही वानरश्रेष्ठ महात्म्या हनुमानाचे भोंवतीं गराडा देऊन उभे राहिले ३२. तात्पर्य, तो हनुमान् आला असतां पराकाष्ठेचे आनंदित झालेले ते सर्वही वानर त्याच्या भोंवतीं जमले आणि हर्षयुक्त मुद्रेनें अगदीं त्याच्याजवळ येऊं लागले ३३. तदनंतर नजराण्यादाखल मुळें व फळें आणून वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमानाचा त्या वानरांनीं सत्कार केला ३४. कांहींजण आनंदित झाले; कांहीं किलकिल शब्द करूं लागले आणि आनंदित झालेले कांहीं वानरश्रेष्ठ वृक्षांच्या शाखा घेऊन त्याच्याकडे आले ३५. नंतर त्या महाकपि हनुमानानें जांबवान् वगैरे वृद्ध व गुरुतुल्य वानरांना आणि राजकुमार अंगदाला वंदन

महाकपिः ३६स ताभ्यां पूजितः पूज्यः कपिभिश्च प्रसादितः । दृष्टा देवीति विक्रान्तः संक्षेपेण न्यवेदयत् ३७ निषसाद च हस्तेन गृहीत्वा वालिनः सुतम् । रमणीये वनोद्देशे महेन्द्रस्य गिरेस्तदा ३८ हनूमानब्रवीत्पृष्टस्तदा तान्वानरर्षभान् । अशोकवनिकासंस्था दृष्टा सा जनकात्मजा ३९ रक्ष्यमाणा सुघोराभी राक्षसीभिरनिन्दिता । एकवेणीधरा बाला रामदर्शनलालसा ४० उपवासपरिश्रान्ता मलिना जटिला कृशा । ततो दृष्टेति वचनं महार्थममृतोपमम् ४१ निशम्य मारुतेः सर्वे मुदिता वानराभवन् । क्ष्वेडन्त्यन्ये नदन्त्यन्ये गर्जन्त्यन्ये महाबलाः ४२ चक्रुः किलकिलामन्ये प्रतिगर्जन्ति चापरे । केचिदुच्छ्रितलाङ्गूलाः प्रहृष्टाः कपिकुञ्जराः ४३ आयताञ्चितदीर्घाणि लाङ्गूलानि प्रविव्यधुः । अपरे तु हनूमन्तं श्रीमन्तं वानरोत्तमम् ४४ आप्लुत्य गिरिशृङ्गेषु संस्पृशन्ति स्म हर्षिताः । उक्तवाक्यं हनूमन्तमङ्गदस्तु तदाब्रवीत् ४५ सर्वेषां हरिवीराणां मध्ये वाचमनुत्तमाम् ।

---

केलें ३६; व त्या उभयतांनीं त्या पूज्य वानराचा सत्कार केल्यावर आणि इतर वानरांनींही त्याला प्रसन्न केल्यावर त्या पराक्रमी हनुमानानें " दृष्टीं पडली देवी " एवढें थोडक्यांतच सांगून टाकिलें ३७. तदनंतर वालिपुत्र अंगदाचा हात धरून तो हनुमान् महेंद्रपर्वताच्या रम्य वनप्रदेशावर बसला ३८ आणि वानरांनीं प्रश्न केल्यावर तो त्या वानरश्रेष्ठांना ह्मणाला " अशोकवनामध्यें बसलेली ती जनककन्या सीता माझ्या दृष्टीं पडली ३९. अतिभयंकर राक्षसी त्या निर्दोष सीतेच्या बंदोबस्ताला आहेत; तिनें नुसता अंबाडा बांधिलेला आहे आणि ती बाला रामदर्शनाकरितां उत्सुक झालेली आहे ४०. उपवास करून करून ती अगदीं थकली आहे; मलिन झालेली आहे आणि ती जटिल सीता कृश झालेली आहे ". असो. " दृष्टीं पडली " हे महत्वाच्या अर्थानें युक्त असलेले अमृततुल्य शब्द ४१ मारुतीच्या मुखांतून श्रवण करितांक्षणीं सर्वही वानर आनंदित झाले; कांहींजण क्रीडा करूं लागले; कांहीं सामान्य शब्द करूं लागले; कांहीं महाबलाढ्य वानर गर्जना करूं लागले ४२; कांहींजण किलकिल शब्द करूं लागले; कांहींजण इतरांनीं गर्जना केल्यावर आपण त्याच्यावर ताण करण्याकरितां गर्जना करूं लागले आणि आनंदित व ह्मणूनच उन्नत पुच्छांनीं युक्त झालेले कांहीं वानरश्रेष्ठ ४३ रोमांचयुक्त अशीं आपलीं स्थूल व दीर्घ पुच्छें हलवूं लागले; व कांहीं वानर त्या उदार वानरश्रेष्ठ हनुमानाला ४४, पर्वतशिखरांवर उड्डाण करून, आनंदानें स्पर्श करूं लागले. असो. हनुमानाचें भाषण झाल्यानंतर सर्व वानरवीरांमध्यें श्रेष्ठ असलेला अंगद अनुपम वाणीनें त्याला ह्मणाला " हे वानरा, धैर्य

सत्त्वे वीर्ये न ते कश्चित्समो वानर विद्यते ४६ यदवप्लुत्य विस्तीर्णं सागरं पुनरागतः । जीवितस्य प्रदाता नस्त्वमेको वानरोत्तम ४७ त्वत्प्रसादात्समेष्यामः सिद्धार्था राघवेण ह । अहो स्वामिनि ते भक्तिरहो वीर्यमहो धृतिः ४८ दिष्ट्या दृष्टा त्वया देवी रामपत्नी यशस्विनी । दिष्ट्या त्यक्ष्यति काकुत्स्थः शोकं सीतावियोगजम् ४९ ततोऽङ्गदं हनूमन्तं जाम्बवन्तं च वानराः । परिवार्य प्रमुदिता भेजिरे विपुलाः शिलाः ५० उपविष्टा गिरेस्तस्य शिलासु विपुलासु ते । श्रोतुकामाः समुद्रस्य लङ्घनं वानरोत्तमाः ५१ दर्शनं चापि लङ्कायाः सीताया रावणस्य च । तस्थुः प्राञ्जलयः सर्वे हनूमद्वदनोन्मुखाः ५२ तस्थौ तत्राङ्गदः श्रीमान्वानरैर्बहुभिर्वृतः । उपास्यमानो विविधैर्दिवि देवपतिर्यथा ५३ हनूमता कीर्तिमता यशस्विना तथाङ्गदेनाङ्गदनद्धबाहुना । मुदा तदाध्यासितमुन्नतं महन्महीधराग्रं ज्वलितं श्रियाभवत् ५४ [ २३९९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः॥५७॥

---

आणि वीर्य ह्यांमध्यें तुझी बरोबरी करणारा कोणीही नाहीं ४५, ४६. कारण, उड्डाणाबरोबर विस्तीर्ण सागर उल्लंघन करून पुनरपि परत आलेला आणि ह्मणूनच आह्मांला जीवदान देणारा असा, हे वानरश्रेष्ठा, तूंच एक आहेस ४७. तुझ्या प्रसादानें आमचे मनोरथ परिपूर्ण झाले असल्यामुळें रघुवंशज रामाला आतां आह्मी भेटूं. कायरे ही तुझी स्वामिभक्ति ! काय हें वीर्य ! आणि काय हें धैर्य ! ४८. यशस्विनी रामपत्नी सीतादेवी तुझ्या दृष्टीं पडली ही फार उत्तम गोष्ट झाली. आतां सुदैवानें ककुत्स्थकुलोत्पन्न राम सीतेच्या वियोगामुळें झालेल्या दुःखाचा त्याग करील ४९. तदनंतर आनंदित झालेले वानर अंगद, हनुमान् व जांबवान् ह्यांना गराडा देऊन मोठ्या मोठ्या शिळांवर बसले ५०. तात्पर्य, समुद्राचें उल्लंघन हनुमानानें कसें केलें आणि लंका, सीता व रावण हीं त्याच्या कशीं दृष्टीं पडलीं हें श्रवण करण्याकरितां त्या महेंद्रपर्वताच्या विस्तीर्ण शिळांवर, हनुमानाच्या मुखाकडे पहात, पहात, ते सर्वही वानर हात जोडून बसले ५१, ५२. नानाप्रकारचे देव ज्याच्या शुश्रूषेंत तत्पर आहेत असा देवराज इंद्र ज्याप्रमाणें स्वर्गामध्यें बसतो त्याप्रमाणें अनेक वानरांनीं परिवेष्टित असलेला श्रीमान् अंगद तेथें बसला ५३; आणि ह्याप्रमाणें कीर्तिमान् हनुमान् व बाहुभूषणें हातांमध्यें घातलेला यशस्वी अंगद हे आनंदानें त्या पर्वताच्या शिखरावर बसले असतां तें उन्नत पर्वतशिखर कांतीनें उज्ज्वल दिसूं लागलें ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक

ततस्तस्य गिरेः शृङ्गं महेन्द्रस्य महाबलाः। हनुमत्प्रमुखाः प्रीतिं हरयो जग्मुरुत्तमाम् १ प्रीतिमत्सूपविष्टेषु वानरेषु महात्मसु। तं ततः प्रतिसंहृष्टः प्रीतियुक्तं महाकपिम् २ जाम्बवान्कार्यवृत्तान्तमपृच्छदनिलात्मजम्। कथं दृष्टा त्वया देवी कथं वा तत्र वर्तते ३ तस्यां चापि कथं वृत्तः क्रूरकर्मा दशाननः। तत्त्वतः सर्वमेतन्नः प्रब्रूहि त्वं महाकपे ४ संमार्गिता कथं देवी किं च सा प्रत्यभाषत। श्रुतार्थाश्चिन्तयिष्यामो भूयः कार्यविनिश्चयम् ५ यश्चार्थस्तत्र वक्तव्यो गतैरस्माभिरात्मवान्। रक्षितव्यं च यत्तत्र तद्भवान्व्याकरोतु नः ६ स नियुक्तस्ततस्तेन संप्रहृष्टतनूरुहः। नमस्यञ्छिरसा देव्यै सीतायै प्रत्यभाषत ७ प्रत्यक्षमेव भवतां महेन्द्राग्रात्खमाप्लुतः। उदधेर्दक्षिणं पारं काङ्क्षमाणः समाहितः ८ गच्छतश्च हि मे घोरं विघ्नरूपमिवाभवत्। काञ्चनं शिखरं दिव्यं पश्यामि सुमनोहरम् ९ स्थितं पन्थानमावृत्य मेने विघ्नं च तं नगम्। उपसंगम्य तं दिव्यं काञ्चनं नगमुत्तमम् १० कृता मे मनसा बुद्धिर्भेत्तव्योऽयं मयेति च। प्रहतस्य मया

---

आदिकाव्यांतील, सुंदरकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५७ ॥

तदनंतर त्या महेंद्रपर्वताच्या शिखरावर जुळलेले ते हनुमान् वगैरे महाबिलाढ्य वानर अत्यंत आनंदित झाले १. ह्याप्रमाणें ते महात्मे वानर आनंदानें तेथें बसले असतां हर्षयुक्त झालेला जांबवान् त्या महाकपि वायुपुत्र हनुमानाला हातीं घेतलेल्या कार्याविषयींचा वृत्तांत विचारूं लागला. (तो ह्मणाला ) "देवी सीता तुझ्या कशी दृष्टीं पडली ? ती तेथें कशी काय आहे ? २,३ आणि तिच्याशीं तो क्रूरकर्मी रावण कसा वागत आहे ? हें सर्व, हे महाकपे, तूं आह्मांला खरें खरें सांग ४; व देवी सीतेचा तूं शोध कसा लाविलास ? आणि ती तुला काय ह्मणाली ? हेंही तूं आह्मांला कथन कर. ह्मणजे काय वृत्तांत आहे तो आह्मांला विदित झाला असतां पुढें काय करावयाचें ह्याचा निश्चय करितां येईल ५. शिवाय, तेथें गेल्यावर स्वतःसंबंधानें आह्मीं रामाला काय सांगावयाचें आणि काय गुप्त ठेवावयाचें हेंही तूं आह्मांला स्पष्ट सांग" ६. ह्याप्रमाणें जांबवानानें विचारिलें असतां हर्षानें ज्याच्या अंगावर रोमांच उठले आहेत असा तो हनुमान् सीतादेवीला मस्तकानें प्रणाम करून त्या वानरांना ह्मणाला ७ "सागराच्या दक्षिणतीरास जाण्याचा उद्देश मनांत धरून स्वस्थ चित्तानें मीं तुमच्या समक्षच महेंद्रपर्वताच्या शिखरावरून आकाशांत उड्डाण केलें ८. जातां जातां प्रथमतः मला एक वार विघ्नच आल्यासारिखें वाटलें. कारण, एक सुवर्णाचें मनोहर दिव्य शिखर माझ्या दृष्टीं पडलें ९. तेव्हां मार्ग आडवून राहिलेला तो पर्वत एक विघ्नचें आहे असें मला

तस्य लाङ्गूलेन महागिरेः ११ शिखरं सूर्यसंकाशं व्यशीर्यत सहस्रधा । व्यवसायं च तं बुद्ध्वा स होवाच महागिरिः १२ पुत्रेति मधुरां वाणीं मनः प्रह्लादयन्निव । पितृव्यं चापि मां विद्धि सखायं मातरिश्वनः १३ मैनाकमिति विख्यातं निवसन्तं महोदधौ । पक्षवन्तः पुरा तत्र बभूवुः पर्वतोत्तमाः १४ छन्दतः पृथिवीं चेरुर्बाधमानाः समन्ततः । श्रुत्वा नगानां चरितं महेन्द्रः पाकशासनः १५ वज्रेण भगवान्पक्षौ चिच्छेदैषां सहस्रशः । अहं तु मोचितस्तस्मात्तव पित्रा महात्मना १६ मारुतेन तदा वत्स प्रक्षिप्तो वरुणालये । राघवस्य मया साह्ये वर्तितव्यमरिन्दम १७ रामो धर्मभृतां श्रेष्ठो महेन्द्रसमविक्रमः । एतच्छ्रुत्वा मया तस्य मैनाकस्य महात्मनः १८ कार्यमावेद्य च गिरेरुद्धतं वै मनो मम । तेन चाहमनुज्ञातो मैनाकेन महात्मना १९ स चाप्यन्तर्हितः शैलो मानुषेण वपुष्मता । शरीरेण महाशैलः शैलेन च महोदधौ २० उत्तमं जवमास्थाय शेषमध्वानमास्थितः । ततोऽहं सुचिरं कालं जवेनाभ्यगमं पथि २१ ततः

---

वाटलें. नंतर त्या उत्कृष्ट व दिव्य सुवर्णपर्वतासमीप गेल्यावर १० तो फोडून टाकावा असा मीं मनामध्यें निश्चय केला आणि एक पुच्छाचा तडाकाही त्याला दिला. तेव्हां त्या महापर्वताच्या ११ एका सूर्यासारिख्या तेजस्वी शिखराचे हजारों तुकडे झाले. हा माझा पराक्रम पाहून तो महापर्वत "हे पुत्रा," अशा मधुरवाणीनें मनाला आल्हाद देत देत मला ह्मणाला "मी वायूचा सखा असल्यामुळें तुझा चुलता आहें असें तूं समज १२,१३. मैनाक ह्या नांवानें मी प्रसिद्ध असून महासागरामध्यें वास्तव्य करीत असतों. पूर्वी श्रेष्ठ पर्वतांना पक्ष होते १४ आणि ते आपल्या इच्छेप्रमाणें पृथ्वीवर संचार करीत असत व संचार करितां करितां मार्गांत जें कांहीं येईल त्याला पीडा देत असत. हें नगांचें वर्तन श्रवण करून पाकशासन भगवान् महेंद्रानें त्यांच्या पंखांचे वज्राच्या योगानें हजारों तुकडे केले. तेव्हां तुझ्या महात्म्या पित्यानें इंद्रापासून माझी मुक्तता केली १५, १६. हे वत्सा, वायूनें त्यावेळीं मला सागरामध्यें फेंकून दिलें. असो. हे शत्रुदमना, रघुवंशज रामाचें मला साहाय्य केलें पाहिजे १७. कारण, राम धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ आहे आणि महेंद्रासारिखा त्याचा पराक्रम आहे". हें त्या महात्म्या मैनाकाचें भाषण श्रवण करून १८ व त्या पर्वताचा उद्देश जाणून माझ्या मनाला धीर आला आणि नंतर त्या महात्म्या मैनाकानें मला जाण्याची अनुज्ञा दिली १९. अनुज्ञा देतांक्षणीं मोठें मनुष्यरूप धारण केलेला तो महापर्वत पुनरपि फक्त पाषाणरूपाचेंच अवलंबन करून समुद्रामध्यें गुप्त झाला २०. नंतर पराकाष्ठेच्या वेगाचें अवलंबन करून

पश्याम्यहं देवीं सुरसां नागमातरम् । समुद्रमध्ये सा देवी वचनं चेदम-
ब्रवीत् २२ मम भक्ष्यः प्रदिष्टस्त्वममरैर्हरिसत्तम । ततस्त्वां भक्षयि-
ष्यामि विहितस्त्वं हि मे सुरैः २३ एवमुक्तः सुरसया प्राञ्जलिः प्रणतः
स्थितः । विवर्णवदनो भूत्वा वाक्यं चेदमुदीरयन् २४ रामो दाशरथिः श्रीमा-
न्प्रविष्टो दण्डकावनम् । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया च परन्तपः २५ तस्य
सीता हृता भार्या रावणेन दुरात्मना । तस्याः सकाशं दूतोहं गमिष्ये
रामशासनात् २६ कर्तुमर्हसि रामस्य साहाय्यं विषये सति । अथवा
मैथिलीं दृष्ट्वा रामं चाक्लिष्टकारिणम् २७ आगमिष्यामि ते वक्त्रं सत्यं
प्रतिशृणोमि ते । एवमुक्ता मया सा तु सुरसा कामरूपिणी २८ अब्रवी-
न्नातिवर्तेत कश्चिदेष वरो मम । एवमुक्तः सुरसया दशयोजनमायतः २९
ततोर्धगुणविस्तारो बभूवाहं क्षणेन तु । मत्प्रमाणाधिकं चैव व्यादितं तु
मुखं तया ३० तद्दृष्ट्वा व्यादितं त्वास्यं ह्रस्वं ह्यकरवं पुनः । तस्मिन्मुहूर्ते

मी अवशिष्ट राहिलेला मार्ग उल्लंघन करूं लागलों असतां वेगावेगानें बराच वेळ-पर्यंत मार्गातून गेलों २१. तदनंतर नागमाता देवी सुरसा समुद्रामध्यें माझ्या दृष्टीं पडली व ती देवी मला ह्मणाली २२ " हे वानरश्रेष्ठ, देवांनीं तुला माझें भक्ष्य नेमिलें आहे; ह्मास्तव, मी तुला भक्षण करितें. कारण, देवांनींच तुझी माझ्याकडे योजना केलेली आहे " २३. ह्याप्रमाणें सुरसेनें सांगितलें असतां मी हात जोडून नम्रपणें उभा राहिलों; माझें मुख निस्तेज झालें आणि मी तिला ह्मणालों २४ " दशरथपुत्र शत्रुतापन श्रीमान् राम भ्राता लक्ष्मण व सीता ह्यांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला असतांना २५ दुरात्म्या रावणानें त्याची भार्या सीता हरण करून नेली आहे आणि रामाच्या आज्ञेवरून तिच्याकडे मी दूत ह्या नात्यानें जात आहें २६. ह्मास्तव, हा प्रदेश जर रामाच्या आज्ञेतील असेल तर तूं त्याला साहाय्य कर. अथवा असें नसेल तर सीतेचा शोध लावून आणि तो वृत्तांत निवेदन करण्याकरितां पापापासून परावृत्त असलेल्या रामाची भेट घेऊन २७ मी पुनरपि तुझ्या मुखामध्यें परत येईन; हें मी तुला प्रतिज्ञापूर्वक सत्य सांगतों. " ह्याप्रमाणें मीं तिला सांगितलें असतां इच्छेप्रमाणें रूप धारण करणारी ती सुरसा २८ मला ह्मणाली " हा मला प्राप्त झालेला वर व्यर्थ करण्यास कोणीही समर्थ नाहीं ". ह्याप्रमाणें सुरसेनें मला सांगितलें असतां मी दहा योजनें उंच आणि पांच योजनें रुंद एका क्षणामध्यें विस्तृत झालों. परंतु, माझ्याहीपेक्षां तिनें आपला जबडा जास्त मोठा केला २९, ३०. तेव्हां तो आ पसरलेला पाहून मी पुनरपि ह्रस्वरूप धारण

च पुनर्बभूवाङ्गुष्ठसंमितः ३१ अभिपत्याशु तद्वक्त्रं निर्गतोहं ततः क्षणात् ।
अब्रवीत्सुरसा देवी स्वेन रूपेण मां पुनः ३२ अर्थसिद्धौ हरिश्रेष्ठ गच्छ
सौम्य यथासुखम् । समानय च वैदेहीं राघवेण महात्मना ३३ सुखी
भव महाबाहो प्रीतास्मि तव वानर । ततोहं साधुसाध्वीति सर्वभूतैः
प्रशंसितः ३४ ततोन्तरिक्षं विपुलं प्लुतोहं गरुडो यथा । छाया मे निगृहीता
च न च पश्यामि किंचन ३५ सोहं विगतवेगस्तु दिशो दश विलोकयन् ।
न किंचित्तत्र पश्यामि येन मे विहता गतिः ३६ अथ मे बुद्धिरुत्पन्ना
किंनाम गमने मम । ईदृशो विघ्न उत्पन्नो रूपमत्र न दृश्यते ३७ अधोभागं तु
मे दृष्टिः शोचतः पतिता तदा । तत्राद्राक्षमहं भीमां राक्षसीं सलिलेशयाम् ३८
प्रहस्य च महानादमुक्तोहं भीमया तया । अवस्थितमसंभ्रान्तमिदं वाक्य-
मशोभनम् ३९ क्वासि गन्ता महाकाय क्षुधितायाा ममेप्सितः । भक्षः
प्रीणय मे देहं चिरमाहारवर्जितम् ४० बाढमित्येव तां वाणीं प्रत्यगृह्णा-
महं ततः । आस्यप्रमाणादधिकं तस्याः कायमपूरयम् ४१ तस्याश्चास्यं

---

केलें आणि तत्क्षणींच अगदीं अंगुष्ठाएवढा लहान झालों ३१. नंतर सत्वर तिच्या मुखामध्यें प्रवेश करून तत्क्षणींच बाहेर पडलों असतां स्वाभाविक रूप धारण करून ती सुरसा देवी मला ह्मणाली ३२ " हे विनयसंपन्न वानरश्रेष्ठा, कार्यसिद्धीकरितां तूं खुशाल जा आणि महात्म्या राघवाकडे सीतेला घेऊन ये ३३. हे महापराक्रमी वानरा, तूं सुखी हो; मी तुजवर प्रसन्न झालें आहें. " तदनंतर " शाबास, शाबास " ह्मणून सर्व प्राण्यांनीं माझी प्रशंसा केल्यावर ३४ विस्तीर्ण अंतरिक्षामध्यें मी गरुडाप्रमाणें उड्डाण केलें. तों छायेच्या द्वारानें मला कोणीं आकर्षण केलें. परंतु, कोण आकर्षण करीत आहे हें मला कांहींच दिसेना ३५. वेग नाहींसा झाल्यामुळें मी दशदिशा अवलोकन करूं लागलों; तथापि, ज्याच्या योगानें माझी गति कुंठित झाली होती तें कांहींच माझ्या दृष्टीं पडेना ३६. असें झालें असतां मी मनामध्यें ह्मणालों " अरे, आकाशामध्यें अशा प्रकारचें विघ्न उपन्न झालें आहे आणि प्रत्यक्ष रूप तर मला कोणाचेंच दिसत नाहीं ह्याचा अर्थ काय ? " ३७. अशा प्रकारें काळजी करीत आहे तोंच अधोभागीं माझी दृष्टि गेली असतां उदकामध्यें वास्तव्य करणारी एक भयंकर राक्षसी मीं पाहिली ३८. तेव्हां ती भयंकर राक्षसी हास्यपूर्वक उच्च स्वरानें, निश्चेष्ट परंतु निर्भय असलेल्या मला, अशुभ शब्दांनीं ह्मणाली ३९ " हे धटिंगणा, तूं आतां कोठें जाणार, रे ? क्षुधित असलेल्या माझा तूं उद्दिष्ट भक्ष्यच आहेस. आतां पुष्कळ वेळपर्यंत आहाररहित असलेला हा माझा देह तूं तृप्त कर " ४० ह्यावर

महद्गात्रं वर्धते मम भक्षणे । न तु मां सा नु बुबुधे मम वा विकृतं
कृतम् ४२ ततोहं विपुलं रूपं संक्षिप्य निमिषान्तरात् । तस्या हृदयमा-
दाय प्रपतामि नभस्थलम् ४३ सा विसृष्टभुजा भीमा पपात लवणा-
म्भसि । मया पर्वतसंकाशा निकृत्तहृदया सती ४४ शृणोमि खगतानां
च वाचः सौम्या महात्मनाम् । राक्षसी सिंहिका भीमा क्षिप्रं हनुमता
हता ४५ तां हत्वा पुनरेवाहं कृत्यमात्ययिकं स्मरन् । गत्वा च महद-
ध्वानं पश्यामि नगमण्डितम् ४६ दक्षिणं तीरमुदधेर्लङ्का यत्र गता पुरी ।
अस्तं दिनकरे याते रक्षसां निलयं पुरीम् ४७ प्रविष्टोहमविज्ञातो रक्षो-
भिर्भीमविक्रमैः । तत्र प्रविशतश्चापि कल्पान्तघनसप्रभा ४८ अट्टहासं
विमुञ्चन्ती नारी काप्युत्थिता पुरः । जिघांसन्तीं ततस्तां तु ज्वलदग्नि-
शिरोरुहाम् ४९ सव्यमुष्टिप्रहारेण पराजित्य सुभैरवाम् । प्रदोषकाले
प्रविशं भीतयाहं तयोदितः ५० अहं लङ्कापुरी वीर निर्जिता विक्रमेण

---

" ठीक आहे " असें ह्मणून मीं तिच्या भाषणाला मान दिला आणि तिच्या मुखापेक्षांही आपलें शरीर मोठें केलें ४१. परंतु, मला भक्षण करण्याकरितां तिचेंही भयंकर मुख फारच वाढू लागलें. तथापि, तिनें मला आळखिलें नाहीं व तिच्यापासून मला कांहीं इजाही झाली नाहीं ४२. नंतर आपलें विशालरूप एका निमिषांत मीं संकुचित केलें आणि तिचें हृदय घेऊन आकाशामध्यें उड्डाण केलें ४३. तेव्हां मीं तिचें हृदय तोडून नेल्यामुळें ती पर्वतप्राय भयंकर राक्षसी हातपाय पाखडून समुद्रामध्यें पडली ४४. असें होतांक्षणीं " भयंकर सिंहिका राक्षसीचा हनुमानानें तडकाफडकी वध करून टाकिला " असे अंतरिक्षामध्यें संचार करणाऱ्या महात्म्यांचे सौम्य शब्द कानीं आले ४५. ह्याप्रमाणें तिचा वध केल्यावर आपल्या कार्याला विलंब होत आहे हें मनांत आणून मी बराच रस्ता उल्लंघून गेलों असतां पर्वतानें मंडित असें समुद्राचें दक्षिणतीर मीं अवलोकन केलें. त्याच तीरावर लंकानगरी आहे. पुढें सूर्यास्त झाल्यानंतर राक्षसांचें निवासस्थान असलेल्या त्या नगरीमध्यें ४६, ४७ भयंकरपराक्रमी राक्षसांच्या समजण्यांत न येतां मीं प्रवेश केला. परंतु, मी प्रवेश करीत असतांनाच प्रलयकालच्या मेघाप्रमाणें जिची कांति आहे ४८ अशी एक स्त्री अट्टहास करीत करीत माझ्यासमोर उभी राहिली. तदनंतर माझा वध करण्याचा उद्देश मनांत धरणाऱ्या आणि प्रदीप्त अग्नीसारिख्या उज्ज्वल केशांनीं युक्त असलेल्या ४९ त्या अतिभयंकर स्त्रीला डाव्या मुष्टिप्रहारानेंच पराजित करून प्रदोषसमयींच मीं लंकानगरीमध्यें प्रवेश केला. तेव्हां भयभीत झालेली ती स्त्री मला ह्मणाली ५० " हे वीरा, मी लंकानगरी ज्याअर्थी तुझ्या

ते । यस्मात्तस्माद्विजेतासि सर्वरक्षांस्यशेषतः ५१ तत्राहं सर्वरात्रं तु विचरञ्जनकात्मजाम् । रावणान्तःपुरगतो न चापश्यं सुमध्यमाम् ५२ ततः सीतामपश्यंस्तु रावणस्य निवेशने । शोकसागरमासाद्य न पारमुपलक्षये ५३ शोचता च मया दृष्टं प्राकारेणाभिसंवृतम् । काञ्चनेन विकृष्टेन गृहोपवनमुत्तमम् ५४ सप्राकारमवप्लुत्य पश्यामि बहुपादपम् । अशोकवनिकामध्ये शिंशपापादपो महान् ५५ तमारुह्य च पश्यामि काञ्चनं कदलीवनम् । अदूराच्छिंशपावृक्षात्पश्यामि वरवर्णिनीम् ५६ श्यामां कमलपत्राक्षीमुपवासकृशाननाम् । तदेकवासःसंवीतां रजोध्वस्तशिरोरुहाम् ५७ शोकसंतापदीनाङ्गीं सीतां भर्तृहिते स्थिताम् । राक्षसीभिर्विरूपाभिः क्रूराभिरभिसंवृताम् ५८ मांसशोणितभक्ष्याभिर्व्याघ्रीभिर्हरिणीं यथा । सा मया राक्षसीमध्ये तर्ज्यमाना मुहुर्मुहुः ५९ एकवेणीधरा दीना भर्तृचिन्तापरायणा । भूमिशय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमागमे ६०

---

पराक्रमानें पराजित झालें आहे त्याअर्थी तूं सर्व राक्षसांचा पूर्णपणें पराभव करिशील " ५१. असें तिनें सांगितल्यानंतर सर्व रात्रभर तेथें हिंडतां हिंडतां रावणाच्या अंतःपुरामध्यें जरी मी गेलों तरी सुंदरी सीता तेथें माझ्या दृष्टीं पडली नाहीं ५२. तेव्हां रावणाच्या गृहामध्येंही सीता दृष्टीं न पडल्यामुळें मी शोकसागरांत डूबून गेलों आणि त्यांतून तरून जाण्याचा मला कांहींएक उपाय सुचेना ५३. तथापि, खेद करितां करितां सभोंवतीं सुवर्णमय उच्च कोट असलेली उत्कृष्ट बाग माझ्या दृष्टीं पडली ५४. नंतर प्राकारानें परिवेष्टित आणि असंख्य वृक्षांनीं युक्त अशा त्या बागेमध्यें उडी मारून गेलों असतां पहातों तों त्या अशोकवनांत शिशवीचा एक मोठा वृक्ष होता ५५. त्या वृक्षावर चढून पाहूं लागलों तों एक पिवळें कदलीवन माझ्या दृष्टीं पडलें आणि त्या शिशवीच्या वृक्षाजवळच सुंदरी सीता माझ्या दृष्टीं पडली ५६. कमलपत्रासारिख्या विस्तीर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या श्यामवर्ण सीतेची मुद्रा उपवासानें कृश झालेली होती; एकाच वस्त्रानें तिचें शरीर आच्छादिलेलें होतें; केसांमध्यें धूळ उडालेली होती ५७; शोक व संताप ह्यांनीं तिचें शरीर अगदीं जर्जर झालें होतें; भर्त्याच्या हिताविषयीं ती चिंतन करीत बसली होती आणि रक्तमांस भक्षण करणाऱ्या वाघिणींनीं घेरून टाकिलेली हरिणीच कीं काय अशी ती सीता विरूप व क्रूर राक्षसींनीं वेढून टाकिलेली होती. राक्षसींमध्यें बसलेली गों तिला अवलोकन केलीं तेव्हां त्या राक्षसी वारंवार तिला दटावीत होत्या ५८, ५९. भर्त्याच्या चिंतनामध्येंच ती अगदीं गढून गेली होती, दीन झाली होती, केसांचा

रावणाद्विनिवृत्तार्था मर्तव्ये कृतनिश्चया । कथंचिन्मृगशावाक्षी तूर्णमासादिता मया ६१ तां दृष्ट्वा तादृशीं नारीं रामपत्नीं यशस्विनीम् । तत्रैव शिंशपावृक्षे पश्यन्नहमवस्थितः ६२ ततो हलहलाशब्दं काञ्चीनूपुरमिश्रितम् । शृणोम्यधिकगम्भीरं रावणस्य निवेशने ६३ ततोहं परमोद्विग्नः स्वरूपं प्रत्यसंहरम् । अहं च शिंशपावृक्षे पक्षीव गहने स्थितः ६४ ततो रावणदाराश्च रावणश्च महाबलः । तं देशमनुसंप्राप्तो यत्र सीताभवस्थिता ६५ तं दृष्ट्वाथ वरारोहा सीता रक्षोगणेश्वरम् । संकुच्योरू स्तनौ पीनौ बाहुभ्यां परिरभ्य च ६६ वित्रस्तां परमोद्विग्नां वीक्षमाणामितस्ततः । त्राणं कंचिदपश्यन्तीं वेपमानां तपस्विनीम् ६७ तामुवाच दशग्रीवः सीतां परमदुःखिताम् । अवाक्शिराः प्रपतितो बहुमन्यस्व मामिति ६८ यदि चेत्त्वं तु मां दर्पान्नाभिनन्दसि गर्विते । द्विमासानन्तरं सीते पास्यामि रुधिरं तव ६९ एतच्छ्रुत्वा वचस्तस्य रावणस्य दुरात्मनः । उवाच

---

तिनें नुसता अंबाडाच बांधिलेला होता; ती भूमीवरच शयन करीत होती; हिंवाळा आला असतां निस्तेज होणाऱ्या कमलिनीप्रमाणें तिचें शरीर निस्तेज झालेलें होतें ६० आणि रावणामुळें तिचें सुख नाहींसें झालें असल्याकारणानें मरण्याविषयींच ती निश्चय करून बसली होती. अशा अवस्थेमध्यें असलेल्या त्या मृगनयना सीतेजवळ मी सत्वर गेलों ६१ आणि तशा प्रकारची ती स्त्री ह्मणजे यशस्विनी राजपत्नी अवलोकन केल्यावर तसाच अवलोकन करीत करीत मी त्या शिशवीच्या वृक्षावर बसलों ६२. तों इतक्यांत कमरपट्टा व तोरड्या ह्यांच्या ध्वनींनीं मिश्रित झालेला अतिच प्रचंड हलहला शब्द रावणाच्या गृहासमीप मला ऐकूं आला ६३. तेव्हां अत्यंत उद्विग्न होऊन मी आपलें स्वरूप सूक्ष्म केलें आणि त्या शिंशपावृक्षावर पानांनीं गजबजून गेलेल्या एका प्रदेशामध्यें पक्ष्याप्रमाणें मी दडून बसलों. तदनंतर ज्या ठिकाणीं ६४ सीता होती तेथें आपल्या स्त्रियांसहवर्तमान महाबलाढ्य रावण आला ६५. तो राक्षसगणाधिपति रावण आल्याचें समजतांक्षणीं सुंदरी सीतेनें आपले पाय वस्त्राच्या आंत सांवरून घेतले आणि पुष्ट स्तन बाहूंनीं अगदीं झांकून टाकिले ६६. तदनंतर अतिशय त्रस्त व अत्यंत उद्विग्न होऊन इकडे तिकडे पहात असलेल्या आणि रक्षण करणारा कोणी दृष्टीं पडत नसल्यामुळें थरथर कांपत असलेल्या त्या अत्यंत दुःखित तपस्विनी सीतेला मान खालीं घालून प्रणिपातपूर्वक रावण ह्मणाला " माझ्या ह्मणण्याला बहुमान दे ६७, ६८. हे गर्विष्ठ सीते, गर्वानें जर तूं माझें ह्मणणें मान्य केलें नाहींस तर सुमारें दोन महिन्यांनंतर मी तुझें रक्त प्राशन करीन ". ६९. हें

परमक्रुद्धा सीता वचनमुत्तमम् ७० राक्षसाधम रामस्य भार्याममिततेजसः । इक्ष्वाकुवंशनाथस्य स्नुषां दशरथस्य च ७१ अवाच्यं वदतो जिह्वा कथं न पतिता तव । किंस्विद्वीर्यं तवानार्य यो मां भर्तुरसंनिधौ ७२ अपहृत्यागतः पाप तेनादृष्टो महात्मना । न त्वं रामस्य सदृशो दास्येप्यस्य न युज्यसे ७३ अजेयः सत्यवाक्शूरो रणश्लाघी च राघवः । जानक्या परुषं वाक्यमेवमुक्तो दशाननः ७४ जज्वाल सहसा कोपाच्चितास्थ इव पावकः । विवृत्य नयने क्रूरे मुष्टिमुद्यम्य दक्षिणम् ७५ मैथिलीं हन्तुमारब्धः स्त्रीभिर्हाहाकृतं तदा । स्त्रीणां मध्यात्समुत्पत्य तस्य भार्या दुरात्मनः ७६ वरा मन्दोदरी नाम तया स प्रतिषेधितः । उक्तश्च मधुरां वाणीं तया स मदनार्दितः ७७ सीतया तव किं कार्यं महेन्द्रसमविक्रम । मया सह रमस्वाद्य मद्विशिष्टा न जानकी ७८ देवगन्धर्वकन्याभिर्यक्षकन्याभिरेव च । सार्धं प्रभो रमस्वेति सीतया किं करिष्यसि ७९ ततस्ताभिः समेताभिर्नारीभिः स महाबलः । उत्थाप्य सहसा नीतो

---

त्या दुरात्म्या रावणाचें भाषण श्रवण करून अत्यंत क्रुद्ध झालेली सीता उत्कृष्ट शब्दांनीं त्याला ह्मणाली ७० " हे राक्षसाधमा, अतुलतेजस्वी रामाच्या भार्येशीं आणि इक्ष्वाकुवंशाधिपति दशरथाच्या स्नुषेशीं ७१ अनुच्चारणीय भाषण करीत असतांना तुझी जिह्वा झडून कशीरे पडली नाहीं ! हे दुष्टा, हे पाप्या, भर्ता संनिध नसतांना त्या महात्म्याच्या दृष्टीं न पडतां तूं मला हरण करून इकडे घेऊन आला आहेस ह्यांत तुझा पुरुषार्थ तो काय ? तूं रामाच्या तोडीचा नाहींस, इतकेंच नव्हे परंतु, त्याचा दास होण्याचीही तुझी योग्यता नाहीं ७२, ७३. संग्रामासंबंधानें विख्यात असलेला सत्यवचनी व शूर राम अजिंक्य आहे. " ह्याप्रमाणें जानकीनें रावणाला अनुलक्षून कठोर भाषण केलें असतां ७४ चितेवरील अग्निप्रमाणें तो एकाएकीं क्रोधानें जळफळूं लागला; आणि आपले क्रूर डोळे वटारून व उजव्या हाताची मूठ उगारून तो ७५ सीतेला मारण्यास उद्युक्त झाला असतां स्त्रियांनीं हाहाकार केला. तेव्हां स्त्रियांमधून त्या दुरात्म्याची मंदोदरीनामक श्रेष्ठ भार्या लगबगीनें उठली आणि तिनें त्याला आवरून धरिलें. नंतर मदनानें व्याकुल झालेल्या रावणाला मधुरवाणीनें ती ह्मणाली ७६, ७७ " हे महेंद्रतुल्यपराक्रमी, आपणाला सीतेशीं काय कर्तव्य आहे ? माझ्यासहवर्तमान आज आपण रममाण व्हा. जानकी माझ्यापेक्षां अधिक नाहीं ७८. देव, गंधर्व आणि यक्ष ह्यांच्या कन्यांसहवर्तमान, हे प्रभो, आपण रममाण व्हा. सीतेशीं आपल्याला काय करावयाचें

भवनं स्वं निशाचरः ८० याते तस्मिन्दशग्रीवे राक्षस्यो विकृताननाः । सीतां निर्भर्त्सयामासुर्वाक्यैः क्रूरैः सुदारुणैः ८१ तृणवद्भाषितं तासां गणयामास जानकी । गर्जितं च तथा तासां सीतां प्राप्य निरर्थकम् ८२ वृथागर्जितनिश्चेष्टा राक्षस्यः पिशिताशनाः । रावणाय शशंसुस्ताः सीताध्यवसितं महत् ८३ ततस्ताः सहिताः सर्वा विहताशा निरुद्यमाः । परिक्लिश्य समस्तास्ता निद्रावशमुपागताः ८४ तासु चैव प्रसुप्तासु सीता भर्तृहिते रता । विलप्य करुणं दीना प्रशुशोच सुदुःखिता ८५ तासां मध्यात्समुत्थाय त्रिजटा वाक्यमब्रवीत् । आत्मानं खादत क्षिप्रं न सीतामसितेक्षणाम् ८६ जनकस्यात्मजां साध्वीं स्नुषां दशरथस्य च । स्वप्नो ह्यद्य मया दृष्टो दारुणो रोमहर्षणः ८७ रक्षसां च विनाशाय भर्तुरस्या जयाय च । अलमस्मान्परित्रातुं राघवाद्राक्षसीगणम् ८८ अभियाचाम वैदेहीमेतद्धि मम रोचते । यदि ह्येवंविधः स्वप्नो दुःखितायाः

---

आहे ?" ७९. इतकें झाल्यानंतर त्या एकत्र जुळलेल्या स्त्रिया त्या महाबलाढ्य रावणराक्षसाला एकदम तेथून उठवून स्वतःच्या घरीं घेऊन गेल्या ८०. तो रावण निघून गेल्यानंतर अक्राळविक्राळ मुद्रेनें युक्त असलेल्या त्या राक्षसी क्रूर व अत्यंत भयंकर भाषणांनीं सीतेची निर्भर्त्सना करूं लागल्या ८१. परंतु, सीतेनें त्यांचें भाषण कसपटाप्रमाणें मानिलें व त्यामुळें सीतेसंबंधानें त्यांची ती गर्जना व्यर्थ झाली ८२. ह्याप्रमाणें मांसभक्षक राक्षसस्त्रियांची गर्जना व तडफड व्यर्थ झाली असतां सीतेनें मरणाविषयीं केलेला भयंकर निश्चय त्यांनीं रावणाला कळविला ८३. तदनंतर हताश झालेल्या आणि म्हणूनच सीतेचें मन वळविण्याचा प्रयत्न सोडून दिलेल्या त्या सर्वही राक्षसी श्रांत झाल्यामुळें एकदम निद्रिस्थ झाल्या ८४ आणि ह्याप्रमाणें त्या गाढ निद्रिस्थ झाल्या असतां भर्त्याच्या हिताविषयीं तत्पर असलेली ती अत्यंत दुःखित व दीन सीता करुणस्वराने विलाप करून शोक करूं लागली ८५. तेव्हां त्या राक्षसींमधून एक त्रिजटानामक राक्षसी उठली आणि त्यांना ह्मणाली "तुह्मी स्वतःलाच सत्वर खाऊन टाका; जनकाची कन्या आणि दशरथाची स्नुषा जी कृष्णनयना साध्वी सीता तिला भक्षण करणें तुमच्या हातून होणार नाहीं. कारण, आज मला अंगावर कांटा आणण्यासारिखें एक भयंकर स्वप्न पडलें आहे ८६, ८७. त्यावरून राक्षसांचा नाश व हिच्या भर्त्याचा जय होणार आहे. ही सीता आह्मां राक्षसींच्या समुदायाचें रामापासून रक्षण करण्यास समर्थ आहे ८८. ह्यास्तव, ह्याविषयीं आपण सीतेची प्रार्थना करावी हें मला बरें दिसतें. दुःखाकुल झालेल्या

प्रदृश्यते ८९ सा दुःखैर्विविधैर्मुक्ता सुखमाप्नोत्यनुत्तमम् । प्रणिपातप्रसन्ना हि मैथिली जनकात्मजा ९० अलमेषा परित्रातुं राक्षस्यो महतो भयात् । ततः सा ह्रीमती बाला भर्तुर्विजयहर्षिता ९१ अवोचद्यदि तत्तथ्यं भवेयं शरणं हि वः । तां चाहं तादृशीं दृष्ट्वा सीताया दारुणां दशाम् ९२ चिन्तयामास विश्रान्तो न च मे निर्वृतं मनः । संभाषणार्थे च मया जानक्याश्चिन्तितो विधिः ९३ इक्ष्वाकुकुलवंशस्तु स्तुतो मम पुरस्कृतः । श्रुत्वा तु गदितां वाचं राजर्षिगणभूषिताम् ९४ प्रत्यभाषत मां देवी बाष्पैः पिहितलोचना । कस्त्वं केन कथं चेह प्राप्तो वानरपुङ्गव ९५ का च रामेण ते प्रीतिस्तन्मे शंसितुमर्हसि । तस्यास्तद्वचनं श्रुत्वा अहमप्यब्रुवं वचः ९६ देवि रामस्य भर्तुस्ते सहायो भीमविक्रमः । सुग्रीवो नाम विक्रान्तो वानरेन्द्रो महाबलः ९७ तस्य मां विद्धि भृत्यं त्वं हनुमन्तमिहागतम् । भर्त्रा संप्रहितस्तुभ्यं रामेणाक्लिष्टकर्मणा ९८ इदं तु पुरुषव्याघ्रः

---

सीतेसंबंधानें जर अशा प्रकारचें स्वप्न दृष्टीं पडत आहे तर ८९ नानाप्रकारच्या दुःखांतून ती मुक्त होईल आणि अनुपम सुख तिला प्राप्त होईल. ह्यास्तव, हे राक्षसस्त्रियांनों प्रणिपातानें आपण जर जनककन्या मैथिली प्रसन्न करून घेतली तर महाभयापासून, ती आपलें संरक्षण करण्यास समर्थ आहे ". हें त्रिजटेचें भाषण ऐकिल्यानंतर भर्त्याचा विजय होणार ह्मणून हर्ष झालेली ती विनयसंपन्न बाला सीता ९०,९१ ह्मणाली " हें जर खरें असेल तर मी तुमचें रक्षण करीन. " सीतेची ती तशा प्रकारची भयंकर अवस्था पाहिल्यावर ९२ मी काळजींत पडलों आणि सीता दृष्टीं पडली ह्मणून मला प्रथमतःच जरी श्रमाचें सार्थक झाल्यासारिखें वाटत होतें तरी तशी अवस्था अवलोकन केल्यानंतर माझ्या मनाला बरें वाटेना. तदनंतर सीतेशीं संभाषण करण्याचा उपाय मनामध्यें आणून ९३ माझ्या डोळ्यांपुढें असलेल्या इक्ष्वाकुवंशाची मीं स्तुति केली. तेव्हां राजर्षिपरंपरेच्या वर्णनानें भूषित अशी मीं उच्चारिलेली वाणी श्रवण करून ९४ अश्रूंनीं नेत्र आच्छादित झालेली ती देवी मला ह्मणाली " हे वानरश्रेष्ठा, तूं कोण आहेस ? येथें कसा आलास ? ९५ आणि रामाशीं तुझें प्रेम काय आहे ? हें मला कथन कर ". हें तिचें भाषण श्रवण करून मीही तिला ह्मणालों ९६ " हे देवि, तुझ्या भर्त्या रामाचा एक महापराक्रमी साहाय्यकर्ता सुग्रीवनामक महाबलाढ्य व शूर वानराधिपति आहे ९७. त्याचा सेवक हनुमान् मी येथें आलों आहें असें तूं समज. पापकर्मापासून परावृत्त असलेल्या भर्त्या रामानें मला तुझ्याकडे पाठविलें

श्रीमान्दाशरथिः स्वयम् । अङ्गुलीयमभिज्ञानमदात्तुभ्यं यशस्विनि ९९
तदिच्छामि त्वयाज्ञप्तं देवि किं करवाण्यहम् । रामलक्ष्मणयोः पार्श्वं
नयामि त्वां किमुत्तरम् १०० एतच्छ्रुत्वा विदित्वा च सीता जनकन-
न्दिनी । आह रावणमुत्पाट्य राघवो मां नयत्विति १ प्रणम्य शिरसा
देवीमहमार्यामनिन्दिताम् । राघवस्य मनोह्लादमभिज्ञानमयाचिषम् २ अथ
मामब्रवीत्सीता गृह्यतामयमुत्तमः । मणिर्येन महाबाहू रामस्त्वां बहु
मन्यते ३ इत्युक्त्वा तु वरारोहा मणिप्रवरमुत्तमम् । प्रायच्छत्परमोद्विग्ना
वाचा मां संदिदेश ह ४ ततस्तस्यै प्रणम्याहं राजपुत्र्यै समाहितः । प्रद-
क्षिणं परिक्रामभिहाभ्युद्गतमानसः ५ उत्तरं पुनरेवाह निश्चित्य मनसा
तदा । हनूमन्मम वृत्तान्तं वक्तुमर्हसि राघवे ६ यथा श्रुत्वैव न चिरात्ता-
वुभौ रामलक्ष्मणौ । सुग्रीवसहितौ वीरावुपेयातां तथा कुरु ७ यदन्यथा
भवेदेतद्द्वौ मासौ जीवितं मम । न मां द्रक्ष्यति काकुत्स्थो म्रिये साहमनाथ-

---

आहे ९८ आणि, हे यशस्विनि, पुरुषश्रेष्ठ श्रीमान् दाशरथि रामानें खुणेकरितां ही आंगठीही तुला दिली आहे ९९. तस्मात्, हे देवि, तुझी काय आज्ञा मीं शेवटास न्यावी हें समजण्याची माझी इच्छा आहे. रामलक्ष्मणाजवळ तर मी तुला घेऊन जाईनच; परंतु, दुसरी काय आज्ञा आहे ती मला कळूं दे " १००. हें भाषण श्रवण करून व ती खूण ओळखून जनककन्या सीता मला ह्मणाली " रावणाचा समूळ नाश करून रामानेंच मला घेऊन जावें " १. असें तिनें सांगि-तल्यानंतर त्या साध्वी अनिंदित सीतादेवीला मीं मस्तकानें प्रणाम केला आणि राघवाच्या मनाला आनंद देण्यासारिखी खूणही मीं तिच्यापाशीं मागितली २. तेव्हां सीता मला ह्मणाली " हा उत्कृष्ट मणि घे. ह्या मण्याच्या योगानें महापराक्रमी राम तुला बहुमान देईल ". ३. असें बोलून त्या सुंदरीनें तें उत्कृष्ट व श्रेष्ठ रत्न माझ्या स्वाधीन केलें आणि अत्यंत उद्विग्न होऊन तिनें कांहीं रामाला खूण पटण्यासारिखा वृत्तांतही मला कथन केला ४. तदनंतर स्वस्थ चित्तानें मीं त्या राजकन्येला प्रणाम केला आणि इकडे परत येण्याचा उद्देश मनांत धरून तिला प्रदक्षिणाही केली ५. तेव्हां मनाचा पूर्ण निश्चय करून ती मला पुनरपि आणखीही ह्मणाली " हे हनुमाना, राघवाला तूं माझा वृत्तांत निवेदन कर ६ आणि श्रवण करितांक्षणीं लवकरच ते उभयतां वीर रामलक्ष्मण सुग्रीवासहवर्तमान इकडे येतील असें तूं कर ७. ह्यांत जर अंतर पडेल तर आतां माझें दोनच महिने जीवित अवशिष्ट राहिलें आहे. त्यानंतर मी ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या दृष्टीं पडणार नाहीं.

यतु ८ तच्छ्रुत्वा करुणं वाक्यं क्रोधो मामभ्यवर्तत । उत्तरं च मया दृष्टं कार्यशेषमनन्तरम् ९ ततोवर्धत मे कायस्तदा पर्वतसंनिभः । युद्धाकाङ्क्षी वनं तस्य विनाशयितुमारभे ११० तद्भग्नं वनखण्डं तु भ्रान्तत्रस्तमृगद्विजम् । प्रतिबुद्ध्य निरीक्षन्ते राक्षस्यो विकृताननाः ११ मां च दृष्ट्वा वने तस्मिन्समागम्य ततस्ततः । ताः समभ्यागताः क्षिप्रं रावणायाचचक्षिरे १२ राजन्वनमिदं दुर्गं तव भग्नं दुरात्मना । वानरेण ह्यविज्ञाय तव वीर्यं महाबल १३ तस्य दुर्बुद्धिता राजंस्तव विप्रियकारिणः । वधमाज्ञापय क्षिप्रं यथासौ न पुनर्व्रजेत् १४ तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रेण विसृष्टा बहुदुर्जयाः । राक्षसाः किङ्करा नाम रावणस्य मनोनुगाः १५ तेषामशीतिसाहस्रं शूलमुद्गरपाणिनाम् । मया तस्मिन्वनोद्देशे परिघेण निषूदितम् १६ तेषां तु हतशिष्टा ये ते गता लघुविक्रमाः । निहतं च मया सैन्यं रावणायाचचक्षिरे १७ ततो मे बुद्धिरुत्पन्ना चैत्यप्रासादमुत्तमम् । तत्रस्थान्राक्षसान्हत्वा शतं

---

इतक्या मुदतींत जर तो लवकर न येईल' तर मी अनाथाप्रमाणें येथेंच मरेन " ८. हें दीन भाषण श्रवण करितांक्षणीं क्रोधानें मला घेरून टाकिलें आणि सीतादर्शनानंतर अवशिष्ट कार्य आपलें काय राहिलें आहे तें मीं मनामध्यें आणिलें ९. तेव्हां माझें शरीर पर्वतासारिखें वाढलें आणि युद्धाची इच्छा धरून मी त्या रावणाच्या वनाचा नाश करण्याला आरंभ केला ११०. तें वन मोडिलें असतां त्यांतील मृग व पक्षी त्रस्त होऊन गोंधळून गेले आणि अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या राक्षसस्त्रिया जाग्या होऊन इकडे तिकडे पाहूं लागल्या ११. नंतर त्या वनामध्यें मला अवलोकन करितांक्षणीं, त्या चोहोंकडून येऊन एकत्र जुळल्या आणि सर्वांनीं मिळून रावणाला तो वृत्तांत सत्वर निवेदन केला १२. ( त्या ह्मणाल्या ) " हे महाबलाढ्य राजा, आपल्या सामर्थ्याचा विचार न करितां दुरात्म्या वानरानें हें आपलें गहन वन मोडून टाकिलें आहे १३. ह्यावरून, हे राजा, आपला अपराध करणाऱ्या त्या वानराला अवदशाच आठवली आहे. ह्यास्तव, आपण सत्वर ह्याच्या वधाची आज्ञा द्या; ह्मणजे पुनरपि ह्याला येथें येतां येणार नाहीं " १४. हें भाषण श्रवण करून राक्षसाधिपति रावणानें आपल्या मर्जीप्रमाणें वागणारे असे किंकरनामक अत्यंत दुर्जय राक्षस पाठवून दिले १५. परंतु, शूल व मुद्गल हातांत घेऊन आलेल्या त्या ऐशीं हजार राक्षसांचा मीं गदेच्या योगानें त्या वनप्रदेशामध्यें वध केला १६. तथापि, त्यांच्यापैकीं जे अवशिष्ट राहिले होते ते सत्वर तेथून निघाले आणि मीं सैन्य मारिल्याचें त्यांनीं रावणाला कथन केलें १७. तदनंतर चिरेबंदी काम केलेला रावणाचा

स्तम्भेन वै पुनः १८ ललामभूतो लङ्काया मया विध्वंसितो रुषा । ततः
प्रहस्तस्य सुतं जम्बुमालिनमादिशत् १९ राक्षसैर्बहुभिः सार्धं घोररूपै-
र्भयानकैः । तमहं बलसंपन्नं राक्षसं रणकोविदम् १२० परिघेणातिघोरेण
सूदयामि सहानुगम् । तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रस्तु मन्त्रिपुत्रान्महाबलान् २१
पदातिबलसंपन्नान्प्रेषयामास रावणः । परिघेणैव तान्सर्वान्नयामि यमसा-
दनम् २२ मन्त्रिपुत्रान्हताञ्श्रुत्वा समरे लघुविक्रमान् । पञ्च सेनाग्रगा-
ञ्छूरान्प्रेषयामास रावणः २३ तानहं सहसैन्यान्वै सर्वानेवाभ्यसूदयम् ।
ततः पुनर्दशग्रीवः पुत्रमक्षं महाबलम् २४ बहुभी राक्षसैः सार्धं प्रेषया-
मास संयुगे । तं तु मन्दोदरीपुत्रं कुमारं रणपण्डितम् २५ सहसा खं
समुद्यन्तं पादयोश्च गृहीतवान् । तमासीनं शतगुणं भ्रामयित्वा व्यपेष-
यम् २६ तमक्षमागतं भग्नं निशम्य स दशाननः । ततश्चेन्द्रजितं नाम
द्वितीयं रावणः सुतम् २७ व्यादिदेश सुसंक्रुद्धो बलिनं युद्धदुर्मदम् ।
तच्चाप्यहं बलं सर्वं तं च राक्षसपुङ्गवम् २८ नष्टौजसं रणे कृत्वा परं हर्षमु-

उत्कृष्ट प्रासाद मोडून टाकावा असें माझ्या मनांत आल्यामुळें तेथील शंभर राक्षसांचा वध करून स्तंभाच्या योगानें १८ मीं लंकानगरीला भूषण होऊन राहिलेल्या त्या प्रासादाचा रागारागानें विध्वंस केला. तदनंतर प्रहस्तपुत्र जंबुमालीला घोर रूप धारण करणाऱ्या असंख्य भयंकर राक्षसांसहवर्तमान माझ्याकडे ( रावणानें ) जाण्याची आज्ञा केली. परंतु, त्या बलाढ्य व संग्रामवेत्त्या राक्षसाचा अनुयायांसहवर्तमान मीं अतिघोर गदेनें घात केला. हें ऐकून राक्षसाधिपति रावणानें पायदळ सैन्य बरोबर देऊन महाबलाढ्य मंत्रिपुत्रांना हुकूम केला. तथापि, गदेच्याच योगानें मीं त्या सर्वांना यमलोकीं पाठवून दिलें १९,१२०,२१,२२. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें झटपट पराक्रम करणाऱ्या मंत्रिपुत्रांचा वध झाल्याचें ऐकून रावणानें पांच शूर सेनाधिपति पाठवून दिले २३. परंतु, सैन्यासहवर्तमान त्याही सर्वांचा मीं वध केला. तदनंतर दशानन रावणानें आपला महाबलाढ्य पुत्र अक्ष २४ पुष्कळ राक्षस बरोबर देऊन संग्रामामध्यें पाठवून दिला. त्याप्रमाणें तो मंदोदरीपुत्र रणशूर कुमार अक्ष २५ एकाएकीं आकाशामध्यें आला असतां मीं त्याचे पाय धरिले आणि शंभरवेळां गरगर फिरवून त्याचें चूर्ण करून टाकिलें २६. ह्याप्रमाणें अक्षाचा वध झाल्याचें ऐकून दशानन रावण अतिशयच क्रुद्ध झाला आणि युद्धामध्यें अजिंक्य व बलाढ्य अशा आपल्या इंद्रजित्नामक पुत्राला त्यानें आज्ञा केली. तेव्हां त्या राक्षसश्रेष्ठाला आणि त्याच्या बरोबर आलेल्या सर्व सैन्याला २७,२८ संग्रामामध्यें सामर्थ्यहीन केल्यावर मला पराकाष्ठेचा हर्ष झाला. [illegible] रावणानें

पागतः । महतापि महाबाहुः प्रयत्नेन महाबलः २९ प्रहितो रावणेनैव
सह वीरैर्मदोद्धतैः । सोऽविषह्यं हि मां बुद्ध्वा स्वसैन्यं चावमर्दितम् १३०
ब्रह्मणोऽस्त्रेण स तु मां प्रबद्ध्वा चातिवेगिनः। रज्जुभिश्चापि बध्नन्ति ततो मां तत्र
राक्षसाः ३१ रावणस्य समीपं च गृहीत्वा मामुपागमन्। दृष्ट्वा संभाषितश्चाहं
रावणेन दुरात्मना ३२ पृष्टश्च लङ्कागमनं राक्षसानां च तं वधम् । तत्सर्वं
च रणे तत्र सीतार्थमुपजल्पितम् ३३ तस्यास्तु दर्शनाकाङ्क्षी प्राप्तस्त्व-
द्भवनं विभो । मारुतस्यौरसः पुत्रो वानरो हनुमानहम् ३४ रामदूतं च
मां विद्धि सुग्रीवसचिवं कपिम् । सोऽहं दौत्येन रामस्य त्वत्सकाशमिहा-
गतः ३५ शृणु चापि समादेशं यदहं प्रब्रवीमि ते । राक्षसेश हरीशस्त्वां
वाक्यमाह समाहितम् ३६ सुग्रीवश्च महाभाग स त्वां कौशलमब्रवीत् ।
धर्मार्थकामसहितं हितं पथ्यमुवाच ह ३७ वसतो ऋष्यमूके मे पर्वते
विपुलद्रुमे । राघवो रणविक्रान्तो मित्रत्वं समुपागतः ३८ तेन मे कथितं
राजन्भार्या मे रक्षसा हृता । तत्र साहाय्यहेतोर्मे समयं कर्तुमर्हसि ३९

---

मदमत्त वीरांसहवर्तमान ह्या महापराक्रमी व महाबलाढ्य पुत्राला माझ्याकडे पाठविलें होतें. असो. मी अजिंक्य आहें असें जाणून आणि आपल्या सैन्याचा नाश झाला हें लक्ष्यांत आणून त्यानें २९,१३० मला अतिवेगवान् ब्रह्मास्त्रानें बांधून टाकिलें असतां इतर राक्षसांनींही मला दोऱ्यांनीं आवळून टाकिलें ३१ व ते मला रावणासमीप घेऊन गेले. मला अवलोकन केल्यानंतर, दुरात्म्या रावणानें माझ्याशीं संभाषण केलें ३२ आणि लंकेमध्यें येण्याचें व राक्षसांचा संग्रामामध्यें वध करण्याचें कारण काय ह्मणून त्यानें विचारिलें असतां तें सर्व सीतेकरितां आहे ह्मणून मीं त्याला सांगितलें ३३. ( सारांश, मी त्याला ह्मणालों ) " हे विभो, त्या सीतेच्या दर्शनाकरितां मी तुझ्या घरीं आलों आहें आणि मी वायूचा औरस पुत्र वानर हनुमान् आहें ३४. शिवाय, मी वानर सुग्रीवाचा मंत्री व रामाचा दूत आहें असें तूं समज. तात्पर्य, रामासंबंधानें निरोप घेऊन मी तुझ्यासमीप येथें आलों आहें ३५. हे राक्षसाधिपते, तो निरोप मी तुला सांगतों; तूं श्रवण कर. वानराधिपति सुग्रीवानें तुला स्वस्थ चित्तानें निरोप सांगितला आहे ३६. हे महाभाग्यवान् रावणा, त्या सुग्रीवानें प्रथमतः तुला कुशल प्रश्न विचारून धर्म, अर्थ आणि काम ह्यांना अनुसरून असलेला हितावह व पथ्यकारक निरोप त्यानें तुला सांगितला आहे. तो येणेंप्रमाणें:-३७ विपुल वृक्षांनीं युक्त असलेल्या ऋष्यमूकपर्वतावर वास्तव्य करीत असतांना रणशूर राम माझा मित्र झाला ३८ आणि मला ह्मणाला " हे राजा, राक्षसानें माझी भार्या हरण

वालिना हृतराज्येन सुग्रीवेण सह प्रभुः । चक्रेऽग्निसाक्षिकं सख्यं राघवः सहलक्ष्मणः १४० तेन वालिनमाहत्य शरेणैकेन संयुगे । वानराणां महाराजः कृतः संप्लवतां प्रभुः ४१ तस्य साहाय्यमस्माभिः कार्यं सर्वात्मना त्विह । तेन प्रस्थापितस्तुभ्यं समीपमिह धर्मतः ४२ क्षिप्रमानीयतां सीता दीयतां राघवस्य च । यावन्न हरयो वीरा विधमन्ति बलं तव ४३ वानराणां प्रभावोयं न केन विदितः पुरा । देवतानां सकाशं च ये गच्छन्ति निमन्त्रिताः ४४ इति वानरराजस्त्वामाहेत्यभिहितो मया । मामैक्षत ततो रुष्टश्चक्षुषा प्रदहन्निव ४५ तेन वध्योहमाज्ञप्तो रक्षसा रौद्रकर्मणा । मत्प्रभावमविज्ञाय रावणेन दुरात्मना ४६ ततो बिभीषणो नाम तस्य भ्राता महामतिः । तेन राक्षसराजश्च याचितो मम कारणात् ४७ नैवं राक्षसशार्दूल त्यज्यतामेष निश्चयः । राजशास्त्रव्यपेतो हि मार्गः संलक्ष्यते त्वया ४८ दूतवध्या न दृष्टा हि राजशास्त्रेषु राक्षस । दूतेन वेदितव्यं च यथाभिहितवादिना ४९ सुमहत्यपराधेपि दूतस्यातुलविक्रम ।

---

करून नेली आहे. ह्यास्तव, त्यासंबंधानें साहाय्य करण्याविषयीं तूं मला वचन दे" ३९. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर वालीनें ज्याचें राज्य हरण केलें आहे त्या सुग्रीवासुद्धवर्तमान प्रभु रामानें लक्ष्मणाला बरोबर घेऊन व अग्नीला साक्षी ठेवून सख्य केलें १४०. नंतर एका बाणानें संग्राममध्यें वालीचा वध करून महाराज सुग्रीवाला त्या रामानें उड्डाण करणाऱ्या वानरांचें प्रभुत्व दिलें ४१. ह्यास्तव, त्या सुग्रीवाचें अगदीं मनापासून साहाय्य करणें आमचें कर्तव्य आहे आणि त्यानेंच धर्मबुद्धीनें मला तुझ्याकडे पाठविलें आहे ४२. "ह्या वीर वानरांनीं तुझ्या सैन्याचा नाश केला नाहीं तोंच सीतला लवकर परत आणून रामाच्या स्वाधीन कर ४३. वानरांचा हा प्रभाव पूर्वींच कोणाला बरें माहीत झालेला नाहीं ? निमंत्रित असल्यामुळें देवतांच्याही समीप ते जात असतात " ४४. ह्याप्रमाणें वानरराज सुग्रीवानें तुला निरोप सांगितला आहे; ह्मणून मीं त्याला सांगितलें असतां दृष्टीनें मला दग्ध करीतच कीं काय तो रावण क्रुद्ध होऊन माझ्याकडे पाहूं लागला ४५ आणि माझा प्रभाव न समजून त्या क्रूरकर्मी दुरात्म्या रावणराक्षसानें माझा वध करण्याविषयींही राक्षसांना आज्ञा केली ४६. तेव्हां बिभीषण ह्मणून त्याचा एक महाविचारी भ्राता आहे त्यानें माझ्याकरितां त्या राक्षसराजाची प्रार्थना केली ४७.(तो ह्मणाला )" हे राक्षसश्रेष्ठा, हा आग्रह आपण सोडा. आपण राजनीतीला सोडून असलेल्या मार्गाचें अवलंबन करीत आहां ४८. हे राक्षसा, राजनीतिशास्त्रांमध्यें दूतांचा वध कोठें सांगितलेला नाहीं. जसें असेल

विरूपकरणं दृष्टं न वधोस्ति हि शास्त्रतः १५० विभीषणेनैवमुक्तो रावणः संदिदेश तान् । राक्षसानेतदेवाद्य लाङ्गूलं दह्यतामिति ५१ ततस्तस्य वचः श्रुत्वा मम पुच्छं समन्ततः । वेष्टितं शणवल्कैश्च पट्टैः कार्पासकैस्तथा ५२ राक्षसाः सिद्धसंनाहास्ततस्ते चण्डविक्रमाः । तदादीप्यन्त मे पुच्छं हनन्तः काष्ठमुष्टिभिः ५३ बद्धस्य बहुभिः पाशैर्यन्त्रितस्य च राक्षसैः । न मे पीडाभवत्काचिद्दिदृक्षोर्नगरीं दिवा ५४ ततस्ते राक्षसाः शूरा बद्धं मामग्निसंवृतम् । अघोषयन्राजमार्गे नगरद्वारमागताः ५५ ततोहं सुमहद्रूपं संक्षिप्य पुनरात्मनः । विमोचयित्वा तं बन्धं प्रकृतिस्थः स्थितः पुनः ५६ आयसं परिघं गृह्य तानि रक्षांस्यसूदयम् । ततस्तन्नगरद्वारं वेगेन प्लुतवानहम् ५७ पुच्छेन च प्रदीप्तेन तां पुरीं साट्टगोपुराम् । दहाम्यहमसंभ्रान्तो युगान्ताग्निरिव प्रजाः ५८ विनष्टा जानकी व्यक्तं न ह्यदग्धः प्रदृश्यते । लङ्कायाः कश्चिदुद्देशः सर्वा भस्मीकृता पुरी५९

---

असें भाषण करणाऱ्या दूतानें आपला निरोप सांगितला पाहिजे ४९. हे अतुलपराक्रमी रावणा, मोठा अपराध जरी दूताच्या हातून घडला तरी त्याला विद्रूप करावें, एवढेंच फार तर शास्त्रामध्यें सांगितलें आहे; शास्त्रांत त्याचा वध सांगितलेला नाहीं "१५०. ह्याप्रमाणें बिभीषणानें प्रार्थना केली असतां "हें ह्याचें पुच्छ आजच्या आजच दग्ध करून टाका" ह्मणून रावणानें त्या राक्षसांना आज्ञा केली ५१. तदनंतर त्याचें भाषण श्रवण केल्यावर राक्षसांनीं माझ्या पुच्छाला कापसाचीं चिरगुटें व तागाचीं वस्त्रें भोंवतालीं गुंडाळलीं ५२ आणि युद्धाची तयारी करून सज्ज झालेल्या त्या प्रचंडपराक्रमी राक्षसांनीं काष्ठें व मुष्टि ह्यांच्या योगानें मला प्रहार करीत करीत माझें पुच्छ पेटवून दिलें ५३. परंतु, राक्षसांनीं जरी मला जखडलें होतें आणि अनेक पाशांनीं जरी मला बांधिलें होतें तरी दिवसा लंकानगरी पहावयास सांपडावी अशी माझी इच्छा असल्यामुळें मला कांहींएक पीडा झाली नाहीं ५४. तदनंतर त्या शूर राक्षसांनीं बांधून अग्नीनें प्रदीप्त केलेल्या माझ्यासंबंधानें राजमार्गामध्यें दवंडी पिटविली आणि नगराच्या द्वाराशीं ते मला घेऊन आले ५५. तेव्हां आपलें तें प्रचंड रूप मीं पुनरपि संकुचित केलें आणि तो बंध सोडून टाकून पुनरपि नेहमींप्रमाणेंच झालों ५६. लोखंडाची गदा घेऊन मीं त्या राक्षसांचा वध केला; वेगावेगानें त्या नगराच्या द्वारावर उडी मारिली ५७; आणि नंतर आपल्या प्रदीप्त झालेल्या पुच्छाच्या योगानें मी अगदीं निर्भयपणें प्रलयकालीं प्रजा दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें मच्या व बुरूज ह्यांसहवर्तमान लंकानगरी दग्ध करूं लागलों ५८. परंतु, "सर्व नगरी

दहता च मया लङ्कां दग्धा सीता न संशयः । रामस्य च महत्कार्यं मयेदं विफलीकृतम् ६० इतिशोकसमाविष्टश्चिन्तामहमुपागतः । ततोऽहं वाचमश्रौषं चारणानां शुभाक्षराम् ६१ जानकी न च दग्धेति विस्मयोदन्तभाषिणाम् । ततो मे बुद्धिरुत्पन्ना श्रुत्वा तामद्भुतां गिरम् ६२ अदग्धा जानकीत्येव निमित्तैश्चोपलक्षितम् । दीप्यमाने तु लाङ्गूले न मां दहति पावकः ६३ हृदयं च प्रहृष्टं मे वाताः सुरभिगन्धिनः । तैर्निमित्तैश्च दृष्टार्थैः कारणैश्च महागुणैः ६४ ऋषिवाक्यैश्च दृष्टार्थैरभवं हृष्टमानसः । पुनर्दृष्टा च वैदेही विसृष्टश्च तया पुनः ६५ ततः पर्वतमासाद्य तत्रारिष्टमहं पुनः । प्रतिप्लवनमारेभे युष्मद्दर्शनकाङ्क्षया ६६ ततः श्वसनचन्द्रार्कसिद्धगन्धर्वसेवितम् । पन्थानमहमाक्रम्य भवतो दृष्टवानिह ६७ राघवस्य प्रसादेन भवतां चैव तेजसा । सुग्रीवस्य च कार्यार्थं मया सर्वमनुष्ठितम् ६८ एतत्सर्वं मया तत्र यथावदुपपादितम् । तत्र यन्न कृतं शेषं

---

जळून खाक झाली आहे; लंकेंतील कोणताही प्रदेश न जळलेला शिलक राहिलेला नाहीं; तेव्हां जानकीचा निःसंशय नाश झालाच असेल ५९; लंका दहन करितांना माझ्या हातून सीताही निःसंशय दग्ध झाली आणि ह्यामुळें रामाचें हें मोठें कार्य मीं अगदीं निष्फळ केलें " ६० अशा प्रकारची मला काळजी पडली व मी अगदीं शोकाकुल झालों. तदनंतर आश्चर्यचकित करून टाकणारी वार्ता कथन करणाऱ्या चारणांची " जानकी दग्ध झाली नाहीं " अशी शुभ अक्षरांनीं युक्त असलेली वाणी मीं श्रवण केली. तेव्हां ती अद्भुत वाणी श्रवण करून मलाही "जानकी दग्ध झाली नाहीं " असें वाटलें आणि इतर चिन्हांवरून माझें तसें अनुमानही झालें. कारण, माझें पुच्छ जरी प्रदीप्त झालें होतें तरी अग्नीमुळें माझ्या अंगाचा दाह होत नव्हता ६१,६२,६३. माझें हृदय आनंदित होतें आणि वायु सुगंधि वहात होते. त्या प्रत्यक्ष चिन्हांवरून, इतरही महत्त्वाच्या कारणांवरून ६४ आणि प्रतीतीस येऊन चुकलेल्या ऋषिवाक्यांवरून मी मनामध्यें आनंदित झालों; पुनरपि सीतेचें मीं दर्शन घेतलें आणि तिनें मला जाण्याची अनुज्ञाही दिली ६५. तदनंतर अरिष्टपर्वतावर येऊन तुमचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें मीं उलट उड्डाण करण्याचा उपक्रम केला ६६. नंतर वायु, सूर्य, चंद्र, सिद्ध आणि गंधर्व ह्यांनीं आश्रय केलेल्या आकाशमार्गाचें आक्रमण करून मी तुह्मांला येथें येऊन भेटलों ६७. रामाच्या प्रसादामुळें आणि तुमच्या तेजामुळें सुग्रीवाच्या कार्याकरितां मीं हें सर्व केलें ६८. हें सर्व तेथें केलेलें मीं तुह्मांला कथन केलें आहे. आतां माझ्या हातून न झालेलें जें अवशिष्ट राहिलेलें कार्य तें

तत्सर्वं क्रियतामिति ६९ [ २५६८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

एतदाख्याय तत्सर्वं हनूमान्मारुतात्मजः । भूयः समुपचक्राम वचनं वक्तुमुत्तरम् १ सफलो राघवोद्योगः सुग्रीवस्य च संभ्रमः । शीलमासाद्य सीताया मम च प्रीणितं मनः २ आर्यायाः सदृशं शीलं सीतायाः प्लवगर्षभाः । तपसा धारयेल्लोकान्क्रुद्धा वा निर्दहेदपि ३ सर्वथातिप्रकृष्टोसौ रावणो राक्षसेश्वरः । यस्य तां स्पृशतो गात्रं तपसा न विनाशितम् ४ न तदग्निशिखा कुर्यात्संस्पृष्टा पाणिना सती । जनकस्य सुता कुर्याद्यत्क्रोधकलुषीकृता ५ जाम्बवत्प्रमुखान्सर्वाननुज्ञाप्य महाकपीन् । अस्मिन्नेवंगते कार्ये भवतां च निवेदिते ॥ न्याय्यं स्म सह वैदेह्या द्रष्टुं तौ पार्थिवात्मजौ ६ अहमेकोपि पर्याप्तः सराक्षसगणां पुरीम् । तां लङ्कां तरसा हन्तुं रावणं च सराक्षसम् ७ किं पुनः सहितो वीरैर्बलवद्भिः कृतात्मभिः । कृतास्त्रैः प्लवगैः शक्तैर्भवद्भिर्विजयैषिभिः ८ अहं तु रावणं

---

सर्व उरकण्याची तुह्मी तजवीज करा" ६९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

हें सर्व त्यांना सांगितल्यानंतर वायुपुत्र हनुमान् आणखीही त्यांना ह्मणाला १ " रामाचा उद्योग आणि सुग्रीवाची त्वरा ह्यांचें सार्थक झालें आहे आणि सीतेचें शील अवलोकनांत आल्यामुळें माझ्याही मनाला आनंद झाला आहे २. हे वानरश्रेष्ठहो, अशा प्रकारचें शील त्या साध्वी सीतेलाच योग्य आहे. आपल्या तपाच्या योगानें ती त्रैलोक्याचें रक्षण करील; आणि क्रुद्ध झाली असतां ही त्रैलोक्य दग्धही करून टाकील ३. ज्याअर्थी सीतेच्या शरीराला स्पर्श केला असतांही तिच्या तपाच्या योगानें रावणाचा नाश झाला नाहीं, त्याअर्थी तो राक्षसाधिपति महातपस्वीच असला पाहिजे ४. जनककन्या सीता क्रुद्ध झाली असतां जें करील तें हस्तस्पर्श झाला असतां अग्नीची ज्वालाही करूं शकणार नाहीं ५. आतां जांबवान् आदि करून सर्व महाकपींची अनुज्ञा घेतल्यानंतर सीताशुद्धिरूप कार्य येथपर्यंत झाल्याचें मीं आपणास निवेदन केलें आहे. तस्मात्, आतां सीतेसहवर्तमान त्या राजकुमार रामलक्ष्मणांचें आपणांला दर्शन होणें शक्य आहे ६. राक्षसगणांसहवर्तमान ती लंकानगरी आणि इतर राक्षसांसहवर्तमान तो रावण ह्यांचा स्वसामर्थ्यानें वध करण्यास मी एकटाही समर्थ आहें ७. मग वीर, बलाढ्य, सुशिक्षित, अस्त्रसंपन्न, शक्तिमान् आणि विजयेच्छु असलेल्या तुमची गोष्ट कशाला पाहिजे ? ८. मी सैन्य, पुढारी, पुत्र व सहोदर भ्राते ह्यांसहवर्तमान रावणाचा

युद्धे ससैन्यं सपुरःसरम् । सहपुत्रं वधिष्यामि सहोदरयुतं युधि ९ ब्राह्म-मस्त्रं च रौद्रं च वायव्यं वारुणं तथा १० यदि शक्रजितोऽस्त्राणि दुर्निरीक्ष्याणि संयुगे । तान्यहं निहनिष्यामि विधमिष्यामि राक्षसान् ११ भवतामभ्यनुज्ञातो विक्रमो मे रुणद्धि तम् । मयातुला विसृष्टा हि शैलवृष्टिर्निरन्तरा १२ देवानपि रणे हन्यात्किंपुनस्तान्निशाचरान् । भवतामननुज्ञातो विक्रमो मे रुणद्धि माम् १३ सागरोप्यतियाद्वेलां मन्दरः प्रचलेदपि । न जाम्बवन्तं समरे कम्पयेदरिवाहिनी १४ सर्वराक्षससङ्घानां राक्षसा ये च पूर्वजाः । अलमेकोपि नाशाय वीरो वालिसुतः कपिः १५ प्लवगस्योरुवेगेन नीलस्य च महात्मनः । मन्दरोप्यवशीर्येत किं पुनर्युधि राक्षसाः १६ सदेवासुरयक्षेषु गन्धर्वोरगपक्षिषु । मैन्दस्य प्रतियोद्धारं शंसत द्विविदस्य वा १७ अश्विपुत्रौ महावेगावेतौ प्लवगसत्तमौ । एतयोः प्रतियोद्धारं न पश्यामि रणाजिरे १८ मयैव निहता लङ्का दग्धा भस्मीकृता पुरी । राजमार्गेषु सर्वेषु नाम विश्रावितं मया १९ जयत्यतिबलो रामो

संग्रामामध्यें वध करीन ९; ब्राह्म, रौद्र, वायव्य आणि वारुण १० हीं संग्रामामध्यें शत्रूंची दृष्टि दिपवून टाकणारीं जरी इंद्रजितापाशीं अस्त्रें असलीं तरी मी त्या सर्वांचा नाश करून राक्षसांचा वध करीन ११. तुमची अनुज्ञा झाली असतां रावणाला जखडून टाकण्यास माझा पराक्रमच पुरे होईल. मीं एकसारिखी अतुल पाषाणवृष्टि सुरू केली असतां १२ संग्रामामध्यें ती देवांचाही वध करील; मग त्या निशाचरांची कथा काय ? परंतु जोंपर्यंत तुमची अनुज्ञा झाली नाहीं तोंपर्यंत मला पराक्रम करितां येत नाहीं १३. सागरही मर्यादेचें उल्लंघन करील आणि कदाचित् मंदरपर्वतही स्थानापासून ढळेल. परंतु, संग्रामामध्यें शत्रूची सेना जांबवानाला जेरीस आणण्यास समर्थ होणार नाहीं १४. एकंदर राक्षससमुदायांचा आणि त्यांच्या पूर्वज राक्षसांचा नाश करण्यास मी एकटाही पुरे आहें अथवा वालिपुत्र वीर अंगदही समर्थ आहे १५. महात्म्या नीलवानराच्या प्रचंड वेगानें मंदरपर्वतही विदीर्ण होऊन जाईल; मग युद्धामध्यें राक्षसांची गोष्ट कशाला पाहिजे ? १६. मैंदाशीं अथवा द्विविदाशीं सामना करणारा देव, असुर, यक्ष, गंधर्व, उरग आणि पक्षी ह्यांमध्यें एक तरी कोणी सांगा पाहूं १७. हे महावेगवान् वानरश्रेष्ठ अश्विनीकुमारांचे पुत्र आहेत. ह्यांच्याशीं संग्रामामध्यें सामना करणारा मला कोणीही दिसत नाहीं १८. लंकानगरींतील ( मोठ्या मोठ्या ) राक्षसांचा वध करून मीं ती दग्ध करून टाकिली आणि सर्व राजमार्गांमध्यें नांव गाजविलें १९. " अतिबलाढ्य रामाचा व महाबलाढ्य लक्ष्मणाचा

लक्ष्मणश्च महाबलः । राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः २०
अहं कोसलराजस्य दासः पवनसंभवः । हनूमानिति सर्वत्र नाम विश्रावितं मया २१ अशोकवनिकामध्ये रावणस्य दुरात्मनः । अधस्ताच्छिंशपामूले साध्वी करुणमास्थिता २२ राक्षसीभिः परिवृता शोकसंतापकर्शिता । मेघरेखापरिवृता चन्द्ररेखेव निष्प्रभा २३ अचिन्तयन्ती वैदेही रावणं बलदर्पितम् । पतिव्रता च सुश्रोणी अवष्टब्धा च जानकी २४
अनुरक्ता हि वैदेही रामे सर्वात्मना शुभा । अनन्यचिन्ता रामेण पौलोमीव पुरन्दरे २५ तदेकवासःसंवीता रजोध्वस्ता तथैव च । सा मया राक्षसीमध्ये तर्ज्यमाना मुहुर्मुहुः २६ राक्षसीभिर्विरूपाभिर्दृष्टा हि प्रमदावने । एकवेणीधरा दीना भर्तृचिन्तापरायणा २७ अधःशय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमोदये । रावणाद्विनिवृत्तार्था मर्तव्यकृतनिश्चया २८ कथंचिन्मृगशावाक्षी विश्वासमुपपादिता । ततः संभाषिता चैव सर्वमर्थं

---

जयजयकार असो. राघवानें रक्षण केलेल्या सुग्रीवराजाचा विजय असो २०. मी वायुपुत्र हनुमान् कोसलदेशाधिपति रामाचा दास आहें. " असें सर्व ठिकाणीं मीं नांव गाजविलें आहे २१. दुरात्म्या रावणाच्या अशोकवनांत शिशवीच्या झाडाखालीं साध्वी सीता दीनपणानें बसली आहे २२; राक्षसींनीं तिला घेरून टाकिलें आहे; शोक व संताप ह्यांनीं ती कृश झाली असल्यामुळें मेघपटलानें आच्छादित झालेल्या चंद्रकलेप्रमाणें ती निस्तेज दिसत आहे २३. परंतु, बलामुळें मत्त झालेला रावण तिच्या खिजगणतींतही नाहीं. कारण, तथें अडकवून टाकिलेली ती सुंदरी जानकी पतिव्रता आहे २४; रामावांचून, मनामध्यें ती दुसरें कांहींएक चिंतन करीत नाहीं आणि इंद्राणी ज्याप्रमाणें इंद्राचे ठिकाणीं अनुरक्त आहे त्याप्रमाणें रामाचे ठिकाणीं ती कल्याणी सीता अगदीं मनापासून अनुरक्त आहे २५. एकच वस्त्र तिनें परिधान केलेलें आहे आणि तिच्या अंगावर धूळ उडालेली आहे. प्रमदावनांत राक्षसींमध्यें असलेल्या त्या सीतेला एकसारिख्या अकाळविकाळ राक्षसी धमकी देत आहेत असें मीं अवलोकन केलें. भर्त्याचाच ध्यास घेऊन बसलेल्या त्या दीन सीतेनें केंसांचा अंबाडा बांधलेला आहे २६, २७; ती भूमीवर शयन क आहे; हिंवाळा आला असतां ज्याप्रमाणें कमलिनीची कांति पालटते त्याप्रमाणें तिची कांति पालटून गेलेली आहे आणि रावणाच्या हातून सुटका होण्याविषयीं निराशा झाल्यामुळें ती मरणाचा निश्चय करून राहिलेली आहे २८. हरणाच्या पाडसाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशा त्या सीतेला मीं कसा तरी धीर दिला

प्रकाशिता २९ रामसुग्रीवसख्यं च श्रुत्वा प्रीतिमुपागता । नियतः समुदाचारो भक्तिर्भर्तरि चोत्तमा ३० यन्न हन्ति दशग्रीवं स महात्मा दशाननः । निमित्तमात्रं रामस्तु वधे तस्य भविष्यति ३१ सा प्रकृत्यैव तन्वङ्गी तद्वियोगाच्च कर्शिता । प्रतिपत्पाठशीलस्य विद्येव तनुतां गता ३२ एवमास्ते महाभागा सीता शोकपरायणा । यदत्र प्रतिकर्तव्यं तत्सर्वमुपकल्प्यताम् ३३ [२६०१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकोनषष्टितमः सर्गः ॥ ५९ ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा वालिसूनुरभाषत । अश्विपुत्रौ महावेगौ बलवन्तौ प्लवङ्गमौ १ पितामहवरोत्सेकात्परमं दर्पमास्थितौ । अश्विनोर्माननार्थं हि सर्वलोकपितामहः २ सर्वावध्यत्वमतुलमनयोर्दत्तवान्पुरा । वरोत्सेकेन मत्तौ च प्रमथ्य महतीं चमूम् ३ सुराणाममृतं वीरौ पीतवन्तौ महाबलौ ।

---

आणि संभाषण करून सर्व कांहीं तिला निवेदन केलें २९. राम आणि सुग्रीव ह्या उभयतांमध्यें सख्य झाल्याचें श्रवण करितांक्षणीं तिला आनंद झाला. तिचें दृढ पातिव्रत्य एकसारिखें चाललेलें आहे आणि भर्त्याचे ठिकाणीं तिची अनुपम भक्ति आहे ३०. इतकें असूनही सीतेच्या हातून रावणाचा वध होत नाहीं ह्यावरून तो रावण खरोखर महातपस्वी असला पाहिजे. तथापि, ( सीतेला दुःख दिल्याच्या पातकानें तो आपोआप मृतप्रायच झालेला आहे ) राम त्याचा वध होण्याला निमित्त मात्र होईल ३१. ती सीता जातीचीच सडपातळ असून त्या रामाच्या वियोगानें अधिकच कृश झालेली आहे आणि ह्यामुळें प्रतिपदेचे दिवशीं अध्ययन करणाऱ्याच्या विद्येप्रमाणें ती अतिच सूक्ष्म झाली आहे ३२. सारांश, ती महाभाग्यवती सीता ह्याप्रमाणें एकसारिखा शोक करीत बसली आहे. तेव्हां ह्याला काय उपाय करावयाचा असेल तो सर्व लवकर होण्याची तजवीज करा ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला ॥ ५९ ॥

तें त्या हनुमानाचें भाषण श्रवण केल्यावर वालिपुत्र अंगद ह्मणाला " हे महावेगवान् अश्विनीकुमारपुत्र मैंद व द्विविद वानर बलाढ्य आहेत १; आणि ब्रह्मदेवाच्या वरानें ते पराकाष्ठेचे गर्विष्ठ झालेले आहेत. अश्विनीकुमारांना मान देण्याकरितां सर्वलोकाधिपति ब्रह्मदेवानें २ पूर्वी ह्यांना " तुह्मांला कोणापासूनही पीडा होणार नाहीं " असा अतुल वर दिला असतां त्या वरानें मत्त होऊन व प्रचंड सेनेचा पराजय करून ३ ह्या महाबलाढ्य वीर वानरांनीं देवांचें अमृत प्राशन केलें. सर्व

एतावेव हि संक्रुद्धौ सवाजिरथकुञ्जराम् ४ लङ्कां नाशयितुं शक्तौ सर्वे तिष्ठन्तु वानराः । अहमेकोऽपि पर्याप्तः सराक्षसगणां पुरीम् ५ तां लङ्कां तरसा हन्तुं रावणं च महाबलम् । किं पुनः सहितो वीरैर्बलवद्भिः कृतात्मभिः ६ कृतास्त्रैः प्लवगैः शक्तैर्भवद्भिर्विजयैषिभिः । वायुसूनोर्बलेनैव दग्धा लङ्केति नः श्रुतम् । ७ दृष्टा देवी न चानीता इति तत्र निवेदितुम् । न युक्तमिव पश्यामि भवद्भिः ख्यातपौरुषैः ८ न हि वः प्लवने कश्चिन्नापि कश्चित्पराक्रमे । तुल्यः सामरदैत्येषु लोकेषु हरिसत्तमाः ९. जित्वा लङ्कां सरक्षौघां हत्वा तं रावणं रणे । सीतामादाय गच्छामः सिद्धार्था हृष्टमानसाः १० तेष्वेवं हतशेषेषु राक्षसेषु हनूमता । किमन्यदत्र कर्तव्यं गृहीत्वा याम जानकीम् ११ रामलक्ष्मणयोर्मध्ये न्यस्याम जनकात्मजाम् । किं व्यलीकैस्तु तान्सर्वान्वानरान्वानरर्षभान् १२ वयमेव हि गत्वा तान्हत्वा राक्षसपुङ्गवान् । राघवं द्रष्टुमर्हामः सुग्रीवं सहलक्ष्मणम् १३ तमेवं कृतसंकल्पं जाम्बवान्हरिसत्तमः । उवाच परमप्रीतो

---

वानर स्वस्थ बसूं द्या. हेच उभयतां क्रुद्ध झाले असतां अश्व, रथ व गज ह्यांसहवर्तमान लंकेचा नाश करण्यास समर्थ आहेत. अथवा राक्षसगणांसहवर्तमान ती लंकानगरी आणि तो महाबलाढ्य रावण ह्यांचा स्वसामर्थ्यानें नाश करण्यास मीही पुरेसा आहें. मग बलवान्, वीर, सुशिक्षित, अस्त्रवेत्ते, समर्थ आणि विजयशाली असलेल्या तुमचें साहाय्य असल्यावर तर काय विचारावयाचें आहे ? वायुपुत्राच्या बलानेंच लंका दग्ध झाली असें आपल्या कानांवर आलें आहे ४,५,६,७; परंतु, पराक्रमाविषयीं प्रख्यात असलेले तुह्मी साहाय्यकर्ते असतांना " सीतादेवीचें दर्शन झालें परंतु, तिला आणिलें नाहीं " असें रामाला जाऊन सांगणें मला योग्य दिसत नाहीं ८. हे वानरश्रेष्ठहो, उड्डाण करण्यामध्यें अथवा पराक्रम गाजविण्यामध्यें देव आणि दैत्य ह्यांसहवर्तमान त्रैलोक्यांत तुमची बरोबरी करणारा कोणीही नाहीं ९. ह्यास्तव, राक्षसगणांसहवर्तमान लंका जिंकून व संग्रामामध्यें त्या राक्षसाचा वध करून आपण कृतकृत्य होऊं आणि सीतेला घेऊन आनंदानें रामाकडे जाऊं १०. हनुमानानें राक्षसांचा वध केल्यामुळें त्यामध्यें थोडकेच अवशिष्ट राहिले असतांना आतां तेथें आपलें दुसरें कर्तव्य तें काय उरलें ? जानकीला घेऊन येऊन आपण रामाकडे जाऊं ह्मणजे झालें ११. आपणच जानकीला रामलक्ष्मणांच्यामध्यें नेऊन ठवूं. किष्किंधानगरींतून लंकानगरींत जाण्याचें त्या सर्व वानरांना व वानरश्रेष्ठांना आयास पाडण्यांत काय अर्थ आहे ? १२. आपणच तेथें जाऊन मुख्य मुख्य राक्षसांचा वध केल्यावर लक्ष्मणासहवर्तमान सुग्रीवाची

वाक्यमर्थवदर्थवित् १४ नैषा बुद्धिर्महाबुद्धे यद्ब्रवीषि महाकपे । विचेतुं
वयमाज्ञप्ता दक्षिणां दिशमुत्तमाम् १५ नानेतुं कपिराजेन नैव रामेण
धीमता । कथंचिन्निर्जितां सीतामस्माभिर्नाभिरोचयेत् १६ राघवो नृप-
शार्दूलः कुलं व्यपदिशन्स्वकम् । प्रतिज्ञाय स्वयं राजा सीताविजयम-
ग्रतः १७ सर्वेषां कपिमुख्यानां कथं मिथ्या करिष्यति । विफलं कर्म
च कृतं भवेत्तुष्टिर्न तस्य च १८ वृथा च दर्शितं वीर्यं भवेद्वानरपुङ्गवाः ।
तस्माद्गच्छाम वै सर्वे यत्र रामः सलक्ष्मणः ।। सुग्रीवश्च महातेजाः कार्य-
स्यास्य निवेदने १९ न तावदेषा मतिरक्षमा नो यथा भवान्पश्यति राज-
पुत्र । यथा तु रामस्य मतिर्निविष्टा तथा भवान्पश्यतु कार्यसिद्धिम् २०
[ २६०१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे
षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

ततो जाम्बवतो वाक्यमगृह्णन्त वनौकसः । अङ्गदप्रमुखा वीरा

---

व रामाची भेट घ्यावी हें बरें " १३. ह्याप्रमाणें वालिपुत्र अंगदाचें बोलणें झाल्या-नंतर त्याच्या भाषणाचें तत्त्व जाणणारा वानरश्रेष्ठ जांबवान् अतिशय संतुष्ट झाला आणि म्हणाला १४ "हे महाबुद्धिमान् श्रेष्ठ वानरा, तूं म्हणतोस खरें; परंतु, हा विचार उपयोगीं नाहीं. कारण, दक्षिणदिशेमध्यें त्या श्रेष्ठ सीतादेवीचा शोध करण्याविषयींच आपणांला आज्ञा झालेली आहे १५. "तिला घेऊन या" अशी वानरराज सुग्रीवानें अथवा विचारी रामानें आपणांला आज्ञा केलेली नाहीं. शिवाय, आपल्या कुलाचा अभिमान बाळगणाऱ्या नृपश्रेष्ठ रघुवंशज रामाला आपणच सीतेला जिंकून आणिलें असतां कधींहीं बरें वाट-णार नाहीं. शिवाय, सर्व वानरश्रेष्ठांसमक्ष रावणाला जिंकून स्वतः सीतेला आणण्याची जर त्या राजानें प्रतिज्ञा केली आहे तर त्याची प्रतिज्ञा मिथ्या होणें योग्य कसें होईल ? सारांश, हे वानरश्रेष्ठहो, असें झालें असतां आपला मात्र पराक्रम व्यर्थ जाईल आणि त्यालाही संतोष होणार नाहीं १६,१७,१८. सारांश, हे वानरश्रेष्ठहो, असें केलें असतां आपला पराक्रम मात्र व्यर्थ दर्शविल्यासारिखें होणार आहे. तस्मात्, लक्ष्मणासहवर्तमान राम आणि महातेजस्वी सुग्रीव हे जिकडे आहेत तिकडे हें झालेलें कार्य निवेदन करण्याकरितां आपण सर्व जाऊं १९. हे राजपुत्र अंगदा, आमच्यासंबंधानें हा तुझा विचार अयोग्य आहे असें नाहीं; परंतु, रामाचा विचार ज्याप्रमाणें ठरलेला आहे त्याप्रमाणें कार्यसिद्धि करून घेण्याकडे तुला लक्ष्य दिलें पाहिजे २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडा-पैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६० ॥

हनूमांश्च महाकपिः १ प्रीतिमन्तस्ततः सर्वे वायुपुत्रपुरःसराः । महेन्द्राग्रात्समुत्पत्य पुप्लुवुः प्लवगर्षभाः २ मेरुमन्दरसंकाशा मत्ता इव महागजाः । छादयन्त इवाकाशं महाकाया महाबलाः ३ सभाज्यमानं भूतैस्तमात्मवन्तं महाबलम् । हनूमन्तं महावेगं वहन्त इव दृष्टिभिः ४ राघवे चार्थनिर्वृत्तिं कर्तुं च परमं यशः । समाधाय समृद्धार्थाः कर्मसिद्धिभिरुन्नताः ५ प्रियाख्यानोन्मुखाः सर्वे सर्वे युद्धाभिनन्दिनः । सर्वे रामप्रतीकारे निश्चितार्था मनस्विनः ६ प्लवमानाः खमाप्लुत्य ततस्ते काननौकसः । नन्दनोपममासेदुर्वनं द्रुमशतायुतम् ७ यत्तन्मधुवनं नाम सुग्रीवस्याभिरक्षितम् । अधृष्यं सर्वभूतानां सर्वभूतमनोहरम् ८ यद्रक्षति महावीरः सदा दधिमुखः कपिः । मातुलः कपिमुख्यस्य सुग्रीवस्य महात्मनः ९ ते तद्वनमुपागम्य बभूवुः परमोत्कटाः । वानरा वानरेन्द्रस्य

---

तदनंतर अंगदप्रभृति वीर वानर आणि महाकपि हनुमान् ह्यांनीं जांबवानाचें ह्मणणें कबूल केलें १ आणि वायुपुत्र हनुमानाला पुढें घालून ते सर्वही आनंदित झालेले वानरश्रेष्ठ महेंद्रपर्वताच्या शिखरापासून उड्या टाकीत टाकीत निघाले २. शरीरानें धिप्पाड असल्यामुळें मेरुमंदरपर्वतांसारिखे आणि मोठ्या मोठ्या मत्त गजांसारिखे दिसणारे ते महाबलाढ्य वानर जसे कांहीं आकाश आच्छादित करूं लागले ३ आणि आकाशामध्यें वास्तव्य करणारे सिद्धप्रभृति भूतगण त्या महावेगवान् व महाबलाढ्य हनुमानाची प्रशंसा करूं लागले असतां दृष्टींनीं त्याला वाहूनच नेत आहेत कीं काय अशा रीतीनें तें त्याच्याकडे एकसारिखे पाहूं लागले ४. रामाची कार्यसिद्धि करण्याचा आणि पराकाष्ठेची कीर्ति गाजविण्याचा निश्चय करून चाललेले ते वानर सीतादर्शन, लंकादहन वगैरे कर्मांनीं आनंदित झाले होते आणि पुढें काय करावयाचें हेंही त्यांनीं ठरविलें होतें ५. प्रिय वार्ता सांगण्याविषयीं सर्वही उत्सुक झाले होते; सर्वही युद्धाचें अभिनंदन करणारे होते आणि रामाच्या हातून रावणाचा प्रतीकार व्हावा ह्याविषयीं त्या सर्वही विचारी वानरांचा निश्चय झालेला होता ६. असो. आकाश व्याप्त करून ते वानर उड्या टाकीत टाकीत जाऊं लागले असतां शेंकडों वृक्षांनीं युक्त असलेल्या एका नंदनतुल्य वनामध्यें ते येऊन पोंचले ७. तें सुग्रीवाचें रक्षण करून ठेविलेलें मधुवन होय. तें मधुवन प्राणिमात्राच्या मनाला आल्हाद देणारें होतें आणि आज्ञेशिवाय कोणत्याही प्राण्याचा त्यांत प्रवेश होणें शक्य नव्हतें ८. वानरश्रेष्ठ महात्म्या सुग्रीवाचा मातुल दधिमुखनामक महावीर वानर त्याचें सर्वदां रक्षण करीत असे ९. वानरराज सुग्रीवाचे मनाला

मनःकान्तं महावनम् १० ततस्ते वानरा हृष्टा दृष्ट्वा मधुवनं महत् ।
कुमारमभ्ययाचन्त मधूनि मधुपिङ्गलाः ११ ततः कुमारस्तान्वृद्धाञ्जाम्ब-
वत्प्रमुखान्कपीन् । अनुमान्य ददौ तेषां निसर्गं मधुभक्षणे १२ ते निसृष्टाः
कुमारेण धीमता वालिसूनुना । हरयः समपद्यन्त द्रुमान्मधुकराकुलान् १३
भक्षयन्त सुगन्धीनि मूलानि च फलानि च । जग्मुः प्रहर्षं ते सर्वे बभू-
वुश्च मदोत्कटाः १४ ततश्चानुमताः सर्वे सुसंहृष्टा वनौकसः । मुदिताश्च
ततस्ते च प्रनृत्यन्ति ततस्ततः १५ गायन्ति केचित्प्रहसन्ति केचिन्नृत्यन्ति
केचित्प्रणमन्ति केचित् । पठन्ति केचित्प्रचरन्ति केचित्प्लवन्ति केचित्प्र-
लपन्ति केचित् १६ परस्परं केचिदुपाश्रयन्ति परस्परं केचिदतिब्रुवन्ति ।
द्रुमाद्द्रुमं केचिदभिद्रवन्ति क्षितौ नगाग्रान्निपतन्ति केचित् १७ मही-
तलात्केचिदुदीर्णवेगा महाद्रुमाग्राण्यभिसंपतन्ति । गायन्तमन्यः प्रहसन्नु-
पैति रुदन्तमन्यः प्ररुदन्नुपैति १८ तुदन्तमन्यः प्रणुदन्नुपैति समाकुलं

---

आनंद देणारें जें महावन त्याच्यासमीप गेल्यानंतर ते वानर मधुपान करण्याविषयीं अतिशय उत्सुक झाले १०. सारांश, मोठें मधुवन अवलोकन करून ते वानर आनंदित झाले आणि मधासारिख्या पिंगटवर्णानें युक्त असलेल्या त्या वानरांनीं मधुपान करण्याला अनुज्ञा देण्याविषयीं कुमार अंगदाची प्रार्थना केली ११. तदनंतर कुमार अंगदानें त्या जांबवान् वगैरे वृद्ध कपींचें अनुमोदन घेऊन मधुपान करण्याविषयीं त्यांना अनुज्ञा दिली १२. तेव्हां वालिपुत्र विचारी कुमार अंगदाची आज्ञा झाली असतां मधुमक्षिकांनीं भरलेल्या वृक्षावर ते वानर गेले १३; सुगंधि मुळें व फळें त्यांनीं भक्षण केलीं आणि ते सर्वही आनंदित झाले व तर्र होऊन गेले १४. तात्पर्य, अंगदाचें अनुमोदन मिळाल्यावर सर्वही वानरांना अतिशय हर्ष झाला आणि आनंदित होऊन ते ठिकठिकाणीं नाचूं लागले १५. कांहींजण गाऊं लागले; कांहीं हंसूं लागले; कांहीं नाचूं लागले; कांहीं प्रणाम करूं लागले; कांहीं पठण करूं लागले; कांहीं हिंडूं लागले; कांहीं उड्या मारूं लागले; कांहीं संभाषण करूं लागले १६; कांहीं एकमेकांकडे जाऊं लागले; कांहीं बोलण्यामध्यें एकमेकांवर ताण करूं लागले; कांहीं ह्या वृक्षावरून त्या वृक्षावर धांवाधांव करूं लागले; कांहीं वृक्षाग्रांवरून भूमीवर उड्या टाकूं लागले १७ आणि कांहीं महावेगवान् वानर भूतलावरून मोठ्या मोठ्या वृक्षांच्या अग्रांवर एकदम उड्या मारूं लागले. कोणी गाऊं लागला असतां दुसरा हंसत हंसत त्याच्याकडे जाऊं लागला; कोणी रडूं लागला असतां दुसराही थट्टेनें रडत रडत त्याच्याकडे जाऊं लागली १८; कोणी

तत्कपिसैन्यमासीत् । न चात्र कश्चिन्न बभूव मत्तो न चात्र कश्चिन्न बभूव दृप्तः १९ ततो वनं तत्परिभक्ष्यमाणं द्रुमांश्च विध्वंसितपत्रपुष्पान्। समीक्ष्य कोपाद्दधिवक्त्रनामा निवारयामास कपिः कपींस्तान् २० स तैः प्रवृद्धैः परिभर्त्स्यमानो वनस्य गोप्ता हरिवृद्धवीरः । चकार भूयो मतिमुग्रतेजा वनस्य रक्षां प्रति वानरेभ्यः २१ उवाच कांश्चित्परुषाण्यभीतमसक्तमन्यांश्च तलैर्जघान । समेत्य कैश्चित्कलहं चकार तथैव साम्नोपजगाम कांश्चित् २२ स तैर्मदादप्रतिवार्यवेगैर्बलाच्च तेन प्रतिवार्यमाणैः। प्रधर्षणे त्यक्तभयैः समेत्य प्रकृष्यते चाप्यनवेक्ष्य दोषम् २३ नखैस्तुदन्तो दशनैर्दशन्तस्तलैश्च पादैश्च समापयन्तः । मदात्कपिं ते कपयः समन्तान्महावनं निर्विषयं च चक्रुः २४ [ २६२५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्ड एकषष्टितमः सर्गः ॥ ६१ ॥

---

कुचळी काढूं लागला असतां दुसराही त्याची कुचळी काढण्या करितां त्याच्याकडे जाऊं लागला आणि अशा रीतीनें त्या वानरसेनेमध्यें एकच गोंधळ उडून गेला. मधुपान करून तर्र न झालेला आणि स्वसामर्थ्याबद्दल गर्व न चढलेला असा एकही वानर त्या सैन्यामध्यें नव्हता १९. ह्याप्रमाणें वानर सर्वप्रकारें त्या वनांतील पदार्थ भक्षण करून टाकींत आहेत आणि वृक्षांवरील पत्रांचा व पुष्पांचा त्यांनीं विध्वंस केला आहे असें आढळून आल्यावर दधिमुखनामक वानर रागारागानें त्या वानरांचें निवारण करूं लागला २०; परंतु, मदचढलेले ते वानरच उलट त्याची निर्भर्त्सना करूं लागले असतां उग्र तेजानें युक्त असलेल्या त्या वनरक्षक वृद्ध वानरवीरानें त्या वानरांपासून वनाचें संरक्षण करण्याचें आणखी एकदां मनामध्यें आणिलें २१. कांहीं कांहीं वानरांना तो निर्भयपणें कठोर शब्द बोलूं लागला; कांहींना, मुळींच उपेक्षा न करितां तो चपराका मारूं लागला; कांहींच्या जवळ येऊन कलह करूं लागला आणि कांहींशीं सामोपचारानेंच बोलूं लागला २२. परंतु, मद चढल्यामुळें ज्यांच्या वेगाचें निवारण होणें अशक्य झालें होतें आणि आपल्याला जो आड येईल त्याच्यावर हल्ला करण्याविषयीं ज्यांना मुळींच भय वाटेनासें झालें होतें त्या वानरांचें तो बलात्कारानें निवारण करूं लागला असतां यत्किंचितही दोष मनामध्यें न आणितां ते वानर एकत्र जुळून त्याला ओढूं लागले २३. कांहींजण नखांनीं त्याचे बोचकारे काढूं लागले; कांहींजण दातांनीं त्याला चावूं लागले आणि कांहींजण चपराकांनीं व लाथांनीं त्याला मृतप्राय करूं लागले. असो. अशा रीतीनें मद चढल्यामुळें त्या वानरांनीं त्या सर्व महावनांतील यत्किंचितही भोग्यवस्तु शिलक ठेविली नाहीं २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकसष्ठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

तानुवाच हरिश्रेष्ठो हनूमान्वानरर्षभः । अव्यग्रमनसो यूयं मधु सेवत वानराः १ अहमावर्जयिष्यामि युष्माकं परिपन्थिनः । श्रुत्वा हनुमतो वाक्यं हरीणां प्रवरोऽङ्गदः २ प्रत्युवाच प्रसन्नात्मा पिबन्तु हरयो मधु । अवश्यं कृतकार्यस्य वाक्यं हनुमतो मया ३ अकार्यमपि कर्तव्यं किमङ्ग पुनरीदृशम् । अङ्गदस्य मुखाच्छ्रुत्वा वचनं वानरर्षभाः ४ साधुसाध्विति संहृष्टा वानराः प्रत्यपूजयन् । पूजयित्वाङ्गदं सर्वे वानरा वानरर्षभम् ५ जग्मुर्मधुवनं यत्र नदीवेग इव द्रुमम् । ते प्रविष्टा मधुवनं पालानाक्रम्य शक्तितः ६ अतिसर्गाच्च पटवो दृष्ट्वा श्रुत्वा च मैथिलीम् । पपुः सर्वे मधु तदा रसवत्फलमाददुः ७ उत्पत्य च ततः सर्वे वनपालान्समागतान् । ते ताडयन्तः शतशः सक्ता मधुवने तदा ८ मधूनि द्रोणमात्राणि बाहुभिः परिगृह्य ते । पिबन्ति कपयः केचित्सङ्घशस्तत्र हृष्टवत् ९ घ्नन्ति स्म सहिताः सर्वे भक्षयन्ति तथापरे । केचित्पीत्वापविध्यन्ति मधूनि मधुपिङ्गलाः १० मधूच्छिष्टेन केचिच्च जघ्नुरन्योन्यमुत्कटाः । अपरे

---

प्रथमतः कपिश्रेष्ठ वानरोत्तम हनुमान् त्यांना ह्मणाला, “ हे वानरहो, तुह्मी स्वस्थ मनानें मध सेवन करा १. तुह्मांला आड येणाऱ्यांचें मी निवारण करीन ”. हें हनुमानाचें भाषण श्रवण करून वानरश्रेष्ठ अंगद २ प्रसन्न मनानें ह्मणाला; “ वानरांना मध सेवन करूं द्या. कार्य करून आलेल्या वानराचें ह्मणणें अयोग्य जरी असलें तरी सुद्धां मला तें अवश्य शेवटास नेलें पाहिजे; मग अशा ह्मणण्याची तर गोष्ट पाहिजे कशाला ? ” अंगदाच्या मुखांतून हें भाषण श्रवण करितांक्षणीं वानरश्रेष्ठ ३, ४ आनंदित होऊन “ शाबास, शाबास ” ह्मणून त्याची प्रशंसा करूं लागले आणि वानरश्रेष्ठ अंगदाची प्रशंसा केल्यावर ते सर्वही वानर ५ वृक्षाकडे जाणाऱ्या नदीच्या वेगाप्रमाणें मधुवनाच्या मार्गाला लागले, व आपल्या सामर्थ्यानें रक्षकांना पादाक्रांत करून ते मधुवनामध्यें प्रविष्ट झाले ६; हनुमानाला सीतेचें दर्शन झाल्यामुळें आणि इतरांना तिची वार्ता समजल्यामुळें निर्भय झालेले ते सर्वही वानर अंगदाच्या अनुज्ञेनें मध पिऊं लागले आणि रसानें भरलेलीं फळेंही तोडूं लागले ७. वनरक्षक त्यांच्याकडे आले असतां उड्या मारून ते सर्वही वानर त्यांना ताडण करूं लागले आणि शंकडों टोळ्या करून ते मधुवनामध्यें मध प्राशन करण्याकरितां ठिकठिकाणीं बिलगून राहूं लागले ८. शेर शेर मध हातांमध्यें घेऊन कांहीं वानर आनंदानें पंक्ति पंक्ति करून पिऊं लागले ९; कांहींजण सर्व मिळून एकदम वनरक्षकांना मारूं लागले; कांहीं भक्षण करण्यामध्यें गुंतले आणि मधासारिख्या पिंगटवर्णानें युक्त असलेले कांहीं वानर मध

वृक्षमूलेषु शाखा गृह्य व्यवस्थिताः ११ अत्यर्थं च मदग्लानाः पर्णान्यास्तीर्य शेरते । उन्मत्तवेगाः प्लवगा मधुमत्ताश्च हृष्टवत् १२ क्षिपन्त्यपि तथान्योन्यं स्खलन्ति च तथापरे । केचित्क्ष्वेडान्प्रकुर्वन्ति केचित्कूजन्ति हृष्टवत् १३ हरयो मधुना मत्ताः केचित्सुप्ता महीतले । धृष्टाः केचिद्धसन्त्यन्ये केचित्कुर्वन्ति चेतरत् १४ कृत्वा केचिद्वदन्त्यन्ये केचिद्बुध्यन्ति चेतरत् १५ येऽप्यत्र मधुपालाः स्युः प्रेष्या दधिमुखस्य तु । तेऽपि तैर्वानरैर्भीमैः प्रतिषिद्धा दिशो गताः १६ जानुभिश्च प्रघृष्टाश्च देवमार्गं च दर्शिताः । अब्रुवन्परमोद्विग्ना गत्वा दधिमुखं वचः १७ हनूमता दत्तवरैर्हतं मधुवनं बलात् । वयं च जानुभिर्घृष्टा देवमार्गं च दर्शिताः १८ तदा दधिमुखः क्रुद्धो वनपस्तत्र वानरः । हतं मधुवनं दृष्ट्वा सान्त्वयामास तान्हरीन् १९ एतागच्छत गच्छामो वानरानतिदर्पितान् । बलेनावारयिष्यामि प्रभुञ्जानान्मधूत्त-

---

पिऊन पोळीं फेंकूनही देऊं लागले १०, मद चढल्यामुळें कित्येकजण एकमेकाला मधानेंच मारूं लागले आणि कांहींजण शाखा धरून वृक्षावर स्वस्थ बसूं लागले ११. मदानें अतिशय ग्लानि आल्यानंतर कांहींजण पानें पसरून वर पडूं लागले आणि मधु पिऊन मत्त झालेले कांहीं वानर उन्मत्त पुरुषाप्रमाणें हंसत हंसत दांडगाई करूं लागले १२. कांहींजण एकमेकाला ढकलूं लागले; कांहींजण चालतां चालतां अडखळूं लागले; कांहीं गर्जना करूं लागले आणि कांहीं आनंदानें मंजुल शब्द करूं लागले १३. मधानें मत्त झालेल्या कांहीं वानरांना भूतलावरच गाढ झोंप लागली; कांहीं धीट होते ते हंसूं लागले आणि कांहीं रोदनही करूं लागले १४. कांहींजण हातानें एक करून तोंडानें भलतेंच बोलूं लागले आणि कांहींजण एक सांगितलें असतां भलतेंच समजूं लागले १५. दधिमुखाच्या हाताखालचे जे त्या वनामध्यें मधुरक्षक होते त्यांचा त्या भयंकर वानरांनीं निषेध केला असतां ते वाट फुटेल तिकडे निघून गेले १६. कांहींना गुडघे धरून वानरांनीं फरपटत फरपटत ओढून नेलें आणि कांहींना धरून आकाशामध्यें उंच फेंकूनही दिलें. तेव्हां अतिशय भयभीत झालेले ते वनरक्षक दधिमुखाकडे जाऊन ह्मणाले १७ "हनुमानानें अनुज्ञा दिलेल्या वानरांनीं बलात्कारानें मधुवनाचा विध्वंस केला. आह्मांला गुडघे धरून त्यांनीं फरपटीत नेलें आणि उंच फेंकूनही दिलें" १८. हें ऐकून घेऊन वनरक्षक दधिमुख वानर क्रुद्ध झाला आणि मधुवनाचा विध्वंस झालेला पाहून त्यांना धीर देण्याकरितां तो ह्मणाला १९ "चला या, आपण तिकडे जाऊं. अतिशय चढून जाऊन अनुपम मध प्राशन करीत असलेल्या त्या

मम् २० श्रुत्वा दधिमुखस्येदं वचनं वानरर्षभाः। पुनर्वीरा मधुवनं तेनैव
सहिता ययुः २१ मध्ये चैषां दधिमुखः सुप्रगृह्य महातरुम्। समभ्यधाव-
द्वेगेन सर्वे ते च प्लवङ्गमाः २२ ते शिलाः पादपांश्चैव पाषाणानपि
वानराः। गृहीत्वाभ्यागमन्क्रुद्धा यत्र ते कपिकुञ्जराः २३ बलान्निवार-
यन्तश्च आसेदुर्हरयो हरीन्। संदष्टोष्ठपुटाः क्रुद्धा भर्त्सयन्तो मुहुर्मुहुः २४
अथ दृष्ट्वा दधिमुखं क्रुद्धं वानरपुङ्गवाः। अभ्यधावन्त वेगेन हनुमत्प्रमु-
खास्तदा २५ सवृक्षं तं महाबाहुमापतन्तं महाबलम्। वेगवन्तं विजग्राह
बाहुभ्यां कुपितोऽङ्गदः २६ मदान्धो न कृपां चक्रे आर्यकोऽयं ममेति सः।
अथैनं निष्पिपेषाशु वेगेन वसुधातले २७ स भग्नबाहूरुमुखो विह्वलः
शोणितोक्षितः। प्रमुमोह महावीरो मुहूर्तं कपिकुञ्जरः २८ स कथंचि-
द्विमुक्तस्तैर्वानरैर्वानरर्षभः। उवाचैकान्तमागत्य स्वान्भृत्यान्समुपाग-
तान् २९ एतागच्छत गच्छामो भर्ता नो यत्र वानरः। सुग्रीवो विपुलग्रीवः

---

वानरांचें मी स्वतःच आपल्या सामर्थ्यानें निवारण करीन" २०. हें दधिमुखाचें भाषण श्रवण केल्यावर ते वीर वानरश्रेष्ठ पुनरपि त्याच्याच बरोबर मधुवनामध्यें गेले २१; दधिमुख त्यांच्यामध्यें राहून व एक महावृक्ष हातांत घेऊन वेगानें तिकडे धांवूं लागला व त्याच्याबरोबर ते सर्वही वानर धांवूं लागले २२. ते वानरश्रेष्ठ जिकडे अवाडाव करीत होते तिकडे हे दधिमुखाबरोबर असलेले वानर शिळा, वृक्ष आणि पाषाण घेऊन रागा-रागानें गेले २३; आणि आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें निवारण करण्याकरितां तेथील वानरांच्या समीप येऊन पोंचल्यावर रागानें दांत ओठ खाऊन वारंवार त्यांची निर्भ-र्त्सना करूं लागले २४. तदनंतर क्रुद्ध झालेल्या दधिमुखाला अवलोकन करून हनु-मत्प्रभृति वानरश्रेष्ठ वेगानें त्याच्या अंगावर धांवून गेले २५. तो महाबलाढ्य व महा-पराक्रमी वेगवान् दधिमुख वृक्ष घेऊन अंगावर येऊं लागला असतां क्रुद्ध झालेल्या अंगदानें हातांनींच त्याला आवळून धरिलें २६. इतकेंच नव्हे परंतु, मदांध झाल्या-मुळें "हा मला पूज्य आहे" असा विचार मनामध्यें न आल्या कारणानें त्याच्यावर दया न करितां अंगदानें त्याला वेगानें एकदम भूतलावर हपटून टाकिलें २७. तेव्हां हात, पाय व मुख हीं भग्न होऊन रक्तानें भरून गेलेला तो वानरश्रेष्ठ महावीर दधि-मुख विह्वल झाला आणि एक मुहूर्तपर्यंत त्याला मूर्च्छाही आली २८. नंतर कसा तरी त्या वानरांच्या हातून सुटल्यावर, तो वानरश्रेष्ठ दधिमुख एकीकडे येऊन जवळ आलेल्या आपल्या सेवकांना ह्मणाला २९ "चला या, विशाल कंठानें युक्त असलेला 'आपला अधिपति' सुग्रीव वानर रामासह-

सह रामेण तिष्ठति ३० सर्वं चैवाङ्गदे दोषं श्रावयिष्याम पार्थिवे ।
अमर्षी वचनं श्रुत्वा घातयिष्यति वानरान् ३१ इष्टं मधुवनं ह्येतत्सुग्रीवस्य
महात्मनः । पितृपैतामहं दिव्यं देवैरपि दुरासदम् ३२ स वानरानिमान्स-
र्वान्मधुलुब्धान्गतायुषः । घातयिष्यति दण्डेन सुग्रीवःससुहृज्जनान् ३३
बद्ध्वा ह्येते दुरात्मानो नृपाज्ञापरिपन्थिनः । अमर्षप्रभवो रोषः सफलो मे
भविष्यति ३४ एवमुक्त्वा दधिमुखो वनपालान्महाबलः । जगाम सहसो-
त्पत्य वनपालैः समन्वितः ३५ निमेषान्तरमात्रेण स हि प्राप्तो वनालयः ।
सहस्रांशुसुतो धीमान्सुग्रीवो यत्र वानरः ३६ रामं च लक्ष्मणं चैव दृष्ट्वा
सुग्रीवमेव च । समप्रतिष्ठां जगतीमाकाशान्निपपात ह ३७ स निपत्य महा-
वीरः सर्वैस्तैः परिवारितः । हरिर्दधिमुखः पालैः पालानां परमेश्वरः ३८
स दीनवदनो भूत्वा कृत्वा शिरसि चाञ्जलिम् । सुग्रीवस्याशु तौ मूर्ध्ना
चरणौ प्रत्यपीडयत् ३९ [ २६६४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय
आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ६२ ॥
ततो मूर्ध्ना निपतितं वानरं वानरर्षभः । दृष्ट्वैवोद्विग्नहृदयो वाक्यमेतदुवाच

वर्तमान जिकडे आहे तिकडे आपण जाऊं ३० आणि हा सर्व अंगदाचा दोष आहे असें आपण राजाला सांगूं. म्हणजे हें भाषण ऐकून तो रागीट सुग्रीव वानरांचा वध करील ३१. कारण, देवांनाही मिळण्यास अशक्य असें हें वाडवडिलांपासून चालत आलेलें दिव्य मधुवन महात्म्या सुग्रीवाला प्रिय आहे ३२. ह्यास्तव, तो वानर सुहृज्जनांसहवर्तमान ह्या सर्वही आसन्नमरण झालेल्या मधुलुब्ध वानरांना बांधून मृत्यूची शिक्षा देईल आणि असें झालें म्हणजे असहिष्णुतेमुळें उत्पन्न झालेला माझा क्रोध सफल होईल. कारण, हे दुरात्मे राजाज्ञा अमान्य करणारे आहेत " ३३,३४. ह्याप्रमाणें वनपालांना सांगितल्यावर तो महाबलाढ्य दधिमुख वनपालांसहवर्तमान एकदम उड्डाण करून चालता झाला ३५; एका निमेषामध्यें तो दधिमुख वनचर सूर्यपुत्र विचारी सुग्रीव वानर जिकडे बसला होता तिकडे गेला ३६. आणि राम, लक्ष्मण व सुग्रीव ह्यांना अवलोकन केल्यानंतर सपाट भूमीवर तो आकाशांतून खालीं उतरला ३७. त्या सर्व वनपाल वानरांनीं परिवेष्टित असलेला तो वनपालाधिपति महावीर दधिमुख वानर आकाशांतून खालीं उतरला ३८; दीन वदन होऊन त्यानें मस्तकीं हात जोडिले आणि सुग्रीवाच्या चरणांवर त्यानें सत्वर मस्तक ठेविलें ३९. ह्याप्रमाणें महामुनि-वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

६ १ उत्तिष्ठोत्तिष्ठ कस्मात्त्वं पादयोः पतितो मम । अभयं ते प्रदा-
स्यामि सत्यमेवाभिधीयताम् २ किं संभ्रमाद्धितं कृत्स्नं ब्रूहि यद्वक्तु-
मर्हसि । कच्चिन्मधुवने स्वस्ति श्रोतुमिच्छामि वानर ३ स समाश्वासित-
स्तेन सुग्रीवेण महात्मना । उत्थाय स महाप्राज्ञो वाक्यं दधिमुखोऽब्र-
वीत् ४ नैवर्क्षरजसा राजन्न त्वया न च वालिना । वनं निसृष्टपूर्वं ते
नाशितं तत्तु वानरैः ५ न्यवारयमहं सर्वान्सहैभिर्वनचारिभिः । अचिन्त-
यित्वा मां हृष्टा भक्षयन्ति पिबन्ति च ६ एभिः प्रधर्षणायां च वारितं
वनपालकैः । मामप्यचिन्तयन्देव भक्षयन्ति वनौकसः ७ शिष्टमत्रापवि-
ध्यन्ति भक्षयन्ति तथापरे । निवार्यमाणास्ते सर्वे भ्रुकुटिं दर्शयन्ति हि ८ इमे
हि संरब्धतरास्तदा तैः संप्रधर्षिताः । निवार्यन्ते वनात्तस्मात्क्रुद्धैर्वानरपुङ्गवैः ९
ततस्तैर्बहुभिर्वीरैर्वानरैर्वानरर्षभाः संरक्तनयनैः क्रोधाद्धरयः संप्रधर्षिताः १०

---

तदनंतर चरणीं मस्तक ठेविलेल्या दधिमुख वानराला अवलोकन करितांक्षणीं वानरश्रेष्ठ सुग्रीवाचें हृदय उद्विग्न झालें व तो त्याला ह्मणाला १ "ऊठ, ऊठ; तूं कशाकरितां माझ्या पायां पडला आहेस? जें सत्य असेल तें सांग; ह्मणजे मी तुला अभय देईन २. कसल्या भीतीमुळें तूं येथें आला आहेस ? हितावह असें जें कांहीं असेल तें सर्व तूं मला सांग. हे वानरा, तुझ्यापासून तिकडील हकीकत श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. मधुवनामध्यें सर्व यथास्थित आहे नां ? ३. ह्याप्रमाणें त्या महात्म्या सुग्रीवानें आश्वासन दिल्यावर तो महाबुद्धिमान् दधिमुख उठला आणि ह्मणाला ४ "हे राजा, जांबवानानें, आपण अथवा वालीनें वानरांना यथेच्छ उपभोग घेण्याकरितां आजपर्यंत मधुवन कधींही देऊन टाकिलेलें नाहीं; परंतु, त्या वनाचा आज वानरांनीं विध्वंस केला ५. ह्या वनचरांसहवर्तमान मीं त्या सर्वांचें निवारण केलें; परंतु, मला न जुमानितां ते आनंदानें मध प्राशन करीत आहेत व फलें भक्षण करीत आहेत ६. ह्याप्रमाणें त्यांनीं विध्वंस आरंभिला असतां वनपालांनीं त्यांचें निवारण केलें; परंतु, माझीही खिजगणती न करितां, हे राजा, त्या वानरांनीं खाण्याचा सपाटा चालविलाच आहे ७. खाऊन अवशिष्ट राहिलेला मध कांहीं फेंकून देत आहेत; कांहीं फलें भक्षण करीत आहेत आणि कोणी आडकाठी करूं लागला असतां ते सर्वही क्रोधानें आपल्या भिवया चढवून दाखवीत आहेत ८. ह्या वनपालांनीं त्यांचें निवारण करण्याची अगदीं शिकस्त केली आणि त्यांनीं ह्यांच्यावर हल्ला केला असतां हे क्रुद्ध वानरश्रेष्ठ त्यांना त्या वनांतून हाकूनही देऊं लागले ९. परंतु, क्रोधानें ज्यांचे नेत्र आरक्तवर्ण झालेले आहेत अशा त्या असंख्य वीर वानरांनीं वनरक्षक वानरश्रेष्ठांचा पराभव केला १०.

पाणिभिर्निहताः केचित्केचिज्जानुभिराहताः । प्रकृष्टाश्च तदा कामं देव-
मार्गं च दर्शिताः ११ एवमेते हताः शूरास्त्वयि तिष्ठति भर्तरि । कृत्स्नं
मधुवनं चैव प्रकामं तैश्च भक्ष्यते १२ एवं विज्ञाप्यमानं तं सुग्रीवं वान-
रर्षभम् । अपृच्छत्तं महाप्राज्ञो लक्ष्मणः परवीरहा १३ किमयं वानरो
राजन्वनपः प्रत्युपस्थितः । किं चार्थमभिनिर्दिश्य दुःखितो वाक्यमब्र-
वीत् १४ एवमुक्तस्तु सुग्रीवो लक्ष्मणेन महात्मना । लक्ष्मणं प्रत्युवाचेदं
वाक्यं वाक्यविशारदः १५ आर्य लक्ष्मण संप्राह वीरो दधिमुखः कपिः ।
अङ्गदप्रमुखैर्वीरैर्भक्षितं मधु वानरैः १६ नैषामकृतकार्याणामीदृशः
स्याद्व्यतिक्रमः । वनं यदभिपन्नास्ते साधितं कर्म तद्ध्रुवम् १७ वारयन्तो
भृशं प्राप्ताः पाला जानुभिराहताः । तथा न गणितश्चायं कपिर्दधिमुखो
बली १८ पतिर्मम वनस्यायमस्माभिः स्थापितः स्वयम् । दृष्टा देवी न
संदेहो न चान्येन हनूमता १९ न ह्यन्यः साधने हेतुः कर्मणोस्य हनूमतः ।

---

कांहींना चपराका बसल्या; कांहींना जानूंचे प्रहार झाले; कांहींना त्यांनीं फरफर ओढीत नेलें आणि कांहींना ( आकाशामध्यें यथेष्ट फेंकून देऊन ) देव मार्गाचेंही त्यांनीं दर्शन करविलें ११. सारांश, आपण अधिपति विद्यमान असतांना ह्याप्रमाणें ह्या शूरांना मार बसला आहे आणि सर्व मधुवन ते यथेष्ट भक्षण करीत आहेत " १२. ह्याप्रमाणें दधिमुख त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाला सांगूं लागला असतां शत्रुवीरनाशक महाबुद्धिमान् लक्ष्मण सुग्रीवाला विचारूं लागला १३ " हे राजा, हा वनपाल वानर कशाकरितां येथें आला आहे ? आणि कशाकारितां हा दुःखित होऊन भाषण करीत आहे ? " १४. ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें सुग्रीवाला विचारिलें असतां संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला तो सुग्रीव लक्ष्मणाला म्हणाला १५ " आर्या लक्ष्मणा, अंगदप्रभृति वीरवानरांनीं मध भक्षण करून टाकिल्याचें वीर दधिमुखवानरानें सांगितलें १६. तस्मात्, कार्यसिद्धि झाल्यावांचून त्यांच्या हातून असा अतिक्रम होणार नाहीं. त्यांनीं ज्याअर्थी वनावर धाड घातली आहे त्याअर्थी हातीं घेतलेलें तें कार्य त्यांनीं निःसंशय पार पाडिलें आहे १७. अहो, निवारण करण्याकरितां हे वनपाल त्यांच्याकडे गेले असतां त्यांनीं ह्यांना जानूंनीं अतिशयच ताडण केलें आणि ह्या बलाढ्य दधिमुख वानरालाही त्यांनीं जुमानिलें नाहीं १८. आम्हीं स्वतः वनाचा अधिपति म्हणून ह्याला नेमिलें आहे. असो. तेव्हां सीता देवी दृष्टीं पडली ह्यांत संदेहच नाहीं. परंतु, हनुमानावांचून ती दुसऱ्या कोणाच्या दृष्टीं पडली नाहीं १९. कारण, हें कार्य सिद्धीस नेण्यासारिखा हनुमानावांचून

कार्यसिद्धिर्हनुमति मतिश्च हरिपुङ्गवे २० व्यवसायश्च वीर्यं च श्रुतं चापि प्रतिष्ठितम् । जाम्बवान्यत्र नेता स्यादङ्गदश्च महाबलः २१ हनूमांश्चाप्यधिष्ठाता न तत्र मतिरन्यथा । अङ्गदप्रमुखैर्वीरैर्हतं मधुवनं किल २२ विचित्य दक्षिणामाशामागतैर्हरिपुङ्गवैः । आगतैश्च प्रहृष्टं तद्यथा मधुवनं हि तैः २३ धर्षितं च वनं कृत्स्नमुपयुक्तं तु वानरैः । पातिता वनपालास्ते तदा जानुभिराहताः २४ एतदर्थमयं प्राप्तो वक्तुं मधुरवागिह । नाम्ना दधिमुखो नाम हरिः प्रख्यातविक्रमः २५ दृष्टा सीता महाबाहो सौमित्रे पश्य तत्त्वतः । अभिगम्य यथा सर्वे पिबन्ति मधु वानराः २६ न चाप्यदृष्ट्वा वैदेहीं विश्रुताः पुरुषर्षभ । वनं दत्तवरं दिव्यं धर्षयेयुर्वनौकसः २७ ततः प्रहृष्टो धर्मात्मा लक्ष्मणः सहराघवः । श्रुत्वा कर्णसुखां वाणीं सुग्रीववदनाच्च्युताम् ॥ प्राहृष्यत भृशं रामो लक्ष्मणश्च महायशाः २८ श्रुत्वा दधिमुखस्यैवं सुग्रीवस्तु प्रहृष्य च । वनपालं पुनर्वाक्यं सुग्रीवः प्रत्यभाषत २९ प्रीतोऽस्मि सोऽहं यद्भुक्तं वनं तैः कृतकर्मभिः । धर्षितं

---

दुसरा कोणीही नाहीं. वानरश्रेष्ठ हनुमानाचे ठिकाणीं कार्यसिद्धि, बुद्धि २०, उद्योग, सामर्थ्य आणि विद्या हें सर्व कांहीं आहे. जांबवान्, महाबलाढ्य अंगद २१ आणि हनुमान् हे जेथें पुढारी आहेत तेथें (कार्यसिद्धीवांचून) दुसरें कांहीं होणें शक्यच नाहीं. अंगदप्रभृति वीर वानरांनीं खरोखर मधुवनाचा फडशा पाडिला २२. दक्षिणदिशा शोधून ते वानरश्रेष्ठ परत आले आणि आनंदानें मधुवनामध्यें ते परत आल्यावर २३ त्यांनीं वनावर हल्ला करून तें सर्व खाऊनही टाकिलें. त्यांनीं वनपालांना फेंकून दिलें आणि त्यांना जानूंनींही प्रहार केले २४. हें सांगण्याकरितां हा मधुर भाषण करणारा व पराक्रमाविषयीं प्रख्यात असलेला दधिमुखनामक वानर येथें आला आहे २५. हे महापराक्रमी सुमित्रानंदना, सीता खरोखर दृष्टीं पडली. कारण, पहा हे सर्वही वानर इकडे येऊन मधुपान करीत आहेत २६. हे पुरुषश्रेष्ठा, प्रख्यात वानर वैदेही दृष्टीं पडल्यावांचून देवांनीं आह्मांला वर ह्मणून अर्पण केलेल्या ह्या दिव्य वनावर धाड घालणार नाहींत " २७. तदनंतर कर्णेंद्रियाला सुखावह अशी सुग्रीवाच्या मुखांतून निघालेली वाणी श्रवण करून रामासहवर्तमान धर्मात्म्या लक्ष्मणाला आनंद झाला आणि त्या उभयतां महाकीर्तिमान् रामलक्ष्मणांना अत्यंत हर्षही झाला २८. दधिमुखाचें ह्याप्रमाणें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीव आनंदित झाला आणि त्या वनपालाला पुनरपि ह्मणाला २९ " कामगिरी बजावलेल्या त्या वानरांनीं वन फस्त करून टाकिलें ह्याबद्दल मी प्रसन्न झालों आहें. कारण, काम करून आलेल्या वानरांचें तें अमर्याद

मर्षणीयं च चेष्टितं कृतकर्मणाम् ३० गच्छ शीघ्रं मधुवनं संरक्षस्व त्वमेव हि । शीघ्रं प्रेषय सर्वांस्तान्हनूमत्प्रमुखान्कपीन् ३१ इच्छामि शीघ्रं हनुमत्प्रधानाञ्शाखामृगांस्तान्मृगराजदर्पान् । प्रष्टुं कृतार्थान्सह राघवाभ्यां श्रोतुं च सीताधिगमे प्रयत्नम् ३२ प्रीतिस्फीताक्षौ संप्रहृष्टौ कुमारौ दृष्ट्वा सिद्धार्थौ वानराणां च राजा । अङ्गैः प्रहृष्टैः कार्यसिद्धिं विदित्वा बाह्वोरासन्नामतिमात्रं ननन्द ३३ [ २६९७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

सुग्रीवेणैवमुक्तस्तु हृष्टो दधिमुखः कपिः । राघवं लक्ष्मणं चैव सुग्रीवं चाभ्यवादयत् १ स प्रणम्य च सुग्रीवं राघवौ च महाबलौ । वानरैः सहितः शूरैर्दिवमेवोत्पपात ह २ स यथैवागतः पूर्वं तथैव त्वरितं गतः । निपत्य गगनाद्भूमौ तद्वनं प्रविवेश ह ३ स प्रविष्टो मधुवनं ददर्श हरियूथपान् । विमदानुद्धतान्सर्वान्मेहमानान्मधूदकम् ४ स तानुपागमद्वीरो बद्ध्वा करपुटाञ्जलिम् । उवाच वचनं श्लक्ष्णमिदं हृष्टवदङ्गदम् ५ सौम्य

---

वर्तन सहन करणें भाग आहे ३०. ह्यास्तव, तूं सत्वर जा; तूंच मधुवनाचें संरक्षण कर आणि हनुमान् आदिकरून आलेल्या त्या सर्व वानरांना तूं लवकर इकडे पाठवून दे ३१. त्या सिंहतुल्य मानी असलेल्या मारुतिप्रभृति कृतकृत्य वानरांना रघुवंशज रामलक्ष्मणांसहवर्तमान सत्वर प्रश्न करण्याची आणि सीतेच्या प्राप्तीविषयीं त्यांनीं केलेला प्रयत्न श्रवण करण्याची माझी इच्छा आहे " ३२. आनंदानें ज्यांचे नेत्र विकसित झाले आहेत असे राजकुमार रामलक्ष्मण मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणें आनंदित झालेले पाहून आणि आपल्या शरीरावर आनंदानें उठलेल्या रोमांचांवरून कार्यसिद्धि अगदीं जवळच आल्याचें जाणून वानरराज सुग्रीवाला अतिशय हर्ष झाला ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

सुग्रीवानें असें सांगितल्यानंतर आनंदित झालेल्या दधिमुख वानरानें राम, लक्ष्मण व सुग्रीव ह्यांना अभिवंदन केलें १ आणि ह्याप्रमाणें महाबलाढ्य रामलक्ष्मणांना व सुग्रीवाला अभिवंदन केल्यावर त्या दधिमुखानें शूरवानरांसहवर्तमान आकाशामध्येंच उड्डाण केलें २. जशा त्वरेनें तो पूर्वी आला होता तशाच त्वरेनें परत गेला आणि गगनांतून भूमीवर उतरून त्या वनामध्यें प्रविष्ट झाला ३. मधुवनामध्यें प्रविष्ट झाल्यावर ते सर्वही वानरसेनाधिपति अमर्याद व मदरहित असून मधच मुतत असल्याचें त्यानें अवलोकन केलें ४. नंतर तो वीर त्यांच्याजवळ गेला आणि हात जोडून आनंदानें अंगदाशीं असें

रोषो न कर्तव्यो यदेभिः परिवारणम् । अज्ञानाद्रक्षिभिः क्रोधाद्भवन्तः प्रतिषेधिताः ६ श्रान्तो दूरादनुप्राप्तो भक्षयस्व स्वकं मधु । युवराजस्त्वमीशश्च वनस्यास्य महाबल ७ मौर्ख्यात्पूर्वं कृतो रोषस्तद्भवान्क्षन्तुमर्हति। यथैव हि पिता ते पूर्वं हरिगणेश्वरः ८ तथा त्वमपि सुग्रीवो नान्यस्तु हरिसत्तम । आख्यातं हि मया गत्वा पितृव्यस्य तवानघ ९ इहोपयानं सर्वेषामेतेषां वनचारिणाम् । भवदागमनं श्रुत्वा सहैभिर्वनचारिभिः १० प्रहृष्टो न तु रुष्टोसौ वनं श्रुत्वा प्रधर्षितम् । प्रहृष्टो मां पितृव्यस्ते सुग्रीवो वानरेश्वरः ११ शीघ्रं प्रेषय सर्वांस्तानिति होवाच पार्थिवः । श्रुत्वा दधिमुखस्यैतद्वचनं श्लक्ष्णमङ्गदः १२ अब्रवीत्तान्हरिश्रेष्ठो वाक्यं वाक्यविशारदः । शङ्के श्रुतोयं वृत्तान्तो रामेण हरियूथपाः १३ अयं च हर्षादाख्याति तेन जानामि हेतुना । तत्क्षमं नेह नः स्थातुं कृते कार्ये परन्तपाः १४ पीत्वा मधु यथाकामं विक्रान्ता वनचारिणः । किं शेषं गमनं

---

मृदु भाषण करूं लागला कीं ५ " हे सौम्य, ह्यानीं तुह्मांला अडथळा केला ह्याबद्दल तुह्मीं राग मानूं नका. अज्ञानामुळें वनरक्षकांनीं तुह्मांला निषेध केला आहे ६. हे महाबलाढ्य अंगदा, लांबून आल्यामुळें तूं श्रांत झाला आहेस. ह्यास्तव, स्वतःचा मध तूं भक्षण कर. कारण, तूं युवराज असल्यामुळें ह्या वनाचा अधिपतिच आहेस ७. मूर्खपणामुळें पूर्वीं आह्मीं तुमच्यावर राग केला त्याची तूं आह्मांला क्षमा कर. पूर्वीं ज्याप्रमाणें तुझा पिता वानरसमुदायांचा अधिपति होता ८ तसा तूंही वानरसमुदायांचा अधिपतिच आहेस. हे वानरश्रेष्ठा, तूं सुग्रीवच आहेस; कोणी परका नाहींस. हे निष्पापा अंगदा, मीं तुझ्या पितृव्याकडे जाऊन हे सर्व वानर येथें आल्याचें त्याला सांगितलें असतां ह्या वानरांसहवर्तमान तुझें आगमन झाल्याचें श्रवण करून ९,१० तो रुष्ट न होता हर्षयुक्तच झालेला आहे. वनाची तुह्मीं नासाडी केल्याचें श्रवण केल्यावरही तुझा पितृव्य वानराधिपति राजा सुग्रीव आनंदित होऊन मला ह्मणाला " त्यां सर्वांना इकडे पाठवून दे ". दधिमुखाचें हें मधुर भाषण श्रवण केल्यावर संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला तो वानरश्रेष्ठ अंगद त्या वानरांना ह्मणाला " हे वानरसेनाधिपतींनों, रामाच्याही कानावर हा वृत्तांत गेला असावा अशी मला शंका वाटत आहे ११,१२,१३. कारण, हा दधिमुख हर्षानें असें आपल्याशीं बोलत आहे ह्यावरून असें माझें अनुमान आहे. ह्यास्तव, हे शत्रुतापन वानरहो, कार्यसिद्धि झाल्यावर येथें राहणें आपणांला योग्य नाहीं १४. पराक्रमी वानरांनीं यथेष्ट मधुपान केल्यानंतर मग शिलक काय राहिलें?

तत्र सुग्रीवो यत्र वानरः १५ सर्वे यथा मां वक्ष्यन्ति समेत्य हरिपुङ्गवाः । तथास्मि कर्ता कर्तव्ये भवद्भिः परवानहम् १६ नाज्ञापयितुमीशोहं युवराजोस्मि यद्यपि । अयुक्तं कृतकर्माणो यूयं धर्षयितुं बलात् १७ ब्रुवतश्चाङ्गदस्यैवं श्रुत्वा वचनमुत्तमम् । प्रहृष्टमनसो वाक्यमिदमूचुर्वनौकसः १८ एवं वक्ष्यति को राजन्प्रभुः सन्वानरर्षभ । ऐश्वर्यमदमत्तो हि सर्वोहमिति मन्यते १९ तव चेदं सुसदृशं वाक्यं नान्यस्य कस्यचित् । सन्नतिर्हि तवाख्याति भविष्यच्छुभयोग्यताम् २० सर्वे वयमपि प्राप्तास्तत्र गन्तुं कृतक्षणाः । स यत्र हरिवीराणां सुग्रीवः पतिरव्ययः २१ त्वया ह्यनुक्तैर्हरिभिर्नैव शक्यं पदात्पदम् । क्वचिद्गन्तुं हरिश्रेष्ठ ब्रूमः सत्यमिदं तु ते २२ एवं तु वदतां तेषामङ्गदः प्रत्यभाषत । साधु गच्छाम इत्युक्त्वा खमुत्पेतुर्महाबलाः २३ उत्पतन्तमनूत्पेतुः सर्वे ते हरियूथपाः । कृत्वाकाशं निराकाशं यन्त्रोत्क्षिप्ता इवोपलाः २४ अङ्गदं पुरतः कृत्वा हनूमन्तं च वानरम् । तेम्बरं सहसोत्पत्य वेगवन्तः प्लवङ्गमाः २५ विनदन्तो महानादं

---

सुग्रीव वानर जिकडे आहे तिकडे जाणें एवढेंच आतां अवशिष्ट कार्य राहिलेलें आहे १५. सर्व वानरश्रेष्ठ एकत्र जुळून जसें मला सांगतील तसें मी करीन. कारण, पुढें काय करावयाचें ह्याविषयीं मी तुमच्यावर अवलंबून आहें १६. मी जरी युवराज आहें तरी तुह्मांला आज्ञा करण्यास समर्थ नाहीं. काम शेवटास नेलेल्या तुह्मांला सत्तेच्या जोरावर वांकविणें योग्य नाहीं " १७. अशाप्रकारें बोलत असलेल्या अंगदाचें ह्याप्रमाणें उत्कृष्ट भाषण श्रवण करून वानर मनामध्यें आनंदित झाले आणि ह्मणाले १८ " हे वानरश्रेष्ठा राजा, प्रभु असतांना असें कोण बरें ह्मणणारा आहे ? कोणीही झाला तरी ऐश्वर्यमदानें मत्त होऊन मी मीच ह्मणत असतो १९. हें भाषण तुलाच योग्य आहे, दुसऱ्या कोणालाही योग्य नाहीं. तुझा हा विनयच पुढें तुला मोठी योग्यता प्राप्त होण्याचें सुचवीत आहे २०. जेथें तो वानरवीरांचा अक्षय अधिपति सुग्रीव आहे तेथें जाण्याविषयीं आह्मीही सर्व येथें आलेले उत्सुक आहोंत २१. हे वानरश्रेष्ठा, तुझ्या आज्ञेवांचून कोठेंही एक पाऊल देखील टाकण्यास वानर समर्थ नाहीत, हें आह्मी तुला सत्य सांगतों " २२. ह्याप्रमाणें ते बोलत असतांना अंगदानेंही त्यांना उत्तर दिलें आणि नंतर " ठीक आहे, आपण तिकडे जाऊं " असें ह्मणून त्या महाबलाढ्य वानरांनीं आकाशामध्यें उड्डाण केलें २३. अंगद उड्डाण करून जाऊं लागला असतां ते सर्वही वानरसेनाधिपति आकाश व्याप्त करून तोफेंतून सुटलेल्या पाषाणाप्रमाणें सत्वर उड्डाण करून निघाले २४. अंगद

घना वातेरिता यथा । अङ्गदे समनुप्राप्ते सुग्रीवो वानरेश्वरः २६ उवाच शोकसंतप्तं रामं कमललोचनम् । समाश्वसिहि भद्रं ते दृष्टा देवी न संशयः २७ नागन्तुमिह शक्यं तैरतीतसमयैरिह । अङ्गदस्य प्रहर्षाच्च जानामि शुभदर्शन २८ न मत्सकाशमागच्छेत्कृत्ये हि विनिपातिते । युवराजो महाबाहुः प्लवतामङ्गदो वरः २९ यद्यप्यकृतकृत्यानामीदृशः स्यादुपक्रमः । भवेत्तु दीनवदनो भ्रान्तविप्लुतमानसः ३० पितृपैतामहं चैतत्पूर्वकैरभिरक्षितम् । न मे मधुवनं हन्यादहृष्ट्वा जनकात्मजाम् ३१ कौसल्या सुप्रजा राम समाश्वसिहि सुव्रत । दृष्टा देवी न संदेहो न चान्येन हनूमता ३२ न ह्यस्य कर्मणो हेतुः साधने तद्विधो भवेत् । हनूमतीह सिद्धिश्च मतिश्च मतिसत्तम ३३ व्यवसायश्च शौर्यं च श्रुतं चापि प्रतिष्ठितम् । जाम्बवान्यत्र नेता स्यादङ्गदश्च हरीश्वरः ३४ हनूमांश्चाप्यधिष्ठाता

---

आणि हनुमान् वानर ह्यांना पुढें करून त्या वेगवान् वानरांनीं आकाशामध्यें एकदम उड्डाण केलें २५ आणि वायूचा तडाका बसलेल्या मेघाप्रमाणें ते उच्च स्वरानें गर्जना करूं लागले. नंतर अंगद आल्यावर वानराधिपति सुग्रीव २६ शोकाकुल झालेल्या, कमलनयन रामाला ह्मणाला " तुझें कल्याण असो; धीर धर. दृष्टीं पडली देवी ह्यांत संशय नाहीं २७. कालमर्यादेचें उल्लंघन झालें असल्यामुळें त्यांच्या हातून जर कार्य झालें नसतें तर त्यांचें येथें येणेंच शक्य झालें नसतें. परंतु, हे शुभदर्शना, अंगदाला झालेल्या आनंदावरून कार्य शेवटास गेलें असावें असें माझें अनुमान आहे २८. कारण, वानरांमध्यें श्रेष्ठ असलेला हा महापराक्रमी युवराज अंगद कार्य शेवटास गेलें नसतांना माझ्या समीप येणार नाहीं २९. 'हातून कार्यसिद्धि झाली नसतांनाही इतर वानरांनीं कदाचित् अशा प्रकारचे चाळे आरंभिले असते; परंतु, अंगद तर दीनवदन होऊन मनामध्यें अगदीं गोंधळून गेला असता ३०. वाडवडिलांपासून चालत आलेल्या आणि पूर्वजांनीं रक्षण करून ठेविलेल्या ह्या मधुवनाचा, जनककन्या दृष्टीं पडल्याशिवाय तो नाश करणारच नाहीं ३१. हे सुव्रता रामा, कौसल्या सुपुत्रवती आहे. तूं धीर धर. दृष्टीं पडली देवी ह्यांत संशयच नाहीं; आणि ती एका हनुमानाच्याच दृष्टीं पडली आहे ह्यांतही संदेह नाहीं ३२. हें कार्य सिद्धीस नेणारा त्याच्यासारिखा दुसरा कोणीही नाहीं. हे श्रेष्ठ बुद्धिमाना, ह्या वानरसैन्यामध्यें हनुमानाचेच ठिकाणीं बुद्धि, सिद्धि ३३, उद्योग, शौर्य आणि ज्ञान हीं वास्तव्य करीत आहेत. अरे, जांबवान् आणि वानराधिपति अंगद हे जेथें पुढारी आहेत ३४ आणि

न तत्र गतिरन्यथा । मा भूश्चिन्तासमायुक्तः संप्रत्यमितविक्रम ३५ यदा हि दर्पितोदग्राः संगताः काननौकसः । नैषामकृतकार्याणामीदृशः स्यादुपक्रमः ३६ वनभङ्गेन जानामि मधूनां भक्षणेन च । ततः किलकिलाशब्दं शुश्रावासन्नमम्बरे ३७ हनूमत्कर्मदृप्तानां नदतां काननौकसाम् । किष्किन्धामुपयातानां सिद्धिं कथयतामिव ३८ ततः श्रुत्वा निनादं तं कपीनां कपिसत्तमः । आयताञ्चितलाङ्गूलः सोभवद्धृष्टमानसः ३९ आजग्मुस्तेपि हरयो रामदर्शनकाङ्क्षिणः । अङ्गदं पुरतः कृत्वा हनूमन्तं च वानरम् ४० तेऽङ्गदप्रमुखा वीराः प्रहृष्टाश्च मदान्विताः । निपेतुर्हरिराजस्य समीपे राघवस्य च ४१ हनूमांश्च महाबाहुः प्रणम्य शिरसा ततः । नियतामक्षतां देवीं राघवाय न्यवेदयत् ४२ दृष्टा देवीति हनूमद्वदनादमृतोपमम् । आकर्ण्य वचनं रामो हर्षमाप सलक्ष्मणः ४३ निश्चितार्थं ततस्तस्मिन्सुग्रीवं पवनात्मजे । लक्ष्मणः प्रीतिमान्प्रीतो बहुमानादवैक्षत ४४ प्रीत्या च परमोपेतो राघवः परवीरहा । बहुमानेन महता

हनुमान् जेथें मुख्य आहे तेथें कार्यसिद्धीवांचून भलताच प्रकार कधींही व्हावयाचा नाहीं. वास्तव, हे अतुलपराक्रमी रामा, सांप्रत तुला काळजी करण्याचें प्रयोजन नाहीं ३५. ज्याअर्थी वानर गर्वानें चढून एकत्र जुळलेले आहेत त्याअर्थी कार्यसिद्धि झाल्याशिवाय त्यांच्या हातून असा प्रकार कधीं घडणार नाहीं ३६. वनभंग आणि मधुभक्षण ह्यांवरून कार्यसिद्धि झाली असावी असें मी समजत आहें " ३७. इतक्यांत हनुमानाच्या पराक्रमामुळें गर्वयुक्त झालेल्या आणि कार्यसिद्धि झाली हें समजाविण्याकरितांच कीं काय गर्जना करीत करीत किष्किंधेजवळ आलेल्या अरण्यवासी ३८ वानरांचा शब्द श्रवण केल्याबरोबर सुग्रीव मनामध्यें आनंदित झाला आणि त्याचें पुच्छ दीर्घ व रोमांचयुक्त झालें ३९. इतक्यांत अंगद आणि हनुमान् वानर ह्यांना पुढें करून रामदर्शनाकरितां ते कपिही आले ४०. ते अंगदप्रभृति बेफाम व आनंदित झालेले वीर वानरराज सुग्रीव आणि राघव ह्यांच्याजवळ येऊन पोंचल्यावर ४१ महापराक्रमी हनुमानानें मस्तकानें प्रणाम करून सीतादेवी शुद्ध आणि क्षतरहित असल्याचें रामाला निवेदन केलें ४२. " दृष्टी पडली देवी " हें अमृततुल्य वाक्य हनुमानाच्या मुखांतून श्रवण करितांक्षणीं लक्ष्मणासहवर्तमान रामाला हर्ष झाला ४३. तदनंतर त्या वायुपुत्र हनुमानाविषयीं ज्यानें निश्चयपूर्वक सांगितलें होतें त्या सुग्रीवाकडे आनंदित झालेल्या लक्ष्मणानें बहुमानानें प्रेमपूर्वक अवलोकन केलें ४४; आणि शत्रुपक्षीयवीरनाशक रामही अतिशय संतुष्ट होऊन मोठ्या

हनूमन्तमवैक्षत ४५ [२७४२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥ ६४ ॥

ततः प्रस्रवणं शैलं ते गत्वा चित्रकाननम्। प्रणम्य शिरसा रामं लक्ष्मणं च महाबलम् १ युवराजं पुरस्कृत्य सुग्रीवमभिवाद्य च। प्रवृत्तिमथ सीताया प्रवक्तुमुपचक्रमे २ रावणान्तःपुरे रोधं राक्षसीभिश्च तर्जनम्। रामे समनुरागं च यथा च नियमः कृतः ३ एतदाख्याय ते सर्वं हरयो रामसंनिधौ। वैदेहीमक्षतां श्रुत्वा रामस्तूत्तरमब्रवीत् ४ क सीता वर्तते देवी कथं च मयि वर्तते। एतन्मे सर्वमाख्यात वैदेहीं प्रति वानराः ५ रामस्य गदितं श्रुत्वा हरयो रामसंनिधौ। चोदयन्ति हनूमन्तं सीतावृत्तान्तकोविदम् ६ श्रुत्वा तु वचनं तेषां हनूमान्मारुतात्मजः। प्रणम्य शिरसा देव्यै सीतायै तां दिशं प्रति ७ उवाच वाक्यं वाक्यज्ञः सीताया दर्शनं यथा। तं मणिं काञ्चनं दिव्यं दीप्यमानं स्वतेजसा ८ दत्त्वा रामाय हनुमांस्ततः प्राञ्जलिरब्रवीत्। समुद्रं लङ्घयित्वाहं शतयोजनमायतम् ९ अगच्छं जानकीं

---

बहुमानानें हनुमानाकडे पाहूं लागला ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६४ ॥

तदनंतर चित्रविचित्र वनांनीं युक्त असलेल्या प्रस्रवणपर्वतावर जाऊन त्या वानरांनीं महाबलाढ्य रामलक्ष्मणांना मस्तकानें प्रणाम केला १ आणि युवराज अंगदाला पुढें करून व सुग्रीवाला अभिवंदन करून त्यांनीं सीतेचा वृतांत कथन करण्यास आरंभ केला २. रावणाच्या अंतःपुरामध्यें सीतेचा निरोध, राक्षसींकडून तिला मिळत असलेली धमकी, रामाचे ठिकाणीं असलेलें तिचें प्रेम आणि रावणानें केलेली मुदत ३ हें सर्व निवेदन करून ते वानर रामाचे संनिध उभे राहिले. तेव्हां सीता बिनधोक आहे असें ऐकून राम त्यांना म्हणाला ४ " हे वानरहो, सीता देवी आहे कोठें ? आणि माझ्याविषयीं तिचें आचरण कसें आहे ? हें सर्व सीतेसंबंधानें तुह्मी मला कथन करा ' ५ रामाचें भाषण श्रवण केल्यावर त्याचे संनिध असलेल्या वानरांनीं सीतेचा वृत्तांत जाणणाऱ्या हनुमानाला तो निवेदन करण्याची विनंति केली ६. तेव्हां त्यांची विनंति ऐकून घेऊन वायुपुत्र हनुमानानें प्रथम त्या दक्षिणदिशेकडे सीता देवीला मस्तकानें प्रणाम केला ७; आणि सीतेचें दर्शन कसें झालें ह्याविषयीं तो वक्ता हनुमान् रामाशीं संभाषण करूं लागला. प्रथमतः स्वतःच्या तेजानें झळकत असलेलें तें दिव्य सुवर्णयुक्त रत्न ८ रामाला दिल्यावर हनुमान् हात जोडून ह्मणाला " शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या समुद्राचें उल्लंघन करून मी ९ जनककन्या सीतेचें दर्शन घेण्याच्या उद्देशानें पहात पहात

सीतां मार्गमाणो दिदृक्षया । तत्र लङ्केति नगरी रावणस्य दुरात्मनः १०
दक्षिणस्य समुद्रस्य तीरे वसति दक्षिणे । तत्र सीता मया दृष्टा रावणा-
न्तःपुरे सती ११ त्वयि संन्यस्य जीवन्ती रामा राम मनोरथम् ।
दृष्टा मे राक्षसीमध्ये तर्ज्यमाना मुहुर्मुहुः १२ राक्षसीभिर्विरू-
पाभिः रक्षिता प्रमदावने । दुःखमापद्यते देवी त्वया वीर सुखो-
चिता १३ रावणान्तःपुरे रुद्धा राक्षसीभिः सुरक्षिता । एकवे-
णीधरा दीना त्वयि चिन्तापरायणा १४ अधःशय्या विवर्णाङ्गी पद्मि-
नीव हिमागमे । रावणाद्विनिवृत्तार्था मर्तव्यकृतनिश्चया १५ देवी कथं-
चित्काकुत्स्थ त्वन्मना मार्गिता मया । इक्ष्वाकुवंशविख्यातिं शनैः कीर्त-
यतानघ १६ सा मया नरशार्दूल शनैर्विश्वासिता तदा । ततः संभाषिता
देवी सर्वमर्थं च दर्शिता १७ रामसुग्रीवसख्यं च श्रुत्वा हर्षमुपागता ।
नियतः समुदाचारो भक्तिश्चास्याः सदा त्वयि १८ एवं मया महाभाग

तिच्यासमीप गेलों. त्या ठिकाणीं दुरात्म्या रावणाची समुद्राच्या दक्षिणतीरावर लंका ह्मणून एक नगरी आहे. तेथें रावणाच्या अंतःपुरांत साध्वी सीता माझ्या दृष्टीं पडली १०, ११. हे राम, ती सुंदरी सीता आपल्या मनोरथाचा भार तुझ्यावर ठेवून जिवंत राहिली आहे. मीं जेव्हां तिला पाहिलें तेव्हां ती राक्षसींमध्यें होती व तिला वारंवार त्या दटावीत होत्या १२. अक्राळविक्राळ राक्षसींनीं प्रमदावनामध्यें सीतेला बंदोबस्तांत ठेविलें असल्यामुळें, हे वीरा, सुख भोगण्यासच योग्य असलेल्या त्या देवीला दुःख होत आहे १३. रावणाच्या अंतःपुरामध्यें तिला अडकवून ठेविलें आहे. राक्षसींनीं तिचा फारच बंदोबस्त ठेविला आहे आणि त्या दीन सीतेनें आपल्या केसांचा अंबाडा बांधला असून ती एकसारिखें तुझेंच चिंतन करीत आहे १४. ती भूमीवर पडली आहे, थंडीचे दिवस आले असतां निस्तेज होऊन जाणाऱ्या कमलिनी-प्रमाणें ती निस्तेज झाली आहे आणि रावणापासून पराङ्मुख असलेली ती सीता मरणाचाच निश्चय करून बसलेली आहे १५. हे कुकुत्स्थकुलोत्पन्ना निष्पापा रामा, इक्ष्वाकुवंशाची कीर्ति मी हळू हळू गाऊं लागलों असतां मोठ्या प्रयत्नानें तुझे ठिकाणींच मनाचें लय लावून राहिलेली सीता देवी मोठ्या प्रयासानें माझ्या दृष्टीं पडली १६. हे पुरुषश्रेष्ठा, दृष्टीं पडल्यानंतर मीं तिला हळू हळू धीर दिला आणि तिच्याशीं संभाषण करून सर्व उद्देश मीं तिला कळविला १७. राम आणि सुग्रीव ह्यांमध्यें सख्य झाल्याचें श्रवण केल्यावर तिला हर्ष झाला. तिचें सदाचरण अगदीं एकसारिखें चाललें असून तिची भक्ति सर्वदां तुझेच ठिकाणीं आहे १८. हे

दृष्टा जनकनन्दिनी । उग्रेण तपसा युक्ता त्वद्भक्त्या पुरुषर्षभ १९ अभिज्ञानं च मे दत्तं यथावृत्तं तवान्तिके । चित्रकूटे महाप्राज्ञ वायसं प्रति राघव २० विज्ञाप्यः पुनरप्येष रामो वायुसुत त्वया । अखिलेन यथा दृष्टमिति मामाह जानकी २१ अयं चास्मै प्रदातव्यो यत्नात्सुपरिरक्षितः। ब्रुवता वचनान्येवं सुग्रीवस्योपशृण्वतः २२ एष चूडामणिः श्रीमान्मया ते यत्नरक्षितः। मनःशिलायास्तिलकं तत्स्मरस्वेति चाब्रवीत् २३ एष निर्यातितः श्रीमान्मया ते वारिसंभवः। एनं दृष्ट्वा प्रमोदिष्ये व्यसने त्वामिवानघ २४ जीवितं धारयिष्यामि मासं दशरथात्मज। ऊर्ध्वं मासान्न जीवेयं रक्षसां वशमागता २५ इति मामब्रवीत्सीता कृशाङ्गी धर्मचारिणी । रावणान्तःपुरे रुद्धा मृगीवोत्फुल्ललोचना २६ एतदेव मयाख्यातं सर्वं राघव यद्यथा । सर्वथा सागरजले संतारः प्रविधीयताम् २७ तौ जाताश्वासौ राजपुत्रौ विदित्वा

---

महाभाग्यवान् पुरुषश्रेष्ठा रामा, ह्याप्रमाणें तुझ्याविषयीं प्रेम आणि उग्र तपश्चर्या ह्यांनीं युक्त असलेली जनकनंदिनी सीता माझ्या दृष्टीं पडली १९. शिवाय, हे महाप्राज्ञ रघुवंशज रामा, चित्रकूटपर्वतावर तुझ्यासमीप काकपक्ष्यासंबंधानें घडलेला एक वृत्तांतही खूण पटण्याकरितां तिनें मला सांगितला आहे २०; आणि 'हे वायुपुत्रा, तू ज्याप्रमाणें माझी स्थिति अवलोकन केली आहेस त्याप्रमाणेंच ह्या रामाला तू पूर्णपणें निवेदन कर ' असेंही मला तिनें सांगितलें आहे " २१. सुग्रीव ऐकत असतांना असें बोलतां बोलतांच हनुमान् ह्मणाला " यत्नानें संरक्षण करून ठेविलेला हा मणि ह्याला द्यावयाचा आहे " २२. ह्यानंतर तो ह्मणाला " सीतेनें सांगितलें आहे कीं, 'हा भव्य चूडामणि मीं आपणांकरितां यत्नानें रक्षण करून ठेविला आहे हा आपण पहा आणि मनःशिलेचा तिलक आपण मला केला होतात त्याचीही आठवण करा २३. उदकामध्यें उत्पन्न झालेला हा भव्य चूडामणि मीं आपणाकडे परत पाठविला आहे. ही आपण पाठविलेली अंगठी पाहून संकटामध्यें आपलेंच दर्शन झाल्याप्रमाणें, हे निष्पाप, मी आपल्या मनाला आनंद मानीन २४. हे दशरथनंदन, एक महिनापर्यंत मी जीव ठेवीन. राक्षसांच्या अधीन होऊन राहिलेली मी एक महिन्यानंतर जीव ठेवणार नाहीं ' २५. ह्याप्रमाणें शरीरानें कृश, धर्मानें वागणारी आणि हरिणीप्रमाणें विकसित नेत्रांनीं युक्त असून सांप्रत रावणाच्या अंतःपुरामध्यें अडकून राहिलेली सीता मला ह्मणाली २६. असो. हे राघव, हें जसें होतें तसें सर्व मीं तुला निवेदन केलें आहे. आतां हरप्रयत्नानें समुद्राच्या उदकांतून तरून जाण्याचा विचार कर " २७. सारांश, त्या राजकुमार

तच्चाभिज्ञानं राघवाय प्रदाय। दृष्टा चाख्यातं सर्वमेवानुपूर्व्याद्वाचा संपूर्णं वायुपुत्रः शशंस २८ [ २८०४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

एवमुक्तो हनुमता रामो दशरथात्मजः। तं मणिं हृदये कृत्वा रुरोद सहलक्ष्मणः १ तं तु दृष्ट्वा मणिश्रेष्ठं राघवः शोककर्शितः। नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां सुग्रीवमिदमब्रवीत् २ यथैव धेनुः स्रवति स्नेहाद्वत्सस्य वत्सला। तथा ममापि हृदयं मणिश्रेष्ठस्य दर्शनात् ३ मणिरत्नमिदं दत्तं वैदेह्याः श्वशुरेण मे। वधूकाले यथा बद्धमधिकं मूर्ध्नि शोभते ४ अयं हि जलसंभूतो मणिः प्रवरपूजितः। यज्ञे परमतुष्टेन दत्तः शक्रेण धीमता ५ इमं दृष्ट्वा मणिश्रेष्ठं तथा तातस्य दर्शनम्। अद्यास्म्यवगतः सौम्य वैदेहस्य तथा विभोः ६ अयं हि शोभते तस्याः प्रियाया मूर्ध्नि मे मणिः। अद्यास्य दर्शनेनाहं प्राप्तां तामिव चिन्तये ७ किमाह सीता वैदेही ब्रूहि सौम्य पुनः पुनः। परासुमिव तोयेन सिञ्चन्ती वाक्यवारिणा ८ इतस्तु किं

---

रामलक्ष्मणांना धीर आला आहे असें समजून व राघवाला ती खूण देऊन वायुपुत्र हनुमानानें सीता देवीनें सांगितलेलें सर्वकांहीं पूर्णपणें अनुक्रमें मनुष्यवाचेनें रामाला कथन केलें २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां लक्ष्मणासहवर्तमान असलेला दशरथपुत्र राम तो मणि हृदयावर ठेऊन रडूं लागला १. ह्याप्रमाणें तो श्रेष्ठ मणि अवलोकन केल्यावर शोकाकुल झालेला राम अश्रूंनीं नेत्र भरून आले असतांना सुग्रीवाला म्हणाला २ " ज्याप्रमाणें वत्साच्या प्रेमामुळें दयाळु गाईला पान्हा फुटतो त्याप्रमाणें ह्या श्रेष्ठ रत्नाच्या दर्शनानें माझ्या हृदयाला पाझर फुटूं लागले आहेत ३. माझ्या श्वशुरानें हा श्रेष्ठ मणि विवाहसमयीं वैदेहीला दिलेला आहे आणि हा त्यावेळीं जेव्हां तिनें मस्तकीं धारण केला होता तेव्हां फारच शोभत होता ४. उदकामध्यें उत्पन्न झालेला व देवांनाही पूज्य असलेला हा मणि यज्ञामध्यें अतिशय संतुष्ट झालेल्या विचारी इंद्रानें दिला आहे ५. हा श्रेष्ठ मणि अवलोकन केल्यानें आज मला, हे विनयसंपन्न सुग्रीवा, पित्याचें आणि त्याचप्रमाणें प्रभु विदेहाधिपति जनकाचें स्मरण झालें ६. त्या माझ्या प्रियेच्या मस्तकीं हा मणि शोभत असतो आणि ह्याचें आज दर्शन झाल्यामुळें ती प्रियाच प्राप्त झाल्यासारिखें मला वाटत आहे ७. हे सौम्य, मृतप्राय झालेल्या मला संभाषणरूप उदकानें सिंचन करणारी विदेहराजकन्या सीता

दुःखतरं यमिमं वारिसंभवम् । मणिं पश्यामि सौमित्रे वैदेहीमागतं विना ९ चिरं जीवति वैदेही यदि मासं धारिष्यति । क्षणं वीर न जीवेयं विना तामसितेक्षणाम् १० नय मामपि तं देशं यत्र दृष्टा मम प्रिया । न तिष्ठेयं क्षणमपि प्रवृत्तिमुपलभ्य च ११ कथं सा मम सुश्रोणी भीरुभीरुः सती तदा । भयावहानां घोराणां मध्ये तिष्ठति रक्षसाम् १२ शारदस्तिमिरान्मुक्तो नूनं चन्द्र इवाम्बुदैः । आवृतो वदनं तस्या न विराजति सांप्रतम् १३ किमाह सीता हनुमंस्तत्त्वतः कथयस्व मे । एतेन खलु जीविष्ये भेषजेनातुरो यथा १४ मधुरा मधुरालापा किमाह मम भामिनी । मद्विहीना वरारोहा हनुमन्कथयस्व मे १५ दुःखाद्दुःखतरं प्राप्य कथं जीवति जानकी १६ [ २८२० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥

एवमुक्तस्तु हनुमान्राघवेण महात्मना । सीताया भाषितं सर्वं न्यवेदयत

---

काय ह्मणाली तें तूं मला फिरून फिरून सांग ८. हे लक्ष्मणा, सीतेवांचून हा उदकामध्यें उत्पन्न झालेला मणि आज माझ्या दृष्टीं पडत आहे ह्यापेक्षां अधिक दुःखावह तें काय असणार! ९. सीता एक महिनाभर जिवंत राहील तर ती चिरजीविनीच आहे असें मी समजतों. कारण, हे वीरा, कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेवांचून एक क्षणभरही जिवंत रहाण्यास मी समर्थ नाहीं १०. जेथें माझी प्रिया दृष्टीं पडली त्या ठिकाणीं मलाही घेऊन जा. तिची वार्ता समजल्यावर एक क्षणभरही मला तिच्यावांचून रहावणार नाहीं ११. भयावह आणि घोर अशा राक्षसांमध्यें भित्र्यांतली भित्री असलेली ती माझी सुंदरी कशी बरें राहिली आहे ? १२. अंधकारापासून मुक्त झालेला शरदृतूंतील चंद्र मेघांनीं व्याप्त झाला असतां ज्याप्रमाणें प्रकाशत नाहीं त्याप्रमाणें सांप्रत तिचें मुख खरोखरच प्रकाशत नसेल १३. हे हनुमाना, सीता काय ह्मणाली हें तूं मला खरें खरें सांग. कारण, रोगग्रस्त पुरुष ज्याप्रमाणें औषधाच्या योगानें जिवंत रहाण्याची इच्छा धरीत असतो त्याप्रमाणें ह्याच्याच योगानें खरोखर मला जगण्याची आशा आहे १४. हे हनुमाना, रूपानें मनोहर आणि मधुर भाषण करणारी ती माझा वियोग झालेली सुंदरी स्त्री मला काय ह्मणाली,' हें तूं मला सांग १५. वनवासाच्या दुःखाहून अधिक दुःसह दुःख प्राप्त झालें असतां ती जानकी जिवंत तरी कशी राहिली आहे " ? १६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

ह्याप्रमाणें महात्मा राम हनुमानाला ह्मणाला असतां सीतेचें सर्व कांहीं भाषण हनुमानानें

राघवे १ इदमुक्तवती देवी जानकी पुरुषर्षभ। पूर्ववृत्तमभिज्ञानं चित्रकूटे यथातथम् २ सुखसुप्ता त्वया सार्धं जानकी पूर्वमुत्थिता। वायसः सहसोत्पत्य विददार स्तनान्तरम् ३ पर्यायेण च सुप्तस्त्वं देव्यङ्के भरताग्रजः। पुनश्च किल पक्षी स देव्या जनयति व्यथाम् ४ ततः पुनरुपागम्य विददार भृशं किल। ततस्त्वं बोधितस्तस्याः शोणितेन समुक्षितः ५ वायसेन च तेनैवं सततं बाध्यमानया। बोधितः किल देव्या त्वं सुखसुप्तः परन्तप ६ तां च दृष्ट्वा महाबाहो दारितां च स्तनान्तरे। आशीविष इव क्रुद्धस्ततो वाक्यं त्वमूचिवान् ७ नखाग्रैः केन ते भीरु दारितं वै स्तनान्तरम्। कः क्रीडति सरोषेण पञ्चवक्त्रेण भोगिना ८ निरीक्षमाणः सहसा वायसं समुदैक्षथाः। नखैः सरुधिरैस्तीक्ष्णैस्तामेवाभिमुखं स्थितम् ९ सुतः किल स शक्रस्य वायसः पततां वरः। धरान्तरगतः शीघ्रं पवनस्य गतौ समः १० ततस्तस्मिन्महाबाहो कोपसंवर्तितेक्षणः। वायसे त्वं व्यधाः क्रूरां मतिं मतिमतां वर ११ स

---

रामाला कथन केलें १. (तो ह्मणाला) "हे पुरुषश्रेष्ठा, चित्रकूटपर्वतावर पूर्वी घडलेली ही एक गोष्ट खुणेकरितां देवी जानकीनें अगदीं हुबहुब सांगितली आहे २. तुझ्यासहवर्तमान गाढ निद्रिस्थ झालेली जानकी पूर्वी उठून पाहूं लागली तों काकपक्ष्यानें एकाएकीं झडप घालून तिचें वक्षस्थल विदीर्ण केलें ३. नंतर तूंही भरताग्रज पाळीप्रमाणें सीतादेवीच्या अंकावर निद्रिस्थ झालास. तेव्हां पुनरपि तो पक्षी देवीला पीडा देऊं लागला ४. सारांश, पुनरपि तिनें झडप घालून खरोखर तिचें वक्षःस्थल अतिशय ओरखाडिलें असतां तिचें रक्त अंगावर पडल्यामुळें तूं जागा झालास ५. सारांश, हे शत्रुतापना रामा, तो काकपक्षी ह्याप्रमाणें एकसारिखा तिला पीडा देऊं लागला असतां गाढ निद्रिस्थ असलेल्या तुला त्या देवीनें उठविलें ६. नंतर, हे महापराक्रमी रामा, वक्षःस्थलाचे ठिकाणीं तिला ओरखडलेली पाहून तूं सर्पाप्रमाणें क्रुद्ध झालास आणि तिला ह्मणालास ७ 'हे भीरु, नखांच्या अग्रांनीं तुझ्या वक्षःस्थलावर ओरखडे कोणीं केले आहेत? अरे, क्रुद्ध झालेल्या पंचमुखी नागाबरोबर कोण अतिप्रसंग करीत आहे?' ८. असें ह्मणून तूं जेव्हां इकडे तिकडे पाहूं लागलास तेव्हां रक्तानें तीक्ष्ण नखें भरलीं असतांना तिच्याच संमुखस्थित असलेला काकपक्षी एकाएकीं तुझ्या दृष्टीं पडला ९. इंद्राचा पुत्र असलेला तो पक्षिश्रेष्ठ वायस गतीमध्यें वायूची बरोबरी करणारा असल्यामुळें सत्वर पातालांत गेला १०. तेव्हां, हे बुद्धिमानामध्यें श्रेष्ठ महापराक्रमी

दर्भसंस्तराद्गृह्य ब्रह्मास्त्रेण न्ययोजयः। स दीप्त इव कालाग्निर्जज्वालाभि-
मुखं खगम् १२ स त्वं प्रदीप्तं चिक्षेप दर्भं तं वायसं प्रति। ततस्तु वायसं
दीप्तः स दर्भोनुजगाम ह १३ भीतैश्च संपरित्यक्तः सुरैः सर्वैश्च वायसः।
त्रील्लोँकान्संपरिक्रम्य त्रातारं नाधिगच्छति १४ पुनरप्यागतस्तत्र त्वत्स-
काशमरिन्दम। त्वं तं निपतितं भूमौ धरण्यां शरणागतम् १५ वधार्ह-
मपि काकुत्स्थ कृपया परिपालयः। मोघमस्त्रं न शक्यं तु कर्तुमित्येव
राघव १६ ततस्तस्याक्षि काकस्य हिनस्ति स्म स दक्षिणम्। वाय-
सस्त्वां नमस्कृत्य राज्ञो दशरथस्य च १७ विसृष्टस्तु तदा काकः प्रति-
पेदे स्वमालयम्। एवमस्त्रविदां श्रेष्ठः सत्त्ववाञ्छीलवानपि १८ किमर्थ-
मस्त्रं रक्षःसु न योजयसि राघव। न दानवा न गन्धर्वा नासुरा न मरु-
द्गणाः १९ तव राम रणे शक्तास्तथा प्रतिसमासितुम्। तव वीर्यवतः
कच्चिन्मयि यद्यस्ति संभ्रमः २० क्षिप्रं सुनियतैर्बाणैर्हन्यतां युधि रावणः।

---

रामा, त्या काकपक्ष्यासंबंधानें तुझ्या मनामध्यें क्रूर विचार आला असतां ११ दर्भांच्या आस्तरणांतील एक दर्भ घेऊन तूं तो ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रित केलास व तो प्रलयकालच्या प्रदीप्त अग्नीप्रमाणें संमुख असलेल्या पक्ष्याला अनुलक्षून जळूं लागला १२. तूं तो प्रदीप्त दर्भ त्या काकपक्ष्याला उद्देशून टाकिलास तेव्हां तो त्या पक्ष्याच्या मागोमाग जाऊं लागला १३. सर्व देवांनींही भयभीत होऊन त्या काकपक्ष्याचा त्याग केला आणि अशा रीतीनें त्रैलोक्यामध्यें हिंडूनही त्या काकपक्ष्याला कोणी त्राता आढळेनासा झाला १४. तेव्हां, हे शत्रुदमना, पुनरपि तो तिकडे तुझ्याजवळ आला असतां भूमीवर पडून लोटांगणें घालीत असलेल्या त्या १५ वधालाही योग्य असलेल्या काकपक्ष्याचें, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं कृपेनें परिपालन केलेंस. हे राघवा, अस्त्र सोडिलेलें व्यर्थ होणें शक्य नाहीं, एवढ्याच करितां १६ त्या काकपक्ष्याचा उजवा डोळा त्या बाणानें नाहींसा केला, नंतर तूं सोडून दिल्यावर तुला व दशरथराजाला नमस्कार करून तो काकपक्षी आपल्या निवासस्थानाकडे निघून गेला. सारांश, ह्याप्रमाणें तूं अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, धैर्यवान् आणि सुशील असूनही १७,१८, हे राघवा, राक्षसांवर तूं अस्त्रप्रयोग कां करीत नाहींस? दानव, गंधर्व, असुर आणि मरुद्गण ह्यांपैकीं १९ कोणीही, हे रामा, संग्रामामध्यें तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहींत. ह्यास्तव, माझेविषयीं जर तुज वीर्यवानाला कांहीं काळजी असेल २० तर चांगल्या निश्चित बाणांनीं संग्रामामध्यें तूं रावणाचा सत्वर वध कर. आत्याची आज्ञा आहे

भ्रातुरादेशमाज्ञाय लक्ष्मणो वा परन्तपः २१ स किमर्थं नरवरो न मां रक्षति राघवः । शक्तौ तौ पुरुषव्याघ्रौ वाय्वग्निसमतेजसौ २२ सुराणामपि दुर्धर्षौ किमर्थं मामुपेक्षतः । ममैव दुष्कृतं किंचिन्महदस्ति न संशयः २३ समर्थौ सहितौ यन्मां न रक्षेते परन्तपौ । वैदेह्या वचनं श्रुत्वा करुणं साधुभाषितम् २४ पुनरप्यहमार्यां तामिदं वचनमब्रुवम् । त्वच्छोकविमुखो रामो देवि सत्येन ते शपे २५ रामे दुःखाभिभूते च लक्ष्मणः परितप्यते । कथंचिद्भवती दृष्टा न कालः परिशोचितुम् २६ इदं मुहूर्तं दुःखानामन्तं द्रक्ष्यसि भामिनि । तावुभौ नरशार्दूलौ राजपुत्रौ परन्तपौ २७ त्वद्दर्शनकृतोत्साहौ लङ्कां भस्मीकरिष्यतः । हत्वा च समरे रौद्रं रावणं सहबान्धवम् २८ राघवस्त्वां वरारोहे स्वपुरीं नयिता ध्रुवम् । यत्तु रामो विजानीयादभिज्ञानमनिन्दिते २९ प्रीतिसंजननं तस्य प्रदातुं तत्त्वमर्हसि । साभिवीक्ष्य दिशः सर्वा वेण्युद्ग्रथनमुत्तमम् ३० मुक्त्वा वस्त्राद्ददौ मह्यं मणिमेतं महाबल । प्रतिगृह्य मणिं दोर्भ्यां तव

---

असें समजून तो पुरुषश्रेष्ठ व रघुवंशज शत्रुतापन लक्ष्मण तरी कशाकरितां माझें रक्षण करीत नाहीं ? तेजामध्यें वायु आणि अग्नि ह्यांची बरोबरी करणारे ते उभयतां पुरुषश्रेष्ठ माझें रक्षण करण्यास समर्थ असून २१, २२ देवांनाही अजिंक्य आहेत. मग कशाकरितां बरें ते माझी उपेक्षा करीत आहेत ? ज्याअर्थी ते दोघेही शत्रुतापन भ्राते समर्थ असूनही माझें रक्षण करीत नाहींत त्याअर्थी माझेंच कांहींतरी पाप आड आलें आहे ह्यांत संशय नाहीं. दीनपणानें केलेलें हें उत्कृष्ट भाषण ऐकून घेऊन २३, २४ मी त्या साध्वीला पुनरपि असें ह्मणालों कीं, ' हे देवि, तुझ्या शोकामुळें रामाला दुसरें कांहीं सुचेनासें झालें आहे हें मी तुला शपथपूर्वक खरें सांगतों २५. ( रामच नुसता दुःखाकुल होऊन राहिला आहे असें नाहीं; परंतु, ) राम दुःखाकुल झाल्यामुळें लक्ष्मणही शोकग्रस्त झाला आहे. परंतु, आतां शोक करण्याची वेळ राहिली नाहीं. कारण, कसें तरी तुझें दर्शन झालें आहे २६. आतां, हे भामिनि, ह्या घटकेलाच तुझी इच्छा असल्यास सर्व दुःखांचा अंत झाल्याचें तूं अवलोकन करशील. ते उभयतां शत्रुतापन व पुरुषश्रेष्ठ राजपुत्र २७ तुझ्या दर्शनाविषयीं उत्सुक झाल्यामुळें लंका भस्म करून टाकितील. इतकेंच नव्हे परंतु, संग्रामामध्यें क्रूर रावणाचा बांधवांसहवर्तमान वध करून २८, हे सुंदरि, राघव निःसंशय तुला आपल्या राजधानीला घेऊन जाईल. ह्यास्तव, हे अनिंदिते, रामाला पटेल अशी एकादी त्याला आनंद देणारी खूण तूं माझ्यापाशीं

हेतो रघुप्रिय ३१ शिरसा संप्रणम्यैनामहमागमने त्वरे । गमने च कृतो-
त्साहमवेक्ष्य वरवर्णिनी ३२ विवर्धमानं च हि मामुवाच जनकात्मजा ।
अश्रुपूर्णमुखी दीना बाष्पगद्गदभाषिणी ३३ ममोत्पतनसंभ्रान्ता शोक-
वेगसमाहता । मामुवाच ततः सीता सभाग्योसि महाकपे ३४ यद्द्रक्ष्यसि
महाबाहुं रामं कमललोचनम् । लक्ष्मणं च महाबाहुं देवरं मे यशस्वि-
नम् ३५ सीतयाप्येवमुक्तोहमब्रुवं मैथिलीं तथा । पृष्ठमारोह मे देवि
क्षिप्रं जनकनन्दिनि ३६ यावत्ते दर्शयाम्यद्य ससुग्रीवं सलक्ष्मणम् ।
राघवं च महाभागे भर्तारमसितेक्षणे ३७ साब्रवीन्मां ततो देवी
नैष धर्मो महाकपे । यत्ते पृष्ठं सिषेवेहं स्ववशा हरिपुङ्गव ३८
पुरा च यदहं वीर स्पृष्टा गात्रेषु रक्षसा । तत्राहं किं करिष्यामि काले-
नोपनिपीडिता ३९ गच्छ त्वं कपिशार्दूल यत्र तौ नृपतेः सुतौ । इत्येवं
सा समाभाष्य भूयः संदेष्टुमास्थिता ४० हनूमन्सिंहसंकाशौ तावुभौ

---

दे.' असें मीं ह्मटल्यावर चोहोंकडे पाहून वेणीमध्यें गुंफण्यास योग्य असा हा उत्कृष्ट मणि वस्त्रांतून सोडून, हे महाबलाढ्य रामा, तिनें मला दिला; आणि, हे रघुप्रिय, तुझ्याकरितां तो मणि हातांत घेऊन २९,३०,३१ व तिला मस्तकानें प्रणाम करून मी इकडे येण्याविषयीं त्वरा करूं लागलों. तेव्हां जाण्याविषयीं उत्सुक होऊन वृद्धिंगत होऊं लागलेल्या माझ्याशीं ती सुंदरी दीन जनककन्या बोलूं लागली. तिचें मुख अश्रूंनीं भरून गेलें होतें आणि अश्रूंनीं कंठ दाटून आला असल्यामुळें तिच्या मुखांतून शब्दही कंपयुक्तच निघत होते ३२,३३. असो. प्रचंड शोकामुळें व्याप्त झालेली आणि मी इतक्यांत उड्डाण करून जाईन कीं काय ह्मणून गोंधळून गेलेली ती सीता मला ह्मणाली 'हे महाकपे, तूं भाग्यवान् आहेस ३४; कारण, कमलनयन राम आणि माझा यशस्वी दीर महापराक्रमी लक्ष्मण तूं आतां अवलोकन करिशील' ३५. ह्याप्रमाणें सीता बोलली असतां मी त्या मैथिलीला ह्मणालों 'हे देवि, हे जनकनंदिनि, तूं सत्वर माझ्या पाठीवर बैस कशी ३६. ह्मणजे, हे कृष्णनयने महाभाग्यवति सीते, मी आजच्या आजच सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान तुला रामाचें दर्शन करवितों' ३७. ह्यानंतर ती देवी मला ह्मणाली 'हे महावानरा, हे वानरश्रेष्ठा, मी स्वतंत्र होऊन तुझ्या पृष्ठभागावर आरोहण करणें हा धर्म नव्हे ३८. हे वीरा पूर्वी माझ्या शरीराला राक्षसाचा स्पर्श झाला आहे खरा; परंतु, काळाच्या तावडींत सांपडल्यामुळें माझा तेथें काय उपाय आहे? ३९. ह्यास्तव, हे वानरश्रेष्ठा, जिकडे ते राजकुमार आहेत तिकडे तूं जा'. ह्याप्रमाणें मला सांगून ती पुनरपि निरोप सांगण्यास तयार

रामलक्ष्मणौ । सुग्रीवं च सहामात्यं सर्वान्ब्रूया अनामयम् ४१ यथा च स महाबाहुर्मां तारयति राघवः । अस्माद्दुःखाम्बुसंरोधात्त्वमाख्यातुमर्हसि ४२ इदं च तीव्रं मम शोकवेगं रक्षोभिरेभिः परिभर्त्सनं च । ब्रूयास्तु रामस्य गतः समीपं शिवश्च तेऽध्वास्तु हरिप्रवीर ४३ एतत्तवार्या नृप संयता सा सीता वचः प्राह विषादपूर्वम् । एतच्च बुद्ध्वा गदितो यथा त्वं श्रद्धत्स्व सीतां कुशलां समग्राम् ४४ [ २८६४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः ॥ ६७ ॥

अथाहमुत्तरं देव्या पुनरुक्तः ससंभ्रमम् । तव स्नेहान्नरव्याघ्र सौहार्दादनुमान्य च १ एवं बहुविधं वाच्यो रामो दाशरथिस्त्वया । यथा मां प्राप्नुयाच्छीघ्रं हत्वा रावणमाहवे २ यदि वा मन्यसे वीर वसैकाहमरिन्दम । कस्मिंश्चित्संवृते देशे विश्रान्तः श्वो गमिष्यसि ३ मम चाप्यल्पभाग्यायाः सांनिध्यात्तव वानर । अस्य शोकविपाकस्य मुहूर्तं स्याद्वि-

झाली आणि ह्मणाली ४० 'हे हनुमाना, हे सिंहतुल्य उभयतां रामलक्ष्मण आणि अमात्यांसहवर्तमान सुग्रीव ह्या सर्वांना तूं माझ्या वतीनें कुशल प्रश्न कर ४१ आणि ज्यारीतीनें तो महापराक्रमी रघुवंशज राम ह्या दुःखसागराच्या कचाट्यांतून मला तारील त्यारीतीनें तूं त्याला माझा वृत्तांत निवेदन कर ४२. हे वानरश्रेष्ठा, हा माझा अति तीव्र शोकवेग आणि ह्या राक्षसांकडून होत असलेली ही माझी निर्भर्त्सना तूं रामासमीप गेल्यावर सांग. तुला मार्ग सुखावह होवो' ४३. हे राजा, शुद्ध आचरणानें असलेल्या त्या साध्वी सीतेनें खेदपूर्वक तुला हा निरोप सांगितला आहे. ह्यास्तव, तूं ह्याचा विचार कर आणि मीं तुला सांगितल्याप्रमाणें सीता अगदीं सर्वस्वीं कुशल आहे असा माझ्या बोलण्यावर तूं विश्वास ठेव ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६७ ॥

तदनंतर, हे पुरुषश्रेष्ठा, मला इकडे येण्याला अनुज्ञा दिल्यावर तुझे ठिकाणीं प्रेम असल्यामुळें ती देवी पुनरपि घाई घाईनें मला ह्मणाली १ " ह्याप्रमाणें दाशरथि रामाला पुष्कळ प्रकारानें तूं सांग आणि संग्रामामध्यें रावणाचा वध करून ज्यारीतीनें तो सत्वर मला भेटेल अशी तजवीज कर २. अथवा, हे शत्रुदमना वीरा, येथें रहाण्याचा मानस असेल तर एक दिवस येथें कां राहीनास ? एकाद्या गुप्त प्रदेशामध्ये विश्रांति घेऊन उद्यां जा ह्मणजे झालें ३. हे वानरा, असें झालें असतां तुझ्या सांनिध्यामुळें मज भाग्यहीन स्त्रीची एक घटकाभर तरी ह्या प्रचंड शोकापासून मुक्तता

मोक्षणम् ४ गते हि त्वयि विक्रान्त पुनरागमनाय वै। प्राणानामपि संदेहो मम स्याच्चात्र संशयः ५ तवादर्शनजं चापि भयं मां परितापयेत्। दुःखा-दुःखपराभूतां दुर्गतां दुःखभागिनीम् ६ अयं च वीर संदेहस्तिष्ठतीव ममाग्रतः। सुमहांस्त्वत्सहायेन हर्यृक्षेषु असंशयः ७ कथं नु खलु दुष्पारं तरिष्यन्ति महोदधिम्। तानि हर्यृक्षसैन्यानि तौ वा नरवरात्मजौ ८ त्रयाणामेव भूतानां सागरस्येह लङ्घने। शक्तिः स्याद्वैनतेयस्य वायोर्वा तव चानघ ९ तदस्मिन्कार्यनियोगे वीरैवं दुरतिक्रमे। किं पश्यसि समाधानं ब्रूहि वाक्यविदां वर १० काममस्य त्वमेवैकः कार्यस्य परिसाधने। पर्याप्तः परवीरघ्न यशस्यस्ते बलोदयः ११ बलैः समग्रैर्यदि मां हत्वा रावणमाहवे। विजयी स्वपुरीं रामो नयेत्तत्स्याद्यशस्करम् १२ यथाहं तस्य वीरस्य वनादुपधिना हृता। रक्षसा तद्भयादेव तथा नार्हति राघवः १३ बलैस्तु संकुलां कृत्वा लङ्कां परबलार्दनः। मां नयेद्यदि काकुत्स्थस्तत्तस्य

---

होईल ४. नाहींतर, हे महापराक्रमी हनुमाना, आतां तूं एकदां येथून निघून गेलास ह्मणजे फिरून येईतोंपर्यंत माझे प्राण रहाण्याचाही संदेहच आहे; ह्यांत संशय नाहीं ५. हे वीरा, तूं दृष्टीआड झालास ह्मणजे एका दुःखांतून सुटून दुसऱ्या दुःखांत पडल्यामुळें दुर्दशेस पोंचलेल्या मज दुःखभागिनीला फारच भीति वाटूं लागेल ६. हे वीरा, तूं जरी साहाय्यकर्ता आहेस तरी वानर आणि ऋक्ष ह्यांविषयीं एक फारच मोटी शंका माझ्या डोळ्यापुढें जशी कांहीं अगदीं दत्त उभी आहे आणि ती शंका निःसंशय मला खरीही दिसत आहे ७. तीं ऋक्षवानरांचीं सैन्यें अथवा ते राजपुत्र खरोखर दुस्तर महासागर कसे तरून येतील? ८. हे निष्पापा, गरुड, वायु आणि तूं ह्या तीनच प्राण्यांचे ठिकाणीं ह्या जगतामध्यें समुद्र उल्लंघन करण्याचें सामर्थ्य आहे ९. तस्मात्, हे वीरा, पुढें येऊन पडलेल्या ह्या दुस्तर कार्यांतून पार पडण्याला, हे उपायवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, तुला काय उपाय दिसत आहे तो तूं मला सांग १०. हे शत्रुपक्षीयवीरघातका, हें कार्य पार पाडण्यास तूंच एकटा खरोखर समर्थ आहेस व तुझें बल प्रशंसनीय आहे ११. परंतु, संपूर्ण सैन्यांसहवर्तमान संग्रामामध्यें रावणाचा वध करून आणि ह्मणूनच विजयी होऊन जर राम मला आपल्या राजधानीमध्यें घेऊन जाईल तर तें करणें त्याला यशस्कर होईल १२. ज्याप्रमाणें राक्षसानें कपट करून त्या वीराच्या वनांतून मला हरण करून आणिलें, त्याप्रमाणें त्याच्या भीतीनें मला तशाच रीतीनें येथून परत नेणें रामाला योग्य नाहीं १३. शत्रुसैन्याचा नाश करणारा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम सैन्यांच्या योगानें लंका ग्रस्त करून जर मला घेऊन जाईल

सदृशं भवतु १४ तद्यथा तस्य विक्रान्तमनुरूपं महात्मनः । भवत्याहव-
शूरस्य तथा त्वमुपपादय १५ तदर्थोपहितं वाक्यं प्रश्रितं हेतु-
संहितम् । निशम्याहं ततः शेषं वाक्यमुत्तरमब्रुवम् १६ देवि
हर्यृक्षसैन्यानामीश्वरः प्लवतां वरः । सुग्रीवः सत्त्वसंपन्नस्त्वदर्थे कृत-
निश्चयः १७ तस्य विक्रमसंपन्नाः सत्त्ववन्तो महाबलाः । मनःसंकल्पस-
दृशा निदेशे हरयः स्थिताः १८ येषां नोपरि नाधस्तान्न तिर्यक्सज्जते
गतिः । न च कर्मसु सीदन्ति महत्स्वमिततेजसः १९ असकृत्तैर्महाभागै-
र्वानरैर्बलसंयुतैः । प्रदक्षिणीकृता भूमिर्वायुमार्गानुसारिभिः २० मद्विशि-
ष्टाश्च तुल्याश्च सन्ति तत्र वनौकसः । मत्तः प्रत्यवरः कश्चिन्नास्ति
सुग्रीवसंनिधौ २१ अहं तावदिह प्राप्तः किं पुनस्ते महाबलाः । न हि
प्रकृष्टाः प्रेष्यन्ते प्रेष्यन्ते हीतरे जनाः २२ तदलं परितापेन देवि मन्युर-
पैतु ते । एकोत्पातेन ते लङ्कामेष्यन्ति हरियूथपाः २३ मम पृष्ठगतौ तौ
च चन्द्रसूर्याविवोदितौ । त्वत्सकाशं महाभागे नृसिंहावागमिष्यतः २४

---

तर तें त्याच्या योग्यतेला शोभेल १४. ह्यास्तव, त्या रणशूर महात्म्याला अनुरूप असा पराक्रम त्याच्या हातून होईल अशी तूं व्यवस्था कर" १५. अर्थ आणि हेतु ह्यांनीं भरलेलें तें विनय युक्तभाषण श्रवण करून मीं शेवटचें उत्तर सांगितलें कीं १६ " हे देवि, वानर आणि ऋक्ष ह्यांच्या सैन्यांचा अधिपति वानरश्रेष्ठ सुग्रीव धैर्यवान् असून तुला नेण्याविषयीं त्याचा निश्चय झालेला आहे १७. पराक्रमी, धैर्यवान् , महाबलाढ्य आणि मनोरथाप्रमाणें वेगवान् असे वानर त्याच्या आज्ञेंत आहेत १८. उर्ध्वभागीं, अधोभागीं अथवा आजूबाजूस त्यांची गति कुंठित होत नाहीं आणि मोठीं मोठीं कार्यें पुढें येऊन पडलीं असतां- नाही त्या अतुलतेजस्वी वानरांचें कधीं धैर्य खचत नाहीं १९. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या बलाढ्य महाभाग्यवान् वानरांनीं अनेक वेळां पृथ्वीला प्रदक्षिणा केली आहे" २०. माझ्यापेक्षां अधिक आणि माझ्याबरोबरीचे असेच वानर तेथें आहेत. माझ्याहून कमी असा कोणीही सुग्रीवाजवळ नाहीं २१. आतां यःकश्चित् मी सुद्धां जर येथें आलों आहें तर त्या महाबलाढ्य वानरांची गोष्ट पाहिजे कशाला ? हलक्यासलक्या कामाकरितां मोठ्यामोठ्यांना पाठविणें योग्य नाहीं; साधारणच सेवक क्षुल्लक कामाला पाठवीत असतात ( ह्मणून मी यःकश्चित येथें आलों आहें ) २२. तस्मात्, हे देवि, तुला काळजी करण्याचें कारण नाहीं. तूं चिंता करूं नको. ते वानरसेनाधिपति एका उडीबरोबर लंकेमध्यें येतील २३. हे महाभाग्यवति,

अरिघ्नं सिंहसंकाशं क्षिप्रं द्रक्ष्यसि राघवम् । लक्ष्मणं च धनुष्मन्तं लङ्का-द्वारमुपागतम् २५ नखदंष्ट्रायुधान्वीरान्सिंहशार्दूलविक्रमान् । वानरान्वारणेन्द्राभान्क्षिप्रं द्रक्ष्यसि संगतान् २६ शैलाम्बुदनिकाशानां लङ्कामलयसानुषु । नर्दतां कपिमुख्यानां न चिराच्छ्रोष्यसे स्वनम् २७ निवृत्तवनवासं च त्वया सार्धमरिन्दमम् । अभिषिक्तमयोध्यायां क्षिप्रं द्रक्ष्यसि राघवम् २८ ततो मया वाग्भिरदीनभाषिणी शिवाभिरिष्टाभिरभिप्रसादिता । उवाह शान्तिं मम मैथिलात्मजा तवातिशोकेन तथातिपीडिता २९ [ २८९३] [१४४९७]* इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥ ६८ ॥

॥ इति श्रीरामायणे सुन्दरकाण्डं समाप्तम् ॥ ५ ॥

---

उदय पावलेल्या चंद्रसूर्यांप्रमाणें ते पुरुषश्रेष्ठ माझ्या पाठीवर बसून तुझ्यासमीप येतील २४. शत्रुघातक सिंहतुल्य राम आणि धनुर्धारी लक्ष्मण लंकेच्या द्वाराशीं आल्याचें तूं सत्वर अवलोकन करशील २५; नखें आणि दांत हींच ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र ह्यांप्रमाणें ज्यांचे पराक्रम आहेत आणि गजेंद्रांप्रमाणें जे धिप्पाड आहेत असे वानरवीर एकत्र जुळलेले लवकरच तुझ्या दृष्टीं पडतील २६; पर्वतांप्रमाणें आणि मेघांप्रमाणें असलेले वानरश्रेष्ठ लंकेंतील मलयपर्वताच्या शिखरांवर गर्जना करूं लागले असतां लवकरच त्यांचा ध्वनि तुझ्या कानीं येईल २७ आणि तुझ्यासहवर्तमान शत्रुदमन रघुवंशज रामाला वनवास संपून अयोध्येमध्यें राज्याभिषेक झाल्याचें तुझ्या सत्वरच दृष्टोत्पत्तीस येईल" २८. ह्याप्रमाणें शुभ व इष्ट अशा शब्दांनीं मीं तिचें सांत्वन केलें असतां तुझ्या शोकामुळें अतिशय व्याकुळ झालेलीही ती मिथिलराजकन्या सीता दैन्यरहित भाषण करूं लागली आणि माझें भाषण ऐकून तिनें दुःख करण्याचें सोडून दिलें २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६८ ॥

॥ ह्या ठिकाणीं सुंदरकांडही संपूर्ण झालें ५ ॥

---

* अयोध्याकांडांतील १९ व्या सर्गाचे शेवटीं दिलेली बेरीज एकानें कमी आहे; अरण्यकांडांतील ९ व्या सर्गाचे शेवटीं दिलेल्या बेरजेंत प्रथम अंक दोन पाहिजे तो पांच पडला आहे व तीच चूक ५५ व्या सर्गापर्यंत होत गेली आहे. ५६ व्या सर्गाचे शेवटीं ती चूक सुधारून बेरीज दिली आहे. तथापि ती बेरीज दोहोंनीं कमी आहे; किष्किंधाकांडांतील ३५ व्या सर्गाचे शेवटीं दिलेली बेरीज तिहींनीं जास्त आहे आणि सुंदरकांडांत ४२ व्या सर्गापासून बेरीज चुकली आहे ती ६५ व्या सर्गाला बरोबर करून घेतली आहे व पांचही कांडांतील श्लोकांची एकंदर बरोबर बेरीज १४४९७ होते ती येथें दिली आहे.